# शास्त्रीय मराठी व्याकरण.

[ उद्घाटन व ऊहापोह ]

पूर्वार्ध व उत्तरार्धासह संपूर्ण ग्रंथ.

---

लेखक

**मोरो केशव दामले, एम्. ए.**

सुपरिंटेंडंट, नील्सिटीस्कूल—नागपूर.

---

आवृत्ति दुसरी

---

प्रकाशक

**केशव भिकाजी ढवळे, बुकसेलर.**

ठाकुरद्वार—मुंबई.

---

सन १९२५ इ.

---

हें पुस्तक दामोदर सांवळाराम यंदे यांनीं नं. ३८८ ठाकुरद्वार रोड, मुंबई येथें 'इंदुप्रकाश' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

---

किंमत ● रुपये

# अभिप्राय.

## रा. सा. विष्णु मोरेश्वर महाजनी एम. ए. ह्यांचा अभिप्राय.

I have read a large portion of a new Marathi Grammar by Mr. Moro Keshav Damle. It evinces careful thought and weighing of conflicting opinions. The treatment of the subject is throughout logical—in parts it is original. Unless the author receives patronage it will be impossible for him to get the book published. That the book deserves patronage I have not the slightest hesitation in saying.

(Sd.) Vishnu M. Mahajani M. A.

Akola,
28th August 1909

Retired Edl. Inspector H. A. D.
Akola, Berar.
and
Fellow of the University of Allahabad.

---

सूचना:—सदर पुस्तकाची ही दुसरी आवृत्ति असून तिचा प्रसार सर्वत्र व्हावा अशा उद्देशानें या आवृत्तीपुरता आमच्याकडे असलेला हक्क रा. केशव भिकाजी ढवळे, बुकसेलर–ठाकुरद्वार—मुंबई, यांस आम्ही दिलेला आहे.

दामोदर सांवळाराम यंदे, मूळप्रकाशक.



# उपक्रम.

—:o:—

१. शास्त्रीय मराठी व्याकरणाचा हा पूर्वार्ध होय. निवळ व्याकरणाचें निरूपण मोठ्या ठशांनीं छापिलें असून, तत्संबंधाच्या टीपा बारीक ठशांनीं छापिल्या आहेत; आणि या विषयांतील प्रश्नांचा ऊहापोह बारीक ठशांनीं छापिला असून, प्रत्येक ऊहापोहाचे आरंभीं व अन्तीं आद्यन्तसूचक [ ] असा कंस घातला आहे. त्यायोगें उद्घाटन व ऊहापोह भिन्नपणें सहज समजतील.

२. प्रचलित मराठीच्या व्याकरणांत दादोबा, कृष्णशास्त्री चिपळूणकर, व कृष्णशास्त्री गोडबोले, हीं नांवें चिरायु झाल्याशिवाय राहणार नाहींत. दादोबांच्या व्याकरणाची प्रथमावृत्ति सन १८३६ मध्यें प्रसिद्ध झाली. त्याचे पूर्वी मराठीच्या व्याकरणाचा उदय झाला होता कीं काय, हें खात्रीलायक समजत नाहीं. आणि जरी एखादें लहानसें पुस्तक त्याचे आधीं निर्माण झालें असलें तरी सध्या त्याची स्मृतिही फारशी उरली नाहीं. तेव्हां मराठीच्या आद्य वैयाकरणाचा मान दादोबांसच मिळतो. हें योग्य आहे. दादोबांनींच या शास्त्रास मूर्त स्वरूप देऊन त्यास नीटनेटकेपणा, सौंदर्य, उज्ज्वलता, व पूर्णता आणण्याचें कामीं आपल्या आयुष्यभर काळजीपूर्वक अव्याहत मेहनत केल्यामुळें तेच मराठी व्याकरणाचे प्रवर्तक होत. ‘ येथें दाक्षिणात्य पंडित आपणास महाराष्ट्र भाषेचे पाणिनि असें समजतात ’ असें जें श्रीक्षेत्र काशींतील एका गृहस्थानें दादोबांस एका पत्रांत कळविलें होतें, त्यास आपलें अनुमोदन कोण देणार नाहीं ? कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं जरी स्वतंत्रपणें व्याकरणरचना केली नाहीं, तरी त्यांचे निबंध जागोजाग सूचक व शोधप्रवृत्त्युत्पादक असल्यामुळें त्यांची किंमतही अद्याप आहे तशीच आहे; आणि क्रियापदांच्या निरुपणाची जी योग्य व नवीन दिशा त्यांनीं दाखवून दिली आहे, ती त्यांचें मराठी व्याकरणशास्त्रांतील एक स्मारकच होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. कृष्णशास्त्री गोडबोले ह्यांनीं संस्कृत व फारशी या भाषांचा प्रकाश मराठीवर पाडून मराठींतील संस्कृत व फारशी शब्दांची व्युत्पत्ति विषद केली आहे, आणि त्या दिशेनें अद्याप कोणी अधिक शोध केला आहे असें दिसत नाहीं. शिवाय, ‘ संयुक्त काळ ’ असें ज्यांस इंग्रजी व्याकरणास अनुसरून म्हणण्यांत येतें, त्यासंबंधानेंही होईल तितकी समाधानकारक व्यवस्था करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे, ह्यामुळें त्यांचाही मराठी व्याकरणाचे विद्यार्थ्यांस विसर पडणें शक्य नाहीं.

३. आगरकरांनीं मराठी व्याकरणास वाक्यमीमांसेची जोड करून दिली. वाक्यमीमांसा हें इंग्रजींतील व्याकरणाचें अंग दादोबा व चिपळूणकर यांनीं मराठीच्या व्याकरणाचे निरूपणांत लक्षांतच घेतलेलें दिसत नाहीं. गोडबोले ह्यांनीं जरी त्या अंगाकडे स्वतंत्रपणें लक्ष दिलेलें नसलें, तरी त्या अंगाचा मराठी व्याकरणास कोठें जोड लावितां येईल, हें त्यांचे ध्यानांत आलें होतें, असें त्यांच्या उभयान्वयी अव्ययांचे विवेचनावरून दिसतें. आगरकरांनीं वाक्यमीमांसा ह्या अंगाचें स्वतंत्रपणें निरूपण केलें आहे, व तें उत्तम झालें आहे. तथापि त्याचा व व्याकरणाचा योग्य सांधा किंवा मेळ घालण्याचें काम शिल्लकच राहिलें.

४. यानंतर रा० रा० रा. भि. जोशी यांनीं या विषयाचा दीर्घ काळ व्यासंग केला असून, मराठी व्याकरणावर अनेक लहानमोठीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांनीं कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या बऱ्याच सूचना स्वीकारून त्या अंमलांत आणिल्या आहेत. शास्त्रीबोवांच्या निबंधांचा आणि विशेषेंकरून क्रियापद निरूपणाचा जोशीबोवांनींच उद्धार केला आहे. परंतु याशिवाय त्यांनीं व्याकरणांत व वाक्यमीमांसेंत जी उलथापालथ केली आहे, तिच्यामुळें त्यांची एकंदर मेहनत विशेष फलद्रूप झाली आहे असें वाटत नाहीं.

५. ज्याप्रमाणें दादोबांचें व्याकरण प्रसिद्ध झाल्यावर कृष्णशास्त्री चिपळूणकर ह्यांनीं आपले टीकात्मक निबंध लिहिले, त्याचप्रमाणें जोशी ह्यांचें प्रौढबोध व्याकरण प्रसिद्ध झाल्यावर गुंजीकर यांनीं आपले कांहीं परीक्षणात्मक निबंध लिहिले. हे निबंधही शास्त्रीबोवांच्या निबंधांच्या तोलाचे असून, त्यांनीं त्यांची आठवण झाल्यावांचून राहत नाहीं. शिवाय गुंजीकरांनीं सुबोध व्याकरण म्हणून एक लहानसें पुस्तकही लिहिलें आहे.

६. जोशीबोवांचे नंतर खेर ह्यांनीं आपलें मराठी भाषेचें व्याकरण इंग्रजींत लिहून प्रसिद्ध केलें. तें स्कूलफायनल परीक्षेच्या विद्यार्थ्यांस उपयोगी पडावें, ह्याच उद्देशानें लिहिलेलें असून तो त्यांचा उद्देश सफल होत आहे. त्यांचे पूर्वी रेव्हरेंड नवलकर यांनीं एक मराठी भाषेचें विस्तृत व्याकरण इंग्रजींत प्रसिद्ध केलें होतें. पण तें मराठीचा अभ्यास करणाऱ्या परकी लोकांस विशेषेंकरून उपयुक्त व्हावें या उद्देशानें उदयास आलें असल्यामुळें, आणि ह्यामुळेंच त्याची किंमत श्रीमंतीची पडल्यामुळें, खेर ह्यांच्यासारख्या पुस्तकाची उणीव भासली, व ती खेरांनीं भरून काढिली. तथापि खेरांनीं एक काम केलें आहे. इंग्रजी भाषेच्या व्याकरणावर बेन ह्यानें जें शास्त्रीय पद्धतीनें पुस्तक लिहिलें आहे, त्यावरून खेर ह्यांनीं मराठी व्याकरणाच्या शास्त्रीय पद्धतीचा एक सांगाडा तयार केला आहे, किंवा मराठी व्याकरणास बेननें बनविलेल्या शास्त्रीय मुशींत ओतून त्यास साधारणपणें शास्त्रीय स्वरूप आणण्याचा प्रयत्न केला आहे, असें म्हटलें पाहिजे.

७. मध्यंतरीं रावजीशास्त्री गोडबोले ह्यांनीं ट्रेनिंग कॉलेजांतील शिक्षकांच्या मदतीनें तयार केलेलें 'मराठी भाषेचें मध्यम व्याकरण' हें पुस्तक प्रसिद्ध झालें. आणि जरी ह्याची योग्यता प्रौढबोधापेक्षां किंवा खेरांच्या व्याकरणापेक्षां सरस आहे, तरी त्याचा व्हावा तसा प्रसार झाला नाहीं. इतकेंच नव्हे, तर तें साधारण जनसमूहास माहित झालेलें आहे कीं नाहीं ह्याचीही शंकाच आहे. तसेंच बाळकृष्ण विष्णु भिडे ह्यांचेंही एक व्याकरण छापून निघालें. परंतु हीं दोन्ही पुस्तकें ग्रंथकर्त्यांचे पाठीमागें प्रसिद्ध झाल्यामुळें मागें पडलीं असावीं असें वाटतें.

८. याशिवाय बाळशास्त्री जांभेकर, गंगाधरशास्त्री टिळक, गोपाळ जिवाजी केळकर, वागळे, इत्यादिकांचीं व्याकरणावर लहानसहान किरकोळ पुस्तकें मधून मधून प्रसिद्ध झालींच आहेत. परंतु त्यांत विशेष कांहीं नसल्यामुळें त्यांपासून मराठी व्याकरणाचें सांगण्यासारखें नफानुकसान कांहींच झालेलें नाहीं.

९. अखेरीस 'श्रीज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण' हें रा० रा० विश्वनाथ काशिनाथ राजवाडे ह्यांचें पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. ह्या पुस्तकाची योग्यता विशेष आहे, हें महाराष्ट्रास केसरीचे द्वारा विदित झालेंच आहे. त्याचा प्रचलित मराठीचे व्याकरणावर प्रकाश पडल्यावांचून राहणार नाहीं.

१०. असा गेल्या पाऊणशें वर्षांचा प्रचलित मराठी व्याकरणाचा इतिहास आहे. त्यावरून असें आढळून येतें कीं, दादोबांचें व्याकरण हें कालदृष्टीनें पहिलें असून योग्यतेच्या दृष्टीनेंही तें अद्याप पहिलें आहे व पुढेंही पहिलेंच राहणार ह्यांत संशय नाहीं.

११. शास्त्रीय मराठी व्याकरण या ग्रंथांतील ऊहापोहांत पूर्व वैयाकरणांचे कृतीचें जागोजाग परीक्षण आलेलें आहे. त्यांच्या ग्रंथांत कोणकोणते उत्तम भाग आहेत व त्यांचें विवेचन कोठें कोठें निर्दोष आहे, हें अर्थात् या पुस्तकांत कथितच सांगितलेलें आढळेल. कोणत्याही शास्त्राची किंवा कलेची जेव्हां वाढ होत असते तेव्हां मागल्या रचनेंतील दोष विशेषेंकरून दूर करावयाचे असल्यामुळें त्यांचेकडेच नवीन प्रबंधकाराचें विशेष लक्ष जाणें स्वाभाविक आहे. ह्यामुळें हा नवीन प्रबंधक दोषैकदृक् आहे असें जरी सहृदयांनीं वाटलें तरी पूर्व कृतींतील योग्य व सत्य भागाचा स्वीकार करूनच तो पुढें चालण्याचा प्रयत्न करीत असल्यामुळें पूर्व प्रबंधकांची योग्यता तो विसरून जाणें शक्यच नाहीं. उलट पूर्व प्रबंधकारांची खरी योग्यता इतर लोकांपेक्षां ह्याच अधिक स्पष्टपणें जाणत असतो असें म्हणण्यासही हरकत नाहीं. ह्यामुळें जरी नवीन प्रबंधकार पूर्व प्रबंधकारांस नांवें ठेवीत आहे व त्यांजवर मधून मधून भडिमार करीत आहे असें बाह्यतः दिसलें, तरी त्यांच्याविषयींचा ह्याचा पूज्यभाव कधींच नष्ट होत नाहीं. जर त्यांची खरी योग्यता तोच जाणत आहे, तर त्याचे ठायीं

त्यांजविषयीं योग्य आदर वसत असलाच पाहिजे हें उघड आहे. साराश पूज्य-पुरुषांसंबंधानें दोषज्ञान व पूज्यबुद्धि यांजमध्यें कांहीं एक विरोध नाहीं.

१२. व्याकरणविषयांत दादोबा, चिपळूणकर व गोडबोले, ह्यांच्याच अंगाखांद्यावर खेळून वाढीस लागलेल्या पिढीपैकींच प्रस्तुत लेखक आहे. परंतु जर एखाद्या मुलास पूर्वजाच्या खांद्यावर उभें राहण्यास मिळाल्यामुळें, त्या वडील माणसाची दृष्टि त्याच्या भोंवतालच्या प्रांतांत ज्या मर्यादेपर्यंत पोंचली होती त्या मर्यादेच्या पलीकडीलही कांहीं प्रांत जर त्या मुलाच्या दृष्टीस पडला आणि तो त्या नवीन भागाच्या प्रत्यक्ष ज्ञानानें आपल्या वडील आप्तजनाच्या तत्संबंधाच्या अप्रयोजक कल्पना दूर करूं लागला, तर त्याच्या त्या वडील आप्तासही वाईट न वाटतां उलट आनंदच होईल; आणि त्या मुलासही आनंद होऊन तो आपणास खांद्यावर घेणाऱ्या आपल्या आप्ताचे आभार मानिल्याशिवाय राहणार नाहीं. दादोबा, चिपळूणकर व गोडबोले हे व्याकरणविषयांतील आपले वृद्ध आप्त असून आपण तत्स्कंधास्थित एक बालक आहों, असेंच प्रस्तुत लेखकास वाटत आहे, यापेक्षां या बाबतींत अधिक लिहिण्याची कांहीं जरूर नाहीं.

१३. ‘दर बारा कोशांवर भाषा बदलते’ अशी ज्या कालीं स्थिति होती त्याच कालाचे लगेच नंतर, वरील आप्तजन उदयास आलेले असल्यामुळें त्यांच्या वेळीं मराठी भाषेचें स्वरूप फारच चंचल असावें यांत नवल नाहीं. यामुळें दादोबादिकांनीं व्याकरणरचनेच्या वेळीं भाषेस कांहीं एक योग्य वळण लावण्याचाही जागोजाग प्रयत्न केलेला आहे. हें काम वैयाकरणाचे कर्तव्याच्या मर्यादेबाहेरचें आहे म्हणून ह्या ग्रंथांत त्यांस जागोजाग दोष दिलेला आहे. परंतु तत्कालीन भाषेची विस्कळित स्थिति मनांत आणिली असतां तीस कांहीं तरी बंधन घालण्याचा जो त्यावेळीं त्यांनीं प्रयत्न केला तो केवळच अस्थानीं होता असें म्हणतां येत नाहीं. उलट आज जें भाषेस कांहींसें स्थैर्य आलें आहे तें अंशतः त्यांच्या श्रमाचें फल आहे असें म्हणण्यासही हरकत नाहीं. ह्यामुळें ह्या बाबतींतील या ग्रंथांतली त्यांजवरील टीका जराशी सौम्य असावयास पाहिजे होती यांत संशय नाहीं. पण विषयाचे भरांत आणि विशेषेंकरून वादविवादांत म्हणजे खंडनमंडनामध्यें बहुधा कांटेतोल समवृत्ति रहाणें कठिण हें उघड आहे. शिवाय या ग्रंथांतील वादविवाद व्यक्तिविषयक नसून केवळ मतविषयक आहे हें विसरतां कामा नये.

१४. एकछत्री राज्य, देशी भाषांचा अभ्यास, वर्तमानपत्रें, मासिक पुस्तकें व ग्रंथ ह्यांचा मुद्रणकलेच्या साहाय्यानें होणारा प्रसार, आणि प्रवाससाधनांच्या सुलभतेनें घडणारें प्रांताप्रांतांतील वाढतें दळणवळण, ह्या योगानें मराठी भाषेची पूर्वीची चंचल, व विस्कळित स्थिति दिवसेंदिवस लयास जात असून प्रांतिक उपभाषांच्या एकीकरणास सुरवात होऊन गेली आहे. ह्यामुळें हल्लीं मराठी भाषेस बरेंच स्थैर्य आलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणून दादोबादिकांनीं गाजविलेली

नियामक सत्ता किंवा मार्गदर्शकता सोडून देऊन वैयाकरणाची प्रयोगशरणवृत्तीच अशा स्थितींत धारण करण्यास सुरवात करणें चांगलें असें वाटून तिच्याच धोरणानें ह्या ग्रंथाची अथपासून इतिपर्यंत सर्व रचना केली आहे.

१५. मराठी व्याकरणास शास्त्रीय स्वरूप देण्याच्या कामास खेरांनीं बेनचा नमुना पुढें ठेऊन आरंभ केला हें वर सांगितलेंच आहे. त्याचप्रमाणें आगरकरांनीं बेनच्या पद्धतीनेंच मराठी वाक्यमीमांसा रचिली. अशा प्रकारें सुरू झालेलीं मराठी व्याकरण विषयांतील दोन कामें तशींच पुढें चालवून प्रचलित मराठी व्याकरणाची शास्त्रीय पद्धतीनें योग्य रचना करून व्याकरणाचा व वाक्यमीमांसेचा सांधा एकांत एक नीट जुळवून द्यावा आणि असें करितांना होतां होईल तों व्याकरणाच्या लहान मोठ्या सर्व मुद्यांची यथाशक्ति छाननी करावी, हाच या ग्रंथाचा मुख्य उद्देश आहे. प्रस्तुत पुस्तक हा त्याचा पूर्वार्ध आहे. उत्तरार्ध लौकरच प्रसिद्ध होईल. तेव्हां समग्र ग्रंथ हातीं पडल्यावर हा उद्देश कितपत सफल झाला आहे हें विद्वज्जनांनीं ठरवावें. तोंपर्यंत त्यांच्यापुढें केवळ ह्या कृतीचा एकच खंड असल्यामुळें सर्व कृतीबद्दल आणि विशेषें करून उत्तरार्धांत येणाऱ्या विषयांबद्दल त्यांनीं आपला कोणताच एक ग्रह कायमचा न ठरविण्याची त्यांस सविनय प्रार्थना आहे.

१६. मराठी भाषेचें मुद्रण इंग्रजीच्या मानानें किति संकुल आहे आणि इंग्रजीच्या मानानें मराठी मुद्रणकला किति मागें पडलेली आहे ह्या गोष्टी ध्यानांत घेतल्या म्हणजे मुद्रितें जरी नीट डोळ्यांत तेल घालून तपासिलीं तरी केवळ छापतांना काना, मात्रा, अनुस्वार, वेलांटी, इत्यादि अक्षरावयव कसे नकळत उडून जातात हें तेव्हांच समजतें. तेव्हां असल्या प्रमादांकडे वाचकवर्ग जरा उदार मनानेंच पाहील अशी आशा आहे.

१७. शेवटीं इतकें सांगितल्याशिवाय राहवत नाहीं कीं, हा ग्रंथ बराचसा लिहून झाल्यावर रा० रा० विष्णु मोरेश्वर महाजनी यांस त्यांचा महत्त्वाचा भाग दाखविला व तो त्यांनीं वेळांत वेळ काढून मोठ्या प्रेमानें वाचला, आणि कांहीं योग्य सूचनाही केल्या. त्यांबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. आणखी कांहीं गोष्टींचा उल्लेख करण्याचें चुकून राहिलें असल्यास तें उपसंहारावर सोंपवून हा लेख संपवितो.

मुंबई,<br>ता० १५-६-११. } **मोरो केशव दामले.**

---

# उपसंहार.



१. रा. रा. रामचंद्र भिकाजी जोशी ह्यांच्या प्रौढबोधाची नवीन आवृत्ति नुकतीच प्रसिद्ध झाली; त्या वेळीं या ग्रंथाच्या उत्तरार्धाचाही बराच भाग छापून झाला होता. त्यामुळें या ग्रंथांत जेथें जेथें प्रौढबोधाचा उल्लेख आलेला आहे, तेथें तेथें तो या नवीन आवृत्तीच्या संबंधानें नसून त्याच्या मागल्या म्हणजे सन १८९५ सालीं प्रसिद्ध झालेल्या दुसऱ्या आवृत्तीस उद्देशून आलेला आहे; हें ध्यानांत धरिलें असतां गैरसमज होण्याचा फारसा संभव उरणार नाहीं.

२. उपक्रमांत सांगितल्याप्रमाणें अनिश्चित प्रश्नांचा ऊहापोह व्याकरणाचे उद्‌घाटनापासून स्पष्टपणें वेगळा सांपडावा, म्हणून कंसांत बारीक ठशांनीं छापिला आहे. शिवाय ऊहापोहांतील विषयांची एक स्वतंत्र सूचि देण्यांत येत आहे. तिजवरून, तत्त्वबोध होण्यासाठीं कोणकोणत्या प्रश्नांचा वादविवाद या ग्रंथांत करण्यांत आला आहे व त्यांचा काय निर्णय केलेला आहे, हें पाहणें विद्वज्जनांस सुलभ होईल अशी आशा आहे. ह्या ग्रंथाचा सरासरी एकचतुर्थांश हिस्सा ऊहापोहात्मक आहे.

३ ऊहापोहामध्यें निरनिराळ्या मुद्यांचें दिग्दर्शन दोनचार सूचक शब्दांनीं पृष्ठाचे एका बाजूस करणें, एक पोटमुद्दा संपल्यावर दुसऱ्यास आरंभ करण्यापूर्वीं दोहोंमध्यें एकदोन अंगुळें कोरी जागा सोडणें, उद्‌घाटनांतील सर्व अंकांची अनुक्रमणिका देणें, मुख्य मुख्य शब्दांसंबंधाचा उल्लेख कोठें कोठें झाला आहे, हें कळण्यासाठीं एक विस्तृत सूचि तयार करणें, इत्यादि गोष्टी ग्रंथाची उपयुक्तता वाढविण्याचे कामीं पोषक होतात हें उघडच आहे. परंतु विद्वज्जनांस ग्रंथ कितपत पसंत पडतो व त्याचा प्रसार कसा काय होतो, हें समजण्यापूर्वीं वरील गोष्टी तयार करण्याची मेहनत घेण्यास प्रवृत्ति होत नाहीं. ह्यामुळें जेव्हां त्यांची विशेष जरूर भासेल, तेव्हां त्या साहजिकपणें तयार होतीलच. ग्रंथाचा जर प्रसार झाला नाहीं, तर या विषयसूचींचा व शब्दसूचींचा काय उपयोग !

४. तसेंच वाक्प्रचार, भाषाविशेष, लाक्षणिक शब्द, अलंकार, वृत्तें, म्हणी, पौराणिक व ऐतिहासिक कथानुसंधान, धार्मिक व सामाजिक संस्था व समज, इत्यादि गोष्टींचें निरूपण अभियुक्त ग्रंथ समजण्यास उपयुक्त असल्यामुळें, या गोष्टींचाही व्याकरणावरील पुस्तकांत थोडाबहुत समावेश होऊं लागला आहे. परंतु या गोष्टी व्याकरणशास्त्राच्या मर्यादेच्या बाहेरील आहेत. साहित्यशास्त्र, छंदःशास्त्र, वगैरे गोष्टींचा आभ्यास भाषेच्या सर्वांगपरिपूर्ण

ज्ञानास अवश्य आहे हें खरें; तरी त्यांचा व्याकरणशास्त्रांत अन्तर्भाव होत नासल्यामुळें, त्या निव्वळ व्याकरणावरील ग्रंथांत न येणेंच स्वाभाविक आहे.

५ मराठीव्याकरणाची रचना शास्त्रीय पद्धतीस अनुसरून व्हावी, हा या ग्रंथाचा मुख्य उद्देश होय. तेव्हां व्याकरणविषयक कांहीं विशेष गोष्टीही या ग्रंथांत न आढळण्याचा संभव आहे नाहीं असें नाहीं; शिवाय असें होणें साहाजिक आहे. कारण मराठी भाषेसारख्या प्रचलित व वृद्धिंगत होत जाणाऱ्या भाषेचें व्याकरण अपूर्णच असावयाचें. विशेष वस्तु अनंत आहेत आणि त्या सर्वांचा सामान्यांत समावेश करितां येत नाहीं, असें बेकनचें म्हणणें आहे. तसेंच 'अनंतपारं किल शब्दशास्त्रम्' अशी आपलीही म्हण आहे. तेव्हां मराठी व्याकरणास शास्त्रीय वळण लागण्याचे व त्यास पूर्णत्व प्राप्त होण्याचे बाबतींत प्रस्तुत ग्रंथाचा उपयोग होवो म्हणजे झालें.

६. विसंगति, अलक्ष, अशास्त्रीयतां, अप्रोजकपणा, न्यूनता, व्यंग, इत्यादि लहानमोठ्या दोषांचें आविष्करण व आवश्यक सूचना, ह्यांचा साभार स्वीकार करण्यांत येईल. आणि दुसरी आवृत्ति काढण्याचा प्रसंग आल्यास त्या वेळीं त्याचा योग्य विचार होईल.

७. एवढा मोठा व्याकरण ग्रंथ पाहून कांहीं जणांचे पुढें स्पष्टपणें किंवा अस्पष्टपणें आजकाल जे विचार उभे राहतात ते असे. व्याकरण जरी शास्त्र असलें तरी तें गणितशास्त्र, रसायनशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र, इत्यादि नव्या जुन्या शास्त्राइतकें महत्वाचें नाहीं,तर तें केवळ फार तर दुय्यम प्रतीचें शास्त्र होय. व्याकरण ही एक व्यवस्था आहे. दोन आणि दोन चार ह्या प्रकारचीं प्रमेयें त्यांत येत नाहींत. अर्थात् व्याकरणांत सत्यासत्याचा फारसा प्रश्न नसून सरसनीरसपणाचाच काय तो प्राधान्येंकरून विचार करावयाचा असतो. तेव्हां त्याचे संबंधानें एवढा खटाटोप कशास पाहिजे. शिवाय व्याकरणावांचून भाषाव्यवहार चालत नाहीं काय ? परभाषा शिकण्याचे कामीं व्याकरणाचा उपयोग होतो हें खरें. तरी आतां परभाषा शिकविण्याची जी नवीन 'संभाषणपद्धति' निघाली आहे, तिला व्याकरणाची फारशी जरूर नाहीं. तेव्हां 'मराठी भाषेंत अशा प्रकारची पुस्तकें रचण्यांत वेळ व बुद्धि निदान प्रस्तुत काळीं तरी खर्चण्यांत हांशील नाहीं.' तसेंच 'आमच्या देशांत ग्रंथ लिहिणारांची संख्या अत्यंत स्वल्प आहे, तेव्हां त्यांनीं शब्दवादप्रचुर शुष्क भाषाविषयांकडे आपली मर्यादित हिंमत खर्च न करितां जेणेंकरून लोकांस राज्यविषयक, नीतिविषयक, व संपत्तिविषयक तत्वाचें ज्ञान होईल, असे ग्रंथ उत्पन्न करण्यांत आपला काळ व उमेद खर्चावी !'

८. वरील अवतरणें आगरकरांनीं लिहिलेल्या वाक्यमीमांसेच्या प्रस्तावनेंतील आहेत. ह्या प्रस्तावनेंतच त्यांनीं या शंकांचें जें समाधान केलें आहे तें असें. 'त्यावर आमचें पहिलें उत्तर असें आहे कीं, शेंकडा नव्याण्णव लोकांस ज्याची पर्वा नाहीं किंवा गरज नाहीं, अशा व्याकरणासारख्या एकदेशीय विषयांत काळ घालविणें आपणांस व दुसऱ्यांस

फायदेशीर होईल, असा पक्का सुमार दिसला, तरच कोणी त्या मार्गास लागणार आहे. असें करतांना जर कोणी अटकळ करण्यास चुकला असला, तर इतर प्रमाद करणाऱ्यांप्रमाणें त्यालाही आपल्या प्रमादापासून होणारें नुकसान सोसावें लागून, पुढें त्या वाटेला फिरून न जाण्यास ताकीद मिळेल; दुसरें असें कीं सर्वमान्य अशा कांहीं अत्यंत उपयुक्त गोष्टी आहेत असें जरी मानिलें, तरी त्या करण्याची सर्वांच्या अंगीं पात्रता असेल असें नाहीं. कित्येकांना असेल तेवढें सामर्थ्य उपयुक्ततेच्या व कर्मणुकीच्या दृष्टीनें दुसऱ्या किंवा तिसऱ्या प्रतीच्या व्याकरणासारख्या नीरस विषयांकडेच लावण्याची सोय असेल.'

९. हीं व अशींच इतर उत्तरें व्यवहारिकदृष्ट्या योग्यच आहेत; तथापि प्रस्तुत पुस्तकासंबंधानें माझें उत्तर इतकेंच कीं, इतकें लिहिल्यावाचून माझ्यानें राहवेचना, म्हणून तें लिहिण्यांत आलें व त्याला दिलदार प्रकाशक मिळाले म्हणून तें प्रसिद्ध झालें. एवढ्यांत बहुतेक सर्व आलें. बाकीचें तुकारामबोवांचे पुढील शब्दांत पहावें.

करविली तैशी, केली कटकट ॥ वांकुडें कीं नीट, देव जाणे ॥
कोणा कारणें हें, जालेंसे निर्माण ॥ देवाचें कारण, देव जाणे ॥
तुका म्हणे मी या, अभिमाना वेगळा ॥ घालूनि गोपाळा, भार असें ॥

मग ही कटकट चालली असतां जी वृत्ति होती तीः—

निवडावे खडे ॥ तरी दळण वोजें घडे ॥
नाहीं तरी नासोनि जाय ॥ कारण आळस उरे हाय ॥
निवडावें तण ॥ सेतीं करावें राखण ॥
तुका म्हणे नीत ॥ न विचारितां नव्हे हित ॥

तेव्हां आतां पुढील शब्दांनीं वाचकांचा निरोप घेतों.—

सकळिकांच्या पांया, माझी विनवणी ॥ मस्तक चरणीं, ठेवितसें ॥
अहो श्रोते वक्ते, सकळही जन ॥ बरें पारखून, बांधा गांठीं ॥
फोडिलें भांडार, धन्याचा हा माल ॥ मी तव हमाल, भारवाही ॥
तुका म्हणे चाली जाली चहूं देशीं ॥ उतरला कसीं, खरा माल

॥ श्रीदत्तार्पणमस्तु ॥

नागपुर,
ता० १५-१०-११. } मोरो केशव दामले.

# ऊहापोहसूचि

---+❀+❀+---

पहिल्या आवृत्तीची मूळची

# प्रस्तावना.

शास्त्रीय मराठी व्याकरण हा ग्रंथ सोईसाठीं दोन खंडांनीं प्रसिद्ध करण्यांत आला. पूर्वार्ध १ ते ४६८ पृष्ठांचा व उत्तरार्ध ४६९ ते ९९० पृष्ठांचा; असे दोन खंड झाल्यामुळें वास्तविक प्रस्तावनेचेही उपक्रम व उपसंहार असे दोन खंड झाले आहेत. म्हणून उपक्रम व उपसंहार लागोपाठ वाचल्यानें प्रस्तावनेचें कार्य भागेल.

या ग्रंथावर जे कोणी आपला अभिप्राय वर्तमानपत्रांत किंवा मासिक पुस्तकांत प्रसिद्ध करितील, त्यांनीं आपल्या अभिप्रायाची एक प्रत मजकडे पाठविल्यास किंवा निदान एका कार्डाचे द्वारें मला त्या वर्तमानपत्राचें अथवा मासिक पुस्तकाचें नांव व त्या विशिष्ट अंकाची तारीख ह्या गोष्टी कळविल्यास मी त्यांचा फार आभारी होईन.

सदर पुस्तक लिहून तयार झाल्यावर त्याची हस्तलिखित प्रत रा. सा. विष्णु मोरेश्वर महाजनी, एम. ए. यांस मी दाखविली होती. त्यांनीं त्यांतील बराच भाग वाचून पाहून आपला जो अभिप्राय दिला, तो या सोबत जोडला आहे. रा. सा. महाजनी यांनीं या पुस्तकाची हस्तलिखित प्रत वाचून पहाण्याची जी तसदी घेतली त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

अखेरीस, **मातृभाषेची ही अल्पसेवा श्रीदत्तचरणीं प्रणामपूर्वक अर्पण करितों.**

नागपूर,
ता. ११-११-१२.

**मोरो केशव दामले,**
लेखक.

# अनुक्रमणिका.

## भाग तिसरा-वाक्यविचार.



### प्रकरण पहिलें—वाक्यरचना.



### प्रकरण २ रें—वाक्यपृथक्करण.



### पर्यवसानाध्याय



परिशिष्ट

श्रीदत्त

# शास्त्रीय व्याकरण.

## ( उद्घाटन व ऊहापोह )

## उपोद्घात.

### भाषा व व्याकरण.

१. मनांतील कल्पना बाहेर प्रकट करण्याचें जें साधन त्यास **भाषा** असें म्हणतात.

[ भाषेचें हें लक्षण अत्यंत व्यापक दृष्टीनें केलें आहे. तें केवळ मनुष्यांच्याच नव्हे, तर पशुपक्ष्यादि सर्व प्राण्यांच्या कल्पनाप्रकटीकरणाच्या साधनास लागणारें आहे. मनुष्येतर प्राण्यांस मन आहे कीं नाहीं, असल्यास तें सर्वच प्राण्यांस आहे कीं काय, आणि त्या सर्वांस आपल्या कल्पना बाहेर दाखवितां येतात कीं काय, वगैरे प्रश्न व तत्संबंधाचे वादविवाद गहन व मनोरंजक आहेत. तरी ते प्रकृत पुस्तकांत महत्वाचे व अवश्य नसल्यामुळें बाजूसच टेविले पाहिजे. सध्या इतकेंच पुरे आहे कीं, जर कोणत्याही प्राण्यास मन असून त्यांत कांहीं कल्पना उठत असतील, आणि त्या कल्पना त्या प्राण्यास शरीरेंद्रियद्वारा बाहेर दाखवितां येत असतील– आणि साधारण दृष्टीनें ह्या गोष्टी सर्वांस मान्य होण्यासारख्याच आहेत– तर त्यान्याहि कल्पनाप्रकटीकरणाच्या साधनाचा वरील व्याख्येंत अन्तर्भाव होईल हें उघड आहे. ‘ पशुपक्ष्यांची भाषा आपणांस कळत नाहीं ’ असें उद्गार आपण अनेक वेळां काढितों, आणि ‘ त्यांची भाषा जर आपणांस समजती तर बरें झालें असतें ’ असेंही म्हणतों. यावरून त्यांना कल्पना आहेत व ते त्या आपल्या बाह्येंद्रियांनीं व्यक्तही करितात, इतकेंच नव्हे, तर ज्या खुणांनीं त्या व्यक्त होतात, त्यांस आपण त्यांची भाषा असेंही म्हणतों, हें स्पष्टच आहे. म्हणून ‘ भाषा ’ शब्दाचें लक्षण मानवी दृष्टीनेंच करणें अयोग्य असल्यामुळें, व्यापक दृष्टीचा स्वीकार करून वरील लक्षण ठरविलें आहे. तसेंच ज्या कल्पना बाहेर येतात, त्या दुसऱ्यास समजण्याच्याच उद्देशानें येतात असें नाहीं; तर कधीं कधीं त्या स्वतःशींही प्रकट होतात. म्हणून त्या दुसऱ्यास कळविण्याचा उल्लेख

भाषेच्या लक्षणांत करितां येत नाहीं. मुख्यत्वेंकरून भाषेचा उपयोग आपल्या कल्पना दुसऱ्यास कळविण्याच्या कामीं होतो हें खरें; तथापि दुसरा कोणीही जवळ नसतां मनोविकार प्रबल झाले, तर, आत्मगत किंवा स्वगत भाषण चालतें, हें लक्षांत ठेविलें म्हणजे भाषेच्या शास्त्रीय 'लक्षणांत कल्पना दुसऱ्यास कळविणें' ह्या गोष्टीचा अन्तर्भाव केल्यानें त्या लक्षणांत अव्याप्तीचा दोष होईल हें उघड आहे.

तिसरी गोष्ट लक्षांत ठेवावयाची ती अशी; कल्पनीं दोन प्रकारच्या खुणांनीं प्रकट करितां येतात. चेहऱ्यांतील फरक, हातवारे, अंगविक्षेप, व निरनिराळ्या प्रकारचे आवाज, ह्या खुणा स्वाभाविक आहेत. म्हणजे चर्येचीं स्थित्यंतरें व हावभाव व आवाजांतील फरक ही कोणास शिकावीं लागत नाहींत; तीं प्राणिमात्रास निसर्गतःच प्राप्त होतात. रागाचें चिन्ह अमुक, लोभाचें अमुक, हें कोणास मुद्दाम सांगण्याची जरूर नाहीं; रडणें दुःखप्रदर्शक आहे, व हंसणें आनंद द्योतक आहे, तसेंच आवाजांतील फरकानें मनुष्याचेंच काय, पण मनुष्येतर प्राण्यांचेंही सुखदुःख व्यक्त होतें, हें उघड आहे. या निसर्गप्राप्त चिन्हांच्या समुदायास स्वाभाविक भाषा असें म्हणण्यास हरकत नाहीं. स्वाभाविक भाषा ही मनुष्यांप्रमाणें पशुपक्ष्यादि प्राण्यांसही अवगत आहे. निरनिराळया जातींच्या प्राण्यांची स्वाभाविक भाषा त्यांच्या शरीरांप्रमाणेंच निरनिराळी असावयाची हे उघड आहे. भाषेच्या दुसऱ्या प्रकारास कृत्रिम किंवा सांकेतिक हें नांव देतात. मुखावाटे निघणारे जे अनेक ध्वनी तेच ह्या भाषेंतील मुख्य खुणा होत. अमुक ध्वनि किंवा ध्वनि-समूह अमुक कल्पनेचा अथवा अमुक अर्थाचा वाचक होय, अशा संकेताच्या पायावर ह्या भाषेची उभारणी झालेली आहे. तथापि मुखद्वारा निघणारे ध्वनीच सांकेतिक भाषेचें साधन होय, असें समजण्याचें कारण नाहीं. करपल्लवी, नेत्रपल्लवी, हीं नांवें ज्यांच्या कानावरून गेलीं असतील त्यांस, मनोगत कल्पना प्रकट करण्याचें शब्दातिरिक्तही अन्य संकेत असूं शकतात, ही गोष्ट तेव्हांच समजण्यासारखी आहे तथापि हे अन्य संकेत कल्पनाबाहुल्यास पुरे पडण्यासारखे तादृश नसल्यामुळें, मुख-ध्वनिमय भाषाच सर्वत्र दृष्टीस पडते, इतकेंच नव्हें तर तसें होणेंच स्वाभाविक आहे. आणि विचाराचे वाढीबरोबर तिचीच वाढ होत आहे. सांकेतिक किंवा कृत्रिम भाषा ही मात्र मनुष्य प्राण्यांच्याच ठिकाणीं दृष्टीस पडते. स्वाभाविक भाषेप्रमाणें कृत्रिम किंवा सांकेतिक भाषा मनुष्येतर प्राण्यांत वास करीत नाहीं, म्हणून सांकेतिक भाषा हा मनुष्याचा विशेष होय. आणि भाषात्मक संकेत जरी अनेक असणें शक्य आहे तरी--मुखध्वनीच्या अर्थानें 'शब्द' या शब्दाचा उपयोग करून--शब्दमय भाषाच सांकेतिक भाषांत प्रधान होय, हें निर्विवाद आहे. हीच शब्दमय सांकेतिक भाषा व्याकरणाचा विषय होय. ]

२. भाषा **दोन** प्रकारची आहे:-**स्वाभाविक** व **सांकेतिक**.

(अ) आवाज, चेहरा व हावभाव, ह्यांच्या खुणांनीं होणाऱ्या भाषेंत **स्वाभाविक भाषा** असें म्हणतात. ही सर्व प्राण्यांत दृष्टीस पडते.

(आ) अमुक खुणेनें अमुक कल्पनेचें किंवा अर्थाचें ग्रहण करावें, अशा प्रकारच्या संकेतानें ठरलेल्या भाषेस **कृत्रिम** किंवा **सांकेतिक भाषा** असें म्हणतात. सांकेतिक भाषा मनुष्यप्राण्याचा विशेष आहे. ही मनुष्येतर प्राण्यांच्या ठिकाणीं दृष्टीस पडत नाहीं.

३. सांकेतिक भाषेचेही अनेक प्रकार असणें शक्य आहे. हातांच्या खुणांनीं होणारी ती करपल्लवी; नेत्रसंकेतमय जी ती नेत्रपल्लवी; आणि वाणीच्या द्वारें उत्पन्न होणारी ती शब्दमय किंवा **वैखरी वाणी** होय. करपल्लवी, नेत्रपल्लवी, व इतर पल्लव्या केवळ मर्यादित व तात्पुरत्या पडल्यामुळें, त्या मानसिक कल्पनाबाहुल्याचे सांकेतिक चिह्नीकरणाच्या दृष्टीनें सर्वथैव अप्रयोजक व म्हणूनच त्याज्य होत, हें निर्विवाद आहे.

४. मनांतील कल्पना बाहेर प्रकट करण्याचें सांकेतिक शब्दमय साधन म्हणजे 'वैखरी वाणी' हा व्याकरणाचा विषय होय. अर्थात् व्याकरण जें लिहावयाचें तें 'वैखरी वाणी' चें होय. तेव्हां व्याकरणाच्या संबंधानें 'भाषा' शब्दाचा उपयोग 'वैखरी वाणी' या मर्यादित अर्थानेंच नेहमी करण्यांत येतो, व तसाच तो या पुस्तकांतही करण्यांत येईल.

आतां **व्याकरण** शब्दाकडे वळूं.

५. भाषेचा व्यवहार किंवा उपयोग कोणत्या नियमांस अनुसरून होतो हें ज्या शास्त्रांत सांगितलेलें असतें, त्यास **व्याकरणशास्त्र** असें म्हणतात. आणि हे नियम एकदां समजले म्हणजे अपरिचित मनुष्यास भाषेचा उपयोग कसा करावा हेंही समजतें. म्हणजे बोलण्याच्या कामीं किंवा लिहिण्याच्या कामीं व्याकरण त्याला मार्गदर्शक होतें. या दृष्टीनें व्याकरणास एक प्रकारची **कला** असेंही म्हणण्यास हरकत नाहीं.

[ भाषेचीं स्वरूपें दोन आहेत:-भाषण व लेखन. अथवा, भाषेचें मूल स्वरूप एकच होय असें म्हणणें बरें. तें विशिष्ट कल्पनावाचक सांकेतिक विशिष्ट शब्द-

मय म्हणजे भाषण होय. व लेखन हें त्या मूळ स्वरूपाचें म्हणजे भाषणाचें प्रतिबिंब होय हें उघड आहे. तेव्हां या दोन स्वरूपांचा--भाषणाचा व लेखनाचा--येहनीं पृथक् पृथक् विचार करण्याचें प्रयोजन नाहीं. आतां, भाषेच्या उपयोगाचे साधारण नियम शोधून काढणें म्हणजे काय ? भाषा शब्दमय आहे हें वर सांगितलेंच आहे. शब्द हे कल्पनावाचक आहेत. तथापि कोणतीही एक कल्पना किंवा कोणताही एक विचार पूर्णपणें व्यक्त करण्यास जितक्या संकेतांची आवश्यकता आहे, त्या संकेतांच्या समुदायास वाक्य म्हणतात. म्हणजे न्यायशास्त्राच्या दृष्टीनें काय किंवा व्याकरणाच्या दृष्टीनें काय-- विचाराच्या दृष्टीनें काय, किंवा भाषेच्या दृष्टीनें काय--वाक्य हें तत्त्वतः विशेष महत्त्वाचें आहे हें उघड आहे. परंतु वाक्याचें शास्त्रीय विवेचन समाधानकारक व पूर्णपणें म्हणजे यथासांग होण्यासाठीं त्याचे अवयव जे शब्द, आणि शब्दाचे अवयव जे वर्ण, त्या सर्वांचें विवेचन करणें व्याकरणास अवश्य आहे. यावरून पुढील तीन अंकांतील विधानांची सत्यता तेव्हांच लक्षांत येईल. ]

६ तात्त्विक दृष्टया भाषेचा विचार करणें म्हणजे वाक्याचा विचार करणें होय. कारण कीं, ज्या स्वतंत्र वस्तूशीं व्याकरणशास्त्राचा संबंध आहे अशी स्वतंत्रपणें अस्तित्वांत असणारी वस्तु म्हटली म्हणजे वाक्य होय. ईश्वर आहे; बोलणें फार सोपें आहे; क्रिया फार कठिण आहे; इ० हीं वाक्यांचीं उदाहरणें आहेत.

७. प्रत्येक वाक्य शब्दाचें बनलेलें असतें. जसें:--ईश्वर आहे, या वाक्यांत ' ईश्वर ' व ' आहे ' असे दोन शब्द आहेत.

८. शब्दांमध्यें अक्षरें दिसतात; तरी शब्दाचे मूळ अवयव वर्ण होत. ' ईश्वर ' या शब्दांत तीन व ' आहे ' या शब्दांत दोन अक्षरें आहेत. तथापि पहिल्यांत ई, श्, व्, र् आणि दोन वेळ अ असे पांच वर्ण आहेत; आणि दुसऱ्यांत आ, ह् आणि ए असे तीन वर्ण आहेत, हें उघड आहे.

[ ह्याप्रमाणें वर्ण, शब्द व वाक्य, ह्यांचीं उदाहरणें पाहून, त्यांचा जरी आपणास परिचय झाला आहे, तरी शास्त्रीय दृष्टीनें त्यांचीं लक्षणें काय तें पाहिलें पाहिजे. ]

९. मुखाचे वाटे स्पष्ट उच्चारले जाणारे जे मूळ ध्वनी त्यांस **वर्ण** म्हणतात. जसें:-अ, इ, उ, क्, ख्, ग्, इ.

टीप--' मूळ ध्वनी ' या शब्दाचा अर्थ असा कीं, त्या ध्वनीचें पृथक्करण करणें शक्य नाहीं. ई, श्व, र, हीं तीन अक्षरें आहेत. पण हे तीन जरी ध्वनी आहेत तरी तिन्ही मूळ ध्वनी नाहींत. ' श्व ' ह्यांत श, व, अ, असे तीन आणि

'र' मध्यें र् आणि अ असे दोन मूळ ध्वनी आहेत. तसें 'ई' मध्यें किंवा श्, व्, र्, यांमध्यें आणखी निराळे मूळ ध्वनी दाखवितां येत नाहींत. म्हणून ई, श्, व्, र्, अ, हे वर्ण होत. यावरून सर्व अक्षरांस वर्ण म्हणतां येत नाहीं हें उघड आहे.

१०. बाह्य किंवा अन्तःसृष्टींतील कोणतीही वस्तु दाखविणाऱ्या वर्णास किंवा वर्णसमुच्चयास **शब्द** म्हणतात. जसें—आ ( उघडें तोंड ), ई ( वरचे खालचे पुढचे दांत एकमेकांवर टेंकलेले असतां उघडलेलें तोंड ) ओ ( हांकेच्या श्रवणाचें दर्शक प्रत्युत्तर ). मनुष्य, आहे. इ०.

टीप—श्, व्, र्, हे शब्द नव्हत. त्यांनीं कोणत्याही वस्तुचा बोध होत नाहीं. ह्या ठिकाणीं वस्तु शब्दाचा उपयोग शास्त्रीय दृष्टीनें केला आहे. त्यानें केवळ साधारण भाषेंतलाच अर्थ ग्राह्य नाहीं, तर सर्व ब्रह्मांडांतील अखिल प्राण्यांचा, पदार्थांचा, धर्मांचा, व त्यांमधील सर्व प्रकारच्या परस्पर संबंधांचा बोध होतो. हें लक्षांत ठेविलें म्हणजे शुद्धक्रियादिवाचक वर्णांस व वर्णसमुच्चयांसही शब्दाचें प्रस्तुत लक्षण कसें लागू पडतें तें तेव्हांच कळेल. 'श्, व्, र्, हीं व्यंजनें आहेत' या वाक्यांत श्, व्, र्, ह्या वर्णांचा शब्दांप्रमाणें उपयोग केला आहे. तथापि त्यांनीं त्या वर्णांशिवाय अन्य कोणत्याही वस्तूचा निर्देश होत नसल्यामुळें त्यांस शब्द म्हणणें प्रशस्त नाहीं. तें फार तर एका विशेष पण क्षुल्लक दृष्टीनेंच शब्दाची योग्यता पावतात, तरी त्यांचा साधारण दृष्टीनें शब्दांत अन्तर्भाव होत नाहीं हें उघड आहे.

११. एक विचार पूर्णपणें व्यक्त करणाऱ्या स्वतंत्र शब्दसमुच्चयास **वाक्य** म्हणतात, वाक्याचीं उदाहरणें वर दिलींच आहेत.

टीप—'बोलणें फार' इतक्या शब्दांनीं पूर्ण अर्थाचा निर्देश होत नाहीं. म्हणून त्यास वाक्य म्हणतां येत नाहीं. 'बोलणें फार' किंवा 'बोलणें फार सोपें' इतक्या शब्दांनींच विचार पूर्ण व्यक्त होतो, असें कोणी म्हटल्यास तीं वाक्यें आहेत असें म्हणावें लागेल. परंतु वरील शब्दांचा जर कांहीं पूर्ण अर्थ होत असेल तर तो 'अमक्याचें बोलणें फार आहे,' व 'बोलणें फार सोपें आहे' अशा पूर्व संबंधास अनुसरून होणें शक्य आहे. तथापि अशा ठिकाणीं 'बोलणें फार' व 'बोलणें फार सोपें' इतकेच शब्द असून, आणखी कांहीं शब्दांचा अध्याहार समजल्यावांचून तितक्याच शब्दांनीं स्वतंत्रपणें अर्थनिष्पत्ति होत नाहीं, हें उघड आहे. यावरून वाक्याच्या प्रस्तुत लक्षणांतील 'पूर्णपणें' व 'स्वतंत्र' या शब्दांचें महत्व लक्षांत येईल.

१२. व्याकरणाचा मुख्य विषय वाक्य होय. परंतु त्याच्या यथासांग विवेचनाच्या पूर्तीसाठीं शब्दांचा व वर्णांचा विचारही अवश्य आहे. म्हणून

**वर्णविचार, शब्दविचार** व **वाक्यविचार** असे व्याकरणाचे तीन भाग करितात.

[ येथपर्यंत भाषा म्हणजे काय व व्याकरण म्हणजे काय व कोणत्या भाषेचें व्याकरण होतें, ह्याचा साधारण दृष्टीनें सविस्तर खुलासा झाला. त्यावरून भाषा प्रथम अस्तित्वांत असल्याशिवाय तिचें व्याकरण होऊं शकत नाहीं, हें वेगळें सांगण्याची गरज नाही. व्याकरण, भाषेशिवाय स्वतंत्र राहूं शकत नाहीं; तरी व्याकरणाशिवाय भाषा असूं शकते, हें रानटी भाषांच्या उदाहरणांवरून स्पष्टच आहे. ह्यावरून व्याकरण हें भाषेच्या पाठीमागून जातें व भाषा पुढें चालते. व्याकरण जर भाषेस सोडून जाऊं लागलें, तर तें व्याकरणच नव्हे. तें भाषेवरच अवलंबून असलें पाहिजे, त्याचें बंधन भाषेस कामाचें नाहीं, त्याच भाषेवर सर्वस्वी पगडा चालावयाचा नाहीं, त्यास भाषेवर आपला अंमल चालवितां येत नाहीं; भाषेचें साम्राज्य स्वतंत्र आहे, ह्या गोष्टी निर्विवाद आहेत. तथापि पुढारी जरी पूर्णपणें स्वतंत्र असला, तरी अनुयायांचे सूचनांचा त्यानें सर्वथा तिरस्कार करणें जसें त्यास अहितकर असून त्यांनीं दाखविलेल्या मार्गानें जाणेंही त्यास कधीं कधीं इष्ट असतें. त्याचप्रमाणें व्याकरणाचेंही मार्गदर्शकत्व कधीं कधीं अंशतः कबूल केल्यापासून भाषेचें कल्याणच होतें, हेंही विसरतां कामा नये. तात्पर्य, भाषेची वाढ निरनिराळ्या दिशांनीं स्वतंत्रपणें होतच असते हें खरें, तरी तिच्या ह्या प्रगतीस व्याकरणाचेंही तिला बरेंच साहाय्य मिळतें, इतकेंच नव्हे, तर व्याकरणाच्या साहाय्याशिवाय तिची प्रगति कुंठित झाल्यावांचून रहाणार नाहीं, हेंही तितकेंच निर्विवाद आहे.

सर्व मनुष्यजातीची एकच भाषा असणें कांहीं अशक्य नाहीं; तर त्या दिशेनें कांहीं विद्वानांचे प्रयत्नही चालले आहेत. जगावरील सर्व देशांतल्या विद्वान् लोकांची तरी एक भाषा असावी, असें इष्ट वाटूं लागल्यामुळें प्रकृत प्रयत्नास प्रारंभ झाला आहे. तो सफल होईल तेव्हां होवो. तोंपर्यंत भाषाभिन्नत्व हें कायमच आहे, व जरी तो प्रयत्न सफल झाला, तरी तें कायमच राहाणार. मराठी, इंग्रजी, फारशी, गुजराथी, संस्कृत, इत्यादि ज्या शेंकडों भाषा आजपर्यंत झाल्या आहेत, व सध्यां प्रचलित आहेत व पुढें होतील, त्या सर्वांस भाषा व व्याकरण या संबंधाचे वरील विचार सारखेच लागू आहेत. तथापि वर्णविचार, शब्दविचार व वाक्यविचार, हे जरी साधारणपणें सर्व भाषांत असावयाचे, तरी त्यांतील वर्णभिन्नत्व, शब्दभिन्नत्व व वाक्याभिन्नत्व, ह्याबरोबर व्याकरणांतील नियमभिन्नत्व हें आलेंच. ज्याप्रमाणें मनुष्याचा आकार येथून तेथून एकच तरी प्रत्येकाच्या देहांत विशिष्टपणा आहेच. म्हणजे देहभिन्नत्व आहेच. त्याप्रमाणें

णेंच व्याकरणाचा सांगाडा जरी जिकडे तिकडे एकच, तरी वेगळ्या वेगळ्या भाषांचें व्याकरण वेगळें वेगळें होणारच. कालदेशवर्तमानास अनुसरून ज्या निरनिराळ्या स्वतंत्र भाषा दिसतात, त्यांचें प्रत्येकीचें निरनिराळें स्वतंत्र व्याकरण होणें साहजिकच आहे. त्याचप्रमाणें सूक्ष्म विचारांतीं असेंही आढळून येईल कीं, एकाच भाषेचीं कालदेशवर्तमानाचे मानानें जीं निरनिराळीं स्वरूपें असतात, त्यांस अनुरूप अशीं त्या भाषेच्या व्याकरणाचींही तितकीं स्वरूपें कमी अधिक भिन्न अशीं व्हावयाचींच. म्हणजे काल, देश, जाति, लिंग, इत्यादि उपाधींनीं एकाच भाषेचीं जशीं रूपांतरें होतात, तशीं त्या भाषेच्या व्याकरणाचींही अनेक रूपांतरें होणें हें साहजिक आहे.

यावरून उघडच आहे कीं, जरी इंग्रजी, संस्कृत, फारसी, मराठी इ. सर्व भाषांचें एक सर्वसाधारण ठोकळ व्याकरण असणें शक्य आहे, तरी त्या भाषा ज्या मानानें परस्परांपासून भिन्न आहेत, त्याच मानानें त्यांचीं व्याकरणेंही परस्पर भिन्न असलींच पाहिजेत. तसेंच मराठी भाषेचें व्याकरण जरी एकच असलें, तरी ज्ञानेश्वरी मराठी, रामदासी मराठी, पेशवाई मराठी, व प्रचलित मराठी, ह्यांचें व्याकरण सर्वथा एक कदापि होणार नाहीं. तसेंच कोंकणी मराठी, गोमांतकी मराठी, देसुरी मराठी, वऱ्हाडी मराठी, नागपुरी मराठी, माळवी मराठी, गुजराती मराठी, कानडी मराठी, इत्यादि प्रांतिक मराठीचेंही व्याकरण अंशतः भिन्न असावें लागेल. फार तर काय, मराठी गद्याचें पद्याच्याहून जरा निराळें, पुरुषांच्या मराठीचें बायकांच्या मराठीच्याहून वेगळें, व लहान मुलांच्या भाषेचें मोठ्या माणसांच्या भाषेच्याहून जरासें भिन्न होईल. परंतु असे फरक तात्त्विक दृष्ट्या जरी मानिले पाहिजेत, तरी त्यांचें महत्त्व सूक्ष्मदर्शक यंत्राच्या द्वारें जसें विकसित दिसतें, तसेंच तें वास्तविक आहे असें समजणें हेंही कांहीं इष्ट नाहीं. तात्पर्य, भाषाभेद जेव्हां सहज दिसण्याइतका उत्कट होतो, तेव्हांच त्या भाषेच्या व्याकरणांतही म्हणण्यासारखा बदल होत असतो. म्हणून भाषेच्या सूक्ष्म रूपांतरास नसतें महत्व देऊन व्याकरणाचें रूपांतर करण्याची किंवा मानण्याची विशेष जरूर नाहीं.

काल, देश, जात, लिंग, इत्यादि उपाधींनीं भाषेचें जें रूपांतर होतें म्हणून वर म्हटलें आहे, त्या सर्वांत कालजन्य रूपांतर हें अत्यंत महत्वाचें आहे. आणि जात, लिंग, प्रांत, ह्यांनीं एकाच काळीं जरी भाषेंत फरक झाला, तरी तिचीं हीं सर्वच रूपें सारखीं महत्त्वाचीं नाहींत. शिष्ट व नागरिक लोकांच्याच भाषेचें स्वरूप सर्वमान्य असतें व तेंच व्याकरणदृष्ट्या महत्त्वाचें होय; आणि त्या शिष्ट व नागरिक भाषास्वरूपाचेंच व्याकरणशास्त्र बहुधा उदयास येतें. म्हणून

कालांतरानें शिष्ट भाषेंत जसजसा फरक होत जातो, तसतसें तिचें व्याकरणही बदलतें; आणि गद्याहून पद्याची भाषा एकाच कालींही कांहींशी भिन्न असल्यामुळें गद्याचें व्याकरण पद्यास सर्वांशीं लागू पडत नाहीं. या ग्रंथांत जें मराठी व्याकरण विशद करण्याचें योजिलें आहे, तें मराठी भाषेच्या कोणत्या विशिष्ट स्वरूपाचें होय, हें थोडक्यांत आरंभीं सांगणें इष्ट आहे. कालांतरानें शिष्ट मराठीचीं जीं रूपांतरें झालीं आहेत, त्या सर्वांचें योग्य मनन करून मराठी व्याकरणांत कसकसा फरक होत गेला, हें दाखविण्याचें काम मराठी व्याकरणाच्या इतिहासकर्त्याचें आहे. तशा प्रकारचा मराठी व्याकरणाचा इतिहास येथें द्यावयाचा नाहीं, व त्यास जी प्रचंड विद्वत्ता व जी विशाल व शोधक बुद्धि अवश्य आहे, ती विद्वता व ती बुद्धि प्रस्तुत लेखकाच्या ठायीं वास करीत नसल्यामुळें तें काम त्यास झेंपण्यासारखेंही नाहीं. म्हणून या ग्रंथांत केवळ प्रचलित शिष्ट मराठी भाषेच्या गद्य स्वरूपाकडेच मुख्यत्वें करून लक्ष देण्याचा त्याचा मानस आहे. तथापि ज्या ठिकाणीं प्रचलित स्वरूपाच्या स्पष्टीकरणास प्राचीन स्वरूपाकडे दृष्टि देणें अवश्य आहे, त्या ठिकाणीं पूर्वपरंपरा व इतिहास यथाशक्ति देण्यांत येईलच; आणि पद्याचाही स्थलविशेषीं यथावकाश विचार करण्यांत येईल. तरी प्रचलित शिष्ट गद्याचेंच प्राधान्यानें विवेचन करण्यांत येणार आहे. ]

---

# भाग १.

—:०:—

# वर्णविचार.

## अध्याय १

## वर्णमाला.

१३. मराठी वर्णमालेंत एकंदर ४८ वर्ण आहेत. ते असेः—

**अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ऌ, ए, ऐ, ओ औ अं अः; क, ख, ग, घ, ङ, च, छ, ज, झ, ञ, ट, ठ, ड, ढ, ण, त, थ, द, ध, न, प, फ, ब, भ, म, य, र, ल, व, श, ष, स, ह, ळ.**

(अ) श हा वर्ण तीन तऱ्हांनीं लिहितातः—श, श, श्. पहिल्या दोन्हीं तऱ्हा स्वतंत्रपणें सारख्याच प्रचारांत आहेत. शेवटची तऱ्हा श्री, श्र, श्व, इत्यादि जोडाक्षरांत बहुधा आढळते; क्वचित् शुभ शुक्र, इत्यादि थोड्याशा शब्दांतील केवलाक्षरांतही स्वतंत्रपणें कधीं कधीं दृष्टीस पडते.

१४. वर्ण तीन प्रकारचे आहेत: **स्वर, स्वरादि** आणि **स्वरान्त**, किंवा **व्यंजनें**.

टीप—संस्कृत व्याकरणांत स्वरांस 'अच्' आणि व्यंजनांस 'हल्' अशा पारिभाषिक संज्ञा आहेत.

१५. ज्या वर्णांचा उच्चार स्वतंत्रपणें म्हणजे दुसऱ्या वर्णांच्या साहाय्यावांचून होतो, त्यांस **स्वर** असें म्हणतात. स्वर बारा आहेत. तेः—**अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ऌ, ए, ऐ, ओ, औ.**

१६. ज्या वर्णांचा उच्चार स्वतंत्रपणें म्हणजे दुसऱ्या वर्णांच्या—स्वरांच्या साहाय्यावांचून होत नाहीं. त्यांस **परवर्ण** असें म्हणतात. ते ३६ आहेत. वर्णमालेमध्यें स्वरांच्या नंतर येणारे अ पासून ळ अखेर सर्व वर्ण परवर्ण होत.

टीप—परवर्णांमध्यें स्वर मिळाला म्हणजे त्यांचा उच्चार होतो; एरव्हीं होत नाहीं. म्हणूनच परवर्ण हे अ या स्वरानें युक्त असे वर्णमालेमध्यें उच्चारण्याचा

व लिहिण्याचा नेहमींचा परिपाठ आहे. आतां परवर्णांत जो स्वर मिळतो, तो एक तर आरंभीं, नाहीं तर अंतीं. बिंदु आणि विसर्ग म्हणून जे परवर्ण आहेत, त्यांच्या आरंभीं स्वर आला तरच त्यांचा उच्चार होतो; म्हणून बिंदु आणि विसर्ग हे अ + ं = अं आणि अ + ः = अः असें लिहितात. आणि बाकीच्या परवर्णांमध्यें स्वर अंतीं मिळतो, म्हणून ते क् + अ = क, ख् + अ = ख, इ० असें लिहितात.

१७. परवर्ण दोन प्रकारचे आहेतः--**स्वरादि** आणि **स्वरान्त**.

(अ) स्वर हे ज्यांच्या आरंभीं यावे लागतात ते **स्वरादि** वर्ण होत. ते दोन आहेतः बिंदु (अं) आणि विसर्ग (अः).

(आ) स्वर हे ज्यांच्या अंतीं यावे लागतात ते **स्वरान्त** वर्ण होत. **व्यंजनें व्यंजनें** म्हणून ज्यांस म्हणण्याचा परिपाठ आहे तीं हींच होत. स्वरान्त वर्ण किंवा व्यंजनें, म्हणजेच हल्, हीं ३४ आहेत. **क** पासून पुढील सर्व.

टीप---ह्याप्रमाणें वर्णमालेंत आरंभीं दिलेले ४८ वर्ण आहेत. स्वर १२ आणि पर ३६; आणि ह्या ३६ परांपैकीं स्वरादि वर्ण २ आणि स्वरान्त वर्ण म्हणजे व्यंजनें ३४ आहेत.

१८. व्यंजनांच्या पुढें स्वर आला म्हणजे त्याचा नीट उच्चार होतो; एरव्हीं उच्चाराच्या दृष्टीने तीं केवळ लंगडीं होत. म्हणून निवळ व्यंजनांचा उल्लेख करावयाचा असतां तीं पायमोडकीं लिहिण्याचा प्रचार आहे. जसें:--क्, ख्, ग्, घ्, इ०. त्यांचा अस्पष्ट उच्चार दाखविण्यासाठीं त्यांच्या खालच्या बाजूस उजव्या बाजूकडे झुकता जरासा तिरकस फांटा ( ् ) काढतात, त्यास **पाय मोडणें** असें म्हणतात.

(अ) स्वर आधीं आला असतां व्यंजनाच्या उच्चारास मदत होत नाहीं हें उघड आहे. अक्, इक्, ह्यामध्यें क् हें व्यंजन पहिल्या प्रमाणेंच निराधार म्हणजे उच्चाराच्या बाबतींत लंगडें आहे; ही गोष्ट अक्, इक् ह्यांमधील व्यंजन पाय मोडकें आहे यावरून स्पष्टच आहे. म्हणून व्यंजनाचा उच्चार स्पष्ट होण्यासाठीं स्वर त्याच्या अंतीं म्हणजे पुढें येऊनच त्यांत मिळाला पाहिजे हें निर्विवाद आहे.

( आ ) मुलांस वर्णमाला शिकवितांना व्यंजनांचा उच्चार स्पष्टपणें करितां येण्यासाठीं तीं नेहमीं अकारान्त सांगण्याची व त्या उच्चारास धरून पाय न मोडतां लिहिण्याची चाल आहे. जसें:—**क, ख, ग, घ, इ०.**

१९. वर्णमाला लिहिण्याची जी पद्धति आरंभीं दिली आहे, त्या पद्धतीस **देवनागरी लीपि** असें म्हणतात. देवनागरीचेंच संक्षेपानें नुसतें **नागरी** असें रूप झालें.

टीप—ह्या लिपिस देवनागरी हें नांव मिळण्याचें कारण असें दिसतें कीं, हिंदुस्थानांतील मूळच्या गोंड, भिल्ल, इ. जातींच्या लोकांच्या मानानें शरीर व मन, अथवा कांति व ज्ञान, ह्या गोष्टींत आर्य लोक हे अधिक तेजःपुंज पडल्यामुळें त्यांत **देव** ( दिव्–प्रकाशणें ह्या संस्कृत धातूपासून देव शब्द निघाला आहे. ) हें अन्वर्थक नांव मिळालें व त्यांच्या वसतिस्थानास ग्रामाच्या उलट नगरी म्हणण्यांत आलें. तेव्हां अर्थातच देवनगरींमध्यें उपयोगांत येणारी ती देवनागरी अशी या नांवाची उपपत्ति आहे.

२०. जलद लिहितांना वर्णमालेंतील वर्ण मोडून म्हणजे कांहीं अंशीं मुरडून किंवा जरासें वेडेवांकडें लिहिण्यांत येऊं लागले. ह्यामुळें ह्या मोडून जलद लिहिण्याचे पद्धतीस **मोडी** हें सार्थ नांव आहे. मोडी लीपि वाचण्यास कठिण आहे; आणि विशेषेंकरून अनभ्यस्त बालांस तर ती फारच दुर्बोध आहे.

टीप—मोडी लिपीचे उत्पत्तिसंबंधानें अद्याप वाद आहे. परंतु व्याकरणदृष्ट्या तो महत्त्वाचा नसल्यामुळें त्यांत पडण्याची येथें आवश्यकता नाहीं.

२१. वर्ण न मोडतां लिहिण्याची पद्धति मोडीचे मानानें बालांस फारच सुबोध आहे; म्हणून तिला **बालबोध** असें म्हणतात.

( अ ) ग्रंथलेखनाच्या व छापण्याच्या कामीं बहुधा बालबोध लिपीचाच उपयोग करितात. आणि व्यवहारांत म्हणजे पत्रें, जमाखर्च, अर्ज, रोखे इत्यादिकांच्या कामीं व खासगी व सरकारी दप्तरांत मोडी लिपीचाच विशेष प्रचार आहे. म्हणूनच वर्णमालेचें मोडी स्वरूप व्याकरणावरील पुस्तकांत देण्याची जरूर नाहीं.

२२. वर्णमालेंतील वर्णांसंबंधानें कांहीं गोष्टी ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत. त्याः—

(अ) कांहीं वर्ण केवळ तत्सम संस्कृत शब्दांतच आढळतात. ते असेः— ऋ, ऌ, ङ्, ञ्. उदाहरणेंः—ऋतु, ऋषि, मृदु, कृपा, क्लृप्त, क्लृप्ति, वाङ्मय, पराङ्मुख, नञ् तत्पुरुष, इ० यांपैकीं ऌ, व ञ् हे अनुक्रमें दोन व एका शब्दांतच बहुधा दृष्टीस पडतात असें म्हटलें तरी चालेल.

(आ) ष् निवळ मराठी शब्दांत क्वचित् येतो. तरी तो केवळ संस्कृत मराठींतच दिसतो असें नाहीं; तर अन्य भाषांतून आलेल्या शब्दांतही आढळतो. तुषार, संतोष ह्या संस्कृत शब्दांप्रमाणें, हुषार, खुष इ० यावनी शब्दांतही ष् दिसतो. सत्राष्ण, गोष्ट, एकसष्ट, बासष्ट, खाष्ट, उष्टें, अशा कांहीं संस्कृतोद्भव शब्दांतही तो येतो; नाहीं असें नाहीं.

(इ) ऐ आणि औ हे स्वर इतर स्वरांच्या मानानें मराठींत कमी येतात. आणि कांहीं शब्दांत ऐ व औ ह्यांच्या जागीं अई, अय आणि अऊ, अव असें अनुक्रमें विकल्पानें लिहिण्याची थोडीशी चाल आहे. जसें: —चैन—चईन, कैं—कईं, कैवार—कयवार, थै थै थय थय, कौल—कऊल, चौथ-चऊथ, लौकर—लवकर, चौताळणें -चवताळणें, इ०. परंतु शिष्ट मराठीचा कल ह्या चालीचे उलट दिसतो. म्हणजे ऐकारयुक्त व औकारयुक्त रूपांकडेच तिचा विशेष कल दिसून येतो, आणि त्या बाजूनेंच तिला स्थैर्य येत आहे. कवितेंत मात्र छंदोनुरोधानें वाटेल तें रूप येऊं शकतें.

[ए आणि ओ हे स्वरही मराठींत कमी येतात असें खेरांचें म्हणणें आहे. परंतु त्यांत अर्थ दिसत नाहीं. कारण कीं, कोणत्याही मराठी पुस्तकाच्या कोणत्याही पानाकडे लक्ष दिलें तरी त्यांत एका मात्रेचीं अनेक अक्षरें दृष्टीस पडल्यावांचून रहाणार नाहींत. पडते, केलें, बोलेल, असे, घोडे, त्याचे, एरव्हीं, एकूण, एवढा, जातो, असो, करो, ओरु, ओझें, ओढा, हे व ह्यांसारखे शेंकडों शब्द वाचकांच्या दृष्टीसमोर तेव्हांच उभे राहतील. आतां ए आणि ओ हे स्वर मराठी शब्दांत कमी येतात, या खेरांच्या म्हणण्याचा अर्थ असा कीं, हे स्वर आरंभीं

असलेले शब्द मराठींत कमती, असें जर कोणी म्हणेल तर तें म्हणणें कांहीं अंशीं खरें आहे, ह्यांत संशय नाहीं. तथापि अशीं अपुरीं विधानें शास्त्रीय ग्रंथांत करणें कधींही क्षम्य नाहीं. शिवाय शोधांतीं असेंही आढळून आल्यावांचून राहणार नाहीं कीं, इ, ई, ऊ, ऋ, हे स्वर आरंभी ज्यांत आहेत असे शब्द ए आणि ओ ह्यांनीं आरंभ होणाऱ्या शब्दांपेक्षांही कमी आहेत. तर मग इ, ई, ऊ, ऋ, ह्यांचा मुळींच उल्लेख न करितां ए, व ओ, हे स्वर मराठी शब्दांत क्वचित् येतात, असें विधान करणें केवळ भ्रामक होय.

( ई ) अ, आ, उ हे मराठींत शब्दारंभी पुष्कळ येतात. बाकीचे स्वर त्यांच्या मानानें शब्दारंभीं कमी येतात, आणि त्यांतही ऋ फारच कमी आढळतो, व ऌ नें आरंभाचा शब्दच नाहीं.

( उ ) त्याचप्रमाणें ङ्, ञ्, ण्, ळ् हीं व्यंजनें शब्दारंभी कधींच येत नाहींत.

( ऊ ) बिंदु व विसर्ग ह्या दोनच वर्णांचे नांव वेगळें व उच्चार वेगळा; बाकी सर्व वर्णांचीं नांवें व उच्चार एकच आहेत.

[ आतां वर्णमालेंतील स्वर व व्यंजनें ह्यांच्या संख्येचा विचार करूं. स्वर व व्यंजनें किती व कोणतीं हा प्रश्न मराठींत थोडासा वादग्रस्त आहे; आणि त्याचा वर दिलेला निर्णयही कांहीं अंशीं नवीनच आहे. म्हणून हा वाद काय आहे आणि येथें दिलेला निर्णयच कां स्वीकारिला पाहिजे, हें जरासें सविस्तरच सांगितलें पाहिजे. हा ऊहापोह अर्थातच लहान विद्यार्थ्यांसाठीं नसल्यामुळें त्यांमध्य आतांपर्यंत स्पष्ट न झालेल्या व्याकरणांतील गोष्टींचा संबंध येण्यास हरकत नाहीं.

लहान मुलांस वर्णमाला शिकवितांना स्वर सोळा व व्यंजनें छत्तीस शिकविण्यांत येतात. परंतु ही संख्या निरनिराळे वैयाकरण निरनिराळी मानितात. तेव्हां त्यांचें म्हणणें काय आहे तें प्रथम पाहिलें पाहिजे.

प्रथम स्वर घेऊं. अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ॡ, ए, ऐ, ओ, औ, अं, अः, असे स्वर सोळा आहेत. असें मुलांस वाटतें. ह्या स्वर मालिकेंत ॡ ( दीर्घ ) हा कोठून कसा व कधीं शिरला, हेंच गूढ आहे. कारण संस्कृत व्याकरणांत असें साफ सांगण्यांत आलें आहे, कीं ऌ, ह्या स्वरास दीर्घत्व नाहीं. म्हणजे संस्कृत भाषेंत दीर्घ ॡ हा स्वर नाहींच; आणि शिवाय मराठींतही तो कोठें दिसत नाहीं. तेव्हां केवळ अ, इ, उ, ऋ, ह्यांचे दीर्घ स्वर आ, ई, ऊ, ॠ, हे देण्याचे ओघांत अज्ञानपणानें दीर्घ ॡ, चाही अवतार प्रकट झाला असावा असें वाटतें. तें कांहीं असो, दीर्घ ॡ यांस मुळीं संस्कृतांत व मराठींतही अस्तित्वच नाहीं, हें उघड आहे.

अं, अः हे स्वर नसून बिंदु व विसर्ग हे दर्शविण्यासाठीं अ चा आरंभीं आधार घेऊन अस्तित्वांत आले आहेत, हें उघड आहे. शिवाय अं, अः ह्यांची जर स्वरांत स्वतंत्रपणें गणना केली तर इं, इः, उं, उः इ० आणखी अनेक स्वर मानावे लागतील. म्हणून अं अः ह्यांची गणना स्वरांत स्वतंत्रपणें कोणीही करीत नाहीं, हें योग्यच आहे. तर मग बिंदु आणि विसर्ग हें काय आहेत ? हा प्रश्न स्वरसंख्येचा विचार पूर्ण झाल्यावर हातीं घेऊं. सध्या सारांश इतकाच कीं, दीर्घ ॡ मुळीं अस्तित्वांतच नाहीं; आणि अं, अः, म्हणजे बिंदु व विसर्ग हे स्वर नव्हत. तेव्हां सोळांमधून हे तीन गेले म्हणजे बाकी राहिले तेरा. म्हणून हे तेराच स्वर मराठींत मानणें योग्य होय, असें अलीकडील मराठी वैयाकरणांचें मत आहे.

परंतु सूक्ष्म शोधांतीं असें दिसतें कीं, दीर्घ ॠ हा स्वर सुद्धां मराठींत मानण्याची जरूर नाहीं. ऱ्हस्व ऋ सुद्धां निवळ मराठी शब्दांत दृष्टीस पडत नाहीं. तरी संस्कृतांतून मराठीमध्यें जे कांहीं शब्द जसेच्या तसे, म्हणजे त्यांत कांहींएक फेरबदल न होतां आले आहेत, आणि ज्यांस तत्सम अशी संज्ञा आहे, त्या तत्सम शब्दांत तो दिसतो. आणि मृदु, नृत्य, कृपा, इ० तत्सम शब्द मराठींत प्रचारांत आहेत, तेव्हां ऱ्हस्व ऋची गणना मराठी स्वरांत केलीच पाहिजे. परंतु दीर्घ ॠ हा संस्कृतामध्येंही कमीच येतो, आणि मराठींत तर मुदलींच नाहीं. क्लृप्त व क्लृप्ति अशा दोन शब्दांतच ज्याप्रमाणें ऌ हा स्वर मराठींत दिसतो, त्याप्रमाणें दीर्घ ॠ हा जरी निदान एका तत्सम प्रचारांतील शब्दांत दृष्टीस पडता तरी तो मराठींत स्वीकारावा लागता. अमुक एक स्वर किंवा व्यंजन अमुक भाषेंत आहे कीं नाहीं, ह्या प्रश्नाचा निकाल करितांना, इतक्या इतक्या शब्दांतच तो वर्ण दिसतो हा शब्दसंख्येचा मुद्दा अप्रकृत होय. तो वर्ण जरी एकाच शब्दांत वास करीत असला तरी त्याचा वर्णमालेंत अन्तर्भाव झालाच पाहिजे हे उघड आहे. परंतु दीर्घ ॠ, हा मूळ मराठी, किंवा तत्सम प्रचारांतील मराठी, किंवा तद्भव मराठी, म्हणजे कोणत्याही एका शब्दांत येत नसल्यामुळें त्याची मराठी स्वरमालिकेंत कां गणना व्हावी, हें आम्हांस समजत नाहीं. पितृ + ऋण=पितॄण, हें उदाहरण पाहून दीर्घ ॠ या स्वराचा मराठींत समावेश केला पाहिजे असें वाटण्याचा संभव आहे. पण 'पितॄण' हा संधि संस्कृतांतही वैकल्पिक आहे; म्हणजे 'पितृ ऋण' असें ही संधिरहित रूप संस्कृतांत चालतें. तेव्हां तें मराठींतही चालण्यास हरकत नाहीं. आणि शिवाय 'पितॄण' हे दीर्घ ऋकारयुक्त रूप मराठी ग्रंथांत कोठें आल्याचा पुरावा अद्याप पुढें आलेला नाहीं. आणि जरी 'पितॄण' असें दिर्घ ऋकार युक्त रूप मोठ्या प्रयासानें शोधांतीं कोठें आढळलें, तरी तें प्रचलित मराठींत खास नाहीं. तें फार तर प्रचलित मराठी व्याकरणावरील पुस्तकांत संधिप्रकर-

णींच आढळतें. म्हणून दीर्घ ॠ हा सुद्धां मराठींत नाहींच असें म्हटलें पाहिजे. एवंच दीर्घ ऌ, दीर्घ ॠ, आणि अं, अः हे चार वर्ज करून बाकीचे बारा स्वर मराठींत आहेत. आणि तेच व्यंजनांस लावून बाराखड्या तयार कराव्या. म्हणजे बिंदु व विसर्ग हे गाळून ऋ व ऌ अधिक घ्यावे व बाराखडी लिहावी. जसेः—क, का, कि, की, कु, कू, कृ, क्ऌ, के, कै, को, कौ.

आतां येथें कोणी असा आक्षेप घेईल कीं, जर दीर्घ स्वर मूळ नव्हत, आणि जर ए, ऐ, ओ, औ, हेही स्वर मूळ नसून ते संयुक्त आहेत, तर हे सर्व वगळले पाहिजेत. आणि अ, इ, उ, ऋ, ऌ, हे पांचच मूळ स्वर मानिले पाहिजेत. हा आक्षेप वास्तविक सत्य आहे. अ, इ, उ, ऋ, ऌ हे पांचच मूळ स्वर आहेत; आणि आ, ई, ऊ, हे तीन दीर्घ, व ए, ऐ, ओ, औ हे चार संयुक्त, असे बाकीचे सर्व सातही स्वर मूळ स्वरांपासूनच उत्पन्न झालेले आहेत, हें अक्षरशः खरें आहे. तथापि ए, ऐ, ओ, औ, हे ज्या स्वरांचे संयोग आहेत, त्यांजपासून त्यांचा उच्चार भिन्न आहे; म्हणजे त्यांच्या उच्चारांत अवयवांचा उच्चार स्पष्ट नाहीं, अथवा त्यांच्या उच्चारांत अवयवांचा मागमूस लागत नाहीं. त्यांचे उच्चारावरून ते अमुक अमुक स्वरांपासून झाले असें सांगतां येत नाहीं हें एक, आणि या उच्चारभिन्नत्वास अनुसरून ते लिहिण्याची तऱ्हाही भिन्न आहे हें दुसरें. या दोन कारणांकरितां त्यांस स्वरमालिकेंत गोविलें आहे.

या ठिकाणीं असें सांगण्यांत येण्याचा संभव आहे कीं, ए ( अ+इ, ई ) आणि ओ ( अ+उ, ऊ ) हे जरी अनुच्चरितावयव असले, तरी ऐ आणि औ हे उच्चरितावयवच आहेत. म्हणून वरील तत्त्वांस अनुसरून ऐ आणि औ या दोहोंचा तरी स्वरमालेंत अन्तर्भाव व्हावयास नको. या शंकेचें समाधान इतकेंच कीं, ऐ आणि औ यांस जरी एका आधुनिक वैयाकरणानें उच्चरितावयव असें म्हटलें आहे, तरी तें सर्वस्वी सत्य नाहीं. ऐ=अ+ए=अ+ (अ+इ, ई )=आ+इ, ई; आणि औ=अ+ओ=अ+( अ+उ, ऊ, )=आ+उ, ऊ; हीं त्यानें दिलेलीं समीकरणें सर्वस्वी ग्राह्य आहेत असें जरी मानिलें, तरी ए आणि औ ह्यांचें उच्चरितावयवत्व सिद्ध होत नाहीं तें नाहींच. ऐ ह्याचा आइ व औ ह्याचा आउ असा उच्चार होतो, असें प्रस्तुत लेखकास वाटत नाहीं. त्यांचा उच्चार अनुक्रमें अइ व अऊ ह्यांच्यासारखा कांहीं अंशीं होतो, इतकेंच फार तर सर्वसंमत होण्यासारखें आहे. परंतु अ + इ = ए आणि अ + उ = ओ अशीं संधिदृष्ट्या वास्तविक समीकरणें आहेत. पण हीं संधिदृष्ट्या वास्तविक समीकरणें ऐ व औ ह्यांच्या उच्चारांशीं जमत नाहींत; आणि ऐ व औ ह्यांच्या उच्चारांतील समीकरणें—ऐ = अइ, औ = अउ – हीं संधिदृष्ट्या वास्तविक म्हणजे बराबर नाहींत, म्हणजे तीं वस्तुस्थितीशीं जमत नाहींत, हें उघड आहे. ह्यामुळें ए, ऐ, ओ, औ, हे सारखेच अनुच्चरितावयव आहेत, आणि

१ क् + अ = क; २ अ + क् = अक्

३ { ∸ + अ = ∸ अ; : + अ = : अ; } ४ { अ + ∸ अं = अं. अ + : अः }

जर अक् म्हणजे स्वराच्या पुढें व्यंजन येणें शक्य आहे ( उ०—पृथक् ) तर ∸ अ, : अ हेंही अशक्य नाहीं ( उ०—असें असतां, प्रायः असें ). अक् हें एका शब्दांत मिळतें, परंतु ∸ अ, : अ हीं एका शब्दांत मिळत नाहींत, हें जरी खेर यांनीं स्वतः सांगितलें नाहीं, तरी त्यांचा तसाच आशय असला पाहिजे. हें आम्हांस मान्य आहे. तथापि २ आणि ३ यांमधील हा फरक उच्चाराच्या व लिपीच्या दोन्ही दृष्टींनीं उपेक्षणीयच होय. कारण कीं बिंदु व विसर्ग आणि पुढील स्वर ( ३ ) हीं जशीं कोठेंही एक जीव न होतां भिन्न भिन्नच राहतात, म्हणजे त्यांच्या उच्चारास पुढील स्वराची मदत होत नाहीं त्याचप्रमाणें पूर्वीचा स्वर व नंतरचें व्यंजन ( २ ) हीं भिन्न भिन्नच राहून पुढील व्यंजनाच्या उच्चारास मागील स्वराची मदत पोंचत नाहीं, हें उघड आहे. एवंच बिंदु व विसर्ग आणि व्यंजनें ह्यांमधील जो फरक खेरांनीं टीपेंत सांगितला आहे, तो एक तर सर्वत्वा खरा नाहीं, नाहीं तर निदान निरुपयोगी होय.

' तर मग बिंदु व विसर्ग यांस व्यंजन म्हणणेंच रास्त व अवश्य नाहीं काय ?' वाचक हो, इतकी घाई कामाची नाहीं. शास्त्रीय विचारांत तरी उतावळेपणा इष्ट नाहीं. गेल्या वाक्यसमुच्चयांत नमूद केलेल्या चार स्थळांपैकीं २ आणि ३ यांची जरी तशी वासलाद लागली तरी १ आणि ४ हीं सर्वस्वी एक नाहींत. उच्चार होण्यासाठीं ज्यांस स्वरांची मदत लागते त्यांस व्यंजनें म्हणतात, असें जेव्हां व्यंजनांचें ( क– ळ हल् वर्णांचें ) लक्षणांत करण्यांत येतें, तेव्हां त्या ' व्यंजनाच्या पुढें स्वराची मदत ' असा अर्थ अध्याहृत नाहींत काय ? जर ' होय ' तर हेंच लक्षण बिंदु व विसर्ग ह्यांस अक्षरशः लागू पडतें काय ? अथवा व्यंजनाचे याच अर्थानें बिंदु व विसर्ग यांस व्यंजनें म्हणतां येईल काय ?

' पण तुमच्या पहिल्या प्रश्नाचें ' होय ' असें जें आम्हीं उत्तर दिलें, तें दूरवर विचार करून दिलें नाहीं. तेव्हां तें उत्तर परत घेऊन आम्ही असें म्हणतों कीं, व्यंजनाचे पुढें स्वराची मदत—हे शब्द व्यंजनाचे व्याख्येंत अध्याहृत न समजतां बिंदु व विसर्ग यांस व्यंजनाचें लक्षण लावितां येईल. उच्चारासाठीं मदत, मग ती स्वराचे पुढें येण्यानें होवो किंवा मागें येण्यानें होवो, एकच. तेव्हां व्यंजनाचें जें पहिलें लक्षण आहे तें तसेंच काईम ठेवावें म्हणजे झालें. आणि ह्या इतक्या सूक्ष्म विचारानेंच खेरांनीं व्यंजनाचें लक्षण न बदलतां बिंदु व विसर्ग ह्यांची व्यंजनांमध्यें भरती केली असावी. आतां तर तुमची सूक्ष्मता

संपली कीं नाहीं ? ' वाचक हो, पुन्हा तेंच. शास्त्रीय विषयांत डोकें शांत ठेविलें पाहिजे. तसें केल्यानें पुढील विवेचन समजून घेण्यास फार सोपें जाईल. माझा वाद खेरांशीं नाहीं. मी त्यांचें नांवाचा उल्लेखही करणार नव्हतों. परंतु आजकाल त्यांचें व्याकरणाचा प्रसार चालला आहे आणि त्यांच्या बाजूचें म्हणणें नीट मांडण्यांत आलें आहे कीं नाहीं, हें वाचकांस स्वतः पाहण्यास मिळावें म्हणून त्यांच्या व्याकरणाचा उल्लेख करून त्यांच्या शब्दांचें मराठी रूपांतर देणें मला योग्य दिसलें, इतकेंच. एरवीं येथील वाद केवळ शास्त्रीय आहे. तेव्हां शास्त्रीय दृष्टीनें या प्रश्नाचा काय निकाल लागतो तो पहा.

पूर्वीं जेव्हां बिंदु व विसर्ग यांनां वर्णमालेंतून साफ गाळीत असत, त्या वेळची व्यंजनाची अस्पष्टपणें केलेली व्याख्या घेऊन तीच बिंदु व विसर्ग यांनां अंधपणें लावणें नीट नाहीं; कारण कीं, तीं जर स्पष्ट केली, म्हणजे तींत जो अध्याहार आहे तो पूर्ण व्यक्त केला, तर ती बिंदु व विसर्ग यांस लागूच होत नाहीं. ती जशी अस्पष्ट आहे, तशीच अस्पष्ट ठेवून बिंदु व विसर्ग ह्यांसही ती डोळसपणें म्हणजे सुज्ञपणें लावणें, हें कांहीं शास्त्रीय दृष्ट्या सर्वथा वावगें नाहीं. तरी असें करण्यांत साहजिकपणें काय होत आहे त्याकडेही आपली डोळेझांक होता कामा नये. व्यंजन या शब्दाचा आपल्या मनांत असलेल्या नेहमींचा अर्थ वाढवून येथें त्याचा आपण त्यापेक्षां अधिक व्यापक अर्थानें उपयोग करीत आहों, हें विसरतां कामा नये. तसें करण्यास प्रचारांची आडकाठी कदाचित् असेल, पण शास्त्राची नाहीं. तथापि प्रचारांतील शब्दांस अधिक व्यापकता देण्याच्या वेळीं तसें करणें विवक्षित स्थळीं कितपत योग्य आहे ह्याचाही शास्त्रानें सूक्ष्मपणें पूर्ण विचार केला पाहिजे. तेव्हां, नेहमींपेक्षा अधिक व्यापक अर्थानें व्यंजन शब्दाचा उपयोग करून बिंदु व विसर्ग ह्यांची गणना व्यंजनांत केली तरी नेहमींच्या मर्यादित अर्थानें म्हटलीं जाणारीं व्यंजनें ( क—ळ ), आणि हीं व्यापक अर्थानें म्हटलीं जाणारीं व्यंजनें ( बिंदु व विसर्ग ) ह्यांमधील फरक स्पष्ट केलाच पाहिजे. नाहीं तर न जाणों कदाचित् भलताच परिणाम घडावयाचा. म्हणूनच आम्हीं बिंदु व विसर्ग ह्यांस स्वरादि म्हणजे स्वर आदि आहे ज्यामध्यें ते; आणि क पासून ळ पर्यंतच्या वर्णांस स्वरान्त म्हणजे स्वर अंतीं येतो ज्यांच्या ते, म्हणजेच हल् वर्ण, किंवा नेहमींच्या अर्थानें, व्यंजनें असें म्हटलें आहे; आणि व्यंजन शब्दाचा उपयोग ह्या मर्यादित म्हणजे नेहमींच्या अर्थानें, बिंदु व विसर्ग यांस व्यंजनांच्या मर्यादेच्या बाहेरच ठेवून, करण्याचें योजिलें आहे. या योजनेची इष्टता आणखी पुढील विवेचनावरून वाचकांस पटल्यावांचून राहणार नाहीं.

प्रथम बिंदु व विसर्ग ह्यांचा व्यंजनांतच अन्तर्भाव करण्याचीं जीं आणखी कारणें देण्यांत येतात त्यांचा विचार करूं. ' शिवाय अनुनासिक व्यंजनें आणि र्, स्, इ. ह्यांचीच ते ( बिंदु व विसर्ग ) अनुक्रमें रूपांतरें आहेत. याप्रमाणें

अनुस्वार ( बिंदु ) हा एक अनुनासिक आणि विसर्ग हा एक अर्धस्वर आहे असें मानिलें तरी चालेल. वास्तविक म्हटलें असतां ते ह्या व्यंजनाशीं एकरूप आहेत असेंच मानिलें पाहिजे, ' यावरूनही बिंदु व विसर्ग हे स्वरादि आहेत व व्यंजनें स्वरान्त आहेत हा त्यांमधील फरक खेरांच्या लक्षांत पूर्णपणें वसत नव्हता, किंवा तो त्यांच्या मतें अगदीं उपेक्षणीयच होता असें ठरत नाहीं काय ? बिंदु आणि अनुनासिक व्यंजनें जर ' वास्तविक म्हटलें असतां ' एकरूप होत, म्हणजे त्यांचें तादात्म्य आहे, तर अनुनासिक व्यंजनांत व बिंदुमध्यें कांहीं एक फरक असतां कामा नये. परंतु ङ, ञ, ण, न, म हे स्वरान्त आहेत; आणि बिंदु स्वरादि आहे. पण हा मुद्दा जरी बाजूस ठेविला, तरी वरील विधानापासून काय काय घोंटाळे, अडचणी, व अनिष्ट प्रकार उत्पन्न होतात ते पहा. अनुनासिक व बिंदु जर एकच, तर वाटेल त्या ठिकाणीं त्यांची अदलाबदल झाली पाहिजे. परंतु वाङ्मय, नञतत्पुरुष, मृण्मय, धन्वंतरि, सम्राट्, आणि कींव, रेंव, कोंवळा, ऊंस, आंस, भोंसकणें, गहूं, बीं, गुरूं, तळें, इ० शब्दांतील अनुनासिक वर्णांची व बिंदूची अदलाबदल करण्यास कोणी समंजस मनुष्य डोळे उघडे ठेवून धजेल असें वाटत नाहीं. शिवाय बिंदु व अनुनासिक व्यंजनें ह्यांचें आणि विसर्ग व ' र् स् इ० ' ह्यांचें जर ' वास्तविक म्हटलें असतां ' तादात्म्य असतें तर पाणिनीसारख्या संकृत वैयाकरणास अनुनासिकांचा अनुस्वार कोणकोणत्या स्थळीं होतो, आणि विसर्गाचा र् किंवा स् कोठें होता, किंवा उलट र्, स् ह्यांचा विसर्ग कोठें होतो, ह्यासंबंधाचे विस्तृत नियम देण्याची नसती उठाठेव करण्याची काय जरूर होती, हें आम्हांस तरी समजत नाहीं. आणि ज्या अर्थीं त्यांनीं ही उठाठेव केलेली आहे, त्या अर्थीं बिंदु व अनुनासिक व्यंजनें, आणि विसर्ग व र्, स् ह्यांचें तादात्म्य नाहीं, इतकेंच नव्हे तर अनुनासिक व्यजनें व र्, स् ह्यांचींच बिंदु व विसर्ग हीं केवळ रूपांतरें नसून, बिंदु व विसर्ग हे त्या त्या व्यंजनापासून अगदीं भिन्न आहेत, असेंच त्या प्राचीन पूज्यदान ज्ञानसूर्याचें मत होतें असें मानावयास नको काय ? तेव्हां बिंदु व विसर्ग, आणि अनुनासिक व्यंजनें व र्, स् ह्यांचें तादात्म्य आहे, किंवा पहिले दुसऱ्यांचें रूपांतर होत, हीं दोन्हीं विधानें शास्त्रीय दृष्ट्या केवळ त्याज्यच होत हें निर्विवाद आहे.

ह्याप्रमाणें तादात्म्य व रूपांतर ह्यांपैकीं कोणतेंच मत शास्त्रसंमत नाहीं, म्हणून बिंदु व विसर्ग यांस स्वतंत्र व्यंजनेंच म्हणणें बरें, असें वाटण्याचा संभव आहे. खेरे सुद्धां अखेरीस म्हणतात कीं, ' परंतु ज्या अर्थीं त्यांचा आकार व उच्चारही कांहीं अंशीं भिन्न आहे, त्या अर्थीं त्यांस स्वतंत्र व्यजनें मानणेंच मला योग्य दिसतें. ' ह्या विधानांतील पूर्व, खरें आहे; तरी त्यांतील उत्तर मात्र ग्राह्य ठरत नाहीं; म्हणजे बिंदु व विसर्ग यांचा अनुनासिक व्यंजनें व र्, स् ह्यांपासून आकार व उच्चारही बऱ्याच अंशीं भिन्न आहे हें उघड आहे; म्हणून ते स्वतंत्र वर्ण

होत ह्यांत कांहीं एक संशय नाहीं. आणि त्यांचा उच्चार स्वरांच्या मदतीवाचून होत नाहीं, म्हणून ते स्वरही नव्हत. तेव्हां त्यांचा स्वरेतर वर्णांतच अन्तर्भाव झाला पाहिजे हें उघड आहे. ह्या स्वरेतर वर्णांस व्यंजन असें विस्तृत अर्थानें म्हणतां येईल. तथापि व्यंजन शब्दाचा अर्थ मात्र या ठिकाणीं नेहमीच्या अर्थापेक्षां अधिक व्यापक आहे हें विसरतां कामा नये. म्हणून बिंदु व विसर्ग ह्यांस स्वरादी वर्ण असें भिन्न नांव देऊन हल् म्हणजे क पासून अखेरपर्यंतचें जे स्वरान्त वर्ण त्यांसच, नेहमींच्या मर्यादित अर्थानें, व्यंजनें म्हणणें बरें, ह्या गोष्टी वर सविस्तर आल्याच आहेत.

तथापि बिंदु व विसर्ग यांस नेहमींच्या अर्थानें व्यंजनें न समजण्याची आणखीहि कांहीं कारणें दाखवितां येतील. जर बिंदु व विसर्ग हीं व्यंजनें होत असें मानिलें तर मराठीमध्यें निवळ मराठी शब्दांपैकीं सुद्धां अनेक शब्द व्यंजनान्त मानावे लागतील. गहूं, बीं, दहीं, पांखरूं, तळें, घोसाळें, असें असतां करावें, करूं, कीं, प्रायः, स्वतः इ० व्यंजनान्त शब्दांचा मराठीमध्यें अगदीं सुळसुळाट उडून जाईल. पण जाईना परता; त्यापासून आपलें काय नुकसान आहे, असें वाटण्याचा संभव आहे. परंतु ह्यापासून पुढें अनेक अतर्क्य अडचणी उत्पन्न होणें संभवनीय आहे. सध्यां इतकेंच पुरें कीं, वर दिलेल्या शब्दांस कोणी 'व्यंजनान्त' म्हणण्यास तयार नाहीं. आणि शास्त्र जरी झालें तरी त्यास रूढीस सर्वस्वी धाब्यावर बसवितां येत नाहीं; इतकेंच नव्हे तर कधीं कधीं 'शास्त्राद्रूढिर्बलीयसी' ह्या न्यायानें शास्त्रास रूढीचाच मार्ग स्वीकारावा लागतो.

बिंदु व विसर्ग ह्यांस व्यंजनें न समजण्याचें आणखी एक सुयुक्तिक कारण दाखवून हा आधींच फार लांबलेला विषय पुरा करितों. दोन किंवा अधिक व्यंजनें एकत्र आल्यानें, म्हणजे मध्यें स्वर न येतां एकामागून एक अशीं तीं अव्यवहितपणें आलीं असतां संयुक्त व्यंजनें तयार होतात; परंतु बिंदु व विसर्ग ह्यांजपासून आपआपसांत किंवा कोणत्याहि व्यंजनाबरोबर एकही संयोग बनत नाहीं. क् आणि र् ह्या दोहोंपासून क्र किंवा र्क् हीं संयुक्त व्यंजनें जशीं तयार होतात, तशी क् व बिंदु किंवा विसर्ग ह्यांपासून कोणता संयोग होतो ? ं + क्, क् + ं, : + क्, क् : ह्या चारी स्थानचा संयोग आमच्या तरी कल्पनाशक्तीच्या आटोक्यांत नाहीं, हें आम्ही प्रांजलपणें कबूल करितों.

सारांश, या सर्व लांबलचक ऊहापोहापासून हाच अखेरचा निकाल लागतो कीं, बिंदु व विसर्ग ह्यांची स्वरांत गणना करूं नये, हें निर्विवाद आहे. आणि जरी बिंदूचा उच्चार कांहीं स्थळीं अनुनासिक व्यंजनांप्रमाणें झाला, आणि कांहीं स्थळीं कांहीं अनुनासिक व्यंजनांचा बिंदु झाला; तसेंच जरी विसर्गाचा

कांहीं स्थळीं र्, स्, झाला, आणि कांही स्थळीं र्, स्, ह्यांचा विसर्ग झाला, तरी तेवढ्यावरून बिंदु व विसर्ग हे अनुनासिक व्यंजनें व र्, स्, ह्यांच्या रूपान्तरापासून अनुक्रमें उत्पन्न झाले आहेत, किंवा त्यांमध्यें तादात्म्य आहे, असें म्हणतां यावयाचें नाहीं. तसेंच ह्यांचा उच्चार स्वरांच्या मदतीशिवाय होत नाहीं, ह्या अस्पष्ट बाबतींत जरी त्यांमध्यें व व्यंजनांमध्यें साधर्म्य दिसत असलें, तरी त्या साधर्म्याच्या मानानें त्यांमध्यें वैधर्म्यही फारच आहे, व तें शास्त्रीय दृष्ट्या महत्वाचें आहे, यामुळें त्यांची व्यंजनांतही गणना करितां येत नाहीं. आणि त्यांचा उच्चार व लिपि ही दोन्ही, खेर यांनीं सांगितल्याप्रमाणें, सर्व वर्णांच्या उच्चाराहून व लिपीहून निराळी पडल्यामुळें त्यांची वर्णमालेंत स्वतंत्रपणे भरती करणें अवश्य आहे. ह्याकरितां त्यांस 'स्वरादि' हें तिसरेंच नांव देऊन व्यंजन शब्द नेहमींच्याच मर्यादित अर्थानें वापरणें चांगलें हें उघड आहे. एवंच, वर्णांचें वर्गीकरण स्वर व व्यंजनें असें करण्यापेक्षां खाली दिल्याप्रमाणें करणें अधिक प्रशस्त आहे.




आतां अखेरीस व्यंजनसंख्येकडे वळूं. संस्कृतांत फक्त तेहतीस व्यंजनें आहेत. ळ हें निराळें व्यंजन संस्कृतांत नाहीं. तें वेदामध्यें उच्चारांत डच्या जागीं येतें इतकेंच. परंतु मराठीमध्यें डच्या जागीं ळ किंवा ळ च्या जागीं ड असा 'डळयोरभेदः' ड व ळ ह्यांचा अभेद दृष्टीस पडत नाहीं. पड ह्याच्या जागीं पळ, किंवा खळगा ह्याचे जागीं खडगा, असें म्हटल्यानें अर्थ विपर्यास किंवा अर्थशून्यता उत्पन्न होते. शिवाय, काल, वेला, शाला इ० संस्कृत शब्दांपासून झालेल्या काळ, वेळा, शाळा या मराठी शब्दांत ळ येतो. तथापि ल व ळ हे दोन्ही स्वतंत्रपणें मराठींत असल्यामुळें मूळ संस्कृत तेहतीस व्यंजनांत ळ ह्या चौतिसाव्याची मराठींत भर घालणें प्राप्त झालें आहे.

क्ष व ज्ञ हीं आणखी दोन अक्षरें मुळाक्षरें शिकवितांना मुलांस शिकवितात. तसें करणें मुलांच्या दृष्टीनें जरी युक्त असलें, तरी व्याकरणदृष्ट्या त्यांची वर्णमालेंत स्वतंत्र गणना करणें नीट नाहीं. कारण कीं, तीं संयुक्त व्यंजनें होत. क व नंतर ष् ह्याचे संयोगापासून क्ष् होतो, हें जसें क्षच्या उच्चारावरून समजतें, तसें ज्ञच्या प्रचलित उच्चारावरून त्यांत ज् व नंतर ञ् हीं व्यंजनें संयुक्त आहेत, असें स्पष्ट समजत नाहीं. इतकेंच नव्हे तर उलट ज्ञमध्यें द, न्, य् ह्या व्यंजनांच्या अस्ति-

त्याचा भास होतो. ह्यावरून आमचा, म्हणजे मराठी ही मातृभाषा बोलणाऱ्या लोकांचा, ज्ञ चा प्रचलित उच्चार मूळ उच्चार नव्हे हें खास. मूळ उच्चाराच्या जागीं हा नवीन भलताच उच्चार कधीं व कसा सुरू झाला; तसेंच हिंदी, बंगाली, गुजराती, कानडी वगैरे, भाषा बोलणारे लोक त्याचे जे आणखी जरजरा निराळे उच्चार करितात, त्यांचीही उत्पत्ति कधीं व कशी झाली इत्यादि प्रश्न ऐतिहासिक दृष्ट्या महत्वाचे व मनोरंजक आहेत. त्यांचा इतिहाससंशोधक पत्ता लावीलच. येथें इतकेंच लक्षांत ठेवावयाचें कीं, क्ष् व ज्ञ् हीं संयुक्त व्यंजनें आहेत. आणि जरी तीं लिहिण्याचे प्रचलित स्वरूपावरून त्यांतील अवयव काय हें स्पष्ट समजत नाहीं, तरी त्यांचा मूळ व्यंजनांमध्यें अन्तर्भाव होत नाहीं. नाहीं तर क्त व त्र ह्यांसारख्या दुसऱ्याही कांहीं संयुक्त व्यंजनांची वर्णमालेंत गणना करावी लागेल.

या ठिकाणीं असा आक्षेप येण्याचा संभव आहे कीं, जर ए, ऐ, ओ, औ, ह्या संयुक्त स्वरांची वर्णमालेंत गणना झाली आहे, तर क्ष् व ज्ञ् या संयुक्त व्यंजनांची वर्णमालेंत गणना करण्यास काय हरकत आहे ? या प्रश्नाचें उत्तर इतकेंच कीं, संयुक्त स्वरांप्रमाणें संयुक्त व्यंजनांसही जर वर्णमालेंत गुंफण्याचें ठरविलें, तर क्ष् व ज्ञ् ह्यांच्याबरोबर आणखी दीडशें दोनशें संयुक्त व्यंजनांस वर्णमालेंत स्थळ द्यावें लागेल. तसें करणें म्हणजे वर्णमालेस व्यर्थ लांबवून अवजड करणें होय. त्यापासून व्यावहारिक किंवा शास्त्रीय कोणताच फायदा नाहीं. फक्त पंक्तिप्रपंच किंवा विसंगति हा दोष टळेल. परंतु केवळ संगतीस च विशेष महत्त्व देणें योग्य नव्हे. उलट, विसंगति टाळण्याच्या प्रयत्नानें जर विनाकारण गर्दी व घोंटाळा होत असेल, तर संगतीस च फांटा देणें कांहीं गैर नाहीं. शिवाय संयुक्त स्वरांची व संयुक्त व्यंजनांची गोष्ट केवळ एकच नाहीं. स्वर हे उच्चाराचे बाबतींत व्यंजनांस आधारभूत आहेत, व व्यंजनें केवळ लंगडीं आहेत. म्हणून या पंगूंस एकंदर किती प्रकारचा आधार मिळणं शक्य आहे, हें आरंभी ठरविणें इष्ट व अवश्य आहे. तशी व्यंजनांची गोष्ट नाहीं. मूळ व्यंजनांस जो आधार मिळतो तो संयुक्त व्यंजनांस मिळावयाचाच. बाराखड्यांच्या दृष्टीनें ह्या मुद्याचें महत्त्व तेव्हांच समजेल. एवंच, मूळ व तदुत्पन्न या सर्व स्वरांची गणना होणें व्यवहार व शास्त्र या दोन्ही दृष्टीनीं जसें इष्ट व अवश्य आहे, तसें मूल व संयुक्त या दोन्ही व्यंजनांची गणति होणें कोणत्याही दृष्टीनें अवश्य नसल्यामुळें वर्णमालेंमध्यें संयुक्त व्यंजनांस स्थळ देण्यास कोणीच तयार न व्हावें हें साहाजिक आहे. ]

---

# अध्याय २.

## वर्णांचें वर्गीकरण.

हें वर्गीकरण अनेक तत्त्वांस—अथवा न्यायशास्त्राच्या भाषेनें, भेदक धर्मांस—अनुसरून करितात. प्रथम सर्व वर्णांचें एकत्र, नंतर फक्त स्वरांचें व नंतर फक्त व्यंजनांचें वर्गीकरण यथाक्रम पुढें दिलें आहे.

२३. उच्चाराच्या कामीं मुखाच्या निरनिराळ्या भागांची वर्णांस विशेष मदत लागते. ह्या निरनिराळ्या भागांस **स्थानें** म्हणतात.

२४. स्थानभेदानें वर्णांचे जे वर्ग होतात ते:—

**कंठ्य**—विशेषेंकरून कंठस्थानापासून ज्यांचा उच्चार होतो ते:—
अ, आ, क्, ख्, ग्, घ्, ङ्, ह्, आणि **विसर्ग**.

**तालव्य**—विशेषेंकरून तालुस्थानापासून ज्यांचा उच्चार होतो ते:—
इ, ई, च्, छ्, ज्, झ्, ञ्, य्, आणि श्.

**मूर्धन्य**—विशेषेंकरून मूर्धा स्थानापासून ज्यांचा उच्चार होतो ते:—ऋ, ट, ठ, ड्, ढ्, ण्, र, ष्, आणि ळ्.

**दंत्य**—विशेषेंकरून दंतस्थानापासून ज्यांचा उच्चार होतो ते:—
ऌ, त, थ्, द्, ध्, न्, ल्, आणि स्.

**ओष्ठ्य**—विशेषेंकरून ओष्ठस्थानापासून ज्यांचा उच्चार होतो ते:—
उ, ऊ, प्, फ्, ब्, भ्, म्.

**अनुनासिक**—विशेषेंकरून नासिकास्थानापासून ज्यांचा उच्चार होतो ते:—ङ्, ञ्, ण्, न्, म्, आणि **बिंदु**.

**कंठतालव्य**—विशेषेंकरून कंठ आणि तालु या दोहोंपासून ज्यांचा उच्चार होतो ते: **ए, ऐ**.

**कंठौष्ठ्य**—विशेषेंकरून कंठ आणि ओष्ठ या दोहोंपासून ज्यांचा उच्चार होतो ते: **ओ, औ**.

**दंतौष्ठ्य**—विशेषेंकरून दंत आणि ओष्ठ या दोहोंपासून ज्यांचा उच्चार होतो तो: **व**.

**दंततालव्य**—विशेषेंकरून दंत आणि तालु या दोहोंपासून ज्यांचा उच्चार होतो ते:—**च्, ज्, झ्**, (हा उच्चार निवळ मराठी आहे.)

टीप १.—यावरून ङ्, ञ्, ण्, न्, म्, ह्यांचें प्रत्येकाचें जें वेगळालें विशिष्ट स्थान आहे, त्याशिवाय त्या सर्वांचें एक नासिका हें साधारण स्थान आहे, म्हणजे त्या प्रत्येकाचीं दोन दोन स्थानें आहेत हें उघड आहे. त्याप्रमाणेंच सर्व स्वरही अनुनासिक होतात. जसें:—अं, इं, उं, ऋं, लृं, एं, इ०.

टीप २.—तसेंच च्, ज्, झ्, ह्यांचे तालव्य व दंततालव्य असे दोन उच्चार आहेत. संस्कृत, फारसी, इंग्रजी, इ० परभाषांतून आलेल्या तत्सम शब्दांत तालव्य उच्चार दिसतो. जसें:—चंद्र, छाया, बगीचा, गुलजार, जज्ज, इ०. शुद्ध मराठी शब्दांत तालव्य उच्चार सांपडत नाहीं, तर केवळ दंततालव्य आढळतो असें कोणी समजूं नये. शुद्ध मराठी शब्दांमध्यें तालव्य व दंततालव्य हे दोन्ही उच्चार आढळतात. चपळ, चंबू, चिमणी, जितका, जेवढा, झेंप, झेला, इ० शब्दांत तालव्य; आणि चमचा, जो, जांवई, झगडा, झाड, इ० शब्दांत दंततालव्य उच्चार आहे हें उघड आहे. जलद, जेवढा, जेथें, इ० कांहीं थोड्याशा शब्दांत एकाच जागीं दोन्ही उच्चार दिसतात, म्हणजे या शब्दांतील ज चा दोन्ही प्रकारचा उच्चार करणारे लोक आढळतात. त्यांतल्या त्यांत देशावर तालव्य व कोकणांत दंततालव्य उच्चाराकडे विशेष प्रवृत्ति दिसते.

टीप ३.—बायकांचे बोलण्यांत इच्छा शब्दामध्यें छ चा उच्चार कधीं कधीं दंततालव्य झालेला आढळतो. परंतु तो अलीकडे लुप्त होत आहे. यामुळें छचा तालव्यच उच्चार होतो हें म्हणणें बरें.

२५. वर्णांचे पुन्हा **अघोषवर्ण** आणि **घोषवर्ण** अथवा **श्वास** आणि **नाद** असे दोन भेद करितात. अघोषवर्णांच्या उच्चारांत फक्त श्वासाचा उपयोग होतो, त्यांत घोष म्हणजे नाद नसतो; आणि घोषवर्णांच्या उच्चारांत श्वास नसून फक्त नादाचा उपयोग होतो.

**श्वास अघोष-वर्ण:**—क्, ख्, च् छ्, ट्, ठ्, त्, थ् प्, फ्, आणि श्, ष्, स्.

**नाद-घोष-वर्ण:**—बाकीचीं सर्व व्यंजनें व सर्व स्वर.

टीप—या वर्गीकरणांतून स्वर काढून टाकिले म्हणजे फक्त व्यंजनेंच राहतात. आणि पहिल्यांस म्हणजे श्वास व्यंजनांस कठोर व्यंजनें, आणि दुसऱ्यांस म्हणजे नाद व्यंजनांस मृदु व्यंजनें, असें इंग्रजींत म्हणतात. या कलमांतील वर्णभेद मराठी व्याकरणदृष्ट्या फारसे महत्त्वाचे नाहींत.

आतां केवळ स्वरांचें वर्गीकरण घेऊं.

२६. स्वरांचे **मूल व तदुत्पन्न** असे दोन भेद आहेत तदुत्पन्नांसच कोणी **साधित** असें म्हणतात.

(अ) **मूलस्वर** म्हणजे स्वतःसिद्ध अथवा स्वयंभू; अर्थात् ज्यांची उत्पत्ति इतरांपासून नाहीं ते:—अ, इ, उ, ऋ, ऌ.

(आ) **तदुत्पन्न** अथवा **साधित** म्हणजे मूल स्वरांपासून उत्पन्न झालेले:—आ, ई, ऊ, ए, ऐ, ओ, औ.

२७. साधित स्वरांचे दोन पोटभेद करितातः **द्विगुणित** व **संयुक्त**.

(अ) एका मूल स्वरामध्यें तोच मूल स्वर मिळून जो साधित स्वर उत्पन्न होतो, त्यास **द्विगुणित** असें म्हणता। अ+अ= आ; इ +इ = ई; उ + उ = ऊ. म्हणून आ, ई, ऊ, हे द्विगुणित स्वर होत.

**टीप**—ऋ + ऋ = ॠ हा द्विगुणित स्वर मराठींत नाहीं; आणि ऌ या स्वरास द्विगुणितत्व मुळीं नाहींच.

(आ) कोणत्याही निरनिराळ्या स्वरांच्या संयोगापासून उत्पन्न होणाऱ्या स्वरांस **संयुक्त** स्वर असें म्हणतात ते:—

अ + इ अथवा ई = ए; अ + ए = ऐ;

अ + उ अथवा ऊ = ओ; अ + ओ = औ.

२८. उच्चाराचे कालमानाप्रमाणें स्वरांचे दोन भेद करितात; त्यांस **ऱ्हस्व** व **दीर्घ** असें म्हणतात. उच्चारास लागणाऱ्या कालमानास मात्रा असें म्हणतात.

(अ) ज्या स्वरांचे उच्चारास एक मात्रा लागते त्यांस **ऱ्हस्व** स्वर असें म्हणतात; ते: अ, इ, उ, ऋ ऌ.

(आ) ज्या स्वरांचे उच्चारास दोन मात्रा लागतात त्यांस **दीर्घ** स्वर असें म्हणतात; ते:-आ, ई, ऊ, ए, ऐ ओ औ.

**टीप १**—यावरून सर्व मूल स्वर ऱ्हस्व होत; आणि बाकीचे सर्व, म्हणजे साधित, हे दीर्घ होत हें उघड आहे.

**टीप २**—संस्कृत व्याकरणांत प्लुत म्हणून स्वरांचा तिसरा एक भेद मानितात. प्लुत म्हणजे फार दीर्घ; ह्याच्या तीन मात्रा समजतात. कु—कू—कू—३.

असे जे कोंबड्याच्या आरवण्यामध्यें तीन ध्वनि ऐकूं येतात, त्यांमध्यें दिसणारे उ, ऊ, ऊ, ३, तीन स्वर अनुक्रमें ऱ्हस्व, दीर्घ व प्लुत ह्या उच्चारांच्या कालाचें नक्की प्रमाण दाखवितात. ऱ्हस्वाचे दुप्पट दीर्घास, व तिप्पट प्लुतास काळ लागतो; म्हणून त्यांच्या अनुक्रमें एक, दोन व तीन मात्रा मानितात. ऋ, व ऌ ह्यांस दीर्घत्व नाहीं; आणि ए, ऐ, ओ, औ ह्यांस ऱ्हस्वत्व नाहीं;

२९. स्वरांचे आणखी **सवर्ण** आणि **असवर्ण** किंवा **सजातीय** आणि **विजातीय** असे दोन भेद करितात. समानस्थानीं समान प्रयत्नानें उत्पन्न होणारे ते सवर्ण किंवा सजातीय स्वर होत; आणि असे जे नव्हते ते असवर्ण किंवा विजातीय होत. **अ, आ** हे परस्पर सजातीय होत; त्याचप्रमाणें इ, ई आणि **उ, ऊ** हे आपआपसांत परस्पर सजातीय होत; **अ इ, अ उ, अ ऋ, इ ऊ, आ ऋ, अ ए, अ ओ,** इ० ह्या जोड्या परस्पर विजातीय होत.

टीप १—ए, ऐ, ओ, औ ह्या संयुक्त स्वरांत परस्पर सजातीयत्व नाहीं. कारण कीं, ते मुळींच विजातीय स्वरोत्पन्न आहेत.

टीप २—हें जें स्वरांचें अनेक दृष्ट्या वर्गीकरण सांगितलें, तें व्याकरणाचे दृष्टीनें सगळेंच सारखें महत्त्वाचें नाहीं. मूल व तदुत्पन्न म्हणजे साधित, आणि साधितांचे द्विगुणित व संयुक्त, हे भेद त्या त्या स्वरांचें स्वरूप कळण्यापुरते उपयोगी आहेत.

अखेरी व्यंजनांचें वर्गीकरण घेऊं.

३०. व्यंजनांचे **स्पर्श अंतस्थ ऊष्म** असे तीन भेद आहेत. हे भेद ज्या दृष्टीनें केले आहेत, त्या दृष्टीनें स्वरांस विवृत असें म्हणतात. वर्णोच्चाराच्या वेळीं वागिंद्रिय साफ उघडें (विवृत) होत असेल किंवा साफ बंद (स्पृष्ट) होत असेल, किंवा जरासें उघडें (ईषत् विवृत) किंवा जरासें लागलेलें (ईषत् स्पृष्ट) असेल. स्वरांच्या उच्चारांत तें साफ उघडें असतें म्हणून **स्वरांस विवृत्त** म्हणतात. आणि व्यंजनांचे उच्चारांत तें कमीजास्त उघडें किंवा बंद असतें; म्हणून व्यंजनांस खालीं दिल्याप्रमाणें नांवें आहेत.

**स्पर्श व्यंजनें:** ह्यांच्या उच्चारांत वागिंद्रियाचें द्वार लागलेलें म्हणजे स्पृष्ट असतें. हीं पंचवीस आहेत. त्यांचें पांच वर्ग केले असून प्रत्येकांत पांच पांच व्यंजनें आहेत. ते वर्ग येणेप्रमाणें:—

क-वर्ग--क्, ख्, ग्, घ्, ङ्.
च-वर्ग--च्, छ्, ज्, झ्, ञ्.
ट-वर्ग—ट्, ठ्, ड्, ढ्, ण्.
त वर्ग—त्, थ्, द्, ध्, न्.
प-वर्ग—प्, फ्, ब्, भ्, म्.

**ईषत् विवृत--अंतःस्थः**—ह्यांच्या उच्चारांत वागिंद्रियाचें द्वार जरासें उघडें असतें; आणि हीं व्यंजनें स्पर्श व्यंजनें व ऊष्म व्यंजनें ह्यांच्या मध्यें येत असल्यामुळें त्यांस **अंतस्थ** असेंही दुसरें नांव आहे. तीं:—य्, व्, र्, ल्.

टीप—ह्यांस इंग्रजींत अर्धस्वर असें म्हणतात. इ, उ, ऋ, लृ, या स्वरांस अनुरूप य्, व्, र्, ल्, हीं व्यंजनें असून संधि होतांना त्या त्या स्वरांच्या जागीं तदनुरूप स्वर कधीं कधीं येतात. हें संधिप्रकरणावरून समजेल. अशा प्रकारें यांचें स्वरांशीं (विवृत वर्णांशीं) निकट नातें पडल्यामुळें आणि ते उच्चारांत ईषत् विवृत असल्यामुळें त्यांस अर्धस्वर हें नांव योग्य आहे.

**ईषत् स्पृष्ट—ऊष्मः**—ह्यांच्या उच्चारांत वागिंद्रिय जरासें लागलेलें (स्पृष्ट) असतें. ऊष्म, म्हणजे उष्णता उत्पन्न करणारे अथवा प्रखर उच्चाराचे, असें ह्यांसच दुसरें नांव आहे. ऊष्म व्यंजनें येणेप्रमाणें:—श्, ष्, स्. ह्यांच्या उच्चारांत एका प्रकारचें घर्षण किंवा घसीट आहे हें उघड आहे. ह्या ऊष्म वर्णांमध्यें ह्चा कोणी कोणी अन्तर्भाव करितात.

टीप—स्पर्श, अंतस्थ, ऊष्म, हा त्रिविध भेद संस्कृत वैयाकरणांनीं केलेला आहे. त्यावरून वर्णमालेमध्यें वर्णांचा जो क्रम लावलेला आहे तोही कोणत्या धोरणानें लाविला असावा हें सहज ध्यानांत येतें. प्रथम विवृत वर्ण म्हणजे स्वर, नंतर बिंदु व विसर्ग (अं, अः) हे स्वरादि म्हणजे स्वर पूर्वीं आल्याशिवाय ज्यांचा उच्चार बिलकुल होत नाहीं ते. नंतर स्वरान्त म्हणजे स्वर अंतीं आल्याशिवाय ज्यांचा उच्चार होत नाहीं ते. या स्वरान्त वर्णांमध्यें म्हणजे व्यंजनांमध्यें प्रथम स्पृष्टवर्ण म्हणजे वर्गीय वर्ण किंवा पांच वर्गांतील पंचवीस वर्ण, नंतर ईषत् विवृत म्हणजे अंतस्थ, व अखेरीस ईषत् स्पृष्ट म्हणजेच ऊष्मवर्ण असा क्रम आहे. ळ् हे व्यंजन संस्कृतांत स्वतंत्रपणें नाहीं. म्हणून तें वरील वर्गीकरणांत दिसत नाहीं. तथापि 'डळयोरभेदः' या उच्चारसूत्रावरून तें स्पर्श व्यंजनांतच येईल असें वाटतें. तें मुळांतच नसल्यामुळें अंतीं येतें.

३१. व्यंजनांचे **अल्पप्राण** आणि **महाप्राण** असे आणखी दोन भेद करितात. ज्यामध्यें हकाराचा ध्वनि विशेषेंकरून ऐकूं येतो, तीं **महाप्राण** व बाकीचीं **अल्पप्राण** होत.

**महाप्राण**—ख्, घ्, छ्, झ्, ठ्, ढ्, थ्, ध्, फ्, भ्, श्, ष्, स्, ह्, म्हणजे पांच वर्गांतलीं दुसरीं व चवथीं आणि चार ऊष्म व्यंजनें हीं चौदा महाप्राण होत.

**अल्पप्राण**--क्, ग्, ङ्, च्, ज्, ञ्, ट्, ड्, ण्, त्, द्, न्, प्, ब्, म्, य्, व्, र्, ल्, ळ्. म्हणजे पांच वर्गांतलीं पहिलीं, तिसरीं, व पांचवीं, मिळून पंधरा; अंतस्थ चार, आणि ळ्; मिळून एकंदर वीस अल्पप्राण होत.

टीप-- अल्पप्राणांचेपेक्षां महाप्राणांचे उच्चारास प्राणवायूचा उपयोग अधिक जोरानें व्हावा लागतो. शिवाय ख्, घ्, इत्यादि महाप्राण व्यंजनांचे उच्चारांत हकाराचा ध्वनि उमटतो; म्हणजे ख्,=क्+ह्, घ्,=ग्+ह् असा कांहीं अंशीं प्रकार दिसतो. ख् आणि घ् ह्यांचें इंग्रजी लिपिप्रकारावरूनहीं वरील समीकरणांची सत्यता तज्ञ वाचकांचे तेव्हांच नजरेस येईल. अंतस्थ वर्णांमध्यें हा हकाराचा ध्वनि नसला तरी, पूर्वी सांगितल्याप्रमाणें, त्यांमध्यें जें एका प्रकारचें घर्षण आहे, त्यामुळें त्यांचे उच्चारांतही प्राणवायूचें प्रमाण अधिक आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

३२. गेल्या ३१ अंकांतील व २५ व्या अंकांतील वर्गीकरणांचें संमेलन केलें म्हणजे असें कळून येईल कीं, वर्गपंचकांतील पंचवीस व्यंजनांपैकीं प्रत्येकास वेगळी वेगळीं संज्ञा प्राप्त होण्यास हरकत नाहीं.

वर्ग पंचकांतील पहिलीं—क्, च्, ट्, त्, प्,--श्वास अल्पप्राण.
दुसरीं--ख्, छ्, ठ्, थ्, फ्,--श्वास महाप्राण.
तिसरीं—ग्, ज्, ड्, द्, ब्,--नाद अल्पप्राण.
चवथीं—घ्, झ्, ढ, ध्, भ्,--नाद महाप्राण.
पांचवीं--ङ्, ञ्, ण्, न्, म्, अनुनासिक.

श्वास अल्पप्राण, श्वास महाप्राण इत्यादिकांचे पाठीमागें कंठ्य, तालव्य इत्यादि वर्गसूचक शब्द लाविले म्हणजे क्, ख्, ग्, च्, छ्, ज् इ० प्रत्येक व्यंजनाचें दर्शक नांव तयार होतें, हें तेव्हांच समजेल.

टीप--या दृष्टीनें य्, व्, र्, ल्, ह्या अंतस्थांस नाद अल्पप्राण, श्, ष्, स्, ह्यांस श्वास महाप्राण, ह् ह्यास नाद महाप्राण आणि ळ् यास नाद अल्पप्राण ह्या वर्गांत घातलें पाहिजे हें उघड आहे.

---

# अध्याय ३.

## अक्षरें.

३३. कोणत्याही स्वरास किंवा स्वरयुक्त व्यंजनास **अक्षर** म्हणतात. अ, आ, इ, ई, हीं जशीं अक्षरें होत, त्याचप्रमाणें क, ख, गा, खी, घे, इ० हीं अक्षरें होत. परंतु क्, ख्, ग्, इ० हीं पायमोडकीं लंगडीं व्यंजनें अक्षरें नव्हत. हा फरक साधारण भाषणांत कदाचित् पाळला जात नाहीं. तसेंच साधारण भाषणांत क, ख, ग, इ० अकारान्त वर्णांसच व्यंजनें म्हणतात. परंतु शास्त्रीय भाषेंत असा गोंधळ कामाचा नाहीं म्हणूनच वर्ण, स्वर, व्यंजन, अक्षर इ० शब्दांच्या व्याख्या करणें शास्त्रदृष्ट्या अवश्य आहे. त्याप्रमाणें केलेल्या व्याख्या शास्त्रीय ग्रथांत महत्त्वाच्या आहेत.

३४. व्यंजनांस स्वर जोडतात, त्यावेळीं स्वरांचें मूळचें स्वरूप जाऊन त्यांचे जागीं तद्दर्शक पुढील खुणा येतात.

**स्वर--अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ऌ, ए, ऐ, ओ, औ.**

**खुणा--, ा, ि, ी, ु, ू, ृ, ॢ, े, ै, ो, ौ.**

उदा०--**क, का, कि की, कु, कू, कृ, कॢ, के कै, को, कौ.**

**अ** हा **स्वर** व्यंजनांत मिळतो तेव्हां, व्यंजनाचा पाय मोडका आहे म्हणजे तें लंगडें आहे हें दाखविण्याकरितां त्याचे खालीं जो उजव्या बाजूकडे झुकता तिरकस फांटा काढितात, तो फक्त नाहींसा होतो. अर्थात तो फांटा नसला म्हणजे तें व्यंजन अ--युक्त आहे असें समजण्यांत येतें.

३५. स्वराचिन्हांस म्हणजे स्वरदर्शक वरील खुणांस निरनिराळीं नांवें आहेत. तीं अशीं:--

| स्वर. | स्वरचिह्न | त्याचें नांव. | स्वर. | स्वराचिह्न | त्याचें नांव. |
|---|---|---|---|---|---|
| आ | ा | काना | ए | े | एक मात्रा |
| इ | ि | डावी वेलांटी | ऐ | ै | दोन मात्रा |
| ई | ी | उजवी वेलांटी | ओ | ो | एक मात्रा काना, काना मात्रा. |
| उ | ु | सातांचा आंकडा | | | |
| ऊ | | आठांचा आंकडा | | | |
| ऋ | ृ | ऋकार | औ | ौ | द्विमात्रा काना, काना दोन मात्रा. |
| ऌ | ॢ | ऌकार | | | |

टीप--ऱ्हस्व उ च्या जागीं जो सातांचा आंकडा वर दिला आहे, त्याचें रूप रु ह्या अक्षरांत ( ु ) असें आहे. र् ह्या व्यंजनास ऱ्हस्व उ लागून साधारण नियमा प्रमाणें रु असें अक्षर व्हावें; पण तसें न होतां रु असेंच होतें. दीर्घ ऊ ची खुणासुद्धां र् ह्या व्यंजनास नेहमीप्रमाणें खालीं न जोडतां पुढेंच उजव्या बाजूस जोडून रू होतो. पण या रू मध्यें दीर्घ ऊ ची खुणा--आठाचा आंकडा--हा अगदी स्पष्ट आहे. परंतु रु मध्यें सातांचा आंकडा इतका स्पष्ट नाहीं. ऱ्हस्व उ ची रु मध्यें दिसणारी खुणा अन्यत्रही विकल्पानें दृष्टीस पडते. ज्या व्यंजनामध्यें मूळचाच काना आहे, त्यांस ऱ्हस्व उ च्या जागीं ( ु; ृ ) ह्या दोन्ही खुणा कधीं कधीं विकल्पानें जोडलेल्या आढळतात. जसें:--चु, चृ; झु, झृ; सु, सृ; इ० परंतु ह्यांपैकीं दुसरा पक्ष अलीकडे प्रचारांतून बहुतेक अन्तर्धानच पावला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. तो जुन्या पोथ्यांत बहुधा आढळतो. तेव्हां ऱ्हस्व उ ची दुसरी खुणा फक्त रु ह्या अक्षरांतच दृष्टीस पडते, आणि त्यामध्यें ती अवश्य आहे हें उघड आहे.

३६. देवनागरी लिपीमध्यें अक्षराचा उच्चार व त्याचें नांव हीं एकच आहेत. ह्यामुळें एकदां अक्षर ओळख झाली कीं, वाटेल तें पुस्तक मुलास वाचतां येतें संस्कृतोद्भव आर्य भाषांत असाच प्रकार आहे. परंतु फारसी, आरबी, इंग्रजी ह्यांमध्यें अक्षराचा उच्चार व नांव हीं भिन्न भिन्न पडल्यामुळें विद्यार्थ्यास फारच अडचण पडते. असो; तेव्हां देवनागरी लिपींत ‘ अमुक एक अक्षर ’ असें म्हणावयाचें असतां त्या अक्षरापुढें **कार** हा प्रत्यय जोडण्याची चाल आहे. जसें:--**अकार, ककार, श्री-**

**कार, आकार,** इ० म्हणजे अ, क, श्री, ओं किंवा ॐ इ० अक्षरें असें समजावयाचें.

३७. कोणताही स्वर मध्यें न येतां अव्यवहितपणें एकापुढें एक अशीं व्यंजनें एकत्र आलीं असतां त्या व्यंजनगुच्छास **संयोग** किंवा **संयुक्त व्यंजन** असें म्हणतात. जसें:--**क्य्**, **स्न्**, **ग्ल्**, इ० दोनच किंवा तीनच व्यंजनें एकत्र येतात असा कांहीं नियम नाहीं. तथापि दोन तीन व्यंजनांचे संयोग इतरांचें मत्नानें फार आढळतात; आणि पांच व्यंजनांच्यापेक्षां अधिक व्यंजनांचे संयोग शोधूनच काढावे लागतील, व ते बहुधा संस्कृत शब्दांमध्येंच आढळल्यास आढळतील; निवळ मराठी शब्दांत ते औषधांसही सांपडतील कीं नाहीं, ह्याची शंकाच आहे. **कार्त्स्न्य** ह्या शब्दामध्ये दुसऱ्या अक्षरांत पांच व्यंजनांचा संयोग आहे हें स्पष्टच आहे.

३८. कोणत्याही व्यंजनाचा त्याच व्यंजनाशीं संयोग झाला असतां त्या संयोगामध्यें तें व्यंजन **द्वित्त** झालें आहे, असें म्हणतात. जसें:--क्क्, च्च्, ज्ज्, त्त्, इ० स्थळीं क्, च्, ज्, त् हीं व्यंजनें द्वित्त आहेत.

३९. व्यंजनसंयोगामध्यें तदन्तर्भूत व्यंजनांचा ज्या क्रमानें उच्चार होतो, त्याच क्रमानें तीं लिहितात. तीं लिहिण्याचे दोन प्रकार संभवतात १ एकाखालीं एक, किंवा एकापुढें एक. संयुक्त व्यंजनें लिहिण्याबद्दलचा एकही अनपवादक नियम देतां येत नाहीं. साधारणपणें इतकेंच सांगतां येतें कीं, एका व्यंजनास दुसरें व्यंजन जोडावयाचें असतां (**अ**) एक तर पहिल्याचे खालीं किंवा पुढें त्यास चिकटून दुसरें लिहितात, म्हणजे या गुच्छांत दोघांचे आकार पूर्णपणें दृष्टीस पडतात, मात्र ते एकमेकास चिकटलेले असतात, इतकेंच; नाहींतर (**आ**) पहिल्याच्या आकाराचा कोणता तरी एक भाग गाळून बाकीच्याचे खालीं किंवा पुढें दुसरें चिकटून लिहितात. या दोन्ही प्रकारांत पहिल्याची पायमोडकेपणाची खुणा नाहींशी होते.

(**अ**) पहिल्या प्रकारचीं उदाहरणें:--क्क्, क्कु्, ट्व्, ङ्ग्, ट्य्, ड्य्, ङ्क्,

ङ्म्, द्व्; इत्यादि

(**आ**) दुसऱ्या प्रकारचीं उदाहरणें:--**च्च्, ब्द्, ष्ट्, त्त्; क्य्, ग्व्, ध्म्, ल्क्, त्य्, ह्न्,** इ०.

टीप--दुसऱ्या प्रकारच्या उदाहरणांवरून असें दिसून येईल कीं, ज्या व्यंजनांत मूळचा काना आहे त्यांचा बहुधा काना गळण्यांत येतो; ही गोष्ट ग्, ध्, त् ह्यांच्या ग्व्, ध्म्, त्य् ह्यांमधील स्थितीवरून दिसेल. परंतु ज्यांत मूळचा काना नाहीं, त्यांचा कोणत तरी एखादा भाग गाळण्यांत येतो. कोणता भाग गाळावा किंवा कोणता भाग बहुधा गाळतात, ह्याबद्दल सर्वसाधारण नियम बांधतां येत नाहींत; हें क्य्, क्क, ह्व् इ० उदाहरणांवरून कळेल. तसेंच ज्यांत मूळचा काना नाहीं, त्यांचा कांहीं तरी भाग गाळलाच पाहिजे, असेंही म्हणतां येत नाहीं; ही गोष्ट पहिल्या प्रकारचे उदाहरणांवरून कळेल. एवंच, संयुक्त व्यंजनांची लिपि बहुतांशीं बेबंदच आहे असें म्हटलें पाहिजे. ती समजण्यास प्रचाराचे प्रत्यक्ष अवलोकनाशिवाय दुसरा मार्ग नाहीं. तथापि संयुक्त व्यंजनें डोळ्यापुढें आलीं असतां त्यांपैकीं पुष्कळांस ओळखण्यास अडचण पडत नाहीं.

४०. ज्या संयुक्त व्यंजनांची ओळख पटण्यास अडचण पडते, अशांपैकीं कांहींच्या संबंधानें पुढील गोष्टी सांगतां येतात. बाकीच्यांची ओळख प्रत्यक्ष करून घेतली पाहिजे.

(अ) र् ह्या व्यंजनाला कोणतेंहीं व्यंजन जोडावयाचें असतां त्या व्यंजनाचे डोक्यावर, दीर्घ ईच्या डोक्यावर जशी खूण आहे तशी खूण करितात. ह्या खुणेस ( ि ) रेफ म्हणतात. जसें:--र्क्, र्व्, र्त्य्, इ०

**अपवाद**--ऱ्य्, ऱ्ह्, हे अपवाद निवळ मराठी शब्दांत आढळतात. जसें:-मऱ्या, दुसऱ्यास, तऱ्हा, कऱ्हाड, वऱ्हाड, इ०.

टीप--आरंभींचें र् हें व्यंजन पुढील व्यंजनास जोडण्याचा ह्या दोन प्रकारांत उच्चाराही फरक आहे. तो पुढील अध्यायाचे शेवटल्या अंकांत पहावा.

(आ) र् हें व्यंजन इतर व्यंजनांस जोडण्याचे दोन प्रकार आहेत. ख्र्, ग्र्, इत्यादिकांतील एक, आणि ट्र्, ठ्र्, ड्र्, इत्यादिकांतील दुसरा. ज्यांमध्यें मूळचा काना आहे, त्यांत बहुधा पहिला आढळतो व अन्यत्र दुसरा. क्, फ् ह्यांमध्यें मूळचा काना आहे असें म्हटलें तर क्र्, फ्र् हीं स्थळें प्रकृत नियमास अपवादक आहेत असें म्हणण्याचें कारण नाहीं. पण द्र् हें संयुक्त व्यंजन तरी या नियमास खास अपवादक आहे, असें म्हटलें पाहिजे. कारण कीं द् या व्यंजनांत

जरी मूळचा काना नाहीं तरी त्यास र् हें व्यंजन पहिल्याच प्रकारानें जोडण्यांत येतें हें उघड आहे.

( इ ) क्ष्, ज्ञ् ह्यांची तर विशेषेंकरून प्रत्यक्षच ओळख करून घेतात. क्ष् = क् + ष्, आणि ज्ञ् = ज् + ञ्. दुसऱ्याचा म्हणजे ज्ञ चा प्रचलित उच्चारही विलक्षण आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

( ई ) कांहीं संयुक्त व्यंजनें दोन प्रकारांनीं लिहितात. जसें--त्र, त्र्; क्र्, क्र्, श्र्, श्र्; क्त्, क्त्; क्न्, क्न्; त्य्, त्य्; इ०. ह्या दोन प्रकारांपैकीं पहिलाच प्रकार विशेष प्रचारांत आहे.

( उ ) कांहीं संयुक्त व्यंजनांमधील फरक ध्यानांत धरण्यासारखा आहे. जसें:--द्य्, ध्य्, ह्य्; ब्द्, द्ब्; प्त्, त्प्; इ०

प--न्ह, ह्न; म्ह, ह्म इ० जोड्यांतही वरील जोड्यांतल्याप्रमाणेंच फरक आहे. परंतु ह्या हकारान्तर्गत संयुक्त व्यंजनांतील फरक मराठींत बहुतेक लोपल्यासारखाच झाला आहे. पहिल्या जोडीचे जागीं न्ह व दुसरीचे जागीं म्ह असेंच सरसकट लिहिण्याचा अज्ञानमूलक प्रचार पडत चालला आहे. ह्यावरून एक गोष्ट सुचते ती अशीः--ह् या व्यंजनास जें व्यंजन जोडवयाचें तें त्याचे खालीं किंवा पुढें वास्तविक लिहावयाचें; आणि संस्कृतांत अशीच चाल आहे. परंतु तें दुसरें व्यंजन ह् ह्या व्यंजनाचे पाठीमागेंच त्यास जोडून लिहिण्याचा अज्ञानमूलक प्रचार मराठींत रूढ झाल्यासारखाच आहे. ऱ्हस्व, ऱ्हास, आल्हाद, आव्हान, चिन्ह, ब्राम्हण इ० शब्दांतील संयुक्त व्यंजनें संस्कृत पद्धतीनें शुद्ध लिहावयाचीं म्हटलें म्हणजे वरील शब्द ह्रस्व, ह्रास, आह्लाद, आह्वान, चिह्न, ब्राह्मण, इ० प्रकारें लिहिले पाहिजेत. परंतु हा संस्कृत शुद्ध लेखनप्रचार बहुतेक लुप्तच झाला आहे. ह्य् ह्या संयुक्त व्यंजनामध्यें मात्र मराठींतील लेखन प्रचार अद्याप शुद्ध राहिला आहे; म्हणजे ह् व य् या व्यंजनांचा क्रम, वरील उदाहरणांतील संयुक्त व्यंजनांतल्याप्रमाणें, विपर्यस्त न होतां वास्तविक जसा असावा तसाच अद्याप कायम आहे.

४१. एकेरी व्यंजनाप्रमाणें संयुक्त व्यंजनांतही अंतीं स्वर मिळून अक्षरें तयार होतात, त्यांस **जोडाक्षरें** असें म्हणतात. जसें:--क्र, क्रा, क्रि, क्री, इ०

४२. प्रत्येक **एकेरी** व संयुक्त व्यंजनापासून बारा स्वरांचे मिलाफानें बारा अक्षरें तयार होतात. या बारा अक्षरांचे माळेस किंवा ओळीस **बाराक्षरी** किंवा **बाराखडी** असें म्हणतात. जसें:--

क, का, कि, की, कु, कू, के, कै, को, कौ, कं, कः—प्रचार.

क, का, कि, की, कु, कू, कृ, कॣ, के, कै, को, कौः--शास्त्र.

[ बाराखडीसंबंधानें शास्त्र व प्रचार ह्यांमधील फरक ध्यानांत ठेवण्यासारखा आहे, इतकेंच नव्हे तर प्रचारास शास्त्रीय वळणही लावणें इष्ट आहे. ही गोष्ट मागील एका अध्यायांतील उहापोहावरून सर्वसंमत होण्यासारखी आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कं, कः हे गाळण्यास कोणाची आडकाठी येईल असें वाटत नाहीं. त्याचप्रमाणें कृ, आणि कॢ ह्यांचीही बाराखडींत भरती करण्यास कोणी प्रतिबंध करील असें दिसत नाहीं. परंतु त्यांचे बरोबर कॄ व कॣ म्हणजे दीर्घ ऋकारयुक्त व दीर्घ लकारयुक्त अक्षरें बाराखडींत कां घेऊं नयेत अशी पुष्कळांस शंका उत्पन्न होईल. तिचें उत्तर स्वरसंख्येबद्दलच्या मागील ऊहापोहावरून उघडच आहे. दीर्घ ॡकार मुळीं अस्तित्वांतच नाहीं. तेव्हां त्याची गोष्टच बोलावयास नको; आणि दीर्घ ऋकार जरी संस्कृतांत असला, तरी तो पूर्वीं सिद्ध केल्याप्रमाणें मराठी स्वरमालेंत गुंफण्याची जरूर नसल्यामुळें कॄ व कॣ ह्यांस जमेस धरण्याची गरज नाहीं. ह्याप्रमाणें कं, कः खर्चीं घालून कृ, कॢ, हे जमेस धरण्याची जरूर नाहीं--म्हणजे नफानुकसान कांहीं एक न होतां बाराखडीचें मुद्दल कायम राहून तिला अशास्त्रत्व प्राप्त होईल व तिचें नांवही पूर्वींप्रमाणेंच सार्थ राहील. ]

---

## अध्याय ४.

### उच्चार.

इंग्रजींतल्याप्रमाणें मराठींत अक्षर व उच्चार वेगळे नसून यथोच्चार लिपि आहे हें बहुतांशीं खरें आहे. तथापि कांहीं स्थळीं थोडासा फरक आहे ही गोष्ट पुढील विस्तारावरून उघड होईल. बिंदु व विसर्ग ह्या दोन स्थलीं तर वर्णनांव व उच्चार ह्यांमधील भेद स्पष्टच आहे. तेव्हां प्रथम ह्यांच्याच उच्चाराकडे वळूं.

४३. विसर्ग हा एक कंठ्य वर्ण असून त्याचा उच्चार, ह् ह्या व्यंजनाच्या उच्चारास जोरानें एक हिसडा देऊन तोंडांतून वायु एकदम सोडला म्हणजे होतो; आणि हा उच्चार नेहमीं कोणत्या तरी स्वराच्यानंतर होतो. शब्दामध्यें व शब्दान्तींही विसर्ग आढळतो. जसें:—दु:ख,

अन्तःकरण, अतःपर, प्रायः, छिः, थूः, अंः, इ०. या उदाहरणांवरून असें दिसून येईल कीं, विसर्ग केवळ तत्सम संस्कृत शब्दांतच येतो असें नाहीं, तर तो निवळ मराठी शब्दांतही क्वचित् आढळतो. अखेरचीं तीन उदाहरणें निवळ मराठी आहेत.

टीप.—विसर्गाच्या उच्चाराचें शब्दांनीं वर्णन करणें कठिणच. त्याचें यथार्थ ज्ञान प्रत्यक्षच झालें पाहिजे. तथापि त्याचें वर्णन अनेकांनीं केलें आहे. कांहीं म्हणतात, त्याचा उच्चार अर्ध 'स्' कार किंवा 'ह्' कार ह्यांच्यासारखा होतो. हें म्हणणें कांहीं खोटें नाहीं. पण तें अपूर्ण आहे असें आमच्या वरील वर्णनावरून सहज समजेल. कांहींच्या मतें त्याचा उच्चार केवळ छातींत होतो, त्याच्याशीं मुखाच्या अवयवांचा कांहीं-एक संबंध नाहीं, आणि तो एक ऊष्मवर्णच होय. दादोबांचे मतें 'ज्या अक्षरापुढें विसर्ग असतो त्या अक्षराचा अन्त्य स्वर उच्चारून तो मुखांत वायू वर किंचित् आदळावा लागतो.' विसर्ग हा बिंदूप्रमाणेंच नेहमीं स्वरान्तीं येतो म्हणून त्यास स्वरादि म्हणावें, हा मुद्दा या ग्रंथांत पूर्वींच सविस्तर आला आहे. विसर्गाचा उच्चार नेहमीं पाठीमागें स्वराचा आश्रय करूनच होतो. त्याचें स्थान कंठ्य होय हें पाणिनीनेंच सांगितलें आहे. तेव्हां मुखाच्या अवयवांचा त्याच्या उच्चाराशीं कांहींएक संबंध नाहीं, ह्या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. यावरून प्रकृत अंकांत दिलेलें वर्णन किती यथार्थ आहे तें समजेल.

४४. बिंदूचे उच्चार दोन आहेत. एक खणखणित व दुसरा ओझरता. खणखणित उच्चारास **अनुस्वार** म्हणतात; आणि ओझरत्या उच्चारास **अनुनासिका** असें म्हणतात.

४५. बिंदूच्या खणखणित उच्चराचे म्हणजे अनुस्वाराचे पुन्हा दोन भेद दिसतात, ते असेः—

(क) बिंदूच्या पुढें स्पर्श व्यंजनांपैकीं कोणतेंही व्यंजन आलें असतां त्या बिंदूचा उच्चार, पुढील व्यंजन ज्या वर्गांतील असेल त्या वर्गांतील अनुनासिक व्यंजनाप्रमाणें होतो. जसें:—पंक, पंखा; पंच, पंजा; पंडित पुंड; प्रांत, पंत; पंपा, पिंपळ; इ०. ह्या जोड्यांतील पहिलें उदाहरण संस्कृत व दुसरें मराठी आहे हें तज्ज्ञ वाचकांच्या तेव्हांच नजरेस येईल.

टीप १.—या उच्चारासंबंधानें इतकें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, प्रस्तुत नियम संस्कृत शब्दांसंबंधानें अगदीं अनपवादक आहे; आणि बिंदूचे जागीं, त्याच्या ज्या अनु-

नासिक व्यंजनाप्रमाणें उच्चार होतो, तें व्यंजनच विकल्पानें लिहिण्याचा संस्कृत भाषेंत प्रचार आहे. म्हणजे पंक, पंच, पंडित, प्रांत, पंपा हे वरील संस्कृत शब्द अनुक्रमें पङ्क, पञ्च, पण्डित, प्रान्त, पम्पा, अशा प्रकारें विकल्पानें लिहिलेले संस्कृत भाषेंत आढळतात. परंतु हा प्रचार मराठींत क्वचित् आढळतो. मराठीमध्यें या सर्व ठिकाणीं बहुधा बिंदुच लिहिण्याचा परिपाठ आहे; व तो लेखनाचे दृष्टीनें सुलभही आहे.

टीप २.—परंतु मराठी शब्दांसंबंधानें उच्चाराचा प्रकृत नियम अनपवादक नाहीं. मराठी शब्दांत बिंदूचेपुढें स्पर्श व्यंजन आलें असतां त्याचा उच्चार नेहमीं खणखणितच, म्हणजे पुढील व्यंजनाच्या वर्गांतील अनुनासिकाप्रमाणेंच, होतो असा नियम नाहीं; तर केवळ ओझरताही होतो. जसें:—कांकडी, चांचणी, तांतडी, पांच, इ०. तथापि निवळ मराठी शब्दांसंबंधानेंही खणखणित उच्चाराचा एक नियम सांगतां येतो. तो असाः—

जेव्हां ऱ्हस्वाक्षरावरील बिंदूच्या पुढें स्पर्शव्यंजन येतें, तेव्हां त्या बिंदूचा उच्चार निवळ मराठी शब्दांतही नेहमीं खणखणित म्हणजे पुढील स्पर्श व्यंजनाचे अनुनासिक व्यंजनाप्रमाणें होतो. जसें:—खंक, डंका, मुंगुस, रंक, उंच, गुंज, उंट, सुंठ, खिंड, गुंडाळणें, उंदीर, चिंधी, पिंपळ, बंब, इ०. या नियमांतील 'ऱ्हस्वाक्षर' हा शब्द महत्त्वाचा आहे. मूळ शब्दांतील बिंदुयुक्त अक्षर दीर्घ असून तें जर केवळ छंदोनुरोधानें म्हणजे कवीच्या इच्छेस अनुसरून ऱ्हस्व होत असेल, तर त्यावरील बिंदूस प्रकृत नियम लागू पडत नाहीं. एरवीं असे शब्द प्रकृत नियमास व्यर्थ अपवादक मानावे लागतील. उदाहरणः—अंतरिंचा ज्ञान दिवा मालवूं नको रे—या सोहिरोबाचे पद्यांतील अंतरिंचा या शब्दांतील रिं हें अक्षर मूळचें दीर्घ आहे, ह्यामुळें त्यावरील बिंदूचा उच्चार प्रकृत नियमास अपवादक नाहीं हें उघड आहे.

आतां खणखणित उच्चाराचा दुसरा प्रकार सांगतों.

(ख) बिंदूच्या पुढें य्, र्, ल्, व्, श्, ष्, स्, ह् हीं व्यंजनें आलीं असतां बिंदूचा उच्चार खणखणित होतो. य् आणि ल् हीं व्यंजनें पुढें असतां मागील बिंदूचा उच्चार अनुक्रमें तालव्य व दंततालव्य म्हणजे यँ् आणि लँ् असा होतो; आणि व्, र्, श्, ष्, स्, ह् हीं व्यंजनें पुढें असतां दंततालव्य म्हणजे वँ् असा होतो. यामुळेंच य्, ल्, व् ह्यांचे यँ्, लँ्, वँ् हे अनुक्रमें अनुनासिक होत, असें

म्हणण्यास हरकत नाहीं. उदाहरणें:—संयोग, संलग्न, संवाद, संरक्षण, संशय, दंष्ट्रा, संसार, सिंह.

टीप १.—या उदाहरणांपैकीं संयोग, संलग्न, संवाद हे शब्द अनुक्रमें सँय्योग, सँल्लग्न, सँव्वाद, असे य्, ल्, व् ह्यांच्या अनुनासिकांस व्यक्त करूनही संस्कृतांत विकल्पानें लिहितात. परंतु मराठींत ही दुसरी तऱ्हा मुळींच प्रचारांत नाहीं. र्, श्, ष्, स्, ह् हीं व्यंजनें पुढें असतां बिंदूचा उच्चार खणखणित दंततालव्य म्हणजे वँ् असा अनुस्वार होतो. तरी ह्या व्यंजनांस अनुरूप अनुनासिक व्यंजनें नसल्यामुळें तीं पुढें असतां मागला अनुस्वार लिहिण्याची वैकल्पिक तऱ्हा मुळीं शक्यच नाहीं. बिंदूच्या खणखणित उच्चाराचे ह्या दुसऱ्या प्रकारासच विशेषेंकरून कोणी अनुस्वार ही संज्ञा लावितात. परंतु या ग्रंथांत ती खणखणित उच्चाराचे दोन्ही प्रकारांस लाविली आहे.

टीप २.—हा उच्चारसुद्धां तत्सम संस्कृत शब्दांमध्येंच नेहमीं आढळतो. निवळ मराठी शब्दांमध्यें प्रकृत नियमांत निर्दिष्ट केलेल्या ठिकाणीं सुद्धां ओझरताच उच्चार दृष्टीस पडतो. उदाहरणें:—जंव, तंव, दंव, त्यांला, आम्हांला, घांस, डांस, कांसव, ऊंस, भोंसकणें, इ०. बिंदूचेपुढें य्, र्, श्, ष्, ह् हीं व्यंजनें आलेल्या निवळ मराठी शब्दांचीं उदाहरणें उपलब्ध नाहींत.

टीप ३.—आजकाल संस्कृत भाषेंत बिंदूचा फक्त खणखणित म्हणजे अनुस्वार हा उच्चारच सर्वत्र करितात, अनुनासिक म्हणजे ओझरता उच्चार हाही पूर्वीं संस्कृतांत होता; परंतु ती भाषा बोलण्याच्या प्रचारांतून गेली असल्यामुळें म्हणजे आजकाल ज्या भाषांना ' मृत भाषा ' असें म्हणतात, त्यांचे वर्गांतील असल्यामुळें, तो उच्चार अन्तर्धान पावला असावा. तें कसेंही असो; मराठींत त्याचा फार प्रचार आहे ह्यांत संशय नाहीं.

४६. बिंदूच्या ओझरत्या उच्चारास **अनुनासिक** म्हणतात. हा उच्चार मराठींत खालील स्थळीं बहुधा आढळतो.

(क) निवळ मराठी शब्दांत शब्दाचे अन्तीं जो बिंदु येतो, मग तो मूळचा असो अथवा प्रत्ययांतला असो, त्याचा उच्चार अनुनासिक होतो. जसें:—हें, तें गहूं, बीं, दहीं, तळें, गुरूं, झाडें, असें, असतां, करावें, केलें, करूं, चालतें, कां, कीं, करणें, साठीं, विषयीं, इ०.

(ख) निवळ मराठी शब्दांत बिंदूचे पुढें ल्, व्, स्, हीं व्यंजनें आलीं असतां बिंदूचा अनुनासिकच उच्चार होतो.

जसें:—त्यांला, आम्हांला, जंव, तंव, दंव, डांस, भोंस-कणें, कांसव, असूं इ०.

( ग ) विभक्तींच्या अनेकवचनी सामान्यरूपांत जो बिंदु आढळतो, त्याचा नेहमीं अनुनासिकच उच्चार होतो; मग चालविलेला शब्द निवळ मराठी असो अथवा तत्सम, किंवा तद्भव असो, हा नियम अनपवादक आहे. जसें:—वाघांस, घोड्यांनीं, नात्वांला, कवींहून, साधूंचा, बायकांत इ०.

टीप—अनेकवचनी सामान्यरूपावर जो बिंदु असतो त्याचा देशस्थांमध्यें कांहीं ठिकाणीं खणखणित उच्चार ऐकूं येतो. जसें:—घोड्यांचा, गाड्यांचा, त्यांत, त्यांला, इ०. हा उच्चार कधीं कधीं इतका स्पष्ट करितात कीं, ' त्यांला ' हा शब्द जवळ जवळ ' त्यांन्‌ला ' असा ऐकूं येतो,

( घ ) दीर्घ स्वरावर बिंदु असून त्याच्यापुढें जर स्पर्श-श्वास व्यंजन आलें तर बिंदूचा उच्चार अनुनासिकच होतो. जसें:—कांकडी, पांखरूं, पांच, कांटा, रांठ, दांत, कांप, इ.

टीप.—विभक्तिप्रत्ययान्त अनेकवचनी शब्दांचा गेल्या टीपेंत सांगितलेला देशस्थी उच्चार या नियमास अपवादक होय. संस्कृतामध्यें सर्वत्रच खणखणित उच्चार म्हणजे अनुस्वार दिसतो. तेव्हा संस्कृत शब्दांस हा नियम लागू नाहीं हें उघड आहे. तथापि कांहीं मराठी शब्द व कांहीं संस्कृत शब्द हे बिंदूचे उच्चारांतील ह्या फरकानेंच भिन्न भिन्न आहेत असें कळतें. उदाहरणार्थ:—वेदांत ( वेद शब्दाची सप्तमी ), वेदांत ( वेदान्त एका शास्त्राचें नांव ); कांत ( सापाची गळून पडलेली त्वचा ) कांत ( कान्त—सुंदर, नवरा ), दांत ( चावण्याचें साधन ), दांत ( दान्त—दमयुक्त ); इ०. ह्या जोड्यांपैकीं पहिला शब्द मराठी असून त्यांतील बिंदूचा उच्चार ओझरता म्हणजे अनुनासिक आहे; आणि दुसरा शब्द संस्कृत असून त्यांतील बिंदूचा उच्चार खणखणित म्हणजे अनुस्वार आहे. ह्या उच्चारांतील फरक अशा स्थळीं लिपींत दाखविण्यासाठीं असें संस्कृत शब्द, बिंदूचे जागीं पुढील व्यंजनाचे अनुनासिकानें युक्त, म्हणजे वेदान्त, कान्त, दान्त, असे लिहितात. हा प्रचार योग्य व इष्ट आहे. तो सार्वत्रिक झाल्यास चांगलें. म्हणजे जेथें दोन शब्दांत घोंटाळा होण्याचा संभव असेल, तेथें उच्चारांतील फरकास अनुसरून लिपीमध्यें फरक होणें हें आपल्या भाषेच्या स्वभावास साजेसेंच असल्यामुळें प्रकृत प्रचारास उत्तेजन देणेंच योग्य आहे. परंतु संस्कृत शब्दांतील बिंदूच्या पुढलें व्यंजन, जेव्हां वर्गीय

व्यंजनांपैकीं नसतें, तेव्हां मात्र संस्कृत शब्दांत व तशाच प्रकारें लिहिण्यांत येणाऱ्या मराठी शब्दांत लिपीमध्यें फरक दाखविण्याचा प्रचार अद्याप अस्तित्वांत आला नाहीं. जसें:—सर्व+अंशीं=सर्वांशीं, आणि सर्व शब्दास तृतीयेचा 'शीं' हा प्रत्यय लागून होणारें तृतीयेचें अनेकवचनी रूप सर्वांशीं, हे शब्द जरी दुसऱ्या अक्षरावरील बिंदूचे उच्चारांतील फरकानें (पहिल्या शब्दांत अनुस्वार व दुसऱ्या शब्दांत अनुनासिक) भिन्न आहेत, तरी लिपीमध्यें ते शब्द अद्याप एकाच तऱ्हेनें लिहितात. हा फरक दाखविण्या-साठीं कांहीं संकेत झाल्यास बरें.

(ङ) दीर्घ स्वरावर बिंदु असून त्याच्यापुढें जर स्पर्श-नाद व्यंजन आलें, तर बिंदूचा उच्चार कोंकणस्थांत अनु-नासिक करण्याकडे व देशस्थांत अनुस्वार करण्याकडे अधिक प्रवृत्ति आहे. आंग, गांजणें, मांजर, कांडप, तांदूळ फांदी, धांदा, लांब, इत्यादि शब्दांच्या कोंकणस्थदेशस्थांच्या उच्चारांचें सूक्ष्म निरीक्षण केल्यानें, वरील विधानाची सत्यता ध्यानांत येईल.

४७. अनुस्वार आणि अनुनासिक, म्हणजेच खणखणित व ओझरता नाकांतून उच्चार, हे जे बिंदूच्या उच्चाराचे दोन प्रकार, त्यांसंबंधाचे वर दिलेले साधारण नियम इतकेंच दर्शवितात कीं, त्या त्या ठिकाणीं बिंदूचा तसा तसा उच्चार होतो. इतर ठिकाणीं त्याचा उच्चार काय हें केवळ प्रचारावरूनच समजलें पाहिजे. म्हणजे अमुक अमुक ठिकाणीं बिंदूचा उच्चार अनुनासिक होतो असें जें वर सांगितलें, त्यावरून अन्यत्र त्याचा असा उच्चार होत नाहीं असें समजूं नये; तर तत्संबंधाचे नियम ठरवितां येत नाहींत इतकेंच

४८. अनुस्वार व अनुनासिक हे दोन तऱ्हेनें लिहिण्याचा मूळ प्रचार होता. अनुस्वारदर्शक ओळीवरील साधा बिंदु ( ं ) आणि अनुनासिक दर्शक ओळीवरील चंद्रकोरीच्या आंतला बिंदु ( ँ ) अशीं दोन चिह्नें आहेत परंतु हें दुसरें चिह्न प्रचारांतून जाऊन लिपिभेद बहुतेक नष्टच झाल्यासारखा आहे. **सर्वाँशीं** (तृ. अ.) या सारख्या वरील अवश्य ठिकाणीं ( ँ ) या चिह्नाचें पुनरुज्जीवन होणें इष्ट नाहीं काय?

४९. बिंदूचे उच्चारांतील हा फरक कवितेच्या दृष्टीनें फारच महत्त्वाचा आहे. पुढें अनुस्वार विसर्ग येतो ॥ संयोग ऱ्हस्वास गुरुत्व देतो ॥

असा छंद:शास्त्राचा नियम आहे. परंतु अक्षरावरील बिंदूस सरसकट अनुस्वार म्हटल्यानें छंद:शास्त्राच्या वरील नियमाचा अर्थ नीट समजावयाचा नाहीं; अथवा तो नियमच चुकीचा म्हणावा लागेल. परंतु अनुस्वार आणि अनुनासिक असे बिंदूचे दोन वेगळे वेगळे उच्चार असून ज्या अक्षरावरील बिंदूच्या उच्चारास अनुस्वार म्हणतां येतें, तें अक्षर लघु असल्यास अनुस्वारानें त्यास दीर्घत्व येतें. परंतु लघु अक्षरावरील बिंदूचा उच्चार केवळ अनुनासिक असल्यास त्या लघूस दीर्घत्व येत नाहीं. असा स्पष्ट खुलासा समजल्यानें छंद:शास्त्रासही सुगमता प्राप्त होते.

ज्या दिवशीं दुर्योधन झाला कुंतीस भीम ते दिवशीं ।
स्वगुणें एकें तप्तें एकें केलीं सुहृन्मनें हिंवशीं ॥ --मोरोपंत.

या आर्येंत ‘ हिंवशीं ’ या शब्दांतील पहिल्या ऱ्हस्व अक्षरावर बिंदु असूनही त्या अक्षरास दीर्घत्व येत नाहीं, ह्याचें कारण, त्यावरील बिंदूचा उच्चार केवळ अनुनासिक आहे, अनुस्वार नाहीं हें उघड आहे.

येथें विसर्ग व बिंदु ह्यांच्या उच्चाराबद्दलचें विवेचन संपलें. आतां इतर उच्चार--विशेषांकडे वळूं.

५० **अ** ह्या स्वराचा उच्चार मराठींत सर्वत्र एकसारखा होत नाहीं. अर्धवट म्हणजे कोता किंवा तोकडा, पूर्ण म्हणजे पुरा किंवा बेताचा, आणि लांबट म्हणजे जरा ओढलेला, असे **अ**च्या उच्चारांत तीन भेद दिसतात.

५१. ( **अ** ) निवळ मराठी शब्दांचे **अंतींचा अ** हा अर्धवट किंवा कोता किंवा तोकडा **अ** होय. जसें:--कर, बस, जर, तर, घर, गत, कळप, उखळ, सुलभ, कमळ, चुकार, नोकर, चाकर, इ०.

[ हा अंतींचा अ केवळ अनुच्चरित ( silent ) आहे, असें कांहींचे म्हणणें आहे. परंतु हें म्हणणें चुकीचें व घातक आहे. कारण कीं, जर तो अनुच्चरित असेल तर, मराठींतील अकारान्त म्हणविले जाणारे बहुतेक सर्व शब्द व्यंजनान्त होतील; आणि त्यांमधील, व कदाचित्, क्वचित्, किंचित्, पश्चात्, विद्वान्, इत्यादि वास्तविक व्यंजनान्त शब्दांमधील फरक नाहींसा होईल. आणि दुसरें, जर अन्त्य अ वास्तविक अनुच्चरित असेल, तर तो लिहावा कां ? म्हणजे अशा ठिकाणीं अन्त्य व्यंजन पायमोडकेंच कां न लिहावें ? असा प्रश्न साहजिक उत्पन्न होतो. एवंच, ज्यांनीं त्यास silent म्हणजे अनुच्चरित असें म्हटलें आहे

त्यांचा आशय तसा नसून त्यांची शब्दयोजनाच केवळ दूषित आहे असें वाटतें. silent म्हणजे अनुच्चारित असें त्यास न म्हणतां not fully sounded म्हणजे अपूर्णोच्चरित किंवा अर्धवट, कोता, असेंच म्हणण्याचा त्यांचा उद्देश असला पाहिजे हें उघड आहे. ]

**अपवाद १.**--जर अकारान्त शब्दाचें अन्त्याक्षर जोडाक्षर असलें किंवा उपान्त्याक्षर सानुस्वार असलें, तर अन्त्य अचा उच्चार पूर्ण होतो. जसें:-घट्ट, लख्ख, गर्क, उंट, उंच गुंज, इ०.

**अपवाद २.**---एकाक्षरी अकारान्त शब्दांतील अन्त्य अ पूर्णोच्चारित असतो. जसें:—ग, च, ढ, न, र, व, इ०.

**अपवाद ३.**—सर्व तत्सम संस्कृत अकारान्त शब्दांतील अन्त्य अ पूर्णोच्चारित असतो. जसें:—गृह, सुर, स्थिर, स्वच्छ, इ०.

**प्रत्यपवाद.** –पण आकारान्त संस्कृत तत्सम शब्द मराठींत अगदीं माणसाळलेले म्हणजे विशेष परिचित, अगदीं नेहमींच्या प्रचारांत येत असतील, तर प्रकृत नियमास अनुसरून त्यांच्या अंतीचा अ अर्धोच्चारितच असतो. उ०:--देव, धन, पुस्तक, सोम,–वार, दिवस, अक्षर, वचन, इ० शब्दांचा नेहमींच्या भाषणांतील उच्चार पहा.

( **आ** ) अकारान्ताशिवाय इतर तीन अक्षरी शब्दांमध्यें दुसरें अक्षर आकारान्त असेल, तर ह्या दुसऱ्या अक्षराचे अंतींचा अ सुद्धां अर्धोच्चारितच म्हणजे उच्चारांत कोता किंवा अर्धवटच असतो. जसें—बकरा, सुटका, भटजी, लावणी, परभू, पणतू, करणें, बोलणें, कापडें, बकरें, करतो, बोलतो, इत्यादि.

[ अ चा ह्या उच्चार आणि अन्त्य अ चा वर सांगितलेला उच्चार हे बहुतेक एकच आहेत. भट, लाव, कर, बोल, या शब्दांची, भटजी, लावणी, करणें, बोलणें, ह्या शब्दांशीं तुलना केली, म्हणजे दोहोंमध्यें ट, व, र, ल, ह्या अक्षरांतील अ ह्या स्वराचा उच्चार कोता, अपूर्ण आहे हें कळण्यासारखें आहे. द्व्यक्षरी व त्र्यक्षरी शब्दांतील आद्याक्षराचा उच्चार सारखा नाहीं हें खरें. परंतु आद्याक्षराचे उच्चाराचा प्रस्तुत प्रश्न नाहीं. सध्या द्वितीयाक्षराचेच अन्त्य स्वराच्या उच्चाराविषयींचा विचार कर्तव्य आहे; आणि तो उच्चार द्व्यक्षरी व त्र्यक्षरी या दोन्ही शब्दांत अर्धवट, कोता, किंवा अपूर्ण आहे, हें सर्वसंमत आहे. परंतु त्र्यक्षरी शब्दांतील द्वितीयाक्षराचे अन्त्य अ च्या उच्चारास जे अपूर्णोच्चरित ( not fully sounded ) असें म्हणतात, तेच द्व्यक्षरी शब्दांतील अन्त्य अ ह्या स्वर

अनुच्चारित ( silent ) आहे असें म्हणतात हें विचित्र नव्हे काय? एवंच त्यांचा silent म्हणजे अनुच्चरित हा शब्द योग्य नसून त्याचे जागीं त्यांनीं not fully sounded म्हणजे अपूर्णोच्चरित किंवा अर्धोच्चरित म्हणजेच अर्धवट, कोता, तोकडा असें म्हणावयास पाहिजे होतें, असें जें मागल्या अंकांत म्हटलें आहे, त्याची सत्यता त्यांच्याच दृष्टीनें ह्या प्रकारें सिद्ध होत नाहीं काय ?]

( इ ) चार अक्षरी अकारान्त शब्दांमध्यें दुसरें अक्षर, जोडाक्षर नसतां अकारान्त असलें तर अन्त्य अ प्रमाणेंच हा दुसऱ्या अक्षरांतील अ उच्चारांत अर्धवट किंवा कोता असतो. जसें:—करवत, बोलवत, रुखवत, काकळूत, आगळीक, सोयरीक, मोकळीक, मोगरेल, खोबरेल, भिजवण, भरवण, घरकूल, फटकूर, कामगार, अरबट, दणगट, परटीस, वठणीस, मुलग्यास , उंदरास, कमळांत, बेडकांत, इ०. परंतु वर्तणूक, अर्धवट, हक्कदार इ०. शब्दांतील द्वितीयाक्षर जोडाक्षर असल्यामुळें त्यांतील अ पूर्णोच्चरित आहे.

टीप—या व याच अंकांतील पुढील नियमांवरून साधारणपणें असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, एकसारखीं लागोपाठ आलेलीं दोन तीन किंवा अधिक ऱ्हस्व अक्षरें नीट उच्चारण्यास पंचाईत पडते; म्हणून उच्चाराचे सौकर्यासाठीं त्यांमधील एखाद्या अकाराचा कोता किंवा अपूर्ण उच्चार होऊं लागतो. ही व्यापक गोष्ट ध्यानांत धरिली असतां या अंकांतील बहुतेक नियमांचें रहस्य वाचकांस कळण्यास सुलभ पडेल. एरवीं हे नियम केवळ स्वेच्छाचारी वाटल्यावांचून राहणार नाहींत.

( ई ) अकारान्तेतर चार अक्षरी शब्दांमध्यें तिसरें अक्षर अकारान्त असल्यास त्यांतील अचा उच्चार अर्धवटच होतो. जसें:—भटुरडा, आठवडा, मुखवटा, निपणजा, विसरला, समजला, पांघरतां, रागावतां, फुशारकी, नखुरडें, चिंचवणी, करवली, करवतें, करवणें, समजणें, पाठवणें, सांपडलें, उतरलें, कमावलें, ओळखतों, उचलता, इ.

**अपवाद १.**—ज्या चार अक्षरी अकारान्त शब्दांमध्यें तिसरें अक्षरही अकारान्त आहे, त्यांचें अनेकवचनी रूप अकारान्तेतर जरी असलें, तरी त्यांचे तिसऱ्या अक्षरांतील अकाराचा उच्चार पूर्ण होतो. जसें:—करवत—करवती, हरकत—हरकती, अडचण—अडचणी, रुखवत रुखवतें इत्यादि. ह्या अनेकवचनी शब्दांत तिसऱ्या अक्षरांतील अचा पूर्ण उच्चार होण्याचें

कारण उघडच आहे कीं, मूळ एकवचनामध्यें त्याचा उच्चार जरा लांबटच आहे.

**अपवाद २.**—जे चार अक्षरी आकारान्त शब्द धातूंस **आ** प्रत्यय लागून साधलेले असून त्यांतील तिसरें अक्षर अकारान्त आहे, त्यांमधील तिसऱ्या अक्षरांतील अकार अर्धवट किंवा कोता नसतो. जसें:- उलगड-उलगडा, ओरखड—ओरखडा, अडखळ-अडखळा, इ०. या अपवादाचेंही कारण वरील अपवादाच्या कारणासारखेंच आहे, हें सुज्ञ वाचकांस समजेलच.

**अपवाद ३.**—चार अक्षरी अकारान्तेतर अनुकरणवाचक शब्दही प्रकृत नियमास अपवादक आहेत. जसें:—घडघडां, पटपटां, कडकडां, इ०. ह्या ठिकाणच्या तिसऱ्या अक्षरांतील **अ** चा उच्चार अर्धवट किंवा तोकडा नसण्याचें कारण असें कीं, ह्या आकारान्त शब्दांचे जे अकारान्त मूळ शब्द घडघड, पटपट, कडकड, इ० त्यांमध्यें तिसऱ्या अक्षरांतील **अ** चा उच्चार अपूर्ण नसून उलटा अधिकच आहे.

**अपवाद ४.**— द्व्यक्षरी मूळ शब्दांस अकारान्तेतर द्व्यक्षरी प्रत्यय लागून साधलेल्या चार अक्षरी शब्दांत जर तिसरें अक्षर अकारान्त असेल तर, त्यांतील अही पूर्णोच्चरित असतो. जसें:—शेत—करी, होत—करू, भाडे—करी, वाट—सरू, भले—पणा, इ०

**( उ )** ज्या चार अक्षरी शब्दांत शेवटचीं दोन अक्षरें दीर्घ असून दुसरें अकारान्त असतें, त्यांमधील दुसऱ्याचे अंतींचा **अ** अर्धवटच उच्चारला जातो. जसें: —रडकुंडी, ठेवणाऊ, शिकणारा, नरकाडी, इवलासा, भलतासा, इतकाला, एवढाला. इ०.

**( ऊ )** पांच अक्षरी व त्यांपेक्षांही मोठे शब्द बहुधा साधित असतात. त्यांमध्यें त्यांचा मूळ अवयवांतील अर्धोच्चरित **अ** बहुतेक तसाच अर्धोच्चरित राहतो. हें वरील कांहीं चार अक्षरी शब्दांच्या अवलोकनानेंही समजेलच. उदाहरणें:—शेत-करी, वाट-सरू, कड-कडां, मळ-मळत, पाथर-वट ओशाळ-गत, रख-रखीत, मन-मिळाऊ, पायली-भर, हात-चलाखी, गैर-हजर, माहेर-घर, माय-पोट, देव-घर, इ०.

५२. हा अपूर्णोच्चरित म्हणजे अर्धवट, कोता, किंवा तोकडा उच्चारलेला **अ** शब्दाचे अंतीं आला असतां मागील अक्षरांतील **अ**चा उच्चार

लांबट म्हणजे जरा ओढलेला असा होतो. ह्यास कोणी दीर्घ असें म्हणतात; तें चुकीचें आहे. कारण त्याची व्याकरणदृष्ट्या किंवा छन्दःशास्त्रदृष्ट्या दीर्घांत गणना करितां यावयाची नाहीं हें उघड आहे. उ०:-घर,गत, मन, इ०. यांतील **घ, ग, म** ह्या आद्याक्षरांतील **अ** हा उच्चारांत लांबट होतो.

५३. अर्धवट व लांबट ह्या दोन उच्चारांशिवाय **अ** चा जो वास्तविक बेताचा, पूर्ण उच्चार तो इतरत्र आढळतो. 'सरळ' या एका शब्दांत **अ**चे तिन्ही उच्चार येतात. **ळ** मधील **अ** अर्धवट, **र** मधील लांबट, आणि **स** मधील पूर्ण आहे हें उघड आहे.

५४. स्वरांमध्यें फक्त **अ** या स्वराचाच अर्धवट किंवा कोता उच्चार होतो. त्याप्रमाणें इतर कोणत्याही स्वराचा उच्चार कोता किंवा अर्धवट होत नाहीं. पण **अ** च्या पूर्ण उच्चाराशिवाय जसा त्याचा, अंक ५२ मध्यें सांगितलेला, आणखी एक लांबट अथवा कांहींसा ओढलेला किंवा ताणलेला उच्चार होतो, त्याप्रमाणें इतर सर्व स्वरांचे लांबट किंवा जरासे ओढलेले उच्चार होतात. म्हणजे सर्व स्वरांचे प्रत्येकीं दोन उच्चार होतात. एक– पूर्ण, बेताचा, वाजवी; आणि दुसरा—लांबट, फाजिल, जरासा ओढलेला. जसें:—भात, ताक, हित, विष, वीट, मीठ, गुण, सुत, जूट, फूट, ऋण, मृग, शेत, ऐट, ओळ, लोक, कौल, मौज, इ० शब्दांतील पहिल्या अक्षरांतील स्वर वाजवीपेक्षां उच्चारांत जरासे ओढलेले म्हणजे लांबट आहेत. त्यांचे पूर्ण बेताचे किंवा वाजवी उच्चार पहावयाचे असल्यास त्यांस विभक्तिप्रत्यय लावावे, म्हणजे ते वाजवी उच्चार पहावयाचे असल्यास त्यांस विभक्तिप्रत्यय लावावे, म्हणजे ते वाजवी उच्चार त्या विभक्त्यन्त रूपांत दिसतात. भाताला, हितानें, गुणास, ऋणास, मृगाचा, शेताशीं, ओळींत, लोकीं, मौजेचा, इ० विभक्त्यन्त रूपांमध्यें पहिल्या अक्षरांतील स्वर मूळ शब्दाचे त्याच अक्षरांतील त्याच स्वराचे मानानें कमी लांब म्हणजे बेताचा उच्चारलेला आहे. मीठ व जूट यांस विभक्तिप्रत्यय लागले म्हणजे त्यांचें आद्य अक्षर मुळींच ऱ्हस्व होतें. तेव्हां दीर्घ ई व दीर्घ ऊ ह्यांचे उच्चाराचें वास्तविक स्वरूप नदी, स्त्री, वाणी, भाऊ, जाऊ, सासू, इ० दीर्घ ईकारान्त व दीर्घ ऊकारान्त शब्दांत चांगलें दृष्टीस पडतें.

५५ **अ** ह्या स्वराचा लांबट उच्चार जसा अकारान्त शब्दांचे उपान्त्य (अकारान्त) अक्षरामध्यें दृष्टीस पडतो, त्याचप्रमाणें इतर स्वरांचा

लांबट उच्चारही अकारान्त शब्दांचे उपान्त्य अक्षरांतच आढळतो. गेल्या अंकांतील उदाहरणांवरून ही गोष्ट कळून येईलच.

टीपः—प्रत्येक स्वराचा लांबट किंवा जरासा ओढलेला असा जो दुसरा उच्चार मराठींत दिसतो, तो केवळ अन्त्य अच्या अर्धवट उच्चारापासून उत्पन्न झाला आहे. ह्याचें कारण उघडच आहे कीं, अन्त्याक्षरांतील अचा अर्धवट उच्चार झाल्यानें त्या अक्षरांतील व्यंजनाचा पुढील आधार (स्वर) ज्या मानानें कमी (कोता) होतो, त्या मानानें त्याच्या मागील अक्षरांतील स्वरास अन्त्याक्षरांतील लटपटित व्यंजनाची ओढ लागते. ह्यामुळें उपान्त्याक्षरांतील स्वर जरासा ओढला जातो, म्हणजेच त्याचा जरासा लांबट उच्चार होतो. परंतु अचा अर्धवट उच्चार संस्कृत भाषेंत मुळींच नसल्यामुळें, म्हणजे जिकडे तिकडे त्याचा उच्चार पूर्ण, बेताचा किंवा वाजवी होत असल्यामुळें, त्याचा किंवा इतर कोणत्याही स्वराचा लांबट उच्चार संस्कृत भाषेंत नाहीं. हा प्रकार केवळ मराठीच होय.

५६. शब्दाच्या अन्त्याक्षराशिवाय ज्या ज्या अक्षरांतील अ अर्धवट उच्चारण्यांत येतो, त्या त्या अक्षराचे मागील अक्षरांतील स्वरावर आघात येतो. पुढच्यां जोडाक्षरानें ज्या प्रकारचा आघात मागील अक्षरावर येतो, त्याच प्रकारचा हा आघात आहे. भटजी, कपडें, जितका, इवलासा, उलगडा, भटुरडा, नखुरडें, बेडकांत, बोलवत, इ० शब्दांमध्यें दुसऱ्या किंवा तिसऱ्या अक्षरांत जो अर्धवट उच्चारला जाणारा अ आहे, त्याचे योगें मागील म्हणजे पहिल्या किंवा दुसऱ्या अक्षरावर, पुढें जणुं कांहीं जोडाक्षर आलें आहे असा आघात होतो; म्हणजे ते शब्द जवळ जवळ भट्जी, काप्डें, जित्का, इव्लासा, उल्गडा, भटुर्डा, नखुर्डें, बेड्कांत, बोल्वत, असे उच्चारण्यांत येतात असें म्हणण्यास हरकत नाहीं.

[ वरील अकांत जी भाषा वापरली आहे, ती अलीकडील मराठी-वैयाकरणांचें भाषेहून जराशी भिन्न आहे. येथें ज्याला अर्धवट, कोता, किंवा तोकडा असें म्हटलें आहे, त्याला ते अनुच्चारित ( silent ) म्हणतात, आणि येथें ज्याला लांबट, जरासा ओढलेला असें म्हटलें आहे, त्याला ते दीर्घ ( long ) असें म्हणतात. हा भाषेचा फरक फारसा महत्त्वाचा नाहीं,[१] असें सकृतद्दर्शनीं पुष्कळांस वाटण्यासारखें आहे. परंतु भाषेच्या अप्रयोजकपणामुळें किंवा शैथिल्यानें किंवा अन्य सूक्ष्म दोषानेंही अखेरीस अनिष्ट परिणाम घडून येतात, असें निरनिराळ्या शास्त्रांतील अनेक उदाहरणें देऊन सिद्ध करितां येईल. सांगावयाचें तात्पर्य इतकेंच कीं, शास्त्रीय ग्रंथांत वापरल्या जाणाऱ्या भाषेकडे कधींच दुर्लक्ष करितां कामा नये. भाषा नेहमीं विवक्षित अर्थ तंतोतंत दाखविणारी असावी.

तिच्यायोगें वास्तविक अर्थाचें महत्त्व कमी होतां कामा नये. किंवा जास्तही होतां कामा नये. अर्धवट, तोकड्या उच्चारास ह्या व्याकरणकारांनीं अनुच्चरित असें जें म्हटलें आहे, तें कां चुकीचें आहे, आणि ते स्वतःशींच कसे विसंगत आहेत, ह्याचें दिग्दर्शन वर आलेंच आहे. येथें अतिशयोक्ति किंवा वास्तविक अर्थाचा फाजील विकास हा दोष आहे. म्हणजे वास्तविक जो खरा अर्थ आहे, त्यापेक्षां भाषेचा अर्थ अधिक होतो. हाच दोष दीर्घ ह्या शब्दांतही आहे. लांबट, जरासा ओढलेला, याला दीर्घ म्हणावें कीं नाहीं हा प्रश्न आहे. ह्याचें उत्तर निषेधार्थकच दिलें पाहिजे. कारण कीं, लांबट म्हणजे जरासा लांब, याला दीर्घ म्हणजे लांब म्हटल्यामुळेंच मराठीमध्यें उपान्त्य अक्षरांतील ऱ्हस्व इ व उ हे संस्कृत शब्दांतही दीर्घ लिहावे असा बूट निघाला होता; व त्याप्रमाणें शुद्धलेखनामध्यें अशुद्ध सुधारणा व्हावयाची होती. पण ती सध्या थांबली आहे. तरी तोच प्रश्न पुन्हा पुढेंमागें उपस्थित व्हावयाचा. म्हणून त्याचा साधल्यास वेळींच प्रतिकार करणें बरें. लांबट उच्चार, ऱ्हस्व इ व ऱ्हस्व उ ह्यांचाच होतो असें नाहीं, तर तो सर्व स्वरांचा होतो. हें वरील उद्घाटनांत आलेंच आहे. अन्त्य अ अर्धवट उच्चारण्यांत येतो; त्यामुळें उपान्त्य अक्षरांतील स्वर लांबट होतो; म्हणून उच्चाराचे दृष्टीनें ऱ्हस्व व दीर्घ स्वरांचे, ऱ्हस्व व लांबट ऱ्हस्व, आणि दीर्घ व लांबट दीर्घ, असे दोन दोन प्रकार होतात. फक्त अ ह्या स्वराचा आणखी एक अर्धवट असा उच्चार आहे आणि त्यामुळेंच प्रत्येक स्वराच्या पूर्ण वाजवी उच्चाराशिवाय त्याचा लांबट हा दुसरा उच्चार मराठींत उदयास आलेला आहे. कु–कू–कू३ ह्या कोंबड्याचे आखण्यांतील तीन उकार अनुक्रमें ऱ्हस्व, दीर्घ, व प्लुत ह्या स्वरांच्या उच्चाराचें प्रमाण दाखवितात, हें संस्कृत वैय्याकरणांचें मत पूर्वी सांगितलेंच आहे. प्लुत म्हणजे फार दीर्घ, हा उच्चार मराठी नाहीं, ही गोष्ट सर्वमान्य आहे. त्याच-प्रमाणें ऱ्हस्व, दीर्घ, व प्लुत ह्यांच्या अनुक्रमें एक, दोन, व तीन मात्रा समजतात हेंहि सर्वमान्य आहे. तेव्हां लांबट म्हणजे दीर्घ असें जर म्हटलें, तर लांबटच्या दोन मात्रा समजल्या पाहिजेत आणि लांबट दीर्घाच्या तीन समजल्या पाहिजेत. घर या शब्दांतील घ मधल्या अचा उच्चार जितका लांबट होतो, तितकाच शेत शब्दांतील शेमधल्या एचा लांबतो हें उघड आहे. तेव्हां घमधील अस दीर्घ म्हटल्यानें त्याच्या जशा दोन मात्रा धराव्या लागतील, म्हणजे त्याची वाजवीपेक्षां फाजील लांबी जशी एका मात्रेची आहे असें म्हणावें लागेल, त्याचप्रमाणें शेत शब्दांतील शेची फाजील लांबी तितकीच म्हणजे एक मात्रा होईल. म्हणजे शेत शब्दांतील शेच्या उच्चाराच्या मूळच्या दोन व फाजील लांबीची एक मिळून तीन मात्रा कल्पाव्या लागतील. याप्रमाणें शेत शब्दांतील शेच्या उच्चारास प्लुत म्हणावें लागेल, आणि प्लुत उच्चार मराठींत नाहीं, हें

सर्वसंमत मत त्याज्य ठरेल. म्हणून शेत शब्दांतील शेच्या उच्चाराची फाजील लांबी एक मात्रा नाहीं हें निर्विवाद सिद्ध होत नाहीं काय? आणि हें जर सिद्ध आहे, तर घर ह्या शब्दांतील घच्या उच्चाराच्याही दोन मात्रा कल्पितां येणार नाहींत; म्हणजेच त्यास दीर्घ म्हणतां येणार नाहीं, हें उघड आहे. ह्यामुळेंच या ग्रंथांत त्या उच्चारास लांबट किंवा जरासा ओढलेला असें म्हटलें आहे. ह्यावरून असेंही म्हणतां येईल कीं, हित, शिव, गुण, विष, इत्यादि तत्सम संस्कृत शब्दांच्या मराठी उच्चारांत उपान्त्य अक्षरांतील स्वरांचा लांबट उच्चार होतो, पण त्यास दीर्घ हें नांव चुकीचें आहे, व त्यामुळेंच ते दीर्घ लिहिणें किंवा लिहिले पाहिजेत असें म्हणणें हेंही केवळ अज्ञानमूलक होय. शुद्धलेखनाच्या ह्या प्रश्नाचा वादविवाद आम्ही स्वतंत्रपणें केला आहे; तो जिज्ञासूंनीं पहावा. येथें फक्त उच्चाराचा प्रश्न आहे. ह्यामुळें त्यास येथें स्थळ देणें योग्य नाहीं. ]

[ उच्चाराच्या संबंधानें आणखी एका नवीन उपस्थित झालेल्या प्रश्नाचा ऊहापोह करावयाचा आहे. इंग्रजींतल्याप्रमाणें मराठींतही शब्दोच्चारांत शब्दांतील विशिष्ट अक्षरावर जोर ( accent ) असतो असें एक नवीन मत प्रचालित होऊं पहात आहे. हें नवीन मत सर्वस्वी चुकीचें आहे असें कोणीही म्हणणार नाहीं. परंतु ह्या स्वराघाताच्या (accent) प्रश्नाचा शास्त्रीय दृष्ट्या जसा सोपपत्तिक विचार व्हावयास पाहिजे, तसा अद्याप झाला नसल्यामुळें त्यासंबंधाचे नियमही जे उदयास आले आहेत, ते अप्रयोजक व दूषित आहेत. त्या नियमांचें सविस्तर परीक्षण करण्यापूर्वी ह्या मुद्याचें वास्तविक स्वरूप प्रथम विशद केलें पाहिजे. सत्य स्वरूप नीट समजलें म्हणजे न्यून, दोष, भ्रम इत्यादि असल्याचे प्रकार सहज ओळखतात.

प्रथम असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, मूळ संस्कृत भाषेंत जर जोर किंवा स्वराघात ( accent ) नाहीं, तर तो मराठींत कधीं व कोठून आला? ह्या प्रश्नाचें ऐतिहासिक दृष्ट्या समाधानकारक उत्तर देण्याचा येथें उद्देश नाहीं. तें काम इतिहाससंशोधकांचें होय. येथें इतकेंच सांगतों कीं, अ ह्या स्वराचा अर्धवट, कोता, तोकडा उच्चार जो वर सांगितला आहे तो संस्कृतांत नाहीं; म्हणून संस्कृत भाषेंत स्वराघाताचा ( accent ) प्रश्नच उद्भवत नाहीं. आणि मराठीमध्यें तो प्रश्न जो उत्पन्न झाला आहे, तो केवळ अ ह्या स्वराच्या अर्धवट उच्चारापासूनच आला आहे. ही एक गोष्ट ध्यानांत ठेविली म्हणजे ह्या प्रश्नाचा सर्व उलगडा झालाच म्हणून समजावें.

स्वरांच्या मराठींतील उच्चारासंबंधानें जें विवेचन वर केलें आहे, त्यावरून असें कळून येईल कीं, मराठीमध्यें अर्धवट उच्चार फक्त अ ह्या स्वराचाच होतो आणि त्यामुळेंच हा अपूर्णोच्चरित अ ज्या अक्षरांत असतो, त्याचे मागल्या

अक्षरांतील स्वराचे उच्चारावर त्याचा परिणाम घडतो. शब्दान्तींचा अ अपूर्णोच्चरित असल्यास उपान्त्य अक्षरांतील स्वराचा लांबट उच्चार होतो; आणि अपूर्णोच्चरित अ शब्दाच्या मधल्या कोणत्याही अक्षरांत आल्यास त्या अक्षराचे मागल्या अक्षरास किंवा त्या मागल्या अक्षरांतील स्वरास पुढें जोडाक्षर आल्याप्रमाणें धक्का बसतो. अपूर्णोच्चरित अ शब्दाचे आरंभीं किंवा आरंभींचे अक्षरांत कधींच येत नाहीं. आतां अपूर्णोच्चरित अ चे मागल्या अक्षरावर किंवा त्यांतील स्वरावर असे निरनिराळे दोन परिणाम कां व्हावे, ह्या प्रश्नाचें उत्तर असें:—घर ह्या शब्दांतील अन्तींच्या अ चा अपूर्णोच्चार होतो, त्यामुळें र ह्या व्यंजनाचा पुढील स्वराधार डळमळून तें व्यंजन लटपटूं लागतें. म्हणजे तें लगेंच स्वाभाविकरीत्या आपल्या पाठीमागच्या स्वरास उच्चारांत जणूं काय पकडूं लागतें व त्यामुळें तो स्वर ताणला जाऊन जरासा लांबट होतो, हें पूर्वींच सांगण्यांत आलें आहे. परंतु अपूर्णोच्चारित अ शब्दाच्या मध्यें आल्यास त्याच्या मागल्या अक्षरावर निराळाच परिणाम होतो. ह्याचें कारणही स्पष्टच आहे. रुखवत या शब्दामध्यें ख आणि व ह्या अक्षरांच्या उच्चारावर अ च्या अर्धवट उच्चाराचा एकच परिणाम होत नाहीं, व हें अक्षर उच्चारांत लांबट होतें. आणि रु ह्या अक्षरास पुढें जोडाक्षर आल्याप्रमाणें उच्चारांत धक्का बसतो किंवा त्यावर आघात येतो; हें, रुखवत या शब्दाचें उच्चाराकडे सूक्ष्म लक्ष दिल्यानें ध्यानांत येईल. सूक्ष्म वस्तु स्पष्ट दृष्टीस पडावी म्हणून सूक्ष्मदर्शक यंत्राचा किंवा विकासक कांचेचा उपयोग करितात. या साहाय्यानें सूक्ष्म वस्तूंचा आकार मोठा दिसतो. तरी हा मोठा आकार मूळ वस्तूचा नसून तो केवळ उपयोगांत आणलेल्या यंत्रानें किंवा कांचेनें उत्पन्न होणारा भ्रम आहे हें विसरूं नये. असो. तेव्हां हा इशारा ध्यानांत ठेवून वरील सूक्ष्म उच्चारास कृत्रिम स्थूल रूप आणून त्याजकडे पाहूं म्हणजे अपूर्णोच्चरित अ हा अगदीं अनुच्चरित आहे. असें क्षणभर समजूं. तसें झाल्यास रुखवत हा शब्द ‘ रुख्वत् ’ असा लिपींत व उच्चारांतही दिसेल. म्हणजे रु ह्या अक्षरापुढें ख्व हें जोडाक्षर प्रत्यक्ष दिसेल आणि व ह्या अक्षरापुढें फक्त एकच व्यंजन दिसेल. ह्यामुळें रु ह्या अक्षरास पुढल्या जोडाक्षराचा धक्का बसतो; परंतु व ह्याचेपुढें एकच व्यंजन असल्यामुळें त्यास धक्का बसण्याचें कारण नाहीं. तें फक्त त्याच्या पुढील लंगड्या व्यंजनाचे ओढीनें लांबतें. रुखवत ह्या शब्दाचें ‘ रुख्वत् ’ हें कृत्रिम स्थूल स्वरूपच खरें मानून त मधील अ च्या उच्चारास कोणी अनुच्चरित म्हणत असले तर नकळे. पण मग त्यांनीं त्याच दृष्टीनें ख मधील अ च्या उच्चारासही अनुच्चरित न म्हणतां अपूर्णोच्चरित कां म्हणावें, हेंही एक गूढच आहे. असो. तात्पर्य इतकेंच कीं, अपूर्णोच्चरित अन्त्य अ आणि अपूर्णोच्चरित मधला अ ह्यांचें मागल्या

अक्षराचे उच्चारावर भिन्न भिन्न कार्य होण्याचें कारण इतकेंच कीं, त्या त्या स्थळीं मागल्या अक्षराची परिस्थिति भिन्न भिन्न आहे. ह्या दोन भिन्न भिन्न कार्यांस लांबणें किंवा ओढलें जाणें, आणि धक्का किंवा आघात, अशीं आम्हीं दोन पृथक् नांवें दिलीं आहृत. ह्या दोन्ही कार्यांस accent म्हणजे जोर किंवा स्वराघात हें एकच नांव देऊन त्यासंबंधाचे नियम सांगणें झाल्यास ते असे होतील:—

(क) शब्दान्तींचा अ अपूर्णोच्चरित असल्यास उपान्त्याक्षरावर जोर येतो; म्हणजे त्यानें उपान्त्याक्षराचा उच्चार लांबट होतो. जसें:—घर, दार, इ०.

(ख) शब्दाच्या मध्यभागीं जर कोणत्याही अक्षरांत अपूर्णोच्चरित अ आला, तर त्याच्या मागल्या अक्षरावर जोर येतो, म्हणजे त्यानें मागील अक्षरास जणूं कांहीं पुढें जोडाक्षर आल्याप्रमाणें धक्का बसतो. जसें:—हुखवत, बोलवत, इ०.

टीप—या दोन ठिकाणचा जोर वास्तविक निरनिराळ्या प्रकारचा आहे. पहिल्यास लांबट जोर म्हणावें व दुसऱ्यास साधात जोर म्हणावें. अथावा पहिल्यास ताण व दुसऱ्यास धक्का असें म्हणणें बरें.

(ग) पुढें जोडाक्षर आलें असतां मागल्या अक्षरावर बहुधा जोर येतो; म्हणजे त्यास धक्का बसतो. या मुद्याचें सविस्तर विवेचन पुढें येणार आहे.

(घ) वरील तीन नियमांत सांगितलेल्या स्थळांशिवाय अन्यत्र सर्व अक्षरांचा पूर्ण, बेताचा, किंवा वाजवी उच्चार होतो.

जोर किंवा स्वराघात ( accent ) ह्या विषयाचें मराठींत स्वतंत्र प्रकरण करावयाचेंच असलें तर तें इतकें साधें, सरळ, व थोडक्यांत होतें. आतां या विषयासंबंधाच्या बऱ्याच लांबलचक विवेचनांतीं जे साधारण नियम सुचविण्यांत आले आहेत, त्यांचें थोडक्यांत परिक्षण करूं.

नियम १—दोन अक्षरी शब्दांत पहिल्या अक्षरावर जोर असतो, मग तें अक्षर ऱ्हस्व असो वा दीर्घ असो.

परीक्षण—हा नियम कांहीं अकारान्त द्यक्षरीं शब्दांसच लागू आहे. परंतु इतर अन्ताच्या द्यक्षरी शब्दांस तो कसा लागतो व कां लागावा हें एक गूढच आहे. जरा, बघा, खुळा, पळी, इथें, कुठें, मारा, वारा, गीता, गेंडा, सोटा, तेली, लाडू, इ० शब्दांतील आद्याक्षरांचे उच्चारांत कांहीं विशेष आहे असें दिसत नाहीं.

नियम २.—त्र्यक्षरी शब्दांत बहुधा पहिल्या अक्षरावर जोर पडतो; परंतु पहिलें अक्षर ऱ्हस्व व दुसरें दीर्घ असतें, तेव्हां मधल्या अक्षरावर जोर पडतो.

परीक्षण.—त्र्यक्षरी शब्दांचे आठ सांचे आहेत, त्यांस छंदःशास्त्रांत गण म्हणतात. ते आम्ही वैयाकरणांचे ग्रंथांतून उतरून घेतों.

१ कमळ, घळत, कळप ... ... ... नगण.
२ मारावा, नेमावा, सोडावें ... ... मगण.
३ कासार, सोनार, लोहार ... ... ... तगण.
४ बकरा, भटजी, तटका ... ... ... सगण.
५ भाकरी, चाकरी, वानगी ... ... ... रगण.
६ नगारा, फवारा, सुगावा ... ... ... यगण.
७ भाकर, चाकर, नोकर ... ... ... भगण.
८ वरात, परात, कटाव ... ... ... जगण.

या आठ सांच्यांपैकीं किंवा गणापैकीं चवथ्या व पांचव्या म्हणजे सगणाचे व रगणाचे सांच्यांतील शब्दांमध्यें मधल्या अक्षरांतील अ अपूर्णोच्चरित आहे; म्हणून पहिल्या अक्षरावर जोर आहे; पहिल्या, तिसऱ्या, सातव्या व आठव्या म्हणजे नगण, तगण, भगण, व जगण, ह्या सांच्यांतील शब्दांत अन्तीं अपूर्णोच्चरित अ आहे, म्हणून दुसऱ्यावर जोर आहे; आणि दुसऱ्या व सहाव्या म्हणजे मगण व यगण ह्या सांच्यांतील शब्दांत विशेष जोर कोठेंच नाहीं, अशी वस्तुस्थिति आहे; म्हणजे आठांपैकीं दोन सांच्यांत पहिल्या अक्षरावर जोर आहे. म्हणून नियमाचे प्रथम भागांतील 'बहुधा' हा शब्द व्यर्थ आहे. आतां दुसऱ्या भागाकडे पहा. पहिलें अक्षर ऱ्हस्व व दुसरें दीर्घ असा प्रकार सहा व आठ म्हणजे यगण जगण या दोन सांच्यांत आहे. तेव्हां नियमाप्रमाणें या दोन्हीं सांच्यांतील शब्दांत दुसऱ्या अक्षरावर जोर असावा. परंतु तसा जोर फक्त आठव्या म्हणणजे ज गणांतील सांच्यांत आहे; कारण त्यांत अन्त्य अ असून तो अर्धवट आहे. सहाव्या म्हणजे यगणांत अन्तीं किंवा मध्यें अर्धवट अ नाहीं; तेव्हां त्या सांच्यांतील शब्दांत कोठेंच जोर नाहीं. शिवाय पहिल्या, तिसऱ्या व सातव्या, म्हणजे नगण, तगण, व भगण, या तीन सांच्यांत अन्ती अर्धवट अ आहे; म्हणून त्यांमध्यें दुसऱ्या अक्षरावर जोर आहे. एवंच, नियमाचे पहिल्या भागांतील 'बहुधा' शब्द निरर्थक आहे; आणि दुसऱ्या भागांत अतिव्याप्ति व अव्याप्ति हे दोन्ही दोष आहेत.

**नियम ३.**—चार अक्षरी शब्दांत बहुधा पहिल्या व तिसऱ्या अक्षरावर जोर असतो; परंतु दुसरें अक्षर दीर्घ असतें, तेव्हां दुसऱ्या अक्षरावर जोर पडतो.

**परीक्षण.**—दुसरें व चवथें हीं दोन अक्षरें अकारान्त असून त्या दोहोंमधील अ अर्धवट उच्चरला जात असतो तेव्हां नियमाचा पूर्वभाग त्या शब्दांस लागू पडतो. परंतु इतर शेंकडों शब्दांस तो लागू पडत नाहीं. म्हणून पूर्वभागांतील

'बहुधा' शब्द व्यर्थ होय. दुसरें अक्षर दीर्घ असलें म्हणजे त्याजवर जोर येतो; हा दुसरा भाग अपूर्ण व चुकीचाही आहे. चार अक्षरी शब्दांतील तिसरें अक्षर अकारान्त असून त्यांतील अ अर्धवट असला तर दुसऱ्या अक्षरावर जोर येतो. मग तें अक्षर ऱ्हस्व असो वा दीर्घ असो. जसें:—निलाजरा, रिकामका, भटुरडा, निपणजा, इ० उदाहरणें प्रकृत अध्यायांत पूर्वीं आलींच आहेत. मुलाखत, करावया हीं नियमाच्या कर्त्यांनीं दिलेलीं उदाहरणें साफ चुकीचीं आहेत. मुलाखत ह्या शब्दांत अंन्तींचा अ अर्धवट असल्यामुळें तिसऱ्या अक्षरावर जोर आहे, दुसऱ्यावर नाहींच; आणि करावया या शब्दांत अर्धवट अ नाहींच, म्हणून त्यांत जोर कोठेंच नाहीं. ह्या दोन्ही शब्दांत दुसऱ्या अक्षरावर जोर आहे असा जो सदरहु गृहस्थांस भास झाला, त्याचें कारण इतकेंच दिसतें कीं, त्या दोन्हीं शब्दांत दुसरें अक्षर दीर्घ आहे. पण दीर्घत्व हें जोराचें कारण कधींच होऊं शकत नाहीं.

**नियम ४.**—समासांमध्यें मूळ अवयवांतील शब्दांमधला जोर बहुतकरून तसाच राहतो.

**परीक्षण**—हा नियम सर्वस्वी खरा आहे. मात्र मूळ शब्दांतील जोर कोठें आहे, हें नीट समजलें पाहिजे.

**नियम ५.**—मराठींत ऱ्हस्वस्वरान्त शब्दच नाहींत.

**परीक्षण.**—मराठींत अकारान्त शब्द शेंकडों नव्हे, तर हजारों असतां असा नियम घालणारानें कसा घातला, याचें राहून राहून आश्चर्य वाटतें. कदाचित् 'अकारान्ताशिवाय' असें म्हणण्याचा त्यांचा उद्देश असेल. त्याप्रमाणें नियमांत इतकी भर घातली, तरी ऱ्हस्व इकारांत व ऱ्हस्व उकारान्त तत्सम संस्कृत शब्द प्रचलित मराठींत अनेक असल्यामुळें नियमाची सत्यता प्रत्ययास येत नाहीं. तेव्हां तत्सम संस्कृत शब्द वर्ज करून बाकीचे म्हणजे निवळ मराठी शब्द अ शिवाय इतर ऱ्हस्वस्वरान्त नाहींत असा कर्त्यांचा आशय असावा, असें जरी घेऊन चालल, तरी हा नियम त्याज्यच होय. आणि परंतु, किंतु, हुतुतु, हे गद्यांत आणि करुनि, करोनि, अशीं पूर्वकालवाचकें म्हणजे ऊनक्दन्तें पद्यांत अनेक आढळतात. तेव्हां प्रकृत नियमाच्या सुधारून वाढविलेल्या जरी आवृत्त्यांवर आवृत्त्या काढिल्या तरी तो केवळ टाकाऊच होय, हें उघड आहे.

**नियम ६.**—आरंभीचा अ कधींच अनुच्चरित नसतो.

**परीक्षण.**—मराठींत कोणताच स्वर कोठेंही अनुच्चारित नसतो. अनुच्चरित म्हणजे अपूर्णोच्चरित असें समजलें, तर नियम खरा आहे.

**नियम ७.**—अन्त्य अ सदोदित अनुच्चरित असतो. (अन्त्याक्षर जोडाक्षर असल्यास तेथें हा नियम लागू नाहीं.)

परीक्षण.—प्रथम अनुच्चरित हा शब्द अस्थानीं आहे. त्याचे जागीं अपूर्णाच्चरित असें म्हटलें पाहिजे. या नियमास पुढील कंसांत एक अपवाद सांगितला आहे. परंतु त्यास आणखी अपवाद आहेत. ते पूर्वी अंक ५१ मध्यें सांगितले आहेत, तेथें पहावे.

नियम ८—दीर्घ अक्षर आरंभीं, मध्यें, किंवा शेवटीं, कोठेंही असो, तें कधींच अनुच्चरित नसतें.

परीक्षण.—या नियमाचा उद्देश नीटसा समजत नाहीं. अकारान्ताशिवाय इतर सर्व ऱ्हस्व अक्षरें हीं आरंभीं, मध्यें, व शेवटीं कधींच अनुच्चरित नसतात. फक्त अ हा स्वर तेवढा कधीं कधीं अंतीं व कधीं कधीं मध्यें अपूर्णोच्चरित असतो; परंतु आरंभीं तोसुद्धां कधींहि अपूर्णोच्चरित नसतो (नियम ६ पहा); आणि कोणतेंच अक्षर किंवा कोणताच स्वर कोठेंही, कधींही अनुच्चरित नसतो. तेव्हां दीर्घ अक्षराबद्दलच हा नियम सांगण्यांत काय मतलब?

नियम. ९—जेव्हां दोन अक्षरें दीर्घ असतात, तेव्हां त्यांपैकीं एक उच्चारामध्यें जरासें आंखुड होतें.

परीक्षण.—या नियमाचा नीट अर्थ लागावा म्हणून त्यांत प्रथम कांहीं शब्दांची भर घालणें अवश्य आहे. नाहीं तर कांहींच अर्थ लागत नाहीं. 'दोन अक्षरें दीर्घ असतात' म्हणजे काय? कोणतीं दोन अक्षरें? तेव्हां 'लागोपाठचीं' या अर्थाचे शब्द अध्याहृत समजले पाहिजेत. तसेंच 'त्यांपैकीं एक ......इ०' येथें कोणतें, म्हणजे पहिलें कीं दुसरें हें स्पष्ट नाहीं. तेव्हां एक म्हणजे पहिलें असा बहुधा अर्थ असावा असें वाटतें. एवंच, नियमाची भाषा प्रथम किती अपूर्ण व सदोष आहे! पण ह्या सुधारणा केल्या तरी नियमाची उपपत्ति लागत नाहीं. वारा, गारा, होतो, येते, मारवा, इत्यादि शब्दांत आधोंचें दीर्घ अक्षर किंवा नंतरचें दीर्घ अक्षर उच्चारांत जरासें कां आंखुड व्हावें हें समजत नाहीं, आणि तें होतें असेंही दिसत नाहीं.

नियम १०.—अन्त्य दीर्घ स्वराचा पूर्ण उच्चार कधींच होत नाहीं.

परीक्षण.—ह्या नियमाचें कारण अगम्य असून त्याची सत्यताही कोठेंच प्रत्ययास येत नाहीं. विडा, खारा, फटका, मागणी, उलगडा, सुधारणा, इ० द्व्यक्षरी, त्र्यक्षरी, चतुरक्षरी किंवा पंचाक्षरी, वाटतील ते दीर्घस्वरान्त शब्द घेऊन पहा; प्रस्तुत नियम केवळ भ्रममूलक दिसतो.

नियम ११.—अन्त्य अचे पाठीमागें दीर्घ स्वर येणें बरें, अथवा इष्टत्वानें दीर्घ स्वर येतो.

परीक्षण.—हा नियय जरासा संदिग्ध आहे. म्हणजे 'दीर्घ स्वर येतो' कीं, 'जो मागें स्वर येतो त्यास दीर्घ म्हणावें' ह्यापैकीं कर्त्याचे मनांत कोणता

अर्थ आहे हें स्पष्ट होत नाहीं. शिवाय या नियमांत भाषेची वस्तुस्थिति न सांगतां 'दीर्घ स्वर येणें बरें' या शब्दांनीं भाषेस बंधन घालण्याचा किंवा नवीन वळण लावण्याचा प्रयत्न केला आहे असें दिसतें. शिव, सुत, गृह, इ० तत्सम संस्कृत शब्द मराठींत शीव, सूत, गृह असे लिहावे असा कर्त्याचा आशय आहे काय? असेल तर तो विचित्रच समजावयाचा. बरें तो योग्य आहे असें जरी घेऊन चाललें, तरी फळ, घर, कमळ, इ० शब्दांची वाट काय? ह्यांतील अन्त्य अचे पाठीमागें ऱ्हस्व स्वर नाहीं काय? अथवा त्यासही दीर्घ करून ते शब्द फाळ, घार, कम्मळ असे लिहावयाचे व उच्चारावयाचे कीं काय? तेव्हां निदान या प्रकारच्या शब्दांसंबंधानें तरी प्रकृत नियम खोटा किंवा अनिष्ट आहे, असें म्हटलेंच पाहिजे हें उघड आहे.

नियम १२.—अन्त्य अक्षर एक तर दीर्घ असलें पाहिजे, नाहीं तर अनुच्चरित अकारान्त पाहिजे.

परीक्षण.—प्रथम 'अनुच्चरित' ह्या शब्दाचे जागीं 'अपूर्णोच्चरित' असें पाहिजे. दुसरें, अंग, कंठ, रंक, लख्ख, गर्क, इ० अंक ५१ मध्यें किंवा वरील नियम ७ चे परीक्षणांत निर्दिष्ट केलेले अपवाद लक्षांत घेतले पाहिजेत; तेव्हां उत्तरभाग खरा ठरेल आणि पूर्वभागामध्यें 'तत्सम संस्कृत शब्दांशिवाय अन्यत्र' अशा शब्दांची भर घातली पाहिजे हें उघड आहे. पण तितक्यानें भागत नाहीं. ती भर घातली किंवा अध्याहृत आहे असें समजलें, तरी नियम अनपवादक होत नाहीं. आणि, परंतु, दुतुतु, इ० नियम ५ चे परीक्षणांत निर्दिष्ट केलेले थोडेसे शब्द त्यास अपवादक आहेत हें उघड आहे. शिवाय सबंध नियमास बरेच अपवाद आहेत. अकारान्ताचे वर दिलेले अपवाद सोडले तरी व, ढ, च, इ० एकाक्षरी अकारान्त शब्दांची वाट काय?

जोराच्या संबंधानें देण्यांत आलेल्या नियमांचें परीक्षण येथें संपलें. या परीक्षणावरून आणि यापूर्वी दिलेल्या या विषयाचे यथार्थ विवेचनावरून काय निष्पन्न होतें तें भाषाकोविदांनीं ठरवावें. आमच्या मतें इंग्रजींतल्याप्रमाणें शब्दांतला विशेष जोर म्हणजे accent संस्कृतांत व मराठींतही स्पष्टपणें कोठेंच दृष्टीस पडत नाहीं. फक्त अन्त्य अच्या अर्धवट उच्चारानें मागल्या म्हणजे उपान्त्य अक्षराचा लांबट, व मधल्या अच्या अर्धवट उच्चारानें त्याच्या मागल्या अक्षराचा पुढें जोडाक्षर आल्यासारखा किंचित् साघाच उच्चार होतो इतकेंच. ह्या उपान्त्याचे ताणास व इतराचे धक्क्यास वाटेल तर मराठींतला accent म्हणजे जोर म्हणावें. ह्याशिवाय मराठींत accent नाहीं, आणि हा जो कांहीं अल्पांशानें आहे असें म्हटलें असतां चालेल, तो केवळ अर्धवट अचे संबंधानें व जोडाक्षरांचे संबंधानें येत असल्यामुळें त्याचे नियम वर सांगितल्याप्रमाणें अगदीं साधे व सरळ आहेत.]

५७ **च् ज् झ्** ह्यांचा मूळ उच्चार तालव्य होय. परंतु मराठींत त्यांचा आणखी दन्ततालव्य उच्चार होतो, हें पूर्वीं स्थानविचारांत (अंक २४ टीप २) सांगितलेंच आहे. 'या वर्णांचा दन्ततालव्य उच्चार असतां त्यांच्या वरल्या रेघेच्या डावेकडेस एक बिंदु देण्याचा कोठें परिपाठ आहे' असें दादोबा म्हणतात, परंतु हा परिपाठ सर्वस्वी नाहींसा झाला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

५८ **च्, ज्, झ्** ह्यांच्या तालव्य व दन्ततालव्य उच्चारांचे सर्वसाधारण नियम देणें दुर्घटच आहे. त्यांतल्या त्यांत त्यांच्या संबंधाच्या ज्या साधारण गोष्टी दिसतात त्या अशाः—

(अ) शुद्ध संस्कृत शब्दांत **च्, ज्, झ्,** ह्यांचा तालव्य उच्चार होतो जसें—चंद्र, चक्र, जन, जंतु, झंझावात, इ०.

(आ) **च्, ज्, झ्,** ह्यांचेपुढें **इ, ई** हे स्वर आले असतां, किंवा **य्** हें व्यंजन् पुढें येऊन ह्यांचा त्यांच्याशीं संयोग झाला असतां, निवळ मराठी शब्दांतही **च्, ज्, झ्,** ह्यांचा तालव्य उच्चार होतो. उदाहरणः— चिकण, चिखल, चीर, जितका, झिजणें, झींण, त्याची, चंची, जी, हांजी, माझी तिच्या, ज्याला, माझ्या इ० परंतु त्याचा, माझा, माझें, इ० ठिकाणीं दन्ततालव्यच उच्चार दिसतो.

(इ) शब्दाच्या आरंभीं **चे, जे, झे,** हीं अक्षरें आलीं असतां, म्हणजे शब्दाचे आरंभी **च्, ज्, झ्,** हे वर्ण एकारान्त आले असतां, त्यांचा उच्चार तालव्य होतो. उदा०:- चेला, चेव, जेवण, झेला, इ०.

**अपवाद १.**—**जे** नें आरंभ होणाऱ्या कांहीं शब्दांत **ज्** ह्याचा उच्चार तालव्य व दन्ततालव्य असा दोन्ही प्रकारचा आढळतो. त्यांत तालव्याचा प्रचार देशावर व दन्ततालव्याचा कोंकणांत फार. उदा०:- जेथें, जेव्हां, जेवढा, इ०.

**अपवाद २.**—एकाक्षरी एकारान्त शब्दांत ज ह्याचा उच्चार सदोदीत दन्ततालव्य होतो. जसें:—जे ( जो ह्याचें अ. व. ), जें.

(ई) **चे, झे** ह्या षष्ठीच्या प्रत्ययांचा कोंकणस्थांत दंततालव्य आणि देशस्थांत क्वचित् तालव्य उच्चार होतो. उदा०:—त्याचे आईबाप, माझे कपडे, इ० ठिकाणच्या त्याचे, माझे, ह्या शब्दांतील दुसऱ्या

अक्षराच्या कांहीं देशस्थांच्या उच्चाराकडे सूक्ष्म नजर दिली म्हणजे वरील फरक कळल.

[ ह्या नियमांत निर्दिष्ट झालेल्या स्थळांशिवाय अन्यत्र च्, ज्, झ्, ह्यांचा उच्चार कसा होतो, ह्याबद्दल नियम देतां येत नाहींत. तो उच्चार अन्यत्र प्रत्येक ठिकाणीं केवळ प्रचारानेंच समजावयाचा. कांहीं वैयाकरणांनीं आणखी एक दोन नियम दिले आहेत, आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, गुंजीकरांसारख्या व्यापक व शास्त्रीय दृष्टीच्या शोधक टीकाकारांनीं व वैयाकरणांनीं त्यांचा केवळ अंधपणें स्वीकार केला आहे. परंतु ज्या नियमांस फारच अपवाद असतात आणि त्या अपवादांसंबंधाचा नियम देतां येत नाहीं, किंवा सर्व अपवादांची यादी देणेंही त्रासदायक होतें, ते नियम कसचे? वास्तविक म्हटलें असतां त्यांचा शास्त्रीय ग्रंथांत समावेश करणें म्हणजे शास्त्रीय विवेचनाचें किंवा शास्त्ररचनेचें अज्ञान प्रगट करणें होय. उदाहरणार्थः—कांहींकांचे मतें चे, जे, झे, हे शब्दांचे मध्यें किंवा अन्तीं असतां त्यांतील च्, ज्, झ्, ह्यांचा उच्चार दन्ततालव्य होतो. हा त्यांचा नियम त्यांनीं दिलेल्या रजेवर, टांचेशीं, आमचें, माझें, या शब्दांत खरा दिसतो. परंतु पंचेचाळीस, उंचेला, मजेनें, उजेड, तजेला. इ० शब्दांची वाट काय? शिवाय ' यांत ए असतां देश आणि कोंकण यांपरत्वें विकल्पें दन्ततालव्य उच्चार होतो ' असा एक नियम दुसरे वैयाकरण देतात, तेव्हां या दोन्ही नियमांचा मेळ बसत नाहीं. यांपैकीं पहिला अपूर्ण किंवा दुसरा चुकीचा असला पाहिजे. तेव्हां, आपल्यापुढें जीं उदाहरणें आलीं, तेवढ्याच उदाहरणांवरून जो नियम दिसला, तोच अनपवादक समजून उतावीळपणें ठाम ठोकून देण्यांत आला असावा असें वाटतें. मूळ मुद्याचा विचार विस्तृत दृष्टीनें करण्यांत आला नाहीं. या प्रकारच्या उतावळेपणानें केलेल्या नियमांस न्यायशास्त्रांत ' अवलोकनात्मक विगमनें ' हें यथार्थ नांव आहे. आपल्या कोत्या अवलोकनांत जी गोष्ट सार्वत्रिक दिसते, ती त्या अवलोकनाचे मर्यादेबाहेरही तशीच आहे, असें समजून जें विगमन करण्यांत येतें म्हणजे जो सामान्य सिद्धान्त स्थापित करण्यांत येतो, त्यास अवलोकनात्मक विगमन असें म्हणतात. हें वास्तविक शास्त्रशुद्ध विगमन नव्हे. ह्या अवलोकनात्मक विगमनाचें प्रस्तुत विषयासंबंधाचें आणखी एक ढळढळीत उदाहरण पहा. ' च्, ज्, झ्, ह्यापुढें इतर स्वर (इ, ई व ए, हे त्यांच्या पूर्वीच्या नियमांत येऊन गेलेले शिवाय करून बाकीचे) असतां दन्ततालव्य उच्चार होतो. उदा०:—चढाव, चूक, चूल, चाल, चोर, जोर, जूग, चौरंग, इ०. ' या नियमांत दिलेल्या उदाहरणांवरून नियम सर्वस्वी सत्य आहे, असें कोत्या दृष्टीचे वाचकास वाटलें तर त्यांत नवल नाहीं. परंतु त्याच गृहस्थाचे अवलोकनाची मर्यादा वाढविली आणि—चरबी, चंगळ, चंडोल, जंगी, जंत, चार (संख्या)

वाचक ), चाळीस, जाठ, जादु, चुप, आचंबा, आचारी, आजोळ, कचोळें, कंजूष, कुचाळी, गचांडी, गांजा, बोजा, इजा, विजा, तिजा, इ०—असे अनेक शब्द त्याचे नजरेस पाडिले, तर त्याचें त्यालाच आपल्या संकुचित दृष्टीचें आश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाहीं. एवंच, असले नियम हे वास्तविक नियमच नव्हत, म्हणून त्यांस शास्त्रीय ग्रंथांत थारा मिळतां कामा नये. ]

[ ड या वर्णाचे दोन उच्चार सांगण्याचा दादोबांचेपासून प्रघात पडला आहे. दादोबा म्हणतातः–' ह्या वर्ण शब्दाचे आरंभीं असतां त्याचा उच्चार शुद्ध ड सारखा होतो; परंतु शब्दांचेमध्यें, अथवा शेवटीं असला तर, शुद्ध ड उच्चारते वेळेस जितकी जीभ टाळ्यावर दाबावी लागते तितकी न दाबतां मध्येंच किंचित् पसरावी लागते; डाग आणि बडबड अथवा भडाभडा या दोहों शब्दांत डचा उच्चार सारखा नाहीं. ' ' या उच्चारणाविषयीं कित्येकांस संशय आहे. ' ' परंतु मराठी शब्दांत शेवटल्या व मधल्या डच्या उच्चारांत आणि आद्य डच्या उच्चारांत किंचित् फेर असतो यांत संशय नाहीं. गडबड, भडबड्या यांत आणि डाग, डुकर यांत डच्या उच्चारणांत कांहीं फेर आहे, याविषयीं मला तर अगदींच संशय वाटत नाहीं. ' या नियमास दादोबा एक अपवाद सांगतात; तो असाः-' शेवटीं द्वित्त ड असला, अथवा उपान्त्य वर्ण जर अनुनासिक असला, तर डच्या शुद्ध उच्चारांत कांहीं फेर पडत नाहीं. जसें—अड्डा, सांड, इ०. '

दादोबांनीं ' ड या वर्णाचा ' असें म्हटलें आहे. गोडबोले यांनीं नुसतें ' डचा ' असें म्हटलें आहे. कृष्णशास्त्री चिपळूणकर आपल्या व्याकरणावरील निबंधांत लिहितातः— ' डकाराचाही उच्चार दोन प्रकारचा आहे. ..............डफ, डाग, सांड, खांड, इत्यादि पहिल्या प्रकारचीं उदाहरणें होत; व पाड, खाडी, कडे, खडा, इत्यादि दुसऱ्या प्रकारचीं उदाहरणें होत. ' जोशीबोवांनीं या उच्चारासंबंधानें मुग्धता पतकरलेली आहे. मग त्यांचें मत काय असेल तें असो. खेरांनीं ' ड् या व्यंजनाचा ' असें साफ म्हटलें आहे. अशा स्थितींत प्रथम कशाचा उच्चार दोन प्रकारचा होतो हें निःसंशय समजत नाहीं. ' ड या वर्णाचा ' म्हणजे ' ड् या व्यंजनाचा ' असा अर्थ दिसतो, अकारान्त ड या अक्षराचा नव्हे; आणि दादोबांचे उदाहरणांवरून तोच अर्थ दिसतो; आणि इतरांचे उदाहरणांवरूनही तोच अर्थ दिसतो. आणि खेरांनीं तर साफ ' ड् या व्यंजनाचा ' असें स्पष्ट म्हटलेंच आहे, तेव्हां तोच अर्थ स्वीकारून चालावें हें बरें.

आतां दादोबांनीं अकारान्ताशिवाय फक्त आकारान्ताचें ' भडभडा ' असें एकच उदाहरण घेतलें आहे. चिपळूणकरांनीं खाडी, कडे अशीं ईकारान्त व एकारान्त दोन उदाहरणें आणखी जास्त दिलीं आहेत. परंतु जोशीबोवा व खेर यांस जरी बाजूस ठेविलें तरी दादोबा, गोडबोले, व चिपळूणकर ह्या विद्वान

त्रयीचें ज्या मुद्यासंबंधानें एकमत दिसतें, त्या मुद्यावर विरुद्ध पक्षीं एक चकारही काढणें धाडसाचेंच होय असें पुष्कळांप्रमाणें प्रस्तुत लेखकासही वाटत आहे. तथापि सत्यास कोणाचीही भीडमर्यादा नसते. त्यामुळें ते या लेखकास मागून पुढें ढकलित आहे, व प्रस्तुत स्थळींच्या सत्याचें आविष्करण व त्याचें शास्त्रीय विवेचन करण्यास प्रवृत्त करीत आहे. डाग, डीक, डूल, डेरा, डोलणें, इ० शब्दांतील आद्य अक्षराचा उच्चार, व घोडा, गाडी, गड्डू, कडे, पडो, इ० शब्दांतील अन्त्याक्षराचा उच्चार यांत आम्हांस तर यत्किंचितही फरक दिसत नाहीं. परंतु डकणें, डचमळणें, इ० शब्दांतील आद्य डचा उच्चार व गडबड, बडबड, इ० शब्दांतील मधल्या व अन्त्य डचा उच्चार यांत दादोबादिकांनीं सांगितलेला फरक यथार्थ आहे. डकणें या शब्दांतील ड उच्चारितांना 'जितकी जीभ टाळ्यावर दाबावी लागते तितकी' गडबड शब्दांतील ड उच्चारितांना 'न दाबतां मध्येंच किंचित् पसरावी लागते' हें अक्षरशः खरें आहे. तसेंच 'शेवटीं द्वित्त ड असला अथवा उपान्त्य वर्ण जर अनुनासिक असला तर डच्या शुद्ध उच्चारांत कांहीं फेर पडत नाहीं' असा जो एक अपवाद दादोबांनीं सांगितला आहे, त्यामध्यें 'अनुनासिक' ह्याचे जागीं 'सानुस्वार' असा शोध केला म्हणजे अपवादही खरा ठरतो. कांड, दांड, सांड, ह्या शब्दांतील बिंदूचा उच्चार कोंकणस्थांप्रमाणें फक्त अनुनासिक केल्यास अन्त्य डचा उच्चार दादोबांचे नियमाप्रमाणेंच होतो; परंतु देशस्थांप्रमाणें 'सानुस्वार' केल्यास नियमास अपवादक होतो हें सूक्ष्म निरीक्षणांतीं ध्यानांत येईल. हीच गोष्ट, ज्या शब्दांत बिंदूचा उच्चार केवळ सानुस्वार असतो त्या शब्दांतील डचा उच्चार नियमास स्पष्टपणें अपवादक आहे, या वरून समजेल. दंड, खिंड, शुंड, मंडप, इ० उदाहरणांमध्यें बिंदूचा उच्चार सानुस्वार आहे, व त्याचे पुढील डचा उच्चार 'शुद्ध' होतो हें स्पष्टच आहे. मंडप या उदाहरणावरून एक गोष्ट सुचते. ती अशीः—दादोबांनीं अपवाद जो सांगितला आहे तो अन्त्य डचे संबंधानेंच सांगितला आहे. परंतु मंडप या उदाहरणावरून मधल्या डचे उच्चाराचा नियमही निरपवाद नाहीं असें आढळेल. शिवाय, सडक, पडत, खडक, इ० शब्दांतीलही मधल्या डचा उच्चार दादोबादिक जसा म्हणतात तसा होत नाहीं, तर 'शुद्ध' होतो. नियम व अपवाद ह्यांचे सदरहू परीक्षणावरून असें दिसून येईल कीं, अपवादांत अनुनासिकाचे जागीं 'सानुस्वार' हा शब्द पाहिजे; आणि नियमामध्यें अकारान्त डचा, म्हणजे ड् या व्यंजनाचा नव्हे तर ड या अक्षराचा, असें म्हटलें पाहिजे. आणि अपवादामध्यें वर सांगितलेली सुधारणा करून अन्त्य डचे उच्चाराचा नियम जरी खरा म्हटला तरी मधल्या डच्या उच्चाराचा नियम दादोबादिक म्हणतात त्याप्रमाणें निरपवादक नाहीं, हें मंडप, मंडळ, सडक, खडक, इत्यादि उदाहरणांवरून उघडच आहे.

'तुम्ही म्हणता तें खरें. परंतु डचे दोन उच्चार होतात ह्या दादोबांचे विधानास तुमची कोणतीच हरकत नाहीं. त्यांचा नियम व अपवाद शास्त्रीय-दृष्ट्या जितक्या तंतोतंतपणें सांगावयास पाहिजे होता, तितक्या तंतोतंतपणें तो सांगितलेला नाहीं इतकाच तुमच्या म्हणण्याचा रोंख दिसतो. बाकी मुख्य विधानास कांहीं तुमची हरकत दिसत नाहीं. यामुळें त्यांचे नियमांत व अपवादांत फक्त योग्य सुधारणा केली म्हणजे झालें' असें जर कोणी वरील विवेचन वाचून म्हणाला, तर त्याच्या म्हणण्यापैकीं बराच भाग आम्हांस मान्य आहे. कारण कीं, डा, डी, डु, डे, डो, इ० इतर स्वरान्त ड् या व्यंजनाचा दोन प्रकारचा उच्चार होतो. नाहीं तर फक्त आकारान्त ड् ह्या व्यंजनाचाच म्हणजे ड या अक्षराचाच होतो. शिवाय, दोन प्रकारचा डचा उच्चार जरी मानला तरी त्या संबंधाचे वेगळे नियम व अपवाद देण्याची जरूर नाहीं, असें व्यापक शास्त्रीय दृष्टीस म्हणावें लागतें. कारण उघडच आहे कीं, हा जो दोन प्रकारचा उच्चार सांगितला, तो केवळ डचाच होतो असें नसून सर्व मूर्धन्य अकारान्त व्यंजनांचा होतो असें विस्तृत अवलोकनांतीं आढळतें. फट, फटकन, वाढ, काढणें, मार मारका, इत्यादि शब्दांतील ट, ढ, र, ह्या अक्षरांचा उच्चार ही टक, ढवळा, रडका, इत्यादि शब्दांतील आद्याक्षराचे उच्चाराहून किंचित् भिन्न आहे. आणि अशीच दृष्टि अधिक विस्तृत केली म्हणजे असें दिसून येईल कीं, प्रत्येक व्यंजनाच्या अकारान्त उच्चारांत ह्याप्रमाणें आरंभीं व अंतीं थोडासा फरक पडतो. असें जरी आहे तरी त्यासंबंधाचे नियम देण्याची जरूर नाहीं. अ शिवाय इतर स्वरान्त व्यंजनांचे उच्चारांत असा फरक पडत नाहीं, म्हणजे तो अकारान्त व्यंजनांचे उच्चारांतच पडतो, आणि तो फरक वास्तविक व्यंजनांचे उच्चरांतला नसून अ ह्या स्वराचे उच्चारांतला आहे. पूर्वीं असें सांगितलेंच आहे कीं, फक्त अ ह्या स्वराचा, बेताच्या वाजवी उच्चाराशिवाय, मराठीमध्यें एक अर्धवट कोता, किंवा अपूर्ण उच्चार होतो. अचा हा जो अर्धवट उच्चार होतो त्याचे योगानेंच तो ज्या व्यंजनाचे अंतीं असतो त्या व्यंजनाचे उच्चारांत थोडासा फरक पडणें साहाजिक आहे. एवंच, अच्या अर्धवट उच्चाराचे जे सविस्तर नियम वर दिले आहेत त्यांमध्येंच या नियमांचा अन्तर्भाव होतो, असें सूक्ष्म व व्यापक शास्त्रीय दृष्टीस कळल्यावांचून राहणार नाहीं.

सारांश, दादोबादिकांचा नियम व अपवाद दोन्ही कांहीं अंशीं अतिव्याप्त, अपूर्ण, व असत्य आहेत; आणि त्यांत जें अल्प सत्य आहे तें डप्रमाणेंच इतर अकारान्त सर्व व्यंजनांसही लागू पडतें, आणि तें सत्य वास्तवीक म्हटलें असतां व्यंजनाचे उच्चाराविषयीं नसून त्यांत मिळालेल्या अ ह्या स्वराचे उच्चारा-संबंधाचे होय; आणि यामुळेंच अ ह्या स्वराचे उच्चाराबद्दल विस्तृत नियम

दिल्यानंतर त्यांतच ह्या नियमाचा अन्तर्भाव होत असल्यामुळें ( अंक ५१-अ पहा ) तो वेगळा सांगण्याची जरूर नाहीं. ह्या सर्व गोष्टी वरील विस्तृत विवेचनावरून वाचकांच्या पूर्णपणें ध्यानांत येतील अशी आशा आहे. ]

अखेरीस सयुंक्त व्यंजनाचा उच्चारासंबंधाच्या विशेष गोष्टी सांगून ह्या उच्चाराध्याय संपावितों.

५९. सयुंक्त व्यंजनाचे उच्चार त्यांत मिळालेल्या व्यंजनांच्या उच्चाराचे मिलाफानें होतो; पण तो होतांना संयुक्त व्यंजनाचे मागें अक्षर असल्यास त्यास पुढील संयुक्ताचे उच्चाराचा एक प्रकारचा धक्का बसतो. ह्यामुळेंच ' संयोग ऱ्हस्वास गुरुत्व देतो ' असा नियम ठरला आहे हा नियम संस्कृत भाषेंत अगदीं निरपवादक आहे. परंतु निवळ मराठी भाषेंत ह्यास अनेक अपवाद आढळतात.

६०. निवळ मराठी शब्दांत खालील स्थळीं संयुक्त अक्षराचे उच्चाराचा मागल्या अक्षरास धक्का बसत नाहीं.

( अ ) आम्ही, तुम्ही या शब्दांत व त्यांचे विभक्त्यन्त रूपांतही म्ह् ह्या संयुक्त व्यंजनाचे उच्चाराचा, मागल्या अक्षरास विकल्पानें आघात बसतो हो गोष्ट कवितेंत स्पष्ट होते. कारण कीं, जेव्हां अघात बसत नाहीं तेव्हां मागील ऱ्हस्व अक्षर ऱ्हस्वच राहतें. पुढील उदाहरणें पहाः—

मजकरवीं न तुम्ही बुध गुरुमर्यादातिपात करवा हो
सत्पात्रीं स्वधनातें चिंतामणि कण्वतातकर वाहो ॥——मोरोपंत.

श्रोते हो बहुभाषणें त्यजुनियां काव्यासि या भूषणें
**तुम्ही** तों निजभूषणें निजकृपे-दृष्टीं मला पोषण
कृष्णार्थासि न कर्षणें वदविलें हें काव्य संकर्षणें
ह्या काव्या अति तोषणें बहुत मी संतृप्त संभाषणें ॥——अनंतकवि.

देतों माग न **आम्ही** कोणीहि कधीं सकाम हाकविला ॥—मोरोपंत.
प्रार्थिलें **आम्ही** बालकोत्तमा, देइं सोडुनी या तुरंगमा—अनंतकवि

( अ ) पुन्हा, तिऱ्हाईत. तऱ्हा, कुऱ्हाड, वऱ्हाड, कऱ्हाड इ० ज्या मराठी शब्दांतील जोडाक्षरांत दुसरें व्यंजन ह् आहे त्या जोडाक्षराचे उच्चाराचा मागल्या अक्षरास धक्का बसत नाहीं.

( इ ) जेव्हां, तेव्हां, केव्हां, नव्हे, अव्हेर, इ० शब्दांतील संयुक्ताक्षराचा मागल्या अक्षरावर विकल्पानें आघात येतो. तथापि ' नव्हे ' हा शब्द शिवाय करून बाकीच्या शब्दांत साघात उच्चारच फार प्रचलित असून तोच शिष्ट समजला जातो.

हें काय उचित तुजला साधु न कोणासिही **अव्हेरीती**
अभिमानें स्वतपःक्षय केला कीं हे बरी **नव्हे** रीती ॥—मोरोपंत.

( ई) ' **या** ' प्रत्ययांन्त साधित शब्दांमध्यें अन्त्य जोडाक्षराचे उच्चाराचा मागल्या अक्षरास धक्का बसत नाहीं. उदा०:—बश्या, पोश्या, रड्या उचल्या, हुम्या, घुम्या, भुल्या, उम्या, अडल्या, खमक्या, उठल्या, बसल्या, घाबऱ्या घाबऱ्या, इ०

टीपः— उद्यां ह्या शब्दांतील प्रथमाक्षर निराघातच आहे.

**अपवाद्**—अठ्या, सत्या, ( इस्पिकें किंवा पत्ते या खेळांतील विशिष्ट पत्ते ) पठ्या.

( उ ) सविभक्तिक व सशब्दयोगिक शब्दांचे सामन्यरूपामध्यें जेथें जेथें जोडाक्षर होतें, तेथें तेथें त्या जोडाक्षराचे उच्चाराचा मागल्या अक्षरावर आघात येत नाहीं. उदा० घोड्यास, तळ्यांचा, दुसऱ्यास, तिसऱ्यास, माऱ्याची, काठ्यांनीं, भाकऱ्यांत, नव्यास ( नवें शब्दाची चतुर्थी ), जुन्यास, बोलण्याचा, म्हटल्यास, पडत्या, बोलक्या, गड्याकडून माळ्यावर, जिन्याखालीं, इत्यादि.

टीप १.—यावरून एक गोष्ट ध्यानांत ठेवावयाची; ती अशीः—र्–ला य् जोडून होणाऱ्या संयोगाचा मागल्या अक्षरावर उच्चारामध्यें आघात येत नसेल तर तें संयुक्त व्यंजन ऱ्य् असें लिहितात; आणि येत असेल तर र्य् असें लिहितात. उदाहरण—कातऱ्याची, साताऱ्यास, इ०. परंतु कार्य, धार्य, पर्यंत, इ०.

टीप २.—हा नियम तत्सम संस्कृत शब्द मराठींत चालतांना त्यांसही लागतो. जसेंः—नद्यांस, सख्यांस, सत्यांस ( सती शब्दाची चतुर्थी ), इ०. पुणें, लावणी, इ० शब्दांचीं विभक्तींचीं रूपें पुण्यास, लावण्यांत, अशीं, म्हणजे जोडाक्षराचे मागील अक्षर निराघात राहूनच होतात. परंतु पुण्य, लावण्य, इ० जोडाक्षरान्त शब्दांचे रूपांत—पुण्यास, लावण्यांत -- जोडाक्षराचे मागल्या अक्षरास आघात बसतो. तरी हीं रूपें प्रकृत नियमास अपवादक नाहींत. कारण उघडच आहे कीं, पुण्यास ( पुण्य शब्दाची चतुर्थी ) लावण्यांत ( लावण्य शब्दाची सप्तमी ), इ० शब्दांतील जोडाक्षराचे मागलें साघात अक्षर,

पुण्य व लावण्य या मूळ शब्दांतच साघात आहे; आणि दिलेला नियम केवळ सामान्यरूपामध्यें होणाऱ्या जोडाक्षरासंबंधाचा आहे हें विसरतां कामा नये.

( ऊ ) प्रतिपदिकांचे अनेकवचनांतही येणारें जोडाक्षर मागल्या अक्षरास उच्चारामध्यें धक्का देत नाहीं. उदा:—सत्या. ( सती शब्दाचें अनेकवचन ) नद्या, पेट्या, मिऱ्यें, मोत्यें, म्हणाल्या, बोलल्या, इ.

**अपवाद**--( उ ) आणि ( ऊ या नियमांस एक अपवाद आहे. जेव्हां सामान्यरूप किंवा अनेकवचन ह्यांमधील जोडाक्षरांतलें अन्त्य व्यंजन व् असतें, तेव्हां त्या जोडाक्षराचा मागील अक्षरावर आघात येतो जसें:--विंच्वास, लाड्वास, सास्वेनें, पिस्वेस, तार्वास, गळ्वाचें, जळ्वा, बाज्वा, अस्वें, इ०

टीप:--या अपवादास एक प्रत्यपवाद दिसतो. गहूं शब्द चालतांना ( गव्हास, गव्हानें इ० ) त्याचे सामान्यरूपांत जें जोडाक्षर होतें त्यांत तात्विक दृष्ट्या व् हें व्यंजन अन्तीं आहे. तेव्हां त्या जोडाक्षराचा अपवादाचे नियमाप्रमाणें मागल्या अक्षरावर आघात यावयास पाहिजे, पण तो येत नाहीं. तेव्हां त्यास वास्तविक प्रत्यपवाद म्हणजे अपवादाचा अपवाद असें म्हटलें पाहिजे. परंतु ह् या व्यंजनाच्या पुढें जें अक्षर जोडावयाचें, तें त्याच्या मागेंच लिहिण्याची जी अज्ञानमूलक चाल मराठींत पडली आहे म्हणून पूर्वीं सांगितलें [ अंक ४० ( ऊ ) टीप पहा ] त्या चालीप्रमाणें गव्हाचे सामान्यरूपांतील जोडाक्षराच्या अंतीं लिपीमध्यें व् हें व्यंजन खास नाहीं; आणि उच्चारही लिपीप्रमाणेंच करण्याचा प्रचार दिसत असल्यासमुळें गव्हाचे सामान्यरूपांतील जोडाक्षरास प्रत्यपवाद म्हणण्याची जरूर नाहीं.

( ऋ ) धातूंच्या आख्यातरूपांमध्यें सुद्धां कधीं कधीं जें जोडाक्षर येतें त्याच्या मागलें अक्षर उच्चारांत निराघातच राहतें. उदा :--करत्यें, बोलत्ये, लिहित्ये, पडल्या, कराव्या, असाव्या, हव्या, हव्यास, ०

**अपवाद** १.—खाल्ला, खाल्ली, खाल्लें, ० खा धातूचे भूतकाळाच्या रूपांत आघात आहे.

**अपवाद** २.--जुन्या कवितेंतील भूतकाळाच्या कांहीं रूपांमध्यें जोडाक्षराचे मागील अक्षर साघात असतें. जसें: —धाविन्नला, हसिन्नला, गर्जिन्नले, इ०

**अपवाद** ३.—दिल्हें, नव्हे, ह्या रूपांतील उपान्त्याक्षरास अन्त्य जोडाक्षराचा विकल्पानें धक्का बसतो.

# उच्चार

सूचनाः--या प्रकरणीं एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ती अशीः - जोडाक्षरामागलि अक्षर जेव्हां स्वतः दीर्घ असतें, तेव्हां पुढील जोडाक्षराचा त्यास धक्का बसला काय न बसला काय त्यांत छंदःशास्त्रदृष्ट्या फारसा फरक पडत नाहीं. परंतु जोडाक्षराचे मागील अक्षर स्वतः ऱ्हस्व असतां पुढील जोडाक्षराचे धक्क्यानें ऱ्हस्वास छन्दःशास्त्रांत गुरुत्व येतें; आणि पुढील जोडाक्षराचा मागील ऱ्हस्वास धक्का बसत नसला तर त्या ऱ्हस्वास गुरुत्व येत नाहीं. हा मुद्दा कवितेच्या दृष्टीनें फार महत्त्वाचा आहे.

( ऌ ) जोडाक्षरानें आरंभ होणारा शब्द वाक्यामध्यें ऱ्हस्वाक्षरान्त शब्दापुढें आला असतां, त्याचा मागल्या ऱ्हस्वाक्षरास उच्चारामध्यें धक्का बसतो किंवा नाहीं, हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. त्यासंबंधानें असें सांगतां येतें कीं, गद्यामध्यें प्रत्येक शब्द वेगळा उच्चारला व लिहिला जात असल्यामुळें, म्हणजे गद्यामध्यें शब्दांचा संयोग होत नसल्यामुळें सदरहू धक्का बसत नाहीं, परंतु कवितेंत कांहीं निराळा प्रकार आहे.

( ए ) कवितेमध्यें ऱ्हस्वाक्षरान्त शब्दापुढें संयुक्ताक्षरादि संस्कृत शब्द आला असतां त्याचा मागील ऱ्हस्वाक्षरास बहुधा धक्का बसतो, व त्यायोगें त्या ऱ्हस्वास गुरुत्व येतें, आणि त्याच्या दोन मात्रा धरण्यांत येतात. परंतु संयुक्ताक्षरादि शब्द निवळ मराठी असल्यास त्याचा धक्का मागील ऱ्हस्वास बसत नाहीं, म्हणजे त्यास गुरुत्व येत नाहीं व त्याची एकच मात्रा धरतात.

उदाहरणें:--

जो विप्र आजिपासुनि मद्यप्राशन करील तो पापी ।
ब्रह्मघ्नासम निश्चित असि मर्यादा स्वयें **कवि** स्थापि ॥ १ ॥
शक्रसुता गहिंवरली न्हाणी तदुरःस्थलासि अश्रु तिचें ।
कवणाला **न** प्रिये तें गुणमणिमयकेलिमन्दिर श्रुतिचें ॥ २ ॥
भूप म्हणे बाल दिसे परि मतिनें वृद्धसा न बालकसा ।
वय अल्प परि अनल्प-ज्ञान म्हणावा असाहि बालकसा ॥ ३ ॥
**न** चुकेचि भावि चुकतें तरि मृत्यु **न** व्हावयासि कामएा ।
करिताचि भीष्म येतें मग त्या मध्यम वयांत कां मरण ॥ ४ ॥

— मोरोपंत.

वरील उदाहरणांतील ' कवि स्थापी ' ' **न** प्रिय ' ' मान्दिर श्रुतिचें ' या ठिकाणीं स्थापी, प्रिय, श्रुतिचें, हे शब्द संस्कृत आहेत आणि त्यांतील आद्य संयुक्ताक्षराचा मागल्या **वि**, **न**, **र**, या ऱ्हस्वाक्षरांवर आघात येत आहे; तसेंच ' भूप म्हणे, ' ' ज्ञान म्हणावा ' ' न व्हावयासि , ' ' मग त्या ' या ठिकाणीं म्हणे, म्हणावा , व्हावयासि, त्या, हे शब्द निवळ मराठी आहेत आणि त्यांतील आद्य संयुक्ताक्षराचा मागल्या प, न, न, ग, ह्या ऱ्हस्वाक्षरांवर आघात येत नाहीं हें उघड आहे.

**अपवादः**--संयुक्ताक्षरादि शब्द संस्कृत असूनही कधीं कधीं मागील ऱ्हस्वाक्षरावर आघात येत नाहीं. म्हणूनच वरील नियमांत ' बहुदा ' हा शब्द घातला आहे. उदाहरणः--

अप्रिय परि पथ्य असें वक्ता श्रोताहि दुर्लभ स्पष्ट ।
बहु सुलभ प्रियंवद ते, वाढविती चुकविती न ते कष्ट ॥ --मोरोपंत.

या आर्येतील ' सुलभ प्रियंवद 'या ठिकाणीं प्रियंवद हा संयुक्ताक्षरादि शब्द संस्कृत असूनही त्याचा, सुलभ शब्दांतील **भ** वर आघात येत नाहीं. जर तो आघात घेऊन आर्या म्हटली तर **भ** ला गुरुत्व येऊन त्याच दोन मात्रा होतील व त्यामुळें आर्येच्या तिसऱ्या चरणांत एक मात्रा फाजील हेऊन छन्दोभंग होईल. एवंच, वरील नियम केवळ सामान्यकल्प आहे. असाच प्रकार कांहीं ठिकाणीं गद्यांतील समासांत आढळतो. याचें ठळक उदाहरण म्हटलें म्हणजे ' ज्ञानप्रकाश ' हें होय. या वर्तमानपत्रासंबंधानें बोलतांना साधारणपणें **प्र** चा **न** वर आघात न घेतांच ' ज्ञानप्रकाश ' हें नांव उच्चारण्याचा जिकडे तिकडे बराच प्रघात दिसतो. तथापि हा अपवादक प्रकार गौण असून अनुकरणीय नाहीं.

---

## आध्याय ५.

---

### संधि.

६१. दोन अव्यवहित, म्हणजे एका पाठीमागून एक असे येणारे वर्ण एकत्र जोडण्याचे प्रकारास संधि असें म्हणतात.

टीप.— संस्कृत भाषेंत संधींचें प्रकरण फार मोठें व महत्वाचें आहे. पदसिद्धि, समास व वाक्य या तिन्ही स्थळीं संधि होतात. त्यांपैकीं वाक्यांत येणाऱ्या लागोपाठच्या दोन शब्दांमध्यें मराठींत प्रायः संधि होत नाहीं. संस्कृत शब्दांचा भरणा मराठींत फार असून तो वाढत्या प्रमाणावर आहे. तेव्हां संस्कृत संधींची माहिती मराठी विद्यार्थ्यांस असणें अवश्य आहे. समासांतील संधींची माहिती पदसिद्धीमधील संधींचे माहितीपेक्षां मराठीच्या दृष्टीनें अधिक महत्वाची आहे. संस्कृत पदसिद्धींतील संधि संस्कृताचे अभ्यासास अवश्य आहेत. परंतु संस्कृत शब्द व पदें मराठींत आल्यावर त्यांच्या साधनिकेचा प्रश्न मराठीच्या दृष्टीनें गौण होतो. तेव्हां मराठीच्या दृष्टीनें संस्कृतांतील संधींपैकीं फक्त सामासिक शब्दांचे अवयवांमध्यें होणारे संधि हेच काय ते विशेष महत्त्वाचे होत. खुद्द मराठींमध्यें वाक्यांतील लागोपाठच्या शब्दांमध्यें संधि बहुधा होत नाहींत. मराठी समासांतील अवयवांचे संधि कांहीं स्थळीं होतात; आणि मराठी पदसिद्धीमध्येंही कांहीं संधि आढळतात. तथापि मराठींतील संधि हे बहुतेक पररूपसंधि आहेत. तेव्हां य अध्यायांत येणारे सर्व नियम संस्कृत शब्दांसंबंधाचे होत. जेथें जेथें मराठी उदाहरणें दिलीं आहेत, तेथें तेथें तीं मराठी भाषेच्या दृष्टीनें अपवादरूप होत. मराठी पदसिद्धीमध्यें कोठें कोणता नियम लागतो तो जेथला तेथें सांगण्यांत येईल.

६२. संधि तीन प्रकारचे आहेत **स्वरसंधि, व्यंजनसंधि,** आणि **विसर्गसंधि.**

( अ ) दोन अव्यवहित स्वरांचे संधीस **स्वरसंधि** किंवा **अच्-संधि** असें म्हणतात.

( आ ) ज्या दोन वर्णांचा संधि होतो, त्यांपैकीं पहिला वर्ण व्यंजन असला, तर त्यांचे संधीस **व्यंजनसंधि** किंवा **हल्-संधि** असें म्हणतात. अर्थात् व्यंजनसंधीमध्यें दुसरा वर्ण व्यंजन असेल किंवा स्वरही असेल.

( इ ) ज्या दोन वर्णांचा संधि होतो, त्यांपैकीं पहिला वर्ण जर विसर्ग असला, तर त्यांचे संधीस **विसर्गसंधि** असें म्हणतात. अर्थात् विसर्ग-संधीमध्यें दुसरा वर्ण स्वर असेल किंवा व्यंजन असेल.

६३. या तीन प्रकारांचें अनुक्रमें विवेचन करण्यापूर्वी प्रथम या अध्यायांत आणि पुढेंही व्याकरणांत येणाऱ्या कित्येक पारिभाषिक शब्दांचा अर्थ स्पष्ट करून सांगणें अवश्य आहे. ते असेः—

( अ ) स्वरसंधीमध्यें जेव्हां दोन्ही स्वरांचे जागीं पहिलाच स्वर येतो,

म्हणजे दुसऱ्याचा लोप होतो, तेव्हां त्या स्वरसंधीस **पूर्वरूप-संधि** असें म्हणतात.

(आ) स्वरसंधीमध्यें जेव्हां दोन्ही स्वरांचे जागीं दुसराच स्वर येतो, म्हणजे पहिल्याचा लोप होतो, तेव्हां त्या स्वरसंधीस **पररूप संधि** असें म्हणतात.

( इ ) इ, ई ह्यांचे जागीं **ए**—उ, ऊ ह्यांचे जागीं **ओ**—ऋचे जागीं **अर्** —आणि ऌचे जागीं **अल्**- येणें यास त्या त्या स्वरांचा गुण होणें असें म्हणतात. म्हणजे इ, ई, ह्यांचा गुण **ए**; **उ**, **ऊ** ह्यांचा गुण ओ; आणि **ऋ** व **ऌ** ह्यांचे गुण अनुक्रमें **अर्** व **अल्** हे होत.

( ई ) इ, ई ह्यांचे जागीं ऐ —उ, ऊ ह्यांचे जागीं **औ**--ऋचे जागीं **आर्**--आणि ऌचे जागीं **आल्**--येणें, यास **वृद्धि** असें म्हणतात. म्हणजे इ, ई ह्यांची **वृद्धि ऐ**; उ, ऊ ह्यांची **औ**; आणि ऋ व ऌ ह्यांची अनुक्रमें **आर्** व **आल्** ही **वृद्धि** होय.

( उ ) एका वर्णाचे जागीं जो दुसरा वर्ण येतो त्यास **आदेश** असें म्हणतात. याप्रमाणें वर जे गुण व वृद्धि म्हणून प्रकार सांगितले ते आदेश होत. म्हणून त्यास अनुक्रमें गुणादेश व वृध्यादेश असेंही म्हणतात.

( ऊ ) कधीं कधीं एखाद्या वर्णाची किंवा अक्षराची भर मध्येंच पडते. तेव्हां या नवीन भरती झालेल्या वर्णास किंवा अक्षरास **आगम**, असें म्हणतात.

( ऋ ) कधीं कधीं इ, ई यांचे जागीं **य्**; उ, ऊ ह्यांचे जागीं **व्**; ऋचे जागीं **र्**; आणि ऌचे जागीं ल्; येतो. या विकारास **यणादेश** असें म्हणतात.

( ऌ ) कधीं कधीं **य्**, व्, र्, ल् ह्यांचे जागीं अनुक्रमें इ, उ, ऋ, ऌ, हे स्वर येतात. या विकारास **संप्रसारण** असें म्हणतात.

## स्वरसंधि.

६४. दोन **सवर्ण** किंवा **सजातीय** स्वर एकापुढें एक असे म्हणजे लागोपाठ आले असतां, त्या दोहोंबद्दल त्यांचाच सवर्ण दीर्घ स्वर होतो. या नियमाचा तपशील:—

(क) अ आणि आ या सवर्ण स्वरांचे संधि व उदाहरणें येणें-प्रमाणें:—

अ + अ = आ; जसें:—सुर + असुर = सुरासुर; सार + असार = सारासार; सूर्यास्त, वेदान्त, इ०. म० उ०:—धुळाक्षर, जोडाक्षर, मुळाक्षर, इ०.

अ + आ = आ; जसें:—देव + आलय = देवालय; दीपावलि; दर्भासन; दुःखार्त; कार्यारंभ; इ०. म० उ:—कुंभ + आर = कुंभार; कर + आ = करा; घर + आवें = घरावें; झोंप + आळू = झोंपाळू; करित + आहे = करिताहे; इ०.

दोष.—हा एक पररूपसंधि आहे. याचीं उदाहरणें निवळ मराठींत फार आडळतात. तीं विकरण प्रकरणांत पहावीं.

आ + आ = आ; जसें:—विद्या + आरंभ = विद्यारंभ; विद्यालय; राजाज्ञा. म० उ०:—जा + आ = जा; जा + आवें = जावें; पोंवा + आडा = पोंवाडा, आशा + आवणें = आशावणें, इ०.

आ + अ = आ; विद्या + अर्थी = विद्यार्थी, भाषान्तर, गंगार्पण, इ०. हा पूर्वरूपसंधि आहे.

(ख) इ व ई या सवर्ण स्वरांचे संधि व उदाहरणें:—

इ + इ = ई; जसें:—कवि + इच्छा = कवीच्छा; कवींद्र; अभीष्ट, अधीत, अतीत, इ०.

इ + ई = ई; जसें:—कवि + ईश्वर = कवीश्वर.

ई + ई = ई; जसें:—मही + ईश = महीश, श्रीश, पार्वतीश, इ०.

ई + इ = ई; जसें:—देवी + इच्छा = देवीच्छा, पार्वतीच्छा, इ०.

(ग) उ + उ = ऊ; जसें:—भानु + उदय = भानूदय, गुरूत्सव, गुरूक्त, सूक्त, इ०.

उ + ऊ = ऊ; जसें:—गुरु + ऊरु = गुरूरु.

ऊ + उ = ऊ; जसें:—भू + उद्धार = भूद्धार.

ऊ + ऊ = ऊ; जसें—भू + ऊर्जित = भूर्जित.

(घ) ॠसंबंधानें संस्कृत उदाहरणही मराठींत आढळत नाहीं. मातॄ + ॠण = मातॄण असें एक उदाहरण व्याकरणांत देतात. पण त्या ठिकाणीं सुद्धां मातृण असा ऱ्हस्व ऋकारयुक्त विकल्प आहे. तेव्हां दीर्घ ॠची जरूरी नाहीं. ऌस दीर्घत्व नसल्यामुळें त्याचें उदाहरण अर्थात् उपलब्ध नाहींच.

६५. **अ** किंवा **आ** ह्यांचे पुढें इ, ई, उ ऊ, ऋ, ऌ हे स्वर आले असतां दोहोंच्या जागीं दुसऱ्याचा गुणादेश होतो. जसें: —

ईश्वर + इच्छा = ईश्वरेच्छा.

गण + ईश = गणेश; म० उ०:—रंग + ईल = रंगेल.

रमा + इच्छा = रमेच्छा, यथा + इष्ट = यथेष्ट. रमा + ईश = रमेश.

सूर्य + उदय = सूर्योदय; म०:-वर + उपचार = वरोपचार.

गंगा + उत्साह = गंगोत्साह, धारा + उष्ण = धारोष्ण.

समुद्र + ऊर्मि = समुद्रोर्मि; म०:—एक + ऊन = एकोन अ० एकूण.

गंगा + ऊर्मि = गंगोर्मि.

देव + ऋषि = देवर्षि, ब्रह्मर्षि.

महा + ऋषि = महर्षि, राजर्षि.

तव + ऌकार = तवल्कार.

टीप—ऌ संबंधाचा संधि फारच क्वचित्, जवळ जवळ नाहींच म्हटलें तरी चालेल. तवल्कार हें उदाहरण तरी वैयाकरणांनीं बनविलेलेंच दिसतें.

**अपवाद**.— स्व + ईर = स्वैर, अक्ष + ऊहिनी = अक्षौहिणी, प्र + ऊढ = प्रौढ, दश + ऋण = दशार्ण, सुख + ऋत = सुखार्त, इ०.

६६. **अ** किंवा **आ** ह्यांचेपुढें **ए** किंवा **ऐ** आल्यास त्या दोहोंच्या जागीं **ऐ** हा आदेश होतो; आणि **ओ** किंवा **औ** आल्यास दोहोंच्या जागीं **औ** असा आदेश होतो. उदाहरणें:—

एक + एक = एकैक (संस्कृत); एकेक व एकक (मराठी).

देव + ऐश्वर्य = देवैश्वर्य.

महा + एकान्त = महैकान्त, सदैव, सर्वथैव, इ०.

विद्या + ऐश्वर्य = विद्यैश्वर्य.

भव + ओषधी = भवौषधि.
बाल + औत्सुक्य = बालौत्सुक्य.
गंगा + ओघ = गंगौघ.
रमा + औदार्य = रमौदार्य.

**अपवाद १**—**अ** किंवा **आ** ह्यांचे पुढें ओष्ठ शब्द आला असतां, **ओ** किंवा **औ** असा वैकल्पिक आदेश होतो. जसें:—बिंब + ओष्ठ = बिंबोष्ठ, बिंबौष्ठ; अधर + ओष्ठ = अधरोष्ठ, अधरौष्ठ.

**अपवाद २**—मराठींत प्रकृत स्थळीं पररूपसंधि होतो. जसें:—एक + एक = एकेक, एक + एकटा = एकेकटा, टारगा + एला = टारगेला, गोरेला, काळेला, रेघ + ओटी = रेघोटी, लांब + ओडा = लांबोडा घाम + ओळें + घामोळें, कर + ओ = करो, बस + ओत = बसोत इ०.

६७. इ, ई, उ, ऊ, ऋ, ऌ, ह्यांचेपुढें कोणताही असवर्ण म्हणजे विजायतीय स्वर आला असतां त्यांचे जागीं यणादेश होतो; म्हणजे इ, ई बद्दल य्; उ, ऊ बद्दल व्; ऋ बद्दल र्; आणि ऌ बद्दल ल्: हा आदेश होतो. उदाहरणें:—

(क) प्रीति + अर्थ = प्रीत्यर्थ; नदी + अर्पण = नद्यर्पण.
अति + आनंद = अत्यानंद; गौरी + आनंद = गौर्यानंद.
अति + उत्तम = अत्युत्तम; देवी + उत्थ = देव्युत्थ.
बुद्धि + ऊर्मि = बुध्यूर्मि; नदी + ऊर्मि = नद्यूर्मि.
प्रति + एक = प्रत्येक; देवी + ऐश्वर्य = देव्यैश्वर.
मति + ओघ = मत्यौघ; देवी + औदार्य = देव्यौदार्य.

(ख) मनु + अन्तर = मन्वंतर; श्वश्रू + अर्थ = श्वश्वर्थ.
हेतु + आभास = हेत्वाभास; धू + आ = ध्वा(क्वचित्),
गुरु + इच्छा = गुर्विच्छा; = धुवा. (हें
गुरु + ईश = गुर्वीश उदाहरण मराठी आहे.)
अनु + एषण = अन्वेषण; गुरु + ऐश्वर्य = गुर्वैश्वर्य.
गुरु + ओघ = गुर्वौघ; धेनु + औदार्य = धन्वौदार्य.

(ग) पितृ + अर्थ = पित्रर्थ; मातृ + इच्छा = मात्रिच्छा.
मातृ + आनंद = मात्रानंद; इ० इ०
(घ) ऌ + आकृति = लाकृति.

६८. **ए, ऐ, ओ, औ,** ह्यांचे पुढें कोणताही स्वर आला तरी त्यांचे जागीं अनुक्रमें **अय्, आय्, अव्, आव्,** असे आदेश होऊन त्यांच्या अंतीच्या य् किंवा व् या व्यंजनांत पुढील स्वर मिळतो. उदाहरणें:—

ने + अन = नयन. गो + ईश्वर = गवीश्वर.
गै + अन = गायन. नौ + इक = नाविक.

६९. मराठीमध्यें म्हणजे निवळ मराठी शब्दांमध्यें बहुधा पररूपसंधि होतो. असें वर सांगितलेंच असून त्याची कांहीं उदाहरणेंही दिलीं आहेत. आणखी उदाहरणें:—नृप + एं = नृपें, घर + ईं = घरीं, हात + ऊन = हातून, कर + ऊन = करून, सांग + ऊं = सांगूं, इ०.

७०. कधीं कधीं मराठींत पूर्वरूप संधि होतो; म्हणजे ज्या दोन स्वरांचा संधि व्हावयाचा असतो, त्यांपैकीं दुसऱ्याचा लोप होऊन त्या दोहोंच्या जागीं फक्त पहिलाच स्वर उरतो. जसें:—किती + एक = कितीक (किंवा कित्येक असेंही रूप होतें.). एक + एक = एकेक (किंवा एकेक, एकैक, अशींही रूपें होतात.), करितो + आहे = करितोहे, इ०.

(अ) पहिल्या शब्दान्तीचा स्वर अनुनासिक असतांही कधीं कधीं पूर्वरूपसंधिच होतो. जसें:—कांहीं + असा = कांहींसा, चांगलें + असें = चांगलेंसें, इ०.

## व्यंजनसंधि.

७१. कोणत्याही अघोषवर्णापुढें कोणताही घोषवर्ण आला असता अघोषवर्णाचे जागीं त्याचे वर्गांतील नाद अल्पप्राण वर्ण येतो. जसें:—

वाक् + ईश = वागीश. सच्चित् + आनंद = सच्चिदानंद.
दिक् + विजय = दिग्विजय सत् + आचार = सदाचार.
अच् + अंत = अजंत. अप् + ज = अब्ज.
अच् + आदि = अजादि. सुप् + अन्त = सुबन्त.

षट् + रिपु = षड्रिपु. प्रावृष् + काल = प्रावृट्काल.
षट् + आनन = षडानन. इ० इ०

७२. कोणत्याही अघोषवर्णापुढें कोणताही अघोषवर्ण आला असतां पहिल्याच्या जागीं त्याचे वर्गांतील श्वास अल्पप्राण वर्ण येतो. जसें:--

वाक् + पति = वाक्पति. पृथक् + करण = पृथक्करण.
सरित् + पति = सरित्पति. तत् + तत् = तत्तत्. इ० इ०.

७३. कोणत्याही अनुनासिकेतर घोषवर्ण व्यंजनापुढें अघोषवर्ण आला असतां पहिल्याबद्दल त्याचे वर्गांतील श्वास अल्पप्राण वर्ण येतो. जसें:--

शरद् + काल = शरत्काल. क्षुध् + तृषा = क्षुत्तृषा.
ककुभ् + प्रांत = ककुप्प्रांत. क्षुध् + पिपासा = क्षुत्पिपासा. इ०.

७४. कोणत्याहि अनुनासिकेतर घोषवर्ण व्यंजनापुढें घोषवर्णच आला असतां पहिल्याच्या जागीं त्याचे वर्गांतील नाद अल्पप्राण वर्ण होतो. जसें:--

क्षुध् + भय = क्षुद्भय. शरद् + ऋतु = शरदृतु.
शरद् + उत्पल = शरदुत्पल. इ० इ०.

**टीप १.**--वरील चारी (७१-७४) नियम लावतांना अन्त्य च्, श् आणि ज्, यांस क् असें समजावें. उदाहरणें:--

वाच् + पति = वाक्पति, ( किंवा वाचस्पति असेंही रूप होतें. )
वाच् + गुरु = वाग्गुरु. दिश् + अंबर = दिगंबर.
दिश् + पाल = दिक्पाल. ऋत्विज् + पंक्ति = ऋत्विक्पंक्ति.

**टीप २.**-- व्यंजनसंधीचे हे सामान्य नियम होत. विशेष नियम पुढें दिल्याप्रमाणें:--

७५. स्पर्श म्हणजे वर्गीय व्यंजनांपुढें अनुनासिक व्यंजन आल्यास पहिल्याचे जागीं त्याचेच वर्गांतील अनुनासिक व्यंजन येतें; किंवा वरील नियमांप्रमाणेंही संधि होतो. तथापि, अनुनासिक व्यंजन ज्यांत येतें अशींच रूपें विशेष प्रचारांत आहेत. उदाहरणें:--

षट् + मास = षण्मास. किं षड्मास. ( अं. ७१ ).
वाक् + मन = वाङ्मन. किं वाग्मन. ,,
तत् + मन = तन्मन. किं. तद्मन. ,,

तत् + नयन = तन्नयन. किं. तद्नयन. (अं. ७१)

भगवत् + नाम = भगवन्नाम. किं. भगवद्नाम ,,

जगत् + नाथ = जगन्नाथ. किं. जगद्नाथ. ,,

**टीप**—परंतु अनुनासिकानें आरंभ होणारा प्रत्यय पुढें आला असतां फक्त ७५ वा नियमच लागतो; मागल्या नियमांप्रमाणें होणारें रूप प्रचारांत नाहीं.

जसें:— अप् + मय = अम्मय. वाक् + मय = वाङ्मय.

चित् + मय = चिन्मय.

मृद् + मय = मृन्मय. ( ह्याचें मृण्मय असेंही एक रूप होतें. )

७६. **त** वर्गांतील व्यंजनापुढें **च** वर्गांतील किंवा **ट** वर्गांतील वर्ण, श्, किंवा ल्, आल्यास पहिल्याचे जागीं पुढील वर्णच येतो. परन्तु छ्, झ्, ठ्, ढ्, हे महाप्राण वर्ण असल्यास पहिल्याचे जागीं पुढिलांचे अल्पप्राण वर्ण, म्हणजे च्, ज्, ट्, ड्, हे वर्ण, अनुक्रमें होतात. व्यंजनसंधीमध्यें पहिल्या महाप्राण व्यंजनाच्या जागीं तदनुरूप अल्पप्राण व्यंजनच येतें असा नियम आहे. उदाहरणें:—

तत् + चरित्र = तच्चरित्र, सत् + जन = सज्जन.

तत् + छत्र = तच्छत्र, शरद् + झंझावात = शरज्झंझावात.

तत् + टीका = तट्टीका, भगवत् + डमरु = भगवड्डमरु.

भूभृत् + ढक्का = भूभृड्ढक्का, भगवत् + लीला = भगवल्लीला.

सुहृत् + लाभ = सुहृल्लाभ, जगत् + लय = जगल्लय.

७७. अनुनासिकेतर स्पर्श व्यंजनापुढें ( स्वर, अंतःस्थ, अनुनासिक वर्ण किंवा हकार ह्यांपैकीं कशानेंही युक्त असा ) शकार आल्यास **श** चा **छ** विकल्पेंकरून होतो. तथापि, छकार युक्त रूपच विशेष प्रचारांत आहे. म्हणून पुढील उदाहरणांत दुसरें वैकल्पिक रूप दिलें नाहीं. जसें:—

सत् + शिष्य = सच्छिष्य, शरद् + श्री = शरच्छ्री.

उत् + शृंखल = उच्छृंखल, चित् + शक्ति = चिच्छक्ति.

मत् + शर = मच्छर, इ० इ०

७८. संधि होऊन प्राप्त झालेल्या संयुक्त व्यंजनांत पहिलें व्यंजन नाद अल्पप्राण ( ग्, ज्, ड्, द्, ब्, ह्यांपैकीं कोणतेंही एक ) असून

दुसरें ह् असेल तर ह् बद्दल कधीं कधीं त्याच वर्गांतील नाद महाप्राण वर्ण होतो. उदाहरणें:--

वाच् + हरि = वाग्हरि किंवा वाग्घरि, षट् + हस्त = षड्हस्त किं. षड्ढस्त.
ईषत् + हीन = ईषद्हीन किं. ईषद्धीन, उद् + हरण = उद्हरण किं. उद्धरण.

७९. समास होतांना प्रथम शब्द न्कारान्त असल्यास, किंवा न्कारान्त शब्दापुढें तद्धित प्रत्यय आल्यास न्चा लोप होतो. जसें:--

राजन् + आज्ञा = राजाज्ञा, राजन् + गृह = राजगृह.
हस्तिन् + दन्त = हस्तिदन्त, हस्तिन् + इन्द्र = हस्तीन्द्र.
प्राणिन् + मात्र = प्राणिमात्र, धनिन् + त्व = धनित्व

८०. एकाच शब्दांत न्चे मागें ष्, र्, किंवा ऋ असल्यास न् चा ण् होतो. दोहोंच्या मध्यें कवर्ग किंवा पवर्ग ह्यांतील व्यंजन स्वर, ह्, य्, व्, र्, विसर्ग, किंवा न् किंवा म् ह्यांपासून झालेला अनुस्वार आला तरी चालतो; परंतु त्यांच्यामध्यें ह्याशिवाय इतर व्यंजनें किंवा इतर अनुस्वार आला तर न्चा ण् होत नाहीं; तसेंच न् हें व्यंजन शब्दान्तीं असतां त्याचा ण् होत नाहीं. उदाहरणें:--

भाष् + अन = भाषण, रम् + अन = रमण,
रक्ष् + अन = रक्षण, ऋ + अन = ऋण, इ०.

परंतु रचना, रामान् इ० ठिकाणीं न्चा ण् होत नाहीं.

**टीप**--वास्तविक एक शब्द नसतांही कधीं कधीं न्चा ण् होतो. जसें:--
राम + अयन = रामायण, नार + अयन = नारायण.

८१. म्कारापुढें स्वर आल्यास तो स्वर त्या म्कारांत मिळून जातो; व्यंजन आल्यास म्बद्दल त्या व्यंजनाचे वर्गांतील अनुनासिक व्यंजन येतें; किंवा म्चा लोप करून त्याचे मागल्या अक्षरावर बिंदु देतात. जसें:--

सम् + आप्ति = समाप्ति, सम् + गति = सङ्गति किंवा संगति.
एकम् + एकम् = एकमेकम्, सम् + ताप = सन्ताप किं. संताप.

**अपवाद:**--सम् + राज् = सम्राज् (ट) या शब्दांत म्चा लोप करून मागील स वर बिंदु देण्याची चाल नाहीं.

८२. अ, आ, ह्याखेरीज कोणताही स्वर कवर्ग, अंतस्थ, आणि इ

ह्यांतील कोणत्याही वर्णापुढें प्रत्ययाचा, किंवा षबद्दल आलेला, स् आल्यास त्याबद्दल ष् होतो. जसें:—

प्रति + संग = प्रतिषंग, नि + सिद्ध = निषिद्ध,

अनु + संग = अनुषंग, वि + सम = विषम.

( अ ) परंतु ज्या संस्कृत धातूंत प्रथम स् असून पुढें ऋ किंवा र् असतो, त्या धातूपासून निघालेला शब्द पूर्वोक्त वर्णापुढें आला असतां स्चा ष् होत नाहीं. जसें:—

वि + स्मरण ( स्मृ—धातु ) = विस्मरण,

वि + स्तीर्ण, स्तृ—धातु ) = विस्तीर्ण,

अनु + सरण ( सृ—धातु ) = अनुसरण,

वि + सर्ग ( सृज्—धातु ) = विसर्ग.

८३. ऱ्हस्व स्वरापुढें छ् आल्यास तो द्वित्त होतो, परंतु दोन महाप्राण वर्णांचा संयोग होत नाहीं ( अं. ७६ पहा. ) म्हणून त्याबद्दल च्छ् होतो. जसें:— इक्षु + छाया = इक्षुच्छाया, आश्रय + छत्र = आश्रयच्छत्र. इ०.

( अ ) आ आणि मा या अव्ययानंतर छ् आल्यास त्याबद्दल च्छ् होतो; आणि कधीं कधीं दीर्घ स्वरापुढें छ् आल्यास त्याबद्दलही च्छ् होतो, जसें:—

आ + छादन = आच्छादन म्लेच्छ.

लक्ष्मी + छाया = लक्ष्मीछाया, किंवा लक्ष्मीच्छाया.

८४. अहन् यापुढें कोणताही वर्ण आला असतां अन्त्य न्बद्दल र् होतो; परंतु रात्रि, रूप, हे शब्द आले असतां न्बद्दल उ होऊन संधिनियमाप्रमाणें अहो ( अह + उ = अहो ) असें रूप होतें. जसें:—

अहन् + गण = अहर्गण, अहन् + मुख = अहर्मुख,

अहन् + रात्र = अहोरात्र, अहन् + रूप = अहोरूप.

८५. मराठीमध्यें कांहीं संस्कृत व्यंजनांत शब्द आलेले आहेत. पैकीं कांहीं मूळ प्रातिपदिकें, कांहीं विभक्त्यन्त रूपें आणि कांहीं अव्ययें आहेत. उ०:—भगवान्, विद्वान्, श्रीमान्, तस्मात्, अकस्मात्, कदाचित्, किंचित्, क्वचित्, इ० यासंबंधाचे नियम असे:—

( अ ) यांपैकीं प्रातिपदिकांस विभक्ति प्रत्यय लागण्यापूर्वीं त्यांमध्यें अंतीं अ मिळतो, म्हणून तीं अकारान्त होऊन अकारान्त शब्दांप्रमाणें चालतात. जसें:—भगवानाला, विद्वानांचा, इ०.

(**आ**) व्यजनान्त शब्दांचे पुढें **च** हें शुद्ध शब्दयोगी अव्यय आलें असतां त्यांचे अन्त्य व्यंजनान्तीं **अ** हा आगम होतो. जसें:—विद्वानच, अर्थातच, कदाचितच, अकस्मातच, क्वचितच, इ०.

## विसर्गसंधि.

८६. विसर्गापुढें **च्**, **छ्**, **ट्**, **ठ्** किंवा **त्**, **थ्** आल्यास विसर्गाचे जागीं स् होतो; आणि विसर्गापुढील व्यंजन **च्** किंवा **छ्** असल्यास **स्** चा **श्** होतो, आणि **ट्** असल्यास **स्**चा **ष्** होतो. उदाहरणें:—

अधः + तल = अधस्तल, शनैः + चर = शनैश्चर,
अधः + छवि = अधश्छवि, चक्षुः + तेज = चक्षुस्तेज,
रामः + टीकते= रामष्टीकते, इ० इ०.

८७. विसर्गापुढें **स्**, **श्**, किंवा **ष्** आल्यास विसर्ग तसाच राहतो, किंवा त्याबद्दल पुढील वर्ण होतो. जसें:—

दुः + शासन = दुःशासन किंवा दुश्शासन.
अधः + स्वस्तिक = अधःस्वस्तिक् किं० अधस्स्वस्तिक.

८८. विसर्गापुढें **क्**, **ख्**, किंवा **प्**, **फ्** आल्यास विसर्ग तसाच राहतो. म्हणजे संधि होत नाहीं. जसें:--रजःकण, अधःपतन, इ०

(**अ**) इकारापुढें व उकारापुढें प्रत्ययभिन्न विसर्ग असून पुढें **क्**, **ख्**, किंवा **प्**, **फ्** आल्यास विसर्गाबद्दल प्रायः **ष्**, होतो. जसें:—

निः + कारण = निष्कारण, दुः + कृत = दुष्कृत,
निः + फल = निष्फल, दुः + प्रकृति = दुष्प्रकृति.

**अपवाद**--दुः+ख = दुःख, निः + पक्ष = निःपक्ष.

(**आ**) कांहीं शब्दांत विसर्गाबद्दल **स्**कार येतो. जसें:—

तिरः + कार = तिरस्कार, पुरः + कर्ता = पुरस्कर्ता,
नमः + कार = नमस्कार, भाः + कर = भास्कर.
यशः + कर = यशस्कर, अयः + कार = अयस्कार.

८९. **अः**पुढें **अ** किंवा घोषवर्ण व्यंजन आलें असतां **अः** बद्दल **ओ** होतो.

**अधः + वदन = अधोवदन**, अधः + मुख = अधोमुख,
**रजः + गुण = रजोगुण**, मनः + वृत्ति = मनोवृत्ति,
**मनः + रथ = मनोरथ**, मनः + गत = मनोगत.

९०. विसर्गाचे मागें अ किंवा आ ह्यांचेशिवाय इतर स्वर असून पुढें घोषवर्ण आला असतां विसर्गाचा र् होतो. जसें:--

बहिः + द्वार = बहिर्द्वार, निः + लोभ = निर्लोभ,

दुः + आत्मा = दुरात्मा, निः + अंतर = निरंतर.

(अ) परंतु पुढील घोषवर्ण र् असला तर विसर्गाचा झालेला र् लोप पावतो, आणि त्याचे पाठीमागें जर ऱ्हस्व स्वर असला तर तो दीर्घ होतो. जसें:--निः + रस = नीरस, निः + रदन = नीरदन. इ०.

(आ) कधीं कधीं विसर्गाचे मागें अ हा स्वर असूनही विसर्गाचा र् झालेला आढळतो. जसें:--

पुनः + जन्म = पुनर्जन्म, अन्तः + गत = अन्तर्गत, इ०.

९१. अः पुढें अशिवाय दुसरा स्वर आल्यास विसर्ग मात्र नाहींसा होतो. जसें: --अतः + एव = अत एव याप्रमाणें विसर्गाचा लोप होऊन जवळ जवळ आलेल्या स्वरांचा (अ आणि ए) पुन्हा संधि होत नाहीं.

९२. अन्त्य स्‌बद्दल विसर्ग होतो, म्हणून विसर्गाबद्दलचे वरील नियम स्‌कारास लागू आहेत. वरील नियमांतील विसर्गाच्या उदाहरणांतही कांहीं ठिकाणीं (उ०:--अधस् + अधः, निस् = निः, इ०.) मूळचा स् आहे हें तज्ज्ञांस कळेलच. आणखी उदाहरणें:--

मनस् + विकार = मनः + विकार=मनोविकार,

तेजस् + पुंज = तेजःपुंज.

चक्षुस + विषय = चक्षुः + विषय=चक्षुर्विषय,

ज्योतिस् + शास्त्र = ज्योतिः + शास्त्र=ज्योतिःशास्त्र.

९३. अन्त्य र् बद्दलही विसर्ग होतो. परंतु अन्त्य र चे पुढें अघोष वर्ण आला असतां ८९ वे नियमाप्रमाणें संधि होतो, आणि घोषवर्ण आला असतां र् तसाच राहून ९० वे नियमाप्रमाणें संधि होतो. जसें:--

प्रातर् + काल = प्रातःकाल, अन्तर् + करण=अन्तःकरण,

प्रातर् + संध्या =प्रातःसंध्या, अन्तर् + पुर =अन्तःपुर,

पुनर् + उक्ति =पुनरुक्ति, पुनर् + रक्षण=पुनारक्षण.

**सूचना**--संस्कृत संधीचें प्रकरण कृष्णशास्त्री गोडबोले यांच्या 'नवीन,' व्याकरणांत चांगलें दिलें आहे. त्याजवरूनच प्रस्तुत अध्याय लिहिला आहे.

# भाग २.

## शब्दविचार.

### विषयप्रवेश.

शब्द म्हणजे काय हें पूर्वींच सांगितलें आहे. या भागांत ज्या प्रश्नांचा खुलासा व्हावयाचा आहे, ते असेः–शब्द किती प्रकारचे आहेत? म्हणजे त्यांचे किती वर्ग आहेत? आणि त्या वर्गांचे उपवर्ग कोणते? त्यांचीं वेगवेगळीं रूपें कशीं साधतात? म्हणजे वाक्यांत त्यांचा उपयोग करितांना त्यांस जे अनेक विकार होतात, त्यांसंबंधाचे नियम काय? आणि शब्दांची उत्पत्ति काय? म्हणजे ते कसे तयार होतात? ह्यावरून ह्या भागांत शब्दांसंबंधाच्या मुख्य तीन गोष्टींचा विचार व्हावयाचा आहे असें कळून येईल. शब्दांचे भेदोपभेद म्हणजे त्यांचें वर्गीकरण; शब्दांच्या रूपांची सिद्धि म्हणजे पदसिद्धि किंवा विकरण; आणि शब्दांची व्युत्पत्ति. म्हणून व्याकरणाच्या 'शब्दविचार' या दुसऱ्या भागाचीं तीन प्रकरणें आहेत; **वर्गीकरण, विकरण** व **व्युत्पत्ति**. हीं तीन प्रकरणें अनुक्रमानें पुढें दिलीं आहेत. या तीन प्रकरणांतील फरक ध्यानात येण्यासाठीं पुढील विस्ताराची जरूर आहे.

मराठीमध्यें **शब्द** हा शब्द फारच संदिग्ध आहे. 'गेल्याचा शोक वृथा न करावा वित्त सर्व जायाचें' ह्या आर्यार्धांत आठ **शब्द** आहेत असें आपण म्हणतों. त्याचप्रमाणें 'गेल्याचा' हें 'गेलें' ह्या **शब्दाचें** षष्ठीचें एकवचन असेंही आपण म्हणतों. म्हणजे 'गेल्याचा' हाही **शब्द**च आणि 'गेले' हाही **शब्द**च; 'शोक' हाही **शब्द**च आणि 'शोकानें' हाही **शब्द**च. परंतु या ठिकाणीं **शब्द** या शब्दाचा उपयोग निरनिराळ्या अर्थानें केला आहे हें विसरतां कामा नये. प्रकृति आणि विकृति यांमधील फरक प्रथम ध्यानांत ठेविला पाहिजे. शब्दाचें जें मूळ रूप त्यास **प्रकृति** म्हणतात; आणि त्यास कोणतेंही प्रत्यय लागून जीं रूपें तयार होतात, त्या सर्वांची त्याच्या 'विकृतींत' गणना केली पाहिजे.

आतां मूळ रूप म्हणजे तरी काय? हा मोठा वादग्रस्त प्रश्न आहे. 'विकृतींत' हाच शब्द पहा. 'विकृति' या मूळ रूपाचें 'विकृतींत' हें सप्तमीचें एकवचन होय. पण 'विकृति' हें तरी मूळचें रूप आहे काय? **कृ** या धातूस **वि** हा उपसर्ग लागून त्यापासून **ति** या प्रत्ययानें 'विकृति' हें एक नाम बनलें आहे. ह्याप्रमाणें भाषेमध्यें असणारे बहुतेक सर्व शब्द अगदीं आरंभीं कांहीं थोड्याशा धातूंपासून उत्पन्न झाले आहेत. ज्याप्रमाणें मूळ बीज एक असून त्याचा, पुढें शाखा, पानें, फुलें, फळें, असा अनंत विस्तार होतो; त्याचप्रमाणें भाषेंतील धातुरूपबीजांपासून नामें, विशेषणें, क्रियापदें, निरनिराळया प्रकारचीं अव्ययें, व पुढें त्यांजपासून आणखी समस्त, कृदन्त, तद्धित वगैरे शब्द, असा अगणित शब्दविस्तार उदयास येतो. तेव्हां वास्तविक म्हटलें म्हणजे धातूसच **मूळ प्रकृति** म्हटलें पाहिजे; आणि त्या दृष्टीनें इतर सर्व विकृति होय. कांहीं शब्द अव्युत्पन्न आहेत, म्हणजे ते कोणत्या धातूपासून निघाले हें सांगतां येत नाहीं. त्यांचीही मूळ प्रकृतींत गणना करितात. परंतु व्याकरणामध्यें प्रकृति म्हणजे मूळ प्रकृति असा अर्थ नाहीं. ज्या प्रत्ययांनंतर दुसरे प्रत्यय सहसा लागत नाहींत त्यांस **चरम प्रत्यय** असें म्हणतात. चरम प्रत्यय दोन प्रकारचे आहेत. नामादि प्रातिपदिकांस लागणारे ते **विभक्तिप्रत्यय;** आणि धातूंस लागणारे ते **आख्यातप्रत्यय** होत. हे चरम प्रत्यय लागण्याचे पूर्वीचें जे मूळ रूप त्यास स्थूल दृष्टीनें **प्रकृति** असें व्याकरणांत म्हणण्यास हरकत नाहीं. पण ही अर्थातच मूळ प्रकृति नव्हे. या स्थूल प्रकृतीस **शब्द** म्हणतात. हा 'शब्द' या शब्दाचा एक अर्थ झाला. प्रकृतीचें जें कोणतेंही विकृत रूप त्यासही शब्द म्हणतात. हा त्याचा दुसरा विस्तृत अर्थ होय. प्रकृतीस विकृति जी होते, ती प्रत्यय लागून होते. प्रत्यय दोन प्रकारचे आहेत. एक वर सांगितलेले चरम व दुसरे चरमेतर म्हणजे ज्यांचेनंतर अन्य प्रत्यय लागतात ते हे चरमेतर प्रत्यय लागून कृदन्तें व तद्धितें तयार होतात. ह्यांस व समासांसही चरम प्रत्यय लागतात. म्हणून कृदन्तांस, तद्धितांस व समासांसही वरच्या स्थूल दृष्टीनें प्रकृति असें म्हणतां येईल. अव्ययांवरून बहुधा कोणतेच प्रत्यय सहसा होत नाहींत. तेव्हां त्यांसही प्रकृति म्हणतां येतें. चरम प्रत्यय लागून जी विकृति होते तीच खरी विकृति होय; कारण तिला प्रकृतीचें स्वरूप

सहसा प्राप्त होत नाहीं. चरमप्रत्ययान्त रूपांस वास्तविक **पदें** असें म्हणतात. परन्तु त्यांसही शब्द ही संज्ञा विस्तृत अर्थानें लावितात. तथापि व्याकरणामध्यें शब्द व पद यांमधील फरक महत्त्वाचा आहे. व्याकरणामध्यें शब्द याचा पदभिन्न या मर्यादित अर्थानेंच उपयोग करण्यांत येतो. तो ध्यानांत धरिला आणि प्रकृतिविकृतीचें वरील विवेचन समजून घेतलें, म्हणजे शब्दविचारांतील तीन प्रकरणांत कोणकोणता विषय येतो ह्याचें आकलन सहज होईल. **वर्गीकरणामध्यें** सर्व शब्दांच्या—म्हणजे ज्या विकृतीस प्रकृतीचें स्वरूप सहसा येत नाहीं तिच्या म्हणजेच **पदेतर शब्दांच्या** अथवा 'शब्द' या शब्दाचे मर्यादित अर्थानें म्हटल्या जाणाऱ्या शब्दांच्या-जाती व उपजाती कोणत्या व त्यांचें स्वरूप काय ह्या गोष्टींचें सविस्तर विवेचन येतें. **विकरणामध्यें** चरम प्रत्ययांनीं होणाऱ्या विकृतीचें म्हणजेच **पदांचें** विवेचन येतें. अर्थात् चरम प्रत्यय कोणते व ते शब्दांस लागून पदें कशीं तयार होतात, हें या प्रकरणांत सांगितलेलें असतें. म्हणूनच यास कोणी 'पदसिद्धि' असेंही म्हणतात. आणि **व्युत्पत्ति या** तिसऱ्या **प्रकरणांत** धातूंपासून किंवा इतर शब्दांपासून अन्य शब्द कसे तयार होतात; म्हणजे **कृदन्तें** व **तद्धितें यांची व्युत्पत्ति** काय हें सांगितलेलें असतें. सामासिक शब्दांचा विचार ह्याच प्रकरणांत करण्याची चाल आहे. कारण कीं समास हे मूळ शब्द नव्हत; ते मूळच्या शब्दांचे समूह होत; म्हणजे ते एक प्रकारचे साधित शब्दच होत; म्हणून त्यांचा या तिसऱ्या प्रकरणांत अन्तर्भाव होतो. एवंच, तिसऱ्या व्युत्पत्ति या प्रकरणांत **साधित शब्दांचा**, म्हणजे जे शब्द इतर शब्दांपासून तयार होतात त्यांचा,—यांत समासांचाही वर सांगितल्याप्रमाणें समावेश होतोच—**व्युत्पत्तिदृष्ट्या विचार** केलेला असतो. दुसऱ्यांत फक्त पदांची सिद्धि येते आणि पहिल्यांत सिद्ध व साधित शब्दांचे भेदोपभेद दाखविण्यांत येतात.

९४. जे शब्द इतर शब्दांपासून उत्पन्न झालेले नसतात, त्यांस **सिद्ध शब्द** असें म्हणतात. जसें:—नाक, कान, घोडा, लांकूड, इ०.

९५. जे शब्द इतर शब्दांपासून उत्पन्न होतात, त्यांस **साधित शब्द** असें म्हणतात. समासांचा अन्तर्भाव यांतच होतो. उदा०—डोळस (डोळा + स), लांकडी (लांकूड + ई), घोडागाडी, इ०.

९६. शब्दविचारांत **तीन** प्रकरणें येतात; **वर्गीकरण, विकरण,** व **व्युत्पत्ति.**

**( अ )** वर्गीकरणांत, सिद्ध व साधित ह्या दोहोंमिळून सर्व शब्दांचे भेदोपभेद सांगण्यांत येतात.

**( आ )** विकरणांत, शब्दांपासून पदें कशीं तयार होतात, तें सांगण्यांत येतें. म्हणून विकरणास कोणी 'पदसिद्धि' असेंही म्हणतात.

( इ ) व्युत्पत्तीमध्यें साधित शब्द कसे बनतात हें सांगितलेलें असतें.

---

# प्रकरण १.



## वर्गीकरण.

---

## अध्याय १.

—— :०:——

### शब्दांच्या जाती.

९७. शब्दाचे मुख्य **दोन** भेद आहेतः—**विकारी** व **अविकारी** किंवा **अव्ययें.**

९८. वाक्यामध्यें उपयोगांत येतांना ज्यांस कांहीं विकार होतात म्हणजे जे जसेच्या तसे अविकृत सहसा उपयोगांत येत नाहींत, त्यांस **विकारी शब्द** असें म्हणतात; उ:—मनुष्य, तो, चांगला, जा, इ०.

दिलेलीं उदाहरणें योग्य नाहींत; कारण कीं, 'तो मनुष्य चांगला आहे,' 'तूं जा' इ० वाक्यांत उद्धृत शब्दांचा अविकृत उपयोग होऊं शकतो, असें सकृद्दर्शनीं वाटण्याचा संभव आहे. आणि जरी कांहीं स्थळीं त्यांचा अविकृत उपयोग शक्य असला, तरी अनेक स्थळीं त्यांस विकार व्हावा लागतो. 'चांगल्या मनुष्यास लोक चाहतात;' 'चांगल्या मनुष्याचे ठायीं दुराचरणाचा संभव कमी;' 'तो जातो—गेला—जाईल;' इ० अनेक ठिकाणीं त्यांस विकार झालेले दृष्टीस पडतात. पण कांहीं ठिकाणीं ते अविकृत उपयोगांत येतात; याकरितांच वरील लक्षणांत 'सहसा' हा शब्द घातला आहे.

९९ ज्या शब्दांचा उपयोग वाक्यामध्यें अविकृतपणें होतो म्हणजे जे जसेच्या तसे कांहीं एक विकार न होतां उपयोगांत येतात, त्यांस **अविकारी शब्द** किंवा **अव्ययें** असें म्हणतात. उ०:—हळू, जर, वर, छे, इ०.

१००. विकारी शब्दांचे **चार** उपभेद आहेत: **नाम, सर्वनाम, विशेषण** आणि **धातु** किंवा **क्रिया**. त्याचप्रमाणें अविकारी शब्दांचे म्हणजे अव्ययांचेही **चार** उपभेद आहेत: **क्रियाविशेषण, उभयान्वयी, शब्दयोगी,** आणि **केवलप्रयोगी**. एकंदरींत शब्दांच्या **आठ** जाती आहेत. यांपैकीं प्रत्येकींचें सविस्तर विवरण पुढें यावयाचेंच आहे. म्हणून त्यांच्या नामनिर्देशापेक्षां अधिक कांहीं सांगण्याची येथें आवश्यकता नाहीं.

[ दादोबादि वैयाकरणांनीं ज्यांनां 'सविभक्तिक' असें म्हटलें आहे, त्यांस येथें, 'विकारी' हें नांव दिलें आहे. आजपर्यंतच्या प्रचारास सोडून देण्याचें कारण सांगितलें पाहिजे. 'सविभक्तिक' ही संज्ञा नामें, सर्वनामें, व विशेषणें यांस सहजच लागू पडते. परंतु ज्यांस क्रियापदें म्हणतात, त्यांस 'सविभक्तिक' शब्द हें नांव एकाएकी बरें दिसत नाहीं. धातूंस जे चरम प्रत्यय लागून पदें होतात त्या प्रत्ययांस आख्यातप्रत्यय असें म्हणतात; 'विभक्तिप्रत्यय' असें बहुधा म्हणत नाहींत. आख्यातप्रत्ययांसही विभक्तिप्रत्यय हें नांव देण्यास संस्कृतव्याकरणास अनुसरून कांहीं हरकत नाहीं. परंतु मराठींत तसा प्रचार नाहीं. म्हणून क्रियापदांस सविभक्तिक ही संज्ञा लावण्यापेक्षां दुसरीच एखादी संज्ञा उपयोगांत आणणें बरें दिसतें; अविभक्तिक शब्दांस अव्यय असें म्हणतात; त्या दृष्टिनें सविभक्तिकांस व्ययी शब्द असें म्हटलें असतां चालेल. परंतु अव्ययें या शब्दास व्ययी हा शब्द सर्वस्वी अनुरूप नाहीं. व्ययें हा शब्द तदनुरूप खरा, परंतु तो प्रचारांत नाहीं. व्ययें आणि अव्ययें ह्यांचा भावार्थ व्यक्त करणारे व सहज समजणारे आणि परस्परांस अनुरूप असें विकारी व अविकारी हे शब्द या ग्रंथांत योजिले आहेत. तसेंच आजपर्यंतच्या मराठी वैयाकरणांचे परिभाषेंत आणखी एक लहानसा फरक येथें केला आहे. तो असा या भागाचे विषयप्रवेशांत सांगितलेला, शब्द व पद यांमधील फरक, ध्यानांत धरिला, म्हणजे धातूंस 'क्रियापदें' असें म्हणणें प्रशस्त नाहीं; हें वाचकांचे तेव्हांच नजरेस आल्यावांचून राहणार नाहीं. म्हणूनच काहींनीं यांस 'धातुशब्द' असें म्हटलें आहे. परंतु नामशब्द, सर्वनामशब्द, विशेषणशब्द असा 'शब्दान्त' परिभाषेचा प्रचार नाहीं. तेव्हां धातुशब्द ह्याचे ऐवजी नुसतें धातु म्हणणें बरें दिसतें. तथापि 'क्रियापद' शब्द प्रचलीत असल्यामुळें त्याचा त्याग करणेंही सर्वस्वी बरें नाहीं. म्हणून त्यांतील दोष तेवढा काढून टाकून निर्दोष शेष स्वीकारण्यास हरकत नाहीं. 'क्रियापद' शब्दामध्यें 'पद' हा अन्त्यावयवच

आक्षेपार्ह आहे; ‘ क्रिया ’ ह्या आद्यावयवास कांहींच बाध नाहीं असें नाहीं. सर्वच धातू क्रियाद्योतक असतात असे नाही हें खरें, तथापि रूढीस अनुसरून त्यांसही एका दृष्टीनें क्रिया म्हणण्यास हरकत नाहीं. ह्यामुळें ज्या शब्दांस जराशा अप्रयोजकपणें ‘ क्रियापदें ’ असें म्हणण्यांत येतें त्यांस येथें ‘ धातू किंवा क्रिया ’ असें म्हटलें आहे. क्रिया शब्दास असा मान देण्याचें आणखी एक कारण असें कीं; क्रियापदाचीं जीं विशेषणें त्यास क्रियाविशेषणें असें म्हणतात. तेव्हां क्रियाविशेषण या संज्ञेच्या दृष्टीनें ‘ धातु ’ या शब्दाबरोबर ‘ क्रिया ’ या शब्दाचीही योजना करणें इष्ट दिसतें. यावरून आणखी एक मुद्दा सुचतो, तो असाः——क्रियेच्या विशेषणांस ज्याप्रमाणें क्रियाविशेषणें असें म्हणतात, त्याप्रमाणें नामांच्या विशेषणांस ‘ नामविशेषणें ’ असें म्हणणें इष्ट आहे. परंतु या अर्थी नुसता ‘विशेषण’ हा शब्द अगदीं रूढ झाल्यामुळें त्यांत फरक करण्याची गरज नाहीं. फक्त विशेषण म्हणजे नामविशेषण असें समजावें. एवंच विशेषणांचे दोन प्रकार आहेतः नामविशेषणें आणि क्रियाविशेषणें. ह्यांपैकीं नामविशेषणांस संक्षेपानें विशेषण म्हणण्याचा प्रचार रूढ झाला आहे. ही गोष्ट ध्यानांत धरिली म्हणजे ‘ विशेषण ’ ह्या शब्दाचे मागें ‘ नाम ’ हा शब्द जोडून परिभाषा अवजड करण्यांतही विशेष मतलब नाहीं.

परिभाषेच्या मुद्यानंतर त्यापेक्षां अधिक महत्त्वाच्या मुद्याकडे वळूं. तो शब्दाच्या जातींची संख्या हा होय. कोणी म्हणतात, शब्दांच्या जाती तीन आहेतः प्रातिपादिकें, धातुशब्द, आणि अव्ययें. प्रातिपदिकांचे पुन्हा तीन भेदः नामें, सर्वनामें, व विशेषणें. असे एकंदरींत त्यांच्या मतें शब्दांचे पांच भेद होतात. अव्ययांचे भेद ते मानीत नाहींत. या ठिकाणीं प्रथम प्रातिपदिक या शब्दाचा अर्थ मर्यादित आहे हे ध्यानांत ठेवावें. कारण कीं, संस्कृत व्याकरणांत प्रातिपदिकांमध्यें अव्ययांचाही अन्तर्भाव होतो; तथापि या वर्गीकरणांत अव्ययें हीं अलग काढिलीं आहेत. कोणी, आठांपैकीं सर्वनाम व केवलप्रयोगी हे दोन भेद गाळून बाकीचे सहाच मानितात. त्यांच्या मतें सर्वनामांचा नामें, विशेषणें व क्रियाविशेषणें या तिहींत अन्तर्भाव होतो; आणि केवलप्रयोगी शब्दांचा वाक्याशीं कांहीं संबंध नसतो, तर त्यांनीं स्वतंत्र वाक्येंच होतात; म्हणून व्याकरणांत हे शब्द अनावश्यक आहेत. दुसरे कोणी, अव्ययांपैकीं फक्त क्रियाविशेषण अव्यय अलग काढून बाकीच्यांचा अव्ययें असा वर्ग करून शब्दांच्या जाती सहा मानितात. शब्दांच्या जातींचे संख्येसंबंधानें असा थोडासा मतभेद दिसतो. तथापि दादोबा म्हणतात त्याप्रमाणें ‘ विचारपूर्वक पाहिलें असतां या भाषेंत शब्दांच्या पूर्वोक्त आठ जाति मानणें हेंच प्रशस्त दिसतें.’ उद्गारवाची अथवा केवलप्रयोगी अव्ययांसंबंधानें आगरकर आपल्या

वाक्यमीमांसेंत म्हणतात कीं, 'वाक्यमीमांसेंत याचा एकवार उल्लेख करण्यापली-कडे यांविषयीं विशेष चर्चा करीत बसण्याचें प्रयोजन नाहीं, व शब्दवर्गात यांचा समावेश करण्याची आवश्यकता नाहीं.' म्हणजे आगरकर हे केवल-प्रयोगीशिवाय बाकीच्या शब्दांच्या सात जाती मानितात; आणि त्या सातां-संबंधानें असें म्हणतात कीं, 'पाहिजे तेवढी हातचलाखी केली तरी या सात जातींपैकीं कोणत्याही जातींत पडणारा शब्द त्याच अर्थानें दुसऱ्या कोणत्याही जातींत घालतां येणार नाहीं, तसेंच ज्याला या सात जातींपैकीं एका जातींत घालतां येणार नाहीं, असाही शब्द भाषेंत सांपडावयाचा नाहीं. यावरून हा सप्तसंख्यात्मक जातिविभाग आवश्यक आहे व पूर्णही आहे असें मानिलें पाहिजे.' यावरून निदान सात भेद अवश्यक आहेत हें उघड आहे. आणि 'केवलप्रयोगी अव्ययांशिवाय शब्दांच्या सात जाती होतात' असें तेच त्याच पुस्तकांत अन्यत्र म्हणतात. एवंच केवल प्रयोगी अव्ययें धरून शब्दांच्या आठ जाती होतात, हें आगरकरांसही मान्य आहे. केवलप्रयोगी अव्ययांचें वाक्यमी-मांसेंत फारसें महत्त्व नसेल. तथापि व्याकरणामध्यें शब्दांचें वर्गीकरणांत त्यांस स्थळ देणें अवश्य आहे. 'ज्याला या सात जातींपैकीं एका जातींत घालतां येणार नाहीं असाही शब्द भाषेंत सांपडावयाचा नाहीं.' असें जेव्हां आगरकर म्हणतात, तेव्हां त्यांचे म्हणण्यांत 'केवलप्रयोगी अव्ययांशिवाय' या शब्दांचा अध्याहार आहे, हें 'केवलप्रयोगी अव्ययांशिवाय शब्दांच्या सात जाती आहेत' असें जें त्यांनीं अन्यत्र म्हटलें आहे त्यावरून उघड आहे. सारांश 'पाहिजे तेवढी हातचलाखी केली तरी' भाषेंतील एकंदर शब्दांच्या आठ जाती केल्याच पाहिजेत हें उघड आहे. राजवाडे म्हणतातः—'हे प्रकार (अव्ययांचे प्रकार) अशास्त्रतेस्तव संस्कृत व्याकरणांत नाहींत येथें लौकिकार्थानें दिले आहेत.' (श्रीज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण, पृष्ठ १३५.) अव्ययांचे प्रकार अशास्त्र खरेच, तरी 'लौकिका-र्थास,' उपयुक्ततेस, व रूढीस मान देणें योग्य असल्यामुळें राजवाड्यांनींही त्यांचा स्वीकार केला आहे. यामुळें शब्दजातींसंबंधाचा आतां ह्यापुढें वाद वाढ-विण्यांत अर्थ नाहीं. कोणत्याही भाषेमधील एकंदर शब्दांच्या नाम, सर्वनाम, विशेषण, धातु किंवा क्रिया, क्रियाविशेषण, उभयान्वयी, शब्दयोगी, आणि केवल-प्रयोगी किंवा उद्गारवाची, या आठ जाती आहेत हा सिद्धान्त भाषाशास्त्रज्ञांमध्यें आतां अगदीं सर्वसंमत झाला आहे. तेव्हां आतां या जातींच्या यथाक्रम विवर-णास लागणें बरें. ]

---

# अध्याय २.

## नाम.

१०१. वास्तविक किंवा काल्पनिक सृष्टींतील कोणतीही वस्तु दाखविणारा जो विकारी शब्द त्यास **नाम** म्हणतात. उ०:—पुस्तक, अक्षर, रामा, गोविंद, देव, शौर्य, विद्वत्ता, चांगुलपणा, इ०

या लक्षणांतील 'वस्तु' शब्दाचा उपयोग अत्यन्त विस्तृत अर्थानें केला आहे. त्यानें 'प्राणी, पदार्थ, व त्यांचे ठायींचे धर्म' या सर्वांचा बोध विवक्षित आहे. अशा अर्थानें सामान्य भाषेंत 'वस्तु' शब्दाचा उपयोग बहुधा होत नाहीं. तथापि व्यवहारांतील शब्द शास्त्रीय ग्रंथांत उपयोगांत आणावयाचे असतां, त्यांचे अर्थांत कांहीं न्यूनाधिक करून त्यांचा स्वीकार करणेंच इष्ट असतें. मात्र शास्त्रीय ग्रंथांतील त्यांचा अर्थ अगदीं तन्तोतंत ठरला पाहिजे. त्यांत कांहीं संदिग्धता कामाची नाहीं. तेव्हां 'वस्तु' शब्दाचा नामाचे लक्षणांतील वर सांगितलेला अर्थ नीट ध्यानांत धरिला म्हणजे त्या लक्षणाचा पूर्ण आशय समजेल.

[ निरनिराळ्या वैयाकरणांनीं दिलेलीं नामाचीं लक्षणें सोडून आज पुन्हा नामाचें नवीन लक्षण करण्याची काय आवश्यकता आहे? या ग्रंथांत बऱ्याच जागीं असाच प्रश्न उत्पन्न होण्याचा संभव आहे. म्हणून त्याचें आरंभींच एकदां उत्तर देऊन टाकणें चांगलें. आजपर्यंत दिलेलीं बहुतेक सर्व लक्षणें पूर्ण शास्त्रीय दृष्टीनें केलेलीं आहेत असें दिसत नाहीं; त्यामुळें न्यायशास्त्राचे कसोटीस तीं सर्वस्वी उतरावयाचीं नाहींत. प्रत्येक लक्षण घेऊन ते शास्त्राचे कसोटीस कां उतरत नाहीं, हें दाखविणें कांहीं अशक्य नाहीं. तथापि मेहनत व ग्रंथविस्तार फार होणार; म्हणून, तो प्रयत्न जरी मनोरंजक व विद्यार्थ्यांस बोधक होण्यासारखा असला, तरी बाजूस ठेवणें भाग आहे. शिवाय विघटनेपेक्षां घटना अधिक महत्त्वाची व इष्ट आहे; आणि चांगल्यानें वाइटाचें निराकरण आपोआपच होतें; व सत्याचें ज्ञान करून दिल्यानंतर असत्याचें ज्ञान वेगळें करून देण्याची गरज राहत नाहीं. म्हणून आजपर्यंतच्या प्रत्येक लक्षणाची सविस्तर शास्त्रीय परीक्षा न करितां इतकेंच सांगतों कीं, ज्या लक्षणांत लक्ष्य पद स्पष्टपणें किंवा कमजास्त गुप्तपणें आलेलें असतें तें लक्षण कसचें! त्याचप्रमाणें एका शब्दाचा अर्थ दुसऱ्या शब्दानें सांगणें म्हणजे एकास दुसरा प्रतिशब्द देणें हें त्या शब्दाचें लक्षण करणें किंवा त्याची व्याख्या सांगणें नव्हे.

मग 'नाम म्हणजे नांव' इतकें म्हटलें म्हणजे पुरे. नांव शब्द घेऊन त्याचे मागेंपुढें शब्दजाल पसरिणें शास्त्रीयदृष्ट्या केवळ व्यर्थ होय हें उघड आहे. कोणत्याही पदाचें लक्षण करणें म्हणजे त्याचा ज्या जातींत अन्तर्भाव होत असेल ती जाति आणि लक्ष्य पदाचा असाधारण धर्म किंवा व्यावर्तक, म्हणजे त्या जातींतील अन्य उपजातींपासून दिलेल्या पदाचे अर्थास भिन्न करणारा धर्म, या दोन गोष्टी सांगणें होय, हें न्यायशास्त्रज्ञांस विदितच आहे. कोणतेंही शास्त्रीय लक्षण याच मार्गानें झालें पाहिजे. शब्दाचा अर्थ दुसऱ्यास समजावून सांगण्याचे अनेक मार्ग असूं शकतील, तथापि त्या सर्वांस लक्षण म्हणतां यावयाचें नाहीं. लक्षण म्हणजे जाति अधिक असाधारण धर्म. हें जर खरें, तर नामाची जाति व असाधारण धर्म सांगितला म्हणजे त्याचें न्यायशुद्ध शास्त्रीय लक्षण झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. नामाचा कोणत्या अधिक व्यापक वर्गांत अन्तर्भाव होतो? तो वर्ग त्याची जाति होत. नामाचा अन्तर्भाव विकारी शब्दांत होतो, म्हणजे विकारी शब्दांच्या नाम, सर्वनाम, इत्यादि चार उपजाति आहेत हे पूर्वी सांगितलेंच आहे; तेव्हां 'विकारी शब्द' ही नामाची जाति, होय. आणि 'वास्तविक किंवा काल्पनिक सृष्टींतील कोणतीही वस्तु दाखविणें' हा त्याचा असाधारण धर्म होय; म्हणजे हा धर्म विकारी शब्दाचे सर्वनामादि इतर उपजातींमध्यें दृष्टीस पडत नाहीं, तर तो नामाचेच ठायीं आहे. ह्यावरून नामाचें वर दिलेलें लक्षणच शास्त्रीयदृष्ट्या कां स्वीकरणीय होय हें वाचकांचे नजरेस येईलच.

'पदार्थमात्राचें नांव,' 'कशाचें तरी नांव' हीं लक्षणें सोपीं, सरळ, व आटपसर आहेत असें वाटण्याचा संभव आहे. परंतु प्रथम हीं लक्षणेंच नव्हत; तर 'नाम म्हणजे नांव' असें म्हणण्यापैकींच आहेत हें उघड आहे. लहान मुलांची समजूत घालण्याचे कामीं त्यांचा, शास्त्रीय लक्षणांपेक्षां अधिक उपयोग होईल हें निर्विवाद आहे. तथापि शास्त्रीय लक्षण म्हणून त्यांचा स्वीकार करण्याच्या योग्यतेचीं तीं मुळींच नाहींत हें वरील विवेचनावरून वाचकांचे ध्यानांत आलेंच असेल. शिवाय कोणत्याही नामाचें लक्षणांत काल्पनिक सृष्टीचा उल्लेख केलेला दिसत नाहीं. वेताळपंचविशी, शुकबहात्तरी, इसापनीति, ह्या पुस्तकांसारख्या कल्पित गोष्टींच्या पुस्तकांत आणि काल्पनिक नाटकांत व कादंबऱ्यांत जी सृष्टि वर्णिलेली असते त्या सृष्टींतील प्राण्यांचीं, पदार्थांचीं, आणि त्यांचे धर्मांचीं नांवें व्याकरणांतील नामवर्गांत येत नाहींत काय? या दृष्टीनें पहिलें असतां सदरहू आडनांवी लक्षणें अपुरींही होत; म्हणजे न्यायशास्त्राचे भाषेनें त्यांत अव्याप्तीचाही दोष आहे, असें म्हटल्याशिवाय गत्यन्तर नाहीं.

१०२. नामें दोन प्रकारचीं आहेत: **धर्मिवाचक** आणि **धर्मवाचक**.

१०३. ज्या नामांनीं प्राण्यांचा अथवा पदार्थांचा अथवा त्यांच्या समुदायांचा बोध होतो, त्यास **धर्मिवाचक नामें** असें म्हणतात. उ०:—गोविंद, मनुष्य, प्राणी, कागद, शाई, सैन्य, सभा, शाळा, इ०.

धर्मिवाचक नामांसंबंधानें लक्षांत ठेवण्याची गोष्ट इतकीच कीं, ह्या नामांनीं एका किंवा अनेक प्राण्यांचा, एका किंवा अनेक पदार्थांचा, किंवा प्राण्यांच्या अथवा पदार्थांच्या एका किंवा अनेक समुदायांचा, बोध होतो. प्राणी व पदार्थ ह्या दोहोंसही सारखाच लागू पडणारा शब्द प्रचारांत नाहीं. म्हणून 'धर्मी' हा शब्द योजिला आहे. धर्मी म्हणजे ज्याचे ठायीं धर्म म्हणजे गुण वास करितात तो; आणि प्राणी हा सजीव धर्मी, व पदार्थ हा निर्जीव धर्मी होय हें उघड आहे. जगांत कोणताही धर्म म्हणजे गुण हा स्वतंत्रपणें अस्तित्वांत नाहीं. सर्व धर्म प्राण्यांचे किंवा पदार्थांचे ठायीं आढळतात. धर्मास स्वतंत्र अस्तित्व नाहीं; पण धर्मीस आहे. ह्यावरूनही धर्म आणि धर्मी ह्यांमधील फरक स्पष्ट होईल.

१०४. धर्मिवाचक नामांत **दोन** प्रकार आहेतः **विशेषनामें** आणि **सामान्यनामें.**

१०५. ज्या नामांनीं एका धर्मीचा, म्हणजे एका प्राण्याचा, पदार्थाचा, किंवा त्यांच्या एका समूहाचा, बोध होतो त्यांस **विशेषनाम** असें म्हणतात. उ०:—ब्रह्मा, विष्णु, महेश, गोपाळ, नर्मदा, गंगा, निर्णयसागर, इ०.

विशेषनाम हें ज्या अर्थी एकाच धर्मीचें नांव आहे, त्या अर्थी तें एकवचनी असतें; आणि बहुधा तें निरर्थक म्हणजे अर्थहीन असतें. ह्याचा अर्थ असा कीं, त्याचे योगानें ज्या एका धर्मीचा बोध होतो त्याचे अंगच्या कोणत्याही धर्माचा बोध त्या नामापासून होत नाहीं. नर्मदा ह्या नांवानें एका स्त्रीचा, एका नदीचा, एका गाईचा, किंवा ज्या कोणाचें किंवा कशाचें नर्मदा हें नांव असेल त्याचा बोध होईल. तथापि तन्नामधारी व्यक्तीचे ठायींचा एकही धर्म किंवा गुण त्या नांवापासून समजावयाचा नाहीं. म्हणूनच 'नांव सोनूबाई आणि हातीं कथलाचा वाळा' अशी जी म्हण पडली आहे, तिजवरून विशेषनामाचें अर्थहीनत्व स्पष्ट होतें. कांहीं कांहीं विशेषनामांस मूळचा अर्थ असतो, पण त्याचा लोप होऊन तीं केवळ अर्थशून्यपणेंच उपयोगांत असतात. गोपाळ म्हणजे गाईंचा रक्षक किंवा गोवारी, गुराखी, असा मूळचा अर्थ असल्यामुळेंच तो शब्द

प्रथम कृष्णाचा वाचक झाला; आणि तेव्हां तो कांहीं विशेषनाम म्हणजे अर्थहीन नांव नव्हता. परन्तु गोपाळ या प्रचारांतील विशेषनामांतून तो अर्थ सर्वस्वी अन्तर्धान पावला आहे, असेंच म्हटलें पाहिजे. म्हणूनच गोपाळ या नांवावरून तन्नामधारी व्यक्तीसंबंधानें आपणास कांहीं एक माहिती समजत नाहीं. तेव्हां विशेषनामें हीं बहुधा अर्थशून्य होत असेंच म्हटलें पाहिजे. 'बहुधा' असें म्हणण्याचें कारण इतकेंच कीं, ब्रह्म, परमात्मा, ईश्वर, ब्रह्माण्ड, इ० थोडींशीं नामें एकाच धर्मीस लागणारीं असूनही तीं केवळ अर्थशून्य नाहींत तर सर्वस्वी अर्थपूर्ण आहेत हें उघड आहे. तसेंच 'आमचे बादशहा,' 'मराठी राज्याचे संस्थापक' इ० विशेषनामें एकाच व्यक्तीस जरी लागणारीं असलीं, तरी तीं सार्थ आहेत हें निर्विवाद आहे. कदाचित् कोणी असें म्हणेल कीं, हीं मुळीं विशेषनामेंच नव्हत. आमचे बादशहा इ० शब्दांचें आम्हीं स्वतंत्र व्याकरण करूं; त्या शब्दांमिळून एक विशेषनाम समजण्याची कांहीं जरूर नाहीं हें म्हणणें कांहीं अंशीं ठीक आहे. शिवाय 'मराठी राज्याचा संस्थापक' हा शब्दसमूह एकाच व्यक्तीस लागावा असें तात्त्विक व व्यापक दृष्टीनें म्हणतां यावयाचें नाहीं; त्यानें शिवाजीचाच बोध होतो हें खरें; तथापि भविष्यकाळीं जर कोणी मराठी राज्याची स्थापना करणारा प्रतापशाली नरकेसरी सुदैवानें निर्माण झाला तर त्यास 'मराठी राज्याचा संस्थापक' हें वर्णन अक्षरशः लागू पडेल हें उघड आहे. म्हणजे हें विशेषनाम नसून बीजरूपानें म्हणजे तत्त्वतः सामान्यनामच होय, हें कोणीही शास्त्रीय दृष्टीचे मनुष्यास कबूल केलेंच पाहिजे. तथापि व्यावहारिक दृष्टीनें त्यास विशेषनाम म्हणण्यास हरकत नाहीं हें उघड आहे. तसेंच, मराठी, राज्याचा, संस्थापक, ह्या शब्दांचें स्वतंत्र व्याकरण जरी शक्य आहे, तरी त्या शब्दांची अशी फोड करून त्यांतील अर्थाची हानि करणें म्हणजे वैयाकरणाची गाजलेली शुष्क अरसिकता व्यर्थ प्रकट करणें होय. शिवाय 'मराठी राज्याचा संस्थापक' या स्थळीं जरी तशी फोड व्याकरणास उपलब्ध असली, तरी 'महाराष्ट्रराज्यसंस्थापक' अशा सामासिक शब्दांत महाराष्ट्र, वगैरे शब्दांचें स्वतंत्र व्याकरण करण्याची कलतिही उपयोगी पडत नाहीं. म्हणून ह्यांस स्थूल दृष्टीनें सार्थ विशेषनामें म्हणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.

१०६. विशेषनामांचें पूर्ण आकलन होण्याकरितां आणखी कांहीं वेगळ्या प्रकारचीं उदाहरणें घेऊं. वार, महिने संवत्सर, सण, जयन्त्या, लोक, ग्रह, नक्षत्रें, इत्यादिकांची नांवें हीं सर्व विशेषनामांचींच उदाहरणें होत. कारण कीं, एक तर तीं एकेकाच वस्तूचीं नांवें आहेत. आणि दुसरें तीं अर्थशून्य आहेत. सोमवार म्हणजे आठवड्यांतील एकच वार; आणि त्यास सोमवार कां म्हणावें अथवा त्या दिवसाचे ठिकाणीं असें काय विशेष चिह्न आहे कीं, त्यास सोमवार म्हटलें पाहिजे हें सांगतां येत नाहीं, ह्या गोष्टी उघड आहेत. कधीं कधीं हीं नामें अनेकवचनीं उपयोगांत येतात. तेव्हां त्यांस सामान्यनामें म्हणावें. जसें:—त्यानें सोळा **सोमवार** केले, गुरूस सहा **चन्द्र** आहेत असें म्हणतात. इ०.

१०७. ज्या नामांनीं अनेक धर्मींचा अथवा धर्मिसमुदायांचा म्हणजेच जातीचा किंवा वर्गाचा बोध होतो, त्यांस **सामान्यनामें** असें म्हणतात. उ०:—मनुष्य, दौत, पेटी, पुस्तकसंग्रह, अरण्य, इ०.

सामान्यनामाची मुख्य विशिष्ट गोष्ट ही कीं, तें अनेकांस लागतें. एकाच प्रकारच्या अनेक व्यक्तींस किंवा अनेक समुदायांस तें लावितां येण्याचें कारण इतकेंच कीं, त्या अनेकांमध्यें कांहीं सर्वसाधारण धर्म किंवा साधर्म्य असतें. ह्या साधर्म्याचेच योगानें अनेक धर्मींचा एक वर्ग किंवा जाति होते; आणि त्या जातींतील प्रत्येक व्यक्तीस व त्या सबंध जातीस म्हणजे वर्गास लागणारें नाम प्रचारांत येतें. मनुष्य हें नाम ह्या वर्गांतील प्रत्येक प्राण्यास आणि सर्व मनुष्यजातीस लागतें. मनुष्यत्व हें साधर्म्य होय. अरण्य म्हणजे झाडांचा एकत्र समूह. परंतु असे समूह अनेक असून त्यांपैकीं प्रत्येक समूहास अरण्य हा शब्द लागतो; ह्यामुळें अरण्य हें समुदायवाचक सामान्यनाम होय. अरण्यत्व हा साधारण धर्म होय. 'न्यू स्कूल' हेंही एक गुरुशिष्य समुदायवाचक नाम आहे; परंतु तें एका विशेष समुदायासच लागणारें असल्यामुळें तें सामान्यनाम नव्हे, तर विशेषनाम होय. शिवाय तें नाम आतां अर्थहीनही आहे; त्यावरून त्या विद्यालयाचे ठायींच्या धर्माचा बोध होत नाहीं. परंतु सामान्यनामास अर्थ असतो. ज्या अनेकांस तें लागतें, त्यांचेठायीं दृष्टीस पडणारें साधर्म्य हें त्याचें प्रवृत्तिनिमित्त होय. विशेषनामास प्रवृत्तिनिमित्त नाहीं.

१०८. ज्या नामानें प्राणी अथवा पदार्थ ह्यांमध्यें वास करणाऱ्या कोणत्याही धर्माचा म्हणजे गुणाचा अथवा भावाचा बोध होतो, त्यास **धर्मवाचक नाम** असें म्हणतात. ह्यासच दादोबा 'भाववाचक' आणि गोडबोले 'गुणबोधक' नाम असें म्हणतात. उ०:—चांगलेपणा, शौर्य वक्तृत्व, विद्वत्ता, गुलामगिरी, पाटीलकी, करणें, बोलणें, दळण, कांडण, समजूत, वागणूक, शंका, समाधान, रंग, रूप, इ०.

(एकंदरींत नामांचे तीन भेद आहेत: विशेषनाम, सामान्यनाम आणि धर्मवाचक किंवा भाववाचक नाम. ह्या भेदांचीं लक्षणें वर आलींच आहेत. तथापि त्यांमधील परस्पर साधर्म्य व वैधर्म्य ह्यांविषयीं थोडासा खुलासा करणें जरूर आहे. विशेषनाम आणि सामान्यनाम हीं दोन्ही धर्मिवाचक आहेत; आणि भाववाचक नाम धर्मवाचक किंवा गुणवाचक आहे. तसेंच विशेषनामानें एक-धर्मी दाखविला जातो. आणि सामान्यनामानें अनेक धर्मी दाखविले जातात; व विशेषनाम बहुधा अर्थहीन असतें आणि सामान्यनामास अर्थ असतो, हें पूर्वी आलेंच आहे. सामान्यनामानें ज्या वर्गाचा अथवा जातीचा बोध होतो, त्या वर्गांतील व्यक्तींमध्यें दृष्टीस पडणारें साधर्म्य त्या नामाचें प्रवृत्तिनिमित्त होय; म्हणजेच हा साधारण धर्म त्या नामाचा अर्थ होय असा अर्थ विशेषनामास नसतो, म्हणजे त्यानें कोणत्याही धर्माचा बोध सहसा होत नाहीं. धर्मवाचक नामें हीं सामान्यनामांप्रमाणेंच अर्थपूर्ण आहेत; तींही सामान्यनामांप्रमाणेंच धर्म दाखवितात. तेव्हां या दोहोंमधील फरक समजून घेतला पाहिजे. 'मनुष्य' या सामान्यनामानें मनुष्यत्वाचा बोध होतो, आणि 'मनुष्यत्व' या धर्मवाचक नामानेंही त्याचाच बोध होतो हें खरें. तरी 'मनुष्य' या सामान्य-नामानें धर्मीचा म्हणजे तें नांव ज्या प्राण्यांस लागतें त्यांचाही बोध होतो. परंतु 'मनुष्यत्व' या धर्मवाचक नामानें प्राण्यांचा प्रत्यक्ष बोध होत नाहीं. जर त्यानें प्राण्यांचा बोध झालाच तर तो अप्रत्यक्षपणें होतो; कारण, त्या प्राण्यांस 'मनुष्यत्व' हा शब्द लावितां येत नाहीं. 'पदार्थ' या सामान्यनामाचे अर्थांत रंग व आकृति या धर्मांचा अन्तर्भाव होतो. तथापि रंग व आकृति या धर्मवाचक नामांनीं पदार्थांचा बोध प्रत्यक्ष होत नाहीं हें उघड आहे. म्हणजे सामान्यनामांनीं धर्मी व धर्म या दोहोंचा बोध होतो; आणि धर्मवाचक नामांनीं फक्त धर्मांचा म्हणजे गुणांचा बोध होतो; त्यांनीं धर्मींचा बोध झालाच तर तो केवळ अप्रत्यक्ष होय. कारण कीं, धर्मी हे स्वतंत्रपणें सृष्टींत आढळतात; परंतु धर्म हे केवळ धर्मींच्याच ठायीं वास करित असल्यामुळें म्हणजे धर्मींच्याच आश्रयानें राहत असल्यामुळें धर्मवाचक नामांनीं तदाधारभूत धर्मींचाही अप्रत्यक्ष बोध झाल्यास नवल नाहीं. तथापि धर्मींचा बोध हें धर्मवाचक नामांचें जीवित नव्हे, ही गोष्ट तीं नामें धर्मीस प्रत्यक्ष लावितां येत नाहींत ह्यावरून उघड आहे.

विशेषनामें ज्याप्रमाणें एकवचनींच येतात, त्याचप्रमाणें धर्मवाचक नामेंही प्राधान्येंकरून एकवचनींच येतात. कारण कीं, एक धर्म जरी अनेक स्थळीं आढळला तरी तो एकच होय. मनुष्यत्व हा धर्म सर्वत्र एकच. तथापि एखाद्या धर्माचे निरनिराळे प्रकार दाखवावयाचे असतां धर्मवाचक नाम अनेकवचनींही उपयोगांत येतें. रंग हा धर्म जिकडे तिकडे एकच. तरी तांबडा, काळा, पांढरा, इ० प्रकार विवक्षित असतां रंग शब्द अनेकवचनी येतो. उदाहरणार्थ, 'रंग अनेक आहेत.' अशा ठिकाणी मूळच्या धर्मवाचक नामाचा सामान्यनामाप्रमाणें उपयोग झाला आहे असें म्हणतात. ज्याप्रमाणें विशेषनामाचा उपयोग अनेकवचनीं झाला म्हणजे त्यास सामान्यनामाचें स्वरूप प्राप्त होतें, त्याचप्रमाणें धर्मवाचक नामांचे अनेकवचनीं त्यांसही सामान्यनामाचें स्वरूप येतें. 'आमचे शाळेंत पांच गोपाळ आहेत' या वाक्यांत 'गोपाळ' शब्दास सामान्यनाम म्हणण्याचें कारण असें कीं, त्यानें एक तर अनेक धर्मींचा बोध होत आहे आणि त्यास 'गोपाळ हें नांव धारण करणारे' असा अर्थही प्राप्त झाला आहे. 'त्रिकोण, चौकोन, वर्तुळ, इ० अनेक आकृती आहेत.' या वाक्यांत 'आकृति' ह्या मूळ धर्मवाचक नामाचे ठायींही अनेकत्व व साधर्म्यदर्शकत्व ह्या दोन्ही गोष्टी दिसत असल्यामुळें त्यासही सामान्यनामाचें स्वरूप प्राप्त होत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. बाकी या ठिकाणीं आकृति या धर्मवाचकास जें अनेकत्व आहे, तें धर्मप्रकारांमुळें आहे, धर्मींमुळें नव्हे. धर्मवाचकानें धर्मींचा बोध प्रत्यक्षपणें व्हावयाचाच नाहीं. परंतु त्या धर्माचे जे अनेक प्रकार तेच जणु कांहीं अनेक धर्मी होत व त्यांचे ठायींचें साधर्म्य हें प्रवृत्तिनिमित्त साक्षात् आहेच. तेव्हां येथें आकृति ह्या धर्मवाचक नामाचा सामान्यनामाप्रमाणें उपयोग झाला आहे. म्हणून विशेषनामें व धर्मवाचकनामें अनेकवचनीं उपयोगांत येतात, तेव्हां त्यांस सामान्यनामाचें स्वरूप प्राप्त होतें असें म्हणतात.

सामान्यनामानें धर्मी व धर्म या दोहोंचा बोध होतो, व धर्मवाचक नामानें फक्त धर्माचा बोध होतो. हा सिद्धान्त स्पष्ट समजण्यासाठीं थोडेसें त्यांच्या उपपत्तीकडे पहा. सृष्टीमध्यें फक्त विशेष व्यक्ति म्हणजे विशेष प्राणी व विशेष पदार्थ काय ते अस्तित्वांत आहेत. त्यांचे वर्ग केलेले नाहींत. वर्गीकरण हें मनुष्याच्या बुद्धीचें काम आहे. मनुष्यास प्रथम विशेष धर्मी दिसतात. समजा कीं, प्रथम आपण एक प्राणी पाहिला. त्याचा रंग अमुक आहे, त्याचा आकार अमुक आहे म्हणजे त्याचे ठायीं अमुक धर्म आहेत, असें आपणास आढळलें. नंतर आपण तशाच प्रकारचे अनेक प्राणी जेव्हां पाहिले व त्यांमधील साधर्म्य नीट समजून घेतलें, तेव्हांच आपण त्या साधर्म्याचे आधारावर त्या अनेकांचा एक वर्ग कल्पून त्यास 'घोडा' असें नांव दिलें. तेव्हां 'घोडा' या शब्दानें कांहीं एका प्रकारच्या अनेक व्यक्तींचा व तन्निष्ठ साधारण धर्माचाही बोध आपणांस व्हावा हें योग्यच आहे. परंतु घोडा हा वर्ग आपल्या मनांत उत्पन्न होण्यापूर्वी

जेव्हां आपण निरनिराळे प्राणी पाहिले किंवा जेव्हां आपण प्रथमच घोडा हें जनावर पाहिलें आणि त्याच्या अंगी अमुक अमुक धर्म आहेत असें जेव्हां आपणास आढळलें, त्यावेळींच रंग, रूप, इ० धर्मांची धर्मीपासून भिन्न कल्पना आपल्या मनांत आली. त्यामुळें धर्मवाचक नामानें धर्मीचा प्रत्यक्ष बोध होत नाहीं. धर्मीशिवाय धर्मांचें अस्तित्वच शक्य नाहीं. म्हणून प्रत्येक धर्माबरोबर तदाधारभूत धर्मी येतो हें खरें; तथापि कल्पनेमध्यें धर्मांचे स्वतंत्र अस्तित्व शक्य असल्यामुळें धर्मवाचक नामानें धर्मीचा प्रत्यक्ष बोध होण्याची जरूर नाहीं. परंतु सामान्यनामाच्या उत्पत्तीमध्येंच अनेक धर्मी व तन्निष्ठ साधर्म्य ह्या दोहोंची आवश्यकता असल्यामुळें सामान्यनामानें दोहोंची कल्पना मनांत येणें साहजिक आहे. तथापि सामान्यनामाचा प्रत्यक्ष उपयोग धर्मी दाखविण्याचें कामीं होतो; म्हणजे तें धर्मीसच लागतें, धर्मास लागत नाहीं हें उघड आहे. त्याचप्रमाणें धर्मवाचक नाम धर्मासच प्रत्यक्ष लावितां येतें, धर्मीस लावितां येत नाहीं. 'मनुष्य' हें कांहीं प्राण्यांस लागतें; आणि जरी त्यानें ह्या धर्मीबरोबर मनुष्यत्व ह्या धर्माचा बोध होत असला, तरी मनुष्य हा शब्द त्या मनुष्यत्व धर्मास लागत नाहीं. तसेंच 'माधुर्य' या शब्दानें जरी मधुर पदार्थांचा अप्रत्यक्ष बोध झाला, तरी 'माधुर्य' या शब्दाचा प्रयोग मधुर पदार्थांवर कदापि व्हावयाचा नाहीं. म्हणूनच सामान्यनामानें धर्मीबरोबर तन्निष्ठ धर्माचाही अर्थदृष्ट्या जरी बोध होत असला तरी धर्मदर्शकत्वाचा उल्लेख त्याचें लक्षणांत करितां येत नाहीं. तसेंच धर्मवाचक नामानें धर्मीचा बोध होतो असें जरी मानिलें, तरी धर्मिदर्शकत्व हें त्याचें लक्षण होऊं शकत नाहीं.

यावरून ज्या नामांनीं कोणत्याही प्राण्याचा अथवा पदार्थाचा प्रत्यक्ष बोध होत नाहीं, म्हणजे जीं कोणत्याही प्राण्यांस, पदार्थांस, अथवा त्यांचे समुदायास प्रत्यक्ष लावितां येत नाहींत, तीं सारीं धर्मवाचक किंवा भाववाचक नामें होत हें उघड आहे. ]

१०९. विशेषनामें व धर्मवाचक नामें जेव्हां अनेकवचनीं उपयोगांत येतात तेव्हां त्यांस सामान्यनामें म्हणतात. सर्व **आडनांवें** हीं मूळचीं विशेषनामें म्हणजे एक धर्मी दाखविणारीं होत; परंतु त्यांस अनेकधर्मिदर्शकत्व प्राप्त झाल्यामुळें त्यांस सामान्यनामाचें स्वरूप आलें आहे. दुसरीं उदाहरणें:—येत्या श्रावण महिन्यांत पांच **मंगळवार** आहेत; तिचीं किती **बाळतपणें** झालीं? **जन्ममृत्यूंची** सरकारांत नोंद होते; इ०.

११०. विशेषनामें व धर्मवाचक नामें ह्यांचा कधीं कधीं एकवचनांतही सामान्यनामाप्रमाणें उपयोग होतो. उदाहरणें:—

(अ) तो केवळ **कर्ण** आहे; त्या **कैकयी**च्या तोंडास कोण लागेल; तो अगदीं **पेंद्र्** आहे; इ० वाक्यांत, कर्ण, कैकयी, पेंद्र् हीं मूळचीं विशेषनामें असून उदार, भांडखोर, शिळपट मनुष्य, अशा अर्थानें त्यांचा उपयोग झाला असल्यामुळें तीं त्या त्या स्थळीं सामान्यनामाप्रमाणें योजिलेलीं आहेत.

(आ) तो एक जिवंत मृत्यु आहे; या ठिकाणी मृत्यु म्हणजे बहुतेक प्रेतच होय. तसेंच 'संसारांत पैशासारखें **सुख** नाहीं;' या ठिकाणीं सुखाचा अर्थ, सुखकारक पदार्थ, असाच समजला पाहिजे. म्हणून मृत्यु व सुख हीं मूळचीं धर्मवाचक नामें वरील उदाहरणांत सामान्यनामाप्रमाणें उपयोगांत आलीं आहेत हें उघड आहे.

टीपः—कांहींकांच्या मतें (अ) मधील विशेषनामांचा उपयोग सामान्यनामासारखा नसून विशेषणासारखा आहे. म्हणजे कर्ण, कैकेया, पेंद्र् यांस ते सामान्यनामें न म्हणतां विशेषणें म्हणतात, परंतु तो कर्ण आहे, तो पेंद्रू आहे' इत्यादि स्थळीं 'तो उदार आहे, तो शिळपट आहे' असा त्यांचे जागीं उदार व शिळपट या विशेषणांचा उपयोग केला तरी चालतें हें खरें; तरी 'त्या कैकेयीच्या तोंडास कोणी लागावें,' 'तो एक कर्ण आहे' ह्या उदाहरणांत कैकेयी व कर्ण ह्यांचे जागीं भांडखोर व उदार या विशेषणांचा उपयोग विशेषणरूपानें नीटसा होत नाहीं हें उघड आहे; ह्यामुळें त्यांस कोठेंच विशेषण म्हणणें प्रशस्त नाहीं.

१११. कांहीं सामान्यनामेंही विशेषनामांप्रमाणें उपयोगांत येतात. उदा०:—पुरी = जगन्नाथ; नगर = अहमदनगर; लष्कर = ग्वाल्हेर; इ०.

हिमालय, देवेन्द्र, गोपाल, पुरुषोत्तम, इ० उदाहरणेंही मुळचीं याच मासल्याचीं होत. तथापि या शब्दांचा सामान्यनामाप्रमाणें हल्लीं फारसा उपयोग होत नाहीं. तीं आतां बहुतेक विशेषनामेंच झालीं आहेत. परंतु पुरी, नगर, लष्कर इ० वरील उदाहरणें अद्यापि सामान्यनामाप्रमाणेंही प्रचारांत असून त्यांचा तीं तीं स्थळें दाखविण्याचें कामीं विशेषनामाप्रमाणेंही उपयोग होतो; म्हणून पुरी वगैरे उदाहरणें अधिक योग्य होत.

## नामांचे जागीं येणारे शब्द.

**११२. सर्वनामें** नामाप्रमाणें उपयोगांत येतात. तीं एका प्रकारचीं नामेंच होत, हें त्यांच्या नांवावरूनही सिद्धच आहे. त्यांचें सविस्तर विवेचन पुढील अध्यायांत येणारच आहे.

११३. मराठींत **विशेषणाचा** नामाचे जागीं फारच उपयोग होतो. जसें:—**शहाण्यास** मार शब्दांचा, **आंधळ्यासी** जन सारेचि आंधळे, सन्मार्ग सोडूनि **भले** न जाती, इ०.

११४. कधीं कधीं कांहीं **केवलप्रयोगी** किंवा उद्गारवाची शब्दांचा नामाप्रमाणें उपयोग होतो. तेव्हां तीं धर्मवाचक नामें होतात. जसें:— त्याची **वाहवा** झाली, त्याची **छीथू** झाली, इ०.

११५. **कोणताही शब्द** किंवा **कोणतेंही अक्षर** केवळ एक शब्द किंवा एक अक्षर म्हणून नामाप्रमाणें योजितां येतें. जसें:—परन्तुरामायणामध्यें मोरोपंतानें प्रत्येक आर्येत '**परन्तु**' घातलें आहे, तुझी **श्री** इतकी रोडावली कां, **की** ची वेलांटी नीट काढ, इ०.

[ नामांच्या भेदांविषयीं अलीकडे थोडासा वाद उत्पन्न झाला आहे. दादोबांनीं सामान्य, विशेष, व भाववाचक असे तीनच भेद मानिले आहेत. समुदायवाचक व द्रव्यवाचक नामें म्हणून आणखी दोन प्रकार मानण्याकडे आधुनिकांचा कल दिसतो. परंतु या भेदांची इंग्रजी भाषेंत जरी कांहीं जरूरी असली तरी मराठी भाषेंत हे भेद निष्कारण होत. शिवाय त्यांचा वरील वर्गीकरणांत अन्तर्भाव होतच आहे. आणि हे भेद मानण्याचा ज्यांचा कल दिसतो, तेही त्यांसंबंधानें सादर व सोत्कंठ दिसत नाहींत. म्हणून त्यांच्या संबंधाच्या खलांत वेळ न घालवितां ते मराठी व्याकरणांत स्वीकारार्ह नाहींत, इतकेंच सांगितलें म्हणजे पुरे आहे.

परंतु, दादोबांनीं मानिलेल्या तीन जाती तरी मानण्याची मराठी भाषेंत काय जरूर आहे ? 'वास्तविकपणें म्हटलें म्हणजे, मराठी व्याकरणांत नामाच्या जाती सांगण्याची आवश्यकता नाहीं...........आतां वडिलोपार्जित वहिवाट चालत आलेली मोडणें हें पातक वाटत असल्यास अथवा व्यवहारज्ञानाच्या वृद्धीला उपयोगीं पडतील म्हणून सामान्य, विशेष आणि फार तर भाववाचक, आणि सर्वनाम, असे विभाग दिले तर पुरेत असें आम्हांस वाटतें.' ( विविधज्ञानविस्तार पु. २१, अंक ९।१० ) हें सुप्रसिद्ध भाषाभिज्ञ गुंजीकर ह्यांचें मत आहे. त्यांनीं जरी 'मराठी व्याकरणांत नामांच्या जाती सांगण्याची कांहीं आवश्यकता नाहीं' असें म्हटलें आहे तरी तें अक्षरशः खरें नाहीं. कारण कीं, व्युत्पत्तिप्रकरणांत साधित शब्दांचे विचारामध्यें त्यांचा बराच उपयोग होतो हें त्या प्रकरणीं वाचकांस कळून येईलच. तसेंच विभक्ति-प्रकरणांतही त्यांचा थोडाफार उपयोग आहेच. यासंबंधानें एक गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. ती अशी:—कांहीं लोकांस ज्याप्रमाणें मराठी व्याकरणास आंग्ल व्याकरणाचें वळण

देणें बहुतांशीं पसंत पडतें, त्याप्रमाणें दुसऱ्या कांहीं जणांस त्याला केवळ संस्कृत वळणावरच होईल तितकें परत आणणें अवश्य वाटतें. परंतु ज्याप्रमाणें संस्कृत भाषेशीं असलेला मराठीचा संबंध तोडून टाकणें शक्य नाहीं, त्याचप्रमाणें इंग्रजी भाषेशींही घडलेला तिचा अर्वाचीन संबंध सर्वस्वी विसरणें शक्य नाहीं. एवंच इंग्रजी वळणाचें सर्वस्वीं निराकरण जरी इष्ट असलें तरी शक्य नाहीं. आणि ज्ञानाचे प्रत्येक शाखेस पाश्चात्त्यांनीं सूक्ष्म विचारांती व दीर्घोद्योगानें जें पूर्णत्व आणिलें आहे, तें मनांत आणिलें असतां मराठीस इंग्रजीच्या सहवासापासून सर्वथा परावृत्त करणें इष्टही नाहीं. तात्पर्य इतकेंच कीं, अव्ययांचे क्रियाविशेषणादि भेद संस्कृत व्याकरणांत नसले तरी आतां ते मराठींत मानणें ज्याप्रमाणें अवश्य वाटतें, त्याचप्रमाणें नामांचे भेद मराठींत मानण्यास हरकत नाहीं; इतकेंच नव्हे. तर तसें करणें इष्ट व अवश्यही आहे. शिवाय, अखेरीस गुंजीकरही तीन भेद मानण्याचे विशेष विरुद्ध नाहींत हेंही वरील उताऱ्यावरून समजेलच.

परंतु जरी नामांचे भेद मानणें अवश्य असलें तरी सामान्य व विशेष हे दोनच भेद पुरेत; भाववाचकाची जरूर नाहीं असें कांहीं विद्वानांचें मत आहे. ‘ सामान्यनामें व विशेषनामें या विभागांप्रमाणें भाववाचक नामें असाही एक प्रकार कोणी कोणी ग्रंथकार सांगतात. चांगलेपणा, कमताई, मधुरत्व इ० या प्रकारच्या नामांचीं उदाहरणें देतात. परंतु, हा भाववाचक नामांचा वेगळा वर्ग सांगण्याचें व्याकरणांत कांही एक प्रयोजन आह्मांस दिसत नाहीं. अशा प्रकारच्या नामांचा एक वर्ग आहे, इतक्यावरून जर तो सांगावा तर दळणावळ, करणावळ, शिवणावळ इत्यादि नामांचाही एक वर्ग करून त्यास मौल्यवाचक नामांचा वर्ग असें नांव ठेवून या प्रकारें पुष्कळ भेद करितां येतील. ’ ( कृष्णशास्त्री चिपळूणकरकृत मराठी व्याकरणावरील निबंध. पृ० ५० ). जोशी यांनीं कृष्णशास्त्र्यांस अनुसरून ‘ हे दोन भेद पुरे आहेत ’ असें ह्मणून शिवाय जातिवाचक, भाववाचक, द्रव्यवाचक, व समुदायवाचक असे सामान्यनामांचे पाहिजे तर भेद करितां येतील असें सांगितलें आहे.

जोशी यांस पाठबळ तर रथीमहारथींचें आहे. तरी त्यांचा पक्ष अगदी निर्जीव दिसत आहे, आणि तो अखेरीस रसातळास गेलाच पाहिजे असें पुढील विवेचनावरून दिसून येईल. जातिवाचक, भाववाचक, द्रव्यवाचक, समुदायवाचक, असे सामान्यनामांचे चार पोटभेद आहेत, असें जोशी यांनीं सामान्यनामांचें जें वर्गीकरण दिलें आहे, त्याकडे पहा. मनुष्य, झाड, घोडा, इ० हीं जातिवाचक, आणि सोनें, लांकूड पाणी, इ० हीं द्रव्यवाचक, नामें सामान्यनामें होत, ह्यांबद्दल कांहीं वाद असण्याचें कारण नाहीं. परंतु भाववाचक व समुदायवाचक ह्यांसंबंधानें जबर शंका घेण्यास अवकाश आहे. वर्ग, फौज, सैन्य, सभा, मंडळी, माणुस, इ० समुदायवाचकांचीं उदाहरणें जोशी यांनीं दिलीं आहेत. जोशी ह्यांच्या व्याख्या जशा अशास्त्रीय आहेत, त्याचप्रमाणें त्यांचे

वर्गीकरणही अशास्त्र असल्यास नवल नाहीं. 'जाती'वाचकांचे उदाहरणांत त्यांनीं 'मनुष्य' हें उदाहरण दिलें आहे; आणि समुदायवाचकांमध्यें 'माणुस' हें उदाहरण दिलें आहे. ह्यावरून त्यांनीं जातिवाचकांमध्यें व समुदायवाचकांमध्यें एक तर घोंटाळा केला आहे, नाहीं तर निदान मनुष्य, माणुस हीं त्यांचे मतें दोन्ही पोटभेदांत येत असावीं. हा विषय आमचे मुख्य मुद्यास अवश्य नसल्यामुळें आणि केवळ क्षुल्लक असल्यामुळें त्याचा व्यर्थ काथ्याकूट करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तथापि, इतकें खरें कीं, समुदायवाचक सर्व नामें सामान्य होत असा जोशी यांचा समज दिसतो. परंतु तो साफ चुकीचा आहे. समर्थविद्यालय, फर्ग्युसन कॉलेज, मुंबई युनिव्हर्सिटी, इ० नामें समुदायवाचक असून सामान्य नाहींत तर केवळ विशेष आहेत हें सूक्ष्म वाचकांस तेव्हांच समजेल. हा विषय मुख्यत्वेंकरून न्यायशास्त्राचा पडल्यामुळें त्याचा सविस्तर ऊहापोह व्याकरणांत थोडासा अस्थानींच होय. म्हणून कांहीं समुदायवाचक नामें विशेषही असू शकतात, इतकें वरील उदाहरणांवरून वाचकांस समजलें म्हणजे झालें. त्यानें, जोशी यांचें वर्गीकरण दूषित आहे असें तेव्हांच वाचकांस समजेल. ह्यामुळेंच सामान्य व विशेष ह्या दोन्ही नामांचे लक्षणांत आम्हीं समुदायांचा उल्लेख केला आहे. असो. एवंच, समुदायवाचक नामें सामान्य व विशेष ह्या दोन्ही वर्गांत येतात हें उघड आहे.

आतां, भाववाचक नामांकडे वळूं. ह्यांस सामान्यनामें कसें व कां म्हणावें हेंच आम्हांस समजत नाहीं. कांहीं भाववाचकनामांस सामान्यनामांचें स्वरूप प्राप्त होतें असें या अध्यायांत सांगितलें आहे. त्यावरून हा भ्रम उत्पन्न झाला असल्यास नकळे. जोशांसारख्या शास्त्रीय संस्कारविरहित मनुष्यास हा घोंटाळा खपला तर त्याचें आश्चर्य नाहीं. परंतु कृष्णशास्त्र्यांसारख्या शास्त्रपारंगतांची नजर इतक्यानें कशी चकावी हें एक मोठेंच गूढ आहे. भाववाचक नामांचा सामान्यनामांमध्यें अन्तर्भाव करितां यावा, या दृष्टीनें सामान्यनामाचें लक्षणच शास्त्रीबोवांनीं कांहीं विचित्रपणें बदललें आहे काय अशी शंका येऊन तें पाहिलें, तों तें असें आढळलें:—'ज्या नामांपासून जातीचा किंवा गुणाचा बोध होऊन तद्द्वारा ती जाति किंवा गुण ज्या व्यक्तींवर असतात त्यांचा बोध होतो, त्या नामांस सामान्यनाम म्हणतात.' ह्याच्या स्पष्टीकरणांत ते लिहितात:—'सामान्यनामें व विशेषनामें यांत मुख्य भेद हा आहे कीं, सामान्यनाम जाति किंवा धर्म दाखवितें. व ती जाति किंवा धर्म अनेकांवर असल्यामुळें तें त्या त्या व्यक्तीस लागतें.' ह्यानंतर त्यांनीं जीं उदाहरणें दिलीं आहेत, तीं सर्व आमच्या दृष्टीनें सामान्यनामें आहेत. त्यांत भाववाचक नाम एकही नाहीं. (त्यांचीं उदाहरणें:—घोडा, घर, माणूस, गलबत, इ०; नंतर गाय, चाकर.) परंतु हें स्पष्टीकरण भाववाचक नामांस कसें लावावें हें गूढ त्यांनीं कोठेंच उकलून दाखविलेलें नाहीं. भाववाचक नामांची म्हणून त्यांनी जीं उदाहरणें दिलीं आहेत, त्यांमध्यें कमताई हें एक आहे.

कमताई हा शब्द धर्मद्योतक आहे. पण तो धर्म ' अनेकांवर असल्यामुळें तें त्या त्या व्यक्तीस लागतें ' हें त्यांचें स्पष्टीकरण ' कमताई ' संबंधानें कसें समजून घ्यावें हें आम्हांस तरी समजत नाहीं. ' कमताई ' हा धर्म कमी जे पदार्थ असतील, त्यांचा अप्रत्यक्षपणें बोध करील. तथापि, ' कमताई ' हा शब्द त्यांत कधींच लावितां यावयाचा नाही, हें निर्विवाद आहे. एवंच, या अध्यायांत स्पष्ट केल्याप्रमाणें व कृष्णशास्त्र्यांनींही वरील अवतरणांत सांगितल्याप्रमाणें सामान्यनामानें धर्माचा व धर्मीचा, दोहोंचाही बोध होतो. तरी तें धर्मीसच लागतें, म्हणून त्याचा धर्मिवाचक शब्दांत अन्तर्भाव होतो. आणि भाववाचक नामानें जरी धर्मीचा अप्रत्यक्ष बोध झाला तरी तें प्रत्यक्षपणें धर्मच दाखवितें व धर्मासच लागतें, धर्मीस लागत नाहीं. म्हणून धर्मवाचक किंवा भाववाचक नामांचा धर्मिवाचक नामांत कदापि अन्तर्भाव करितां यावयाचा नाहीं. यामुळें त्यांचा तिसरा भेद मानिल्यावांचून गत्यंतरच नाहीं.

येथपर्यंत धर्मवाचक नामें निराळीं मानण्याची आवश्यकता सिद्ध केली. आतां अखेरीस याजवरील कृष्णशास्त्र्यांच्या आक्षेपाचें निराकरण करून हा विषय संपवूं. ते म्हणतात कीं, हा तिसरा वर्ग मानिल्यास ' दळणावळ, करणावळ, शिवणावळ, इत्यादि नामांचाही एक वर्ग करून त्यांस मौल्यवाचक नामांचा वर्ग असें नांव ठेऊन या प्रकारें पुष्कळ भेद करितां येतील. ' या आक्षेपांत कांहींच तथ्य नाहीं. कारण कीं, मौल्यवाचक नामें हीं धर्मवाचक नामें होत. खेर म्हणतात कीं, ' भाववाचक नामें गुण, व्यापार, व स्थिति, ( Quality, action, State ) दाखवितात.' ह्यावरून खेरांचें जर असें मत असलें कीं, भाववाचक नामें— गुणदर्शक, व्यापारदर्शक, व स्थितिदर्शक ह्या—तीनच प्रकारचीं आहेत, तर ' दळणावळ, शिवणावळ इत्यादि मौल्यवाचक; पाटीलकी, मामलेदारी इत्यादि अधिकारवाचक; शेती, सुतारकी इत्यादि उद्यमवाचक; असे भाववाचक नामांचे पुष्कळ भेद मानावे लागतील' हें खेरांस समर्पक उत्तर होईल. म्हणूनच धर्मवाचक किंवा भाववाचक नामांचे पोटभेद करण्याचे भरीस आम्ही पडलों नाहीं. तात्पर्य, हा कृष्णशास्त्र्यांचा आक्षेप नामांचे मुख्य तीन भेदांवर आणि विशेषकरून धर्मवाचक नामांवर कसा येतो हें आम्हांस तरी समजत नाहीं.

वरील विवेचनाचा निष्कर्ष असाः—धर्मवाचक नामांचा सामान्यनामांत समावेश करितां येत नाहीं, म्हणून त्या नामांचा तिसरा भेद मानणें अवश्य आहे. आणि हा तिसरा भेद मानिल्यानें आणखी भेद मानण्याची जरूर नाहीं. कारण की, विशेष, सामान्य, व धर्मवाचक ह्यांपैकीं कोणत्या तरी एकांत ज्याचा अन्तर्भाव होत नाहीं असें एकही नाम आढळत नाहीं. म्हणून हे तीन भेद जरूर व पुरेसे आहेत हें निर्विवाद आहे. ]

# अध्याय ३.

—— :०: ——

## सर्वनाम.

११६. जो विकारी शब्द विशिष्टार्थद्योतक नसून ज्यास पूर्वापर संबंधानें सर्वप्रकारच्या नामांचा अर्थ येऊं शकतो, म्हणजे जो वाटेल त्या नामाबद्दल उपयोगांत येतो, त्यास **सर्वनाम** असें म्हणतात. उ:०—मी, तूं, तो, हा, ही, इ०.

(सर्वनाम हें एका प्रकारचें नामच आहे. परंतु गेल्या अध्यायांतील नामें स्वतः धर्मवाचक किंवा धर्मिवाचक असतात; पण सर्वनामांनीं स्वतंत्रपणें कोणत्याच विशिष्ट धर्माचा किंवा धर्मीचा अर्थ ध्यानांत येत नाहीं. मी, तूं, तो, इ० शब्दांनीं पूर्वापर संबंधाव्यतिरिक्त स्वतंत्रपणें कोणाचा किंवा कशाचा बोध होत आहे हें सांगतां यावयाचें नाहीं. पण रामा, मनुष्य, शहाणपणा ह्यांस स्वतंत्रपणें अर्थवाहकत्व आहे. ह्यांचा अर्थ समजण्यास म्हणजे त्यांनीं कोणत्या व्यक्तीचा किंवा धर्माचा बोध होत आहे हें कळण्यास दुसऱ्या कशाचीही अपेक्षा नाहीं. तथापि सर्वनामांना स्वतःचा अर्थ नाहीं असें नाहीं. कारण कीं, मी म्हणजे बोलणारा, वक्ता किंवा लेखक; तूं म्हणजे ज्याचेपाशीं भाषण चालले आहे तो, इ० असे अर्थ त्यांस आहेत. तर मग सर्वनामें विशिष्टार्थद्योतक नाहींत म्हणजे काय? याचा अर्थ इतकाच कीं, त्यांनीं स्वतंत्रपणें म्हणजे पूर्वापार संबंधाशिवाय कोणत्याच विशेष धर्माचा किंवा धर्मीचा बोध होत नाहीं. तीं सर्वप्रकारच्या नामांबद्दल येतात; म्हणजे त्यांनीं वाटेल त्या धर्माचा किंवा धर्मीचा बोध होतो. परंतु प्रकृत स्थळीं अमुक सर्वनामानें कोणत्या धर्माचा किंवा धर्मीचा बोध होत आहे म्हणजे तें कोणत्या नामाबद्दल आलें आहे, हा प्रश्न प्रत्येक स्थळीं पूर्वापर संबंधास अनुसरून सोडविला पाहिजे. ह्यावरून सर्वनाम—'सर्वनामांबद्दल येणारें नाम'—हा शब्द अन्वर्थक आहे हें उघड आहे.

सर्वनाम ह्या शब्दाचा मूळचा ऐतिहासिक अर्थ निराळाच आहे. सर्व ह्या प्रातिपदिकाप्रमाणें चालणारीं जीं नामें त्या नामांचा विकरणाचे दृष्टीनें एक वर्ग करून त्यांस संस्कृतांत 'सर्वनाम' अशी संज्ञा केली आहे. ह्यावरून 'सर्वनामें म्हणजे सर्व शब्दाप्रमाणें ज्यांची विभक्त्यन्तरूपें अनियमित असतात तीं नामें' असा मूळ संस्कृत भाषेंत अर्थ आहे. ह्यामुळें ज्यांस मराठी व्याकरणांत सर्वनाम म्हटलें आहे, त्यांस त्यांचे लक्षणावरून 'प्रतिनाम' ही संज्ञा लावणें अधिक प्रशस्त होय असें कांहींचें मत आहे. परन्तु नवीन परिभाषेची कांहीं जरूर दिसत नाहीं. एक तर सर्वनाम हा शब्द मराठींमध्यें या नवीन अर्थानें इतका कांहीं रूढ झाला आहे कीं, त्याचा मूळ अर्थच समजून सांगण्याची

आवश्यकता भासूं लागली आहे. शिवाय सर्वनाम याचा सर्वादि किंवा सर्वप्रमुख नामें असाच अर्थ करण्याची कांहीं जरूर नाहीं. ‘ सर्व नामांचीं जीं नामें म्हणजे जीं सर्व प्रकारच्या नामांबद्दल येतात, तीं ’ सर्वनामें होत असाही सर्वनाम शब्दाचा अर्थ करण्यास हरकत नाहीं; असें जें डॉ. भांडारकर यांनीं खेरांस सुचविलें तें यथार्थ आहे असें कोण म्हणणार नाहीं.

‘ नामांची द्विरुक्ति वारंवार न व्हावी म्हणून त्यांचे स्थानीं जे शब्द येतात ते ’ हें सर्वनामाचें जुनें लक्षण योग्य नाहीं. कारण कीं, मी, तूं, कोण, इ० कांहीं सर्वनामांस तें लागतच नाहीं, म्हणून अव्याप्त आहे; आणि तें कांहीं ठिकाणच्या नामांसही लावितां येतें म्हणून अतिव्याप्तही आहे. एकाच नामाचा उपयोग एकसारखा वारंवार करणें हें भाषादारिद्र्याचें चिन्ह आहे; म्हणून त्याच अर्थाचीं दुसरीं नामें योजण्याची चाल आहे. त्याचप्रमाणें कवितेमध्यें छन्दास अनुसरून एकाच अर्थाचे अनेक शब्द एकामागून एक असे उपयोगांत येतात. मनुष्याचे जागीं मानव, इ०, स्त्रीचे जागीं बायको, नारी इ०, असे शब्द वारंवार येतात. त्यांसही प्रकृत व्याख्येप्रमाणें सर्वनाम म्हणण्याची पाळी येईल. याप्रमाणें अव्याप्ति व अतिव्याप्ति हे दोन्ही दोष त्या लक्षणांत असल्यामुळें सर्वनामाच्या लक्षणाची सुधारून वाढविलेली नवीन आवृत्ति काढणें भाग पडलें. नामाची द्विरुक्ति सर्वनामाचे उपयोगानें टळते हें खरें आहे. तथापि हा त्याचा उपयोग सर्वनामाचा असाधारण धर्म किंवा व्यावर्तक धर्म होऊं शकत नाहीं. समानार्थक नामाचाही तसा उपयोग होतो; म्हणून नामद्विरुक्तिनिराकरण हें सर्वनामाचें लक्षण होऊं शकत नाहीं हें निर्विवाद आहे. )

११७. मराठीत एकंदर **नऊ** सर्वनामें आहेत:—मी, तूं आपण, स्वतः, तो, हा, जो कोण आणि काय. ]

सूचना—मराठींतील सर्वनामांच्या संख्येचा प्रश्न वादग्रस्त झाला आहे. त्याचप्रमाणें त्यांचें वर्गीकरणही जरासें कठिण आहे. परंतु ह्या प्रश्नांसंबंधाचा आमचा अभिप्राय काय आहे, तो सांगण्यापूर्वी त्याचा ऊहापोह करणें सोईस्कर नसल्यामुळें या अध्यायाच्या अन्तींच त्यास हात घालणें बरें दिसतें.

११८. सर्वनामांचे **सहा** भेद आहेतः **पुरुषवाचक, आत्मवाचक, दर्शक, संबंधी, प्रश्नार्थक,** आणि **अनिश्चित.**

११९. वक्त्याचे तसेंच लेखकाचे दृष्टीनें एकंदर सृष्टीचे तीन भाग करितां येतात. पहिला—वक्ता किंवा लेखक स्वतः; दुसरा—श्रोता किंवा वाचक म्हणजे ज्याशीं वक्ता बोलतो किंवा ज्याकरितां लेखक लिहितो तो; आणि तिसरा—उक्तिविषय किंवा लेखनविषय म्हणजे ज्याचेविषयीं भाषण किंवा लेखन चालतें तो. सृष्टीचीं जीं हीं तीन स्वरूपें किंवा तीन

अंगें त्यांस व्याकरणांत सर्वसाधारण **पुरुष** ही संज्ञा आहे; आणि त्यावरून त्यांस अनुक्रमें प्रथमपुरुष, द्वितीयपुरुष, आणि तृतीयपुरुष, असें म्हणतात. ह्या तीन पुरुषांपैकीं प्रथम व द्वितीय हेच पुरुष महत्त्वाचे होत. कारण कीं, तेच मर्यादित व निश्चित आहेत. तिसरा अमर्याद असून त्यांत बाकीच्या साऱ्या जगाचा अन्तर्भाव होतो. तेव्हां ह्या वस्तुस्थितीस अनुसरून प्रथम व द्वितीय पुरुष दाखविणारीं अनुक्रमें मी आणि तूं हीं सर्वनामें शिवाय करून बाकीचीं सगळी सर्वनामें आणि नामेंसुद्धां तृतीय पुरुषांत यावीं हें साहजिक आहे. तथापि या अशा अमर्याद प्रांताचें ग्रहण थोडक्यांत व्हावें म्हणून 'तो' या सर्वनामाचा तृतीयपुरुष दाखविण्याचे कामीं उपयोग करण्याचा प्रचार पडला आहे; आणि तो अत्यन्त सोईस्कर आहे हें कोणीही कबूल करील.

एवंच, सर्वनामांचे **तीन पुरुष** आहेत. ते आणि त्यांचीं सर्वनामें खालीं दिल्याप्रमाणें:——

**प्रथमपुरुषवाचक**—मी, आपण.

**द्वितीयपुरुषवाचक**-तूं, आपण.

**तृतीयपुरुषवाचक** तो, हा, जो, कोण, काय. (सर्व नामें तृतीय पुरुषवाचकच होत.)

**सर्वपुरुषवाचक**—स्वतः, आपण.

टीप १——स्वतः आणि त्याच अर्थानें येणारें **आपण** हीं विशेषेंकरून कोणत्याच पुरुषाचीं नाहींत. तेव्हां त्यांस कोणत्याच पुरुषांत न दाखविणें बरें. वर आपण हें पहिल्या दोन्ही पुरुषांत दाखविलें आहे. परंतु **आपण** हें केवळ स्वतः या अर्थानें जेव्हां येतें, तेव्हां तें स्वतः प्रमाणें आत्मवाचक असतें; म्हणून स्वतः व तद्वाचक आपण हीं आत्मवाचक सर्वनामें वास्तविक म्हटलें असतां कोणत्याच पुरुषाचीं नाहींत. अर्थात् पाण्याला जसा स्वतःचा रंग नाहीं, तसा त्यांस स्वतःचा पुरुष नाहीं. तीं केवळ त्याच वाक्यांत पूर्वीं आलेल्या नामासंबंधानें किंवा सर्वनामासंबंधानें आत्मवाचक असल्यामुळें तें नाम अथवा सर्वनाम ज्या पुरुषाचें असेल तोच पुरुष तीं दाखवितात. म्हणून त्यांस वाटेल तर **सर्वपुरुषवाचक** असें म्हणण्यास हरकत नाहीं. एकाच जागीं तीं तिन्ही पुरुष अर्थातच दाखवीत नाहींत, तर तीं निरनिराळ्या स्थळीं निरनिराळ्या पुरुषांबद्दल येऊं शकतात; इतकाच 'सर्वपुरुषवाचक' या शब्दाचा अर्थ आहे. यावरून **आपण** ह्याच्या अर्थाचे दोन वर्ग करितां येतात. एका वर्गांत प्रथम द्वितीय

आवश्यकता भासूं लागली आहे. शिवाय सर्वनाम याचा सर्वादि किंवा सर्वप्रमुख नामें असाच अर्थ करण्याची कांहीं जरूर नाहीं. 'सर्व नामांचीं जीं नामें म्हणजे जीं सर्व प्रकारच्या नामांबद्दल येतात, तीं' सर्वनामें होत असाही सर्वनाम शब्दाचा अर्थ करण्यास हरकत नाहीं; असें जें डॉ. भांडारकर यांनीं खेरांस सुचविलें तें यथार्थ आहे असें कोण म्हणणार नाहीं.

'नामांची द्विरुक्ति वारंवार न व्हावी म्हणून त्यांचे स्थानीं जे शब्द येतात ते' हें सर्वनामांचें जुनें लक्षण योग्य नाहीं. कारण कीं, मी, तूं, कोण, इ० कांहीं सर्वनामांस तें लागतच नाहीं, म्हणून अव्याप्त आहे; आणि तें कांहीं ठिकाणच्या नामांसही लावितां येतें म्हणून अतिव्याप्तही आहे. एकाच नामाचा उपयोग एकसारखा वारंवार करणें हें भाषादारिद्र्याचें चिन्ह आहे; म्हणून त्याच अर्थाचीं दुसरीं नामें योजण्याची चाल आहे. त्याचप्रमाणें कवितेमध्यें छन्दास अनुसरून एकाच अर्थाचे अनेक शब्द एकामागून एक असे उपयोगांत येतात. मनुष्याचे जागीं मानव, इ०, स्त्रीचे जागीं बायको, नारी इ०, असे शब्द वारंवार येतात. त्यांसही प्रकृत व्याख्येप्रमाणें सर्वनाम म्हणण्याची पाळी येईल. याप्रमाणें अव्याप्ति व अतिव्याप्ति हे दोन्ही दोष त्या लक्षणांत असल्यामुळें सर्वनामाच्या लक्षणाची सुधारून वाढविलेली नवीन आवृत्ति काढणें भाग पडलें. नामाची द्विरुक्ति सर्वनामाचे उपयोगानें टळते हें खरें आहे. तथापि हा त्याचा उपयोग सर्वनामाचा असाधारण धर्म किंवा व्यावर्तक धर्म होऊं शकत नाहीं. समानार्थक नामाचाही तसा उपयोग होतो; म्हणून नामद्विरुक्तिनिराकरण हें सर्वनामाचें लक्षण होऊं शकत नाहीं हें निर्विवाद आहे.)

११७. मराठीत एकंदर **नऊ** सर्वनामें आहेत:—मी, तूं आपण, स्वतः, तो, हा, जो कोण आणि काय.]

सूचना—मराठींतील सर्वनामांच्या संख्येचा प्रश्न वादग्रस्त झाला आहे. त्याचप्रमाणें त्यांचें वर्गीकरणही जरासें कठिण आहे. परंतु ह्या प्रश्नांसंबंधाचा आमचा अभिप्राय काय आहे, तो सांगण्यापूर्वी त्याचा ऊहापोह करणें सोईस्कर नसल्यामुळें या अध्यायाच्या अन्तींच त्यास हात घालणें बरें दिसतें.

११८. सर्वनामांचे **सहा** भेद आहेतः **पुरुषवाचक, आत्मवाचक, दर्शक, संबंधी, प्रश्नार्थक,** आणि **अनिश्चित.**

११९. वक्त्याचे तसेंच लेखकाचे दृष्टीनें एकंदर सृष्टीचे तीन भाग करितां येतात. पहिला—वक्ता किंवा लेखक स्वतः; दुसरा—श्रोता किंवा वाचक म्हणजे ज्याशीं वक्ता बोलतो किंवा ज्याकरितां लेखक लिहितो तो; आणि तिसरा—उक्तिविषय किंवा लेखनविषय म्हणजे ज्याचेविषयीं भाषण किंवा लेखन चालतें तो. सृष्टीचीं जीं हीं तीन स्वरूपें किंवा तीन

अंगें त्यांस व्याकरणांत सर्वसाधारण **पुरुष** ही संज्ञा आहे; आणि त्यावरून त्यांस अनुक्रमें प्रथमपुरुष, द्वितीयपुरुष, आणि तृतीयपुरुष, असें म्हणतात. ह्या तीन पुरुषांपैकीं प्रथम व द्वितीय हेच पुरुष महत्त्वाचे होत. कारण कीं, तेच मर्यादित व निश्चित आहेत. तिसरा अमर्याद असून त्यांत बाकीच्या साऱ्या जगाचा अन्तर्भाव होतो. तेव्हां ह्या वस्तुस्थितीस अनुसरून प्रथम व द्वितीय पुरुष दाखविणारीं अनुक्रमें मी आणि तूं हीं सर्वनामें शिवाय करून बाकीचीं सगळी सर्वनामें आणि नामेंसुद्धां तृतीय पुरुषांत यावीं हें साहजिक आहे. तथापि या अशा अमर्याद प्रांताचें ग्रहण थोडक्यांत व्हावें म्हणून 'तो' या सर्वनामाचा तृतीयपुरुष दाखविण्याचे कामीं उपयोग करण्याचा प्रचार पडला आहे; आणि तो अत्यन्त सोईस्कर आहे हें कोणीही कबूल करील.

एवंच, सर्वनामांचे **तीन पुरुष** आहेत. ते आणि त्यांचीं सर्वनामें खालीं दिल्याप्रमाणें:——

**प्रथमपुरुषवाचक**—मी, आपण.

**द्वितीयपुरुषवाचक**-तूं, आपण.

**तृतीयपुरुषवाचक** तो, हा, जो, कोण, काय. (सर्व नामें तृतीय पुरुषवाचकच होत.)

**सर्वपुरुषवाचक**—स्वतः, आपण.

**टीप १**—स्वतः आणि त्याच अर्थानें येणारें **आपण** हीं विशेषेंकरून कोणत्याच पुरुषाचीं नाहींत. तेव्हां त्यांस कोणत्याच पुरुषांत न दाखविणें बरें. वर आपण हें पहिल्या दोन्ही पुरुषांत दाखविलें आहे. परंतु **आपण** हें केवळ **स्वतः** या अर्थानें जेव्हां येते, तेव्हां ते **स्वतः** प्रमाणें आत्मवाचक असतें; म्हणून **स्वतः** व तद्वाचक **आपण** हीं आत्मवाचक सर्वनामें वास्तविक म्हटलें असतां कोणत्याच पुरुषाचीं नाहींत. अर्थात् पाण्याला जसा स्वतःचा रंग नाहीं, तसा त्यांस स्वतःचा पुरुष नाहीं. तीं केवळ त्याच वाक्यांत पूर्वीं आलेल्या नामासंबंधानें किंवा सर्वनामासंबंधानें आत्मवाचक असल्यामुळें तें नाम अथवा सर्वनाम ज्या पुरुषाचें असेल तोच पुरुष तीं दाखवितात. म्हणून त्यांस वाटेल तर **सर्वपुरुषवाचक** असें म्हणण्यास हरकत नाहीं. एकाच जागीं तीं तिन्ही पुरुष अर्थांतच दाखवीत नाहींत, तर तीं निरनिराळ्या स्थळीं निरनिराळ्या पुरुषांबद्दल येऊं शकतात; इतकाच 'सर्वपुरुषवाचक' या शब्दाचा अर्थ आहे. यावरून **आपण** ह्याच्या अर्थाचे दोन वर्ग करितां येतात. एका वर्गांत प्रथम द्वितीय

पुरुषांचे प्रत्यक्ष अर्थ येतात; आणि दुसऱ्या वर्गांत सर्व पुरुषांचे अर्थ अप्रत्यक्ष येतात. **आपण** ह्या आत्मवाचकाचा अर्थ **स्वतः** असून तें त्या वेळीं पूर्वींच्या नामास किंवा सर्वनामास उद्देशून येत असल्यामुळें त्यांचे द्वारें **आपण** व **स्वतः** या दोहोंस तेच अर्थ प्राप्त होतात हें उघड आहे. पहिल्या वर्गांतील अर्थांचा वाचक 'आपण' शब्द प्रत्यक्षपणें मुख्य दोन्ही पुरुषवाचक आहे; आणि आत्मवाचक **आपण** आणि **स्वतः** हे दोन्ही शब्द प्रत्यक्षपणें पुरुषरहित असून अन्यद्वारा सर्व पुरुषांचे वाचक होऊं शकतात. स्वतः व तदर्थक आपण हे दोन शब्द वाक्यांत स्वतंत्रपणें उद्देश्यस्थानीं मुळीं कधीं येतच नाहींत; तर केवळ उद्देश्याचे सम्बन्धानें किंवा पूर्वगत इतर नाम किंवा सर्वनाम ह्यांचे संबंधानें त्यांचा वाक्यांत प्रयोग होतो. **आपण** शब्दाचे अर्थांतील हा फरक सूक्ष्म आहे. तो पक्का ध्यानांत ठेविला असतां पुढील वर्गीकरण नीट समजण्यास सुलभ जाईल.

टीप२.—आतां या पुरुषवाचक सर्वनामांचे अर्थ व उपयोग सांगावयाचे. त्यापूर्वी इतकें सांगणें अवश्यक आहे कीं, सर्वनामांचे जे अन्य भेद आहेत ते तृतीयपुरुषवाचक सर्वनामांचेच होत. **मीं, तू**, आणि दोन्ही पुरुषीं येणारें **आपण** हीं त्या इतर भेदांत येत नाहींत; म्हणून **मी**, **तूं**, आणि त्यांच्या अर्थाचें **आपण** हीं विशेषेंकरून पुरुषवाचक सर्वनामें होत. तेव्हां प्रथम बाकीचीं म्हणजे तृतीयपुरुषवाचक सर्वनामें बाजूस ठेवून ह्या **प्रधानपुरुषवाचकांच्याच** अर्थाकडे व उपयोगाकडे वळूं. सर्वनामांच्या अर्थांचे व उपयोगाचे विवेचनांत विकरण या प्रकरणाचा कांहीं भाग अध्याहृत घेऊन चालणें अवश्य आहे. म्हणजे लिंग, वचन, व विभक्ति, या विकारांनीं त्यांचीं प्राप्त होणारीं निरनिराळीं रूपें येथें गृहीत धरिलीं पाहिजेत. नाहीं तर सर्वनामांचे अर्थाचा व उपयोगाचा कांहीं खुलासा येथें व कांहीं खुलासा विकरणप्रकरणीं असें करावें लागेल. त्यामुळें सोईचे ऐवजीं गैरसोय व अव्यवस्थाच होणार. म्हणून सर्वनामांचें विकरण गृहीत धरून त्यांच्या अर्थाचा व उपयोगाचा सर्व खुलासा येथेंच एका जागीं करणें अधिक प्रशस्त दिसतें.

१२०. **मी**—प्र० पु० एकवचन—

(अ) स्वतः एकट्याचेच संबंधानें ज्या वेळीं विधान करावयाचें असतें, त्यावेळीं वक्ता किंवा लेखक ह्या सर्वनामाचा उपयोग करितो. एवंच मी ह्याचे अर्थांत बाकीच्या सर्व जणांचें, किंवा जगाचें म्हटलें तरी चालेल, पूर्ण निराकरण आहे. ह्या निराकरणावर जोर द्यावयाचा असतां **मी** ह्या प्रथमपुरुषवाचकाच्या एकवचनाचाच प्रयोग अवश्य आहे. तें निराकरण स्पष्टपणें विवक्षित नसतें, त्यावेळीं **मी** बद्दल मराठींत 'आम्ही' किंवा 'आपण' ह्या अनेकवचनाचाही प्रयोग आढळतो. हा प्रयोग बरो-

वरीच्या किंवा खालच्या दर्जाच्या मंडळीशीं भाषण चाललें असतां फार येतो. उ०—आम्ही ( मी ) समजलों तुमच्या मनांत काय आहे तें; तुम्ही या अथवा नका, आपण ( मी ) जाणार; बरें तूं आपला बेत आम्हांला ( मला ) कधीं कळविशील ? इ०.

( **आ** ) आपल्यापेक्षां वरिष्ठ दर्जाचे मनुष्याशीं किंवा देवाशीं भाषण करितांना वक्ता स्वतः संबंधाचा उल्लेख बहुधा प्रथमपुरुषीं एकवचनींच करितो. उ०—**मला** दोन दिवसांची रजा पाहिजे आहे, मेहेरबानीनें मंजूर होईल अशी आशा आहे; ईश्वरा, **मला** या संकटांतून एकदांचा पार पाड; इ०. या ठिकाणीं ‘ मला ’ चे जागीं ‘ आम्हाला ’ असा अनेकवचनी प्रयोग प्रशस्त नाहीं.

**१२१. आम्ही**—प्र० पु० अनेकवन—ह्या अनेकवचनाचा अर्थ नामांच्या अनेकवचनाहून भिन्न आहे. मनुष्यें म्हणजे एकापेक्षां अधिक मनुष्यें ( **मनुष्यें = मनुष्य + मनुष्य + मनुष्य,** इ०. ) परंतु आम्ही म्हणजे एकापेक्षां अधिक मी नव्हे. ‘ एकापेक्षां अधिक मी ’ ह्याचा अर्थच नीट होत नाहीं. तेव्हां आम्ही म्हणजे ‘ मी व मजबरोबर दुसरे’ किंवा मी व माझ्या बाजूचे किंवा माझ्या पक्षाचे इतर, ज्यांच्या वतीनें जणुं कांही मी बोलत आहें ( **आम्ही = मी + मत्पक्षीय** ).

( **अ** ) वर्तमानपत्रांचे व मासिकादिपुस्तकांचे संपादक व कोणत्याहीं कांहीं लोकांच्या वतीनें बोलणारे व लिहिणारे लोक, तसेंच मोठमोठे अधिकारी व राजे लोक. हे बहुधा प्रथमपुरुषीं अनेकवचनाचा उपयोग करितात उदा०:—**आम्ही** असें ऐकितों कीं, इ०; या खटल्याचा निकाल झाल्याशिवाय **आम्हांस** या बाबतींत कांहींच लिहितां येत नाहीं; इ०.

( **आ** ) आपल्या कुळाविषयीं किंवा एकंदर कुटुंबाविषयीं बोलतांना वक्ता ‘ आम्ही ’ ह्याचा उपयोग करितो. उदा०:—**आमच्या** घरीं यंदा तीन कार्यें व्हावयाचीं आहेत, आम्ही सुटींत देशीं जाणार आहों; इ०.

( **इ** ) जातभाई, देशबांधव, किंवा मानवजाति ह्यांसंबंधानें वक्ता व लेखक प्रथमपुरुषाचे अनेकवचनाचाच प्रयोग करितात. उदा०:—**आम्हांस** तुमचा धर्म नको; **आम्ही** ( मनुष्य ) सर्वस्वी अपराधी आहों; इ०.

(ई) वाटेल तो मनुष्य नेहमींच्या साधारण व्यवहारांत स्वतःचे संबंधानें 'मी' असें न म्हणतां बहुधा 'आम्ही' असा अनेकवचनी प्रयोग करितो. इंग्रजीमध्यें असें करणें चुकीचें होय. परंतु मराठीचा प्रचार भिन्न आहे. प्रथम पुरुषाचे एकवचनाच्या अर्थानें अनेकवचनीं प्रयोग मराठीस खपतो.

१२२. तूं—द्वि० पु० एकवचन—एकाच व्यक्तीशीं बोलावयाचें असतां ह्या सर्वनामाचा उपयोग खालील स्थळीं बहुधा होतो.

(अ) जेव्हां दुसऱ्याचा दर्जा वक्त्याचेपेक्षां फारच हलका असतो त्यावेळीं द्वितीयपुरुषवाचकाचा एकवचनी प्रयोग होऊं शकतो.

(आ) शिपाई, गडी, हमाल, मजूर, इ० नीच स्थितींतील लोकांशीं बोलतांना द्वि० पु० ए० व० अवश्य येतें.

(इ) वडील माणसें आपल्याच नात्यागोत्यांतील निकट लहान माणसांशीं बोलतांना द्वि० पु० ए० व० योजितात.

(ई) अतिपरिचित माणसें किंवा जीवश्चकंठश्च स्नेही परस्परांसंबंधानें कधीं कधीं द्वि० पु० ए० व० वापरितात.

(उ) सरदार व राजे लोक ह्यांची घराणीं शिवायकरून बाकीच्या कुटुंबांत म्हणजे मध्यम स्थितींतील कुटुंबांत, मुलें आईशीं बोलतांना द्वि० पु० एक वचनाचाच उपयोग करितात.

टीप १—आई शिवाय इतर वडील बायकांशीं बोलतांना बहुधा 'तूं' याचा उपयोग होतो. क्वचित् 'तुम्ही' ही येतें. वडील पुरुषासंबंधानें मात्र 'तुम्ही' ह्या अनेकवचनाचाच प्रयोग फार आढळतो. परंतु बहिणभावंडांमध्यें परस्पर वयाचा विचार बहुधा बाजूस रहातो; आणि परस्परांसंबंधानें 'तूं' चाच बहुधा उपयोग करितात. तरी प्रौढ वयांत परस्पर वयाचा नियम बराच आढळतो.

टीप २—कोकणांत बापाशीं बोलतांनाही मुलें द्वि० पु० एकवचनीच बहुधा बोलतात. परंतु त्या प्रांतातही ही चाल आतां अशिष्ट मानण्याकडे लोकांच्या मनाची प्रवृत्ति होत असल्यामुळें तिचा दिवसेंदिवस लोपच होत चालला आहे.

(ऊ) देवाशीं बोलतांना म्हणजे देवाला प्रार्थना करितांना किंवा त्याची स्तुति करितांना बहुधा द्वि० पु० एक वचनाचाच प्रचार आहे.

(ऋ) मनुष्याच्या दर्जाचा वगैरे विचार बाजूस राहून तिरस्कारपूर्वक भाषण चाललें असतां बहुधा द्वि० पु० एक वचन आलेलें आढळते.

१२३. **तुम्ही**—द्वि० पु० अनेकवचन—ह्याचा अर्थसुद्धां 'आम्ही' शब्दाचे अर्थासारखाच आहे. तुम्हीं म्हणजे तूं आणि तुझ्या वतीचे किंवा पक्षाचे लोक ( **तुम्हीं = तूं + त्वत्पक्षीय** ).

( अ ) तूं ह्याचा ज्या स्थळीं अवश्य उपयोग होतो, म्हणून वर सांगितलें त्यांशिवाय इतर सर्व स्थळीं दुसऱ्या एकट्याशीं बोलतांनाही द्वि० पु० अनेकवचन येण्यास हरकत नाहीं.

( आ ) एकाच गृहस्थाशीं बोलत असतांनासुद्धां शिष्टाचारास अनुसरून 'तुम्हीं' याचा प्रयोग होतो.

टीप:—परस्परांमध्यें अत्यंत दृढ परिचय किंवा संघटन असल्यास शिष्ट लोकांतसुद्धां परस्परांबद्दल 'तुम्ही' या अनेकवचनाचे जागीं 'तूं' या एकवचनाचा उपयोग कधीं कधीं आढळतो.

( इ ) देवापाशीं बोलतांनाही द्वि० पु० अनेकवचनाचा उपयोग पूज्यबुद्धीस अनुसरून प्रचारांत आहे.

( ई ) अनेक मनुष्यांस उद्देशून बोलावयाचें असतां 'तुम्हीं' याचा उपयोग अवश्यच आहे. मग तीं लहान, मोठीं, उच्च, नीच, परिचित, अपरिचित, कशींही असोत—अर्थास अनुसरून द्वि० पु० अनेकवचन अवश्य आलेंच पाहिजे.

टीप—नातेवाईकांसंबंधानें मागल्या अंकांत खुलासा केलाच आहे. त्यावरून द्वि. पु. अ. व चा उपयोग त्यांमध्यें कधीं होतो तें समजेल.

१२४. **तो ( ती, तें. )**—तृ० पु० एकवचन—( हा, जो, इ० बाकीचीं जीं सर्वनामें आहेत, तीं सर्व येथें येतातच. शिवाय सर्व प्रकारचीं नामेंही तृतीय पुरुषींच असतात हें पूर्वीं सांगितलेंच आहे. म्हणून 'तो' ह्यास त्या सर्वांचा प्रतिनिधि म्हणून प्रमुखत्व दिलें आहे इतकेंच. )

( अ ) आपल्या भाषेंत एका माणसाबद्दल आदरार्थीं अनेकवचनी प्रयोग करण्याची चाल फार आहे. तेव्हां तेवढी बाब सोडून एकाच व्यक्तीविषयीं बोलावयाचें असल्यास त्याजविषयीं आणि सर्व प्राणी व पदार्थ आणि सर्व धर्म ह्यांपैकीं कोणत्याही एकाविषयीं विधान करितांना तृ० पु० एकवचन येतें.

( आ ) मोठ्या दर्जाचे मनुष्यांविषयीं तिरस्कार दाखवावयाचा असतां तृतीय पुरुषाचें एकवचन योजितात.

**अपवाद**-- ज्याचे विषयीं आपल्या मनांत पुष्कळ आदर वसत आहे, अशा गत मनुष्याविषयीं बोलावयाचें असतां वचनाबद्दलचा निश्चित नियम कांहींच देतां येत नाहीं. तथापि मनुष्य मरण पावल्यानंतर त्यास पाहिलेले लोक म्हणजे त्याचे समकालीन लोक जोंपर्यंत अस्तित्वांत आहेत तोंपर्यंत तरी म्हणजे त्याचे मरणानंतर ५०।७५ वर्षेपर्यंत तरी मृत मनुष्यासंबंधानें आदरार्थी अनेकवचनाचा प्रयोग तसाच चालतो. परंतु त्याच्या ओळखीचें व त्याच्या समकालीन जग नष्ट झाल्याबरोबर म्हणजे तो केवळ इतिहासाचा विषय झाल्याबरोबर त्याचे संबंधानें लोकांची आदरबुद्धि जागृत असतांही त्याचा एकवचनीं उल्लेख होण्यास हरकत नाही. त्याचे संबंधानें आदरार्थी अनेकवचन येत नाहीं असें नाहीं, तर आदराचे नियमास अनुसरून अनेकवचन जरी आलें, तरी त्याचा एकवचनीं उल्लेख केवळ अनादरद्योतकच असेल असें म्हणतां यावयाचें नाहीं. एवंच ऐतिहासिक माणसाविषयीं बोलावयाचें असतां कोणतेंही वचन चालतें. अनेकवचनी उल्लेखांत वक्त्याचा तत्संबंधी आदर अनावृत म्हणजे उघडा, स्पष्टच आहे; आणि एकवचनी उल्लेखांत तो आवृत म्हणजे झांकलेला, गुप्त आहे इतकेंच. ह्यामुळें दादोबा, कृष्णशास्त्री, इ० गत वैयाकरणांसंबंधानें अद्याप, अनेकवचनींच प्रयोग आढळतो. परंतु मोरोपंत, तुकाराम, रामदास, ह्यांचे संबंधानें दोन्ही प्रकारचे प्रयोग आढळतात. त्यांतही केवळ ऐतिहासिक माणसासंबंधानें एकवचनी प्रयोगाचाच अधिक प्रचार आहे. विश्वामित्र, पाणिनि, शिवाजी, बाजीराव ह्यांचा अनेकवचनीं उल्लेख फारसा आढळत नाहीं म्हटलें तरी चालेल. तथापि त्यांबद्दलची लोकांची पूज्यबुद्धि बिलकूल घटलेली नाहीं, उलट वृद्धिंगतच होत आहे हें उघड आहे.

**१२५. ते ( त्या, तीं )**--तृ० पु० अनेकवचन-( गेल्या अंकीं सांगितलेलें ‘ तो ’ चें प्रतिनिधित्व व त्यामुळें त्याचा प्रमुखत्वानें उल्लेख ह्या गोष्टी येथेंही ध्यानांत ठेवाव्या. ) ह्यांचा एका व्यक्तीसंबंधानें आदरार्थी उल्लेख होतो हें वर आलेंच आहे. अनेक धर्मीविषयीं बोलतांना ह्यांचाच उपयोग होणें हें साहजिक आहे. ( ऐतिहासिक मनुष्यांच्या उल्लेखासंबंधानें गेल्या अंकांतील सविस्तर खुलासा पहावा. )

१२६. **आपण--प्रधानपुरुषवाचक** म्हणजे प्रथम व द्वितीय पुरुष वाचक -हें पुरुषवाचक **आपण**, आत्मवाचक 'आपण' या सर्वनामाहून भिन्न आहे. ही गोष्ट जितक्या स्पष्टपणें सांगावयास पाहिजे तितक्या स्पष्टपणें आजपर्यंत सांगण्यांत आलेली नाहीं, म्हणून ती विसरूं नये. पुरुषवाचक **आपण** हें प्रथम आणि द्वितीय पुरुषांचें फक्त **अनेकवचनीं** उपयोगांत येतें. **आपण** या पुरुषवाचकाचा एकवचनीं उपयोग कोठेंच होत नाहीं. 'तुम्ही या अथवा नका, **आपण** जाणार;' '**आपण** गेलास तर गेलास, पण त्याला तरी न्यायचें नव्हतेंस;' इ० ठिकाणीं तें एकवचनी आहे असें वाटण्याचा संभव आहे. परंतु 'आपण' जाणार, हें जरी एक वक्ता म्हणूं शकला, तरी तें प्र० पु० एक वचन नव्हे हें खास, तर अनेवचनच होय. या ठिकाणीं आपण = आम्ही. कदाचित् येथें आपण = मी, असें जरी भासलें तरी तो भ्रम होय. कारण कीं, 'मी जाईन' ह्याचे जागीं 'आपण जाईन' असा प्रयोग होत नाहीं, तर 'आम्हीं जाऊं आपण जाऊं' असे अनेकवचनीं प्रयोग होतात हें उघड आहे. 'आपण गेलास तर गेलास' या दुसऱ्या स्थळीं जरी द्वितीय पुरुषाचें एकवचन स्पष्ट दिसत आहे, तरी तेथें 'आपण' हें मुळींच पुरुषवाचक नाहीं, तर केवळ आत्मवाचक आहे; आणि 'गेलास' याचा वास्तविक कर्ता 'आपण' नसून 'तूं' हा अध्याहृत आहे. या ठिकाणीं **आपण = स्वतः** एवंच **आपण** या पुरुषवाचक सर्वनामाचा एकवचनीं प्रयोग कधींच होत नाहीं.

(१) **आपण** (आम्हीं)--प्र० पु० अनेकवचन--**आपण** आणि **आम्ही** ह्यांचे उपयोगांत असा फरक दिसतो कीं, जेव्हां इतरांचे वतीनें म्हणजे त्यांचा पक्ष स्वीकारून आणि त्यांचेमध्यें व स्वतःमध्यें तेवढ्यापुरतें तादात्म्य कल्पून वक्ता बोलतो, तेव्हां तो, ते व स्वतः ह्यांबद्दल 'आम्हीं' याचा उपयोग करितो; आणि आपण म्हणजे 'मी व तूं किंवा तुम्ही मिळून' प्रथम व द्वितीय पुरुषासंबंधानें एकत्र बोलवयाचें असतां म्हणजे त्या दोन्ही पुरुषांबद्दल एकच विधान करावयाचें असतां 'आपण' या शब्दाचा प्रयोग होतो. उ०:--हिंदुवक्ता मुसलमानांस उद्देशून म्हणतोः--आम्ही तुह्मांशीं वाद करित नाहीं, फक्त तुम्हांस असें सुचवितों कीं, **आपण** एकदिलानें वागूं या; त्यांत दोघांचेंही हित आहे.' या ठिकाणीं आम्ही = मी व इतर हिंदु; 'येथें आम्ही' बद्दल आपण चालावयाचें नाहीं.

तसेंच, आपण = आम्ही व तुम्ही; येथें 'आपण' बद्दल 'आम्ही' शब्दाचा उपयोग होणार नाहीं हें उघड आहे. आपल्या पक्षकारांचे वतीनें वकील बोलावयास उठतो तेव्हां तो आपल्या पक्षकारामध्यें व स्वतःमध्यें तात्कालीन तादात्म्य कल्पून म्हणतो कीं, आम्ही आमची बाजू योग्य रीतीनें कोर्टापुढें मांडली आहे; यानंतर न्याय करणारें कोर्ट समर्थ आहे.' येथें आम्ही = मी व माझा पक्षकार. आणखी उदाहरणें:—त्या मंडळीला आज जाऊं द्या, आपण उद्यां जाऊं; येथें आपण = मी व तूं. 'आपणाला सांपडली असें कां म्हणतोस? मला सांपडली असें म्हण.' येथें 'आपणाला' म्हणजे मी व तूं मिळून दोघांनां, इ.

ज्याप्रमाणें एकच वक्ता आपणाकडे मोठेपणा घेऊन 'आम्ही' याचा, म्हणजे प्र० पु० चे अ० व० चा उपयोग करितो, त्याचप्रमाणें त्याच दृष्टीनें तो 'आपण' या प्र० पु० चे अनेकवचनाचा उपयोग कधीं कधीं करितो उदा०:—**आपण** (आम्ही—एकवचनार्थक, तेथें गेलों असतों, परंतु तेथें जाण्याची आतां आपली कांहीं एक शोभा राहिली नाहीं.

२ **आपण** (तुम्ही)—द्वि० पु० अनेकवचन—आपण आणि **तुम्ही** ह्यांमध्यें असा फरक आहे कीं, 'तुम्ही' ह्याचेपक्षा 'आपण' ह्यानें अधिक आदर व पूज्यभाव व्यक्त होतो. 'या प्रसंगी जर तुम्ही मला साहाय्य कराल तर **तुमचे** मजवर अनंत उपकार होतील.' यापेक्षां या प्रसंगीं जर **आपण** मजला........**तर आपले**........' हें भाषण अधिक आदर दाखवितें हें उघड आहे. म्हणून थोर मनुष्याशीं बोलावयाचें असतां 'तुम्हीं ह्याचे जागी 'आपण' ह्या द्वि० पु० चे अनेकवचनाचा उपयोग होतो. 'तुम्ही' पेक्षां 'आपण' हें अधिक सभ्यतेचें व शिष्टपणाचें समजलें जातें. ह्यामळें 'तुम्ही' चे जागी 'आपण' ह्याचा मराठी संस्थानांत, आणि विशेषेंकरून मराठांस हिंदीचा सहवास घडणाऱ्या हिंदुस्थानांतील मराठी संस्थानांत, प्रचार फार आढळतो.

(अ) जेव्हां वक्त्यापेक्षां वाच्य मनुष्य म्हणजे ज्याशीं बोलावयाचें तो, फारच मोठ्या दर्जाचा असतो अथवा बोलणाराचे मानानें त्याचा अधिकार फारच उच्च असतो तेव्हां 'आपण' या शब्दापेक्षांही अधिक आदर व्यक्त करणारे शब्द 'तुम्हीं ह्याचे जागीं, म्हणजे द्वि० पु०

अनेकवचनीं, उपयोगांत येतात. ते असेः—रावसाहेब, धनीसाहेब, यजमान, यजमानसाहेब, मालकसाहेब, महाराज, महाराजसाहेब, सरकार, सरकारस्वारी, स्वारी, हुजूर, खाविंद, इ०

( आ ) इतक्यानेंही आपली लीनता, किंवा आपल्या मनांतील दुसऱ्याचे विषयींचा पूज्यभाव पूर्णपणें व्यक्त होत नाहीं असें जर बोलणारास वाटलें तर आणखी एक श्रेष्ठ पर्याय उपलब्ध आहे. तो मात्र अखेरचा. म्हणून त्याचा उपयोग आदरबुद्धीची कमाल किंवा पराकाष्ठेचा पूज्यभाव दर्शविण्याचे वेळीं होतो. म्हणून राजा, बादशहा, गुरू, किंवा देव, यांजपाशीं प्रत्यक्ष बोलण्याचे प्रसंगीच त्याचा उपयोग व्हावा हें उचित होय. उ०:—चरणांस विदितच आहे कीं इ०, इतकीच पायांपाशीं विनंति आहे, इ०. अशा स्थळीं चरण, पाय, या शब्दांचा द्वितीय पुरुषाचे अनेक वचनाच्या जागीं उपयोग झाला आहे हें उघड आहे.

( इ ) आपल्यापेक्षां कमी दर्जाचे मनुष्यापाशीं रागानें, तिरस्कारानें, किंवा औपरोधिक रीतीनें बोलावयाचें असतांही कधीं कधीं **आपण** याचा उपयोग होतो जसें:—**आपलें** काय विचारावें, **आपण** दोड शहाणे अहां; **आपणां**सारखे बृहस्पतीचे अवतार कमी आहेत म्हणूनच बरें; असें पुन्हा कराल तर **आपणांस**, राजश्री, शालजोडींतलेच बसतील बरें? इत्यादि.

( ई ) 'आपण बसतील,' 'आपण करितील' आपण तकलीप घेतील' असें प्रयोग उत्तर हिंदुस्थानांतील शिष्ट मराठींत ऐकूं येतात. ह्या ठिकाणीं 'आपण' म्हणजे तुम्ही असा अर्थ आहे; अर्थात् 'आपण' हें द्वितीय पुरुषाचे अनेकवचन आहे. तरी त्याचा तृतीय पुरुषाचे क्रियापदाबरोबर योग झालेला आहे. कर्तरि प्रयोगांत क्रियापदाचा व कर्त्याचा पुरुष एक असावा लागतो. परतु त्या नियमास हा अपवाद दिसतो. संस्कृतांतही ह्याच्यासारखा एक अपवादक प्रयोग आढळतो. 'भवान्' हें द्वितीय पुरुषवाचक सर्वनाम असून त्याचा नेहमीं तृतीय पुरुषाचे क्रियापदाशींच संयोग व्हावा लागतो हें संस्कृतज्ञांस स्मरेलच. त्याच मासल्याचा वरील प्रयोग दिसतो. परंतु तो हिंदीचे द्वारा तिच्या सहवासांतील मराठींत घुसला; आणि म्हणूनच त्याचा प्रचार हिंदुस्थानांतील मराठींतच आढळतो. पण जरी हा प्रयोग तिकडे विशेष सभ्य व शिष्ट गणला

आहे तरी तो केवळ प्रांतिक म्हणजे एकदेशी पडल्यामुळें तो व्याकरणांत विशेष महत्त्वाचा नाही.

१२७. आतां **मी, तूं,** आणि **आपण,** ह्या प्रधानपुरुषवाचकांशिवाय इतर सर्वनामांचे वर्गीकरणाकडे वळूं. पूर्वीं ( अ० ११८ ) सांगितल्या-प्रमाणें इतर सर्व नामांचे पुढें दिलेले पांच वर्ग आहेत.

( १ ) **आत्मवाचक**—आपण स्वतः

( २ ) **दर्शक**--तो, हा.

( ३ ) **संबधी**--जो.

( ४ ) **प्रश्नार्थक**—कोण, काय.

( ५ ) **अनिश्चित,**—कोण, काय.

या भेदांचें आतां अनुक्रमें विवेचन करूं.

१२८. वाक्यामध्यें पूर्वीं येऊन गेलेल्या नामाबद्दलच किंवा सर्वनामा-बद्दलच त्याच वाक्यांत पुन्हां त्यांचा **अन्यव्यावृत्तिदर्शक उल्लेख** करावयाचा असतां जीं सर्वनामें येतात त्यांस **आत्मवाचक** असें म्हणतात. हीं दोन आहेत : **आपण** आणि **स्वतः**

**१२९. आपण** ( आत्मवाचक ):—हें '**आपण**' या पुरुषवाचका-हून भिन्न आहे. ' आपण ' पुरुषवाचकास एकवचन नाहीं हें पूर्वीं सांगितलेंच आहे; परंतु **आपण** या आत्मवाचकाचा दोन्ही वचनी उप-योग होतो. शिवाय पुरुषवाचक ' आपण ' हें वाक्यारंभीं येऊं शकतें आणि त्याचा कर्त्याचे जागींहीं उपयोग होतो; परंतु आत्मवाचक **आपण** याचा तसा उपयोग कधींच होत नाहीं. पुरुषवाचक ' आपण ' हें फक्त प्रथम व द्वितीय पुरुषीं अनेकवचनीं मात्र येतें; पण आत्मवाचक **आपण** तिन्ही पुरुषीं अनेकवचनीं मात्र येतें; पुरुषवाचक ' आपण ' प्रथम व द्वितीय पुरुषांच एकवचनीं येत नाहीं हें वर दाखविलेंच आहे. तसेंच तें तृतीय पुरुषीं कोणत्याच वचनी येत नाहीं. अर्थात तृतीय पुरुषीं कोणत्याही वचनीं येणारें **आपण** आत्मवाचक होय पुरुषवाचक नव्हे.' त्यानें रामाला पुस्तक दिलें आणि **आपण** निघून गेला.' ' मग **आपण** निघून गेले ' हीं अनुक्रमें खेर आणि दादोबा यांनीं. '**आपण**' याच्या तृतीय पुरुषाचे

उपयोगाचीं उदाहरणें दिलीं आहेत. या दोन्ही ठिकाणीं **आपण** हें तृतीय पुरुषाचे संबंधानें आलें आहे हें निर्विवाद आहे. प्रश्न इतकाच आहे कीं, या उदाहरणांतील ' आपण ' हें पुरुषवाचक आहे कीं आत्मवाचक आहे? खेर यांनीं आपल्या ( येथील पहिल्या ) उदाहरणांतील ' आपण ' पुरुषवाचक आहे असें स्पष्ट सांगितलें आहे.-Kher's Marathi G mr P.65 (5). दादोबा मुग्ध आहेत. तथापि त्यांचा झोंक तसाच दिसत आहे; कारण कीं, त्यांनीं आपण ह्याचा आत्मवाचक उपयोग वेगळा मानिलेलाच नाहीं. दुसरें उदाहरण दादोबांचें आहे; तरी तृतीय पुरुषाचे अनेकवचनाचें उदाहरण म्हणून तें खेरांस पसंत पडेल असें मानण्यास हरकत नाहीं. एवंच, वरील उदाहरणांमध्यें आलेलें ' आपण ' पुरुषवाचक आहे असें वाटण्याचा फार संभव आहे असें म्हटलें असतां चालेल. आमच्या मतें, पुरुषवाचक ' आपण ' हें तृतीय पुरुषीं मुळीं येतच नाहीं. यामुळें त्याचीं तृतीय पुरुषाचीं असंदिग्ध उदाहरणें मिळतच नाहीत; नाहीं तर तीं आजपर्यंतच्या वैयाकरणांनीं कोणी ना कोणी तरी, दिलीच असतीं. आणि वरील संदिग्ध उदाहरणांत सुद्धां ' आपण ' हें पुरुषवाचक मानण्यापेक्षां आत्मवाचक मानणें बरें असें वाचकाचे नजरेस आल्यावाचून राहणार नाहीं. ' रामानें पुस्तक दिलें आणि आपण निघून गेला ' या ठिकाणीं **आपण** ह्मणजे **स्वतः** असा अर्थ घेणें बरें; तसेंच 'मग आपण निघून गेले ' ह्या ठिकाणींही **आपण** म्हणजे **स्वतः** असाच अर्थ करून **आपण** ह्यास आत्मवाचक म्हणणें बरें. कारण कीं, पुरुषवाचक सर्वनाम वाक्याचे आरंभीं येऊं शकतें. आत्मवाचक येत नाहीं; हा दोहोंमधील फरक महत्त्वाचा आहे. तो वाचक विसरले नसतीलच. पहिल्या उदाहरणांत आलेलें ' आपण ' वाक्यारंभीं नाहीं हें उघडच दिसत आहे. आणि दुसऱ्या उदाहरणांत त्याचे मागें दुसरें नाम किंवा सर्वनाम जरी प्रत्यक्ष दिसत नाहीं, तरी तें गुप्त आहे, हें आरंभींच्या ' मग ' या शब्दावरून स्पष्ट होईलच. दुसरें असें कीं, वरील उदाहरणांत ' आपण ' ह्याचे जागीं ' स्वतः ' ह्या तदर्थक व असंदिग्ध आत्मवाचकाचा उपयोग करितां येतो. ' रामानें पुस्तक दिलें आणि स्वतः निघून गेला ' आणि ' मग स्वतः निघून गेले ' अशींही वरील वाक्यें होऊं शकतात. या दोन्ही उदाहरणांमध्यें ' निघून जाणें ' या क्रियेचे वास्तविक कर्ते ' तो ' आणि ' ते '

हे अध्याहृत आहेत. ‘ आपण ’ हें पुरुषवाचक जर तृतीय पुरुषीं येत असतें तर ‘ त्याचें नुकसान झालें ’ ‘ त्यांनीं नाटक पाहिलें ’ ह्यांच्या सारखीं ‘ आपलें नुकसान झालें ’ ‘ आपण नाटक पाहिलें ’ अशीं तृतीय-पुरुषार्थी पुरुषवाचक ‘ आपण ’ ह्याची निःशंक उदाहरणें मिळालीं असतीं. परंतु ‘आपलें नुकसान झालें ’ आणि ‘ आपण नाटक पाहिलें.’ ह्या ठिकाणीं तृतीय पुरुषाचा बोधच होत नाहीं, तर प्रथम किंवा द्वितीय पुरुषाचाच बोध होतो हें कोणीही कबूल करील. पुरुषवाचक सर्वनाम वाक्याचे प्रारंभीं येऊं शकतें म्हणजे त्याचे पूर्वी वाक्यामध्यें कोणतेंही नाम किंवा सर्वनाम येण्याची जरूर नसते; आणि ‘ आपण ’ ह्याचा तृतीय पुरुषीं असा वाक्याचे प्रारंभीं उपयोग होऊं शकत नाहीं; म्हणून तृतीय पुरुषीं येणारें **आपण** पुरुषवाचक नव्हे, हें सिद्ध होत नाहीं काय ? तेव्हां वादविषयक उदाहरणांतील **आपण** पुरुषवाचक नसून आत्मवाचक आहे ह्याबद्दल आतां कोणास शंका राहिली असेल असें वाटत नाहीं. याचप्रमाणें प्रथम व द्वितीय पुरुषांचे एकवचनीं येणारे **आपण** पुरुषवाचक नसून केवळ आत्मवाचक असतें असें सहज दाखवितां येईल.

( अ ) कधीं कधीं **आपण** ह्याची द्विरुक्ति होऊन **आपले आपण, आपल्या आपण, आपआपलें,** अशीं रूपें येतात. **आपले आपण** व **आपल्या आपण** म्हणजे **आपखुषीनें** किंवा **स्वतःचे इच्छेनें,** असा अर्थ आहे. **आपआपले** म्हणजे **अनेकांपैकीं प्रत्येकानें स्वतःचे**, हें उघड आहे. उदा०:—त्याला रोज उठवावें लागतें, आज तो **आपल्या आपण** उठला; प्रत्येकानें **आपआपल्या** पुस्तकाकडे पहावें; इ०.

( आ ) **आपण होऊन** असेंही ‘ आपखुषीनें ’ या अर्थी येतें. उदा०:— मी आपण होऊन बोललों.

( इ ) समासांत ‘ आपण ’ ह्याचे जागीं **आप** असें येतें. जसें:— **आपमतलब, आपखुषी, आपसुख,** इ०.

( ई ) वाक्यांतील पूर्वीच्या नामाबरोबर किंवा सर्वनामाबरोबर आत्म-वाचक **आपण** हें प्रथमा विभक्तीमध्यें उद्देश्यार्थी क्वचित् येतें. मी **आपण** बुडालों व त्यालाही बुडविलें, तो **आपण** समजतो परंतु त्यास दुसऱ्यास

समजावून सांगतां येत नाहीं, इत्यादि ठिकाणीं **आपण** ह्याचे जागीं **स्वतः** ह्याचा अधिक प्रचार दिसतो.

१३०. **स्वतः**—हें संस्कृतामध्यें **स्व** या सर्वनामास **तस्** हा पंचम्यर्थी प्रत्यय लागून झालें आहे; आणि त्याचा संस्कृतांत क्रियाविशेषण अव्ययाप्रमाणें उपयोग होतो. मराठीमध्यें 'स्वतः' ह्याचा **स्वतः** असा अपभ्रंश झाला आहे. तथापि ' स्वतां ' ह्याचे पक्षां **स्वतः** ह्याचाच शिष्ट मराठींत अधिक प्रचार आहे. 'स्वतः' हें मूळचें क्रियाविशेषण अव्ययासारखें असून मराठींत त्याला सर्वनाम मानण्याचें कारण असें कीं, त्यास विभक्तिप्रत्यय लागतात; आणि ' आत्मन् ' या संस्कृत शब्दाचा जसा ' अन्यनिराकरण ' या अर्थानें उपयोग होतो, तसा ' स्वतः ' ह्याचा त्याच अर्थानें मराठींत उपयोग होतो. म्हणून मराठीमध्यें **आपण** याजबरोबर **स्वतः** हें दुसरें आत्मवाचक सर्वनाम मानणें भाग आहे. दादोबा म्हणतात, ' जेव्हां हें सर्वनाम असतें तेव्हां त्यास विभक्ति लागतात.' ' याचें तृतीया विभक्तीचें निराळें रूप होत नाहीं. म्हणोन ती असतां **स्वतः** या अव्ययाचा प्रयोग करावा.' परंतु या म्हणण्यांत विशेष अर्थ दिसत नाहीं. **आपण** या सर्वनामाचीं जशीं ' आपण, आपणांहीं, आपणांशीं ' तृतीयेचीं रूपें दादोबांनीं दिलीं आहेत, त्याचप्रमाणें **स्वतः** ह्याचीं **स्वतःशीं** अशीं तृतीयेचीं रूपें प्रचारांत आहेत. म्हणजे ' आपण' ह्याची तृतीया जशी **आपण** हीच एक होऊं शकते तशी ' स्वतः ' ह्याची **स्वतः** ही एक तृतीया म्हणण्यास हरकत नाहीं ' याचें तृतीया विभक्तीचें निराळें रूप होत नाहीं ' असें जें दादोबांनीं म्हटलें आहे तें वर्तमानकाळीं तरी साफ चुकीचें आहे असेंच म्हटलें पाहिजे. ' स्वतःशीं ' हें रूप सर्वत्र फार प्रचारांत आहे, हें कोणासही सांगण्याची जरूर नाहीं. तृतीयेचा नेहमींचा प्रत्यय जो नें, तो लागून ' स्वतःनें ' असें रूप झालेलें आढळत नाहीं असें पाहून दादोबांची दृष्टि चकली असावी असें वाटतें. परंतु **नें** प्रत्यय लागून **आपण** ह्याचेंही ' आपणानें ' असें झालेलें रूप आढळत नाहीं; म्हणून ' आपण ' यासही तृतीया नाहीं असें म्हणावयाचें कीं काय? एवंच तृतीयेचीं ' स्वतः व स्वतःशीं ' अशीं दोन रूपें प्रचारांत आहेत. तेव्हां ' स्वतः ' याला मराठींत कोठेंच अव्यय मानण्याची जरूर नाहीं. जेव्हां प्रत्यय न लागतां तें

वाक्यांत येतें, तेव्हां तें अर्थानुरोधानें प्रथमान्त किंवा तृतीयान्त समजावें हें बरें. म्हणजे स्वतः हें कोठें सर्वनाम व कोठें अव्यय हा घोंटाळा नको.

**( अ )** प्रथम व द्वितीय पुरुषीं अनेकवचनीं **आपण** हें पुरुषवाचक असतें म्हणून या दोन पुरुषांचे अनेकवचनासंबंधानें जर आत्मवाचक सर्वनाम योजण्याचा प्रसंग आला, तर तें प्रथमेमध्यें बहुतकरून **स्वतः** हेंच येतें. तसें होणें हे साहजिक आहे. कारण की त्या, स्थळीं 'आपण' हें पुरुषवाचक म्हणून येत असल्यामुळें 'आपण' हेंच आत्मवाचक योजिल्यानें संदिग्धता व द्विरुक्ति यांचा आभास होण्याचा संभव आहे. तो संभव टाळण्यासाठीं त्या स्थळीं स्वतः ह्याचाच उपयोग अधिक इष्ट आहे. 'आम्ही आपण गेलों,' 'तुम्ही आपण गेलां' असा भाषाप्रचार नसून 'आम्ही स्वतः' 'तुम्ही स्वतः' असाच प्रचार आहे हें उघड आहे. परंतु आम्ही व तुम्ही ह्यासंबंधानें सुद्धां प्रथमेतर विभक्तींत **आपण** हें आत्मवाचक योजण्यास हरकत नाही. जसें:—'आम्ही **आपलें** व्यर्थ नुकसान करून घेतलं, 'तुम्ही **आपणांस** व्यर्थ त्रास दिलात,' इ०.

**( आ )** मागल्या अंकांतील ( ई ) ह्या ठिकाणची **स्वतः** ह्याची इष्टता संस्मरणीय आहे.

( इ ) कधीं कधीं अन्यव्यावृत्तीवर जोर द्यावयाचा असतां **आपण** व **स्वतः** या दोन्ही आत्मवाचकांचा एकत्र उपयोग होतो. जसें:- त्यानें **आपलें स्वतःचें** नुकसान करून घेतलें; तुम्ही **आपण स्वतःसच** विचारून पहा, इ०.

( ई ) या अर्थानें कधीं कधीं एका आत्मवाचकाबद्दल **जातीनें** किंवा **खुद्द** हा शब्द येऊन त्याचे बरोबर **स्वतः** किंवा **आपण** ह्यांपैकीं एखादें आत्मवाचक येतें. जसें:—मी **स्वतः जातीनें** गेलों होतों, त्यानें **खुद्द स्वतः** तें पहिलें, त्यांनीं **जातीनें आपलें** नुकसान करून घेतलें, इ०. येथें **जातीनें** या शब्दास क्रियाविशेषणाचा अर्थ आहे हें उघड आहे. खुद्द हें मात्र निव्वळ क्रियाविशेषणच आहे.

( उ ) हा 'अन्यनिराकरणाचा अर्थ' दाखविण्याचा आणखी एक जोरदार पर्याय आहे, **तो** असाः—माझा मी, ज्याचा तो, इ०. **जसें:**—अभ्यास हा **ज्याचा त्यानेंच** केला पाहिजे; संकटसमयीं **ज्याचा तो,**

म्हणजे दुसरा कोणी नाहीं, ह्या कामांत तुम्हांस पडण्याची गरज नाहीं, **आमचें आम्हीं** पाहून घेऊं, इ०.

१३१. ज्या सर्वनामानें जवळचा अथवा दूरचा धर्म किंवा धर्मी म्हणजे प्राणी अथवा पदार्थ दाखविला जातो त्यास **दर्शक सर्वनाम** असें म्हणतात. दर्शक सर्वनामें दोन आहेत : **हा** आणि **तो.** हीं लिंगभेदानें बदलतात. पु०—हा, स्त्री०—ही, न०—हें; त्याचप्रमाणें तो–ती–तें.

१३२. हा (हीं, हें):—**हा** हें दर्शक सर्वनाम जवळचा धर्म, प्राणी किंवा पदार्थ दाखवितें.

टीप—'हा मनुष्य,' 'तो मनुष्य,' इ० स्थळीं येणारीं हा आणि तो हीं दर्शक सर्वनामें नव्हत. कारण कीं, येथें तीं नामांबद्दल येत नसून नाम त्यांचे पुढेंच आहे. ह्यामुळें येथें त्यांस 'दर्शकविशेषणें' असें म्हटलें पाहिजे. यावरून एक सर्वसाधारण प्रश्न उभा राहतो. तो असाः—कोणतेंही सर्वनाम नामाच्या लगेच पाठीमागें आलें अथवा ज्या नामासंबंधानें त्याचा उपयोग होत असेल तें नाम लगेच त्याचेपुढें आलें असतां त्या ठिकाणीं त्यास सर्वनाम म्हणतां येतें कीं नाहीं, किंवा त्यास विशेषणच म्हटलें पाहिजे ? ह्या प्रश्नाचें उत्तर विशेषणांचे विवेचनांत देण्यांत येईल. येथें सध्या इतकेंच सांगतों कीं, ज्या नामासंबंधानें हा, तो, जो, कोण, काय हीं येतात, तीं नामें वाक्यांत लगेच त्यांचे पुढें आलीं असतां त्यांस बहुधा विशेषणें म्हणावें; त्यांस सर्वनाम म्हणावयाचें तेव्हां त्यांचेपुढें बहुधा तें नाम येणें कामाचें नाहीं. या स्थळींच्या 'बहुधा' शब्दाची आवश्यकता आणि या एकंदर प्रश्नाचा सविस्तर खुलासा पुढील विशेषणाध्यायांत पहावा.

(अ) ज्या नामाबद्दल **हा** हें सर्वनाम योजावयाचें आहे तें जर पूर्वी येऊन गेलें नसेल तर तें प्रथम योजून लगेच त्याचे पुढें हें सर्वनाम घालतात. जसें:—पुरुषवाचक 'आपण' हें आत्मवाचक 'आपण' ह्या पासून भिन्न आहे; राष्ट्रीयसभा **ही** फार उपयुक्त संस्था आहे; मनुष्य **हा** बुद्धिमान प्राणी आहे; ज्या नामाबद्दल '**हा**' हें सर्वनाम इ०.

(आ) अनेक नामांबद्दल कांहीं सर्वसाधारण विधान करावयाचें असतां त्यांचे नंतर 'हा' दर्शक सर्वनामाचा उपयोग करितात. जसें:— मी, तूं, आपण, हीं पुरुषवाचक सर्वनामें होत; पांडु, काशी, दत्तु, **हीं** काल गेलीं; इ०.

(३) कधीं कधीं **हा** हें सर्वनाम क्रियाविशेषण अव्ययाप्रमाणें योजतात. तेव्हांही त्यास लिंग आणि वचन ह्यांचे विकार होतात; पण विभक्ति प्रत्यय लागत नाहींत. त्या वेळीं त्याचा अर्थ 'आतांच' किंवा 'लगेच' असा असतो जसें:--तुम्ही कधीं आलां? हा आलों एवढ्याच; तुम्ही पुढें चला, आम्ही हे आलोंच किंवा येतोंच; इ०. येथें हा=आतांच आणि हे=लगेच, पाठोपाठ.

१२३ **तो (ती, तें)**--तो हें दर्शक सर्वनाम लांबचा धर्म, प्राणी अथवा पदार्थ दाखवितें.

टीप--हा आणि तो ह्या दर्शक सर्वनामांमधील अर्थाचा फरक नेहमींच पाळला जातो असें नाहीं. समजा कीं, एक मनुष्य आपणाकडे येत आहे; त्याचे संबंधानें आपण शेजारच्या मनुष्यास प्रश्न केला, 'अहो हा समोरून येत आहे हा कोण हो?' तेव्हां शेजारच्या मनुष्यानें उत्तर दिलें 'अहो हा आपला गोविंदा!' ह्या ठिकाणीं हा ह्याचे जागीं तो हें सर्वनाम सुद्धां येण्यास हरकत नाहीं. कधीं कधीं ज्याचे संबंधानें एकदां हा हें आलें आहे त्याचेच संबंधानें लगेच नंतर तो हेंही योजिलेलें आढळतें. जसें:—हीं सर्व साधनें जसजशीं तयार होतील व त्यांचा चोंहोंकडे फैलाव होईल, त्याप्रमाणें मराठी व्याकरणाचा योग्य रीतीनें विचार करण्यास अधिक सौलभ्य येईल यांत संशय नाहीं.—कृष्णशास्त्री चिपळूणकर म० व्या० निबंध, पृष्ठ २२.

[ कृष्णशास्त्री गोडबोले ह्यांनीं आपल्या व्याकरणांत **हा** आणि **तो** ह्यांचेसंबंधानें एक नियम दिला आहे व त्याचा खेरांनीं अनुवाद केला आहे. तो असा:--

'पूर्वी सांगितलेल्या दोन वस्तूंतून किंवा वाक्यांतून मागून सांगितलेली वस्तु किंवा वाक्य हा हें सर्वनाम दाखवितें. आणि प्रथम सांगितलेली वस्तु किंवा वाक्य तो हें सर्वनाम दाखवितें. परंतु कवितेंत कधीं कधीं हा नियम व्युत्क्रम आढळतो' (नवीन मराठी व्याकरण १८४--ब.)

इंग्रजी भाषेंत Former आणि Latter या शब्दांचे उपयोगासंबंधानें अशा प्रकारचा नियम आहे. त्यावरून नवीन मराठी व्याकरणकारांत वरील नियम सुचला असावा असें दिसतें. 'परंतु कवितेंत कधीं कधीं हा नियम व्युत्क्रम आढळतो' या त्यांचे म्हणण्यावरून गद्यामध्यें हा अनपवादक आहे किंवा नेहमीं पाळला जातो असें म्हणण्याचा त्यांचा आशय दिसतो. परंतु त्यांनीं गद्यांतील एकही उदाहरण दिलें नाहीं. अशा प्रकारचा कांही नियम मराठी भाषेंत आम्हांस तरी दिसत नाहीं. इतर वैयाकरणांनींही तो दिलेला आढळत नाहीं. आणखी, इंग्रजींत अशा प्रकारचा जो नियम आहे म्हणून

वर म्हटलें तो नियम इंग्रजीच्या मराठी विद्यार्थ्यांस प्रथम नीट समजत नाहीं हेंही अनुभवसिद्ध आहे. तेव्हां तो 'नवीन' च होय असें म्हणणें भाग आहे. एवंच, त्याची निर्विवादसिद्ध नियमांमध्यें गणना करणें योग्य नाहीं इतकेंच नव्हे तर तो प्रचलित मराठी भाषेचे दृष्टीनें स्वीकारार्हच नाहीं हें उघड आहे. ]

१३४. **जो** ( जी, जें ) हें एकच संबंधी सर्वनाम मराठींत आहे. तेव्हां तें शास्त्रीयदृष्ट्या लक्षणक्षमच नाहीं. ह्यामुळें संबंधी सर्वनामाचीं आजपर्यंत देण्यांत आलेलीं लक्षणें असमाधानकारक असावीं यांत नवल नाहीं. कांहींनीं इंग्रजी लक्षणाचा अनुवाद केलेला आहे. तो मराठींतील **जो** ह्यास सर्वथा लागू पडत नाहीं. " ज्या सर्वनामावरून पूर्वीं ज्याचा संबंध आलेला आहे अशा पदार्थांचा बोध होतो, तें संबंधी सर्वनाम. 'जो' म्हणजे पूर्वीं सांगितलेला कोणी असेल तो, म्हणून हें संबंधी सर्वनाम."
—जोशी. प्रौढबोध म० व्या० क० १६१. हें लक्षण इंग्रजी संबंधी सर्वनामांस यथायोग्य लागतें हें तज्ज्ञांस कळेलच. पण मराठींत **जो** ह्यास तें कसें लागतें हें मोठें गूढ आहे. '**जो**' म्हणजे पूर्वीं सांगितलेला कोणी असेल तो ' असें जोशी म्हणतात हें खरें; पण तें बहुतेक इंग्रजी होय. ' मुलें जीं मनापासून अभ्यास करितात तीं पास होतात. ' अशा वाक्यांतील संबंधीं सर्वनामांस त्यांचें लक्षण साजतें. पण असलीं वाक्यें मराठी भाषेस साजत नाहींत त्यास काय उपाय? त्यांचे जागीं ' जीं मनापासून अभ्यास करितात इ० ' किंवा ' जीं मुलें इ० ' अशीं वाक्यें मराठींत बहुधा येतात. त्यांचें लक्षण भाषांतरी विदेशी मराठीस लागतें; तें मराठी भाषेच्या मूळ स्वभावाचे दृष्टीनें ग्राह्य होण्यासरखें आहे असें दिसत नाहीं. तेव्हां **जो** ह्या संबंधी सर्वनामाचें लक्षण शक्य नसल्यामुळें त्याचें लक्षणकल्प वर्णन काय, म्हणजे त्याचे ठायीं कोणते विशेष धर्म आहेत तें पाहूं.

( **अ** ) मराठी संबंधी सर्वनाम हें नेहमीं **तो** ह्या सर्वनामाशीं संबद्ध असतें. **हा** ह्या दर्शक सर्वनामाशीं त्याचा संबंध कधींच घडत नाहीं. वाक्यामध्यें संबंधी सर्वनाम प्रथम येतें व त्याचे नंतर **तो** हें येतें. संबंधी सर्वनामाशीं अशा प्रकारें जोडल्या जाणाऱ्या **तो** या सर्वनामास केवळ दर्शक ही संज्ञा देणें योग्य नाहीं. तर त्यास दादोबांनीं सुचविल्याप्रमाणें **प्रतिसंबंधी** म्हणण्यास हरकत नाहीं. त्यापेक्षांहीं **अनुसंबंधी** ही संज्ञा बरी.

' अनुसंबंधी ' या शब्दामध्यें संबंधीचे पाठीमागून येण्याचे धर्माचाही स्पष्ट बोध होत आहे. म्हणून **जो** ह्याचे जोडीनें येणाऱ्या **तो** ला **अनुसंबंधी** म्हणणें बरें.

( **आ** ) संबंधी सर्वनाम ज्या नामाबद्दल येतें तें संबंधी सर्वनामाचे पूर्वींच मराठींत येतें असा नियम नाहीं. सर्वनाम ज्या नामाबद्दल येतें त्याचा उल्लेख सर्वनामाचे पूर्वीं बहुधा झालेला असतो, म्हणून त्या नामास **पूर्वनाम** अशी जर संज्ञा दिली, तर संबंधी सर्वनामाचें पूर्वनाम मराठींत बहुधा त्याचे नंतर येतें. जसें:—जो या परीक्षेंत पहिला येईल त्या **मुलास** एक सुंदर पुस्तक बक्षीस मिळेल; जो **मुलगा** वडिलांची आज्ञा मानित नाहीं त्याचें कल्याण होत नाहीं; इ०.

( **इ** ) संबंधी सर्वनाम एकटें कधींच येत नाहीं; त्याचे मागून त्याचें अनुसंबंधी आलेंच पाहिजे. म्हणून संबंधी सर्वनाम ज्या वाक्यांत असतें तें निवळ एक वाक्य किंवा वाक्यपृथक्करणाचे भाषेनें ' केवल वाक्य ' कधींच नसतें, हा मुद्दा वाक्यमीमांसेच्या दृष्टीनें महत्त्वाचा आहे.

( **ई** ) संबंधी आणि त्याचे अनुसंबंधी हीं दोन्ही एकाच नामाचे जागीं येतात. म्हणजे त्यांचें पूर्वनाम नेहमीं एकच असतें. तें जर पूर्वीं येऊन गेलें असेल किंवा वाक्यांतील अर्थानुरोधानें समजण्यासारखें असेल तर संबंधी व अनुसंबंधी हीं दोन्ही सर्वनामें असतात. उदा.:—**जें** पहावें तें लबाड, **जो** करील **तो** भरील; काल **जी** आली **तिलाच** स्वयंपाकास बोलाव; इ०. या वाक्यांतील संबंधी व अनुसंबंधी सर्वनामें अनुक्रमें माणुस, मनुष्य, बाई ह्या नामांबद्दल आलेलीं आहेत हें वाक्यार्थावरून स्पष्टच आहे.

परंतु जेथें पूर्वनाम पूर्वीं गेलेलें नसतें व वाक्यार्थानुरोधानें समजण्यासारखें नसतें, तेथें संबंधी किंवा अनुसंबंधी, कोणतें तरी एक, विशेषण होतें; म्हणजे कोणत्या तरी एकाचे पुढें नाम येतें. जसें:—जो पहिला येईल **त्या मुलास** बक्षीस मिळेल; किंवा, **जो मुलगा** पहिला येईल त्यांस बक्षीस मिळेल. जे आकाशांत उडतात **त्या प्राण्यांस** पक्षी म्हणतात; किंवा जे **प्राणी** आकशांत उडतात त्यांस पक्षी म्हणतात. इ०.

( **उ** ) प्रथम व द्वितीय पुरुषवाचक सर्वनामांबद्दलही संबंधी सर्वनाम कधीं कधीं येतें. जसें:—**मी जो** तुला बोलतों तो तुझें हित व्हावें म्हणून; **तुम्ही** जे आलांत त त्याला भेटून आलांत काय? इ०.

टीपः—कधीं कधीं संबंधी व अनुसंबंधी या दोहोंच्यापुढें प्रथम व द्वितीय पुरुषवाचक सर्वनामें चोडून येतात. जसें:—**ज्या तुला** अक्षर ओळखहीं नाहीं **त्या तुला** पुस्तकाचा काय उपयोग? **ज्या मला** आजारामुळें घरांतल्या घरांत हिंडण्याफिरण्याची पंचाईत पडते **त्या मला** इतकें कसें चालवेल? इ०

( ऊ ) कधीं कधीं संबंधी सर्वनाम अध्याहृत असतें; अनुसंबंधी मात्र नेहमीं व्यक्तच असलें पाहिजे. उदा०:—( जो ) गर्जेल **तो** पडेल काय आणि ( जो ) बोलेल **तो** करील काय; मला येईल **तें** मी तुला सांगेन; तुला पाहिजे **तें** तूं घे; इ०.

( ऋ ) कधीं कधीं संबंधी व अनुसंबंधी ह्यांचा उपयोग त्यांच्या पूर्वनामाच्या व्याप्तीची पूर्णता किंवा साकल्य दाखवितो. जसें:—**जें** पहावें **तें** लबाड = सर्वच माणसें लबाड; **जो** येतो **तो** आपला घोड्यावर = जे येतात ते सर्वच गर्दींत आहेत; इ०.

( ऌ ) साकल्याच्या अर्थावर जोर द्यावयाचा असतां संबंधी व अनुसंबंधी ह्याची बहुधा द्विरुक्ति होतें. जसें:—**जो जो** उद्यां उशिरां येईल **त्याला त्याला** शासन करण्यांत येईल; **जो जो** किजे परमार्थ लाहो ॥ **तो तो** पावे सिद्धीतें. ॥

अशा ठिकाणीं अनुसंबंधीची कधीं कधीं द्विरुक्ति होतही नाहीं. जसें:—**जो जो** उशीर करील **त्याला** शिक्षा होईल.

( ए ) ह्याच अर्थीं म्हणजे साकल्यार्थीं कधीं कधीं **जो** ह्याचे नंतर **म्हणून** या अव्ययाचा किंवा **कोणी** अथवा **काय** या अनिश्चित सर्वनामाचा उपयोग करितात. जसें:—**जो कोणी** अ० **जो म्हणून** उशीर करील **त्यास** शिक्षा होईल; मला **जें काय** माहीत आहे तें मी तुला सांगेन; इ०.

टीपः—येथेंही कोणी व काय यांमधील साधारण फरक ( अंक १३६ ) लक्षांत ठेवावा.

( ऐ ) संबंधी अनुसंबंधी हीं एकत्र जोडल्यानेंही साकल्याचा अर्थ व्यक्त होतो. जसें:—आज काल **जो तो** स्वतंत्र; **ज्याला त्याला** श्रीमंती पाहिजे; इ०.

( ओ ) कधीं कधीं वर्णनामध्यें **तो** ह्या अनुसंबंधीबद्दल **असा** हा

शब्दही येतो. जसें:— नंतर **ज्यानें** हातांत खड्ग धारण केलें आहे, आणि **ज्याचें** एकंदर स्वरूपही भयंकर आहे, **असा** एक पुरुष आपल्या नजरेस पडेल.

१३५. प्रश्न विचारिण्याचे कामीं ज्या सर्वनामांचा उपयोग होतो तीं **प्रश्नार्थक** होत. तीं **दोन** आहेत. **कोण** आणि **काय.**

१३६. **कोण** आणि **काय** ह्यांचे उपयोगासंबंधानें जो साधारण नियम दृष्टीस पडतो तो असा कीं, **कोण** हें प्राण्यांसंबंधानें आणि विशेषेंकरून मनुष्यासंबंधानें येतें; आणि **काय** हें बहुधा सूक्ष्म म्हणजे क्षुद्र प्राणी आणि निर्जीव पदार्थ ह्यासंबधानें येतें. उदा०:—तो **कोण** ? हें काम **कोणीं** केलें ? तो मुंबईहून आला तेव्हां त्यानें **काय** आणलें ? **काय** घेण्याला बाजारांत जात आहेस ? हा **कोण** नवीनच प्राणी हो ? हा **काय** जीव आहे पहा ! इ०.

१३७. **कोण** आणि **काय** ह्यांचे उपयोगाचा जो हा नियम वर दिला आहे त्यास अनेक **अपवाद्** आढळतात.

( अ ) **विलक्षणपणा** किंवा आश्चर्य दाखवावयाचें असतां क्वचित् **कोण व काय** ह्यांची अदलाबदल होते. जसें:—**काय** हो मनुष्य हा ! **कोण** हो तांदुळ हे ! **काय** हो मूर्ख ! हा **कोण** खटाटोप ! **काय** जाणे ! हा **कोण** शहाणपणा ! इ०.

( आ ) एखाद्याबद्दल **तुच्छपणा** किंवा **तिरस्कार** दाखवावयाचा असतां **कोण** ह्याचे जागीं **काय** योजितात. जसें:—.

हा **काय** रत्नभोक्ता मारू अनुताप पावुनी हाका— मोरोपंत.

**( इ )** पुढील उदाहरणांत **कोण** हें **काय** बद्दल आलें आहे. ‘ **कोण** आतां तरी, करावा उपाय, वैरिया अपाय, होय जेणें ’ रामदास.

१३८. **कोण** ( प्रश्नार्थक ) ह्याचे उपयोगासंबंधानें पुढील गोष्टी लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत.

( **अ** ) स्त्री किंवा पुरुष ह्यांपैकीं विशेषेंकरून कोणासंबंधानें **प्रश्न** करावयाचा आहे हें माहित नसल्यास **कोण** ह्याचा **नपुंसकलिंगी** प्रयोग होतो. जसें:—**कोण बोलतें,** कोण रे तें, इ०. एरवीं ‘ कोण ’ ह्याचा **वाटेल त्या** लिंगीं प्रयोग होतो. जसें:—कोण गेला, कोण आली, इ०.

(आ) कधीं कधीं **कोण** ह्याजपासून **तिरस्कार** किंवा **क्षुद्रपणा** सुचविला जातो. जसें:—हें लांकूड पडेना कां बाहेर, **कोण** बसला आहे न्यायला; कोणाचा **कोण** पितळेचा होन! इ०.

(इ) 'कोण—कोण' यांनीं दोन मनुष्यांमधील फरक किंवा अंतर व्यक्त होतें. जसें:—तो **कोण**, तूं **कोण** इकडे कांहीं तरी लक्ष द्यावयाचें होतेंस.

(ई) मनुष्यांचें पृथक्त्व, अगणितत्व व तज्जन्य आश्चर्य दाखवावयाचें असतां **कोण** ह्याची **द्विरुक्ति** होते. जसें:—काल सभेस **कोण कोण** आले होते; पुष्कळच लोक आले होते, **कोणा कोणाचीं** म्हणून नांवें सांगूं; इ०.

(उ) **कोण** ह्यापासून **कोणता** (—ती—तें) आणि **कोणचा** (—ची—चें—) हीं विशेषणें आलीं आहेत. ह्यांचाही प्रश्न करण्याचे कामीं उपयोग होतो. **कोणता** व **कोणचा** ह्यांचा उपयोग एकसारखाच आहे. **कोण** आणि **कोणता** ह्यांमधील फरक असा:—**कोण** ह्याचा साधारणपणें सर्वत्र उपयोग होतो; परंतु **कोणता** व **कोणचा** हे शब्द प्राणी किंवा पदार्थ ह्यांचे समुदायापैकीं एका किंवा अनेक विशिष्ट व्यक्तींस लागतात. जसें:—ह्या वर्गांत **कोणता** मुलगा विशेष हुषार आहे? ह्या आंब्यांपैकीं तुला **कोणते** पाहिजेत? इ०.

**टीप**—**कोणता** व **कोणचा** हे शब्द प्राणी व पदार्थ ह्या दोहों संबंधानें उपयोगांत येतात परंतु कोण हें सर्वनाम फार तर प्राण्यांसंबंधानें आणि विशेषेंकरून मनुष्य व उच्च प्राणी यासंबंधानें, आणि काय हें क्षुद्र प्राणी व पदार्थ यांसंबंधानें योजण्यांत येतें.

१३९. **काय** (प्रश्नार्थक)—ह्या सर्वनामाचे पुढील उपयोग संस्मरणीय आहेत:—

(अ) विवक्षित धर्मांचें असामान्यत्व दर्शविण्याचें कामीं **काय** ह्याचा प्रयोग होतो. जसें:—**काय** हें धैर्य; **काय** हा थोरपणा, **काय** हें वात्सल्य **काय** ही बुद्धिमता, इ०.

(आ) कधीं कधीं **काय** ह्याच्या द्विरुक्तीपासून पृथक्त्व, किंवा नानाविधत्व व कधीं कधीं नानाविधत्व व अगणितत्व व ह्यांपासून उत्पन्न होणारें आश्चर्यही दाखविलें जातें, जसें:—तूं बाजारांतून **काय काय**

आणिलेंस; मला सारे दोनच हात आहेत. मी करूं तरी **काय काय**; मी त्याचे **काय काय** गुण सांगूं; प्रदर्शनांत **काय काय** होतें म्हणून सांगूं; इ०.

(इ) कधीं कधीं **काय** ह्याचा अव्ययाप्रमाणें उपयोग होतो.

(१) साध्या विधानास प्रश्नार्थक रूप द्यावयाचें असतां:--तो गेला **काय** ? तूं हें पत्र वाचिलेंस **काय** ? इ०.

**टीप**--या ठिकाणीं **काय** ह्याचें भाषणप्रचारांत नुसतें **का** असें ही रूप होतें. जसें:--तो आला का ?

(२) आश्चर्य दाखविण्याचे वेळीं:--तो **काय** फारच शहाणा ! **काय**, तो येत नाहीं ! तो **काय** मनुष्य आहे थोडाच !

(३) असंभव किंवा अवश्यकता दाखविण्यासाठीं:--तो **काय** मला मारतो म्हणा !

१४०. **कोण** व **काय** ह्या सर्वनामांचा प्रश्नाशिवाय आणखी एक उपयोग आहे. जेव्हां **प्रश्नोत्तर** वाक्यामध्यें त्यांनीं कोणत्याही विशेष व्यक्तींचा किंवा पदार्थांचा बोध होत नाहीं, तेव्हां त्यांस **अनिश्चित सर्वनामें** असें म्हणतात. दादोबा ह्यांस **सामान्य** सर्वनाम असे म्हणतात. जसें:--कोणालाही सांगा; **काय** सांपडेल तें घे, त्याला **कशा**चाही विधिनिषेध नाहीं; इ०

१४१. (अ) **कोण** या **अनिश्चित** सर्वनामाची प्रथमा व तृतीया **कोणी** अशी होते. जसें:--**कोणी** वंदा **कोणी** निंदा; **कोणी** असें म्हणतात **कोणी** तसें म्हणतात; हें काम कोणीं (तृ०) केलें; इ०.

(आ) जेव्हां स्त्री किंवा पुरुष ह्यांपैकीं कोण विवक्षित आहे ह्याचा निश्चय नसतो, तेव्हां **कोणी** हें अनिश्चित **कोण** या प्रश्नार्थकाप्रमाणें नपुंसक असतें; जसें:--खालीं **कोणी** आलें तर मला सांग, इ०.

(इ) कधीं कधीं अनिश्चितार्थीं प्रथमेबद्दलही **कोण** येतें:--हें काम **कोण** कां करीना, काम झालें म्हणजे झालें. परंतु अशा ठिकाणीं **कोणी** हेंच अधिक प्रशस्त आहे.

(ई) 'कोणी--कोणी' या जोडीनें वैचित्र्य दाखविण्यांत येतें. जसें:--**कोणी दुष्ट**, तर **कोणी** कपटी; **कोणी** असें सांगतो **कोणी** तसें सांगतो, **समजावें** तरी काय; आजकाल चांगला चाकर फारच

दुर्मिळ; **कोणी** चुकार, तर **कोणी** चोर, आणि **कोणी** अडाणी. **कोणाचा** रंग काळा असतो, **कोणाचा** पांढरा असतो. इ०.

( उ ) कधीं कधीं कोणीबद्दल **कोण्ही** असें येतें. तें ' कोणीहीं ' याचें संक्षिप्त रूप असावें असें वाटतें. जसें:-- तेथें **कोण्ही** नाहीं. कोण्ही =कोणी ही. कोण्ही हें फक्त भाषणांत क्वचित् येतें.

( ऊ ) कधी कधी **कोणी** याची द्विरुक्ति होते. जसें:—कोणी कोणी असेंही म्हणतात.

१४२. **काय** या अनिश्चित सर्वनामाचे उपयोग येणेंप्रमाणें:--

( अ ) कधीं कधीं **काय** हें ' कांहीं ' या अर्थानें येतें:--कोणी **काय** म्हणो यासाठीं, अवचित प्रेम असावें गाठीं--शिवदिनकेसरी.

( आ ) बहुधा **काय** या अनिश्चिताचा **जो** या संबंधीं सर्वनामाप्रमाणें उपयोग होतो; आणि म्हणून **काय** ह्याचे नंतर **तो** हें अनुसंबंधी येतें. जसें:- तो **काय** दिसेल **तें** खातो; तो **काय** पडेल तें काम करणारा आहे; इत्यादि.

( इ ) कधी कधी **काय** ह्याचे पूर्वी **जो** हें संबंधी जोडण्यांत येतें. जसें:—तो **जें काय** म्हणेल **तें** खरें. तुला **जो काय** पाहिजे तो घे, इ०.

( ई ) ' काय– काय ' ह्या जोडीचा अर्थ ' हें आणि तें ' असा होतो. जसें:—मनुष्य **काय**, जनावर **काय**, सर्वांस स्वसंरक्षणापुरतें ज्ञान असतेंच. जोंधळा **काय**, बाजरी **काय**, गहूं **काय**,तुम्हांस **काय** पाहिजे तें तयार आहे. या वाक्यांतील शेवटल्या ठिकाणचें **काय** वगळून बाकीच्या ठिकाणच्या **काय** शब्दास **अनिश्चितार्थक अव्यय** म्हणावें हें बरें.

१४३ निषेधक वाक्यांत **कोण** व **काय** ह्यांनीं विवक्षित मनुष्यवर्गाचें किंवा वस्तुवर्गाचें पूर्ण निराकारण होतें. जसें:—न **कोणी कोणाचा** गुरु, न **कोणी कोणाचा** चेला; प्रश्न—जेवणाची तयारी कोठपर्यंत आली आहे ? रांगोळीविंगोळी घालाला लागले का ? उत्तर— **कशास कांहीं** ठिकाण नाहीं.

[ येथें या अध्यायांतील विषय संपला. आतां आरंभीं सांगितल्याप्रमाणें सर्वनामांच्या संख्येबद्दल आणि भेदांबद्दल चर्चा करणें राहिलें. प्रथम संख्येचा प्रश्न हातीं घेऊं.]

आणिलेंस; मला सारे दोनच हात आहेत. मी करूं तरी **काय काय**; मी त्याचे **काय काय** गुण सांगूं; प्रदर्शनांत **काय काय** होतें म्हणून सांगूं; इ०.

( इ ) कधीं कधीं **काय** ह्याचा अव्ययाप्रमाणें उपयोग होतो.

( १ ) साध्या विधानास प्रश्नार्थक रूप द्यावयाचें असतां:--तो गेला **काय** ? तूं हें पत्र वाचिलेंस **काय** ? इ०.

**टीप**--या ठिकाणीं **काय** ह्याचें भाषणप्रचारांत नुसतें **का** असें ही रूप होतें. जसें:--तो आला का ?

( २ ) आश्चर्य दाखविण्याचे वेळीं:--तो **काय** फारच शहाणा ! **काय**, तो येत नाहीं ! तो **काय** मनुष्य आहे थोडाच !

( ३ ) असंभव किंवा अवश्यकता दाखविण्यासाठीं:--तो **काय** मला मारतो म्हणा !

१४०. **कोण** व **काय** ह्या सर्वनामांचा प्रश्नाशिवाय आणखी एक उपयोग आहे. जेव्हां प्रश्नोत्तर वाक्यामध्यें त्यांनीं कोणत्याही विशेष व्यक्तींचा किंवा पदार्थांचा बोध होत नाहीं, तेव्हां त्यांस **अनिश्चित सर्वनामें** असें म्हणतात. दादोबा ह्यांस **सामान्य** सर्वनाम असें म्हणतात. जसें:--कोणालाही सांगा; **काय** सांपडेल तें घे, त्याला **कशा**चाही विधिनिषेध नाहीं; इ०

१४१. ( अ ) **कोण** या **अनिश्चित** सर्वनामाची प्रथमा व तृतीया **कोणी** अशी होते. जसें:--**कोणी** वंदा **कोणी** निंदा; **कोणी** असें म्हणतात **कोणी** तसें म्हणतात; हें काम कोणीं ( तृ० ) केलें; इ०.

( आ ) जेव्हां स्त्री किंवा पुरुष ह्यांपैकीं कोण विवक्षित आहे ह्याचा निश्चय नसतो, तेव्हां **कोणी** हें अनिश्चित **कोण** या प्रश्नार्थकाप्रमाणें नपुंसक असतें; जसें:--खालीं **कोणी** आलें तर मला सांग, इ०.

( इ ) कधीं कधीं अनिश्चितार्थीं प्रथमेबद्दलही **कोण** येतें:--हें काम **कोण** कां करीना, काम झालें म्हणजे झालें. परंतु अशा ठिकाणीं **कोणी** हेंच अधिक प्रशस्त आहे.

( ई ) 'कोणी--कोणी' या जोडीनें वैचित्र्य दाखविण्यांत येतें. जसें:--**कोणी** दुष्ट, तर **कोणी** कपटी; **कोणी** असें सांगतो **कोणी** तसें सांगतो, **समजावें** तरी काय; आजकाल चांगला चाकर फारच

दुर्मिळ; **कोणी** चुकार, तर **कोणी** चोर, आणि **कोणी** अडाणी. **कोणाचा** रंग काळा असतो, **कोणाचा** पांढरा असतो. इ०.

( उ ) कधीं कधीं कोणीबद्दल **कोण्ही** असें येतें. तें ' कोणीही ' याचें संक्षिप्त रूप असावें असें वाटतें. जसें:--तेथें **कोण्ही** नाहीं. कोण्ही =कोणी ही. कोण्ही हें फक्त भाषणांत क्वचित् येतें.

( ऊ ) कधी कधी **कोणी** याची द्विरुक्ति होते. जसें:—कोणी कोणी असेंही म्हणतात.

१४२. **काय** या अनिश्चित सर्वनामाचे उपयोग येणेंप्रमाणें:—

( अ ) कधीं कधीं **काय** हें ' कांहीं ' या अर्थानें येतें:--कोणी **काय** म्हणो यासाठीं, अवचित प्रेम असावें गाठीं--शिवदिनकेसरी.

( आ ) बहुधा **काय** या अनिश्चिताचा **जो** या संबंधीं सर्वनामाप्रमाणें उपयोग होतो; आणि म्हणून **काय** ह्याचे नंतर **तो** हें अनुसंबंधी येतें. जसें:- तो **काय** दिसेल **तें** खातो; तो **काय** पडेल तें काम करणारा आहे; इत्यादि.

( इ ) कधी कधी **काय** ह्याचे पूर्वी **जो** हें संबंधी जोडण्यांत येतें. जसें:—तो **जें काय** म्हणेल **तें** खरें. तुला **जो काय** पाहिजे तो घे, इ०.

( ई ) ' काय- काय ' ह्या जोडीचा अर्थ ' हें आणि तें ' असा होतो. जसें:—मनुष्य **काय**, जनावर **काय**, सर्वांस स्वसंरक्षणापुरतें ज्ञान असतेंच. जोंधळा **काय**, बाजरी **काय**, गहूं **काय**, तुम्हांस **काय** पाहिजे तें तयार आहे. या वाक्यांतील शेवटल्या ठिकाणचें **काय** वगळून बाकीच्या ठिकाणच्या **काय** शब्दास **अनिश्चितार्थक अव्यय** म्हणावें हें बरें.

१४३ निषेधक वाक्यांत **कोण** व **काय** ह्यांनीं विवक्षित मनुष्यवर्गाचें किंवा वस्तुवर्गाचें पूर्ण निराकारण होतें. जसें:—न **कोणी कोणाचा** गुरु, न **कोणी कोणाचा** चेला; प्रश्न—जेवणाची तयारी कोठपर्यंत आली आहे ? रांगोळीविंगोळी घालाला लागले का ? उत्तर— **कशास कांहीं** ठिकाण नाहीं.

[ येथें या अध्यायांतील विषय संपला. आतां आरंभीं सांगितल्याप्रमाणें सर्वनामांच्या संख्येबद्दल आणि भेदांबद्दल चर्चा करणें राहिलें. प्रथम संख्येचा प्रश्न हातीं घेऊं.]

दादोबांनीं सर्वनामांची संख्या बहुतेक अगणितच करून सोडिली आहे. आणि खेरादि बहुतेकांनीं त्यांचेंच अनुकरण केलें आहे. परंतु अशा प्रकारें सर्वनामांचा वर्ग व्यर्थ फुगविणें नीट नाहीं. कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं या प्रश्नाचा निकाल चार ओळींतच लाविला आहे. ते म्हणतात कीं, 'सर्वनामांस प्रत्यय लागून झालेल्या कित्येक शब्दांस दादोबांनीं सर्वनामांत गणिलें आहे. परंतु तसें करणें आम्हांस सयुक्तिक दिसत नाहीं. तसें केलें असतां धातूंपासून निघालेल्या नामांस व विशेषणांस धातु असें म्हणावें लागेल.' ( म व्या० निबंध पृष्ठ १०० ) हा निकाल ज्या तत्त्वास अनुसरून केलेला आहे तें फार महत्त्वाचें आणि सर्वसंमत आहे; असें असून त्यास जितका मान मिळावयास पाहिजे तितका अद्याप मिळालेला दिसत नाहीं. जोशी यांनीं कृष्णशास्त्र्यांचा मार्ग साधारणपणें अवलंबिण्याचा प्रयत्न जिकडे तिकडे केलेला आहे; त्याचप्रमाणें त्यांनीं कृष्णशास्त्र्यांची सूचना या ठिकाणीं पूर्णपणें स्वीकारिली आहे. परंत खेर आणि नवलकर ह्या इंग्रजी मराठी वैयाकरणांस तसेंच इतर मराठी व्याकरणकारांस वरील तत्त्व मान्य झालेलें दिसत नाहीं; म्हणून या प्रश्नाचा थोडासा विस्तृत विचार करणें इष्ट व अवश्य दिसतें.

दादोबादिकांचे मतें ज्यांचा सर्वनामांतच अन्तर्भाव केला पाहिजे, असे शब्द बहुधा दोन प्रकारचे आहेत. ( अ ) हा, तो, जो, कोण, आणि काय ह्यांपासून निघालेले म्हणजे सर्वनामोत्पन्न; आणि ( आ ) इतर म्हणजे ज्यांचा सर्वनामांशीं अर्थाअर्थी कांहीं एक संबंध नाहीं ते. ह्या दोन्ही प्रकारचे शब्द पुढें दिल्याप्रमाणें:—

( अ ) सर्वनामोत्पन्न.

हा— ( १ ) असा, असला, असलाला.
( २ ) इतका, एवढा.
( ३ ) इतकाला, एवढाला.
( ४ ) अमुक, अमका.

तो— ( १ ) तसा, तसला, तसलाला.
( २ ) तितका, तेवढा.
( ३ ) तितकाला, तेवढाला.
( ४ ) तमुक, तमका.

जो— ( १ ) जसा, जसला, जसलाला,
( २ ) जितका, जेवढा.
( ३ ) जितकाला, जेवढाला.

कोण— { (१) कसा, कसला, कसलाला, कोणसा.
(२) केवढा.
(३) केवढाला.

काय— { (१) कसा, कसला, कसलाला, कायसा.
(२) कितका.
(३) कितकाला.

(आ) इतर.

किती, कितीक, कित्येक, कितीएक, कैक, कईक.

| | |
|---|---|
| फलाणा. | भलता, भलतासा. |
| उभय, उभयतां. | एकमेक, परस्पर, अन्योन्य. |
| सर्व, अवघा, सगळा. | एक, हरएक, कोणी एक. |
| कांहीं, कांहीं एक. | एक एक, एकेक, एकक. |
| वरकड. | हरकोणी. |

हे दोन्ही प्रकारचे सर्व शब्द केवळ विशेषणें होत. पहिल्या (अ) प्रकारचे शब्द सर्वनामांपासून साधलेले असून त्यांचा नामाप्रमाणें उपयोग होतो हें खरे; तरी ते विशेषणेंच होत. कारण कीं; 'नामाची व्याप्ति मर्यादित करणें' हें जें विशेषणाचें लक्षण तें त्यांस पूर्णपणें लागू पडतें. सर्वनामें आणि विशेषणें यांमधील फरक स्पष्ट कळला म्हणजे प्रकृत मुद्याचा खुलासा नीट होईल. सर्वनाम म्हणजे सर्व नामांबद्दल येणारा शब्द; म्हणूनच त्यास स्वतःचा विशिष्ट अर्थ नाहीं; म्हणजे तें पूर्वापरसंबंधाशिवाय कोणताही विशेष प्राणी, पदार्थ, किंवा तन्निष्ठ धर्म दाखवीत नाहीं. तें केवळ एक अर्थहीन चिह्न होय असें म्हटलें पाहिजे. परंतु विशेषणांची गोष्ट तशी नाहीं. विशेषणें हीं नेहमीं प्राणी अथवा पदार्थ ह्यांच्या अंगचे धर्म दाखवितात आणि तीं विशेष्याची व्याप्ति मर्यादित करितात. कदाचित हा, तो, ह्यांनींही संनिधि आणि दूरत्व ह्या धर्मांचा बोध होतो असें वाटण्याचा संभव आहे. परंतु या अध्यायांत सांगितलेंच आहे कीं, जरी त्या शब्दांचा मूळ अर्थ तसा असला किंवा अद्यापही कधीं कधी त्या अर्थानें त्यांचा उपयोग होत असला तरी त्यांच्या अर्थातील हा फरक भाषेमध्यें सर्वत्र मानिला जात नाहीं; आणि ज्याला एकदां 'हा' हें लागलें आहे त्यालाच नंतर 'तो' हेंही लागलेलें वारंवार आढळतें. जो, कोण, काय, ह्यांस कांहीं मूळचा अर्थ आहे असें विशेषेंकरून म्हणतांच येत नाहीं. म्हणजे सर्वनामास मूळ विशिष्ट अर्थ नाहीं; आणि ह्यामुळेंच त्यांच्या योगें नामाची व्याप्ति मर्यादित होत नाहीं. परंतु वादविषयक शब्दांची गोष्ट निराळी आहे. खेर यांनींच त्यांचे अर्थ सांगितले आहेत. ते असेः—

( १ ) ह्या प्रकारचे शब्द जाति आणि प्रकार दाखवितात.

( २ ) ह्या प्रकारचे शब्द संख्या आणि परिमाण दाखवितात.

( ३ ) ह्या प्रकारचे शब्द संख्येची वांटणी दाखवितात.

पहिल्या ( अ ) वर्गातील शब्दांस ह्याप्रमाणें अर्थ असल्यामुळें त्यांनीं नामाची व्याप्तिही मर्यादित होते. म्हणजे 'काळा मनुष्य' असें म्हटल्यानें ज्याप्रमाणें सर्व मनुष्यांचा बोध न होतां कृष्णवर्णयुक्त अशा कांहीं व्यक्तींचाच बोध होतो, त्याचप्रमाणें 'असा मनुष्य' म्हटल्यानेंही विवक्षित प्रकारच्या मनुष्यांचाच बोध होतो. आतां तो विवक्षित प्रकार कोणता हें जसें 'काळा' या शब्दानें प्रत्यक्ष समजतें, तसें 'असा' ह्या शब्दानें लगेच प्रत्यक्ष कळत नाहीं; तर तें पूर्वसंबंधा वरूनच समजून येतें हें खरें; तरी असें होणें साहजिक आहे. कारण कीं, 'असा' हे मूळ 'हा' या सर्वनामापासून निघालेलें आहे. म्हणून तेवढ्यापुरतें 'असा' ह्यास सर्वनामाचेंही स्वरूप आहे. तरी त्यास सर्वनाम म्हणतां येत नाहीं. त्यास स्वतःचा वर निर्दिष्ट केलेला अर्थ असून तें विशेष्याची व्याप्ति मर्यादित करतें ह्या दृष्टीनें त्याचें प्रधान स्वरूप विशेषणासारखें आहे, असेंच म्हटलें पाहिजे. मात्र हीं विशेषणें सर्वनामोत्पन्न असल्यामुळें त्यांचे ठायीं सर्वनामाचेंही थोडेंसें सादृश्य दिसत आहे इतकेंच. 'कृति' हें नाम आणि 'कृ' हा धातु किंवा 'डोला' हें नाम आणि 'डोल' हा धातु ह्यांतील क्रियार्थ एकच आहे; तरी भाषादृष्ट्या नाम आणि धातु ह्यांचीं स्वरूपें जशीं निराळीं समजतात त्याचप्रमाणें सर्वनामें आणि सर्वनामोत्पन्न विशेषणें ह्यांचीं स्वरूपें भाषाशास्त्रदृष्ट्या भिन्नच होत.

'किती' ह्या शब्दापासून पुढें दिलेले दुसऱ्या ( आ ) प्रकारचे 'इतर शब्द' केवळ विशेषणें होत. वरील शब्द निदान सर्वनामसाधित तरी आहेत. परंतु 'फलाणा, सर्व, एक, इ०' शब्द मूळचेच विशेषणें होत. आणि यांस जर सर्वनाम म्हणावयाचें तर फार, अति, पुष्कळ, दोन, तीन, इ० शब्दांसही सर्वनाम कां म्हणूं नये हें आम्हांस समजत नाहीं. सर्व, अन्य, इ० शब्द संस्कृतांत 'सर्व' या शब्दाप्रमाणें चालतात, म्हणून त्यांस सर्वनामांत गणितात. परंतु मराठीमध्यें 'सर्वनाम' या पारिभाषिक शब्दाचा जर अर्थच निराळा झाला आहे, तर त्यांस ह्या नवीन अर्थानेंही सर्वनाम म्हणत सुटणें म्हणजे निवळ अंधपणा होय असें मोठ्या दुःखानें म्हणावें लागतें. एवंच, या दोन्ही ( अ आणि आ ) प्रकारच्या शब्दांची सर्वनामांत गणना करणें केवळ अनुचित होय हें उघड आहे.

कोणी असें म्हणेल कीं, 'फलाणा, सर्व, इ०' शब्दांचा अर्थ पूर्वसंबंधानेंच ठरतो. म्हणून या शब्दांस अनिश्चित सर्वनाम म्हणण्यास काय हरकत आहे ? परंतु हाच न्याय, 'फार, अति, पुष्कळ, थोडा, इ०' शब्दांस लागू नाहीं

काय ? ह्यांचा अर्थ तरी ' फलाणा, कांहीं, इ० ' शब्दांच्या अर्थाप्रमाणेंच पूर्वसंबंधानेंच ठरतो हें उघड आहे. तेव्हां ह्यांसही अनिश्चित सर्वनाम म्हणण्यास काय हरकत आहे ? परंतु ' फार, अति, थोडा, इ० ' शब्दांस दादोबा, खेर, किंवा कोणीच सर्वनामांत गणीत नाहींत; तर हीं सर्व विशेषणें होत ह्याबद्दल त्यांसही शंका नाहींच. आणि आमच्या मतें, ' फार, अति, थोडा, इ० ' विशेषणांत आणि ' फळाणा, कांहीं, सर्व, इ० ' शब्दांत मुदलींच अन्तर नाहीं. म्हणून ' फलाणा, कांहीं सर्व, इ० ' शब्द ' फार, अति, थोडा, इ० ' शब्दांप्रमाणेंच अनिश्चित विशेषणें होत हें निर्विवाद सिद्ध होत नाहीं काय ?

तात्पर्य, वर दिलेल्या दोन्ही प्रकारच्या शब्दांची सर्वनामांत भरती करणें मुळींच प्रशस्त नाहीं.

ह्यावरून, कृष्णाशास्त्री चिपळूणकर यांनीं मानलेली सर्वनामांची संख्या आम्हांस मान्य आहे असें मात्र कोणी समजूं नये. वरील दोन प्रकारचे शब्द—सर्वनामसाधित विशेषणें व मुळचीं विशेषणें असलेले शब्द—सर्वनाम या वर्गांत घेतां येत नाहींत आणि ते अमुक तत्त्वास अनुसरून विशेषणांतच घातले पाहिजेत ह्याबद्दल त्यांची व आमची पूर्ण एकवाक्यता आहे. परंतु सर्वनामांची संख्या नक्की अमुक असावी किंवा आहे या बाबतींत त्यांचा आमचा थोडासा मतभेद आहे. तसें म्हटलें तर शास्त्रीबोवांचें या प्रश्नासंबंधाचें अमुक एक मत आहे असें निश्चित मुळीं दिसतच नाहीं. निरनिराळ्या ठिकाणीं त्यांनीं निरनिराळें मत दिलेलें आढळतें. सर्वनाम हा मराठींत वेगळा वर्ग मानण्यापासून फळ आहे असें दाखवितांना ( निबंध. पृ० ४३।४४ ) सर्वनामें अमुकच आहेत असें त्यांनीं सांगितलेलें नाहीं. परंतु या ठिकाणीं त्यांनीं मी, तूं, तो, हा, जो, कोण, ह्या सहांचाच उल्लेख केला आहे. सर्वनामांचे प्रकरणांत तरी त्यांनीं अमुक हींच सर्वनामें होत असें कोठेंच म्हटलेलें नाहीं. परंतु मी, तूं, तो, हीं पुरुषवाचक; हा, हें दर्शक; जो, हें संबंधी; आणि कोण, काय, किती, हीं प्रश्नार्थक असें वेगळें वेगळें सांगितलें आहे. सामान्यसर्वनाम हा वेगळा वर्ग मानण्याची जरूर नाहीं असें त्यांचें मत आहे. सर्वनामांचे वर्गीकरणाचा प्रश्न ह्यानंतर ओघानेंच येईल, तेव्हां त्यांच्या ह्या मताचा विचार होईलच. सध्या इतकेंच पहावयाचें कीं, ह्या वर्गीकरणावरून शास्त्रीबोवांचे मतें मी, तूं, तो, हा, जो, कोण, काय, किती, इतकीं आठ सर्वनामें मानावीं असें दिसतें. परंतु पुढें त्यांचें विकरण आणि त्यांचे उपयोग हीं सांगतांना त्यांनीं ' किती ' ह्यास अजीच फांटा दिला आहे; आणि त्याचेसंबंधीं एक अक्षरही लिहिलें नाहीं. यावरून त्यांचे मतें ' किती ' हें सर्वनाम नसावें असें दिसतें; आणि त्यांच्या निबंधांचे प्रकाशक आणि स्वतंत्र वैयाकरण जोशी यांनीं ' किती ' हें वगळून बाकीचीं सात हींच सर्वनामें होत असें साफ म्हटलें आहे. ह्यावरून, कृष्णशास्त्री ह्यांचें मत सहा, सात, आठ ह्यामध्यें

जरी घोंटाळत आहे असें दिसतें तरी ते अखेरीस आपल्या अनुयायांचेच—जोशी यांचेच—मतावर येऊन ठरले असते असें वाटतें. ज्या दादोबांनीं सर्वनामांची यादी बहुतेक अनत करून सोडिली आहे म्हणावयाची, तेसुद्धां अखेरीस 'किती हें केवळ विशेषण होय' असा निकाल देतात. तेव्हां 'किती' ह्याचेबद्दल वादच राहिला नाहीं असें म्हटलें पाहिजे. म्हणून कृष्णशास्त्री व जोशी ह्यांचे मतें सर्वनामें सात आहेत; तीं:—मी, तूं, तो, हा, जो, कोण, काय, (प्रौढबोध व्या. क. १५६). आमच्या मतें या सातांत आणखी आपण आणि स्वतः ह्या दोहोंची भर घातली पाहिजे. ह्यास दादोबादिकांची संमति मिळेल कीं नाहीं हा प्रश्नच नको. त्यांनीं ह्यांस सर्वनामांत स्थळ दिलेंच आहे. कृष्णशास्त्री ह्यांचें मत ह्या शब्दासंबंधानें कोठेंच स्पष्ट झालेलें दिसत नाहीं. जोशी यांनी आपण हे 'आम्ही' बद्दल व आदरार्थी द्वितीय पुरुषीं येतें असें सांगितलें आहे (क०६४६). तथापि ते त्यास स्वतंत्रपणें सर्वनाम मानण्यास तयार दिसत नाहींत. नाहीं तर त्यांनीं या आठव्याची गणना सर्वनामांत केली असती. परंतु कृष्णशास्त्र्यांचा याबद्दलचा स्पष्ट अभिप्राय कोठेंच न आढळल्यामुळें आपण हें एक स्वतंत्र सर्वनाम होय असें म्हणण्याचें जोशी यांस धाडस झालें नसावें. काय असेल तें असो. आपण ह्यास स्वतंत्र सर्वनाम न मानण्यास आम्हांस कांहींच कारण दिसत नाहीं. आपण हें कोणत्याही दुसऱ्या सर्वनामाचें रूप किंवा त्यापासून साधलेलें रूप आहे असेंही म्हणतां येत नाहीं. तर तें 'आत्मन्, या संस्कृत शब्दापासून प्राकृतद्वारा (अप्पाणो) मराठींत आलें आहे, आणि संस्कृत 'आत्मन्' शब्दही संस्कृतांत सर्वनामाप्रमाणें रूढ आहे ह्या गोष्टी निर्विवाद आहेत. तसेंच आपण शब्द मराठींतही सर्वनामाप्रमाणें उपयोगांत आहे, ह्याबद्दलही प्रतिपक्षाचा वाद असेल असें वाटत नाहीं. जोशी यांनीं 'आपण' हा शब्द प्रथम व द्वितीय पुरुषीं येतो " सांगितलेंच आहे. तेव्हां प्रतिपक्षाची ही कबुली आपण ह्यास सर्वनामांत गणण्यास पुरेशी आहे. तेव्हां आतां वाद उरला काय तो स्वतःबद्दलचा. स्वतः हे स्व यास तस् प्रत्यय लागून संस्कृतामध्यें एक क्रियाविशेषण झालें आहे हें तज्ज्ञांस माहितच आहे. दादोबाही, ह्यास तृतीय विभक्ति लागत नाहीं, म्हणून क्रियाविशेषणच म्हणतात. एरव्हीं त्यांचें मतें स्वतः ह्यास सर्वनाम म्हणण्यास हरकत नाहीं. स्वतः ह्या शब्दास संस्कृतांत विभक्तिप्रत्यय लागत नाहींत म्हणून तें अव्यय होय हे ठीकच आहे. परंतु मराठींत जर त्यास विभक्तिप्रत्यय लागतात तर त्यास अव्ययांत ढकलतांच येत नाहीं हे निर्विवाद आहे. त्यास तृतीयेचे प्रत्यय लागत नाहींत हे दादोबांचें विधानही सर्वस्वी खरें नाहीं; कारण, 'स्वतःशीं' असे रूप प्रचारांत आहे. आणि नुसतें 'स्वतः' हेंही तृतीयेच्या अर्थानें येतें. आपण हें सुद्धां नुसतें तृतीयार्थी येतें, म्हणजे शब्दाचें मूळ रूप तसेंच तृतीयेच्या अर्थानें येतें हें केवळ

स्वतः या शब्दासंबंधानेंच नव्हे तर तूं, आपण या अन्य शब्दांसंबंधानें सुद्धां निर्विवाद आहे. ह्यामुळें स्वतः यास मराठींत कधींच क्रियाविशेषण मानण्याची गरज दिसत नाहीं. आणि कदाचित् त्यास क्रियाविशेषण समजणें कांहीं अंशीं ग्राह्य आहे असें जरी घेऊन चाललें, तरी त्यास मराठींत विभक्तिप्रत्यय लागत असल्यामुळें, आणि त्याचा संस्कृत 'आत्मन्' शब्दाप्रमाणें सर्वनामासारखा उपयोग होत असल्यामुळें त्याची सर्वनामांत गणना केलीच पाहिजे. या गोष्टी या अध्यायांत खुलासेवार आल्याच आहेत. म्हणून कृष्णशास्त्री व जोशी यांनीं मानिलेल्या सातांत आपण आणि स्वतः ह्या दोहोंची भर घालून सर्वनामांची संख्या नऊ मानणें अवश्य आहे हें उघड आहे.

आतां सर्वनामांचे वर्गीकरणाकडे वळूं. दादोबांनीं पुरुषवाचक, दर्शक, संबंधी, प्रश्नार्थक, आणि सामान्य, असे पांच भेद केले आहेत. कृष्णशास्त्री यांनीं सर्वनामांची संख्या फुगविण्याची जरूर नाहीं असें सांगून सामान्य सर्वनामांस फांटा दिला आहे. आणि जोशी यांनीं तोच मार्ग निमूटपणें स्वीकारून सर्वनामांचे चारच वर्ग मानिले आहेत. आतां सामान्य सर्वनामांत गोविलेलीं दादोबांचीं आक्षेपार्ह उदाहरणें सोडिलीं म्हणजे, ज्यांस सामान्य म्हणतां येईल अशीं स्वतंत्र उदाहरणें उरत नाहींत, हें खरें. तथापि तेवढ्यानें दादोबांचा सामान्य हा भेद साफ उडत नाहीं. कोण, काय, ह्यांचा दादोबांनीं सामान्य सर्वनामांतही उल्लेख केलेला आहे, त्यांची वाट काय? प्रश्न विचारण्याचे कामीं त्यांचा उपयोग होतो म्हणून तीं प्रश्नार्थक होत ह्याविषयीं कोणाचाच मतभेद नाहीं. त्यांचा केवळ प्रश्नार्थीच उपयोग झाला असता तर सामान्य सर्वनाम या वेगळ्या भेदाची जरूर लागली नसती. परंतु प्रश्नेतर वाक्यांत त्यांचा अनिश्चित अर्थानेंही उपयोग होतो ही गोष्ट जोशी यांनींही आपल्या व्याकरणांत (क० ६६४) नमूद केली आहे. त्यावेळींही त्यांस प्रश्नार्थक म्हणावयाचें कीं काय? प्रश्नार्थक वाक्यांतही तीं अनिश्चितार्थक असतात असें म्हणण्यास एकवार हरकत नाहीं. 'तिकडे कोण आलें आहे?' 'हें काय?' या वाक्यांत वक्त्याचे दृष्टीनें तीं निश्चित प्राणी किंवा पदार्थ दाखवीत नाहींत हें कांहीं अंशीं खरें आहे. तथापि कोण व काय हीं प्रश्नार्थक वाक्यांत विवक्षित स्थळीं निश्चित प्राणी किंवा पदार्थच दाखवितात हें प्रश्नांचें उत्तरावरून उघड आहे. परंतु 'कोणी निंदा कोणी वंदा' 'काय पाहिजे तें घे' ह्या ठिकाणीं तीं प्रश्नार्थकही नाहींत आणि निश्चितार्थकही नाहींत. तेव्हां त्यांस अशा स्थळीं प्रश्नार्थक कसें म्हणतां येईल? या ठिकाणचीं कोण व काय हीं जरी दिसण्यांत प्रश्नार्थक कोण व काय ह्यांपासून भिन्न नसलीं म्हणजे त्यांचा दोन्ही ठिकाणीं एकच उच्चार व एकच लेखनप्रचार जरी असला, तरी प्रश्नेतर वाक्यांत अनिश्चितार्थानें येणारीं कोण व काय प्रश्नार्थक नव्हत हें उघड आहे. शिवाय

जरी घोंटाळत आहे असें दिसतें तरी ते अखेरीस आपल्या अनुयायांचेच—जोशी यांचेच—मतावर येऊन ठरले असते असें वाटतें. ज्या दादोबांनीं सर्वनामांची यादी बहुतेक अनत करून सोडिली आहे म्हणावयाची, तेसुद्धां अखेरीस 'किती हें केवळ विशेषण होय' असा निकाल देतात. तेव्हां 'किती' ह्याचेबद्दल वादच राहिला नाहीं असें म्हटलें पाहिजे. म्हणून कृष्णशास्त्री व जोशी ह्यांचे मतें सर्वनामें सात आहेत; तीं:—मी, तूं, तो, हा, जो, कोण, काय, (प्रौढबोध व्या. क. १५६). आमच्या मतें या सातांत आणखी आपण आणि स्वतः ह्या दोहोंची भर घातली पाहिजे. ह्यास दादोबादिकांची संमति मिळेल कीं नाहीं हा प्रश्नच नको. त्यांनीं ह्यांस सर्वनामांत स्थळ दिलेंच आहे. कृष्णशास्त्री ह्यांचें मत ह्या शब्दासंबंधानें कोठेंच स्पष्ट झालेलें दिसत नाहीं. जोशी यांनी आपण हा 'आम्ही' बद्दल व आदरार्थीं द्वितीय पुरुषीं येतें असें सांगितलें आहे (क०६४६). तथापि त त्यास स्वतंत्रपणें सर्वनाम मानण्यास तयार दिसत नाहींत. नाहीं तर त्यांनीं या आठव्याची गणना सर्वनामांत कली असती. परंतु कृष्णशास्त्र्यांचा याबद्दलचा स्पष्ट अभिप्राय कोठेंच न आढळल्यामुळें आपण हें एक स्वतंत्र सर्वनाम होय असें म्हणण्याचें जोशी यांस धाडस झालें नसावें. काय असेल तें असो. आपण ह्यास स्वतंत्र सर्वनाम न मानण्यास आम्हांस कांहींच कारण दिसत नाहीं. आपण हें कोणत्याही दुसऱ्या सर्वनामाचें रूप किंवा त्यापासून साधलेलें रूप आहे असेंही म्हणतां येत नाहीं. तर तें 'आत्मन्, या संस्कृत शब्दापासून प्राकृतद्वारा (अप्पाणो) मराठींत आलें आहे, आणि संस्कृत 'आत्मन्' शब्दही संस्कृतांत सर्वनामाप्रमाणें रूढ आहे ह्या गोष्टी निर्विवाद आहेत. तसेंच आपण शब्द मराठींतही सर्वनामाप्रमाणें उपयोगांत आहे, ह्याबद्दलही प्रतिपक्षाचा वाद असेल असें वाटत नाहीं. जोशी यांनीं 'आपण' हा शब्द प्रथम व द्वितीय पुरुषीं येतो " सांगितलेंच आहे. तेव्हां प्रतिपक्षाची, ही कबुली आपण ह्यास सर्वनामांत गणण्यास पुरेशी आहे. तेव्हां आतां वाद उरला काय तो स्वतःबद्दलचा. स्वतः हे स्व यास तस् प्रत्यय लागून संस्कृतामध्यें एक क्रियाविशेषण झालें आहे हें तज्ञांस माहितच आहे. दादोबाही, ह्यास तृतीय विभक्ति लागत नाहीं, म्हणून क्रियाविशेषणच म्हणतात. एरव्हीं त्यांचे मतें स्वतः ह्यास सर्वनाम म्हणण्यास हरकत नाहीं. स्वतः ह्या शब्दास संस्कृतांत विभक्तिप्रत्यय लागत नाहींत म्हणून तें अव्यय होय ह ठीकच आहे. परंतु मराठींत जर त्यास विभक्तिप्रत्यय लागतात तर त्यास अव्ययांत ढकलतांच येत नाहीं हे निर्विवाद आहे. त्यास तृतीयेचे प्रत्यय लागत नाहींत ह दादोबांचें विधानही सर्वस्वी खरें नाहीं; कारण, 'स्वतःशीं' अस रूप प्रचारांत आहे. आणि नुसतें 'स्वतः' हेंही तृतीयेच्या अर्थानें येतें. आपण हें सुद्धां नुसतें तृतीयार्थी येतें, म्हणजे शब्दाचें मूळ रूप तसेंच तृतीयेच्या अर्थानें येतें हें केवळ

स्वतः या शब्दासंबंधानेंच नव्हे तर तूं, आपण या अन्य शब्दांसंबंधानें सुद्धां निर्विवाद आहे. ह्यामुळें स्वतः यास मराठींत कधींच क्रियाविशेषण मानण्याची गरज दिसत नाहीं. आणि कदाचित् त्यास क्रियाविशेषण समजणें कांहीं अंशीं ग्राह्य आहे असें जरी घेऊन चाललें, तरी त्यास मराठींत विभक्तिप्रत्यय लागत असल्यामुळें, आणि त्याचा संस्कृत 'आत्मन्' शब्दाप्रमाणें सर्वनामासारखा उपयोग होत असल्यामुळें त्याची सर्वनामांत गणना केलीच पाहिजे. या गोष्टी या अध्यायांत खुलासेवार आल्याच आहेत. म्हणून कृष्णशास्त्री व जोशी यांनीं मानिलेल्या सातांत आपण आणि स्वतः ह्या दोहोंची भर घालून सर्वनामांची संख्या नऊ मानणें अवश्य आहे हें उघड आहे.

आतां सर्वनामांचे वर्गीकरणाकडे वळूं. दादोबांनीं पुरुषवाचक, दर्शक, संबंधी, प्रश्नार्थक, आणि सामान्य, असे पांच भेद केले आहेत. कृष्णशास्त्री यांनीं सर्वनामांची संख्या फुगविण्याची जरूर नाहीं असें सांगून सामान्य सर्वनामांस फांटा दिला आहे. आणि जोशी यांनीं तोच मार्ग निमूटपणें स्वीकारून सर्वनामांचे चारच वर्ग मानिले आहेत. आतां सामान्य सर्वनामांत गोंविलेलीं दादोबांचीं आक्षेपार्ह उदाहरणें सोडिलीं म्हणजे, ज्यांस सामान्य म्हणतां येईल अशीं स्वतंत्र उदाहरणें उरत नाहींत, हें खरें. तथापि तेवढ्यानें दादोबांचा सामान्य हा भेद साफ उडत नाहीं. कोण, काय, ह्यांचा दादोबांनीं सामान्य सर्वनामांतही उल्लेख केलेला आहे, त्यांची वाट काय? प्रश्न विचारण्याचे कामीं त्यांचा उपयोग होतो म्हणून तीं प्रश्नार्थक होत ह्याविषयीं कोणाचाच मतभेद नाहीं. त्यांचा केवळ प्रश्नार्थींच उपयोग झाला असता तर सामान्य सर्वनाम या वेगळ्या भेदाची जरूर लागली नसती. परंतु प्रश्नेतर वाक्यांत त्यांचा अनिश्चित अर्थानेंही उपयोग होतो ही गोष्ट जोशी यांनींही आपल्या व्याकरणांत (क० ६६४) नमूद केली आहे. त्यावेळींही त्यांस प्रश्नार्थक म्हणावयाचें कीं काय? प्रश्नार्थक वाक्यांतही तीं अनिश्चितार्थक असतात असें म्हणण्यास एकवार हरकत नाहीं. 'तिकडे कोण आलें आहे?' 'हें काय?' या वाक्यांत वक्त्याचे दृष्टीनें तीं निश्चित प्राणी किंवा पदार्थ दाखवीत नाहींत हें कांहीं अंशीं खरें आहे. तथापि कोण व काय हीं प्रश्नार्थक वाक्यांत विवक्षित स्थळीं निश्चित प्राणी किंवा पदार्थच दाखवितात हें प्रश्नांचें उत्तरावरून उघड आहे. परंतु 'कोणी निंदा कोणी वंदा' 'काय पाहिजे तें घे' ह्या ठिकाणीं तीं प्रश्नार्थकही नाहींत आणि निश्चितार्थकही नाहींत. तेव्हां त्यांस अशा स्थळीं प्रश्नार्थक कसें म्हणतां येइल? या ठिकाणचीं कोण व काय हीं जरी दिसण्यांत प्रश्नार्थक कोण व काय ह्यांपासून भिन्न नसलीं म्हणजे त्यांचा दोन्ही ठिकाणीं एकच उच्चार व एकच लेखनप्रचार जरी असला, तरी प्रश्नेतर वाक्यांत अनिश्चितार्थानें येणारीं कोण व काय प्रश्नार्थक नव्हत हें उघड आहे. शिवाय

सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें म्हणजे त्यांचा प्रश्नवाक्यांत व प्रश्नेतर वाक्यांत एकच उच्चार होतो असेंही म्हणतां येत नाहीं; तर प्रश्नवाक्यांत त्यांस उच्चारामध्यें एका तऱ्हेचा झटका बसतो हें उघड आहे. परंतु ही बारकाई जरी बाजूस ठेविली तरी त्यांस सर्वत्र प्रश्नार्थक ही संज्ञा लाविणें अंधपणाचें होय हें वरील विवेचनावरून स्पष्ट झालेंच असेल. तसेंच सामान्य या शब्दापेक्षां त्यांस प्रश्नेतर वाक्यांत दादोबांचेशिवाय अन्य वैयाकरणांनीं म्हटल्याप्रमाणें अनिश्चित हा शब्द लावणें अधिक प्रशस्त आहे हेंही वाचकांचे नजरेस आलेंच असेल. एवंच, दादोबांचा सामान्य सर्वनाम हा पांचवा भेद कायम ठेविल्यांवाचून गत्यन्तर नाहीं. मात्र त्यास सामान्य असें न म्हणतां अनिश्चित असें म्हणणें बरें.

मी, तूं, तो, हा, जो, कोण, काय, या सातांचे पांच भेद मानिले पाहिजेत. मी, तूं, हीं पुरुषवाचक; तो, हा, हीं दर्शक; जो, हें संबंधी; आणि कोण, काय, हीं प्रश्नार्थक व अनिश्चित येथपर्यंतचें हें सात सर्वनामांचें वर्गीकरण ठीक झालें. म्हणजे कृष्णशास्त्री व जोशी ह्यांचीं सातच सर्वनामें जरी मानिलीं तरी त्यांचे चारच भेद मानून चालावयाचें नाहीं; तर पांच मानिले पाहिजेत हें सिद्ध झालें. परंतु आपण व स्वतः हीं जीं आणखी दोन सर्वनामें मानणें अवश्य आहे म्हणून वर सिद्ध केलें आहे, त्यांचा वर्ग कोणता हें पाहिलें पाहिजे. ह्यांपैकी, स्वतः बद्दलचा प्रश्न फारसा बिकट नाहीं; आणि तो सुटला म्हणजे आपण ह्याचाही निकाल लावण्यास सुलभ पडेल. म्हणून प्रथम 'स्वतः' कडे पहा. 'स्वतः' हें वाक्यांत स्वतंत्रपणें उद्देश्य कधींच होत नाहीं. आणि तें पूर्वी गेलेल्या व्यक्तीबद्दल आणि अन्य व्यक्तींचें निराकरण करण्यासाठीं येतें, इत्यादि गोष्टी प्रकृत अध्यायांत सविस्तर आल्याच आहेत. त्यांवरून तें वर दिलेल्या कोणत्याही सर्वनामापासून भिन्न आहे आणि त्याचा आणखी एक स्वतंत्रच भेद मानिला पाहिजे हें उघड आहे. इंग्रजीमध्यें यास reflexive pronoun असें म्हटलें आहे. त्याचा अर्थ 'पूर्वसंबंधी' किंवा 'परावर्तनसंबंधी' असा आहे. परंतु हे शब्द मराठींत अनेक दृष्टांनीं ग्राह्य दिसत नाहींत. ह्यास खेर ह्यांनीं 'आत्मपदवाचक' असें म्हटलें आहे. परंतु त्याचे जागीं आत्मवाचक हें नांव आम्ही योजिलें आहे. स्वतः याचा संस्कृतांतील 'आत्मन्' ह्या सर्वनामाप्रमाणें उपयोग होतो आणि त्याचा अर्थही तोच आहे म्हणून त्यास आत्मवाचक म्हणणें बरें. 'आत्मवाचक' ही संज्ञा जराशी अवजड आहे; आणि तींतील 'पद' शब्दाची आवश्यकता नाहीं हें कोणीही कबूल करील. खेर ह्यांनीं जरी स्वतः ह्याला ह्याप्रमाणें स्वतंत्र नांव दिलें आहे तरी ते त्याचा अनिश्चित सर्वनामांतच अन्तर्भाव करितात. ह्यास अनिश्चित कां म्हणावें हें आम्हांस तरी समजत नाहीं. तें ज्याचे संबंधानें उपयोगांत येतें त्याचा अर्थ त्यास निःसंशय प्राप्त होतो. 'त्यानें स्वतःचें नुकसान करून घेतलें' ह्या वाक्यांत स्वतः " 'तो'

ह्याबद्दल येत आहे आणि 'तो' ह्याचा अर्थ पूर्वसंबंधानें निश्चित आहे; म्हणून **स्वतः** ह्यासही सर्वस्वी निश्चित असाच अर्थ प्राप्त होत आहे. म्हणून **स्वतः** ह्याला अनिश्चित या वर्गांत ढकलितां येत नाहीं; तर त्याला सर्वनामांचे वर्गीकरणांत स्वतंत्रच स्थान मिळालें पाहिजे हें उघड आहे.

आतां आपण या सर्वनामाकडे वळूं. 'आपण' ह्याचा प्रथम व द्वितीय पुरुषीं उपयोग होतो हें सर्वांसच मान्य आहे; तसेंच आपण ह्याचा **स्वतः** ह्या शब्दाचे सारखाही उपयोग होतो ही गोष्ट निर्विवाद आहे. म्हणजे **आपण** हें **कोण** व काय ह्यांप्रमाणें आहे. **कोण** व **काय** हीं जशीं प्रश्नार्थक आणि अनिश्चित ह्या दोन्ही वर्गांत येतात असें वर दाखविलें त्याचप्रमाणें **आपण** ह्याच्या निरनिराळ्या उपयोगांकडे पाहिलें म्हणजे त्यालाही पुरुषवाचक आणि आत्मवाचक ह्या दोन्ही वर्गांत घालणें अवश्य आहे असें वाटल्यावांचून राहणार नाहीं. आमचे मतें पुरुषवाचक 'आपण' हें प्रथम व द्वितीय पुरुषीं अनेकवचनीं मात्र येतें आणि आत्मवाचक **आपण** हें तिन्ही पुरुषीं दोन्ही वचनीं येऊं शकतें. आजपर्यंतच्या वैयाकरणांस **आपण** ह्याचे उपयोगांतील हा फरक ढळढळीतपणें न दिसल्यामुळें त्यांनीं त्यास **स्वतः**चे बरोबर सरसकट सामान्य किंवा अनिश्चित असें म्हटलें आहे. परंतु पुरुषवाचक आपण तृतीय-पुरुषीं दोन्ही वचनीं आणि पहिल्या दोन पुरुषांचे एकवचनीं येतें कीं नाहीं, ह्याबद्दल जरी मतभेद होण्याचा संभव असला तरी आत्मवाचक आपण पुरुष-वाचकाहून सर्वस्वी भिन्न आहे, हें कधींच नाकबूल करितां यावयाचें नाहीं. आणि वर स्पष्ट केल्याप्रमाणें जसें **स्वतः**ला अनिश्चित या वर्गांत कोंबतां येत नाहीं, त्याचप्रमाणें आत्मवाचक **आपण** हेंही केवळ **स्वतः** यासारखेंच असल्या-मुळें त्यासही अनिश्चित असें म्हणतां यावयाचें नाहीं. करितां **स्वतः** आणि तद-र्थक **आपण** ह्यांचा आत्मवाचक म्हणून एक स्वतंत्र वर्ग करणें अवश्य आहे हें उघड आहे. **स्वतः** व तदर्थक **आपण** हीं इतर सर्वनामांहून भिन्न आहेत. इतर सर्वनामें वाक्यांत कर्ते होऊं शकतात; परंतु ह्यांचा उपयोग स्वतंत्रपणें कर्तृस्थानीं होत नाहीं. 'स्वतः गेला', 'आपण गेला' अशा स्थळीं **स्वतः** व **आपण** ह्यांचा कर्तृस्थानीं उपयोग झाला आहे असें वाटण्याचा संभव आहे. परंतु तो निवळ भास होय. वास्तविक पाहतां याठिकाणीं 'तो' हा अध्याहृत कर्ता असून **स्वतः** आणि आपण ह्यांचा 'जातीनें', 'खुद्द' असा अर्थ आहे हें उघड आहे. तथापि आपण हें जसें अव्यय नव्हे, तसें **स्वतः** हेंही आमचे मतें अव्यय नव्हे. आपण ही जशी उद्देश्यार्थी प्रथमा असें वरील वाक्यांत समजावयाचें त्याचप्रमाणें **स्वतः** या शब्दाची **स्वतः** ही प्रकृत स्थळीं उद्देश्यार्थी प्रथमा समजावी. परंतु प्रकृत स्थळीं **स्वतः** ह्याचें व्याकरण काय करावें ह्याबद्दल जरी मतभेद असला, तरी इतकें खरें कीं, **स्वतः** व **आपण** हीं आत्मवाचक

कर्तृस्थानीं येत नाहींत आणि त्याचप्रमाणें तदाधारभूत नामें किंवा सर्वनामें वाक्यांत पूर्वी प्रत्यक्ष किंवा अध्याहृत असल्याशिवाय त्यांचा प्रयोग संभवनीय नाहीं. ह्या बाबतींत आत्मवाचक सर्वनामांचें व इतर सर्वनामांचें मुळींच पटत नसल्यामुळें त्यांस स्वतंत्र घर बांधून देणेंच अवश्य आहे.

सारांश, खोगीरभरती सामान्य सर्वनामांस फांटा देऊन सर्वनामांची संख्या जरी कमी केली तरी कोण व काय ह्यांच्या प्रश्नेतर वाक्यांतील अनिश्चित उपयोगास अनुसरून सामान्य सर्वनाम अथवा भाषातारतम्यदृष्टीनें 'अनिश्चित सर्वनाम' हा वर्ग कायमच ठेविला पाहिजे. तसेंच आपण व स्वतः ह्या दोहोंस सर्वनामांतून वगळण्यांत कांहींच कारण नसल्यामुळें त्यांचा सर्वनामांत अन्तर्भाव करणें जरूर आहे इतकेंच नव्हे, तर पुरुषवाचक आपण इतर सर्वनामांत गेलें तरी स्वतः व तदर्थक आपण ह्यांचा उपयोग त्यांजपासून सर्वथा भिन्न असल्यामुळें त्यांचा 'आत्मवाचक' म्हणून सर्वनांमामध्यें आणखी एक सहावा भेद मानणें अवश्य आहे हें उघड आहे. ]

---

# अध्याय ४.

:o:

## विशेषण.

१४४. जो विकारी शब्द नामाची व्याप्ति मर्यादित करितो त्यास **विशेषण** म्हणतात. उदा०:---पांढरा, लाल, एक, दोन, इ०.

[ वास्तविक म्हटलें असतां सर्व विशेषणें विकार पावत नाहींत, हें पुढें विकरण-प्रकरणांत स्पष्ट होईलच. तथापि कोणतेंही विशेषण नामाप्रमाणें योजण्यास हरकत नाहीं. तेव्हां एकंदर सर्व विशेषणांस विकारी ही संज्ञा लागण्यास विशेष प्रत्यवाय दिसत नाहीं. विशेषणांची गणना सविभक्तिक शब्दांमध्यें ह्याच दृष्टीनें करावयाची. बाकी संस्कृतामध्यें जरी सर्व विशेषणांस विशेषणदृष्टीनेंही विभक्ति लागतात तरी तसा मराठी प्रचार नाहीं. कांहीं ठिकाणीं संस्कृत रचनेचें अनुकरण करून कवि मराठीमध्येंही विशेष्याची विभक्ति विशेषणांस लावितात म्हणजे मराठी विशेषणेंही ते विशेष्यनिघ्न करितात. तथापि मराठी विशेषणांची ही पद्यगत विशेष्यनिघ्नता अपवादकच होय. म्हणून विशेषणांस जर सविभक्तिक म्हणावयाचें आहे तर तें जरासें अप्रत्यक्षपणेंच होय. म्हणजे विशेषणांचा जेव्हां नामांप्रमाणें उपयोग होतो तेव्हां त्यांस विभक्तिप्रत्यय लागतात, आणि कोणत्याही विशेषणाचा नामाप्रमाणें उपयोग होतो; म्हणून विशेषणें हीं मराठींत अप्रत्यक्षपणेंच सविभक्तिक होत हें उघड आहे. विशेषणांस सविभक्तिक

म्हणण्यापेक्षां, त्यांचे ठिकाणीं विशेष्याचे लिंगवचनाप्रमाणें कांहीं विकार होतात ह्यामुळें तीं प्रत्यक्ष **विकारी** आहेत असें म्हणणें अधिक प्रशस्त आहे. आतां आकारान्त विशेषणांशिवाय इतर विशेषणांस असे विकार मराठींत बहुधा होत नाहींत हें खरें. तथापि कवीनें मनांत आणिलें तर संस्कृत पद्धतीस अनुसरून तो ह्या इतर विशेषणांसही विकृत करितो. अर्थात् ‘दीन वाणी’ असाच मराठी प्रचार खरा; तरी ‘दीना वाणी ऐकिली म्यां अरीची’ असेंही कवि म्हणतो. यावरून आकारान्तेतर विशेषणेंही मराठींत पद्यांत विकार पावतात हें उघड आहे. आणि प्रौढ गद्यांतही कधीं कधीं असा प्रकार आढळतो. ह्या दृष्टीनें विशेषणांस **विकारी** ही संज्ञा प्रत्यक्षपणेंही लावण्यास हरकत नाहीं. म्हणूनच विशेषणाचे लक्षणांत सविभक्तिक ह्या शब्दाचे जागीं **विकारी** या शब्दाची योजना करणें बरें. आतां ‘व्याप्ति मर्यादित करणें’ म्हणजे काय तें पाहू. विशेषणरहित नाम जितक्या वस्तूंस म्हणजे प्राण्यांस, पदार्थांस, किंवा धर्मांस लागतें त्यांचेपेक्षां विशेषणयुक्त नाम कमी वस्तूंस लागतें. ‘शाई’ हा शब्द जितका व्यापक आहे, म्हणजे तो जितक्या पदार्थांस लागतो, तितका ‘काळी शाई’ हा व्यापक नाहीं; म्हणजे ‘काळी शाई’ हा कमी पदार्थांस लागतो. तेव्हां नामाची **व्याप्ति** म्हणजे नाम ज्या वस्तूंस लागतें त्या वस्तूंचा गण, किंवा त्या वस्तूंचा मनामध्यें विस्तार, म्हणजे त्या वस्तूंचें कल्पित क्षेत्र, असा अर्थ समजावयाचा. व्याप्ति हा वास्तविक एक धर्म आहे. ज्या धर्माचे योगानें नामाला वस्तूंचा निर्देश करण्याची शक्ति येते त्यास **व्याप्ति** किंवा **व्यक्तिनिर्देश** असें न्यायशास्त्रांत नांव आहे. परंतु लक्षणेनें ‘व्याप्ति’ हा शब्द वर सांगितल्याप्रमाणें ‘विवक्षित वस्तूंचें क्षेत्र’ ह्या अर्थानेंही उपयोगांत आला आहे; त्याच अर्थानें तो वरील लक्षणांत योजिला आहे.

‘पदार्थांचा गुण दाखविणारा शब्द’ ही विशेषणाची जुनी व्याख्या सामान्यनामें आणि विशेषेंकरून भाववाचक नामें ह्यांसही लागू पडते; म्हणून ती अतिव्याप्त असल्यामुळें त्याज्य होय. गुणदर्शकत्व हा धर्म जरी सर्व विशेषणांत दृष्टीस पडतो तरी तो विशेषणांचा असाधारण धर्म किंवा व्यावर्तक नसल्यामुळें त्यानें विशेषणांचें लक्षण होऊं शकत नाहीं. तथापि विशेषणानें नामाच्या अंगचा धर्म दाखविला जातो हें विधान सर्वस्वी खरें आहे. ह्यामुळें नामाच्या मूळ अर्थामध्यें विशेषणानें भर पडते. म्हणजे नुसत्या नामानें जितक्या धर्मांचा बोध होतो त्यापेक्षां विशेषणयुक्त नामानें अधिक धर्मांचा बोध होतो. ‘शाई’ ह्या नामाची व्याप्ति वर दाखविल्याप्रमाणें ‘काळी शाई’ ह्याचे पेक्षां कमी; तरी ‘काळी शाई’ ह्याचा अर्थ ‘शाई’ शब्दाचे अर्थापेक्षां जास्त आहे. म्हणजे ‘काळी शाई’ ह्यानें शाईच्या अंगचे सर्व धर्म आणि काळेपणा हा धर्म इतके दाखविले जातात. व्याप्तीला जसें न्यायशास्त्रांत व्यक्तिनिर्देश असें म्हणतात. तसें धर्मदर्शकत्वाला जातिनिर्देश असें म्हणतात. तेव्हां विशेषणांनीं नामांची व्याप्ति कमी

होते आणि अर्थ वाढतो; हा सिद्धान्त न्यायशास्त्राचे भाषेनें सांगावयाचा असतां 'विशेषणानें विशेष्याचा जातिनिर्देश वाढतो, परंतु व्यक्तिनिर्देश कमी होतो' असें म्हणतात. विशेषणाचें स्वरूप पूर्णपणें लक्षांत येण्यासाठीं म्हणजे त्याच्या, धर्मिदर्शकत्व व धर्मदर्शकत्व, ह्या दोन्ही अंगांचें पूर्ण आकलन होण्यासाठीं इतका विस्तार केला. बाकी केवळ व्याकरणास त्याची विशेष जरूर नाहीं.

अखेरीस नाम आणि विशेषण ह्यांची तुलना केली पाहिजे. नामें हीं वस्तुवाचक आहेत; म्हणजे त्यांनीं धर्मी, धर्म, किंवा दोन्ही दाखविलीं जातात, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. विशेषण हें प्रत्यक्ष कशाचेंच नांव नाहीं; म्हणजे तें प्रत्यक्षपणें धर्मीही दाखवित नाहीं व धर्मही दाखवित नाहीं. तरी त्यानें अप्रत्यक्षपणें दोन्ही समजतात; आणि विशेषेंकरून त्याचा धर्मीपेक्षां धर्म दाखविण्याकडेसच अधिक कल आहे. म्हणजे विशेषणाचे अंगीं धर्मिदर्शकत्वापेक्षां धर्मदर्शकत्वच अधिक आहे. केवळ वाक्याचे दृष्टीनें पाहिलें म्हणजे विशेषणाचा उपयोग नामाशिवाय होत नाहीं. तें नेहमीं नामास धरून असतें आणि जेव्हां तें नामाशिवाय स्वतंत्र येतें तेव्हां तें स्वतःच नाम होतें. 'गरीब मनुष्यास श्रीमंतीचे चोंचले कशास पाहिजेत' या ठिकाणीं 'गरीब' हें विशेषण आहे. परंतु 'गरिबास श्रीमंतीचे चोचले इ०' या ठिकाणी तें नाम आहे. म्हणून विशेषण हें विशेषण या नात्यानें नेहमीं नामाचे आश्रयानें येतें; आणि जेव्हां तें स्वतंत्रपणें येतें तेव्हां तें विशेषणच नव्हे, तर तेव्हां त्यास नामाचेंच स्वरूप प्राप्त होतें हें उघड आहे. ]

१४५. ज्या नामाचे आश्रयानें विशेषणाचा वाक्यांत उपयोग होतो म्हणजे ज्या नामाची व्याप्ति त्याचे योगें मर्यादित होते, त्या नामास विशेषणाचे दृष्टीनें **विशेष्य** असें म्हणतात. 'गरीब मनुष्यास श्रीमंताचे इ०' या उदाहरणांत 'गरीब' ह्या विशेषणाचें 'मनुष्य' हें विशेष्य होय.

१४६. विशेषण हें वाक्यामध्यें विशेष्याचे आधीं म्हणजे पूर्वीं येतें, किंवा नंतर म्हणजे पाठीमागून येतें. जेव्हां विशेषण हें वाक्यांत विशेष्याचे नंतर येतें तेव्हां त्यास **विधिविशेषण** असें म्हणतात. 'चांगला मुलगा अभ्यासाकडे दुर्लक्ष करीत नाहीं.' या वाक्यांत 'चांगला' हें 'मुलगा' या विशेष्याचे आधीं आलें आहे. 'हा मुलगा चांगला आहे, कारण तो अभ्यासाकडे दुर्लक्ष करीत नाहीं' या वाक्यांत 'चांगला' हें विशेषण 'मुलगा' या विशेष्याचे नंतर आलें आहे म्हणून या दुसऱ्या वाक्यांत त्याला विधिविशेषण असें म्हणतात. विशेष्याचे पूर्वी म्हणजे त्याचे पाठीमागें लागून येणारे विशेषणास अद्याप कोणी निराळी संज्ञा

केलेली दिसत नाहीं. त्यास **अधिविशेषण** म्हणजे मुख्यतः किंवा विशेषें-करून विशेषण असें म्हणण्यास हरकत नाहीं. अधिविशेषण आणि विधिविशेषण ह्यांमध्यें स्थानभेद आहे. अधिविशेषण हें विशेष्याचे आधीं म्हणजे पूर्वीं येतें आणि विधिविशेषण हें त्याचेनंतर येतें. यामुळें त्यांस पूर्वविशेषण व उत्तरविशेषण असेंही म्हटल्यास चालेल. तथापि विधिविशेषण ही संज्ञा रूढ झाली असल्यामुळें पूर्वविशेषणास अधि-विशेषण म्हणणेंच बरें.

विधिविशेषण व अधिविशेषण यांमध्यें स्थानभेदाशिवाय अर्थदृष्ट्याही फरक आहे, तो असाः––अधिविशेषण हें विशेष्याची व्याप्ति मर्यादित करतें. पण विधिविशेषण म्हणजे विशेष्याचे नन्तर येणारें विशेषण हें विशेष्याची व्याप्ति मर्यादित करितेंच असें म्हणतां येत नाहीं. 'सोनें पिंवळें असतें' या वाक्यांत 'पिंवळें' हें सोन्याचें विधिविशेषण आहें. परन्तु त्यानें सोन्याची व्यापकता मुळींच कमी होत नाहीं; तर तें केवळ सोन्याचे अंगचा एक गुण दाखवित आहे हें उघड आहे.

१४७. विशेषणांचे मुख्य तीन भेद करितात : **सार्वनामिक विशे-षणें, गुणविशेषणें** आणि **संख्याविशेषणें.**

[ विशेषणांचें हें वर्गीकरण कितपत सशास्त्र आहे हें ठरविणें न्यायशास्त्राचें काम आहे. त्या शास्त्राचे कसोटीस हें उतरेलसें वाटत नाहीं. कारण कीं, सर्वच विशेषणें गुणवाचक म्हणजे धर्म दाखविणारीं आहेत हें उघड आहे. तथापि हें वर्गीकरण न्याय-शास्त्राचे दृष्टीनें जरी ह्याप्रमाणें त्याज्यच ठरलें तरी तें व्याकरणांत उपयोगी आहे. सार्वनामिक विशेषण हीं मूळचीं सर्वनामें किंवा तदुत्पन्न म्हणजे सर्वनामांपासून साधलेलीं आहेत, म्हणून इतर विशेषणांपासून त्यांचा भिन्न वर्ग करणें उचित होय. तात्विक दृष्ट्या संख्या हा एक धर्म म्हणजे गुण होय हें जरी खरें आहे, तरी व्यवहारामध्यें गुण आणि संख्या ह्यांमध्यें नेहमीं विरोध दाखवितात. एका परीक्षेत चाळीस विद्यार्थ्यांपैकीं तीस विद्यार्थी पास झाले, पण ते सर्व तिसऱ्या वर्गांत पास झाले असें असल्यास त्या परीक्षेचा हा निकाल संख्येचे दृष्टीनें समाधानकारक आहे परंतु गुणाचे दृष्टीनें वाईटच होय असें म्हणण्याची चाल आहे. गुण आणि संख्या ह्यांमधील या व्यावहारिक विरोधास अनुसरून गुणवाचक व संख्या वाचक असे विशेषणांचे दुसरे दोन भेद केले आहेत. ]

१४८. सार्वनामिक विशेषणांत प्रथम दोन मुख्य भेद केले पाहिजेत. मूळ सर्वनामेंच जशींच्या तशीं नामांचे पाठीमागें येऊन विशेषणें होतात तीं; आणि सर्वनामांस कांहीं प्रत्यय लागून तयार होतात तीं. यांपैकीं पहिल्यांस वाटेल तर **सार्वनामिक मूल विशेषणें**, अथवा संक्षेपानें, **सर्वनामविशेषणें** व दुसऱ्यांस **सार्वनामिक साधित विशेषणें**, अथवा **सर्वनामसाधित विशेषणें** असें म्हणावें. या दोन प्रकारांमध्यें उपयोगदृष्ट्या मोठा फरक असा आहे कीं, पहिलीं म्हणजे सर्वनामविशेषणें हीं फक्त अधिविशेषणें होतात, विधिविशेषणें कधींच होत नाहींत; म्हणजे तीं नेहमीं विशेष्याचे पाठीमागें येतात, पाठीमागून म्हणजे नन्तर कधींच येत नाहींत. परन्तु सर्वनामसाधित विशेषणें हीं इतर सर्व विशेषणांप्रमाणें 'अधि' किंवा 'विधि' या दोन्ही तऱ्हांनीं वाक्यांमध्यें उपयोगांत येतात.

१४९. सर्वनामें नामांचे पाठीमागें दोन तऱ्हांनीं येतात. (अ) पुढील नामांप्रमाणें मागील सर्वनामांस विभक्तिप्रत्यय लागतात; (आ) किंवा विभक्त्यन्त नामांपूर्वीं त्यांचें सामान्यरूप होतें. जसें:—'मला' गरिबाला ही उठाठेव कशास पाहिजे? किंवा **मज** गरिबाला ही उठाठेव इ०; 'आम्हांला' गरिबांनां किंवा **आम्हां** गरिबांनां छळून 'तुम्हांला' श्रीमंतांनां किंवा **तुम्हां** श्रीमन्तानां काय मिळावयाचें आहे? 'त्याला' बिचाऱ्याला किंवा **त्या** बिचाऱ्याला व्यर्थ दण्ड झाला म्हणावयाचा; 'हिला' बोडकीला किंवा **ह्या** बोडकीला तिथें जायला कोणीं सांगितलें होतें; इत्यादि.

(१) ह्या दोन प्रकारांपैकीं विभक्त्यन्त शब्दांपूर्वीं विभक्तिप्रत्यय लागलेलीं जीं सर्वनामांचीं उदाहरणें (मला, आम्हांला, तुम्हांला, त्याला, हिला, इ०) तीं विशेषणें नसून सर्वनामेंच होत. परन्तु जेथें त्यांचें सामान्यरूप झालें आहे, तेथें त्यांस (मज, आम्हां, तुम्हां, त्या, ह्या, इ०) सर्वनामविशेषणें म्हणावें.

(२) विभक्तिप्रत्ययान्त सर्वनामें, जरी नामांचे पाठीमागें लगेच आलीं तरी तीं सर्वनामेंच होत. अशा स्थळीं प्रथमा विभक्तींतील प्रधान पुरुषवाचक (प्रथम व द्वितीय पुरुषवाचक) सर्वनामांसही विशेषण म्हणूं नये. कारण त्यांचे पुढील नामाप्रमाणें वाक्यांतील क्रियापद बदलत नसून या प्रधानपुरुषवाचक सर्वनामांप्रमाणेंच बदलतें. उदा०:—**मी**

गरीब ही उठाठेव कशास **करूं**? **तूं** लंगडा त्या गर्दींत कशाला **जातोस**? **आम्ही** ब्राह्मण सर्वांत अधिक धर्मलंड **झालों आहोंत**, इ०.

(३) इतर सर्वनामांच्या ( तृतीयपुरुषवाचकांच्या ) पुढें येणारें नाम विधानाच्या स्पष्टीकरणासाठीं क्वचित्‌च येतें. तेव्हां प्रथमा विभक्तींतही त्यांस, म्हणजे जेव्हां त्यांचें सामान्यरूप नसतें तेव्हांही त्यांस, विशेषण म्हणण्यास हरकत नाहीं. उदा०:—**ती** स्त्री म्हणाली कीं **जो** मनुष्य मला या संकटांतून सोडवील इ०. परतु ह्या तृतीय पुरुषवाचक सर्व-नामांपुढें येणारें नाम जर केवळ विधानाच्या स्पष्टीकरणार्थ आलेलें आहे असें वाक्यौघावरून स्पष्ट दिसत असेल, तर त्या ठिकाणीं तीं सर्वनामेंच होत. उदा०: —हा मुलगा त्या मोठ्यांच्या भांडणांत कशास पडला? तेव्हां ह्याला थोडेंसें मिळालेलें प्रायश्चित्त कांहीं अस्थानीं नाहीं. या वाक्यांत ' मुलगा ' हा शब्द विधानाचे स्पष्टीकरणासाठीं ' हा ' या सर्वनामाचे पुढें आलेला दिसत आहे. तेंव्हां या ठिकाणच्या ' हा ' या शब्दास विशेषण न म्हणतां सर्वनामच म्हणणें योग्य आहे हें उघड आहे.

[ आम्हीं दिलेला हा निकाल कदाचित् एकाएकीं मान्य होण्यासारखा नाहीं. म्हणून त्याची इष्टता स्थापित केली पाहिजे. या मुद्यासंबंधानें मराठी वैयाकरणांत दोन पक्ष आहेत असें दिसतें; एक दादोबांचा व दुसरा गोडबोल्यांचा. दादोबांचा कल सर्वनामांस विशेषणें कधींच मानूं नये या मताकडे विशेष दिसतो. तरी त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, ' मी, तूं, आम्ही, तुम्ही या सर्वनामांचीं **विशेषणसामान्यरूपें** पुढल्या विशेष्याच्या विभक्तीच्या अनुरोधानें होतात' ( क० २९६ जाडा छाप आम्हीं योजिलेला आहे.) या भाषेवरून सर्वनामांस पुढील नामांचे योगें विशेषणाचें स्वरूप प्राप्त होतें असें म्हणण्याकडेही त्यांचा थोडासा कल दिसतो. तथापि ते तसें साफ कधींच म्हणत नाहींत. त्यांचे मतें सर्वनामें तीं सर्वनामें व विशेषणें तीं विशेषणें. वरील भाषा जी त्यांनीं वापरिली आहे ती केवळ सर्वनामांचा वाक्यांतील उपयोग स्पष्ट करण्याचे उद्देशानें वापरिली आहे. तिजवरून ते सर्वनामांस या ठिकाणीं विशेषणें म्हणण्यास तयार आहेत असें त्यांच्या एकंदर व्याकरणपद्धतीवरून दिसत नाहीं. म्हणून आम्हीं त्यांस एका पक्षाचे प्रतिनिधि समजतों. दुसरा पक्ष गोडबोले ह्यांचा. हाच खेरादि आधुनिकांस पसंत दिसतो. त्यांचे मतें सर्वनामापुढें नाम आलें म्हणजे तें नेहमीं विशेषण समजावें. अथवा, पुढें नाम न येतां जेव्हां सर्वनामांचा उपयोग होतो तेव्हांच तें सर्वनाम होय. दोन्ही पक्ष आप-आपल्यापरी साधे, सरळ, आणि सुसंगत दिसतात, ज्यांस एकदां सर्वनाम म्हटलें तीं कोठेंही कशींही आलीं तरी सर्वनामेंच होत. ह्यापेक्षां अधिक सोपी व्यवस्था सांप-

डणारच नाहीं. परंतु कोणत्याही प्राण्यांचें काय किंवा पदार्थांचें काय वर्गीकरण करितांना केवळ त्यांच्या बाह्य स्वरूपावरच नजर देऊन चालणें सुरक्षित नाहीं; आणि व्याकरणासारख्या सूक्ष्म व बिकट विषयांत तर तसें करणें कधींच योग्य होणार नाहीं. ह्यामुळें दादोबांसही नामांचे पाठीमागें येणाऱ्या सर्वनामांसंबंधानं बोलतांना कांहीं अंशीं विशेषणांस साजेशी भाषा वापरावी लागली आहे. आतां गोडबोल्याकडे पहा. ते म्हणतात कीं, पुढें नामें आलीं असतां सर्वनामांस विशेषणांचें रूप प्राप्त होतें. हा नियमसुद्धां सोपा व सरळ नाहीं, असें कोण म्हणेल? परंतु सूक्ष्म विचारांतीं असें दिसून येईल कीं ज्याप्रमाणें दादोबांनीं एका टोंकास जाण्याची पराकाष्टा केली, त्याचप्रमाणें गोडबोले हे दुसऱ्या टोंकांकडे धांवले आहेत; आणि सत्य हें मध्येंच कोठें तरी वसत आहे.

प्रथम ह्या गोष्टीचा विचार भाषेच्या मर्यादित दृष्टीनें न करितां अर्थाचे म्हणजे विचाराचे तात्विकदृष्टीनें करूं. कारण कीं, भाषा हें अर्थ म्हणजे विचार प्रगट करण्याचें एक साधन आहे. तेव्हां हा विषय मूळ विचारसृष्टिमध्यें कसा आहे तें पाहून नंतर विचाराचें बाह्य स्वरूप जी भाषा तिच्या योगें त्याचे स्वरूपांत कांहीं फरक पडत आहे कीं काय तें ठरवूं. प्रथम वादविषयक प्रश्नाचें एक उदाहरण घेऊं. 'मला गरिबाला श्रीमंती चोंचल्यांची उठाठेव कशास पाहिजे?' या ठिकाणचें 'मला' हें सर्वनाम होय कीं विशेषण होय हा प्रश्न आहे. 'मला श्रीमंती चोंचल्यांची उठाठेव कशास पाहिजे' असें म्हटलें असतां 'मला' हें सर्वनाम आहे, ह्याबद्दल कोणाचाच वाद नाहीं. बरें, नुसतें 'मला ही उठाठेव इ०' असें म्हणण्याचे जागीं 'मला गरिबाला' असें कां म्हटलें? हा मुद्दा महत्त्वाचा आहे. ह्याचें उत्तर उघडच आहे कीं 'मला' असे नुसतें म्हटल्यानें ऐकणाराला वरील म्हणण्याचे सत्यतेविषयीं कांहीं शंका येण्याचा संभव राहिला. तो संभव दुर करावा आणि आपलें विधान ऐकणारास स्पष्ट समजावें म्हणून वक्ता 'मला गरिबाला' असें म्हणतो. अर्थ उघडच आहे कीं 'मी गरीब आहें, म्हणून मला ही उठाठेव नको' किंवा 'कोणत्याच गरिबाला ही उठाठेव नको; आणि मी गरीब आहे; म्हणून मला ती नको.' अथवा संक्षेपानें 'मी जो गरीब त्या मला इ०.' म्हणजे 'गरिबाला' हा जो शब्द 'मला' या शब्दाचें नंतर घातलेला आहे तो क्षणैक विचारांतीं स्पष्टीकरणाचे उद्देशानें घातला आहे हें उघड आहे. वक्त्याचें मनांत आपल्या विधानाचे अस्पष्टतेची शंका जर उत्पन्न झाली नसती तर त्यानें 'गरिबाला' या शब्दाची भर मूळ वाक्यांत घालण्याचें कांहीं एक कारण दिसत नाहीं. ह्यावरून 'मला श्रीमंतीचे इ०' हें मूळ विधान आहे; अर्थांत ह्या विधानांतील उद्देश्य 'मी' हें होय हें उघड आहे. म्हणजे या वाक्यामध्यें जें कांहीं विधान केलेलें आहे तें 'माझे' संबंधाचें आहे आणि

" गरिबा ' चें संबंधाचें नाहीं. ' गरिब ' हा जो शब्द त्यांत घातला आहे त्याचें प्रयोजन मूळ विधानाचें समर्थन करणें हें होय. ' मला श्रीमंतीचें इ० ' या मूळ विधानावर जर श्रोत्यानें अशी शंका घेतली कीं, 'कां बरें ही उठाठेव तुम्हांस नको ? ' तर वक्त्याचें उत्तर असें कीं ' मी गरीब आहें; म्हणून मला श्रीमंतीचें इ० ' या दुसऱ्या वाक्यांत ' गरीब ' या शब्दाचें सत्य स्वरूप स्पष्ट होत आहे. ' मी गरीब आहें, म्हणून इ०. ' येथेंही ' गरीब ' ह्याचेबद्दल विधान नसून ' मी ' चे बद्दलच तें आहे हें उघड आहे. सारांश, ' मला गरिबाला इ० ' ह्या मूळ वाक्यांत ' गरीब ' ह्याचेबद्दल मुख्य विधान नसून ' मी ' चे बद्दल आहे. हें जर खरें, तर ' मला ' ह्याचे जागीं ' मज ' हा शब्द घातल्यानें वरील विचारसरणींत कांहीं फरक पडतो, असें दिसत नसल्यामुळें ' मज गरिबाला इ० ' या ईषत भिन्न वाक्यांतही मूळ विधान ' मज ' बद्दलच असून, ' गरिबा ' बद्दल नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. प्रथम आणि द्वितीय पुरुषवाचक सर्वनामासंबंधानें ही गोष्ट एकजात निराबाध आहे. म्हणजे विशेषेंकरून पुरुषवाचक म्हटल्या जाणाऱ्या म्हणजे प्रधान पुरुषवाचक सर्वनामांसंबंधानें वरील विवेचन निरपवाद आहे. इतर सर्वनामासंबंधानें कधीं कधीं वरील अनुमानांत फरक करावा लागेल. ' त्याला किंवा त्या गरिबाला श्रीमंती पोंचल्याची इ० ' अशा ठिकाणीं वरील अनुमान पूर्णपणें लागू पडतें. परंतु त्या मनुष्याला ही उठाठेव कशास पाहिजे ? ' अशा प्रकारचें उदाहरणांत मुख्य विधान ' तो ' चे बद्दल असून ' मनुष्य ' हा शब्द स्पष्टीकरणार्थ घातला आहे असें म्हणतां येत नाहीं; तर मूळ विधानच ' त्या मनुष्या ' बद्दलचें आहे हें उघड आहे. ह्या विवेचनाचा इत्यर्थ असा कीं, प्रधान पुरुषवाचक सर्वनामांचेपुढें नाम आलें तरी मूळ विधान नेहमीं त्या सर्वनामांबद्दलच असतें; आणि इतर म्हणजे तृतीयपुरुषवाचक सर्वनामांपुढें जेव्हां नाम येतें, तेव्हां तें नाम जर मूळ विधानाचे स्पष्टीकरणार्थ येत असेल तर त्या ठिकाणींही मूळ विधान त्या सर्वनामांबद्दलचेंच होय; नाहीं तर नाहीं. परंतु या इतर म्हणजे तृतीयपुरुषवाचक सर्वनामांचे संबंधानें हे विसरतां कामा नये कीं त्यांचे पुढें येणारें नाम मूळ विधानाचे स्पष्टीकरणासाठीं क्वचित् येतें. म्हणून प्रधानपुरुषवाचकेतर सर्वनामांपुढें नाम आल्यास मूळ विधान त्या सर्वनामांबद्दल नसून तें बहुधा तत्सर्वनामयुक्त नामाबद्दलच असतें असें म्हटलें पाहिजे.

ज्या वाक्यांमध्यें सर्वनामांचेपुढें नाम येतें, त्याचें विचाराचे दृष्टीनें वास्तविक स्वरूप काय या प्रश्नाचा निकाल लागला. आतां ह्या नामांमागील सर्वनामांस दादोबाप्रमाणें सर्वनामच समजावें कीं गोडबोले, खेर, इत्यादिकांचे मताप्रमाणें विशेषण मानावें हा प्रश्न उरला. त्याचें उत्तर फारसें कठीण नाहीं. वाक्यामध्यें ज्याचे बद्दल कांहीं विधान करण्यांत येतें तें कधीं विशेषण असूं शकणार नाहीं.

कारण कीं, विशेषण हें विशेषण या नात्यानें विशेष्याशिवाय वाक्यांत मुळीं येऊंच शकत नाहीं. अर्थात विशेषणास वाक्यामध्यें प्रधानत्व नसल्यामुळें म्हणजे तें नेहमी विशेष्याचे आश्रित पडल्यामुळें तें विधानाचा विषय होऊं शकत नाहीं. यामुळें वरील प्रश्नाचे उत्तर उघडच आहे कीं, प्रधानपुरुषवाचक सर्वनामांपुढें नाम आलें तरी मूळ विधान नेहमीं त्यांचे बद्दलच असल्यामुळें त्यांस विशेषण म्हणतां येत नाहीं; परंतु इतर सर्वनामांचे पुढें जेव्हां नाम येतें, तेव्हां मुख्य विधान बहुधा तत्सर्वनामयुक्त नामाबद्दलच असल्यामुळें त्यांस बहुतेक ठिकाणीं विशेषणें म्हणण्यास हरकत नाहीं.

मूळ प्रश्नाचें हें उत्तर तात्त्विकदृष्ट्या अगदीं तंतोतंत आहे. परंतु व्याकरणाचा विषय विचार नसून विचाराचें बाह्य स्वरूप जी भाषा ती व्याकरणाचा प्रत्यक्ष विषय पडल्यामुळें विचाराच्या ह्या बाह्य स्वरूपाचे दृष्टीनें वरील निकालामध्यें कांहीं फरक करावा लागतो कीं काय, हें पहावयाचें अद्याप उरलें आहे. ‘मला गरिबाला श्रीमंतीचें चोंचल्यांची उठाठेव कशास पाहिजे’ आणि ‘मज गरिबाला इ०’ हीं दोन्ही वाक्यें तात्त्विकदृष्ट्या अगदीं एक; तथापि त्यांचें भाषेंत फरक आहे. ‘मला’ हें विभक्त्यन्त आहे. ‘मज’ हें सामान्यरूप आहे. आणि सामान्यरूपी शब्दाला भाषेच्या दृष्टीनें वाक्यामध्यें प्राधान्य देतां येत नाहीं. जरी तात्त्विकदृष्टीनें ‘मला’ आणि ‘मज’ ह्यांमध्यें काडीचाही फरक नाहीं, तरी भाषे-मध्यें ‘मज’ ह्यास गौणत्वच येतें. ‘मज’ हें सामान्यरूप न मानितां ‘मला’ ह्याप्रमाणेंच तें चतुर्थी विभक्तीचें रूप मानावें असें कोणी म्हणेल; परंतु तें सरळ नाहीं. ‘मज’ हें जरी विभक्त्यन्त रूप होय असें समजलें, तरी त्याची विभक्ति अप्रत्यय आहे हें उघड आहे; म्हणजेच तें वास्तविक सामान्यरूप आहे. शिवाय अशी अप्रत्यय विभक्ति शिष्ट गद्य भाषेमध्यें प्राधान्येंकरुन बहुधा येतच नाहीं; तर ती फार तर पद्यांत येऊं शकते. आणि आपला प्रकृत प्रश्न गद्य भाषेचा चालला असल्यामुळें वरील क्लृप्ति प्रशस्त नाहीं हें उघड आहे, एतावता, भाषेचे दृष्टीनें ‘मला’ आणि ‘मज’ ह्यांमधील फरक महत्त्वाचा असून, त्याकडे कानाडोळा करणें उचित नव्हे. अशा प्रकारें विचार व भाषा ह्यांचे दृष्टीमध्यें फरक पडत आहे. ह्यामुळें तात्त्विकदृष्ट्या मूळ प्रश्नाचें जें उत्तर दिलें आहे तें व्याकरणदृष्ट्या सर्वस्वी प्रशस्त दिसत नाहीं; म्हणून व्याक-रणदृष्ट्या त्या प्रश्नाचे निकालांत अवश्य फरक करून असें म्हणावें लागतें कीं, पुढील नामानें जेव्हां मागील सर्वनामाचें सामान्यरूप होतें, तेव्हां तें सर्वनाम प्रधानपुरुषवाचक असलें तरी त्यास विशेषण म्हणणेंच व्याकरणदृष्ट्या योग्य होय. इतर सर्वनामांस तात्त्विकदृष्ट्याही बहुधा प्राधान्य नसतें, तेव्हां त्यांचे संबंधानेंसुद्धां हा सिद्धांत ग्रहण करण्यास हरकत नाहीं. कारण तात्त्विकदृष्ट्या जसें त्यांस बहुधा गौणत्व आहे, तसेंच भाषेंतही त्यांचें बहुधा सामान्यरूपच होतें.

म्हणून आम्हीं चालू अंकांत दिलेला निकाल अशा रीतीनें ओघासच येतो हें उघड आहे.

आतां या प्रश्नासंबंधाचे वर जे दोन पक्ष सांगितले आहेत, त्यांचें परीक्षण आणि त्यांची या निर्णयाशीं तुलना करून हें विवेचन संपवूं. दादोबांचें मत हें स्वतः त्यांच्या दृष्टीनेंहि कांहीं अंशीं अप्रयोजक आहे हें त्यांनीं, नामांपाठीमागें येणाऱ्या सर्वनामांसंबंधानें विशेषणांस साजेशी जी भाषा वापरली आहे, तिजवरून उघड आहे हें वर सांगितलेंच आहे. प्रधानपुरुषवाचक सर्वनामांसंबंधानें वर जो तात्त्विक दृष्टीचा निर्णय दिला आहे, त्यास अनुरूप असें त्यांचें मत दिसतें; परंतु तदितर सर्वनामासंबंधानें तात्त्विकदृष्ट्याहि त्यांचा निकाल गैर होय. 'कोणा एका यक्षें केलें अलक्ष अपुल्या कामीं' अशा ठिकाणीं 'कोण' हें अनिश्चित सर्वनाम होय हें म्हणणें, तात्त्विदृष्ट्या काय कीं भाषादृष्ट्या काय, सारखेंच सदोष आहे; आणि ह्या इतर सर्वनामांस बहुतेक ठिकाणीं वर सांगितल्याप्रमाणें गौणत्व असल्यामुळें दादोबांचा पक्ष ह्या प्रधानपुरुषेतर सर्वनामासंबंधानें मुदलींच ग्राह्य नाहीं. आणि प्रधानपुरुषवाचक सर्वनामांसंबंधानें तात्त्विकदृष्ट्या जरी तो यथार्थ असला तरी ज्या ठिकाणीं प्रधानपुरुषवाचक सर्वनाम पुढील नामामागें सामान्यरूपीं आहे, त्या ठिकाणीं व्याकरणशास्त्रदृष्ट्या प्रधानपुरुषवाचकास गौणत्व येत असल्यामुळें असल्या प्रकारचे उदाहरणांसंबंधानें तरी दादोबांचा निकाल स्वीकारार्ह नाहीं हें उघड आहे. एवंच दादोबांचा निकाल बऱ्याच अंशीं अप्रयोजक होय असें म्हणणें भाग आहे.

आतां गोडबोले खेर व यांचे मत पहा. सर्वनामापुढें नाम आलें कीं त्यास विशेषण म्हणावें, हें तात्त्विकदृष्ट्या प्रधानपुरुषवाचक सर्वनामांसबधानें सर्वथा त्याज्य होय; आणि इतर सर्वनामांसंबंधानें बऱ्याच अंशीं ग्राह्य होय. भाषादृष्टीनें सामान्यरूपी प्रधानपुरुषवाचक सर्वनामांस आणि इतर सर्वनामांस बहुतेक स्थळीं ते लागू पडतें हें वरील एकंदर विवेचनावरून उघड आहे. परंतु प्रधानपुरुषवाचक सर्वनामें सामान्यरूपी नसतां तें मत तात्त्विक व वैयाकरणिक या दोन्ही दृष्टींनीं ग्राह्य नाहीं; इतकेंच नव्हे, तर कांहीं अंशी तें साफ चुकीचें आहे असेंही दाखवितां येईल. 'मला गरिबाला ही उठाठेव कशास पाहिजे' या ठिकाणीं 'मला' ह्याला कोणत्याच दृष्टीनें गौणत्व नाही; म्हणून त्यास विशेषण म्हणणें प्रशस्त नाहीं, इतकेंच फार तर म्हणतां येईल; तरी हें मत साफ चुकीचें आहे असें स्पष्ट होत नाहीं. परंतु 'मी गरीब ही उठाठेव कशास करूं?' 'तूं गरीब ही उठाठेव कशास करितोस?' 'तुम्हीं गरीब ही उठाठेव कशास करितां?' अशा उदाहरणांत म्हणजे जेव्हां प्रधानपुरुषवाचक सर्वनाम प्रथमा विभक्तींत असतें, त्या वेळीं त्यास विशेषण म्हणणें प्रशस्त नाहीं इतकेंच नव्हे, तर साफ चुकीचें होय. कारण कीं, ह्या वाक्यांतील क्रियापद पुढल्या

' गरीब ' या नामाच्या पुरुषवचनाप्रमाणें बदलत नसून प्रधानपुरुषवाचक सर्वनामाचे पुरुषवचनाप्रमाणें बदलत आहे; हें ' करूं ', ' करतोस ', ' करितां ' ह्या रूपांवरून धडधडीत दिसत आहे. म्हणून अशा प्रकारच्या वाक्यांत नामांचे पाठीमागें येणाऱ्या प्रधानपुरुषवाचक सर्वनामांस विशेषण म्हणणें व्याकरणदृष्ट्या ढोबळच चूक होय हें निर्विवाद आहे. ' तो गरीब ही उठाठेव कशास करितो ? ' या ठिकाणींही तीच चुक आहे. परंतु वर सांगितल्याप्रमाणें अशीं वाक्यें कमी येतात; आणि ' तो ' आणि ' गरीब ' ह्यांचेमध्यें पुरुषवचनांचे बाबतींत विरोध नसल्यामुळें ती चूक इतकी उठुन दिसत नाहीं; बाकी चूक सारखीच हें उघड आहे. नामांचे पाठीमागें सर्वनामाचें सामान्यरूप आलें असतां त्या सर्वनामांस विशेषण म्हणावें या आमच्या नियमास वरील उदाहरणें विरुद्ध नाहींत. कारण त्यांत मी, तूं, इ० पुरुषवाचक सर्वनामांचे ' गरीब ' ह्या नामाचे पाठीमागें सामान्यरूप नाहीं; म्हणून तीं विशेषणें नव्हत, तर सर्वनामेंच होत; हें त्या नियमाप्रमाणें उघड दिसतच आहे.

अखेरीस, खेरांचें मत मराठी भाषेच्या साधारण स्वरूपांशींही कसें विसंगत आहे हें दाखविलें म्हणजे संपलें. संकृत भाषेमध्यें विशेष्याचीं लिंग, वचन, विभक्ति, हीं विशेषणास असतात म्हणजे विशेषणाचे अंगीं विशेष्यनिष्ठता असते असा नियम आहे, हें तज्ज्ञांस विदितच आहे. मराठीमध्येंही कवितेंत कधीं कधीं विशेषनिष्ठ विशेषणें आढळतात हें खरें; तथापि मराठीमध्यें कांहीं विशेषणें विशेष्याचे लिंगवचनाप्रमाणें जरी बदललीं तरी विशेषणांस विशेष्याची विभक्ति गद्यामध्यें लागलेली दिसत नाहीं हें निर्विवाद आहे. म्हणजे मराठी भाषेचा साधारण स्वभाव संस्कृत भाषेच्या साधारण स्वरूपाहून या बाबतींत भिन्न आहे. अर्थात् मराठीमध्यें विशेष्याची विभक्ति विशेषणास गद्यामध्यें तरी सहसा लागत नाहीं; फार झालें तर जें विशेषण विशेष्याचे लिंगवचनाप्रमाणें बदलतें त्याचें विशेष्य जर सविभक्तिक अथवा सशब्दयोगिक असलें, तर त्या विशेष्याचे मागें त्या विशेषणाचें सामान्यरूप होतें, असा मराठींतील विशेषणांचा सामान्य स्वभाव दिसतो. म्हणून नामांचे पाठीमागील विभक्त्यन्त सर्वनामांस विशेषणें म्हणणें संस्कृतभाषादृष्ट्या अयुक्त नसलें तरी मराठी भाषेच्या साधारण स्वभावाशीं तें फारच विसंगत आहे हें उघड आहे. त्याचप्रमाणें नामांमागील सामान्यरुपी सर्वनामांस विशेषण म्हणावें; परंतु इतर सर्वनामांस म्हणजे कोणत्याहि विभक्त्यन्त सर्वनामांस विशेषण म्हणू नये; हा प्रकृत ग्रंथांतील निर्णय मराठीच्या साधारण स्वभावाशी तितकाच सुसंगत आहे हेंही निर्विवाद आहे. नामाचे पाठीमागें जेव्हां सर्वनामाचें सामान्यरूप नसतें तेव्हां तें जर सर्वनामच होय तर त्यापुढील नाम सर्वनामाचेच विभक्तींत असल्यामुळें त्या नामाची ती विभक्ति उद्देशार्थी समजून

तिची सांगड पूर्वीच्या सर्वनामाशीं लावावी म्हणजे व्याकरणव्यवस्थाही नीट जुळेल. ]

१५०. सर्व विशेषणें नामांप्रमाणेंही उपयोगांत येतात. जेव्हां एखाद्या विशेषणाचें विशेष्य अध्याहृत असतें, तेव्हां त्यास नाम म्हणतात व तें नामाप्रमाणें चालतें. जसें:—**शहाण्यास** मार शब्दांचा; **जाग्यास** जागें कसें करणार, इ०.

टीप—या अध्यायांत विशेषणांचीं उदाहरणें देतांना कधीं कधीं विशेष्याचा अध्याहारही असलेला आढळेल. त्या ठिकाणीं तीं नामें होत हें खरें. तथापि तीं मूळचीं विशेषणेंच असल्यामुळें त्यांचीं विशेष्यें अध्याहृत असलेलीं उदाहरणेंही चालण्यासारखीं आहेत. फक्त अध्याहृत विशेष्यें स्पष्ट केलीं म्हणजे झालें.

१५१. **सर्वनामसाधित विशेषणें**:—हीं सर्वनामांस कांहीं प्रत्यय लागून साधलीं आहेत. त्यांची यादी मागल्या अध्यायांत दिली आहे; आणि तीं कोणता धर्म दाखवितात तेंही तेथेंच सांगितलें आहे.

१५२. असला, असलाला, तसला, तसलाला इ०. जीं दोन प्रकारचीं रूपें आहेत, त्यांमध्यें अर्थाचे दृष्टीनें थोडासा फरक आहे. असला, तसला, इत्यादि एकेरी **ला**कारान्त शब्द असा, तसा, इत्यादि **सा**कारान्त रूपांप्रमाणेंच प्रकारार्थीं एकेका वस्तूस लागतात; आणि असलाला, तसलाला हीं दुहेरी **ला**कारान्त रूपें अनेक वस्तूंपैकीं एकएकीस पृथक्पणें लागतात. उदा०:—**असा** अथवा **असला** मनुष्य, म्हणजे 'अमुक एका प्रकारचा मनुष्य;' **असलाला** मनुष्य, म्हणजे 'अनेक मनुष्यांपैकीं अमुक एका प्रकारचा प्रत्येक अलग अलग मनुष्य' असा अर्थ आहे. एकेरा **ला** हा दादोबा म्हणतात त्याप्रमाणें केवळ स्वार्थीं प्रत्यय होय. म्हणजे त्यानें मूळच्या अर्थांत कांहींच फरक होत नाहीं. असा आणि असला ह्या दोहोंचा अर्थ एकच.

१५३. ज्याप्रमाणें सम्बन्धी सर्वनामाचे नन्तर त्याचें अनुसंबंधी सर्वनाम वाक्यामध्यें अवश्य येतें, त्याचप्रमाणें जसा, जसला, जसलाला, इ० संबंधी विशेषणांचे नंतर तदनुरूप अनुसंबंधी विशेषणें येतात. उदा०:—**जशी** योग्यता **तशी** दक्षणा; **जसें** काम **तसा** दाम; **जितके** आंबे मिळतील **तितकेच** आण.

( अ ) संबंधी व अनुसंबंधी ह्यांपैकीं कोणतें तरी एक बहुधा नामाप्रमाणें योजितात; आणि जेव्हां कशाविषयीं भाषण चाललें आहे हें पूर्वापर सम्बन्धानें समजतें म्हणजे भाषणाचा विषय सहज लक्षांत येण्यासारखा असतो, तेव्हां दोन्ही, नामाप्रमाणेंच म्हणजे विशेष्य गाळून योजितात. जसें:—जितके आंबे मिळतील **तितकेच** आण; किंवा जितके मिळतील **तितकेच** आंबे आण; आणि आंब्यांविषयीं भाषण चाललें असतां '**जितके** मिळतील **तितकेच** आण' असें म्हणतात. **जसें** करावें **तसें** भरावें', इ०.

( **आ** ) कधीं कधीं सम्बन्धी सर्वनामाप्रमाणें संबन्धी विशेषण किंवा नाम अध्याहृत असतें. उदा०:—योग्यता तशी दक्षणा. मिळतील तितकेच आण, इ०.

( इ ) **जसा जसा—तसा तसा, जितका जितका—तितका तितका,** इत्यादि द्विरुक्त विशेषणांनीं एकसारखें वाढतें न्यूनाधिक्य समजतें. उदा०:—ह्या रोगाचा जसा जसा अधिक प्रसार होत गेला, तसा तसा लोकांचा त्रासही वाढत गेला; जितकी जितकी तूं मेहनत करशील तितका तितका यशाचा संभव वाढेल; इ०.

( ई ) कधीं कधीं **जसा जसा—तसा तसा** ह्यांचेंपैकीं पहिला शब्द अकारान्त होऊन **जसजसा—तसतसा** असें रूप उपयोगांत येतें. या ठिकाणीं लिंगवचनाप्रमाणें फक्त दुसरा शब्द म्हणजे आकारान्त शब्दच बदलतो. जसें:—**जसजशी, तसतसें**, इ० उदाहरण:— जसजसें त्याचें दुखणें लांवत चाललें, तसतशी त्याची शक्ति क्षीण होत गेली.

( उ ) **जसातसा**:—ह्याचा, 'कसातरी' 'कोणत्या तरी प्रकारचा' म्हणजे 'बहुतेक निरुपयोगी' किंवा 'चालढकल करणारा' किंवा 'वाईट' अशा अर्थीं उपयोग होतो. उदाहरण:—हा चाकर माझ्या कामाचा नाहीं, **जसेंतसें** काम करितो; ह्या गृहस्थानें **जसेतसे** दोनशें रुपये मिळविले; इ०. दुसऱ्या उदाहरणांत 'जसेतसे' हें क्रियाविशेषण समजावें. **जसेतसे** म्हणजे 'कसेंतरी करून' 'कोणत्या तरी प्रकारें' 'मोठ्या कष्टानें' किंवा 'न्यायान्याय किंवा नीति—अनीति ह्यांचा विचार न करितां.' **जसातसा** ह्या पदाचा विशेषणापेक्षां क्रियाविशेषणासारखाच फार उपयोग होतो. मात्र हें क्रियाविशेषण लिंगवचनाप्रमाणें बदलतें.

( ऊ ) **जशास तसा**--ह्या पदाचा उपयोग 'त्याला योग्य' 'तदनुरूप' या अर्थीं बहुधा विशेषणाप्रमाणें होतो. उदा०:--तुला हल्लीं भला यजमान भेटला आहे, **जशास तसा.**

( ऋ ) **जशाचे तसा** किंवा **जशाचा तसा** किंवा **जशाच्या तसा** म्हणजे 'पूर्ववत्' 'अविकृत' ह्याचाही बहुधा विशेषणाप्रमाणेंच उपयोग होतो. उदा०: --हा मुलगा आज दोन वर्षें ह्या वर्गांत आहे, पण **जशाचा तसा.**

( ऌ ) **अमुक, अमका--तमुक, तमका**:--'कोणी एक मनुष्य' अथवा 'कोणी तरी एक वस्तु' या अर्थानें या शब्दांचा उपयोग होतो. अमुक, अमका, ह्यांचेसंबंधानें तमुक तमका ह्याचा उपयोग होतो. जसें:--अमुक असें म्हणाला, तमुक तसें म्हणाला अमुक, अमका ह्यांचा तमुक, तमका ह्यांचेशिवाय स्वतंत्रपणें उपयोग होतो, परंतु अमुक, अमका हे शब्द पूर्वीं आल्याशिवाय तमुक, आणि तमका ह्यांचा स्वतंत्रपणें सहसा उपयोग होत नाहीं.

१५४. प्रश्नार्थक कोण, आणि कोणचा किंवा कोणता, ह्यांमधील फरक असा कीं, कोण हें मनुष्यांस पृथक्करण लागतें; आणि कोणता किंवा कोणचा हें सजातीय मनुष्यें किंवा वस्तू ह्यांचे समुदायापैकीं एका संबंधानें येतें. उदा०:--**कोण** मनुष्य आला होता? **ह्यांपैकीं** तुला **कोणता** नवरा पाहिजे किंवा **कोणता** आंबा पाहिजे? इ०. **कोणता** हा शब्द 'कोणचा' ह्याचेपेक्षां अधिक प्रचारांत आहे असें वाटतें.

सारांश, **कोण** हें बहुधा मनुष्यासंबंधानें आणि फार झालें तर अन्य प्राण्यांसंबंधानें उपयोगांत येतें; परंतु **कोणता हें** वाटेल त्यासंबंधानें म्हणजे मनुष्यें, मनुष्येत्तर प्राणी, किंवा पदार्थ, ह्या सर्वांसंबंधानें एकजात उपयोगांत येतें. म्हणजे, निवड करावयाची असतां कोण व काय ह्या दोहोंच्या जागीं 'कोणता' किंवा 'कोणचा' ह्याचा उपयोग होतो. (अं १३८ पहा.)

( अ ) **कसा कसा, कसकसा**, ह्यांचा उपयोग बहुधा क्रियाविशेषणाप्रमाणें होतो; आणि त्यांचा अर्थ 'सविस्तर' 'क्रमवार' असा आहे. उदा०:--तो सर्व प्रकार **कसा कसा** किंवा **कसकसा** झाला तें सांगा.

( आ ) **किती**--ह्या विशेषणाचा केवळ संख्येसंबंधाचा प्रश्न विचार-

ण्याचे कामीं उपयोग होतो. जसें:—किती जण (संस्कृत-जन) हजर होते; किती आंबे आणलेस; इत्यादि.

ह्यापासून कित्येक, कितीएक, कितीक, कैक, इ०. अनिश्चित संख्यावाचक विशेषणें निघालीं आहेत.

**टीप**—किती हें संस्कृत 'कति' ह्या सर्वनामापासून आलें आहे. म्हणून त्याची गणना सर्वनामसाधित प्रश्नार्थक विशेषणांत केली आहे. एरवीं केवळ मराठीच्या दृष्टीनें त्यास सर्वनामसाधित हें नांव शोभत नाहीं हें उघड आहे.

१५५. गुणविशेषणांसंबंधानें विशेषेंकरून सांगण्यासारखें कांहीं नाहीं. तेव्हां आतां संख्याविशेषणाकडे वळूं.

१५६. संख्याविशेषणांचे **पांच** भेद आहेत. **संख्यावाचक** किंवा **गणनावाचक, क्रमवाचक, आवृत्तिवाचक, पृथक्त्ववाचक** आणि **अनिश्चित.**

१५७. संख्यावाचक किंवा गणनावाचक विशेषणांनीं वस्तूंच्या गणनेचा म्हणजे गणतीचा बोध होतो. त्यांनीं 'किती' या प्रश्नास उत्तर मिळतें. जसें:—एक, दोन, चार, दहा, पांचशें, हजार, दोन लाख पांचशें तीन, सव्वा चार, साडे पांच, पावणे नऊ, इ०.

**टीप१**—ह्याच अर्थाचीं कांहीं थोडींशीं नामें आहेत. त्यांचा विशेषणांप्रमाणें कधींच उपयोग होत नाहीं; म्हणून त्यांस विशेषणें हें नांव देतां येत नाहीं. उदा०:—जोड, जोडी, त्रिकूट, चौक, चौकडी, पंचकडी, छकडी दसकडी; कोडी, विशी (अ० व० विसा) पंचविशी, बत्तिशी. शेंकडा, लाखोली, युग्म, द्वय, त्रय, चतुष्क, पंचक, षटक, सप्तक, अष्टक, नवक दशक, इ०हीं तितक्या तितक्या वस्तूंचा समुदाय दाखवितात.

**टीप २**—फांसे, गंजिफा, इत्यादि खेळांमध्यें एक, दोन, तीन, चार, इ० संख्यांचा एकत्र समाहार दाखवावयाचा असतां कांहीं संख्यावाचक नामें उपयोगांत येतात. तीं अशीं:—एक्का-एक्या, दुव्वा, तिव्वा-तिय्या, चौव्वा-चव्वा, पंज्या, पंचडी, दुड्डी, दुरी, तिरी, तिरपगड-तिरपगडा, छक्का, छकडी, सत्या, अठ्या नहला-नहल्या दहला-दहल्या, इ०

१५८. संख्यावाचकांचे किंवा गणनावाचकांचे **पूर्णांकवाचक, अपूर्णांकवाचक,** आणि **साकल्यवाचक** असे **तीन** प्रकार आहेत. एक, दोन तीन, इ०. हीं पूर्णांकवाचक; पाव, अर्धा, पाऊण, पावणेदोन, इ० हीं **अपूर्णांकवाचक;** आणि दोघे, तिघे, चौघे, इ० हीं **साकल्यवाचक** होत.

१५९. **पूर्णांकवाचकें** दोन प्रकारांनीं लिहितात: आंकड्यांनीं आणि अक्षरांनीं. त्यांपैकीं मोठमोठ्या संख्या आंकड्यांनीं लिहितात; परंतु लहान लहान संख्या आणि लहान लहान आंकडे प्रथम येऊन नंतर त्यांजवर दोन तीन किंवा अधिक पूज्य येणाऱ्या संख्या, म्हणजे थोडेसे शेकडें, हजार, लाख ,इ० हे वाक्यांत बहुधा अक्षरी लिहितात. उदा०:—आमच्या गांवांत ब्राह्मणांचीं घरें शंभर आहेत; त्या गांवांत ब्राह्मणांचीं घरें **सातच** आहेत; काल्च्या सभेस **हजार दोनहजार**, लोक तरी हजर असावें; इ०

१६०. पूर्णांकवाचकांचीं नांवें व आंकडे खालीं **दिल्याप्रमाणें:—**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| एक | १ | सतरा | १७ | एकतीस | ३१ |
| दोन | २ | अठरा | १८ | बत्तीस | ३२ |
| तीन | ३ | एकोणीस | १९ | तेतीस | ३३ |
| चार | ४ | एकोणवीस | | | |
| पांच | ५ | एकूणवीस (क्व०) | | तेहतीस | |
| सहा | ६ | वीस | २० | चौतीस | ३४ |
| साहा (क्वचित्) | | एकवीस | २१ | चवतीस | |
| सात | ७ | बावीस | २२ | पस्तीस | ३५ |
| आठ | ८ | बेवीस | | छत्तीस | ३६ |
| नऊ | ९ | तेवीस | २३ | सदतीस | ३७ |
| दहा | १० | चोवीस | २४ | सततीस | (क्व०) |
| दाहा (क्व०) | | चव्वीस (क्व०) | | अडतीस | ३८ |
| अकरा | ११ | पंचवीस | २५ | | |
| बारा | १२ | सव्वीस | २६ | अठतीस | (क्व०) |
| तेरा | १३ | सत्तावीस | २७ | एकूणचाळीस* | ३९ |
| चौदा | १४ | अठ्ठावीस | २८ | चाळीस | ४० |
| चवदा | | एकोणतीस | २९ | एकेचाळीस | ४१ |
| पंधरा | १५ | एकूणतीस (क्व०) | | बेचाळीस | ४२ |
| सोळा | १६ | तीस | ३० | त्रेचाळीस | ४३ |

* एकुणचाळीस (३९) पासून अठ्ठेचाळीस (४८) पर्यंत येणारा 'चाळीस' हा शब्द 'चाळ' 'ताळीस' 'ताळ' असाहि क्वचित् म्हणण्यांत व लिहिण्यांत येतो. परंतु हे पर्याय फारच विरळा; आणि ते दिवसेंदिवस लोप पावत चालले आहेत.

चव्वेचाळीस ४४
चवरेचाळीस
पंचेचाळीस ४५
शेचाळीस ४६
छेचाळीस ( क० )
सत्तेचाळीस ४७
अठ्ठेचाळीस ४८
एकुणपन्नास ४९
पन्नास ५०
एकावन ५१
एकावन्न
बावन—न्न ५२
त्रेपन—न्न ५३
चौपन—न्न ५४
पंचावन—न्न ५५
छप्पन—न्न ५६
सत्तावन—न्न ५७
अठ्ठावन—न्न ५८
एकुणसाठ ५९
साठ ६०
एकसष्ठ ६१
एकसट (क० )
बासष्ठ ६२
त्रेसष्ठ ६३
चौसष्ठ ६४
पासष्ठ ६५
सासष्ठ ६६
सहासष्ठ

सदसष्ठ ६७
सदुसष्ठ
सत्सष्ट (क० )
अडसष्ट ६८
अडुसष्ट
एकुणसत्तर ६९
एकुणहत्तर ( क )
सत्तर ७०
एकाहत्तर + ७१
बाहत्तर ७२
त्र्याहत्तर ७३
चौऱ्याहत्तर ७४
चवऱ्याहत्तर
पंचाहत्तर ७५
शाहात्तर
शहात्तर ७६
सत्त्याहत्तर ७७
आठ्याहत्तर ७८
एकुणऐशीं ७९
एकोणऐशीं (क)
ऐशीं ८०
एक्यायशीं ८१
ब्यायशीं ८२
त्र्यायशीं ८३
चौऱ्यायशीं
चवऱ्यायशीं ८४
पंच्यायशीं ८५

शायशीं ८६
सत्त्यायशीं ८७
अठ्यायशीं ८८
एकुणनव्वद ८९
नव्यायशीं (क० )
नव्वद ९०
एक्याण्णव ९१
ब्याण्णव ९२
त्र्याण्णव ९३
चौऱ्याण्णव
चवऱ्याण्णव ९४
पंचाण्णव ९५
शाण्णव ९६
सत्त्याण्णव ९७
अठ्याण्णव ९८
नव्याण्णव ९९
शंभर १००
एकशें एक
एकोदरशें १०१
एकशें दोन
दुव्वोदरशें १०२
एकशें तीन
तिव्वोदरशें १०३
एकशें चार
चव्वोदरशें १०४
चवरोदरशे ( क )
इ०.

+एकाहत्तर ( ७१ ) येथून पुढील नांवांपैकीं ‘ हत्तर ’ हा शब्द कधीं कधीं ‘ हात्तर ’ असाही म्हणतात व लिहितात.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| हजार / सहस्र | १००० | लाख / लक्ष | १००००० | कोटि / कोट / करोड (क्र०) / क्रोड (क्र०) | १००००००० |
| दहाहजार / दशसहस्र | १०००० | दहालक्ष / दशलक्ष | १०००००० | | |

दशकोटि ( दहा कोटी ), अब्ज, खर्व, निखर्व, महापद्म, शंकु, जलधि, अन्त्य, मध्य, परार्ध, इत्यादि. शंभरांपुढें ह्याप्रमाणें उत्तरोत्तर दसपटीस नवीन नवीन नांव आहे.

टीप १—अकरा, बारा,......इ०; एकवीस बावीस;......इ०; एकतीस, बत्तीस,......इ०, त्याचप्रमाणें एकोदरशें, चवरोदरशें, दुह्मोत्रीं दोन, एकुणसाठ दोन, अष्ठोत्रें तीन, एकेचाळ चाळ, एकोणतीस पांच, पंचवीस सहा, इ०; उजळणींतील वाचनीमध्यें येणाऱ्या या नांवांत नेहमींची संख्यावाचनाची रीति उलट झालेली आहे. नागरी लिपीप्रमाणें संख्या नेहमीं डावीकडून उजवीकडे वाचीत जातात. परंतु वरील उदाहरणांत ती फारसी लिपीप्रमाणें उजवेकडून डावीकडे वाचलेली दिसते. उदाहरणार्थ, ६२५—ही संख्या रोजच्या नागरी लिपीच्या प्रचाराप्रमाणें 'सहाशें पंचवीस' अशी वाचतात. परंतु उजळणीमध्यें आणि कधीं कधीं हुंड्या, बिलें, इ० हिशेबांचे कागदांत ती उलटी म्हणजे 'पंचवीस सहा' अशी वाचण्याची चाल आहे. ती सकृद्दर्शनी चमत्कारिक किंवा विचित्र वाटते. परंतु त्यांत आश्चर्य करण्यासारखें कांहींएक नाहीं. कारण कीं, मूळ संस्कृतांतही असा प्रकार आढळतो, आणि 'अंकानां वामतो गतिः' असा त्याबल गणितांत नियम सांगितला आहे. त्याप्रमाणें उलट तऱ्हेमध्यें 'अंकांची डावीकडे गति' मराठीमध्येंही दिसत आहे. हाच प्रकार सव्वादोन, साडे तीन, पावणे चार, सव्वाशें, साडे चारशें, पावणे पांचशें, इ० अंशयुक्त संख्येच्या वाचनांतही आढळतो. परंतु मोठमोठ्या संख्या डावीकडून उजवीकडेच नागरी लिपीप्रमाणें वाचतात. जसें:— चार लक्ष पांच हजार तीनशें सात.

टीप २—वरील यादीवरून असें दिसून येईल कीं, एक, दोन, तीन, चार, पांच, सहा, सात, आठ, हे दशकांचे अंकांपुढें आले असतां वरील टीपेंत सांगितल्याप्रमाणें त्यांचा दशकवाचक शब्दांचे आधीं उच्चार होतो; पण तो उच्चार सर्वत्र एकसारखा नसून निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळा होतो. तो केवळ अनियमित असल्यामुळें जागच्या जागींच शिकला पाहिजे.

टीप ३—विसांपासून नव्वदांपर्यंत प्रत्येक दशकाचे लगेच आधींच्या आकड्यांचे नांवाच्या आरंभीं 'एकुण' किंवा 'एकोण' असा शब्द आहे. तो खर ह्यांचे मतें 'नञ्' शब्दाचें रूपान्तर आहे. ( खरांचें इंग्रजी मराठी व्याकरण आ० २ री, पृष्ठ ७१. ) परंतु हें त्यांचें म्हणणें साफ चुकीचें आहे. एवढा

दोबळ चूक वयाकरण म्हणविणाराचे हातून कशी झाली कोणास ठाऊक ! बहुत-करून हा दुर्लक्षाचा किंवा अलक्षाचा परिणाम असावा. तथापि असला निष्काळ-जीपणा दुसऱ्या तिसऱ्या आवृत्तीचे वेळींही कायम राहून तो व्याकरणांत चिर-स्थायी व्हावा हें मराठी भाषेचें दुर्दैवच म्हणावयाचे ! असो. सदरहू ' एकुण ' किंवा ' एकोण ' हा शब्द तत्तत्संख्यावाचक संस्कृत शब्दांत येणारा जो ' एकोन ' ( एक + ऊन ) शब्द त्याचें रूपांतर असून, त्याचा ' एक कमी ' किंवा ' एकानें कमी ' असा अर्थ आहे. ' एकोणवीस ' म्हणजे एक कमी वीस, किंवा एकानें कमी वीस, म्हणजे विशांत एक कमी, असा या शब्दाचा वास्तविक अर्थ आहे. खेरांचे म्हणण्याप्रमाणे ' सात ' ह्याचें जसें ' सत्ता ' ' आठ ' ह्याचें जसें ' अठ्ठा ' तसें नऊ ह्याचें ' एकोण ' किंवा ' एकुण ' असें रूपान्तर मानिलें तर अर्थाचा कसा अनर्थ होतो तो पहा ! सत्तावीस व अठ्ठावीस म्हणजे अनुक्रमें दोहोंवर सात व दोहोंवर आठ; त्याचप्रमाणें खेरांचे मतें एकोणतीस म्हणजे ' तिहींवर नऊ ' असें होईल. अर्थात ज्या संख्येला आज आपण एकोण-तीस असें म्हणतों, तिची किंमत खेरांच्या व्युत्पत्तीचे दृष्टीनें दहांनीं वाढणार ! तेव्हां प्रकृत शब्दांची व्युत्पत्ति फारच महत्त्वाची असल्यामुळें खेरांची चूक क्षम्य नाहीं असें कोण म्हणणार नाहीं ? नऊ ह्याचें वास्तविक रूपान्तर जर पहावयाचें असेल तर तें नव्याण्णव ह्या शब्दांत आढळतें. एकुणनव्वद ह्याचे जागीं नव्यायशीं असें कांहीं लोक म्हणतात. या ' नव्यायशीं ' या प्रांतिक भाषेंतही नऊ ह्याचें तेंच रूपांतर दिसतें. प्रांतिक शब्द जरी खेरांस माहीत नसला तरी नव्याण्णव ह्या सार्वत्रिक शब्दाकडे जर त्यांचें लक्ष गेलें असतें, तर नऊ ह्याचें रूपान्तर त्यांस तेव्हांच कळलें असतें.

टीप ४—एकापासून नवांपर्यंतच्या आंकड्यांचे नांवांचीं शंभराचे आंत जीं रूपान्तरें दिसतात त्यांचे पेक्षां त्यांचीं निराळींच रूपान्तरें उजळणीमध्यें शंभरांचे पुढल्या संख्येच्या वाचनांत आढळतात. जसें:—दुव्वोदरशें, तिव्वोदरशें, चवरोदरशें,......नव्वोदरशें, इ०; दुहोत्रीं दोन, तिहोत्रीं दोन,.......... अष्टोत्रीं दोन, इ०. एवंच हीं रूपान्तरें अनियमित असून, त्यांचा व्याकरणदृष्ट्या खल करण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं. दुहोत्रीं, तिहोत्रीं, चवरोत्रीं,......अष्टोत्रीं इत्यादि शब्दांतील उत्तरार्ध ' उत्तर ' म्हणजे अधिक या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश आहे. ' अष्टोत्तर ' म्हणजे ' आठ अधिक ' किंवा ' आठांनीं अधिक ' यापासून ' अष्टोत्तरी ' हा शब्द निघाला आहे. ' अष्टोत्तरी ' म्हणजे ' आठांनीं अधिक ' एक शत , म्हणजे अष्टोत्तर शत, म्हणजेच एकशें आठ; आणि एकशें आठ कविता ज्या स्तुतीमध्यें असतात त्या स्तुतीच्या तेवढ्या कवितासमूहास ' अष्टोत्तरी ' असें म्हणतात. ह्या उत्तर म्हणजे अधिक शब्दांचाच अंश दुहोत्रीं, तिहोत्रीं,..... अष्टोत्रीं, इ० शब्दांत आहे; म्हणजे यांचा अर्थ—दोहांनीं अधिक,

तिहींनीं अधिक,......आठांनीं अधिक,—दोनशें, तीनशें, इ० असा अर्थ आहे हें उघड आहे.

दुव्वोदरशें, तिव्वोदरशें, अष्टोदरशें, इ०. हे शब्द मूळचे दुव्वोत्तरशें, तिव्वोत्तरशें, अष्टोत्तरशें, असेच असले पाहिजेत. याचे अर्थ वर सांगितल्याप्रमाणें 'दोहोंनीं अधिक शें, तिहींनीं अधिक शें, आठांनीं अधिक शें' असे आहेत. शें हें संस्कृत शतं ह्याचें रूपान्तर होय. परंतु व्युत्पत्तीचे अज्ञानानें दुव्वोत्तरशें, तिव्वोत्तरशें, अष्टोत्तरशें इत्यादि शब्द जराशा शिकलेल्या परंतु संस्कृतानभिज्ञ मनुष्यास अगम्य वाटल्यामुळें चुकीचे समजून त्यानें त्यांत जांवईशोध घातला असावा; आणि त्यांस दुव्वोदरशें, तिव्वोदरशें, अष्टोदरशें अशीं रूपें दिलीं असावीं; काय असेल तें असो. ह्या शब्दांमध्यें 'दर शें' म्हणजे 'प्रत्येक शंभर' असा अर्थ कांहीं युक्त नाहीं. 'दर' ह्याचा 'एक' असा अर्थ होत नसून, 'प्रत्येक' असा होतो. परंतु 'प्रत्येक' हा अर्थ प्रस्तुतस्थळीं योग्य नाहीं हें कोणीही कबूल करील. म्हणून या ठिकाणीं सुचविलेली व्युत्पत्ति अधिक ग्राह्य इतकेंच नव्हे, तर आमचे मतें, तीच खरी होय. करितां यापुढें तरी दुव्वोदरशें, अष्टोदरशें, इ० पाठ सुधारून दुव्वोत्तरशें तिव्वोत्तरशें, अष्टोत्तरशें, असा पाठ सर्वत्र होणें इष्ट आहे; आणि या खऱ्या व्युत्पत्तिज्ञानाचा प्रकाश जसजसा पसरत जाईल, तसतसा अज्ञानांधकाराचा लोप होऊन नवीन पाठाचा प्रचार अधिकाधिक वाढत जाईल यांत संशय नाहीं.

दुहोत्रीं, तिहोत्रीं इ० शब्दांचे जागीं दुहोत्रें, तिहोत्रें, असाही पाठ आढळतो. दोन्ही पाठांत 'उत्तर' शब्दाचा अपभ्रष्ट शेष आहे. हीं रूपें दोनशें, तीनशें, ह्यांचे संबंधानें येतात. म्हणजे शेंकड्याचा अंक अनेक वचनीं असतां त्याचे पूर्वीं हीं रूपें येतात. म्हणून दुहोत्रीं, तिहोत्रीं, इ० हा अनेकवचनी पाठ अधिक योग्य होय. दुहोत्रें, तिहोत्रें, हीं रूपें 'एकोत्रें' या शब्दासारखीं आहेत. एकोत्रें हें एकवचन असून 'एकोत्रीं' हे त्याचें अनेकवचन होय, हें निर्विवाद आहे.

टीप ५—दुव्वोत्तरशें, तिव्वोत्तरशें, इ० आणि दुहोत्रीं दोन, तिहोत्रीं दोन, इ० ही भाषा फक्त अठरोत्तरशें, आणि अठरोत्रीं दोन येथपर्यंत दृष्टीस पडते. यानंतर 'उत्तर' शब्दास फांटा देण्यांत येऊन एकोणिसाशें, विसाशें, एकोणिशें दोन, वीशें दोन, साठ्यें दोन, सत्तरें दोन, इ० अशीं नांवें बनतात. आणि ज्याप्रमाणें अठरानंतर उत्तर शब्दास फांटा मिळतो, तसा दोनशांपासून शें या शब्दाचा लोप होतो, हें एकोणिशें दोन, इ० उदाहरणांवरून स्पष्ट होईलच.

टीप ६—लेखांमध्यें म्हणजे पाढ्यांमध्यें एकापासून दहांपर्यंतचे जे गुणक त्यांचा पुन्हा रूपान्तरें होतात. आणि तीं निरनिराळ्या प्रान्तांत जरा जरा निरनिराळीं अशीं आढळतात. तसेंच अकरकीं, एकोत्रीं ह्यांचे उच्चारांतही प्रान्ताप्रान्तांत थोडथोडा फरक पडतो तथापि तो फरक इतका सूक्ष्म असतो कीं, एका प्रांतांतील

उजळणीची वाचनी दुसऱ्या कोणत्याही प्रांतांत जराशी विलक्षण वाटली, तरी ती दुर्बोध कधींच होत नाहीं. आंकड्यांच्या नांवांचे रूपांतील हीं अनंत अन्तरें इतकीं कांहीं विचित्र आहेत कीं, त्यांचे संबंधानें सामान्य नियम सांपडणें बहुधा कठिणच दिसते.

१६१. **अपूर्णांकवाचक** संख्याविशेषणानें पूर्ण अंकाचा भाग दाखविला जातो. जसें:—पाव म्हणजे चवथा हिस्सा, पाऊण म्हणजे तीन हिस्से, सव्वा म्हणजे एक पूर्ण आणि चवथा हिस्सा, साडे चार म्हणजे अर्ध्या-सह चार, म्हणजेच एकाचे दोन हिस्से व पूर्ण चार; इ०.

१६२. **अपूर्णांकवाचक** विशेषणें खालीं दिल्याप्रमाणें:—

| | | | |
|---|---|---|---|
| पाव | -।., $\frac{1}{4}$ | सव्वा दोन | २।, २$\frac{1}{4}$ |
| अर्धा | -॥-, $\frac{1}{2}$ | अडीच | २॥, २$\frac{1}{2}$ |
| पाऊण | -।॥-, $\frac{3}{4}$ | पावणे तीन | २।॥, २$\frac{3}{4}$ |
| सव्वा | १।, १$\frac{1}{4}$ | सव्वा तीन | ३।, ३$\frac{1}{4}$ |
| दीड | १॥, १$\frac{1}{2}$ | साडेतीन / औट | ३॥, ३$\frac{1}{2}$ |
| पावणे दोन | १।॥, १$\frac{3}{4}$ | पावणे चार | ३।॥, ३$\frac{3}{4}$ |

ह्यापुढें सव्वा ( सं०—सपाद ), साडे ( सं०—सार्ध ), आणि पावणे ( पाव उणे ), हे शब्द पूर्णांकास जोडून अपूर्णांक दाखविण्याची चाल आहे.

**टीप १**—ह्यापैकीं दीड, अडीच व औट, या शब्दांची व्युत्पत्ति रा. रा. वि. का. राजवाडे यांनीं प्रथमच दिली आहे ती अशीः–सं.–व्यर्ध–दिवड्ढ दीड; सं.–अर्धतृतीय–अड्ढइज्ज अडीच; सं.–अर्धचतुर्थ–अद्धुट्ठ–आउट–औट.

**टीप २**—एकाचे सारखे चार भाग करून त्यावरून होणाऱ्या अपूर्णांकांचीं जी पाव, अर्धा, पावणें, अशीं नांवें आहेत त्यांपैकीं ' पाव ' ह्याचे जागीं विशेषेंकरून भाकरी किंवा पोळी संबंधानें ' चतकोर ' ( क्वचित्–चोतकर ) म्हणजे चतुर्थ कोर अर्थात् चवथा हिस्सा हा शब्द येतो; ' अर्धा ' ह्याचे ऐवजीं ' निमा ' किंवा ' निम्मा ' असें साधारणपणें म्हणण्याची चाल आहे. ' निमा ' किंवा ' निम्मा ' हा शब्द फारसी आहे.

१६३. शेंकडों, हजार, लाख, इ० संख्यांसही अपूर्णांकवाचक शब्द जोडण्याची चाल आहे. जसें:—सव्वाशें = १२५; दीडशें = १५०;

सव्वा हजार = १२५०; अडीच हजार = २५००; साडे पांच लाख = ५५०००० ; पावणे दहा कोटी = ९७५००००००, इ०

१६४. चवथ्या हिश्शाचे म्हणजे पावाचेही लहान भागांस कांहीं नांवें आहेत. अर्धापाव–अर्धपाव–अधपाव–अदपाव = $\frac{१}{८}$ छटांक = $\frac{१}{१६}$ दीड पाव, अडीच पाव, अडीच छटांक, हे शब्दही प्रचारांत आहेत.

१६५. इतर अपूर्णांक हे बहुतकरून ‘अंश’ या शब्दाचा उपयोग करून दाखवितात. जसें–एक दशांश; तीन सप्तमांश, तेरा षोडशांश; इ०.

हा प्रकार सर्व साधारण आहे. मागल्या तीन (१६२, १६३, १६४) अंकांमध्यें सांगितलेले अपूर्णांकहीं ह्या रीतीनें दाखवितां येतात. जसें–पाव = एक चतुर्थांश; अर्धा = एक द्वितीयांश, पाऊण = तीन चतुर्थांश; छटांक = एक षोडशांश. इ०.

टीप––पूर्णांकाचे पुढें अपूर्णांक आला असतां त्यांचे वाचनीमध्यें ‘पूर्णांक’ हा शब्द घालण्याची चाल आहे जसें—$७\frac{३}{४}$ = सात पूर्णांक तीन चतुर्थांश; $१\frac{७}{१८}$ = एक पूर्णांक सात अठरांश; इ०.

१६६. कधीं कधीं अपूर्णांक हे आण्यांचे हिशेबानें सांगतात. एक आणा हा रुपयाचा सोळावा हिस्सा होय. ह्या हिशेबानें छटांक = एक आणा = ०–; अधपाव = दोन आणे = ०=; पाव = चार आणे = ·।·; दीड पाव = सहा आणे = -।= ; इ०. जसें—ह्या गांवांत त्याची **दोन आणे तक्षीम** आहे, किंवा त्याचा **दोन आण्यांचा हिस्सा** आहे. यंदां पाऊस चांगला पडल्यामुळें **चौदा आणे** तरी **पीक** येईल असा अंदाज आहे, परंतु गेल्यासालीं कांहीं कांहीं ठिकाणीं **चार आणे**ही पदरांत पडले नाहींत.

१६७. संख्यावाचक किंवा **गणनावाचक संख्याविशेषणांचा** आणखी एक तिसरा वर्ग आहे; त्यास **साकल्यवाचक** असें म्हणतात. त्यांनीं तितक्या तितक्या वस्तूंपैकीं सर्व असा अर्थ दाखविला जातो. जसें:— दोघें, तिघे, चौघे (हीं तीन लिंगानुसार बदलतात.) पांची, साही, साती, इ० हीं फक्त नवांचेशिवाय दहांपर्यंत आढळतात.

(अ) दोघे–दोघी–दोघें, ह्याच अर्थानें **उभय उभयतां**, हे शब्द येतात. ह्यांपैकीं उभयतां (सं०—उभयतः) हें ‘स्वतां’ (सं—स्वतः)

ह्याप्रमाणें मूळचें क्रियाविशेषण अव्यय होय. तथापि त्याचा विशेषणाप्रमाणें आणि नामाप्रमाणेंही उपयोग आढळतो. जसें: – तुम्हां **उभयतां बंधूस** किंवा **उभयतांस** बोलाविलें आहे.

(**आ**) हाच अर्थ–साकल्याचा अर्थ—आंकड्याचे शब्दास **ही** हें अक्षर जोडून व्यक्त करितां येतो. जसें:—दोन्ही (दोन + ही) = दोघे, तिन्ही (तीन + ही) = तिघे, चाऱ्ही–चारी (चार + ही) = चौघे ह्या **ही** प्रत्ययाचेंच पुढें **ई** हें रूपान्तर होतें, आणि त्यापासून पररूप संधिनें चारही–चाऱ्ही–**चारी** पांचही-**पांची, साती**, इत्यादि रूपें बनतात. दहांचे पुढील अंकवाचक शब्दांस ही हा प्रत्यय जोडतांना त्यांत कांही एक फरक होत नाहीं. जसें:—अकराही, सतराही, पंचवीसही, इ०. अकराही = सर्व अकरा, सतराही = सगळे सतरा, इ०. ' नऊ ' याजपासून ' नऊही ' असें रूप होतें.

(**इ**) लहान मोठ्या सर्व संख्यासंबंधानें हा साकल्यार्थ दाखविण्याचा एक मार्ग मराठींत आहे; तो असा:—बारांचे बारा किंवा बारांच्या बारा, पंधरांचे पंधरा किंवा पंधरांच्या पंधरा, शंभरचे शंभर किंवा शंभरच्या शंभर, हजारचे हजार किंवा हजारच्या हजार, इ०.

**टीप**—दोघे (–घी–घें), तिघे (–घी–घें), चौघे (–घी–घें); आणि दोन्ही, तिन्ही, चाऱ्ही–चारी (सर्व तिन्ही लिंगी समान) ह्यांचे उपयोगांत फरक आहे. पहिलीं एकारान्त रूपें मनुष्यांसंबंधानें येतात; इतरांसंबंधानें येत नाहींत. परंतु दुसरीं ईकारांत रूपें सर्व प्राणी व पदार्थ ह्यांपैकी वाटल त्यांसंबंधानें येतात. जसें—**दोन्ही चोर** फरारी झाले. **दोन्ही** आंबे तूच खा. या ठिकाणीं दोघे चोर असें म्हणतां येतें; परंतु ' दोघे आंबे ' असें म्हणतां येत नाहीं. यावरून असें दिसून येईल कीं, ' दोघे ' याजबद्दल ' दोन्ही ' हें सर्वत्र डोळे मिटून घालितां येईल; परंतु ' दोन्ही ' बद्दल ' दोघे ' हें फक्त कांहीं ठिकाणींच घालितां येईल. अर्थात ' दोन्ही ' हें जेव्हां मनुष्यवाचक असेल तेव्हांच त्याचे जागीं ' दोघे ' ह्याचा उपयोग करितां येईल; अन्यत्र नाहीं.

१६८. संख्यावाचक किंवा गणनावाचक विशेषणांचे उपयोगा संबंधानें पुढील गोष्टी ध्यानांत धरण्यासारख्या आहेत.

(**अ**) गणनावाचक संख्याविशेषणाची द्विरुक्ती झाली असतां त्याचेपासून वांटणीची किंवा पृथक्त्वाची कल्पना उत्पन्न होते. जसें:—दोन

दोन. चार चार, इ०. एकेकाला दोन दोन आंबे दे; चौघे चौघे येत जा; प्रत्येकास साडे चार चार रुपये मिळाले; इ०.

( आ ) साकल्यवाचकांशिवाय इतर संख्यावाचक दोन आकडे उभयान्वयी अव्ययावांचून वाक्यामध्यें जोडल्यानें त्यांजपासून अंदाज किंवा सुमार याचा बोध होतो. उदा०:—**पांच सहा** वर्षांनीं हें काम पुरें होईल, परवां त्या गारुड्यास **चार साडेचार रुपये** मिळाले. या गांवांत नळाचें पाणी आणण्यास **दोन अडीच लाख** रुपये लागतीलसें वाटतें.

( इ ) मोठमोठ्या समुदायांची संख्या सांगावयाची असतां शंभरानंतरचे हजार, लाख, इत्यादि स्थूल संख्यावाचकांचे अन्त्य स्वरास, तद्वाचक संख्येच्या अनेकार्थी प्रथमेच्या अनेकवचनीं **ओं**, असा आदेश होतो, या विकृत रूपाचें—**ओं**कारान्त रूपाचें—सामान्यरूप तसेंच. जसें:—**लाखों लोकांनीं** प्रदर्शन पाहिलें असेल; रेलवेच्या कामीं आजपर्यंत **क्रोडों रुपये** खर्च झाले असतील; त्या सभेस **शेंकडों** लोक जमले होते; इ०.

हा आदेश ‘ शंभर ’ या शब्दास कधींच होत नाहीं; आणि सहस्र, लक्ष, कोटि, या संस्कृत शब्दांस क्वचित् होतो. ‘ शंभरों ’ लोक आले होते, असा प्रयोग कधींच ऐकूं येत नाहीं. परंतु **लक्षों** गणती पैसा खर्च झाला, कोट्यों रुपयांचा चुरा उडाला; असे प्रयोग क्वचित् ऐकूं येतात, सहस्र, लक्ष, कोटि, या संस्कृत शब्दांस **अवधि** हा शब्द जोडून **सहस्रावधि, लक्षावधि, कोट्यावधि** असे प्रकृत अर्थाचे समास तयार होतात. जसें:—सिंहस्थाचे मेळ्यास **लक्षावधि** यात्रा जमली होती.

( ई ) साकल्यवाचकांशिवाय इतर संख्यावाचकांचे पुढें **एक** हा शब्द जोडूनही अंदाज, सुमार हा अर्थ व्यक्त होतो; जसें:—**पांच एक** रुपयांचा खर्च आहे, या तसबिरीला **दीड एक** रुपया पडेल; इ०.

१६९. **क्रमवाचक** संख्याविशेषणांनीं वस्तूंच्या क्रमवार व्यवस्थेचा बोध होऊन, त्या व्यवस्थेंत त्यांस कितवें स्थळ मिळालें आहे ह समजतें; जसें:—सातवा, आठवा, इ०.

१७०. पूर्णांक संख्यावाचकांपासून म्हणजे पूर्णांक गणवाचक संख्याविशेषणांपासून क्रमवाचकें तयार होतात; अपूर्णांकवाचकांपासून किंवा साकल्यवाचकांपासून अर्थात् तीं बनूं शकतच नाहींत.

(अ) पहिली चार क्रमवाचकें अनियमित आहेत. तीं अशीं:—

एक—**पहिला** तीन—**तिसरा**
दोन—**दुसरा** चार—**चवथा**

(आ) पांचांपासून पुढे **वा** हा प्रत्यय लागून तीं तयार होतात. जसें:—पांचवा, आठवा, दहावा; इ०.

टीप १—परंतु एकोणिसांपासून पुढील पूर्णांकांस **वा** हा प्रत्यय लागण्याचे पूर्वी त्यांचे अन्त्य स्वरास **आ** हा आदेश होतो; आणि उपान्त्याक्षरांतील दीर्घ ई ऱ्हस्व होते. जसें:—एकोणिसावा, विसावा, तिसावा, पन्नासावा, इ०.

'एकोणीसावा' एकशें 'पसतीसावा' अशीं खेरांनीं उदाहरणें दिलीं आहेत. (क० १२२) परंतु हीं चुकीचीं आहेत. 'वीसावा,' तीसावा, अशीं दीर्घ ईकारयुक्त रूपें प्रचारांत नाहींत; तर विसावा, तिसावा अशीं ऱ्हस्व इकारयुक्त रूपेंच भाषेंत सर्वत्र आढळतात.

टीप २—ऐंशीं ऐक्याशीं........अव्यायशीं, यांचे अन्त्याक्षरास **वा** हा प्रत्यय लागण्याचे पूर्वी **आ** हा आदेश विकल्पेकरुन होतो. जसें:—ऐंशींवा किंवा ऐंशांवा, एक्यायशींवा किंवा एक्याशांवा, इत्यादि.

(इ) संस्कृत क्रमवाकचकें मराठींत बरींच प्रचारांत आहेत. प्रथम, द्वितिय, तृतीय, चतुर्थ, पंचम, षष्ट, इ०. विभक्तींचीं सात नांवें, तिथींचीं चौदा नांवें हीं संस्कृत क्रमवाचकें आहेत. तीं संस्कृत पूर्णांकवाचकांपासून कशीं तयार होतात तें संस्कृत, व्याकरणाचा विषय होय, म्हणून जिज्ञासूंनीं तें संस्कृत व्याकरणांत पहावें.

(ई) सर्व मराठी क्रमवाचकें आकारान्त असल्यामुळें लिंगवाचनानुसार बदलतात.

१७१. पूर्णांक संख्यावाचकांपासून गुणितार्थ किंवा आवृत्त्यर्थ दाखविणारीं जीं विशेषणें तयार होतात, त्यांस **आवृत्तिवाचक** संख्याविशेषणें असें म्हणतात.

(अ) हीं बहुधा **पट** हा शब्द पूर्णांकवाचकांस जोडून तयार होतात. त्यांतील कांहीं अनियमित आहेत तीं अशीं:—दुप्पट, तिप्पट, चौपट, 'दहा' पासून 'दहापट' ह्या सरळ रूपाशिवाय 'दसपट' असें एक रूप प्रचारांत आहे. तें 'दस' ह्या हिंदी शब्दापासून साधलें आहे.

बाकीच्यांस **पट** हा शब्द जोडतांना कांहींएक विकार होत नाहींत. जसें:—एकपट, पांचपट, अकरापट, पंधरापट, इ०

**( आ )** कपडा, दोरा, इत्यादिकांच्या घडयांसंबंधानें बोलावयाचें असतां आवृत्त्यर्थींच एकेरी, दुहेरी, तिहेरी, चव्हेरी हीं विशेषणें येतात. जसें:—धोतरें दुहेरी वाळत घाल, एकेरी घालूं नको; दुहेरी दोऱ्यानें शींव; इ०.

ह्यांचा अन्यत्रही कधीं कधीं उपयोग होतो. 'दुहेरी सरंजाम,' 'दुहेरी व्यवस्था,' असेही प्रयोग आढळतात.

**टीप**:—या शब्दांचें साधनिकेसाठीं तद्धित प्रकरण पहावें.

( इ ) चार व त्याचें पुढील पूर्णांकास याच अर्थी कधीं कधीं **पदरी** असा शब्द जोडितात. जसें:—चौपदरी, पांचपदरी, सहापदरी, इ०.

( ई ) निरनिराळ्या वस्तुमात्रासंबंधानें बोलतांना ह्याच अर्थी 'पदरी' ह्या शब्दाचे जागीं अन्य शब्दही येतात. **सुती, पेडी, घडी,** ह्या शब्दांचाही असाच उपयोग होतो. दुसुती,—तिसती,—दोरी, जानवें,इ ०; तिपेडी-पांचपेडी,—वेणी, वगैरे; आणि दुघडी,—चौघडी,—पासोडी, वगैरे.

**( उ )** संस्कृत संख्यावाचकांपासून आवृत्त्यर्थी त्यांस 'गुणित' हा शब्द लागून साधलेलीं अनेक संस्कृत विशेषणें मराठींत प्रचारांत आहेत. जसें:—द्विगुणित, त्रिगुणित, शतगुणित, इ०.

कधीं कधीं **गुण** शब्द जोडूनही ह्याच अर्थाचीं संस्कृत विशेषणें बनतात. जसें द्विगुण, त्रिगुण, चतुर्गुण, शतगुण, इ०.

१७२. **पृथक्त्ववाचक** विशेषणांनीं अनेकांपैकीं प्रत्येकाचा पृथक् पृथक् बोध होतो, म्हणून त्यांस **पृथक्त्ववाचक** किंवा पार्थक्यवाचक असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु कांहीं वैयाकरण ह्यांस 'भेदवाचक' असें म्हणतात; पण तो शब्द योग्य दिसत नाहीं. उदा०:—दरएक, हरएक, प्रत्येक. दर, हर, प्रति, हीं याच अर्थी बहुधा समासांत येतात. जसें:—दरमाणशीं, हररोज, प्रतिक्षणीं, इ०.

( अ ) हाच अर्थ संख्यावाचकांची म्हणजे गणनावाचक संख्याविशेषणांची द्विरुक्ति झाल्यानें उत्पन्न होतो. जसें:—एक एकास येऊं दे, पांच पांचांस आंत सोड, इ, ० (अं० १६८ अ).

**( आ )** कांहीं संख्यावाचक विशेषणांस **ला** हा प्रत्यय लागून पृथक्त्वाचा अर्थ निष्पन्न होतो. इतर कांहीं विशेषणांसही हा **ला** प्रत्यय लागून तोच अर्थ उत्पन्न होतो. जसें:—त्या मुलांनां **अर्धाला** पेरू दे, **सगळाला, इवलाला,** असलाला, तितकाला, इ०. ( अं. १५२ पहा. )

१७२. ज्या संख्याविशेषणांनीं कोणत्याही निश्चित म्हणजे नक्की संख्येचा बोध होत नाहीं, त्यांस **अनिश्चित संख्यावाचकें** असें म्हणतात. जसें:— थोडा, फार, अल्प, सर्व, सगळा, अवघा, इतर, अन्य, भलता, वरकड, इत्यादि, कांहीं, एक, परस्पर, अन्योन्य, इ०.

हीं विशेषणें इतर विशेषणांप्रमाणें नामांसारखीं म्हणजे विशेष्याशिवाय उपयोगांत येतात. पुढील उदाहरणांमध्येंही त्यांचा नामांप्रमाणें उपयोग आढळेल. तथापि तीं मूळचीं विशेषणेंच होत. त्यांस दादोबा आणि खेर हे सर्वनामांत गणितात, परंतु तें योग्य नाहीं. त्यापेक्षां त्यांस नामें म्हणणें बरें. शिवाय अन्य भाषांमध्येंही ह्याच अर्थाचे जे शब्द आहेत, त्यांस कोणीं सर्वनामांत घालीत नाहीं.

( १ ) **एक**—या अनिश्चित संख्यावाचकाचे उपयोग येणेंप्रमाणे:—

( अ ) एक ह्याचा नामाप्रमाणें जेव्हां उपयोग होतो तेव्हां तो शब्द अनेकवचनींही आढळतो. जसें:—**एक** जाउनी सांगती सिते ॥

( आ ) 'एक—एक' ह्याचा अर्थ ' कांहीं—कांहीं दुसऱ्या प्रकारचे' असा होतो. जसें:—**एक** असें म्हणतात, **एक** तसें म्हणतात; एक ओरडतो एक रडतो, इ०.

( इ ) **एक** हा शब्द कांहीं सर्वनामांस व विशेषणांस लागून अनिश्चित विशेषणें तयार होतात. जसें:—कोणी एक, कोणेक, किती एक, कित्येक, कितीक, कांहीं एक, बहुतेक, अमुक एक; इ०

( २ ) **अन्य, इतर, पर,**—ह्यांचा अर्थ ' प्रकृत प्राणी अथवा पदार्थ ह्यांहून भिन्न ' असा आहे.

( ३ ) अन्योन्य, इतरेतर, परस्पर, हे शब्द अन्य, इतर, पर, ह्यांपासूनच साधतात. ' यांचा एकमेक ' असा अर्थ आहे.

(४) **वरकड, बाकी, बाकीचा**—'उरलेला,' 'शेष' ह्या अर्थी हे शब्द येतात.

(५) इत्यादि, वगैरे—'आणखी असेच दुसरे' असा यांचा अर्थ आहे.

(६) **सर्व, सगळा, अवघा, सारा**—विवक्षित वस्तूंपैकीं कोणतीही न वगळितां **एकूणएक** ह्या अर्थी हे शब्द येतात. 'एकंदर' याचाही या अर्थीं कधीं कधीं उपयोग होतो. परंतु त्याचा वास्तविक अर्थ जरासा भिन्न आहे. 'एकंदर' म्हणजे 'सर्व एकत्र;' जसें:—तुमच्या शाळेंत एकंदर मुलें किती आहेत?

(७) **फार, पुष्कळ, बहु**—हे शब्द अतिशयता किंवा आधिक्य दाखवितात.

(८) **थोडा, अल्प, इवला, किंचित्, जरासा**—हे शब्द न्यूनता किंवा कमी प्रमाण दाखवितात.

(९) कांहीं हा शब्द न्यूनाधिक्याचा बोध न करितां अपूर्णता दाखवितो.

[ संख्याविशेषणांचे दादोबांनीं चार भेद केले आहेत: संख्यावाचक, क्रमवाचक किंवा संख्यापूरक, संख्यावृत्तिवाचक, आणि संख्यांशवाचक. नवलकर आणि खेर यांनीं त्यांचे सहा भेद केले आहेत. दादोबांचे वरील चारांस त्यांनीं अनिश्चित आणि भेदवाचक असे दोन भेद जोडले आहेत. या दोहोंस दादोबा मुळीं विशेषणांत गणितच नाहींत. ते त्यांस सामान्यसर्वनामांचे वर्गांत घालितात. दादोबांचे मतेंही हीं सामान्यसर्वनामें विशेषणांप्रमाणें उपयोगांत येतात. तेव्हां त्यांचा विशेषणांमध्यें निराळा एक वर्ग मानणें गैर नाहीं. 'सामान्य' ह्या वर्गास्च 'अनिश्चित' हें नवीन नांव देण्यांत आलें आहे; आणि तें दादोबांचे नांवापेक्षां अधिक सार्थ व अधिक ग्राह्य आहे हेंच उघड आहे. या अनिश्चितांपासून भेदवाचक म्हणून एक भिन्न वर्ग काढण्यांत आला आहे, तोही गैर नाहीं; तथापि भेदवाचक ही संज्ञा प्रशस्त दिसत नाहीं. तिचे ऐवजीं पृथक्त्ववाचक असा शब्द योजणें अर्थास अधिक अनुरूप आहे, हें सूक्ष्म विचारान्तीं तेव्हांच समजेल. म्हणून नवीन वैयाकरणांचे सहा भेद दादोबांचे चारांपेक्षां बरे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

आतां संख्याविशेषणाचे जे हे चार किंवा सहा भेद, त्यांपैकीं एकाचें नांव संख्यावाचक आहे आणि तें सर्वांस मान्य दिसत आहे. परंतु संख्याविशेषण आणि संख्यावाचकविशेषण ह्या दोन संज्ञामध्यें अर्थाचे दृष्टीनें आम्हांस कांहींच फरक दिसत नाहीं. संख्याविशेषण म्हणजे संख्यावाचकविशेषणच नव्हे, तर काय? दोहोंचा अर्थ 'संख्या दाखविणारीं विशेषणें' हा एकच नव्हे काय?

पहिल्यापेक्षां दुसऱ्यांत ‘ वाचक ’ या शब्दाची भर घातली आहे इतकेंच. त्यामुळें दिसण्यांत दोन शब्द झाले; पण अर्थाचे दृष्टीनें ते एकच. जसें ‘ काळें ’ आणि ‘ काळ्या रंगाचें ’ हे शब्द दोन आहेत, परंतु अर्थ एकच; तसेंच संख्याविशेषण व संख्यावाचकविशेषण ह्या दोन्ही संज्ञांचा वास्तविक शब्दशः अर्थ एकच. म्हणूनच एका जातीस, वर्गास किंवा भेदास जें नांव दिलें तेंच किंवा तदर्थ-वाचक जवळ जवळ तेंच नांव त्याचे उपजातीस, उपवर्गास, किंवा उपभेदास देणें हें अगदीं अप्रशस्त होय. तसें करणें म्हणजे सबंध वस्तूचा एक भाग त्या सबंध वस्तूबरोबर आहे, असेंच म्हणण्यासारखें नाहीं काय ? शिवाय ‘ एक हें संख्यावाचक संख्याविशेषण होय ’ ही भाषाही चमत्कारिकच नव्हे काय ? तिच्यांत वरील अर्थदोषाशिवाय द्विरुक्तीचाही दोष सहजच दिसत नाहीं काय ? द्विरुक्तीचा दोष स्वतंत्रपणें महत्त्वाचा नाहीं हें आम्हास कबूल आहे. परंतु अर्थ-दोषांत त्याची भर पडल्यामुळें एकंदर दोष वाढत आहे. ज्या उपभेदास किंवा उपवर्गास संख्यावाचक असें म्हटलें आहे, त्यास ‘ गणनावाचक ’ हें किंवा अशाच प्रकारचें नवीन नांव देणें उचित आहे. तथापि या नवीन नांवाची योजना स्वतंत्रपणें आम्हीं केली नाहीं; कारण इतकेंच कीं, संख्यावाचक ही संज्ञा इतकी रूढ होऊन गेली आहे कीं, ती एकाएकीं बदलणेंही सर्वथा योग्य दिसत नाहीं. म्हणूनच आम्हीं तिच्याबरोबर नवीन संज्ञेचा विकल्पानें उपयोग केला आहे. नवीन संज्ञेची इष्टता व उपयुक्तता जसजशी लोकांच्या प्रत्ययास येत जाईल तसतशी जुनी संज्ञा आपापच मागें पडेल.

आतां संख्याविशेषणांचे आमच्या वर्गीकरणाकडे वळूं. आम्ही त्यांचे पांचच वर्ग मानिले आहेत. नवलकर आणि खेर यांनीं जोडलेले दोन भेद आम्हीं स्वीकारिले आहेत. फक्त त्यांचे भेदवाचकास पृथक्त्ववाचक असें नवीन नांव देणें प्रशस्त आहे हें वर सांगितलेंच आहे. तेव्हां दादोबांचे व ह्यांचें वर्गीकरणांत साधारण असणारे जे चार भेद त्यांपैकीं येथें कोणता व कां गाळला आहे तें स्पष्ट सांगितलें पाहिजे. संख्यांशवाचक म्हणून एक भेद दोन्ही वर्गी-करणांत आहे. आमच्या मतें हा भेद संख्यावाचकामध्येंच म्हणजे गणनावाचका-मध्येंच अन्तर्भूत होतो. एक, दोन, तीन इत्यादि जशी बहुमात्राची संख्या दाख-वितात त्याचप्रमाणें पाव, अर्धा, पाऊण, सवा, सव्वाचार, साडेचार, पावणेपांच, इ० अंशवाचकेंही संख्याच दाखवितात; आणि जसें पहिल्या प्रकारच्या शब्दांनीं ‘ किती ’ ह्या प्रश्नास उत्तर मिळतें, तसेंच दुसऱ्या प्रकारच्या शब्दांनींही—अंश-वाचकांनींही—त्याच प्रश्नास उत्तर मिळतें. तेव्हां त्या दोहोंमध्यें ह्या मुख्य बाबतींत साम्य असल्यामुळें त्यांचे भिन्न भिन्न दोन वर्ग करणें न्यायशास्त्रदृष्ट्या उचित नाहीं. त्या दोहोंची जाति एकच आहे, हें १६८ अंकांत त्या दोहोंचे जे समान उपयोग दाखविले आहेत, त्यांजवरून स्पष्टच आहे. आजपर्यंत म्हटलीं

जाणारीं संख्यावाचकें म्हणजे गणनावाचकसंख्याविशेषणें आणि अंशवाचकें ह्यांमध्ये जो फरक आहे तो इतकाच कीं, एक पूर्णांक दाखवितात आणि दुसरीं अपूर्णांक दाखवितात. बाकी दोहोंचें मुख्य स्वरूप एकच, हें त्यांचे उपयोगांवरून उघडच आहे. म्हणून त्या दोहोंचा एकच वर्ग मानून त्यास संख्यावाचक किंवा गणनावाचक असें नांव देऊन त्यांचे पूर्णांकवाचक व अपूर्णांकवाचक असे दोन पोटभेद कल्पिले आहेत. ह्यांशिवाय दोघे, तिघे, इ० उदाहरणें वास्तविक या दोहोंपासूनही रूपानें व अर्थानें भिन्न पडल्यामुळें त्यांचा साकल्यवाचक म्हणून एक तिसरा पोटभेद मानणें भाग पडलें. एक, दोन, इ० ह्या पूर्णांकवाचकांपासून दोघे, तिघे, इ० हीं साकल्यवाचकें दिसण्यांत भिन्न आहेत, हे कोणीही कबूल करील. त्याचप्रमाणें त्यांची अपूर्णांकवाचकांत गणना व्हावयाची नाहीं हेंही तितकेंच स्पष्ट आहे. अर्थानेंही तीं स्वतंत्रच असून त्यांचा उपयोगही या दोहोंपासून भिन्न आहे, हें प्रकृत अध्यायांत स्पष्ट झालेंच आहे, (अं० १६८). एवंच, संख्यांशवाचक हा भेद वगळून संख्यावाचकांचे म्हणजे गणनावाचकांचे पूर्णांकवाचक, अपूर्णांकवाचक, आणि साकल्यवाचक, असे तीन उपभेद करण्यांत आले आहेत. हा केवळ व्यवस्थेचा प्रश्न आहे हें कांहीं अंशीं खरें आहे. तथापि न्यायशास्त्रदृष्ट्या भेदांस व उपभेदांस एकाच पंक्तीस बसविणें चुकीचें आहे हें तज्ज्ञांस तेव्हांच समजेल. तसें केल्यानें व्याकरणांत नाहीं तरी इतर शास्त्रांत आणि विशेषेंकरून भौतिक शास्त्रांत अनेक दुष्परिणाम होण्याचा फार संभव असतो. म्हणूनच उपभेदाला भेदाची योग्यता देणें केवळ अव्यवस्थित किंवा गैरशिस्त आहे इतकेंच नव्हे, तर अशास्त्र होय हें उघड आहे. संख्यांशवाचक हा भेद तुम्ही प्रथम फक्त वगळिल्यासारखा करून मग त्यास हळूच दुसऱ्याचे पोटांत स्थळ दिलें आहे; ह्यामुळें तुमच्यांत पूर्वींच्यांत फारसा फरक नाहीं; उगाच कांहीं तरी उलथापालथ केली आहे इतकेंच. असा आमच्यावर शास्त्रानभिज्ञ लोकांचा आक्षेप येण्याचा संभव आहे. म्हणून वरील न्यायशास्त्रशुद्धतेच्या स्वरूपाचें थोडक्यांत दिग्दर्शन केलें आहे. जिज्ञासूंनीं प्रकृत मुद्याचें सविस्तर विवेचन न्यायशास्त्रावरील पुस्तकांत पाहून घ्यावें. विद्वानांस आमच्या वर्गीकरणाची इष्टता व शास्त्रशुद्धता समजून येण्यास वरील दिग्दर्शन पुरेसें आहे. ]

---

## अध्याय ५.

## धातु किंवा क्रिया.

१७४. वाक्यामधील ज्या क्रियावाचक विकारी शब्दानें वाक्यार्थास पूर्णता येते आणि वक्त्याचे दृष्टीनें त्या क्रियेच्या आख्याताचा म्हणजे

काळाचा किंवा कांहीं विशेष अर्थाचा बोध होतो, त्यास **क्रियापद** असें म्हणतात. जसें:—रामा पुस्तक **वाचितो; तूं** हें पुस्तक **वाच.** या वाक्यांत 'वाचितो' व 'वाच' हे शब्द वाचणें ही क्रिया दाखवितात. आणि त्यांचे योगानें वाक्यें पुरीं होतात; शिवाय 'वाचितो' यानें बोलण्याचे वेळेचा म्हणजे वर्तमानकाळाचा आणि 'वाच' यानें आज्ञेचा अर्थ समजतो. म्हणून 'वाचितो' व 'वाच' हीं **क्रियापदें** होत.

१७५. ज्या मूळ शब्दास कांहीं विकार होऊन म्हणजे त्यास कांहीं प्रत्यय लागून क्रियापद बनतें, त्यास **धातु** किंवा क्रिया असें म्हणतात. जसें:—'वाचितो' हें क्रियापद **वाच** या मूळ शब्दास 'तो' हा प्रत्यय लागून झालेलें आहे. म्हणून 'वाचितो' या क्रियापदांत **वाच** हा **धातु** होय. ह्याचप्रमाणें करितो, दिलें, जाईल, हीं क्रियापदें **कर, दे, जा,** ह्या धातूंचीं विकृत रूपें होत.

**(अ)** कोशामध्यें धातूंचीं मूळ रूपें वाच, कर, दे, जा, अशीं न देतां त्यांचीं **णें** प्रत्ययान्त रूपें देण्याची तेथें चाल आहे. म्हणजे वरील धातू कोशांत वाचणें, करणें, देणें, जाणें, अशा रूपानें देण्यांत येतात.

**(आ)** धातूच्या विकृत रूपास म्हणजे धातूपासून तयार झालेल्या वाक्यांतील पदास **क्रियापद** असें म्हणतात. यावरून पुष्कळांचा असा समज होण्याचा संभव आहे कीं, धातु हा क्रियादर्शक शब्द आहे म्हणजे प्रत्येक धातूपासून कोणत्या ना कोणत्या तरी क्रियेचा बोध होतो. परंतु हें सर्वस्वी खरें नाहीं. बरेच धातु **क्रियादर्शक** आहेत हें खरें; तथापि कांहीं धातु **सत्तादर्शक** किंवा **स्थितिदर्शक,** तर कांहीं धातु **स्थित्यन्तरदर्शक** किंवा **विकारदर्शक** आहेत. हें विसरतां कामा नये. जसें:—सोनें पिंवळें असतें; त्याला फार आनंद झाला; इ०. या वाक्यांत **अस** आणि **हो** या धातूंपासून बनलेलीं क्रियापदें आहेत. परंतु त्यांनीं कोणत्याही क्रियेचा बोध होत नाहीं तर **अस** या धातूनें फक्त **सत्ता** म्हणजे **स्थिति** आणि **हो** या धातूनें **स्थित्यन्तर** किंवा **विकार** ह्यांचा बोध होत आहे हें उघड आहे. तर मग धातूच्या विकृत रूपास क्रियापद कां म्हणावें असा एक प्रश्न उत्पन्न होतो. क्रियापद शब्द इतका कांहीं रूढ झाला आहे कीं, तो जरी सर्वांशीं यथार्थ नसला तरी

तो यापुढें बदलणें इष्टही नाहीं आणि शक्यही नाहीं. तेव्हां त्याचें जर कोणत्या तरी दृष्टीनें समर्थन करितां येईल तर बरें. स्थूल दृष्टीनें क्रियापद हा शब्द यथार्थ दिसत नाहीं. तथापि एका दृष्टीनें त्याचें समर्थन करणें शक्य आहे. वाक्यामध्यें कांहीं तरी विधान करण्यांत येतें; म्हणजे दोन वस्तूंमधील साधर्म्य किंवा वैधर्म्य व्यक्त करण्यांत येतें. दोन वस्तूंमध्यें साधर्म्य आहे किंवा वैधर्म्य आहे हेंच प्रत्येक वाक्यांत सांगितलेलें असतें. ह्यासच **विधान करणें** असें म्हणतात. 'विधान करणें' हा मनाचा व्यापार म्हणजे **मानसिक क्रिया** आहे; आणि ही क्रिया क्रियापदाचे उपयोगानेंच नेहमीं व्यक्त होत असल्यामुळें क्रियापद ही संज्ञा या मानसिक क्रियेचे दृष्टीनें अन्वर्थक आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**टीप**—क्रियापदाचें जें आजपर्यंत लक्षण करण्यांत आलें आहे त्यांत क्रियापदाचे दोनच धर्मांचा उल्लेख केलेला आहे. एक क्रियाबोधकत्व आणि दुसरा कालबोधकत्व, कालबोधकत्वाचे संबंधाचा सूक्ष्म विचार बाजूस ठेविला तरी इतकें खरें कीं, या दोन धर्मांनीं क्रियापदाची व्याख्या पुरी होत नाहीं. कारण कीं, या व्याख्येंत अतिव्याप्तीचा दोष स्पष्टच आहे. 'रामा पुस्तकें वाचून घरीं गेला' या वाक्यांत 'गेला' या क्रियापदानें 'जाणें या क्रियेचा व 'भूत' काळाचा बोध होत आहे हें खरें; परंतु तेवढ्यानें जर 'गेला' यास क्रियापद म्हणावयाचें तर 'वाचून' यासही क्रियापद म्हटलें पाहिजे. कारण कीं, 'वाचून' ह्यानेंही 'वाचणें' या क्रियेचा आणि पूर्वकाळाचा म्हणजे भूत काळाचा प्रायः बोध होत आहे. म्हणजे 'वाचून' या ऊनकृदन्ताचे ठायीं सुद्धां क्रियाबोधकत्व व कालबोधकत्व हे दोन्ही गुण आहेत. ह्यामुळें क्रियापदाचे जुनें लक्षण कांहीं धातुसाधितांवरही येत असल्यामुळें तें दूषित आहे हें उघड आहे. जुन्या लक्षणांतील हा अतिव्याप्तीचा दोष टाळावा म्हणूनच क्रियापदाचे लक्षणांत **वाक्यपूरकत्व** ह्या धर्माची येथें भर घातली आहे. कांहीं धातुसाधितांनीं वर दाखविल्याप्रमाणें जरी क्रिया व काळ या दोहोंचा बोध झाला, तरी त्यांनीं वाक्य कधींच पुरें होत नसल्यामुळें वाक्यपूरकत्व या धर्मानें क्रियापदाचे लक्षणांतून त्यांची निवृत्ति होत आहे हें उघड आहे. तसेंच कांहीं क्रियापदांनीं आज्ञार्थादि अर्थांचा बोध होतो. म्हणून काळाबरोबर या लक्षणांत अर्थांचाहि निर्देश करण्यांत आला आहे.

१७६. धातूंचे मुख्य **दोन** प्रकार आहेत: **सकर्मक** आणि **अकर्मक.**

(अ) धातूनें दाखविली जाणारी क्रिया कर्त्यापासून निघते व ज्या दुसऱ्या कोणावर किंवा कशावर तिचा परिणाम घडतो किंवा निदान

प्रश्न विचारिले असतां मी, राम, आणि संत्रें, अशीं उत्तरें येतात; म्हणून वरील वाक्यांमध्यें हे शब्द कर्ते आहेत असें समजावें--मग ते शब्द कोणत्याही विभक्तींत असोत, ते त्या वाक्यांतील धातूंचे कर्ते होत. वरील वाक्यांत मी हा शब्द प्रथमान्त आहे, राम हा तृतीयान्त आहे, व संत्रें हा प्रथमान्त आहे. **प्रयोगभिन्नत्वानें व वाक्यरचनाभिन्नत्वानें कर्त्याची विभक्ति बदलेल. परन्तु कोणत्याही धातूचा जो कर्ता तो कर्ता व कर्म तें कर्म; त्यांत अदलबदल होऊं शकत नाहीं.** धातूचा कर्ता व त्याचें कर्म ह्यांच्या, प्रयोगभिन्नत्वानें किंवा वाक्यरचनेच्या भिन्नत्वानें. विभक्ती बदलतील, परन्तु कर्ता व कर्म हांमध्यें बदल होत नाहीं; आणि होतां कामा नये हें उघड आहे. हे सिद्धान्त फार महत्त्वाचे आहेत. म्हणूनच मोठ्या ठशांनीं छापिले आहेत.

[ कर्ता ह्या शब्दाचा अर्थ दादोबा हे आमच्याप्रमाणेंच समजतात. वरील उदाहरणांत ते मी, रामानें, संत्रें, हेच कर्ते मानितात. तसेंच 'त्यानें काम केलें' या ठिकाणीं 'करणारा कोण' या प्रश्नाचें उत्तर 'तो;' तेव्हां तो कर्ता होय. 'तो' शब्द तृतीयान्त आहे, म्हणून 'त्यानें' हा कर्ता, 'काम' हें कर्म व 'केलें' हें क्रियापद, कर्मणिप्रयोग असेंच ते म्हणतात. परंतु त्यांच्या कर्मकर्तरिप्रयोगासंबंधानें बोलतांना मात्र ते निराळीच भाषा वापरितात. 'जेव्हां या भाषेंत कांहीं प्रसंगीं सकर्मक धातूवरून सहायक्रियापदाचे योगानें अथवा दुसऱ्या प्रकारें अर्थान्तर न करितां कर्मास कर्ता करण्याचें अगत्य पडतें आणि त्या असा झालेल्या कर्तृपदाचा अधिकार क्रियापदाचे रूपांवर असतो, तेव्हां एक नवा कर्मकर्तरी म्हणून प्रयोग होतो' ( क० ४२८ ), 'त्यानें वाघ मारिला जातो' या वाक्यांत 'वाघ' हा जर कर्ता होय तर 'त्यानें काम केलें' या वाक्यांत 'काम' हा कर्ता कां नव्हे ? या दुसऱ्या वाक्यांत 'काम' या कर्मास कर्ता कां म्हणूं नये ? याचाच 'क्रियापदाचें रूपावर अधिकार' नाहीं काय ? कर्मकर्तरीप्रयोगांत कर्माचा अधिकार क्रियापदाचे रूपावर आहे, म्हणून त्यास दादोबा कर्ता म्हणतात. म्हणजे क्रियापदाचे रूपावर ज्याचा अधिकार चालतो तो कर्ता अशी कर्ता या शब्दाची व्याख्या त्यांचे कर्मकर्तरी प्रयोगाचे भाषेवरून दिसते. परंतु कर्मणिप्रयोगांतही कर्माचाच अधिकार क्रियापदाचे रूपावर असतो म्हणजे कर्माचेच लिंगवचनपुरुषाप्रमाणें क्रियापदाचें रूप असतें हें उघड आहे. 'तरी कर्मणिप्रयोगांत कर्मास कर्ता म्हणण्यास ते तयार नाहींत. म्हणजे दादोबांचे व्याकरणांत कर्ता हा शब्द दोन निरनिराळ्या अर्थांनीं योजिला आहे हें उघड आहे. 'त्यानें काम केलें' या ठिकाणीं दादोबांचे मतें 'त्यानें' हा कर्ता--म्हणजे 'कर' ही क्रिया करणारा; आणि 'त्याच्याकडून काम केलें गेलें' या वाक्यांत

'काम' हा कर्ता—म्हणजे क्रियापदाचे रूपावर ज्याचा अधिकार आहे तो शब्द—अर्थात् ज्या शब्दाचे लिंगवचनपुरुषाप्रमाणें क्रियापदाचें रूप फिरतें तो शब्द, हें उघड आहे. दादोबांची विसंगति त्यांच्या व्याकरणामध्यें लोकांच्या नजरेस येत नाहीं, ह्याचें कारण इतकेंच कीं, त्यांनीं कर्ता या शब्दाची व्याख्या स्पष्टपणें कायम केलेली नाहीं. यामुळें ते वेळेस साजेल तशी, ही किंवा ती भाषा वापरून वेळ मारून नेतात.

ही दादोबांची उणीव व विसंगति जोशी यांनीं साफ दूर केली आहे. जोशी म्हणतात, 'कर्ता म्हणजे वाक्यांत क्रियापद ज्या शब्दाप्रमाणें असतें तो शब्द, व कर्तृपद म्हणजे वाक्यांतील क्रियापदाचा अर्थ जो व्यापार तो ज्याचेकडून घडला किंवा घडत असेल त्याचा दर्शक शब्द' (क. ४८८). जोशी यांनीं 'कर्ता' या शब्दाची स्पष्ट व्याख्या केली आहे, याबद्दल ते स्तुतीस पात्र आहेत. परंतु कर्ता व वास्तविक त्याच अर्थाचा दुसरा शब्द जो 'कर्तृपद' ह्यांमध्यें जो त्यांनीं फरक केला आहे तो गैर आहे. वास्तविक 'क्रिया करणारा' आणि दादोबा म्हणतात त्याप्रमाणें 'क्रियापदाचे रूपावर अधिकार चालविणारा' हे दोन भिन्न भिन्न अर्थ आहेत हें निर्विवाद आहे, व त्यांस पाहिजे तर भिन्न भिन्न नांवें द्यावीं. परंतु एकाच अर्थाची दिसण्यांत दोन नांवें त्यांस देणें म्हणजे भाषेचा अप्रयोजकपणा व्यक्त करणें होय.

क्रिया करणारा ज्या शब्दानें दाखविला जातो तो कर्ता असेंच खेर आपल्या इंग्रजींतील मराठीचे व्याकरणांत म्हणतात. म्हणजे जोशी यांचे जें 'कर्तृपद तें खेरांचा 'कर्ता'; आणि जोशी यांचा जो 'कर्ता' तें खेरांचें 'प्रथमान्त-नाम.' ह्याप्रमाणें जोशी ह्यांनीं कर्ता हा रूढ शब्द भलत्याच अर्थानें योजण्यांत जी चूक केली ती आणि भिन्न भिन्न अर्थास एकाच अर्थाचे दोन शब्द योजण्यांत त्यांनीं जी दुसरी चूक केली ती, या दोन्ही चुका खेर यांनीं दुरुस्त केल्या आहेत. म्हणजे योग्य अर्थास त्यांनीं 'कर्ता' ही संज्ञा लाविली आहे; आणि तदितर अर्थास 'प्रथमान्तनाम' ही निराळी संज्ञा सुचविली आहे. निराळी संज्ञा सुचविली " जरी खेरांनीं योग्य केलें, तरी 'प्रथमान्तनाम' ही त्यांनीं सुचविलेली संज्ञा पुनः अयोग्यच असल्यामुळें आणि जोशाप्रमाणेंच त्यांनीं अप्रत्यय द्वितीया व सप्रत्यय द्वितीया असे दोन प्रकार मानल्यामुळें पुन्हा त्यांची कृति सदोषच राहिली आहे. 'तो काम करितो' या वाक्यांत 'तो' हा कर्ता व प्रथमान्त नाम, 'काम' ही अप्रत्यय द्वितीया—अर्थ 'कर्म'; आणि 'त्यानें काम केलें' या वाक्यांत 'त्यानें' हा कर्ता, 'काम' हें प्रथमान्तनाम—'केलें' याचें कर्म, असें खेर एका ठिकाणीं म्हणतात. आणि 'दुसरे ठिकाणीं ते म्हणतात कीं, द्वितीया ही सप्रत्यय व अप्रत्यय असून कर्म नेहमीं द्वितीया विभक्तींत असतें. या नियमाप्रमाणें 'त्यानें काम केलें' या वाक्यांत 'काम' हें कर्म असल्यामुळें तें

अप्रत्यय द्वितीयान्त ' होय; आणि ' काम ' ह्या शब्दाप्रमाणें क्रियापदाचें रूप बदलत असल्यामुळें तें ' प्रथमान्तनाम ' होय. अशा प्रकारें एकाच शब्दास प्रथमान्त व द्वितीयान्त असें खेरांचे व्याकरणाप्रमाणें म्हणावें लागतें.

' कर्ता ' या शब्दाच्या दोन भिन्न भिन्न अर्थांची दादोबांची चूक जोशी यांनीं दूर करण्याचा प्रयत्न केला. परंतु ' कर्ता ' हा शब्द पुन्हा भलत्याच अर्थी योजून त्याच अर्थाचा ' कर्तृपद ' हा शब्द ' कर्ता ' ह्याचे वास्तविक अर्थी योजिला. ह्यामुळें एक घोंटाळा जाऊन दुसरा उत्पन्न झाला. तो खेरांनीं दूर केला तर त्यांनीं आणखी तिसराच घोंटाळा उत्पन्न केला. असा वरील विवेचनाचा आशय आहे.

ज्यास एकदां अप्रत्यय द्वितीया म्हणावयाचें त्यासच पुन्हा प्रथमान्तनाम म्हणावयाचें हा घोंटाळा किंवा ही विसंगति खेरांचे नजरेस आली होती असें त्यांचे उपोद्घातावरून दिसतें. परंतु जोशी जसें आपल्या प्रस्तावनेंत म्हणतात कीं ' थोडी संवय झाल्यावर ' आमची नवीन व्यवस्था उलट सोपी व सोईची वाटेल, त्याचप्रमाणें खेरही आपल्या उपोद्घातांत म्हणतात कीं, ही विसंगति केवळ आभासमय आहे. एवंच, त्यांच्याही कृतींत पुन्हा घोंटाळा राहिला तो राहिलाच.

तात्पर्य इतकेंच कीं, दादोबांनीं कर्त्याची व्याख्या केली नव्हती ती खेरापर्यंत नीट ठरून गेली, इतकाच काय तो या अवधींत व्याकरणास फायदा झाला. बाकी कोणता ना कोणता तरी घोंटाळा शिल्लकच राहिला. कर्ता आणि कर्म ह्यांच्या व्याख्या एकदां नीट ठरल्या आणि कर्ता तो कर्ता, कर्म तें कर्म; तसेंच कर्तरि प्रयोगांत कर्त्याप्रमाणें क्रियापद असतें, आणि कर्मणिप्रयोगांत कर्माप्रमाणें क्रियापद असतें; इतक्या गोष्टी निश्चित झाल्या, म्हणजे वाक्यांत ज्या शब्दाचें लिंगवचनपुरुषानुरूप क्रियापदाचें रूप असतें, किंवा दादोबांचे भाषेनें ' ज्याचा क्रियापदाचे रूपावर अधिकार चालतो ' त्यास वेगळी संज्ञा काढण्याची कांहीं विशेष जरूर आहे असें आम्हांस वाटत नाहीं. आणि या अर्थास वेगळी संज्ञा तयार करण्याचे व्यर्थ खटाटोपांत जोशी आणि खेर यांनीं आपापल्यापरी घोंटाळा उत्पन्न केला आहे. त्यांनीं फक्त कर्ता ह्याची योग्य व्याख्या केली असती म्हणजे व्याकरणाचें काम भागलें असतें. परंतु ' क्रियापदाचे रूपावर अधिकार चालविणारा ' या अर्थाची नवीन संज्ञा आपल्या टांकसाळींत पडविण्याचा जो त्यांनीं व्यर्थ प्रयत्न करून अखेरीस कवडीमोल नाणी प्रचारांत आणिलीं त्यानेंच सगळी घाण झाली आहे असें वरील विवेचनावरून कळेलच. ' क्रियापदाचे रूपावर अधिकार चालविणारा ' किंवा ' ज्याचे लिंगवचनपुरुषाप्रमाणें क्रियापद असतें ' तो या अर्थाची संज्ञा असण्याची कांहीं फारशी जरूर नाहीं. तसें असतें तर पाणिनीसारख्या संस्कृत वैयाकरणांनींच आपणांकरितां ती आयती तयार करून

ठेविली असती. कारण उघडच आहे कीं, हा प्रकार संस्कृतांतही असाच आहे. म्हणून कर्ता म्हणजे क्रिया करणारा, आणि 'क्रियापदाचे रूपावर अधिकार चालविणारा' ह्यांमधील भेद संस्कृतांतन्याप्रमाणें मराठींतही विशेष महत्त्वाचा नाहीं. तथापि 'क्रियापदाचे रूपावर अधिकार चालविणारा' या अर्थाची स्वतंत्र संज्ञा पाहिजेच असल्यास ती 'क्रियापदेश' किंवा 'धातुरूपेश' अशा प्रकारची केल्यानें वर सांगितल्याप्रकारचा कोणताही घोंटाळा उत्पन्न होणार नाहीं.

तेव्हां क्रिया करणारा तो कर्ता; आणि ज्या शब्दाचे लिंगवचन—पुरुषाप्रमाणें धातुरूप म्हणजे क्रियापद असतें त्यास वाटेल तर 'धातुरूपेश' म्हणावें. असो. वाक्यांतील क्रियापदाचा कर्ता शोधून काढणें फारसें कठिण आहे असें नाहीं. तथापि या कामीं आमचे वैयाकरण इंग्रजी भाषेच्या परकीय फाजील संस्कारानें कसे चकले आहेत तें पहा. 'मला तुझें करणें रुचत नाहीं' विष्णूस भक्ति आवडते', 'देवाला सर्व दिसतें' या वाक्यांतील रुचणें, आवडणें, दिसणें, या धातूंचीं मला, विष्णूस, देवाला, हीं जोशी यांचे भाषेनें कर्तृपदें म्हणजेच कर्ते होत, (प्रौढबोध—क० ५४७) खरही असेंच म्हणतात. मला वाटतें त्यानें जावें' या वाक्यांत मला हा वाटतें याचा कर्ता (agent) असेंच ते सांगतात. (Kher's gram p. 410) आणि 'तुला हल्लीं बरें वाटतें काय' या वाक्यांत जसा त्यांचे मतें कर्मणिप्रयोग आहे, (p. 415) त्याचप्रमाणें वरील वाक्यांतही ते कर्मणिप्रयोग समजतात, व जोशी ह्यांचें मतही तसेंच दिसतें. परंतु आमच्या मतें ज्याला कांहीं रुचतें, आवडतें, दिसतें, वाटतें, तो, रुचणें, आवडणें, दिसणें, वाटणें, ह्या क्रियांचा कर्ता नव्हे. कारण कीं, वर सांगितल्याप्रमाणें येथें—रुचणारा, आवडणारा, दिसणारा, वाटणारा कोण?—असा प्रश्न जर केला तर त्याचें उत्तर ज्या मनुष्यासंबंधानें किंवा प्राण्यासंबंधानें या धातूंचा उपयोग होतो, तो मनुष्य किंवा प्राणी असें येत नाहीं; तर ज्या पदार्थासंबंधानें या धातूंचा उपयोग होतो तो पदार्थ असेंच येतें. वरील वाक्यांत प्रकृत प्रश्नाचें उत्तर मी, विष्णु, देव, हें नसून, तुझें करणें, भक्ति, सर्व, हें होय, हें उघड आहे. यावरून वरील वाक्यांतील क्रियापदांचे मी, विष्णु, देव हे कर्ते नसून, तुझें करणें, भक्ति, सर्व, हें त्यांचे कर्ते होत, यांत संशय नाहीं. या वाक्यांचें इंग्रजींत जें नेहमीं भाषान्तर करितात, त्यांत मी, विष्णु, देव, हे कर्ते करितात हें खरें; पण तेवढ्यावरून मराठींतील रुचणें, आवडणें, दिसणें, ह्यांचे तेच कर्ते होत असें मानणें वाजवी नाहीं. दुसरें असें कीं, रुच, आवड, दिस, वाट, इ० मराठी धातूंच्या अर्थाचे जे like, see, think, हे इंग्रजी धातू ते सकर्मक आहेत. परंतु मराठींतील रुच, आवड, दिस, वाट, हे धातु अकर्मक आहेत. संस्कृतभाषेंतही रुच्, हा धातु अकर्मकच आहे. 'मोदको बालकाय रोचते' म्हणजे मोदक बालकाला रुचतो किंवा आवडतो या वाक्यांत मोदक हाच

कर्ता असून रुच धातु अकर्मक आहे हें उघड आहे. आम्हीं वर सांगितलेल्या कर्त्याच्या खुणेप्रमाणेंही पहा. रुचणारा कोण ? अर्थात् 'बालक' नव्हे तर मोदकच होय. तेव्हां या खुणेप्रमाणेंही मोदक हाच कर्ता ठरतो. तर मग बालकाय ( सं० ) किंवा बालकाला ( म० ) या चतुर्थीचा अर्थ काय ? हा प्रश्न साहजिकच उद्भवतो. त्याचें उत्तर असें कीं, वरील वाक्यांचा अर्थ 'मोदक हा बालकाप्रत रुचि देतो' किंवा 'मोदक हा बालकाचे ठायीं रुचि उपत्न्न करितो' अशा प्रकारचा असल्यामुळें 'बालकाला' या चतुर्थीचा अर्थ संप्रदान किंवा अधिकरण आणि विशेषेंकरून अधिकरण समजणेंच चांगलें. एवंच, रुच, आवड, दिस, वाट, हे धातु अकर्मक आहेत. तेव्हां त्यांचेबदला इंग्रजींत जे like, See, think, हे सकर्मक धातु योजितात, त्यांचा मनावर खोल ठसा उमटल्यामुळें रुच, आवड, दिस, वाट, हे मराठी धातुही आमच्या इंग्रजी शिकलेल्या लोकांस सकर्मक वाटूं लागले. असो. सारांश, मला तुझें करणें रुचत नाहीं, विष्णूस भक्ति आवडते, देवास सर्व दिसतें, मला वाटतें त्यानें जावें, या वाक्यांत आमचे नवीन वैयाकरण म्हणतात त्याप्रमाणें कर्मणिप्रयोग नसून केवळ अकर्मककर्तरिप्रयोग आहे. ह्याच मुद्याचे समर्थनार्थ आणखी एक गोष्ट सांगतो. कर्माशिवाय धातु असतो, पण कर्त्याशिवाय, उजाडणें, सांजावणें, फावणें, इ० थोड्याशा भावकर्तृक किंवा अकर्तृक धातूंशिवाय, धातू नसतो, तेव्हां हाताच्या बोटांवर मोजतां येण्याजोगे भावकर्तृक धातु वगळले असतां बाकीच्या सर्व धातूंस कर्ता असतो आणि सर्वांचा कधीं ना कधीं तरी कर्तरि प्रयोग होणें हें स्वाभाविक आहे. सकर्मक धातूंचाही कर्मणिप्रयोगापेक्षां कर्तरि प्रयोगच अधिक स्वाभाविक आहे असें जरी न म्हटलें तरी सकर्मक धातूंचाही कर्तरिप्रयोग होतो व होणें शक्य आहे, ह्या विधानास कोणी हरकत घेईल असें वाटत नाहीं. आतां विष्णूस भक्ति आवडते, देवाला सर्व दिसतें इ० वाक्यांतील आवड, दिस, इ० धातु सकर्मक असून वरील उदाहरणांत जोशी व खेर म्हणतात त्याप्रमाणें जर त्यांचा कर्मणिप्रयोग झालेला आहे तर त्यांचा दुसऱ्या कोणत्याही वाक्यांत त्यांनीं आम्हांस सकर्मक कर्तरिप्रयोग करून दाखवावा अशी आमची त्यास नम्र विनंति आहे. आमच्या मतें तर हें मराठी भाषेच्या दृष्टीनें निदान सध्या तरी अशक्य आहे. आणि कांहीं सकर्मक धातूंचा सकर्मक कर्तरिप्रयोग कधींच शक्य नाहीं असें जोंपर्यंत म्हणण्यास कोणी तयार नाहीं, तोंपर्यंत रुच, आवड, दिस, इ० धातु अकर्मकच समजून वरील वाक्यांत त्यांचा अकर्मककर्तरि प्रयोगच आहे असें म्हणणें भाग आहे आतां या धातूंचा कर्तरि प्रयोग कधींच होत नाहीं हें मत जर कोणी ग्राह्य समजेल तर मात्र आम्ही आपलें हें म्हणणें त्याजवर बळेंच न लादितां माघारें घेण्यास तयार आहों. नाहीं तर, युक्तीस, व्याकरणास, तर्कास, अर्थास, व व्युत्पत्तीस मान देऊन या विषया-

संबंधानें आम्ही प्रतिपादिलेलें दादोबांचें मतच स्वीकारिलें पाहिजे हें उघड आहे. अखेरीस असेंही पहा कीं, दिसणें, वाटणें, हे धातु अकर्मक असून तदनुरूप अर्थाचे पहाणें, मानणें, हे धातु सकर्मक आहेत.

अशाच प्रकारचे व याच अर्थाचे दुसरे कांहीं धातु आहेत. त्यांस नवीन वैयाकरण सकर्मक समजतात. परंतु ते वर सांगितल्याप्रमाणें वास्तविक अकर्मक होत. जसें:—रुचणें, आवडणें, दिसणें, वाटणें, भासणें, येणें, लाजणें, शोभणें, इ०. उदाहरणें:—त्याला इंग्रजी येतें, त्याला तांबडी पगडी शोभते, इ०.

समजणें व साधणें ह्यांचे दोन्ही तऱ्हेचे प्रयोग होतात. 'तुम्ही काय म्हणतां तें मला समजलें, त्याला हें काम चांगलें साधलें आहे' या वाक्यांत ते वरील धातूंप्रमाणें अकर्मकच होत. परंतु 'तुम्ही काय म्हणतां तें मी समजलों, तो आपलें हित साधितो' या वाक्यांत ते सकर्मक आहेत हें उघड आहे.]

१७८. कांहीं धातूंचा सकर्मक व अकर्मक असा दोन्ही प्रकारचा उपयोग आढळतो, म्हणून त्यांस उभयविध म्हणण्याची चाल आहे. जसें:—तो घर मोडतो, त्याचें घर मोडतें; त्यानें दार उघडिलें, त्याच्या घराचें दार उघडलें; तो काम करितो, त्याला मळमळ करते; तो उदाहरण समजतो, त्याला उदाहरण समजतें; इ०. अशा धातूंचा वेगळा वर्ग करण्यापासून व्याकरणास फारसा उपयोग नाहीं. जेव्हां त्यांचा सकर्मक उपयोग होत असेल तेव्हां त्यांस सकर्मक म्हणावें, आणि जेव्हां त्यांचा अकर्मक उपयोग होत असेल तेव्हां त्यांस अकर्मक म्हणावें. तथापि त्या धातूंच्या सकर्मक व अकर्मक उपयोगांतील फरक भाषेच्या अभ्यासाचे दृष्टीनें विद्यार्थ्यांचे लक्षांत आणणें कांहीं वावगें नाहीं. यामुळें धातूंचा हा प्रकार व्याकरणांत सांगण्यास हरकत नाहीं. याचप्रमाणें लोट, काप, मान, फळ, भर, आठव, स्मर, इ०, धातु उभयविध समजावे.

१७९. धातु अकर्मक असतां कर्ता आणि क्रियापद या दोन शब्दांनीं बहुधा विधानाची पूर्णता होते. आणखी कशाचीही त्यास जरूर नाहीं. जसें—तो पडला, तो बसतो, मी निजतों, तूं जा, इ०. या वाक्यांत दोन दोन शब्दांनींच विधान पूर्ण झालें आहे; आणखी कोणत्याही शब्दाची विधानपूर्णतेस आवश्यकता नाहीं. अन्य शब्दांनीं वाक्याची वाढ होऊन अर्थांत भर पडेल. जसें:—तो जिन्यावरून पडला. तो माडीवर जात असतां जिन्यावरून पडला, तो माडीवर जात असतां

पायरी चुकून जिन्यावरून पडला, इ०. तथापि या अधिक शब्दांची विधानपूर्णतेच्या दृष्टीनें गरज नाहीं, हें उघड आहे.

(अ) तथापि कांहीं **अकर्मक** धातु असे आहेत कीं, कर्ता आणि क्रियापद या दोनच शब्दांनीं त्यांच्यासंबंधानें होणारें विधान पूर्ण होत नाहीं; तर विधानपूर्णतेस आणखी निदान एका शब्दाची तरी अपेक्षा असते. अशा अकर्मक धातूंस आणि तत्साधित क्रियापदांस **अपूर्णविधान धातू** व **अपूर्णविधान क्रियापदें** असें म्हणतात; आणि ज्या शब्दानें अथवा शब्दांनीं तत्संबंधी विधानाची पूर्णता होते, त्यास अथवा त्यांस **विधानपूरक शब्द** किंवा संक्षेपानें **पूरक** म्हणण्याची चाल आहे. जसें:--तो **राजा** झाला, तो **वेडा** झाला, रामा **रागावलेला** दिसला, हा आंबा **चांगला** निघाला, इ०. या वाक्यांत राजा, वेडा, रागावलेला, चांगला, हे शब्द पूरकें आहेत. त्यांच्याशिवाय **हो, दिस, निघ,** या धातूंसंबंधाचें विधान पूर्ण होत नाहीं; म्हणून **हे** अकर्मक धातु **अपूर्णविधान** आहेत हें उघड आहे.

१८०. सकर्मक धातूंसंबंधाचें विधान कर्माशिवाय पुरें होत नाहीं; अर्थात् त्यास कर्माची अपेक्षा असते. म्हणून **कर्मासही** या दृष्टीनें **पूरक म्हणतात.** वाक्यमीमांसेंत हा मुद्दा महत्त्वाचा आहे. जसें:--त्यानें **काम** केलें, तो **आंबा** खातो, रामानें **रावणास** मारिलें, इ०. या वाक्यांत काम, आंबा, रावणास, हीं कर्में आहेत; त्यांच्या उल्लेखाशिवाय विधान पूर्ण होत नाहीं; अर्थपूर्णतेस त्यांची गरज आहे; म्हणून वाक्यमीमांसेचे दृष्टीनें हीं पूरकेंच होत.

(अ) कर, विचार, बोल, म्हण, सांग, दे, दाखव, हे व ह्या **अर्थाचे** आणि आणखी कांहीं सकर्मक धातु यांस दोन दोन कर्में असतात. एक बहुधा प्राणिवाचक आणि दुसरें बहुधा पदार्थवाचक; ह्यांपैकीं पहिलें बहुधा चतुर्थ्यन्त असतें आणि दुसरें प्रथमान्त असतें. जसें:--न्यायाधीश **अपराध्यास** शिक्षा करितो, शिक्षकानें **विद्यार्थ्यांस** दोन प्रश्न विचारिले, असें सूत **शौनकास** बोलला किंवा म्हणाला, त्यानें **मला** तुझा पत्ता सांगितला, इत्यादि वाक्यांत अपराध्यास, विद्यार्थ्यांस, शौनकास, मला, हे चतुर्थ्यन्त शब्द प्राणिवाचक कर्में होत. ह्यांस अलीकडे **अप्रत्यक्ष** कर्में असें म्हणण्याची इंग्रजी व्याकरणास अनुसरून चाल पडली आहे. कारण कीं, दुसरीं जीं कर्में आहेत तीं कर्मणि प्रयोगांत बहुधा 'धातुरूपेश' होत

असल्यामुळें म्हणजे त्यांच्या लिंगवचनपुरुषाप्रमाणें क्रियापद बदलत असल्यामुळें त्यांचें महत्त्व अधिक; म्हणून त्यांस **प्रत्यक्ष कर्में** व इतरांस अप्रत्यक्ष कर्में असें म्हणतात. शिवाय प्राणिवाचक कर्में कधीं कधीं सांगितलीं नाहींत तरी चालतें. जसें:--सूत म्हणाला, परीक्षकानें दोन प्रश्न विचारिले, इ०.

आमच्या मतें अप्रत्यक्ष कर्म या संज्ञेची मराठींत विशेष जरूर नाहीं. वरील चतुर्थ्यन्त शब्दांस कर्में म्हणण्यापेक्षां त्या चतुर्थींचा अर्थ संप्रदान, हें मराठी व संस्कृत व्याकरणास अनुसरून म्हणणेंच प्रशस्त होय. आणि प्रथमान्त शब्दच केवळ कर्में होत. दोहोंसही व्यर्थ कर्म म्हटल्यामुळें त्यांमधील फरक दाखविणें अवश्य होऊन प्रत्यक्ष कर्म व अप्रत्यक्ष कर्म ह्या शब्दांची जरूर भासते. तथापि प्रत्यक्ष कर्म व अप्रत्यक्ष कर्म ही भाषा इंग्रजीच्या अभ्यासानें व संघटनानें वहुतेक रूढ झाली असल्यामुळें आणि ती तशीच निरुपद्रवी असल्यामुळें तिचा उपयोग करण्यास हरकत नाहीं.

१८१. कांहीं धातूंस कर्म नसतें म्हणजे ते अकर्मक असतात हें खरें. तथापि अकर्मक व सकर्मक ह्या दोन्ही प्रकारच्या धातूंस **बहुधा** कर्ता हा असतोच. 'बहुधा' असें म्हणण्याचें कारण असें कीं, कांहीं अकर्मक धातूंस वाक्यामध्यें स्वतंत्रपणें दृश्य कर्ता नसतो, म्हणजे केवळ क्रियापदानेंच तत्संबंधाचें विधान पूर्ण झालेलें दिसतें. अशा धातूंस किंवा क्रियापदांस **अकर्तृक** असें म्हणतात. जसें:—कळमळतें, सांजावलें, उजाडलें, फावलें, इ०. या ठिकाणीं स्वतंत्र कर्ता दिसत नाहीं; म्हणून यांस अकर्तृक असें म्हणतात. या धातूंचा उपयोग नेहमीं तृतीय पुरुषीं नपुंसकलिंगीं एकवचनीं होतो.

[ वास्तविक म्हटलें म्हणजे कर्ता व क्रियापद ह्या गोष्टी विधानास आवश्यक होत. तेव्हां प्रकृत स्थळीं कर्त्याशिवाय विधान होत आहे, म्हणून प्रकृत धातूंस अकर्तृक म्हणणें बरें असें जरी व्याकरणदृष्ट्या क्षणभर वाटलें तरी वाक्यमीमांसेचे दृष्टीनें पाहिलें असतां तें तत्त्वतः खरें नाहीं. कळमळतें, सांजावलें, फावतें, इ० क्रियापदांपासून कर्ता पृथक् सांगण्याची भाषेमध्यें जरूर नाहीं, इतकेंच फार तर म्हणतां येईल. दादोबा म्हणतात कीं, या ठिकाणीं 'क्रियेचा जो भाव तोच कर्ता असावा असें भासतें.' दादोबांचा कर्ता हा शब्द संदिग्ध आहे. ह्याचा अर्थ 'क्रिया करणारा' किंवा 'धातुरूपेश' असा आहे. आतां 'क्रियेचा

जो भाव ' तोच ' क्रिया करणारा ' होऊं शकत नाहीं; तेव्हां कळमळणें, सांजावणें, फावणें, इ०. हे ' क्रिया करणारे ' या अर्थी कर्ते नव्हत हें उघड आहे. ' धातुरूपेश ' या अर्थानें मात्र त्यांस ' कर्ता ' हें नांव एकवार चालेल. तथापि ' कर्ता ' या शब्दाचा हा उपयोग योग्य नव्हे आणि त्या अर्थानें एक स्वतंत्र संज्ञा पाहिजेच असल्यास ती ' धातुरूपेश ' हिच्यासारखी एखादी वापरणें चांगलें हें वर सविस्तर दाखविलेंच आहे. म्हणून दादोबांचें ' भावकर्तृक ' हें नांव योग्य नाहीं. शिवाय प्रत्येक क्रियापदास धातुरूपेश असलाच पाहिजे असा कांहीं नियम नाहीं. भावी प्रयोगांतील क्रियापदास धातुरूपेश मुळींच नसतो; आणि ज्यावेळीं क्रियापद कर्त्याचे किंवा कर्माचे कोणाचेच तंत्रानें वागत नाहीं, तेव्हां तें तृतीयपुरुषीं नपुंसकलिंगीं एकवचनीं असतें असा नियम आहे; आणि अशाच वाक्यांत भावी प्रयोग मानितात. ह्या दृष्टीनें कळमळतें, सांजावलें, फावलें, इ० हे भावी प्रयोग होत. परंतु सकर्मक भावी व अकर्मक भावी असे जे भावी प्रयोगाचे नेहमींचे दोन प्रकार आहेत; त्यांशिवाय हा एक भावी प्रयोगाचा वेगळाच प्रकार मानावा लागेल. नेहमींच्या प्रयोगांत कर्ता हा असावयाचाच; कर्म कधीं असेल, कधीं नसेल; म्हणून कर्तरि आणि भावी ह्या प्रयोगांचे सकर्मक व अकर्मक असे दोन प्रकार होतात. परंतु प्रकृत स्थळीं कर्मही नाहीं आणि व्याकरणदृष्ट्या कर्ताही नाहीं. तेव्हां हा अकर्तृकर्मक भावी असा तिसराच प्रकार मानिला पाहिजे. एवंच व्याकरणाच्या शास्त्रीय दृष्टीनें पाहिलें म्हणजे हा भावी प्रयोगाचाच तिसरा प्रकार मानणें रास्त आहे. परंतु कळमळ, सांजाव, फाव, इ० धातु फारच थोडे पडल्यामुळें आणि त्यांस भावकर्तृक असें म्हणण्याचा प्रचार पडल्यामुळें प्रकृत रूढीचाच कोणी स्वीकार केल्यास त्यास फारशी हरकत नाहीं, असें आम्ही रूढीस मान देऊन म्हणतों. तथापि शास्त्रीयदृष्ट्या चालू वहिवाट योग्य नाहीं आणि या धातूंचा अकर्तृकर्मक असा एक भावी प्रयोगच होतो हें वरील विवेचनावरून वाचकांचे नजरेस आलेंच असेल.

दादोबा म्हणतात, वाटणें या धातूचा ' कोठें कोठें भावकर्तृक धातूप्रमाणेंही प्रयोग होतो; जसें:— मला वाटतें, त्याणें हें कृत्य केलें असावें. मला वाटलें, तो कालच गेला असावा ' ( क० ३९५ ). या ठिकाणीं दादोबांची दृष्टि कशी चुकली कोणास ठाऊक ! वरील उदाहरणांत ' वाटतें ' आणि ' वाटलें ' या क्रियापदांचा कर्ता त्यांचे नंतर आलेलें वाक्य होय हें उघड आहे. म्हणून या बाबतींत अधिक विस्तारपूर्वक खुलासा करण्याची जरूर नाहीं.

येथपर्यंत धातु, कर्ता, कर्म, ह्यांविषयींचा व त्यांच्या परस्पर संबंधाचा साधारण विचार झाला. धातूचा कर्ता शोधून काढण्याची खूण आम्हीं वर सांगितलीच आहे. त्याप्रमाणें कर्म शोधून काढण्याची निरपवादक खूण मिळत नाहीं. म्हणून अमुक धातु सकर्मक की अकर्मक हें निःसंशय सांगतां येत नाहीं. दादोबां-

दिकांनीं धातूंमधील हा फरक जाणण्यासाठीं कांहीं खुणा सांगितल्या आहेत. अमुक स्थळीं अमुक प्रत्यय धातूंस लागत असला म्हणजे त्यास सकर्मक म्हणावें. नाहीं तर तो धातु अकर्मक होय. अशा प्रकारचे अनेक नियम, त्याचे अपवाद आणि प्रत्यपवाद देऊन विस्तार करण्यांत कांहींच अर्थ नाहीं. कारण कीं, एक तर हे नियम निरपवाद नाहींत, आणि अपवादांचा नियम ठरवितां येत नाहीं. किंवा त्यांची व्यक्तिशः संपूर्ण यादी तयार करितां येत नाहीं असें असूनही वरील मार्ग स्वीकारण्यास कांहीं हरकत नव्हती. पण दादोबादिकांचा मार्ग शास्त्रीयदृष्ट्या सर्वांशीं अशुद्ध अर्थात् सर्वथा अशास्त्रीय असल्यामुळें तो स्वीकारार्ह नाहीं. आतां हा मार्ग केवळ अशास्त्रीय कसा तें पहा. दिलेल्या धातूस अमुक स्थळीं अमुक प्रत्यय लागल्यास तो सकर्मक होय हें धातूंचें विकरण, म्हणजे धातु कसे चालावावयाचे हें, सांगण्यापूर्वीं सांगणें म्हणजे विकरणप्रकरण गृहीत घेणें होय. आणि विकरणामध्यें, तो प्रत्यय सकर्मक धातूंसच लागतो, असें सांगणें म्हणजे अन्योन्याश्रयाचा दोष पदरीं घेणें होय. असें करण्यापासून शास्त्र किंवा उपयोग ह्यांपैकीं कोणत्याच दृष्टीनें फायदा होत नसल्यामुळें आम्ही तो प्रयत्न सोडूनच देतों, तात्पर्य, अमुक एक धातु सकर्मक आहे, कीं अकर्मक आहे, हें ठरविण्याचें निःसंशय साधन उपलब्ध नाहीं असेंच प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे. आणि ह्या प्रश्नाचा निकाल प्रत्येक धातूच्या भाषेंतील निरनिराळ्या उपयोगांचेंच निरक्षण करून, केला पाहिजे हें उघड आहे, म्हणून अमुक एक धातु सकर्मक आहे कीं अकर्मक आहे, हें सांगण्याचें व्याकरणाचें काम नसून तें त्याच्या अर्थांबरोबर कोशकार कोशामध्यें देतात. ही गोष्ट अन्य भाषांतही अशीच आहे. तेव्हां कोशकाराचे कामांत वैयाकरणानें व्यर्थ हात घालणें उचित नाहीं. ]

१८२. धातूंत पुन्हा **दोन** प्रकार आहेत: **अव्युत्पन्न** म्हणजे **सिद्ध** जसें:—हो, अस, निज, भी, खा, ऐक, इ०; आणि **व्युत्पन्न** म्हणजे **साधित**, जसें:—माणसाळणें, वेडावणें, विझवणें, उत्तरणें, उद्धारणें, इ०.

**टीप**—व्युत्पन्न किंवा साधित धातु अनेक प्रकारांनीं साधतात. ते प्रकार पुढें दिले आहेत. या साधित धातूंचें संबंधानें येथें फक्त त्याच भाषेच्या दृष्टीनें—मराठीच्याच दृष्टीनें—विचार करितात. म्हणजे मराठी भाषेंतच रूढ असलेल्या शब्दांपासून साधित धातु कसे साधतात इतकेंच येथें सांगण्यांत येतें. अन्य भाषांतील शब्दांपासून निघालेल्या धातूंस व्याकरणांत अव्युत्पन्न किंवा सिद्ध असेंच म्हणण्यास हरकत नाहीं. अन्य भाषांतून आपल्या भाषेंत शब्द कसे येतात, म्हणजे शब्दांची उत्पत्ति परभाषेपासून कशी होते हें सांगणें कोशाचें काम आहे; व्याकरणाचें नाहीं. फक्त भाषेंतल्या भाषेंत कांहीं शब्दांपासून दुसरे कांहीं शब्द कसे साधतात, इतकेंच सांगण्याचें व्याकरणाचें काम आहे. अर्थात् कोणत्याहि भाषेच्या व्याकरणाची दृष्टि प्राधान्येंकरून त्या भाषेचे

मर्यादेच्या बाहेर जाण्याची आवश्यकता नाहीं. आपल्याच प्रांतांतील कांहीं गोष्टींचा स्पष्ट खुलासा त्या मर्यादेच्या बाहेर थोडीशी दृष्टी फेकल्यानें होत असेल तर वैयाकरणानें बाहेरच्या प्रांताचें तेवढ्यापुरतें निरीक्षण करणें अवश्य आहे; परंतु एकंदर भाषेची उत्पत्ति कशी झाली व तिची कसकशी वाढ होत गेली, हा विषय प्रचलित भाषेच्या व्याकरणाचा नसून इतिहासाचा किंवा ऐतिहासिक व्याकरणाचा आहे हें उघड आहे.

१८३. मराठींत प्रचारांत असलेलीं कांहीं तत्सम संस्कृत नामें धातूप्रमाणें उपयोगांत येतात. जसें:—उपदेश—उपदेशणें, अनुवाद—अनुवादणें, अंकुर—अंकुरणें, उत्तर—उत्तरणें, इ०. यांस वाटेल तर **नामधातु** असें म्हणावें. ह्यांचा उपयोग प्रौढ भाषेंतच होतो; आणि ते वेळेवरही ग्रंथकाराचे इच्छेनुरूप अस्तित्वांत येतात.

(अ) मराठी नामेंही याप्रमाणें कधीं कधीं धातु होतात. यांसही **नामधातु** म्हणावें. यांस वाटेल तर **मराठी नामधातु** आणि वरच्यांस **संस्कृत नामधातु** असें म्हटल्यानें दोहोंमधील फरक स्पष्ट होईल. परन्तु हा फरक विशेष महत्त्वाचा नाहीं; ह्यामुळें दोहोंसही सरसकट **नामधातु** म्हणण्यास हरकत नाहीं. मराठी नामधातूंचीं उदाहरणें:—उजेड—उजेडणें, फूल—फुलणें, फळ—फळणें, विटाळ—विटाळणें, इ०. ह्यांचा प्रचार मराठी भाषेंत बराच आहे. हेहीं बोलणाराचे व ग्रंथकाराचे लहरीप्रमाणें नवे बनूं शकतात. दिलेलीं उदाहरणें प्रचारांतील होत.

(आ) कांहीं विशेषणांचाही धातूंप्रमाणें उपयोग होतो. त्यांस **विशेषणधातु** म्हणावें. जसें:—लांब—लांबणें, आंखूड—आंखुडणें, गढूळ—गढूळणें, इ०.

१८४. **नामसाधित धातु** म्हणजे नामांपासून कांहीं प्रत्ययादि विकार होऊन साधलेले धातु; जसें:—शोभा—शोभणें, माणूस—माणसाळणें, विष—विषारणें, वीख—विखारणें, डोकें—डोकावणें, पाणी—पाणारणें, हात—हातळणें किंवा हाताळणें, दुःख—दुखणें व सुख—सुखावणें; इ०.

१८५. ह्यांशिवाय अन्य प्रकारच्या शब्दांपासूनही कांहीं कांहीं धातु तयार होतात. त्यांचीं उदाहरणें:—

**विशेषणसाधित धातु**:—एक—एकारणें, एकटणें; स्थिर—स्थिरावणें; वेडा—वेडावणें; रोड—रोडावणें; दीन—दीनावणें; इ०.

**क्रियाविशेषणसाधित धातु** (हे बहुतेक अनुकरणवाचक आहेत.):— झटकन— झटकणें, भरभर——भरभरणें, भरारणें; तरतर——तरतरणें, तरारणें; कडाड—कडाडणें; खदखद—खदखदणें; चकचक—चकचकणें; चकाकणें; इ०. अनुकरणवाचकेतर क्रियाविशेषणांपासूनही साधलेल्या धातूंचीं कांहीं उदाहरणें सांपडतात. पण तीं अनुकरणवाचकांपासून साधलेल्यांचे मानानें कमीच होत. जसें:—दूर—दुरावणें, मागें—मागसणें, खालीं—खालावणें, इ०.

टीपः——वरील तीन (१८३, १८४, १८५,) अंकांत सांगितलेल्या साधित धातूंचा विस्तारपूर्वक विचार व्युत्पत्तिप्रकरणांत येईल, येथें फक्त त्यांचें दिग्दर्शन केलें आहे. मात्र पुढील अंकांमध्यें धातूवरून साधणाऱ्या धातंचें म्हणजे धातु-साधित धातूंचें सविस्तर विवेचन सोईसाठीं येथेंच केलें आहे.

१८६. जेव्हां मूळ धातूचा कर्ता आपण होऊन धातुदर्शित क्रिया करीत नाहीं, तर दुसऱ्याचे प्रेरणेनें ती क्रिया करितो असा अर्थ त्या मूळ धातूच्या विकृत रूपावरून उत्पन्न होतो, तेव्हां त्या विकृत धातूस **प्रयोज्य** किंवा **प्रयोजक** किंवा **प्रयोजनाबोधक** धातु असें म्हणतात. जसें:—कृष्णानें भीमाकडून जरासंधास **मारविलें**. या उदाहरणांत 'मार' या मूळ धातूचा कर्ता म्हणजे मारणारा जो भीम तो आपण होऊन मारण्याची क्रिया न करितां कृष्णाचे प्रेरणेनें ती क्रिया करितो, असा 'मार' या धातूच्या 'मारव' या विकृत रूपापासून बोध होतो. म्हणून **मारव** हा **प्रयोजक** धातु होय. याचप्रमाणें:——करव, आणव, विझव, इ०.

१८७. मूळ धातूंपासून प्रयोजक धातु मुख्यतः दोन प्रकारें मराठींत साधतात. एक—**प्रत्यय लागून,** आणि दुसरा—मूळ धातूंतील स्वरांस **गुणवृद्धि होऊन.**

यासंबंधानें कृष्णशास्त्री चिपळूणकर आपल्या निबंधांत मार्मिकपणें लिहितातः—'हे प्रयोजकत्वार्थक साधित धातु संस्कृतांत **अय** (मूळचा इ०) प्रत्यय लागून होतात. जसें:——तरति——तारयति, चलति——चालयति, इ० त्या संस्कृत रूपांतील **य** चा **व** होऊन बालभाषेच्या-द्वारा मराठींतले प्रयोजकत्वार्थक साधित धातु झाले आहेत. भेद इतकाच दिसतो कीं, संस्कृत प्रयोजकत्वार्थक धातू होतांना पुढें **अय** होतो व पहिल्या स्वरास वृद्धि किंवा गुण होतो. म्हणजे पहिला स्वर अ, इ

किंवा उ असल्यास यथानुरूप त्यांच्या जागीं **आ**, **ए**, किंवा **ओ** हे स्वर होतात; जसें:—तरति (तरतो)—तारयति (तारतो) क्षिपति (फेकतों)—क्षेपयति (फेंकवितो), मुञ्चति (सोडतो)—मोचयति (सोडवितो), इ०. परंतु मराठी प्रयोजकत्वार्थक धातू होतात ते मूळ धातूस प्रत्यय लागून होतात किंवा त्यांच्या प्रथम स्वरास वृद्धि किंवा गुण होतात; दोन्हीं विकार एकदम होत नाहींत. या दोन प्रकारांत 'व' प्रत्यय लागून प्रयोजकत्वार्थक साधित धातु करण्याचा विशेष व्यापक आहे, व धातूच्या पहिल्या स्वरास वृद्धि किंवा गुण करून साधित धातू करण्याचा प्रकार कांहीं धातूंस मात्र आहे.

१८८. मूळ धातूस **अव** हा प्रत्यय लागून प्रयोजक धातू तयार होतात. ते येणेंप्रमाणें:—

**(अ)** अकारान्त धातूंस हा प्रत्यय लागतांनां पररूपसंधि होतो. जसें कर—करव, बस—बसव, निज—निजव, इ०.

**अपवाद १**—कांहीं अकारान्त धातूंस हा प्रत्यय लागतांनां नियमानुसार (अ + अ = आ, असा) संधि विकल्पानें होतो. जसें:—फितणें—फितवणें, फितावणें; निभणें—निभवणें, निभावणें; सरकणें—सरकवणें, सरकावणें; समजणें—समजवणें, समजावणें; इ०.

अपवाद २—अनुकरणवाचक धातूंस हा प्रत्यय लागतांनां केवळ नियमानुसारच (अ + अ = आ, असाच) संधि होतो; पररूप संधि मुळींच होत नाहीं. जसें:—गटगटणें—गटगटावणें, खुळखुळणें—खुळखुळावणें, फडफडणें—फडफडावणें, कडकडणें—कडकडावणें, इ०.

पररूपसंधि होऊन झालेल्या रूपांत ह्या **अव** प्रत्ययांतील आद्य स्वरास विकल्पेंकरून **ई** हा आदेश होतो. जसें:—करवणें, करीवणें; निजवणें, निजीवणें; फितवणें, फितीवणें; निभवणें, निभीवणें; इ०.

**(आ)** एकाक्षरी व हकारान्त धातूंस **अवव** असा प्रत्यय लागतो. अकारान्तेतर धातूंस हा प्रत्यय लागतांना पूर्वरूपसंधि होतो. जसें:—गाणें—गाववणें, खाणें—खाववणें, घेणें—घेववणें, लिहणें—लिहववणें, पाहणें—पाहववणें, इ०.

ह्या प्रत्ययांतील पहिल्या **व** च्या जागीं **वि** असाही आदेश विकल्पानें होतो; म्हणजे दोन दोन रूपें होतात. जसें:—गाणें—गाविवणें, गाववणें, खाणें—खाविवणें, खाववणें; लिहणें—लिहविवणें, लिहववणें; राहणें—राहविवणें, राहववणें; इ०.

**टीप**—हकारान्त धातूंस आजकाल **अवव** असा प्रत्यय लावण्याचे ऐवजीं **अव** हाच प्रत्यय लावण्याकडे अधिक प्रवृत्ति दिसते. म्हणजे हकारान्त धातूंचे प्रयोजक रूपांमध्यें दोन वकारांचे जागीं एकच वकार ठेवण्याकडे मराठी भाषेचा विशेष कल होत चालला आहे. जसें:—लिहववणें, पाहववणें, राहववणें इत्यादि रूपांचे जागीं लिहवणें, पाहवणें, राहवणें इत्यादि रूपांचाच प्रचार अधिक होत आहे. यामुळें लिहविवणें, पाहविवणें, राहविवणें, इं० जीं विकल्पानें होणारी रूपें त्यांचे जागीं लिहीवणें, पाहीवणें, राहीवणें, अशी रूपें येणें हेंहीं साहजिक आहे.

( इ ) कांहीं धातूंचीं प्रयोजक रूपें अनियमित आहेत. उदा०:—पिणें—पाजणें, भिणें—भेडावणें, किंवा भेवडावणें, लागणें—लावणें, देखणें—दाखविणें.

( ई ) कांहीं प्रयोजक धातू प्रचारांत आहेत; परन्तु त्या धातूंचे मूळ धातू भाषेंत मुळींच नाहींत किंवा त्याच अर्थानें भाषेंत दिसत नाहींत. जसें:—पाठविणें, बडविणें, भिरकावणें, कातवणें, कमावणें, सामावणें, इ० प्रयोजक रूपांमध्यें पाठणें, बडणें, भिरकणें, कातणें, कमणें, सामणें, इ० मूळ धातू असावे असें दिसतें. परन्तु हे कोठेंच आढळत नाहींत. ‘ठेवणें’ ह्याचा मूळ ‘ठे’ हा फक्त कवितेंत आढळतो. हरवणें, गमावणें, ह्यांचीं मुळें हरणें, गमणें, हीं भाषेंत आहेत. परन्तु मुळांचे आणि प्रयोजकांचे अर्थांत फरक आहे. **हरवणें, गमावणें**, ह्याचा अर्थ सांडणें किंवा **स्वतःस नकळत टाकणें** असा आहे; परन्तु ‘हरणें’ म्हणजे ‘पराजय पावणें, यशस्वी न होणें’ असा आहे. क्वचित् ‘हरणें’ याचा ‘नकळत पडणें किंवा जाणें’ असाही अर्थ होतो; ह्यामुळें हें उदाहरण सर्वथा योग्य नव्हे. तरी ‘गमणें’ याचा मात्र तसा अर्थ कधींच होत नाहीं; तर केवळ ‘हयगय किंवा दुर्लक्ष, किंवा आळस करणें’ असा आहे हें उघड आहे.

( उ ) कांहीं धातु दिसण्यांत प्रयोजकाप्रमाणें दिसतात, परन्तु ते अर्थदृष्ट्या प्रयोजक नाहींत. उदा०:—खुणावणें, रागावणें, वेडावणें, इ०. हे धातू खूण, राग, वेडा, या शब्दांस प्रयोजक प्रत्ययासारखाच **अव** प्रत्यय लागून साधले आहेत हें खरें; तथापि ते प्रयोजक नव्हत हें उघड आहे.

( ऊ ) कांहीं धातूंस दिसण्यामध्यें प्रयोजक रूप असतें; परन्तु मूळ साधित हीं दोन्ही रूपें एकाच मूळ अर्थानें उपयोगांत असतात. अर्थात् त्यांचें प्रयोजक रूप हा एक केवळ आभास होय. उदा०: – माणें-मावणें, साकणें–सोकावणें किंवा सवकणें, सोंपणें–सोंपविणें ( स्वाधीन करणें ) इ०. जसें:—ह्या भांडयांत शेरभर दूध मातें किंवा मावतें; त्यांची व्यवस्था त्यांच्याच हातांत **सोंपणें** हें आपलें कर्तव्य होय, असें तत्कालीन राज्यकर्ते समजत,' ( सरदेसाई–ब्रिटिश रियासत, पूर्वार्ध–पृष्ठ ७४ ) या ठिकाणीं **सोंपविणें** असेंही म्हणतां येतें.

**टीप**:—निजिवणें, जागिवणें, बसविणें, उडिवणें, उठिवणें, इ० अनेक धातू दिसण्यांत केवळ प्रयोजक आहेत; परंतु ते वास्तविक मूळ (active) होत असें खेर म्हणतात ( p. 160 note ) कां तें त्यांचे त्यांसच माहीत. परंतु निजणें, जागणें, बसणें, उडणें, उठणें, इ० मूळ धातूंचीं वरील रूपें हीं वास्तविक प्रयोजक होत यांत संशय नाहीं.

१८९. प्रयोजक धातू साधण्याचा **दुसरा** प्रकार असा कीं, मूळ धातूंचे आद्याक्षरांतील **अ**कारास वृद्धि व ऱ्हस्व **इ**कारास व **उ**कारास **गुण** होतो; आणि दुसऱ्या अक्षरांतील **ट**काराचे जागीं **ड**कार होतो, आणि **प**कार व **त**कार ह्यांचे जागीं **व**कार होतो. ह्या नियमानुसार, कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात त्याप्रमाणें, सर्वच धातूंपासून प्रयोजक धातू साधतात असें नाहीं; तर केवळ कांहीं धातूंपासूनच साधतात. पहिला प्रकार या प्रकाराचे मानानें अधिक व्यापक आहे. या दुसऱ्या प्रकारचीं उदाहरणें:—

| | | |
|---|---|---|
| गळणें—गाळणें | गडणें—गाडणें | जुटणें—जोडणें |
| वळणें—वाळणें | तरणें—तारणें | तुटणें—तोडणें |
| टळणें—टाळणें | फाटणें—फाडणें | जुडणें—जोडणें |
| मरणें—मारणें | फिटणें—फेडणें | गुंतणें—गोंवणें |
| पडणें—पाडणें | फिरणें—फेरणें | गुतणें—गोवणें |
| दबणें—दाबणें | सुटणें—सोडणें | खुपणें—खोवणें |
| चरणें—चारणें | फुटणें—फोडणें | रुपणें—रोवणें |
| इ० | इ० | इ० |

( अ ) कांहीं धातू दुसऱ्यांपासून या नियमाप्रमाणें बनलेले प्रयोजक धातु होत, असा त्यांच्या स्वरूपावरून भास होण्याचा संभव आहे. परन्तु

दोहोंमध्यें अर्थाअर्थी कांहींएक संबंध नाहीं; तर ते दोन केवळ भिन्न भिन्न स्वतंत्र मूळ धातूच असतात. उ:---कढणें, काढणें, पिटणें, पेटणें, लुटणें, लोटणें, इ०.

१९०. या दोन्ही प्रकारच्या ( १८८, १८९ या अंकांत सांगितलेल्या ) प्रयोजक धातूंपासून पुन्हा नवीन प्रयोजक धातूही साधतात म्हणजे दुहेरी प्रयोजक धातूही अस्तित्वांत आहेत. उदा०:---करविवणें, मारवणें, पाडवणें, फेडवणें, सोडवणें, इ०. परन्तु पहिल्या प्रकारच्या प्रयोजकांपेक्षां दुसऱ्या ( १८९ ) प्रकारच्याच प्रयोजकांपासून झालेले दुहेरी प्रयोजक धातू अधिक प्रचारांत आहेत.

१९१. कांहीं स्थळीं मूळ धातु आणि तदनरूप अर्थाचे प्रयोजक धातु हे स्वरूपत: अगदीं भिन्न भिन्न असतात. म्हणजे स्वरूपत: ते अगदीं निरानिराळे दिसतात; एक दुसऱ्याचा प्रयोजक होय, असा त्यांच्या रूपांवरून संशय सुद्धां यावयाचा नाहीं. परन्तु अर्थदृष्ट्या एक दुसऱ्याचा वास्तविक प्रयोजकच असतो. उदाहरण:--

येणें---आणणें; जाणें--नेणें, पाठविणें, धाडणें; इत्यादि.

१९२. सर्व प्रयोजक धातू सकर्मक आहेत. आणि त्यांस व्यंजनादि आख्यात प्रत्यय लागतांना मूळ सकर्मक धातूंप्रमाणें त्यांचीं दोन दोन रूपें होतात; म्हणजे धातूचे अन्त्य स्वरास विकल्पानें इ असा आदेश होतो. जसें:--

करव--करवतो, करवितो; करवलें, करविलें.
करीव---करिवतो, करिवितो; करीवलें, करिविलें.
इ०. इ०.

**टीप**---या चार चार रूपांपैकीं कोणतें रूप ग्राह्य होय हा प्रश्न उपस्थित करून आणि त्याचा बराच सविस्तर ऊहापोह करून अखेरीस करवितो, करविलें, इ० म्हणजे फक्त उपान्त्य अक्षरांतील इकारानें युक्त रूपच ग्राह्य होय असा दादोबांनीं आपला अभिप्राय दिला आहे. परंतु या ग्रंथांत अनेक ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें भाषेंतील कोणत्याही रूपांवर हा ग्राह्याग्राह्यतेचा छाप मारण्याचा अधिकार वैयाकरणास नाहीं. त्यानें सर्व रूपांचा संग्रह करून फार तर इतकें सांगावें कीं, अमुक रूपाचा प्रचार शिष्ट भाषेंत कमी किंवा जास्त आहे. त्यापलीकडे त्यास जातां येत नाहीं. या वैयाकरणाचे कर्तव्याप्रमाणें आम्ही इतकेंच

म्हणतों कीं, वरील चार रूपांपैकीं एका इकारानें युक्त अशीं जीं दोन रूपें आहेत तीं इतर दोन रूपांपेक्षां अधिक प्रचारांत आहेत. उदाहरणार्थ, **करवितो** आणि **करीवतो** हीं रूपें 'करवतो' व 'करिवितो' या रूपांपेक्षां शिष्ट भाषेंत अधिक प्रचारांत आहेत. अर्थात् दोन इकारयुक्त रूप—करिवितो, आणि इकाररहितरूप—करवतो, हीं प्रयोजक रूपें प्रचलित शिष्ट भाषेंत फारच क्वचित् आढळतात. 'करवतो' हें इकाररहित रूप किंवा दोन अकारांनीं युक्त रूप कर धातूच्या शक्य क्रियापदाशीं समान असल्यामुळें तें प्रयोजकत्वाचे अर्थानें मागें पडत आहे हें चांगलेंच आहे. आणि 'करिवितो' हें रूप उच्चारास त्रासदायक असल्यामुळें तेंही मागें पडत आहे हें योग्यच होत आहे. आणि भाषेची ही प्रवृत्ति अशीच कायम राहिली, तर तीं कांहीं वर्षांनीं शिष्ट भाषेंतून सर्वस्वी अन्तर्धान पावतील असें म्हणण्यास हरकत नाहीं. असो. एक इकारयुक्त दोन रूपांपैकीं उपान्त्याक्षरांतील इकारानें युक्त जें **करवितो** किंवा **करविलें हें रूप**, त्याचा ग्रंथांत आणि कोंकणस्थभाषेंत फार प्रचार आहे, व दुसऱ्या अक्षरांतील इकारानें युक्त जें करीवतो, करीवलें, हें रूप, त्याचा देशस्थभाषेंत फार प्रचार आहे. अर्थात करवितो व करीवतो या दोन रूपांपैकीं **करवितो** ह्याचाच लेखी भाषेंत विशेष प्रचार असल्यामुळें तेंच अधिक शिष्टसंमत होय असें दिसतें.

१९३. प्रयोजक धातूंच्या दोन रूपांपासून व्यंजनादि आख्यात प्रत्यय लागून चार रूपें कशीं तयार होतात व त्यांपैकीं कोणतीं दोन अधिक प्रचारांत आहेत आणि त्यांतही कोणतें एक रूप लेखनामध्यें विशेष प्रचलित आहे, हें गेल्या अंकांत सांगितलें. आतां स्वरादि आख्यात प्रत्ययांपूर्वी त्यांची स्थिति कशी होते ती पहा. स्वरादि आख्यात प्रत्यय लागून प्रयोजक धातूच्या दोन रूपांपासून प्रायः एकच रूप तयार होतें. 'करव' आणि 'करीव' हीं कर धातूचीं दोन प्रयोजक रूपें होत. त्यांस स्वरादि आख्यात प्रत्यय लावूं:—

करव + ऊं = करवूं; करीव + ऊं = करवूं.
करव + आ = करवा; करीव + आ = करवा.
करव + आवें = करवावें; करीव + आवें = करवावें.
करव + काल = करवाल; करीव + आल = करवाल. इ०.

असें होण्याचें कारण समजण्यासाठीं वचनाध्यायाचे अखेरीस उपान्त्याचे विकारासंबंधानें जे नियम आहेत ते पहावे. त्यांपैकीं ४ था नियम विशेषेंकरून असा आहे कीं, अर्धोच्चारित अकारान्त त्र्यक्षरी

शब्दांतील उपान्त्य दीर्घ **ई** व **ऊ** ह्यांचे पुढें विकरणामध्यें दीर्घ अक्षर आलें, तर हे **ई** व **ऊ** ऱ्हस्व होतात किंवा त्यांचे जागीं **अ** हा आदेश होतो. ( विशेष खुलाशासाठीं नियम पहावा. ) या नियमाप्रमाणें 'करीव' ह्यांतील उपान्त्य दीर्घ **ई**चे जागीं **अ** हा आदेश होऊन करवूं, करवावें, **करवा**, करवाल अशीं रूपें सिद्ध होतात. या ठिकाणीं उपान्त्य **ई** ऱ्हस्व करण्याचा कोठेंच प्रसंग नाहीं; म्हणून 'करव' आणि 'करीव' या **दोन** अंगांपासून एकच रूप तयार होतें.

( **अ** ) उपान्त्य **ई** व **ऊ** ह्यांचे पुढें दीर्घ अक्षर आलें असतां, ते स्वर ऱ्हस्व होण्याचा किंवा त्यांचे जागीं **अ** हा आदेश होण्याचा हा नियम त्र्यक्षरी प्रयोजक धातूंतील उपान्त्य **आ** संबंधानेंही लागू पडतो. जसें:—फित, निभ, ह्यांपासून फितव, फिताव; निभव, निभाव; अशीं उपान्त्य **आ**नें युक्त वैकल्पिक रूपें होतात असें वर (अंक १८८ अ—अपवाद १) सांगितलें आहे; त्यांसही स्वरादि आख्यात प्रत्यय लागून एकच रूप बनतें.

फितव + आवें = फितवावें; फिताव + आवें = फितवावें.

निभव + आल = निभवाल; निभाव + आल = निभवाल. इ०.

१९४. जेव्हां मूळ धातु अकर्मक असतो, तेव्हां त्याचा कर्ता तदुत्पन्न प्रयोजक धातूचें चतुर्थ्यन्त कर्म होतो; आणि ज्या कोणापासून त्याला प्रेरणा प्राप्त झाली असते, तो त्या प्रयोजक धातूचा कर्ता असतो. उदाहरण:—**मी** बसलों, त्यानें **मला** बसविलें; **मी** राहतों, तो **मला** राहवितो; इत्यादि.

१९५. जेव्हां मूळ धातु सकर्मक असतो, तेव्हां तदुत्पन्न प्रयोजक धातूच्या उपयोगाचे वेळीं मूळ धातूच्या कर्त्यापुढें 'कडून', 'करवीं' किंवा 'हातून' ह्यांपैकीं एक शब्द येतो. जसें:—**मी** तें काम करितों, तो **मजकडून**, किंवा **मजकरवीं**, किंवा **माझ्या हातून** तें काम करवितो; **नळानें** रामेश्वरचा सेतु बांधिला, रामानें **नळाकडून** किंवा **नळाकरवीं**, किंवा **नळाच्या हातून** सेतु बांधविला; इत्यादि.

१९६. जेव्हां मूळ अकर्मक धातूचा दुहेरी प्रयोजक धातु उपयोगांत येतो, तेव्हां मूळ सकर्मक धातूच्या ( अंक १९५ प्रमाणें ) प्रयोजकाप्रमाणें

पहिल्या प्रयोजक धातूच्या वाक्यापासून दुहेरी प्रयोजक धातूचें वाक्य बनतें. जसें:—

( १ ) मूळ—मी पडलों. प्रथम प्रयोजक—**रामानें** मला पाडिलें.
द्वितीय प्रयो०—गोविंदानें **रामाकडून** मला पाडविलें.

( २ ) मूळ—मूल निजतें. प्रथम प्रयो०—**दाई** मुलाला निजविते.
द्वितीय प्रयो०—आई **दाईकडून** मुलास निजविवते.

१९७. जेव्हां मूळ धातु सकर्मक असतो, तेव्हां त्याच्या दुहेरी प्रयोजक धातूच्या उपयोगाचे वेळीं मूळ धातुचा कर्ता आणि प्रथम प्रयोजकाचा कर्ता ह्या दोहोंच्या पुढें 'कडून' इ०. शब्द येतात; मात्र दोहोंच्या पुढें एकच शब्द येत नाहीं, तर निरनिराळे येतात. जसें:—

( १ ) मूळ—मी तें काम करितों. प्रथम प्रयोजक—रामा मजकडून तें काम करवितो. द्वितीय प्रयोजक—गोविंदा रामाकडून माझ्याहातून तें काम करविवतो.

( २ ) मूळ—नळानें रामेश्वरचा सेतु बांधिला.

प्रथम प्रयोजक—मारुतीनें नळाकडून रामेश्वरचा सेतु बांधविला.
द्वि० प्रयो०—रामानें मारुतीकडून नळाच्या हातें रामेश्वरचा सेतु बांधविवला.

**टीप १**—निजविवते, करविवते, बांधविवला इ० दुहेरी प्रयोजक क्रियापदांत दोन दोन विकार येत असल्यामुळें त्यांचे जागीं कधीं कधीं एकेरी प्रयोजक म्हणजे एकाच वकारानें युक्त प्रयोजक क्रियापद जोजण्याचाही प्रघात आहे. जसें:—'गोविंदा रामाकडून माझ्या हातून तें काम करविवतो' ह्याचे जागीं नुसतें 'करवितो' आणि 'बांधविवला' ह्याचे जागीं नुसतें 'बांधविला' असेंही कधीं कधीं म्हणतात. असें एकेरी प्रयोजक क्रियापद झालें तरी दुहेरी प्रयोजकत्वाचा बोध वाक्यांतील तीन कर्त्यांच्या क्रमवार उल्लेखानें सहज होत असल्यामुळें अर्थास कोणत्याही प्रकारें बाध येत नाहीं.

परंतु पड–पाड–पाडव अशासारख्या द्वितीय प्रकारच्या प्रयोजकाचे द्वारें होणाऱ्या दुहेरी प्रयोजकांत एकच वकार असल्यामुळें तो एकच वकार मात्र कधींच गळत नाहीं.

**टीप २**—एकंदरींत दुहेरी प्रयोजक–रचनेचा प्रकार कोणत्याही भाषेंत फार कमी आढळणें साहजिक आहे; यांत संशय नाहीं

[ येथें या प्रकरणांतील विषय संपला. आतां अखेरीस धातूंच्या वर्गीकरणासंबंधानें कांहीं महत्त्वाच्या गोष्टी सांगून हा धातुवर्गीकरणाध्याय संपवितों. धातूंचें दोन दृष्टीनें वर्गीकरण केलें आहे. एक अर्थावरून आणि दुसरें व्युत्पत्तीवरून. अर्थावरून तीन प्रकार होतातः सकर्मक, अकर्मक, आणि अकर्तृक. या तिसऱ्या--अकर्तृक--प्रकारास दादोबा भावकर्तृक असें म्हणतात. शास्त्रीयदृष्टीनें पाहिलें म्हणजे हें वर्गीकरण पुढें दिल्याप्रमाणें झालें पाहिजे.




यावरून दिसून येईल कीं, धातूंचे प्रथम सकर्तृक आणि अकर्तृक असे दोन मुख्य भेद करून, त्यांपैकीं एका--सकर्तृक ह्या--भेदाचे सकर्मक आणि अकर्मक असे दोन उपभेद करितात. अकर्तृक धातूं मध्यें असे उपभेद नाहींत, ते सर्वच अकर्मक आहेत. असे धातूंचे तीन भेद होतात. ते मुख्यतः कर्त्याचे संबंधानें होतात. ज्या धातूंस कर्मासह कर्ता असतो ते **सकर्मक**; ज्या धातूंस कर्माशिवाय कर्ता असतो ते **अकर्मक**; आणि ज्यांस मुळीं कर्ताच नसतो, ते अकर्तृक. हे तिसरे अर्थात अकर्मकही असतात. उभयविध धातूंसंबंधानें विवेचन वर आलेंच आहे. तें सकर्मक असतील तेव्हां त्यांस सकर्मक म्हणावें, आणि अकर्मक असतील तेव्हां त्यांस अकर्मक म्हणावे. न्यायशास्त्राचे दृष्टीनें पाहिलें म्हणजे कोणताही उभयविध धातु हा एक धातु नसून समान वेषधारी दोन धातू होत. म्हणजे अर्थाचे दृष्टीनें ते वास्तविक दोन असून स्वरूपतः म्हणजे दिसण्यांत--उच्चारामध्यें व लिपिमध्यें--फक्त ते एक होत असा आभास होतो इतकेंच; बाकी ते दोन होत. तेव्हां ते निरनिराळ्या दोन उपभेदांत जाण्यास न्यायशास्त्राची हरकत नाहीं.

धातूंचें दुसरें वर्गीकरण व्युत्पत्तीवरून केलें आहे. येथें धातूंची व्युत्पत्ति भाषेंतल्या भाषेंतलीच पाहण्यांत येते. अन्य भाषांतील त्यांच्या उगमाकडे येथें लक्ष देण्यांत येत नाहीं. तर प्रकृत स्थळीं फक्त मराठी भाषेच्याच मर्यादित दृष्टीनें त्यांची व्युत्पत्ति पाहतात. या दृष्टीनें **अव्युत्पन्न** किंवा **सिद्ध** आणि **व्युत्पन्न** किंवा **साधित** असे दोन मुख्य भेद करितात. आणि व्युत्पन्न किंवा साधित धातूंचे नामधातु, नामसाधितधातु, विशेषणधातु विशेषणसाधितधातु, धातुसाधितधातु आणि क्रियाविशेषणसाधितधातु, हे उपभेद होत. साधित धातूंचें पद्धतशीर व खुलासेवार व

असें आहे. येथपर्यंत या वर्गीकरणामध्यें कांहीं मतभेद होण्याचा संभव नाहीं. परंतु धातुसाधितधातु हा जो साधित धातूंचा एक पोटभेद सांगितला, त्यासंबंधानें मात्र थोडासा पण महत्त्वाचा मतभेद उत्पन्न होण्याचा बराच संभव आहे. म्हणून या वर्गाचें जरा सविस्तरच विवेचन करणें अवश्य आहे.

दादोबांनीं आम्ही सांगितलेल्या साधित धातूंच्या सर्व प्रकारांचीं उदाहरणें दिलीं आहेत. परंतु त्यांनीं स्पष्टपणें आम्ही सांगितलेले उपभेद सांगितले नाहींत. त्यांच्या साधित धातूंचे उदाहरणांत विझिवणें, भिवडावणें, देविवणें हीं प्रयोजक धातूंचीं उदाहरणें आलीं आहेत, (क० ३८१). तथापि नंतर त्यांनीं क्रियापदांचे शक्य, प्रयोजक, गौण अथवा सिद्ध, असे रूपावरून तीन भेद केले आहेत. यावरून एक दोन प्रश्न उपस्थित होतात, ते असेः—दादोबांनीं वर जीं तीन प्रयोजक धातूंचीं उदाहरणें साधित धातूंच्या उदाहरणांत दिलीं आहेत, त्यांचा अर्थ काय ? प्रयोजक क्रियापदांमध्यें धातु कोणता ? करतो, करवितो, करवतो हीं तीन मूळरूप, प्रयोजक आणि शक्य क्रियापदांचीं उदाहरणें आहेत. 'करतो' ह्यांत 'कर' धातु आहे; आणि तो अव्युत्पन्न म्हणजे सिद्ध आहे, याबद्दल मतभेद नाहीं. 'करवितो' आाण 'करवतो' ह्यांमध्यें धातु कोणता मानावा ? हा प्रश्न महत्त्वाचा आहे. दादोक्त व्याकरणांतील क्रियापदांचे एकंदर विवेचनास अनुसरून जर ह्या प्रश्नाचें उत्तर द्यावयाचें, तर दादोबाचे मतें 'करवितो' व 'करवतो' यांत 'कर' हाच धातु असून प्रयोजक व शक्य या दोन भेदांस अनुसरून त्या 'कर' धातूचें रूप बदलतें. म्हणजे पुरुष, काळ, अर्थ, लिंग, वचन हीं जशीं धातूचें रूप पालटविणारीं कारणें आहेत, त्याचप्रमाणें 'भेद' हें धातूचें रूप पालटविणारें आणखी एक कारण होय. कृष्णशास्त्री चिपळूणकरानींही दादोबांच्या मताबद्दल असेंच लिहिलें आहे. 'पुरुष, काळ, वचन, अर्थ व लिंग ह्यांखेरीज आणखी दोन कारणें क्रियापदांचे रूपांत बदल करणारीं दादोक्त व्याकरणांत मानिलीं आहेत. त्यांत एकास रूप व दुसऱ्यास भेद अशीं पारिभाषिक नांवें दिलीं आहेत.' (निबंध० पृष्ट ११८). यावरून दादोबांचें मतें 'करवितो' व करवतो' या दोन्ही क्रियापदांत 'कर' हाच धातु असून भेदानुसार कर धातुंचीं रूपें पालटलीं आहेत. हें जर खरें, तर साधित धातूंचे उदाहरणांत जीं त्यांनीं विझिवणें, भिवडावणें व देविवणें हीं तीन उदारणें दिला आहेत, तीं त्यांच्याच मताप्रमाणें अयोग्य होत, हें निर्विवाद आहे. म्हणजे दादोबांचे मतें विझिव, भिवडाव,, देविव, हे मुळीं धातूच नव्हत; तर विझ, भी, दे, हें धातु होत; व मूळरूप-भेद, प्रयोजक-भेद, आणि शक्य-भेद या भेदांस अनुसरून त्या धातूंचीं रूपें पालटतात. या दादोबांच्या मतावरील कृष्णशास्त्री चिपळूणकर ह्यांचा अभिप्राय पहा.

'आतां तीन प्रकारचा भेद म्हणून जो विशेष दादोबांनीं सांगितला आहे, त्यांचेंही प्रयोजन दिसत नाहीं. प्रातिपादिकांस ज्याप्रमाणें नवीन प्रत्यय लागून प्रातिपादिकें होतात, त्याप्रमाणें धातूंस व नामांस प्रत्यय लागून नवीन धातू होतात. परंतु प्रातिपादिकांस विभक्ति लागण्याचे विचारांत प्रातिपादिकें स्वतंत्र आहेत किंवा साधित आहेत या भेदाचा जसा उपयोग नाहीं, तसा धातूंस आख्यात प्रत्यय लागण्याचे विचारांत म्हणजे क्रियापदाचे साधनिकेच्या विचारांत, धातु स्वतंत्र आहेत किंवा साधित आहेत या विचारांचे प्रयोजन नाहीं. कारण धातु सिद्ध असेल किंवा साधित असेल, तरी त्यांपासून होणाऱ्या क्रियापदांचे रूपांत कांहीं तफावत होत नाहीं. तसेंच प्रयोजकत्वार्थ व शक्यत्वार्थ धातूंप्रमाणें नामापासून निघणाऱ्या, माणसाळणें, डोकावणें, घाबरणें, इत्यादि धातूंचाही एक प्रकार दादोक्त व्याकरणांत भेदप्रकारांत गणिला पाहिजे होता, परंतु वास्तविक पाहतां धातूच्या या प्रकारांच्या योगानें क्रियापदांचे रूपांत कांहीं एक विशेष कार्य होत नसल्यामुळें काळ, वचन, पुरुष, वगैरे क्रियापदरूपभेदक कारणांत त्या प्रकारची आम्हीं गणना केली नाहीं.' ( निबंध, पृष्ठ ११९ ).

कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे विरुद्ध खेर यांनी दादोबांची तरफदारी करून कृष्णशास्त्र्यांचे आक्षेपांस उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या म्हणण्याचा सारांश असा कीं, (Kher's. Gram. Introduction Pages LVI-LVII) 'वरील आक्षेपांत कांहीं अर्थ नाहीं. व्याकरण करण्यामध्यें आपण केवळ विकरणाकडेसच लक्ष देत नाहीं. नामाचें व्याकरण करितांना तें नाम सामासिक असल्यास आपण तसा निर्देश करितों. मूळरूपभेदीं, प्रयोजकभेदीं, व शक्यभेदीं क्रियापदांचे विकरणामध्यें फरक नसेल; तथापि मूळरूपाप्रमाणें अन्य भेदांत चालणारें अंग निराळें आहे, ह्यामुळें तें वेगळें सांगितलें पाहिजे. माणसाळणें, फुलणें, इ० नामांपासून व इतर शब्दांपासून साधलेल्या धातूंचा आणखी एक भेद मानण्याची जरूर नाहीं. कारण कीं, **क्रियापदांचे व्युत्पत्तीशीं** भेदाचा संबंध नाहीं; तर **क्रियापदांच्या रूपांचे व्युत्पत्तीशीं** भेदाचा संबंध आहे. **धातूची व्युत्पत्ति कांहीं असो.** व्याकरण करितांना तिच्याशीं आपणास कांहीं एक कर्तव्य नाहीं. परंतु व्याकरण करितांना शब्द जशाच्या तसाच घेऊन त्यास नवीन अंग प्राप्त होतें कीं काय, हें पाहिलें पाहिजे. प्रयोजक व शक्य रूपांमध्यें क्रियापदांस नवीन अंग प्राप्त होत असल्यामुळें माणसाळणें, फुलणें, इत्यादिकांचा आणखी एक नवीन भेद मानण्याची जरूर नाहीं. शिवाय क्रियापदांच्या व्युत्पत्तीकडे जर लक्ष दिलें तर नामादि इतर शब्दजातींसंबंधानेंही व्युत्पत्तीकडे कां लक्ष देऊं नये? परंतु **शब्दांचें व्याकरण करितांना शब्द जशाचे तसेच घ्यावयाचे असल्यामुळें त्यांच्या व्युत्पत्तीविषयीं विचार करण्याची आपणास गरज नसते,** आणि आपणास इतकेंच ठावावयाचें असतें कीं, विकरणामध्यें त्यांचें मूळ रूपच कायम राहतें, कीं त्यांस

नवीन अंग प्राप्त होतें. ह्यामुळें तीन प्रकारच्या भेदांची व्यवस्था दुरुस्त व अवश्य आहे." हा खेरांचे म्हणण्याचा इत्यर्थ आहे.

दादोबांचे पक्षास उचलून धरण्याचा हा खेरांचा प्रयत्न सर्वस्वी अस्थानीं असून त्यांनीं कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या एकाही अक्षेपाचें समाधानकारक खंडन केलेलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर त्यांनीं ते अक्षेप नीट समजून घेतले आहेत असेंही दिसत नाहीं, किंवा त्या आक्षेपांस उत्तर देतांना आपण काय लिहीतो आहों, ह्याचाही पूर्ण विचार केला होता असें वाटत नाहीं. एरवीं त्यांच्या लेखणींतून प्रतिपक्षासच अनुकूल अशी भाषा निघाली नसती. असो. खेरांच्या म्हणण्याचें स्वतंत्र सविस्तर परीक्षण करण्याची जरूर नाहीं. त्यांचे मुख्य म्हणणें इतकेंच कीं 'करवितो' हें क्रियापद 'कर' धातूपासून तयार होतांना जर त्यास 'करव' हें नवीन अंग प्राप्त होत आहे, तर तें सांगावयास नको काय? 'कर' हें मूळ अंग प्राप्त होत आहे तर ते सांगावयास नको काय? 'कर' हें मूळ अंग व 'करव' हें नवीन अंग ह्या दोहोंचें विकरण सारखेंच, म्हणजे त्यांस आख्यातप्रत्यय एकाच प्रकारें लागतात, हें खरें; तथापि मूळ अंगांत झालेला फरक सांगितल्याशिवाय, म्हणजे नवीन अंगाचे कारण सांगितल्याशिवाय, म्हणजेच भेदव्यवस्था मानल्याशिवाय, क्रियापदाचें रूप स्पष्ट होणार नाहीं. ह्यापेक्षां त्यांच्या म्हणण्यांत आणखी कांहीं विशेष मुद्दा आहे असें दिसत नाहीं. परंतु या म्हणण्यांत थोडासा गैरसमज दिसतो. 'करवितो' ह्याचें व्याकरण करितांना 'कर' या सकर्मक धातूचें इ० असें दादोबा म्हणतात; आणि तसेंच म्हणावयाचें असें म्हटलें पाहिजे असें खेर हें गृहीत धरून चालतात. तसें गृहीत धरिलें म्हणजे 'कर' यास प्रयोजकत्वार्थी नवीन अंग प्राप्त होतें, त्याचा निर्देश केल्यावांचून म्हणजे प्रयोजक भेद मानिल्यावांचून 'करवितो' या पदाची साधनिका पुरी होणार नाही हें खेरांचें म्हणणें निर्विवाद सत्य आहे. परंतु तें ज्या गृहीत गोष्टीवर उभारिलेलें आहे, ती गोष्ट तशीच कां स्वीकारिली पाहिजे ह्याचा खेरांनीं कोठेंच खुलासा केला नाहीं. एवंच, ही गृहीत गोष्ट स्वीकारिलीच पाहिजे, असें जोंपर्यंत खेरांनीं किंवा तत्पक्षीयांनीं सिद्ध केलें नाहीं, तोंपर्यंत त्यांचें म्हणणें केवळ निराधार होय. 'करवितो' या क्रियापदाचें व्याकरण करितांना 'कर या सकर्मक धातूचें इ०' असें मूळ न घालितां 'करव या सकर्मक धातूचें' किंवा फार तर 'करव या साधित सकर्मक धातूचें' असा आरंभ केला म्हणजे 'करवितो' या रूपाची साधनिका दादोबा-खेरांचे भेदाशिवाय पूर्ण होणार नाहीं काय? म्हणजे 'कर' ह्याचें नवीन अंग सांगण्यासाठीं भेदाचा उल्लेख जरूर आहे असें जें खेर यांनीं मोठ्या जोरानें वारंवार म्हटलें आहे, तें खरें आहे. परंतु हें नवीन अंग म्हणजेच 'कर' यापासून साधलेला साधित धातु 'करव' होय. तेव्हां व्युत्पत्तिदृष्ट्या 'करव' ह्याचें जें मूळ 'कर' त्या मुळापर्यंत व्याकरण करितांना जाण्याची आम्हांस कांहीं जरूर

नाहीं; भेद मानणाऱ्या दादोबांसच ती मजल मारणें जरूर पडतें. खेर म्हणतात कीं शब्दांचें व्याकरण करितांना शब्द जशाचे तसेच घ्यावयाचे असल्यामुळें त्यांच्या व्युत्पत्तीविषयीं विचार करण्याची आपणास गरज नसतें. हें त्यांचें म्हणणें खरें आहे. आतां 'करवितो' या शब्दाचें व्याकरण करितांना 'जशाचा तसा' हा शब्द कोण घेतो ? 'कर ह्या सकर्मक धातूचें' असें म्हणणारे दादोबा-खेर ? कीं 'करव या सकर्मक धातूचें' असें म्हणणारे कृष्णशास्त्री चिपळूणकर ? तसेंच **कर** येथून आरंभ केल्यामुळें करव या नवीन अंगाचे स्पष्टीकरणासाठीं भेद सांगणाऱ्या व्युत्पत्तिविषयीं विचार करण्याची गरज पडते कीं **करव** येथून आरंभ करून 'करव' हें 'कर' पासून कसें झालें, हें सांगण्यांची जो मुळीं भानगडच ठेवित नाहीं, म्हणजे भेदाची ज्यास आवश्यकता नाहीं, त्यास व्युत्पत्तीविषयीं विचार करण्याची जरूर पडते ? या प्रश्नांचीं उत्तरें आमच्या मताप्रमाणेंच वाचकांनीं आपल्या मनाशीं दिलीं म्हणजे त्यांचें त्यांसच कळून चुकेल कीं, खेरांची इमारत वाळूच्या भुसभुशींत पायावर उभारिलेली असल्यामुळें ती क्षणभरही टिकाव धरूं शकत नाहीं.

एवढ्यावरून या बाबतींत आम्ही दादोबा-खेरांचे सर्वस्वी कडवे प्रतिपक्षी व कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे कट्टे अनुयायी आहों असें समजल्यास तें अगदींच गैर होणार नाहीं. परंतु या अध्यायांत आलेल्या विषयाचें ज्यास स्मरण असेल तो तरी असें एकाएकीं समजणार नाहीं. आम्ही कोणत्याच पक्षाचे अभिमानानें अंध झालेले नाहीं. तसें असतें तर खेरांनीं ज्याप्रमाणें दादोबांचें मत स्वीकारून शास्त्रीबोवांचें मंडन करण्याचा प्रयत्न केला आहे आणि जोशांनीं ज्याप्रमाणें कृष्णशास्त्र्यांचें अनुयायित्व विशेष विचार करण्याचा प्रयत्नही न करितां, एकदम पतकरिलें आहे, त्याप्रमाणें दादोबाविरुद्ध-कृष्णशास्त्री यांपैकीं कोणत्या तरी पक्षास आम्हांसही निमुटपणें मिळतां आलें असतें; आणि मग इतकी काथ्याकूट करण्याचे भानगडींत आम्ही व्यर्थ पडलों नसतों. परंतु पक्षाभिमानापेक्षां सत्याभिमानाची चाड अधिक श्रेयस्कर असल्यामुळें सत्यान्वेषणाचे कामीं यथाशक्ति प्रयत्न करण्याचे इच्छेनें प्रेरित होऊन आम्ही दोन्ही बाजूंचा निरभिमानपणें विचार करून ह्या अडचणींतून कांहीं मार्ग निघतो कीं काय, हें पाहण्यास उत्सुक झालों आहों, हें पुढील विवेचनावरून वाचकांचे नजरेस येईल.

प्रयोजकत्वार्थक व शक्यत्वार्थक धातूंस दादोबा हे साधित धातु न समजतां ते धातू मूळ धातूंचींच प्रयोजक व शक्य भेद यांस अनुसरून झालेलीं विकृत रूपें होत असें म्हणतात. आणि जसें प्रयोजकभेदीं सर्व प्रयोग सकर्मक होतात; तसे त्यांच्या मतें शक्यभेदी सर्व प्रयोग अकर्मक कर्तरि किंवा भावकर्तरि होतात. जसें:— 'त्याला काम करवतें' या ठिकाणीं 'करवतें' या क्रियापदांत जरी 'कर' हा अकर्मक धातु आहे असें ते मानितात, तरी त्याच्या शक्यभेदीं 'काम' हा कर्ता

आणि 'करवतें' हें क्रियापद अकर्मक कर्तरी प्रयोग असें त्याचें मत आहे. त्याचप्रमाणें 'त्याला जाववतें' या ठिकाणीं 'जाववतें' यांतील 'जा' धातूला कर्ता नसल्यामुळें हा भावकर्तरि प्रयोग होय असा त्यांचा आशय आहे. याच्या विरुद्ध कृष्णशास्त्री चिपळूणकर ह्यांचें मत असें कीं, पुरुष, काळ, अर्थ, लिंग, वचन, ह्याप्रमाणें भेद म्हणून 'क्रियापदरूपभेदक' असें आणखी एक कारण मानण्याची जरूर नाहीं. मूळ धातूची जशीं वरील कारणांनीं रूपें बदलतात, त्याच कारणांनीं तशींच या साधित धातूंचीही रूपें बदलतात. मळ संस्कृत भाषेंतही प्रयोजक धातु म्हणून वेगळे साधित धातूच मानिले आहेत; प्रयोजक भेद मानिला नाहीं. एवंच इतर साधित धातूंप्रमाणेंच प्रयोजक रूप हें एक साधित धातु होय; ह्याशिवाय त्यांत कांहींएक न्युनाधिक नाहीं. हा कृष्णशास्त्र्यांचा निकाल युक्ति, सोय, व्याकरण व्युत्पत्ति व पूर्वपरंपरा किंवा इतिहास ह्या सर्वांचे दृष्टीनें प्रयोजक रूपासंबंधानें निर्विवाद सिद्ध आहे. ह्यामुळेंच या अध्यायांत आम्हीं साधित धातूंमध्यें प्रयोजक धातूंची गणना केली आहे. परंतु धातूच्या शक्यरूपासंबंधानें शास्त्रीबोवांचा हा निकाल स्वीकारण्यास आमच्या मनाची एकदम तयारी होत नाहीं. तेव्हां आतां विशेषेंकरून धातूंच्या शक्यरूपासंबंधानेंच विचार कर्तव्य आहे. म्हणजे यापुढें प्रयोजक रूपाबद्दल वाद नसून शक्यरूपाबद्दलच काय तो संशय उरला आहे, असें ध्यानांत ठेविलें म्हणजे ऊहापोह करण्यास बरें.

शक्यरूपासंबंधाचें दादोबांचें मत नुकतेंच वर दिलें आहे. आतां कृष्णशास्त्री चिपळूणकर काय म्हणतात तें पहा. "शक्यत्वार्थक साधित धातु संस्कृतांत मुळीच नाहींत व बालभाषेंतही आढळत नाहींत. ते मराठींत मात्र आहेत. हे साधित धातु संस्कृतांतील प्रयोजकत्वार्थक रूपांपासूनच उत्पन्न झाले असावे असें वाटतें. तथापि या रूपांस हा नवीन शक्तिघटित अर्थ कसा आला याची उपपत्ति अद्यापि स्पष्ट समजत नाहीं. व प्रत्यय लागून जे शक्यत्वार्थक धातु सिद्ध होतात, ते कर्तरि कधीं असत नाहींत, त्या साधित धातूंचा अन्वय कर्त्याकडे कधींही होत नाहीं; तर मूळ धातु सकर्मक असल्यास साधित शक्यत्वार्थक धातु कर्मणि होतो; म्हणजे त्याचा अन्वय मूळ धातूच्या कर्माकडे होतो व मूळ धातु अकर्मक असल्यास तो भावी होतो; म्हणजे त्याचा अन्वय मूळच्या कर्त्याकडे असत नाहीं, व धातु अकर्मक असल्यामुळें कर्माकडेही त्याचा अन्वय संभवत नाहीं; जसें:—तें काम मला करवतें, मला जाववतें; पाहिल्या उदाहरणात 'कर' धातु सकर्मक असल्यामुळें त्यापासून झालेला शक्यत्वार्थक साधित धातु कर्मणि होतो; म्हणजे त्याचा संबंध मूळ धातूचें कर्म जें काम त्याकडे असतो; व दुसऱ्या उदाहरणांत 'जा' धातु अकर्मक असल्यामुळें त्यापासून झालेला शक्यत्वार्थक धातु भावी होतो." (निबंध. पृष्ट. १६०, १६१).

ह्या कृष्णशास्त्र्यांच्या कर्मणिचे जागीं दादोबा अकर्मक कर्तरि, आणि कृष्णशास्त्र्यांच्या भावीचे जागीं दादोबा भावकर्तरि प्रयोग मानितात हें वर सांगितलेंच आहे. ह्यासंबंधानें दादोबांचें म्हणणें पहा. 'या अशा शक्यार्थ अथवा शक्य क्रियापदांचा प्रयोग होत असतां ओंड मनन केल्या अंतीं असें ज्ञापित होतें कीं, त्या त्या कर्त्याचे शक्तीनें, द्वारानें, किंवा योगेंकरून ती ती क्रिया अथवा तो तो व्यापार केला जातो, केला जायास शक्य होतो, असा त्यांत कर्मकर्तृभाव म्हणजे कर्मवाचकाचे ठायीं कर्त्याचा भाव प्रगट होतो. म्हणोनच वरच्या उदाहरणांत सर्वव्यापक नियमानुसार कर्त्यांची प्रथमान्त किंवा शुद्ध तृतीयान्त रूपें व्हावीं तशीं न होतां सर्वकाळीं—माझ्यानें, त्याच्यानें, तुझ्यानें, अशीं पाहुण्यासारखीं पारकी सविकरण तृतीयान्त रूपें प्रयोजिलीं जातात. येणेंकरून या शब्दांचे ठायीं जो कर्तृत्वाचा भास होतो, तो उडवावा हेंच या रूपान्तरान इंगित होतें, असें माझ्या बुद्धीस वाटतें.' (दादोबाकृत व्याकरण, क० ४०९).

दादोबा आणि कृष्णशास्त्री चिपळूणकर या दोन मतांपैकींच कोणतें ना कोणतें तरी एक मत हल्लीं प्रचलीत आहे. जोशी यांनीं अर्थात् चिपळूणकरमत स्वीकारिलें आहे; म्हणजे जोशीबोवांचे मतें 'मला काम करवतें' ह्यामध्यें 'करवतें' या क्रियापदांत प्रयोजक क्रियापदांतल्याप्रमाणेंच 'करव' हा सकर्मक परंतु साधित धातु असून त्याचा 'मला' हा कर्ता, 'काम' हें कर्म—अथवा त्यांचें स्वतःचे भाषेनें 'मला' हें कर्तृपद; काम हें कर्म, कर्ता;—'करवतें' हें क्रियापद, कर्मणि प्रयोग. खेर यांनीं दादोक्त भेदव्यवस्था पसंत केली आहे. तथापि वरील वाक्यांतील प्रयोगासंबंधानें मात्र ते दादोबांचें मत स्वीकारित नाहींत. म्हणजे 'करवतें' यामध्यें खेरांचे मतें 'कर' हाच धातु असून चिपळूणकरांचे मताप्रमाणें प्रयोग मात्र कर्मणि आहे; दादोबा म्हणतात त्याप्रमाणें अकर्मककर्तरि नाहीं. ह्यावरून प्रयोगाचे संबंधानें मात्र खेर यांनीं चिपळूणकरांचें मत उचलिलें आहे. याप्रमाणें खेर यांनीं दादोबा व चिपळूणकर ह्यांच्यामध्यें शक्य क्रियापदांसंबंधानें तडजोड केली आहे. दादोबांचा शक्य भेद खरा—म्हणजे 'करवतें' यामध्यें 'कर' हाच धातु असून भेदानुसार त्याचें 'करव' हें रूप होतें—तरी प्रयोगाचेसंबंधानें चिपळूणकरांचेंच मत ग्राह्य होय, असा खेरांचे म्हणण्याचा निष्कर्ष दिसतो.

प्रस्तुत प्रश्नाविषयीं दादोबा व चिपळूणकर ह्या दोघांचींहीं मतें व्याकरणदृष्ट्या सारखींच आक्षेपार्ह आहेत असें आम्हांस वाटतें. क्रियापदाचा कर्ता कसा शोधून काढावा हें आम्ही या अध्यायांत सांगितलेंच आहे, तें वाचक विसरले नसतीलच. दिलेल्या क्रियापदांतील धातूंचें 'णारा' प्रत्ययान्त कृदन्त करून त्यानें प्रश्न विचारिला असतां, जें उत्तर येतें, तें त्या क्रियापदाचा कर्ता होय—मग तो शब्द कोण-

त्याही विभक्तींत असो. या नियमास अनुसरून मतांकडे पहा. दादोबांचे मतें 'करवतें' या क्रियापदांत 'कर' हा धातु आहे. हें जर खरें, तर जो 'करणारा' तो 'करवतें' या क्रियापदाचा कर्ता होय. अर्थात् दादोबा व खेर ह्यांचे दृष्टीनें 'करवतें' या क्रियापदाचा 'मला' हा कर्ता होय हें उघड आहे. परंतु दादोबांचे मतें 'काम' हा कर्ता होय. आतां चिपळूणकरांचे मतें 'करवतें' या क्रियापदांत 'करव' हा साधित धातु होय. हें जर खरें, तर 'करवतें' ह्याचा जो 'करवणरा' तो कर्ता. 'मला काम करवतें' ह्याचे जागीं 'मला हा धंदा करवतो' असें उदाहरण घेतल्यास 'करवणारा' कोण? तर अर्थात् 'धंदा' तेव्हां 'करवतो' या क्रियापदाचा 'धंदा' हा कर्ता होय. त्याचप्रमाणें वरील वाक्यांत 'करवणारें' कोण--तर 'काम'--तेव्हां 'करवतें' या क्रियापदाचा 'काम' हा कर्ता होय. परंतु चिपळूणकरांचे मतें 'करवतें' ह्याचा कर्ता 'काम' नसून 'मला' हा होय. एवंच दोन्ही मतें आपआपल्यापरी स्वतःशीं विसंगत आहेत हें उघड आहे.

कर्त्याचे दृष्टीनें दिसणारी ही प्रत्येक मतांतील विसंगति खेर ह्यांचे मतानें दूर झाली आहे. 'करवतें' ह्या क्रियापदांत दादोबाप्रमाणेंच खेर हेही 'कर' हाच धातु मानितात; परंतु त्यांचे मतें त्याचा, कर्ता दादोबा म्हणतात त्याचप्रमाणें 'काम' नसून 'मल' हाच होय. 'करवतें' या क्रियापदांत धातु कोणता आणि त्या धातूचा कर्ता कोणता ह्या प्रश्नांचीं खेरांचीं उत्तरें योग्य आहेत. म्हणजे दादोबांचें धातूसंबंधानें मत आणि कृष्णशास्त्री चिपळूणकर ह्यांचें कर्त्यासंबंधाचें मत हीं खरीं आहेत. परंतु ह्यापुढील प्रश्न असा कीं, 'कर' या धातूपासून 'करवतें' हें रूप कसें सिद्ध होतें? दादोबांचे मतें या प्रश्नाचें उत्तर असें कीं, शक्यभेदीं 'कर' यापासून 'करव' हें अंग तयार होतें; व त्यास वर्तमान काळाचे प्रत्यय लागतात, म्हणजे 'कर' पासून 'करव' हें शक्यभेदानुरूप बनतें. भेदव्यवस्था चिपळूणकर मानित नसल्यामुळें ते 'करव' हाच धातु मानितात. आणि तो प्रयोजक धातूप्रमाणेंच मूळ 'कर' या धातूपासून निघतो असें म्हणतात. दिसण्यामध्यें प्रयोजक 'करव' व शक्य 'करव' यांमध्यें फरक नाहीं हें निर्विवाद आहे. परंतु तेवढ्यावरून दोन्ही रूपें एकच होत हें म्हणणें संयुक्तिक नाहीं. दोहोंमध्यें अर्थदृष्ट्या फारच अन्तर आहे. इतकेंच नव्हे, तर अर्थदृष्ट्या दोहोंत कांहीच साम्य नाहीं. प्रयोजक 'करव' ह्याचा कर्ता मूळ 'कर' धातू या कर्त्याहून अगदीं भिन्न, तर चिपळूणकरांचेच मतें शक्य 'करव' ह्याचा आणि मूळ 'कर' ह्याचा कर्ता एकच--मात्र त्याची विभक्ति निराळी--परंतु विभक्ति कांहीं का असेना, कर्ता तो कर्ता व कर्म तें कर्म, असें पूर्वीच सांगण्यांत आलें आहे; तें विसरतां कामा नये. प्रयोजक 'करव' हा मूळ

धातूप्रमाणें चालतो व त्याचे सर्व प्रयोग होतात. परंतु शक्य ' करव ' ह्याचा कोठेंच व कधींच कर्तरी प्रयोग होत नाहीं, हें एक आश्चर्य नव्हे काय ? रुच, आवड, वाट, इ० धातूसंबंधानें ह्याच अध्यायांत वरतीं जो ऊहापोह केला आहे, त्यांत आम्हीं सांगितलेंच आहे कीं, ज्यांस अकर्तृक किंवा भावकर्तृक असें म्हणतात ते थोडेसे धातु वगळिले म्हणजे असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, प्रत्येक धातूचा कर्तरि प्रयोग होणें हें स्वाभाविक आहे. धातूस कर्म असेल किंवा नसेल; त्याचप्रमाणें त्यास कर्ता असेल किंवा नसेल. परंतु ज्याप्रमाणें प्रत्येक सकर्मक धातूचा कर्मणिप्रयोग होणें संभवनीय असतें, त्याचप्रमाणें प्रत्येक सकर्तृक धातूचा कधीं तरी कर्तरिप्रयोग होणें संभवनीय असणें हें स्वाभाविक नाहीं काय ? परंतु चिपळूणकर म्हणतात त्याप्रमाणें जर ' करवतें ' या क्रियापदांत शक्यत्वार्थक ' करव ' हा धातु होय आणि त्याचा कर्ता ' मला ' होय म्हणजे शक्य ' करव ' धातु सकर्तृक आहे, तर ह्या शक्य ' करव ' धातूचा कर्तरिप्रयोग कोणत्या ना कोणत्या तरी काळीं किंवा अर्थीं म्हणजे कोणते तरी आख्यात प्रत्यय लागून होणें शक्य म्हणजे संभवनीय असावयास नको काय ? परंतु शक्य ' करव ' याचा कर्तरिप्रयोग कधींच संभवनीय नाहीं. प्रत्येक सकर्मक धातूचा कर्मणिप्रयोग कधीं ना कधीं तरी संभवनीय आहे हें खरें; तरी प्रत्येक सकर्तृक धातूचा कधीं ना कधीं तरी कर्तरिप्रयोग संभवनीय नसला म्हणून काय झालें ? असें वाटण्याचा संभव आहे. आणि हें मत ग्राह्य होय असें जर समजलें, तर आमचा हा आक्षेप महत्वाचा नाहीं असें म्हणणें भाग आहे हें आम्हीं कबुल करितों. परंतु वरील मत कोणी अशा तऱ्हेनें स्पष्टपणें आजपर्यंत प्रतिपादलेलें आमच्या पाहण्यांत नाहीं. कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या शक्य ' करव ' धातूवरील अभिप्रायांत तसा ध्वनि उमटत आहे. तथापि कांहीं सकर्तृक धातूंचा कर्तरिप्रयोग कधींच होत नाहीं असें म्हणावें लागेल ह्या आमच्या आक्षेपास हेंच वादविषयक शक्य धातु उत्तर म्हणून विरुद्धपक्षाकडील पुराव्यांत जमेच्या बाजूस दाखल करितां येत नाहींत हें उघड आहे. तेव्हां या धातूंशिवाय अन्य असंदिग्ध धातूंचाच पुरावा जमेस धरितां येईल. आणि अशा प्रकारचे दुसरे धातु जोंपर्यंत उपलब्ध नाहींत, तोंपर्यंत विरुद्धपक्षाचें मत ग्राह्य समजतां येत नाहीं हें उघड आहे. शिवाय कांहीं सकर्तृक धातूंचा कर्तरिप्रयोग होत नाहीं ही गोष्ट मराठीच्या मातृस्थानीं असणाऱ्या प्राकृत व संस्कृत यांमध्येंच नव्हे, तर इतर भाषांतही आढळत नाहीं; आणि प्राकृत, संस्कृत व इतर भाषांचा हा साधारण स्वभाव विरुद्ध पक्षास फारच घातक आहे. एवंच प्रयोजक ' करव ' व शक्य ' करव ' या दोहोंमध्यें अर्थामध्यें कांहीं एक साम्य नाहीं. त्याप्रमाणें व्याकरणदृष्ट्याही त्यांमध्यें फारच फरक आहे, हेंही सिद्धच आहे. म्हणून हीं दोन रूपें बाह्य दृष्टीस जरी दिसण्यांत एक दिसलीं, तरी त्यांस कृष्णशास्त्र्यांप्रमाणें एक समजणें

कांहीं योग्य नाहीं. ह्या ठिकाणीं कृष्णशास्त्री चिपळूणकरांची नजर कशी चुकली हें एक मोठें गूढच आहे. एवंच 'करवतें' ह्यामध्यें 'करव' हा धातु होय, हें शास्त्रीबोवांचे मत आम्हांस ग्राह्य दिसत नाहीं तर मग 'करवतें' ह्या क्रियापदाची 'कर' धातूपासून उपपत्ति काय? क्रियापदरूपभेदक कारणांत प्रयोजक भेद गणितां येत नाहीं म्हणून प्रयोजक अंग हा जसा एक साधित धातु समजावयाचा तशी व्यवस्था या ठिकाणीं योग्य व इष्ट नाहीं हें दाखविलेंच. तर मग मूळरूपभेद आणि शक्यभेद हे दोनच भेद मानावयाचे कीं काय? असा एक प्रश्न उत्पन्न होतो. 'करवतें' या ठिकाणीं 'करव' हा जर साधित धातु मानितां येत नहीं तर ह्या रूपांची साधनिका दादोबांचे भेदद्वारा लावावयाची कीं काय? म्हणजे प्रयोजक भेद जरी उडाला तरी भेद व्यवस्था कायम ठेवून मूळरूपभेद व शक्यभेद असे दोन भेद कल्पावयाचे कीं काय?

या प्रश्नास आमचें उत्तर नकाराचेंच आहे. तें कां, आणि तसें जर करावयाचें तर 'करवतें' या रूपाची 'कर' या धातूपासून साधनिका कशी साधावयाची? या प्रश्नांचीं उत्तरें पुढील विवेचनावरून स्पष्ट होतील. याकरितां प्रथम व्युत्पत्तीकडे पहा. कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात 'हे साधित धातु (शक्य धातु) संस्कृतांतील प्रयोजकत्वार्थ रूपांपासूनच उत्पन्न झाले असावे असें वाटतें. तथापि त्या रूपांस हा नवीन शक्तिघटित अर्थ कसा आला याची उपपत्ति अद्यापि स्पष्ट समजत नाहीं.' प्रयोजक 'करव' आणि शक्य 'करव' ह्यांमध्यें वर सांगितल्याप्रमाणें अर्थदृष्ट्या आणि व्याकरणदृष्ट्या महदन्तर असल्यामुळें प्रयोजकत्वार्थ 'करव' पासूनच शक्य 'करव' उत्पन्न झालें किंवा हीं दोन्ही मूळांत एकच होत हें म्हणणें युक्त नाहीं. संस्कृतांत दहाव्या गणांतील धातूंस अय लागून क्रियापदें साधतात; तसेंच धातूंस अय लागून त्यांपासून प्रयोजक धातु साधतात. एवढ्यावरून या दोन्ही ठिकाणचा अय एकच होय असें कोणी म्हणत नाहीं. कारण, अर्थदृष्ट्या दोहोंमध्यें अन्तर आहे. तसेंच चवथ्या गणांतील धातूंस य लागून क्रियापदें साधतात; आणि धातूंस य लागून कर्मणि क्रियापदें तयार होतात; आणि य हा विध्यर्थी कृदन्त साधण्याचाही एक प्रत्यय आहे, हें संस्कृतज्ञांस माहितच आहे. तथापि या तिन्ही ठिकाणचा य एकच होय असें कोणी म्हणत नाहीं. एवंच जेथें अर्थामध्यें कांहीं साम्य नाहीं, किंवा महदंतर आहे, तेथील सकृद्दर्शनीं किंवा बाह्य दृष्टीस दिसणारें साम्य वास्तविक नसून भ्रामक असतें हें उघड आहे. म्हणून प्रयोजक 'करव' आणि शक्य 'करव' हीं एकाच मूळापासून आलीं आहेत हें कृष्णशास्त्री चिपळूणकरांचें मत सूक्ष्म विचारांतीं सर्वसंमत होण्यासारखें नाहीं असें म्हणणें भाग आहे. शिवाय कृष्णशास्त्री चिपळूणकरही स्वतः शक्य 'करव' ह्याचे व्युत्पत्तीविषयीं जरासे साशंकच दिसतात हेंही त्यांचे भाषेवरून कळेलच.

तर मग शक्य क्रियापदांची वास्तविक उपपत्ति काय ? कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात, 'कर्तरी क्रियापदांस जे आख्यात प्रत्यय लागतात, तेच आख्यात प्रत्यय कर्मणि आणि भावी क्रियापदांसही लागतात. परंतु कर्मणि आणि भावी क्रियापद कर्तव्य असतां धातूपुढें ज हें अक्षर लागून त्यापुढें आख्यात प्रत्यय लागतात. संस्कृतांत कर्मणि व भावी क्रियापदें होतांना य प्रत्यय होत असतो. जसें:--दृश्यते, श्रूयते, भूयते, इ० या यचाच प्राकृत भाषेत ज झाला आहे.' करिजे, चिंतिजे, होइजे, हीं रूपें मूळामध्यें ह्याप्रमाणें कर्मणि किंवा भावी होत. परंतु, हीं केवळ कवितेंत–आणि विशेषेंकरून जुन्या कवितेंत–मात्र येतात.' (कृ. चिपळूणकर, निबंध. पृ. १३ व पृ. १३१). तो करी, ते करीती हीं जशीं जुन्या वर्तमानकाळाचीं रूपें सध्या निदान गद्यामध्यें प्रचलित नाहींत, त्याचप्रमाणें करिजे, धरीजे, हीं कर्मणि व जाइजे, होइजे, हीं भावी रूपें, सध्या गद्यांत प्रचलित नाहींत हें कृष्णशास्त्र्यांनीच सांगितलें आहे. जुन्या वर्तमानकाळाचे जागीं म्हणजे, तो करी, ते करिती, ह्यांचे जागीं तो करितो, तें करितात, अशीं नवीन रूपें प्रचारांत आलीं आहेत. जेव्हां एका प्रकारच्या रूपांचा प्रचार भाषेमध्यें नाहींसा होतो, तेव्हां त्यांचे जागीं त्याच अर्थाचीं नवीन रूपें उत्पन्न होणें साहजिक आहे. या नियमास अनुसरून करिजे, धरिजे, ह्या कर्मणि रूपांपासून पुढें केला जातो, धरिला जातो, इ० अलीकडील कर्मणि किंवा दादोबा म्हणतात त्याप्रमाणें कर्मकर्तरि रूपें निघालीं आहेत. हा विषय सध्यां जरासा अप्रकृतच पडल्यामुळें तो बाजूस ठेवितों. योग्य जागीं त्याचा सविस्तर खुलासा होईलच. एवंच, एका रूपांच्या जागीं जशीं दुसरीं रूपें येतात, त्याचप्रमाणें भाषेच्या उत्क्रांतीमध्यें आणखी एक नियम आढळतो, तो असाः कधीं कधीं एकाच मूळापासून जराशा भिन्न भिन्न अर्थानें दोन अथवा फांटे फुटतात. हे दोन फांटे एकाच मूळापासून निघाले असल्यामुळ त्यामध्यें साम्याचे मानानें भिन्नत्व फारच थोडें असतें. जसें:—अस् धातुपासून आहे व असतो; दंत, राम, इ० शब्दांपासून दांत व दांता, राम व रामा; पाद–पाय, पाया; उत्तान— उताणा, उथळ; जीर्ण---जुना, जून, बीज--बी, बीं; भगिनी – बहीण, बहिणी; इ० तसेंच मूळ संस्कृत कर्मणि व भावी क्रियापदें होतांना जो य होतो, त्यापासून दोन अंकुर फुटलेः एक ज---हा करिजे, धरिजे, जाइजे, होइजे, इ० रूपांमध्यें दिसतो; आणि दुसरा व--हा करव, धरव, जावव, होवव इ० शक्यत्वार्थक रूपांमध्यें दिसतो. य या संस्कृत अक्षराचा जसा एक ज हा अपभ्रंश आहे, तसा दुसरा व ह्याही एक अपभ्रंश आहे. प्रयोजक व हा मूळ य पासूनच आला आहे. तेव्हां संस्कृत य पासून व उत्पन्न होणे हें सर्वस्वी संभवनीय आहे. एवंच, आमच्या मतें करवतें, धरवतें, जाववतें, येववतें, इ० शक्यत्वार्थक रूपें कर, धर, जा, ये, इ० मूळ धातूंपासूनच कर्मणि व भावी व हा

आगम होऊन झालीं आहेत; म्हणूनच तीं नेहमीं कर्मणि व भावी प्रयोगांच आढळतात. परंतु संस्कृत भाषेंत 'कृ' या धातूपासून कर्मणि य लागून जें 'क्रिय' हें अंग होतें, त्यास स्वतंत्र धातु म्हणत नाहींत; त्याचप्रमाणें कर, धर, जा, इत्यादिकांपासून कर्मणि व व भावी व होऊन जीं करव, धरव, जावव, इत्यादि अंगें तयार होतात, त्यांसही स्वतंत्र साधित धातु म्हणणें योग्य नाहीं. ह्याचें कारण असें दिसतें कीं, 'कृ' आणि कर्मणि 'क्रिय' ह्यांचीं कर्ताकर्में एकच असून, फक्त 'कृ' ह्याचा कर्तरि आणि 'क्रिय' ह्याचा कर्मणि प्रयोगांत उपयोग होतो, इतकेंच. म्हणजे जोंपर्यंत एक धातूचा कर्ता व कर्म हीं त्याचपासून उत्पन्न झालेल्या निरनिराळया दोन रूपांसंबंधानें तशींच काइम आहेत, तोंपर्यंत त्या दोन रूपांत निरनिराळे धातु आहेत असें म्हणणें सयुक्तिक नाहीं. परंतु 'करतो' व 'करवितो' म्हणजे मूळ रूप आणि प्रयोजकत्वार्थक रूप या दोन रूपांसंबंधानें निदान कर्ता तरी भिन्न असल्यामुळें 'कर' आणि 'करव', असे दोन धातु मानणें अयोग्य नाहीं. म्हणूनच संस्कृतांत मूळ धातूचे प्रयोजकत्वार्थक विकृत अंगास स्वतंत्र धातु असें म्हटलें आहे. परंतु मूळ धातूच्या कर्मणि व भावी रूपांचा कर्ता व मूळ धातूचा कर्ता हे एकच असल्यामुळें त्या कर्मणि व भावी रूपांमध्यें मूळ धातूहून भिन्न अशा स्वतंत्र धातूचें अस्तित्व कल्पितां येत नाहीं. याच न्यायानें 'मी काम करितों' आणि 'मला काम करवतें' या दोन्ही वाक्यांतील परस्परसदृश किंवा एकाच मूळापासून उत्पन्न झालेल्या 'करितों' व 'करवतें' या दोन क्रियापदांत निरनिराळे दोन धातु मानितां येत नाहींत. तात्पर्य, 'करवतें' या रूपांतील व हा आगम होऊन 'कर' धातूपासून 'करव' हा धातु उत्पन्न होत नाहीं; तर व हा आगम मूळ संस्कृत कर्मणि व भावी य या आगमापासून त्याच प्रयोगरचनेमध्यें मराठींत आला आहे असें आमचें मत आहे. कृष्णशास्त्री म्हणतात त्याप्रमाणें शक्यत्वार्थी येणारा व आणि प्रयोजकत्वार्थी येणारा व हे दोन्ही जर मूळ संस्कृत प्रयोजकत्वार्थक आगमापासूनच आलेले असतील तर अकर्मक धातूंसही तो आगम लागून प्रयोजकत्वार्थी मात्र सकर्मक क्रियापदें व्हावीं, परंतु शक्यत्वार्थी त्यांपासून अकर्मक क्रियापदेंच कां व्हावीं, हें एक मोठें गूढच नाहीं काय? 'बस' धातूपासून 'बसवितो' हें प्रयोजकत्वार्थी येणारें क्रियापद सकर्मक आहे; परंतु तोच व हा आगम लागून शक्यत्वार्थी येणारें 'बसवतें' हें क्रियापद अकर्मकच राहतें, हा एक चमत्कार म्हणावयाचा. परंतु आम्हीं सांगितलेली व्युत्पत्ति स्वीकारिली म्हणजे कोणतीच अडचण उरत नाहीं. 'मला काम करवतें' व 'मला जाववतें' या वाक्यांतील क्रियापदांत 'कर' आणि 'जा' हेच धातु आहेत—करव व जावव हे साधित धातु नाहींत. 'करणारा' व 'जाणारा' कोण, तर मी, म्हणून 'मला' हा कर्ता आणि पाहिल्या वाक्यांत 'काम' या कर्माप्रमाणें क्रियापदाचें

रूप असल्यामुळें पहिल्यांत कर्माणि, व दुसऱ्यामध्यें कर्त्याप्रमाणें, किंवा कर्माप्रमाणें—धातु अकर्मक असल्यामुळें वास्तविक कर्माची गोष्टच बोलावयास नको—क्रियापदाचें रूप नसून तें तृतीयपुरुषीं नपुंसकलिंगीं एकवचनीं असल्यामुळें त्यांत भावी प्रयोग आहे हें उघड आहे. संस्कृतांतही य लागून सकर्मक धातूंचीं कर्मणि व अकर्मक धातूंचीं भावी अशींच रूपें होतात. शिवाय या शक्यत्वार्थक रूपामध्यें मूळ धातु 'करव' मानिल्यामुळें त्यांच्या कर्तरिप्रयोगाच्या अस्तित्वाबद्दलची उत्पन्न होणारी जी अडचण वर दाखविली आहे तीही येथें उरत नाहीं मूळ धातु कर, जा; हेच असल्यामुळें त्यांचे कर्तरिप्रयोग होतात आणि ते प्रसिद्धच आहेत. अशा प्रकारें येथें सुचविलेल्या व्युत्पत्तीस अनुसरून 'करवतें' हा शक्यत्वार्थी कर्माणि आणि 'जाववतें' हा शक्यत्वार्थी भावी अथवा संक्षेपानें शक्य कर्मणि व शक्य भावी असे कर्मणि व भावी प्रयोगाचे पोटभेद मानिले म्हणजे, सर्व गोष्टी संगतवार जुळून कोणतीच अडचण रहात नाहीं. भेदव्यवस्था मूळ संस्कृतांत नाहींच; आणि मूळ संस्कृतांतल्या व्यवस्थेप्रमाणें प्रयोजकत्वार्थक क्रियापदांत प्रयोजक साधित धातु मानिला, आणि शक्यत्वार्थक क्रियापदांचें रूप, मूळ संस्कृतांतल्या प्रमाणेंच मूळ धातूंस व आगम होऊन शक्य कर्मणि व शक्य भावी प्रयोगीं प्रचारांत आहे असें म्हटलें, म्हणजे दादोबांच्या भेदव्यवस्थेची जरूर नाहीं हें उघड आहे.

आतां या कर्मणि आणि भावी रूपांस मराठींत शक्यत्वार्थ कोठून प्राप्त झाला, इतकाच प्रश्न उरला, त्याचें थोडक्यांत उत्तर असें. संस्कृत भाषेंत काय कीं इंग्रजी भाषेंत काय—दादोबांच्या कर्मकर्तरि प्रयोगामध्यें शक्यत्वार्थाची थोडीशी झांक मारतच असते, 'तत्कर्म मया क्रियते' यामध्यें शक्यत्वार्थाचा सूक्ष्म ध्वनि आहे, हें तज्ज्ञांस समजेलच. संस्कृतांतील कर्मणि व भावीप्रयोगांत शक्तीचा ध्वनि निघतो, या विधानाच्या पुष्टीकरणास त्याच भाषेंतील विध्यर्थी कर्मणि व भावी कृदन्तांच्या उपयोगाकडे तज्ज्ञांनीं लक्ष द्यावें. विध्यर्थी, कर्मणि व भावी कृदन्तांचा उपयोग शक्यत्वार्थी होतो असें संस्कृत व्याकरणांत स्पष्ट सांगितलें आहे. एवंच, मूळ संस्कृत कर्मणि व भावी रूपांमध्यें शक्तीचा जो अस्पष्ट ध्वनि उठत आहे, तोच मराठींतील कर्मणि व भावी रूपांमध्यें स्पष्ट उमटूं लागला आहे.

या सर्व विवेचनावरून 'करवतें' 'जाववतें' इ० शक्यत्वार्थक रूपांच्या येथें सुचविलेल्या व्युत्पत्तीनें त्यांची साधानिका व अर्थ या दोहोंचें योग्य स्पष्टीकरण होऊन व्याकरणामध्येंही दादोबा, चिपळूणकर व खेर यांच्या व्यवस्थेंतील कोणतीहि अडचण उरत नाहीं; आणि दादोबांच्या भेदव्यवस्थेची जरूर रहात नाहीं. आणि चिपळूणकरांनीं ह्यी प्रयोजकत्वार्थक क्रियापदांची, मूळ संस्कृत भाषेस अनुसरून प्रयोजक अंगें हीं साधित धातु मानून योग्य

व्यवस्था लाविली, त्याचप्रमाणें ' करवते ' ' जाववतें ' हीं ' कर ' व 'जा' या मूळ धातूंचीं संस्कृत व्यवस्थाप्रमाणें, केवळ कर्मणि व भावी रूपें होत आणि त्यास वाटेल तर शक्य कर्मणि व शक्य भावी असें म्हटल्यानें ह्या शक्यत्वार्थक रूपांचीही संगतवार योग्य व्यवस्था लागते असे सुज्ञ वाचकांचे ध्यानांत आल्यावांचुन राहणार नाहीं.

हें सर्व प्रतिपादन लिहून झाल्यानंतर रा. रा. राजवाडे ह्यांचे ' श्री ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण ' प्रसिद्ध झालें. त्यांतही ' करवतें ', ' जाववतें ' ह्या रुपांच्या व्युत्पत्ती बद्दल असाच निर्णय केलेला आहे, तो जिज्ञासूंनीं पहावा. रे० नवलकर ह्यांचेंही मत असेंच आहे. ]

# अध्याय ६.

---

## क्रियाविशेषण.

१०८. ज्या अव्ययांनीं क्रियेचें कोणत्याही प्रकारचें विशिष्टत्व दाखविलें जातें, म्हणजे जीं क्रियेसंबंधाचे, स्थल, काल, रीति, संख्या, इ० धर्म दाखवितात, त्यांस क्रियाविशेषणें म्हणतात. जसें:—येथें, तेथें, लौकर, हळू, झटकन, फार, इ०.

[ क्रियाविशेषणांस अव्ययें म्हणजे अविकारी शब्द असें म्हणतात. ह्या विधानासंबंधानें शंका उत्पन्न होणें साहजिक आहे. कारण कीं एक तर, रात्रीस, दिवसाचा, आरंभीं, इ० शेंकडों विभक्त्यन्त शब्दांस क्रियाविशेषणें म्हणतात; आणि अनेक क्रियाविशेषणांस कांहीं विभक्ति-प्रत्यय लागतात. उदा०:—वरून, वरचा, इकडेस, इ०. या शंकेंत बरेंच तथ्य आहे. तथापि, तिचें समाधान असें कीं, विभक्तिप्रत्ययान्त शब्द क्रियाविशेषणांप्रमाणें उपयोगांत येतात. हा कांहीं क्रियाविशेषणांचे अव्ययी स्वभावावर आक्षेप नव्हे. कारण, रात्रीस, आरंभीं, इ० हे सबंध शब्द अव्ययेंच म्हणजे अविकारी होत; म्हणजे त्यांस पुढें विकार होत नाहींत हें उघडच आहे. शिवाय, त्यांतील मूळ शब्दांस म्हणजे रात्र, आरंभ, इत्यादिकांस कांहीं कोणी क्रियाविशेषण म्हणत नाहींत, हेंही निर्विवाद आहे. संस्कृतांतही कांहीं विभक्त्यन्त शब्द क्रियाविशेषणासारखे उपयोगांत असून त्यांस अव्ययें म्हणतात हें तज्ज्ञांस स्मरेलच. तेव्हां कांहीं विभक्त्यन्त शब्दांस क्रियाविशेषणें म्हटलें तरी क्रियाविशेषणांस अव्ययें म्हणजे अविकारी शब्द म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं हें कोणीही कबूल करील. परंतु जर कांहीं क्रियाविशेषणांस विभक्ति-प्रत्यय लागतात, तर त्यांस अव्ययें कसें म्हणतां येईल ? ही शंका जराशी कठिण आहे. वर आणि इकडे ह्या क्रियाविशेषणांस विभक्तिप्रत्यय लागून वरून, वरचा, इकडेस, इकडून, इकडचा, इ० शब्द बनतात ह्यांत कांहीं संशय

नाहीं. यावर कोणी असें उत्तर देईल कीं, या ठिकाणचे स, ऊन, चा, इ० हे विभक्तिप्रत्यय नव्हत. परंतु जरासा खोल विचार केला म्हणजे वर आणि ईकडे-इकडे यांस ते विभक्तिप्रत्ययच लागलेले आहेत असें स्पष्ट दिसेल. तेव्हां हें उत्तर समाधानकारक नाहीं. एवंच कांहीं क्रियाविशेषणांस विभक्तिप्रत्यय लागतात ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. तथापि अशा प्रकार सर्वच क्रियाविशेषणांस विभक्तिप्रत्यय लागतात असें नाहीं; तर अशीं नामांप्रमाणें कांहीं अंशीं चालणारीं क्रियाविशेषणें फार थोडीं आहेत; आणि या थोड्यांस फारच थोडे विभक्तिप्रत्यय लागतात. त्यांवरून जरी बहुतेक सर्व विभक्ति होतात असें आढळलें तरी प्रत्येक क्रियाविशेषणावरून सर्व विभक्तिप्रत्यय होत नाहींत, त्यांस त्या त्या विभक्तीचे सर्व प्रत्यय लागत नाहींत, आणि त्यांस कोणत्याच विभक्तीचे अनेकवचनी प्रत्यय लागत नाहींत. इकडे ह्याचीं इकडनें, इकडेस, इकडून, इकडचा हीं चार विभक्तींचीं रूपें जरी आढळलीं तरी त्यास ह्याच विभक्तीने अन्य प्रत्यय लागलेले दिसत नाहींत व त्याचें सप्तमीचें एकही रूप होत नाहीं, आणि त्याचें अनेकवचनी एकाही विभक्तीचें रूप प्रचारांत नाहीं. आम्ही घेतलेलें 'इकडे' हें उदाहरण शंकेच्या बाजूनें फारच अनुकूल आहे. कारण कीं, त्यास एका सप्तमीवांचून (कारण कीं इकडे हें मूळ इकड ह्याचें अधिकरणार्थींच रूप आहे.) बाकीच्या बहुतेक सर्व विभक्ति लागतातसें दिसतें. इतक्या विभक्ति लागणारें दुसरें क्रियाविशेषण क्वचितच आढळेल. इतर बहुतेकांस फार तर दोन तीन विभक्ति लागतात. एवंच ज्या कांहीं थोड्याशा क्रियाविशेषणांस विभक्तिविकार होतात त्यांचें हें विकरण फारच अल्प आहे हें एक; आणि अशा प्रकारें त्यांचीं जीं कांहीं विभक्त्यन्त रूपें आढळतात तींही पुन्हा बहुधा क्रियाविशेषणेंच होतात. ह्यामुळें क्रियाविशेषणांस अव्ययें म्हणण्यास फारशी हरकत नाहीं. बाकी शंका सत्य आहे यांत संशय नाहीं. त्यांपैकीं कांहींचें जें असें अल्प विकरण होतें तें केवळ अपवादक पडल्यामुळें तें कोणी जमेस धरीत नाहीं. संस्कृत भाषेंतही असा प्रकार आढळतो हें वर सांगितलेंच आहे. तथापि त्यांस अव्ययेंच म्हणतात. तीच स्थिति मराठींत आहे. ]

टीप—क्रियेचा कोणताही धर्म किंवा रीति दाखविणाऱ्या अव्ययांस जसें क्रियाविशेषण म्हणतात, त्याचप्रमाणें विशेषणांचा आणि क्रियाविशेषणांचा कोणताही धर्म दाखविणाऱ्या अव्ययांसही क्रियाविशेषण म्हणण्याची चाल आहे. हीं मूळचीं क्रियाविशेषणेंच आहेत. क्रियाविशेषणांचे जे प्रकार आहेत, त्यांपैकीं ज्यांस विशेषणांप्रमाणें गुणवाचक असें म्हणतां येईल, तीं प्राधान्येंकरून क्रियेशींच संबद्ध असतात; आणि ह्यांचाच भरणा फार आहे, त्यांचे मानानें ज्यांस परिणामवाचक असें म्हणतां येईल तीं कमी आहेत. हीं परिमाणवाचक क्रियाविशेषणेंच विशेषणांशीं व इतर क्रियाविशेषणांशीं बहुधा संबद्ध असतात; आणि त्यांचें

न्यूनाधिक परिमाण दाखवितात. ‘फार शहाणा’ ‘अति जलदीनें’, जरा हळू’ इ० उदाहरणांवरून वरील विधानाची सत्यता कळेल. ‘खरोखर शहाणा’ इ० कांहीं ठिकाणीं ‘खरोखर’ यासारखीं जीं परिमाणवाचकेतर क्रियाविशेषणें, विशेषणें व अन्य क्रियाविशेषणें यांच्याशीं संयोग पावलेलीं आढळतात तीं त्या ठिकाणीं अप्रत्यक्षपणें परिमाणवाचकच होतात. कारण कीं, ‘खरोखर शहाणा’ ‘चांगला शहाणा’ या ठिकाणीं खरोखर आणि चांगला या शब्दांनीं शहाणपणाची उच्च मर्यादा दाखविली जात आहे; म्हणजे त्यांचा अर्थ बराच, अति, अत्यन्त, असा अधिक–परिमाणदर्शकच आहे हें उघड आहे.

१९९. क्रियाविशेषणाचें विवेचन व्यवस्थितपणें करावयाचें म्हटलें म्हणजे त्याचें दोन प्रकारचें वर्गीकरण करणें अवश्य आहे. एक स्वरूपावरून आणि एक अर्थावरून. ह्याचे कारण असें कीं, मराठी भाषेंतील पुष्कळशीं क्रियाविशेषणें–अव्यय स्वरूपानें फारच भ्रामक आहेत. म्हणजे नुसत्या स्वरूपावरून त्यांस ओळखण्याची बरीच पंचाईत पडते. करितां त्यांचा पक्का परिचय होण्यासाठीं त्यांच्या भ्रामक व चंचल स्वरूपाचें आविष्करण करणें अवश्य आहे. आणि अर्थदृष्टीनें होणारें वर्गीकरण व्यवहारास व क्रियाविशेषणाचे उपयोगास जरूरीचें आहे. तेव्हां प्रथम त्यांच्या स्वरूपमूलक वर्गीकरणाकडे वळूं व नंतर दुसरें हातीं घेऊं.

२००. क्रियाविशेषणांचे स्वरूपावरून मुख्य **तीन** प्रकार आहेत तेः––**सिद्ध, साधित** आणि **स्थानिक.**

२०१. जे शब्द मूळचे अव्यय असून क्रियाविशेषणांप्रमाणें उपयोगांत येतात त्यांस **सिद्ध क्रियाविशेषणें** म्हणतात. जसें:––हळू, लौकर, पुनः, उगीच, इ०.

२०२. जीं क्रियाविशेषणें अन्य शब्दांस कांहीं प्रत्यय किंवा शब्दयोगी अव्ययें लागून तयार होतात, त्यांस **साधित क्रियाविशेषणें** असें म्हणतात. त्यांचे प्रकार येणें प्रमाणें:––

( अ ) **नामसाधित**:—सकाळला, दिवसास, रात्रीचा, वस्तुतः, व्यक्तिशः अर्थात्, अंशतः, यत्नतः, प्रथमतः, इ०.

( आ ) **सर्वनामसाधित**:––तेणेंकरून, जेणेंकरून, ह्यामुळें, त्यामुळें येथें, जेथें तेथें तस्मात्, इ०.

( इ ) **विशेषणसाधित**:--इतक्यांत, तशांत, विशेषेंकरून, मोठ्यानें, मुकाट्यानें, पहिल्यानें, एकदां, पांचदां, बहुशः, अल्पशः अनेकशः, सर्वत्र, एकत्र, अन्यत्र, द्विधा, बहुधा, इ०.

( ई ) **धातुसाधित**:--खेळतां, चालतांनां, उठल्या, बसल्या, निजल्या, पडल्या, इ०. ह्या ल्या प्रत्ययान्त अव्ययांच्या, अन्त्याक्षरावर विकल्पानें बिंदुही आढळतो जसें:--उठल्यां, पडल्यां, इ० पण हीं बिंदुयुक्त रूपें मागें पडत चाललीं आहेत.

( उ ) **अव्ययसाधित**:--आतांपर्यंत, एव्हांपासून, कोठून, खालून, वरतीं, पूर्वींचा, इ०.

( ऊ ) **समासघटित**:--प्रतिक्षण, दररोज, गांवोगांव, यथाक्रम, प्रेमपूर्वक, शास्त्रदृष्ट्या, लोकरीत्या, इ०.

२०३. इतर जातीचे शब्द जशाचे तसे जेव्हां कांहीं वाक्यांत क्रियाविशेषणांप्रमाणें उपयोगांत येतात, तेव्हां त्यांस **स्थानिक क्रियाविशेषणें** असें म्हणतात. कारण कीं, त्या विशेष स्थळीं त्यांचा तसा उपयोग असतो, परंतु ते शब्द क्रियाविशेषणें नव्हत. ह्यांचीं उदाहरणें:--

( अ ) नामें:--तो काय **माती** लिहितो ! मोडी पत्र तो **दगड** वाचतो ! इत्यादि वाक्यांत माती, दगड, हीं नामें असंभवार्थी क्रियाविशेषणाप्रमाणें उपयोगांत आहेत.

( आ ) विशेषणें:--ती **चांगलें** गात्ये, तो इंग्रजी **चांगलें** बोलतो, **उताणा** पडला, इ०. चांगलें, उताणा हे शब्द मूळचे विशेषणें होत. परंतु वरील वाक्यांत ते गाणें, बोलणें, पडणें, ह्या क्रियांचें विशिष्टत्व दाखवित असल्यामुळें त्यांस या ठिकाणीं क्रियाविशेषणेंच म्हटलें पाहिजे. ह्याप्रमाणें मराठींमध्यें अनेक विशेषणें जशींच्या तशीं क्रियाविशेषणांप्रमाणें उपयोगांत येतात.

( इ ) **त प्रत्ययान्त कृदन्तें**:--तो **हंसत** होता, डोळ्यांदेखत, **नकळत; चुकतमाकत, हांसत** कर्म करावें भोगावें **रडत** तेंचि परिणामीं इ.

( ई ) **ऊन कृदन्तें**:--**फिरून** यत्न करून पहा, **रगडून खच्चून** जेवला, कुकर्माच्या कांहिं वर्माच्या गोष्टि सांगशीं **कसून**--( सोहिरोबा ) इ०.

( उ ) **शब्दयोगी अव्ययें**:—त्यानें हात **वर** केला, **पुढें** पाहूं, **मागें** असला प्रकार होत नसे, इ०. वर, मागें, पुढें हे शब्द शब्दयोगी अव्ययें असून वरील वाक्यांत ते क्रियाविशेषणाप्रमाणें उपयोगांत आले आहेत, हें उघड आहे.

२०४. कांहीं संस्कृत क्रियाविशेषणें जशींच्या तशीं मराठींत उपयोगांत येतात. त्यांचा प्रौढ भाषेंत बहुधा उपयोग होतो. जसें:— एवंच, अत एव, तस्मात्, शनैःशनैः, अकस्मात्, आदौ, अवस्तात्, अन्यथा, असकृत्, इतस्ततः, ईषत्, किमपि, पश्चात्, प्रायः, वृथा, सम्प्रति, साक्षात्, व्यर्थ, जात्या, बुद्ध्या, एतावता, अर्थात्, पुनः, पूर्ववत्, प्रथमतः, वस्तुतः, व्यक्तिशः, द्विधा, बहुधा, एकत्र, सर्वत्र, इ०.

२०५. आतां क्रियाविशेषणांचे अर्थमूलक वर्गीकरणाकडे वळूं. अर्थाचे दृष्टीनें त्यांचे मुख्य **चार** भेद आहेत. **स्थलवाचक, कालवाचक, संख्यावाचक,** किंवा **परिमाणवाचक,** आणि **रीतिवाचक.**

२०६. स्थलवाचकांचे **दोन** पोटभेद आहेतः **स्थितिदर्शक** आणि **गतिदर्शक.**

( अ ) **स्थितिदर्शक**:—

अत्र, येथें, इथें, इकडे (येथ), (इथ).
तत्र, तेथें, तिथे, तिकडे, (तेथ), (तिथ).
जेथें, जिथे, जिकडे, (जेथ), (जिथ).
कोठें, कुठे, (कोठ).

{ जवळ, समीप.
{ नजीक, सन्निध.
दूर, लांब.
मागें.
पुढें
} हीं कालवाचकही आहेत.

कोसभर, मलभर.
समोर, समूर, इ०.

वर, (वरि), वरतीं.
खालीं, खालतीं.
मध्यें, (मधीं, मधें)
अलीकडे, पलीकडे.
{ सर्वत्र, सगळीकडे.
{ जिकडे तिकडे.
चोहोंकडे, चोहींकडे.
अन्यत्र, भलतीकडे.
भोंवता-तीं, भोंवताला.
{ सभोंवतीं, सभोंवार.
{ आसपास, इ०.

टीपः—कंसांत दिलेलीं अव्ययें किंवा रूपें कवितेंत येतात. गद्यांत त्यांचा उपयोग सहसा होत नाहीं. असेंच यापुढें अन्यत्रही समजावें.

( आ ) **गतिदर्शकः**—ह्यांमध्यें दोन प्रकार आहेतः—**गत्यारम्भदर्शक** व **गत्यन्तदर्शक.** हीं गत्यन्तदर्शक अव्ययें वास्तविक स्थितिदर्शकच होत. कारण जेथें गति संपते तेथें स्थिति लागते.

| **गत्यारम्भदर्शक** | गत्यन्तदर्शक |
|---|---|
| इकडून. इकडनें. | तिकडे, तिकडेस. |
| तिकडून. तिकडनें. | इकडे, इकडेस. |
| दुरून. लांबून. | दूर, लांब. |
| चोहोंकडून. चोहींकडून. | जवळ, समीप. |
| एथपासून. तेथपासून. | येथें, तेथें. |
| जेथपासून. कोठपासून. | वर, खालीं. |
| येथून, तेथून. | जेथें, कोठें. |
| जेथून, कोठून. | मागें, पुढें. |
| वरून, खालून. | आंत, बाहेर. |
| मागून, पुढून. | मध्यें, समोर. |
| आंतून, बाहेरून. | इ०. |
| मधून, समोरून. | |
| अलीकडून, पलीकडून. | |
| जवळून, इ०. | |

**टीप १**— गत्यारम्भदर्शकांतील **ऊन** प्रत्यय पंचम्यर्थक म्हणजे अपादानवाचक आहे.

**टीप २**—गत्यन्तदर्शकांस कधीं कधीं **पर्यन्त, वर,** हीं शब्दयोगी अव्ययें जोडतात. जसें:—वरपर्यंत, खालवर, तेथपर्यंत, तेथवर, दूरवर, इ०.

२०७. कालवाचकांमध्यें **क्षणवाचक, अवधिवाचक,** आणि **पौनःपुन्यवाचक,** असे तीन भेद आहेत.

( अ ) **क्षणवाचकः**—

| | |
|---|---|
| आज, अद्य. | इतक्यांत, तितक्यांत. |
| आधीं, प्रथम, पहिल्यानें. | अशांत, तशांत. |
| { आतां, सध्या, हल्लीं. | अमळशानें, जराशानें. |
| { साम्प्रत, सम्प्रति, अलीकडे. | तुर्त, त्वरित, सत्वर. |

लवकर, लौकर, झटकन, जलद.
लागलीच, लगेच, तडक.
लगेहात, हातोहात,
तडकाफडक—कीं.
लागोपाठ, पाठोपाठ.
तात्काळ, तत्क्षणीं.
अकस्मात् , एकाएकीं, एकदम.
अवचित, अवस्तूत.
एव्हां, तेव्हां, जेव्हां, केव्हां.
यदा, तदा, कदा.
कधीं, ( जधीं, तधीं )
जों, तों.
( जई, कई, तई )
( एधवां, केधवां )
( जेधवा, तेधवां )
एव्हांशीं, केव्हांशीं
पूर्वीं, अगोदर, मागें.
नंतर, पुढें, पश्चात् , मग, इ०.

काल, उद्या.
यंदां, गुदस्तां.
गतसाल, गतसालीं.
परवां, तेरवां,
नेरवां, एरवा ( क. )
अखेर, अखेरीस.
अंतीं, शेवटीं.
नुकता—ती—तें, नवथर.
सकाळीं, प्रातःकाळीं.
उजाडत, पहांटेस.
सकाळचा, सकाळला.
संध्याकाळीं, सायंकाळीं.
आवशीस, रात्रीस.
दिवसाचा, रात्रीचा.
दुपारीं, मध्यान्हीस.
दिवसाउजेडीं, दिवसाढवळ्या.
कोंबडसादीं.
कोंबडेआरवणीं, इ०.

**टीप**—कालाची गति दाखवावयाची असतां गत्यारम्भदर्शक कालवाचकास ‘ पासून ’ व अन्तदर्शकास ‘पर्यंत ’ लावतात. जसें:—कालपासून, परवांपर्यंत, आतांपासन, पूर्वींपासून, इ०.

**( आ ) अवधिवाचक:—**

नित्य, सदा, सर्वदा, सर्वत्र.
सदोदित, सार्वकाळ, सतत.
नेहमीं, हमेश—शा.
कधीं कधीं
केव्हांचा, फारवेळ.
रातोरात, इ०.

क्षण,—दिवस,—भर.
दिवस,-महिना,-वर्ष,—पर्यंत.
इतकावेळ, येवढावेळ.
अजून, अद्यापि, अद्याप.
अजूनतरी.
आजकाल, इ०.

(इ) **पौनःपुन्यवाचकः—**

{ वारंवार, पुनःपुनः,
{ पुनः, पुन्हा, फिरून.

कधीं कधीं, मधून मधून,

\+ पहिल्यानें, दुसऱ्यानें.

\+ पहिल्यानदां, दुसऱ्यानदां.

\+ एकदां, दोनदां, तीनदां.

अनेकदां, पुष्कळदां, कितीदां.

प्रतिक्षणीं, क्षणोक्षणीं, इ०.

{ दररोज, हररोज.
{ दरदिवस, प्रतिदिवशीं.

दरसाल, दरवर्ष, सालोसाल.

\+ एकवार, दोनवार, तीनवार,

द्विवार, त्रिवार, दुवार.

\+ एकडाव, दोनडाव.

तीन वेळा, चार वेळा—ळां.

कैकवेळां, किती वेळा—ळां, इ०.

टीप—अधिक (+) चिह्नित अव्ययें त्यांच्या पुढील शब्दांसंबंधानें येथें आलीं आहेत. पण तीं एकटींच वास्तविक पौनःपुन्य दाखवीत नाहींत.

२०८. **संख्यावाचक** किंवा **परिमाणवाचक** क्रियाविशेषणांमध्यें जीं कांहीं निश्चितसंख्या किंवा परिमाण प्रत्यक्ष सुचवितात त्यांपेक्षां अनिश्चित संख्या किंवा परिमाण सुचविणारीं क्रियाविशेषणें पुष्कळ व विशेष महत्त्वाचीं आहेत; आणि त्यांचे मुख्यत्वेंकरून पुढील प्रकार आढळतातः—

**(अ) प्रकर्षवाचक** :—अत्यन्त, अगदीं, बिलकूल, मुदलींच, किमपि, कधींहीं, उत्तम, उत्कृष्ट, सर्वथा, साफ, अलबत, खास, सर्वांशी, अवश्य, होय, खचित, निःसंशय, निखालस, निभ्रान्त, बेशक, बेलाशक, खरोखर, अगत्य, हटकून, जरूर, थेट, निवळ, अवश्यमेव, निःसंदेह, निःशंक, निक्षून, इत्यादि.

**आ अपकर्षवाचक** :—किंचित्, जरा, कांहीं, कांहींसा, थोडा, कदाचित्, कांहीं अंशीं, क्वचित, यदाकदाचित्, दैववशात्, अल्पशः, इ०.

**(इ) आधिक्यवाचक**:—अधिक, फार, अति, अतिशय, बहुत, बहुधा, फाजील, बहुतकरून, बहुशः, प्रायः, पुष्कळ, रगडून, खच्चून, रगड, खूप, इ०.

**(ई) पर्याप्तिवाचक** :—पुरे, पुरेसें, बस, वाजवी, बरोबर, पूर्णपणें, यथास्थित, बेताचा, बेतवार, इ०.

( उ ) **श्रेणीवाचकः**—हळुहळू, थोडथोडें, क्रमानें, क्रमाक्रमानें, पायरीपायरीनें, थेंबथेंब, घांसघांस, अंशतः, उत्तरोत्तर, दिवसेंदिवस, क्रमशः, क्रमवार, यथाक्रम, इ०.

२०९. **रीतिवाचक** किंवा गुणवाचक क्रियाविशेषणें हीं गुणवाचक विशेषणांप्रमाणें अनंत आहेत. वास्तविक म्हटलें म्हणजे सर्वच क्रिया-विशेषणें रीतिवाचक होत. परंतु त्यांपैकीं पूर्वी सांगितलेल्या क्रियाविशेष-णांनीं ते ते प्रधान गुण म्हणजे त्या त्या मुख्य रीति व्यक्त होत असल्या-मुळें त्यांचा स्वतंत्रपणें उल्लेख केला आहे, इतकेंच. तेव्हां त्यांचेशिवाय बाकीचीं सर्व या वर्गांत येतात. अर्थात् ज्या ज्या क्रियाविशेषणांचा मागें सांगितलेल्या कोणत्याही वर्गांत अन्तर्भाव करितां येत नाहीं, त्या सर्वांचा या वर्गांत समावेश होतो. म्हणून रीतिवाचक क्रियाविशेषणें हा वर्ग म्हणजे क्रियाविशेषणांचें एक मायपोटच होय.

| | | | |
|---|---|---|---|
| असें | तसें | जसें | कसें |
| इतपत | तितपत | जितपत | कितपत |
| एरवीं—व्हीं | निरर्थक | हटकून | एतावता |
| उगाच | निष्कारण | सडकून | कसेंकरून |
| उगीच | व्यर्थ | जाणून | |
| उगेंच | सार्थ | जाणूनबुजून | कांहींकेल्या |
| सहज | फुकट | समजून | निजल्या |
| येणेंप्रमाणें | मोफत | समजून उमजून | उठल्या |
| बरें | निदान | आपाप | बसल्या |
| एकत्र | किमानपक्ष | आपोआप | उभ्या |
| यथार्थ | निमूट | आपल्याआपण | उभ्याउभ्या |
| मुद्दाम | ( जेंवी ) | आपणहोऊन | धावऱ्या |
| दाटून | ( तेंवी ) | मी होऊन | |
| बुद्ध्या | ( केंवी ) | तो होऊन | |
| बुद्धिपुरःसर | ( एंवी ) | केवळ | |
| इ० | इ० | इ० | इ० |

२१०. ह्या रीतिवाचक क्रियाविशेषणांचा एक विशेष प्रकार आहे. त्यांस **अनुकरणवाचक** क्रियाविशेषणें असें म्हणतात. यांसंबंधानें दादोबा लिहितातः—' मराठी भाषेंत व्यापारादिकांचें अनुकरण कर्तव्य असतां तें अनुकार्य जे व्यापारादि, त्यांच्या स्थानीं कांहीं एक ध्वनितार्थसूचक शब्द कल्पून त्यांपुढें **कन, कर, दिशीं, दिनीं,** हे प्रत्यय लागून जे शब्द साधतात, अथवा द्विरुक्तीनें जे या प्रकारचे ( **अ**करान्त किंवा **आ**कारान्त ) शब्द सिद्ध होतात, ते सारीं क्रियाविशेषणें होतात. जसें:—फटकन्, फटकर, फटदिशीं, फटदिनीं. गट—कन—कर, इ०. झट—कन—कर, इ०, गपगप, धसधस, झटझट, फटफटां, बदबदां, सटासट, कडाकड, कडकडां, इ०.

' या अशा अनुकरणरूप शब्दांचा या महाराष्ट्र भाषेंत जितका भरणा असेल तितका मला वाटतें आणखी कोणतेंही भाषेंत नसेल; आणि तो या भाषेचा केवळ असाधाराण जिव्हाळा होऊन राहिला आहे. गति, वेग, मांजुल्य, कार्कश्य, सौंदर्य, परिमिति इत्यादि क्रियेचे शतावधि प्रकार दाखवावयाचें असतां, त्या त्या अनुकरणरूप शब्दांचा प्रयोग होतो. जसें:— झटझट चालतो; चमचम लवते; टकमक पाहत्ये; झणझण वाजतें बदबद पडतें; टपटप झरतें; छडी लागे छमछम विद्या येई घमघम, इ०.'

( **अ** ) या अनुकरणवाचक शब्दांपैकीं प्रत्येकाचीं बहुधा आठ आठ रूपें आढळतात. जसें:—गटगट, गटागट, गटागटां, गटमटां, गटकन, गटकर, गटदिनीं, गटदिशीं.

( **आ** ) यांपैकीं पहिलीं चार हीं विवक्षित क्रियेचें पौनःपुन्य दाखवयाचें असतां बहुधा उपयोगांत येतात; आणि शेवटचीं चार ती क्रिया एकदांच घडत असतां योजण्यांत येतात. या अर्थभेदास अनुरूप असा त्यांचे ठायीं स्वरूपभेदही दृष्टीस पडतो. पहिल्या चारांतील अनुकरणवाचकाच्या द्विरुक्त रूपावरून ( गटगट, गटागट, इत्यादि चारांमध्यें ' गट ' ह्याची द्विरुक्ति स्पष्ट दिसत आहे. ) आणि दुसऱ्या चारांतील त्याच्या एकेरी रूपावरून ( गटकर, गटदिनीं, इ० चारांमध्यें ' गट ' हा शब्द एकदांच दिसत आहे. ) आमच्या म्हणण्याची सत्यता वाचकांस कळेलच. उदा०:—त्याला इतकी तहान लागली होती कीं, त्यानें तांब्याभर पाणी

**गटागट** ( गटागटां इ०. ) पिऊन टाकिलें. अशा स्थलीं ' गटकन ' असें म्हणण्यांत येत नाहीं. परंतु, त्यानें ती गोळी **गटकन** गिळली. अशा स्थलीं ' गटागट ' याचा उपयोग प्रशस्त नाहीं.

( इ ) ह्या अनुकरणवाचक शब्दांपैकीं मुख्य अवयव स्वतंत्रपणेंहीं कधीं कधीं उपयोगांत येतो. जसें:—त्यानें तांब्याभर पाणी **गट** किंवा **गट्ट** करून टाकलें अशा ठिकाणीं त्या मुख्य अवयवाचें अन्त्याक्षर विकल्पें. करून द्वित्त होतें, हें दिलल्या उदाहरणावरून कळेलच.

**टीप**—अनुकरणवाचक क्रियाविशेषणांचें ' गटगट ' यासारखें जें मूळ अविकृत दिरुक्त रूप दिसतें, त्यास कधीं कधीं ईत हा प्रत्यय लागून पररूपसंधीनें विशेषणें बनतात. जसें:—गटगटीत, चमचमीत, झणझणीत, फुशफुशीत, टुणटुणीत, इ०. यांपासून अशीच आणखीहीं तद्धितें साधतात. तीं तद्धिताध्यायांत पहावीं.

२११. आतां इतर शब्दांस कोणते शब्द व प्रत्यय लागून क्रियाविशेषणें साधतात तें थोडक्यांत सांगतों. ह्याविषयींचा सविस्तर खुलासा साधितशब्दांचे विचारांत येईल. येथें फक्त मुख्य मुख्य शब्द व प्रत्यय आणि एक दोन उदाहरणें देऊन या विषयाचें दिग्दर्शन मात्र करण्याचें योजिलें आहे.

( १ ) मराठींतील संस्कृत क्रियाविशेषणसाधन.

दृष्ट्या—शास्त्रदृष्ट्या, इतिहासदृष्ट्या, इ०.

रीत्या—लोकरीत्या, शास्त्ररीत्या, इ०.

पूर्वक—प्रीतिपूर्वक, नीतिपूर्वक. इ०.

पुरःसर—बुद्धिपुरःसर, आस्थापुरःसर, इ०.

वशात्—दैववशात्, प्रसंगवशात्, इ०.

अनुसार—प्रसंगानुसार, कालानुसार. इ०.

**टीप**—यापासूनच वेळेनसार, कामानसार, हे मराठी अपभ्रंश झाले आहेत.

अनुरूप—गुणानुरूप, शक्त्यनुरूप, तदनुरूप, इ०.

उपात्त—प्रसंगोपात्त.

तः—यत्नतः, स्वरूपतः स्वतः उभयतः, इ०.

**टीप**—यापासून मराठी स्वतां, उभयतां, प्रथमतां, हे शब्द आले आहेत.

दा — सर्वदा, एकदा.

**टीप**—यापासून मराठींत 'दां' आला. एकदां, दोनदां, इ०

धा—बहुधा, द्विधा, शतधा.

शः—क्रमशः, शब्दशः, बहुशः, ( म० बहुशा ).

त्र—एकत्र, सर्वत्र, अन्यत्र.

**टीप**—अन्यत्र व सर्वत्र यांचा क्वचित् नामांप्रमाणेही उपयोग आढळतो. जसें:—सर्वत्रांस ( सर्वांस ) माझे नमस्कार, अन्यत्रांस ( अन्यांस, दुसऱ्यांस) याचा काय उपयोग? इ०. ह्या शब्दांचा हा उपयोग अर्थात् अज्ञानमूलक म्हणून त्याज्यच होय.

था—अन्यथा, सर्वथा.

वत्—तद्वत्, पूर्ववत्.

मात्र—पत्रमात्र, लवमात्र, बिंदुमात्र. ( म० काडीमात्र, तिळमात्र ).

चित्—कदाचित्, किंचित्, क्वचित्, इ०

( २ ) निवळ मराठी क्रियाविशेषणसाधन.

त, तां, तांनां—हंसत, नकळत, जातां, येतां, देतां, करतांनां, बोलतांनां.

ल्या—ल्यां—उठल्या—ल्यां, बसल्या, कांहीं केल्या, इ०.

ऊन—फिरून, मारून, मुटकून, लावून; मागून, पुढून, उंचून, लांबून, दुरून, एकूण, इ०.

चा—एकदांचा, केव्हांचा, दिवसाचा, सकाळचा, इ०.

पासून—आजपासून, मागपासून, अथपासून, इ०.

पावेतों—जोंपावेतों, येथपावेतों.

पर्यंत—उद्यांपर्यंत, जोंपर्यंत, कोठपर्यंत, इतिपर्यंत, इ०.

पेक्षां—ज्यापेक्षां, त्यापेक्षां.

पक्षीं—ज्यापक्षीं, त्यापक्षीं.

अर्थीं—ज्याअर्थीं, त्याअर्थीं.

ईं—पूर्वीं, सभोंवतीं, इ०.

**टीपः**—जधीं, तधीं, कधीं, जंई, तंई, कंई, इ०. कवीतेंतील रूपें अर्वाच साधलीं आहेत. त्यांचा प्रकार असाः—क(सं०—किम्, म०—कोण) ज (सं०—यत्, म०—जो ), त ( सं०—तत्, म०—तो ) ह्या सर्वनामांच्या मूळ रूपांपासून कधीं, जधीं, तधीं, कईं, जईं, तईं, हीं अव्ययें झालीं. त्याचप्रमाणें कें, जें, तें,

हीं आलीं. क, ज, त, यांप्रमाणें अ (सं०---एतत्, म०-- हा) यालाही कांहीं प्रत्यय लागून अव्ययें होतात. एथ, जेथ, तेथ, कोठ, हीं रूपें स्वतंत्रपणें प्रचलित शिष्ट मराठींत नाहींत. तरी एथपासून, जेथपासून, तेथपावेतों, कोठपर्यंत, इत्यादि ठिकाणीं त्यांचा उपयोग आढळतो. एथ, जेथ, तेथ, कोठ ( कुठ ), यांस एं व ए हे प्रत्यय लागून एथें, येथें, इथे; जेथें, जिथे; तेथें, तिथे; कोठें, कुठे; हीं रूपें आलीं. अ, क, ज, त, ह्या मूळ रूपांपासूनच पुढें दिलेलीं सर्व अव्ययें उत्पन्न झालीं आहेत हें सुज्ञ वाचकांचे ध्यानांत येईलच. जंव, तंव, जा, तों, जर, तर, जरी, तरी, जऱ्ही, तऱ्ही, एव्हां, केव्हां, जेव्हां, तेव्हां, एधवां, केधवां जेधवां, तेधवां, एंवी, केंवी, जेंवी, तेंवी, एवीं, केवीं, जेवीं, तेवीं, ( एम, केम--गुजराती ) जेम, तेम, आं, कां, इ०. एवंच, दर्शक, संबंधी, प्रश्नार्थक अव्ययें हीं त्याच प्रकारच्या सर्वनामांपासून साधलेलीं आहेत, हें उघड आहे.

कडे, कडेस—इकडे-स, पलीकडे-स.

कडून, कडनें—जिकडून, जिकडनें, अलीकडून, ऐलीकडनें.

वर—येथवर, तेथवर, जोंवर, ( तोंवरी ).

करून—जेणेंकरून, विकल्पेंकरून.

दां--एकदां, पुष्कळदां.

वार--एकवार, दोनवार, इसमवार, खानेवार. गांववार.

डाव--एकडाव, दोनडाव.

वेळ--अनेकवेळ-वेळा-वेळां.

सा-शी--से ( हे असा-शी-सें या शब्दांचे शेष होत. )-कांहींसा. मधाशीं, थोडेंसें.

आं--कडकडां, खदखदां, धडाडां.

या--घाबऱ्या, उभ्या, उपड्या.

कर, कन--झटकर, पटकन.

दीनीं, दिशीं--टुणदिनीं, चटदिशीं.

तीं—मागुतीं, पुढतीं, वरतीं, खालतीं.

भर--क्षणभर; दिवसभर.

ला—आजला, भोंवताला.

नां--एव्हांनां, उद्यांनां, परवांनां.

२१२. आतां सामासिक क्रियाविशेषणें म्हणजे मुख्य मुख्य अव्ययीभाव समास सांगतों. तथापि यांचें सविस्तर विवेचन समासाध्यायांत येईल.

( १ ) मराठींतील संस्कृत अव्ययीभाव समास.

प्रति——प्रतिक्षण, प्रत्यक्ष, प्रतिदिन.

यथा——यथाक्रम, यथाशक्ति.

निः——निःसंशय, निर्भ्रान्त ( म. निभ्रान्त ).

यावत्——यावज्जीव, यावच्चंद्रदिवाकरौ.

पर——परोक्ष, ( डोळयांचे आड ), अपरोक्ष, ( डोळयांदेखत ).

टीप——हे शब्द मराठींत अज्ञानानें उलट अर्थानें योजितात.

आ——आमरणान्त, आमरण.

सं——समक्ष.

वि——व्यर्थ.

( २ ) निवळ मराठी अव्ययीभाव समास.

( अ ) गांवोगांव, घरोघर, दारोदार.

टीप——हे कधीं कधीं ईकारान्तही आढळतात. जसें:——गांवोगांवीं, दारोदारीं, घरोघरीं मातीच्याच चुली इ०.

( आ ) रात्रंदिवस, गांवगन्ना, रानोमाळ, इ०.

टीप——यांस कृष्णशास्त्री गोडबोले द्वंद्वसमासांत घालितात ( नवीन व्याकरण क्र० ५९२ ब ). परंतु तें चुकीचें होय. कारण रूपावरून जरी तसा भास होण्याचा संभव असला तरी अर्थावरून आणि संस्कृत व्याकरणाचें सादृश्यावरून त्यांची अव्ययीभाव समासांतच गणना करणें चांगलें.

( ३ ) परकीय व धेडगुजरी अव्ययीभाव समास.

दर——दररोज, दरमजल, दरदिवस, दरशेंकडा.

हर——हररोज, हरघडी, हरवेळीं.

बिन——बिनहरकत, बिनचूक, बिनव्याजीं, बिनतोड.

बे——बेमालुम, बेशक, गैर——गैरकायदा, गैरहजर.

बर——बरहुकुम. नि——खालस.

२१३. कांहीं क्रियाविशेषणांचे अर्थासंबंधानें व उपयोगासंबंधानें वरील विवेचनांत उल्लेख आलाच आहे. आणखी कांहीं क्रियाविशेषणां-संबंधानें विशेष उल्लेख करणें जरूर आहे.

**परवां, तेरवा**—हीं दोन अर्थांनीं उपयोगांत आहेत. तीं गतकाल-सम्बन्धानें व भविष्य कालासंबंधानेंही उपयोगांत आहेत. पूर्वापरसंबंधानें आणि विशेषेंकरून क्रियापदाचे रूपावरून विशेष **अर्थ** कोणता हें समजतें. 'तो **परवां** आला', 'तो **तेरवां** जाणार', इ०.

**टीप**—हिंदीमध्ये 'कल' हा शब्द असाच काल आणि उद्यां या दोन्ही अर्थीं येतो. क्रियापदावरून विशेष अर्थ समजावयाचा.

**इकडे, तिकडे**—हे शब्द स्थितिवाचक आणि गतिवाचकही आहेत. उदा०—तें पुस्तक इकडे नाहीं, तिकडेच असेल; या वाक्यांत **इकडे** = **येथें**; **तिकडे** = **तेथें**. मुला इकडे ये, तिकडे जाऊं नको; या वाक्यांत, **इकडे** = **या बाजूस**; **तिकडे** = **त्या बाजूस**.

**पुढें, मागें, जवळ, समीप, दूर, लांब,** इ०—हीं स्थलवाचक आणि कालवाचकही आहेत. उदा०:—पुढें (स्थ० वा०) पाहून पाऊल टाक; **मागें** (स्थ० वा०) काय चाललें आहे हें प्रत्यक्ष कसें कळणार; कोत्या दृष्टीचे लोकांस पुस्तक **जवळ** (स्थ० वा०) धरावें लागतें. आणि वृद्ध मनुष्यांस तें **लांब** किं. **दूर** (स्थ० वा०) धरावें लागतें. परन्तु पुढील वाक्यांत हेच शब्द कालवाचक आहेत. आजपर्यंतचा काल मजेंत गेला, **पुढें** (का० वा०) काय होतें तें पहावें; **मागें** (का० वा०) असें घडल्याचें ऐकिवांत नाहीं; संक्रांत अद्याप **लांब** किंवा **दूर** (का०वा०) आहे; लग्नांचे दिवस **जवळ** (का० वा०) येत चालले.

**तर, तरी**—'जर' आणि 'जरी' हीं नेहमीं उभयान्वयी अव्ययें आहेत; आणि तत्संबंधानें येणारीं 'तर' आणि 'तरी' हीं उभयान्वयीं अव्ययेंच होत. परन्तु तर आणि तरी ह्यांचा जेव्हां स्वतंत्र, म्हणजे जर आणि जरी हीं पूर्वीं गेली नसतां किंवा अध्याहृतही नसतां, उपयोग होतो, तेव्हां तीं क्रियाविशेषणें असून त्यांचा अर्थही त्या वेळीं भिन्न असतो. तो असा:

(अ) तर = खरोखर, केवळ, इ०. उदा०—तुम्ही **तर** हजार रुपये मागतां आणि मी **तर** गरीब; तूं तें करितोसना?—होय करितों **तर**, इ०.

( आ ) **तरी** = निदान; उदा०:—या कृत्यास दोन हजार रुपये **तरी** लागतील; यंदां फार महागाई आहे, पुढल्या वर्षी **तरी** सुवत्ता होवो; इ०.

**एव्हां**—याचा बहुतेक **आतां** असाच अर्थ आहे. तरी **एव्हां** हें आतां-पेक्षां अधिक जोरदार आहे. म्हणजे त्याचा अर्थ '**आतांच**' 'इतक्यां-तच' असा आहे. उदा०:—मी नाहीं **एव्हां** येत, तुम्हीं पुढें चला.

**तेव्हां**—'त्या वेळीं' ह्या अर्थानें 'तेव्हां' हें आलें असतां तें क्रिया-विशेषणच होय; मात्र या अर्थानें तें 'जेव्हां' यास धरून येतें. परंतु कधीं कधीं 'तेव्हां' याचा 'म्हणून' असा अर्थ असतो; जसें:—तूं खोटें बोललास, तेव्हां ( म्हणून ) तुला शिक्षा करणें भाग आहे. या 'म्हणून' अर्थाचें 'तेव्हां' हें अर्थात् क्रियाविशेषण नसून उभयान्वयी अव्यय आहे हें उघड आहे.

**मग**—हें 'तेव्हां' या प्रमाणेंच क्रियाविशेषण व उभयान्वयी अव्यय आहे. 'मग' हें क्रियाविशेषण असतें तेव्हां त्याचा अर्थ **नंतर**, **पुढें**, **पश्चात्**, असा असतो. आणि तें उभयान्वयीं अव्यय असतें, तेव्हां त्याचा 'तर' 'त्या अर्थी' असा अर्थ असतो. उदा०:—त्याला आधीं जाऊं दे. **मग** ( नंतर ) तूं जा; रामानें हें उदाहरण केलें, मग ( तर ) तुला कां येऊं नये? यांपैकीं पहिल्या उदाहरणांतील **मग** हें क्रियेविशेषण आहे व दुसऱ्यांतील मग हें उभयान्वयी आहे.

**दिवसाढवळ्या**—हें रूप लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ह्यांत 'ढवळ्या' हें दिवसाचें विशेषण त्याचे पुढें येऊन 'दिवसाढवळ्या' हें सबंध क्रिया-विशेषण झालें आहे. त्याचा अर्थ उघडच आहे.

२१४. आतां संयुक्त द्विरुक्त इत्यादि कांहीं क्रियाविशेषणांकडे पहा:—

**कधीं कधीं**:—**मधून मधून**—**कांहीं कांहीं दिवसांनीं.** उदा:०— कधीं कधीं पत्रद्वारें समाचार कळवित असावें.

**जेव्हां जेव्हां**—**तेव्हां तेव्हां**:—ज्या ज्या वेळीं—त्या त्या वेळीं.

**जेव्हां तेव्हां**:—**सदोदित.** उदा०:—**जेव्हां तेव्हां** त्याचें असेंच.

**जेव्हां केव्हां**:—**कधीं कधीं.** 'जेव्हां केव्हां' हें क्वचित येतें.

**कधींही:**—**पूर्ण निषेधार्थक** वाक्यांत याचा उपयोग होतो. जसें:—असेंही **कधींही** ( कालत्रयीं ) घडावयाचें नाहीं.

**कधीं ना कधीं:**—**कधीं तरी, आज नाहीं तर उद्यां.** उदा०:—**कधीं ना कधीं** मरण हें आहेच.

**कधीं तरी, केव्हां तरी:**—ह्यांचा ' कधीं ना कधीं ' ह्याच अर्थानें उपयोग होतो.

**रोज रोज:**—दररोज.

**अर्थाअर्थीं:**—मुदलींच. उदा०:—त्याचा माझा **अर्थाअर्थीं** कांहीं संबंध नाहीं.

**जसा जसा—तसा तसा:**—ह्यांचे जागीं कधीं कधीं ' **जसाजसा, तसतसा** ' अशींही रूपें आढळतात. म्हणजे पहिलें तिन्ही लिंगीं **अकारान्त** होतें. हीं **उत्तरोत्तर उत्कर्ष** किंवा **अपकर्ष** दाखवितात. ह्यांप्रमाणेंच **कसा कसा** किंवा **कसकसा** ह्यांचाही उपयोग प्रश्नार्थक वाक्यांत होतो.

**वर वर:**—**स्थूलदृष्टीनें.** उदा०:—**वरवर** पाहणारास असें दिसेल कीं, त्याची प्रकृति निरोगी आहे; परंतु तो वास्तविक क्षयी आहे.

**उडत उडत, पडत पडत:**—द्विरुक्तीनें बहुधा **रीति** व **पौनःपुन्य** ह्यांचा बोध होतो. जसें असा **उडत उडत** कसा चालतोस? तो अडखळत **पडत पडत** चालला आहे.

**वाचतां वाचतां, पडतां पडतां:**—अशा **तां** प्रत्ययान्त कृदन्ताचे द्विरुक्तीनें ' क्रियेचें एकसारखें घडणें चाललें आहे. अशा वेळीं ' म्हणजे ' ती क्रिया घडत असतां ' असा बोध होतो. उदा०:—' तो **वाचतां वाचतां** निजला, ' म्हणजे ' वाचण्याची क्रिया चालली असतां. ' तसेंच ' तो **पडतां पडतां** वांचला ' म्हणजे ' पडण्याची क्रिया घडत असतां; ' इ०.

**बसल्या बसल्या, उभ्या उभ्या:**—इत्यादि स्वरूपाचे द्विरुक्तीनें त्या **क्रियेचें सातत्य,** किंवा देहाची अथवा मनाची **विशेष काळची स्थिति** ह्यांचा बोध होतो. जसें:—**बसल्या बसल्या** त्यानें तें पूर्ण केलें, **उभ्या उभ्या** मुततो, ती **घाबऱ्या घाबऱ्या** म्हणाली; इ०.

टीप—मागल्या व या दोन्ही प्रकारच्या द्विरुक्तीनें कधीं कधीं 'ती क्रिया होतांक्षणींच', लगेच, तत्काळ, असा अर्थ होतो. जसें:—मुलांस पडतां पडतां झोंप लागते, उभ्या उभ्यां मी तिकडे जाऊन येतों; इ०. पडतां पडतां= पडतां क्षणींच, पडल्याबरोबर; उभ्या उभ्या=न बसतां, न थांबतां.

**जेथें तेथें**:—सर्वत्र—उदा०:—जेथें तेथें असेंच आहे.

**जिकडे तिकडे**:—सर्वत्र; उदा०:—जिकडे तिकडे महागाई.

**येथून तेथून, जेथून तेथून**:—सर्व, एकंदर. उदा०:—मुलें म्हटलीं म्हणजे **येथून तेथून** ( किंवा **जेथून तेथून** ) सारखींच.

**कसें करून, कसेंही करून, कसें तरी करून**:—कोणत्याही प्रकारानें किंवा **कोणत्याही उपायानें**.

**आपाप, आपोआप, आपल्या आपण**:—दुसऱ्याचे मदतीशिवाय, स्वतःच, कांहीं एका उपायावांचून, इ०

**आपण होऊन, मी होऊन, तो होऊन**, इ०:—यांचाही 'दुसऱ्याचे मदतीशिवाय किंवा अपेक्षेशिवाय' 'स्वतः' असा अर्थ आहे.

**हां हां म्हणतां, होय ना करितां, वास्तविक म्हटलें म्हणजे, खरें पाहिलें तर**, इ०:—अशा ठिकाणीं संबंध वाक्यांशाच किंवा वाक्येंच क्रियाविशेषणांप्रमाणें उपयोगांत आहेत. त्यांतील शब्दांचें वेगळें वेगळें व्याकरण केलें तरी चालेल. तरी वाक्यमीमांसेचे दृष्टीनें ह्या संबंध वाक्यांशास किंवा वाक्यास संयुक्त **क्रियाविशेषण** म्हणणें अधिक प्रशस्त होय. अशाच प्रकारचीं आणखी उदाहरणें:—'इतकें झालें नाहीं तोंच.'- 'हें होतें न होतें तोंच', इ०.

[ क्रियाविशेषणांचें व्यवस्थित विवेचन कसें करावें हा थोडासा बिकट प्रश्न आहे. पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, कांहींकांचे मतें अव्ययांचे वेगळे वेगळे प्रकार मानण्याची जरूरी नाहीं. परंतु त्यांसही अव्ययांचें वर्गीकरण करून त्यांचे निरनिराळ्या कार्यांवरून पंचवीस एक मुख्य भेद मानणें अवश्य वाटतें; शिवाय क्रियाविशेषण, शब्दयोगी, वगैरे शब्दांचा उपयोग करावा लागलाच आहे. दुसऱ्या कांहींनीं तर क्रियाविशेषणांचा वर्ग अलग मानावा, बाकीचीं अव्ययें एकत्र सांगितलीं तरी हरकत नाहीं असें म्हटलें आहे. ह्यावरून क्रियाविशेषणांचें महत्त्व कळेलच. त्यांचें वर्गीकरण आम्हीं दोन तऱ्हांनीं केलें आहे. क्रियाविशेषणांपैकीं सिद्ध क्रियाविशेषणें कमतीच; साधितांचाच भरणा फार. आणि साधित क्रियाविशेषणें बहुतेक सर्व प्रकारच्या शब्दांपासून साधत असल्यामुळें त्यांचें स्वरूपावरून वर्गी-

करण करणें भाग पडलें. ह्यासंबंधानें एक मुद्दा विशेष महत्त्वाचा आहे, तो असाः सकाळीं, दिवसास, रात्रीचा, शेवटीं, आरंभीं, अंतीं, पहांटेस, इ० कालवाचक नामांचीं विभक्त्यन्त रूपें क्रियाविशेषणाचे अर्थानें उपयोगांत येतात ह्यांत संशय नाहीं. तेव्हां त्यांस क्रियाविशेषणें म्हणण्यास काय हरकत आहे ? ह्या प्रश्नाचें स्पष्ट उत्तर कोणीं दिलेलें आमचे पाहण्यांत नाहीं. तथापि, 'सकाळला, दिवसास, रात्रीस, अनशेपोटीं, शेवटीं, गतसालीं, पुरतेपणीं, चांगलेपणें' ह्यांस अव्ययें म्हणण्यास हरकत नाहीं असें दादोबांनी सांगितलें आहे. ते म्हणतातः—'कित्येक शब्दांस विभक्ति असतां त्यांचा प्रयोग शुद्ध अव्ययांप्रमाणें होतो; म्हणून त्यांस अव्ययेंच म्हटलें तरी चिंता नाही.' (क० ५६९). आणि हाच निकाल बहुतेक वैयाकरणांनी स्वीकारलेला आहे असें दिसतें. परंतु या मुद्याचा व्हावा तसा ऊहापोह झाला आहे असें दिसत नाहीं. विभक्त्यन्त शब्द नामें, सर्वनामें, आणि विशेषणें हे होत. ह्यांपैकीं विभक्त्यन्त सर्वनामांचा प्रयोग शुद्ध अव्ययांप्रमाणें बहुधा होत नाही. तेव्हां उरला प्रश्न काय तो नामांबद्दल आणि विशेषणांबद्दल. विशेषणांस मराठींत केवळ विशेषण या नात्यानें विभक्तिप्रत्यय बहुधा लागत नाहींत. त्यांचा जेव्हां नामांप्रमाणें उपयोग होतो तेव्हां त्यांस विभक्तिप्रत्यय लागतात. 'शहाण्यास मार शब्दांचा' इत्यादि स्थळीं 'शहाणा' यासारख्या मूळ विशेषणांस नामच म्हटलें पाहिजे हें उघड आहे. आणखी एका स्थळींही विशेषणांस विभक्तिप्रत्यय लागलेले आढळतात. 'तो इतक्यांत तेथें पोंचला, मोठ्यानें बोलला, मी हे तुला चवथ्यानें सांगतों आहे' इ० ठिकाणीं इतका, मोठा, चवथा, इ० मूळ विशेषणें नामांप्रमाणें उपयोगांत आलीं आहेत असें म्हणतां येत नाहीं. एवंच, या ठिकाणीं त्यांस विशेषणेंही म्हणतां येत नाहीं आणि नामेंही म्हणतां येत नाहीं हें निर्विवाद आहे. तसेंच या ठिकाणीं त्यांचा संबंध क्रियेकडे आहे हेंही उघड आहे. तीं मूळचीं विशेषणें असून, त्यांस दिसण्यांत जरी विभक्तिप्रत्यय लागलेले आहेत, तरी त्यांनीं क्रियेच्याच अर्थाचें परिपोषण होत असल्यामुळें आणि त्यांस प्रकृत स्थळीं विशेषण किंवा नाम ह्यांपैकीं कोणतेंच नांव देतां येत नसल्यामुळें त्यांस येथें क्रियाविशेषणें म्हणण्यास हरकत नाहीं; इतकेंच नव्हे, तर तसें करण्यावांचून अन्य गतिच नाहीं हें उघड आहे. म्हणून इतक्यांत, मोठ्यानें, इ० शब्दांस विभक्त्यन्त शब्द, किंवा या शब्दांतील त, नें, इत्यादिकांस विभक्ति प्रत्यय म्हणणें बरें नाहीं; तर ते प्रत्यय लागून इतका, मोठा, इ० विशेषणांपासून क्रियाविशेषणें साधतात, म्हणजे विशेषणांपासून क्रियाविशेषणें साधण्याचे ते तद्धित प्रत्यय होत असें म्हणणें अधिक प्रशस्त होय.

आतां फक्त विभक्त्यन्त नामांबद्दलचा प्रश्न उरला. दिवसास, रात्रीचा, अनशे-पोटीं, शेवटीं, गतसालीं, इ० यांस क्रियाविशेषणें म्हणावें असें दादोबा व बहुतेक

सर्व वैयाकरण म्हणत आहेत. परंतु ह्यांस जर क्रियाविशेषण अव्ययें म्हणावयाचें तर सायंकाळीं, ह्या वेळीं, त्या वेळीं पांच दिवसांनीं, आरंभीं, सुरवातीस, सुरवातीचे वेळीं, गेल्यावर्षी, दोन वर्षांनीं, इ० शेंकडों कालवाचक विभक्त्यन्त नामांस व शब्दसमुच्चयांस क्रियाविशेषण अव्ययें म्हणण्यास काय हरकत आहे ? सेकंड, मिनिटें, तास, पळें, घटी, प्रहर, दिवस, रात्र, आठवडा, पंधरवडा, महिना, वर्ष, इ० अर्थाची कालवाचक नामें भाषेत अगणित आहेत. त्यांस कांहीं विशेष विभक्तिप्रत्यय लागले म्हणजे जर क्रियाविशेषणें म्हणावयाचें तर घर, गांव, शहर, इ० हजारों स्थलवाचक नामांसही कांहीं विशेष विभक्तिप्रत्यय लागले असतां क्रियाविशेषण अव्ययें म्हणण्यास हरकत नसावी. ‘ तो रात्रीं मुंबईस पोंचला ’ या वाक्यांत ‘ रात्रीं ’ हें जर कालवाचक क्रियाविशेषण, तर ‘ मुंबईस ’ हें स्थलवाचक क्रियाविशेषण कां नव्हे बरें ? ‘ गतसालीं हिंदुस्थानांत प्लेगचा आजार फार फैलावला होता ’ या वाक्यांत ‘ गतसालीं ’ यास जर क्रियाविशेषण म्हणावयाचें तर ‘ हिंदुस्थानांत ह्यासही क्रियाविशेषण म्हणण्यास काय हरकत आहे ? चांगलेपणें, पुरतेपणें, हीं जर क्रियाविशेषणें, तर शहाणपणानें, शौर्यानें, आनंदानें सुखांत, दुःखांत, इ० हजारों भाववाचक विभक्त्यन्त नामांसही क्रियाविशेषणें म्हणण्यास हरकत नसली पाहिजे. कालवाचक नामांस, विभक्तिप्रत्यय लागले नसतांनाहीं, क्रियाविशेषणें म्हणण्यास दादोबा तयार आहेत ‘ कालवाचक नुसत्या शब्दांचा अथवा विशेषणांसहित असले तरी तशा शब्दांचा क्रियाविशेषणांप्रमाणें प्रयोग केलेला पुष्कळ ठिकाणीं आढळतो ’ ( पूरणिका क० १२५ ). उदा०:—एक महिना पाऊस पडला, त्यानें बारा महिने चाकरी केली, इ० ह्या ठिकाणचे कालवाचक शब्द जर क्रियाविशेषणें होत, तर ‘ तो पांच कोस चालून आला, ’ ‘ कापड चार हात भरलें ’ इ० ठिकाणचे कोस, हात, इ० स्थलवाचक, परिमाणवाचक वगैरे शब्द यांचीही क्रियाविशेषणांत कां भरती करूं नये ? असे प्रश्न साहजिक उत्पन्न होतात. आणि आजपर्यंतच्या मराठी वैयाकरणांनीं कांहीं ठिकाणीं जो निकाल दिलेला आहे म्हणून वर सांगितलें, त्या निकालास अनुसरून म्हणजे त्यांशीं जुळेल असा वरील प्रश्नांचा सुसंगत निकाल करावयाचा म्हटलें म्हणजे स्थलवाचक, गुणवाचक, कालवाचक, परिणामवाचक अशा हजारों नामांस कांहीं विभक्तिप्रत्यय लागले असतां किंवा नसतांही बऱ्याच ठिकाणीं क्रियाविशेषणें म्हणावें लागेल. वाक्यमीमांसेचे दृष्टीनें त्यांचा क्रियाविशेषणांप्रमाणें विधेयविस्तारांतच अन्तर्भाव झाला पाहिजे हें निर्विवाद आहे. तथापि वर निर्दिष्ट केलेल्या सर्व ठिकाणच्या नामांस क्रियाविशेषण म्हणण्यास वैयाकरण तयार नाहींत. अशी सरसकट एक जात एक व्यवस्था केलेली अन्य भाषांतही कोठें पाहण्यांत किंवा ऐकिवांत नाहीं. आणि वाक्यमीमांसेची दृष्टि व्याकरणाचे दृष्टीहून कांहींशी भिन्न आहे, म्हणून मराठी वैयाकरणांचे विरुद्ध निकाल करणें

प्राप्त आहे. आमच्या मतें नामांस कोठेंच क्रियाविशेषण म्हणणें प्रशस्त नाहीं, तर त्यांची जी विभक्ति असेल ती सांगून तिचा त्या त्या ठिकाणचा विशेष अर्थ सांगावा म्हणजे झालें. हें एकंदर व्याकरणव्यवस्थेस सुसंगत असून अर्थदृष्ट्याही गैर नाहीं. 'तो घरीं गेला,' 'तो ह्या वर्षी मुंबईस आहे' इ० ठिकाणीं घरीं, वर्षी, मुंबईस, ह्यांस विभक्त्यन्त नामें म्हणून त्या विभक्तीचा अर्थ अधिकरण असें ज्याप्रमाणें सांगतात, त्याचप्रमाणें सर्व ठिकाणीं करण्यास कांहीं एक प्रत्यवाय नाहीं; इतकेंच नव्हे, तर तसेंच करणें अधिक सुसंगत व सशास्त्र आहे हें उघड आहे. म्हणून वर क्रियाविशेषणांचे वर्गीकरणांत आम्हीं जीं अशा प्रकारचीं विभक्त्यन्त नामांचीं उदाहरणें दिलीं आहेत, तीं केवळ आजपर्यंतच्या रूढीस अनुसरून होत. वाक्यमीमांसेचे दृष्टीनें त्यांत कांहीं गैर नाहीं. तथापि केवळ व्याकरणाचे दृष्टीनें अशा शब्दांस क्रियाविशेषणें म्हणणें प्रशस्त नाहीं असें आमचें मत आहे.

कांहीं संस्कृत नामांचीं संस्कृत विभक्त्यन्त रूपें मराठींत क्रियाविशेषणाप्रमाणें प्रचलित आहेत. त्यांस वरील नियम लागू नाहीं. त्या विभक्ति मराठी व्याकरणास अपरिचित असल्यामुळें अशा संस्कृत विभक्त्यन्त नामांस क्रियाविशेषणच म्हणणें बरें. उदा०—लोकरीत्या, शास्त्रदृष्ट्यां, जात्या, बुध्या, दैववशात्, प्रसंगवशात्, आदौ, इ०. मराठींमध्यें जीं कांहीं समासघटित अव्ययें आहेत तीं मात्र वरील नियमास अपवादक समजलीं पाहिजेत. हे समास अव्ययीभावच आहेत; म्हणजे त्यांस क्रियाविशेषण अव्ययेंच म्हणावयाचें हें उघड आहे. हे समास वर (अंक २१२) दिलेच आहेत. त्यांपैकीं संस्कृत समासांबद्दल शंकाच नाहीं. परंतु निवळ मराठी, परकीय व भेसळगुजरी म्हणून जे आहेत त्यांपैकीं कांहीं समास विभक्तिप्रत्ययान्त दिसतात; तेव्हां त्यांस अव्ययें कां म्हणावें ? अशी शंका उत्पन्न होणें गैर नाहीं. घरोघर, देशोदेश, वर्षोवर्ष, दररोज, दरवर्ष, इ० शब्दांस अव्ययें म्हणण्यास जरी हरकत नाहीं, तथापि जेव्हां त्यांस विभक्तिप्रत्यय लागून घरोघरीं, देशोदेशा, दरवर्षी अशीं रूपें होतात, तेव्हां त्यास क्रियाविशेषण अव्ययें कसें म्हणावें ? या शंकेचें समाधान असें कीं, वास्तविक या समासांस विभक्तिप्रत्यय लागण्याची जरूर नाहीं. म्हणजे घरोघरीं गेला, देशोदेशीं हिंडला, दरवर्षी येतो, असें म्हणण्याचे जागीं घरोघर गेला, देशोदेश हिंडला, दरवर्ष येतो, असेंही म्हणतात, आणि असेंच म्हणण्याचा विशेष प्रचार दिसतो. यावरून हे समास वास्तविक अव्ययीभाव होत व त्यांस विभक्तिप्रत्यय लावण्याची आवश्यकता नाहीं; इतकेंच नव्हे, तर तें व्याकरणदृष्ट्या अनियमितच होय. संस्कृतांतही असा थोडासा प्रकार आहे हें तज्ज्ञांस स्मरेलच. म्हणून या अव्ययीभाव समासांचीं जीं कांहीं विभक्त्यन्त रूपें आढळतात, त्यांसही अव्ययेंच म्हणणें चांगलें. ज्याप्रमाणें इकडे, तिकडे इ० कांहीं क्रियाविशेषणांस विभक्ति

अव्यय लागून इकडून, इकडेस, इ० जीं विभक्त्यन्तें रूपें आढळतात, त्यांस क्रियाविशेषण अव्ययेंच म्हणतात; त्याचप्रमाणें घरोघर, देशोदेश, इ० अव्ययीभाव समासांपासून होणारीं घरोघरीं, देशोदेशीं, इ० हीं विभक्त्यन्त रूपेंही अव्ययेंच होत असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. एवंच अव्ययांवरून कांहीं विभक्तिप्रत्यय होऊन जे शब्द बनतात तीं अव्ययेंच होत.

आतां अर्थावरून क्रियाविशेषणांचे भेद करावयाचे म्हटलें तर येथेंही विशेषणांप्रमाणेंच कांहीं अशी स्थिति आहे. म्हणजे विशेषणें जशीं वास्तविक म्हटलें असतां सर्वच गुणवाचक होत, तशीं क्रियाविशेषणेंसुद्धां सर्वच रीतिवाचक होत. तथापि ज्याप्रमाणें विशेषणांचे गुणवाचक आणि संख्यावाचक असे दोन मुख्य भेद मानणें इष्ट आहे असें सांगितलें, त्याचप्रमाणें क्रियाविशेषणांचेही अशा प्रकारचे दोन भेद मानणें इष्ट आहे. मात्र संख्याविशेषणांचे उपभेद आणि तशाच प्रकारच्या क्रियाविशेषणांचे उपभेद एक नाहींत. यांमध्यें फरक आहे, आणि तो अवश्य आहे, असें त्यांचे तुलनेवरून दिसून येईल. एवंच संख्याविशेषणांचे जे उपभेद मानिले आहेत त्यांसारखे क्रियाविशेषणांचे उपभेद सर्वच मानितां यावयाचे नाहींत आणि बाकीचे विशेष महत्त्वाचे नाहींत असेंच आढळून येईल. आणि असें होणें स्वाभाविक आहे. कारण कीं, प्राणी आणि पदार्थ ह्यांची गणना जशी महत्त्वाची आहे तशी क्रियेची गणना महत्त्वाची नाहीं. परंतु क्रियेसंबंधानें स्थल व काल हीं दोन फार महत्त्वाचीं आहेत. म्हणून स्थलवाचक आणि कालवाचक असे क्रियाविशेषणांचे आणखी दोन भेद मानणें अवश्य आहे. एवंच क्रियाविशेषणांचे स्थलवाचक, कालवाचक, संख्यावाचक किंवा परिणामवाचक, आणि रीतिवाचक असे मुख्य चार भेद कल्पिले आहेत. त्यांचे उपभेदही अर्थानुरोधानें सांगितले आहेत. ते अर्थाची सूक्ष्म भिन्नता दाखवितात. रीतिवाचकांचे जर उपभेद करावयाचे म्हटलें तर ते पुष्कळच होतील; शिवाय त्यांचा कोणत्याही दृष्टीनें विशेष उपयोग नाहीं. म्हणून गुणवाचक विशेषणांप्रमाणें रीतिवाचक क्रियाविशेषणें हा वर्ग अमर्यादच म्हणावयाचा. मात्र रीतिवाचक क्रियाविशेषणांमध्यें अनुकरणवाचक क्रियाविशेषणांचा मराठींत बराच मोठा भरणा असून, त्यांचा वारंवार उपयोग होत असल्यामुळें त्यांचाही एक स्वतंत्र भेद मानण्याची चाल आहे. ]

---

## अध्याय ७.

## शब्दयोगी अव्ययें.

२१५. जीं अव्ययें नामें आणि नामांप्रमाणें योजिलेले इतर शब्द ह्यांचे पुढें येऊन त्यांचा वाक्यांतील इतर शब्दांशीं संबंध दाखवितात

त्यांस **शब्दयोगी अव्ययें** असें म्हणतात. ( ह्यांपैकीं शुद्ध शब्दयोगी अव्ययें मात्र केवलप्रयोगी अव्ययांशिवाय इतर सर्व शब्दांपुढें येतात. ) जसें:— विद्यार्थ्याचें अभ्यासा**वर** किंवा अभ्यासा**कडे** लक्ष असलें पाहिजे. मनुष्याची किंमत त्याचे स्वभावा**वर** अवलंबून आहे. या वाक्यांत **वर** आणि **कडे** हीं शब्दयोगी अव्ययें 'अभ्यास' आणि 'स्वभाव' या नामांपुढें येऊन त्यांचा अनुक्रमें 'लक्ष' आणि 'अवलंबून' ह्या शब्दांशीं संबंध दाखवितात आहेत.

२१६. कांहीं स्थलवाचक आणि कालवाचक अव्ययें क्रियाविशेषणेंही असतात आणि शब्दयोगीही असतात. तीं ज्या वेळीं नामांपुढें येतात तेव्हां त्यांस शब्दयोगी अव्ययें म्हणतात; आणि जेव्हां तीं कशासही जोडलीं न जातां स्वतंत्रपणें वाक्यांत येतात, तेव्हां त्यांस क्रियाविशेषणें म्हणावें. उदा:—तो माडी**वर** ( श० अ० ) आहे; त्यानें हात **वर** ( क्रि० अ० ) केला; त्याचा पाय फांदी**वरून** ( श० अ० ) घसरून तो झाडाखालीं ( श० अ० ) आला, तूं **वरून** ( क्रि० अ० ) **खालीं** ( क्रि० वि० ) ये; स्नानाचे **आधीं** ( श० अ० ) तोंड धू, मुखमार्जना**नंतर** ( श० अ० ) स्नान कर; **आधीं** ( क्रि० वि० ) तोंड धू आणि **नंतर** ( क्रि० अ० ) स्नान कर; इ०.

२१७. शब्दयोगी अव्ययांचें वर्गीकरण करण्याची विशेष आवश्यकता नाहीं. तथापि अर्थास अनुसरून त्यांची वर्गवार यादी पुढें दिल्याप्रमाणें:—

## कालवाचक.

| | |
|---|---|
| आंत. | पर्यंत, पावेतों, ( वेरीं. ) |
| पुढें, नंतर. | अगोदर, पूर्वीं, आधीं, अलिकडे. |
| वर, उपर. | आड, अंतीं. |

## स्थलवाचक.

| | |
|---|---|
| आंत, ठायीं. | बाहेर. |
| मध्यें, ( मधीं, माजीं. माझारीं, भितरीं ) | जवळ, पाशीं, नजीक. शेजारीं, निकट, सांनिध. समीप, संनिकृष्ट, ( पासाव ). |

समक्ष, अपरोक्ष, देखत. | मागें, पिछाडीस.
देखतां, पुढें, समोर. | अलीकडे; कडे.
परोक्ष; खालीं; वर. | पलीकडे; पुढें.
| सभोंवता, भोंवता, आसपास, भोंवतालीं, वाटोळा, भोंवती.
येथें; तेथें.

## गतिवाचक.

आंतून, वाटे, मधून. | पर्यंत, पावेतों, तागाईत.
कडे, कडेस, कडून. | वरून; खालून.
पासून. | मधून.

**नियोजत्ववाचकः**—कडून, करवीं, द्वारा, द्वारें, हातीं, हातून.

**साधनवाचकः**—वारीं, मुळें, योगें, करून.

## हेतुवाचक.

अर्थीं, निमित्त, साठीं, करणें, करितां, स्तव, अर्थ, प्रीत्यर्थ, खातर.

**विषयवाचकः**—विषयीं, विशीं, संबंधीं.

**व्यतिरेकवाचकः**—खेरीज, शिवाय, वांचून, विना, ( वीण, विणें ), व्यतिरिक्त, विरहित, परता, वेगळा, निराळा.

**भागवाचकः**—पैकीं, आंतून, पोटीं.

**विनिमयवाचकः**—बद्दल, बदला, ऐवजीं, मोबदला, जागीं.

## योग्यता–सादृश्य–अनुरोध–इत्यादिवाचक.

सम, ( परी ), जोगा, समान, योग्य, सरसा, सारखा, प्रमाणें, बरहुकूम, अनुसार.

**विरोधवाचकः**—विरुद्ध, उलट, उलटें.

**साहचर्यवाचकः**—बरोबर, संगें, संगतीं, सांगातीं, ( सवें ), सकट, संह, सहित, सहवर्तमान, समवेत, निशीं.

**अभिव्याप्तिवाचक** किंवा **संग्रहवाचकः**—सुद्धां, देखील, ही, पण, तरीत.

## अन्यव्यावृत्तिवाचक किंवा कैवल्यवाचक.

च, मात्र, ना, पण, बरीक, केवळ, फक्त.

परिणामवाचकः--भर.

दिग्वाचकः--प्रत, प्रति, लागीं, कडे.

पूर्णतावाचकः--पुरता, पुरेसा.

तुलनावाचक.

उत्तरवाचक--पेक्षां, परीस. उत्तमवाचक--आंत, मध्यें, (माजी).

प्रश्नार्थकः--कां, कीं, ना,

पादपूरकः--( पैं ), नी, न.

कंसांत दाखविलेलीं अव्ययें बहुधा कवितेंत येतात. एकाच ओळींतील अव्ययें बहुधा समानार्थक किंवा जवळ जवळ समानार्थक आहेत.

२१८. ज्याप्रमाणें कांहीं शब्दयोगी अव्ययें क्रियाविशेषणेंही आहेत, (अ० २१६) त्याप्रमाणें कांहीं मूळचीं विशेषणें आहेत. ह्यांपैकीं जीं आकारान्त आहेत तीं विशेष्यनिघ्न आहेत; अर्थात् तीं पुढें येणाऱ्या नामांच्या म्हणजे विशेष्याचा लिंगवचनाप्रमाणें बदलतात. जसें:--त्या मनुष्याच्या **भोंवतें** दहाजण उभे होते; त्याला त्याच्या**सारखीच** बायको मिळाली आहे; माझ्या**पुरतें** मजपाशी आहे; नामा**निराळीं;** मुलखा-वेगळा, इ०. आणखी उदाहरणें:--तुल्य, समान, विरुद्ध, जोगा, उलटा, पुरता. इ०.

टीपः--बदला, मोबदला, विना, ना, हीं शब्दयोगी अव्ययें आकारान्त असूनही बदलत नाहींत. त्यांचा विशेषणांप्रमाणेही उपयोग होत नाहीं. उ०:--त्याला त्याच्या मोबदला दोन आंबे मिळाले, इ०.

२१९. **पासून, पर्यंत,** व **पावेतो,** हीं शब्दयोगी अव्ययें स्थलवाचक व कालवाचक क्रियाविशेषणांपुढें येऊन साधित क्रियाविशेषणें होतात. जसें:--कालपासून; जेव्हां--तेव्हां--पासून; जेथ--तेथ--पासून, पर्यंत, किंवा पावेतों; इ०.

(अ) हीं शब्दयोगी अव्ययें पुढें येतांनां क्रियाविशेषणांच्या अन्तींच्या एं व ईं ह्या स्वरांस अ हा आदेश होतो. जसें:--कोठें+पासून=कोठपासून खालीं+ पावेतों=खालपावेतो; इ०.

अपवाद--आधींपासून, पूर्वींपासून, कधींपासून.

टीप---हीं शब्दयोगी-अव्ययान्त क्रियाविशेषणें क्रियाविशेषणेंच होत. त्याचप्रमाणें शब्दयोगी-अव्ययान्त कोणताही शब्द प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतिनें क्रियापदाशीं संबंध पावत असल्यामुळें सर्व शब्दयोगी-अव्ययान्त शब्द वाक्यमीमांसेचे दृष्टीनें क्रियाविशेषणेंच होत. तो घरावर चढला, ब्राह्मण जेवल्यानंतर हजामत करवित नाहींत, तो माझ्याविरुद्ध बोलला, इ०. या वाक्यांत ' घरावर,' ' जेवणानंतर,' ' माझ्याविरुद्ध ' या शब्दांचा 'चढला,' ' करवित नाहींत,' ' बोलला ' या क्रियापदांशीं संबंध आहे हें उघड आहे. म्हणून त्या दृष्टीनें हे शब्द क्रियाविशेषणेंच होत. आणि जरी केवळ व्याकरणाचे दृष्टीनें त्यांस साफ क्रियाविशेषणें म्हणणें प्रशस्त नाहीं, तरी वाक्यमीमांसेचे दृष्टीनें हा मुद्दा विशेष महत्त्वाचा व संस्मरणीय आहे. म्हणूनच त्याचा येथें मुद्दाम उल्लेख केला आहे. आगरकर म्हणतात:---' मराठींत अनेक प्रकारचीं शब्दयोगी अव्ययें आहेत. त्यांचा नामांशीं किंवा नामार्थक कोणत्याही प्रकारच्या शब्दांशीं संयोग झाला कीं, त्यांपासून क्रियाविशेषणें उत्पन्न होतात............या सर्व प्रकारच्या शब्दयोगी अव्ययांचा नामार्थक शब्दांशीं संयोग होऊन क्रियाविशेषणें होतात ' ( वाक्यमीमांसा, पृ० ७५, ७६ ). ह्याच पुस्तकाचे प्रस्तावनेंतही ( वा० मी० पृ० ७ ) ते ह्याच अभिप्राय प्रकट करितात. ' शब्दयोगी अव्ययांचा शब्दांशीं संयोग होऊन त्यांपासून क्रियाविशेषणें उत्पन्न होतात.'

२२०. पर्यंत, पावेतों, तों, हीं शब्दयोगी अव्ययें धातूच्या ई आख्याताचे म्हणजे रीतिभूतकाळाच्या रूपांपुढेंही येतात. जसें:---जाईपर्यंत, लिहीपर्यंत, जेवेपर्यंत, येईपर्यंत, येतपर्यंत, इ०.

टीप---या शब्दयोगी अव्ययांचे योगानें मागील क्रियापदास कांहीं एक विकार होत नाहीं; म्हणजे क्रियापद अविकृत राहून तीं त्याचेपुढें येतात. अशा ठिकाणचें शब्दयोगी अव्यय केवळ क्रियापदाचेनंतर आलेलें नसून तें क्रियापद ज्या वाक्यांतील असेल, त्या वाक्याचा नामाप्रमाणें उपयोग होऊन त्याचे पुढें तें आलेलें असतें. याचा सविस्तर खुलासा पुढें होईल.

२२१. क्वचित् उभयान्वयी-अव्ययापुढेंही शब्दयोगी येतें. जसें:---जरकरितां. हें सबंध उभयान्वयी अव्ययच आहे.

टीप---यावरून कांहीं शब्दयोगी अव्ययें नामार्थक शब्दांशिवाय इतर शब्दांपुढेंही येतात असें दिसेल. अशा स्थलीं मागील शब्द नामाप्रमाणें योजिलेला असतो. पण शुद्ध शब्दयोगी अव्ययें मात्र प्रथम सांगितल्याप्रमाणें केवलप्रयोगी अव्ययावांचून इतर वाटेल त्या शब्दापुढें येतात. यांचा सविस्तर खुलासा पुढें अंक २२५ अपवाद ४ ) पहावा.

२२२. शब्दयोगी अव्ययांचे यादीकडे पाहिलें म्हणजे असे दिसून येईल कीं, त्यांमध्यें मूळचीं म्हणजे सिद्ध शब्दयोगी अव्ययें थोडीं असून बरींचशीं मूळ नामांपासून विभक्तिप्रत्ययांनीं साधलेलीं आहेत. हीं मूळ नामें सर्वच प्रचलित भाषेंत दिसत नाहींत; तथापि कांहीं कांहीं अद्याप आढळतात. कांहीं शब्दयोगी अव्ययें नामेतर शब्दांपासूनही साधलेलीं आहेत.

( अ ) प्रचलित नामांपासून साधलेलीं:—

| | | |
|---|---|---|
| ठाय—ठायीं. | विषय—विषयीं. | संबंध—संबंधीं. |
| मध्य—मध्यें. | योग—योगें. | शेजार—शेजारीं. |
| कड—कडेस, कडून. | प्रमाण—प्रमाणें. | अर्थ—अर्थीं. |
| कारण—कारणें. | मूळ—मुळें. | द्वार—द्वारें, द्वारां. |
| इ०. | इ०. | इ०. |

( आ ) ज्यांतील मूळ नामें फारशीं प्रचारांत नाहींत तीं:—

पास ( सं० पार्श्व—प्रा० पास्स )—पाशीं, पासून

माग ( सं० मार्ग—प्रा० मग्गो )—मागें, मागून, मागां,

( इ ) क्रियापदसाधित:—

पावे ( पोंचे, प्राप्त होई. ) + तों = पावेतों

( ई ) धातुसाधित:—

देख ( 'देख'=पहा; हा धातु मराठींत व स्वतंत्रपणें आढळत नाहीं; हिंदींत आहे. ) —देखत, देखतां.

कर—करितां, करून

लाग—लागीं, लागून

इ०.

( उ ) कांहीं विशेषणें आहेत:—

सम, समान, सारखा. योग्य, जोगा.

भोवता, वाटोळा. इ०.

अव्ययें आहेत:—परोक्ष, समक्ष, विना, प्रति,

।, संनिकृष्ट, संनित, इ०.

(ऋ) गतिवाचक शब्दयोगी अव्ययेंही मूळ स्थलवाचकांसच ऊन प्रत्यय लागून झालेलीं आहेत. उदा:—

| | |
|---|---|
| वर—वरून | खालीं—खालून |
| आंत—आंतून | समोर—समोरून |
| बाहेर—बाहेरून | जवळ—जवळून |
| इ० | इ० |

टीप १—मागें, पाशीं, कडे, हीं जशीं मूळचीं माग, पास, कड, यांपासून झालेलीं विभक्त्यन्त रूपें होत, म्हणजे त्यांतील मूळ शब्द अकारान्त होत, त्याप्रमाणें खालीं, पुढें, ह्यांमध्येंही मूळ शब्द खाल, पुढ, असे अकारान्त असावे असें वाटतें. खालतीं, खालचा, खालील, खालनें, खालून, पुढतीं, पुढचा, पुढील, पुढनें, पुढून, ह्या त्याच मूळापसून निघालेल्या इतर शब्दांकडे पाहिलें म्हणजे ह्या सर्वांचें मूळ आरंभीं अकारान्त असावें ह्या तर्कास बळकटी प्राप्त होते. आणि खालपासून, खालपावेतों, इ० प्रचलित प्रयोग पाहिले, म्हणजे तर प्रकृत मुद्यासंबंधानें शंकाच उरत नाहीं, असें म्हटलें तरी चालेल.

टीप २—कांहीं स्थितिवाचक क्रियाविशेषणांस ऊन प्रत्यय लागून गत्यारंभवाचक क्रियाविशेषणें होतात. त्यांमध्यें वर दिलेल्या शब्दयोगी अव्ययांचीं उदाहरणेंही आलीं आहेत. कारण हींच पूर्वींच्या नामार्थक शब्दांशिवाय वाक्यांत आलीं म्हणजे क्रियाविशेषणें होतात, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. परंतु ह्यांशिवाय गत्यारंभवाचकांचें यादींत आणखीं कांहीं ऊन प्रत्ययान्त क्रियाविशेषणें आहेत; तीं:—जेथून, तेथून, येथून, कोठून, ह्यांचें व जेथें, तेथें, येथें, कोठें, ह्या प्रचलित शब्दांचें पहिलें मूळ जेथ, तेथ, येथ, कोठ, असें अकारान्तच आहे असें क्रियाविशेषणाध्यायांत सविस्तर दाखविलेंच आहे. हीं अकारान्त मुळें जरी प्रचलित शिष्ट गद्यांत स्वतंत्रपणें आढळत नाहींत, तरी कवितेंत आणि प्रांतिक भाषेंत बरींच येतात. जातां जातां आणखी एक गोष्ट सुचते; तीही येथेंच नमूद करून ठेवितों. प्रकृत शब्दांचीं जिथे तिथे इथे, कुठे, अशीं जीं रूपें व्यावहारिक भाषेंत आढळतात तीं जरी प्रचलित लेखी भाषेंत किंवा ग्रंथांत येत नाहींत तरी तीं जेथें, तेथ, येथें, कोठें, या प्रचलित शिष्ट रूपांपेक्षां मूळास अधिक जवळ आहेत हें उघड आहे.

टीप ३—घरून, गांवून, हातून, तोंडून, इ० शब्द ह्याच प्रकारचे आहेत. म्हणजे घर, गांव, हात, तोंड, या मूळ नामांस ऊन प्रत्यय लागून झालेले आहेत. ह्यांपैकीं हातून, तोंडून, ह्यांस शब्दयोगी अव्ययें म्हणण्याचा प्रघात आहे. परंतु घरून, गांवून, ह्यांस अद्याप शब्दयोगी अव्ययें हें नांव कोणी देत नाहीं. हातून, तोंडून, हीं षष्ठीच्या रूपांपुढें येऊन त्यांचें सामान्यरूप करितात. जसें:—रामाच्या हातून, त्याच्या तोंडून, इ०. ह्याचें कारण तीं प्रचलित नामांपासून साध-

लेलीं आहेत हेंच होय. ह्यामुळेंच तीं केवळ नामाच्या सामान्यरूपापुढें येत नाहीत; तर सविकरण सामान्यरूपापुढें येतात.

२२३. कित्येक स्थलवाचक व कालवाचक शब्दयोगी अव्ययांस **चा** व **ला** हे लिंगवचनान्वयें बदलणारे आणि **ईल** हे प्रत्यय लागून त्यांजपासून कांहीं विशेषणें साधतात. जसें:—वरचा, पुढचा, मागला, पलीकडला, समोरलें, आंतील, पुढील, इ०. (ह्या रूपांची साधनिका साधित शब्दविचारांत पहावी.)

(अ) हीं जरी विशेषणें झालीं, तरी त्यांचें शब्दयोगी अव्ययत्व पूर्णपणें नाहींसें होत नाहीं, तर तीं शब्दयोगी अव्ययांप्रमाणेंच नामार्थक शब्दांपुढें येऊन त्या शब्दांचें ह्यांचे योगें सामान्यरूप होतें. जसें:— **घरापुढचा** भाग, **रस्त्यापलीकडली** जागा. **त्याच्यापुढील** महिन्यांत इ०.

२२४. शब्दयोगी अव्ययांचे योगानें मागील नामांचें व सर्वनामांचें 'बहुधा' सामान्यरूप होतें. जसें:—घरावर, शेतामध्यें, शाळेपासून पुस्तकांसह, इ०.

टीपः—सामान्यरूपाबद्दलचे नियम विभक्तिप्रकरणांत येतील. पूर्वींच्या शब्दांचें सामान्यरूप होण्याचें कारण व्युत्पत्तिदृष्ट्या असें दिसतें का, संस्कृत भाषेंत शब्दयोगी अव्ययें नामांचेपुढें येण्याचे वेळीं त्या नामांस निरनिराळ्या विभक्ति होतात. उदाहरणार्थः—ग्रामं, प्रति, देवं—देवेन—देवात्—विना, पुत्रेण सह, गृहस्योपरि इ०. या निरनिराळ्या विभक्तींचे जागीं मराठींत सर्वत्र सामान्यरूप (हें मूळ षष्ठी विभक्ति होय) येऊं लागलें. तथापि मराठींतही संस्कृत नियम क्वचित् आढळतो; नाहीं असें नाहीं.

(अ) 'करून' या शब्दयोगी अव्ययाचे मागील नामाची तृतीया होते. जसें:—जेणेंकरून, तेणेंकरून, त्यांहींकरून, सामर्थ्येंकरून, विशेषेंकरून, मुख्यत्वेंकरून, प्राधान्येंकरून, इ०.

टीप—'करून' हें करणवाचकच अव्यय आहे. त्यानें मागील तृतीयेस जोरदारपणा व भारदस्तपणा येतो. म्हणून या शब्दयोगी अव्ययाचा उपयोग बहुतकरून प्रौढ भाषेंत विशेष आढळतो.

(आ) 'प्रमाणें' ह्याचे पूर्वींही क्वचित् तृतीया येते. जसें:—येणेंप्रमाणें, तेणेंप्रमाणें, इ०.

(इ) विना, विणें, वांचून, पाडें, ह्या शब्दयोगी अव्ययांचे मागील नामेंही कवितेंत क्वचित् तृतीयान्त आढळतात. जसें:--

आपुला तो एक, देव करुनी ध्यावा, **तेणेंविणें** जीवा, सुख नोहे।

---तुकाराम.---

अर्जुना **तेणेंपाडें**, जया विषयवार्ता नावडे---ज्ञानेश्वर.

**टीप**--' करून ' या शब्दयोगी अव्ययानें जसा तृतीयेचा करण हा अर्थ उत्पन्न होतो, त्याचप्रमाणें निरनिराळ्या शब्दयोगी अव्ययांनीं निरनिराळ्या विभक्तींचीं कार्यें भागतात. म्हणजे विभक्तिप्रत्ययांचे जागीं शब्दयोगी अव्ययांचाही कधीं कधीं उपयोग होतो. उदा०:--तो **त्याला** अथवा **त्याप्रत** म्हणाला, तुझ्या **पैशानें** अ० **पैशामुळें** माझें कार्य झालें, इ० कोण कोणत्या विभक्तींचे जागीं कोणकोणतीं शब्दयोगी अव्ययें साधारणपणें येऊं शकतात हें विभक्तिप्रकरणीं देण्यांत येईल. शब्दयोगी अव्ययांनीं विभक्तींचीं कार्यें होणें हें अर्थदृष्ट्या जसें साहजिक आहे, तसेंच भाषाशास्त्रदृष्ट्याही स्वाभाविक आहे. कारण कीं, विभक्तिप्रत्यय हे मूळ शब्दयोगी अव्ययांपासूनच संक्षेपानें किंवा छाटाछाटीनें उत्पन्न झाले आहेत; असें भाषाशास्त्रज्ञांचें मत आहे. मराठींतील विभक्तिप्रत्ययांकडे जरी पाहिलें तरी वरील सिद्धान्ताचें स्पष्टीकरण अल्पांशीं तरी होईलच. सप्तमीचा प्रत्यय ँत हा ' आंत ' या शब्दयोगी अव्ययाचा शेष आहे हें उघड आहे. तेव्हां शब्दयोगी अव्ययांनीं विभक्तींचीं कार्यें व्हावीं हें योग्यच आहे विभक्तिप्रत्यय हे मूळचीं शब्दयोगी अव्ययेंच होत हें खरें; तथापि आतां त्या दोहोंमध्यें थोडासा फरक आहे. विभक्तिप्रत्यय हे स्वतंत्र शब्द नसून दिसण्यांत अर्थहीन दिसतात; परंतु शब्दयोगी अव्ययें स्वतंत्र शब्द समजले जात असून, त्यांस स्वतःचा अर्थ आहे हें उघड आहे.

२२५. शब्दयोगी अव्ययांचे योगानें मागील नामांचें सामान्यरूप होण्याचा नियम निरपवाद नाहीं, हें त्यांतील ' बहुधा ' या शब्दावरून कळेलच. त्या नियमाचे अपवाद पुढें दिल्याप्रमाणें:---

[ ह्या अपवादांबद्दल प्रथम मुख्य मुख्य वैयाकरणांचे कांहीं कांहीं नियम पाहूं. पावेतों, पर्यंत या शब्दयोगी अव्ययांनीं मागील शब्दांचीं ' सामान्यरूपें निरंतर होत नाहींत; परंतु बहुधा ते कालवाचक असले तर ' असें **दादोबा** म्हणतात. ' जसें:--- दोन महिनेपावेतों, चार दिवसपर्यंत, सकाळपर्यंत, इ०. ' ( क ५७६ ).

याच विषयासंबंधानें कृष्णशास्त्री **चिपळूणकर** म्हणतात कीं, पावेतों हें पावे+तों असें साधलें आहे. ' तळेगांवपावेतों मी तुमच्याबरोबर येतों,' ' माघपावेतों मी पुण्यांत आहे ' इत्यादि वाक्यांत पावे हें क्रियापद धरून चाललें तरी अर्थ जुळतो. ' आणि पावे हें

क्रियापद असल्यामुळें तळेगांव व माघ या शब्दांस सामान्यरूपही झालें नाहीं. तसेंच पर्यंत शब्द पुढें लागला असतांही कधीं कधीं मागच्या शब्दास सामान्यरूप करीत नाहीं. जसें:--तो तळेगांव-पर्यंत मजबरोबर होता, थंडी माघपर्यंत असते.' परंतु कधीं कधीं तळेगांवपर्यंत, माघापर्यंत असेही प्रयोग होतात. नंतर कृष्णशास्त्री म्हणतात कीं, पर्यंत शब्दाच्या मागील सामान्यरूपाचा विकल्प 'अकारान्त शब्दांस मात्र लागू आहे. आकारान्त किंवा एकारान्त शब्द असल्यास त्यांस पर्यंत शब्दयोगीमुळें सामान्यरूप नियमानें होतें.' जसें:--राजवाड्यापर्यंत, पुण्यापर्यंत, नर्मदेपर्यंत. ( निबंध० पृष्ठ. १९८ ).

यावरून दादोबांनीं सांगितलेला 'पावेतों' चा अपवाद कृष्णशास्त्र्यांस पूर्णपणें मान्य आहे असें दिसतें. मात्र ते त्या अपवादाचें व्युत्पत्तिदृष्ट्या स्पष्टीकरण करून असे सांगतात कीं, 'पावे' हें क्रियापद असल्यामुळें मागला शब्द त्याचा कर्ताही धरून चालतां येईल. पण कृष्णशास्त्र्याच्या उदाहरणावरून-( तळेगांवपावेतो )-दादोबांनीं घातलेली मर्यादा-'परंतु ते बहुधा कालवाचक असले तर'-रास्त नाहीं हें उघड आहे. यावरून कालवाचक आणि स्थलवाचक-दोन्ही शब्दांचें 'पावेतों' या शब्दयोगी अव्ययापूर्वी सामान्यरूप होत नाहीं असा शास्त्रीबोवांचा अभिप्राय दिसतो. 'पर्यंत' या शब्दयोगी अव्ययासंबंधानें सामान्यरूपाचा विकल्प दोन्ही प्रकारच्या--स्थलवाचक व कालवाचक--अकारान्त शब्दांस लागू आहे; आणि आकारान्त एकारान्त शब्दांचें सामान्यरूप अवश्य होतें, असें कृष्णशास्त्री चिपळूणकरांचें मत आहे.

कृष्णशास्त्र्यांचें हें म्हणणें दादोबांच्या सारखेंच अपुरें आणि चुकीचें ठरतें. कारण कीं 'पावेतों' ह्याचे मागील नामांचे सामान्यरूप कधींच होत नाहीं हें सर्वांशीं खरें दिसत नाहीं. 'तुमची हद्द कोठपावेतों आहे ? त्या घरापावेतों किंवा झाडापावेतों' या ठिकाणीं 'तें घरपावेतों' किंवा 'तें झाडपावेतों' असें म्हणण्याचा प्रघात कोठेंच दिसत नाहीं. बरें, कालवाचक शब्दांसंबंधानें तरी दादोबा म्हणतात त्याप्रमाणें 'पावेतों' विषयींचा नियम अनपवादक आहे काय ? तसेंही दिसत नाहीं. 'बाबा मला जानवें द्या; बाप-आठव्या वर्षापावेतों तुला वाट पाहिली पाहिजे, तेव्हां तुझी मुंज झाली कीं, तुला जानवें मिळेल.' या ठिकाणीं 'आठवें वर्ष पावेतों तुला वाट पाहिली पाहिजे' असें म्हणण्याचा बहुधा प्रघात दिसत नाहीं. असो. आतां 'पर्यंत' बद्दलच्या विकल्पाकडे पहा. कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात कीं, तो अकरान्त शब्दांसच लागू आहे. परंतु घरपर्यंत, गांवपर्यंत, लग्नपर्यंत, मुंजपर्यंत असे प्रयोग ऐकिवात नाहींत; ह्यांचे जागीं घरापर्यंत, गांवापर्यंत, लग्नापर्यंत, मुंजीपर्यंत, असेच प्रयोग आढळतात. आणि 'स्टेशनपासून शहरपर्यंत आतां पक्की सडक झाली आहे'

अशा वाक्यांत क्वचित् क्वचित् जरी ' शहरपर्यंत ' असा प्रयोग आढळला, तरी ह्या अकारान्त सामान्यनामामागें सार्वनामिक विशेषण आलें असतां ' पर्यंत ' शब्दयोगी अव्ययाचेपूर्वीही त्यांचें सामान्यरूप अवश्य होतें. जसें:— त्या **घरापर्यंत**, त्या **गांवापर्यंत**, त्या **दिवसापर्यंत**, त्या **वर्षापर्यंत**, इ० या ठिकाणीं तें घरपर्यंत, तो गांवपर्यंत, तो दिवसपर्यंत, असे प्रयोग तर कोठेंच ऐकूं येत नाहींत. तेव्हां ' पर्यंत ' संबंधाच्या आकारान्त शब्दांबद्दलचे नियमांत विशेष राम दिसत नाहीं. ' पर्यंत ' च्या मागें आकारान्त व एकारन्त शब्दांचें सामान्यरूप अवश्य होतें, असें जें कृष्णशास्त्र्यांनीं, आणखी एक विधान केलें आहे तें तरी कितपत खरें आहे तें पाहूं. राजवाड्यापर्यंत, नर्मदेपर्यंत, पुण्यापर्यंत हीं त्यांनीं दिलेलीं उदाहरणें स्थलवाचक शब्दांचीं आहेत. आतां कालवाचक उदाहरणें घेऊन पाहूं. घटकापर्यंत, आठवडयापर्यंत, महिनापर्यंत असें म्हणण्याचा प्रचार नसून **घटकेपर्यंत, आठवड्यापर्यंत, महिन्यापर्यं**, असेंच म्हणतात. परंतु चार घटकांपर्यंत. दोन आठवडेपर्यंत, सहा महिनेपर्यंत या अनेकवचनीं उदाहरणांत आकारान्त शब्दांचें सामान्यरूप दिसत नाहीं. स्थलवाचक शब्दांच्या अनेकवचनी उदाहरणांतही–राजवाड्यांपर्यंत, तळ्यांपर्यंत इ०– त्यांचें सामान्यरूप अवश्य आढळतें. परंतु घटकांपर्यंत, आठवड्यांपर्यंत ह्या सामान्यरूपयुक्त प्रचाराबरोबर घटकापर्यंत, आठवडेपर्यंत, महिनेपर्यंत, असाही सामान्यरूपरहित प्रकार आढळतो; किंबहुना, सामान्यरूपरहित प्रचारच अधिक व्यापक आहे. म्हणून कालवाचक आकारान्त शब्दांचें ' पर्यंत ' शब्दयोगी अव्ययाचे मागें सामान्यरूप अनेकवचनी अवश्य होतें असें नाहीं, तर विकल्पानें होतें असें म्हणावें लागतें.

जोशी यांनीं चिपळूणकरांचाच अभिप्राय थोडक्यांत दिला आहे, आणि तो देतांना, जरी त्यांनीं एक * चमत्कारिक किंवा वास्तविक म्हटलें असतां चुकीचेंच विधान केलें आहे, तरी त्याचें वेगळें परीक्षण करण्याची जरूरी नाहीं. ह्या कृष्णशास्त्री चिपळूणकरांचा अभिप्राय सांगितल्यानंतर त्यांनीं आणखी एक स्वतःचें कलम लिहिलें आहे, तें असें:—

" परंतु भर, पावेतों, व पर्यंत यांजपासून कालावधीचा बोध होतो, तेव्हां त्यांवरून सामान्यरूप नेहमींच होत नाहीं; जसें:—' रात्रभर, ' ' गांवभर, ' ' दुपारपावेतों, ' ' संध्याकाळपर्यंत ' इ० " ( क० ३०६, पृष्ट १९० ).

---

* ' कित्येक ( श० अ० ) मूळचीं नामाचीच सविभक्तिक रूपें आहेत; यामुळें क्वचित् स्थळीं असा शब्दयोगी अव्ययांचे योगानें सामान्यरूप होत नाहीं. ' ( प्रौढ बोध क० ३०४, पृष्ट १९० पहा. ) मात्र याचें उदाहरण एकही देण्यांत आलेलें नाहीं शिवाय ह्या वाक्यांतील पूर्वोत्तर विधानांचा कारणकार्यसंबंध ' यामुळें ' या शब्दानें स्पष्ट दिसत आहे! तो जोशीबोवांचा जोशीबोवांसच कळे.

जोशीबोवांचें हें एकच कलम किती गहन आहे पहा! प्रौढांसही त्यांचा बोध होणें दुरापास्त दिसतें. ' गांवभर ' हें उदाहरण कालावधीचा बोध कसा करितें! परंतु हें उदाहरण बाजूस ठेऊं. त्याचप्रमाणें ' भर ' या अव्ययासंबंधाचाही प्रश्न बाजूस ठेऊं. कारण त्याच्याबद्दलचा साधा, सरळ, व स्पष्ट नियम पुष्कळांनीं दिला आहे व तो पुढें येणारच आहे. तेव्हां फक्त ' पावेतों ' व ' पर्यंत ' ह्यांच्याच संबंधानें जोशी यांच्या म्हणण्याकडे पाहूं. ' नेहमींच होत नाहीं ' हे शब्द जोशी यांनीं जाणूनबुजून लिहिले आहेत असें समजलें, तर त्यांचा अर्थ असा होतो कीं,' कधीं कधीं होत नाहीं ' म्हणजे ' कधीं कधीं होतें. ' परंतु असा जर त्यांचा अर्थ असता तर त्यांनीं दोन्ही प्रकारचीं उदाहरणें दिलीं असतीं. तेव्हां उदाहरणांवरून त्यांचा तसा अर्थ असावा असें दिसत नाहीं; आणि त्यांनीं ' नेहमींच होत नाहीं ' हे शब्द त्यांचा अर्थ नीट लक्षांत घेऊन लिहिले आहेत असें म्हणवत नाहीं. एवंच ' नेहमीं होत नाहीं ' ह्याचे जागीं ' कधींच होत नाहीं ' असें लिहिण्याचा त्यांचा इरादा असावा असें वाटतें. तसें घेऊन चालले तर नियमाचे सत्यतेस बाध येतो. कारण कीं, ' चार महिन्यापर्यंत ', ' दहा वर्षांपर्यंत ' अशा उदाहरणांत सामान्यरूप होतें. ह्यावरून त्यांनीं नकळत लिहिलेलेच शब्द—' नेहमींच होत नाहीं ' हे—खरे ठरतात; म्हणजे कधीं कधीं होत नाहीं आणि कधीं कधीं होतें. आतां हा अर्थ घेऊन चाललें, तर तो ' भर ' या शब्दयोगीसंबंधानें योग्य नाहीं. कारण कीं, ' भर ' यानें मागल्या नामाचें कधींच सामान्यरूप होत नाहीं. एवंच ' पावेतों ' व ' पर्यंत ' यांबद्दलचे नियमांत ' भर ' याचा जोशी यांनीं समावेश केल्यामुळें वरील नियम दूषित झाला आहे. एकाचा नियम दुसऱ्यास लागू पडत नसल्यामुळें त्या दोहोंसंबंधानें कोणतीही एक भाषा वापरणें सारखेच धोक्याचें आहे. अखेरीस आणखी एक भाषेचा, किंवा विचारशैथिल्याचा असें म्हटलें असतां बरें, मासला पहा. ' पावेतों व पर्यंत ह्यांपासून जेव्हां कालावधीचा बोध होतो ' असें जें जोशी यांनीं लिहिलें आहे, त्याचाहि अर्थ स्पष्ट होत नाहीं. ' जेव्हां कालवधीचा बोध होतो ' असें ज्या अर्थी म्हटलें आहे, त्या अर्थी ' पावेतो ' व ' पर्यंत ' यांनीं कधीं कधीं कालावधीचा बोध होत नाहीं असें दिसतें. तर त्यांनीं त्यावेळीं कशाचा बोध होतो? कालवधि म्हणजे इंग्रजींत ' period of time ' आणि ह्याचे विरुद्ध इंग्रजींत ' point of time ' ( कालक्षण ) असें म्हणतात. तेव्हां कालावधि ह्याचे विरुद्ध ' कालक्षण ' असें म्हणण्यास हरकत नाहीं. अतएव, जेव्हां, ' पावेतों ' व ' पर्यंत ' यांनी कालावधीचा बोध होत नाहीं, तेव्हां त्यांजपासून कालक्षणाचा बोध होत असला पाहिजे. परंतु वास्तविक म्हटलें म्हणजे ' पावेतों ' व ' पर्यंत ' हीं स्थलवाचक व कालवाचक या शब्दांपुढें येतात; आणि कालवाचक नावें कालावधिवाचक असतात किंवा कालक्षणवाचक असतात. उदाहरणार्थ, दिवस, महिना,

७५, ६ शब्द कालावधिवाचक आहेत; आणि सकाळ, दुपार, मध्यान्ह, इ० शब्द कालक्षणवाचक आहेत. कालक्षण व कालावधि ह्यांमधलि फरक फारसा तात्त्विक नसून व्याकरणामध्यें त्याकडे साधारण स्थूल दृष्टीनेंच पाहिलें पाहिजे. तसेंच हा फरक सापेक्ष आहे; दुपारचे मानानें दिवस कालावधि दाखवितो, परंतु वर्षाचे मानानें कालक्षण दाखवितो. शिवाय सूर्योदय आणि मध्यान्ह हे जरी तत्त्वतः क्षण असले, तरी सकाळ व दुपार हे शब्द व्यवहारांत अवधिवाचक आहेत. परंतु इतकी बारकाई सध्या आपणास नको आहे. अतएव सकाळ, दुपार, ह्यांस क्षणवाचक आणि महिना, वर्ष, ह्यांस अवधिवाचक म्हणून चालण्यास हरकत नाहीं. म्हणून 'संध्याकाळपर्यंत,' 'दुपारपावेतों' या जोशांच्या उदाहरणांत 'पर्यंत व पावेतों' हे शब्द क्षणवाचकांपुढें आले आहेत; आणि 'चार महिन्यांपर्यंत' 'दोन वर्षांपावेतों' इ० स्थळीं ते अवधिवाचकांपुढें आले आहेत हें उघड आहे. आणि सर्व ठिकाणीं कालावधीचाच बोध होत आहे. अर्थात् सकाळपर्यंत, दुपारपर्यंत म्हणजे 'आपणाचे कालापासून तोंपर्यंतचा काळ' म्हणजेच कालावधि; आणि 'चार महिनेपर्यंत' 'दोन वर्षांपर्यंत' ह्या ठिकाणीं कालावधीचा बोध होतो यांत तर संशयच नाहीं. एवंच पर्यंत, पावेतों, हीं दोन्ही स्थलसूचक व कालसूचक आहेत. तीं कालसूचक असतात त्या वेळीं तीं क्षणवाचक व अवधिवाचक ह्या दोन्ही शब्दांपुढें येतात; आणि तीं क्षणवाचकांचे पुढें येवोत किंवा अवधिवाचकांचे पुढें येवोत, त्यांनीं कालावधीचाच बोध होतो हें उघड आहे. यावरून जोशी ह्यांची भाषा किती व कशी अस्पष्ट, अप्रयोजक, व शिथिल आहे हें वाचकांचे नजरेस येईल.

जोशीबोवांचे एका तीन ओळींच्या कलमावर इतकी विस्तृत मल्लिनाथी करण्याचें कारण नव्हतें. परंतु व्याकरण, भाषा, शास्त्रीय विवेचनपद्धति, सूक्ष्म विचार, पृथक्करण, आणि स्वतंत्र शोध, या बाबतींत जोशीबोवांची कृति कधीं कधीं कशी सदोष असते, हें वाचकांस दाखवावें, या उद्देशानें तसें करणें भाग पडलें. त्याचप्रमाणें 'पावेतों' व 'पर्यंत' या दोन शब्दयोगी अव्ययांचे उपयोगाच्या विवेचनांतही इतकी जागा व इतका वेळ खर्च करण्याचें विशेष कारण नव्हतें. परंतु मराठी व्याकरणासारख्या अद्याप बनत असलेल्या शास्त्रांत अनपवादक सिद्धान्त ठोकून देण्याचें काम जितकें सुलभ, तितकेंच धाडसाचें व धोक्याचें आहे आणि या कामीं मोठमोठ्या नाणावलेल्या रथीमहारथींचीही अखेरीस कशी दशा उडून जाण्याचा संभव आहे हें वाचकांचे पूर्ण नजरेस आणावें; या उद्देशानें हा 'पावेतों-पर्यंत'चा खल लांबविला आहे. यावरून जी एक गोष्ट शिकावयाची ती अशीः ज्याप्रमाणें घर मोडण्यापेक्षां घर बांधण्याचें काम फार कठिण आहे, म्हणजे विघटनेपेक्षां घटना अधिक दुष्कर आहे, त्याचप्रमाणें दुसऱ्याचे दोषांचें आविष्करण करण्यापेक्षां निर्दोष शोध लावणें मुष्किलीचें आहे. आणि म्हणूनच

इतक्या खलानंतरही 'पावेतों-पर्यंत' च्या उपयोगाचा सामान्य सिद्धान्त मिळत नाहीं, हें आम्ही प्रांजलपणें कबूल करितों; आणि त्यांच्या उपयोगासंबंधानें जो कांहीं अनिश्चित प्रकार आढळतो तो सांगतों. पण ह्याच विषयासंबंधानें एक मुद्दा राहिला आहे, तो प्रथम घेऊन नंतर त्यांच्या उपयोगाकडे वळूं.

पर्यंत, पावेतों आणि पासून, हीं तिन्ही स्थलवाचक व कालवाचक क्रिया-विशेषणांपुढें येतात हें वर (अंक २१९) सांगितलेंच आहे. पावेतों व पर्यंत यांबद्दल लिहितांना बहुतेकांनीं त्यांच्या मागील नामांस असें न म्हणतां 'शब्दांस' असें म्हटलें आहे. तथापि सामान्यरूपाचा प्रश्न असल्यामुळें त्यांचा 'नामांस' असेंच म्हणण्याचा आशय दिसतो. परंतु खेर यांनीं आपल्या इंग्रजी व्याकरणांत याविषयीं लिहितांना अप्रयोजकपणा, किंवा अशास्त्रीयपणा किंवा दुर्लक्ष, किंवा काय वाटेल तें म्हणा, या बाबतींत सर्वांवर ताण केली आहे.

करून शिवाय इतर सर्व शब्दयोगी अव्ययांनीं मागील नामांचें सामान्यरूप होतें, अशी 'नोट' लिहून तिच्यापुढें वरील नियमास अपवाद सांगण्याच्या उद्देशानें ते म्हणतातः—'(अ) कालवाचक शब्दांत कांहीं बदल होत नाहीं. जसें:— तो कालपासून येथें आहे.'

या ठिकाणीं खेरांनीं 'कालवाचक शब्द' अशीच भाषा वापरिली आहे. परंतु इतर वैयाकरणांचा उद्देश, 'शब्द' ह्याचे जागीं 'नाम' म्हणावें, असा असावा हें जसें त्यांचे उदाहरणांवरून स्पष्ट दिसतें, तसें खेरांचे उदाहरणावरून स्पष्ट दिसत नाहीं. त्यांनीं फक्त एकच उदाहरण दिलें आहे. तें 'कालपासून' हे होय. 'काल' (चालू दिवसाचे लगेच मागला दिवस) हें नाम नसून क्रियाविशेषण आहे हें उघड आहे. तेव्हां खेर यांनीं 'कालवाचक शब्द' अशी जी शब्दयोजना केली आहे, ती कदाचित मुद्दामही केली असेल; आणि त्यांचे मनांत 'कालवाचक शब्द' यामध्यें नामांचा व इतर शब्दांचा ही अन्तर्भाव करावयाचा असेल. किंवा त्यांच्या मनांत 'कालवाचक नाम' असेंच म्हणावयाचें असून 'नाम' ह्याचे जागीं 'शब्द' असें दुर्लक्षानें पडलें असेल. ह्याशिवाय तिसरी कल्पना फारशी संभवनीय दिसत नाहीं.

इतरांप्रमाणें त्यांचा उद्देश 'शब्द' ह्याचे जागीं 'नाम' असाच अर्थ समजावयाचा असेल असें म्हणावें तर त्यांचें उदाहरण 'कालपासून' हें त्या कल्पनेशीं विसंगत आहे हें वर सांगितलेंच आहे. आतां कोणी असेंही म्हणेल कीं, 'कालपासून' हें त्यांचें उदाहरणही दुर्लक्षानें देण्यांत आलें असेल. म्हणजे हें उदाहरण देतांना 'काल' हें नाम नसून क्रियाविशेषण अव्यय आहे ही गोष्ट त्यांचे मनांत पूर्णपणें वागावी तशी वागत नसेल. आणि 'सोमवारपासून' असें एखाद्या नामाचें उदाहरण देण्याचे ऐवजीं घाईघाईनें त्यांनीं भलतेंच उदाहरण दिलें असेल! असलें उदाहरण, असली घाई, शास्त्रीय विषयावरील भाषणांत

नव्हे तर लेखांत, आणि त्याच्या पहिल्यांच आवृत्तींत नव्हे, तर सुधारून वाढविलेल्या नंतरच्या आवृत्तींत केवळ अक्षम्य होय; आणि अशा तऱ्हेच्या अनेक चुका शास्त्रीय व शिक्षणविषयक पुस्तकांत राहणें तर फारच अनिष्ट आहे हें उघड आहे. यामुळेंच त्यांचा येथें मासला देऊन पूर्ण निषेध करण्यांत येत आहे. परंतु ही गोष्टही बाजूस ठेवून वाटेल तितक्या उदारपणानें त्यांच्या लेखाकडे पाहण्याची आमची तयारी आहे. तेव्हां ' शब्द ' ह्याचे जागीं ' नाम ' आणि ' कालपासून ' ह्याचे जागीं ' सोमवारपासून ' असेंच लिहिण्याचा त्यांचा अभिप्राय होता, असें घेऊन त्यांच्या अपवादाकडे पाहूं. कालवाचक नामांत कांहीं बदल होत नाहीं असेंच खेर म्हणतात असें जरी समजलें, तरी तें प्रथम अक्षरशः खरें नाहीं; कारण कीं, ' सोमवारपासून ' ह्यांप्रमाणेंच ' महिन्यापासून ' असेंही म्हणण्याचा प्रघात आहे; तेव्हां तिकडूनही पंचाईतच. शिवाय, कोणत्याच शब्दयोगी अव्ययांचे मागें त्यांच्यांत बदल होत नाहीं कीं फक्त कांहींचे मागें, ह्या प्रश्नाचें उत्तरही खेरांचे व्याकरणांत स्पष्ट नाहीं. ओघावरून ' करून ' ह्यावांचून इतर सर्व शब्दयोगी अव्ययांपूर्वी असें म्हणण्याचा त्यांचा बेत दिसतो, परंतु ' सोमवार आधीं ' असें कधींच कोणी म्हणत नाहीं; तर ' सोमवारचे आधीं ' किंवा क्वचित ' सोमवारा आधीं ' असें म्हणतात. बरें, कांहीं शब्दयोगी अव्ययांचे पूर्वीं कालवाचक नामें बदलत नाहींत असें जर खेरांचे मत होतें, तर तीं कोणतीं हें सांगणें अवश्य होतें. एवंच कांहीं केल्या खेरांचा नियम स्वीकारार्ह होत नाहीं.

आतां दुसरी कल्पना घेऊन पाहूं. ' कालवाचक शब्द ' यानें खेर केवळ नामांचाच निर्देश न करितां क्रियाविशेषणांसारख्या इतर शब्दांचाही ते त्यांत अन्तर्भाव करितात; आणि म्हणूनच त्यांनीं ' कालपासून ' हें ' काल ' या क्रियाविशेषणाचें उदाहरण दिलें आहे. या कल्पनेनेंही खेरांचा बचाव मुळींच होत नाहीं. कारण, एक तर ' सोमवारपासून, ' ' सोमवारपर्यंत ' ह्या बरोबरच ' महिन्यापासून,' ' महिन्यापर्यंत ' असा नामांसंबंधानें सामान्यरूपयुक्तही प्रचार आढळतो. आणि ' खालपासून,' ' जेथपासुन ' इ० उदाहरणांत खालीं, जेथें, इ० अव्ययांत बदल झालेला पाहून क्रियाविशेषणांसंबंधानेंही खेरांचें विधान अपवादक नाहीं असेंच म्हणावें लागतें. शिवाय कालवाचकांबरोबर स्थलवाचकांचाही अंशतः निर्देश व्हावयास पाहिजे होता, हें मागील विवेचनावरून निर्विवाद आहे. तात्पर्य, जोशी आणि खेर ह्यांच्या प्रकृत विधानांपैकीं कोणाचें अधिक ग्राह्य होय. हें ठरविण्याचा प्रयत्न करणें म्हणजे ' उडदांमाजी काळे गोरे ' निवडण्याचाच उद्योग करण्यासारखें आहे असें म्हटल्याशिवाय गत्यन्तर नाहीं.

अखेरीस या प्रश्नाचा निकाल काय लागतो तें पाहूं. हा निकाल फारसा समाधानकारक नाहीं; पण त्यास इलाज नाहीं. ज्या ठिकाणीं शिष्टप्रचारच इतका अनियमित दिसतो, त्या ठिकाणीं दिसण्यांत अनप-

बादक नियम ठोकून देणें गैर आहे, हें वरील विवेचनावरून कळेलच. तेव्हां त्यांतल्या त्यांत या प्रचारासंबंधानें साधारणपणें काय दिसतें तें पहा. या गोष्टी २२४ नियमाचे अपवाद म्हणून २२५ अकांत घावयाचें ठरलें आहे. त्याप्रमाणें या गोष्टी २२४ अंकांतील नियमास अपवाद म्हणून सांगतों.

**अपवाद** १---पासून, पर्यंत, व पावेतों, या शब्दयोगी अव्ययांपूर्वी स्थलवाचक आणि कालवाचक विशेषनामांपैकीं अकारान्त विशेषनामांचें बहुधा विकल्पेंकरून सामान्यरूप होतें; आणि आकारान्त व एकारान्त नामांचें सामान्यरूप अवश्य होतें. जसें:--**पुण्या**पासून **तळेगांव**पर्यंत किंवा **तळेगांवा**पर्यंत; **कलकत्त्या**पासून **नागपूर**पावेतों किंवा **नागपुरा**-पावेतों; **सोमवार**पासून किंवा **सोमवारा**पासून **शनिवार**पर्यंत किंवा **शनि-वारा**पर्यंत; **नागपूर**वर किंवा **नागपुरा**वर; परन्तु **माळ्यावर**; इ०.

**टीप**---वार, महिने इत्यादिकांची नांवें विशेषनामें होत, हें या ठिकाणीं ध्यानांत ठेवावें. ग्रहादिकांचीं नांवेंही विशेषनामेंच होत. त्यांचा स्थलवाचक नामांत अन्तर्भाव केल्यास तीं या नियमास अपवाद आहेत; म्हणजे त्यांचें सामान्यरूप अवश्य होतें असें समजावें. उदा०---सूर्यापासून चंद्रापावेतों; मंगळापासून शुक्रापर्यंत किंवा शुक्रापावेतों; इ०.

**टीप २**---या ठिकाणीं एक गोष्ट सुचते ती अशी:---अमुकपासून तमुकपर्यंत असें आंकड्यांनीं सांगण्याचे दोन पर्याय आहेत. पांचपासून दहापर्यंत हे आंकड्यांनीं व्यक्त करावयाचें असतां एक तर '५ ते १०' (पांच ते दहा) असें म्हणतात व लिहितात, नाहीं तर '५--१०' (पांचपासून दहा) असें म्हणातात व लिहितात. ह्यांपैकीं पहिल्या पर्यायांतील 'पासून' या अर्थाच्या 'ते' या शब्द-योगी अव्ययानेंही मागील अंकवाचक शब्दांचें सामान्यरूप होत नाहीं; परंतु 'पासून' यानें विकल्पेंकरून होतें. जसें:---पांचपासून किंवा कधीं कधीं पांचापासून. क्रम-वाचकांचें सामान्यरूप अवश्य होतें. जसें:---पांचव्यापासून दहाव्यापर्यंत, सातव्या-पावेतों, आठव्यापूर्वी, बाराव्यानंतर, इ०.

**टीप ३**---अपवाद १ मध्यें सांगितलेला विकल्प बहुधा 'पासून' आणि 'पावेतों' याबद्दल विशेषेंकरून आढळतो; आणि त्यांतही 'पावेतों' संबंधानें अधिक आढळतो.

**टीप ४**---कालवाचक शब्दांपैकीं महिन्यांचे नांवांपेक्षां वारांचे नांवांसंबंधानें विकल्पाचा प्रचार फार.

**टीप ५**—स्थलवाचक सामान्यनामांपैकीं फक्त अकारान्त सामान्यनामें विशेषनामांप्रमाणें उपयोगांत आलीं असतां त्यांचेंही कधीं कधीं सामान्यरूप होत नाहीं. जसें:—**स्टेशनपासून शहरपावेतों** पक्की सडक झाली आहे; नगरपासून, लष्करपेक्षां, शत्रु **नगरवर** चालून गेला; इ०. तथापि नगरापासून, नगरावर असा सामान्यरूपयुक्त प्रचारच अधिक आढळतो. सामान्यरूपरहित प्रचार नवीन व कमी व्यापक आहे.

**टीप ६**—कालवाचक सामान्यनामांपैकीं क्षणवाचक नामांचें बहुधा सामान्यरूप करीत नाहींत. जसें:—सकाळपर्यंत, सायंकाळपासून, दुपारवेरीं, इ०.

**टीप ७**–अवधिवाचक सामान्यनामांचें 'पर्यंत' आणि 'पावेतों' या शब्दयोगी अव्ययांपूर्वीं बहुधा सामान्यरूप होत नाहीं; परंतु 'पासून'चे पूर्वीं होतें. जसें:—एक दिवसपर्यंत, दोन वर्षेपावेतों, चार महिनेपर्यंत, एक आठवडापर्यंत; परंतु दिवसा—वर्षा—महिन्या—आठवड्या—पासून, इ०.

**टीप ८**—अवधिवाचक आकारान्त शब्दांचें, अनेकवचनीं 'पर्यंत' शब्दयोगी अव्ययाचे मागें, विकल्पेंकरून सामान्यरूप होतें. जसें:—चार महिनेपर्यंत, किंवा चार महिन्यांपर्यंत, दहा घटकापर्यंत किंवा दहा घटकांपर्यंत, इ०.

**अपवाद २**—सरकार, दरबार, पार्लमेंट, इ०. अधिकारमंडळवाचक आकारान्त शब्दांचें आणि यावनी शब्दांचें बहुधा सामान्यरूप होत नाहीं. जसें:—**सरकारवर** कोण फिर्याद करणार, **दरबारपुढें** कोणाचें चालत नाहीं, **पार्लमेंटपुढें** स्टेट सेक्रेटरी काय करणार, डॉक्तरवर, डॉक्तरकडे, कमिशनरपुढें, इ०.

**टीप १**—या दोन्ही अपवादांसंबंधानें असें समजावें कीं, सामान्यरूपयुक्त प्रयोग बहुधा सर्वत्र चालतो. तथापि कांहीं कांहीं ठिकाणीं सामान्यरूपविरहित प्रयोगच अधिक रूढ, प्रशस्त, व डौलदार दिसतो. आणि अन्यत्र जरी असा प्रयोग विशेष प्रचलित नसला, तरी त्याकडेच सुशिक्षित व शिष्ट लोकांचा कल दिसतो.

**टीप २**—दोन्ही अपवादांतील शब्दांसंबंधानें दुसरी एक गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. ती अशी कीं, शब्दयोगी अव्ययांचे मागें जेव्हां त्या शब्दांचें सविकरण सामान्यरूप येतें, तेव्हां त्यांस लागलेल्या चा, ची, चें, प्रत्ययांपूर्वीं त्या शब्दांचें सामान्यरूप बहुधा होत नाहीं. जसें:—**सोमवारचे** नंतर—आधीं—पूर्वीं, **नागपूरचे** पुढें—आसपास—जवळ; सरकारचे पुढें—बद्दल, विरुद्ध; इ०. ही गोष्ट पहिल्या अपवादाचे सातव्या व आठव्या टीपेंतील शब्दांस लागू नाहीं. कारण, 'पर्यंत' आणि 'पावेतों' ह्यांचे पूर्वीं बहुधा कोणत्याच शब्दाचें सविकरण सामान्यरूप येत नाहीं.

**अप०** ३—'भर' या शब्दयोगी अव्ययानें मागील नामाचें सामान्यरूप कधींच होत नाहीं. 'भर' हें परिमाणवाचक असून स्थल, काल, माप, वजन, इ० अर्थाचे नामांपुढें फक्त एकवचनांत येतें. जसें—शहरभर, कोसभर, घरभर, गाडाभर, दिवसभर, वर्षभर, आठवडाभर, हातभर, वारभर, पायलीभर, शेरभर, इ०.

( अ ) याच अर्थी अनेकवचनीं या सर्व शब्दांचीं प्रथमेचीं अनेकवचनें कोणत्याही प्रत्ययावांचून किंवा शब्दयोगी अव्ययावांचून उपयोगांत येतात. जसें:—पांच मिनिटें—दिवस—महिने—वाट बघ; पांच पन्नास घरें—पाउलें—गांवें—गेलास तरी तुला कोणी एक शब्दही विचारणार नाहीं.

**( आ )** याच अर्थी फक्त स्थलवाचक व कालवाचक नामांचे अनेकवचनांपुढें 'पर्यन्त' हें शब्दयोगी अव्यय विकल्पानें येतें आणि त्याचेयोगें मागील नामाचें पूर्वी सांगितल्याप्रमाणें विकल्पानें सामान्यरूप होतें. जसें:—पांच मिनिटें—दिवस—महिने थांब; किंवा पांच मिनिटेंपर्यंत, पांच दिवसपर्यंत, किंवा पांच महिनेपर्यंत थांब; किंवा पांच मिनिटांपर्यंत, दिवसांपर्यंत, किंवा महिन्यांपर्यंत, इ० थांब; तसेंच पांच कोस, पांच कोसपर्यंत, किंवा पांच कोसांपर्यंत, असा तीन प्रकारचा शब्दप्रयोग आढळतो.

टीप—'भर' आणि, 'पर्यंत' या शब्दयोगी-अव्ययांचे उपयोगांतील हा फरक स्मरणीय आहे. तसेंच भर शब्दयोगी-अव्ययान्त शब्दांस कोणी कोणी क्रियाविशेषणेंही म्हणतात. तसें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण कीं, शब्दयोगी अव्ययान्त सर्वच शब्द वाक्यमीमांसेचे दृष्टीनें क्रियाविशेषणें होत हें पूर्वी सांगितलेंच आहे. भरशब्दयोगी अव्ययान्त, वजन, माप व स्थळ दाखविणाऱ्या शब्दांचा विशेषणांप्रमाणेंही उपयोग होतो. जसें:—पायलीभर तांदूळ, हातभर कापड, शेरभर तेल, कोसभर जमीन, इ०.

**अप०** ४—च, मात्र, ना, ही, देखील, पण, सुद्धां, या अव्ययांचे योगानेंही मागील शब्दांस कांहीं एक विकार होत नाहीं. तीं केवलप्रयोगी अव्ययाशिवाय इतर वाटेल त्या शब्दापुढें येतात. 'त्यांपासून कोठें व्यावृत्ति, कोठें संग्रह, कोठें अवधारण, कोठें गौरव, इ० अर्थ गम्यमान होतात.' ( दादोबा ) उदा०:—तूंच ये, तूं येच, लहान मुलांना मात्र घेऊन ये, तूं मोठ्यानेंना म्हणणार होतास, इ०. यांस

दादोबादि बहुतेक व्याकरणकार **शुद्ध शब्दयोगी अव्ययें** असें म्हणतात; आणि गंगाधरपन्त टिळक हे अविकारक शुद्ध शब्दयोगी अव्ययें असें म्हणतात.

( अ ) यांपैकीं **च** आणि **ही** हीं दोन, शब्दयोगी अव्ययें आणि मागील शब्द, यांचेमध्येंही येतात. जसें:---ह्याचप्रमाणें, तेणेंचकरून, तेथूनचपासून, घराहीवर, शहाण्यांहीपेक्षां, इ०.

( आ ) हीं शुद्ध शब्दयोगी अव्ययें आणि 'भर' ह्यांचिमध्यें इतकाच फरक आहे कीं शुद्ध शब्दयोगी अव्ययें वाटेल त्या शब्दापुढें येतात; 'भर' हें फक्त एकवचनी नामापुढें येतें.

( इ ) कदाचित्, कचित्, अर्थात्, विद्वान्. इत्यादि जे कांहीं थोडेसे व्यंजनान्त शब्द मराठींत आहेत, ते शुद्ध शब्दयोगी अव्ययांचे पूर्वी अकारान्त होतात. जसें:---कदाचितच, विद्वानही, विद्वानच, इ०.

( ई ) अर्थास अनुसरून शुद्ध शब्दयोगी अव्ययांचे जे वर्ग होतात ते असे:---अन्यव्यावृत्तिवाचक किंवा कैवल्यबोधक, अभिव्याप्तिवाचक किंवा संग्रहबोधक, प्रश्नार्थक, आणि पादपूरक. यांत येणारीं अव्ययें वरील यादींत दिलींच आहेत.

[ ह्यांस दादोबा शुद्धशब्दयोगी अव्ययें आणि गोडबोले अवधारणबोधक अव्ययें असें म्हणतात. तथापि गोडबोले ह्यांस शब्दयोगी अव्ययांतच घालितात. कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात कीं, त्यांस शब्दयोगी अव्ययें म्हणणें बरें नाहीं. दादोबा व गोडबोले ह्यांच्याविरुद्ध ते जीं कारणें दाखवितात त्यांचा आतां विचार करूं. प्रथम ते म्हणतात कीं, 'शब्दयोगी अव्ययांचे वास्तविक रूप म्हटलें म्हणजे त्यानें प्रातिपदिक व क्रियापद ह्यांमधील संबंध दाखवावा. त्यानें काडीनेंच कुलूप उघडिलें, ती बागेंतही गेली होती; इत्यादि वाक्यांत च, ही, हीं अव्ययें प्रातिपदिकांचा धात्वार्थाशीं संबंध दाखवित नाहीं, तर तो संबंध त्या त्या विभक्तिप्रत्ययानें दाखविला जातो.' शुद्ध शब्दयोगी अव्ययें हा संबंध दाखवित नाहींत, हें कृष्णशास्त्र्यांचें म्हणणें अगदीं निर्विवाद आहे. आणि 'जीं अव्ययें धातूचा अर्थ व प्रातिपादिकें (नामें किंवा सर्वनामें) यांचा संबंध दाखवितात त्यांस शब्दयोगी अव्ययें म्हणावें' ( निबंध पृष्ठ १९६ ) असें जर कृष्णशास्त्र्यांचेप्रमाणें शब्दयोगी अव्ययांचें लक्षण केलें तर

शुद्ध शब्दयोगी अव्ययास शब्दयोगी अव्ययें म्हणणें रास्त नाहीं हें उघड आहे. तेव्हां प्रश्न इतकाच उरला कीं, कृष्णशास्त्र्यांनीं केलेलें शब्दयोगी अव्ययांचें लक्षण ग्राह्य आहे काय? तेंच जर ग्राह्य असेल तर च, ही, ना, इ० शुद्ध शब्दयोगी अव्ययें शब्दयोगी अव्ययेंच नव्हत ह्यांत तिळमात्र संशय नाहीं. 'अव्ययांपासून दिग्रूप अथवा कालरूप अधिकारणाचा उद्बोध होतो आणि ज्या शब्दांनीं याचा योग होतो त्याचें ह्याच्या योगानें सामान्यरूप होतें असा जो शब्द तें शब्दयोगी अव्यय होय (दादोबा क ५७५) हें शब्दयोगी अव्ययांचें दादोक्त लक्षण होय. 'शब्दयोगी अव्ययांचें दादोबांनीं चमत्कारिक जें लक्षण केलें आहे तेंही च, ही, देखील, इ० अव्ययांवर येतेंसें दिसत नाहीं' असें जें कृष्णशास्त्री म्हणतात (निबंध० पृष्ठ २०१) तेंही अक्षरशः खरें आहे. तथापि कृष्णशास्त्री चिपळूणकरांचें या अव्ययांबद्दलचें मत अखेरीस स्वीकारार्ह नाहीं असेंच म्हणावें लागतें. कारण कीं दादोबांचे व्याख्येप्रमाणें च, ही, ना, इत्यादिकांस शब्दयोगी अव्ययें म्हणणें रास्त नाहीं; आणि कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे व्याख्येप्रमाणें त्यांस शब्दयोगी अव्ययें म्हणणें रास्त नाहीं; हीं दोन्हीं विधानें सारखींच अपुरीं व भ्रामक आहेत. त्यांनीं वादाचा निकाल लागावयाचा नाहीं. जसें दादोबांचें लक्षण चुकीचें असेल तसें कृष्णशास्त्र्यांचेंही चुकीचें असेल. दादोबांचें लक्षण चुकीचें आहे असें कृष्णशास्त्री म्हणत नाहींत; तर तें केवळ 'चमत्कारिक' आहे इतकेंच त्यांचें म्हणणें आहे. तें चुकीचें आहे असें म्हणण्याचें कृष्णशास्त्र्यांस प्रयोजन नाहीं. कारण कीं, तें लक्षण च, ही, ना, इत्यादिकांस लागत नाहीं हें कलम त्यांच्या फायद्याचेंच आहे. तथापि दादोबांचें लक्षण चुकीचें असावें असेंच कृष्णशास्त्री चिपळूणकरांचें मत असावेंसें वाटतें. नाहींतर चिपळूणकरांनीं शब्दयोगी अव्ययांचें निराळें लक्षण केलें नसतें. पण त्यांचे मतें दादोबांचें लक्षण त्याज्य होय, म्हणूनच नवीन लक्षण देऊन शब्दयोगी अव्ययांचे या सत्यस्वरूपाप्रमाणें, च, ही, ना, इत्यादिकांस शब्दयोगी अव्ययें म्हणतां येत नाहीं असें ते प्रतिपादन करितात. परंतु दादोक्त लक्षणाप्रमाणेंच चिपळूणकरकृत लक्षण ग्राह्य नाहीं; त्यामुळें त्यांचा निकालही स्वीकारार्ह दिसत नाहीं. तें कसें तें पहा. कृष्णशास्त्री म्हणतात कीं, जीं अव्ययें प्रातिपदिकांचा धातूंशीं संबंध दाखवितात तीं शब्दयोगी अव्ययें होत. परंतु हें लक्षण सर्व शब्दयोगी अव्ययास सारखें लागू नाहीं, 'शिष्याचे वर्तनाबद्दल गुरूस दंड हा प्रकार न्याय्य नाहीं, अन्यायावांचून सर्व कांहीं काम करण्यास मी तयार आहें, रामकथेपेक्षां कृष्णकथेंतच भक्तिरस अधिक आहे, शौर्य व राजनीतिपटुत्व ह्या दोहोंमध्यें नेपोलियनपेक्षां शिवाजीचीच योग्यता अधिक उच्च दर्जाची ठरते' इत्यादि वाक्यांतील बद्दल, वांचून, पेक्षां या अव्ययांनीं त्यांच्या मागील प्रातिपदिकांचा संबंध अनुक्रमें दंड, काम, भक्तिरस आणि योग्यता या प्रातिपदिकांशींच जोडिला जात आहे हें उघड आहे. आतां वाक्यमीमांसेचे दृष्टीनें कृष्णशास्त्र्यांचें शब्दयोगी अव्ययांचें लक्षण या वाक्यांतील शब्दयोगी अव्ययांसही अप्रत्यक्षपणें

लावितां येईल हें आम्हांस मान्य आहे. परंतु त्या दृष्टीनें शब्दयोगी अव्ययांचा वेगळा वर्ग मानण्याचेंच कारण उरत नाहीं, हें सुज्ञ वाचकांचे तेव्हांच लक्षांत येईल. एवंच व्याकरणाचे दृष्टीनें शब्दयोगी अव्ययांचा वेगळा वर्ग मानणें जर अवश्य असेल आणि वाक्यमीमांसेचे दृष्टीनें तसें काण्याची आवश्यकता नसेल तर वाक्यमीमांसेचे दृष्टीनें केलेलें शब्दयोगी अव्ययांचें लक्षण कितीही अनपवादक आणि अप्रत्यवाय असलें, तरी तें व्याकरणाचे दृष्टीनें ग्राह्य नाहीं हें उघड आहे म्हणून असलें व्याकरणदृष्ट्या अप्रशस्त लक्षण घेऊन तें अमुक शब्दांस लागू नाहीं म्हणून त्यांचा शब्दयोगी अव्ययांत समावेश करितां येत नाहीं ह्या म्हणण्यांत अर्थ नाहीं; आणि अतएव अशानें वादाचा निकाल लागत नाहीं. शब्दयोगी अव्ययांचें दादोक्त लक्षण जरी व्याकरणाचे दृष्टीनें केलेलें आहे तरी तें कृष्णशास्त्री म्हणतात त्याप्रमाणें शुद्ध शब्दयोगी अव्ययांस लागत नाहीं. पण तें चूक आहे असें कृष्णशास्त्री स्पष्टपणें कोठेंच म्हणत नाहींत. कदाचित त्यांचे मतें तें बरोबरही असेल. दादोक्त लक्षण शुद्ध शब्दयोगी अव्ययांस लागत नाहीं, त्यामुळें तें त्यांचे स्वतःचेच दृष्टीनें चुकीचें ठरेल. परंतु जे च, ही, ना, इत्यादिकांस शब्दयोगी अव्ययांचे वर्गांत घालण्यास तयार नाहींत, त्यांचे दृष्टीनें वरील आक्षेपास अवकाश रहात नाहीं. म्हणूनच कदाचित कृष्णशास्त्री हे दादोक्त लक्षणास ‘ चमत्कारिक ’ एवढेंच नांव ठेवितात. परंतु आमचे मतें दादोक्त लक्षण केवळ चमत्कारिकच नव्हे तर चुकीचें आहे. स्थूलमानानें तें ग्राह्य होण्यासारखें असेल. तरी न्यायशास्त्राचे कांटेतोल दृष्टीनें पाहिलें म्हणजे तें अव्याप्त ठरतें. च, ही, ना इत्यादिकांस तें लागत नाहीं. म्हणून अव्याप्त होय हें म्हणणें कृष्णशास्त्र्यांस मान्य व्हावयाचें नाहीं. कारण कीं, च, ही, ना, इ० हीं शब्दयोगी अव्ययेंच नव्हत असें त्यांचें मत आहे. तेव्हां अव्याप्तीचें हें उदाहरण निर्विवाद नाहीं. परंतु ‘ करून ’ आणि ‘ भर ’ हीं दोन्ही शब्दयोगी अव्ययें होत ह्याबद्दल कोणासच शंका नाहीं. त्याचप्रमाणें ‘ करून ’ हें शब्दयोगी अव्यय नेहमीं नामाचे तृतीयेनंतर येतें आणि ‘ भर ’ यानें मागील नामाचें सामान्यरूप कधींच होत नाहीं, या गोष्टीबद्दलही कोणास शंका असण्याचें कारण दिसत नाहीं. म्हणून शब्दयोगी अव्ययांचें दादोक्त लक्षण निदान ‘ करून ’ आणि ‘ भर ’ या सर्वमान्य शब्दयोगी अव्ययांस लागत नाहीं; अतएव तें अव्याप्त आहे हें उघड आहे. एवंच दादोक्त लक्षण न्यायशुद्ध नाहीं आणि चिपळूणकरकृत लक्षण जरी अशुद्ध नसलें, तरी व्याकरणदृष्ट्या प्रशस्त नाहीं. म्हणून च, ही, ना, इत्यादिकांस शब्दयोगी अव्ययें म्हणण्याचे विरुद्ध कृष्णशास्त्री यांनीं अद्यापपर्यंत आणिलेल्या पुराव्यावरून कांहींच सिद्ध होत नाहीं. हें उघड आहे.

याचसंबंधानें दादोबांचे विरुद्ध कृष्णशास्त्री आणखी असें सांगतात कीं,–‘ तसेंच

शब्दयोगी अव्ययें नेहमीं प्रातिपदिकांस लागून असतात; पण च, ही, वगैरे अव्ययें क्रियापदापुढेंही लागतात. जसें:—तो येईल व बोलेलही, पण त्याचें बोलणें तुम्ही मान्य करालच याचा नियम काय ? ' ह्या म्हणण्यांत विशेष तथ्य नाहीं. कारण शब्दयोगी अव्ययें बहुतकरून प्रातिपदिकांस लागून असतात हें खरें, तथापि कृष्णशास्त्री म्हणतात त्याप्रमाणें तीं ' नेहमीं ' तशी नसतात. जाईपर्यंत, येईपावेतों, इ० ठिकाणीं (अंक २२० ) कांहीं शब्दयोगी अव्ययेंही क्रियापदापुढें लागलेलीं आढळतात हें एक; आणि जेव्हांपासून, कोठपासून, जेथपर्यंत, जोंपावेतों, तोंवर, इ० ठिकाणीं तीं क्रियाविशेषणांपुढेंही आलीं आहेत. म्हणून कृष्णशास्त्र्यांचा हा मुद्दा विशेष महत्त्वाचा नाहीं हें निर्विवाद आहे. तात्पर्य, दादोबा विरुद्ध कृष्णशास्त्री चिपळूणकर ह्या मुकदम्याचा निकाल कृष्णशास्त्र्यांनीं आणि लेल्या पुराव्यावरून स्पष्टपणें कोणत्याच बाजूचा लागत नाहीं हें उघड आहे. तथापि इतकेंच कबूल करणें भाग आहे कीं, दादोबांचें शब्दयोगी अव्ययांचें लक्षण स्वीकारून च, ही, ना, इत्यादिकांची शब्दयोगी अव्ययांत गणना करणें ह्यापेक्षां कृष्णशास्त्र्यांचें लक्षण घेऊन त्यांस शब्दयोगी अव्ययांतून काढून देणें हें अधिक सुसंगत आहे यांत संशय नाहीं.

च, ही, ना, इत्यादिकांस जर शब्दयोगी अव्ययांतून घालवून द्यावयाचें तर त्यांचा कोणत्या वर्गांत अन्तर्भाव करावयाचा हा प्रश्न उरला. दादोबा म्हणतात. ' यांत च, कीं, ना, हीं वर्जून अर्थास अनुकूळ पडल्यास इतरांस क्रियाविशेषणें मानिलें तरी चिंता नाहीं असें मला वाटतें. अशा जातीचे शब्दांस संस्कृत वैयाकरण निपात म्हणून संज्ञा देतात; व त्यांचे अनेक अर्थ होतात, म्हणून सांगतात. ' ' अर्थास अनुकूळ पडल्यास इतरांस क्रियाविशेषणें मानावें ' असें दादोबा म्हणतात; आणि नवलकर यांनीं सर्वांसच क्रियाविशेषणें मानिलें आहे. खेर यांनीं कांहींच निर्णय दिला नाहीं, कृष्णशास्त्री त्यांस क्रियाविशेषणें म्हणण्यास तयार नाहींत असें दिसतें; पण त्यांनीं या पक्षासम्बन्धानें अगदीं मुग्धता धारण केली आहे. यावरून त्यांच्या मतें हा पक्ष बिलकुल विचारार्हच नसावा. आणि ज्या अर्थीं या पक्षाचा रे० नवलकरांशिवाय कोणीच पुरस्कर्ता दिसत नाहीं, त्या अर्थीं तेंच खरें यांत संशय नाहीं. आमच्या मतें अर्थाचे दृष्टीनें त्यांस वेगळ्या वेगळ्या ठिकाणीं वेगळ्या वेगळ्या वर्गांत गणावें लागेल. हीं वादाविषयक अव्ययें केवलप्रयोगीशिवाय वाटेल त्या शब्दास लागून येतात. तेव्हा क्रियाविशेषणांप्रमाणें त्यांचा क्रियापदांशीं सम्बन्ध असतां त्यांस क्रियाविशेषणांत घालणें गैर होणार नाहीं. तथापि तेवढ्यावरून त्यांस सरसकट नेहमीं क्रियाविशेषणें म्हणणें रास्त नाहीं. एकंदरींत हा पक्ष विशेष विचार करण्यासारखा दिसत नाहीं. त्यांत थोडासा सत्यांश आहे; परन्तु तो इतका अल्प आहे कीं, त्याचा या मतास आधार न मिळतां त्यायोगें हें मत बहुतेक लंगडेंच आहे असेंच स्पष्ट ठरतें.

अखेरीस कृष्णशास्त्री चिपळूणरांचा ह्याविषयींचा निकाल पाहणें राहिलें. दादोबांचे विरुद्ध पुरावा संपावितांना ते म्हणतात कीं, 'वास्तविकपणें पाहतां च, ही, देखील, मात्र, इत्यादि शब्द, अव्ययांचे जे चार वर्ग करितात, त्यांपैकीं कोणत्याही वर्गांत समावेश पावत नाहींत; त्यांचा एक स्वतंत्रच वर्ग मानावा हें बरें. आतां त्यांस वरील चार वर्गांतून एखाद्या वर्गांत लोटणेंच असल्यास त्यांस उभयान्वयी अव्ययांत घालावें हें बरें भासतें व तसें भासण्याचें बीज उभयान्वयी अव्ययाच्या पुढील निरूपणावरून सुज्ञ वाचणाराचे लक्षांत येईल.' यावरून वादविषयक अव्ययांस उभयान्वयी अव्ययें म्हणण्याकडे त्यांचा विशेष कल दिसतो. आणि त्याप्रमाणें ते उभयान्वयी अव्ययाची प्रथम एक व्याख्या करून म्हणतात कीं, असें लक्षण केलें असतां तें लक्षण च, ही, देखील, मात्र, इत्यादि अव्ययांवर येतें; यास्तव तीं उभयान्वयी अव्ययेंच मानावीं. परंतु लगेच त्यांस असें आढळून येतें कीं, आपण केलेलें हें उभयान्वयी अव्ययांचें लक्षण ठीक नाहीं. वादविषयक अव्ययांस उभयान्वयी अव्ययें म्हणावें असा अभिप्राय प्रथम देऊन गेल्यामुळें बहुतकरून शास्त्रीबोवांनीं उभयान्वयी अव्ययांचें त्या अभिप्रायास जुळेसें एक लक्षण केलें. 'वाक्यार्थांत जुळण्यासारखा स्वतंत्र अर्थ ज्यांस नसतो, परंतु ज्यांच्या योगानें वाक्यापासून अधिक अर्थ भासतो त्या अव्ययांस उभयान्वयी अव्ययें म्हणावें.' ह्या लक्षणाचें परीक्षण करण्याचें ँ स्थळ नव्हे; आणि तसें करण्याची कांहीं आवश्यकताही दिसत नाहीं. कारण शास्त्रीबोवांची सत्यान्वेषण करणारी तात्त्विक बुद्धि लगेच प्रबल होऊन त्यांचें त्यांसच आढळून आलें असावें कीं, ह्या लक्षणांत कांहीं तथ्य नाहीं. म्हणूनच लगेच दुसऱ्या शब्दसमुच्चयांत उभयान्वयी अव्ययाचें वास्तविक खरें लक्षण देण्यास ते तयार होतात. 'किंवा असें म्हणावें कीं, शब्दयोगी अव्ययें जसा दोन शब्दांमधला म्हणजे प्रातिपदिक व धातु यांमधला संबंध दाखवितात तशीं उभयान्वयी अन्वयें दोन वाक्यांमधील संबंध दाखवितात तर, म्हणजे, जरी, परंतु, इ० उभयान्वयी अन्वयें वाक्यांच्या मधला संबंध भासवितात हें उघड आहे.' म्हणजे आपल्या वरील मतासाठीं त्यास उभयान्वयी अव्ययांचें लक्षण कसें तरी बदलणें प्रयत्नांतीं निष्फळ वाटल्यामुळें त्यांस हें खरें लक्षण पुढें करणें भाग पडलें. परंतु लगेच त्यांस वादविषयक अव्ययांसंबंधाचा आपला कलही सोडून देणें प्राप्त झालें. 'परंतु च, ही, देखील इत्यादि शब्दांवर तें लक्षण येत नसल्यामुळें त्यांस उभयान्वयी अव्ययांत गणता येत नाहीं. म्हणून त्या अव्ययांचा एक निराळाच भेद मानावा लागेल. त्या अव्ययांस सजातीयद्योतक अव्ययें असें नवीन नांव द्यावें' इतकें सांगून ते त्या नांवाचें समर्थन करितात.

असो. याप्रमाणें कृष्णशास्त्री चिपळूणकर हे दादोबांचे विरुद्ध वादविषयक अव्ययांस उभयान्वयी अव्ययांत घालण्यास तयार असतां त्यांस तें, डोकें जाग्यावर कायम ठेऊन, करितां आलें नाहीं यामुळें ते त्या अव्ययांचा स्वतंत्रच एक वर्ग मानण्यास तयार झाले. यावरून त्या अव्ययांस उभयान्वयी अव्ययें मानण्याचा पक्ष किती निर्जीव आहे हें तेव्हांच स्पष्ट होत नाहीं काय ? शिवाय त्यांचे नंतरही कोणी या पक्षाचा वकील तत्प्रतिपादनार्थ पुढें आलेला दिसत नाहीं. म्हणून या पक्षाचाही आणखी खल करण्याची जरूर नाहीं.

तर मग वादविषयक अव्ययांचा कृष्णशास्त्री म्हणतात त्याप्रमाणें आणखी एक स्वतंत्र वर्ग मानून शब्दांच्या जाती नऊ मानावयाच्या कीं काय ? आणि जर शब्दांच्या जाती आठच मानावयाच्या असतील तर ह्या अव्ययांस त्या आठांपैकीं कोणत्या जातींत घालावें ? हे दोन प्रश्न अखेरीस राहिले. या ग्रंथाचे आरंभीं भाषा व व्याकरण ह्यांचेसंबंधानें जें साधारण विवेचन केलें आहे, त्यावरून असें दिसून येईल कीं, ज्याप्रमाणें व्यक्तिभिन्नत्व असतांही जातीचें सामान्य शक्य आहे त्याचप्रमाणें भाषाभिन्नत्व आणि त्याचबरोबर व्याकरणभिन्नत्व असलें तरी भाषा व व्याकरण ह्यांचें साधारण स्वरूप जिकडे तिकडे एक असणें अशक्य नाहीं. इतकेंच नव्हे तर मनुष्याचा आकार साधारणपणें एकच असें ज्याप्रमाणें ठरून गेलें असून, त्याचा आकार स्थूल मानानें रेखाटतां येतो. त्याचप्रमाणें व्याकरण म्हणजे अमुक अमुक विषयाचें विवेचन करणारें शास्त्र असें ठरलें असून, त्याच्याही विवेचनाचें स्थूलमानानें एक सांगाडेवजा चित्र रेखाटतां येणें शक्य झालें आहे. म्हणजे सर्व भाषांचें साधारण व्याकरण जर लिहावयाचें म्हटलं तर त्यामध्यें जे अनेक सिद्धान्त लिहितां येतील त्यांपैकीं एक असा असलाच पाहिजे कीं, कोणत्याही भाषेतील शब्दांच्या जाती आठच असल्या पाहिजेत. एकंदरींत शब्दांच्या मुख्य जाती आठ आहेत. हा सिद्धान्त विश्वव्यापी असून तो अनपवादक आहे. तेव्हां अशा या विश्वव्यापक सर्वसंमत सिद्धान्तास बाजूस ठेऊन विवक्षित अव्ययांचा नववा स्वतंत्र वर्ग मानणें हें उचित दिसत नाहीं. तर मग त्यांस सर्वसंमत आठ वर्गांपैकीं कोणत्या वर्गांत घालावें ? क्रियाविशेषणाचा आणि उभयान्वयी अव्ययाचा असे जरी नवीन दोन पक्ष पुढें आले आहेत, तरी त्यांचे पुरस्कर्ते आपण होऊनच हातपाय गाळीत असल्यामुळें ते वर सांगितल्याप्रमाणें निर्जीव व निराधार आहेत; तेव्हां आमचे मतें विवक्षित अव्ययांस दादोबांप्रमाणेंच शब्दयोगी अव्ययांत स्थळ देणें हेंच प्रशस्त होय. परंतु शब्दयोगी अव्ययांची दादोकृत व्याख्या त्यांस लागू पडत नाहीं, ही अडचण राहिली. ती फारशी अपरिहार्य नाहीं. कारण का, दादोकृत व्याख्या स्थूलमानानें जरी चालण्यासारखी असली तरी ती न्यायशुद्ध नाहीं; आणि चिपळूणकरकृत व्याख्या जरी अशुद्ध नाहीं, तरी व्याकरणदृष्ट्या प्रशस्त नाहीं; इत्यादि मुद्दे वर सविस्तर

आलेच आहेत. तेव्हां शब्दयोगी अव्ययांची नवीन व्याख्या करणें जरूर आहे. त्याप्रमाणें या अध्यायाचे आरंभीं दिलेली व्याख्या केली आहे. 'जीं अव्ययें नामें अथवा सर्वनामें आणि नामांप्रमाणें योजिलेले इतर शब्द ह्यांचे पुढें येऊन त्यांचा वाक्यांतील इतर शब्दांशीं संबंध दाखवितात, त्यांस शब्दयोगी अव्ययें असें म्हणतात.' अशी शब्दयोगी अव्ययांची व्याख्या करून शुद्ध शब्दयोगी-संबंधानें लगेच असें सांगितलें आहे कीं, तीं केवलप्रयोगी अव्ययांशिवाय इतर सर्व शब्दांपुढें येतात. कृष्णशास्त्री गोडबोले यांनींही याच अर्थाची व्याख्या करून वादविषयक अव्ययांस शब्दयोगी अव्ययांतच समाविष्ट केलें आहे. गोडबोल्यांची व्याख्या अशीः—'वाक्यांतील दुसऱ्या शब्दांशीं नामाचा संबंध होतांना (प्रायः त्याचें सामान्यरूप होऊन) त्यास जें अव्यय लागतें, त्यास शब्दयोगी अव्यय असें म्हणतात.' या लक्षणाचें रहस्य असें कीं, शब्दयोगी अव्ययांनीं मागील नामाचें सामान्यरूप होतें असें जे त्यांचे व्याख्येंत दादोबांनीं चुकीनें घातलें आहे, त्यांस या ग्रंथांतील व्याख्येंत फांटा दिला आहे; आणि गोडबोले यांनींही त्यास कंसांत फेंकून त्याचेमागें 'प्रायः' हें अव्यय जोडून त्यास सर्वथा निरुपद्रवी केलें आहे. तसेंच 'धातूशीं संबंध दाखविणें' हें जें कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचें व्याकरणदृष्ट्या अप्रशस्त विधान त्याचें या लक्षणांत 'इतर शब्दांशीं संबंध दाखविणें' असें रूपान्तर केलें आहे. यामुळें हें लक्षण सर्वसंमत असलेल्या व वादविषयक या दोन्ही अव्ययांस लागू पडण्यास आतां कोणतीच अडचण राहिली नाहीं. तथापि वादविषयक अव्ययें नामांशिवाय इतर शब्दांपुढें येतात; त्या वेळीं त्यांस प्रकृत लक्षण प्रत्यक्षपणें लागू पडत नाहीं. तीं नामेतर शब्दांपुढें येत नाहींत असें जरी गोडबोले ह्यांचे व्याख्येंत सांगितलेलें नाहीं, तरी त्यांचें लक्षण नामेतर शब्दांपुढें आलेल्या शुद्ध शब्दयोगी अव्ययांस निदान त्या ठिकाणीं तरी लागू होत नाहीं हें सूक्ष्म विचारान्तीं उघड आहे. आणि ह्यामुळेंच आम्हीं बहुतेक गोडबोल्यांप्रमाणें केलेल्या शब्दयोगी अव्ययांचे व्याख्येस शुद्ध शब्दयोगीसंबंधानें 'तीं केवलप्रयोगी अव्ययांशिवाय इतर सर्व शब्दांपुढें येतात' अशी पुरवणी जोडली आहे. ]

२२६. शब्दयोगी अव्ययांपूर्वीं मागील नामाचें प्रायः सामान्यरूप होतें म्हणून सांगितलें; त्या सामान्यरूपाचे जागीं कधीं कधीं त्या नामाचें सविकरण सामान्यरूप होतें. जसें:—घराबाहेर, किंवा घराच्या बाहेर; तुजवर, किंवा तुझ्यावर सोमवारापूर्वीं किंवा सोमवारच्या पूर्वीं; इ०.

२२७. अर्थदृष्टीनें या दोन प्रकारच्या शब्दयोजनेंत बहुधा फारसा फरक होत नाहीं. परंतु कधीं कधीं फरक आढळतो. शब्दयोगी अव्ययाचे मागील सविकरण—सामान्यरूपयुक्त नाम आणि शब्दयोगी अव्यय

अव्ययांचे मागील नामांचें नेहमीं सविकरण सामान्यरूप होतें. पाठीमागें, तोंडावर, तोंडापुढें, तोंडापुरतें, पायांखालीं, इ. हीं मिश्र शब्दयोगी अव्ययें होत. ह्यांची उदाहरणें:—कोणत्याही मनुष्याची **त्याच्या** पाठीमागें निंदा करूं नये; त्यानें **त्याच्या** तोंडावर त्याला शिव्या दिल्या; ज्यानें त्यानें **आपल्या** पायांखालीं काय जळतें आहे तें प्रथम पहावें; अहो हे चोर नव्हत, हे दरवडेखोरच होत; कारण ते **माणसाच्या** डोळ्यांदेखत त्यास लुबाडतात; इ०. कारण उघडच आहे कीं, मिश्र शब्दयोगी अव्ययांतील आद्य नामाशींच मागल्या नामाचा संबंध असल्यामुळें व पुढील शब्द सशब्दयोगिक असल्यामुळें मागील नामाचें सविकरण सामान्यरूप होतें.

२३०. कांहीं शब्दयोगी अव्ययांचे अर्थाविषयीं व उपयोगाविषयीं खुलासा झाला आहे. तथापि आणखीं कांहींच्या अर्थाकडे आणि परस्परांतील अर्थभेदाकडे विद्यार्थ्यांचें लक्ष लावणें अवश्य आहे.

**नंतर, पुढें**—हीं दोन्ही उत्तरकाल दाखवितात. **अमक्यानंतर** म्हणजे 'तें झाल्यावर **लगेच** किंवा फारसा वेळ न जातां;' आणि '**अमक्यापुढें**' म्हणजे 'तें होऊन गेल्यावर कधीं तरी' तें होण्याचे पूर्वीं नव्हे इतकेंच. परंतु तें झाल्यावर कधीं ह्याचा नेम नाहीं. उदा०:—लग्नानंतर वऱ्हाडी मंडळी निघून गेली. लग्नानंतर=लग्न आटोपल्यावर लगेच नाहीं, तरी लौकरच; परंतु 'ह्या गोष्टीचा विचार लग्नापुढें करितां येईल' लग्नापुढें—लग्न संपल्यावर कधीं तरी, सावकाश, सवडीनुसार. हा फरक फारसा मानिला जात नाहीं. तथापि अशा अनिश्चित उत्तरकालाचे अर्थानें 'पुढें' याचा बहुधा क्रियाविशेषणाप्रमाणें उपयोग करितात. जसें:—ह्याचा विचार इतक्यांत कशास पाहिजे. पुढें पाहतां येईल.

**मध्यें, आंत, ठायीं**—'ठायीं' ह्याचा व्युत्पन्न व उदात्त किंवा प्रौढ भाषेंत अधिक प्रचार आहे; आणि 'मध्यें' व 'आंत' ह्यांचा साध्या व व्यावहारिक भाषेंत फार प्रचार आहे. शिवाय 'ठायीं' हें मूळचें 'ठाय' ह्या नामाचें सप्तम्यन्त रूप असल्यामुळें तें बहुधा सविकरण सामान्यरूपाचे पुढें येतें, साध्या सामान्यरूपाचे पुढें आलेलें सहसा आढळत नाहीं. जसें:—त्याच्या—माझ्या—ठायीं, मनुष्याचे ठायीं, इ०.

**शिवाय, वांचून, खेरीज**—तिन्ही व्यतिरेकवाच आहेत; म्हणजे 'तें वगळून, सोडून, वर्ज करून, किंवा त्याचे अभावीं' या अर्थी उपयोगांत

आहेत. जसें:—तुमच्याशिवाय हें काम होणार नाहीं, पैशावांचून प्रपंच चालावयाचा नाहीं, तबल्याखेरीज आणि विण्याखेरीज गाण्याला रंग येत नाहीं, इ०. तथापि 'शिवाय' या शब्दयोगी अव्ययाला आणखी एक अर्थ आहे. 'त्यानें ह्या कामीं मला पैशाची मदत दिलीच, परन्तु **पैशाशिवाय** त्यानें अंगमेहनतही फार केली; तिची किंमतच करितां यावयाची नाहीं.' अशा ठिकाणीं 'शिवाय' याचा 'त्यापेक्षां अधिक' तें + दुसरें, त्याच्या भरीस' असा अर्थ आहे हें उघड आहे. 'खेरीज' ह्याचाही 'त्याच्या भरीस' या अर्थीं कधीं कधीं उपयोग होतो. आणखी असें कीं, 'शिवाय' आणि 'खेरीज' ह्यांचा क्वचित् विशेषणाप्रमाणेंही उपयोग होतो. उदा०:—शिवायजमा, खेरीजजमा, इ०. एवंच 'शिवाय' आणि 'खेरीज' ह्यांचे तीन तीन अर्थ आहेत; परंतु 'वांचून' हें त्यांपैकीं एकाच—तें वगळून—या अर्थीं उपयोगांत आहे.

**पेक्षां, परीस**—तुलनेंतील न्यूनाधिक्य किंवा तारतम्य दाखविण्याकरितां इंग्रजी व संस्कृत या भाषांत विशेषणासच तारतम्यद्योतक प्रत्यय जोडण्याचा जसा प्रकार आहे, तसा मराठींत नाहीं. दोन प्राण्यांचे किंवा पदार्थांचें तुलनेनें दृष्टोत्पत्तीस येणारें त्यामधील न्यूनाधिक्य दाखविण्याकरितां त्यांपैकीं एकाचे पुढें प्रकृत शब्दयोगी अव्ययें जोडण्याचा मराठींत प्रघात आहे. 'पेक्षां' आणि 'परीस' ह्यांपैकीं 'पेक्षां' चा प्रचार फार मोठा; 'परीस' हें क्वचित् गद्यांत, व विशेषेंकरून पद्यांत आढळतें. जसें:—**क पेक्षां ख** अधिक हुषार आहे; **ख पेक्षां ग** कमी हुषार आहे; हा कागद **त्यापेक्षां** अधिक किंवा कमी पांढरा आहे, इ०. 'हा कागद **त्यापेक्षां** पांढरा आहे' असेंही कधीं कधीं म्हणतात; म्हणजे कधीं कधीं अधिक किंवा कमी ह्यांपैकीं कोणताच शब्द वाक्यांत नसतो. अशा ठिकाणीं नेहमीं 'अधिक या शब्दाचाच अध्याहार होतो. 'ह्या मुलांपेक्षां तो हुषार आहे' म्हणजे ह्याचेपेक्षां तो 'अधिक हुषार' आहे असाच अर्थ होतो.

**आंत, मध्यें**—जेव्हां एखाद्या प्राण्याचें अथवा पदार्थाचें त्याच्या वर्गांतील अन्य सर्व व्यक्तींच्या मानानें एखाद्या बाबतींत अतिशयत्वानें वर्णन करावयाचें असतें. म्हणजे जेव्हां त्याची त्याच वर्गांतील अन्य सर्व व्यक्तींशीं तुलना करून एखादा गुण त्याचे ठायीं इतर सर्वांपेक्षां अधि-

क्यानें किंवा कमी प्रमाणानें वसत आहे असें म्हणावयाचें असतें. त्यावेळीं वर्गवाचक नामापुढें ‘ आंत ’ किंवा ‘ मध्यें ’ हें शब्दयोगी अव्यय येतें. म्हणूनच यांस ‘ उत्तमवाचक ’ असें म्हटलें आहे. आणि ह्यांचे दृष्टीनें ‘ पेक्षां ’ व ‘ परीस ’ ह्यांस ‘ उत्तरवाचक ’ अशी संज्ञा दिली आहे. उदाहरणें:—ह्या वर्गांत गोविंदा हा सर्व मुलांमध्यें हुषार आहे; त्यांच्यांत तात्या हा विशेष गोरा आहे; महाभारतांतील सर्व योद्ध्यामध्यें भीष्म हा श्रेष्ठ होय; इ०.

उत्तमवाचक संस्कृत विशेषणेंही अशींच या शब्दयोगी अव्ययांचे पुढें मराठींत योजितात, हें शेवटल्या उदाहरणांतील ‘ श्रेष्ठ ’ या शब्दावरून स्पष्ट होईल.

---

# अध्याय ८.

## उभयान्वयी अव्ययें.

२३१. जें अव्यय क्रियेचें विशिष्टत्व न दाखवितां एका वाक्याचा दुसऱ्या वाक्याशीं संबंध दाखवितें, ह्मणजे एका वाक्याची दुसऱ्या वाक्याशीं सांगड घालितें, त्यास **उभयान्वयी अव्यय** असें ह्मणतात. उदा०:—आणि, जर, तर, कांकीं इ०.

‘ रामा गेला **आणि** गोविंदा आला ’ या ठिकाणीं **आणि** हें उभयान्वयी अव्यय आहे; कारण कीं, त्यानें त्याच्या पुढील वाक्याची मागील वाक्याशीं सांगड घातली आहे. उभयान्वयी अव्ययानें जोडलीं जाणारीं वाक्यें कधीं कधीं इतकीं स्पष्ट नसतात. ‘ रामा **आणि** कृष्णा गेले ’ अशासारख्या ठिकाणीं दिसण्यांत एकच वाक्य दिसत आहे. परंतु दोन्ही वाक्यांतील क्रियापद एकच असल्यामुळें तें जणुं कांहीं कंसाबाहेर काढिलें आहे. म्हणजे गणिताचे रीतीनें जर वरील वाक्य मांडून दाखविलें, तर तें असें दिसेल:— ( रामा+कृष्णा ) गेला. यावरून ‘ रामा गेला ’ आणि ‘ कृष्णा गेला, ’ या दोन वाक्यांचा संक्षेप होऊन ‘ रामा आणि कृष्णा गेले, असें एक संक्षिप्त वाक्य झालें आहे, हें तेव्हांच नजरेस येईल. म्हणून प्रकृत स्थलींही ‘ आणि ’ हें अव्यय दोन वाक्यें

जोडीत आहे. आणखी उदाहरणें:—जर तूं नीट अभ्यास करशील तर पास होशील; 'तुला शिक्षा केली पाहिजे; **कांकीं**, आजकाल तुझें अभ्यासाकडे दुर्लक्ष झालें आहे;' इ०.

(अ) कधीं कांहीं कांहीं उभयान्वयीं अव्ययांनीं वाक्यांतील शब्दांचीही सांगड घालण्यांत येते. 'त्यास साखर आणि पाणी पाजा' या ठिकाणीं 'त्यास साखर पाजा' आणि 'त्यास पाणी पाजा' असा अर्थ होणें शक्य नाहीं, यामुळें प्रकृत स्थळीं 'आणि' या अव्ययानें दोन शब्दच जोडण्यांत येत आहेत हें निर्विवाद आहे. पुढील उदाहरणही असेंच निर्विवाद आहे. 'त्यानें आपल्या निष्काळजी व आळशी मुलास बराच दोष दिला!'

[ आतां उभयान्वयी अव्ययांची दादोबांची व्याख्या पहा. 'ज्या अव्ययांचा संबंध दोन शब्दांच्या अथवा दोन वाक्यांच्या परस्पर अन्वयाकडेस असतो, त्यांस उभयान्वयी अव्यय म्हणावें, (क० ५७४). खेरांनीं या व्याख्येचा अनुवाद केला आहे. उभयान्वयी अव्ययें वाक्यांची सांगड घालितात यांत शंकाच नाहीं. तथापि त्यांचे योगानें दोन शब्द जोडिले जातात कीं नाहीं, ह्याचेबद्दल प्रश्न आहे. वरील अंकांतील (अ) या कलमावरून उभयान्वयी अव्ययांनीं दोन शब्दही जोडण्यांत येतात असें दिसेल. परंतु हें जरी कांहीं थोड्याशा उभयान्वयी अव्ययासंबंधानें खरें असलें तरी तें सर्व उभयान्वयीं अव्ययांस लागू पडत नाहीं. ह्यामुळेंच वरील कलमांत 'कांहीं' हें विशेषण मुद्दाम योजिलें आहे; त्याकडे दुर्लक्ष करितां येत नाहीं. जर, तर, कारण, कारण कीं, कांकीं, इ० अनेक उभयान्वयी अव्ययांचा केवळ शब्द जोडण्याचे कामा कधींच उपयोग होत नाहीं. त्यांनीं नेहमीं वाक्येंच जोडण्यांत येतात. म्हणजे 'वाक्यान्वयकारकत्व' हा एकच धर्म सर्व उभयान्वयी अव्ययांचे ठायीं दृष्टीस पडतो; परंतु 'शब्दान्वयकारकत्व' हा फक्त त्यांपैकीं कांहींचेच ठायीं आढळत असल्यामुळें त्यांचा उभयान्वयी अव्ययांचें लक्षणांत अन्तर्भाव होऊं शकत नाही; तसें केल्यानें तें लक्षण अव्याप्त होवें म्हणजे तें कांहीं उभयान्वयी अव्ययांस लागत नाहींसें होतें. अर्थात् हे लक्षण अशुद्ध होय. ]

२३२. आतां उभयान्वयी अव्ययाचे आमच्या व्याख्येमध्यें 'क्रियेचें विशिष्टत्व न दाखवितां' असे जे अधिक शब्द घालण्यांत आले आहेत, त्यांचें महत्त्व व आवश्यकत्व दाखवितों.

ज्याप्रमाणें उभयान्वयी अव्ययांनीं वाक्यें जोडण्यांत येतात, त्याचप्रमाणें तीं इतर शब्दांनींही जोडिलीं जातात. म्हणजे वाक्यांची सांगड घालणारे शब्द भाषेमध्यें केवळ उभयान्वयी अव्ययेंच होत असें कोणीं समजूं नये,

तर इतर कांहीं शब्दांनींही तें कार्य भाषेंत घडून येतें. **संबंधी** व **अनुसंबंधी सर्वनामांनीं** वाक्यांची सांगड होते. '**जो** ईश्वरास स्मरून वागतो **त्यास** भिण्याचें कांहीं कारण नाहीं.' या उदाहरणांतील वाक्यांची सांगड 'जो' आणि 'त्यास' ह्यांचे योगानें झालेली आहे हें उघड आहे. त्याचप्रमाणें 'जसा—तसा,' 'जितका—तितका,' 'जितकाल—तितकाला' इत्यादि जीं सबंधीसर्वनामजन्य आणि तदनुसंबंधीसर्वनामजन्य विशेषणें—अथवा संक्षेपानें **संबंधीविशेषणें** असें म्हटलें तरी चालेल—त्यांनींही वाक्यांचा अन्वय होतो. '**जसें** करावें **तसें** भरावें,' '**जितका** प्रयत्न अधिक **तितकें** फल अधिक,' इत्यादि उदाहरणांवरून संबंधीविशेषणें हीं एका दृष्टीनें उभयान्वयी अव्ययें कशीं आहेत हें तेव्हांच समजेल. त्याचप्रमाणें 'जेव्हां—तेव्हां,' 'जेथें—तेथें,' 'ज्याप्रमाणें—त्याप्रमाणें' इत्यादि जोडीजोडीनें उपयोगांत येणारीं जीं क्रियाविशेषणें आहेत, त्यांसही एका दृष्टीनें **सम्बन्धी क्रियाविशेषणें** म्हणण्यास हरकत नाहीं; त्यांनींही वाक्यावाक्यांची जोड करण्यांत येते. म्हणजे सम्बन्धी सर्वनामें, सम्बन्धी विशेषणें, आणि संबंधी क्रियाविशेषणें यांनींही वाक्यमीमांसेचे दृष्टीनें उभयान्वयी अव्ययांचें काम होत असतें हें उघड आहे. आणि वाक्यमीमांसेचे दृष्टीनें जरी त्यांस उभयान्वयी अव्ययें म्हणणें शक्य आहे, तरी व्याकरणदृष्ट्या त्यांची उभयान्वयी अव्ययांत गणना करितां यावयाची नाहीं. कारण कीं, संबंधी सर्वनामें आणि संबंधी विशेषणें हीं मुळीं अव्ययेंच नव्हत. आणि सम्बन्धी क्रियाविशेषणें हीं जरी अव्ययें असलीं, तरी त्यांचा प्रधान धर्म उभयान्वयी अव्ययाप्रमाणें, वाक्यसंयोग हा नसून क्रियेचें विशिष्टत्व दाखविणें हा असल्यामुळें त्यास क्रियाविशेषणेंच म्हणणें रास्त आहे. न्यायशास्त्राचे भाषेनें बोलावयाचें म्हणजे, वाक्यसंयोग, ही त्यांची प्रकृति नसून विकृति किंवा विकार आहे. म्हणून जरी त्यांनीं वाक्यसंयोग होत असला, तरी त्यांस उभयान्वयी अव्यय हें नांव शोभत नाहीं. एवंच वाक्यमीमांसेचे दृष्टीनें उभयान्वयी अव्ययांचें मुख्य काम जें वाक्यसंयोग, तें सम्बन्धी सर्वनामें, सम्बन्धी विशेषणें, व सबंधी क्रियाविशेषणें यांनींही होतें हीं गोष्ट संस्मरणीय आहे. ह्यांपैकीं सर्वनामें व विशेषणें अव्ययें नसल्यामुळें उभयान्वयी अव्ययांचा व त्यांचा घोंटाळा होण्याचा संभव नाहीं. म्हणून सम्बन्धी क्रियाविशेषणांचें निराकरण करण्या-

साठीं म्हणजे उभयान्वयी अव्ययांचे लक्षणाची त्यांजवरील अतिव्याप्ति टाळण्यासाठीं 'क्रियेचें विशिष्टत्व न दाखवितां' हे शब्द या ग्रंथांतील उभयान्वयी अव्ययाचे लक्षणांत मुद्दाम अधिक घालण्यांत आले आहेत.

२३३. उभयान्वयी अव्ययांचे मुख्य दोन भेद आहेत: **प्रधानवाक्यसूचक** आणि **गौणवाक्यसूचक**: अथवा संक्षेपानें **प्रधानत्वसूचक** आणि **गौणत्वसूचक.**

[ यांसच आगरकरांनीं समानाधिकरण आणि व्यधिकरण अशीं नांवें दिलीं आहेत. नांवांबद्दल वाद करण्यांत अर्थ नाहीं. आमच्या मतें प्रधानत्वसूचक आणि गौणत्वसूचक, अर्थात् वाक्याचें प्रधानत्व व गौणत्व दाखविणारीं हीं नांवें अधिक सार्थ व सुबोध आहेत; म्हणून हीं बरीं. बाकी अमुक शब्दाचा अमुक अर्थ समजावा हा संकेत जोंपर्यंत असंदिग्ध आणि स्पष्ट असून कायम आहे, तोंपर्यंत कोणतीही परिभाषा वापरण्यास हरकत नाहीं. उभयान्वयी अव्ययांचे प्रधानत्वसूचक आणि गौणत्वसूचक हे भेद अर्थात् वाक्यांचे दृष्टीनें केले आहेत. उभयान्वयी अव्ययांचा मुख्य व्यापार वाक्यसंयोगाचाच पडल्यामुळें त्यांचे भेद त्याच दृष्टीनें करणें प्रशस्त होय. ]

२३४. प्रधानत्वसूचक उभयान्वयी अव्ययांचे **समुच्चयबोधक, विकल्पबोधक, न्यूनत्वबोधक,** आणि **परिणामबोधक,** असे चार उपभेद आहेत; आणि गौणत्वसूचक उभयान्वयी अव्ययांचे **कारणदर्शक, उद्देशदर्शक, संकेतदर्शक,** आणि **स्वरूपदर्शक,** असे चार उपभेद आहेत.

[ ह्याप्रमाणें उभयान्वयी अव्ययांचे एकन्दर आठ भेद आहेत. आजपर्यन्तच्या वैयाकरणांनीं उभयान्वयी अव्ययांचे भेद एकदम सांगितले आहेत. म्हणजे प्रथम मुख्य भेद व नंतर त्यांचे उपभेद अशा क्रमानें सांगितले नाहींत. दादोबांनीं आपल्या व्याकरणांत वाक्यमीमांसेला बिलकूल स्थळ दिलें नसल्यामुळें त्यांचे व्याकरणांत ही उणीव भासण्याचें कारण नाहीं. परन्तु वाक्यमीमांसेला व्याकरणाचा एक भाग मानूनही जे वैयाकरण भेद व उपभेद हा क्रम उभयान्वयी अव्ययांसम्बंधानें पाळीत नाहींत, त्यांस तो नंतर वाक्यमीमांसेंत सांगावा लागतोच. त्यापेक्षां तो प्रथमच सांगितल्यानें व्यवस्था व अभ्यास ह्या दोहोंसही अधिक फायदेशीर होतो हें उघड आहे. ]

२३५. ज्या अव्ययांनीं प्रधान वाक्यें जोडण्यांत येतात त्यांस **प्रधानत्वसूचक** उभयान्वयी अव्ययें म्हणतात. ह्यांच्या उपभेदांकडे पहा:—

( अ ) **समुच्चयबोधक**—आणि, व, आणखी, ( आणिक ).

या अव्ययांनीं दोन अथवा अधिक प्रधान वाक्यांचा एकत्र समुच्चय

किंवा संग्रह होतो, म्हणून यांस समुच्चयबोधक असें म्हणतात. उदा०:—राम आणि सीता वनवासांत गेलीं; राम, लक्ष्मण, आणखी सीता दण्डकारण्यांत जाऊन राहिलीं; आणखी असें पहा, इ०.

**( आ ) विकल्पबोधकः**—वा, किंवा, अथवा, अगर, कीं, ( ना ).

या अव्ययांनीं दोन किंवा अधिक विवक्षित वाक्यांपैकीं किंवा शब्दांपैकीं कोणत्या तरी एकाचें ग्रहण होत असल्यामुळें त्यांस विकल्पबोधक असें म्हणतात. जसें:—रामा, अथवा गोविंदा अथवा कृष्णा उद्यां जाईल; येथें या तिघांपैकीं कोणी तरी एक जाईल असा अर्थ आहे हें उघड आहे.

**वा**—हें साध्या व्यावहारिक भाषेंत बहुधा येत नाहीं. हें संस्कृतांत फार आढळतें. परन्तु प्रौढ भाषेंत, विद्वत्ताप्रचुर भाषणांत, आणि ग्रंथांत याचा उपयोग होतो. जसें:—नरो **वा** कुंजरो **वा**; हा मार्ग तुम्हांस इष्ट **असो वा नसो**, त्याशिवाय तुम्हांस गत्यन्तरच नाहीं; इ०.

**कीं**—ह्याचा जेव्हां **किंवा** असा अर्थ असतो तेव्हांच तें विकल्पबोधक होतें. जसें:—तो येतो **कीं** नाहीं हें समजत नाहीं. 'किंवा' ह्या अर्थीं 'कीं' ह्याचा उपयोग कधीं कधीं ( कवितेंत ) होतो असें जें खेर म्हणतात, ( क० १९० ब ) त्यांत विशेष तथ्य नाहीं हें वरील गद्य उदाहरणावरून कळेलच.

**( इ ) न्यूनत्वबोधक**—पण, परन्तु, किंतु, बाकी, ( परी ).

या अव्ययांनीं विवक्षित अर्थामधील कांहीं कमीपणा दाखविण्यांत येतो, म्हणून यांस न्यूनत्वबोधक असें म्हणतात. जसें:—वैद्यानें औषध दिलें, परन्तु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

**( ई ) परिणामबोधक**—म्हणून, अतएव, यास्तव, याकरितां, तेव्हां, सबब, त्यास, तस्मात्, इ०.

या अव्ययांनीं असें दाखविण्यांत येतें कीं, या अव्ययाचे पुढें येणाऱ्या वाक्यांतील अर्थ त्याचे मागील वाक्याचे अर्थाचा परिणाम आहे म्हणजे तो त्याजपासून उत्पन्न होतो. म्हणून यांस परिणामबोधक असें म्हणतात. जसें:—'माशांस फुप्फुसें नाहींत, म्हणून त्यांस शब्द नाहीं. या ठिकाणीं 'त्यांस शब्द नाहीं.' हें परिणाम दाखवितें; आणि 'माशांस फुप्फुसें नाहींत.' हें कारण दाखवितें. याकरितां म्हणून हें परिणामबोधक होय.

**अत एव**—हें संस्कृत आहे. म्हणून याचा उपयोग बहुधा प्रौढ व व्युत्पन्न भाषासरणींत होतो.

**तेव्हां**—ह्याचा 'त्यावेळी' असा अर्थ असला म्हणजे तें क्रियाविशेषण असतें. परंतु त्याचा '**म्हणून, सबब, यास्तव,**' या अर्थांही उपयोग होतो; त्यावेळीं तें **परिणामबोधक** उभयान्वयी अव्यय होय. जसें:—तूं त्या वेळीं तेथें हजर असूनही कानावर हात ठेवितोस, **तेव्हां** तूं लुच्चा आहेस; त्याचा आजार वाढता आहे, **तेव्हां** त्याला डाक्तरकडे नेणें अवश्य आहे.

**म्हणून**—यास अनेक अर्थ आहेत. त्याचा जेव्हां 'सबब, याकरितां,' असा मागील अर्थाचा परिणाम दाखविणारा अर्थ असेल, तेव्हांच त्यास परिणामबोधक म्हणावें.

टीपः—म्हणून याचे इतर अर्थ पुढें दिले आहेत.

२३६. ज्या अव्ययांनीं एका प्रधानवाक्याला एक किंवा अनेक गौणवाक्यें जोडण्यांत येतात, त्यांस **गौणत्वसूचक** उभयान्वयी अव्ययें असें म्हणतात. ह्यांचे पोटभेद येणेंप्रमाणें:—

( अ ) **कारणदर्शक**—कारण, कीं, कांकीं, कारण कीं,

या अव्ययांनीं आरंभ होणाऱ्या वाक्यानें पूर्व वाक्याचें समर्थन होतें, म्हणजे पूर्ववाक्यांत जें विधान केलेलें असतें, त्याचें कारण या अव्ययांनंतर येणाऱ्या वाक्यांत सांगितलेलें असतें. म्हणून त्यांस कारणदर्शक अव्ययें असें म्हणतात. जसें:—तो एकाएकीं मेला, **कारण कीं,** औषधाचे बदला तो चुकीनें विषच प्याला. या ठिकाणीं उत्तरवाक्यामध्यें पूर्वींतील वृत्ताचें म्हणजे त्याच्या मरणाचें कारण सांगितलें आहे. अर्थातच उत्तरानें पूर्वाचें समर्थन होत आहे. म्हणून 'कारण कीं,' हें कारणदर्शक उभयान्वयी अव्यय होय. हें वाक्य जर उलटें करून असें म्हटलें कीं, 'औषधाचे बदला तो चुकीनें विषच प्याला, सबब—यास्तव—म्हणून—एकाएकीं मेला' तर पूर्वामध्यें कारणाचा निर्देश आहे. यामुळें, सबब, यास्तव, म्हणून, इ०. अव्ययें परिणामबोधक आहेत हें उघड आहे.

( आ ) **उद्देशदर्शक**—सबब, म्हणून, यास्तव, याकरितां, कारण, कीं, कांकीं, इ०.

ज्याप्रमाणें वर सांगितल्याप्रमाणें उत्तर वाक्यामध्यें पूर्वाचें कारण सांगितलेलें असतें, त्याचप्रमाणें कधीं कधीं उत्तरामध्यें पूर्वाविषयींचा हेतु किंवा उद्देश सांगण्यांत येतो. 'मी तुमच्याकडे आलों आहें, **कांकीं** माझी एवढी अडचण निभावी' या ठिकाणीं 'कांकीं' या अव्ययानंतर येणारें वाक्य पूर्वांतील विधानाचा उद्देश दाखवितें. 'माझी अडचण निभावी' हा तुमच्याकडे माझ्या येण्याचा उद्देश आहे हें उघड आहे. परंतु उद्देशदर्शक वाक्य बहुधा प्रथम येऊन त्याचे पुढें म्हणून, सबब, इ० अव्ययें येऊन नंतर प्रधानवाक्य येतें. जसें:—माझी एवढी अडचण निभावी म्हणून मी तुमच्याकडे आलों आहें. उद्देशदर्शक वाक्य प्रथम येवो वा नंतर येवो, तें गौण होय; आणि ज्याविषयींचा उद्देश सांगितलेला असतो तें वाक्य प्रधान होय. 'मी तुमच्याकडे इ०' हें प्रधानवाक्य होय; कारण कीं, ह्याविषयींचा (माझ्या येण्याचा) उद्देश दुसऱ्या वाक्यांत सांगितलेला आहे.

**म्हणून**—उद्देशदर्शक 'म्हणून' हें परिणामबोधक 'म्हणून' हून भिन्न आहे. यामधील फरक असा कीं, ज्या वाक्यांत परिणामाचा निर्देश केलेला असतो त्याचे आरंभीं 'म्हणून' येतें; आणि ज्यांत उद्देशाचा उल्लेख केलेला असतो त्याचे अखेरीस 'म्हणून' येतें. तो विष प्याला, म्हणून गेला; माशास फुप्फुसें नाहींत, म्हणून त्यांस शब्द नाहीं; या दोन उदाहरणांतील उत्तरवाक्यांत पूर्ववाक्यांतील कारणाचा परिणाम सांगितलेला आहे. याअरितां 'म्हणून' हें अव्यय पूर्ववाक्याचे अंतीं व **परिणामद्योतक वाक्याचे आरंभीं** आलें आहे. 'नोकरी पहावी **म्हणून** मी येथें आलों आहें, डोळ्यांस डाक्तरी इलाज करावा **म्हणून** मी नागपुरास किंवा मुंबईस जाणार आहें.' या दोन उदाहरणांत 'म्हणून' हें उद्देशदर्शक असून तें **उद्देशद्योतक वाक्याचे अन्तीं** आलें आहे. 'म्हणून' याप्रमाणें परिणामबोधक इतर अव्ययेंही—सबब, याकरितां, यास्तव, इ०—बहुधा अशा रीतीनें उद्देशदर्शक होऊं शकतात. आणि परिणाम बोधक 'म्हणून' हें जसें उद्देशदर्शक 'म्हणून' यापासून भिन्न आहे, त्याचप्रमाणें इतरांमधील फरकहीं विसरतां कामा नये.

सारांश, उद्देशदर्शक उभयान्वयी अव्यय अगदीं स्वतंत्र असें एकही नाहीं. कारण कीं, कांकी, इ० हीं कारणदर्शक अव्ययें उद्देशदर्शक होऊं

शकतात. परंतु कारणदर्शक अव्ययांचा हा उद्देशदर्शक उपयोग पद्यांत बराच आढळतो. उदा०:—शेले, शाल्ह, साड्या, क्षीरोदक, लांबरुंद पाटावें ॥ झाला अनंत वस्त्रें **कीं** तीस अनाथसें न वाटावें ॥—मोरोपंत.

तथापि गद्यांत त्याचा हा उपयोग कमीच होय. जो कांहीं थोडासा आढळतो तो इंग्रजी भाषेच्या सहवासाचा परिणाम होय. तेव्हां मराठींतील नेहमींचीं उद्देशदर्शक उभयान्वयी अव्ययें म्हटलीं म्हणजे परिणामबोधक या सदराखालीं जीं म्हणून, सबब, इ० पूर्वीं सांगितलीं आहेत तींच होत. म्हणजे परिणामबोधक आणि नेहमींचीं उद्देशदर्शक हीं दिसण्यांत एकच आहेत. मात्र त्यांचे उपयोगांत फरक आहे. तो असा:—म्हणून, सबब, हीं जेव्हां परिणामबोधक असतात, तेव्हां तीं कारणद्योतक वाक्याचे अन्तीं आणि परिणामद्योतक वाक्याचे आरंभीं येतात; आणि जेव्हां तीं उद्देश-दर्शक असतात तेव्हां तीं उद्देशद्योतक वाक्याचे अन्तीं आणि उद्देशप्रेरित क्रिया दाखविणाऱ्या वाक्याचे आरंभीं येतात. हा फरक महत्वाचा असून वाक्यमीमांसेंत त्याचा उपयोग कळून येईल.

( इ ) **संकेतदर्शकः**—जर—तर, जरी—तरी, यद्यपि—तथापि, म्हणजे, कीं, इ०.

ह्यांपैकीं 'म्हणजे' व 'कीं' हीं दोन शिवाय करून बाकीचीं जोडीनें येतात. तीं संबंधीं सर्वनाम व अनुसंबंधीं सर्वनाम ह्यांच्यासारखीं आहेत. म्हणजे जर, जरी, यद्यपि, हीं जोडण्यांत येणाऱ्या दोन वाक्यांपैकीं एका वाक्यांत येतात; आणि तर, तरी, तथापि, हीं तदनुरूप अव्ययें दुसऱ्या वाक्यांत येतात जर, जरी, यद्यपि, हीं ज्या वाक्यांत येतात, त्यास **पूर्ववाक्य** किंवा संक्षेपानें **पूर्व** असें म्हणतात; आणि तर, तरी, तथापि, हीं ज्या वाक्यांत येतात, त्यास **उत्तरवाक्य** किंवा **उत्तर** असें, म्हणतात. **जर** तुला तहान लागली आहे, **तर** पाणी पी; तूं **जरी** सशक्त आहेस **तरी** तुला हा थैला उचलणार नाहीं. या उदाहरणांत 'जर तुला तहान लागली आहे' आणि 'तूं जरी सशक्त आहेस' हीं **पूर्वें** होत; आणि 'तर पाणी पी' आणि 'तरी तुला हा थैला उचलणार नाहीं' हीं **उत्तरें** होत.

कधीं कधीं पूर्वामध्यें येणारीं जर, जरी, इ० अव्ययें अध्याहृत असतात. परंतु उत्तरामध्यें येणारीं तर, तरी, इ० हीं नेहमीं व्यक्त किंवा प्रकटच असावीं लागतात. जसें:—त्यानें त्या वैद्याचें औषध घेतलें तरी किंवा तथापि त्यास गुण आला नाहीं. या ठिकाणीं पूर्वामध्यें जरी किंवा यद्यपि हें अध्याहृत आहे.

कवितेंत क्वचित्, तर, तरी, इ० हीं अनुसंबंधी, व क्वचित् संबंधी व अनुसंबंधी हीं दोन्हीं अध्याहृत असतात. जसें:—

लाविल इला बळें कर **जरि** खळ परपुरुष ( तर ) स्वकुळ रक्षा हो—मोरो.

नामा म्हणे ( तर ) सर्व, सुखच होईल । ( जर ) मन हें ठेवाल, हरिपायीं॥

**जर—तर**:—हीं ज्या वाक्यांत येतात, त्यांतील पूर्वामध्यें कांहीं तरी अट सांगितलेली असते, आणि उत्तरामध्यें त्या अटीवर अवलंबून असलेली गोष्ट निर्दिष्ट असते.

**जरी—तरी, यद्यपि—तथापि:**—हीं ज्या वाक्यांत आलेलीं असतात, त्यांतील पूर्वोत्तरांमध्यें कांहीं अंशीं परस्पर विरोध असतो. जसें:—जरी तो आला तरी त्याची व बापाची भेट झाली नाहीं; यद्यपि तूं हुषार आहेस तथापि तुझा अभ्यास नीट नसल्यामुळें तुला यंदां नापास होण्याची भीति आहे; इ०. म्हणून यांस कोणी विरोधी संकेतदर्शक असें म्हणतात.

( १ ) कवितेमध्यें कधीं कधीं **जरी—तरी** ह्यांचा केवळ **जर—तर** असाच अर्थ असतो.

जरि ( जर ) विचारुन गोंविसि वैखरी ।
तरि ( तर ) च होइल जाण अगा खरी—वामन

( २ ) **जरी—तरी** ह्यांचेबदल कवितेंत कधीं कधीं **जऱ्ही—तऱ्ही** आणि **यद्यपि—तथापि** ह्यांचेबदल **यद्पि—तद्पि** असे पर्याय आढळतात.

**म्हणजे**—हें पूर्वाचे अंतीं, अर्थात् उत्तराचे आरंभीं येतें. ह्याचा उपयोग ‘ तर ’ या सारखा आहे. तथापि ‘ म्हणजे ’ ह्याचे अर्थांत ‘ पूर्वांतील अट खरी झाल्याबरोबर ’ ह्या अर्थाचा ध्वनि आहे. ह्याचेपूर्वीं दुसरें कोणतेंही अव्यय यावें लागत नाहीं. जसें:—तूं खरें बोल **म्हणजे**, मी तुला सोडीन; त्याला सुटी झाली **म्हणजे**, तो एक दिवसही

येथें रहावयाचा नाहीं; तूं बरा झालास **म्हणजे,** मी तुला सर्कस पहाण्यास पाठवीन, इ०.

**कीं**—संकेतदर्शक ' कीं ' ह्याचा अर्थ व उपयोग ' म्हणजे ' प्रमाणेंच आहे. जसें:—तूं निघालास कीं, मी निघालोंच, इ०.

( ई ) स्वरूपदर्शक—म्हणजे, म्हणून, कीं, जे.

यांनीं जोडण्यांत येणाऱ्या शब्दांपैकीं किंवा वाक्यांपैकीं मागील शब्दाच्या किंवा वाक्याच्या अर्थाचें स्वरूप म्हणजे त्याचा खुलासा पुढील शब्दानें किंवा वाक्यानें होतो. म्हणून यांस स्वरूपदर्शक असें म्हणतात.

**म्हणजे**—' अश्व **म्हणजे** घोडा.' ' म्हणजे ' हें वास्तविक म्हटलें असतां मूळचें क्रियापद आहे. म्हण या धातूचें तें कर्मणि वर्तमानकाळीं तृतीयपुरुषाचें एकवचनीं ' म्हणिजे ' म्हणून जें जुनें रूप कवितेंत येतें त्याचें ' म्हणजे ' हें रूपांतर होय. म्हणजे=म्हणिजे=म्हटला जातो.

जणें माया अधिष्ठिजे । तें ब्रह्म मायोपाधि बोलिजे ।
माया शबल ऐसें **म्हणिजे** । तया तेंचि ॥—मुकुंदराज

यावरून असें दिसून येईल कीं, ' अश्व म्हणजे घोडा ' = अश्व घोडा म्हणिजे = अश्व घोडा असें म्हटला जातो = अश्वाला घोडा असें म्हणतात.

**म्हणून**—हें मूळचें म्हण या क्रियेचें ' ऊन ' प्रत्ययान्त कृदन्त होय. त्याचा मूळचा अर्थ **बोलून** हा होय; आणि या अर्थानेंही तें प्रचलित मराठींत उपयोगांत आहे, नाहीं असें नाहीं. उदा०:—असें म्हणून (बोलून) तो निघून गेला. ' म्हणून ' हें जेव्हां स्वरूपदर्शक उभयान्वयी अव्यय असतें, तेव्हां त्याचा अर्थ ' हें, **असें**, किंवा या नांवाचा ' असा असतो. जसें:—मी बघेन म्हणून ( हें किंवा असें ) तो म्हणाला; ज्ञानेश्वर म्हणून ( असें ) म्हणतात तोच ज्ञानदेव; त्यानें ज्ञानेश्वरी म्हणून ( या नांवाची ) एक श्रीमद्भगवद्गीतेवर मराठींत सुप्रसिद्ध टीका लिहिली आहे; कोबी म्हणून ( या नांवाची ) एक भाजी आहे; इ०.

**कीं**—हें स्वरूपदर्शक असतें त्या वेळीं तें केवळ आरंभसूचक किंवा प्रास्ताविक असतें. जसें:—तो म्हणाला **कीं,** मी उद्यां मुंबईस जाणार आहें. या ठिकाणीं ' मी उद्यां मुंबईस जाणार आहें ' या त्याच्या भाषणाचा आरंभ ' कीं ' हें दाखवित आहे.

कधीं कधीं मागील शब्दाच्या अर्थाचा खुलासा करणाऱ्या वाक्याचे आरंभींही तें आलेलें आढळतें. जसें:—त्यानें मला असें **वचन** दिलें आहे **कीं,** वाटेल त्या वेळेस मी तुला गणित शिकवीन. त्यानें मला असा **धाक** घातला आहे **कीं,** तूं जर नापास झालास तर मी पुढें तुला मदत देणार नाहीं.

अशा स्थळीं वाक्याचे अंतीं 'म्हणून' हें अव्यय शेवट दाखविण्या-साठीं घालण्याची व्यावहारिक भाषेंत कांहींशी चाल आहे. जसें:— त्यानें मला वचन दिलें............शिकवीन म्हणून; त्यानें मला धाक घातला...मदत देणार नाहीं म्हणून; इ०. अशा स्थळीं 'कीं' हें आरंभसूचक व 'म्हणून' हें अन्तसूचक स्वरूपदर्शक उभयान्वयी अव्यय होय.

**जे**—हें स्वरूपदर्शक उभयान्वयी अव्यय बहुधा जुन्या गद्यांत व पद्यांत आढळतें. जसें:—तेथें लिहिलें होतें **जे** (कीं) सल्ला करून तुम्हीं आम्हीं एक व्हावें.

पत्रें, करारनामे, रोखे, इत्यादिकांचे मान्यांमध्यें अद्यापि **जे** ह्या स्वरूप-दर्शकाचा उपयोग होतो. जसें:—साष्टांग नमस्कार विनंति ऐशी **जे;** करारनामा, किंवा रोखा.......लिहून देतों ऐसा **जे;** इ०.

'जे' ह्याचे व्युत्पत्तीसंबंधानें कृष्णशास्त्री चिपळूणकर हे आपल्या निबंधांत लिहितात:—'जें हें स्वरूपबोधक उभयान्वयी संस्कृतांतून आलें आहे. त्या भाषेंत स्वरूपबोधक उभयान्वयीचे जागीं 'यत्' ह्या संबंधी सर्वनामाचा प्रयोग करण्याची चाल आहे; जसें:—किं वदसि यत् अहं न गच्छामीति (काय म्हणतोस ? मी जाणार नाहीं म्हणून!) याच 'यत्' चा अपभ्रंश होऊन गुजराथींत 'जत' व मराठींत 'जे' अशीं स्वरूप बोधक उभयान्वयी अव्ययें झालीं आहेत. इंग्रजींतही संबंधी सर्वनाम (that) हेंच स्वरूपबोधक झालें आहे. असो. (निबंध. पृष्ठ २०४).

२३७. 'पेक्षां,' 'परीस' ह्यांचा खेरांनीं (क० १९५) उभयान्वयी अव्ययांत अन्तर्भाव केला आहे. परंतु हें इंग्रजी व्याकरणाचें अंध अनुकरण होय. ह्या अर्थाचा इंग्रजी शब्द जो than तो त्या भाषेंत बहुधा उभयान्वयी अव्यय आहे. कधीं कधीं त्याचा शब्दयोगी अव्ययाप्रमाणेंही उपयोग

होतो, हें इंग्रजी भाषाभिज्ञांस स्मरेलच. तथापि त्यास बहुधा उभयान्वयी अव्यय म्हणतात. येवढ्यावरून तदर्थक मराठी शब्दांस जर उभयान्वयी अव्ययें म्हणावयाचें तर 'पेक्षां' व 'परीस' ह्यांनीं मागील नामांचें सामान्यरूप होतें, हीं गोष्ट सर्वस्वी विसरून गेलें पाहिजे. आणि ह्यांनीं कोणतीं दोन वाक्यें मराठींत जोडिलीं जातात हा प्रश्नही कोणीं काढिता कामा नये. एरव्हीं त्यांस मराठींत उभयान्वयी अव्ययें म्हणणें मुळींच शक्य नाहीं. 'मजपेक्षां तो उंच आहे' या ठिकाणी 'पेक्षां' यानें 'मज' आणि 'तो' हे दोन शब्द जोडले आहेत हें खरें. तरी शब्दयोगी अव्ययांनीं शब्दांची सांगड होत नाहीं असें कोण म्हणतो ? विभक्तिप्रत्ययांनींही शब्दसंयोग होतो. तथापि 'पेक्षां' यानें शब्दसंयोग होतो येवढ्यावरून त्यास उभयान्वयी अव्यय म्हणतां येत नाहीं. शिवाय कोणत्याही उभयान्वयी अव्ययानें मागल्या शब्दाचें सामान्यरूप होत नाहीं. आणि 'पेक्षां' यानें मागील शब्दाचें सामान्यरूप होतें. म्हणून 'पेक्षां' हें उभयान्वयी अव्यय नव्हें असें सिद्ध होत नाहीं काय ?

२३८. अशाच प्रकारची एक चूक दादोबांनीं केलेली आहे. कदाचित्, क्वचित्, प्राय:, प्रायश:, बहुतकरून, फारकरून, इ० अव्ययांस दादोबा न्यूनत्वबोधक उभयान्वयी अव्ययें असें म्हणतात. परंतु तीं वास्तविक क्रियाविशेषणें होत. 'तो क्वचित् तेथें जातो' ह्या दादोबांनीं दिलेल्या उदाहरणांतच 'क्वचित्' यानें कोणते दोन शब्द विशेषेंकरून जोडण्यांत येत आहेत ? दोन वाक्यें तर जोडण्यांत येत नाहींत, हें उघडच आहे. 'क्वचित्' ह्याचा 'जाणें' या क्रियेकडे संबंध असून त्या क्रियेचें विशिष्टत्व त्या शब्दानें समजतें; म्हणून तें क्रियाविशेषण होय हें स्पष्ट नाहीं काय ? यास उभयान्वयी अव्यय कां म्हणावें हें आम्हांस तरी समजत नाहीं.

[ उभयान्वयीं अव्ययांचें दादोबांचें वर्गीकरण मुळीं वर्गीकरणच नव्हे. खुद्द दादोबाही त्यास वर्गीकरण म्हणत नाहींत. 'या उभयान्वयी अव्ययांचे कित्येक अर्थ सांगतो' असें म्हणून त्यांनीं समुच्चयवाचक, पक्षांतरबोधक, वगैरे भेद सांगितले आहेत. दादोबांस वाक्यमीमांसेचें विवेचन व्याकरणांत कर्तव्य नसल्यामुळें त्यांनां उभयान्वयीं अव्ययांचें मुळीं वर्गीकरण करण्याचें प्रयोजनच पडलें नाहीं. कृष्णशास्त्री चिपळूणकरांसही दादोबांप्रमाणेंच वाक्यमीमांसेचें प्रयोजन नसल्यामुळें त्यांनींही उभयान्वयी

अव्ययांचे दिलेले 'प्रकार' विशेष विचार करून दिले आहेत असें दिसत नाहीं. कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं मात्र वाक्यमीमांसेच्या दृष्टीनें उभयान्वयी अव्ययांचें वर्गीकरण केलें आहे. 'उभयान्वयी अव्ययांचे वर्गीकरण करितांनां वाक्यांविषयीं कांहीं माहिती असली पाहिजे' (क० ३५०) असें त्यांनीं आरंभीच म्हटलें आहे. आणि नंतर त्यांनीं उभयान्वयी अव्ययांचे मुख्य वर्ग पांच आहेत असें सांगितलें आहे. तथापि ह्या वर्गांचें विशेष स्पष्टीकरण करितांना त्यांनीं जे वर्गांचे क्रमवार आंकडे घातले आहेत ते सातांपर्यंत गेलें आहेत. या सातांपैकीं पांचव्या आंकड्यांत सांगितलेल्या अव्ययांस त्यांनीं वेगळें नांव दिलेलें दिसत नाहीं. बाकीच्या सहांस निरनिराळीं नांवें दिलीं आहेत. तीं अशीं:—समुच्चयदर्शक. विकल्पदर्शक, विरोधदर्शक, संकेतदर्शक, कारणदर्शक, आणि स्वरूपदर्शक. ह्या सहांपैकीं स्वरूपदर्शक 'म्हणजे' हें एकच उभयान्वयी अव्यय त्यांनां दिसल्यामुळें त्यांनीं स्वरूपदर्शक हा भेदही गौण म्हणून सोडून दिलेला दिसतो. एवंच जरी गोडबोले यांनीं उभयान्वयी अव्ययांचे वर्गीकरणाच्या योग्य मार्गाचें अवलंबन केलें, तरी त्यांनीं त्या मार्गाचें आक्रमण काळजीपूर्वक शेवटपर्यंत केलेलें दिसत नाहीं. यामुळें त्यांचें वर्गीकरण अपुरें व सदोष राहिलें. खेर यांनीं कांहीं एक अधिक विचार न करितां गोडबोल्यांचें म्हणणें डोळे मिटून इंग्रजींत घातलें इतकेंच. तथापि त्यांनीं आगरकरांचे वाक्यमीमांसेकडे पाहिलें असतें तर ह्यापेक्षां अधिक पूर्णतेस आलेलें मराठींतील उभयान्वयी अव्ययांचें वर्गीकरण त्यांचे दृष्टीस पडलें असतं. आगरकर यांनीं या पुस्तकांत क्रियाविशेषणें, शब्दयोगी अव्ययें, आणि उभयान्वयी अव्ययें, ह्यांच्या वर्गीकरणाचा बराच चांगला खल केलेला आहे. इंग्रजीमध्यें बेनच्या व्याकरणांत ज्या प्रकारची शास्त्रीय दृष्टि वापरिली आहे, त्याच दृष्टीनें आगरकरांनीं ह्यांचा ऊहापोह मराठींत केलेला आहे. तथापि बेनच्या इंग्रजी उभयान्वयी अव्ययांचें वर्गीकरण जसेंच्या तसेंच मराठींत घेतांनां आगरकरांचें अंशतः अलक्षच झालें. यामुळें त्यांच्या वाक्यमीमांसेंतील उभयान्वयी अव्ययांचे वर्गीकरणांत व या अध्यायांतील वर्गीकरणांत थोडासा फरक दिसून येईल. बाकी तें आणि हें बहुतांशी एकच आहे. उभयान्वयी अव्ययांचे वर्गीकरणाची युक्तायुक्तता वाक्यमीमांसेचे दृष्टीशिवाय यथायोग्य होण्यासारखी नसल्यामुळें, या ठिकाणीं वाक्यमीमांसेंतील कांहीं गोष्टींचा निर्देश करणें जरूर आहे.

वाक्यें मुख्यत्वेंकरून तीन प्रकारचीं आहेत. केवल, मिश्र आणि संयुक्त. ह्यांपैकीं केवळ वाक्य हें एकेरी होय, त्यामध्यें वाक्यसंयोगाचा प्रश्नच उद्भवत नाहीं. मिश्र आणि संयुक्त वाक्यांत मात्र तो उत्पन्न होतो. साधारणमानानें बोलावयाचें म्हणजे मिश्र वाक्याचे अवयवभूत वाक्यांपैकीं एक वाक्य मुख्य किंवा प्रधान असतें आणि बाकीचीं गौण असतात, म्हणजे एक स्वतंत्र असतें आणि

बाकीचीं त्याजवर अवलंबून म्हणजे परतंत्र असतात, आणि संयुक्त वाक्यांतील अवयवभूत सर्व वाक्यें सारखींच प्रधान किंवा स्वतंत्र असतात. ह्यामुळें मिश्रवाक्याचे अवयव जोडणाऱ्या उभयान्वयी अव्ययांस गौणत्वसूचक आणि संयुक्त वाक्याचे मुख्य अवयव जोडणाऱ्या उभयान्वयी अव्ययांस प्रधानत्वसूचक असें आम्ही म्हटलें आहे. या वाक्यपृथक्करणाचे दृष्टीनें उभयान्वयी अव्ययांचे मुख्य दोनच भेद होतात. ह्यांविषयीं कोणासच शंका नाहीं.

आतां उभयान्वयी अव्ययांच्या पोटभेदांकडे वळूं. समुच्चयबोधक ( आणि, व इ० ), विकल्पबोधक ( किंवा, अथवा, इ० ) हीं संयुक्त वाक्यांचे मुख्य अवयव जोडण्याचे कामीं उपयोगी पडतात, म्हणजे त्यांनीं जोडलेलीं वाक्यें नेहमीं सारखींच स्वतंत्र किंवा सारखींच प्रधान असतात; म्हणून या दोन्ही प्रकारचीं उभयान्वयी अव्ययें प्रधानत्वसूचक होत हें निर्विवाद आहे. त्याचप्रमाणें पण, परंतु, इ. उभयान्वयी अव्ययेंही प्रधानत्वसूचक आहेत, ह्याबद्दलही कोणाचा वाद नाहीं. ह्यांस गोडबोले विरोधदर्शक असें म्हणतात. परंतु आमच्या मतें विरोध हा शब्द या ठिकाणीं विशेष योग्य नाहीं. जरी—तरी, यद्यपि—तथापि यांनीं विरोध दाखविला जातो; आणि पण, परंतु, इत्यादिकांनीं फक्त न्यूनत्व दाखविण्यांत येतें. 'तो जरी शूर आहे तरी हरला.' या ठिकाणीं शौर्य आणि हार ह्यांमध्यें विरोध आहे. परंतु 'त्याची तयारी उत्तम होती, पण आयत्या वेळीं तो अगदीं गोंधळून गेला' ह्या उदाहरणांत 'उत्तम तयारी' मध्यें पण ह्यानें 'गोंधळून जाणें' हें न्यून दाखविण्यांत येत आहे. 'उत्तम तयारी' व 'गोंधळून जाणें' ह्यांत कांहीं म्हणण्यासारखा विरोध नाहीं; म्हणून, 'परंतु, पण, इ०' अव्ययांस येथें न्यूनत्वबोधक असें म्हटलें आहे. ह्याप्रमाणें समुच्चयबोधक, विकल्पबोधक आणि न्यूनत्वबोधक ( ह्यांसच गोडबोले विरोधदर्शक असें म्हणतात ) हीं सर्व प्रधानत्वसूचक आहेत हें सर्वांस कबूल आहे. त्याचप्रमाणें जर, तर, जरी, तरी, इ० संकेतदर्शक अव्ययें हीं गौणत्वसूचक आहेत, म्हणजे त्यांनीं जोडलेल्या वाक्यांपैकीं पूर्ववाक्यास गौणत्व असतें हेंही उघडच आहे. स्वरूपदर्शक ही संज्ञा गोडबोले यांनीं जरी योजिली आहे तरी 'म्हणजे' हें एकच स्वरूपदर्शक अव्यय त्यांस आढळल्यामुळें बहुधा त्यांनीं, आणि इंग्रजींत हा वर्ग बेन यानें न मानिल्यामुळें बहुधा आगरकरांनीं, स्वरूपदर्शक हा उभयान्वयी अव्ययाचा स्वतंत्र वर्ग मानिलेला दिसत नाहीं; बाकी स्वरूपदर्शक अव्ययें गौणत्वसूचक आहेत याबद्दल कोणाचाही वाद असण्याचें कारण दिसत नाहीं. आतां गोडबोले ज्यांस 'कारणदर्शक' म्हणतात त्यांचेबद्दलच प्रश्न उरला. त्यांच्या कारणदर्शकामध्यें तीन प्रकार आहेत: परिणामबोधक ( म्हणून, सबब, इ० ), कारणदर्शक ( कारण, कांकीं, इ० ), आणि उद्देशदर्शक ( म्हणून, सबब, कांकीं, इ० ). या तिहींच्या अर्थांमधील व उपयोगांतील फरक या आध्यायांत सविस्तर स्पष्ट केलाच

आहे. हीं तिन्ही प्रकारचीं अव्ययें गोडबोले ह्यांचे मतें गौणत्वसूचक होत. परंतु अलीकडील नवीन मताप्रमाणें परिणामबोधक हीं गौणत्वसूचक नसून प्रधानत्व-सूचकच आहेत; आणि कारणदर्शक व उद्देशदर्शक हीं तेवढीं गौणत्वसूचक आहेत. वाक्यमीमांसाकारांमध्यें या संबंधानें मतभेद आहे. हा वाद आगरकरांनीं आपल्या वाक्यमीमांसेंत दिला आहे. तेव्हां येथें त्यांचाच एक उतारा प्रथम घेतों.

“ समानाधिकरण ( या ग्रंथांतील प्रधानत्वसूचक ) उभयान्वयीअव्ययांपैकीं परि-णामवाचक, आणि व्यधिकरण ( या ग्रंथांतील गौणत्वसूचक ) उभयान्वयी अव्ययां-पैकीं कारणदर्शक व हेतु अथवा उद्देशदर्शक अव्ययें थोडासा घोंटाळा उत्पन्न करणारीं आहेत. माशांस फुप्फुसें नाहींत, म्हणून त्यांस शब्द नाहीं; यांत परिणामदर्शक वाक्य ‘ त्यांस शब्द नाहीं ’ हें आहे. व त्या परिणामाचें कारणदर्शक ‘ माशांस फुप्फुसें नाहींत ’ हें आहे; आणि दोहोंचा ‘ म्हणून ’ या उभयान्वयी अव्ययानें संयोग होऊन त्या उभयतांपासून संयुक्तवाक्य झालें आहे. या संयुक्त-वाक्यांतील परिणाम किंवा कार्यदर्शक वाक्य प्रथम सांगितलें व कारणदर्शक वाक्य मागून सांगितलें कीं त्याच्या संयुक्तत्वाचा लोप होऊन त्याच्या ठायीं मिश्रत्व येतें. ‘ माशांस शब्द नाहीं कारण त्यांस फुप्फुसें नाहींत ’ हें संयुक्त-वाक्य नाहीं; मिश्रवाक्य आहे. वाक्यमीमांसक असें मानितात कीं, कारण आधीं सांगून कार्य किंवा परिणाम मागून सांगितला असतां कारणदर्शक व कार्यदर्शक वाक्यें स्वतंत्र दिसतात; निदान कार्य आधीं सांगितलें असतां कारण-दर्शक वाक्याचें त्याच्यावर जितकें अवलंबन दिसतें तितकें कारण आधीं सांगि-तलें असतां कार्यदर्शकाचें दिसत नाहीं. ‘ माशांस शब्द नाहीं, कारण त्यांस फुप्फुसें नाहींत ’ यांत त्यांस फुप्फुसें नाहींत हें केवळ पहिल्या वाक्याचें समर्थनार्थ सांगितलें आहे, दुसरा कांहीं हेतु नाहीं, असा भास होतो; व एवढ्याच कारणा-साठीं कारणदर्शक वाक्यास गौण मानून सर्व वाक्यास मिश्र म्हणतात. ” परंतु कित्येकांचें मत भिन्न आहे. ते म्हणतात कीं कारण व कार्य ह्यांपैकीं “ कोणतेंहि आधीं सांगितलें किंवा मागून सांगितलें तरी त्या उभयतांमध्यें असलेल्या निकट-संबंधांत कांहीं भेद नाहीं; म्हणून तो ज्या वाक्यांत प्रदर्शित केलेला असतो त्यांस संयुक्त न मानितां मिश्र मानावें असा कित्येकांचा अभिप्राय आहे; व ज्यांना शब्दशास्त्रांतील बारीकसारिक भेद पहाण्याचा कंटाळा वाटत असेल त्यांनीं हाच अभिप्राय बरा मानून तदनुसार वाक्यपृथक्करण केलें तरी कांहीं वावगें होणार नाहीं. या अभिप्रायाप्रमाणें परिणामदर्शक, कारणदर्शक, आणि हेतु किंवा उद्देशदर्शक उभयान्वयी अव्ययें व्यधिकरण ( गौणत्वसूचक ) अव्ययें होऊन तीं ज्या वाक्यांत येतील तीं सारीं गौणप्रधानवाक्यात्मक मिश्र वाक्यें होतील.” ( वाक्यमीमांसा पृ. १११–११५ ).

हें एकंदर सर्वच विवेचन वाचनीय आहे. तें जिज्ञासूंनीं मूळांत समग्र पहावें. येथें फक्त मुद्याचे दोन उतारे घेतले आहेत. हें दुसरें मत खुद्द आगरकरांसही पसंत नाहीं. आणि आजकालच्या इंग्रजी वाक्यमीमांसकांतही त्याचे पुरस्कर्ते फारसे आढळत नाहींत. कारणदर्शक व उद्देशदर्शक हीं उभयान्वयी अव्ययें गौणत्वसूचक होत, म्हणजे त्यांनीं जोडल्या जाणाऱ्या अवयवांपासून एक मिश्रवाक्यच उत्पन्न होतें, याबद्दल कोणाचाच वाद नाहीं. परंतु परिणामबोधक उभयान्वयी अव्ययांपासून संयुक्त वाक्य होतें कीं मिश्र वाक्य होतें, इतकाच कायतो वादाचा मुद्दा आहे. परिणामबोधक व उद्देशदर्शक अव्ययें मराठींत बहुधा एकच आहेत; तरी त्यांचे उपयोगांत फरक आहे हें वर सांगितलेंच आहे. 'डोळ्यांस डाक्टरी उपाय करावा' म्हणून 'मी मुंबईस गेलों' या ठिकाणीं 'डोळ्यांस डाक्टरी उपाय करावा' हा उद्देश आणि 'मी मुंबईस गेलों' हा त्याचा परिणाम होय. या ठिकाणीं 'म्हणून' हें उद्देशदर्शक आहे 'मी मुंबईस गेलों' हें प्रधानवाक्य होय; आणि 'डोळ्यांस डाक्टरी उपाय करावा' हें गौण होय हें उघड आहे. ह्यापैकीं 'डोळ्यांस डाक्टरी उपाय करावा' यास प्रधानवाक्य म्हणण्यास कोणीही तयार नाहीं. परंतु 'तो विष प्याला म्हणून त्याचा प्राण गेला' या ठिकाणीं 'तो विष प्याला' हें कारणदर्शक वाक्य आणि 'त्याचा प्राण गेला' हें कार्यदर्शक वाक्य हीं दोन्ही प्रधान होत; म्हणून 'म्हणून' हें परिणामबोधक अव्यय या ठिकाणीं प्रधानत्वसूचक आहे. 'तो मेला, कांकीं तो विष प्याला' ह्या ठिकाणीं 'तो विष प्याला' हें कारणदर्शक वाक्य गौण आहे; कारण, तें केवळ पहिल्याचे समर्थनार्थ आलें आहे, म्हणजे 'तो विष प्याला' हें सांगण्याचा प्रधान हेतू नसून 'तो मेला' ही गोष्ट सांगण्याचा मुख्य हेतु दिसतो हें उघड आहे. 'तो विष प्याला' ह्या वाक्याचें गौणत्व जसें याप्रमाणें स्पष्ट होतें तसें 'तो विष प्याला' म्हणून 'त्याचा प्राण गेला' या ठिकाणच्या 'तो विष प्याला' ह्याचें प्रधानत्वही स्पष्टच आहे. 'तो विष प्याला म्हणून त्याचा प्राण गेला' हें बोलतांना बोलणाराचे मनांत 'तो विष प्याला' ही गोष्ट आणि 'त्याचा प्राण गेला' ही गोष्ट ह्या दोन्ही प्राधान्यें करून सांगण्याचा उद्देश दिसतो; आणि म्हणून तो या वाक्याचे ठिकाणीं कधीं कधीं असेंही म्हणतो कीं, 'तो विष प्याला आणि त्याचा प्राण गेला' या स्वरूपांत दोन्ही वाक्यांचें प्रधानत्व स्पष्टच आहे. म्हणून कारणद्योतक वाक्याचे अन्तीं 'म्हणून' इ० अव्ययें येऊन नंतर जेव्हां परिणामद्योतक वाक्य येतें, म्हणजे परिणामद्योतक वाक्याचे आरंभीं 'म्हणून' इ० अव्ययें येतात, तेव्हां त्यांस परिणामबोधक ही संज्ञा असून दोन्ही वाक्यें प्रधान होत असल्यामुळें, परिणामबोधक उभयान्वयी अव्ययांस प्रधानत्वसूचकांतच गणणें उचित दिसतें.

ह्यामुळें गोडबोल्यांच्या कारणदर्शक ह्या एकाचे परिणामबोधक, कारणदर्शक, आणि उद्देशदर्शक असे तीन भेद करण्यांत आले आहेत. परिणामबोधक हा भेद

निराळा करणें भागच आलें. कारण कीं त्यांनीं जोडलीं जाणारीं वाक्यें प्रधान असतात ह्या मताचेंच प्राबल्य होत चाललें आहे. कारणदर्शकांतून त्यांस वेगळीं काढल्यावर उद्देशदर्शक हा तिसरा वर्ग मानणेंही ओघासच आलें. कारण कीं मराठींत परिणामबोधक अव्ययेंच प्रायः उद्देशदर्शक असतात. आणि 'तो विष प्याला, म्हणून त्याचा प्राण गेला' या ठिकाणीं 'म्हणून' यानें जरी दोन प्रधान वाक्यांची सांगड घातली आहे असें दिसतें, तरी, 'डाक्तरी उपाय डोळ्यांस करावा म्हणून मी मुंबईस गेलों' या ठिकाणीं 'म्हणून' या अव्ययानें दोन प्रधान वाक्यांचीच सांगड झाली आहे असें म्हणतां येत नाहीं; तर या ठिकाणचें 'डाक्तरी उपाय करावा' हें वाक्य निःसंशय गौण आहे. ह्यामुळें म्हणून, सबब, इ० परिणामबोधकांपासून म्हणून, सबब, इ० उद्देशदर्शकांचा भिन्नपणा दाखविणें अवश्य पडल्यामुळें उद्देशदर्शक हा स्वतंत्र वर्ग मानावा लागला. अशा प्रकारें गोडबोल्यांचे पांच किंवा सहा ( कारण वर सांगितल्याप्रमाणें त्यांनीं जराशी घरसोड केलेली आहे ) भेदांच जागीं उभयान्वयी अव्ययांचे आठ भेद मानणें जरूर पडतें. ते असेः—समुच्चयबोधक, विकल्पबोधक, न्यूनत्वबोधक ( गोड० विरोधदर्शक ), परिणामबोधक; कारणदर्शक, उद्देशदर्शक, ( परिणाम—कारण—उद्देश—दर्शक यांचा गोडबोले एकाच कारणदर्शकांत समावेश करितात. ) संकेतदर्शक, आणि स्वरूपदर्शक. ह्यांपैकीं पहिले चार भेद हे प्रधानत्वसूचक आणि शेवटचे चार भेद हे गौणत्वसूचक आहेत. आणि हे दोन भेद त्यांचे नांवांमध्येंही सहज दिसावे म्हणून पहिल्या चारांचे अन्तीं बोधक हा एकच शब्द योजिला आहे आणि दुसऱ्या चारांचे अन्तीं दर्शक हा एकच शब्द घातला आहे. अर्थात् बोधकान्त चार भेद प्रधानत्वसूचक आहेत आणि दर्शकान्त चार भेद गौणत्वसूचक आहेत, ह्यामुळें ते ध्यानांत धरण्यासही कठिण पडणार नाहींत. ]

---

# अध्याय ९.

## केवलप्रयोगी किंवा उद्गारवाची अव्ययें.

२३९. ज्या अव्ययांचा वाक्याशीं कांहीं संबंध नसतो म्हणजे ज्यांच्याशिवाय वाक्यामध्यें अर्थाची कांहीं एक उणीव भासत नाहीं, किंवा जीं वाक्यां वाक्यांचाही संबंध दाखवीत नाहींत तर केवळ बोलणाराचे मनांतील हर्षशोकादि वृत्ति मात्र दाखवितता तीं **केवलप्रयोगी** किंवा **उद्गारवाची अव्ययें** होत. उदा०:—**अबब**! केवढी रास ही! **वाहवा**! फारच मजेदार देखावा! इ०. या ठिकाणीं 'अबब' हें आश्चर्यद्योतक आणि

' वाहवा ' हें आश्चर्य व हर्ष ह्या दोन्ही वृत्ति दाखविणारें केवलप्रयोगी अव्यय होय.

आगरकरांनीं वाक्यमीमांसेचे उपोद्घातांत केवलप्रयोगी अव्ययांचें स्वरूप फार उत्तम प्रकारें वर्णिलें आहे. म्हणून त्यांचेंच वर्णन येथें देतों. " या वर्गांत सुखदुःखादि उद्गार प्रकट करणारे जे विसंगत शब्द बोलण्यांत किंवा लिहिण्यांत घालण्याची चाल पडली आहे, त्याचा समावेश होतो. या शब्दांस व्याकरणांत फारसें महत्त्व देण्याचा प्रघात नाहीं. कारण एक तर ते क्वचित् प्रसंगीं येतात; दुसरें कांहीं तरी विधान करणें हें जें वाक्याचें मुख्य काम, त्यास यांच्या योगानें म्हणण्यासारखी मदत होत नाहीं. या उद्गारवाची अव्ययांत मुळींच अर्थ नसतो असें नाहीं. त्यांचा बारकाईनें विचार केला तर त्यांपैकीं प्रत्येकास समग्र वाक्याचा अर्थ असतो असें दिसून येईल. ' अरेरे ' हा शब्द उच्चारिला असतां ' ही गोष्ट ऐकिल्यानें मला दुःख होतें ' अशा अर्थाचा बोध होतो. ' वाहवा ! शाबास ! खाशी ! ' इत्यादि शब्दांनीं आनंदादि वृत्ति व्यक्त होतात, व याचप्रमाणें इतर केवलप्रयोगी अव्ययांचा अर्थ करून दाखवितां येईल तथापि ज्या अर्थीं त्यांचा उच्चार आकस्मिक होत असतो, म्हणजे हे उच्चारण्यापूर्वी मनाला विचार करण्यास सवड नसते, त्या अर्थीं--भय, आश्चर्य किंवा अशाच प्रकारचा दुसरा एखादा मनोविकार---एकाएकीं उत्पन्न करणाऱ्या कारणांनीं शरीरावर जे परिणाम होतात, त्यांसारखेच ह्या अव्ययांस गणतात. यांच्या योगानें विशेष प्रसंगीं मनाची जी स्थिति झाली असेल तिचा समजण्यासारखा ध्वनि मात्र होतो---कोणत्याही प्रकारचें स्पष्ट विधान होत नाहीं. " ( वाक्यमीमांसा पृष्ठ १२, १३ ).

२४०. केवलप्रयोगी अव्ययें आणि त्यानीं दाखविल्या जाणाऱ्या चित्ताच्या निरनिराळ्या वृत्ती हीं मुख्यतः खालीं दिल्याप्रमाणें:—

**हर्षद्योतकः**—वा, वः, वाः, वाहवा, अहा, अहाहा, ओहो, आहा.

**शोकद्योतकः**—ऊँः, अँः, हाय, हायहाय, हायरे, अयाई, आई आई, हरहर, शिवशिव, रामराम, अरेरे, अगग, अगई, आई, देवा रे, आई ग.

**आश्चर्यद्योतकः**—अहा, अबब, बबब, आहा, अलल, अहाहा, अगं-बाई, हाँ, ओच्च्या, ओहो, अरे, बापरे.

**अनुमोदनः—प्रशंसा—द्योतकः**—होय, ठीक, वाहवा, भलेशाबास, अच्छा, अच्छे, धन्य, खाशी, यंव, मारु, फक्कड, ओहो, शाबास, हं, हूं.

**तिरस्कारद्योतकः**—हट्, छे, छत्, छी, छीछी, छिः, भलतेंच, थत्, फूं, छित्, उंः, अंः, फें, फुस्, फस्.

**उद्वेग—विरक्ति—धिक्कार—द्योतकः**—धिक्, इश्श, फिश्, थुत्, थूः, ओ, ओय्, हिडिस, धुत्, शुक्, अहाहा.

**स्तब्धता—मौन—प्रतिबंध—द्योतकः**—चूप, चप, चीप, गप, गपचीप.

**स्वीकारद्योतकः**—जी, ठीक, बरें, हं, हां, जी हां, होय.

**विरोधद्योतकः**—छट्, छिः, छेः, छे, अंहं, उंहूं.

**संबोधनद्योतकः**—हीं लिंगवचनाप्रमाणें बदलतात.

| लिंग. | एकवचन. | अनेकवचन. |
| --- | --- | --- |
| पुलिंग, नपुंसकलिंग | अरे, रे, अगा, अजि. बा, हो, गा, हे, ए, अरे ए. | अहों, हो, अगा, अजि. |
| स्त्रीलिंग | अगे, गे, अगो, गो, ग, ए, हे, अग. | अहों, हो, अगा, अजि. |

२४१. कधीं कधीं संबंध वाक्यच्या वाक्य किंवा वाक्यांश उद्गारवाचक असतो. जसें:—काय मौज, विष्णवे नमः, तथास्तु महाराज, कां होईना, रामाय तस्मै नमः, त्राहि भगवन्, दे माय धरणीठाय, ज्याचें नांव तें, आहे माहीत, इ०.

हीं उद्गार दाखविणारीं आहेत ह्यांत संशय नाहीं. तथापि यांस केवल-प्रयोगी अव्ययें म्हणणें रास्त नाहीं. जीं वाक्यें आहेत त्यांबद्दल वादच नाहीं. पण जे वाक्यांश आहेत, त्यांतील अध्याहृत शब्द व्यक्त करून पुरीं वाक्यें सहज होऊं शकतात. जसें:—काय मौज = काय मौज आहे, कां होईना = तसें कां होईना, इ०.

एवंच जे वाक्यांश आहेत तेही वास्तविक वाक्येंच आहेत. अशा प्रकारच्या वाक्यांस किंवा वाक्यांशांस जर केवलप्रयोगी अव्ययें म्हणण्याचें एकदा ठरलें, तर ह्या न्यायानें चित्तवृत्ति किंवा मनोविकार दाखविणाऱ्या सर्वच

वाक्यांस केवलप्रयोगी अव्ययांत ढकलावें लागेल. उ०:—तुम्हीं पादशहाची गोष्ट ऐकिलीत काय! तो म्हण तीस तीस पानें एकदां वाचून अक्षरशः पाठ म्हणतो! केवढी ही बुद्धि! काय हें अलौकिक स्मृतिसामर्थ्य! असल्या गोष्टी ऐकून मन अगदीं चकित व थक्क होऊन जातें!" या केवलप्रयोगी अव्ययानें तरी कमालच केली म्हणावयाची!

२४२. केवलप्रयोगी अव्ययांचे वरील यादीवरून असें दिसून येईल कीं, संबोधनी नामें आणि कांहीं विशेषणें हीं उद्गारवाचक अव्ययांप्रमाणें उपयोगांत येतात. जसें:—अगबाई, देवा, रामराम, शिवशिव, भलतेंच, इ०.

यांहीं धेनु वळाव्या 'शिवशिव गोपाल राम कृष्ण हरे'—मोरोपंत.

२४३. मराठी भाषेंत असे कित्येक शब्द आहेत कीं, त्यांचाही वाक्यार्थाशीं कांहीं फारसा संबंध नसतो; तथापि त्यांनीं व्यावहारिक भाषेस कांहीं अंशीं चटकता, सरसता, सौंदर्य, ऐट, गोडी, प्रेमळपणा, इत्यादि गुण प्राप्त होतात; आणि कधीं कधीं तर ते केवळ **पादपूरणार्थक** असतात. तसेंच कधीं कधीं बोलणारा अडखळूं लागला, त्याला पुढील शब्द सुचेनासा झाला, किंवा पुढें काय बोलावें हें वेळेवर स्मरत नसलें म्हणजेही कांहीं कांहीं शब्दांचा उपयोग रोजच्या व्यावहारिक भाषेंत होत असतो. कधीं कधीं अशा प्रकारचे शब्द विनाकारण पण वारंवार उच्चारण्याची कांहीं जणांस लकबच लागून जाते. तेव्हां त्यांस **पालवपद** किंवा **पालोपद** असें म्हणतात. ह्या सर्व शब्दांस एका प्रकारचीं अव्ययें असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणि ज्या अर्थीं त्यांचा वाक्यार्थाशीं फारसा संबंध नसतो, त्या अर्थीं त्यांस '**व्यर्थ उद्गारवाची अव्ययें**' असें सार्थ नांव द्यावें. उदाहरणें:—

**आपला**— तो **आपला** कांहीं तरी बोलतो; ती **आपली** जाईल इ०.

**बेटें**—मग **बेटें** असें झालें.

**परता**—तूं येईसना **परता**; ती जाईना **परती**.

**बरीक**—त्याची **बरीक** कमाल खरी.

**कीं**—जा **कीं**, येतों **कीं**, थांब **कीं**.

**म्हणून**—त्याला **म्हणून** एक अक्षरही येत नाहीं.

**म्हणे**—तो **म्हणे** वेडा झाला.

**घ्या**—हा **घ्या** मी जातों.

**मग**—राहूं द्या तर **मग** आतां.

**पैं, हो, अरे, अहो**—हे पादपूरणार्थक शब्द पद्यांत फार आढळतात.

| | |
|---|---|
| आतां, आणखीन्, | अशा प्रकारचे शब्द मधून मधून |
| नी, मातक्यान, | भाषणांत घालण्याची पुष्कळांस |
| बरें, तुमचें देव भला करो. | खोड असते. |

टीपः—हीं व्यर्थ उद्गारवाची अव्ययें होत, वरील उदाहरणांतून तीं साफ गाळून टाकलीं तरी अर्थास फारसा बाध येत नाहीं हें उघड आहे. पण केवल-प्रयोगी अव्ययें ज्याप्रमाणें बहुधा वाक्यारंभी येतात तशीं हीं न येतां बहुधा वाटेल तेथें मध्येंच येतात. यांस गंगाधरपंत टिळक हे 'वाक्यालंकारार्थक अविकारी शब्दयोगी अव्यय' असें म्हणतात.

---

## प्रकरण २.

--:०:--

## विकरण.

---

## अध्याय. १

### लिंग,

२४४. या **विकरण** प्रकरणामध्यें शब्दांस जे विकार होतात, त्यांचें विवेचन केलेलें असतें हें पूर्वी सांगितलेंच आहे. त्याप्रमाणें प्रथम नामांस कोणकोणते विकार होतात ते पाहू.

२४५. नामांस **लिंग, वचन** आणि **विभक्ति** यांस अनुसरून विकार होतात. त्यांचें याच क्रमानें विवेचन करण्यांत येईल.

[ संस्कृत भाषेंत नामाचें मूळ रूप स्वतंत्र असून त्यास निरनिराळीं लिंगें, निरनिराळीं वचनें आणि निरनिराळ्या विभक्ति ह्यांस अनुसरून निरनिराळे विकार होतात. परंतु मराठींत निर्लिंग निर्वचन, किंवा निर्विभक्तिक असें नामाचें

स्वतंत्र मूळ रूप बहुधा आढळत नाहीं. 'बहुधा' असें म्हणण्याचें कारण असें कीं, कांहीं कांहीं ठिकाणीं असें मूळ रूप मानण्यास अवकाश आहे. आकारान्त पुल्लिंगी शब्दांसंबंधानें हा प्रश्न उत्पन्न होतो. उदाहरणार्थ, 'घोडा' या शब्दाचें सर्व विभक्तींमध्यें 'घोड' हच रूप अनुगत दिसतें. त्याचप्रमाणें घोडा, घोडी, घोडें, ह्या लिंगानुसार विकरणामध्येंही 'घोड' हेंच मूळ रूप असून त्यास आ, ई, ए, हे प्रत्यय लागून लिंगभेद उत्पन्न झाला आहे. तसेंच, घोडा, घोडे हीं वचनानुसार रूपेंही 'घोड' हें मूळ रूप मानण्यास अनुकूलच आहेत. शिवाय, घोडमुखी, घोडनवरी, इत्यादि समासांतही 'घोड' असेंच रूप आढळतें. या सर्व कारणांमुळें 'घोडा' असा आकारान्त मूळ शब्द मानण्यापेक्षां 'घोड' असा अकारान्तच मूळ शब्द मानणें रास्त आहे ह्यांत संशय नाहीं. तथापि असा प्रकार आकारान्त पुलिंगी नामांसंबंधानें जरी बहुतांशीं खरा असला तरी तो प्रायः अन्यत्र आढळत नसल्यामुळें त्यास अपवादकच म्हटलें पाहिजे. म्हणून साधारणपणें असाच नियम करणें चांगलें कीं, निर्लिंग, निर्वचन, किंवा निर्विभक्तिक असें प्रातिपदिकाचें मूळ रूप मराठींत नाहीं. तर पुलिंगी, एकवचनी, प्रथमेचें जें रूप त्यासच प्रातिपदिकाचें मूळ रूप समजतात. आणि त्याजला लिंग, वचन, आणि विभक्ति ह्यांचे योगानें काय काय विकार होतात तें सांगतात.

येथें एक गैर समज उत्पन्न होण्याचा संभव आहे; तो प्रथम दूर केला पाहिजे. लिंग, वचन, व विभक्ति हीं सर्व नामांस असतात हें खरें, तथापि वचन व विभक्ति हीं जशीं प्रत्येक नामाचीं बदलूं शकतात, म्हणजे वचनविभक्त्यनुसार जशीं सर्व नामें विकारक्षम आहेत तशीं सर्व नामें लिंगविकारक्षम नाहींत; म्हणजे सगळ्या नामांचीं रूपें लिंगावरून बदलतात असें नाहीं. ज्या नामांचीं, सर्वनामांचीं, किंवा विशेषणांचीं रूपें लिंगानुसार बदलतात, त्याच शब्दांचे पुल्लिंगी रूप मूळ होय असें समजावें. घोडा, घोडी, घोडें, चांगला, चांगली, चांगलें, आणि रजपूत, रजपुतीण, अशीं लिंगानुसार रूपें बदलतात; म्हणून यांमध्यें घोडा, चांगला, आणि रजपूत ह्या पुलिंगी एकवचनी प्रथमेच्या रूपांसच मूळ शब्द मानितात. तसेंच ज्या शब्दांचें रूप तिन्ही लिंगीं एकच रहातें म्हणजे लिंगानुसार बदलत नाहीं त्यांचें तें साधारण रूपच मूळ समजतात. मूल (पु० स्त्री० न०), वाईट (पु० स्त्री० न०), मी (पु० स्त्री० न०), तूं (पु० स्त्री० न०), इत्यादि शब्दांचें एकच रूप तिन्ही लिंगीं आढळतें. तेव्हां तेंच रूप मूळ होय. पदार्थवाचक व धर्मवाचक शब्दांचें लिंगानुसार विकरण होण्याचा मुळीं प्रसंगच नाहीं. तेव्हां तद्वाचक नामें ज्या लिंगाचीं असतील त्याच लिंगाच त्यांचें प्रथमेचें एकवचनी रूप मूळ समजलें पाहिजे. ग्रंथ, पोथी, पुस्तक, हे तीन शब्द एकाच अर्थाचे जरी असले तरी ते निरनिराळ्या लिंगांचे असून त्यांस

लिंगविकरण होण्याचा मुळीं संभवच नाहीं. तेव्हां त्यांचा स्वतःच्या लिंगांचीं प्रथमैकवचनाचीं रूपेंच मूळ समजतात.

तात्पर्य, वचन व विभक्ति ह्यांवरून सर्व नामांचीं, सर्व सर्वनामांचीं, आणि सर्व विशेषणांचींही ( सर्व विशेषणांचींही असें म्हणण्याचें कारण निदान इतकें खरें कीं, सर्व विशेषणांचा मराठींत नामाप्रमाणें उपयोग होऊन त्यांस वचन व विभक्ति लागतात. ) रूपें बदलतात अथवा बदलूं शकतात. म्हणून प्रथमेचे एकवचनी रूपास मूळ शब्द समजतात. ज्या शब्दांस लिंगविकरण होतें त्यांचें पुल्लिंगी रूप मूळ, ज्यांस लिंगविकरण मुळींच होत नाहीं म्हणजे ज्यांचें तिन्हीं लिंगी एकच रूप असतें त्यांचें तेंच रूप मूळ; आणि ज्या शब्दांस लिंगविकार होण्याचें कांहीं कारणच नाहीं म्हणजे जे मुळीं लिंगविकारक्षमच नाहींत त्यांचें तत्तल्लिंगी रूपच मूळ समजलें पाहिजे हें उघड आहे. ]

२४६. नामांच्या लिंगावरून नामाचें ठिकाणीं वास करणारें वास्तविक किंवा काल्पनिक पुंस्त्व, स्त्रीत्व, किंवा उभयभिन्नत्व याचा बोध होतो. यामुळें लिंगें **तीन** मानिलीं आहेत. **पुल्लिंग, स्त्रीलिंग,** आणि **नपुंसकलिंग.**

२४७. ज्या नामाच्या वाक्यांतील प्रयोगावरून त्याच्या अर्थाचें ठायीं वास्तविक किंवा काल्पनिक पुरुषत्वाचा बोध होतो, त्यास **पुल्लिंग** म्हणतात. जसें:—घोडा, बैल, सूर्य, गोळा, इ०. ह्यांपैकीं घोडा आणि बैल हे शब्द वास्तविक पुरुषत्व दाखवितात; सूर्य आणि गोळा हे काल्पनिक पुरुषत्व दाखवितात. हें उघड आहे. म्हणून हे सर्व शब्द **पुल्लिंग,** किंवा **पुल्लिंगी,** किंवा **पुल्लिंगाचे** होत.

टीपः—पुल्लिंग, स्त्रीलिंग, आणि नपुंसकलिंग हे शब्द नामेंही आहेत आणि विशेषणेंही आहेत. ह्यामुळेंच अमुक एक शब्द पुल्लिंग, पुल्लिंगी, किंवा पुल्लिंगाचा होय; ह्यांपैकीं कोणतीही भाषा वापरिली तरी चालते. तथापि पुल्लिंग, स्त्रीलिंग, व नपुंसकलिंग ह्या शब्दांचा विशेषणांपेक्षां नामांप्रमाणेंच मराठींत फार प्रचार आहे; आणि विशेषणांचे अर्थीं प्रायः पुलिंगी, स्त्रीलिंगी, इ० किंवा पुल्लिंगाचा, स्त्रीलिंगाचा, इ० शब्द उपयोगांत आहेत.

२४८. ज्या नामाच्या वाक्यांतील प्रयोगावरून त्याच्या अर्थाचे ठायीं वास्तविक किंवा काल्पनिक स्त्रीत्वाचा बोध होतो, त्यास **स्त्रीलिंग** म्हणतात. जसें:—नारी, गाय, नदी, काठी, इ०. ह्यांपैकीं नारी आणि गाय हे शब्द वास्तविक स्त्रीत्व—द्योतक व नदी आणि काठी हे काल्पनिक स्त्रीत्व-द्योतक आहेत हें उघड आहे.

२४९. ज्या नामाच्या वाक्यांतील प्रयोगावरून त्याच्या अर्थाचे ठायीं वास्तविक किंवा काल्पनिक उभयभिन्नत्वाचा म्हणजे पुरुषत्व व स्त्रीत्व ह्या दोहोंहून वेगळेपणाचा बोध होतो त्यास **नपुंसकलिंग** म्हणतात. जसें:—पत्र, पुस्तक, घोडें, बकरें, इ०. ह्यांपैकीं पत्र व पुस्तक ह्यांमध्यें वास्तविक उभयभिन्नत्व आहे; म्हणजे ह्यांपैकीं एकहीं, पुरुषत्व किंवा स्त्रीत्व प्रत्यक्ष दाखवीत नाहीं हें उघड आहे. परंतु घोडें व बकरें ह्या नामांचे ठायीं काल्पनिक उभयभिन्नत्व आहे; म्हणजे ज्यास आपण घोडें किंवा बकरें म्हणतों, त्याचे ठायीं वास्तविक पुरुषत्व किंवा स्त्रीत्व बहुधा असलेंच पाहिजे, परंतु त्या दोहोंकडे किंवा त्यांमधील भेदाकडे दुर्लक्ष होऊन घोडें व बकरें हे शब्द उपयोगांत आलेले आहेत; अर्थात् त्यांचे ठायीं जें उभयभिन्नत्व आहे तें काल्पनिक आहे उघड आहे.

[ पुल्लिंगाचें दादोबांचें लक्षण पहा. 'ज्या नामावरून प्राणिवाचक ( नामाच्या ) अथवा अप्राणिवाचक पदार्थाच्या पुरुषत्वाचा बोध होतो, त्यांस अथवा त्यांचें ल्लिंग म्हणतात.' ( क० ७४ ) अशींच दुसऱ्या लिंगांचीं लक्षणें आहेत. ह्यावरील कृष्णशास्त्री चिपळूणकरांची टीका पहा. 'परंतु या लक्षणांत अप्राणिवाचक पदार्थाचें पुरुषत्व व स्त्रीत्व म्हणजे काय हें समजत नाहीं. तसेंच प्राणिवाचक आणि अप्राणिवाचक हीं कोणत्या शब्दाचीं विशेषणें समजावीं? पदार्थ शब्दाचीं तीं विशेषणें करावीं तर वाक्य निरर्थक होतें. पदें प्राणिवाचक किंवा अप्राणिवाचक होतील; पण पदार्थ तसे होत नाहींत. वाचक हें विशेषण शब्दाचें संभवतें; अर्थाचें संभवत नाहीं.' ( निबंध, पृष्ठ ५१ ) ह्या टीकेनंतरचे आवृत्तींत दादोबांनीं प्राणिवाचक ह्या शब्दापुढें 'नामाच्या' हा वर कंसांत दाखविलेला शब्द पूर्वीच्या लक्षणांत भरती केला असावा असें दिसतें.

आतां कृष्णशास्त्री चिपळूणकरांचें स्वतःचें लक्षण पहा. 'जें नाम किंवा प्रातिपदिक अर्थाचे ठायीं पुरुषत्वाचा बोध करितें किंवा तो बोध करण्यास समर्थ असतें त्यास पुल्लिंगी नाम किंवा प्रातिपदिक म्हणावें.' हेंच लक्षण जोशी यांनीं उचललें आहे. ह्या लक्षणांत 'पुरुषत्वाचा बोध करित किंवा बोध करण्यास समर्थ असतें' असा जो भाषेचा पर्याय योजिला आहे, त्याचा उद्देश स्पष्ट कळत नाहीं. ह्या लक्षणावर टीका करण्यापेक्षां त्याच्याशीं या ग्रंथांतील लक्षण ताडून पहाणें बरें. 'ज्या नामाच्या वाक्यांतील प्रयोगावरून त्याच्या अर्थाचे ठायीं वास्तविक किंवा काल्पनिक पुरुषत्वाचा बोध होतो त्यास पुल्लिंग म्हणतात.' दोहोंच्या तुलनेनें असें दिसून येईल कीं 'नामांच्या वाक्यांतील प्रयोगावरून' आणि 'वास्तविक किंवा काल्पनिक' हे शब्द या ग्रंथांतील लक्षणांत अधिक आहेत. त्यांची आवश्यकता व योग्यता दाखविली पाहिजे. नुसतें बैल, गाय, झाड, घोडा, शोभा, तेली, नदी,

कीं, असें म्हटलें म्हणजे पुरुषत्वाचा किंवा स्त्रीत्वाचा किंवा उभयभिन्नत्वाचा बोध होतो असें नाहीं. असें असतें तर लहान मुलांचे, तैलंगी ब्राम्हणांचे, व विदेशी मनुष्याचे मराठी भाषेंत लिंगासंबंधाच्या हास्यास्पद चुका कधींच आढळल्या नसत्या. तेव्हां पुरुषत्वादिकांचा जो बोध होतो तो नामांच्या वाक्यांतील प्रयोगावरूनच होतो हें उघड आहे. तसेंच ज्या पुरुषत्वादिकाचा बोध होतो तें कधीं कधीं वास्तविक म्हणजे खरें, प्रत्यक्ष, किंवा यथार्थ असतें आणि कधीं कधीं तें केवळ काल्पनिक म्हणजे मनानें मानिलेलें मात्र असतें हें निर्विवाद आहे. ह्यावरून लिंगाच्या नवीन लक्षणाची श्रेष्ठता वाचकांचे ध्यानांत येईलच. ]

२५०. लिंगें तीन आहेत म्हणून सांगितलेंच आहे. त्यांशिवाय कांहीं ठिकाणीं शब्दांचें सामान्यलिंग मानावें असें दादोबांचें म्हणणें आहे. 'ज्या नामांवरून वर सांगितलेल्या कोणत्याही लिंगाचा ज्या काळीं एखाद्या वाक्यामध्यें निश्चय करितां येत नाहीं, त्या काळीं त्याचें सामान्यलिंग मानावें. जसें:— मित्र, मी, पक्षी, इ०, ' याजवर कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं व त्यांच्या निबंधांचे प्रकाशक जोशी यांनीं बरीच टीका केली आहे. ती जिज्ञासूंनीं मूळांत पहावी. त्या टीकेचा कांहीं भाग अस्थानीं आहे. दादोबा म्हणतात एक आणि टीकाकार समजतात जरासें निराळेंच, असा कांहींसा प्रकार झाला आहे, असें सूक्ष्म वाचकांचे नजरेस येईल. दादोबांनीं पूरणिकेमध्यें आपला आशय बराच स्पष्ट केला आहे. (पूरणिका, क० ३५) "जेव्हां मी त्या खोलींत शिरलों तेव्हां 'मी उद्यां जाईन' असे शब्द ऐकिले, परंतु ते कोणाचे होते हें माझ्यानें सांगवत नाहीं " असें उदाहरण देऊन दादोबा म्हणतात कीं, 'मीं उद्यां जाईन' या ठिकाणच्या 'मी ह्या सर्वनामाचे लिंग भाषेवरून किंवा अर्थावरून किंवा पूर्वापरसंबंधावरून निश्चित ठरवितां येत नाहीं. तेव्हां 'मी' ह्याचें अशा ठिकाणीं सामान्यलिंग मानिलें पाहिजे. ह्या पूरणिकेनंतरही दादोबांचें म्हणणें असावें तितकें स्पष्ट होत नाहीं. मी, तूं, हीं सर्वनामें तिन्ही लिंगीं सारखींच; त्याप्रमाणें कांहीं क्रियापदेंही तिन्ही लिंगीं सारखींच. जसें:—जाईन, जाई, इ०. त्याचप्रमाणें कांहीं नामेंही दोन दोन लिंगीं, किंवा तिन्ही लिंगीं आढळतात. मनुष्य हें पुल्लिंगी व नपुंसकलिंगी, व पोर हें तिन्ही लिंगी आहे. दादोबा म्हणतात, वाक्यामध्यें जेव्हां एखादा नामाच्या लिंगाचा निर्णय करितां येणार नाहीं, तेव्हां त्या नामाचें सामान्यलिंग समजावें. पण ते जीं उदाहरणें देतात तीं सर्वनामांचीं, मित्र आणि

पक्षी अशीं आणखी दोन उदाहरणें त्यांनीं दिलीं आहेत. पण मित्र आणि पक्षी हे दोन्ही शब्द मराठींत पुल्लिंगी आहेत. आतां दादोबांचें असें म्हणणें दिसतें कीं, मित्र व पक्षी ह्या शब्दांचे उपयोगानें कधीं कधीं असें होईल कीं, ते शब्द विशेष स्थळीं नर किंवा नारी ह्यांपैकीं काय दाखवितात हें निश्चयानें सांगतां येणार नाहीं; त्या ठिकाणीं त्यांचें सामान्यलिंग मानावयाचें; असा दादोबाचा अभिप्राय दिसतो. परंतु पक्षी व मित्र ह्या शब्दांचा प्रयोग नेहमीं प्रायः पुल्लिंगी आढळतो. तेव्हां वरील संदिग्धता त्या शब्दांचे लिंगाची नसून त्यांचे अर्थाची आहे हें उघड आहे. तेव्हां दादोबा म्हणतात, ती संदिग्धता नामाचे लिंगासंबंधानें प्रायः कोठेंही उत्पन्न होईल असें आम्हांस वाटत नाहीं; सर्वनामासंबंधानें मात्र ती उत्पन्न होईल. परंतु ती पूर्वापरसंबंधानें बहुधा दूर होईल. नच झाल्यास त्या ठिकाणीं त्या सर्वनामाचें लिंग सामान्य म्हणण्यापेक्षां संदिग्ध, संशय-युक्त, किंवा **अनिश्चित** आहे असें म्हणणें बरें.

[ दादोबांचा हा मुद्दा बाजूस ठेवून दादोबा हे सामान्यलिंग म्हणून एक चवथेंच लिंग मानावें असें म्हणतात, असें समजून त्यांचे टीकाकार त्यांजवर घसरतात. ' कित्येक मराठी व्याकरणांत एक चौथें सामान्यलिंग म्हणून मानिलें आहे. ' ( प्रौढबोध पृष्ठ ३० टीप. ) आणि जीं नामें दोन किंवा तीन लिंगी आहेत त्यांस सामान्यलिंगी म्हणावें असें दादोबांचें मत आहे असें समजून तें ते खोडून काढितात. परंतु दादोबांचें नक्की म्हणणें काय आहे आणि तें कितपत सयुक्तिक आहे हे वर सांगितलेंच आहे. दोन लिंगी किंवा तिन्ही लिंगी शब्दांस सामान्यलिंग म्हणावें असें दादोबांचें मत आम्हांस तरी कोठें आढळत नाहीं. तथापि दादोबांनीं असें म्हटलें नाही म्हणून काय झालें ? असें म्हणणें कितपत सुयुक्तिक आहे हा प्रश्न उरतोच. त्याचें उत्तर मात्र दादोबांचे टीकाकारांप्रमाणेंच दिलें पाहिजे. तथापि या किंवा इतर कोणत्याही बाबतींत नसतेंच मत एखाद्याचे माथीं मारून त्याजवर घसरणें हें कधींच योग्य होणार नाहीं, हें उघड आहे. असो जोशी ह्यांचीं ह्या प्रश्नासंबंधाचीं सर्वच विधानें आम्हांस मान्य नाहींत. तथापि कृष्णशास्त्री चिपळूणकरांचा जोशी यांनीं उचलिलेला निकाल योग्य आहे. जरी दोन दोन किंवा तिन्ही लिंगांचे शब्द भाषेंत आढळले, तरी वाक्यामध्यें त्यांचा नेहमीं कोणत्या तरी एकाच लिंगीं प्रयोग झाला पाहिजे हें उघड आहे. म्हणून कोणत्याही ठिकाणीं नामाचें सामान्यलिंग म्हणण्याचा प्रसंग येणार नाहीं. व्याकरणांत किंवा कोशांत मात्र असे शब्द दोन दोन किंवा तिन्ही लिंगांखालीं दाखवावे लागतील. परंतु त्यांची तशी नोंद केली म्हणजे झालें. त्यांस स्वतंत्र

संज्ञा देण्याचें कांहीं विशेष प्रयोजन दिसत नाहीं. आणि अशा अनेक लिंगी शब्दांस जर स्वतंत्र नांव देण्याचें योजिलेंच, तर सामान्यलिंग ह्या एका संज्ञेनें सर्व काम भागावयाचेंही नाहीं. कारण कीं, कांहीं शब्द पुल्लिंगी व स्त्रीलिंगी; कांहीं पुल्लिंगी व नपुंसकलिंगी; कांहीं स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी; आणि कांहीं तिन्ही लिंगी; असे अनेक लिंगी शब्दांचे चार प्रकार आढळतात. त्यांपैकीं सामान्यलिंग ही संज्ञा अखेरच्या प्रकारचे शब्दांसच योग्य होय. बाकीच्या तिहींस आणखी तीन संज्ञा नवीन घडवाव्या लागतील; परंतु ह्यांपैकीं कोणत्याच संज्ञेची जरूर नसल्यामुळें सामान्यलिंग ही संज्ञाही निरुपयोगी होय. अनेकलिंगी शब्दांची फक्त नोंद केली म्हणजे झालें.

लिंगें तीनच असणें स्वाभाविक आहे. सृष्टीमध्यें जीवजडभेद आणि स्त्रीपुरुषभेद इतका उत्तान आहे कीं अगदीं लहान मुलासमुद्धां तो लक्षांत आल्यावांचून राहत नाहीं. परंतु हिंदी, बंगाली, आरबी, फ्रेंच, इत्यादि भाषांत केवळ पुल्लिंग व स्त्रीलिंग हीं दोनच लिंगें आहेत. यावरून ती ती भाषा बोलणाऱ्या लोकांस जीवजड भेद मुदलींच समजला नव्हता असें म्हणतां येत नाहीं; तर त्यांनीं जड सृष्टींतील प्रत्येक पदार्थाचे ठायीं स्त्रीत्वाची किंवा पुरुषत्वाची कल्पना केली आहे असेंच म्हटलें पाहिजे. इंग्रजी भाषेंत तीन लिंग असून त्यांतील भेदही वर सांगितलेल्या सृष्टींतील त्रिविध भेदास बहुतेक अनुसरून आहे. म्हणजे प्राणिवाचक शब्दांपैकीं स्त्रीत्वद्योतक ते स्त्रीलिंगी आणि पुरुषत्वद्योतक ते पुल्लिंगी आणि बाकीचे सारे शब्द म्हणजे अप्राणिवाचक शब्द, ते सर्व बहुधा नपुंसकलिंगी. परंतु अचेतन सृष्टीपैकीं कांहीं वस्तूंवर सचेतनत्वाचा आरोप करून ज्यांचे ठायीं बल, धैर्य, श्रेष्ठत्व, महत्त्व, इ० गुण मुख्यत्वेंकरून दृष्टीस पडतात, त्यांचे ठायीं पुरुषत्वाची कल्पना करून तद्वाचक शब्दांस पुल्लिंगी; आणि ज्या कांहीं वस्तूंचे ठायीं सौंदर्य, नाजुकपणा, इ० गुण मुख्यत्वेंकरून आढळतात त्यांचे ठायीं स्त्रीत्व कल्पून तद्वाचक शब्दांस स्त्रीलिंगी समजण्याची इंग्रजी भाषेंतही थोडीशी प्रवृत्ति नजरेस येते. ह्याच प्रवृत्तीचा संस्कृत व मराठी भाषेंत अतिरेक झाला आहे असे म्हणण्यास हरकत नाहीं. ह्यामुळें ह्या भाषांत लिंगव्यवस्था ही इंग्रजींतल्या स्पेलिंगाप्रमाणें अगदीं बेबंद व उच्छृंखल आहे असेंच म्हणावें लागतें. अप्राणिवाचक शब्दांसही पुल्लिंग किंवा स्त्रीलिंग मानण्यामध्यें गुंजीकर म्हणतातः— 'मनुष्याच्या अन्तःकरणवृत्तीची सूक्ष्मता अतिशय दृष्टीस पडते. इतकेंच नव्हे, परंतु आमचा तर्क तर एथपर्यंत धांवतो कीं, या भाषांमधील लिंगव्यवस्थेचा निरालसपणें शोध करणारा जर कोणी उभा राहील तर त्या त्या लोकांची सामाजिक स्थिति आरंभीं कशी होती, आणि कोणकोणत्या क्रमानें तिजमध्यें कसकसें अंतर पडत चाललें, याचा बराच उत्तम इतिहास त्या शोधापासून अवश्य निष्पन्न होईल.' हा फायदा जेव्हां होईल तेव्हां होवो; तोंपर्यंत मराठींतील लिंगव्यवस्था

अत्यंत अनियमित आणि मनःपूत आहे असेंच म्हटलें पाहिजे. म्हणून नामलिंगनिर्देश हा व्याकरणापेक्षां कोशाचाच प्रायः विषय होय हें उघड आहे.

बरें, ही व्यवस्था कांहीं अंशीं नियमित आहे असें म्हटलें, तरी लिंगाबद्दलचे नियम व्याकरणांत देण्याचें कांहीं प्रयोजन दिसत नाहीं. विकरण ह्या प्रकरणामध्यें नामांस लिंगानुसार कांहीं विकार होतात कीं काय हा मुख्य प्रश्न आहे. त्यास अनुसरून पुल्लिंगावरून स्त्रीलिंग किंवा नपुंसकलिंग साधण्याचे जर कांहीं विशिष्ट नियम असतील तर ते त्यांच्या अपवादांसह या अध्यायांत सांगणें रास्त आहे. तथापि आजपर्यंतची वैयाकरणांची चाल कांहीं विलक्षण दिसते. ते बहुतेक अनियमित लिंगव्यवस्थेचेही कांहीं नियम सांगण्याचा प्रयत्न करितात. दादोबांनीं लिंगनिर्बंध सांगण्याचा तीन दिशांनीं प्रयत्न केला आहे; एक अर्थाचे दिशेनें, एक अन्त्यवर्ण व प्रत्यय ह्यांचे दिशेनें, आणि एक लोकव्यवहाराचे दिशेनें. ह्यापैकीं अर्थाची दिशा ही अगदीं अप्रयोजक होय. कारण कीं, वृक्ष आणि झाड, आड आणि विहीर, रस्ता आणि सडक इत्यादि शब्द एकाच अर्थाचे असून त्यांचीं लिंगें निरनिराळीं आहेत. फार तर काय देह, तनु, शरीर; ग्रंथ, पोथी, पुस्तक; देव, देवता, दैवत; अशा अनेक स्थळीं एकाच अर्थी तिन्ही लिंगी शब्द आपल्या भाषेंत उपलब्ध आहेत. लिंगभेदानुरूप जरासा अर्थभेद कांहीं ठिकाणीं दृष्टीस पडेल; नाहीं असें नाहीं. तथापि तसा भेद सर्वच ठिकाणीं आढळत नाहीं हेंही वरील उदाहरणांवरून कळून येईल. आणि दिवा, दिवटी, मशाल; ओढा, नदी; दोरा, दोरखंड; इत्यादि कांहीं ठिकाणीं तर कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात त्याप्रमाणें 'स्थौल्यसौक्ष्म्यादि धर्मांचे विरुद्ध लिंगें आढळतात.' यामुळें लिंगभेदाबरोबर जरी कांहीं स्थळीं अर्थभेद असला, तरी तोही पुष्कळांशीं अनियमित आहे हें उघड आहे. एवंच अप्राणिवाचक नामांचें लिंग अर्थाप्रमाणें ठरविण्याचा प्रयत्न करणें म्हणजे बहुतेक वाऱ्याचीच मोट बांधण्याचा प्रयत्न करण्यासारखें आहे. ह्या कामीं लोकव्यवहार किंवा भाषणप्रचार ह्याशिवाय दुसरा राजमार्ग आम्हांस दिसत नाहीं. गुंजीकरांनीं व्युत्पत्तिदृष्ट्या म्हणजे संस्कृत भाषेच्या लिंगानुसार मराठींत तत्सम व तद्भव या दोन्ही प्रकारच्या शब्दांचें लिंग बहुधा असतें असें सांगून कांहीं एक लिंगव्यवस्था करण्याचा प्रयत्न केला आहे. हा प्रयत्न व्युत्पत्तीचे दृष्टीनें जरी महत्त्वाचा, प्रशंसनीय, व विद्वत्ताद्योतक आहे, तरी लिंगव्यवस्थेच्या दृष्टीनें केवळ अप्रयोजकच होय; कारण मराठींतील संस्कृत तत्सम व तद्भव शब्दांचें लिंग मूळांतील संस्कृत लिंगाप्रमाणें बहुधा असतें असें सांगितल्यानें नामांचे लिंगावर मुदलींच प्रकाश पडत नाहीं. मूळ संस्कृतांतलें लिंग तरी कसें जाणावें? तेंही मराठी शब्दांच्या लिंगांइतकेंच स्वैर व बेबन्द आहे. एवंच, मराठी शब्दांचें लिंगज्ञान होण्यासाठीं त्यांच्या मूळ संस्कृत शब्दांकडे

खोट दाखविणें म्हणजे अडचण दूर करणें अथवा नाहींशी करणें नव्हे तर केवळ दूर सारणें होय. मला माहित नाहीं असें म्हणण्याचे ऐवजीं दुसऱ्या आपल्या इतक्याच अज्ञान मनुष्याकडे जा म्हणून सांगितल्यानें गरजूस मोठया आशेनें दुसऱ्याकडे जाण्याचा व्यर्थ त्रास पोंचून त्याची निराशा मात्र दुणावते. ]

एवंच, अर्थावरून लिंगनिबंध आणि व्युत्पत्तीवरून लिंगनिबंध हे दोन्हीं मार्ग सारखेच निरुपयोगी होत. शिष्ट लोकव्यवहार हा एकच मार्ग बिनचूक होय. तो, ती, तें हीं सर्वनामें नामाचें पाठीमागें लागतात; तो लागत असल्यास पुलिंग, ती लागल्यास स्त्रीलिंग, आणि तें लागल्यास नपुंसकलिंग, असें सांगणें म्हणजे प्रचाराचेंच दुसऱ्या शब्दांनीं वर्णन करणें होय. तथापि, तो, ती, तें, हीं व्याकरणांतील पारिभाषिक लिंगांचीं निश्चित व सुगम चिन्हें, मराठी ही ज्यांची जन्मभाषा आहे अशा बालांस अनेक प्रकारांनीं उपयुक्त आहेत हें निर्विवाद आहे, अन्त्यावरून मात्र लिंगासंबंधाचे कांहीं साधारण नियम दृष्टोत्पत्तीस येतात. त्यांनीं लिंगासंबंधाचीं अडचण पूर्णपणें निवारण होते असें नाहीं: तथापि निबिडांधकारांत काजव्या-सही ज्याप्रमाणें तेज चढतें, त्याप्रमाणें वरील नियमांस महत्व प्राप्त होत आहे. तेव्हां या ग्रंथांत अर्थावरून लिंगनिबंध व व्युत्पत्तीवरून लिंगनिबंध हे दोन्ही प्रकार वर्ज करून अन्त्यावरून व प्रत्ययावरून लिंगनिबंध कर-ण्याचे जे कांहीं प्रकार अढळतात, तेवढेच देण्याचा आमचा इरादा आहे. आणि त्यानंतर लिंगानुसार नामांस कोणकोणते विकार होतात, ह्या प्रकृत अध्यायाच्या प्रधान अंगाकडे वळणार आहों. तथापि मराठींतील लिंगासंबंधानें अर्थदृष्टि जरी निःसंशय अप्रयोजक आहे, तरी प्राणीवाचक नामांच्या लिंगासंबंधानें दोन तीन नियम प्रथम सांगतों.

२५१. प्राणिवाचक नामांपैकीं पुरुषवाचक नामें पुल्लिंगी आणि स्त्रीवाचक नामें स्त्रीलिंगी होत; हें सरळच आहे. जसें: — पुरुष, घोडा, हत्ती, इ० पुल्लिं; आणि स्त्री, घोडी, हत्तीण, इ० शब्द स्त्रीलिंगी होत.

**अपवाद १**—दार, सखीजन, कबिला, हे शब्द स्त्रीवाचक असून पुल्लिंगी आहेत.

**दार**—हा शब्द मूळ संस्कृतांत पुलिंगी बहुवचनीं आहे. तसाच मराठी कवितेंत क्वचित् आढळतो. जसें:—

आमंत्रुनि सत्येनें सर्व श्रीकृष्णदार जेवविले — मोरोपंत

तथापि, हा दार शब्द मराठींत बहुधा **दारा** या रूपानें स्त्रीलिंगी आढळतो. जसें:—

नोवरी ते मज होय कशी **दारा**

करूं लागे नळ भूप या विचारा—रघुनाथपंडित.

दार शब्द मराठी कवितेंत क्वचित् नपुंसकलिंगीही आढळतो.

छळिलें दशाननें परि, झालें प्रभु **दार** काय कावर तें — मोरोपंत.

**अपवाद २** —कलत्र, कुटुंब, बक्कल, बटकूर, रांडरूं, रांडमागलूस, लांडोर, इ० शब्द स्त्रीवाचक असूनही नपुंसकलिंगी आहेत. यांपैकीं लांडोर व बटकूर हे शब्द क्वचित् स्त्रीलिंगीही आढळतात.

२५२. प्राणिवाचक नामांपैकीं ज्या नामांनीं सामान्य जातीचा निर्देश होतो त्यांचें बहुधा नपुंसकलिंग असतें; कारण कीं, त्या स्थळीं स्त्रीपुरुष-भेदाची फारशी अपेक्षा नसते. जसें:—माणुस, घोडें, कुत्रें, बकरें, इ०.

[ या नियमास अपवाद फारच आहेत. ते इतके कीं, विवक्षित शब्द नियमांत येतो कीं अपवादांत येतो हे सांगणें अशक्य आहे. नियमास अपवाद हा असावयाचाच अशी एक म्हण आहे. त्याचप्रमाणें अपवाद असल्याचें दुःख नाहीं, मात्र ते अपवाद व्यक्तिशः अमुक होत असें सांगण्याइतके ते थोडे तरी असावेत नाहीं तर त्या अपवादांचा तरी एखादा सामान्य नियम ठरवितां आला पाहिजे. परंतु जेव्हां अपवादांची व्यक्तिशः गणनाही करितां येत नाहीं किंवा त्यांसंबंधाचा साधारण नियमही कांहीं सांगतां येत नाहीं तेव्हां दिलेला नियम केवळ अप्रयोजकच होय. अशांतलाच प्रकृत नियम आहे. परंतु जसा, नियम अप्रयोजक तरी वैयाकरणाचे चालीस अनुसरून सांगितला आहे, त्याचप्रमाणें त्याचे कांहीं अपवादही अप्रयोजकपणेंच सांगतों. ]

**अपवाद १**— हत्ती, वाघ, गेंडा, गरूड, पोपट, गीध, साप, सर्प, टोळ, सुरवंट, उंदीर, बेडूक, मगर, ढेंकूण, पक्षी, इ०. सामान्यजातिवाचक शब्दही पुल्लिंगी आहेत.

**अपवाद २**—घार, मैना, कीड, घूस, घोण, सुसर, घोरपड, गोचीड गोचडी, तांब, ऊ, पिसू, जळू, भाद्द, इ० सामान्यजातिवाचक शब्दही स्त्रीलिंगी आहेत.

**अपवाद** ३ — सामान्यजातिवाचक कांहीं शब्द दोन दोन लिंगीं आहेत. जसें:—आस्वल (स्त्री० न०), मांजर ( स्त्री० न०), मुंगूस (न० पु०—क०), डुक्कर (पु०न०), माणूस (पु०न०), मनुष्य (पु०न०); इ०.

२५३. प्राणिवाचक नामांपकीं अपत्यवाचक नामें बहुधा नपुसकलिंगीं असतात; कारण कीं, या स्थळींही स्त्रीपुरुषभेदाची विशेष विवक्षा नसते. जसें:—मूल, पोर, अपत्य, बाल, बालक, वांसरूं, शिंगरूं, करडूं, पिलूं, इ०.

ह्यांपैकीं मूल आणि पोर हे शब्द तिन्ही लिंगी आहेत आणि बाल, बालक, हे पुल्लिंगीही आहेत.

[ प्राणिवाचक शब्दांच्या लिंगांबद्दलचे नियम संपले. हे फक्त तीन ( २५१, २५२, २५३, ) आहेत. पैकीं दुसरा ( २५२ ) हा पूर्वीं सांगितल्याप्रमाणें वास्तविक नियमच नव्हे, असें म्हटलें पाहिजे. म्हणून बाकीचे दोनच (२५१, २५३) काय ते नियम या नांवास साजेसे आहेत.

आतां नामांच्या अन्त्याक्षरावरून किंवा प्रत्ययांवरून त्यांच्या लिंगाबद्दलचे जे कांहीं साधारण नियम दिसतात ते सांगतों. यासंबंधानें अनेक वैयाकरणांनीं अनेक नियम दिलेले आहेत. परंतु पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ज्यांस नियम ही संज्ञाच शोभत नाहीं, त्यांस येथें स्थळ देण्यांत येणार नाहीं. अशा प्रकारच्या अनियमित आडनांवी नियमांचें स्वरूप वाचकांस कळावें म्हणूनच वरतीं असा एक ( २५२ ) नियम मासल्यासाठीं दिला आहे. असो. त्यातां पुढें जे नियम देण्याचा विचार आहे, त्यासंबंधानें कृष्णशास्त्री चिपळूणकर आपल्या निबंधांत म्हणतात. "शेवटच्या प्रत्ययावरून कांहीं शब्दांच्या लिंगांविषयीं अनुगम करितां येतो. जसें 'पण' प्रत्ययान्त काळेपण, गोरेपण, वगैरे शब्द नपुंसकलिंगी असतात; परंतु वास्तविक म्हटलें असतां हा नियम नव्हे. कारण, 'पण' हा प्रत्यय सर्व शब्दांत एकच आहे; तेव्हां विद्याप्राप्ति, धनप्राप्ति, गुणप्राप्ति, इ० सर्व शब्द स्त्रीलिंगी असतात, असें म्हणण्यांत जसा व्यापक नियम नाहीं तसा एकप्रत्ययान्त सर्व शब्द एकलिंगक असतात असें म्हणण्यांतही व्यापक नियम सांगितलासें होत नाहीं." ( निबंध. पृष्ठ ५९ ). या ठिकाणीं सामासिक शब्द म्हणजे दोन स्वतंत्र शब्दांनीं बनलले शब्द आणि प्रत्ययांनीं साधलेले साधित शब्द यांमध्यें जो फरक आहे तो शास्त्रीबोवांनीं बाजूस ठेविला आहे. सामासिक शब्दही साधित होत यांत संशय नाहीं. तथापि एकाच जातींतील उपजातींमध्येंही फरक असतो हें विसरतां कामा नये. तेव्हां शास्त्रीबोवांच्या वरील आक्षेपांत तथ्य नाहीं. मराठींत लिंगनिर्बंध नाहीं असें म्हटल्यानंतर, दादोबांनीं जे अन्त्यप्रत्ययावरून कांहीं सत्य नियम दिले आहेत, त्यांसही धुडकावून लावण्याचा हा प्रयत्न आहे. बाकी त्यांचा आक्षेप आणि त्याचें समर्थन हीं

दोन्ही सारख्याच योग्यतेच्या आहेत आणि 'शेषं कोपेन पूरयेत्' अशांतलाच कांहीं अंशीं हा प्रकार असावासें दिसतें. त्यांचे प्रकाशक व अनुयायी जे जोशी त्यांनींही शास्त्रीबोवांच्या या म्हणण्यास मान डोलविलेली कोठें दिसत नाहीं. तेव्हां आतां शास्त्रीबोवांनीं नाक मुरडलेल्या दिशेकडे वळूं.

२५४. ज्या मराठी नामांचे अन्तीं बिंदु असतो म्हणजे ज्यांचा अन्त्य वर्ण अनुनासिक असतो तीं सारीं नपुंसकलिंगी जाणावीं. जसें:—दहीं, मोतीं, गुरूं, बकरें, अंडें, तळें, बोलणें, सोनें, रुपें, इ०.

**अपवाद**—गहूं (पु०).

दादोबा म्हणतात,—'मला असें वाटतें, हा शब्द गंहू असा लिहिला असतां मग हा अपवाद करावयास नको.' पण भाषाप्रचार, व्युत्पत्ति, उच्चार, ह्या सर्वांस धाब्यावर बसवून अपवाद उडविण्याची कोण ही विलक्षण बुद्धि! संस्कृत 'गोधूम' शब्दापासून प्रकृत शब्द आला असल्यामुळें, तो अनुनासिकान्त असणेंच साहजिक आहे.

२५५. भाववाचक नामाचे लिंगासंबंधानें प्रत्ययांवरून कांहीं नियम आढळतात. ते असे:—

(अ) **पणा** आणि **वा** प्रत्ययान्त भाववाचक नामें पुल्लिंगी होत. जसें:—देवपणा, मनुष्यपणा, चांगुलपणा, गारवा, ओलावा, थंडावा, इ०.

(आ) **ई, की, ता, गिरी,** हे प्रत्यय लागून साधलेलीं भाववाचकनामें स्त्रीलिंगी असतात. जसें गरिबी, लांबी, पाटीलकी, धन्यता, लुच्चेगिरी, इ०.

(इ) **पण, त्व, य, अ,** हे प्रत्यय होऊन साधणारीं भाववाचक नामें नपुंसकलिंगी होत. जसें:— चांगुलपणा, मनुष्यपण, क्रूरत्व, मृदुत्व, शौर्य, माधुर्य, मार्दव, लाघव, गौरव, इ०.

२५६. कृदन्त म्हणजे धातुसाधित नामांच्या लिंगांबद्दलही प्रत्ययांवरून कांहीं नियम बांधितां येतात ते असे:—

(अ) **आ** आणि **आव** प्रत्ययान्त कृदन्त नामें पुल्लिंगी असतात. जसें:—वेढा, झगडा, ठोका, चावा, भरडा, चढाव, भराव, जमाव, इ०.

(आ) **णान्त** आणि **नान्त** म्हणजे **ण** आणि **न** प्रत्ययान्त कृदन्त नामें बहुधा नपुंसकलिंगी असतात. जसें:—दळण, कांडण, भांडण लेखन, सावन, पोषण, इ०.

**अपवाद**:—णान्त नामांचे नियमास फारच अपवाद आहेत. जसें:—माळण, कोळण, चाळण, चढण, उतरण, ठेवण, शिवण, इ० हे सर्व स्त्रीलिंगी आहेत. ह्यासंबंधानें गुंजीकरांचें असें मत आहे कीं, हे मूळचे ईकारांत असून नंतर अकारान्त झाले, आणि त्या कारणानें त्यांच्या ठायीं मूळचें स्त्रीलिंगत्व राहिलें आहे असा भास होतो.' मात्र हा केवळ तर्क-दिसतो; त्यास कांहीं प्रमाण नाहीं; हें त्यांच्या भाषेवरूनच स्पष्ट आहे.

( इ ) ई प्रत्ययान्त एकेरी व **अ** आणि **ई** प्रत्ययान्त द्विरुक्त धातु-साधित नामें स्त्रीलिंगी असतात. जसें:—उडी, बुडी, थुंकी, थापी मारा-मार, पळापळ, धांवाधांव, मारामारी, ओढाओढी, इ०.

( ई ) **णी, णूक, णावळ,** या प्रत्ययांनीं साधलेलीं सर्व, धातुसाधित नामें स्त्रीलिंगी होत. जसें:—कापणी, लावणी, चाळणी, वर्तणूक, जाच-णूक, घडणावळ, शिवणावळ, लिहिणावळ, इ०.

( उ ) धातु शब्दाची द्विरुक्ति होऊन जीं स्त्रीलिंगी अकारान्त धातु-साधित नामें होतात म्हणून वर ( इ ) सांगितलें त्यांजला **आट** प्रत्यय लागून जीं नामें साधतात तीं पुल्लिंगी असतात. जसें:—पळपळाट, चकचकाट, लखलखाट, इ०.

**अपवाद**—भरभराट. हा शब्द स्त्रीलिंगी आहे, असें प्रचारावरून दिसतें. पण गुंजीकरांनीं तो पुल्लिंगी म्हणून दिला आहे.

( ऊ ) **ति** प्रत्ययान्त क्रियावाचक संस्कृत नामें स्त्रीलिंगी जाणावीं. जसें:—कृति, गति, मति, रति, रीति, भीति, स्थिति, युति, प्रीति, क्षति, बुद्धि, ऋद्धि, सिद्धि, इ०. यांमधील अखेरचे शब्द 'ति' प्रत्य-यान्तच आहेत. संधीमुळें त्यांचें जरासें रूपान्तर झालें आहे, इतकेंच.

( ऋ ) **त** प्रत्ययान्त धातुसाधित नामें नपुंसकलिंगी असतात. जसें:—गत ( गमन ), स्खलित ( स्खलन—चुकी ), आचरित ( आचरण ), चरित ( चरित्र ), लिखित ( लेखन, पत्र ), हसित ( हास्य ), इ०.

**अपवाद**—उगवत ( पूर्व दिशा ), मावळत ( पश्चिम ) पाळत—थ हे स्त्रीलिंगी आहेत.

( ऌ ) **य** व **त्य** या प्रत्ययांनीं साधलेलीं संस्कृत धातुसाधित नामें नपुंसकलिंगी आहेत. जसें:—कार्य, कृत्य, नृत्य, पारिपत्य, सत्य, इ०.

**अपवाद**—भृत्य ( पु० ).

२५७. **त्र** प्रत्ययान्त संस्कृत शब्द प्रायः नपुंसकलिंगी आहेत. जसें:—सूत्र, चित्र, तंत्र, पत्र, पात्र, मूत्र, यंत्र, सत्र, स्तोत्र, गोत्र, वक्त्र, शस्त्र, छत्र, वस्त्र, क्षेत्र, गात्र, चरित्र, शास्त्र, नक्षत्र, कलत्र, इ०.

**अपवाद** १—पुत्र, मित्र ( सूर्य ), क्षत्र, अमित्र, गोत्र ( पर्वत ) पौत्र, छात्र, मंत्र, हे पुलिंगी आहेत.

**अपवाद** २—नेत्र, मित्र ( स्नेही ) हे दोन्ही शब्द मूळ संस्कृतांत अपवाद नाहींत; म्हणजे संस्कृतांत ते नपुंसकलिंगीच आहेत. परंतु मराठींत ते पुलिंगी आहेत.

( अ ) मोरोपंतासारख्या व्युत्पन्न कवींचे काव्यांत मात्र ते कधीं कधीं संस्कृतांतल्याप्रमाणें नपुसकलिंगीच आढळतात. जसें:—

**नेत्र** असोनि उघडीं तिमिरीं स्वपरांसि वीर नोळखिती
आकास्मिकलब्धश्रीमदांध अकुलीन नर जसें कुमती—मोरोपंत.
स्नेह करी हृष्ट करी तर्पीं रक्षी सदैव संमानी
पावे सुखें सुखहि तें **मित्र** असें म्हणति सर्वही ज्ञानी—मोरोपंत.

टीप—नेत्रवाचक सर्व शब्द संस्कृतांत नपुंसकलिंगी आहेत; परन्तु तदर्थक मराठी प्रचारांतील ‘ डोळा ’ हा शब्द पुलिंगी असल्यामुळें नेत्रवाचक तत्सम शब्द मराठींत पुलिंगीच आहेत. तेंच कारण ‘ मित्र ’ शब्दासही लागू आहे.

२५८. **ईक** प्रत्ययान्त नामें स्त्रीलिंगी आहेत. जसें:—आगळीक, शिळीक, तिडीक, सोयरीक, इ०

२५९. **इमा** प्रत्ययान्त संस्कृत शब्द पुलिंगी आहेत. परंतु ते मराठींत कधीं कधीं स्त्रीलिंगीही आढळतात; म्हणजे ते मराठींत दोन्ही लिंगी आहेत. जसें:—महिमा, गरिमा, इ०. उदाहरणें:—

त्याचा **महिमा** काय वर्णवा ?
जो न गाय हरिचे **महिमेला**, तो असे जिताचि या महिमेला—वामन.

२६०. **नद्यांचीं** आकारान्त व ईकारान्त नांवें स्त्रीलिंगी आहेत. जसें:—गंगा, यमुना, नर्मदा, सरस्वती, वेत्रवती, चर्मण्वती, गोमती, तापी, गोदावरी, इ०.

२६१. कांहीं शब्द दोन दोन किंवा तिन्ही लिंगींहीं आढळतात. अशांचीं कांहीं उदाहरणें वर आलींच आहेत. आणखी उदाहरणें येणेंप्रमाणें:—

| | |
|---|---|
| वेळ—पु० स्त्री० | जागा —पु० स्त्री० |
| काळ— पु० | बाग—पु० स्त्री० |
| सकाळ—पु० | मोहो—पु० न० |
| संध्याकाळ—स्त्री० पु० ( क० ) | पितळ—स्त्री० न० |
| दुपार —स्त्री० पु० ( क ) | तपकीर—स्त्री० न० |
| | तंबाखू—पु० स्त्री० |
| मध—पु० स्त्री० | गुडाखू—पु० स्त्री० |
| संधि—पु० स्त्री० | जन्म—पु० न० |
| शिकण—स्त्री० न० | मजा—स्त्री० न० ( प्रांतिक ) |
| भात—पु०(शिजलेले तांदूळ). | सामान—न० पु० ( प्रांतिक ) |
| भात—न० ( साळ ) | रू—पु० स्त्री० |
| तारा—स्त्री० पु० | व्याधि—पु० स्त्री० |
| ढग—पु० न० | तार—स्त्री० पु० ( प्रांतिक ) |
| दुकान—स्त्री० न० | मका—पु० स्त्री० |
| उंट—पु० न० | वीणा—पु० स्त्री० |
| हरिण—पु० न० | जिन्नस—पु० स्त्री० ( क० ) |
| कलम—न० स्त्री० | कसुर—पु० स्त्री० |
| बदल—पु० स्त्री० | इ० |

२६२. कांहीं तत्सम संस्कृत शब्दांचें मुळांत एक व मराठींत दुसरेंच लिंग आहे. ह्यांचींहीं कांहीं उदाहरणें वर आलीं आहेत. आणखी उदाहरणें:—

| | |
|---|---|
| शब्द — सं० लिं०—म० लिं० | शब्द — सं० लिं० म० लिं० |
| वस्तु — न० — स्त्री० | शपथ — पु० — स्त्री० |
| स्वप्न — पु० — न० | वाट — पु० — स्त्री० |
| शाक — पु० न० — स्त्री० | रेणु — पु० स्त्री० — पु० |
| तिथि — पु० स्त्री० — स्त्री० | हनु — पु० स्त्री० — स्त्री० |

| | |
|---|---|
| मध्याह्न — पु० — स्त्री० | वपु — न० — स्त्री० |
| विघ्न — पु० — न० | रोम — न० — पु० |
| राशि — पु० — स्त्री० | असि — पु० — स्त्री० |
| अश्रु — न० — पु० | खड्ग — पु० — न० |
| श्मश्रु — न० — पु० | जन्म — न० — पु० |

ह्यांपैकीं कांहीं शब्द काव्यामध्यें मूळ संस्कृतलिंगीही आढळतात. आणि कधीं कधीं शास्त्री, पंडित, इत्यादि व्युत्पन्न लोकांच्या भाषेंत ते तसे योजिलेले असतात.

२६३. फारसी, अरबी, इंग्रजी, ह्या परकी भाषांतून जे शब्द मराठींत आले आहेत, त्यांच्या लिंगाबद्दल कांहींच नियम दिसत नाहीं. कधीं कधीं एक, तर कधीं कधीं दुसरा, आणि कधीं कधीं तिसराच प्रकार दिसतो. तें येणेंप्रमाणें:—

( अ ) कांहीं शब्दांचें मूळ लिंगच काईम आहे. जसें:—

| | | |
|---|---|---|
| बुक—न० | कचेरी—स्त्री० | पार्लमेंट—न० |
| टेबल—न० | हपीस—न० | काउन्सिल—न० |
| मेज—न० | इस्पितळ—न० | खुर्ची—स्त्री०, इ० |

( आ ) कांहीं शब्दांस तदर्थक प्रचलित मराठीं शब्दांचें लिंग प्राप्त झालें आहे. जसें:—

| | |
|---|---|
| कंपनी—मंडळी—स्त्री० | क्लास—वर्ग—पु० |
| मार्क—गुण—पु० | तबक—ताट—न० |
| नंबर—क्रम—पु० | बूट—जोडा—पु० |
| रसीद—पावती—स्त्री० | कमेटी—सभा—स्त्री० |

( इ ) कांहीं शब्द ईकारान्त असल्यामुळें स्त्रीलिंगी झाले आहेत:— चिमणी, गिनी, म्युनिसिपालिटी, हिस्टरी, जिऑग्रफी, बॉटनी, इ०.

( ई ) कांहीं तर दोन दोन किंवा तिन्ही लिंगी आढळतात:— तिकीट ( न० स्त्री० ), सेन्टेन्स ( पु० न० ), कार्ड ( पु० स्त्री० न० ),

२६४. आतां लिंगानुसार कांहीं शब्दांस कसकसे विकार होतात ते पाहूं. या संबंधानें निवळ मराठी शब्दांचें लिंगविकरण आणि संस्कृत

शब्दांचें लिंगविकरण असे दोन भाग केले पाहिजेत. ह्यांपैकीं प्रथम मराठी लिंगविकारांचा विचार करूं आणि नंतर संस्कृत लिंगविकारांकडे वळूं.

२६५. स्त्रीलिंगद्योतक ई प्रत्यय खालील नामांस लागतो:—

( अ ) प्राणिवाचक आकारान्त पुलिंगी नामांस ई आणि एं हे प्रत्यय लागून अनुक्रमें स्त्रीलिंग आणि नपुंसकलिंग साधतें. हें प्रत्यय पररूपसंधीनें लागतात. उदाहरणें:—

| पु० | स्त्री० | न० | पु० | स्त्री० | न० |
|---|---|---|---|---|---|
| घोडा | घोडी | घोडें | लांडगा | लांडगी | लांडगें |
| कुत्रा | कुत्री | कुत्रें | कोल्हा | कोल्ही | कोल्हें |
| बकरा | बकरी | बकरं | मुलगा | मुलगी | मुलगें |
| कारटा | कारटी | कारटें | पोरगा | पोरगी | पोरगें |
| इ० | | | इ० | | |

ह्या ठिकाणचें नपुंसकलिंग जातिद्योतक किंवा क्षुद्रद्योतक आहे.

( आ ) नातें दाखविणारे अथवा प्रतिष्ठा दाखविणारे आकारान्त पुलिंगी शब्द याच सदरांत येतात. उदाहरणें:—

| पु० — स्त्री० | पु० — स्त्री० |
|---|---|
| काका—काकी, काकू. | आजा—आजी |
| मामा—मामी | चुलता—चुलती |
| दादा—( दादी ) | इ० |

टीप—'काकू' रूप विशेषेंकरून कोंकणांत आणि 'काकी' हें देशावर प्रचारांत आहे. 'दादी' हा शब्द मराठींत प्रचारांत नसून हिंदींत आहे. मावळा—मावळण ( स्त्री० ) हा एक अपवाद खेर यांनीं दिला आहे. पण तो फक्त कोंकणांत कांहीं ठिकाणीं आढळतो.

( इ ) मनुष्येतर प्राणिवाचक त्र्यक्षरी अकारान्त पुलिंगी शब्द:—

| पु० — स्त्री० | पु० — स्त्री० |
|---|---|
| पोपट—पोपटी | सांबर—सांबरी |
| हरीण—हरिणी, हरणी | उंदीर—उंदरी |
| गाढव — गाढवी | बेडूक — बेडकी |

| | |
|---|---|
| ढेंकूण---ढेंकणी | गोचीड---गोचडी |
| माकड---माकडी | मांजर मांजरी |
| इ० | इ० |

(ई) कांहीं प्राणिवाचक अकारान्त संस्कृत शब्दः---देव---देवी, दास---दासी, शूद्र---शूद्री, गोप---गोपी, सिंह---सिंही, मृग---मृगी, महिष---महिषी, हंस---हंसी, व्याघ्र---व्याघ्री, तरुण---तरुणी, इ०.

२६६. स्त्रीलिंगद्योतक **ईण** हा प्रत्यय पुढील नामांस पररूप-संधीनें लागतो.

(अ) अकारांत, ईकारान्त, व ऊकारान्त, पुल्लिंगी, जातीचीं, व धंद्याचीं नांवें आडनांवें आणि मनुष्येतर प्राणिवाचक कांहीं नामें:—

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| वाघ | वाघीण | सिंह | सिंहीण |
| सोनार | सोनारीण | सुतार | सुतारीण |
| लोहार | लोहारीण | तेली | तेलीण |
| न्हावी | न्हावीण | तांबोळी | तांबोळीण |
| कांसार | कांसारीण | भट | भटीण |
| रामोशी | रामोशीण | परभू | परभीण |
| कोळी | कोळीण | शिक्षक | शिक्षकीण |
| गुरव | गुरवीण | मास्तर | मास्तरीण |
| पवार | पवारीण | दातार | दातारीण |
| गायकवाड | गायकवाडीण | करंदीकर | करंदीकरीण |
| जोशी | जोशीण | धोबी | धोबीण |
| माळी | माळीण | गवळी | गवळीण |
| व्याही | विहीण | ,, | गवळण (अनियमित) |
| (मूळास अनियमित विकार होतो.) | | | इ० |

(आ) एकारान्त आडनांवाचे शब्द. ह्यांचीं स्त्रीलिंगी रूपें विकल्पें करून ईकारान्तही होतात. दोन्ही वेळीं पररूपसंधीच होतो. उदाहरणें:—

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| दामले | दामली—लीण | साठे | साठी—ठीण |
| परचुरे | परचुरी—रीण | देशपांडे | देशपांडी—डीण |
| वझे | वझी—वझीण | पाळंदे | पाळंदी—दीण |
| खरे | खरी—रीण | लेले | लेली—लीण |
| इ० | | इ० | |

हीं आडनांवें दिसण्यांत अनेकवचनीं दिसतात. त्यांचीं, दामला—ल्या साठा—ठ्या, लेला—ल्या, अशीं **आ**कारान्त व **या**कारान्त एकवचनें करण्याची चाल आहे. **आ**कारान्ताकडे कोंकणांत व याकारान्ताकडे देशावर अधिक प्रवृत्ति दिसते. दामल्या, साठ्या, इ० **या**कारान्त रूपांत तिरस्काराचाही थोडासा ध्वनि उमटत आहे. एकवचनी रूपावरून जरी स्त्रीलिंग साधावयाचें म्हटलें तरी स्त्रीलिंगी रूपें वर दिलीं आहेत तींच ह्या आडनांवांच्या स्त्रीलिंगी रूपांपैकीं **ईण** प्रत्ययान्त रूपाचाच अधिक प्रचार आहे.

या एकवचनी **या**कारान्त रूपांसारखींच जीं कांहीं जातींचीं, अथवा कृति व वृत्ति यांवरून पडलेलीं **या**कारान्त नांवें आहेत, त्यांचें स्त्रीलिंगही वरीलप्रमाणेच दोन प्रकारांनीं होतें. अन्त्य **या**चा **लो**प होऊन स्त्रीप्रत्यय लागतात.

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| भाट्या—भाटी, भाटीण. | | देशपांड्या—देशपांडी—डीण. | |
| भामट्या—भामटी, भामटीण. | | वाघमाऱ्या—वाघमारी—रीण. | |
| उचल्या—उचली, उचलीण. | | आगलाव्या—आगलावी—वीण. | |
| इ० | | इ० | |

या ठिकाणच्या वैकल्पिक रूपांपैकीं **ईण** प्रत्ययान्त रूपांचा अधिक प्रचार दिसतो.

**टीप**—अशा प्रकारचीं कांहीं नांवें आडनांवें आहेत. जसें:—वाघमारे, गोडबोले, इ०, या आडनांवांचें स्त्रीलिंगी रूप बहुधा **ईण** प्रत्ययान्त होतें. जसें:—वाघमारीण बाई, गोडबोलीण बाई, इ०. परंतु या शब्दांचा जेव्हां सार्थ उपयोग होतो, तेव्हां त्यांच्या ईकारान्त स्त्रीलिंगी रूपाचाच विशेष प्रचार आढळतो. जसें:—ही बाई वाघमारी किंवा गोडबोली आहे.

(इ) शब्दास कोणताही प्रत्यय लागतेवेळीं त्यांतील उपान्त्य ई आणि ऊ ह्यांचे पुढील अक्षर दीर्घ होत असल्यास हे उपान्त्य ऱ्हस्व होतात किंवा त्यांस विकल्पानें **अ** हा आदेश होतो. जसें:——

| पु० | स्त्री० |
|---|---|
| परीट | परिटीण, परटीण. |
| बुरूड | बुरुडीण, बुरडीण. |

परंतु उपान्त्य ई, ऊ, ह्यांचे मागें दीर्घ अक्षर असेल, तर उपान्त्यास ऱ्हस्वत्व न येतां **अ** हाच आदेश होतो. जसें:——

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| बेडूक | बेडकीण | ठाकूर | ठाकरीण |

पाटील पाटलीण (ह्याचीं पाटलण व पटलण अशींही दोन व्यावहारिक रूपें आढळतात.)

ज्यांचेमध्यें उपान्त्य ई व ऊ आहेत, असे शब्द जर अन्य भाषेंतून मराठींत आलेले असले, तर त्यांचे उपान्त्यास अ हा आदेश कधींच होत नाहीं; आणि उपान्त्य ऱ्हस्व होणेंही गौणच आहे. म्हणजे त्यांचीं स्त्रीलिंगी दोन दोन रूपें जरी आढळलीं तरी मूळ दीर्घ उपान्त्याक्षर ज्यामध्यें दीर्घच असतें, असें रूप अधिक प्रचारांत आहे असें समजावें. उदाहरणें:——

| पु० स्त्री० | पु० स्त्री० |
|---|---|
| फकीर——फकीरीण, फकिरीण | अमीर——अमीरीण, अमिरीण |
| वकील——वकीलीण, वकिलीण | फडनीस फडनीशीण, फडनिशीण |
| अहीर——अहीरीण, अहिरीण | रजपूत——रजपूतीण, रजपुतीण |
| माहूत——माहूतीण, माहुतीण | चिटणीस–चिटणीशीण, चिटणिशीण |
| इ० | इ० |

जर उपान्त्य ई व ऊ हे व्यंजनयुक्त नसले, म्हणजे उपान्त्य अक्षरच ई किंवा ऊ असलें, तर त्यांचे जागीं यणादेश होतो; म्हणजे **य** किंवा व हीं अक्षरें अनुक्रमें होतात; किंवा ते स्वर ऱ्हस्व होतात. उदा०:——

शाईर——शायरीण, शाइरीण. राऊत——रावतीण, राउतीण.

**टीप**——अन्त्य व उपान्त्य ह्यांच्या विकाराबद्दलचे सर्व नियम पुढील अध्यायाचे अन्तीं पहावे.

२६७. कांहीं थोड्याशा शब्दांस **आणी** हा स्त्रीवाचक प्रत्यय लागतो. जसें:--मोंगल--मोंगलाणी, शेट--शेटाणी, मेहेतर--मेहेतराणी, इ०, हा प्रत्यय संस्कृतांतही आहे. उदा०:--इन्द्र--इन्द्राणी.

२६८. कधीं कधीं आकारान्त पुल्लिंगी पदार्थवाचक शब्दांस सौक्ष्म्यार्थी ई प्रत्यय लागून स्त्रीलिंगी नामें साधतात. जसें:--

| | |
|---|---|
| आरसा--आरशी | खळगा--खेळणी |
| दांडा--दांडी | लोटा--लोटी |
| खडा--खडी | टोपला--टोपली |
| गुंडा--गुंडी इ० | वडा--वडी इ० |

२६९. उलटपक्षीं ईकारान्त स्त्रीलिंगी पदार्थवाचक शब्दांस स्थौल्यार्थी विनोदानें आ प्रत्यय लावून पररूपसंधीनें पुल्लिंगी नामेंही तयार करितात. जसें:--पळी--पळा, पोळी--पोळा, भाकरी--भाकरा, वाटी--वाटा, चोळी--चोळा, इ०

२७०. कांहीं ईकारान्त व ईण प्रत्ययान्त स्त्रीलिंगी शब्द अर्थदृष्ट्या स्त्रियांसच लागू पडणारे आहेत, यामुळे तदनुरूप पुल्लिंगी नामें भाषेंत आढळत नाहींत. अशा प्रकारच्या स्त्रीलिंगी शब्दांचीं उदाहरणें:--विटाळशी, गर्भारशी, बाळंतीण, सवाशीण, सासुरवाशीण, माघारीण माहेरवाशीण, कुवारली, पाठराखीण, न्हाणवली, करवली, इ०. ह्यांचीं पुल्लिंगी रूपें अर्थात् अस्तित्वांतच नाहींत.

आतां निवळ संस्कृत स्त्रीप्रत्ययांकडे वळूं, कारण, मराठीमध्यें संस्कृत शब्दांचा भरणा फार असल्यामुळें आणि तो दिवसेंदिवस वाढताच असल्यामुळें संस्कृतामध्यें पुल्लिंगावरून स्त्रीलिंग कसें साधतात, हें मराठी भाषेस जाणण्याची फार आवश्यकता आहे. शिवाय संस्कृत स्त्रीप्रत्ययांवरूनच मराठी स्त्रीप्रत्यय कसे निघाले आहेत, हेंही त्यायोगें कळण्यास सुलभ जाईल. पुल्लिंगावरून स्त्रीलिंग साधण्याचे संस्कृतांतील सर्वच नियम येथें देण्याची आवश्यकता नाहीं. परंतु मराठी भाषेस जेवढे उपयुक्त असे वाटतात, तेवढेच येथें देण्याचा प्रचार आहे, आणि तो योग्यच आहे.

२७१. कांहीं पुल्लिंगी नामांस स्त्रीलिंगी ई प्रत्यय लागतो.

(अ) कांहीं व्यंजनान्त पुलिंगी नामें:—

| म० | सं० मूळ | स्त्री० | म० | सं० मूळ | स्त्री० |
|---|---|---|---|---|---|
| राजा | राजन् | राज्ञी | धनी | धनिन् | धनिनी |
| युवा | युवन् | युवती | करी | करिन् | करिणी |
| भगवान् | भगवत् | भगवती | विद्वान् | विद्वस् | विदुषी |
| | सत् | सती | महान् | महत् | महती |
| श्रीमान् | श्रीमत् | श्रीमती | श्वा | श्वन् | शुनी |

(आ) कांहीं अकारान्त पुलिंगी शब्द; हे वर (२६५) सांगितले आहेत. नद—नदी, गौर—गौरी, पुत्र—पुत्री, पंचम—पंचमी, सुंदर—सुंदरी, रमण—रमणी, कुमार—कुमारी, इ०

(ई) ऋकारान्त पुल्लिंगी नामें ही मराठींत आकारान्त होतात. अर्थात् तीं मूळ संस्कृत प्रातिपदिकांपासून आलीं नसून प्रथमेच्या एकवचनापासून आलेलीं आहेत.

| म० | सं० मूळ | स्त्री० | म० | सं० मूळ | स्त्री० |
|---|---|---|---|---|---|
| कर्ता | कर्तृ | कर्त्री | ग्रंथकर्ता | ग्रंथकर्तृ | ग्रंथकर्त्री |
| धाता | धातृ | धात्री | जनयिता | जनयितृ | जनयित्री |
| दाता | दातृ | दात्री | कवयिता | कवयितृ | कवयित्री |
| इ०. | | | | | इ०. |

२७२ बरींच पुलिंगी नामें, सर्वनामें व विशेषणें यांस आ हा प्रत्यय लागतो. तीं खालीं दिल्याप्रमाणें:—

(अ) बहुधा अकारान्त पुल्लिंगी सर्व प्रातिपदिकें.

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| बाल | बाला | प्रिय | प्रिया |
| अश्व | अश्वा | अशुभ | अशुभा |
| अज | अजा | दीन | दीना |
| कोकिल | कोकिला | अन्य | अन्या |
| इ० | | | इ० |

(आ) अन्त्य अ च्या पाठीमागें य् असल्यास प्रायः आ प्रत्यय लागतो. जसें:—वैश्य—वैश्या, क्षत्रिय—क्षत्रिया, इ०

ह्यांचेमध्यें पूर्वापरसंबंधास अनुसरून ज्या ठिकाणीं एखादें नाम अध्याहृत असतें, त्या ठिकाणीं सविकरणसामान्यरूपयुक्त शब्दयोगी अव्यय ह्यास साध्या सामान्यरूपानें युक्त शब्दयोगी अव्ययापेक्षां निराळा अर्थ असतो. ' माझ्यावर आणि तुझ्यावर त्याचें सारखेंच प्रेम आहे ' या वाक्यांत सविकरणसामान्यरूपयुक्त शब्दयोगी अव्ययास विशेष अर्थ नाहीं. यथ ' माझ्यावर आणि तुझ्यावर ' ह्याचा ' मजवर आणि तुजवर ' असाच अर्थ आहे. परंतु ' माझा हात तुझ्यापेक्षां मोठा आहे ' या वाक्यांत ' तुझ्यापेक्षां ' याचा ' तुजपेक्षां ' असा अर्थ **नसून** ' तुझ्या हातापेक्षां ' असा अर्थ आहे. कारण कीं ' तुझ्या ' या सविकरण सामान्यरूपानंतर ' पेक्षां ' या अव्ययाचे पूर्वीं ' हात ' हा शब्द पूर्वसंबंधानुसार अध्याहृत आहे हें उघड आहे. अतएव या वाक्यांत ' तुझ्यापेक्षां ' ह्याचे जागीं ' तुजपेक्षां ' असें साध्या सामान्यरूपानें युक्त शब्दयोगी अव्यय घालून भागावयाचें नाहीं. तसेंच, ' **त्याच्या**पेक्षां ह्याचाच अभ्यास चांगला आहे,' ' **सवतीच्यांवर** पोटच्या पोरांइतकें प्रेम करणारी बायको विरळा, ' ' तूं एकाएकीं त्याच्यावर कसा हात टाकलास ? ' इत्यादि वाक्यांत त्याच्यापेक्षां =त्याच्या अभ्यासापेक्षां; सवतीच्यांवर=सवतीच्या पोरांवर; त्याच्यावर= त्याच्या अंगावर, हें उघड आहे.

यावरून शब्दयोगी अव्ययाचे पूर्वीं सविकरणसामान्यरूप ज प्रथम येऊं लागलें, तें ह्याच विशेष अर्थानें येऊं लागलें असावें. त्याची मूळ उत्पत्ति कांहींहीं असो, इतकें खरें कीं, शब्दयोगी अव्ययाचे पूर्वीं साधें सामान्यरूप आणि सविकरण सामान्यरूप ह्यांचे उपयोगांत प्रचलित भाषेंत प्रायः विशेष भेद दिसत नाहीं, कधीं कधीं मात्र पूर्वापरसंबंधास अनुसरून सविकरण सामान्यरूपास षष्ठी विभक्तीचा अर्थ असून त्याशीं संबद्ध असलेल्या नामाचा वरीलसारख्या उदाहरणांत अध्याहार करावा लागतो; त्या ठिकाणीं मात्र साधें सामान्यरूप चालावयाचें नाहीं. तथापि अशा ठिकाणींही साध्या सामान्यरूपाचा प्रयोग दुर्लक्षानें झालेला कधीं कधीं आढळतो. अन्यत्र दोहोंमध्यें फारसा फरक दिसत नाहीं. तरी तो करणें बरें.

२२८. स्वरादि शब्दयोगी अव्ययांपकीं ' आंत ' हें पुढें आलें असतां मागील सामान्यरूपाचा व त्याचा बहुधा संधि होतो. परंतु त्याचे मागे सविकरण सामान्यरूप आल्यास त्यांचा संधि बहुधा होत नाहीं.

उदा०:—माझ्या वाड्यांत पाय ठेऊं नको, माझ्या वाड्यांचे किंवा वाड्याच्या आंत पाय ठेऊं नको. वाड्यांत हें सप्तमीचें रूप होयं.

( अ ) साधें सामान्यरूप आणि 'आंत' यांच्या संधीस फारसा अपवाद नाहीं. कधीं कधीं कवितेंत मात्र अपवाद आढळतो. जसें:—

रावणाचे सभें आंत, अति समर्थ बोलावया—एकनाथ.

मूढ सभे आंत, इच्छी पंडिताचा घात—तुकाराम.

( आ ) सविकरण सामान्यरूप आणि 'आंत' ह्यांमध्यें संधि न होण्याचे नियमास मात्र बरेच अपवाद आढळतात. जसें:—तुझ्यांत, तुमच्यांत, आमच्यांत, त्यांच्यांत, इंग्रजांच्यांत, इ०.

( इ ) स्वरादि इतर शब्दयोगी अव्ययें मात्र नेहमीं संधि न होतांच पुढें येतात. जसें:—त्याच्या आधीं—अगोदर, इ०.

( ई ) स्वरादि शब्दयोगी अव्ययांचे पूर्वीं साध्या सामान्यरूपापेक्षां सविकरण सामान्यरूपाचाच अधिक प्रचार दिसतो. जसें:—सोमवारचे आंत—आधीं, इ०; रामाच्या आधीं—अगोदर, इ०. या ठिकाणीं सोमवारा आधीं, रामा अगोदर असा प्रयोग क्वचित् आढळतो.

( उ ) 'चार दिवसांत' आणि 'चार दिवसांचे आंत'—'महिन्यांत' आणि 'महिन्याचे आंत'—ह्या दोन भाषणांत फरक आहे. 'दिवसांत' किंवा 'महिन्यांत' म्हणजे 'त्याचे आरंभापासून अखेरपर्यंत;' आणि याच अर्थावर विशेष जोर द्यावयाचा असतां त्याचे मागें 'उभ्या' हें विशेषण लावितात आणि 'उभ्या दिवसांत' किंवा 'उभ्या महिन्यांत' असें म्हणतात. परंतु 'दिवसाचे आंत' किंवा 'महिन्याचे आंत' म्हणजे 'तो संपण्यापूर्वीं' उदा०:—या चार दिवसांत किंवा महिन्यांत एकही मनुष्य प्लेगनें मेलें नाही, या उभ्या महिन्यांत पावसाचा कसा तो थेंबही नाहीं; तो चार दिवसांचे आंत किंवा महिन्याचे आंत परत येईल. शेवटल्या उदाहरणांत 'दिलेली मुदत संपण्यापूर्वीं' असा अर्थ आहे हें उघड आहे.

२२९. कधीं कधीं मागल्या सामान्यरूपान्त नामासह शब्दयोगी अव्ययाचा एका स्वतंत्र शब्दयोगी अव्ययाप्रमाणें उपयोग करितात. अशा शब्दांस जर मिश्र शब्दयोगी अव्ययें असें म्हटलें, तर या मिश्र शब्दयोगी

अपवादः—हय—हयी, गवय—गवयी.

परंतु अन्त्याक्षर संयुक्तव्यंजनयुक्त असल्यास य् चा लोप होतो. जसें:—मत्स्य—मत्सी, गार्ग्य—गार्गी, इ०

टीप—याच नियमाप्रमाणें वाघमाऱ्या—वाघमारीण, माव्या—मावीण, इ०. वर दिलेलीं ( अंक २६६ आ ) मराठी उदाहरणें समजावीं.

२७३. कांहीं नांवास आनी हा स्त्री प्रत्यय लागतो; ( अं० २६७ ).

भव—भवानी इन्द्र—इन्द्राणी शर्व—शर्वाणी

रुद्र—रुद्राणी मृड—मृडानी वरुण—वरुणानी

२७४. कांहींचीं दोन दोन किंवा तीन तीनही स्त्रीलिंगी रूपें होतात.

मातुल—मातुली, मातुलानी.

उपाध्याय—उपाध्यायानी, उपाध्यायी ( त्याची स्त्री ), उपाध्याया ( पंतोजीण ).

आचार्य—आचार्या ( वेदमंत्र शिकविणारी )
आचार्याणी ( आचार्याची बायको ).

क्षत्रिय—क्षात्रियी ( त्याची बायको ), क्षत्रिया, क्षत्रियाणी ( त्या वर्णाची स्त्री ).

२७५. कांहीं स्त्रीलिंगें अनियमित आहेत त्यांपैकीं कांहीं अशीः—

| पु० | स्त्री० |
|---|---|
| सखि ( म० सखा ) | —सखी ( म० सखी ) |
| पति | —पत्नी, पतिवत्नी ( सधवा स्त्री ). |

२७६. मराठींत कित्येक प्राण्यासंबंधानें व मनुष्यांसंबंधानें पुल्लिंग व तदर्थक स्त्रीलिंग ह्यांचें अगदीं वेगळे वेगळेच शब्द आहेत. ते असेः—

| पु० | स्त्री० | पु० | स्त्री० |
|---|---|---|---|
| पुरुष | स्त्री, बायको | दीर | जाऊ |
| नवरा | बायको, नवरी | बाप | आई |
| वर | वधू | साहेब | साहेबा ( अरबी )<br>मडम ( इंग्रजी ) |
| बैल | गाय | बोकड | शेळी |

| | | | |
|---|---|---|---|
| बोका | भाटी, मांजर, मांजरी | राजा | राणी ( राज्ञी ) |
| | | उंट | सांड, सांडणी |
| पिता | माता | नर | मादी |
| वडील | मातोश्री | + विधुर | विधवा |
| मोर | लांडोर | भाऊ | ×बहीण, भावजय |
| रेडा | म्हैस | * वाघ्या | मुरळी |
| खोंड | कालवड | एडका, मेंढा | मेंढी |
| पुत्र | कन्या | सासरा | सासू इ० |

---

## अध्याय २.

### वचन.

२७७. नामाचे व इतर सर्व विकारी शब्दांचे ठायीं संख्या सुचविण्याचा जो धर्म असतो, त्यास **वचन** असें म्हणतात. मराठींत वचनें **दोन** आहेतः **एकवचन** आणि **अनेकवचन** किंवा **बहुवचन.**

२७८. कोणतेंही नाम जेव्हां एक ही संख्या दाखवितें, म्हणजे त्याजपासून तद्दर्शक अर्थाच्या एकतत्वाचा बोध होतो, तेव्हां त्याचें **एकवचन** असतें किंवा तो शब्द एकवचनीं अथवा एकवचनी आहे असें म्हणतात. जसें:—कुत्रा, घोडा, रंग, रूप, इ०. या शब्दांनी तत्तद्दर्शक एकेक प्राण्याचा, पदार्थाचा, किंवा धर्माचा बोध होतो.

**टीप—मराठींत नामाचे जें मूळ रूप तेंच प्रथमेचें एक वचन; म्हणजे नामाचें मूळ रूप हें प्रथमेच्या एकवचनीं असतें.**

२७९. जेव्हां नामाच्या रूपावरून एकापेक्षां अधिक संख्येचा बोध होतो, म्हणजे त्याजपासून तद्दर्शक अर्थाच्या अनेकत्वाचा बोध होतो, तेव्हां

---

+ विधुर—बायको मेलेला पुरुष; विधवा—नवरा मेलेली बायको.

× भाऊ ह्याचें स्त्रीलिंग भावजय ( भ्रातृजाया—भावाची बायको ) हें ठीकच आहे. परंतु ' भाऊ—बहीण ' या ठिकाणीं भाऊ—पुल्लिंगी भावंड, आणि बहीण—स्त्रीलिंगी भावंड, असा अर्थ आहे.

* वाघ्या—खंडोबास वाहिलेला मुलगा; मुरळी—खंडोबास वाहिलेली मुलगी.

तें रूप त्या नामाचें **अनेकवचन** किंवा **बहुवचन** होय; किंवा तो शब्द अनेकवचनीं किंवा अनेकवचनीं आहे असें म्हणतात. जसें:— कुत्रे, घोडे, भिंती, पेट्या, इ० हीं रूपें मूळ कुत्रा, घोडा, भिंत, पेटी, ह्यांस विकार होऊन झालीं आहेत आणि त्यांनीं तत्तद्दर्शक अनेक प्राण्यांचा व पदार्थांचा बोध होत आहे, हें उघड आहे. म्हणून कुत्रे, घोडे, भिंती, पेट्या, इत्यादिकांस कुत्रा, घोडा, भिंत, पेटी, इत्यादिकांचें अनेकवचन म्हणतात; हेंच प्रथमेचें अनेकवचन होय.

[ कुत्र्यास, कुत्र्यानें, कुत्र्याचा, इ० रूपांवरूनही एकाच कुत्र्याचा बोध होतो, म्हणून हीं रूपेंही एकवचनी आहेत; आणि कुत्र्यांनीं, कुत्र्यांचा, इ० रूपांवरूनही अनेक कुत्र्यांचा बोध होतो, म्हणून हीं रूपेंही अनेकवचनीं आहेत ह्यांत संशय नाहीं. म्हणजे प्रथमा विभक्तीच्याच संबधानें एकवचन व अनेकवचन अशीं वचनें उपलब्ध आहेत व तीं इतर विभक्तींच्या संबंधानें उपलब्ध नाहींत असें नाहीं; तर सर्व विभक्तींचीं दोन्ही वचनीं रूपें होतात हें निर्विवाद आहे. म्हणून 'वचन' या विषयाचा विचार विभक्तीचे विचारापासून भिन्न होऊं नये असें कित्यकांचें म्हणणें आहे. संस्कृत भाषेंत वचनाचा भिन्न विचार नसून विभक्तींबराबरच त्याचा विचार होतो. येथें जातां जातां एक गोष्ट नमूद करून ठेवावी असें वाटतें. ती अशीः संस्कृत, झेंद, अरबी, हिब्रू, ग्रीक, लॅटीन, इ० भाषांत तीन वचनें आहेत. एकवचन, द्विवचन, आणि बहुवचन. द्विवचनापासून दोन या संख्येचा आणि बहुवचनापासून तीन व तिहींपेक्षां अधिक संख्येचा बोध होतो. परंतु एतद्देशीय प्राकृत भाषांमध्यें दोनच वचनें आहेत. एकवचन आणि अनेकवचन किंवा बहुवचन. असो. प्रकृत प्रश्न असा आहे कीं, जर वचन आणि विभक्ति हीं एकमेकांत गुंतलेलीं आहेत, तर संस्कृतांतल्याप्रमाणेंच त्यांचा एकत्र विचार होणेंच रास्त नाहीं काय? या प्रश्नाचें उत्तर इतकेंच कीं शास्त्रीयदृष्ट्या हे म्हणणें ठीक आहे. परंतु शास्त्राबराबर विषयविवेचनाच्या सोईचाही विचार झाला पाहिजे. ह्या सोईच्या दृष्टीनें पाहिलें असतां वचनाचें पृथक् विवेचन करण्याचा जो प्रचार मराठींत पडला आहे, तो जरी कांहींसा अशास्त्रीय वाटला तरी तोच अधिक इष्ट आहे. 'शास्त्रात् रूढिर्बलीयसी' अशी म्हणही आहे. तथापि अशी रूढि तरी कां पडावी आणि तीच मान्य कां व्हावी म्हणजे त्या रूढातच अशी कोणती विशेष सोय आहे कीं, जिच्या योगें तिची इष्टता शास्त्रीय रीतीपेक्षां अधिक श्रेष्ठ वाटावी? ह्या प्रश्नाचें थोडक्यांत उत्तर असें. संस्कृतादि भाषांत प्रातिपदिक हें प्रथमेच्या एकवचनी रूपाहून भिन्न आहे. किंवा शब्दपर्यायानें त्या भाषांत प्रथमेच्या एकवचनींही प्रत्यय लागतात; मग त्यांच्या द्विवचनीं व बहुवचनीं प्रत्यय आहेत हें सांगावयासच नको.

परंतु मराठी, गुजराथी, इंग्रजी, इत्यादि भाषांत प्रथमेच्या एकवचनीं प्रत्यय नाहींत, म्हणजे शब्दाचें जें मूळ रूप तेंच प्रथमेचें एकवचन होय. आणि प्रथमोत्तर विभक्तींचे प्रत्यय नामांस लागतांना त्या नामांच्या रूपामध्यें जो एका प्रकारचा विशेष फरक होतो, ज्यास विभक्तीकार्य किंवा सामान्यरूप असें म्हणतात, तें प्रथमेच्या अनेकवचनीं निरुपयोगी ठरतें. उदाहरणार्थ, घोडा या शब्दाचें 'घोड्या' हें सामान्यरूप आहे असें सांगितलें कीं, प्रथमोत्तर विभक्तींचे प्रत्यय घोडा या शब्दास लावण्यास कांहीं अडचण उरली नाहीं परंतु घोडा याचें सामान्यरूप घोड्या हें होय असें जरी कळलें तरी घोडा ह्याचें प्रथमेचें अनेकवचनीं रूप साधण्यास त्याची कांहींच मदत होत नाहीं. म्हणून सर्व विभक्तींबरोबरच प्रथमेचा म्हणजेच प्रथमेच्या अनेकवचनाचा विचार करावयाचा—कारण कीं, प्रथमेचें एकवचन हें नामाचें मूळ रूपच होय, तेव्हां त्याचा निराळा विचार नकोच—असें जरी ठरविलें, तरी प्रथमेच्या अनेकवचनाचा विचार इतर विभक्तींचे अनेकवचनांहूनही भिन्नपणें करणें मराठींत अवश्य आहे. याकरितां सर्वच प्रथमा विभक्ति स्वतंत्र घेऊन तिचा वचन या सदराखालीं अलग विचार करणें अधिक सोईवार व म्हणून अधिक इष्ट आहे. अर्थात् वचन या सदराखालीं नामाच्या मूळ रूपापासून म्हणजेच प्रथमेच्या एकवचनापासून प्रथमेचेंच अनेकवचन कसें साधतें हें दाखविण्यांत येतें. ह्या ठिकाणीं इतर विभक्तींच्या एकवचनाशीं काय, कीं अनेकवचनाशीं काय, आपला मुदलींच संबंध नाहीं.

अनेकवचन व बहुवचन ह्या दोन शब्दांसंबंधानें एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. बहुवचन ही संज्ञा मूळ म्हणजे संस्कृत व्याकरणांतील आहे. अनेकवचन ही संज्ञा संस्कृत व्याकरणांत आढळत नाहीं. यामुळें मूळ संस्कृताभिमानी मुंजीकर ह्यांचा मराठी वैयाकरणांवर, बहुवचन ही संज्ञा बाजूस सारून अनेकवचन या संज्ञेस बहुमान दिल्यानें, थोडासा रोष आहे. तथापि मराठीमध्यें द्विवचन नसल्यानुळें बहुवचन या संज्ञेपेक्षां अनेकवचन हीच संज्ञा आमच्या मतें अधिक अन्वर्थक आहे. हें एक; आणि अनेकवचन ही संज्ञा आतां अत्यंत रूढ झाली आहे हें दुसरें. यामुळें अनेकवचन या संज्ञेस बहिष्कार घालण्याचें आतां कांहीं कारण उरलें आहे असें दिसत नाहीं. एवंच अनेकवचन व बहुवचन ह्यांपैकीं कोणती वाटेल ती संज्ञा वक्त्याचे व लेखकाचे मर्जीप्रमाणें योजण्यास कोणतीच हरकत दिसत नाहीं. ]

२८०. आतां प्रथम मराठी भाषेंत प्रत्येक लिंगीं कोण कोणत्या स्वरान्त नामें आहेत आणि कोणकोणत्या स्वरान्त नामें नाहींत आणि त्यांचीं अनेकवचनें कोणत्या स्वरान्त होतात, हें एका कोष्टकांत दाखवून नंतर अनेकवचनी रूपांच्या विकरणाचें सविस्तर विवेचन हातीं घेऊं.

## नामें व त्यांचे अनेकवचनी विकार दाखविणारें कोष्टक.

| अन्त्य स्वर. | अनेकवचनाचे अन्त्य स्वर. | | |
|---|---|---|---|
| | पुल्लिंग. | स्त्रीलिंग. | नपुंसकलिंग. |
| अ | अ | आ, ई, किंवा दोन्ही | एं |
| आ | ए | आ | ( शब्द नाहीं ) |
| इ | इ | इ | इं |
| ई | ई | आ | एं |
| उ | उ | उ | उं |
| ऊ | ऊ | आ | एं |
| ऋ, ऌ | ( श. ना. ) | ( श. ना. ) | ( श. ना. ) |
| ए | ( श. ना. ) | आ | ईं |
| ऐ | ( श. ना. ) | आ | ( श. ना. ) |
| ओ | ओ | आ | ( श. ना. ) |
| औ | औ | ( श. ना. ) | ( श. ना. ) |

टीप—व्यंजनान्त नामें मराठांत प्रायः नाहींतच म्हटलें तरी चालेल.

२८१. वरील कोष्टकावरून पुल्लिंग नामांच्या अनेकवचनासंबंधानें असें दिसून येईल कीं, एका आकारान्ताशिवाय इतर अन्तांच्या सर्व पुल्लिंगी शब्दांचें अनेकवचन आणि एकवचन सारखेंच. अर्थात् पुल्लिंगामध्यें फक्त आकारान्त शब्दांचें अनेकवचन एकवचनाहून भिन्न आहे.

२८२. आकारान्त पुल्लिंगी नामांचें अनेकवचन एकारान्त होतें. म्हणजें त्यांस अनेकवचनीं ए हा प्रत्यय पररूपसंधीनें लागतो जसें:— घोडा + ए = घोडे, मुलगा + ए = मुलगे; आणखी उदाहरणें:—

| ए० व० | अ० व० | ए० व० | अ० व० |
|---|---|---|---|
| आंबा | आंबे | पिता | पितें |
| रस्ता | रस्ते | आत्मा | आत्मे |
| कोल्हा | कोल्हे | चंद्रमा | चंद्रमे |
| इ० | | इ० | |

**अपवाद १**——प्रतिष्ठावाचक म्हणजे बहुमानार्थी योजण्यांत येणारीं आकारान्त पुल्लिंगी नामें अनेकवचनीं अविकृतच राहतात. जसें:——दादा, दादा, अण्णा—अण्णा, आणखी उदाहरणें:——नाना, बाबा, आपा, तात्या, आबा, काका, मामा, इ०

**प्रत्यपवाद**——यांपैकीं काका, मामा, हे शब्द बहुमानार्थी येतात. परंतु ते मूळचे नातें दाखविणारे आहेत. नातें दाखविणाऱ्या आकारान्त पुल्लिंगी इतर सर्व शब्दांचें अनेकवचन नियमाप्रमाणेंच एकारान्त होतें. जसें:——चुलता—चुलते, आजा-आजे, मेहुणा—मेहुणे, साळा—साळे, भाचा—भाचे, इ०

औपरोधिक किंवा अधिक्षेपव्यंजक भाषणामध्यें अपवादक शब्दांचें कधीं कधीं नियमाप्रमाणें एकारान्त अनेकवचन होतें. जसें:——तुमचे **बापदादे** कधीं घोड्यावर बसले होते का? तुमचे **काके मामे** कोणी येणार आहेत वाटतें तुम्हांस हात लावायला? हे कोण बायकोचे **मामे** घरांत हिंडती रिकामे; इ०

टीप——'बापदादे' या शब्दावरून एक गोष्ट सुचते. तिनें या सामासिक शब्दाचाहि खुलासा होईल; म्हणजे 'बाप' ह्याचे पुढें 'दादा' हाच शब्द का जोडण्यांत आला हें नीट समजेल. हिंदीमध्ये दादा—दादी, नाना—नानी ह्यांचा अनुक्रम आजा—आजी, पणजा—पणजी, असा अर्थ आहे; परंतु हा अर्थ मराठींत नाहींसा झाला आहे. तथापि 'बापदादे' या ठिकाणीं 'दादा' शब्द त्याच हिंदी अर्थानें योजिलेला आहे हें उघड आहे.

**अपवाद २**——आजोबा, दाजीबा, देवबा, घेवबा होयबा, आयतोबा, हणगोबा. इ० **बा** प्रत्ययान्त अल्पप्रतिष्ठा अतिपरिचय व कधीं कधीं अनादरही दाखविणारे शब्द अनेकवचनीं अविकृतच राहतात.

**अपवाद ३**——आकारान्त पुल्लिंगी विशेषनामें उभयवचनीं समान असतात. जसें:——रामा, कृष्णा, गोविंदा, इत्यादि. विशेषनामांचें अनेकवचन करण्याचा प्रसंग अर्थात् क्वचितच येतो.

**प्रत्यपवाद**——परंतु विशेष नामांचीं कुत्सितार्थद्योतक किंवा 'अतिपरिचयादवज्ञा' द्योतक जीं याकारान्त रूपें होतात त्यांचें अनेकवचन नियमाप्रमाणेंच एकारान्त होतें. जसें:——गोंद्या—गोंद्ये, राम्या-राम्ये कृष्ण्या-कृष्ण्ये, नाऱ्या—नाऱ्ये, जग्या—जग्ये, इ०.

**अपवाद ४**---सोमपा, शंखध्मा, धुम्रपा, इत्यादि अप्रसिद्ध आकारान्त पुल्लिंगी संस्कृत शब्दांचें अनेकवचन तेंच.

**प्रत्यपवाद**---परंतु आत्मा, राजा, महिमा, इत्यादि मूळचे व्यजनान्त संस्कृत शब्द जे मराठींत आकारान्त झाले आहेत, त्यांचें अनेकवचन नियमाप्रमाणेंच एकारान्त होतें. जसें:---आत्मा-आत्मे, राजा-राजे, महिमा--महिमे, ब्रह्मा-ब्रह्मे, इ०

गुंजीकर म्हणतात कीं, 'ब्रह्मा' शब्दाचें अनेकवचन 'यज्ञकर्मामध्यें मात्र; ब्रह्मा हेंच.'

( अ ) देशपांडया, वाघमाऱ्या, भाट्या, इ० याकारान्त जोडाक्षर ज्यांचे शेवटीं आहे, अशा आकारान्त शब्दांचें अनेकवचन नियमाप्रमाणें एकारान्तच होतें. परंतु तें यकारयुक्त व यकाररहित अशा दोन प्रकारचें होतें. ह्यांपैकीं यकाररहित साध्या रूपाकडेच शिष्टकल अधिक आहे.

| ए० व० | अ० व० |
|---|---|
| देशपांडया | देशपांडये, देशपांडे |
| वाघमाऱ्या | वाघमाऱ्ये, वाघमारे |
| भाट्या | भाट्ये, भाटे |
| धाम्या | धाम्ये, धामे |
| आगलाव्या | आगलाव्ये, आगलावे |
| इ० | इ० |

[ या शब्दांसंबंधानें दादोबा म्हणतात:---संयोगपूर्वक आकारान्त पुंलिंग शब्दाच्या शेवटील यचा लोप करून अनेकवचनीं ए आदेश करून लिहिण्याचा प्रचार आढळतो. परंतु ही शुद्ध रीति नव्हे' आणि आपल्या मतें एक दोन सबळ कारणें दाखवून दादोबा म्हणतात कीं यकारयुक्तच रूपें विशेष ग्राह्य होत. दादोबांसारख्या मराठी वैयाकरणांचें जेथें तेथें चुकतें तें हेंच. जर यकाररहित रूपांचाच 'प्रचार फार आढळतो' तर त्यांस अशुद्ध म्हणण्याचा वैयकरणांस काय अधिकार आहे ? 'प्रयोगशरणाः वैयाकरणाः हें आमचें वैयाकरण अगदीं कसें विसरून जातात नकळे ! तेव्हां वैयाकरणांचें काम इतकेंच कीं शिष्टप्रचाराची नोंद करून स्वस्थ बसावयाचें. अर्थात् वादविषयक शब्दांची अनेकवचनीं दोन दोन रूपें होतातः एक यकारयुक्त, व दुसरें यकाररहित. ह्यांपैकीं यकाररहित साध्या रूपांकडे-सच दिवसेंदिवस शिष्टप्रवृत्ति अधिकाधिक दिसते इतकें सांगितलें म्हणजे पुरें. ]

कधीं आढळलीं, तरी तीं विशेष शिष्टसंमत नाहींत. या अंकांतील व मागल्या अंकांतील शब्दांच्या रूपांतील हा फरक स्मरणीय आहे.

**अपवाद्**--चाळीस, पापीण, जोशीण, गांधील, वारूळ ह्या शब्दांचीं ऱ्हस्व इकार व ऱ्हस्व उकार यांनींच युक्त असणारीं रूपें होतात; अकारयुक्त रूपें होत नाहींत. जसें:- चाळिसांस, पापिणीस, जोशिणीनें, गांधिलीस, वारुळास अशींच रूपें होतात. चाळसांस, पापणीस (हें 'पापणी' या शब्दाचें रूप होईल 'पापीण' ह्यांचें नव्हे) जोशणीस, गांधलीस, वारळास, अशीं रूपें होत नाहींत, उघड आहे.

**प्रत्यपवाद**--तथापि 'चाळीस' शब्दापासून उपनेत्रवाचक चाळिशी, चाळशी अशीं दोन रूपें होतात.

३०३. **ईण** प्रत्ययान्त चार किंवा चारांपेक्षां अधिक अक्षरी स्त्रीलिंगी शब्दांमध्यें उपान्त्याक्षरांतील ई ऱ्हस्व होते; किंवा तिचे जागीं **अ** हा आदेश होतो, उदाहरणें:--

| पु० | स्त्री० | स्त्रीलिंगी विकृतरूप |
|---|---|---|
| परीट | परिटीण | परिटिणी, परिटणी |
| | परटीण | परटिणी, परटणी |
| बुरूड | बुरुडीण | बुरुडिणीस, बुरुडणीस |
| | बुरडीण | बुरडिणीस, बुरडणीस |
| कुंभार | कुंभारीण | कुंभारिणीस, कुंभारणीस |

याचप्रमाणें सुतारीण, सोनारीण, कांसारीण, कलालीण, मराठीण, तांबोळीण, चांभारीण, भडभुंजीण, कळवंतीण, पुणेकरीण, गोंवेकरीण, मुसलमाणीन इ० शब्दांचीं विकृत रूपें जाणावीं.

**अपवाद्**--परभीण, कुळंबीण, ब्राह्मणीण, शेणवीण, ह्यांच्या उपान्त्याक्षरांतील दीर्घ ई फक्त ऱ्हस्व होते; तिला अकारादेश झालेलें या शब्दांचें रूप होत नाहीं. जसें:--परभीण-परभिणीस; कुळंबीण-कुळंबिणी, कुळंबिणीस, इ०

३०४. चार किंवा चारांपेक्षां अधिक अक्षरी अपूर्णोच्चारित अकारान्त शब्दांच्या उपान्त्याक्षरांतील ई आणि ऊ हे स्वर ऱ्हस्वच होतात; म्हणजे यांस अकारादेश होत नाहीं. जसें:--रजपूत-रजपुतास, समजूत-

समजुतीस, इ०. असेच आणखी शब्दः—जाचणूक, तसबीर, मुरकूट, चुंगरूट, उघडीक, सोयरीक, पावदूक, तजवीज, खरबूज, काकळूत, घरकूल, फटकूर, धुमाकूळ, इ०.

**अपवाद**—कोथिंबीर, कोशिंबीर, इटकूर, कुचरूड, ह्या शब्दांच्या उपान्त्याक्षरांतील, **ई** व **ऊ** हे ऱ्हस्व होतात किंवा त्यांचे जागीं विकल्पें-करून अकारादेशही होतो. जसें:—

| मू० श० | वि० रूप. |
|---|---|
| कोथिंबीर | कोथिंबिरी, कोथिंबरी, कोथिंबिरीस, कोथिंबरीस |
| इटकूर | इटकुरें, इटकरें, इटकुरास, इटकरास |
| इ० | इ० |

२०५. अर्धोच्चरित **अकारान्त** तीन अक्षरी किंवा अधिकाक्षरी शब्दांमध्यें उपान्त्य अक्षर केवळ **ई** किंवा **ऊ** असेल ( म्हणजे व्यंजनाशिवाय हे स्वरच उपान्त्याक्षरांचे जागीं असतील) तर अन्त्य अकाराचे जागीं दीर्घ स्वर येत असतां उपान्त्याक्षरस्थानीय स्वर ऱ्हस्व होतात किंवा त्यांचे जागीं अनुक्रमें **य** आणि **व** असे आदेश होतात. उदाहरणें:—

सुईण—सुइणी, सुयणी. देऊळ—देउळें, देवळें

कुइट—कुइटें, कुयटें. पाऊल—पाउलें, पावलें

ताईत—ताइतास, तायतास. दऊत—दउतीस, दवतीस

अशाच प्रकारचे आणखी शब्द—काईल, अईन, कवाईत, पंचाईत, चाईल, आईस, शाईर, बिछाईत, कऊल, आऊत, शिऊळ, पाऊस, इ०.

२०६. जे संस्कृत शब्द अद्यापि मराठी भाषेच्या पूर्ण परिचयाचे झाले नाहींत, म्हणजे जे अद्यापि थोडेसे परकीय आहेत असें म्हटलें तरी चालेल, त्यांस उपान्त्याक्षरांतील स्वरविकाराचे वरील नियम लागू नाहींत. कारण उघडच आहे कीं, अपूर्णोच्चारित अन्त्य **अ** फक्त मराठी आहे, संस्कृत नाहीं; म्हणजे या जराशा परकी संस्कृत शब्दांतील अन्त्य **अ** पूर्णोच्चरित आहे. उदाहरणें:—

| मू० श० | रूप | मू० श० | विकृत रूप. |
|---|---|---|---|
| गीत | गीतें | शरीर | शरीरें, शरीरानें |
| मयूर | मयूरानें | जीव | जीवाचा |

| | | | |
|---|---|---|---|
| दीन | दीनास | रूप | रूपें, रूपाला |
| गोधूम | गोधूमास | शील | शीलें, शीलास |
| शूर | शूरानें | नीर | नीरें, नीराचा |

अशाच प्रकारचे आणखी शब्दः—कूप, कीट, कील, कूट, भूप, जंबीर, किरीट, मयूख, केयूर, करवीर, वीर, इ०.

**टीप—या शब्दांचीं मागल्या मराठी नियमांस अनुसरूनही कोणी मयुरानें, जिवाचा, शिलास, इ० विकृत रूपें करील; म्हणजे या अंकांतील शब्दांसही मागचे नियम लागू पडतात असें म्हणेल. अर्थात् या शब्दांच्या रूपांबद्दल थोडासा मतभेद होण्याचा संभव आहे. परंतु अमुक एक शब्द पूर्णपणें मराठी झाला किंवा नाहीं हें निश्चयपूर्वक ठरविण्याचें साधन जोंपर्यंत उपलब्ध नाहीं, तोंपर्यंत अशा शब्दांच्या रूपांबद्दल थोडासा मतभेद राहणार. एवंच हा मतभेद अपरिहार्य होय. परंतु जेव्हां एखादा शब्द पूर्णपणे मराठी झाला म्हणजे मराठांत अगदा रुळून गेला असें होईल, तेव्हां त्यांचीं विकृत रूपें मागील नियमांप्रमाणें होण्यास हरकत नाहीं.**

३०७. फारसी वगैरे यावनी भाषांतून जे अकारान्त शब्द मराठींत आले आहेत त्यांच्याही उपान्त्याक्षरांतील ई व ऊ हे बहुधा दीर्घच राहतात; तरी असे शब्द दिवसेंदिवस अधिकाधिक परिचित होत असल्यामुळें त्यांच्या उपान्त्याक्षरांतील हे स्वर ऱ्हस्व करण्याकडेही मराठी भाषेची प्रवृत्ति होत चालली आहे. उदाहरणें:—

| मू० श०. | वि० रू०. |
|---|---|
| फकीर | फकीरास, फकिरास, फकीरीण, फकिरीण |
| अमीर | अमीराचा, अमिराचा, अमीरीण, अमिरीण |

अशाच प्रकारचे आणखी शब्द—खलीप, वकील, मुनीम, हकीम, जामीन, फडनीस, चिटनीस, वांकनीस, नकलनवीस, इ०.

३०८. परंतु कित्येक यावनी शब्द मराठी भाषेंत अगदीं रुळुन गेले आहेत; म्हणजे ते परकी आहेत असें सुद्धां वाटत नाहीं. त्यांच्या उपन्त्याक्षरांतील ई व ऊ हे नेहमीं ऱ्हस्व होतात. परंतु त्यांस अकरादेश कधींच होत नाहीं. उदाहरणें:—

जमीन —जमिनी, जमिनीस
अफीण—अफिणी, अफिणीस
बंदूक —बंदुकी, बंदुकीचा

अशाच प्रकारचे आणखी शब्दः—अफीम, तक्षीम, जंजीर, खंजीर, अंजीर, संदूक, इ०.

## अन्त्याक्षरविकार.

३०९. मराठी भाषेंत अन्त्याक्षरांतील **स्** ह्या व्यंजनाचे पुढें **ई** हा **स्वर** आला असतां त्या स्‌चा **श्** होतो. जसें:—असा—अशी, कसा—कशीं, कांसे—कांशीं. शिसें—शिशी, उसें—उशीं, इ०.

३१०. तसेंच अशा शब्दांच्या विकृत रूपांमध्यें नियमाप्रमाणें ज्या ठिकाणीं **स्या** किंवा **श्या** हें अक्षर यावयाचें, तेव्हां त्या अक्षरांचे जागीं बहुधा फक्त **शा** हा आदेश होतो. जसें:—अशास, अशांनीं, कांशाचा, शिशाची, उशाशीं, मिशी—मिशा, माशी—माशा, इत्यादि. कधीं कधीं मिश्या, माश्या, कांश्याचा अशीही रूपें लिहिलेलीं आढळतात; तरी हा प्रकार आतां बहुतेक लोपतच चालला आहे.

३११. अन्त्य **से**चे जागी **शे** करण्याकडे कित्येकांच्या भाषणाचा कल दिसतो. जसें:—ससे—सशे, पैसे—पैशे, मासे—माशे, इ०. परंतु हा **आदेश सर्वत्र दिसत नाहीं** आणि **शिष्टसंमत आहे असेंही वाटत नाहीं.** कारण कीं असे, कसे, आरसे, खिसे, ह्यांचे जागीं अशे, कशे, आरशे, खिशे असे उच्चार शिष्टभाषणांत कोठेंच ऐकूं येत नाहींत; आणि सशे, माशे, पैशे इ० जे कांहीं थोडेसे शब्द प्रकृत आदेशाने युक्त असे कधीं कधीं कांहीं लोकांचे बोलण्यांत ऐकूं येतात, ते तसे म्हणजे **शे**नें युक्त लिहिलेले सहसा आढळत नाहींत. अत एव **से**च्या जागीं **शे** योजणें हें शिष्टजनमान्य नाहीं असेंच म्हटलें पाहिजे.

टीप—दादाबा म्हणतात कीं, स्‌कारापुढें ई हा स्वर आला असतां विकल्पें श् होतो. जसें:—खसखसी—खसखशी, घुसी—घुशी, इ०. परंतु असा जरी कदाचित् दादोबांचेवेळीं वैकल्पिक प्रचार असला तरी अलीकडे ईच्यापूर्वीं श्‌काराचाच प्रचार फार आहे, तो इतका कीं खसखसी, घुसी, अशीं स्‌कारयुक्त रूपें शिष्टप्रचारांतून बहुतक अन्तर्धान पावल्यासारखींच आहेत.

# अध्याय ३.

## विभक्ति.

३१२. नामांस व सर्वनामांस जे विकार झाल्यानें त्यांचा वाक्यांतील इतर शब्दांशीं असलेला संबंध समजतो त्या विकारांच्या भिन्न भिन्न जातींस **विभक्ति** असें म्हणतात. उदा०:-त्याने हें उदाहरण खडूनें फळ्यावर लिहून ठेविलें आहे; त्याचा हात दुखत आहे; जो एका डोळ्यानें आंधळा आहे त्यास बोलाव; इ०. पहिल्या वाक्यांत त्यानें आणि खडूनें हीं विभक्त्यन्त शब्दांचीं उदाहरणें आहेत आणि त्यांचा 'लिहून ठेविलें आहे' ह्या शब्दांशीं जो संबंध आहे, तो त्यांच्या विभक्तिरूपानें कळत आहे. तसेंच दुसऱ्या उदाहरणांत **त्याचा** ह्या शब्दाचा 'हात' या शब्दाशीं जो संबंध आहे, तो त्याचा ह्या षष्ठयन्त रूपानें कळतो; आणि तिसऱ्या उदाहरणांतील **डोळ्यानें** ह्या शब्दाचा संबंध 'आंधळा' या शब्दाकडे आणि **त्यास** ह्याचा 'बोलाव' शीं आहे, हें डोळा आणि तो ह्यांस जे विभक्तिविकार झाले आहेत, त्यांच्या योगानें समजतें. म्हणून त्यानें, उदाहरण, खडूनें, त्याचा, हात, डोळ्यानें, त्यास, इत्यादि हीं सर्व विभक्तींचीं उदाहरणें होत. ह्या उदाहरणांत नें, चा, स, अशीं जीं कांहीं विभक्तिद्योतक अक्षरें नामांस जोडलेलीं दिसत आहेल, त्यांस **प्रत्यय** म्हणतात. आणि हे प्रत्यय लागून झालेल्या रूपांस विभक्ति किंवा विभक्त्यन्त असें म्हणण्याची चाल आहे.

[ दादोबा, गोडबोले, जोशी, इत्यादिकांच्या विभक्तीच्या व्याख्या अक्षरशः देऊन जागा अडवीत नाहीं. त्यांच्या व्याख्येंतील मुख्य दोष असा कीं, त्यांनीं विभक्तीची व्याख्या कारकावरून केली आहे. कारकद्वारा विभक्तीची व्याख्या प्रथम दादोबांनीं केली, परंतु कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं तिजवर आक्षेप न घेतां इतकेंच म्हटलें कीं, ह्या व्याख्येप्रमाणेंही षष्ठीला विभक्ती म्हणतां यावयाचें नाहीं. शास्त्रीबोवांचा मुद्दा इतकाच कीं, मराठींतील षष्ठी ही विभक्ती नव्हे; तर **चा** ह्या प्रत्यय मूळ विशेषणप्रत्ययापासून निघाला असल्यामुळें **चा** प्रत्ययान्त नामास विशेषण म्हणावें. यामुळें दादोबांची व्याख्या त्यांच्या पथ्यावरच पडली म्हणावयाची. म्हणून त्यांनीं त्यांच्या विभक्तीचे व्याख्येवर कांहींच टीका केलेली दिसत नाहीं. एरवीं शास्त्रीबोवांसारख्यांच्या लक्षांतून हा मुद्दा निसटून जाण्यासारखा नव्हे. त्यांनीं फक्त इतकेंच दाखविलें कीं, **चा** प्रत्ययान्त नाम वास्तविक विशेषण असून, दादोबांचे विभक्तीच्या व्याख्येप्रमाणेंही त्यास विभक्ति म्हणतां येत नाहीं.

शास्त्रिद्वयानें द्वितीया विभक्ति मराठींत नाहीं असें दाखविलें आहे. तिचे वेगळे प्रत्यय नसल्यामुळें तिला विभक्तिमध्यें वेगळें स्थान देणें ठीक नाहीं. दादोबा म्हणतात, कीं, जरी तिला वेगळे प्रत्यय नाहींत तरी स, ला, तें, इत्यादि प्रत्ययांनां दोन अर्थ असल्यामुळें त्यांस जेव्हां कर्माचा अर्थ असेल तेव्हां ते द्वितीया विभक्तिचे समजावे, आणि जेव्हां ते संप्रदानार्थी असतील तेव्हां तदन्त शब्दांची चतुर्थी करावी. गोडबोले व चिपळूणकर या शास्त्रीबोवांनीं सांगितल्याप्रमाणें प्राकृतींत चतुर्थी विभक्ति नाहीं तर तिचें कार्य षष्ठीच्या प्रत्ययानीं होतें. आणि स्य, नां, ह्या षष्ठीचे प्रत्ययांपासून स, ना, हे प्रत्यय आले आहेत; तेव्हां या प्रत्ययांस चतुर्थीचेच प्रत्यय म्हणणें बरें-ह्याप्रमाणें त्यानीं द्वितीयेस स्वतंत्र अस्थित्व नाहीं असें सांगितलें. जोशी हे साधारपणें चिपळूणकर शास्त्रीबोवांचे अनुयायी आहेत. तरी त्यांनीं द्वितीयेस चतुर्थीपासून अलग व स्वतंत्र स्थान कसें दिलें असेल तें असो. जोशीबोवा हे पदच्युत केलेल्या द्वितीयेला स्वस्थानापन्न करूनच थांबले नाहींत, तर त्यांनीं द्वितीयेचे सप्रत्यय द्वितीया आणि अप्रत्यय द्वितीया असे दोन प्रकार मानून पूर्वीच्या घोंटाळ्यांत अधिक भर घातली आहे. म्हणजे पूर्वी द्वितीया व चतुर्थी ह्यांचाच काय तो घोंटाळा होता, तो जोशीबोवांनीं काईम करून शिवाय द्वितीया आणि प्रथमा यांमधील घोंटाळा नवीन उत्पन्न केला आहे. पण इतक्यानेंच झालें नाहीं. याशिवाय त्यानीं आणखी काय नवीन प्रकार केला आहे तो पहा! एकदां ते म्हणतात कीं, 'सकर्मक क्रियापद असतां वाक्यांत जो शब्द त्या क्रियापदाचें कर्म असतो तो द्वितीयान्त असतो (क० ५१५). या नियमाप्रणें 'तो काम करितो,' 'त्यानें काम केलें,' या दोन वाक्यांत कर ही सकर्मक क्रिया आहे; आणि या दोन्ही वाक्यांत 'करितो' आणि 'केलें' ह्या क्रियापदाचें 'काम' हें कर्म आहे, या गोष्टी निर्विवाद आहेत. तेव्हां या दोन्ही वाक्यांत 'काम' हा शब्द जोशीबोवांचे वरील नियमाप्रमाणें द्वितीयान्त होत नाहीं काय? मात्र फार तर त्यांच्या मतें या शब्दाची या दोन्ही वाक्यांत अप्रत्यय द्वितीया आहे. आतां प्रयोगप्रकरणांत ते काय म्हणतात तें पहा. 'कर्मणी प्रयोगांत कर्तृपद तृतीयान्त असून कर्मपद प्रथमान्त असतें' (कलम ४७८); आणि कर्ता म्हणजे वाक्यांत क्रियापद ज्या शब्दांप्रमाणें असतें तो शब्द, (क० ४८८). या नियमाप्रमाणें 'त्यानें काम केलें' या वाक्यांत कर्मणि प्रयोग असल्यामुळें 'काम' हें कर्मपद प्रथमान्त समजावयाचें आणि क्रियापद त्या शब्दांप्रमाणें आहे म्हणून तो कर्ता होय. खेर ह्यांची व्यवस्था अशीच. मात्र 'काम' ह्यास ते जोशीबोवांप्रमाणें 'कर्ता' असें न म्हणतां प्रथमान्तनाम असें म्हणतात. एवंच या दोघांच्या व्यवस्थेप्रमाणें किंवा अव्यवस्थेप्रमाणें, 'त्यानें काम केलें' या वाक्यांतील काम शब्दाची प्रथमा व अप्रत्यय द्वितीया मानावी लागते. 'परंतु थोडी संवय झाल्यावर हा प्रकार उलट सोपा व सोईचा वाटूं लागेल' असें जोशीबोवा आपणांस आश्वासन देत असून

खेर यांनीं त्यांचे हातास हात लाविला आहे. ‘ थोडी संवय झाल्यावर ’ विषसुद्धां पचनीं पडूं लागतें मग या निरुपद्रवी व्याकरणानें ‘ थोडी संवय झाल्यावर ’ कोणासही धक्का पोंचणार नाहीं हें निर्विवाद आहे. आणि ‘ पारिभाषिक शब्दांची सर्व लक्षणें व व्याख्या निर्दोष करण्याचा सक्त प्रयत्न केला आहे ’ असें जरी प्रौढबोध व्याकरणाचे द्वितीयावृत्तींत जोशीबोवा वाचकांस निक्षून सांगत आहेत, तरी अशास्त्रीयता संदिग्धता, शिथिलता, अपूर्णता, असावधानता, इत्यादि अवगुणांची त्यांस ‘ थोडी संवय ’ झालेली दिसत असल्यामुळें त्यांच्या व खेरांचे व्याकरणांत वरील प्रकारचे सर्व दोष पदोपदीं कसे दिसून येतात, याचा मासला या ग्रंथांत अनेक ठिकाणीं देण्यांत आलाच आहे. थोडासा मासला येथल्या येथच पहा. ‘ पारिभाषिक शब्दांचि लक्षणें व व्याख्या ’ या ठिकाणच्या ‘ व ’ या शब्दाची येथें काय योग्यता आहे हें त्यांचें त्यांसच ठाऊक ! असो. तात्पर्य, विभक्ति प्रकरणाच्या सर्व विवेचनामध्यें मराठी व्याकरणकारांनी जो घोंटाळा उत्पन्न केला आहे, तो भाषेचा किंवा दुसऱ्या कोणाचा दोष नसून त्यांचा स्वतःचाच आहे, असें पुढील विवेचनावरून वाचकांचे नजरेस आल्यावांचून राहणार नाहीं. तथापि द्वितीया व षष्ठी या गाळल्यानंतर सप्तमीस पंचमी, आणि द्वितीया पुन्हा स्वस्थानाधिष्ठित झाल्यावर सप्तमीस पुन्हा षष्ठी अशी संज्ञा करून, म्हणजे एकाची जी सप्तमी ती दुसऱ्याची पंचमी आणि तिसऱ्याची षष्ठी अशा प्रकारें ते आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ खेळले नाहींत, हें तरी मराठी भाषेचें त्यांतल्या त्यांत सुदैवच समजलें पाहिजे.

‘ जर संस्कृत आणि प्राकृत व्यकरणांचा मूळ शाखासंबंध नसता, आणि तो संबंध ठेवणें इष्ट नसतें तर चतुर्थीस केव्हांच काढून टाकून संबोधनासुद्धां सातच विभक्ति मानिल्या असत्या. परंतु तसें करणें प्रशस्त दिसत नाहीं, कारण त्यांत लाभापेक्षां हानि अधिक होते. ’ असें दादोबांनीं म्हटलें आहे. यामध्यें चतुर्थीस काढून टाकण्याचा त्यांचा कल मात्र अयोग्य होय. कारण कीं, स, नां, इत्यादि प्रत्यय षष्ठीपासून निघाले असल्यामुळें आणि प्राकृत भाषेच्या व्याकरणांत चतुर्थीचे जागीं षष्ठीचाच उपयोग होत असल्यामुळें, ह्या प्रत्ययांस शास्त्रिद्वयानें दिलेलें चतुर्थी हेंच नांव द्वितीयेपेक्षां अधिक शोभतें असें व्याकरणाचे इतिहासाच्या दृष्टीनें आमचें मत आहे. तथापि वरील उताऱ्यांत दादोबांनीं ध्वनित केलेलें तत्त्व मात्र निराबाध आहे. मराठी व्याकरणाचा संस्कृत व्याकरणाशीं जो संबंध आहे तो तोडितां कामा नये. ह्याच तत्त्वास अनुसरून विभक्तिच्या वादग्रस्त प्रश्नांचा एकंदर उलगडा झाला पाहिजे. म्हणजे व्याकरणाची व भाषेची पूर्वपरंपरा नीट ध्यानांत धरूनच जर ह्या प्रश्नाचा यथायोग्य ऊहापोह होईल तरच त्याचा समाधानकारक निकाल लागेल. तेव्हां आतां त्या दृष्टीनें या प्रश्नाकडे पाहूं या. ( या प्रश्नाचा बराचसा खल मार्मिक भाषाभिज्ञ गुंजीकर ह्यांनीं सरासरी वीस वर्षांपूर्वी विविधज्ञानविस्तारामध्यें जोशीबोवांच्या प्रौढबोध

व्याकरणाची प्रथमावृत्ति प्रसिद्ध झाल्यावर त्याच्या परीक्षणाचे निमित्तानें मराठी व्याकरणावर जे आठ निबंध लिहून प्रसिद्ध केले, त्यांमध्यें सविस्तर आलेला आहे. तो जिज्ञासूंनीं अवश्य पहावा.)

या प्रश्नासंबंधानें विभक्तीच्या व्याख्येचा मुद्दा फारसा महत्त्वाचा नाहीं. व्याकरणामध्यें विभक्तीचें स्थान काय व विभक्तींचा व्याकरणाच्या इतर भागांशीं परस्परसंबंध काय हा काय तो मुख्य मुद्दा आहे. या मुद्याचें महत्त्व व रहस्य नीट न कळल्यामुळें विभक्तींचें विवेचन कोणाच्याही हातून योग्य रीतीनें पार पडलें नाहीं. आणि ह्यामुळेंच विभक्ति प्रत्ययांवरून मानावयाच्या कीं अर्थावरून मानावयाच्या, हा प्रश्न त्यांजपुढें उभा राहून त्याचें एकानेंही समाधानकारक उत्तर दिलेलें दिसत नाहीं. इतकेंच नव्हे तर अद्यापही या प्रश्नासंबंधानें जे लेख मासिक पुस्तकांतून वगैरे प्रसिद्ध होत आहेत, त्यांवरूनही या प्रश्नाचा निकाल कांहीं अंशीं तरी सुलभ झाला आहे असें म्हणतां येईल कीं नाहीं, ह्याबद्दल आम्हांस जबर शंकाच आहे. कोणी म्हणतो प्रत्ययावरून विभक्ति मानणें बरें तर कोणी म्हणतो अर्थावरून मानणें बरें. दादोबा जरी प्रत्ययवादी दिसतात तरी कर्म अर्थ असतां 'मला' ही द्वितीया आणि संप्रदानार्थीं चतुर्थी असें ते म्हणतात. जोशी–खेर ही मंडळी अर्थवादी दिसतातात, आणि त्यांचें मतें विभक्तींस प्रथमा, द्वितीया, तृतीया, असें न म्हणतां कर्तृविभक्ति, कर्मविभक्ति, करणविभक्ति, संप्रदानविभक्ति, इ॰ अर्थवान् नांवें त्यांस योग्य होत. आणि म्हणूनच द्वितीयेचे म्हणजे कर्मविभक्तीचे त्यांनीं अप्रत्यय द्वितीया व सप्रत्यय द्वितीया आणि दादोबांप्रमाणें स, नां, इ॰ प्रत्ययान्त नामांस कर्मार्थीं द्वितीया आणि संप्रदानार्थीं चतुर्थी असें म्हटलें आहे. परंतु 'रामा काम करितो,' 'रामानें काम केलें,' आणि 'रामाला किंवा रामाच्यानें काम करवतें' या वाक्यांत रामा, रामानें, रामाला किंवा रामाच्यानें, हीं सर्व कर्तृपदें आहेत. तेव्हां त्यांचे दृष्टीनें ह्या सर्व पदांस कर्तृविभक्ति म्हणजेच प्रथमा हें नांव देणें योग्य होय. त्याचप्रमाणें, 'त्या वाटेनें कांटे फार आहेत', 'त्याच्या डोक्यास रुमाल होता,' 'तो रात्रीचा चालतो,' 'तो गांवाला गेला,' आणि 'तो गांवीं गेला' या वाक्यांत वाटेनें, डोक्यास, रात्रीचा, गांवाला, गांवीं, हीं सर्व पदें अधिकरणार्थीं आहेत, हें निर्विवाद आहे. तेव्हां या सर्वांत अधिकरणविभक्ति म्हणजेच सप्तमी असें त्यांच्या दृष्टीनें म्हणणें ओघास येतें. असें करण्यास अर्थवादी बहुधा म्यालें असावे. परंतु जर विभक्ति या प्रत्ययांवरून न मानितां अर्थावरून मानावयाच्या आणि त्यामुळें सप्रत्यय द्वितीया आणि अप्रत्यय द्वितीया असा फरक करावयाचा तर त्याच तत्त्वास अनुसरून रामा, रामानें, रामाला, आणि रामाकडून (मज-कडून आज एक आंगठी हरवली अशा ठिकाणीं कर्तृपदार्थीं पंचमी होते असें जोशीबोवा सांगतात. क॰ ५५४) ही सर्व प्रथमेची रूपें होत; आणि वाटेनें,

ण्ड्रेवयास, गांवाला, रात्रीचा, गांवीं, हीं सर्व सप्तमीचीं रूपें होत असें म्हणावयास नको काय? एवंच, प्रत्ययवादी दादोबा थोडेसे अर्थवादी आहेत; आणि अर्थवादी म्हणविणारे जोशी —खेर हे बरेच प्रत्ययवादी आहेत हें उघड आहे. परंतु प्रत्ययावरून विभक्ति मानाव्या कीं अर्थावरून मानाव्या, हा प्रश्नच मुळीं अप्रयोजकत्वद्योतक आहे; आणि तो ज्यांनीं उत्पन्न केला, त्यांनीं असा घोंटाळा करणें हेंच स्वाभाविक आहे. तेव्हां आतां विभक्तीचें स्वरूप, आणि तिचें व्याकरणांतील स्थल म्हणजेच विभक्ति-प्रकरणाचा व्याकरणाचे इतर भागांशीं संबंध, ह्या गोष्टींच्या विवेचनाकडे वळूं.

याकरितां प्रथम शास्त्राचे साधारण स्वरूप सांगणें अवश्य आहे. कोणत्याही शास्त्राचा मुख्य उद्देश आपल्या प्रांतांतील वस्तुस लागू पडणारे सामान्य सिद्धान्त शोधून काढणें हा होय, परंतु सामान्य सिद्धान्त शोधून काढण्यापूर्वी कांहीं आनुषंगिक गोष्टी कराव्या लागतात. कारण सामान्यसिद्धान्तांचे शोधास त्या फार उपयोगी असतात त्यांच्यावांचून सामान्य सिद्धांन्तांचा शोध लागणार नाहीं असें नाहीं. तरी त्यांची त्या शोधास फार मदत होते. ह्या आनुषंगिक गोष्टी मुख्यत्वेंकरून तीन आहेत. अनुभव अथवा निरीक्षण व प्रयोग, वर्गीकरण, आणि परिभाषा. ज्या वस्तूंसंबंधाचे सामान्य सिद्धान्त स्थापावयाचे असतील, म्हणचे ज्या वस्तु दिलेल्या शास्त्रांच्या विषयीभूत असतील त्यांचें योग्य निरीक्षण करणें, तत्संबंधी साधल्यास कांहीं प्रयोग करून पाहणें, नंतर त्याच्या साधर्म्यावैधर्म्यानुरूप त्यांचें वर्गीकरण करून त्यांस योग्य नांवें देणें, ह्या गोष्टी सामान्य सिद्धान्तांचे शोधास सहायभूत आहेत; आणि शास्त्रीय ग्रंथांत याच क्रमानें कोणत्याही शास्त्राचें उद्घाटन करण्यांत येतें हें उघड आहे. या गोष्टी आतां व्याकरणशास्त्रास लावून पाहूं. व्याकरणाचा मुख्य विषय वाक्य. वाक्यासंबंधाचे साधारण सिद्धान्त स्थापन करण्यासाठीं निरनिराळ्या वाक्यांचें आणि तदंगभूत शब्दांचें प्रथम सूक्ष्म व योग्य निरीक्षण झालें पाहिजे. व्याकरण-शास्त्रांत प्रयोग शक्य नसल्यामुळें त्याचे येथें नांवच घ्यावयास नको. निरीक्षणानंतर वर्गीकरण व नंतर नामकरण. व्याकरणविषयांतील मुख्य वस्तु जी वाक्य तें शब्दांचें आणि शब्द वर्णांचें बनलेले असतात. म्हणून या तिहींचें निरीक्षण, वर्गीकरण, व नामकरण झालें पाहिजे. वर्णविचारांत वर्णासंबंधानें ह्या तिन्ही गोष्टी होतात. शब्द-विचारांत शब्दांसंबंधानें आणि वाक्यविचारांत वाक्यासंबंधानें ह्या गोष्टी होऊन नंतर शब्दांबद्दल आणि वाक्यांबद्दल काय काय साधारण नियम दृष्टोत्पत्तीस येतात तें पहावयाचें. सध्या आपण शब्दविचारांत आहों. शब्दविचाराचे वर्गीकरण, विकरण, व व्युत्पत्ति असे तीन भाग आहेत; हें पूर्वी सांगितलें आहे. वर्गीकरणामध्यें शब्दांच्या मूळ रूपाचा विचार करावयाचा असतो. विकरणामध्यें विकृत रूपाचा विचार येतो. नामांस तीन तऱ्हांनीं विकार होतात. त्यांस लिंग, वचन आणि विभक्ति असें म्हणतात. ह्याप्रमाणें शब्दविचार म्हणून व्याकरणाचा जो दुसरा भाग आहे, त्याच्या विकरण

नांवाचे दुसऱ्या प्रकरणांतील विभक्ति ह्या तिसऱ्या प्रकारचे विकारविवेचनांत आपण गुंतलेले आहों. शब्दांचा जो विचार करावयाचा तो वाक्याचे स्पष्टीकरणासाठीं होय. शब्दांचा विचार तीन दृष्टींनीं करावयाचा असतो. त्यांपैकीं मूल प्रकृतीची दृष्टि आणि व्युत्पत्तीची दृष्टि ह्या दोहोंशीं सध्या आपणास कांहीं एक कर्तव्य नाहीं. सध्याचा प्रश्न विकृतीचा आहे. आतां शब्दविकृतीचा विचारही वाक्याचे पूर्ण आकलनासाठींच होय हें निर्विवाद आहे. शब्दविचारांत वाक्याचा विचार येत नाहीं. म्हणणे शब्द-विचारामध्यें वाक्यांतील शब्दांचा परस्परसंबंध हा विषय येऊं शकत नाहीं. कारण उघडच आहे कीं, शब्दांसंबंधानें त्यांची मूळ प्रकृति, विकृति, आणि व्युत्पत्ति ह्यांची जोंपर्यंत आपणास पूर्ण माहिती झाली नाहीं, तोंपर्यंत त्यांचा परस्परसंबंध व वाक्याचा अर्थ ह्या गोष्टी नीट समजावयाच्या नाहींत; तेव्हां शब्दविचारांतील विकरण-मध्येंही वाक्याचे दृष्टीनें शब्दांचा परस्परसंबंध हा विषय येऊं शकत नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्या विषयाचेच आकलनासाठीं शब्दविचारांतील विकरणप्रकरणाची रचना व उभारणी करावयाची आहे. शब्दांचा वाक्यामधील परस्परसंबंध दाखविणारीं जीं शब्दांची विकृत रूपें त्यांचे स्पष्टीकरणामध्यें शब्दांचा परस्परसंबंध गृहीत घेऊन चालतां येत नाहीं. वाक्यांतील शब्दांपैकीं नामें व धातू हे शब्द मुख्य होत. त्यांचा परस्परसंबंध त्यांस लागणाऱ्या चरमप्रत्ययांनीं कळतो. नामांस लागणाऱ्या चरमप्रत्यांस विभक्तिप्रत्यय आणि धातूंस लागणाऱ्या चरमप्रत्ययांस आख्यातप्रत्यय असें म्हणतात. विकरणप्रकरणांत विभक्तिप्रत्यय व आख्यातप्रत्यय ह्यांचें जें विवेचन करावयाचें तें नामांचा व क्रियापदांचा परस्परसंबंध व वाक्याचा अर्थ नीट लक्षांत यावा म्हणून होय. तेव्हां विभक्तिप्रत्ययांचे विवेचनांत विभक्तिप्रत्ययांनीं दाखविले जाणारे संबंध म्हणजेच विभक्तींचे अर्थ गृहीत धरणें म्हणजे शास्त्रीय विवेचन पद्धतीचें अज्ञान प्रकट करणें होय. हें उघड आहे. विभक्तींसंबंधानें नामांस जे निरनिराळे विकार होतात त्यांचें पुन्हां योग्य निरीक्षण करून वर्गीकरण करणें व त्या वर्गांस योग्य नांवें देणें हें पुन्हां या प्रकरणांत आलेंच. आतां नामांच्या विकारांचें निरीक्षण, म्हणजे त्यांचीं जीं वाक्यांत निरनिराळीं रूपें होतात म्हणजेच त्यांस जे निरनिराळे प्रत्यय लागतात त्या प्रत्ययांनीं उत्पन्न झालेलीं जीं नामांचीं विकृत रूपें, त्यांचें सूक्ष्म निरीक्षण करणें होय. तें झाल्यावर त्यांमधील साधर्म्य व वैधर्म्य जें दृष्टोत्पत्तीस येईल त्यास अनुसरून त्यांचें वर्गीकरण करून नंतर त्यांस योग्य नांवें दिलीं पाहिजेत. आणि हें झालें म्हणजे त्या वर्गीकरणा-पासून वाक्याचे आकलनास कसा उपयोग होतो, ह्या मुद्याचें विवेचन वाक्यविचारांत करावयाचें. अर्थात वाक्यांतील क्रियापद, कर्ता कर्म, करण इत्यादी गोष्टी विभक्तिप्रत्यय व आख्यात प्रत्यय ह्यांचें मदतीनें समजून घ्यावयाच्या आहेत. परंतु विभक्ति समजण्यासच जर वाक्यांतील क्रियापद, कर्ता, कर्म, करण

इत्यादि गोष्टींच्या ज्ञानाची मदत लागूं लागली, तर त्या विभक्तिची वाक्यस्पष्टीकरणाचे कामीं काय गरज राहिली? तेव्हां 'रामास' ही कर्मार्थी द्वितीया आणि संप्रदानार्थी चतुर्थी, आणि 'राम' ही कर्त्रर्थी प्रथमा व कर्मार्थी द्वितीया आणि कर्मणी प्रयोगांत कर्मार्थीही प्रथमाच असें सांगणाऱ्यास विभक्तींचा मूळ उद्देशच काय हें समजत नाहीं असें म्हणणें भाग आहे. एवंच प्रत्ययांवरून विभक्ती मानाव्या, कीं अर्थावरून विभक्ती मानाव्या, हा प्रश्न जो विचारितो, तो एकंदरींत शास्त्राचें साधारण स्वरूप व व्याकरणविवेचनाची शास्त्रीय पद्धति ह्या गोष्टींबद्दलच्या आपल्या शोचनीय अज्ञानाचें जणुं कांहीं हास्यास्पद प्रदर्शनच करितो हें निर्विवाद आहे. सारांश, **विभक्ती ह्या प्रत्ययांवरूनच मानिल्या पाहिजेत.** म्हणून दादोबांचा द्वितीया व चतुर्थी ह्यांमधील भेद, आणि जोशी—खेर ह्यांचा तोच भेद, आणि शिवाय सप्रत्यय द्वितीया व अप्रत्यय द्वितीया हा नवीन भेद, हे केवळ अशास्त्र व शिवाय घोटाळा उत्पन्न करणार असल्यामुळें सर्वथा अग्राह्य होत हें उघड आहे. मूळ संस्कृत भाषेंत अशाच प्रत्ययांवरून विभक्ती मानिल्या आहेत; आणि विभक्ति म्हणजे वाक्यामध्यें शब्दांचा परस्परसंबंध दाखविणारीं नामांचीं भिन्न भिन्न प्रकारचीं रूपें, हें विभक्ति ह्या शब्दाचे धात्वर्थावरूनही समजण्यासारखें आहे. आतां संस्कृतामध्येंही भिन्न भिन्न विभक्तींस भिन्न भिन्न प्रत्यय सर्वत्र दृष्टीस पडतात असें नाहीं. तसें असणें ही विभक्तींच्या व्यवस्थेची पूर्णावस्था होय. तथापि एका नपुंसकलिंगांतील प्रथमा व द्वितीया या विभक्तींशिवाय दुसऱ्या कोठेंही कोणत्याही दोन विभक्तींचे तिन्ही वचनीं एकच प्रत्यय दृष्टीस पडत नाहींत. कांहीं ठिकाणीं एक एक दोन दोन वचनांचे प्रत्यय समान आहेत. परंतु तितक्या अंशानें संस्कृत व्याकरणांतील विभक्तींची व्यवस्था अपूर्ण होय असें म्हटल्यावांचून गत्यन्तर नाहीं. परंतु या अंशतः न्यूनत्वाचे आधारावर प्रत्ययभिन्नत्वाचे अत्यन्ताभावी प्रथमा व द्वितीया आणि द्वितीया व चतुर्थी ह्यांमधील फरकाची उभारणी करणें सुज्ञपणाचें नाहीं. एवंच मराठींतही होतां होईल तों प्रत्ययभिन्नत्व हेंच विभक्तिभिन्नत्वाचें मूल चिन्ह समजलें पाहिजे. आजपर्यंतच्या मराठी वैयाकरणांनीं केल्याप्रमाणें कारकभिन्नत्व हें विभक्तिभिन्नत्वाचें लक्षण होऊं शकत नाहीं. तसें झाल्यास एक तर ज्या भाषांत षष्ठी विशेषणात्मक नाहीं, त्या भाषांतही तिला विभक्ति म्हणतां यावयाचें नाहीं; आणि दुसरें कारकांच्या स्पष्टीकरणास विभक्तिज्ञानाची मदत घ्यावयाची असते तसें न करितां उलट विभक्तींचे ज्ञानासच कारकांचे ज्ञानाची जर अपेक्षा लागूं लागली, म्हणजे कारकज्ञान विभक्तींचे ज्ञानाशिवाय होऊं लागलें तर विभक्तींच्या ज्ञानाचें मुळीं प्रयोजनच उरलें नाहीं म्हणावयाचें.

येथपर्यंत विभक्ति म्हणजे काय, विभक्तिचें व्याकरणांमध्यें स्थळ कोणतें, आणि

विभक्ति प्रत्ययांवरूनच मानणें कसें इष्ट व अवश्य आहे हें दाखविलें. आतां नामांच्या प्रत्यययुक्त विकृत रूपांचें वर्गीकरण करून जे विभक्तिभेद उत्पन्न होतात, त्यांस कोणतीं नांवें देणें चांगलें म्हणजे त्यांचें नामकरण कसें असावें ही आनुषंगिक तीन गोष्टींपैकीं—निरीक्षण, वर्गीकरण, व नामकरण यांपैकीं—तिसरी गोष्ट राहिली. नामकरणाचा प्रश्न महत्त्वाचा नाहीं असें पुष्कळांस वाटण्याचा संभव आहे. ज्याप्रमाणें मूल जन्मास आल्यानंतर त्याचें नांव ठेवणें जरी अवश्य असलें, तरी त्यास वाटेल तें नांव दिलें तरी चालतें आणि तें बहुधा त्याच्या आईबापांच्या व आप्तेष्टांच्या आवडीवर अवलंबून असतें, त्याच-प्रमाणें विभक्तीचे भेद म्हणजे निरनिराळ्या विभक्ति दृष्टोत्पत्तीस आल्या कीं त्यांची नांवें वाटतील तीं ठेवण्यास हरकत नाहीं, असा जर पृथक् जनांचा समज असेल तर तो कांहीं अंशीं क्षम्य आहे. परंतु विशेषनामें ठेवण्यांत जरी कोणत्याही प्रकारची कुशलता किंवा तारतम्य, किंवा विशेष ज्ञान ह्यांची आवश्यकता नसली, तरी शास्त्रीय वर्गीकरण झाल्यावर जे भेद उदयास येतात त्यांचीं नांवें कांहीं तरी असून भागावयाचें नाहीं, तर तीं मोठ्या कुशलतेनें व त्या विषयाचे ज्ञानानेंच ठेवावीं लागतात. संस्कृत व्याकरणांत विभक्तींस प्रथमा, द्वितीया, तृतीया, इत्यादि अशीं अर्थहीन फक्त क्रमसूचक नांवें दिलीं आहेत, ह्यांत मोठीशीं कुशलता किंवा तारतम्य तें काय आहे असें क्षणभर वाटण्याचा संभव आहे. परंतु हींच अर्थहीन क्रमसूचक नांवें या ठिकाणीं योग्य असून इंग्रजींतल्याप्रमाणें व रेवरंड नवलकरांनीं इंग्रजी फॅशन उचलून मराठीचे डोक्यावर ठेवल्याप्रमाणें कर्तृविभक्ति, कर्मविभक्ति, करणविभक्ति, इत्यादि सकृद्दर्शनीं दिसणारीं अन्वर्थक नांवेंच घातक आहेत. इंग्रजीमध्यें फारच थोड्या विभक्ति पडल्यामुळें त्या भाषेंत या नांवांपासून फारसा घोंटाळा उत्पन्न झाला नाहीं. तथापि त्या भाषेंतही या सार्थ नावांमुळें nominative and subject ह्यांमध्यें फरक करावा लागला आणि Passive voice मध्यें म्हणजे दादोबा ज्यास कर्मकर्तरि प्रयोग असें म्हणतात, त्यामध्यें ‘ कर्म कर्ता होतें ’ अशी अप्रयोजक भाषा वापरावी लागली आहे. मराठीमध्यें हा घोंटाळा व अप्रयोजकपणा कोणत्याही रीतीनें उत्पन्न होण्याचें कांहीं एक कारण नव्हतें. परंतु इंग्रजीच्या अभ्यासाचा हा परिणाम होय. त्यामुळेंच दादोबांनींही, पूर्वीचें कर्म कर्ता होतें, अशी अप्रयोजक व विरोधी भाषा वापरिली आहे; आणि ‘ त्यानें काम केलें ’ या वाक्यांत ‘त्यानें’ हें कर्तृपद, ‘काम’ हा कर्ता अशा प्रकारची तशीच आक्षेपार्ह भाषा जोशी यांस योजावी लागली आहे. परंतु संस्कृत भाषेंत विभक्तींस प्रथमा, द्वितीया, इत्यादि अर्थविशेषहीन नांवें दिल्यामुळें संस्कृत भाषेसंबंधानें बोलावयाचें म्हटलें म्हणजे दादोबांचे कर्मकर्तरि प्रयो-गांत, मूळ कर्तरि प्रयोगांतील द्वितीयान्त नाम फक्त प्रथमान्त होतें, अशी सर्वथा अनपवादक, सरळ व सोपी भाषा वापरितां येते. शिवाय बहुतेक विभक्तीचा अनेक अर्थानें उपयोग होत असल्यामुळें विभक्तींस जर अन्वर्थक नांवें देण्याचा प्रयत्न केला तर तो कधींही समाधानकारक व्हावयाचा नाहीं. यामुळें विभक्तींस अशीं अन्व-

कि नांवें देण्याचा निखालस निष्फळ होण्याचा प्रयत्न न करितां त्यांस प्रथमादि केवळ क्रमसूचक खुणांप्रमाणें नांवें देण्यांत संस्कृत वैयाकरणांचें केवढें दूरदर्शित्व व कौशल्य दिसून पडतें बरें! अर्थावरून जर विभक्ति मानिल्या आणि कारकद्वारा जर विभक्तींचें लक्षण केलें तर विभक्तींस सार्थ नांवें देणेंच प्राप्त होतें. आणि मूळचीं जरी प्रथमा, द्वितीया, इत्यादि केवळ क्रमसूचक नांवें होतीं, तरी त्यांचें पूर्ण रहस्य न ओळखल्यामुळें व त्यांचें भाषान्तर इंग्रजींत कर्तृविभक्ति, कर्मविभक्ति, अशा प्रकारच्या अर्थपूर्ण नांवांनीं होत असल्यामुळें प्रथमा, द्वितीया, इत्यादि नांवांमध्येंही तो तो अर्थ आमच्या वैयाकरणांस भासूं लागला आणि इंग्रजींतील अप्रयोजकपणा योग्य संस्कृतपरंपरेस लाथाडून मराठींत घुसूं लागला. एवंच विभक्तींना बाह्यात्कारी अन्वर्थक दिसणारीं नांवें देण्यापेक्षां केवळ प्रथमा, द्वितीया, इत्यादि सांकेतिक संज्ञाच करणें अधिक इष्ट व श्रेयस्कर आहे हें उघड आहे.

आतां मराठींत किती विभक्ति आहेत हा प्रश्न उरला. संस्कृत भाषेंत संबोधनासह आठ विभक्ति आहेत. प्राकृतांत चतुर्थी नाहींशी होऊन सातच राहिल्या. त्या भाषेंत तिचें कार्य षष्ठीनें होऊं लागलें. प्राकृतांत चतुर्थी निदान लुप्तप्राय असल्यामुळें ती मराठींत न मानितां संस्कृत षष्ठीच्या स्य, नां, ह्या प्रत्ययांपासून निघालेल्या स नां ह्या प्रत्ययांस द्वितीयेचेच प्रत्यय मानावे, असा दादोबांचा कल दिसतो. परंतु त्यांनीं अर्थभेदानें दोन्ही विभक्ति ठेविल्या आहेत. त्यापेक्षां दोहोंपैकीं एकीस फांटा देऊन स, नां हे कोणत्या तरी एका विभक्तीचे प्रत्यय मानणें चांगलें, हें पूर्वींच्या विवेचनावरून उघडच आहे. आतां ह्या एका विभक्तीस द्वितीया म्हणावें कीं चतुर्थी म्हणावें हा प्रश्न उत्पन्न होतो. दादोबांचा कल तिला द्वितीया म्हणण्याकडे आहे हें वर सांगितलेंच आहे. परंतु शास्त्रिद्वयाचें मत भिन्न असून ते तिला चतुर्थी असें नांव देतात, आणि आमच्या मतें ह्या शास्त्रिद्वयाचा निकालच पूर्वपरंपरेस धरून असल्यामुळें योग्य आहे. कोणी म्हणेल कीं स, नां, हे संस्कृत षष्ठीच्या प्रत्ययांपासून आले असल्यामुळें त्यांस षष्ठी म्हणणें योग्य आहे. परंतु तसें करण्यास जरी व्युत्पत्ति अनुकूल असली तरी मराठींतील विभक्तींची जी परिभाषा सध्या रूढ आहे तिच्या दृष्टीनें तसें करणें इष्ट नाहीं. तेव्हां द्वितीया किंवा चतुर्थी ह्यांपैकीं चतुर्थी हेंच नांव बरें. कारण कीं, संस्कृतांतील द्वितीयेचा जसा उपयोग होतो तसा मराठींतील स, नां, इत्यादि प्रत्ययांचा जरी मराठींत होत असला तरी स, नां, इत्यादि प्रत्ययांचा संस्कृतांतील चतुर्थी विभक्तीच्या प्रत्ययांप्रमाणें अधिक उपयोग होतो. म्हणजे स, नां, इत्यादि प्रत्यय कर्मार्थापेक्षां संप्रदानार्थींच निदान प्रचलित मराठी गद्य भाषेंत तरी विशेष प्रचारांत असल्यामुळें त्यांस द्वितीयेपेक्षां चतुर्थींच म्हणणें अधिक योग्य आहे. तेव्हां प्राकृतांत जशी चतुर्थी ही अलग विभक्ति फारशी दिसत नाहीं; तशी मराठींत द्वितीया ही अलग विभक्ति दिसत नाहीं. तिचें कार्य अंशतः चतुर्थीचे प्रत्ययांनीं होतें; आणि बरेंचसें प्रथमेनें होतें. संस्कृतांतील द्वितीयेच्या प्रत्ययांपासून आलेला मराठींत एकही

विभक्तिप्रत्यय नाहीं हें एक, आणि अन्य विभक्तींचे प्रत्ययांपासून भिन्न असे कर्मार्थी प्रत्यय मराठी भाषेंत आढळत नाहींत हें दुसरें; ह्यामुळ द्वितीया ही मराठींत अलग मानितां येत नाहीं. द्वितीयेचें कर्मसूचकत्व हें काम मराठीमध्यें अंशतः स, नां, इ० चतुर्थी प्रत्ययांनीं होतें; आणि बहुधा प्रथमेनेंच म्हणजे नामाच्या प्रत्ययरहित रूपानेंच होतें. आणि असें होणें कांहीं विचित्र नाहीं. संस्कृतामध्यें पुल्लिंग नामांचें प्रथमा व द्वितीया ह्यांचे द्विवचनीं अभिन्न रूप असतें; म्हणजे पुल्लिंगामध्यें त्या विभक्तींचें तिहींपैकीं एक रूप समान असतें. स्त्रीलिंगामध्यें द्विवचन व बहुवचन हीं दोन बहुधा समान असतात; आणि नपुंसकलिंगीं पहिल्या दोन्ही विभक्तींचीं तिन्हीं वचनीं समान आढळतात. यावरून द्वितीयेचा प्रथमेमध्यें अन्तर्धान पावण्याचा संस्कृतांतही सर्वत्र स्वभाव दृष्टीस पडतो. आणि पुल्लिंगामध्यें जरी तो कमी आढळतो तरी नपुंसकलिंगामध्यें केवळ मराठीप्रमाणेंच द्वितीयेचा प्रथमेमध्यें लोप झाला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. तेव्हां मराठीमध्येंही द्वितीयेचा प्रथमेंत लोप झाला आहे असें मानणें व्युत्पत्तिदृष्ट्या किंवा इतिहासदृष्ट्या गैर नाहीं हें उघड आहे.

परंतु मराठींतील द्वितीयेस याप्रमाणें फांटा मिळणें हें पुष्कळांस कसेंसेंच वाटेल. त्यांचें कारण इतकेंच कीं, कर्म ह्या अर्थास स्वतंत्रपणें एक विभक्ति मिळत नाहीं आणि इंग्रजी व संस्कृत या भाषांत कर्माची द्वितीया विभक्ति कधीं कधीं असते व कधीं कधीं मानतात. त्याचप्रमाणें मराठींतही व्यवस्था करण्यास काय हरकत आहे? म्हणजे वाक्यांतील कर्में द्वितीयान्त असतात, मग तीं सप्रत्यय असोत वा अप्रत्यय असोत, असें समजून द्वितीया विभक्ति कायम ठेवावी असें वाटण्याचा संभव आहे. अलीकडे मराठी वैयाकरणांनीं हीच व्यवस्था स्वीकारिली आहे. परंतु ती कशी अशास्त्रीय आहे आणि तिजपासून काय काय अडचणी व घोंटाळे उत्पन्न होतात हें वरील विवेचनावरून कळेलच. कर्ता हें कारक जसें प्रथमा, तृतीया, व चतुर्थी ह्या तीन विभक्तींचे ठायीं दिसतें तसेंच कर्म हेंही प्रथमा व चतुर्थी ह्या दोन विभक्तींचे ठायीं दिसतें. 'तरी पण कर्ता ह्यास प्रथमा ही स्वतंत्र विभक्ति आहे; तशी कर्मास नाहीं' ह्या विचारानें द्वितीयेचा लोप पाहून ज्यांस हळहळ वाटते त्यांनीं असा विचार करावा कीं ' कर्ता ह्यास प्रथमा ही स्वतंत्र विभक्ति आहे तशी कर्मास नाहीं ' हा एक निवळ भ्रम होय. प्रथमेस कर्ता, कर्म, अधिकरण, उद्देश, विधान, ईयत्ता, प्रमाण, इत्यादि अनेक अर्थ आहेत. त्याचप्रमाणें प्रत्येक विभक्तीस अनेक अर्थ आहेत. असें असतां प्रथमेचा अर्थ कर्ता हा एकच किंवा कर्त्याच्याच वांट्याची प्रथमा होय, असें समजून व कर्माच्या वांट्याची द्वितीया गेली असें पाहून हळहळणें म्हणजे सर्वथा अज्ञानपणा होय हें उघड आहे. एवंच कर्म हा अर्थ भाषेंतून गेला नाहीं. तो कधीं कधीं प्रथमेच्या रूपांचे ठायीं, तर कधीं कधीं चतुर्थीच्या रूपांचे ठायीं आढळतो, असें म्हणावयाचें. आणि असेंच सर्व अर्थसंबंधानें बहुधा आपण म्हणत असल्यामुळें कर्माच्या अर्थाबद्दलची ही व्यवस्था कोणत्याहि प्रकारें आक्षेपार्ह आहे असें दिसत नाहीं. जुनी व्यवस्था सोडून एकदम नवीन

स्वीकारणें हें कनजास्तमानानें कठीण असतें हें खरें; तथापि नवीन व्यवस्थेची आवश्यकता व इष्टता मनाप्त पटली म्हणजे उलट तें तिचा मोठ्या उत्साहानें स्वीकार करितें हेंही विसरतां कामा नये.

आतां उरला प्रश्न षष्ठी विभक्तीचा. मूळ संस्कृत षष्ठीच्या प्रत्ययांपासून निघालेल्या प्रत्ययांचा मराठींत निराळाच उपयोग होत असल्यामुळें त्यांस षष्ठीचे न मानितां चतुर्थीचे मानिले. तेव्हां संस्कृतांतील षष्ठी विभक्तीचें कार्य मराठींत ज्या प्रत्ययांनीं होत असेल, त्यांस षष्ठीचे प्रत्यय मानणें हें ओघासच येतें. त्याप्रमाणें दादोबांनीं संस्कृत षष्ठीच्या स्थानीं येणारे चा, ची, चें हे प्रत्यय किंवा ( लिंगवचनानुसार बदलणारा ) चा हा एकच षष्ठीचा प्रत्यय मानिला. परंतु ह्या षष्ठीसंबंधानें एक दोन वादग्रस्त मुद्दे उपस्थित झाले आहेत. त्यांचा ऊहापोह केला पाहिजे. षष्ठीस कारक नसल्यामुळें कारकद्वारा केलेलें विभक्तीचें लक्षण तिजला लागत नाहीं; म्हणून ती विभक्ति नव्हे, या मुद्यांत अर्थ नाहीं. या आक्षेपानें फार तर इतकेंच सिद्ध होईल कीं, कारकद्वारा केलेलें विभक्तीचें लक्षण त्याज्य होय. कारण कीं मराठीमध्यें चा प्रत्ययांस षष्ठी विभक्ति म्हणावें कीं नाहीं, हा जरी वादग्रस्त मुद्दा असला तरी संस्कृतादि अन्य भाषांत षष्ठी ही निःसंशय विभक्ति असल्यामुळें ती विभक्ति नाहीं असें सिद्ध करणारें अनुमानच चुकीचें होय हें उघड आहे. आतां ज्या दोन प्रमाणांनीं षष्ठी ही विभक्ति नाहीं असें सिद्ध करितात, तीं अशीं कीं, ज्याला कारक आहे ती विभक्ति होय ( हें कारकद्वारा विभक्तीचें लक्षण ); आणि षष्ठीस कारक नाहीं. ह्या दोन प्रमाणांपैकीं षष्ठीस कारक नाहीं हें सत्य आहे. जरी खेरांनीं एक नवीन कारक घडवून तिचे गळ्यांत अडकवून दिलें आहे तरी षष्ठीस कारक नाहीं हा सिद्धांत अद्याप बहुतांशीं सर्वमान्य आहे. तेव्हां ज्याला कारक असतें ती विभक्ति होय, हें विधान अथवा कारकद्वारा विभक्तीचें लक्षण चुकीचें होय. म्हणून या आक्षेपांत कांहीं अर्थ नाहीं हें सिद्ध आहे. आतां अन्य आक्षेपांकडे वळूं.

सगळ्यांत मोठा आक्षेप हा कीं, चा हा प्रत्यय मूळ तद्धित विशेषणप्रत्ययापासून आला आहे. कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात—" तो उत्पन्न होण्याचा संभव षष्ठीच्या अर्थाचा जो संस्कृत तद्धित प्रत्यय ईय त्यापासून फार आहे. रामीय ह्याचें बालभाषेंत ' रामिज्ज ' असें रूप होऊन त्यापुढ जचा च होऊन ' रामाचा ' असें रूप होण्याचा चांगला संभव दिसतो. " ( निबंध, पृष्ठ ६५ ). गोडबोले शास्त्री म्हणतातः—" संस्कृतांत इक, ईन, इय, प्रत्यय नामांस लागून ' तत्संबंधीं ' या अर्थाचीं म्हणजे संबंधदर्शक विशेषणें होतात. जसें:—काय ( देह ) –कायिक, समा ( वर्ष ) समीन, राष्ट्र ( राज्य ) राष्ट्रीय. इकपासून हिंदुस्थानींत का, ईनपासून गुजरातींत नों, आणि इयपासून सिंधींत जो आणि मराठींत चा आला आहे. याबद्दल प्राकृतांत ज आणि क्वचित् च येतो. क, न, य, ह्या प्रत्ययांस पुल्लिंगीं एकवचनीं विसर्ग येतो आणि विसर्गाबद्दल प्राकृतांत ओ किंवा आ होतो. " ( नवीन व्याकरण, पृष्ठ ६३ ).

याप्रमाणें चा हा मूळचा तद्धित विशेषणप्रत्यय असल्यामुळें 'रामाचा' हें विशेषण होय असें शास्त्रिद्वयाचें मत आहे. परंतु गुंजीकरांचे मतें ही व्युत्पत्ति बरोबर नाहीं. त्यांच्या मतें 'संस्कृत स्यचा अपभ्रंश स्स; आणि पुन्हा त्या स्सचा एक अपभ्रंश स आणि दुसरा चा.' त्यांच्या मतें संस्कृतांत स् हा वर्ण दंततालव्य असून त्याचा उच्चार च् ह्या मराठी व द्राविडी दंततालव्याशीं सदृश आहे. ह्यामुळें स् व च् हे दोन वर्ण आपआपसांत बदलल्याची उदाहरणें सांपडतात. म्हणून मुळांत स्स द्वित्त आहे त्याचे जागीं मराठींत चा आला. म्हणून गुंजींकरांचे मतें चा हा मूळचा विभक्तिप्रत्ययच असल्यामुळें 'रामाचा' ही षष्ठी विभक्तिच होय. या चा प्रत्ययानें 'असे नाना प्रकारचे गोते वैयाकरणांनां दिलेले पाहिले, म्हणजे मी मी म्हणणाऱ्या नावाड्यांनां वादळांत भिंगरीसारखे गरगर फिरविणाऱ्या एरियलची आठवण होते' असें जें राजवाडे आपल्या ज्ञानेश्वरी मराठीचे व्याकरणांत म्हणतात तें अक्षरशः खरें आहे, असें म्हणावें लागतें.

कृष्णशास्त्री चिपळूणकरांची चा प्रत्ययाची व्युत्पत्ति चुकीची दिसते. कारण जरी करणीय, उत्तरीय, पेय इत्यादि संस्कृत शब्दांचीं प्राकृतांत करणिज्ज, उत्तरिज्ज, पेज्ज अशीं रूपें होतात, तरी रामीय ह्याचें 'रामिज्ज' असें रूप न होतां 'रामेकर' असे होतें. कारण कीं 'इदमर्थस्य केरः—इदमर्थस्य य प्रत्ययस्य केर इत्यादेशो भवति' असा नियम आहे. त्याप्रमाणें युष्मदीयः—तुह्मकेरो, आत्मीयं – आत्मकेरकं, चारुदत्तीयानि –चारुदत्तकेरकाई, मदीये—मामकेलके, अशीं मृच्छकटिकनाटकांतील बालभाषेंत रूपें आढळतात. तेव्हां ईय ह्या तद्धित प्रत्ययापासून मराठी षष्ठीचा चा हा प्रत्यय आला असें म्हणतां येत नाहीं. कृष्णशास्त्री गोडबोले व गुंजीकर ह्यांनीं दिलेली व्युत्पत्ति काल्पनिक दिसते. त्यांचे म्हणण्यास इतिहासाचा आधार दिसत नाहीं.

या चा प्रत्ययाचे व्युत्पत्तीसंबंधानें नवीन शाळापत्रकाचे सन १९०५ चे मे महिन्याचे अंकांत डॉ. रा. गो. भांडारकर ह्यांचें मत प्रसिद्ध झालें आहे. त्याचा सारांश असाः—त्य हा तद्धित प्रत्यय असून लिंगभेदाप्रमाणें फिरणारा आहे. त्यापासून विशेषणें होतात. मोक्षमुल्लरचे मतें हा त्य षष्ठीचे स्य प्रत्ययापासून झाला आहे. या त्यचा प्रथम च्च होऊन नंतर मराठी चा झाला आहे. हा चा कित्येक प्राकृत लेखांतही आढळतो. पियदसी (प्रियदर्शी) राजाच्या एका आज्ञापत्रांत पुढील वाक्य आहे 'अस्ति पि चु एकचा समाजा साधुमता देवानं' यांत 'एकचा' म्हणजे एकत्य, एका विशेष ठिकाणचा, असा अर्थ आहे. एकाचा समाजा=एका विवक्षित ठिकाणचा समाज (लोक)—Bombay Royal Asiatic Society's Journal Vol. XXI. no. 58, P. 39. ही डॉ. भांडारकरांचीच व्युत्पत्ति साधार व सत्य आहे. तिजवरून असें दिसतें कीं, स्य या मूळ विभक्ति प्रत्ययापासून त्य हा लिंगभेदानें बदलणारा तद्धित विशेषणप्रत्यय आला. त्यचा च्च व त्यापासून चा झाला. याप्रमाणें चा हा मूळ विभक्तिप्रत्ययच कां, व तो विशेषणाप्रमाणें लिंगभेदानें कां बदलतो, ह्या दोन्ही गोष्टी मोठ्या समाधानकारकपणें सिद्ध होत आहेत. तेव्हां

षष्ठीस विभक्ति न मानण्याला व्युत्पत्तीचें जें कारण पुढें करण्यांत येतें, तें फारसें सबल नाहीं हें उघड आहे. यावरून असेंही दिसून येईल कीं राजवाडे यांनीं आपल्या ज्ञानेश्वरी मराठीचे व्याकरणांत होर्न्ले, बीम्स ह्यांस दोष देतांना त्यांचेबरोबर डॉक्टरसाहेबांस व्यर्थ गोंविलें आहे. राजवाडे यांचें मत डाक्तरसाहेबांचेच मताप्रमाणें आहे. असो.

चा प्रत्ययान्त नाम विशेषणच होय असें सिद्ध करण्याकरितां आणखी कांहीं गोष्टी दाखविण्यांत येतात. (१) चा हा प्रत्यय लिंगवचनभेदाप्रमाणें बदलतो. (२) त्याचे योगानें कित्येक स्थलवाचक व कालवाचक अव्ययापासून विशेषणें बनतात; जसें:—येथचा तेथचा, कालचा, परवांचा, इ० आणि (३) हा चरम प्रत्यय नव्हे. त्याजवरून आणखी विभक्तिप्रत्यय होतात. जसें:—रामाच्यानें, रामाच्यांत इ०.

उलट पक्षीं असें प्रतिपादन करितां येतें कीं, (१) तद्धित प्रत्ययांनीं नामाचें सामान्यरूप होत नाहीं. चा यानें इतर विभक्तिप्रत्ययांप्रमाणें त्याचें सामान्यरूप होतें आणि जरी घराचा, नागपूरचा, इत्यादि कांहीं ठिकाणीं चा चे पूर्वी सामान्यरूप झालेलें दिसलें नाहीं तरी हीं उदाहरणें अपवादक असून असे अपवाद नागपुरला, इंदूरहून इत्यादि स्थळीं अन्य प्रत्ययांसंबंधानेंही आढळतात, म्हणून विभक्तिप्रत्ययांप्रमाणें चा ह्याचेपूर्वी नामाचें सामान्यरूप होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु तद्धित प्रत्ययांपूर्वी नामाचें साम - रूप कधींच होत नाहीं (२) आंत चा हा चरम प्रत्यय नाहीं. आणि त्याजवरून अन्य विभक्तिप्रत्यय होतात हें खरें तथापि अशी गोष्ट सप्तमीच्या प्रत्ययांसंबंधानेंही आढळते. प्रांतींचा, दक्षिणेंतला; सोडवीना राजा देशींचा देशींच्या ॥ आणीक सोयरीं भलीं भलीं ॥ तुकाराम; अंतरिंचा ज्ञानदिवा मालवूं नको रे ॥—सोहिरोबा; या उदाहरणांत सप्तमीच्या ई व ँत यांस जर विभक्तिप्रत्यय म्हणण्यास हरकत नाहीं तर चा ह्यास विभक्तिप्रत्यय म्हणण्यास काय हरकत आहे? शिवाय ही गोष्टही विसरतां कामा नये कीं, मूळ संस्कृतांतही अहं, मम, इत्यादि विभक्त्यन्त रूपांस प्रत्यय लागून अहंकार, ममत्व, इत्यादि शब्द साधतात. यावरून, विभक्तिप्रत्यय हे चरम प्रत्यय होत, हा नियम मूळ संस्कृतांतही निरपवाद नाहीं हें उघड आहे. (३) आणि येथचा, तेथचा, परवांचा, इत्यादि स्थलवाचक व कालवाचक अव्ययांपासून झालेल्या विशेषणांतील चा प्रत्यय आणि षष्ठीचा चा प्रत्यय हे सर्वस्वी एकच होत असें समजण्याचें कांहीं कारण नाहीं. आणि तसें समजणें अवश्यही नाहीं. शिवाय चा याप्रमाणें ला प्रत्ययानेंही येथला, तेथला, आंतला, इत्यादि विशेषणें होतात. पण या ला प्रत्ययास कोणी विभक्तिप्रत्यय म्हणत नाहीं. एवंच या ठिकाणचा ला आणि चतुर्थीचा ला हे जसे भिन्न समजतात, त्याप्रमाणें येथचा, तेथचा, इत्यादि विशेषणांतील चा आणि षष्ठीचा चा प्रत्यय हे भिन्न होत असें समजण्यास हरकत नाहीं. (४) असेंच कोणत्याही तद्धितप्रत्ययानें वचनाचा बोध होत नाहीं, परंतु घराचा हें एकवचन आणि घरांचा हें अनेकवचन; असा चा प्रत्यय दोन्ही वचनीं लागून चा प्रत्ययान्त शब्दापासून वचनाचा बोध होतो हें निर्विवाद आहे. (५) षष्ठी विभक्तीचे अभावीं केळफूल, देवघर, इत्यादि

जे षष्ठीतत्पुरुष समास ह्यांस काय म्हणावयाचें ? कर्मधारय जर मानल तर त्यांचा तदनुरूप विग्रह कसा करावयाचा ? केळीचें फूल, देवाचें घर, असा विग्रह करून त्यांस षष्ठीतत्पुरुषाचे जागीं कर्मधारय म्हटलें म्हणजे झालें असें वाटण्याचा संभव आहे. पण इतकें केल्यानें वास्तविक अडचण दूर न होतां दुप्पट वाढत आहे. केळीचें, देवाचें हीं जर विशेषणें होत, तर समासांमध्यें त्यांची केळ, देव, हीं संक्षिप्त रूपें किंवा मूळ नामेंच कां रहावीं ? नामावरून साधलेल्या कोणत्याही विशेषणाचा समासांत असा संक्षेप होऊन फक्त मूळ नामच त्या विशेषणाचे जागीं आलेलें अन्यत्र दिसत नाहीं. शिवाय उलट पक्षीं, चा प्रत्ययान्त नाम विशेषण झाल्यानें त्या प्रत्ययानें संबद्ध नामांचा नेहमीच कर्मधारय समास होऊन असल्या कर्मधारय समासांची गर्दीच होऊन जाईल. बरें ह्या केवळ मराठी अडचणी बाजूस ठेविल्या तरी जे निवळ संस्कृत षष्ठीतत्पुरुष समास मराठींत येतात, त्यांचा योग्य विग्रह मराठींत केवळ अशक्य होऊन जाईल. (६) पण तेंही असो. हाताचें, घराचें, मुलाचा, हीं जर विशेषणें होत तर त्यांजपासून भाववाचक नाम कोणतें व कसें साधतें ? कारण कीं सर्व विशेषणांपासून मराठींत व इतर भाषांतही भाववाचक नामें साधतात. ( ७ ) चतुर्थीच्या विभक्तिप्रत्ययांचा लोप होऊन त्या विभक्तीबद्दल ज्या प्रमाणें सामान्यरूप योजितात, त्याचप्रमाणें चा प्रत्ययाचा लोप होऊन नुसतें सामान्यरूप चा प्रत्यायान्त नामाचे जागीं येतें. ' पलंगीं बसवूनियां राणी, माते हातें आणवी पाणी' या ठिकाणीं 'माते' म्हणजे मातेच्या हें उघड आहे. असा प्रत्ययरहित विशेषणाचा उपयोग मराठींत कोठेंच आढळत नाहीं. ( ८ ) ' पांढऱ्या घराचें दार ' या ठिकाणीं ' घराचें ' हें जर दाराचें विशेषण, तर पांढऱ्या हें घराचें ह्या विशेषणाचें विशेषण म्हणजे क्रियाविशेषण होईल. होईना परतें—असें वाटण्याचा संभव आहे. परंतु या ठिकाणीं आणखी एक अडचण उत्पन्न होते. पांढरा हें मूळ विशेषण व त्याचें पांढऱ्या हें सामान्यरूप होय. विशेषणापुढें जेव्हां सविभक्तिक किंवा सशब्दयोगिक शब्द येतो, तेव्हां त्या विशेषणाचें सामान्यरूप होतें. परंतु विशेषणापुढें विशेषण आल्यानें सामान्यरूप होत असलेलें कोठेंच ऐकिवांत नाहीं. म्हणून ज्याअर्थी पुढील सविभक्तिक किंवा सशब्दयोगिक शब्दानेंच मागल्या विशेषणाचें सामान्यरूप होतें, आणि ' घराचें दार ' या ठिकाणीं पांढऱ्या हें सामान्यरूप ज्या अर्थीं घराचें याशब्दाचे योगानें झालें आहे आणि ज्या अर्थीं घराचें यास सशब्दयोगिक शब्द असें म्हणण्यास अद्याप कोणी तयार नाहीं, त्या अर्थीं घराचें हा सविभक्तिक शब्द नव्हे काय ? त्याला विशेषण म्हणून प्रकृत स्थळीं व्याकरणाचा कसा निर्वाह करावा हें आम्हांस तरी समजत नाहीं. ( ९ ) सर्व विशेषणांचा नामांप्रमाणे उपयोग होतो. आंधळा मनुष्य म्हणाला, ह्याचे जागीं मनुष्य हें विशेष्य गाळून नुसतें ' आंधळा म्हणाला ' असें म्हणतां येतें. परंतु चा प्रत्ययान्त नामाचा असा नामाप्रमाणें उपयोग होतोसें वाटत नाहीं. ( १० ) ' हा सोन्याचा दागिना आहे ' या ठिकाणीं सोन्याचा ह्यास विशेषण म्हटलें असतां एकवार चालेल परंतु ' सोन्याचे दागिने करितात ' या ठिकाणीं सोन्याचे हें दागिने ह्या शब्दाचे विशेषण होय असें म्हणणें सुयुक्तिक

दिसत नाहीं इतकेंच नव्हे तर तें केवळ कसेंसेंच दिसतें. (११) ' तो दिवसाचा निजतो, रात्रीचा चालतो इ० ' या ठिकाणीं दिवसाचा, रात्रीचा, हीं च्या प्रत्ययान्त विशेषणें होत, असें जर समजलें तर त्यांस विधिविशेषणें समजून या अधिकरणार्थी विधिविशेषणांचा अधिविशेषणाप्रमाणें कधींच उपयोग होत नाहीं, म्हणजे कांहीं च्या प्रत्ययान्त विशेषणांचा नेहमीं विधिविशेषणांप्रमाणें किंवा क्रियाविशेषणांप्रमाणें उपयोग होतो असें म्हणणें भाग आहे. ( १२ ) ' त्याच्या बोलण्याचा मला फार राग आला ' या वाक्यांत ' बोलण्याचा' हें 'राग' या नामाचें विशेषणच होय असें म्हणण्यास मराठी षष्ठी विभक्तीचे हाडवैरी तरी धजावतील कीं नाहीं, ह्याचीं शंकाच आहे. ( १३ ) ' ह्या घोड्याचा लगाम तुटला आहे. ' या वाक्यांत घोड्याचा हें जर लगामाचें विशेषण असेल तर ' ह्या ' शब्दाचें व्याकरण कसें करणार ? ' ह्या ' हें घोड्याचें विशेषण होय असें निमूटपणें बेधडक म्हटलें म्हणजे होत नाहीं. कारण कीं हें व्याकरण ' घोड्याचे ' हा शब्द विभक्त्यन्त मानिला तरच शक्य आहे. एक तर ' ह्या ' या सामान्यरूपावरूनच ' घोड्याचा ' हा सविभक्तिक किंवा सशब्दयोगिक शब्द ठरतो; आणि च्या ह्यास अद्याप कोणी केवळ शब्दयोगी अव्यय म्हणत नसल्यामुळें तो वर सांगितल्याप्रमाणें सविभक्तिक शब्दच ठरतो. आणि दुसरें, कोणतेंही सार्वनामिक विशेषण विशेषणाचें विशेषण होऊं शकत नाहीं. ( १४ ) ' दोन घोड्यांची गाडी ' या ठिकाणीं दोन हें गाडीचें विशेषण खास नाहीं. तें अर्थात घोड्यांची या शब्दाचें विशेषण होय. परंतु ' घोड्यांची ' हें जर विशेषण आणि दोन हें ' घोड्यांची ' ह्या विशेषणाचें विशेषण तर त्यास क्रियाविशेषण म्हटलें पाहिजे. पण ' दोन ' हा शब्द क्रियाविशेषणाप्रमाणें मराठींत कधींच उपयोगांत येत नाहीं. दोन ह्यांपासून दोनदां हें क्रियाविशेषण होतें. कोणी असें म्हणेल कीं, ' दोन घोडे ' असा प्रथम एक शब्द घेऊन त्यापासुन ' दोन घोड्यांची ' हें च्या प्रत्ययान्त विशेषण झालें आहे, तर त्यास ' दोन घोडे ' हा एक चमत्कारीक द्विगु समास मानावा लागेल. परंतु ह्यास कोणी समास तरी म्हणण्यास तयार होईल कीं नाहीं ह्याची शंकाच आहे. ( १५ ) शिवाय ' एका घोड्याची गाडी ' या ठिकाणीं तर एका हें सामान्यरूप असल्यामुळें समासान्तर्गत होऊंच शकत नाहीं. त्यास षष्ठी विभक्तीचे प्रतिपक्ष्यांनीं ' घोड्याची ' ह्याचेंच विशेषण मानिलें पाहिजे. परंतु ' घोड्याची ' या विशेषणाचें संख्यावाचक विशेषण, विशेषण होऊं शकत नाहीं. नामांपाठीमागें संख्यावाचक विशेषण येतें. नामनिर्दिष्ट वस्तूंची तें संख्या दाखवितें; पण विशेषणाची संख्या दाखविणें हा शब्दप्रयोग केवळ अर्थहीन होय हें उघड आहे. कोणी म्हणेल कीं एका हें ' घोड्याची ' ह्याचें जर विशेषण करतां येत नाही तर घोड्याची हें विशेषण ज्या ' घोडा ' या नामापासून साधलें आहे, त्या नामाचें तें विशेषण करावें. परंतु नामापासून एकदां विशेषण साधलें म्हणजे तद्विशेषणान्तर्गत किंवा तद्विशेषणाधारभूत जें तदंतर्गत नाम त्यास त्या स्थळीं स्वतंत्र अस्तित्व नसल्यामुळें वाक्यांत तें अन्य कोणत्याही स्वतंत्र विशेषणाचें विशेष्य होऊं शकत नाहीं. ' लाज ' ह्या नामापासून ' लाजाळू '

" तद्धित विशेषण झालें आहे. मोठी हे विशेषण लाजेस लागतें. परंतु 'लाजाळू' या विशेषणांतील 'लाज' या नामास स्वतंत्र अस्तित्व नसल्यामुळें तें कोणत्याच स्वतंत्र विशेषणाचें विशेष्य होऊं शकत नाहीं. म्हणजे मोठी लाज, मोठ्या लाजेनें, असें ज्याप्रमाणें म्हणतां येतें त्याप्रमाणें 'मोठी किंवा मोठ्या लाजाळू' असें स्वतंत्रपणें म्हणतां येत नाहीं. मोठा लाजाळू मनुष्य, मोठी लाजाळू मुलगी असे प्रयोग होतात. परंतु या ठिकाणीं मोठा, मोठी हीं लाजाळू शद्बांतील लाज या नामाचीं विशेषणें नसून लाजाळू या सबंध विशेषणाचीं विशेषणें होत. तशी कांहीं 'एका घोड्याची गाडी' या उदाहरणांत सवड दिसत नाहीं. एवंच घोड्याची हें जर विशेषण मानलें तर एका ह्या शब्दाचें योग्य व्याकरण करितांच येत नाहीं. तें गाडीचें विशेषण खास नव्हे. त्यास घोड्याची ह्या विशेषणाचें विशेषणही म्हणतां येत नाहीं; किंवा घोड्याची या विशेषणांतलि घोडा या नामाचेंही विशेषण म्हणतां येत नाहीं. कारण कीं वर सांगितल्याप्रमाणें नामजन्य विशेषणामध्यें असलेल्या नामास वाक्यामध्यें कोणताच स्वतंत्र अधिकार नसल्यामुळें तें कोणत्याही विशेषणाचें स्वतंत्रपणें विशेष्य होऊं शकत नाहीं. म्हणून 'एका घोड्याची गाडी' या ठिकाणीं 'घोड्याची' यास विशेषण न मानतां घोडा या नामाची षष्ठी विभक्तिच मानिली पाहिजे हें उघड आहे. च्या प्रत्ययान्त नामास एकजात विशेषण म्हटल्यानें व्याकरणामध्यें आणखी कसकशा अडचणी उत्पन्न होतात हेंच सांगत बसावयाचें मनांत आणिल्यास ही यादी आणखीही कदाचित् लांबविता येईल. परंतु इतक्यावरून वाचकांस एवढें कळल्यावांचून राहणार नाही कीं च्या प्रत्ययान्त नामास निवळ विशेषण म्हणणाऱ्या वकिलांनीं आपण काय म्हणतों आहों ह्याचा पूर्ण विचार केलेला आहे असें दिसत नाहीं.

तेव्हां वरील विवेचनाचा इत्यर्थ असा. च्या प्रत्ययान्त नामाचे ठिकाणीं पुढील नामाचे लिंगवचनाप्रमाणें बदलणें हा विशेषणाचा गुण आहे ह्यांत संशय नाही. तथापि तेवढ्यानेंच त्यास जर सर्वत्र निवळ विशेषण असें म्हटलें तर व्याकरणात अनेक अश्रुतपूर्व आणि अकल्पित अडचणी उत्पन्न होतात. त्या इतक्या कीं त्या अडचणींची, या च्या प्रत्ययान्त नामास एका प्रकारचें असाधारण विलक्षण विशेषण असें म्हणून, अन्य व्यवस्था लावणें शक्य आहे असें जरी घेऊन चाललें तरी ती व्यवस्था लाऊन एकदम व्याकरणाची आजपर्यंतची सर्वसंमत रचना उलथून टाकून अगदीं नवीन रचना करण्यापेक्षां च्या प्रत्ययान्त-नामास विभक्तिच म्हणणें बरें असें पुष्कळांस वाटल्यावांचून राहणार नाहीं. तसें केल्यानें ह्या सर्व अडचणी दूर होऊन कोणतीच नवी अडचण उत्पन्न होत नाहीं. गुंजीकर म्हणतातः—'ज्या रूपाला षष्ठी म्हणतात तें रूप विशेषणाचे लक्षणांनी युक्त असतें, आणि विशेष्याचे अनुरोधानें त्याचें रूपांतर होतें, म्हणून त्याला विभक्तींत गणणें योग्य नव्हे अशी एक कोटी चिपळूणकर, गोडबोले, आणि जोशी यांनीं पुढं आणिली आहे. परंतु त्या रूपामध्यें जर विभक्तिचे वास्तविक धर्म आहेत तर विशेषणाचे धर्मही त्यामध्यें आणखी असले म्हणून काय झालें ? षष्ठीच्या रूपाचा सर्व भाषांमध्यें विशेषणासारखा प्रयोग आहेच.

तरी त्या रूपाला विभक्तित्व नाहीं असें कोणत्याही व्याकरणांत म्हटलेलें नाहीं. तृतीयादि विभक्ति अर्थतः क्रियापदाचीं विशेषणेंच आहेत. तरी त्यांचें विभक्तित्व काढून टाकावें असें कोणी म्हणत नाहीं. आणि तसें म्हणण्याला योग्य कारणही नाहीं. असें असतां षष्ठी विभक्ति हें अर्थतः नामपदाचें विशेषण आहे हें कारण दाखवून त्याचें मात्र विभक्तित्व काढून घेण्याचा प्रयत्न करणें हें कांहीं प्रशस्त नव्हे. षष्ठीचे अंगीं विशेषणत्व असणें ही गोष्ट जर तिच्या विभक्तित्वाचे आड येऊं शकत नाहीं, तर तिच्या अंगीं विशेष्यनिघ्नता असणें, म्हणजे विशेष्याच्या लिंगवचनानुरोधानें विकार पावण्याचा धर्म असणें, यांतच अयोग्य तें काय आहे ? कांहीं नाहीं ' ( निबंध ५ ).

एवंच चा प्रत्ययान्त नामास षष्ठी विभक्ति म्हणणें गैर नाहीं तर अवश्य आहे. आतां त्याचे ठायां विशेषणाचा विशेष्यनिघ्नता हा एक धर्म आहे हें खरें; तरी तो त्याच्या विभक्तित्वाचे आड येत नाहीं; इतकेंच नव्हे तर त्याच्या ठायीं विभक्तीचे सर्व धर्म असल्यामुळें त्यास विशेषणापेक्षां विभक्ति हेंच नांव अधिक योग्य आहे. त्याच्याठायीं अंशतः विशेषणत्व असणें हेंही साहजिक आहे. डॉ० भांडारकर यांनीं सुचविलेली चा प्रत्ययाची व्युत्पत्ति लक्षांत घेतली म्हणजे त्याचे ठायीं विभक्तित्वाशिवाय आणखी अंशतः विशेषणत्व कां आहे ह्याचाही योग्य खुलासा होतो. त्यांचें मतें चा हा मूळ स्य ह्या विभक्तिप्रत्ययापासून त्य या तद्धित विशेषणप्रत्ययाचे द्वारा आलेला आहे; तेव्हां चा या मराठी प्रत्ययाचे अंगीं विभक्तिचे व तद्धित विशेषणाचे दोन्ही धर्म असणें स्वाभाविक आहे. तथापि त्याचा मूळ उगम विभक्तीपासून असल्यामुळें त्याचे ठायीं विभक्तीचेच धर्म प्राधान्येंकरून वसत असणें व त्यामुळें तदन्त नामास विभक्त्यन्त म्हणणें हेंच इष्ट, योग्य व अवश्य आहे.

आतां अखेरीस गुंजीकरांच्या एका नवीन सूचनेचा विचार करावयाचा आहे. ती सूचना अशी. स, ला, ह्या प्रत्ययांनां द्वितीया समजून चतुर्थी साठीं ( स्यार्थे ) हा एक स्वतंत्र प्रत्यय मानावा. ' यापासून विभक्तीमध्यें खूट न राहतां सर्व व्यवस्था पुन्हा सुरळीत लागते. ' या सूचनेंत दोन मुद्दे आहेत. पहिला हा कीं, स, ला, ह्यांनां द्वितीया म्हणावें; व दुसरा साठीं यास चतुर्थीचा प्रत्यय मानावा. ह्यांपैकीं पहिल्या मुद्याचा मागील विवेचनांत सविस्तर ऊहापोह आलाच आहे; त्यावरून दादोबांप्रमाणें ते दोन विभक्तींचे द्योतक न मानितां एकाच विभक्तीचे द्योतक जर समजावयाचे तर इतिहासाचे दृष्टीनें व भाषेंतील त्यांच्या उपयोगाचे दृष्टीनें त्या विभक्तीस द्वितीयेपेक्षां चतुर्थी हेंच नांव देणें अधिक रास्त आहे असें कृष्णशास्त्रिद्वयाचें मत योग्य आहे, हें वाचकांस कळून चुकलेंच असेल. आतां गुंजीकरांचा दुसरा मुद्दा असा कीं, साठीं यास चतुर्थीचा प्रत्यय समजावा. साठीं हा शब्द त्यांचेच म्हणण्याप्रमाणें स्यार्थे पासून आला आहे. स्यार्थे ह्यांत जरी स्य हा प्रत्यय असला तरी अर्थे ही अर्थ शब्दाची सप्तमी आहे. नुसत्या अर्थ, अर्थी यांस जर प्रत्यय म्हणतां येत नाहीं तर साठीं ह्यास तरी प्रत्यय हें नांव कितपत साजेल ह्याची आम्हांस शंका आहे, जेणेंकरून, तेणेंकरून, येणेंकरून, या शब्दांत णें हा तृतीयेचा

प्रत्यय आहे व त्यापुढें करून हें शब्दयोगी अव्यय आलें आहे. तेव्हां 'णेंकरून' ह्यास प्रत्यय ही संज्ञा साठीं ( स्यार्थे ) ह्यापेक्षां अधिक शोभेल. तसेंच दक्षिणेंतून, उत्तरेंतून, ह्यांसही तें पंचमी मानण्यास तयार आहेत. परंतु दक्षिणेंत, उत्तरेंत, हीं सप्तमीचीं रूपें प्रसिद्धच आहेत. आणि जसें चा ह्या षष्ठीचे प्रत्ययापुढें आणखी कांहीं प्रत्यय लागतात, त्याचप्रमाणें सप्तमीच्या प्रत्ययांनंतरही कांहीं प्रत्यय लागतात, असें मानिलें पाहिजे. म्हणजे विभक्तींचे प्रत्यय हे चरम प्रत्यय होत. नियमास ज्याप्रमाणें मूळ संस्कृतांतही अपवाद आहेत, त्याप्रमाणें मराठींत षष्ठीचे व सप्तमीचे प्रत्यय हे अपवादक समजले पाहिजेत. नाहीं तर ' ँतून' हा जसा पंचमीचा प्रत्यय झाला त्याचप्रमाणें ' इंचा ' हा एक षष्ठीचा व असेच आणखी प्रत्यय मानावे लागतील. कारण कीं, दक्षिणेंतून, उत्तरेंतून ह्यांप्रमाणें प्रांतींचा, वगैरे रूपेंहि मराठींत प्रचलित आहेत. तात्पर्य ' साठीं ' हा आमच्या मतें प्रत्यय नसून शब्द आहे, आणि त्यास शब्दयोगी अव्यय म्हणणेंच बरें. शिवाय जितक्या जितक्या जागीं संस्कृतामध्यें चतुर्थीचा उपयोग झालेला दिसतो त्याच्या एक चतुर्थांश जागींही मूळ ' स्वार्थे ' हें येत नाहीं, आणि ' साठीं ' हेंही मराठींत येत नाहीं. म्हणजे ज्याप्रमाणें स, नां, ह्या प्रत्ययांचा उपयोग द्वितीयेपेक्षां चतुर्थीच्याच अर्थानें फार होतो म्हणून त्यांस चतुर्थी म्हणावयाचें, त्याचप्रमाणें साठीं ह्याचा उपयोग चतुर्थीच्या केवळ एक दशांश भागीं होत असल्यामुळें त्यास चतुर्थीचा पूर्ण अधिकार देणें प्रशस्त नाहीं. दुसरें असें कीं, संस्कृतांत द्व्यक्षरी प्रत्यय एकही नाहीं. मराठीमध्यें पंचमीचे ऊन आणि हून किंवा वास्तविक हून हाच, ( कारण कीं ऊन हा हुन या पासूनच निघाला असून स्वरादि असल्यामुळें बहुतेक एकाक्षरीच आहे, म्हटलें तरी चालेल, आणि शिवाय तो कांहीं शब्दांसच फक्त एकवचनीं लागतो, ह्यामुळें त्याची मुख्य प्रत्ययांत गणनाच केली नाहीं तरी चालेल. ) एक काय तो द्व्यक्षरी विभक्तिप्रत्यय मराठींत आहे. परंतु तो प्राकृत हिंतो या द्व्यक्षरी प्रत्ययापासून निघाला असून त्याबद्दल कांहीं वाद नाहीं. परंतु असा एक द्व्यक्षरी विभक्तिप्रत्यय मराठींत आहे म्हणून द्व्यक्षरी विभक्तिप्रत्यय मानण्यास हरकत नाहीं असें म्हटलें तर प्रत, लागीं, मुळ, इत्यादि अनेक द्व्यक्षरी शब्दयोगी अव्ययें प्रत्यय होऊं लागतील. तेव्हां हुन हा एकच द्व्यक्षरी विभक्तिप्रत्यय मराठींत आहे, यावरून वरील अनुमान न काढितां तद्विरुद्धच अनुमान काढिलें पाहिजे. म्हणजे त्या एकाच द्व्यक्षरी विभक्तिप्रत्ययामुळें द्व्यक्षरी विभक्तिप्रत्यय मानतां येत नाहींत असेंच म्हणणें चांगलें. या ठिकाणीं इंग्रजीतल्या म्हणीप्रमाणें 'ह्या अपवादानें नियमाची सत्यताच सिद्ध होत आहे ' असें म्हटलें पाहिजे. ह्यामुळें साठीं ह्यास प्रत्ययापेक्षां शब्दच म्हणणें बरें. आणि स, नां, यांनाच चतुर्थी म्हणणें अधिक प्रशस्त आहे असें ठरल्यामुळें चतुर्थीसाठीं ' साठीं ' किंवा दुसरा कोणता तरी नामधारी प्रत्यय शोधून काढून तिचे मांडीवर बसविण्याची आवश्यकता उरली नाहीं. तशी जर कोणाकरितां खटपट करण्याची जरूरी असेल तर ती चतुर्थीकरितां नसून द्वितीयेकरितां करावी लागेल. परंतु ह्या दिशेनें प्रयत्न करणेंच इष्ट नाहीं. प्राकृतांत चतुर्थी मानल्याशिवाय नाहीं भागत

काय ? त्याचप्रमाणें मराठींत स्वतंत्र द्वितीयेशिवाय का भागू नये ? जर एखाद्या भाषेंत एखादी विभक्ति स्वतंत्रपणें नसेल तर प्रथमा, द्वितीया, इत्यादि क्रम पुरा करण्यासाठीं कसें तरी करून त्या विभक्तीचें स्वतंत्र अस्तित्व कायम ठेवण्याचा प्रयत्न करणें ठीक नाहीं. ज्यां जर मराठीमध्यें परंपरेनें द्वितीयेचे प्रत्यय आलेच नाहींत आणि तिचें बहुतेक काम प्रथमेच्याच रूपांनीं होत आहे तर तिचा बहुतांशीं प्रथमेंत व अल्पांशीं चतुर्थींत लोप झाला आहे असेंच प्रांजलपणें कबूल करून चालणें उत्तम. अत एव गुंजीकरांचें सूचनेस थोडक्यांत उत्तर इतकेंच कीं, साठीं हें मूळचें एका शब्दापेक्षांही मोठें रूप आहे, त्यांतील शब्दालाही प्रत्यय म्हणतां येत नाहीं, त्यानें चतुर्थीचा एक दशांशही कार्यभाग उरकत नाहीं, आणि त्यांत दोन अक्षरें असून द्व्यक्षरी विभक्तिप्रत्यय संस्कृतांत तर मुळींच नाहींत आणि मराठींत फार तर एकाशिवाय दुसरा नाहीं; म्हणून साठीं ह्यास विभक्तिप्रत्यय म्हणण्यापेक्षां स्वतंत्र शब्दयोगी अव्ययच म्हणणें बरें. तसेंच स, ना, ह्यांस द्वितीयेपेक्षां चतुर्थी-विभक्ति मानणेंच अधिक सुयुक्तिक व प्रशस्त असल्यामुळें चतुर्थीकरितां वेगळे प्रत्यय शोधून काढण्याची जरूर नाहीं. आणि अखेरीस जेव्हां एखाद्या भाषेंत एखादी विभक्ति स्वतंत्रपणें आढळत नाहीं, मग ती द्वितीया असो वा चतुर्थी असो, तेव्हां विभक्तींमध्यें तिच्या लोपानें दिसणारी खूट कशी तरी भरून काढण्याचा प्रयत्न करणें उचित नाहीं, आणि इष्ट व आवश्यकही नाहीं. म्हणून संस्कृतांतल्या द्वितीयेशिवाय बाकीच्या सातच विभक्ति मराठींत आहेत हें उघड आहे. द्वितीया गेली म्हणून पुढील विभक्तींचीं नांवें बदलून घोंटाळा उत्पन्न करण्यापेक्षां प्राकृत व्याकरणास अनुसरून फक्त द्वितीयेच्या लोपानें होणारी खूट तशीच राखणें बरें; म्हणून येथें तृतीयेपासून विभक्तिसंज्ञांची पूर्वपरंपराच कायम ठेवण्यांत आली आहे, व ऐतिहासिकदृष्ट्या असेंच करणें योग्य आहे. ]

३१३. मराठींत सात विभक्ति आहेत. त्या व त्यांचे दोन्ही वचनीं प्रत्यय खालीं दिल्याप्रमाणें:—

| विभक्ति | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| प्रथमा | ........ | ........ |
| तृतीया | नें, शीं, ( एं ) | नीं, शीं, ( हीं ), ( ई ) |
| चतुर्थी | स, ला, ( तें ) | स, ला, नां, ( तें ) |
| पंचमी | हून | हून |
| षष्ठी | चा | चा |
| सप्तमी | त, ई, ( आं ) | त, ई, ( आं ) |
| संबोधन | ........ | नो |

३१४. आतां प्रथम हे प्रत्यय एका नामास लावून दाखवितों. कंसांत दिलेले प्रत्यय बहुधा प्रचलित गद्यांत सर्वत्र फारसे आढळत नाहींत. त्यांचा जुन्या गद्यांत व पद्यांत प्रचार फार दिसतो.

अकारान्त पुल्लिंगी देव शब्द.

| विभक्ति | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | देव | देव |
| तृ० | देवानें, देवाशीं, देवें | देवांनीं, देवांशीं, देवांहीं, देवीं |
| च० | देवास, देवाला, देवातें | देवांस, देवांला, देवांना, देवांतें |
| पं० | देवाहून | देवांहून |
| ष० | देवाचा | देवांचा |
| स० | देवांत, देवीं, | देवांत, देवीं |
| सं० | देवा | देवांनो |

३१५ प्रथमा विभक्तीस प्रत्यय नाहींत असें म्हणतात. हें म्हणणें प्रचलित गद्य भाषेसंबंधानें एकवचनीं अक्षरशः खरें आहे. कारण कीं, नामाचें मूळ रूप तेंच प्रथमेच्या एकवचनीं येतें. परंतु प्रथमेच्या अनेकवचनीं त्या रूपांत अनेक ठिकाणीं बदल होतो. परंतु व्यवस्थेच्या सोईसाठीं आपण पूर्वीं लिंगाप्रमाणें वचन हें प्रकरण अलग काढिलें आहे. तेव्हां नामाचें जें मूळ रूप एकवचन तेंच प्रथमेचें एकवचन व त्याचें जें अनेक वचन तेंच प्रथमेचें अनेक वचन होय. वास्तविक म्हटलें म्हणजे प्रथमेच्या अनेकवचनीं नामांचें मूळ रूप अनेक जागीं पालटतें. पण तें निरनिराळ्या नामांचें निरनिराळ्या रीतीनें पालटत असल्यामुळें प्रथमेच्या अनेकवचनींही प्रत्यय नाहीं असें म्हणतात. नामांच्या अनेकवचनीं कोठें कोठें काय काय विकार होतात हें वचनाध्यायांत सविस्तर आलेंच आहे.

( अ ) जोशी व खेर यांनीं प्रथमेच्या एकवचनीं ओ आणि ऊ असे दोन प्रत्यय दिले आहेत परंतु खुद्द जोशी हेच त्यांसंबंधीं म्हणतात कीं,' हे कवितेंत व जुन्या भाषेंत बहुधा अकारान्त पुल्लिंगी शब्दांस लागतात. तेव्हां त्यांचीं व्याप्ति किती विस्तृत आहे तें पहा ! ऐतिहासिकदृष्ट्या त्यांचें महत्त्व विशेष आहे. संस्कृतांत अकारान्त पुल्लिंगी शब्दांचें प्रथमेच्या एकवचनीं स् हा प्रत्यय लागून विसर्गान्त रूप होतें. त्यांतील अन्त्य ' अः चें ओ हें प्राकृत रूपान्तर होय. वृक्ष शब्दाचें सं० प्र० ए० व० वृक्षः ह्याचें प्राकृत

रूपान्तर वच्छो हें होय. ह्यांतील अन्त्य ओपासूनच जुन्या मराठी कवितेंत ओ आला व त्या ओ चा पुढें ऊ झाला. उपाय, भाव, इत्यादि शब्दांचीं उपायो, भावो, अशीं रूपें ( प्र० ए० व ) कवितेंत येतात'उपजला भावो॥ तुझें कृपें सिद्धी जावो ॥ तुकाराम. प्रचलित मराठींत जीं ओकारान्त पुल्लिंगी कांहीं नामें आढळतात, त्यांपैकीं बहुतेक मुळचीं अकारान्त होत. परंतु त्यांस हा ( प्र० ए० व० ) ओ प्रत्यय कायमचा चिकटल्यामुळें तीं ओकारान्त दिसूं लागली. डोहो, लाहो, मोहो, हे शब्द मूळचे डोह, लाह, मोह, असे अकारान्तच होत. तसेंच ओ पासून जो ऊ झाला तो लागून सागर, अंत, वात, ह्यांचीं सागरू, अंतू, वातू, अशीं रूपें कवितेंत येतात. परंतु ओचा जसा ओकारान्त पुलिंगी शब्दांत काईमचा छाप दृष्टीस पडत आहे, असा ऊ ह्याचा काईमचा छाप या ठिकाणीं आढळत नाहीं; तरी तो अन्यत्र आढळतो. राम, परशराम, बाळ, इ० नांवांचीं प्रेमळ व सलगीच्या भाषणांत जीं रामू, परसू, बाळू, अशीं, रूपें होतात तीं फक्त प्रथमेच्या एकवचनींच न येतां इतर सर्व विभक्तींत येतात. जसें:—परसूनें, रामूस, बाळूचा, इ०. अर्थात् राम, परशुराम, बाळ, इ० शब्दांचीं रामू, परसू बाळू, हीं ऊकारान्त रूपें अगदीं स्वतंत्रपणें ऊकारान्त शब्दच झाले म्हणावयाचे. त्याचप्रमाणें मूळ विसर्गाचा आणखी एक काईमचा छाप मराठींत आढळतो, तो आकारान्त पुल्लिंगी रूपांत होय. राम, दांत, बाळ, शिष्य, इत्यादिकांचीं रामा, दांता, बाळा, शिष्या, अशीं जीं आकारान्त रूपें आढळतात तीं संस्कृत प्र० ए० व० पासूनच आलेलीं आहेत. म्हणजे कांहीं संस्कृत शब्दांपासून मराठींत दोन दोन शब्द आले आहेत. एक त्यांच्या मूळ रूपापासून म्हणजे प्रातिपदिकापासून व दुसरा त्यांच्याच प्रथमेच्या एकवचनापासून. पुल्लिंगाप्रमाणें नपुंसकलिंगींही असा प्रकार आढळतो. उदाहरणें:—

| | प्रातिपदिक. | तद्भव मराठी. | सं० प्र० ए० व०. | तद्भव मराठी. |
|---|---|---|---|---|
| पु. | राम | राम | रामः | रामा |
| | दंत | दांत | दंतः | दांता |
| न. | दलन | दळण | दलनम् | दळणें |
| | मिश्रण | मिसळण | मिश्रणम् | मिसळणें |
| | बीज | बी ( स्त्री. ) | बीजम् | बीं ( न. ) |
| | इ० | इ० | इ० | इ० |

परंतु असे दोन दोन तद्भव शब्द, दळण, पोषण, राखण, इत्यादि ण प्रत्ययान्त क्रियावाचक नामांसंबंधानें व अकारान्त पुल्लिंगी नामासंबंधानेंच, फार आढळतात. अन्यत्र स्वरांत नामाच्या बहुधा प्रातिपदिकापासून व व्यंजनांत नामाच्या बहुधा प्रथमेच्या एकवचनापासून मराठींतील शब्दांची उत्पत्ति आहे.

३१६ तृतीयेचे नें व शीं हे प्रत्यय नेहमीं येतात. तथापि नें हा जितक्या अर्थांनीं लागतो तितक्या अर्थांनीं शीं हा लागत नाहीं. शीं हा बहुधा संनिधान दर्शवितो. अर्थासंबंधानें पूर्ण खुलासा पुढें कारक प्रकरणांत येईल.

नें--हा प्रत्यय संस्कृत ना पासून आला आहे. ह्याचें अनेकवचन नीं होय. हिंदीमध्यें ने हाच दोन्ही वचनीं येतो. ह्या प्रत्ययाची राजवाड्यांनीं कल्पिलेली द्राविडी प्राणायामी व्युत्पत्ति विद्वज्जनसंमत होण्यासारखी दिसत नाहीं.

शीं--ह्याची उत्पत्ति कोणी म्हणतात सह पासून, कोणी म्हणतात भिः पासून आहे. भिः पासून हीं हा अनेकवचनी प्रत्यय आला. त्यापासूनच वर्णविपर्यासानें सीं व नंतर शीं झाला ( गोडबोले ). गोडबोल्यांची ही व्युत्पत्ति ठीक दिसत नाहीं. स् च्या ठिकाणीं ह् येतो. परंतु ह्याच्या उलट प्रकार आढळांत नाहीं. एकूणसत्तर- एकूणसत्तर हें गोडबोल्यांनीं दिलेलें उदाहरण भ्रामक आहे. मूळ सप्तति, त्याचें झालें सत्तर व त्यापासून हत्तर. म्हणजे येथेंही हें मूळ ह् चा स झालेला नाहीं तर सचाच ह् झालेला आहे. तसेंच सह व शीं ह्यांचे उपयोगांत फारच थोडें सादृश्य असल्यामुळें हीही व्युत्पत्ति ठीक दिसत नाहीं.

एक तर, संस्कृत स्यपासून प्राकृतांत स्स आला. त्याचें मराठींत सिं असें रूप कवितेंत आढळतें. उदा०:—द्रोणासिं ( द्रोणास ) म्हणे गुरुजी कां आशाभंग करितसा माझा--मोरोपंत. ह्या सीं पासूनच शीं झाला असावा. स्य ह्याचा ज्या स्थळीं संस्कृतांत तृतीयेबद्दल उपयोग होतो, त्या स्थळीं मराठींत शीं येतो. जसें:--तेन किंवा तस्य तुल्यः, तेन किंवा तस्य सदृशः, ह्याबद्दल मराठींत त्याशीं किंवा त्याच्याशीं तुल्य, त्याशीं किंवा त्याच्याशीं सदृश असें म्हणतात. नाहींतर, आसपास असा जो एक शब्द आहे त्यांतील आस ह्याचें जें सप्तमी हें (पास चें जसें पाशीं तसें)

आशीं असें रूप होतें, त्यापासून शीं हा प्रत्यय त्याच अर्थानें झाला असावा. ह्या दोहोंपैकीं कोणत्या तरी एका मार्गानें शीं प्रत्ययांची उत्पत्ति झाली असावी असा आमचा तर्क आहे.

राजवाड्याचे मतें ' संस्कृत सम या शब्दाचें अपभ्रष्ट रूप सवँ असें होतें. सवँची एकवचनी सप्तमी सविँ, सवेँ अशी होते. सविँचें मराठी रूप सइँ व त्याचा अपभ्रंश सिं ' या मतामध्यें सवँ ( सम ) ह्याची सप्तमी कां होते व ती कोठें आढळते हें स्पष्ट नाहीं. ती केवळ राजवाड्यांची कल्पना असल्यास त्यांची व्युत्पत्ति शंकास्पदच ठरणार.

**एं**– हा प्रत्यय संस्कृत एन पासून आला आहे, आणि एन ह्या प्रत्ययाप्रमाणेंच एं हा फक्त एकवचनी असून बहुधा अकारान्त नामांस कवितेंत लागलेला आढळतो. जसें:—

कीं कोणाच्या **संगें** स्वविभागा सर्वथा पतन येतें—मोरोपंत
भगवन्नामोच्चारें सकळेंहि अघें सवासनें जळती—मोरोपंत.

परंतु कधीं कधीं आकारान्त स्त्रीलिंगी व ईकारान्त नपुंसकलिंगी नामांसही हा प्रत्यय लागलेला आढळतो. जसें:—

उपजला भावो ॥ तुझे **कृपें** सिद्धी जावो—तुकाराम.
नेलें रात्रीनें तें अर्धें ॥ बाळपण **जराव्याधें** ( व्याधीनें ) ॥ तुकाराम.

हा प्रत्यय लागतांना सर्वत्र पररूपसंधि होतो.

एं प्रत्ययान्त कांहीं रूपें प्रचलित गद्यांतही आढळतात. जसें:—त्यानें मला बळेंची धरिलें, वीरभद्र **नामें** एक राक्षस होता. इ०, योगें मुळें, प्रमाणें, द्वारें, इत्यादि ठिकाणीं हा तृतीयेचा एं प्रत्ययच चमकत आहे. तसेंच हा प्रत्यय कांहीं अव्ययांतही दिसतो. जसें:—पुढें, मागें, इ०

**हीं**—हा भिः पासून आला असून भिः प्रमाणेंच फक्त अनेकवचनीं लागतो, व बहुधा कवितेंत आढळतो. पण कधीं कधीं कांहीं देशस्थांचे बोलण्यांतही क्वचित् येतो.

**ईं**— हा हीं पासून झाला असून अनेकवचनीं कवितेंत येतो. जसें:— परि बहु बहु **कष्टीं** आणिलें चाप रंगीं. क्वचित् गद्यांत एकवचनींही आढळतो. जसें:—त्यानें ही गोष्ट मला **तोंडीं** सांगितली.

२१७. चतुर्थीचे प्रत्यय संस्कृत षष्ठीच्या प्रत्ययांपासून आले आहेत. कारण कीं, प्राकृतांत चतुर्थी नाहीं; तेव्हां तिचे जागीं षष्ठीचा उपयोग होतो.

**स**—हा **स्य** पासून प्राकृत स्स चे द्वारा मराठींत आला. जरी एक-वचनाचे प्रत्ययापासून ह्याची उत्पत्ति आहे, तरी तो दोन्ही वचनीं लागतो. ह्याचीं कवितेंत सि, सिं अशीं बहुधा ऱ्हस्व पण कधीं कधीं दीर्घही रूपें आढळतात. पत्रांचे व अर्जांचे मान्यांत **स** चें सीं किंवा शीं असें रूप आढळतें. जसें :—वडिलांचे सेवेशीं, सेवेशीं श्रुत होय, सेवेशीं अर्ज ऐसाजे, इ०.

राजवाड्यांचे मतें स हा प्रत्यय संस्कृत षष्ठीचे स्य ह्या प्रत्ययापासून निघाला नसून ' मराठींत आसपास असा एक शब्द आहे ' त्यांतील आस ह्याच्या सत्पमीच्या एकवचनी आसिं या रूपापासून तो निघाला आहे. परंतु **स** च्या **स्य** पानसूनचे व्युत्पत्तीस प्रतिकूल व स्वमतास अनुकूल असें जें त्यांनीं लिहिलें आहे तें सारखेंच असमाधानकारक आहे. ह्यामुळें त्यांचें ह्या प्रत्ययाचे उत्पत्तीबद्दलचें मत स्वीकारार्ह दिसत नाहीं.

**ला**—**स**पेक्षां याचा प्रचार फार आढळतो. हा प्रत्यय लागीं याचा शेष असावा असें कांहींचें मत आहे. आमच्या मतें तो ह्याच विभक्तीच्या **नां** या प्रत्ययापासून आला असावा. राजवाड्यांचे मतें ' हा ला फारसी रा ह्या चतुर्थींच्या किंवा द्वितीयच्या प्रत्ययापासून र चा ल उच्चार करून घेतलेला आहे.' एवंच ह्याची व्युत्पत्ति संदिग्ध आहे. ह्याचा अनेकवचना पेक्षां एक-वचनीं उपयोग फार आढळतो.

**तें**—हा कांहींच्या मतें सं० अंते=जवळ, शेजारीं, यापासून आला आहे. राजवाड्यांचें मतें हा प्रत्यय ' अर्थे ' ह्या संस्कृत शब्दापासून निघाला आहे. हा प्रत्यय कवितेंतच फार आढळतो.

**नां**—हा सं० षष्ठीचे बहुवचनीं ' नाम् ' प्रत्ययापासून आला आहे. मराठी नां हाही फक्त अनेकवचनीं आढळतो. या प्रत्ययावर कोणी बिंदु देतात कोणी देत नाहींत. ह्यांतील व्यंजन अनुनासिक असल्यामुळें बिंदूचा लोप होत चालला असावा. बिंदु देणें व्युत्पत्तिदृष्ट्या योग्य आहे.

चतुर्थींचा स हा सं० स्य पासून निघाला नाहीं हें दाखवितांना अखेरीस राजवाडे म्हणतात :—' तस्मात्, पुत्रस्य, पुत्राणाम्, ह्या षष्ठीच्या रूपांपासून मराठी चतुर्थींचीं रूपें निघालीं नाहींत.' नाम्‌बद्दल त्यांनीं आपल्या मताचे समर्थनार्थ एक शब्दही लिहिलेला आढळत नाहीं. फक्त पुत्रस्य या बरोबर पुत्राणाम् हें रूपही घुसडून दिलेलें दिसत आहे.

मोक्षार्थ, उदाहरणार्थ, प्रीत्यर्थ, हेत्वर्थ, इत्यादि संस्कृत शब्दांचे अन्तीं चतुर्थ्यर्थीं अर्थ हा शब्द आलेला दिसतो. त्याची दादोबांनीं मराठी चतुर्थीचे प्रत्ययांत गणना केली आहे. परंतु मूळ संस्कृतांतही अर्थ ह्याला कोणी विभक्तिप्रत्यय असें म्हणत नाहीं. शिवाय तो सर्व शब्दांचे अंतींही येत नाहीं. फक्त ऱ्हस्व स्वरान्त शब्दांचे अंतीं तो बहुधा आढळतो.

३१८. प्राकृतामध्यें हिंतो व सुंतो असे पंचमीचे प्रत्यय आहेत. त्यांपासून मराठींत हून आणि सून हे प्रत्यय आले आहेत. पैकीं सून हा फक्त कांहीं अशिक्षित जुन्या लोकांचे तोंडी आढळतो. पण तो मराठी शिष्ट भाषेंत येत नाहीं.

**हून**—हा प्रत्यय दोन्ही वचनीं लागतो. कवितेंत ह्यांचे हूनि असें छंदाच्या अनुरोधानें वाटेल तसें ऱ्हस्व दीर्घ केलेलें रूप आढळतें.

( अ ) या पासूनच **ऊन** हा एक पंचमीचा प्रत्यय आला आहे. परंतु तो कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात त्याप्रमाणें 'कांहीं थोड्याशा अकारान्त पुल्लिंगी व नपुंसकलिंगी शब्दांस मात्र लागतो. जसें:— घरून, हातून, तोंडून, गांवून, माहेरून, इ०.' म्हणून त्याचा सर्वसाधारणप्रत्ययमालिकेंत समावेश करितां येत नाहीं. हा प्रत्यय पररूप संधि होऊन लागतो.

घरून, हातून, तोंडून, ह्यांचीं घराहून, हाताहून, तोंडाहून, इत्यादिहून प्रत्ययान्तही पंचमीचीं रूपें होतात. परंतु ऊन प्रत्ययान्त व हून प्रत्ययान्त रूपांमध्यें कांहीं ठिकाणीं तरी अर्थदृष्ट्या फरक आहे. हातून, तोंडून, ह्यांचा हातानें, तोंडानें, असा अर्थ होतो परंतु हाताहून, तोंडाहून ह्याचा अपादानार्थीं किंवा बहुधा तुलनेच्या वेळीं उपयोग होतो.

( आ ) दादोबांनीं आणखी एक **तून** हा प्रत्यय पंचमीमध्यें दिला आहे. परंतु त्याची कांहीं आवश्यकता दिसत नाहीं. 'जसा ँत हा सप्तमीचा प्रत्यय मानावा, तसा ँतून हा साधिकरण अपादानार्थ ह्याचा वाचक पंचमीचा प्रत्यय मानल्यास व्याकरण करितेसमयीं पुष्कळ अडचणी दूर होतील.' 'असें न केलें तर व्याकरणपदच्छेद करण्यास मोठी अडचन पडेल' असें दादोबा म्हणतात. परंतु गांवांत, शेंगेंत, उत्तरेंत, हीं सप्तमीचीं रूपें एकदां सिद्ध झालीं म्हणजे त्यांस पुढें ऊन हा वरील प्रत्यय अपादानार्थीं लागतो असें म्हटलें म्हणजे झालें. म्हणजे ज्याप्रमाणें देशींचा, प्रांतीचा या शब्दांमध्यें

देशीं, प्रांतीं, ह्या सप्तमीच्या रूपांस चा हा षष्ठीचा प्रत्यय लागला आहे, त्याचप्रमाणें गांवांत, शेंगेंत, दक्षिणेंत, ह्या सप्तमीच्या रूपांस ऊन हा पंचमीचा प्रत्यय लागला आहे. ज्याप्रमाणें रामाच्यानें, तुमच्यानें, माझ्यानें ह्यांस **सविकरण तृतीया** असें म्हणतात, त्याचप्रमाणें देशींचा, प्रांतींचा, ही **साधिकरण षष्ठी**, आणि गांवांतून, शेंगेंतून, **ही साधिकरण पंचमी** असें म्हटलें म्हणजे झालें. त्यायोगें दादोबांची, व्याकरणपदच्छेद करण्याची मोठी अडचण ' ही दूर होतेच.

( ३ ) पंचमीचा हून हा प्रत्यय द्व्यक्षरी शब्दासारखाच किंवा शब्दयोगी अव्ययासारखाच कांहीं अंशीं असल्यामुळें म्हणजे संक्षिप्त किंवा आटपसर नसल्यामुळें पंचमीच्या अर्थीं बहुधा ' पासून ' ह्या शब्दयोगी अव्ययाचाच पुष्कळ उपयोग होतो.

३१९. षष्ठी विभक्तीचा **चा** प्रत्यय, मूळ **स्य** पासून निघालेला व विशेषणाप्रमाणें बदलणारा जो तद्धित **त्य** प्रत्यय त्याचे द्वारा मराठींत आला आहे. म्हणून **चा** हाही त्याशीं संबद्ध असणाऱ्या पुढील शब्दाचे लिंगवचनाप्रमाणें बदलतो. इतक्यापुरतें षष्ठी विभक्तीस विशेषणत्व आहे. षष्ठ्यन्त शब्दाचा संबंध वाक्यामध्यें ज्या शब्दाकडे असतो, त्यास **प्रतियोगी** असें म्हणतात, आणि त्याचे संबंधानें षष्ठयन्त नामास त्याचा **अनुयोगी** शब्द असें म्हणतात, असें दादोबा सांगतात. त्याप्रमाणें ' राजाचा वाडा ' या उदाहरणांत ' राजाचा ' हा अनुयोगी शब्द होय, आणि ' वाडा ' हा प्रतियोगी शब्द होय. या भाषेनें बोलावयाचें म्हणजे प्रतियोगी शब्दाचे लिंगवचनाप्रमाणें अनुयोगी शब्दांत दिसणारा षष्ठीचा **चा** प्रत्यय. चा—ची—चें ( एकवचन ) आणि चे—च्या—चीं ( अनेकवचन ), जसा षष्ठीचे दोन्ही वचनीं बदलतो. म्हणजे षष्ठीच्या एकवचनीं व अनेकवचनीं दोन्ही ठिकाणीं सहा रूपें येऊं शकतात. परंतु खेर यांनीं षष्ठीचे प्रत्यय देतांना चा, ची, चें, हेच षष्ठीच्या फक्त एकवचनाचे आणि चे, च्या, चीं, हेच फक्त षष्ठीच्या अनेक वचनाचे असे प्रत्यय दिले आहेत. जणु कांहीं घरांचा, घरांची, घरांचें, हीं घर शब्दाचीं षष्ठीचीं अनेकवचनी रूपें नव्हत आणि घराचे, घराच्या, घराचीं, हीं घर शब्दाचीं षष्ठीच्या एकवचनाचीं रूपें नव्हत. पण इतकें सूक्ष्म लक्ष पुरवावें कोणी !

संस्कृत भाषेंत विभक्तिप्रत्यय हे चरम प्रत्यय होत असें मानिलें आहे. म्हणजे विभक्तिप्रत्ययान्त शब्दांस दुसरे कोणतेही प्रत्यय लगत नाहींत. हा नियम संस्कृत भाषेंतही सर्वथा निरपवाद नाहीं. तर मग मराठींत तरी तो सर्वथा निरपवाद कसा असेल ! मराठीमध्यें षष्ठीच्या व सप्तमीच्या प्रत्ययांशिवाय इतर विभक्तींच्या प्रत्ययांस चरम प्रत्यय म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु गेल्या अंकांत सांगितल्याप्रमाणें षष्ठीच्या व सप्तमीच्या प्रत्ययांनंतर मराठींत आणखी प्रत्यय लागतात. जसें:—रामाच्यानें, रामाच्यास, रामाहून, प्रांतींहून, प्रांतींचा, इ०. अशा प्रकारें षष्ठयन्त शब्दास ज्या विभक्ति लागतात, त्यांस **सविकरण तृतीया, सविकरण चतुर्थी,** इ० असें म्हणतात. षष्ठयन्त शब्दास षष्ठीशिवाय इतर सर्व विभक्ति लागतात; म्हणजे सविकरण षष्ठी तेवढी बहुधा होत नाहीं. 'रामाच्याचा' असें रूप सहसा फारसें आढळत नाहीं. परंतु सप्तम्यन्त शब्दास फक्त पंचमी व षष्ठी ह्या विभक्ति लागतात; तेव्हां त्यांस **साधिकरण पंचमी** व **साधिकरण षष्ठी** असें म्हणतात.

टीप—ह्यांपैकीं सविकरण विभक्तींची उपपत्ति अशी. रामाच्यानें, रामाच्यास, इत्यादि रूपांमध्यें एक नाम गुप्त आहे. 'माझ्या भावास नोकरी मिळाली, पण तुमच्या भावास अद्याप मिळाली नाहीं.' ह्या ठिकाणीं 'तुमच्या भावास,' असें म्हटल्यानें 'भावास' या शब्दाची द्विरुक्ति होते. ती टाळण्यासाठीं संक्षेपानें 'तुमच्यास' असें म्हणण्याचा प्रघात पडला आहे. संस्कृतांतही असा प्रकार आढळतो. मृगनयना म्हणजे मृगस्य नयने इव नयने यस्याः सा=मृगाच्या डोळ्यांप्रमाणें डोळे आहेत जिचे ती. ह्या विग्रहाप्रमाणें मृगनयननयना असा वास्तविक समास झाला पाहिजे. परंतु संक्षेपानें मृगनयना असें रूप होतें. इंग्रजींतही षष्ठयन्त नामानंतर पूर्वीं गेलेल्या नामाची द्विरुक्ति टाळण्यासाठीं तें नाम गाळण्याची चाल आहे. हें तज्ज्ञांस स्मरेलच. यावरून रामाच्यानें=रामाच्या शक्तिनें अ० रामाच्या हातानें; रामाच्या=रामाच्या भावास इ० अशा प्रकारें सविकरण विभक्तिरूपामध्यें अन्तींचा विभक्तिप्रत्यय हा वास्तविक त्याच्या मागल्या षष्ठयन्त नामास लागलेला नसून त्यानंतर जें नाम गुप्त असतें त्यास तो मूळचा लागलेला आहे हें उघड आहे; आणि ह्या गुप्त किंवा लुप्त सविभक्तिक प्रतियोगी शब्दाचे योगानें मागल्या अनुयोगीचें नेहमींप्रमाणें सामान्यरूप झालेलें आहे. परंतु ही सविकरण विभक्तींची उपपत्ति जरी यथार्थ आहे आणि अद्यापही जरी त्यांचा तसा उपयोग आढळतो तथापि केवळ साध्या रूपांचे ठिकाणींही सविकरण विभक्तींची रूपें उपयोगांत येतात. म्हणजे प्रतियोगीचा अध्याहार विवक्षित नसतांही अथवा प्रतियोगीचीच ज्या ठिकाणा आकांक्षा

नसते, त्या ठिंकाणींसुद्धां सविकरण विभक्तींचीं रूपें किंवा सविकरण सामान्यरूपापुढें शब्दयोगी अव्ययें येतात. जसें:—रामाहून गोविंदा हा अधिक हुषार आहे किंवा रामापेक्षां गोविंदा हा अधिक हुशार आहे, मी आपणाला. भेटावयास आलों होतों; असें म्हणण्याचे जागीं रामाच्याहून किंवा रामाच्यापेक्षां गोविंदा, मी आपल्याला भेटावयास इ० असेंही म्हणण्याचा प्रचार आहे. या ठिकाणीं रामाच्या आपल्या ह्या सविकरण सामान्यरूपापुढें कांहीं प्रतियोगी नाम अध्याहृत आहे असें म्हणतां येत नाहीं. असें आहे तरी म्हणजे सविकरण विभक्तींचीं रूपें जरी व्यर्थ उपयोगांत आलेलीं आढळतात, तरी त्यांचा असा व्यर्थ उपयोग दिवसेंदिवस कमी प्रमाणावरच आढळत आहे. तेव्हां ह्या सविकरण रूपांच्या उत्पत्तिच्या दृष्टीनें पहिलें असतां पष्ठीचा चा प्रत्यय हाही मूळचा चरम प्रत्ययच होय. परंतु संक्षिप्तभाषाप्रचारामुळें ह्याचें चरमत्व नष्ट झाल्यासारखें दिसतें.

साधिकरण पंचमी व साधिकरण षष्ठी ह्यांची मात्र अशी समाधानकारक उपपत्ति देतां येत नाही.

३२०. सप्तमीच्या प्रत्ययांची व्युत्पत्ति अशी:—

**त**—हा प्रत्यय ँत म्हणजे बिंदुपूर्व किंवा अनुनासिकपूर्व असा आहे. परंतु बिंदूच्या पूर्वीं स्वर आल्यावांचून त्याचा उच्चार होत नाहीं. ह्यामुळें **त** हा प्रत्यय लागण्यापूर्वीं मागील अक्षर सानुनासिक होतें. हा प्रत्यय संस्कृत अन्तर ह्याजपासून उत्पन्न झालेल्या आंत ह्या अव्ययाचे द्वारा आलेला आहे म्हणून त्याची कोणी प्रत्ययांत गणना करित नाहींत. परंतु देवांत, घरांत, इत्यादि अकारान्त पुल्लिंग व नपुंसकलिंग शब्दांसंबंधानें जरी त्यास प्रत्यय समजण्याची जरूर नाहीं असें वाटलें, तथापि दक्षिणेंत, उत्तरेंत, भिंतींत, काठींत, सास्वेंत, इ० अनेक ठिकाणीं आंत ह्या शब्दयोगी अव्ययाचा आद्य **आ** लुप्त झाला आहे असें म्हणण्यापेक्षां अनुनासिकपूर्व **त** ह्यास सप्तमीचा प्रत्यय मानणेंच बरें. शिवाय हा जर सप्तमीचा प्रत्यय मानिला नाहीं, तर या विभक्तीचा सर्व शब्दांस लागणारा एकही प्रत्यय उरणार नाहीं. हें पुढील प्रत्ययांचे खुलाशावरून कळेलच.

**ईं**—हा प्रत्यय सर्व शब्दांस लागत नाहीं. तो संस्कृतांतील सप्तमीच्या इ प्रत्ययापासूनच आलेला आहे. परंतु ईं हा मराठी प्रत्यय बहुधा अकारान्त पुल्लिंगी व नपुंसकलिंगी नामांस मात्र लागतो; व त्याचा प्रचार गद्यापेक्षां पद्यांत फार. गद्यांतही हा कांहीं शुब्दांस नेहमीं लागलेला आढळतो. जसें: घरीं, दारीं, देशीं, वेळीं, अवेळीं, दुपारीं, दिवशीं, हातीं, पदरीं, समयीं, इ०

(अ) कांहीं अकारान्त स्त्रीलिंगी नामांस व आकारन्त नामांसहीं हा प्रत्यय लागलेला क्वचित् आढळतो, जसें:—रात्रीं, सकाळीं, गळा गळीं, जागा-जागीं, इ.

**आं** —हा प्रत्यय फारच थोडया अकारान्त पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आणि आकारान्त पुल्लिंगी नामांस लागतो. जसें—हातांपायां पडला, गळां पडला इ०.

(अ) ह्याचा प्रचार गद्यांतल्यापेक्षां पद्यांत अधिक.

**गळां** तुळशीहार, कांसे पीतांबर। आवडे निरंतर, हेंचि ध्यान ॥ तुकाराम.
त्याचे **माथां** जटा असो नसो ॥ तुकाराम ॥

(आ) आ हा प्रत्यय क्वचित् तृतीयेच्या अर्थींही कवितेंत येतो.
देखिला त्रिभुवननाथ डोळां (डोळ्यांनीं)—श्रीधर,
देखोनि डोळां (डोळ्यांनीं) हृदयाभिरामा..............

३२१. बरेच विभक्तिप्रत्यय कांहीं अव्ययांतही आढळतात. ते असे:—
नें—मागनें, पुढनें, खालनें, इ०
एं—पुढें, मागें, इ०.
स—इकडेस, तिकडेस, इ०.
ऊन—खालून, वरून, मागून, पुढून, इ०.
ई—खालीं, पाशीं, पूर्वीं, आधीं, इ०.
यावरून त्या त्या अव्ययांत मूळचा शब्द कोणता हें स्पष्ट दिसतें.

३२२. संबोधनास एकवचनीं प्रत्यय नाहीं. तथापि येथें प्रथमेच्या एकवचनाचाच उपयोग नेहमीं होत नाहीं. तर संबोधनाचे एकवचनीं रूपाबद्दल साधारणपणें असा नियम आढळतो कीं, नामाचें जें एकवचनीं सामान्यरूप तें बहुधा संबोधनाचे एकवचनीं येतें, जसें:—देवा, डोळ्या, विद्ये, वांसरा, गऱ्हा, इ०.

**नों** — हा प्रत्यय संबोधनाचे बहुवचनीं येतो. संस्कृत हस्तिनः, करिणः, राजानः, इत्यादि संबोधनाचे बहुवचनीं रूपांतील अन्त्य अक्षराचे रूपान्तरानें हा झाला असावा असें वाटतें. ह्याचेवरील बिंदु बहुतेक उडालाच आहे.

[ दुसऱ्यास हाक मारण्याचे वेळीं किंवा त्याचें लक्ष आपणाकडे ओढून घेण्याकरितां संबोधनाचा उपयोग होतो. केवलप्रयोगी अव्ययाप्रमाणें संबोधनान्त शब्दांचा वाक्यार्थाशीं प्रत्यक्ष संबंध फारसा नसल्यामुळें संबोधनास विभक्ति म्हणूं नये असें कांहींचें मत आहे. तथापि जर नामांची त्या अर्थीं स्वतंत्र रूपें आढळतात तर संबोधन ही स्वतंत्र विभक्तिच मानणें चांगलें. ]

३२३. आतां नामें कशीं चालतात म्हणजे त्यांस विभक्तिप्रत्यय कसे लागतात तें पाहूं. ज्या मूळरूपास विभक्तिप्रत्यय लावावयाचे असतात, त्यास त्या प्रत्ययांसंबंधानें **अंग** असें म्हणतात. मराठीमध्यें नामाचें मूळ रूप तेंच प्रथमेचें एकवचन हें पूर्वीं सांगितलेंच आहे. तेव्हां प्रथमेचें जें एकवचन तेंच मूळ रूप आणि तेंच बहुधा अंग होय. ( यांतील 'बहुधा' शब्दांचें महत्व अं० ३२६ वरून कळेल. ) देव या नामास वर विभक्तिप्रत्यय लावून दाखविले आहेत यावरून देव हेंच मूळ रूप, तेंच प्रथमेचें एकवचन, व तेंच अंग होय असें कळेल. असेंच अन्यत्र समजावें.

३२४. अंगास विभक्तिप्रत्यय लावण्यापूर्वीं बहुतेक ठिकाणीं त्यास कांहींना कांहीं तरी विकार होतो. कांहीं ठिकाणीं अंगास प्रत्यय लागतांना अंग अगदीं अविकृत राहतें.

३२५. प्रथमेच्या अनेकवचनीं अंगास जे विकार होतात ते वचनाध्यायांत सांगितलेंच आहेत. इतर सर्व विभक्तींसंबंधानें कांहीं स्थळीं अंगास दोन्ही वचनीं एकच विकार होतो, आणि कांहीं स्थळीं एकवचनीं एक आणि अनेकवचनीं एक असें दोन विकार होतात. परंतु दिलेल्या अंगास दोन्ही वचनीं एकच विकार होवो अथवा दोन वचनीं दोन निरनिराळे विकार होवोत, प्रथमोत्तर सर्व विभक्तींत तेच विकार सर्वत्र आढळतात. म्हणून विभक्तिप्रत्ययक्षम, म्हणजे विभक्तिप्रत्यय लागण्यास अगदीं तयार झालेलें जें अंगाचें रूप त्यास **सामान्यरूप** असें म्हणतात. कांहीं शब्दांचें सामान्यरूप दोन्ही वचनीं समान असतें; व कांहींचें भिन्न भिन्न असतें. संबोधनाचे एकवचनीं प्रत्यय नाहीं; शब्दाचें जें एकवचनीं सामान्यरूप तेंच त्याचे संबोधनाचे एकवचन होय.

३२६. यावरून असें दिसून येईल कीं, अंग, बहुवचन, एकवचन, सामान्यरूप, आणि बहुवचनीं सामान्यरूप ह्या चार गोष्टी माहीत झाल्या म्हणजे कोणत्याही विकृतांग शब्दास विभक्तिप्रत्यय लावून दाखविणें अगदींच सोपें. अविकृतांग शब्दांसंबंधानें या चारी गोष्टी एकच. तेव्हां त्यास विभक्तिप्रत्यय लावण्याचे कामीं कांहींच अडचण नाहीं. संस्कृत भाषेंत शब्द व अंग हीं दोन भिन्न भिन्न असण्याचा संभव असतो. मराठीमध्यें मूळ शब्द प्रथमेचें एकवचन, आणि अंग, हीं बहुधा एकच असतात. तेव्हां अंग, बहुवचन, आणि दोन सामान्यरूपें, ह्यांपैकीं शब्दापासून अंग

हें मराठींत बहुधा भिन्न नसल्यामुळें वरील चार गोष्टींपैकीं नामें चालविण्यास मराठींत बहुवचन व सामान्यरूपें या तीनच गोष्टींच्या माहितीनें बहुधा कार्य भागतें.

(अ) संस्कृतांतून मराठींत आलेल्या तत्सम नामांपैकीं कांहीं नामें व्यंजनान्त आहेत. जसें:—विद्वान्, भगवान्, श्रीमान्, सरित्, इ०. हीं नामें चालवितांना त्यांचें सामान्यरूप मराठींतील अकारान्त नामांप्रमाणें होतें. म्हणून या व्यंजनान्त नामांचें अंग अकारान्त मानिलें पाहिजे. एवंच कांहीं थोडयाशा व्यंजनान्त नामांसंबंधानेंच मूळ शब्दापासून अंग हें भिन्न आहे असें मराठींत समजलें पाहिजे. अन्यत्र मूळ शब्द आणि अंग एकच. म्हणून मूळ शब्द व अंग हीं मराठींत 'बहुधा' एकच असतात असें म्हटलें आहे. विद्वान्, भगवान्, इ० व्यंजनान्त शब्दांचें अंग विद्वान, भगवान, असें अकारान्त होऊन ते अकारान्त शब्दांप्रमाणें चालतात. त्यांचें प्रथमेचें एकवचन नेहमींच्या नियमाप्रमाणें मूळ रूपच होय. संबोधनाचे एकवचनींही त्यांचें एकवचनीं सामान्यरूप सहसा न येतां मूळ रूपच येतें. जसें:—हे विद्वान्, हे भगवान्, इ०. क्वचित् ह्यांचें एकवचनी सामान्यरूपी नेहमींप्रमाणें संबोधनाचे एकवचनीं योजितात आणि क्वचित् त्यांचीं संस्कृतसंबोधनाचीं एकवचनाचीं रूपें मराठींत तशींच उपयोगांत येतात. जसें:—हे विद्वाना अ० भगवाना, किंवा हे विद्वान् किंवा हे भगवन्, इ०.

३२७. अनेकवचन व दोन वचनांचीं सामान्यरूपें ह्या तीन गोष्टींपैकीं अनेकवचन हें मागल्या वचनाध्यायांत सांगितलेंच आहे. तेव्हां आतां येथें फक्त दोन वचनांचीं सामान्यरूपें तेवढीं सांगावयाचीं. कांहीं शब्दांचीं दोन्हीं वचनांचीं सामान्यरूपें समान असतात; आणि कांहींचीं मात्र निरनिराळीं असतात हें पूर्वीं सांगितलेंच आहे.

(अ) अविकृतांग शब्दांसंबंधानें कांहींच समजण्याची जरूर नाहीं. कारण त्यांचें जें मूळ रूप तेंच ह्यांचें अनेकवचन, व तेंच त्यांचें दोन्ही वचनीं येणारें सामान्यरूप होय.

(आ) विकृतांग शब्दांपैकीं सर्व पुल्लिंगी आणि नपुंसकलिंगी नामांचें दोन्ही वचनी एकच सामान्यरूप असतें. तेव्हां पुल्लिंगी व नपुंसकलिंगी शब्दांचे दोन्ही वचनीं येणारें एकच सामान्यरूप या अध्यायांत सांगावयाचें.

( इ ) फक्त कांहीं स्त्रीलिंगी नामांचें एकवचनीं एक व अनेकवचनीं एक अशीं दोन सामान्यरूपें होतात. परंतु ह्या दोन सामान्यरूपांपैकीं अनेकवचनीं सामान्यरूप हें त्याच शब्दांचे अनेकवचनाप्रमाणें असतें. आणि मागल्या वचनाध्यायांत अनेकवचनी रूपें सांगितलीं आहेत. तेव्हां ह्या स्त्रीलिंगी शब्दांसंबंधानेंसुद्धां आतां फक्त त्यांचे एकच ( एकवचनी ) सामान्यरूप सांगितलें म्हणजे झालें.

( ९ ) म्हणून या अध्यायांत तिन्ही लिंगी नामांपैकीं विकृतांग शब्दांचें फक्त एकवचनीं येणारें सामान्यरूप सांगितलें म्हणजे कोणतेही नाम चालवितां येण्यास अडचण राहिली नाहीं.

३२८. विभक्तिप्रत्यय लागण्यापूर्वीं अंगास जें सामान्यरूप होतें, म्हणून येथपर्यंत सांगितलें तें फक्त व्यंजनादि ( व्यंजनांनीं आरंभ होणाऱ्या ) प्रत्ययांपूर्वीं होतें, स्वरादि ( स्वरांनीं आरंभ होणाऱ्या ) प्रत्ययांपूर्वीं होत नाहीं, तर अंगाचे पुढें स्वरादि प्रत्यय आला असतां पररूप संधि होऊन विभक्तीचें रूप बनतें.

**टीप**—‘ वर्तमान मराठींतील सामान्यरूप ज्ञानेश्वरी मराठींतील विभक्तिरूपांवरून निपजलें आहे.’ राजवाडे.

३२९. प्रथमोत्तर सर्व विभक्तींच्या अनेकवचनप्रत्ययांपुर्वीं आणि सप्तमीच्या **त** ह्या प्रत्ययापूर्वीं एकवचनींही मागल्या स्वरास अनुनासिकत्व येतें.

**टीप**—राजवाडे ह्यांचे मतें मराठींतील अनेकवचनीं येणारा अनुनासिक संस्कृतांतील आन् प्रत्ययापासून आन् — आँ — ँ अशा परंपरेनें आला आहे. राजवाड्यांचा हा तर्क कितपत साधार आहे ँ आजच सांगतां येत नाहीं.

**सूचना**—शब्दांच्या अन्त्यास व उपान्त्यास होणारे विकार वचनाध्यायाचे अंतीं सांगितले आहेत, शब्द चालवितांना ते ध्यानांत ठेवावे.

३३०. आतां विकृतांग शब्दांचे सामान्यरूप कसें होतें तें पाहूं. येथें फक्त एकवचनीं सामान्यरूपाचाच विचार आहे. कारण कीं, अनेकवचनी ज्यांचें सामान्यरूप होतें, तें त्यांच्याच प्रथमेच्या अनेकवचनाप्रमाणें असतें, आणि अनेकवचन मागल्या अध्यायांत आलें आहे. म्हणून पुढील सर्व विवेचन एकवचनी सामान्यरूपासंबंधाचेंच आहे हें विसरू नये.

३३१. सामान्यरूपाचे अन्त्य स्वरावरून त्याचे मुख्य चार प्रकार होतात. आकारान्त, ईकारान्त, ऊकारान्त, आणि एकारान्त. त्यांचे पोट-

भेद आणि त्यांत समाविष्ट होणारे शब्द हें आतां अनुक्रमें सांगतों. त्यापूर्वी प्रथम इतकेंच सांगावयाचें कीं, सामान्यरूपाचें मुख्य भेद ज्याप्रमाणें त्यांच्या अन्त्यस्वरावरून करण्यांत येतात, त्याप्रमाणें त्यांचे पोटभेद हे अंगास होणाऱ्या तत्तत्स्वरान्त आदेशावरून करितात. न्यायशास्त्राचें भाषेनें सांगावयाचें म्हटलें ह्मणजें सामान्यरूपाचें वर्गीकरणांत अन्त्य स्वर हा जातींचा भेदक धर्म होय आणि अंगाचें अन्त्य स्वरास होणारा आदेश हा त्यांचा उपजातीचा भेदक धर्म होय.

३३२. आकारान्त सामान्यरूपाचें सहा उपभेद आहेत, हे उपभेद वर सांगितल्याप्रमाणें अंगाच्या अन्त्य स्वरास, आ, या, वा, इया, उवा, अवा असें जे निरनिराळे सहा आकारान्त आदेश होतात त्यांवरून उत्पन्न होतात. त्यांत स्त्रीलिंगाशिवाय इतर दोन्ही लिंगांचें बहुतेक विकृतांग शब्द येतात. हे सहा उपभेद अनुक्रमें घेऊन त्यांचीं उदाहरणें देतों.

(अ) **वर्ग १. उपभेद १**—अंगाचे अन्त्य स्वरास **आ** आदेश होणारे शब्द.

( १ ) अकारान्त पुल्लिंग शब्द. उदा०:--पाट.

| विभक्ति. | एकवचन. | अनेकवचन. |
|---|---|---|
| प्रथमा | पाट | पाट |
| तृतीया | पाटानें, पाटाशीं | पाटांनीं, पाटांशीं |
| चतुर्थी | पाटास, पाटाला | पाटांस, पाटांला, पाटांनीं |
| पंचमी | पाटाहून | पाटांहून |
| षष्ठी | पाटाचा | पाटांचा |
| सप्तमी | पाटांत | पाटांत |
| संबोधन | पाटा | पाटांनो |

**अपवाद १**—मूळाक्षरांचीं नांवें किंवा अक्षरांचीं नांवें ह्यांच्यासारखे जे एकाक्षरी शब्द ते अविकृतांग असतात. जसें:--**कला** काना दे, **बवर** मात्रा दे, **अनें बपासून** पांचशें रुपयें कर्जाऊ घेतले; इ०.

**अपवाद २**—अकारान्त देशवाचक विशेषनामें विकल्पेंकरून अविकृतांग ठेवण्याचा मराठीचाच आजकालचा कल दिसतो. जसें:--इंग्लंडचा, इंग्लंडहून, इंग्लंडनें, हिंदुस्थानचा, हिंदुस्थानला, बंगालहून, बंगालनें, इ० मात्र चतुर्थीच्या स आणि सप्तमीच्या त ह्या प्रत्ययापूर्वी त्यांस नियमाप्रमाणें अवश्य विकार होतात. जसें:-इंग्लंडांत, इंग्लंडांस, हिंदुस्थानांत,

हिंदुस्थानास, इ०. बंगाल ह्याचीं सामान्यरूपयुक्त रूपें करावयाचीं असतां त्याचें बंगाला असें अंग होऊन तो आकारान्त पुल्लिंगी नामांप्रमाणें (वर्ग १. उपभेद २) बंगाल्यानें, बंगाल्यांत, इ० असा चालतो. परंतु 'बंगाली' ह्या ईकारान्त शब्दाची तशीच विभक्तिरूपें होत असल्यामुळें 'बंगाल' ह्या देशवाचक नामाचीं हीं सामान्यरूपयुक्त रूपें लुप्त होत चाललीं आहेत.

**अपवाद ३**--परभाषेंतील नामें व विशेषनामें आणि क्वचित् स्वभाषेंतीलही विशेषनामें यांचें सामान्यरूप न करण्याकडे शिष्ट लोकांची होत चालली आहे असें दिसतें. उदा०:—कमिशनरचा दौरा, हुमायूननें स्वारी केली, बाळाजी विश्वनाथची कारकीर्द, ज्ञानप्रकाशचा अंक, इ०.

**अपवाद ४**---सन्मानार्थी बहुवचन असतां त्या शब्दाचें संबोधन प्रथमेच्या एकवचनाप्रमाणेंच होतें. जसें:—गोविंदराव, इकडे या हरिपंत, तुम्हांस हें माहीत आहे का हो? इ०.

टीप १---हात, ताड, घर, मूळ, वेळ, काळ, रान, जंगल, पाठ, पोट पदर, प्रकार, सरकार, दरबार, इत्यादि कांहीं अकारान्त पुल्लिंगी व नपुंसकलिंगी शब्दांस षष्ठीचा चा प्रत्यय सामान्यरूप न करितां लावितात. जसें:---हातचा, तोंडचें, घरचा, प्रकारचा, दरबारची, इत्यादि. सामान्यरूपविरहित या चा प्रत्ययान्त रूपांस विशेषणत्व अधिक आहे. ह्यांची सामान्यरूपयुक्त निराळीं चा प्रत्ययान्त रूपें नियमितपणें होतातच. जसें :---घराचा, तोंडाचा, प्रकाराचा, दरबाराची, इ०. हींच षष्ठीविभक्तींचीं मुख्य रूपें होत. या दोन प्रकारच्या रूपांचा उपयोग भिन्न आहे. सामान्यरूपयुक्त रूप साधारणपणें जिकडे तिकडे बहुधा उपयोगांत येतें. परंतु बऱ्याच शब्दांचे सामान्यरूपरहित रूप फक्त कांहीं विशेष ठराविक भाषा प्रचारांतच बहुधा आढळतें. जसें :---हातचा मळ, तोंडचे पाणी, घरचा माल, मूळची संपत्ति, त्या वेळची गोष्ट निराळी, पदरचें मोडणें, ही रचना दोन प्रकारची आहे, इ०. परंतु सरकार, दरबार, अशा प्रकारच्या परकी शब्दांची सामान्यरूपरहित रूपेंच साधारण भाषेंत विशेष प्रचारांत आहेत. ह्याचें कारण बहुधा त्यांचें परकीयत्व हें असावें ह्या परकी शब्दांस स आणि त या दोन प्रत्ययांशिवाय इतर प्रत्ययही सामान्यरूप न होतां लागतात. जसें :—सरकारला, दरबारनें, पार्लमेंटहून;. काउन्सिलनें. इ०.

( २ ) अकारान्त नपुंसकलिंगी सर्व नामें. उदा०:—

| वि० | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | घर | घरें |
| तृ० | घरानें, घराशीं | घरांनीं, घरांशीं |
| स० | घरा | घरानों |

**सूचना**—येथून पुढें सर्व विभक्तींचीं रूपें देऊन व्यर्थ जागा न अडवितां फक्त प्रथमा, तृतीया व संबोधन, या तीन विभक्तींचीं रूपें दिलीं आहेत. बाकीच्या विभक्तींचीं रूपें तृतीयेच्या रूपांप्रमाणें सहज बनवितां येतील.

**अपवाद**—देशग्रामशहरादिवाचक अकारान्त नपुंसकलिंगी नामें विभक्तिप्रत्ययांपूर्वीं अविकृत ठेवण्याचा नवीन प्रचार पडत चालला आहे. जसें:—नागपुरचा, म्हैसूरला, इंदोरहून, इ०.

**टीप**—अकारान्त पुल्लिंगी शब्दाचे वर सांगितलेले अपवाद २ व अप. ३ आणि अकारान्त नपुंसकलिंगी शब्दांचा हा अपवाद, यांत येणाऱ्या सर्व नामांचें, चतुर्थीच्या स व सप्तमीच्या त ह्या दोन प्रत्ययांपूर्वीं मात्र, सामान्यरूप अवश्य होतें. जसें:— अकबरास, अकबरांत, जपानास, जपानांत, नागपुरास, नागपुरांत, इ०. ह्याचें कारण असें दिसतें कीं, जर ह्या प्रत्ययांपूर्वीं सामान्यरूप झालें नाहीं तर त्या प्रत्ययांनीं साधणाऱ्या रूपांत अंती दोन अकारान्त अक्षरें लागोपाठ येऊन उच्चारास अवघडपणा येईल. म्हणून उच्चारसौकर्याचे दृष्टीनें प्रकृत प्रत्ययांपूर्वीं सामान्यरूप होणें अवश्य आहे हें उघड आहे. शिवाय त हा प्रत्यय मूळचा आंत या शब्दयोगी अव्ययापासून निघाला असल्यामुळें ह्या अकारान्त शब्दांचें सामान्यरूप होणें स्वाभाविक आहे.

( ३ ) ऊकारान्त पुल्लिंगी कांहीं थोडेसे शब्द. उदा०:—तट्टू

| वि०. | ए० व०. | अ० व०. |
|---|---|---|
| प्र० | तट्टू | तट्टू |
| तृ० | तट्टानें, तट्टाशीं | तट्टांनीं, तट्टांशीं |
| सं० | तट्टा | तट्टांनों |

या प्रकारचे आणखी शब्द:—परभू, वाटसरू, यात्रेकरू हे शब्द अविकृतांग शब्दांचे वर्गांतही विकल्पानें जातात. तेव्हां त्यांचीं रूपें अर्थात् अशीं:—

| | | |
|---|---|---|
| प्र० | तट्टू | तट्टू |
| तृ० | तट्टूनें, तट्टूशीं | तट्टूंनीं, तट्टूंशीं |
| सं० | तट्टू | तट्टूंनों |

( ४ ) ऊंकारान्त नपुंसकलिंगी कांहीं नामें. उदा०:—वांसरूं,

| | | |
|---|---|---|
| प्र० | वांसरूं | वांसरें |
| तृ० | वांसरानें, वांसराशीं | वांसरांनीं, वांसरांशीं |
| सं० | वांसरा | वांसरांनों |

या प्रकारचीं आणखी नामें—मेंढरूं, रेडकूं, शिंगरूं, गुरूं, टिपरूं, शेरडूं, करडूं, घुंगरूं, निंबूं, परसूं, मांजरूं, रताळूं, रांडरूं, लेंकरूं, वाघरूं पिलूं, फाळेटूं, पांखरूं, इ०.

कुसूं, सुकाणूं, जिवाणूं, हीं नामें वासरूं शब्दाप्रमाणें विकल्पानें चाल-तात. म्हणजे वर दिलेल्या रूपांप्रमाणें त्यांचीं रूपें होऊन शिवाय ते शब्द आकारान्त सामान्यरूपाचे याच वर्गाच्या तिसऱ्या ( इ ) व सहाव्या ( ऊ ) ह्या उपभेदांत जातात. ह्यामुळें त्यांचीं एकंदर रूपें अशीं:—

| | | |
|---|---|---|
| प्र० | सुकाणूं | सुकाणें, सुकाण्वें, सुकाणवें |
| तृ० | सुकाणानें, सुकाण्वानें सुकाणवानें | सुकाणांनीं, सुकाण्वांनीं सुकाणवांनीं |
| | सुकाणाशीं, सुकाण्वाशीं सुकाणवाशीं | सुकाणांशीं, सुकाण्वांशीं, सुकाणवांशीं |
| सं० | सुकाणा, सुकाण्वा, सुकाणवा | सुकाणानो, सुकाण्वांना सुकाणवांनो |

( ५ ) वन्सें हा स्त्रीलिंगी शब्द. हा फक्त अनेकवचनीं चालतो. ह्याचे अन्त्य स्वरास **आ** आदेश होतो. जसें:—वन्सांनीं, वन्सांशीं, वन्सांनों इ०.

**( आ ) वर्ग १ उपभेद २**—अंगाचे अन्त्य स्वरास **या** आदेश होणारे शब्द.

( १ ) आकारान्त पुल्लिंगी शब्द. उ०:—घोडा.

| | | |
|---|---|---|
| प्र० | घोडा | घोडा. |
| तृ० | घोडयानें, घोडयाशीं | घोडयांनीं, घोडयांशीं. |
| सं० | घोडया | घोडयांनों |

**अपवाद १**—राजा. हा प्रथमा बहुवचन शिवाय करून अविकृतांग शब्दांचे वर्गांत जातो.

| | | |
|---|---|---|
| प्र० | राजा | राजे |
| तृ० | राजानें, राजाशीं | राजांनीं, राजांशीं |
| सं० | राजा | राजानों |

टीप—वास्तविक ह्याचे अन्त्यास या आदेश व्हावा. परंतु तो केल्यास त्या शब्दांची रूपें 'राज्य' ह्या अकारान्त नपुंसकलिंगी शब्दाचे रूपांपासून भिन्न

दिसणार नाहींत. म्हणून 'राजा' शब्दाचे सामान्यरूपांतील य्‌कार उडून गेला आहे. हा कांहीं वास्तविक अविकृतांग शब्द नव्हे. कारण कीं अविकृतांग शब्दाचें बहुवचन व दोन्ही सामान्यरूपें अंगाप्रमाणेंच असतात. परंतु वर सांगितल्याप्रमाणें ह्या शब्दाचे अनेकवचनीं ह्याचें अंग विकृत आहे. त्याचप्रमाणें सामान्यरूपांतही त्याचें अंग विकृतच असावयाचें. परंतु राजा व राज्य ह्यांचे रूपांत फरक दिसावा येवढ्याकरितां राजा शब्दाचे सामान्यरूपांतील य्‌कार उडविण्यांत आला आहे.

**अपवाद २**—दादा, काका, नाना, आजोबा, दाजीबा, गोविंदा, सोमपा, शंखध्मा, इत्यादि ज्या आकारान्त पुल्लिंगी नामांचीं अनेकवचनें एकवचनाप्रमाणेंच होतांतें, असें गेल्या वचनाध्यायांत (अंक २८२. अप० १) सांगितलें आहे, तीं सर्व विभक्तिप्रकरणीं अविकृतांग शब्दांच्याच वर्गांत जातात.

**अपवाद ३**—'पणा' प्रत्ययान्त भाववाचक नामांचें अनेकवचन नियमाप्रमाणेंच एकारान्त होतें. परंतु ह्या अकारान्त शब्दांस प्रथमेतर विभक्ति लागत नाहींत. त्यांचे जागीं 'पण' प्रत्ययान्त नपुंसकलिंगी नामांचींच रूपें प्रचारांत आहेत. जसें:—

| | | |
|---|---|---|
| प्र० | देवपणा | देवपणे |
| तृ० | देवपणानें, देवपणाशीं | देवपणांनीं, देवपणांशीं |
| सं० | देवपणा | देवपणांनो |

**अपवाद ४**—राम्या, गोंद्या, देशपांड्या, बाघमाऱ्या, इत्यादि शब्दांत अंगामध्येंच अन्त्याक्षरांत यकार असल्यामुळें अन्त्य स्वरास आणखी या आदेश होत नाहीं.

(२) ईकारान्त पुल्लिंगी शब्द. उदा०:—तेली.

| | | |
|---|---|---|
| प्र० | तेली | तेली |
| तृ० | तेल्यानें, तेल्याशी | तेल्यांनीं, तेल्यांशीं |
| सं० | तेल्या, तेली | तेल्यांनो |

**टीप**—संबोधनाचे एकवचनीं तेल्या हें नियमित रूप आहेच. परंतु त्याशिवाय संभावितपणाचे दृष्टीनें 'ए तेली,' 'ए धोबी' अशीं अविकृत रूपें योजण्याची प्रवृत्ति आहे. एवंच या ठिकाणचें संबोधनाचें एकवचनीं याकारान्त रूप विकारद्योतक आहे असें समजतात.

याप्रमाणें चालणारे शब्द :—शास्त्री, सन्यासी, गोसावी, पुजारी, शेतकरी, वारकरी, वाणी, तांबोळी, धोबी, शिंपी, न्हावी, गोंधळी, पापी, दोषी, बिगारी, गडी, विद्यार्थी, माधुकरी, वाढपी, साळी, रंगारी, इ०.

**अपवाद्**—हत्ती, जती; तसेंच हस्ती, करी, दंडी, नंदी, बंदी, केसरी, आततायी, दंती, इत्यादि बरेचसे संस्कृतांतील मूळचे इन्नन्त पुल्लिंगी शब्द ( शास्त्री, संन्यासी, इत्यादि अतिपरिचयाचे म्हणजे फार प्रचारांत आलेले शब्द शिवायकरून बाकीचे अल्पपरिचयाचे म्हणजे मराठी भाषेच्या कमी ओळखीचे ); वादी, प्रतिवादी, मौलवी, फिर्यादी, असामी, मुनशी, इत्यादि व्यवहारांत येणारे संस्कृत व यावनी शब्द; आणि पंतोजी, बाबाजी, रावजी, आबाजी, दादाजी, मशालजी, पाजी, इत्यादि ' जी ' अक्षरान्त व मशालची, काची, मोची, इत्यादि ' ची ' अक्षरान्त पुल्लिंगी शब्द, अविकृतांग शब्दांचे वर्गांत येतात.

**प्रत्यपवाद्**—दर्जी शब्द जरी जी–अक्षरान्त आहे तरी हा तेली–वर्गांतच येतो. जसें:—दर्ज्यानें, दर्ज्याशीं, इ०.

( ३ ) ईकारान्त नपुंसकलिंगी शब्द. उदा०:—पाणी.

| | | |
|---|---|---|
| **प्र०** | पाणी | पाण्यें |
| तृ० | पाण्यानें, पाण्याशीं | पाण्यांनीं, पाण्यांशीं |
| **सं०** | पाण्या | पाण्यांनों |

**अपवाद्**—वीं हा एकच शब्द अपवादक आहे. तो ह्याच पहिल्या वर्गाच्या चौथ्या ( ई ) उपभेदांत येतो. तो तेथें पहावा.

( ४ ) एंकारान्त नपुंसकलिंगी शब्द. उदा०:— तळें

| | | |
|---|---|---|
| प्र० | तळें | तळें |
| तृ० | तळ्यानें; तळ्याशीं | तळ्यांनीं, तळ्यांशीं |
| सं० | तळ्या | तळ्यांनों |

**( इ ) वर्ग १. उपभेद ३**—अंगाचे अन्त्य **स्वरास वा** आदेश होणारे शब्द.

( १ ) ऊकारान्त पुल्लिंगी गहूं शब्द.

| | | |
|---|---|---|
| प्र० | गहूं | गहूं |
| तृ० | गव्हानें, गव्हाशीं | गव्हांनीं, गव्हांशीं |
| सं० | गव्हा | गव्हांनो |

( २ ) भ्रातृवाचक पुल्लिंगी भाऊ शब्द.

| | | |
|---|---|---|
| प्र० | भाऊ | भाऊ |
| त० | भावानें, भावाशीं | भावांनीं, भावांशीं |
| स० | भावा | भावांनो |

परंतु 'भाऊ' हें जेव्हां विशेषनाम बहुमानवाचक नाम असतें, तेव्हां तें अविकृतांग शब्दांप्रमाणें चालतें. जसें:—भाऊनें, भाऊशीं, भाऊंनीं, भाऊंशीं, इ०.

( ३ ) लाडू, नारू, साडू, काडू, विंचू, चाटू, नातू ( मुलाचा अथवा मुलीचा मुलगा ह्या अर्थीं म्हणजे नातें दाखविणारा ) पणतू, वेळू, इत्यादि कांहीं ऊकारान्त पुल्लिंगी शब्दांचे अन्त्य **ऊस** या उपभेदांतील शब्दांप्रमाणें **वा** असा आदेश होतो. परंतु हे शब्द याच वर्गाच्या सहाव्या ( ऊ ) उपभेदांतही येतात, म्हणजे त्यांचे अन्त्य स्वरास **अवा** असाही आदेश होतो. शिवाय हे शब्द अविकृतांग शब्दांप्रमाणें चाल-तात. ह्यामुळें त्यांची एकंदर रूपें कशीं होतात तें एका 'लाडू' शब्दाचें उदाहरणानें दाखवितों. तीं अशीं:—

| | | |
|---|---|---|
| प्र० | लाडू | लाडू |
| तृ० | लाडानें (व), लाडवानें, लाडूशीं | लाडांनीं (व), लाडवांनीं, लाडूंनीं |
| | लाडाशीं, लाडवाशीं, लाडूशीं, | लाडांशीं (व), लाडवांशीं, लाडूंशीं |
| सं० | लाडा (व), लाडवा, लाडू | लाडांनो (व), लाडवांनो, लाडूंनो |

वरील शब्दांपैकीं 'नातू' शब्द नात्याचा वाचक असतां असाच चालतो. परंतु जेव्हां त्याचा अर्थ 'ह्या आडनांवाचा एक मनुष्य' असा असतो तेव्हां त्यास विकल्प नसून तो केवळ अविकृतांग असतो. जसें:— नातू ( या आडनांवाचा मनुष्य )

| | | |
|---|---|---|
| प्र० | नातू | नातू |
| तृ० | नातूनें, नातूशीं | नातूंनीं, नातूंशीं |
| सं० | नातू | नातूंनो |

**अपवाद**—मेरू, पेरू, चाकू, गडू, काऊ, खाऊ, काजू, खडू, वसू, दांडू, बरू, बोरू, बांबू, सांकू, कोद्रू, इ०; तसेंच खिलाडू, पोटभरू झोंपाळू, लाजाळू: कार्यसाधू, इत्यादि धातुसाधित ऊकारान्त पुल्लिंगी शब्द; तसेंच स्वयंभू, वर्षाभू, प्रतिभू, खलपू, इत्यादि दीर्घ ऊकारान्त संस्कृत पुल्लिंगी शब्द; आणि जे ऊकारान्त पुल्लिंगी शब्द कोणत्याही उपभेदांत येत नाहींत ते; हे सर्व अविकृतांग शब्दांचे वर्गांत येतात.

( ४ ) कांहीं ऊकारान्त नपुंसकलिंगी शब्द या वर्गाचे सहाव्या ( ऊ ) उपभेदांत जातात, म्हणजे त्यांचे अन्त्य स्वरास **अवा** असा आदेश होतो. ते शब्दही विकल्पानें या तिसऱ्या उपभेदांत येतात. जसें:—

| | | |
|---|---|---|
| प्र० | तारूं | तार्वें, तारवें |
| तृ० | तार्वानें, तारवानें | तार्वांनीं, तारवांशीं |
| | तार्वाशीं, तारवाशीं | तार्वांशीं, तारवांशीं |
| सं० | तार्वा, तारवा | तार्वांनो, तारवांनो |

याप्रमाणें चालणारे शब्द:— कुंकूं, गळूं, अवाळूं, इ०

( ५ ) कुसूं, जिवाणूं, सुकाणूं हे तीन शब्द फार वैकल्पिक आहेत. ते ह्या वर्गाच्या पहिल्या ( अ ), या तिसऱ्या ( इ ), आणि सहाव्या ( ऊ ), इतक्या उपभेदांत येतात. त्यांची सर्व रूपें वर पहिल्या उपभेदांत दिलीं आहेत. तीं तेथें पहावीं.

( ई ) **वर्ग १. उपभेद ४**—अंगाचे अन्त्य स्वरास **इया** असा आदेश होणारे शब्द.

या वर्गांत फक्त 'बीं' हा एकच नपुंसकलिंगी शब्द येतो.

| | | |
|---|---|---|
| प्र० | बीं | बियें |
| तृ० | बियानें, बियाशीं | बियांनीं, बियांशीं |
| सं० | बिया | बियांनों |

**( उ ) वर्ग १. उपभेद ५**—अंगाचे अन्त्य स्वरास **उवा** असा आदेश होणारे शब्द.

या उपभेदांत ऊकारान्त पुल्लिंगी एकाक्षरी शब्द येतात. उदा०:—पू.

| | | |
|---|---|---|
| प्र० | पू | पू |
| तृ० | पुवानें, पुवाशीं | पुवांनीं, पुवांशीं |
| सं० | पुवा | पुवांनो |

याप्रमाणें चालणारे आणखी शब्दः—गू, रू, इ०.

**( ऊ ) वर्ग १. उपभेद ६**—अंगाचे अन्त्य स्वरास **अवा** असा आदेश होणारे शब्द.

(१)लाडू, नारू, साडू, इत्यादि ऊकारान्त पुल्लिंगी शब्दांचे अन्त्य स्वरास जेव्हां **अवा** असा आदेश होतो, तेव्हां ते या वर्गांत येतात. पण. त्यांचे अन्त्य स्वरास विकल्पें **वा** असाही आदेश होतो. तेव्हां ते या पहिल्या वर्गाच्या तिसऱ्या ( इ ) उपभेदांत येतात. शिवाय ते अविकृतांगही आहेत. ह्यामुळें त्यांचीं अनेक रूपें होतात. तीं वर तिसऱ्या उपभेदांत दिलींच आहेत; तेथें पहावीं.

( २ ) तारू, असूं, गळूं, कुंकू, थरूं इत्यादि शब्दांचे अन्त्य स्वरास **अवा** किंवा **वा** आदेश होतो. त्यांचीं रूपें वर तिसऱ्या ( इ ) उपभेदांत दिलीं आहेत; तेथें पहावीं.

( ३ ) कुसूं, जिवाणूं सुकाणूं ह्या शब्दांचे अन्त्य स्वरास **अवा** ह्या आदेशाप्रमाणें **वा** आणि **आ** असेही आदेश होतात. म्हणून ते वर ह्या वर्गांचे तिसऱ्या ( इ ), आणि पहिल्या ( अ ) उपभेदांतही येतात. एवंच त्यांचीं तीन तीन रूपें होतात. तीं वर पहिल्या उपभेदांत दिलीं आहेत तेथें पहावीं.

३३३. ईकारान्त सामान्यरूप होणाऱ्या शब्दांचा सामान्यरूपाचें दृष्टीनें **दुसरा वर्ग** होय. ह्या वर्गांत उपभेद नाहींत. या वर्गांत येणाऱ्या शब्दांची निवड वचनाध्यायावरून सहज करितां येते.

( १ ) ज्या अकारान्त स्त्रीलिंग शब्दांचे बहुवचन ईकारान्त होतें ते म्हणजे भिंतीच्या गणांतील सर्व शब्द या वर्गांत येतात. म्हणजे त्यांचें एकवचन सामान्यरूप ईकारान्त असतें. अर्थात् त्यांचें अंगाचे अन्त्य स्वरास ईकारादेश होतो. स्त्रीलिंग शब्दांचें बहुवचन आणि बहुवचन

सामान्यरूप एकच असं पूर्वीं सांगितलेंच आहे. त्यावरून ह्या शब्दाचा बहुवचनीं आणि दोन्ही वचनांच्या सामान्यरूपीं एकच विकार होतो असें कळेल. उदा०:—भिंत.

| | | |
|---|---|---|
| प्र० | भिंत | भिंती |
| तृ० | भिंतीनें, भिंतीशीं | भिंतींनीं, भिंतींशीं |
| सं० | भिंती | भिंतींनो |

( २ ) ज्या अकारान्त स्त्रीलिंगी शब्दांचें बहुवचन विकल्पानें आकारान्त किंवा ईकारान्त होतें त्यांचें म्हणजे झेंपेच्या गणांतील शब्दांच एकवचनसामान्यरूपही दोन प्रकारचें होतें. ईकारान्त बहुवचनानुरूप जेव्हां त्यांचें एकवचनीं ईकारान्त सामान्यरूप होतें तेव्हां ते या वर्गांत येतात. पण आकारान्त बहुवचनानुरूप जेव्हां त्यांचें एकवचनीं एकारान्त सामान्यरूप होतें, तेव्हां ते सामान्यरूपाचे चवथ्या वर्गांतील पहिल्या उपभेदांत जातात. ( अं० ३३५ ). उदा०:—तरवार.

| | | |
|---|---|---|
| प्र० | तरवार | तरवारी, तरवारा |
| तृ० | तरवारीनें, तरवारेनें<br>तरवारीशीं, तरवारेशीं | तरवारींनीं, तरवारांनीं<br>तरवारींशीं, तरवारांशीं |
| सं० | तरवारी, तरवारे | तरवारींनो, तरवारांनो |

( ३ ) ऱ्हस्व इकारान्त तिन्ही लिंगी संस्कृत शब्द ह्याच वर्गांत येतात. सामान्यरूपीं त्यांचा अन्त्य इ स्वर दीर्घ होतो, प्रथमा बहुवचनीं सध्या विकल्प आढळतो, तरी दीर्घत्वाकडे विशेष कल आहे वगैरे गोष्टी पूर्वीं वचनाध्यायांत ( अं० २८३ ) सविस्तर सांगितल्याच आहेत. उदा०:—कवि, मति, वारि,

| | | |
|---|---|---|
| प्र० | कवि | कवि, कवी |
| तृ० | कवीनें, कवीशीं | कवींनीं, कवींशीं |
| सं० | कवी | कवींनो |

टीप—परंतु मोरोपंतांचे काव्यामध्यें कधीं कधीं ह्या शब्दांचें सामान्यरूपही ऱ्हस्वस्वरान्तच आढळतें. म्हणजे विभक्तिप्रत्ययांपूर्वीं त्यांचे काव्यांत हे शब्द कधीं कधीं अविकृतांगही आढळतात. जसें:—

वीर संकोच असावा आंत बहुत कृष्णकीर्तनीं काम
गुरुजन समक्ष पतिचें घेतां अत्याग्रहें जसें नाम
संसारदुःख विसरवि सत्पद्धति मतिस जेंवि काय घडी
वरमायेसि विवाहीं विसरवि चवरी गुलाल पायघडी —मोरोपंत.

परंतु सामान्यरूपीं त्यांस दीर्घच करण्याचा प्रचलित मराठीचा निःसंशय प्रघात आहे. येथें विकल्प आढळत नाहीं.

३३४. ऊकारान्त सामान्यरूप होणाऱ्या शब्दांचा सामान्यरूपाचे दृष्टीनें **तिसरा वर्ग** होय. या वर्गांतही उपभेद नाहींत. या वर्गांत ऱ्हस्व उकारान्त तिन्ही लिंगी संस्कृत शब्द येतात. ह्यांचेही अनेकवचनीं अन्त्य स्वराचे ऱ्हस्वदीर्घांचा विकल्प आढळतो. आणि सामान्यरूपीं जरी मोरोपंतांचे काव्यांत कधीं कधीं ह्या शब्दांचाही अन्त्यस्वर ऱ्हस्व राहिलेला आढळतो, तरी वरील टीपेंत सांगितल्याप्रमाणें आतां तो अवश्य दीर्घ होतो. उदा० :—गुरु, धेनु, वपु, इ०.

| | | |
|---|---|---|
| प्र० | गुरु | गुरु, गुरू |
| तृ० | गुरूनें, गुरूशीं | गुरूंनीं, गुरूंशीं |
| सं० | गुरू | गुरूंनो |

टीप—कवि, गुरु, हे ऱ्हस्व इकारान्त व उकारान्त शब्द बहुमानार्थी अनेकवचनीं आले असतां, त्यांचे संबोधनाचे अनेकवचन एकवचनाप्रमाणेंच होतें, जसें:— अहो कवी कोठे गेलां होतां,

आजि वेदव्यास गुरू । तुम्हां माझा नमस्कारू ॥
गुरू तुम्हांसी प्रार्थणें । ऐका दयार्द्र कानानें ॥

३३५. एकारन्त सामान्यरूप होणाऱ्या शब्दांचा सामान्यरूपाचे दृष्टीनें **चौथा वर्ग** होय. या वर्गांत पांच उपभेद आहेत. हे, अंगाच्या अन्त्य स्वरास ए, वे, इये, उवे, अवे, असे जे पांच एकारान्त आदेश होतात त्यामुळें उत्पन्न झाले आहेत. या वर्गांतील पांची उपभेदांत फक्त स्त्रीलिंग शब्दच येतात. त्यांचें हें एकारान्त समान्यरूप फक्त एकवचनीं येतें, त्यांचें अनेकवचनसामान्यरूप आणि अनेकवचन हीं समान असतात हें पूर्वीं सांगितलेंच आहे.

( अ ) **वर्ग ४. उपभेद १**—अंगाचे अन्त्य स्वरास **ए** आदेश होणारे शब्द.

( १ ) ज्या अकारान्त स्त्रीलिंगी शब्दांचे बहुवचन आकारान्त होते ते म्हणजे आतेच्या गणांतील सर्व शब्द, उदा० :—वाट

| | | |
|---|---|---|
| प्र० | वाट | वाटा |
| तृ० | वाटेनें, वाटेशीं | वाटांनीं, वाटांशीं |
| सं० | वाटे | वाटांनो |

**टीप**—आत शब्द या उपभेदांतच येतो, त्याचें आते हें एकारान्त रूपही असेंच चालतें, जसें:—आते, आता; आतेनें, आतांनीं, इ०.

( २ ) ज्या अकारान्त स्त्रीलिंगी शब्दांचे बहुवचन ईकारान्त व आकारान्त असें विकल्पेंकरून होतें म्हणजे जे झेंपेच्या गणांत येतात, त्या शब्दांचे आकारान्त बहुवचनास अनुरूप जेव्हां एकारान्त सामान्यरूप होतें, तेव्हां ते या वर्गांत येतात; आणि ईकारान्त बहुवचनानुरूप जेव्हां ईकारान्तच सामान्यरूप होतें तेव्हां ते दुसऱ्या वर्गांत जातात, त्यांचा उल्लेख वर (अं० २३३ ) आलाच आहे,

( ३ ) आकारान्त स्त्रीलिंगी शब्द, उदा० :—शाळा

| | | |
|---|---|---|
| प्र० | शाळा | शाळा |
| तृ० | शाळेनें, शाळेशीं | शाळांनीं, शाळांशीं |
| सं० | शाळे | शाळांनों |

**अपवाद**—आकारान्त स्त्रीलिंगी विशेषनामांचा उपयोग जरा प्रतिष्ठापूर्वक करावयाचा असल्यास तीं नामें अविकृतांगच राहतात. उदा० :—रमा

| | | |
|---|---|---|
| प्र० | रमा | रमा |
| तृ० | रमानें, रमाशीं | रमांनीं, रमांशीं |
| सं० | रमा | रमांनो |

प्रतिष्ठार्थी सर्व आकारान्त स्त्रीलिंगी विशेषनामें याप्रमाणें चालतात. परंतु प्रतिष्ठापूर्वक बोलावयाचें नसल्यास रमेनें, रमेशीं, रमे, अशींच एकवचनींही नियमित रूपें होतात.

( ४ ) ऊकारान्त स्त्रीलिंगी पिसू शब्द. हा फार वैकल्पिक आहे, ह्याचें एकवचनीं एक सामान्यरूप अन्त्य स्वरास ए आदेश होऊन पिसे

असें होतें. त्यावरून पिसेनें, पिसेशीं अशीं रूपें होतात; तेव्हां तो या चवथ्या वर्गाचे पहिल्या उपभेदांत येतो. या शब्दाचीं सर्व रूपें पुढें याच वर्गाचे पांचवे ( उ ) उपभेदांत सांगितलीं आहेत; तेथें पहावीं,

**( आ ) वर्ग ४. उपभेद २**—अंगाचे अन्त्य स्वरास **वे** आदेश होणारे शब्द.

( १ ) ऊकारान्त स्त्रीलिंगी सासू शब्द. या शब्दास **वे** शिवाय **अवे** असाही आदेश होतो. म्हणून हा, व ह्याप्रमाणें चालणारे इतर शब्द, याच वर्गाचे पांचव्या ( उ ) उपभेदांतही येतात. शिवाय ते अविकृतांगही राहतात, म्हणून ह्यांची एकंदर रूपें येणेंप्रमाणें:—

| | | |
|---|---|---|
| प्र० | सासू | सासू, सास्वा, सासवा, |
| | सासूनें, सासूशीं | सासूंनीं, सासूशीं |
| | सास्वेनें, सास्वेशीं | सास्वांनीं, सास्वांशीं |
| | सासवेनें, सासवेशीं | सासवांनीं, सासवांशीं |
| सं० | सासू, सास्वे, सासवे | सासूंनो, सास्वांनो, सासवांनों |

याप्रमाणें चालणारे आणखी ऊकारान्त स्त्रीलिंग शब्द:— जळू, पेळू, टाळू, दारू, इ०,

**अपवाद**—ज्या ऊकारान्त स्त्रीलिंगी नामांचीं अनेकवचनें एकवचनाप्रमाणेंच होतात म्हणून वचनाध्यायांत [ अ. २८४, ( ५ ), ( इ ) ] सांगितलें आहे, ते सर्व शब्द अविकृतांग शब्दांचे वर्गांत जातात.

( २ ) जाऊ ह्या शब्दाचें एकवचनीं सामान्यरूप अन्त्य ऊचे जागीं **वे** हें अक्षर येऊन होतें. तसेंच हा शब्द अविकृतांगही आढळतो, याचीं रूपें अशीं :—

| | | |
|---|---|---|
| प्र० | जाऊ | जाऊ, जावा |
| तृ० | जाऊनें, जाऊशीं | जाऊंनीं, जाऊंशीं |
| | जावेनें, जावेशीं | जावांनीं, जावांशीं |
| सं० | जाऊ, जावे | जाऊंनो, जावांनो |

( ३ ) पिसू शब्दाचेंही एक सामान्यरूप अंगाचे अन्त्यास **वे** हा आदेश होऊन होतें, हा शब्द वर सांगितल्याप्रमाणें फार वैकल्पिक आहे. ह्यांची एकंदर सर्व रूपें ह्याच वर्गाचे पांचव्या ( उ ) उपभेदांत देण्यांत येतील; तेथें पहावीं.

(इ) **वर्ग ४. उपभेद ३**—अंगाचे अन्त्य स्वरास **इये** आदेश होणारे शब्द. या उपभेदांत बी व स्त्री हे दोनच स्त्रीलिंग शब्द येतात. एकवचनीं हे शब्द अविकृतांगही आढळतात. ह्यांचीं रूपें येणेंप्रमाणें:—

| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्र० | बी | बिया | स्त्री | स्त्रिया |
| तृ० | बीनें, बीशीं<br>बियेनें, बियेशीं | बियांनीं, बियांशीं | स्त्रीनें, स्त्रीशीं<br>स्त्रियेनें, स्त्रियेशीं | स्त्रियांनीं, स्त्रियांशीं |
| सं० | बी, बिये | बियांनो | स्त्री, स्त्रिये | स्त्रियांनो |

(ई) **वर्ग ४. उपभेद ४**—अंगाचे अन्त्य स्वरास **उवे** आदेश होणारे शब्द.

(१) ऊकारान्त स्त्रीलिंगी **धू** शब्द.

| | | |
|---|---|---|
| प्र० | धू | धुवा |
| तृ० | धुवेनें, धुवेशीं | धुवांनीं, धुवांशीं |
| सं० | धुवे | धुवांनो |

(२) ऊ आणि सू हे शब्द या उपभेदांत येतात, तरी एकवचनीं हे अविकृतांगही आढळतात.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्र० | ऊ | उवा | सू | सुवा |
| तृ० | ऊनें, ऊशीं<br>उवेनें, उवेशीं | उवांनीं, उवांशीं | सूनें, सूशीं<br>सुवेनें, सुवेशीं | सुवांनीं, सुवांशीं |
| सं० | ऊ, उवे | उवांनो | सु, सुवे | सुवांनो |

**टीप**—ऊ शब्दाचीं वा, वेनें, वांनीं, इत्यादि अशीं रूपें देशावर क्वचित् आढळतात. पण तीं सर्वमान्य नाहींत.

(उ) **वर्ग ४. उपभेद ५**—अंगाचे अन्त्य स्वरास **अवे** आदेश होणारे शब्द.

(१) सासू, जळू, पेळू, टाळू, वाळू, इत्यादि जे शब्द या वर्गाचे दुसऱ्या (आ) उपभेदांतील कलम (१) मध्यें चालवून दाखविले आहेत त्यांचं एकेक रूप या उपभेदांत येतें. त्यांचीं या उपभेदांत येणारीं रूपें तेथेंच दिलीं आहेत.

( २ ) पिसू शब्द फारच वैकल्पिक आहे म्हणून पूर्वींच सांगितलें आहे, त्याचें एक सामान्यरूप अंगाचे अन्त्य स्वरास **अवे** आदेश होऊन होतें, ह्याशिवाय त्याचे अन्त्य स्वरास **ए** आणि **वे** असेही आदेश होतात. ह्यामुळें तो वर दिल्याप्रमाणें ह्याच वर्गाचे पहिल्या व दुसऱ्या उपभेदांतही येतो. आणखी तो अविकृतांगही आढळतो. एकंदर रूपें येणेंप्रमाणें:—

| | | |
|---|---|---|
| प्र० | पिसू | पिसू, पिसा, पिस्वा, पिसवा |
| तृ० | पिसूनें,–शीं, पिसेनें, –शीं<br>पिस्वेनें,–शीं, पिसवेनें,–शीं | पिसूंनीं,–शीं, पिसांनीं –शीं<br>पिस्वांनीं,–शीं, पिसवांनीं,–शीं |
| सं० | पिसू, पिसे, पिस्वे, पिसवे | पिसूंनो, पिसांनो, पिस्वांनो, पिसवांनो |

[ येथपर्यंत विकृतांग शब्दांचे मुख्य चार वर्ग सांगितले. त्यांपैकी पहिल्यांत सहा आणि चौथ्यांत पांच उपभेद आहेत. दुसऱ्यांत व तिसऱ्यांत उपभेद नाहींत, तेव्हां ह्यांचा प्रत्येकीं एक प्रकार, मिळून विकृतांग नामें चालविण्याचे एकंदर तेरा ( ६ + १ + १ + ५ = १३ प्रकार होतात. ह्यांशिवाय अविकृतांग नामांचा पुढें सांगण्यांत येणारा आणखी एक प्रकार मिळून एकंदर मराठी भाषेंतील नामें चालविण्याचे निरनिराळे चौदा प्रकार होतात. ह्यांपैकीं कांहीं अगदीं क्षुल्लक म्हणजे एक एक किंवा दोन दोन किंवा अगदीं थोड्या शब्दांचे आहेत हें उघड आहे. तथापि त्या शब्दांचा अन्यत्र अन्तर्भाव होत नसल्यामुळें त्यांचे वेगळे वेगळे प्रकार मानावे लागतात. शिवाय, असेंही वाचकांचे लक्षांत येऊन चुकलेंच असेल कीं, हे प्रकार न्यायशास्त्रदृष्ट्या जसे परस्परभिन्न पाहिजेत तसेही परस्परभिन्न नाहींत; म्हणजे कांहीं कांहीं शब्द दोन दोन किंवा अधिक प्रकारांतही येतात. पण न्यायशास्त्राचे धारवाडी कांट्यानें या स्थळीं चालतां येत नाहीं त्यास नाइलाज आहे.

कोणी असें म्हणतील कीं, इतके चौदापंधरा प्रकार करण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. दादोबांनीं सातच प्रकार केले आहेत; आणि जोशीबोवांनींही सातच गण दिले आहेत. परंतु इतका विस्तार तरी कशास पाहिजे. नवलकरांनीं तीनच विकार आहेत असें म्हटलें आहे; आणि गुंजीकरांचें मतें वास्तविक दोनच प्रकार आहेत. ह्यावर आमचें उत्तर इतकेंच कीं प्रत्येकानें जरी निरनिराळी व्यवस्था केली असली आणि कमीजास्त प्रकार मानिले असले तरी भाषेंतील नामें चालविण्याच्या रीती म्हणजे नामांचीं निरनिराळीं विभक्तिरूपें कांहीं कोणास बदलतां येत नाहींत. तेव्हां हा फक्त व्यवस्थेचा प्रश्न आहे. कोणती व्यवस्था उत्तम हें न्यायशास्त्रांतील वर्गीकरणपद्धतीस अनुसरून तारतम्यानें ठरविलें पाहिजे. त्या पद्धतीप्रमाणें पाहिलें म्हणजे या पुस्तकांत सांगितलेल्या वर्गीकरणाइतकें शास्त्रीय वर्गीकरण दुसरें आढळत नाहीं. आणि यामुळेंच, नामें चालविण्याच्या तऱ्हा जरी कोणास बदलितां

येत नाहींत, तरी एकाचें वर्गीकरण दुसऱ्याचे वर्गीकरणाशीं जुळत नाहीं. गुंजीकरांचे मतें जर दोन–तीन–चार प्रकार आहेत ( कारण कीं ते तीन प्रकार सांगतात; ह्यांपैकीं दोन, एक मानिलें तरी चालतील असें म्हणतात; आणि कांहीं शब्दांचा पाहिजे तर चवथा प्रकार मानावा असेंही ते एका ठिकाणीं लिहितात. ) तर नवलकरांचे मतें तीन, दादोबांचे व जोश्यांचे मतें सात, आणि कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे मतें तेरा प्रकार आहेत. तेव्हां या ग्रंथांतील वर्गीकरण एकदां वर्गीकरणाचे आकारांत मांडून दाखवितों म्हणजे त्याची योगता व दुष्टता वाचकांचे सहज ध्यानांत येईल.

नामें

- विकृतांग
  - आकारान्त सामान्यरूपी
    - अंगाचे अन्त्य स्वरास आ आदेश होणारीं १
    - या आ० होणारीं २
    - वा आ० होणारीं ३
    - इया आ० होणारीं ४
    - उवा आ० होणारीं ५
    - अवा आ० होणारीं ६
  - ईकारान्त सामान्यरूपी ७
  - ऊकारान्त सामान्यरूपी ८
  - एकारान्त सामान्यरूपी
    - ए आदेश होणारीं ९
    - ये आदेश होणारीं १०
    - इये आदेश होणारीं ११
    - उवे आदेश होणारीं १२
    - अवे आदेश होणारीं १३
- अविकृतांग १४

या वर्गीकरणाचा खुलासा वर आलेलाच आहे; तेव्हां द्विरुक्ति करीत नाहीं. हें वर्गीकरण पुढें ठेवून तो खुलासा ( ३२४—३३१ ) पुन्हा एकवार वाचावा म्हणजे या वर्गीकरणाची शास्त्रीयता व पूर्णता वाचकांस पटेल. हें वर्गीकरण व्याकरणामध्यें विशेष महत्वाचें नाहीं. कारण कीं, त्याचा व्याकरणाचे इतर भागांशीं फारसा संबंध नाहीं, किंवा त्याजवर व्याकरणाच्या अन्य गोष्टी अवलंबून नाहींत. ह्यामुळें इतरांच्या व्यवस्थेचा असमाधानकारकपणा सविस्तर दाखविण्याची जरूर नाहीं. तुलनेनें तो सहज स्पष्ट होणारा आहे. जिज्ञासूंनीं व परीक्षकांनीं पाहिजे असल्यास स्वतः तुलना करून पहावी. म्हणजे येथील वर्गीकरणाची सरसता त्यांचे नजरेस आल्यावांचून राहणार नाहीं. ]

३३६. अविकृतांग शब्दांचा एक स्वतंत्र वर्ग आहे. त्यांत पुढील शब्द येतात.

(१) ईकारान्त स्त्रीलिंगी शब्द उदा०:—नारी.

| | | |
|---|---|---|
| प्र० | नारी | नारी |
| तृ० | नारीनें, नारीशीं | नारींनीं, नारींशीं |
| सं० | नारी | नारींनो |

(अ) विकृतांग शब्दांसंबंधानें बोलतांना असं सांगितलेंच आहे कीं. त्यांस विभक्तिप्रत्यांपूर्वीं विकार होऊन जीं प्रत्ययक्षम रूपें होतात, त्यांस सामान्यरूप असें म्हणतात. पुल्लिंगी व नपुंसकलिंगी सर्व शब्दांचें सान्यरूप उभयवचनीं एकच असतें. परंतु कांहीं स्त्रीलिंगी शब्दांचें एकवचनीं एक व बहुवचनीं दुसरेंच सामान्यरूप आढळतें. तरी त्यांचें बहुवचनसामान्यरूप हें त्यांचे बहुवचनाप्रमाणें—अर्थात् प्रथमेच्या बहु-वचनाप्रमाणें—असल्यामुळें आणि वचनाध्यायांत बहुवचन पूर्वीं सांगण्यांत आलें असल्यामुळें या अध्यायांत सर्व शब्दांचें फक्त एकवचनसामन्य-रूपच सांगणें राहिलें. या दृष्टीनें नदी, काठी, बगी, माडी, साडी, घोडी, चौकी, धोकटी, पासोडी, शालजोडी, इत्यादि मराठी व अतिपरिचित संस्कृत शब्दांचें एकवचनीं सामान्यरूप होत नसल्यामुळें त्यांस अविकृतांग शब्दांत समाविष्ट केलें आहे. परंतु त्यांचें अनेकवचन एकवचनाहून भिन्न आहे; आणि तेंच अनेक वचन सामान्यरूप होत असल्यामुळें त्यांस सर्वथा अविकृतांग शब्द असें म्हणतां येत नाहीं त्यांच्या बहुवचनीं व बहुवचन सामान्यरूपीं अन्त्य ईस 'या' हा आदेश होत असल्यामुळें, या शब्दांस अनेकवचन सामान्यरूपाचे दृष्टीनें विकृतांग शब्दांच्या पहिल्या वर्गाचे दुसऱ्या उपभेदांत पाहिजे असल्यास घालावें. पण तेथेंही तें पूर्णपणें येत नाहींत; कारण कीं एकवचनीं ते अविकृतांग आहेत. एवंच हे शब्द अंशतः त्या, व अंशत या, या दोन्ही सदरांत येतात. त्या सदरांत यांचा निर्देश झालेला नाहीं. आणि वर सांगितल्याप्रमाणें आमच्या विवेचनपद्धतीचे दृष्टीनें ते याच वर्गांत येत असल्यामुळे तें

येथेंच देण्यांत येत आहेत. तथापि ते या सदरांत अनेकवचनीं अपवादक होत असें म्हणणें अवश्य आहे. उदा०—नदी.

| | | |
|---|---|---|
| प्र० | नदी | नद्या |
| तृ० | नदीनें,नदीशी | नद्यांनीं, नद्यांशीं |
| सं० | नदी | नद्यांनो |

याचप्रमाणें चालणारे आणखी शब्दः—काठी, बगी, पेटी, वाडी, समई इ०

टीप—आई, काकी, मामी, इत्यादि शब्द नात्याचे वाचक असले तर अनेकवचनीं असेच चालतात; म्हणजे त्यांचीं आयांनीं, काक्यांनीं, इत्यादि अशीं सामान्यरूपयुक्तच रूपें होतात. पण जेव्हां तीं नामें प्रतिष्ठावाचक असतात, तेव्हां तीं बहुवचनींही अविकृतांगच राहतात. म्हणजे प्रतिष्ठावाचक आई, काकी, मामी इत्यादि शब्द सर्वस्वी अविकृतांग होत. जसेंः—

प्रतिष्ठावाचक आई शब्द.

| | | |
|---|---|---|
| प्र० | आइ | आई |
| तृ० | आईनें, आईशीं | आईनीं, आईशीं |
| सं० | आई | आईनो |

( आ ) ह्याच्या उलट, वर जे नारी, देवी, सती, साध्वी, कुमारी, गर्भवती, सौभाग्यवती, इत्यादि सर्वस्वी अविकृतांग शब्द म्हणून सांगितले त्यांमधील अधिक परिचित कांहीं शब्दांस बहुवचनीं क्वचित् विकार झालेला आढळतो. म्हणजे त्यांचीं सत्या, साध्व्या, सत्यांनीं, साध्व्यांनीं अशींही रूपें क्वचित् ऐकूं येतात.

( २ ) ओकारान्त स्त्रीलिंगी शब्द एकवचनीं अविकृतांगच असतात. परंतु त्यांचें अनेकवचन सामान्यरूप प्रथमेच्या अनेकवचनाप्रमाणें अन्त्यास आ आदेश होऊन बनतें. उदा०ः—बायको.

| | | |
|---|---|---|
| प्र० | बायको | बायका |
| तृ० | बायकोनें,—शीं | बायकांनीं,—शीं |
| सं० | बायको | बायकांनो |

याचप्रमाणें ढंबो, ताटको, इ०

( ३ ) ओकारान्त पुलिंगी शब्द सर्वस्वी अविकृतांग आहेत. उदा० :—टाहो

| | | |
|---|---|---|
| प्र० | टाहा | टाहो |
| तृ० | टाहोनें,–शीं | टाहोंनीं–शीं |
| सं० | टाहो | टाहोंनो |

( ४ ) एकारान्त स्त्रीलिंगी सवे शब्द एकवचनीं अविकृतांग आहे.

| | | |
|---|---|---|
| प्र० | सवे | सवया |
| तृ० | सवेनें,–शीं | सवयांनीं,–शीं |
| सं० | सवे | सवयांनो |

म्हणजे ह्याचे अनेकवचनाचीं रूपें सवई शब्दाप्रमाणें होतात. एकवचनींही सवई शब्दांचीं रूपें विकल्पेंकरून होतात. ह्याच शब्दांचें 'सवै' असें एक ऐकारान्त रूप आढळतें. तें सर्वस्वी पुढील ऐकारान्त शब्दांप्रमाणें चालतें.

( ५ ) ऐकारान्त स्त्रीलिंगी नामांचीं ऐकारान्त, ईकारान्त, व अकारान्त अशीं तीन तीन मूळ रूपें आढळतात. त्या सर्वांचें प्र० अ० व० एकच. आणि तिहींपैकीं ऐकारान्त व ईकारान्त रूपें विभक्तिप्रत्ययांपूर्वीं अविकृत असतात. पण अकारान्त रूप मात्र विकृत होतें; तें वाट या अकारान्त स्त्रीलिंगी शब्दाप्रमाणें [ ३३५ ( अ ) चालतें. उदा०:—तिवै

| | | |
|---|---|---|
| प्र० | तिवै, तिवई, तिवय | तिवया |
| तृ० | तिवैनें, तिवईनें, तिवयेनें | तिवैंनीं, तिवईंनीं, तिवयांनीं |
| सं० | तिवै, तिवई, तिवये | तिवैंनो, तिवईंनो, तिवयांनो |

याप्रमाणें खै, गै जिल्है, इत्यादि शब्द समजावे.

**टीप**—पै शब्दांचें प्र० अनेकवचन विकल्पानें पै व पया असें होतें, हें वचनाध्यायांत सांगितलेंच आहे. ह्याचीं एकवचनीं पई व पय अशींही रूपें आढळतात. परंतु या ऐकारान्त स्त्रीलिंगी सर्व शब्दांचीं पय, तिवय, इत्यादि यकारान्त रूपें शिष्टसंमत नाहींत.

( ६ ) औकारान्त पुल्लिंगी शब्दांचींही औकारान्त, ऊकारान्त, व अकारान्त अशीं तीन रूपें आढळतात. त्यांपैकीं औकारान्त व ऊकारान्त हीं अविकृतांग समजावीं. आणि अकारान्त रूप पाट या अकारान्त पुल्लिंगी शब्दांप्रमाणें चालवावें. उदा०:—पौ.

| | | |
|---|---|---|
| प्र० | पौ, पऊ, पव | पौ, पऊ, पव |
| तृ० | पौनें, पऊनें, पवानें | पौंनीं, पऊंनीं, पवांनीं |
| सं० | पौ, पऊ, पवा | पौंनो, पऊंनो, पवांनो |

याप्रमाणेंच चौ वगैरे शब्द समजावे. ह्या शब्दांचींही तिसरीं ऊकारान्त किंवा वकारान्त रूपें शिष्टसंमत आहेतसें दिसत नाहीं.

याशिवाय आणखी कांहीं जे शब्द अविकृतांग वर्गांत येतात त्यांचा निर्देश विकृतांग शब्दांचे प्रकारांत अपवाद किंवा विकल्प ह्या रूपानें झालाच आहे. तेव्हां त्यांबद्दल येथें विस्तार करण्याची जरूर नाहीं. तरी ते सर्व एकत्र पहाण्यास मिळावे म्हणून येथें त्यांची फक्त यादी देतों.

( ७ ) क, ढ, ग, इ० मूळाक्षरांचीं नांवें एकाक्षरी अकारान्त शब्द.

( ८ ) हिंदुस्थान, इंग्लंड, जपान इ० देशवाचक विशेषनामें.

( ९ ) ग्रामशहरादिवाचक व इतर कांहीं विशेषनामें.

( १० ) तट्टू, परभू, वाटसरू, इ० ह्यांचे अन्त्य स्वरास विकल्पेंकरून आ असाही आदेश होतो.

( ११ ) राजा आणि ज्यांचें बहुवचन एकवचनाप्रमाणेंच असतें ते, दादा, काका, मामा, इ० शब्द.

( १२ ) देवपणा, मनुष्यपणा, इ० पणा प्रत्ययांन्त धर्मवाचकें.

( १३ ) राम्या, गोंद्या, देशपांड्या, इ० याकारान्त शब्द.

( १४ ) हत्ती, जती, हस्ती, करी, दंडी, इ० मूळचे इन्नन्त संस्कृत शब्द; वादी, प्रतिवादी, मौलवी, काजी, फिर्यादी, इ०; आणि पंतोजी, मशालजी, मोची, काची, इ० जी व ची अक्षरान्त पुल्लिंगी शब्द.

( १५ ) भाऊ हें विशेषनाम किंवा बहुमानवाचक नाम.

( १६ ) लाडू, नारू, साडू, इत्यादि विकल्पें अविकृतांग आहेत.

( १७ ) आडनांवार्थक नातू शब्द.

( १८ ) मेरू, पेरू, चाकू, गडू, इ० ऊकारान्त पुल्लिंगी बरेच शब्द.

( १९ ) रमा, नर्मदा, गंगा, इ० आकारान्त स्त्रीलिंगी विशेषनामांचा जेव्हां प्रतिष्ठापूर्वक उपयोग होतो तेव्हां तीं.

( २० ) सासू, जळू, पेळू, इ० शब्द विकल्पानें अविकृतांग आहेत.

( २१ ) चमू, खडू, अबरू, रू, अफू, इ० दीर्घ ऊकारान्त स्त्रीलिंगी शब्द ज्यांचीं उभयवचनें समान असतात ते.

( २२ ) जाऊ, पिसू, बी, स्त्री, ऊ, सू, हे विकल्पानें अविकृतांग आहेत.

[ शब्द चालवितांनां उपान्त्यास होणारे विकार मागल्या अध्यायाचें शेवटीं सांगितलेंच आहेत. अन्त्यास होणारे विकार हे बहुतेक सामान्यरूपाचे विवेचनांत आलेच आहेत. बाकीचे थोडेसे गेल्या अध्यायाचे अखेरीस नमूद करून ठेविले आहेत. तेव्हां आतां नामांच्या लिंग, वचन, विभक्ति ह्या तिन्ही प्रकारच्या विकरणांचें विवेचन पुरें झालें. आतां अखेरीस ह्याच विषयासंबंधाच्या एक दोन गोष्टी सांगतों. ]

३३७. नामाच्या सामान्यरूपाचाच चतुर्थीचे अर्थी प्रत्यय न लावितां उपयोग करण्याचा कवितेंत बराच प्रचार आहे.

तूं मायबाप बंधु प्राणप्रिय मित्र सोयरा रामा
जड **जीवा** नाम तुझें परिपाळी **बालका** जसा आमा—मोरोपंत
**रामा** वन **भरता** सिंहासन देइन जाण तरीच खरी मी—किर्लोस्कर

( अ ) क्वचित् षष्ठी विभक्तीचे जागींही सामान्यरूपाचा उपयोग होतो. जसें:—तूं आपल्या **मुलग्या** हातीं मला निरोप पाठव.

**मुलां** मध्यभागीं वसे कृष्ण जेंवी —- वामन.
पलंगी बसवूनियां राणी । **माते** हातें आणवी पाणी,

( आ ) जुन्या कवितेंत अन्य विभक्तींचे जागींही सामान्यरूपाचा उपयोग झालेला क्वचित् आढळतो,

३३८, ( अ ) संबोधनाचें एकवचन व एकवचीं सामान्यरूप हीं समान असतात असा साधारण नियम आहे, तरी कधीं कधीं प्रथमेचें एकवचनही संबोधनाचे एकवचनीं जरा बहुमानपूर्वक बोलतांनां योजण्याचा प्रघात आहे, जसें :—ए तेली, ए माळी, ए रमा, इ०,

( आ ) तत्सम संस्कृत शब्दांसंबंधानें असें लक्षांत ठेवावें कीं, त्यांचें संस्कृत संबोधनच मराठींत ठराविक भाषणप्रचारांत व कवितेंत उपयोगांत आहे. जसें :—राम राम, शिव शिव, त्राहि भगवन्, इ०, ( त्राहि भगवान् असें चुकीचें रूप संस्कृतानभिज्ञ लोकांच्या तोंडीं आढळतें, )

हे नाथ रमानाथ व्रजनाथ हरे मुकुंद कंसारे — मोरोपंत,

३३९, विभक्तिप्रत्ययांचे जागीं कांहीं शब्दयोगी अव्ययें नामापुढें लागून विभक्तिप्रत्ययांचें काम करितात, निरनिराळ्या विभक्तींचें अर्थानें निरनिराळीं शब्दयोगी अव्ययें नामांस लागतात, विभक्तिप्रत्ययांचे पूर्वीं जसें नामांचें बहुधा सामान्यरूप होतें, त्याचप्रमाणें शब्दयोगी अव्ययांचे पूर्वींही त्यांचे बहुधा सामान्यरूप होतें. ह्या नियमाचे अपवाद शब्दयोगी अव्ययांचे अध्यायांत सविस्तर आलेच आहेत; ते तेथें पहावे,

**प्रथमा**—( प्रत्ययांप्रमाणेंच अव्ययेंही नाहींत, )

**तृतीया**—करून, द्वारा, द्वारें, मुळें, कडून, जवळून, योगें, पाशीं, सह, बरोबर, बराबर, नजीक, निशी, पायीं, प्रमाणें, बरहुकूम, वतीनें, संकट, संगतीं, संगें, संनिध, समवेत, सरसा, सरसें, सरशीं, सहवर्तमान, इ०, विशेषेंकरून कवितेंत :—करवीं, हातें, सवें, कून, पाडें, पास, मेळें, संगवें; इ०,

**चतुर्थी**—प्रत, लागीं, करितां, साठीं, स्तव, अर्थ, अर्थी, कडे, ऐवजीं, कडेस, खातर प्रीत्यर्थ, बद्दल, बदला, मोबदला; इ०, विशेषेंकरून कवितेंत :— कारणें, निमित्तें, निमित्त, परतें, प्रति, लागून, वतीं, वारीं, हारीं, इ०,

**पंचमी**—पेक्षां, पासून, वांचून, विना, खेरीज, शिवाय, उप्रांत, कडून, नंतर, वरून, विरहित, वेगळें, व्यतिरिक्त; इ०. विशेषेंकरून कवितेंत:— पासाव, विणें, वीण, परीस, अंगी, कडून, जवळून, परते, परी; परीस, पासोनियां; इ०,

**षष्ठी**—संबंधी, विषयीं, विशी, इ०,

**सप्तमी**—मध्यें, ठायीं, ऐथें, खालीं, तेथें, पलीकडे पुढें, पूर्वीं, पोटीं, पैकीं, बाहेर, भोंवती, विषयीं, समोर, सभोंवार, सभोंवती; इ०; विशेषेंकरून कवितेंत:—माजी, भीतरीं, अभ्यंतरीं, उपरी, मधीं, माझारी, वरी, इ०,

**टीप**—यांपैकीं पुष्कळांचीं कवितेंत छंदास अनुसरून अनेक रूपांतरें होतात. जसें:—विना—विणें, वीणें, विण, इ० तीं सहज समजण्यासारखीं असतात.

३४०. संबोधनाचे दोन्ही वचना रूपांपूर्वीं हाक मारण्याचे कामीं कांहीं अव्ययांचा उपयोग होतो. तीं येणेंप्रमाणें:—

| | एकवचनीं. | अनेकवचनीं. |
| --- | --- | --- |
| पुल्लिंगी नपुंसकलिंगी | अरे, रे, हे, ए; पद्यांत:—अमा, गा | अहो, हे, पद्यांत:—अजी |

स्त्रीलिंगी—अगे, गे, अग, ग, अगो, गो.

(अ) हीं सर्व संबोधनाचे रूपाच्या पूर्वीं येतात. जसें:— अरे मुला, अहो मुलांनो; ए माळणी, हे माळणींनो; इ०.

(आ) रे, गे, ग, गो, हो, हीं मात्र संबोधनाचे रूपाच्या नंतरहीं येतात. आणि कधीं कधीं वाक्यांतील इतर शब्दांचे पुढेंही येतात, जसें:—देवा रे, आई ग, सभ्य गृहस्थ हो, मित्र हो, काय हो, काय रे, तुम्हांला ही गोष्ट मी किती वेळां तरी सांगितली हो; रामा, तुला हें येत होतें ना रे, इ०.

टीप—ह्यांपैकीं हो हें अव्यय नामाचें सामान्यरूप न होतां त्याचे अनेकवचनाचे पुढें येतें, हें 'बांधव हो,' 'सज्जन हो' इत्यादि व वरील कांहीं उदाहरणांवरून कळेलच. तसेंच एकंदर संबोधनाचा उपयोग विशेषेंकरून मनुष्यवाचक नामांसंबंधानें व क्वचित् व इतर प्राणिकवाचक नामांसंबंधानें आणि फार तर सचेतनत्वाचा आरोप प्रसंगविशेषीं ज्यांवर केलेला असतो त्या पदार्थांच्या नामांसंबंधानें कधीं कधीं होतो, हें उघड आहे.

---

# अध्याय ४.

## सर्वनामें.

३४१. या अध्यायांत सर्वनामांचें विकरण म्हणजे सर्वनामें कशीं चालतात तें सांगावयाचें आहे. सर्वनामें नऊ आहेत हें मागें आलेंच आहे. तीं येणेंप्रमाणें:—मी, तूं, आपण, स्वत:, तो, हा, जो, कोण, काय. नामांप्रमाणें सर्वनामांसही लिंग, वचन, आणि विभक्ति, हीं असतात.

३४२. परंतु ह्या नऊ सर्वनामांपैकीं फक्त तो, हा आणि जो, हीं तीनच काय तीं लिंगाप्रमाणें बदलतात. बाकीच्यांचीं तिन्ही लिंगी रूपें समान. तो, हा, जो, ह्यांचीं भिन्न लिंगी रूपें येणेंप्रमाणें:--

| पु० | स्त्री० | न० |
| --- | --- | --- |
| तो | ती (ते) | तें |
| हा | ही (हे) | हें |
| जो | जी (जे) | जें |

ते, हे, जे हीं कंसांत दिलेलीं स्त्रीलिंगी रूपें फक्त कवितेंत आढळतात. 'कळावें लोभ असावा हे विनंती' 'सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना,' असें पत्रें पुरीं करतांना लिहिण्याचे जे समारोपप्रकार आहेत त्यांमध्यें हे हें स्त्रीलिंगी रूप गद्यांतही आहे. पण अन्यत्र सहसा आढळत नाहीं.

(कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतातः--"बोलण्याचे चालू भाषेंतही जो व तो ह्या दोन सर्वनामरूप प्रातिपदिकांतही प्रथमैकवचनाचा प्रत्यय जो 'ओ' त्याचीं रूपें राहिलीं आहेत. जो, तो, हे शब्द आकारान्त समजले पाहिजेत; ओकारान्त नव्हत; आणि त्यामुळें त्यांचीं इतर रूपें जे, ते, ज्यास, त्यास, ज्यानें त्यानें, अशीं आकारान्त शब्दांप्रमाणें होतात. टाहो वगैरे ओकारान्त शब्दांप्रमाणें होत नाहींत." व्युत्पत्तिदृष्ट्या हें म्हणणें कांहीं अंशीं खरें असेल. आणि जरी हल्लीं जो, तो, हींच रूपें प्रथमेच्या एकवचनीं येतात म्हणून तींच मूळ रूपें मानून तींच कोशांत देतात आणि तें योग्यही आहे तरी कृष्णशास्त्र्यांच्या वरील विधानाचा ते शब्द चालविण्याचे कामीं उपयोग आहे ह्यांत संशय नाहीं.

तथापि कृष्णशास्त्र्यांचें विधान कांहीं अंशीं अपुरें व भ्रामक असल्यामुळें त्यासंबंधानें अधिक लिहिण्याची जरूर आहे. हीच व्युत्पत्तिदृष्टि जरा लांबविली म्हणजे असेंही दिसून येईल कीं जा, ता, हीं आकारान्त रूपेंही मूळ नव्हत. गाभा, बाळा, दांता, रामा, इत्यादि आकारान्त पुल्लिंगी नामें हीं वास्तविक मूळचीं गाभ, बाळ, दांत, राम, अशीं अकारान्तच समजलीं पाहिजेत आणि त्यांचीं मूळ संस्कृत नामें गर्भ, बाल, दंत, राम, हीं अकारान्तच आहेत. तेव्हां मराठींतील आकारान्त पुल्लिंगी नामें मूळ अकारान्त प्रातिपदिकांपासून निघालेलीं नव्हत, तर गर्भः, बालः, दंतः, रामः, अशा त्यांच्या प्रथमेच्या एकवचनापासून निघालीं आहेत हें उघड आहे. तात्पर्य, जो तो ह्यांचीं हा ह्या सर्वनामाप्रमाणें जरी जा, ता, अशीं आकान्त रूपें समजलीं, तरी तीं मूळ होत असें म्हणतां येत नाहीं. तीं यः आणि सः ह्या प्रथमैकवचनाशींच नेऊन भिडवावीं लागतील. तेव्हां यः आणि सः ह्यांचीं जीं मूळ

रूपें यद् आणि तद् त्यांपासून प्राकृतांत येणारीं ज आणि त हीं अकारान्त रूपेंच मूळ होत असें समजलें पाहिजे. आणि या जचें प्राकृत व्याकरणांत जो हेंच प्रथमेचें एकवचन दिलें आहे; त्याचप्रमाणें त ह्याचें तो. शिवाय जा हें ज ह्याचें स्त्रीलिंगी प्रथमेच्या एकवचनाचें रूप दिलें आहे; त्याप्रमाणेंच त ह्याचें ता. ह्यामुळें मराठींतील जो आणि तो ' हे शब्द आकारान्त समजले पाहिजेत ' या शास्त्रीबोवांच्या विधानासंबंधानें जबर शंका येते. हे शब्द आकारान्त पुल्लिंगी शब्दांप्रमाणें चालतात यांत संशय नाहीं. पण तेवढ्यावरून त्यांस आकारान्त म्हणतां येईल कीं नाहीं ह्याबद्दल शंकाच आहे. आकारान्त पुल्लिंगी शब्दांप्रमाणें एकारान्त नपुंसकलिंगी नामेंही चालतात. सारखीं सारखीं चालणारीं नामें एकाच अंतीं असतात असा नियम नाहीं. एकाच लिंगाच्या शब्दांसंबंधानेंही असें म्हणतां येणार नाहीं. घोडा आणि तेली हे शब्दही एकसारखेच चालतात. पण तेवढ्यावरून ते एकाच अंताचे होत असें कोण म्हणेल ? एवंच जो आणि तो हीं सर्वनामें जरी आकारान्त पुल्लिंगी शब्दांप्रमाणें चाललीं तरी त्यांस आकारान्त म्हणावें कीं नाहीं ही पहिली शंका; आणि जरी त्यांस क्षणभर आकारान्त म्हटलें तरी तीं त्यांचीं मुळ रूपें होत कीं नव्हत ही दुसरी जबर शंका आहेच. ह्यामुळें ' जो व तो हे शब्द आकारान्त समजले पाहिजेत, असलें कृष्णशास्त्र्यांप्रमाणें अपूर्ण व शंकास्पद विधान न करितां जो व तो हीं ओकारान्त रूपेंच मराठीचे दृष्टीनें मूळ समजून तीं आकारान्त पुल्लिंगी शब्दांप्रमाणें चालतात इतकेंच म्हणणें बरें ]

३४३. सर्वनामांचीं वचनें येणेंप्रमाणें :—

| ए० व० | अ० व० | ए० व० | अ० व० |
|---|---|---|---|
| मी | आम्ही | आपण | आपण |
| तूं | तुम्ही | स्वतः | स्वतः |
| तो, ती, तें | ते, त्या, तीं | कोण | कोण |
| जो, जी, जें | जे, ज्या, जीं | काय | काय |
| हा, ही, हें | हे, ह्या, हीं | | |

यावरून असें समजेल कीं, मी व तूं ह्यांचीं अनेकवचनें अनियमित दिसतात; तो, हा, जो ह्यांचीं नियमित दिसतात; आणि आपण स्वतः, कोण, आणि काय हीं उभयवचनीं समान आहेत. ' आपण ' ह्यास एकवचन नाहीं असें दादोबा म्हणतात. हें म्हणणें पुरुषवाचक आपण ह्या सर्वनामासंबंधानें खरें आहे. परंतु आपण हें पुरुषवाचक असून ' स्वतः ' याप्रमाणें आत्मवाचकही आहे, हें सर्वनामांचे वर्गीकरणांत स्पष्ट करून दाख-

विलेंच आहे. तेव्हां ' स्वतः ' ह्याप्रमाणें ' आपण ' या आत्मवाचकास एकवचन आहे. उदा० :——त्यानें हें काम केलें आणि **आपण** निघून गेला.

३४४. आतां सर्वनामांस विभक्तिप्रत्यय कसे लागतात तें सांगतों; अर्थात् तीं चालवून दाखवितों. सर्वनामांसंबंधानें एक गोष्ट ध्यानांत ठेवावयाची ती ही कीं, त्यांस संबोधन नाहीं. कारण कीं, ज्याला हांक मारावयाची त्याला ती त्याच्या नांवानेंच मारिली पाहिजे. आतां कधीं कधीं जेव्हां नांव माहीत नसतें किंवा वेळेवर तोंडास येत नाहीं तेव्हां व्यावहारिक भाषेंत ' अरे तूं ' ' अरे ह्या ' असे प्रयोग क्वचित् येतात. परंतु ते व्याकरणदृष्टया जमेस धरण्यालायक नाहींत.

३४५. प्रथमपुरुषवाचक **मी**—तिन्ही लिंगीं समान.

| वि० | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | मी | आम्ही |
| तृ० | मीं, म्यां, मशीं, मजशीं | आम्हीं, आम्हांशीं, ( आम्हांहीं ) |
| च० | मला, मजला, ( मातें, मस-क ) | आम्हांस, आम्हांला ( आम्हांतें, आमुतें ) |
| पं० | मजहून | आम्हांहून |
| ष० | माझा | आमचा, ( आमुचा ) |
| स० | ( स्वतंत्र रूप नाहीं. ) | आम्हांत |

टीप१– कोणी कोणी मज हें एक चतुर्थीचें एकवचनी रूप सांगतात; पण तें सामान्यरूप होय. शिवाय मज हे जर च० ए० व० तर आम्हां हें तिचें तदनुरूप अ० व० ही होय. अर्थात् आम्हां हें संगतीस अनुसरून चतुर्थीचे अनेकवचनी सांगितलें पाहिजे. परंतु मज हें एकवचनी सांगून ' आम्हां ' ह्याचा अनेकवचनी उल्लेख न करणें, ही केवळ विसंगति होय. वास्तविक म्हटलें म्हणजे दोन्ही केवळ सामान्यरूपें होत हें निर्विवाद आहे. तसेंच सप्तमीचीं माझ्यांत आणि आमच्यांत अशीं रूपें देतात; परंतु हीं सविकरण सप्तमीचीं रूपें होत, हें उघड आहे. सविकरण रूपें जर ह्याप्रमाणें सप्तमींत घेतलीं तर माझ्यानें, माझ्याशीं, आमच्यानें, आमच्याशीं, इत्यादि रूपें अन्य विभक्तींत कां घेऊं नयेत हें आम्हांस समजत नाहीं. आणि जर तीं अन्य विभक्तींत घ्यावयाचीं नाहींत तर संगतीस धरून चालावयाचें म्हटलें म्हणजे तीं सप्तमींतही घेतां येत नाहींत हें निर्विवाद आहे.

टीप——प्रथमेचीं मी व आम्ही, आणि तृतीयेचीं मीं व आम्हीं ह्या रूपांमध्यें अन्त्य स्वरावरील बिंदूच्या बाबतींत फरक आहे हें संस्मरणीय आहे. प्रथमेच्या रूपांवर बिंदु नसतो, पण तो तृतीयेच्या रूपांवर आहे. हा प्रघात सोईचा आहे;

आणि सर्व शब्दांची तृतीयेचीं रूपें अनुनासिकान्त असतात ह्या नियमाप्रमाणें तीं तशीं आहेत हेंही सुसंगतच आहे.

टीप २—झा हा षष्ठीचा प्रत्यय मी व तूं या सर्वनामांचे षष्ठीच्या एकवचनीं आढळतो. अनेकवचनीं सर्वसाधारण चा हा प्रत्ययच त्यांस लागतो. आपण ह्या सर्वनामाला मात्र चा हा षष्ठीचा प्रत्यय कधींच लागत नाहीं. त्यास दोन्ही वचनीं ला लागतो हें पुढें समजेलच.

३४६. द्वितीयपुरुषवाचक तूं—तिन्ही लिंगी समान.

| वि० ए० व० | अ० व० |
|---|---|
| प्र० तूं | तुम्ही |
| तृ० तूं, त्वां, तुशीं, तुजशीं | तुम्हीं, तुम्हांशीं (तुम्हांहीं) |
| च० तुला, तुजला, (तूतें, तूस—क०) | तुह्मांस, तुम्हांला, (तुह्मांतें, तुमतें—क) |
| पं० तुजहून | तुम्हांहून |
| ष० तुझा | तुमचा |
| स० (तूंत—क०) | तुम्हांत |

टीप—तुज हें जर च० ए० व० होय तर तुम्हां हें तिचें अ० व० कां नसावें ! तसेंच गेल्या अंकांतील पहिल्या टीपेंत सांगितल्याप्रमाणें दुसरी गोष्ट अशी कीं, सविकरण रूपें कोठेंच ग्राह्य नव्हत. म्हणजे तीं मूळ शब्द चालवितांना सांगणें नीट नाहीं हें उघड आहे. तसेंच गेल्या अंकांतील दुसऱ्या टीपेंत सांगितल्या-प्रमाणें तूं ह्याचें प्र० अ० व० तुम्ही आणि तृ० अ० व० तुम्हीं यांमधील अन्त्य अनुनासिकाचा फरक ध्यानांत ठेवावा.

३४७ आपण—तिन्ही लिंगी समान.

| वि० ए० व | अ० व० |
|---|---|
| प्र० आपण | आपण |
| तृ० आपण, आपणाशीं | आपण, आपणांशीं |
| च० आपणास, आपणाला | आपणांस, आपणांला |
| पं० आपणाहून | आपणांहून |
| ष० आपला | आपला |
| स० आपणांत | आपणांत |

टीप १—पुरुषवाचक आपण ह्यास एकवचनीं रूपें नाहींत. परंतु आत्मवाचक आपण हें दोन्हीं वचनीं चालतें. म्हणून दोन्हीं वचनीं रूपें वर दिलीं आहेत. पुरुषवाचक आपण एकवचनीं चालत नाहीं किंवा वास्तविक चालूं नये; कारण कीं, तें तत्वतः अनेकवचनींच आहे. परंतु 'आपण' ह्या

बहुवचनाचा सन्मानार्थीं किंवा मोठेपणीं एका व्यक्तीसंबंधानेंही उपयोग होतो; आणि एकवचनाच्या आणि बहुवचनाच्या रूपांमध्यें फक्त सामान्यरूपाचे अन्त्यावरील एका बिंदूचाच फरक लेखांत आहे आणि णा हा स्वतःच अनुनासिक पडल्यामुळें त्यावरील ह्या बिंदूचा अनुनासिक उच्चार साफ होत नाहीं. ह्यामुळें पुरुषवाचक आपण ह्याला एकवचन नाहीं, ही सूक्ष्मता कोणी लक्षांत आणीत नाहीं. तथापि परमार्थतः आत्मवाचक आपण आणि पुरुषवाचक आपण ह्यांत हा फरक आहे, हें विसरतां कामा नये.

टीप २—दादोबांनीं आपला हें रूप चालवून दाखविलें आहे; आणि 'यास अनेकवचन नाहीं' असें म्हटलें आहे. परंतु प्रथम आपला हें रूप चालवून दाखविण्याचीच आवश्यकता नाहीं. कारण कीं, ह्याजवरून होणारीं रूपें हीं सविकरण रूपें होत, आणि तीं नियमितपणें होत असल्यामुळें कोणत्याच शब्दाचीं चालवून दाखविण्याची गरज नाहीं. दुसरें असें कीं आपल्यानें, आपल्याशीं, आपल्यास, ह्यांचीं आपल्यांनीं, आपल्यांशीं, आपल्यांस, अशीं अनेकवचनें कां होऊं नयेत? आमच्या मतें तर अशीं अनेकवचनें होण्यास कांहीं एक हरकत नाहीं; इतकेंच नव्हे तर तीं प्रचारांतही आहेत. तेव्हां दादोबांचे विधानांत कांहीं अर्थ नाहीं हें उघड आहे. नवलाची गोष्ट इतकीच कीं, आमच्या वैयाकरणांचीं असलीं अप्रयोजक विधानें वर्षेंच्या वर्षें निमूटपणें शिरसावंद्य होतात!

टीप ३—आपण ह्याचे आपसांत असें एक सप्तमीच्या अनेकवचनाचें रूप आढळतें. त्याचा स्वतंत्रपणें व 'आपआपसांत' असा द्विरुक्तिपूर्वक उपयोग होतो. त्यावरून आपसांत म्हणजे परस्परांत, एकमेकांत, असा अर्थ आहे हें उघड आहे. परंतु आपणांत ह्याचा ह्या अर्थीं कधींच उपयोग होत नाहीं. व आपसांत ह्याचा आपणांत या अर्थींही कधीं उपयोग होत नाहीं. आपसांत हें रूप हिंदी भाषेच्या द्वारा (हिं० सप्तमी—आपसमें) आलें असावें असें दिसतें. असें सकारयुक्त रूप एकच असून त्याचा अर्थही भिन्न पडल्यामुळें त्याचा आपण शब्द चालवून दाखविण्यांत नियमित रूपांमध्यें अन्तर्भाव करितां येत नाहीं.

३४८. आत्मवाचक **स्वतः**—तिन्हीं लिंगीं समान

| वि० | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | स्वतः | (एकवचनाप्रमाणेंच.) |
| तृ० | स्वतः, स्वतःशीं | |
| च० | स्वतःस, स्वतःला | |
| पं० | स्वतःहून | |
| ष० | स्वतःचा | |
| स० | स्वतांत (क.) | |

टीप—स्वतः ह्याचे 'स्वतां' असें कोणी मराठी रूप लिहितात. आणि त्यासच स्वतांशीं, स्वतांस, इत्यादि अशा प्रकारें विभक्तिप्रत्यय लावितात. परंतु स्वतः हें रूप व त्यांची विभक्तिप्रत्ययान्त रूपें हीं हलक्या प्रतीचीं समजण्यांत येतात. ह्यामुळें तीं शिष्ट भाषेंतून हळू हळू अन्तर्धान पावूं लागलीं आहेत ह योग्यच आहे. मात्र स्वतः ह्याचें सप्तमीचें कोणतेंच नियमित रूप होत नसल्यामुळें तेथें मात्र 'स्वतांत' ह्याचा क्वचित् उपयोग होतो. स्वतः हा शब्द विसर्गान्त पडल्यामुळें त्यास अनुनासिकपूर्व त किंवा ई हे प्रत्यय लागणेंच उच्चारदृष्ट्या शक्य नाहीं. ह्यामुळें त्या प्रत्यांचे जागीं शिष्ट भाषेंत बहुधा शब्दयोगी अव्ययांचा उपयोग होतो. जसें:—स्वतः मध्यें, स्वतः विषयीं, इ०.

३४९. दर्शक तो.— पुल्लिंग.

| वि० | ए० व०, | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | तो | ते |
| तृ० | त्यानें,—णें, त्याशीं, त्याजशीं (तेणें) | त्यांनीं,—णीं, त्यांशीं, त्यांजशीं (त्यांहीं तिहीं) |
| च० | त्यास, त्याला, त्याजला, (त्यातें) | त्यांस, त्यांला, त्यांजला, त्यांनां, (त्यातें) |
| पं० | त्याहून, त्याजहून | त्यांहून, त्यांजहून |
| ष० | त्याचा | त्यांचा |
| स० | त्यांत | त्यांत |

ती—स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | ती | त्या |
| तृ० | तिनें,—णें, तिशीं, तिजशीं | (पुल्लिंगाप्रमाणें.) |
| च० | तीस, तिला, तिजला, (तीतें) | |
| पं० | तीहून, तिजहून, तिहून | |
| ष० | तिचा, (तीचा) | |
| स० | तींत | |

तें — नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | तें | तीं |

(पुढील सर्व विभक्ति दोन्ही वचनीं पुल्लिंगाप्रमाणें.)

टीप—सविकरण रूपांचा अर्थात् कोठेंच अन्तर्भाव करितां येत नाही हें पूर्वी सांगितलच आहे. तेंच अन्यत्र समजावें.

३५०. दर्शक—हा. पुल्लिंग.

| वि० | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | हा | हे |
| तृ० | ह्या–नें,–णें, ह्या–शीं,–जशीं<br>या–नें, णें, या शीं,–जशीं<br>( येणें ) | ह्यां–नीं,–णीं, ह्यां–शीं,-<br>यां–नी,–णीं, यां–शीं,–<br>( ह्यांहीं, यांहीं, इहीं ) |
| च० | ह्यास, ह्याला, ह्याजला<br>यास, याला याजला<br>( ह्यातें, यातें ) | ह्यांस, ह्यांला, ह्यांजला,<br>यांस, यांला, यांजला, यां<br>( ह्यांते, यांतें ) |
| पं० | ह्याहून, ह्याजहून<br>याहून, याजहून | ह्यांहून, ह्यांजहून<br>यांहून, यांजहून |
| ष० | ह्याचा, याचा | ह्यांचा, यांचा |
| स० | ह्यांत, यांत | ह्यांत, यांत |

ही — स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | ही | ह्या |
| तृ० | हिनें, हिणें, हिशीं, हिजशीं<br>इनें, इणें, इशीं, इजशीं | ( पुल्लिंगाप्रमाणें. ) |
| च० | हीस, हिला, हिजला<br>ईस, इला, इजला | |
| पं० | हीहून, हिहून, हिजहून<br>ईहून, इहून, इजहून | |
| ष० | हिचा, इचा, ( हीचा, ईचा ) | |
| स० | हींत, ईंत | |

हें — नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | हें | हीं |

( पुढील सर्व विभक्ति दोन्ही वचनीं पुल्लिंगाप्रमाणें. )

३५१. संबंधी — **जो.** पुल्लिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | जो | जे |
| तृ० | ज्यानें, ज्याणें, ज्याशीं, ज्याजशीं,<br>( जेणें ) | ज्यांनीं, ज्यांणीं, ज्यांशीं,<br>( ज्यांहीं, जिहीं ) |
| च० | ज्यास, ज्याला, ज्याजला, | ज्यांस, ज्यांला, ज्यांजला, |

| वि० | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| पं० | ज्याहून, ज्याजहून | ज्यांहून, ज्यांजहून |
| ष० | ज्याचा | ज्यांचा |
| सं० | ज्यांत | ज्यांत |

जी—स्त्रीलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | जी | ज्या |
| तृ० | जिनें, जिणें, जिशीं, जिजशीं ( जीनें,–णें, जीशीं ) | ( पुल्लिंगाप्रमाणें. ) |
| च० | जीस, जिला, जिजला, ( जीला ) | |
| पं० | जिहून, जीहून, जिजहून | |
| षं० | जिचा, ( जीचा ) | |
| स० | जींत | |

जें—नपुंसकलिंग.

| | | |
|---|---|---|
| प्र० | जे | जीं |

( पुढील सर्व विभक्ति: दोन्ही वचनीं पुल्लिंगाप्रमाणें. )

३५२. प्रश्नार्थक.—**कोण** —- तिन्ही. लिंगीं समान.

| | | |
|---|---|---|
| प्र० | कोण | कोण |
| तृ० | कोणीं, कोणाशीं, ( कोणें ). | कोणीं, कोणांशीं |
| च० | कोणास, कोणाला | कोणांस, कोणांला |
| पं० | कोणाहून | कोणांहून |
| ष० | कोणाचा | कोणांचा |
| स० | कोणांत | कोणांत |

३५३. प्रश्नार्थक — काय — तिन्ही लिंगीं समान.

| | | |
|---|---|---|
| प्र० | काय | काय |
| तृ० | कशानें, कशाशीं, ( कशा, कासया ) | कशानीं, कशांशीं |
| च० | काशास, कशाला | कशांस, कशांला, कशांना |
| पं० | कशाहून | कशांहून |
| प० | कशाचा, | कशांचा |
| स० | कशांत | कशांत |

टीप—काय ह्या शब्दाचीं तृतीयेपासूनचीं रूपें ' कसा ' शब्दाचे रूपांप्रमाणें होतात. किंवा काय हें सर्वनाम मुळीं चालतच नाहीं; त्याच्या अर्थानें प्रथमोत्तर विभक्तींत ' कसा ' शब्दाचा रूपें उपयोगांत येतात असें म्हणावें. ह्यांपैकी कोणतेंही विधान केल तरी सारखेंच.

३५४. अनिश्चित **कोण** व **काय**—हीं प्रश्नार्थक कोण व काय ह्यांप्रमाणेंच चालतात. फक्त कोण ह्या अनिश्चिताचे प्रथमेच्या दोन्ही वचनीं कोणी असें रूप होतें. अथवा, वाटेल तर असें म्हणावें कीं, कोणी हें अनिश्चित सर्वनाम प्रथमेमध्यें ' कोणी—कोणी ' असें चालून पुढील विभक्तींत त्याचीं व कोण ह्या प्रश्नार्थकाचीं रूपें दोन्ही वचनीं समान असतात. परंतु दुसऱ्या विधानापेक्षां पहिलेंच विधान बरें दिसतें. कारण कीं, ' कोण ' हेंही प्रथमेमध्यें कधीं कधीं अनिश्चितार्थीं येतें. आणि शिवाय कोणी हें वास्तविक ( कोण + ही = कोण्ही = कोणी ) कोण. ह्यापासूनच पुढें ही हें अव्यय येऊन साधलें आहे हें उघड आहे. कोणी ह्याचेबद्दल कांहीं लोकांच्या बोलण्यांत ' कोण्ही ' असेंही ऐकूं येतें.

३५५. अखेरीस सर्वनामांच्या एकंदर रूपांचीं कवितेंत मुख्यत्वेंकरून जीं रूपान्तरें होतात तीं नमूद करून सर्वनामांचें विकरण संपवू.

| | | |
|---|---|---|
| आम्ही | बदल | अम्ही |
| आम्हां | — | अम्हां |
| माझा | — | माजा, मम ( संस्कृत ) |
| तुझा | — | तुजा, तव ( सं ) |
| आपणा | — | अपणा, अपुणा |
| आपला | — | अपुला, अपला<br>निज, ( सं० ), आत्म ( सं० समासांत) |
| त्या | — | तया ( तो ह्याचें सामान्यरूप ) |
| ती | — | ते |
| ति | — | तिये ( ती ह्याचें सामान्यरूप ) |
| ही | — | हे |
| ज्या | — | जया ( जो ह्याचें सामान्यरूप ) |
| जी | — | जे |

| | | |
|---|---|---|
| जि | — | जिये ( जी ह्याचें सामान्यरूप ) |
| कोणी | — | कुणी, कोणें |
| कोणा | — | कुणा, कवणा, कोण्हा, |
| कोण | — | कवण |
| कशा | — | कैशा [ सामान्यरूप ] |

टीप—शिवाय ह्यांचीं आणखीही कांहीं वेडीं वांकडीं रूपान्तर आढळतात. पण तीं इतक्यांचे परिचयानें सहज ओळखतां येतील.

३५६. सविकरण विभक्तींच्या रूपांतही असा फरक सर्वनामांसंबंधानें व नामांसंबंधानेंही आढळतो. सविकरण सामान्यरूपीं ज्या, ल्या, च्या, अशीं जीं जोडाक्षरें येतात त्यांचे जागीं कवितेंत झिया, लिया, चिया, अशीं रूपान्तरें होतात. जसें:—माझ्या—माझिया, त्याच्या—त्याचिया, आपुल्या—आपुलिया, इ०

# अध्याय ५.

## विशेषणें.

३५७. मराठीमध्यें आकारान्त विशेषणाशिवाय इतरांस बहुतकरून कांहींच विकार होत नाहींत. तथापि सर्व विशेषणांचा नामांप्रमाणें उपयोग होत असल्यामुळें त्यांस अप्रत्यक्षपणें लिंग, वचन, आणि विभक्ति, हीं असतात असें म्हटलें तरी चालेल. तरी ह्या दृष्टीनें तीं नामांत गेल्यामुळें लिंग, वचन व विभक्ति ह्यांनीं त्यांस होणारे विकार त्या त्या अन्ताच्या नामांप्रमाणेंच असल्यामुळें त्यांचें येथें फक्त दिग्दर्शन केलें म्हणजे झालें. जेथें फरक असेल तेथें मात्र तो फरक विशेष स्पष्ट करण्यांत येईल.

विशेषणांचें मुख्य तीन भेद केले आहेत. सार्वनामिक विशेषणें, गुणविशेषणें, आणि संख्याविशेषणें. ह्या क्रमानेंच त्यांच्या विकरणाचा विचार करूं.

३५८. सार्वनामिक विशेषणांत दोन भेद आहेत. सर्वनामविशेषणें म्हणजे जीं नऊ सर्वनामें आहेत त्यांचाच जेव्हां विशेषणाप्रमाणें उपयोग होतो तेव्हां तीं; आणि सर्वनामांपासून साधलेलीं सर्वनामसाधित विशेषणें.

मूळ सर्वनामाचें फक्त सामान्यरूप होऊन त्याचे पुढें जेव्हां सविभक्तिक किंवा सशब्दयोगिक नाम येईल तेव्हांच त्यास विशेषण म्हणावें, एरवीं त्यास सर्वनामच म्हटलें पाहिजे; आणि विशेषेकरून पुरुषवाचक म्हटल्या जाणाऱ्या सर्वनामांशिवाय इतरांस, जेव्हां त्यांचे पुढील नाम विधानाच्या स्पष्टीकरणासाठीं आलें नसेल तेव्हां, प्रथमेमध्येंही विशेषणें म्हणण्यास हरकत नाहीं; असा, मूळ सर्वनामांस विशेषण कधीं म्हणावें या प्रश्नाचा पूर्वीं दिलेला निकाल ध्यानांत ठेवावा. यावरून असें दिसून येईल कीं, सर्वनामविशेषणांच्या विभक्तिविकरणाचा तर विशेषणाध्यायांत संबंधच येत नाहीं. कारण कीं, त्यांस विभक्तिप्रत्यय लागल्यास त्यांचें विशेषणत्व जातें. तेव्हां त्यांच्या फक्त सामान्यरूपाचाच प्रश्न या अध्यायांत येतो. सर्वनामांचीं विभक्तिप्रत्ययापूर्वीं होणारीं सामान्यरूपें नियमित नाहींत हें मागल्या अध्यायावरून समजेलच. तथापि सविभक्तिक किंवा सशब्दयोगिक शब्द पुढें आला असतां त्यांचीं जीं विशेषण—सामान्यरूपें होतात, तीं विभक्तिप्रत्ययापूर्वीं होणाऱ्या सामान्यरूपांपैकींच ठराविक आहेत. म्हणून तीं विशेषणसामान्यरूपें येथें देतों:—

| | विभक्ति सामान्यरूप. | | विशेषण सामान्यरूप, | |
|---|---|---|---|---|
| सर्वनाम | ए० व० | अ० व० | ए० व० | अ० व० |
| मी | म, मा, मज | आम्हां | मज | आम्हां |
| तूं | तु, तुज | तुम्हां | तुज | तुम्हां |
| तो, तें | त्या, त्याज | त्यां, त्यांज | त्या, ते (क०) | त्या |
| ती | ति, ती, तिज. | त्यां, त्यांज | त्या | त्या |
| हा, हें | ह्या, ह्याज<br>या, याज | ह्यां, ह्यांज<br>यां, यांज | ह्या, या | ह्या, या |
| ही | हि, ही ई, इ<br>हिज इज | ह्यां ह्यांज.<br>यां, यांज | ह्या, या<br>ह्ये(क०)ये(क०) | ह्या, या |
| जो, जें | ज्यां, ज्याज | ज्यां, ज्यांज | ज्या | ज्या |
| जी | जि, जी जिज | ज्यां, ज्यांज | ज्या, जे (क०) | ज्या |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| कोण | कोणा | कोणां | कोणा, कोण्या कोणे (क०) | कोणा, कोण्या |
| काय | कशा | कशां | कशा | कशा |

सूचना—या मुद्यासंबंधानें अं० १४९ पुन्हा एकवार वाचावा.

३५९. सर्वनामसाधित विशेषणांपैकीं असा, इतका, तसा, तितका, जसा, जितका, कसा, कितका, इत्यादि हीं सर्व आकारान्त आहेत. तीं लिंगवचनाप्रमाणें बदलतात. पुल्लिंगावरून स्त्रीलिंग व नपुंसकलिंग साधण्यासाठीं त्यांस अनुक्रमें ई व एं हे प्रत्यय पररूपसंधीनें लागतात. आणि त्यांचीं वचनें व विभक्ति हीं सर्व अनुक्रमें घोडा, नदी, व तळें, या शब्दांप्रमाणें होतात. हीं रूपें साधण्यांत वचनाध्यायाचे अंतीं उपान्त्य व अन्त्य ह्यांचे विकारासंबंधानें जे नियम दिले आहेत ते ध्यानांत ठेवून तदनुसार रूपें साधावीं. उदाहरणार्थ पुढील शब्द पहा:—

| पु० | स्त्री० | नं० |
|---|---|---|
| असा | अशी | असें |

हे शब्द घोडा, नदी, तळें, ह्याप्रमाणें चालतात. जसें:—असा—असे, अशी-अश्या, असें—अशीं, अशानें अशीनें, अशाशीं, इ०.

३६०. गुणवाचक विशेषणांपैकीं सुद्धां फक्त आकारान्त विशेषणें विशेष्यनिघ्न आहेत, म्हणजे तीं विशेष्याचे लिंगवचनाप्रमाणें बदलतात. आणि विशेष्यास विभक्तिप्रत्यय लागले किंवा त्याचे पुढें शब्दयोगी अव्यय आलें म्हणजे त्याच्या मागील आकारान्त विशेषणाचें सामान्यरूप होतें. उदाहरणें:-

| लिंग | विशेषण | ए० व० | अ० व० |
|---|---|---|---|
| पु० | चांगला | चांगला ( घोडा ) | चांगले ( घोडे ) |
| स्त्री० | चांगली | चांगली ( घोडी ) | चांगल्या ( घोड्या ) |
| न० | चांगलें | चांगलें ( घोडें ) | चांगलीं ( घोडीं ) |

स्त्रीलिंगीं व नपुंसकलिंगीं ई व एं हे प्रत्यय पररूपसंधीनें लागतात, हें वर सांगितलेंच आहे.

[ अ ] चांगला, चांगली, चांगलें, इत्यादि विशेषणें जेव्हां नामाप्रमाणें उपयोगांत येतात, तेव्हां तीं अनुक्रमें घोडा, नदी, तळें, ह्या शब्दांप्रमाणेंच चालतात.

[ आ ] विशेष्यास विभक्तिप्रत्यय लागले किंवा त्याचेपुढें शब्दयोगी अव्यय आलें म्हणजे मागल्या आकारान्त विशेषणाचें सामान्यरूप होतें. हें सामान्यरूप मात्र विशेष्याचे लिंगवचनाप्रमाणें बदलत नाहीं. तर तें तिन्हीं लिंगीं व उभयवचनीं समान असतें. तथापि हें सामान्यरूप तीन प्रकारांनीं होतें. जसें:—चांगल्या–चांगले–चांगल्ये घोड्यास, भल्या–भले–भल्ये माणसानें, इ०. म्हणजे अन्त्य आचे जागीं या, ए, किंवा ये असा आदेश होतो. ह्या तीन प्रकारांपैकीं शेवटल्या येकारान्त प्रकाराचा प्रचार फारच कमी आहे.

[ आकारान्त विशेषणाच्या याकारान्त, एकारान्त व येकारान्त ह्या तीन सामान्यरूपांसंबंधानें दादोबांनीं बराच खटाटोप करून असें ठरविलें आहे कीं, फक्त चांगल्या, भल्या, इत्यादि हीं याकारान्त रूपेंच ग्राह्य होत. परंतु अशा तऱ्हेचा वैयाकरणांचा आग्रह केवळ व्यर्थ होय. तेव्हां या तीन सामान्यरूपांपैकीं भल्या, भले, चांगल्या, चांगले, इत्यादि हीं याकारान्त व एकारान्त रूपें येकारान्त रूपांपेक्षां अधिक प्रचारांत आहेत इतकें सांगितलें म्हणजे वैयाकरणाचें काम संपलें. याकारान्त व एकारान्त ह्या दोन विशेष प्रचारांत असलेल्या रूपांपैकीं अमुक एकच ग्राह्य होय व दुसरें त्याज्य होय असें म्हणण्याचा वैयाकरणास अधिकार नाहीं हे आमचे वैयाकरण पदापदीं विसरले आहेत. ]

[ इ ] आकारान्ताशिवाय इतर स्वरान्त विशेषणांपासून जर कांहीं आकारान्त विशेषणें उत्पन्न होत असलीं तर तींही आकारान्त विशेषणांचे नियमाप्रमाणें बदलतात. जसें:—लहाना, लहानगा हीं लहान यापासून आणि कडवा हें कडू यापासून निघालें आहे. त्यांचीं लहानी, लहानें; लहानगी, लहानगें; कडवी, कडवें; अशीं लिंगानुसार रूपें होतात.

३६१. कांहीं शब्द विशेषणें असूनही त्यांचा शब्दयोगी अव्ययांप्रमाणें उपयोग होतो. म्हणजे तीं विशेष्याशिवाय इतर नामांपुढें येऊन त्या नामांचें त्यांचेमागें सामान्यरूप होतें. त्यांस **शब्दयोगी विशेषणें** असें म्हणावें. जसें:—पुस्तका**सारखें** पुस्तक, त्याच्या**जोगी** बायको, तुमच्या**विरुद्ध** मताचे, इ०. अशाच प्रकारचीं आणखी विशेषणें येणेंप्रमाणें :—तुल्य, समान, उलट, इतका, एवढा, इ०.

ह्या शब्दयोगी विशेषणांपैकीं जीं आकारान्त आहेत त्यांस आकारान्त विशेषणांचे सर्व नियम लागू आहेत हें वरील उदाहरणांवरून कळेलच.

३६२. आकारान्ताशिवाय अन्य स्वरान्त विशेषणांस कोणतेच विकार होत नाहींत, जसें: - गरीब मुलगा, गरीब स्त्रिया, गरीब पोरांस, किती आंब्यांस, मऊ बिछान्यावर, कांहीं जणांस, सर्व मंडळीस, इ०.

**अपवाद १** — संस्कृतांत विशेष्याचे लिंगवचनाप्रमाणेंच नव्हे तर विभक्तीप्रमाणेंही सर्व विशेषणें बदलतात. म्हणजे विशेष्याचीं लिंग, वचन, व विभक्ति हीं तिन्ही एकूण एक सर्व विशेषणांस लागतात. मराठीमध्यें कवितेंत अशी संस्कृतरचना क्वचित् आढळते. मोरोपंताचे कवितेंत ह्या रचनेचीं उदाहरणें बरींच आहेत.

वरविक्रममंडितभुजदंडनिहितचंडचापदंडाचा
मी दूत राघवाचा त्वद्विधदुष्टैककालदंडाचा ॥
अज्ञ मुले कलह करिति, न वदावें तेंचि बोलती स्वैर
तें चित्तांत धरुनियां **प्राज्ञें पुरुषें** करूं नये वैर ॥

**अप० २** — अकारान्त विशेषणें, विशेष्य स्त्रीलिंगी असतां, आकारान्त म्हणजे स्त्रीलिंगी झाल्याचींही उदाहरणें कवितेंत अनेक सांपडतात. जसें: —

रविवंशज राजांचीं बहु **सरला** भ्रुलताहि चापलता
ते **वक्रा** झाल्यावर चालेना जिष्णुचीहि चापलता — मोरोपन्त.

३६३. संख्याविशेषणांचे पांच भेद आहेत: गणनावाचक, क्रमवाचक, आवृत्तिवाचक, पृथक्त्ववाचक, आणि अनिश्चित. ह्यांचें विकरण कांहींसें अनियमित आहे.

३६४ गणनावाचकांचे पुन्हा तीन भेद आहेत: पूर्णांकवाचक, अपूर्णांकवाचक आणि साकल्यवाचक.

[ अ ] पूर्णांकवाचकांपैकीं एक, दोन, तीन, चार, हीं फार अनियमित आहेत.

**एक** –( १ ) हें जरी अकारान्त आहे तरी पुढील सविभक्तिक किंवा सशब्दयोगिक विशेष्यानें त्यांचें सामान्यरूप होतें. तें तीन प्रकारांनीं होतें. जसें: —एका मनुष्यास, एके दिवशीं किंवा एक्या दिवशीं. पैकीं अखेरचें " एक्या " हें रूप कमीच प्रचारांत आहे.

**अपवाद**—कधीं कधीं एक ह्याचें सामान्यरूप होतंही नाहीं. जसें:—**एक** प्रकारचें झाड आहे. **एक** घोड्याची गाडी, इ०.

( २ ) प्रथमान्त विशेष्यापूर्वीं हें लिंगभेदानें बदलत नाहीं. जसें:—एक घोडा, एक पोळी, एक पुस्तक, इ०. इतर विभक्तींत विशेष्य असतां त्याचें सामान्यरूप होतें, तिन्ही लिंगीं समान असतें.

( ३ ) नामाप्रमाणें जेव्हां ह्याचा उपयोग होतो तेव्हां तें पुढें दिल्याप्रमाणें चालते. अर्थात् हें नेहमीं एकवचनींच असतें.

| वि० | पु०, न० -ए० व० | स्त्री० —ए० व० |
|---|---|---|
| प्र० | एक | एक |
| तृ० | एकानें, एकाशीं | एकीनें, एकीशीं |
| च० | एकास, एकाला | एकीस, एकीला |
| इ० | इ० | इ० |

टीप—एका ह्या नामाचा जेव्हां 'कांहीं लोक' असा अर्थ असतो तेव्हां त्याचा अनेकवचनींही उपयोग होतो, जसें:—एक जाउनी सांगती सिते, एक असें म्हणतात एक तसें म्हणतात, इ०.

**दोन, तीन, चार** –( १ ) हीं नेहमीं अर्थात् अनेकवचनींच चालतात. हीं तिन्हीं लिंगीं समान.

| वि० | अ० व० | अ० व० | अ० व० |
|---|---|---|---|
| प्र० | दोन | तीन | चार |
| तृ० | दोहोंनीं, दोहोंशीं | तिहींनीं, तिहींशीं | चारांनीं, चारांशीं<br>चोहोंनीं, चोहोंशीं |
| | इ० | इ० | इ० |

( २ ) सविभक्तिक किंवा सशब्दयोगिक विशेष्यांचेपूर्वीं ह्यांचीं अनुक्रमें दोहों, तिहीं, चारां किंवा चोहों, अशीं सामान्यरूपें विकल्पानें होतात. जसें,—दोन किंवा दोहों माणसांनीं, तीन किंवा तिहीं जणींस, चार किंवा चारां किंवा चोहों घरांवर अथवा दिवशीं, इ०.

कवितेंत दोन ह्याचें क्वचित् दों असेंही सामान्यरूप होतें. जसें:—

**दों** दिवसांची तनु ही साची..........................रामजोशी.

टीपः--ह्या शब्दांचे सामान्यरूप करण्यापेक्षां हे शब्द सविभक्तिक व सशब्द-योगीक विशेष्यांचे पूर्वी अविकृत ठेवण्याकडेच शिष्ट भाषेचा कल दिसतो.

**पांच, सात, आठ, नऊः**--हीं जरी आकारांन्त नाहींत तरी ह्यांचीं पांचा, सातां, आठां, नवां अशीं सामान्यरूपें विकल्पेंकरून होतात. तथापि वरील टीपेंत सांगितल्याप्रमाणें ह्यांच्या अविकृत रूपांचाच प्रचार फार आहे.

**सहा, दहा, अकरा, पंधरा** इ०--हीं आकारन्त असूनही विशेष्याचे लिंगवचनाप्रमाणें बदलत नाहींत; आणि सविभक्तिक किंवा सशब्दयोगिक विशेष्यापूर्वी त्यांचें सामान्यरूपही होत नाहीं. जसें:—सहा आंबे, दहा बायका, अकरा मुलें, पंधरा विद्यार्थ्यांस, सोळा जणांवर, इ०

( **आ** ) अपूर्णांकवाचकांपैकीं ' सव्वा ' ह्याशिवाय इतरांस विशेषणांचे नियम नीट लागतात. म्हणजे आकारान्त आहेत तीं बदलतात आणि इतर अविकृत राहतात. जसें:— अर्धा आंबा, अर्धी भाकरी, निम्में केळें, अर्ध्या दिवसाचा, इ०.

**सव्वा**--हें आकारान्त असूनही अविकृत राहतें. जसें:—सव्वा, भाकरी—केळें, इ०; सव्वा रुपयापेक्षां कमी किंवा अधिक, इ०.

( इ ) साकल्यवाचकांपैकीं दोघे, तिघे, चौघे हीं अर्थात् नेहमीं अनेकवचनीं असून लिंगाप्रमाणें बदलतात. स्त्री—:—दोघी, तिघी, चौघी; न०:—दोघें, तिघें, चौघें.

ह्यांचीं विशेषण सामन्यरूपें येणेंप्रमाणें:—

पु० न०—दोघां, तिघां, चौघां

स्त्री०— { दोघी, तिघी, चौघी
क्वचित् दोघ्या, तिघ्या, चौघ्या

परंतु ह्यांचा जेव्हां नामाप्रमाणें उपयोग होतो तेव्हां स्त्रीलिंगी सामन्यरूपें दोघीं, तिघीं, चौघीं अशीं एकाचप्रकारचीं होऊन त्यांच्या अन्त्यावर अनेकवचनाचा बिंदु येतो. जसें:--चौघी किंवा चौघ्या मुलींस, पण चौघींस, इ०

**दोन्ही, तिन्ही, चान्ही—चारी, पांची,** इ० **' दाही '** यापर्यंतचीं साकल्यवाचकें नियमाप्रमाणें तिन्ही लिंगी समान आहेत.

३६५. सर्व क्रमवाचक संख्याविशेषणें आकारान्त असून त्यांस आकारान्त विशेषणांचे विकरण नियम लागू आहेत. जसें:—पहिला - पहिली—पहिलें, चौथा—चौथी—चौथें; पहिल्या अ० पहिले पुरुषास, स्त्रीस, किंवा पोरास, इ०. हीं नामांप्रमाणें उपयोगांत येतात, तेव्हां तीं पुल्लिंगांत 'घोडा' शब्दाप्रमाणें, स्त्रीलिंगांत 'नदी' शब्दाप्रमाणें आणि नपुंसकलिंगीं 'तळें' शब्दाप्रमाणें चालतात.

टीप—संस्कृत क्रमवाचकें अकारान्त आहेत. त्यांचा प्रौढ भाषेंत उपयोग होतो; व त्यांपैकीं पहिलीं तीन स्त्रीलिंगीं आकारान्त होतात. जसें—प्रथम—प्रथमा, द्वितीय—द्वितीया, तृतीय—तृतीया; परंतु पुढचीं ईकारान्त होतात. जसें:—चतुर्थी, पंचमी, एकादशी, सप्तदशी, इ० संस्कृत क्रमवाचकांचा मराठींत फारसा प्रचार नाहीं. तिथींचीं व विभक्तींचीं नांवें हीं संस्कृत क्रमवाचकेंच होत.

३६६. आवृत्तिवाचकांचें विकरण येणेंप्रमाणें:

[ अ ] एकपट, दुप्पट, तिप्पट, चौपट, पांचपट, इ० पट शब्दान्त आवृत्तिवाचकें हीं अकारान्त विशेषणें असल्यामुळें अविकृत राहतात. जसें:—दुप्पट आंबे, पांचपट सुपाऱ्या, दसपट केळीं, तिप्पट माणसांस, इ०.

ह्यांचा जेव्हां स्त्रीलिंगी नामांप्रमाणें उपयोग होतो, तेव्हां तीं 'भिंत' शब्दाप्रमाणें चालतात. जसें दुप्पट—दुप्पटी, दुप्पटीनें, दुप्पटीशीं,—दुप्पटींनीं, दुप्पटींशीं; इ०. दुप्पट, तिप्पट, ह्यांस विभक्तीप्रत्यय लागतांना त्यांतील उपान्त्य द्वित्त प्प विकल्पानें एकेरी होतो; म्हणजे दुपटीनें, तिपटीचें, इ० अशींही रूपें होतात.

[ आ ] एकेरी, दुहेरी, तिहेरी, चव्हेरी, हीं ईकारान्त असल्यामुळें नियमाप्रमाणें अविकृत असतात. जसें:—एकेरी पलंगपोस, दुहेरी पासोडी, तिहेरी जाजम, एकेरी धोतरावर, इ०.

परंतु कधीं कधीं ह्यांची एकेरा, दुहेरा, तिहेरा, चव्हेरा, अशीं पुल्लिंगामध्यें आकारान्त व एकेरें, दुहेरें, तिहेरें, चव्हेरें अशीं नपुंसकलिंगी एकारान्त रूपें आढळतात. तेव्हां त्यांस आकारान्त विशेषणांचे नियम लागू पडतात. जसें:—दुहेऱ्या पासोड्या, दुहेरा सरमजाम, इ०. तथापि ह्यांचा प्रचार कमीच आढळतो.

[ इ ] चौपदरी, पांचपदरी इ० पदरीशब्दांत विशेषणें ईकारान्त असल्यामुळें अविकृतच असतात. ह्यांचा जेव्हां स्त्रीलिंगी नामांप्रमाणें उपयोग होतो, तेव्हां ती 'नदी' शब्दाप्रमाणें चालतात.

[ ई ] अशाच प्रकारचीं जीं दुसुती, तिसुती, तिपेडी, पांचपेडी, दुघडी, चौघडी, इ० ईकारान्त आवृत्तिवाचक विशेषणें आहेत तीं सर्व सामान्य नियमाप्रमाणें अविकृत असतात. जसें:—दुघडी पडदा,—पासोड्या, —जाजम, इ०

हीं जेव्हां स्त्रीलिंगी नामांप्रमाणें उपयोगांत येतात, तेव्हां तीं 'नदी' शब्दाप्रमाणें चालतात.

[ उ ] द्विगुणित, त्रिगुणित, द्विगुण, त्रिगुण, इ० संस्कृत अवृत्तिवाचकें अकारन्त असल्यामुळें अविकृत राहातात. ह्यांचा प्रौढ भाषेंतच उपयोग होतो. हीं नामांप्रमाणें योजिलेलीं सहसा आढळत नाहींत.

३६७. पृथक्त्ववाचक विशेषणें फार थोडीं आहेत. त्यांमध्यें आका- एकही नाहीं.तेव्हां तीं सारीं नियमाप्रमाणें अविकृत राहातात. जसें:——दर एक माणसास—बायकोस—मुलास, प्रत्येक देशांत—नगरींत— शहरांत, इ० हीं सर्व अर्थात् नेहमीं एकवचनीं असतात.

३६८ अनिश्चितांमध्यें एकही विशेषण विकरणदृष्ट्या अनियमित दिसत नाहीं. आकरान्त आहेत तीं आकरान्तांप्रमाणें बदलतात. बाकीचीं अविकृत राहातात; तसेंच जेव्हां तीं नामांप्रमाणें उपयोगांत येतात, तेव्हां तीं तत्तत्स्वरांत तत्तल्लिंग नामांप्रमाणें अगदीं सरळ चालतात.

३६९, तारतम्यद्योतक कांहीं प्रत्यय संस्कृत विशेषणांस लागतात. एखाद्या विशेषणानें दाखविला जाणारा गुण एकापेक्षां दुसऱ्यामध्यें अधिक प्रमाणानें वसत आहे असें सांगावयाचें असतां त्या विशेषणास तर किंवा **ईयस्** हे प्रत्यय लावितात; आणि एकाच वर्गांतील एका व्यक्तीचें ठायीं इतर सर्वांपेक्षां तो गुण आधिक्यानें वास करीत आहे असा आशय असतां तद्वाचक विशेषणास **तम** आणि **इष्ट** हे प्रत्यय लावितात.

[ अ ] **तर** आणि **तम** ह्या प्रत्ययांचा उपयोग फार आढळतो. हे प्रत्यय लावतांना मूळ विशेषणास फारसे विकार होत नाहींत. फक्त अन्त्य

न् चा लोप होतो; आणि वस प्रत्ययांत विशेषणांतील **स्** चा **त्** होतो
उदाहरणें:—

युवन [ तरुण ]—– युवतर [ अधिक तरुण ], युवतम [ सर्वांत तरुण ]

विद्वस [ विद्वान , विद्यासंपन्न ]—– विद्वत्तर , विद्वत्तम.

कृष्ण [ काळा ]—कृष्णतर, कृष्णतम.

दृढ—दृढतर, दृढतम.

उत् [ वर ]—उत्तर, उत्तम.

इ०. इ०. इ०.

टीप—' उत्तम ' ह्याचा उपयोग मूळ अर्थानं मराठींत आहे; परंतु ' उत्तर ' ह्याचा मूळ अर्थानें फारसा उपयोग आढळत नाहीं. तथापि रूढार्थ कांहीं मूळ अर्थास सोडून नाहीं. ' उत्तर ' म्हणजे ' प्रश्नाचे वरचा म्हणजेच पुढला शब्द ' ' जबाब. ' ' ऊत्तरार्ध ' ह्या शब्दांतही मूलार्थ सुटलेला नाहींच.

प्रतिज्ञेतें भीष्में मानिं अवधिलें या **दृढतरें**—

तदपि ने गत हा सुर**सत्तमा**; तुज अजी डसला **पुरुषोत्तमा**—वामन.

( आ ) **ईयस्** व **इष्ठ** हे प्रत्यय लागतांनां विशेषणास बरेच विकार होतात. परंतु हे प्रत्यय तर आणि तम ह्यांच्या इतके व्यापक नसल्यामुळें, अर्थात् त्यांचा प्रचार कमी पडल्यामुळें, त्यांच्यासंबंधाचे नियम येथें देण्याची जरूर नाहीं. फक्त प्रचारांत असलेलीं कांहीं उदाहरणें देतो:—

छांदिष्ठ – छांदस [ छंदबाळगणारा ] + इष्ठ

वशिष्ठ – वसुमत् [ धनवंत ] + इष्ठ

स्वादिष्ठ – स्वादु [ गोड ] + इष्ठ

लोभिष्ठ – लोभिन् + इष्ठ

पापिष्ठ – पापिन् + इष्ठ

कांहीं अत्यंत अनियमितपणें साधलेलीं आहेत. कांहींच्या मूळ रूपांचा संस्कृत भाषेंतही पत्ता नाहीं. त्यांपैकीं कांहीं येणेप्रमाणें:—

कनिष्ठ — हे ' युवन् ' ह्यांचें जे यविष्ठ असें रूप होतें त्या अर्थाचें रूप आहे.

ज्येष्ठ, श्रेष्ठ—ह्यांच्याही मूळांचा पत्ता नाहीं. अर्थ प्रसिद्धच आहे.

वरिष्ठ ---उरु [ मोठा ] + इष्ठ.

याप्रमाणेंच गर्विष्ठ [ गुरु + इष्ठ ], बलिन् [ बलिन् + इष्ठ ], इ०.

टीप---ईयस्---प्रत्ययांन्त उदाहरणें मराठींत नाहींत. ईयस् व इष्ठ ह्यांचा मूळ संस्कृतांतही कांहीं थोड्याशा ठराविक शब्दांतच प्रचार आहे. तेव्हां मराठींत त्यांचीं उदाहरणें विरळच. तर--तम ह्यांचा मात्र प्रौढ भाषमध्यें आणि विशेषेंकरून पद्यामध्यें बराच उपयोग आढळतो. 'तारतम्य' हा शब्द 'तरतम' या प्रत्यययुग्मापासूनच मूळ निघालेला आहे हें सुज्ञ वाचकांचे ध्यानांत येईलच.

३७०. तारतम्यसूचक विकार निवळ मराठींत नाहींत. हा अर्थ दाखविण्याचे मराठींतील प्रकार येणेंप्रमाणें:--

[ अ ] कोणत्याही गुणासंबंधानें दोन प्राण्यांमधील अथवा पादर्थांमधील न्युनाधिकभाव दाखवावयाचा असतां त्यांपैकीं एकाच्या पंचम्यन्त रूपापुढें तद्गुणवाचक विशेषणासह दुसऱ्याचा उल्लेख करितात. मात्र अशा ठिकाणीं विशेषण हें विशेष्याचे नंतर येतें, म्हणजे तें विधिविशेषण होतें. जसें :--रामाहून गोविंदा उंच आहे. तेल पाण्यापेक्षां पातळ असतें, इ० दुसऱ्या उदाहरणावरून, दुसऱ्याचा उल्लेख पंचम्यन्त नामाचे पूर्वींही होतो, हें समजून येईलच.

[ आ ] पंचमीचे प्रत्ययाचे ऐवजीं 'पेक्षां' किंवा क्वचित् 'परिस' ह्या शब्दयोगी अव्ययाचा उपयोग करितात; व त्याचेपुढें अर्थानुसार कमी किंवा अधिक हा शब्द विकल्पेंकरून योजण्याची चाल आहे. जसें :--रामापेक्षां गोविंदा अधिक उंच आहे, किंवा गोविंदा रामापेक्षां अधिक उंच आहे; पाण्यापेक्षां तेल अधिक पातळ असतें, किंवा तेलापेक्षां पाणी अथवा पाणी तेलापेक्षां कमी असतें; इ०

टीप---कधीं कधीं विशेषणाचा उपयोग टाळूनही वरील अर्थ अन्य प्रकारें प्रकट करितात. जसें:---शौर्यांमध्यें किंवा शौर्यासंबंधानें नेपोलियनापेक्षां शिवाजीचीच योग्यता श्रेष्ठ होय, किंवा अधिक श्रेष्ठ होय. या उदाहरणावरून असेंही दिसून येईल कीं केवळ दोन व्यक्तींच्या तुलनेसंबंधानें सुद्धां श्रेष्ठ ह्या आतिशय्यवाचक विशेषणाचा उपयोग होऊं शकतो. अर्थात् मराठींमध्यें इतकी सूक्ष्मता किंवा शब्दयोजनेची योग्यायोग्यता पाळिली जात नाहीं.

[ इ ] सर्वोत्कृष्टताही वरील रीतीनें दाखविली जाते. जसें :---सर्वांहून हा अधिक उंच आहे, इ०.

[ ई ] तथापि पंचमीचे जागीं सप्तमी आणि ' पेक्षां ' चे जागीं ' मध्यें ' यांचा उपयोग करून सर्वोत्कृष्टता व्यक्त करण्याचा अधिक प्रचार आहे. जसें:—सर्व आंब्यांत हा उत्तम किंवा गोड आहे; सर्व पेशव्यामध्यें पहिला बाजीरावच अत्यंत शूर होय; इ०.

यावरून असें दिसून येईल कीं सर्वोत्कृष्टतेच्या व्यक्तीकरणामध्यें कमी अधिक हे शब्द न येतां त्यांचे जागीं अत्यंत, फार, परम, ह्यांसारखे शब्द विकल्पानें येतात. जसें :—मूर्खांमाजी परम मूर्ख, किंवा नुसतें—शूरांत शूर, विद्वानांत विद्वान्, इ०.

[ उ ] सर्वोत्कृष्टता दाखविण्याचा आणखी एक प्रकार आहे. कधीं कधीं तुलना केवळ ध्वनित ठेवून व्यक्तिविशेषाचे ठायीं दिलेल्या गुणाचा अतिरेक आहे. इतकेंच शब्दांनीं व्यक्त केलेलें असतें. तरी या ठिकाणीं सर्वोत्कृष्टता अप्रत्यक्षपणें सुचविली जाते असें म्हणण्यास हरकत नाहीं. जसें :—तो अगदीं निर्लज्ज आहे; तो मोठा जाडा विद्वान आहे; तो पहिल्या प्रतीचा पंडित किंवा वक्ता आहे, ती अत्यंत सुंदर आहे, इ०.

[ ऊ ] एखाद्या गुणाची आणि विशेषेंकरून रंगाची पराकाष्ठा, गाढता, किंवा परमावधि प्रकट करण्याचा मराठींतील एक प्रकार असा आहे कीं गुणवाचक विशेषणाची एक तर द्विरुक्ति करितात किंवा जवळ जवळ त्याच अर्थाचें दुसरें विशेषण किंवा नाम त्याचेपुढें योजितात. जसें :—लाललाल, लाल गुंज, काळा ठिक्कर, काळा कुळकुळित, हिरवा गार, हिरवा चार, इ०.

३७१. जरी मराठी विशेषणांस तारतम्यदर्शक विकार होत नाहींत तरी दिलेल्या गुणाचें न्यूनत्व, लघुत्व, किंवा अल्पत्व दाखविणारे प्रत्यय मराठींत अनेक आहेत. ते साधितशब्दविचारांत सांपडतील. त्यांचीं कांहीं उदाहरणें:—का—पांढुरका, सर—काळसर, ट—पिंवळट, पिंगट, इ०.

---

## अध्याय ६.

—:०:—

### क्रियापदें.

३७२. धातूंस जे प्रत्यय लागून क्रियापदें तयार होतात त्यांस **आख्यात प्रत्यय** असें म्हणतात. आख्यातें सात आहेत. प्रत्येक आख्या-

## अकर्मक राह (किंवा रहा) धातु.

### प्रथमताख्यात एकवचन.

| पुरुष | पु० | स्त्री० | न० |
|---|---|---|---|
| प्र० | राहतों, रहातों | राहत्यें—तें, रहात्यें—तें | राहतें, रहातें |
| द्वि० | राहतोस, रहातोस | राहत्येस, रहात्येस | राहत्येस, रहात्येस |
| तृ० | राहतो, रहातो | राहत्ये, रहात्ये | राहतें, रहातें |

### प्रथमताख्यात—अनेकवचन.

| | | |
|---|---|---|
| प्र० | राहतों, रहातों | तिन्ही लिंगीं समान. |
| द्वि० | राहतां—ता, रहातां—ता | |
| तृ० | राहतात, रहातात | |

### द्वितीयताख्यात—एकवचन

| | | | |
|---|---|---|---|
| म० | राहतों, रहातों | राहत्यें—तें, रहात्यें, तें | राहतें, रहातें |
| द्वि० | राहतास, रहातास | राहतीस, रहातसि | राहतेंस, रहातेंस |
| तृ० | राहता, रहाता | राहती, रहाती | राहतें, रहातें |

### द्वितीयताख्यात—एकवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | राहतों, रहातों | राहतों, रहातों | राहतों, रहातों |
| द्वि० | राहतां—तात—तेत<br>रहातां—तांत—तेत | राहतां—तांत—त्यात<br>रहातां—तांत—त्यात | राहतां—तांत—तींत<br>रहातां—तांत—तींत |
| तृ० | राहते, रहाते | राहत्या, रहात्या | राहतीं, रहातीं |

### लाख्यात—एकवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | राहिलों, रहालों | राहिल्यें—लें, रहाल्यें—लें | राहिलें, रहालें |
| द्वि० | राहिलास, रहालास | राहिलीस, रहालीस | राहिलेंस, रहालेंस |
| तृ० | राहिला, रहाला | राहिली, रहाली | राहिलें, रहालें |

### लाख्यात बहुवचन

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | राहिलों, रहालों | राहिलों, रहालों | राहिलों, रहालों |
| द्वि० | राहिलां—लांत—लेत<br>रहालां लांत—लेत | राहलां—लांत—ल्यात<br>रहालां—लांत—ल्यात | राहिलां—लांत—लींत<br>रहालां—लांत लेत |
| तृ० | राहिले रहाले | राहिल्या, रहाल्या | राहिलीं, रहालीं |

वाख्यात—एकवचन

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | राहावा, रहावा | राहावी, रहावी | राहावें, रहावें |
| द्वि० | राहावास, रहावास | राहावीस, रहावीस | राहावेंस, रहावेंस |
| तृ० | राहावा, रहावा, | राहावी, रहावी | राहावें, रहावें |

वाख्यात—बहुवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | राहावे, रहावे | राहाव्या, रहाव्या | राहावीं, रहावीं |
| द्वि०, तृ० | राहावे-वेत | राहाव्या—व्यात | राहावीं—वींत |
| | रहावे-वेत | रहाव्या—व्यात | रहावीं-वींत |

ई-आख्यात—तिन्ही लिंगीं समान.

| पुरु० | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | राहीं, राहें | राहूं |
| द्वि० | राहस, रहास | राहा, रहा |
| तृ० | राहीं, राहें | राहत, रहात |

| ऊ-आख्यात (ति० लिं० स० | | ई० लाख्यात (ति० लिं० स० ) | |
|---|---|---|---|
| पुरु० ए० व० | अ० व० | ए० व० | अ० व० |
| प्र० राहूं | राहूं | राहीन | राहूं |
| द्वि० राहा, रहा | राहा, रहा | राहशील, रहाशील | राहाल, रहाल |
| तृ० राहू, राहो | राहूत, राहोत | राहील | राहतील, रहातील |

टीप १—यावरून पाह, राह, बाह, इ० धातु एकसारखेच चालतात, असें दिसून येईल.

टीप २—पाह, राह, इ० धातूंचे, पहा, रहा, इ० आकारान्त वैकल्पित धातु हे ई-आख्याता, ऊ-आख्यातीं आणि ईलाख्याती प्र० पु० दोन्ही वचनीं व तृ० पु० ए० वचनीं आणि ऊ—आख्यातांत तृ० पु० ब० वचनीं सुद्धां चालत नाहींत हें उघड आहे. ( मागील धातूच्या अंतींची टीप २ पहा. )

टीप ३—हा धातु जरी अकर्मक आहे, तरी त्यास ईलाख्यातीं प्र० व तृ० पु० एकवचनीं ईन व ईल हे सकर्मक धातूंचे प्रत्यय लागतात, आणि ई-आख्यातांत सकर्मक धातूंचे प्रत्यय ह्यास विकल्पेंकरून लागतात, ह्या गोष्टी वरील रूपावलीवरून कळतीलच.

## ( ५ ) सकर्मक दे धातु.

### प्रथमताख्यात—एकवचन.

| पुरुष | पु० | स्त्री० | न० |
|---|---|---|---|
| प्र० | देतों | देत्यें—तें | देतें |
| द्वि० | देतोस | देत्येस—तेस—तीस | देतेंस |
| तृ० | देतो | देत्ये—ते—ती | देतें |

### प्रथमताख्यात—बहुवचन.

| | | |
|---|---|---|
| प्र० | देतों | तिन्ही लिंगी समान. |
| द्वि० | देतां—ता | |
| तृ० | देतात | |

### द्वितीयताख्यात—एकवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | देतों | देत्यें — तें | देतें |
| द्वि० | देतास | देतीस | देतेंस |
| तृ० | देता | देती | देतें. |

### द्वितीयताख्यात—बहुवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | देतों | देतों | देतों |
| द्वि० | देतां, देतेत | देतां, देत्यात | देतां, देतींत |
| तृ० | देते | देत्या | देतीं |

### लाख्यात—एकवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | दिलों | दिल्यें — लें | दिलें |
| द्वि० | दिलास | दिलीस | दिलेंस |
| तृ० | दिला | दिली | दिलें |

### लाख्यात—बहुवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | दिलों | दिलों | दिलों |
| द्वि० | दिलां-लांत-लेत. | दिलां-लांत-ल्यात | दिलां-लांत-लींत |
| तृ० | दिले | दिल्या | दिलीं |

### वाख्यात—एकवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | द्यावा | द्यावी | द्यावें |
| द्वि० | द्यावास | द्यावीस | द्यावेंस |
| तृ० | द्यावा | द्यावी | द्यावें |

### ख्यात—बहुवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | द्यावे | द्याव्या | द्यावीं |
| द्वि०, तृ० | द्यावे—वत | द्याव्या—व्यात | द्यावीं—वींत |

### ई-आख्यात—तिन्ही लिंगीं समान.

| पुरु० | ए० व० | ब० व० |
|---|---|---|
| प्र० | देईं | देऊं |
| द्वि० | देस | द्या |
| तृ० | देई | देत |

| ऊ-आख्यात—ति० लिं० स० | | ई-लाख्यात—ति० लिं० स० | |
|---|---|---|---|
| प्र० देऊं | देऊं | देईन | देऊं |
| द्वि० दे | द्या | देशील | द्याल |
| तृ० देऊ, देओ, देवो. | देऊत, देओत, देवोत. | देईल | देतील, |

३८५. हो हा धातु अनियमित असल्यामुळें तो स्वतंत्रपणेंच सर्व आख्यातीं चालवून दाखविणें जरूर आहे.

अकर्मक **हो** धातु

### प्रथमताख्यात—एकवचन.

| पुरु० | पु० | स्त्री० | न० |
|---|---|---|---|
| प्र० | होतों | होत्यें तें | होतें |
| द्वि० | होतोस | होतेस—तेस—तीस | होतेंस |
| तृ० | होतो | होत्ये -ते—ती | होतें |

### प्रथमताख्यात— बहुवचन.

| | | |
|---|---|---|
| प्र० | होतों | तिन्ही लिंगी समान |
| द्वि० | होतां—ता—तेत | |
| तृ० | होतात | |

### द्वितीयताख्यात—एकवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | होतों | होत्यें—तें | होतें |
| द्वि० | होतास | होतीस | होतेंस |
| तृ० | होता | होती | होतें |

## द्वितीयताख्यात -- अनेकवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | होतों | होतों | होतों |
| द्वि० | होतां-ता-तेत | होतां-ता-त्यात | होतां-ता-तींत |
| तृ० | होते | होत्या | होतीं |

टीप---हो या धातूच्या या द्वितीय ताख्यातांतील रूपांचा अस धातूच्या भूतकाळाचे अर्थानें उपयोग होतो. म्हणून या रूपांस भूतकाळाचीं रूपें असें आमचे वैयाकरण म्हततात. परंतु प्रक्रियेवरून पहातां ज्याला व्याकरणांत भूतकाळ—लाख्यात म्हणतात, त्या आख्याताचीं रूपें नव्हत हें उघड आहे. हो धातूचीं लाख्यातीं रूपें आतां येतातच आहेत.

## लाख्यात—एकवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | झालों | झाल्यें—लें | झालें |
| द्वि० | झालास | झालीस | झालेंस |
| तृ० | झाला | झाली | झालें |

## लाख्यात—बहुवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | झालों | झालों | झालों |
| द्वि० | झालां—लांत—लेत | झालां—लांत—ल्यात | झालां—लांत-लींत |
| तृ० | झालें | झाल्या | झालीं |

टीप---झाला ह्याचे व्युत्पत्तीविषयीं मतभेद आहे. कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात कीं, हो धातूंतील हकारास दित्व होऊन व पाहिल्या हकाराचा जकार होऊन जहाला असें भूतकाळाचें रूप झालें असावें, आणि ज व ह् एकत्र होऊन जहाला ह्याचें झाला असें रूप झालें असावें. 'जाहला, जहाला, अशीं रूपें कवितेंत व जुन्या लेखांतून पुष्कळदां आढळतात.' कृष्णशास्त्री गोडबोले ह्यांचें मतें 'संस्कृत जातः ह्याचा अर्थ उत्पन्न झालेला असा आहे. ह्यापासून मराठींत जाला हें रूप आलें आहे.' नंतर जाला ह्यांतील ज—बद्दल झ होऊन झाला, आणि झाला यापासून (झ = ज + ह, असें असल्यामुळें) जहाला जाहला हीं रूपें होतात. झाला यापासून जाहला, जहाला हीं रूपें झालीं हें म्हणणें ऐतिहासिक परंपरेच्या दृष्टीनें ग्राह्य नाहीं. तरी एकंदरींत झाला ह्याचा संबंध जातः याजपाशीं लावण्यांत गोडबोल्यांस राजवाड्यांचें पाठबळ आहे. राजवाड्यांचे मतें 'जात (सं०), जाअ (महाराष्ट्री)—(मराठी) जाअल = जाहल = जाल' अशी ऐतिहासिक परंपरा आहे. यामुळें आतां चिपळूणकरांचें मत मागें पडेलें असें वाटतें.

**वाख्यात**—एकवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | व्हावा | व्हावी | व्हावें |
| द्वि० | व्हावास | व्हावीस | व्हावेंस |
| तृ० | व्हावा | व्हावी | व्हावें |

**वाख्यात**—अनेकवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | व्हावे | व्हाव्या | व्हावीं |
| द्वि०, तृ० | व्हावे, व्हावेत | व्हाव्या, व्हाव्यात | व्हावीं, व्हावींत |

**टीप**—हो धातूस वाख्याताचे स्वरादि प्रत्यय संधि होऊन लागतात; त्या वेळीं हो यास 'व्ह्' असा आदेश होतो, परंतु पुढल्या ई, ऊ आणि ईल ह्या आख्यातीं स्वरादि प्रत्ययांपूर्वींही हो धातु अविकृत रहतो. मात्र द्वितीय पुरुषाचे अनेकवचनीं त्या आख्यातांतही त्यास 'व्ह्' असा आदेश होतोच.

**ई-आख्यात** — तिन्ही लिंगीं समान.

| | | |
|---|---|---|
| प्र० | होय, होई | होऊं |
| द्वि० | होस | व्हां, व्हा |
| तृ० | होय, होई | होती |

**ऊ-आख्यात** — ति० लिं० स० **ईलाख्यात** [ति० लिं० स०]

| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्र० | होऊं | होऊं | होईन | होऊं |
| द्वि० | हो | व्हा | होशील | व्हाल |
| तृ० | होऊं-ओ-वो | होऊत-ओत-वोत | होईल | होतील |

३८६. आतां जे कांहीं धातु अनियमित असून सर्व आख्यातांतही चालत नाहींत त्यांच्याकडे वळूं. त्यास गौण धातु किंवा गौण क्रियापदें असें म्हणतात. कारण कीं, त्यांची मूळ रूपें क्रियापदेंच असून त्यांत अमुक एक धातु आहे असें निश्चयात्मक मानितां येत नाहीं. अशीं जीं गौण क्रियापदें मराठींत आढळतात, तीं येणेंप्रमाणें :— आहे, नाहीं, नव्हे, पाहिजे, नको, नये, नलगे.

**आहे** :— संस्कृत अस् धातूचें तृ० पु० ए० व० अस्ति असें होतें. त्यापासून प्राकृत अत्थि व मराठी आथि—थी असें झालें. हें मराठी रूप ज्ञानेश्वरींत आढळतें. यापासूनच अर्वाचीन आहे हें रूप झालें आहे. ह्यांत मूळ संस्कृत धातु अस् हा खरा; परंतु मराठीमध्यें आहे यांत दादोबा

म्हणतात त्याप्रमाणें अस धातु मानितां येत नाहीं. तेव्हां कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात कीं, आहे हाच धातु होय. परंतु रूपांवरून जर पाहिलें तर त्यांमध्यें कांहीं धातु मानणें अवश्य असल्यास तो आह (सं० -- अस्) असा धातु मानणें योग्य दिसतें. हा धातु फक्त ई-आख्यातींच चालतो.

अकर्मक **आह** धातु.

**ईआख्यात**—तिन्ही लिंगीं समान.

| पु० | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | आहें ( आह + एं ) | आहों ( आह + ओं ) |
| द्वि० | आहेस ( आह + स ) | आहां—हा ( आह+आं, आ ),आहांत |
| तृ० | आहे ( आह + ए ) | आहेत ( आह + त ) |

**नाहीं** -- हा शब्द न + आथी=नाथी=नाहीं, असा झाला आहे. यामध्येंही आहे याप्रमाणें वाटल्यास नाह धातु मानावा. हा वरील ' आह ' प्रमाणेंच फक्त ईआख्यातीं चालतो.

अकर्मक **नाह** धातु.

**ईआख्यात** -- तिन्ही लिंगीं समान.

| | | |
|---|---|---|
| प्र० | नाहीं ( नाह + ईं ) | नाहीं |
| द्वि० | नाहींस | नाहीं |
| तृ० | नाहीं | नाहींत |

**टीप**--नाथी=नाहीं, या मूळ रूपांत बिंदु नाहीं म्हणून ह्या शब्दाचें बिंदुरहित रूपच सर्वत्र विशेष ग्राह्य होय, असें एक मत निघालें आहे. परंतु या ई-आख्यातामध्यें प्र० पु० ए० व० चा प्रत्यय ईं हा बिंदुयुक्त असल्यामुळें प्रकृत शब्दांत बिंदु आला आहे. तेव्हां तृ० पु० ए० व० रूपांत बिंदु नसला तरी चालेल. पण प्र० पु० ए० व० रूपांत तो अवश्य पाहिजे. ह्या आख्याताचीं बाकीची रूपें अनियमित असून तीं नाहीं यापासून निघालेलीं दिसतात. उच्चारांत व लिपींत बिंदु आहेच. तेव्हां तो उडविणें रास्त नाहीं. फार तर तृ० पु० ए० व० रूपांत बिंदु नसल्यास चालेल.

**नव्हे** -- हा शब्द ( न + हो ) नहो ह्या ' हो ' च्या निषेधक रूपापासून झाला आहे. हा फक्त द्वितिय ताख्यात व ईआख्यात या दोनच आख्यातीं चालतो.

## अकर्मक नहो धातु.

### द्वितीयताख्यात--एकवचन.

| पुरुष० | पु० | स्त्री० | न० |
|---|---|---|---|
| प्र० | न्व्हतों ( न + होतों ) | न्व्हत्यें--तें | न्व्हतें |
| द्वि० | न्व्हतास | न्व्हतीस | न्व्हतेंस |
| तृ० | न्व्हता | न्व्हती | न्व्हतें |

### द्वितीयताख्यात-- अनेकवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | न्व्हतों | न्व्हतों | न्व्हतों |
| द्वि० | न्व्हतां--तेत | न्व्हतां--त्यात | न्व्हतां--तींत |
| तृ० | न्व्हते | न्व्हत्या | न्व्हतीं |

टीप--या रूपांचा भूतकाळाचे अर्थानें उपयोग होतो.

### ईआख्यात -- तिन्ही लिंगीं समान.

| | | |
|---|---|---|
| प्र० | न्व्हें ( नहो + एं ) | न्व्हों |
| द्वि० | न्व्हस, न्व्हेस | न्व्हां, न्व्हा |
| तृ० | न्व्हे | न्व्हत, न्व्हेत |

टीप १--यावरून नहो या धातूचें नव्ह असें अंग सर्वत्र होतें हें कळेलच. हो धातूचेंही व्ह असें अंग होतें; परंतु त सर्वत्र होत नाहीं हें वाचकांस स्मरेलच. नहो याच्या वरील ईआख्याताचे रूपांचा प्रचलित मराठींत वर्तमान काळाचे अर्थानें उपयोग होतो.

टीप २--नाहीं व नव्हे यांबद्दल कवितेंत कधीं कधीं 'नोहे' असें रूप आढळतें; आणि त्यासही भिन्न भिन्न पुरुषांचे प्रत्यय लागलेले आढळतात. उदाहरणें:--

बलवीर्यादि गुणांहीं भिन्नचि मी उग्रसेनसुत नोहें--मोरोपंत.

नातरी इक्षुदंडु ॥ पाळी तयासची गोडु
गाळी तया कडु ॥ नोहे चि जेविं ॥ --ज्ञानदेव.

निरंतरामंद मरंद वाहे । तपांतही यास्तव रिक्त नोहे ॥--रघु० पं०

निर्मळ पुष्कळ केवळ अमृत रसाचे नवे रवे पोहे ।
नोहेत स्वल्प सख्या मज विश्वात्म्यांहि फार सावे हे ॥ मोरो.

**पाहिजे**—हें वास्तविक पाह धातूचें कर्मणि रूप होय. आणि ज्याप्रमाणें करिजे, चिंतिजे, ध्याइजे, इत्यादि कर्मणि रूपें कवित्तेंत आढळतात, त्याचप्रमाणें पाहिजे हें रूपही मूळ कर्मणि अर्थानें ज्ञानेश्वरींत आढळतें.

जैसें क्षेत्रीं जें पेरिजे ॥ तें वाचौनि आन न निफजे ॥
कां **पाहिजे** तेंचि देखिजे ॥ दर्पणाधारें ॥ अ० ४, ७३. राजवाडी ज्ञानेश्वरी.

यावरून पाहिजे हें तृ० पु० ए० वचनीं ईआख्याताचें रूप आहे ह उघड आहे. परंतु प्रचलित भाषेमध्यें पाहिजे हा शब्द वेगळ्याच अर्थानें उपयोगांत येतो. ह्याचा मूळ अर्थ ‘ पहावें ’ असा दिसतो. परंतु चालू भाषेंत ‘ पाहिजे ’ ह्याचा ‘ अपेक्षित किंवा इष्ट आहे ’ या अर्थीं प्रयोग होतो. ह्याचा ईआख्यातीं, तिन्ही पुरुषीं, दोन्ही वचनीं उपयोग होतो. आणि त्यास द्वितीय व तृतीय पुरुषांचे प्रत्ययही लागतात.

**ईआख्यात** — तिन्ही लिंगीं समान.

| पुरुष | ए० व० | अ०व ० |
|---|---|---|
| प्र० | पाहिजे | पाहिजे |
| द्वि० | पाहिजे, पाहिजेस | पाहिजे, पाहिजेत |
| तृ० | पाहिजे | पाहिजे, पाहिजेत |

**टीप १**—या रूपांशिवाय ह्याचें एक पाहिजेल असें ईलाआख्याताचें रूप आढळतें. जसें:—तुला पाहिजे किंवा पाहिजेल तें तूं घे.

**टीप २**—पाह या धातूच्या निरनिराळ्या अर्थानुसार त्याची निरनिराळी व्युत्पत्ति आहे. ती राजवाड्यांनीं चांगली दाखविली आहे. ‘ पाह हें रूप महाराष्ट्रींतून पांच धातूंपासून निष्पन्न होतें. ’

( अ ) दृश–पश्=पह ( प्रयोजक ) पाह–कर्मणि—पाहिजे.

( आ ) प्रकाश = पआह=पाह. उदा०:—दिवो पाहे (ज्ञाने०)=दिवस प्रकाशे.

( इ ) प्रार्थ = पाह ( अपभ्रंश ) = पा. उ०:—देऊं पाए=देण्यास प्रार्थितो, इच्छितो. इच्छार्थी पाह हा प्रचलित मराठींत सहायधातु आहे.

( ई ) प्राप् = पाव, ( कर्मणि ) पाविजे = पाइजे = पाहिजे. उदा:—मला तें पाहिजे = तन्मे प्राप्यते. हीच अपेक्षार्थी पाहिजे ह्या क्रियापदाची व्युत्पत्ति होय.

( उ ) प्रार्ह् = पाह. उदा०:—त्वं कर्तुं अर्हसि = तूं करूं पाहसि; त्वया कृतं अर्ह्यते = तुवां केलें पाहिजे. आवश्यकतार्थद्योतक पाहिजे या सहायक्रियापदाची हीच व्युत्पत्ति होय.

हो—या धातूचीं वाख्यातांचीं रूपें ' पाहिजे ' ह्या अर्थानें म्हणजे ' अपेक्षित आहे ' या अर्थानें उपयोगांत आहेत. हो धातूच्या वाख्याताचा जेव्हां या अर्थानें उपयोग होतो. तेव्हां त्यास व्ह ह्याचेशिवाय विकल्पेंकरून ह असा आदेश होतो. आणि ह या अंगास वाख्याताचे प्रत्यय लागतांनां पूर्वरूपसंधि होतो.

अपेक्षार्थक **हो** धातु.

**वाख्यात**—एकवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | व्हावा, हवा | व्हावी, हवी | व्हावें, हवें |
| द्वि० | व्हावास, व्हावीस, | व्हावीस, हवीस | व्हावेंस, हवेंस |
| तृ० | व्हावा, हवा | व्हावी, हवी | व्हावें हवें |

**वाख्यात** — बहुवचन.

| | | | |
|---|---|---|---|
| प्र० | व्हावे, हवे | व्हाव्या, हव्या | व्हावीं, हवीं |
| द्वि० | व्हावे-वेत, हवे-वेत<br>हवां—वांत | व्हाव्या-व्यात,हव्या-व्यात<br>हवां—वांत | व्हावीं-वींत, हवीं-वींत<br>हवां वांत |
| तृ० | व्हावे, वेत<br>हवे—वेत | व्हाव्या-व्यात<br>हव्या-व्यात | व्हावीं—वींत<br>हवीं-वींत |

टीप.—पाहिजे आणि त्याच अर्थाचें व्हावें, हवें, हे शब्द कधीं कधीं विशेषणाप्रमाणेंही उपयोगांत येतात आणि तीं व त्यांचीं विषेष्यें यांचेमध्यें तो हा विशेष्यनिम्न दर्शक शब्द येतो. जसें :—पाहिजे त्या लेखणीनें लिही, किंवा हव्या त्या लेखणीनें लिही. यासंबंधानें कृष्णशास्त्री गोडबोले म्हणतात " या वाक्यांत पाहिजे किंवा हव्या हें तर विशेषणच म्हटलें पाहिजे. कारण, हव्या या सामान्यरूपाचें सुयुक्तिक कारण एरवीं दाखवितां येत नाहीं. " ( नवीन व्याकरण क० २७२ ड ). ' या विशेषणाचे बहुवचन कधीं कधीं पाहिजेत असें होतें. ' परंतु आमच्या मतें ' पाहिजे त्या लेखणीनें लिही ' या ठिकाणीं ' पाहिजे ' यास

विशेषण मानण्याची जरूर नाहीं. या ठिकाणीं त क्रियापदच आहे. या वाक्यांतील अध्याहार स्पष्ट करून ' तुला जी पाहिजे त्या लेखणीनें लिही ' असें विस्तृत वाक्य केलें म्हणजे आमच्या म्हणण्याची सत्यता स्पष्ट होते. ' हव्या त्या लेखणीनें लिही ' या ठिकाणीं ' हव्या ' हें मात्र हवी या विशेषणाचेंच सामान्यरूप होय. वाख्यात ह मूळ संस्कृत व्ययी कृदन्त विशेषणापासूनच निघालें असल्यामुळें व्हावा, हवा ह्यांचा विशेषणाप्रमाणें उपयोग होणें साहजिक आहे.

**नको**—ह्याची व्युत्पत्ति संदिग्ध दिसते. गोडबोले शास्त्री म्हणतात ' हें क्रियापद न आणि कम् धातु ह्यांपासून झालें असावें ? संस्कृतांत कम् धातूचा अर्थ इच्छिणें असा आहे, व ह्यास आज्ञार्थी तृतीयपुरुषीं एकानेकवचनी प्रत्यय ओ आणि ओत लागून नको आणि नकोत हीं रूपें झालीं असावीं ? ' ( क० २७५ ). गोडबोले हे स्वतःही ह्या व्युत्पत्तिसंबंधानें संशयग्रस्तच दिसतात. जोशी यांनीं दुसरीच दिशा सुचविली आहे. ' याची उत्पत्ति **न खलु** या अव्ययांपासून झालेली दिसते. प्राकृतांत न खलु ह्याचें **नक्खु** झालें व मराठींत ऊ चा ओ होऊन नको असें रूप बनलें. हें मूळचें अव्यय असून पुढें विशेषण झालें व मग क्रियापद बनलें, हें ( प्रौढ बोध. पृ० १६९ टीप ). राजवाडे सांगतात:—' ( महाराष्ट्री ) नकुण ( लोट ) = नकु = नको ( न कुरु, मा कुरु ). जाऊं नको = यांतु ( वैदिक द्वितीया ए० व० ) मा कुरु. नको हें क्रियाविशेषण असतें तेव्हां तें नु कम् या संस्कृत निपातापासून निघालें आहे असें समजावें. ' ( ज्ञानेश्वरी मराठीचें व्याकरण--पृ० ११९, १२० )

नको हें पाहिजे ह्याचे निषेधार्थक म्हणजे उलट अर्थानें येतें. याचाही तिन्ही पुरुषीं फक्त तृ० पु० अ० व० शिवाय करून, दोन्ही वचनीं उपयोग आढळतो, शिवाय ह्यास द्वितीय व तृतीय पुरुषाचे प्रत्यय विकल्पानें लागतात.

| पुरुष | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | नको | नको |
| द्वि० | नको, नकोस | नको, नका |
| तृ० | नको | नकोत |

'नकोस' ह्याशिवाय हीं ऊ-आख्याताचीं रूपें होत असें म्हटलें तरी चालेल.

टीपः—पाहिजे व नको ह्यांचा क्रियाविशेषणांप्रमाणें कधीं कधीं उपयोग होतो. जसें:—तुला तो आंबा नको असावा, मला तो पाहिजे आहे, मी त्यास नको होतों, इत्यादि.

**नये**—हें मूळचें (न + ये) ये धातूचें निषेधार्थक रूप होय. याचा अर्थ 'येत नाहीं' असा आहे. जोशी म्हणतात:—'हा स्वतंत्र धातु नसून ये धातूच्या जुन्या भाषेंतील वर्तमानकाळाच्या रूपास न हें अव्यय लागून हीं रूपें होतात.' [प्रौढ बोध. पृ० १७० क० (१५)]. व्युत्पत्तीविषयीं जोशी ह्यांचें म्हणणें रास्त आहे. परंतु ये धातूच्या जुन्या वर्तमानकाळाच्या सर्व रूपांस पाठीमागें न लागून नये याचीं रूपें नियमितपणें प्राप्त होत नाहींत. एवंच ये धातूचीं ह्या काळाचीं रूपें आणि नये ह्याचीं रूपें एक नाहींत. यामुळें नये हें स्वतंत्रपणें मानणें अवश्य दिसतें. पाहिजे, नको, ह्यांप्रमाणें नये हेंहीं ईआख्यातांत तिन्हीं लिंगीं, तिन्ही पुरुषीं, फक्त तृतीय पुरुषाचें अनेकवचन शिवायकरून दोन्हीं वचनीं येतें. शिवाय त्यास द्वितीय व तृतीय पुरुषवाचक व्यंजनादि प्रत्यय लागतात. एकंदर रूपें येणेंप्रमाणें:—

**ईआख्यात** — तिन्ही लिंगीं समान.

| पुरुष | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | नये | नये |
| द्वि० | नये, नयेस | नये |
| तृ० | नये | नयेत |

**नलगेः**—न + लागे यापासून संक्षेपानें नलगे असें झालें आहे असें दिसतें. पाहिजे ह्याचे उलट अर्थानें जसें नको येतें तसेंच नलगे हेंहीं येतें. नलगे हें फक्त ईआख्यातांत चालतें.

**ईआख्यात** -- ति० लिं० स०

| | | |
|---|---|---|
| प्र० | नलगें | नलगों |
| द्वि० | नलगस, नलगेस | नलगा |
| तृ० | नलगे | नलगत, नलगेत |

जोशी यांनीं नये ह्याप्रमाणेंच नलगे हें स्वतंत्र मानण्याची जरूर नाहीं असें सांगितलें आहे. त्यांचें हें म्हणणें नये ह्यापेक्षां नलगे ह्याचेसंबंधानें अधिक प्रशस्त आहे. परंतु ज्या अर्थीं लगे असें स्वतंत्र रूप फारसें प्रचरांत नाहीं, त्या अर्थीं **न लागे** या दोन अलग शब्दांपासून **नलगे** हा निराळा स्वतंत्र शब्द मानणें अवश्य आहे.

३८७. येथपर्यंत सर्व आख्यातें सांगितलीं. त्यामध्यें धातूंचीं रूपें कसकशीं होतात म्हणजे प्रत्येय आख्यातांत धातु कसकसे चालतात ह्याचें सविस्तर निरूपण झालें. त्यांमध्यें दिलेलीं सर्व उदाहरणें सिद्ध किंवा अव्युत्पन्न धातूंचीं आहेत. साधित म्हणजे व्युत्पन्न धातु सर्व अकारान्त आहेत. तव्हां ते अकारान्त धातूप्रमाणेंच चालतात. साधित धातूंपैकीं प्रयोजक धातु हे मुख्य होत. ते सर्व सकर्मक असतात; आणि अकारन्त सकर्मक धातूंप्रमाणें अगदीं सरळ नियमितपणें चालतात. उदाहरणार्थ :—करवितो, करीवतो, करविता, करीवता; करविला, करीवला; करवावा; करवी; करवू; करवो; करवील. येथें फक्त प्रत्येक आख्याताचें तृतीयपुरषाचें एकवचन दिलें आहे. त्यांवरून बाकीचीं रूपें सहज समजतील. ह्या रूपांच्या साधनिकेसंबंधानें पूर्वींच ( अं० १९२, १९३ ) खुलासा केला आहे तो पहावा.

३८८. संस्कृत भाषेमध्यें प्रत्येक सिद्ध व साधित धातु प्रत्येक आख्यातांत दोन प्रकारांनीं चालतो; म्हणजे त्यांचीं दोन प्रकारचीं रूपें होतात. एक कर्तरिरूप आणि दुसरें कर्मणिरूप. आणि प्रत्येक धातूचें कर्मणि होतांनां त्यास कांहीं आख्यातांमध्यें य हा आगम होऊन, नंतर आख्यात प्रत्यय लागतात हें संस्कृतज्ञांस स्मरेलच. मराठींत अशा स्थिति नाहीं. येथपर्यंत सांगितलेलीं सात आख्यातांतील रूपें, कांहीं कर्तरि, तर कांहीं कर्मणि, कांहीं दोन्ही प्रकारचीं, तर कांहीं भावी अशींही आढळतील; परंतु प्रत्येक आख्यातांत प्रथम, द्वितीय, आणि तृतीय, पुरुषीं म्हणून देण्यांत येणारीं रूपें, बहुधा भावि नाहींत; तर तीं कर्तरि, किंवा कर्मणि किंवा दोन्ही प्रकारचीं आहेत. हीं रूपें देतांनां तीं कर्तरि आहेत कीं कर्मणि आहेत कीं दोन्ही प्रकारचीं आहेत कीं मुदलींच भावी आहेत, हें धातु चालवितांनां सांगण्याची फारशी गरज नाहीं. अमुक रूप अमुक पुरुषीं आहे ह्याचा अर्थ इतकाच कीं, तें रूप त्या पुरषाचें

लिंगवचनाप्रमाणें आहे. तो पुरुष त्या रूपाचा कर्ता आहे कीं, कर्म आहे, ह्या प्रश्नाच्या उत्तराची तें रूप बनविण्यास मराठींत कांहीं एक जरूर नाहीं. संस्कृत कर्मणि रूप बनवावयाचें असेल कीं, कांहीं आख्यातांत धातूस प्रथम **य** हा प्रत्यय लागतो. धातूचें एकच रूप कर्तरि आणि कर्मणि असें दोन्हीं प्रकारांनीं उपयोगांत येत नाहीं. परंतु मराठीमध्यें एकच रूप कधीं कधीं दोन्हीं प्रकारांनीं उपयोगांत येतें. उदाहरणार्थ, केला हें लाख्याताचे तृतीय पुरुषाचें एकवचन होय. संस्कृतामध्यें धातूचें रूप पाहिल्याबराबर ते कर्तरि कीं कर्मणि हें बहुधा सहज ओळखतां येतें; कारण कर्मणि रूप स्वतंत्र असून त्यास त्याची स्वतःची कांहीं ना कांहीं तरी खुणा बहुधा असते. तसें मराठींत नाहीं. ‘ केला ’ हें रूप कर्तरि कीं कर्मणि हें निश्चित सांगतां येत नाहीं. कारण कीं, ‘ तो स्नान केला ’ ह्या वाक्यांत तें कर्तरि आणि ‘ त्यानें धंदा केला ’ या वाक्यांत तें कर्मणि आहे. ‘ तो स्नान केला ’ हें उदाहरण जर कोणास आवडणार नाहीं आणि त्यामुळें केला या क्रिया-पदाचें उदाहरणही त्यांस जर पसंत पडणार नाहीं तर त्यानें ‘ चावला ’ हें क्रियापद घ्यावें. ‘ तिला साप चावला ’ येथें ‘ चावला ’ हें कर्तरि आणि ‘ तिनें ओंठ चावला’ येथें चावला हें कर्मणि आहे. एवंच, मराठीमध्यें अमुक क्रियापद कर्तरी आहे कीं कर्मणि आहे हें नेहमींच खात्रीपूर्वक सांगतां येत नाहीं. अमुक क्रियापद अमुक पुरुषीं आहे असें जेव्हां आपण मराठींत म्हणतों तेव्हां त्याचा अर्थ इतकाच कीं त्या क्रियापदाचा धातुरूपेंश त्या पुरुषीं आहे; मग तो पुरुष त्या क्रियापदाचा कर्ता असो किंवा कर्म असो. ह्यामुळें संस्कृतांतल्याप्रमाणें प्रथम सर्व आख्यातांचीं कर्तरि रूपें व नंतर त्यांचीं कर्मणि रूपें देण्याची व्यवस्था मराठींत करितां येत नाहीं. तथापि मराठीं-तही एक दोन ठिकाणीं असा स्पष्ट भेद दृष्टीस पडतो. म्हणजे मराठीमध्येंही कर्मणि व भावी रूपांचीं खूण कांहीं ठिकाणीं स्वतंत्रपणें आढळते. आणि त्या रूपांचा कर्तरि उपयोग कधींच होत नाहीं ही खूणा **य** ह्या संस्कृत कर्मणि व भावी खुणेपासूनच निघाली आहे. **य** ह्याचीं मराठींत दोन रूपें झालीं आहेत एक **ज** आणि दुसरें **व**. **जनें** युक्त कर्मणि किंवा भावी रूपें विशेषें करून जुन्या कवितेंत आढळतात **वनें** युक्त कर्मणि आणि भावि रूपांस शक्यत्वाचा अर्थ मराठींत स्पष्टपणें प्राप्त झाला असल्यामुळें, यांस **शक्य कर्मणि** आणि **शक्य भावि** रूपें म्हणावें; म्हणजे मराठी-

मध्यें याशिवाय विशिष्टचिह्नविरहित जीं कर्मणि आणि भावी रूपें आहेत, त्यांपासून ह्याचा निराळा उल्लेख करण्यास ठीक पडेल. ह्या संबंधानें सविस्तर ऊहापोह दादोबांच्या भेदव्यवस्थेचा विचार करितांनां पूर्वीं होऊन गेला आहे. ह्यामुळें येथें त्याची पुनरुक्ति नको.

( १ ) **जुनीं कर्मणि व भावी रूपें**--सकर्मक धातूंस **ज** हा प्रत्यय लागून कर्मणि क्रियापदें होतात. आणि अकर्मक धातूंस तोच प्रत्यय लागून भावी क्रियापदें होतात. या **ज** प्रत्ययापूर्वीं धातूंस **इ** हा आगम होतो. अकारान्त धातूंस हा आगम पररूपसंधीनें मिळतो; आणि अन्य स्वरान्त धातूंचेपुढें जेव्हां हा इ आगम लागतो तेव्हां संधि होत नाहीं. ह्याप्रमाणें जीं कर्मणि व भावी अंगें तयार होतात त्यांचीं उदाहरणें:—

कर + इ + ज = करिज; धर + इ + ज = धरिज;
घे + इ + ज = घेइज; ध्या + इ + ज = ध्याइज;
जा + इ + ज = जाइज; हो + इ + ज = होइज; इ०

ह्या अंगांस सर्व आख्यातांचे प्रत्यय लागलेले आढळत नाहींत. शिवाय ह्या अंगांचीं रूपें प्रचलित भाषेंत नसल्यामुळें त्यांचीं नियमानुसार निर-निराळ्या आख्यातीं सर्व रूपें बनवून दाखविण्यांत अर्थ नाहीं. तेव्हां जितक्या आख्यातांत जितकीं रूपें बहुधा आढळतात तेवढींच सांगण्याची चाल आहे आणि ती योग्य आहे हें उघड आहे.

**प्रथमताख्यात** ( वर्तमानकाळ. )

नित्य पोटीं वडवाग्नि पेट घेतो ॥
सागरानें तो काय **सांगिजे तो** ॥--रघुनाथपंडित.
म्यां तीर्थाचें सेवन **करिजेतें** नित्य कंसरायातें—मोरो०

**लाख्यात** ( भूतकाळ )

तुम्ही आलां कोठून अशा बोलें
द्विजीं निषधापासाव **म्हणीजेलें** ॥...............रघुनाथपंडीत
नळा कोठें जातोसि असें बोलें
नळें इंद्रासी असें **बोलिजेलें** ॥............... ,,
भीमरूपें हें लिखित पाठवीलें
सैंवरासी यालागीं **येइजेलें** ॥...............

**ईआख्यात** ( रीतिभूत किंवा पद्यवर्तमान )

त्वां काय कर्म **करिजे** लघु लेंकरानें ॥...............वामन
वीर्यदानें उपजाविता । अन्नदानें प्रतिपाळिता
संकटीं प्राणरक्षिता । हे तिघ पिते **बोलिजेते** ॥....मुक्तेश्वर
देखें मातापितरें ! **अर्चिजती** । सर्वस्व संतोष **पाविजती**
तये पाठीं केंवी **वधिजती** । आपुलिया हातीं ॥........ज्ञानेश्वर
स्वर्गा पुण्यात्मकें पापें **येईजे** । पापात्मकें पापें नरका **जाईजे**
मग मातें जेणें **पाविजे** । तें शुद्ध पुण्य ॥...........ज्ञानेश्वर

हीं कर्मणि आणि भावी रूपें ई-आख्याताचींच फार आढळतात; आणि तीं तृतीय पुरुषीं दोन्ही वचनीं येतात; तथापि त्यांतल्या त्यांत एकवचनीं फार.

विचारीं तूं अर्जुनु ! कीं कारुण्यें **कीजसि** दीनु—ज्ञानेश्वरी २. १

असें एक द्वि० पु० ए० व० चें या ईआख्याताचें उदाहरण कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं दिलें आहे. परंतु राजवाड्यांनीं प्रसिद्ध केलेल्या ज्ञानेश्वरीच्या प्रतींत ही ओंवी भिन्नपणें आढळते.

विचारीं तूं अर्जुनु । कारुण्यें **कीजतासि** दीनु
सांघ पां अंधकारें भानु । ग्रासिला आथि—ज्ञानेश्वरी २. १३.

**कीजतासि** हें रूप अर्थात् ईख्याताचें नसून द्वितीय ताख्याताचें होय हें उघड आहे.

करिजे, देइज ह्यांचे जागीं कीजे, दीजे अशीं अनियमित रूपेंही आढळतात. उदा०——जो जो **कीजे** परमार्थ लाहो ! तो तो पावे सिद्धितें—

कीजे, दीजे हीं क्रियापदें गद्यभाषेंतही कधीं कधीं आढळतात. जुने लोक ‘ प्रविष्ट **कीजे** ’, ‘ यांस **दीजे** ’ असे प्रयोग पत्रलेखनांत अद्यापही कधीं कधीं योजितात. परंतु ते दिवसोंदिवस स्मृतिशेष होण्याच्याच पंथास लागले आहेत.

अंक २८६ मध्यें **पाहिजे** हें जें क्रियापद आलें आहे तें मूळचें पाह ह्या धातूचें ( पाह + इ + ज + ई = पाहिजे ) ई-आख्यातीं कर्मणिरूप होय हें उघड दिसत आहे. त्याचप्रमाणें **म्हणजे** हें जें अव्यय प्रचलित

गद्यातही आहे तेंही म्हण धातूचें ( म्हण + इ + ज + ई = म्हणिजे ) ईआख्यातांतीलच कर्मणिरूप होय.

## ईलाख्यात ( भविष्यकाळ ).

ते अनुभवाचे चमत्कार । पुढें **बोलिजेतील** ॥ ........ वामन,

धर्मयश विपुल पावें स्वमुखें **वाखाणिजेल** तुज शक्रें ॥ .... मोरोपंत.

यावरून हीं कर्मणि व भावी रूपें बहुधा तृतीयपुरुषीं आढळतात असें दिसून येईल; आणि तीं प्रथमताख्यात, क्वचित् द्वितीयताख्यात, लाख्यात, ई-आख्यात, आणि ईलाख्यात इतक्या पांच आख्यातांचीं आढळलीं आहेत. परंतु ह्या सर्वांमध्यें ई-आख्याताचेच रूपांचा प्रघात जुन्या पद्यांत फार आढळतो हें ध्यानांत ठेवावें. इतर आख्यातांच्या रूपांचा प्रयोग विरळा.

**टीप:**—सांगिजेतो, करिजेतो, बोलिजेलें, म्हणीजेलें, इ० जीं सकर्मक धातूंचीं कर्मणि रूपें आहेत त्यांवरून अर्वाचीन मराठींतील एका प्रकारचा कर्मणि प्रयोग आलेला आहे. ' सांगितला जातो,' ' केला जातो,' ' बोललें गेलें,' ' म्हटलें गेलें ' इ० प्रयोगांच्या वरील रूपांजवळच्या सादृश्यावरून ही गोष्ट उघड दिसत आहे. तसेंच, करण्यांत येतो, बोलण्यांत येतें, म्हणण्यांत येईल, इ० संयुक्त क्रियापदांतील ये हा सहाय धातुही वरील जा या सहाय धातूप्रमाणें मूळ संस्कृत कर्मणि व भावी यकारापासूनच आलेला आहे. ह्या संबंधाचा सविस्तर खुलासा प्रयोगांचे विवेचनांत येईल.

**( २ ) प्रचलित शक्य कर्मणि व भावी रूपें**—हीं मूळ धातूस **व** हा प्रत्यय लागून होतात आणि त्यांस मराठींत शक्यत्वाचा स्पष्ट अर्थ प्राप्त झाला आहे हें वर सांगितलेंच आहे. संस्कृतांतील कर्मणि रूपांमध्यें शक्तीचा अर्थ अनुद्भूत, म्हणजे अस्पष्ट आहे; तो मराठींत उद्भूत म्हणजे स्पष्ट झाला आहे.

**टीप**—याविषयासंबंधानें कृष्णशास्त्री चिपळूणकर लिहितात कीं ' शक्यत्वार्थक साधित धातु संस्कृतांत मुळींच नाहींत; व बालभाषेंतही आढळत नाहींत. ते मराठींत मात्र आहेत. हे साधित धातु संस्कृतांतील प्रयोजकत्वार्थक रूपांपासूनच उत्पन्न झाले असावे असें वाटतें. तथापि त्या रूपांवरून नवीन शक्तिघटित अर्थ कसा आला ह्याची उपपत्ति अद्यापि स्पष्ट समजत नाहीं.' ( निबंध, पृष्ठ १६० ). धातूचें शक्य रूप ' प्रयोजकत्वार्थक रूपांपासूनच ' उत्पन्न झालें असावें—ह्राच तर्क मुळीं चुकला आहे तो कां व कसा हें भेदव्यवस्थेच्या ऊहापोहांत

पूर्वी सांगितलेंच आहे. ह्या रूपांच्या व्युत्पत्तीविषयीं शास्त्रीबोवांची दृष्टि मुळांतच विकृत झाल्यामुळे त्यांतील ' शक्तिघटित ' अर्थास त्यांनीं ' नवीन ' असे म्हटलें आहे आणि तो कसा आला ह्याचें त्यांस गूढ पडलें आहे. शास्त्रीबोवांची व्युत्पत्ति बराबर आहे असेंच आजपर्यंत सर्वत्र समजलें जात असल्यामुळे त्यांचें वरील कोडें कोणासही उकललें नाहीं यांत नवल नाहीं. शास्त्रीबोवांनीं निःशंकपणें सुचविलेल्या व्युत्पत्तीबद्दल शंका घेणें किंवा तिची शहानिशा करण्यास प्रवृत्त होणें म्हणजे धृष्टपणाचेंच होय हें अम्हांसही कबूल आहे. परंतु सत्यशोधनाचा मार्गच अंती श्रेयस्कर असल्यामुळे त्या मार्गाचें अवलंबन करून अन्यत्रही आम्ही शास्त्रीबोवांच्या मतांतील अप्रयोजकपणा किंवा शिथिलपणा दाखविला आहे त्याप्रमाणें प्रकृत स्थळींही सत्यास स्मरून असें म्हणणें भाग आहे कीं, शास्त्रीबोवांनीं दिलेली व आजपर्यंत स्वीकारण्यांत आलेली शक्य क्रियापदांची प्रयोजक धातूंपासूनची उत्पत्ति चुकलेली आहे. यामुळेंच, प्रयोजक क्रियापदांत प्रयोजक हे साधित धातु आहेत असें ज्याप्रमाणें मानण्यांत येतें, त्याप्रमाणें शक्य क्रियापदांत मूळ धातूंस व प्रत्यय लागून झालेलीं शक्य अंगें हे साधित धातु होत, असें म्हणतां येत नाहीं. मूळ धातूचें कर्मणि किंवा भावी रूप होतांनां ज्याप्रमाणें संस्कृतांत य हें अक्षर धातूंस लागतें, त्याचप्रमाणें मराठींतही मूळ धातूचें कर्मणि किंवा भावी रूप होतानां त्या संस्कृत य पासूनच आलेलें व हें अक्षर धातूंस लागतें. म्हणून गम् + य = गम्य ह्यास जसें साधित धातु असें कोणी समजत नाहीं, त्याच प्रमाणें कर + व = करव ह्यासही साधित धातु हें नांव देतां येत नाहीं. त्यास दादोबांप्रमाणें शक्यभेद असें नवीन नांव देणें एकवार बरें. परंतु पूर्वापार चालत आलेली ह्या रूपांची वेगळी व्यवस्था असल्यामुळें दादोबांची भेदव्यवस्था मानण्याचें कांहीं प्रयोजन दिसत नाहीं. या व्युत्पत्तीनें कृष्णशास्त्र्यांच्या कोड्याचाही उलगडा होतोच. मूळ संस्कृत कर्मणि रूपांमध्यें शक्तिघटित अर्थ अव्यक्त होता, म्हणजे त्यांत त्या अर्थाचा अस्पष्ट ध्वनि उमटत होता, तो मराठींतील रूपांत स्पष्ट झाला आहे इतकेंच. बाकी दोन्ही रूपें साधनिकेच्या व प्रयोगाच्या दृष्टीनें सर्वस्वी एक होत ह्यांत संशय नाहीं.

( अ ) धातूस व हें अक्षर लागून शक्य कर्मणि किंवा शक्य भावी अंग तयार होतें. परंतु एकाक्षरी आणि हकारान्त धातूंस वव अशीं दोन अक्षरें लागतात. जसें:-- करव, बसव, जावव, घेवव, पाहवव, लिहवव, इ०.

हकारान्त धातूंस कधीं कधीं एकच व लागूनही शक्य क्रियापदें झालेलीं आढळतात. जसें:-- पाहवतें, लिहवतें, इ०.

टीप—सकर्मक धातूंस व हा आगम होऊन झालेलीं सर्व शक्य क्रियापदें कर्मणि असतात; आणि अकर्मक धातूंस तोच आगम होऊन झालेलीं सर्व शक्य क्रियापदें भावीं असतात, म्हणजे त्यांस कर्म नसतेंच व त्यांचा कर्ताही त्यांचा धातुरूपेश होत नाहीं, तर तीं नेहमीं तृतीयपुरुषीं नपुंसकलिंगी एकवचनीं मात्र असतात. दुसरें असें कीं या कर्मणि व भावी क्रियापदांस शक्यत्वाचा अर्थ स्पष्टपणें प्राप्त झाला असल्यामुळें ज्या धातूंस बहुधा प्राणिवाचक कर्ता नसतो, त्या धातूंचीं हीं शक्य कर्मणि किंवा शक्य भावी रूपें सहसा होत नाहींत. खूप, गळ, तूट, फाट, गुंत इ० धातूंस प्राणिवाचक शब्द कर्ता असण्याचा फारसा संभव नाहीं; म्हणून त्यांजपासून खुपवतें, गळवतें, तुटवतें, फाटवतें, गुंतवतें, इ० शक्य क्रियापदें होणें जरी संभवनीय असलें, तरी तीं फारशीं कोठें आढळत नाहींत.

( आ ) त्याचप्रमाणें प्रथम व द्वितीय पुरुष ह्यांचीं सर्वनामें धातूंच्या कर्मस्थानीं क्वचितच येत असल्यामुळें निवळ कर्मणि शक्य क्रियापदें बहुधा तृतीय पुरुषीच आढळतात. जसें:— करवतो—ती—तें, इ०. त्याच्यानें मी करवतों, त्याच्यानें तूं करवतोस, अशा प्रकारचे प्रथम व द्वितीय पुरुषाचे प्रयोग संभवनीय नाहींत असें नाहीं; तथापि असे प्रयोग क्वचितच उपयोगांत येतात ह्यांत संशय नाहीं. शक्य कर्मणि व भावी अंगे सर्व आख्यातांत अकारान्त धातूंप्रमाणें चालतात. त्यांचा मासला दाखवितों. तरी वर सांगितलेल्या कारणामुळें फक्त तृतीय पुरुषाचीं रूपें देण्याचा विचार आहे.

सकर्मक कर धातु — शक्य कर्मणि रूपें.

### प्रथमताख्यात.

| पुरुष | | पु० | स्त्री० | न० |
|---|---|---|---|---|
| ० | ए० व० | करवतो | करवत्ये—ते—ती | करवतें |
| | ब० व० | करवतात | करवतात | करवतात |

### द्वितीयताख्यात.

| पुरु० | | पु० | स्त्री० | न० |
|---|---|---|---|---|
| तृ० | ए० व० | करवता | करवती | करवतें |
| | ब० व० | करवते | करवत्या | करवतीं |

### लाख्यात.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| तृ० | ए० व० | करवला | करवली | करवलें |
| | ब० व० | करवले | करवल्या | करवलीं |

## वाख्यात.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| तृ० | ए० व० | करवावा | करवावी | करवावें |
| | ब० व० | करवावे | करवाव्या | करवावीं |

## ई-आख्यात.

| | | | |
|---|---|---|---|
| तृ० | ए० व० | करवे | तिन्ही लिंगीं समान. |
| | ब० व० | करवत | |

## ऊ-आख्यात.

| | | | |
|---|---|---|---|
| तृ० | ए० व० | करवू, करवो | तिन्ही लिंगीं समान. |
| | ब० व० | करवूत, करवोत | |

## ईलाख्यात.

| | | | |
|---|---|---|---|
| तृ० | ए० व० | करवेल, | तिन्ही लिंगीं समान. |
| | ब० व० | करवतील | |

**टीप**—वाख्यात हें मूळचेंच कर्मणि असल्यामुळें धातूचीं शक्यकर्मणि वाख्याताचीं रूपें आढळण्याचा संभव कमीच आहे. शिवाय हीं आणि प्रयोजक धातूचीं वाख्यातीं रूपें दिसण्यांत एकच आहेत. तथापि अर्थावरून दोहोंमधील फरक तेव्हांच कळतो. 'बापानें मुलाकडून अभ्यास करवावा' या वाक्यांतील क्रियापद करव या प्रयोजक धातूचें वाख्यातीं रूप होय हें उघड आहे. तसेंच 'त्याच्यानें हा धंदा करवावा' या वाक्यांतील क्रियापद कर या धातूचें शक्य कर्मणि याख्यातीं रूप होय हेंही स्पष्टच आहे. तथापि शक्य कर्मणि व्याख्याताचीं क्रियापदें ज्यांत आहेत असलीं वाक्यें विरळाच दृष्टीस पडतात.

अकर्मक बस धातु—शक्य भावी रूपें.

( अर्थात् सर्व रूपें तृतीय पुरुषीं नपुंसकलिंगीं एकवचनीं. )

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथमताख्यात | — बसवतें | द्वितीय ताख्यात | — बसवतें |
| लाख्यात | — बसवलें | वाख्यात | — बसवावें |
| ई-आख्यात | — बसवे | ऊ-आख्यात | — बसवू, बसवो |
| ईलाख्यात | — बसवेल. | | |

( इ ) कधीं कधीं शक्य कर्मणि क्रियापदाचे जागीं अकर्मक धातूचा उपयोग झालेला आढळतो, आणि कधीं कधीं **व** प्रत्यय न लागतां मूळ सकर्मक धातूचेंच कर्तरिरूप शक्यकर्मणि क्रियापदाचे अर्थानें उपयोगांत येतें. जसें :— 'मला ही दोरी तुटत नाहीं' याठिकाणीं तुटत म्हणजे

तोडवत असा अर्थ आहे; आणि 'तुला हा दगड हालेल' येथ हालेल = हालवेल हें उघड आहे. तुट आणि हाल हे धातु अकर्मक असून त्यांचा शक्यकर्मणि क्रियापदाचे अर्थानें उपयोग झालेला आहे. आतां दुसऱ्या प्रकारचीं उदाहरणें पहा. 'त्यास हें अक्षर वाचत,' 'मला तितक्या दूरचा मनुष्य ओळखेल' या वाक्यांत वाच व ओळख या सकर्मक धातूंचीं वाचतें व ओळखेल हीं कर्तरिरूपें वाचवतें व ओळखवेल या अर्थानें म्हणजे शक्यकर्मणि रूपांप्रमाणें योजिलेलीं आहेत हें स्पष्टच आहे.

---

# अध्याय ७.

## कांहीं अव्ययें.

[ प्रस्ताव—विकरण हें प्रकरण वास्तविक गेल्या अध्यायांत संपलें म्हणावयाचें. म्हणजे अव्ययें हीं वास्तविक विकरणप्रकरणांत येण्याचें कांहीं कारण नाहीं. परंतु भाषेस बहुधा कोणताच नियम सर्वांशीं लागू पडत नाहीं. ह्यामुळें भाषेसंबंधाचें कोणतेंही शास्त्र घ्या, त्यांतील नियमांस अपवाद आणि प्रत्यपवाद हे जागोजाग आढळतात. ह्यामुळें भाषाशास्त्रकारांनीं मुख्य नियमांवरच जोर देऊन अपवादांस नियमांचें बंधन घालण्यास लागणें चुकीचें होय. ही चूक आरंभींच्या मराठी वैयाकरणांनीं केली असें पुष्कळांचें म्हणणें आहे, व आम्हींही म्हटलें आहे. हें म्हणणें कांहीं अंशीं खरें आहे. परंतु या प्रश्नास दुसरीही एक बाजू आहे. तिचा उल्लेख केला पाहिजे. कोणत्याही भाषेच्या बाल्यावस्थेत आणि तिचें व्याकरण बनण्याचे पूर्वकाळीं तिचा स्वभाव मुलाप्रमाणें फार चंचल असतो. आणि मुलांचे स्वभावास चांगलं वळण लागून त्यास स्थैर्य येण्यासाठीं ज्याप्रमाणें त्यांस बन्धनांतच ठेवणें इष्ट, हितावह, व अवश्य आहे त्याप्रमाणें भाषेचीही गोष्ट कांहीं अंशीं तशीच आहे, असें म्हटलें तरी चालेल. दादोबा आपल्या मोठ्या व्याकरणाचे दुसऱ्या आवृत्तींत म्हणतात कीं 'इचा मुख्य उद्देश हाच कीं, जितकें साधेल तितकें करून, आजपावेतों जिला नियमांत आणण्याविषयीं कोणीं प्रयत्न केलाच नाहीं. म्हणोन अत्यंत विस्खलित झालेली, व व्याकरणरूप फणीनें जिला कोणी विंचरलें नाहीं म्हणोन जींत अनेक ग्रंथि जमून फारच गुंतलेली अशी जी ही मराठी भाषा तिला कांहीं तरी नियमांत आणावी, आणि दीर्घकाल ग्रथित जी तिची गूत ती हातीं घेऊन तिचे पदर सोडवून कांहीं तरी उकलण्याचे धोरणांत आणून बसवावी. आतां हें कार्य मी कसें व कोठपर्यंत सिद्धीस नेलें याचा विचार करणें सुज्ञांकडेस आहे.'

हें दादोबांनीं सन १८५० त लिहिलें. त्यांच्या व्याकरणाची पहिली आवृत्ति सन १८३६ मध्यें छापून प्रसिद्ध झाली. तीस आज पाऊणशें वर्षें झालीं. त्यावेळीं दादोबांचा व्याकरण लिहिण्याचा आणि आज व्याकरण लिहिणाराचा उद्देश सर्वस्वी एक असूं शकणार नाहीं. यानांत ठेविलें म्हणजे अमुक शुद्ध व अमुक अशुद्ध, अमुक ग्राह्य व अमुक अग्राह्य असे जे त्यांनीं ठिकठिकाणीं शेरे मारिलेले आढळतात ते केवळ अस्थानीं होत असें म्हणवत नाहीं, त्या शेऱ्यांनीं आपलें काम योग्य स्थळा बरेंच केलें व त्यामुळेंच आज मराठी भाषेस कांहीं स्थैर्य प्राप्त झालें आहे व तें दिवसेंदिवस वाढत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. तात्पर्य इतकेंच कीं, आरंभींच्या वैयाकरणाचा भाषाप्रचारसंग्रह व व्यवस्था हाच उद्देश नसतो तर भाषेस योग्य वळण लागून तिला स्थैर्य यावें म्हणून कांहीं प्रयोगांवर त्यांनीं आपल्या अभिप्रायाचा छाप मारणें कांही वावगें नाहीं. तथापि ह्यासही मर्यादा आहेच. ती मर्यादा नक्की ठरविणें व शब्दांनी व्यक्त करणें फारच कठिण आहे. तथापि ती मर्यादा बहुतांशी सामान्यशिष्टप्रचार ही होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. 'प्रयोगशरणा वैयाकरणाः' या म्हणीतही प्रयोगशब्दामागें शिष्ट हा शब्द अध्याहृत समजला पाहिजे. आतां शिष्टप्रचार तरी कसा ठरवावयाचा हा एक बिकट प्रश्न आहे. त्याचें निःसंशय व पूर्णपणें समाधानकारक उत्तर देतां येत नाहीं. म्हणूनच वरील मर्यादा जराशीं अव्यक्त म्हणजे अंधुक आहे असें म्हटलें पाहिजे. ही अव्यक्त मर्यादा नेहमीं साफ न दिसल्यामुळें तिचें कांही कांहीं स्थळीं आरंभींच्या व्याकरणकारांनीं आपल्या कर्तव्यकर्माचे भरांत उल्लंघन केलें असल्यामुळें त्या त्या स्थळी त्यांस तात्पुरता दोष देणें भाग पडतें. यांपैकीं त्यांच्या एकंदर कृतीबद्दलचा आमचा आदर नष्ट होणें किंवा कमी होणें शक्य नाही, हें उघड आहे.

प्रस्तुत विचार सुचण्याचें कारण असें कीं अव्ययें म्हणजे ज्यांस न्यय म्हणजे लिंगवचनादिप्रकारें करून विकार होत नाहींत ते शब्द. यामुळें विकरणप्रकरणांत अव्ययांचा समावेश होतां कामा नये; परंतु भाषेमध्यें निरपवाद नियम कमीच असल्यामुळें या नियमासही मराठींत बाध येतो. म्हणजे कांहीं अव्ययें विकार पावतात असें आढळतें. तेव्हां त्यांचा या अध्यायांत विचार करण्याचें योजिलें आहे. हीं सर्व अव्ययें बहुधा आकारान्त असून त्यांचा विशेषणांप्रमाणें उपयोग होत असल्यामुळें म्हणजेच त्यांच्यामागें अव्ययत्व व नामविशेषणत्व हे दोन्ही गुण असल्यामुळें तीं लिंगवचनाप्रमाणें बदलतात. ]

३८९. **क्रियाविशेषणें**—आकारान्त नामविशेषणें विशेष्याचे लिंगवचनाप्रमाणें बदलतात हें विशेषणाध्यायांत आलेंच आहे. हीं आकारान्त

नामविशेषणें क्रियाविशेषणांप्रमाणें जेव्हां उपयोगांत येतात तेव्हां सुद्धां तीं कधीं कधीं बदलतात. यासंबंधाचे नियम येणेंप्रमाणें:—

( अ ) अकर्मक कर्तरिप्रयोगांत हीं कर्त्याचे लिंगवचनाप्रमाणें फिरतात. जसें:—ते **उभे** राहतात; या खणांत त्या पोथ्या **आडव्या** मावतात; तें **वांकडें** चाललें, दत्तू, तूं **चांगला** बस; ती **उपडी** निजते; इ०.

**अपवाद**—धातु मूळचा सकर्मक असून कर्माची विवक्षा नसतां जेव्हां त्याचा अकर्मक धातुप्रमाणें अकर्मक कर्तरि प्रयोग होतो, तेव्हां प्रकृत क्रियाविशेषणें कर्त्याचे लिंगवचनाप्रमाणें न बदलतां नेहमीं नपुंसकलिंगी एकवचनीं असतात. जसें:—तीं **उभें** शिवत्ये, त्या **तिरवें** बघतात; तो **आडवें** किंवा **वांकडें** लिहितो, ते मुलगे चांगलें गातात इ०. या वाक्यांतील शिव, बघ लिह, गा, हे धातु मूळचे सकर्मक आहेत; परंतु प्रकृत स्थळीं त्यांच्या कर्माची विवक्षा नसल्यामुळेंच त्याचा अकर्मक कर्तरि प्रयोग केलेला आहे. म्हणून येथील क्रियाविशेषणास वरील नियम लागू नाहीं. तो नियम खऱ्या खुऱ्या म्हणजे मूळच्याच अकर्मक धातूंच्या अकर्मक कर्तरिप्रयोगास लागू आहे असें प्रस्तुत अपवादावरून स्पष्ट होतें.

( आ ) सकर्मक कर्तरि व कर्मणि प्रयोगामध्यें प्रकृत क्रियाविशेषणें कर्माच्या लिंगवचनाप्रमाणें बदलतात. जसें:—ते आपलीं घरें **पांढरीं** रंगवितात, त्यानें आपलीं पुस्तकें कपाटांत **उभीं** ठेविलीं, त्यांच्या हातून हीं पुस्तकें **चांगलीं** रचलीं गेलीं, त्याला हीं पदेंसुद्धां पंचमांत **चांगलीं** गाववतात, इ०.

( इ ) भावीप्रयोगांत प्रकृत क्रियाविशेषणें नेहमीं क्रियापदांप्रमाणेंच नपुंसकलिंगीं एकवचनीं असतात. जसें:—त्यांनीं तास तास **उभें** रहावें, त्यांनीं मला **मोकळें** सोडिलें, हिला दिवसांतून एकदां **मोकळें** सोडावें लागतें, त्याच्यानें **उताणें** पोहववतें, इ०.

**टीप: १** —अशा वाक्यांत कांहीं ठिकाणीं प्रकृत विशेषणांचा उपयोग कधीं कधीं या ( इ ) नियमाचे विरुद्ध झालेला आढळतो. जसें:—त्यानें तास तास **उभा रहावें,** त्यांनीं त्याला **मोकळा** सोडिलें, इ०. परंतु अशीं वाक्यें अनुकरणीय नव्हत. या ठिकाणचीं विशेषणें क्रियाविशेषणें असल्यामुळें क्रियापद ज्या वेळीं भावी असतें त्यावेळीं तींही येथील क्रियापदाप्रमाणेंच नपुंसकलिंगी एक-

वचनाच बरीं दिसतात, ही गोष्ट शिष्टप्रचारावरूनही उघड आहे. अकर्मक कर्तरी प्रयोगांत क्रियापद कर्त्याच्या लिंगवचनाप्रमाणें असतें, त्यामुळें ह्या वाक्यांतील क्रियाविशेषणही कर्तृगामी होतें; आणि कर्मणि प्रयोगांत क्रियापद कर्माचे लिंगवचनाप्रमाणें फिरत असल्यामुळें, त्या प्रयोगांतील क्रियाविशेषणही कर्मगामी असतें. त्याचप्रमाणें भावी प्रयोगांत क्रियापदाप्रमाणेंच त्याचें क्रियाविशेषणही भावी होणें हेंच विशेष स्वाभाविक आहे. 'सरकारनें कैदी खुले केले' आणि 'सरकारनें कैद्यांनां खुलें केलें' हीं दोन्ही वाक्यें 'सरकारनें कैद्यांनां खुले केले' या अनियमित वाक्यापेक्षां अधिक शिष्टसंमत आहेत. 'सरकारनें कैद्यांनां खुले केलें' हा प्रयोग कर्मणि आणि भावी ह्यांचे मिसळीनें झालेला दिसतो. तेव्हां तो शिष्टप्रचाराचे दृष्टीनें हिणकस ठरावा, ह्यांत नवल नाहीं.

टीप २—सर्वथा, जरा, बहुधा, सदा हमेशा, एतावता, आजला, पुन्हां, इ० जी आकारान्त क्रियाविशेषणें मूळची नामविशेषण नव्हत तर जी सदोदित क्रियाविशेषणांप्रमाणेंच उपयोगांत असतात, तीं नेहमीं अविकृतच राहतात. परंतु कांहीं वैयाकरणांनीं ह्यांसही विकारशील क्रियाविशेषणांचे नियमांत समाविष्ट केलें आहे; म्हणजे त्यांनीं सर्व आकारान्त क्रियाविशेषणें कर्त्याचे किंवा कर्माचे लिंगवचनाप्रमाणें बदलतात असें म्हटलें आहे. हा बहुधा दुर्लक्षाचा परिणाम होय. विकारशील क्रियाविशेषणाचे नियमांत आकारान्त क्रियाविशेषणांस जी मर्यादा सांगावयास पाहिजे, ती दुर्लक्षानें राहिल्यामुळें नियमास शिथिलता प्राप्त झाली आहे. परंतु अशी शिथिलता राहणें हें कोठेंही इष्ट नाहीं.

२९०. **शब्दयोगी अव्ययें**—जीं शब्दयोगी अव्ययें विशेषणेंही आहेत म्हणून पूर्वी (अं० २१८) सांगितलें, त्यांपैकीं जीं आकारान्त आहेत तीं विशेष्याचे लिंगवचनाप्रमाणें बदलतात. पुढील विशेष्य सविभक्तिक किंवा सशब्दयोगिक झालें तर ह्या आकारान्त विशेषणशब्दयोगी अव्ययांचे सामान्यरूपही होतें, जसें:—त्याच्या **जोगी** जागा त्यास मिळाली नाहीं, त्याच्या **उलटें** ह्याचें कृत्य आहे, ह्याच्या **सारख्या** मनुष्यास अशीच शिक्षा पाहिजे, इ०.

(अ) **चा** व **ला** या प्रत्ययांनीं शब्दयोगी अव्ययांपासून झालेलीं विशेषणें शब्दयोगी अव्ययेंही असून आकारान्त विशेषणें असल्यामुळें विशेष्याचे लिंगवचनाप्रमाणें बदलतात. (अं० २२३) जसें:—**घरावरचा** वांसा, घर**पलीकडचें** झाड, त्या घराच्या **पुढची** गल्ली, त्या खांबाच्या **पुढल्या** रस्त्यावर, इ०.

# भाग २.

—:-०-:—

# शब्दविचार.

—-०-*-०-—

## प्रकरण ३.

—०*०—

## व्युत्पत्ति.

———

### अध्याय १.

—:०:—

#### विषयप्रवेश व व्यवस्था.

३९१. शब्दविचाराचे तीन भाग आहेत. वर्गीकरण, विकरण, आणि व्युत्पत्ति; हें शब्द विचाराचे आरंभींच सांगितलें आहे. त्याचप्रमाणें या तिन्ही प्रकरणांमध्यें कोणकोणते विषय येतात ह्यांचेही स्थूलमानानें दिग्दर्शन केलेलें आहे. आतां याठिकाणीं व्युत्पत्ति ह्या शब्दविचाराचे तिसऱ्या प्रकरणांत कोणकोणत्या मुद्यांचें कोणत्या क्रमानें विवेचन करण्यांत येईल तें सविस्तर सांगतों.

संस्कृत भाषेपासून महाराष्ट्री ह्या प्राकृत भाषेच्या द्वारा मराठीची उत्पत्ति कशी झाली; आरंभीं, संस्कृत भाषेपासूनच—-महाराष्ट्री, मागधी, शौरसेनी, आणि पैशाची, ह्या –प्राकृत भाषाच कशा अस्तित्वांत आल्या; त्यांचा व मूळ संस्कृत भाषेचा संबंध काय; ह्या भाषा कोणकोणत्या प्रांतांत कोणकोणत्या वेळीं प्रचलित होत्या; त्यांत पुढें कसकसा फरक होत गेला; महाराष्ट्री ह्या प्राकृत प्रकारास मराठी हें स्वरूप कधीं, कोठें, व कशा परिस्थितींत प्राप्त झालें आणि मराठीच्या ह्या मूळ स्वरूपापासून तीस हल्लींचें प्रचलित स्वरूप प्राप्त होईपर्यंत तिचीं कसकशीं व किती रूपान्तरें झालीं, हे प्रश्न किंवा संक्षेपानें मराठी भाषेचा आरंभापासून आतां पर्यंतचा सविस्तर इतिहास फार महत्त्वाचा व मनोरंजकही आहे. परंतु

असा समाधानकारक इतिहास अद्याप उपलब्ध नाहीं आणि जो कांहीं उपलब्ध आहे, त्याचीही मला पूर्ण माहिती नाहीं. आणि जरी असा समाधानकारक इतिहास उपलब्ध असता, तरी तो व्याकरणाचा प्रत्यक्ष विषय नव्हे. म्हणून वरील सर्व प्रश्न बाजूसच ठेविले पाहिजेत हें उघड आहे.

तेव्हां या व्युत्पत्तिप्रकरणामध्यें भाषेचा इतिहास म्हणजे भाषेची व्युत्पत्ति हा विषय वास्तविक येत नाहीं. म्हणजे या भाषेंतील कोणते शब्द अन्य भाषांतील कोणत्या शब्दांपासून कसे झाले हें या प्रकरणांत येत नाहीं; तर प्रचलित भाषेंतीलच शब्द, प्रचलित भाषेंतल्या अन्य शब्दांपासून कसे साधतात, इतक्याच प्रश्नाचा या प्रकरणांत खुलासा होतो. उदाहरणार्थ, 'माणसाळणें' हा शब्द माणुस ह्या शब्दापासून साधलेला एक धातु आहे; म्हणजे माणसाळ हा मराठीमध्यें मूळ धातु नसून एक नामसाधित धातु आहे, इतकेंच या प्रकरणांत दाखविण्यांत येईल. माणुस शब्द कसा व कोणत्या भाषेंतून आला हें सांगण्याचें ह्या व्युत्पत्तिप्रकरणाचें काम नाहीं. तसेंच आगबोट हा शब्द आग आणि बोट ह्या दोन शब्दांच्या समासानें प्राप्त झाला आहे, इतकें व्याकरणांतील व्युत्पत्तिप्रकरणांत येतें; परंतु आग आणि बोट या शब्दांची अन्य भाषांतील कोणत्या शब्दांपासून कशी व्युत्पत्ति झाली आहे, हा प्रश्न व्याकरणाचे मर्यादेच्या बाहेरचा आहे. तात्पर्य, एका भाषेचा अन्य भाषांशीं जो संबंध असतो तो व्याकरणाचा विषय होऊं शकत नाहीं. तर व्याकरणाची दृष्टि फक्त त्या एकाच भाषेपुरती मर्यादित असते. म्हणून व्युत्पत्तीचाही वरील मर्यादित अर्थानेंच व्याकरणामध्यें समावेश होणें हें रास्त आहे.

एवंच या प्रकरणामध्यें साधित शब्दांचा विचार येतो. या भाषेंतील कांहीं शब्द याच भाषेंत प्रचलित असलेल्या अन्य शब्दापासून कसे बनतात हें या प्रकरणांत दाखवावयाचें आहे. शब्दविचाराचे जे पहिले दोन भाग—वर्गीकरण व विकरण—त्यांमध्यें ही दृष्टि अप्रकृत होय; त्यांमध्यें शब्द सिद्ध आहे कीं साधित आहे ह्या प्रश्नास थाराच नाहीं. वर्गीकरणामध्यें इतकेंच पाहण्यांत येतें कीं, दिलेला शब्द शब्दांचे आठ जातींपैकीं कोणत्या जातीचा आहे मग तो सिद्ध असो वा साधित असो. त्याचप्रमाणें विकरणामध्यें दिलेल्या शब्दास चरम प्रत्यय लागून कसकशीं पदें तयार

होतात इतकेंच पहावयाचें. मग तो शब्द सिद्ध असो किंवा साधित असो. त्याच्या साधनिकेशीं विकरणास कांहीं एक कर्तव्य नाहीं. परंतु व्युत्पत्ति-प्रकरणामध्यें शब्दांची ही साधनिकाच पहावयाची आहे, आणि ती वर सांगितल्याप्रमाणें याच भाषेच्या मर्यादित दृष्टीनें पहावयाची आहे.

३९२. एकाच भाषेंतील कांहीं शब्दांपासून दुसरे जे साधित शब्द तयार होतात, ते बहुधा तीन प्रकारांनीं साधतात. कांहीं शब्दांचे पाठीमागें कांहीं एक दोन अक्षरें लागून नवीन शब्द बनतात; कांहींचे पुढें कांहीं एक दोन अक्षरें लागून नवीन शब्द बनतात; आणि कांहीं शब्द अन्य शब्दांशीं मिळून नवीन संयुक्त शब्द तयार होतात.

( अ ) शब्दांचे मागें जें अक्षर किंवा जीं अक्षरें लागतात, त्यांस **उपसर्ग** असें म्हणतातः—पुरा या शब्दास **अ** हें निषेधार्थीं अक्षर मागें लागून अपुरा हा शब्द झाला आहे. ह्या शब्दांतील अ ह्या अक्षरास उपसर्ग असें म्हणतात.

**टीप**—संस्कृत भाषेमध्यें शब्दांचे मागें येणाऱ्या कांहीं ठराविक अक्षरांसच उपसर्ग म्हणतात व बाकीच्यांस अव्ययें असें म्हणतात. हा फरक त्या भाषेच्या दृष्टीनें जरी महत्वाचा असला, तरी मराठींत तसा फरक करण्याचें कांहीं कारण नाहीं. तेव्हां मराठी व्याकरणांत उपसर्ग या शब्दाची विस्तृत अर्थानें योजना होते हें उघड आहे.

( आ ) शब्दांचे पुढें जें अक्षर किंवा जीं अक्षरें लागतात त्यांस **प्रत्यय** म्हणतात. जसें:—दळ ह्या शब्दास णावळ हीं अक्षरें पुढें लागून दळणा-वळ हा शब्द तयार होतो; म्हणून णावळ हा एक प्रत्यय होय.

**टीप**—विकरणप्रकरणामध्यें शब्दांस लागणारे–विभक्तिप्रत्यय आणि आख्यात प्रत्यय म्हणून–जे दोन प्रकारचे प्रत्यय सांगितले, त्यांमध्यें आणि साधित शब्दांतर्गत प्रत्ययांमध्यें फरक आहे. विभक्तिप्रत्यय आणि आख्यात प्रत्यय ह्यांस चरमप्रत्यय असें म्हणतात. चरमप्रत्यय म्हणजे ज्या प्रत्ययांनंतर अन्य कोणतेही प्रत्यय लागत नाहींत ते. या अर्थानें मराठींतल्या षष्ठीचे व सप्तमीचे प्रत्ययांस चरमप्रत्यय म्हणतां येत नाहीं, हें उघड आहे. तथापि विभक्तिप्रत्यय हे चरमप्रत्यय होत असा साधारण नियम समजून त्यास वरील दोन विभक्तींचे प्रत्यय अपवादादाखल समजणें व्यवस्थेच्या दृष्टीनें इष्ट असल्यामुळें विकरण प्रकरणांत आलेले प्रत्यय, चरमप्रत्यय होत असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्या दृष्टीनें साधित शब्दान्तर्गत प्रत्यय चरमप्रत्यय नव्हत; कारण कीं, ह्या प्रत्ययांपुढें दुसरे प्रत्यय लागण्याचा संभव असतो. जसें:—दळणावळण ह्यास विभक्तिप्रत्यय लागून दळणा-

वळीनें, दळणावळीस, इ० रूपें तयार होतात. आतां जे साधित शब्द केवळ अन्ययें असतात, त्यांतील प्रत्ययांपुढेंही दुसरे प्रत्यय लागलेले सहसा दिसत नाहींत. तथापि त्यांस चरमप्रत्यय असें म्हणत नाहींत. विभक्तिप्रत्यय आणि आख्यात प्रत्यय यांसच चरमप्रत्यय ही संज्ञा आहे. तेव्हां साधित शब्दान्तर्गत प्रत्ययांस चरमेतर प्रत्यय म्हणावें हें बरें, मग त्यांच्यापुढें दुसरे प्रत्यय लागोत वा न लागोत.

( इ ) दोन किंवा अधिक शब्द एकत्र मिळून जो संयुक्त साधित शब्द तयार होतो, त्यास समास असें म्हणतात. जसें:—देवघर, स्वयंपाकघर, तळमजला इ०. हे शब्द देव + घर, स्वयंपाक + घर, तळ + मजला, या शब्दांचे संयोगानें झाले आहेत हें उघड आहे. म्हणून यांस सामासिक किंवा समस्त शब्द असें म्हणतात.

टीप—एकाक्षरीही शब्द असतो, आणि अनेकाक्षरीही उपसर्ग आणि प्रत्यय असतात. तेव्हां बाह्यस्वरूपावरून शब्द कोणता आणि उपसर्ग किंवा प्रत्यय कोणता हें ठरवितां येत नाहीं. म्हणून त्यांमधील फरक लक्षांत ठेविला पाहिजे. ज्या अक्षरास किंवा अक्षरसमुच्चयास स्वतंत्रपणें अर्थ असतो त्यास शब्द असें म्हणतात. आणि ज्यास स्वतंत्रपणें कांहीं एक अर्थ नसतो, म्हणूनच ज्यांचा स्वतंत्रपणें कोठेंच उपयोग आढळत नाहीं, तर ज्यांचा अन्य शब्दांचे मागें किंवा पुढें उपयोग होऊन त्यांच्याच आश्रयानें असलेलीं जीं नेहमीं आढळतात, त्या अक्षरांस किंवा अक्षरसमुच्चयांस उपसर्ग किंवा प्रत्यय असें म्हणतात; जीं शब्दांचे मागें येतात, त्यांस उपसर्ग आणि जीं शब्दांचे पुढें येतात त्यांस प्रत्यय म्हणतात; हें वर सांगितलेंच आहे.

२९३. उपसर्गघटित, प्रत्ययघटित, आणि समासघटित या तीन मुख्य प्रकारांशिवाय मराठीमध्यें आणखी एका प्रकारच्या साधित शब्दांचा भरणा फार आहे. तो **अभ्यस्त** शब्दांचा होय. त्यांचीं उदाहरणें:—मारामार, खाणाखुणा, लुंगासुंगा, दगडबिगड इ०. ह्या उदाहरणांकडे पाहिलें म्हणजे सूक्ष्म वाचकांस कळेलच कीं, हीं सर्व एकसारखीं नसून त्यांत फरक आहे. अर्थात् अभ्यस्त शब्दांमध्येंही अनेक पोटभेद आहेत. परंतु ते येथें सांगण्याची जरूर नाहीं.

यामुळें मराठीमध्यें साधित शब्दांचे चार प्रकार आढळतात. ते :—**उपसर्गघटित, प्रत्ययघटित, समासघटित** किंवा **समस्त,** आणि **अभ्यस्त.**

२९४. ह्यांपैकीं प्रत्ययघटित साधित शब्दांचे दोन महत्त्वाचे उपभेद आहेत. ते असे:—**कृदन्तें** व **तद्धितें.** धातूंस प्रत्यय लागून जे साधित

शब्द तयार होतात, त्यांस **धातुसाधितें** किंवा **कृदन्तें** असें म्हणतात; आणि अन्य शब्दांस प्रत्यय लागून जे साधित शब्द बनतात, त्यांस शब्दसाधितें किंवा **तद्धितें** असें म्हणतात. कृदन्ते व तद्धित हे दोन्ही शब्द संस्कृत व्याकरणांतून घेतलेले आहेत

३९५. आतां या प्रकरणांतील विवेचन कोणत्या क्रमानें करण्यांत येईल तें थोडक्यांत सांगतों. मराठी भाषेमध्यें जे शब्द आहेत, त्यांपैकीं कांहीं असे आहेत कीं, ते कसे उत्पन्न झाले किंवा कोणत्या भाषेंतून आले हें सांगतां येत नाहीं; तर ते या भाषेंतील मूळ शब्द होत असेंच म्हणावें लागतें. या शब्दांस **देशज** अशी संज्ञा आहे. देशज शब्द मराठी-मध्यें बरेच आहेत. तथापि ह्यांचेपेक्षां अन्य भाषांतून आलेल्या शब्दांचा भरणा मराठींत फार आहे. ज्या अन्य भाषांतील शब्द मराठीनें घेतले आहेत, त्यांपैकीं संस्कृत, फारसी, अरबी, व आतां इंग्रजी ह्या मुख्य होत. याशिवाय हिंदी, गुजराती, कानडी, इ० ज्या इतर भाषांचा तिला कम-जास्त सहवास झाला आहे किंवा होत आहे, त्या त्या भाषांतूनही मराठीनें कांहीं कांहीं शब्दांची निवड करून त्यांस आपलेंसें करून घेतलें आहे. परंतु हिंदी, गुजराती, कानडी, वगैरे शब्द मराठीमध्यें बेताचेच आहेत. म्हणून त्यांचा स्वतंत्र उल्लेख करण्याची जरूर नाहीं. परंतु संस्कृत' फारशी, अरबी, व इंग्रजी, ह्या शब्दांचा ओघ मराठी भाषेमध्यें फारच जोराचा वहात असल्यामुळें त्यांजकडे विशेष लक्ष देणें अवश्य व इष्ट आहे. आणि या चार भाषांपैकीं सुद्धां संस्कृत भाषेपासून मराठीस फारच फायदा झाला आहे व होत आहे. संस्कृत ही मराठीची मूळची मातामही होय, तेव्हां तिचे हातून प्रथम मराठीचें कल्याण व्हावें; यांत नवल नाहीं. तथापि मराठी ही आतां जरी स्वतंत्रपणें वावरूं लागली आहे तरी सुद्धां संस्कृताचे आधारावांचून तिचें चालावयाचें नाहीं. आणि आजकाल जी मराठी भाषेची वाढ होत आहे, ती केवळ संस्कृत भाषेच्याच आश्रयानें होत आहे हें ध्यानांत धरिलें म्हणजे मराठी भाषेच्या संबंधानें संस्कृत भाषेचें महत्त्व केवढें मोठें आहे तें सहज लक्षांत येईल. असो. आतां संस्कृत, फारसी, अरबी व इंग्रजी, या भाषांचा या प्रकरणांतील विषयाचे विवेचनांत कसा संबंध जोडावयाचा तें सांगतों,

उपसर्गघटित, प्रत्ययघटित, समासघटित आणि अभ्यस्त, असे जे साधित शब्दांचे चार भेद सांगितले ते याच क्रमानें या प्रकरणांत स्पष्ट करण्यांत येतील. या प्रत्येक भेदामध्यें संस्कृत, फारसी, अरबी व इंग्रजी, या भाषांचा संबंध येण्याचा संभव आहे. तथापि उपसर्गघटित शब्दांमध्यें निवळ मराठीपेक्षांही संस्कृताचाच भरणा फार आहे; फारसी, व अरबी ह्यांचा कमी; आणि इंग्रजीचा मुळींच नाहीं म्हटलें तरी चालेल. प्रत्ययघटित शब्दांमध्यें मात्र ह्या सर्व भाषांचा बराच संबंध पोंचतो. प्रत्ययघटित शब्दांचे कृदन्तें व तद्धितें असे दोन पोटभेद करितात, हें वर सांगितलें आहेच. तेव्हां या दोन पोटभेदांमध्यें या निरनिराळ्या भाषांतून आलेल्या शब्दांचा निरनिराळा स्वतंत्र उल्लेख करणें बरें. म्हणून प्रत्ययघटित शब्दांत संस्कृत कृदन्तें व तद्धितें व निवळ मराठी कृदन्तें व तद्धितें अलग अलग सांगण्यात येतील. परंतु फारसी, अरबी व इंग्रजी या भाषांतील प्रत्ययघटित जे शब्द मराठींत आले आहेत, त्यांच्या संबंधानें असा फरक न करितां त्यांचा एकाच प्रत्ययघटित ह्या सदराखालीं उल्लेख करण्यांत येईल. कारण उघडच आहे कीं, त्या भाषांतील शब्दांस मराठीमध्यें शब्द-साधनिकेचे दृष्टीनें फारसें महत्व नाहीं, आणि तसा फरक करण्यास अवश्य लागणारा त्या सर्व भाषांचा परिचयही प्रस्तुत लेखकास नाहीं. म्हणून त्यांचा सरसकट एकाच वर्गांत अन्तर्भाव केला जाईल. समासघटित शब्दांमध्यें ह्या यावनी शब्दांचा फारसा संबंध नाहीं; तर केवळ संस्कृत व मराठी ह्यांशींच आपली गांठ आहे आणि त्यांतही विशेषेंकरून संस्कृत शब्दांशींच आपले विशेष कर्तव्य आहे. कारण निवळ मराठी शब्दांचे समास संस्कृतांचे मानानें कमी आढळतात. साधित शब्दांचा अभ्यस्त शब्द म्हणून जो चवथा प्रकार त्याशीं संस्कृताचाही बहुतेक संबंध नाहींच.

सारांश उपसर्गघटित शब्दांत मुख्यत्वेंकरून संस्कृत आणि अंशतः मराठी व फारसी शब्दांचा अन्तर्भाव होतो; प्रत्ययघटित शब्दांत मात्र संस्कृत व मराठी, ह्या दोहोंमधील कृदन्तें व तद्धितें, आणि फारसी, अरबी व इंग्रजी प्रत्ययघटित शब्द ह्यांचा समावेश होतो; समासांमध्यें पुन्हा मराठीपेक्षां संस्कृताचाच भरणा फार; व यावनी समास फार क्वचित् आढळतात. आणि अभ्यस्त शब्दांत मात्र निवळ मराठीचें साम्राज्य दृष्टीस पडतें.

टीप—परभाषांतून आणि त्यांतही विशेषेंकरून संस्कृत भाषेंतून जे अनेक शब्द मराठींत आले आहेत त्यांचे मुख्य दोन भेद आहेत; तत्सम, आणि तद्भव. जे शब्द जशाच्या तसे म्हणजे मुळांत कांहीं एक विकार न होतां मराठींत आले आहेत त्यांस **तत्सम** शब्द असें म्हणतात. आणि जे शब्द मूळ शब्दांतील स्वरांत किंवा व्यंजनांत किंवा दोहींत कांहीं फरक होऊन मराठींत रूढ झाले आहेत त्यांस **तद्भव** शब्द असें म्हणतात. या सबंध प्रकरणांत तद्भव शब्दांशीं आपला विशेषेंकरून कांहीं एक संबंध नाहीं. तो पूर्वीं सांगितल्याप्रमाणें व्याकरणाचा विषय नाहीं. या प्रकरणामध्यें अन्य भाषांतील केवळ तत्सम शब्दांशींच आपला सर्व व्यवहार आहे हें विसरतां कामा नये.

---

# अध्याय २.

## उपसर्गघटित साधितशब्द.

३९६. प्रथम संस्कृत उपसर्ग, मुख्य अर्थ व उदाहरणें यांसह देतों. हे उपसर्ग धातूंस लागून त्यांच्या अर्थामध्यें बदल होतो. तो कसा हा विषय मराठी व्याकरणाचा नव्हे. तेव्हां हे उपसर्ग लागलेले जे संस्कृत तत्सम शब्द मराठींत दृष्टीस पडतात, तेवढ्या शब्दांपुरताच संस्कृत उपसर्गांचा येथें विचार कर्तव्य आहे. हे उपसर्ग कांहीं निवळ मराठी शब्दांसही लागलेले आढळतात. त्यांचीं उदाहरणें त्या त्या ठिकाणीं देण्यांत येतील.

**अति** — पलीकडे, वर. उ० — अतिक्रम, अत्यंत, अतिप्रसंग, अतिरेक, अतिसार, अतिस्नेह अतिविष, अतिव्याप्ति, इ०.

मराठीमध्यें अति हा फार या अर्थीं स्वतंत्र शब्दाप्रमाणेंही उपयोगांत आहे. जसें :— **अति** ऊ त्याला खाज नाहीं. **अति** देणें त्याला लाज नाहीं; अति शहाणा त्याचा बैल रिकामा; अतिरागी, अतिकठीण, अतिचौकस, अतिलोभी, अतिदयाळू, अतिव्यय अतितृष्णा, इ०.

**अधि** — वर, ठायीं, श्रेष्ठ, इ०. उ० — अध्यात्म, अधिदैवत, अधिभूत, अध्यक्ष, अधिपति, अधिष्ठान, अधिवास, अध्यास, अधिकार अधिक्षेप, अध्ययन, अध्यापन, अधिकरण, इ०.

**अनु** -- मागून, सारखें, इ०. उदा०---अनुक्रम, अनुक्रमणिका, अनुचर, अनुज, अनुग, अनुगमन, अनुकरण, अनुभव, अनुकूल, अनुग्रह, अनुताप, अनुपान, अनुमान, अनुरूप, अनुमत, अनुयायी, अनुभूति, अनुकंपा, अनुगत, अनुनय, अनुनासिक, अनुमोदन, अनुरक्त, अनुराग, अनुरंजन, अनुलोम अनुवाद, अनुशासन, अनुष्टुप्, अनुसंधान, अनुस्वार, इ०.

**अप**--पासून, खालीं, विरुद्ध, हीन, इ०. उदा०—अपकर्ष, अपकार, अपकीर्ति, अपजय, अपभाषण, अपशब्द, अपभ्रंश अपमान, अपराध, अपवर्ग, अपवाद, अपशकुन, अपमृत्यु, अपव्यय, अपेक्षा, अपहार, अपांग, अपघात, अपपाठ, अपयश ( म० अपेश ), अपलाप, अपसव्य, इ०

**अभि**—आसमंतात्, पूर्वी, जवळ, पुढें, इ०. उदा०---अभिनंदन, अभिनिवेश, अभिप्राय, अभिमान, अभिमुख, अभिरुचि, अभिलाष, अभिषेक, अभिसारिका, अभिज्ञान, अभ्यंग, अभ्यास, अभ्यागत, अभ्युत्थान, अभ्युदय, अभिधान, अभिज्ञ, अभिनय, अभिनव, अभिप्रेत, अभियुक्त, अभिवादन, अभिवृद्धि, अभीष्ट, इ०.

**अव** --पासून, खालीं, हीन, अभाव, इ०. उदाहरणें---अवकीर्ण, अवकृपा, अवगणना, अवगत, अवगाहन, अवगुण, अवतरण, अवज्ञा, अवलंबन, अवतार, अवधान, अवस्था, अवरोध, अवलोकन, अवेक्षण, अवष्टंभ, अवसान, अवशेष, अवनत, अवग्रह, अवतंस, अवदशा ( म० अवदसा, ), अवधूत अवभृथ, अवसर, इ०

**मराठी** उदा०---अवघड, अवजड, अवताण, अवलीला, अवकळा, अवलक्षण, अवचित.

**आ**—पासून, पर्यंत, थोडें, इ०. उदा०—आकर्षण, आकलन, आक्रोश, आक्रमण, आगमन, आचरण, आचार, आदान, आधान, आधार, आहार, आश्रय, आभास, आभार, आक्षेप, आज्ञा, आब्रह्म ( ह्याचे जागीं द्विरुक्तीनें आब्रह्मपर्यंत असें म्हणतात ), आबालवृद्ध, आपादमस्तक, आजन्म, ( ह्याचे जागीं आजन्मांत असें म्हणतात. ), आकर्ण, आनंद, आकुंचित, आघात, आच्छादन, आधेय, आश्रित,

आकृति, आकार, आख्यात, आलोचन, आलोडन, आकंठ, आरक्त, आयुध, आशंका, आहुति, आचंद्रार्क, आमरण, आमरणान्त, आकार, आग्रह, आदेश, आदर, आंदोलन, आयात, आरंभ, आरोप, आवर्त, आवर्तन, इ०.

**उत्-द्** — वर. उंच, श्रेष्ठ, इ०. उदा० : — उत्कर्ष, उत्कृष्ट, उत्तीर्ण, उत्तम, उत्तेजन, उत्थापन, उत्पत्ति, उत्पन्न, उत्पात, उत्पादक, उत्सर्ग, उत्सव, उल्हास, उत्साह, उत्सुक, उदाहरण, उद्गम, उद्गार, उद्भव, उद्योग, उद्ध्वस्त, उन्नति, उन्मत्त, उन्मूलन, उदय, उद्धार, उद्धरण, उच्चाटन, उच्छ्वास, उन्मुख, उद्बोध, उद्यान, उद्युक्त, उल्हसित, उल्लेख, उद्वासन, उद्वेग, उद्विग्न, उद्देश, उत्कंठा, उद्यापन, उच्छाप, ( म० उःशाप ), उत्प्रेक्षा, इ०.

**उप** — समीप, गौण, इ०. उदा० — उपाचार, उपकार, उपक्रम, उपजीवन, उपजीविका, उपदेश, उपद्रव, उपताप, उपदिशा, उपदेवता, उपनेत्र, उपपत्ति, उपभेद, उपभोग, उपपादन, उपमर्द, उपयोग, उपलक्षण, उपेक्षा, उपवास, उपास, उपपत्नी, उपधान्य, उपग्रह, उपवेद, इ०.

**दुर्,दुस्** — वाईट, दुष्ट, इ०. उदा० — दुराशा, दुराचरण, दुरुक्ति, दुरुत्तर, दुर्गुण, दुर्जन, दुर्घट, दुर्दशा, दुर्निवार, दुर्बोध, दुर्गम, दुर्भाग्य, दुर्भिक्ष, दुर्लक्ष, दुःसह, दुश्चिह्न, दुष्कर, दुर्मुख, दुष्कर्म, दुर्लभ, दुर्दिन, इ०.

**नि**—आंत, खालीं, कमी, जास्त, हीन, इ०. उदा०:—निकृंतन, निग्रह, निपात, निदर्शन, निक्षेप, नियोग, नियुक्त, निधान, निगमन, निरूपण, निबंध, निमग्न, नीरस, ( म० निरसें ), इ०.

**मराठी**—निकोप, निगाळ, निढाळ, नितळ, निपणजा, निपणतू, निकामी, निजोरी, निधड्या ( निधड्या छातीचा ), इ०.

**निस्, निर**—बाहेर, रहित, इ०. उदा०:—निरंजन, निरंतर, निरपराध, निरर्थक, निरामय, निराश, निरीक्षण, नीरोगी (म०निरोगी), निस्तेज, निर्भय, निर्णय, निर्लज्ज, निर्धन, निर्धार, निर्वाह, निश्चय, निष्कारण,

निश्चल, निःशेष, निष्कंटक, निष्कपट, निष्कलंक, निष्पक्षपात, निष्फल, निष्कृति, निष्तुष ( म० निस्तोष ), निरर्गल, इ०

**मराठी**—निर्फळ, निर्धास्त ( धास्ती हा शब्द अरबी असून त्यास निर हा संस्कृत उपसर्ग लागला आहे ) निष्काळजी, निगाँठ, निर्धोक, निर्जोरी.

**परा**—परत, उलट, इ०. उदा०—पराकाष्ठा, पराक्रम, पराभव, पराजय, परामर्श, परावर्तन, इ०.

**परि**—वाटोळा, पूर्ण, व्याप्त, इ०. उदा०:—परिकर, ( म० परकर हा संस्कृत परिकर, म्हणजे कमर या शब्दापासूनच आलेला आहे. ), परिग्रह, परिचय, परिच्छिन्न, परिजन, परिणयन, परिणाम, परितोष, परित्याग, परित्राण, परिधान, परिपाक, परिपाठ, परिपूर्ण, परिणाम, परिभाषा, परिमित, परिवार, परिश्रम, परिशीलन, परिस्फोट, परिहार, परिज्ञान, इ०.

**प्र**—अधिक, पुढें, वर, इ०. उदा०—प्रकरण, प्रकर्ष, प्रकृति, प्रकार, प्रख्यात, प्रधात, प्रकाम, प्रचार, प्रचुर, प्रमाण, प्रतारणा, प्रज्ञा, प्रभाव, प्रभा, प्रपिता, प्रपितामह, प्रमुख, प्रयोग, प्रसार, प्रस्थान, प्रलय, प्रगति, प्रकोप, प्रजा, प्रक्रिया, प्रखर, प्रगल्भ, प्रचंड, प्रताप, प्रदक्षिणा, प्रदोष, प्रबल, प्रपौत्र, प्रमाण, प्रवेश, प्रवाह, प्रवृत्ति, प्रदेश, प्रभु, इ०.

**प्रति**—उलट, फिरून, वर, एकेक, इ०. उदा०—प्रतिकूल, प्रतिकार, प्रतिक्रिया, प्रतिग्रह, प्रतिनिधि, प्रतिध्वनि, प्रतिपक्ष, प्रतिपादन, प्रतिबंध, प्रतिबिंब, प्रतिच्छाया ( म० पडछाया ), प्रतिशब्द ( म० पडसाद ), प्रतिमा, प्रतिष्ठा, प्रतिषेध, प्रतिस्पर्धी, प्रतिज्ञा, प्रतीक्षा, प्रत्युत्तर, प्रत्युपकार, प्रतिपाल, प्रतिबंध, प्रतिवादी, प्रतिष्ठित, प्रतिदिन, प्रत्येक, प्रतिक्षण, इ०.

**वि**—शिवाय, विशेष, निराळा, इ०. उदा०—विकला, विकार, विकृति, विख्यात, विगमन, विचार, विचल विदेश, विधान, विजातीय, विनति, विपत्ति, विधवा, विराग, विवाद, विसंगति, विज्ञान, विज्ञापना, विस्मृति, विक्षेप, विहार, विशेष, विसर्ग, विस्मर (म० विसर).

**सम्**—चांगलें, बरोबर, इ०. उदा०—संकल्प, संकीर्ण, संकोच, संक्रांत, संगम, संक्षेप, संगीत, संग्रह, संचय, संचार, संजीवन, संताप, संतोष, संधान, संपात, संपादन, संयोग, संज्ञा, संसार, संस्कार, संस्कृत संरक्षण, संशय, संहार, इ०

**सु**—चांगलें, सोपें, अधिक, इ० उदा०:—सुचरित, सुकृत, स्वागत स्वल्प, सुगम, सुदुस्तर, सुदूर, सुदुःखित, सुग्रास, सुभाषित, सुसह्य, सुलभ, सुलक्षण, सुभगा, सुजन, सुदिन, सुकर, सुरस, सुशिक्षित, सुशोभित, सुश्राव्य, सुषुप्ति, सुधारणा, इ०

**मराठी**—सुकाळ, सुगावा, सुघड, सुजाण, सुवीण, सुईण.

३९७. कधीं कधीं दोन दोन तीन तीन उपसर्गही एकाशब्दांत दृष्टीस पडतात. उदा०—अत्युत्कृष्ट, अध्याक्षेप, व्यवधान, सुसंगति, निराकरण, प्रत्यपवाद, समालोचन, समारोप, निर्विकार, पर्यालोचन, अभिनिवेश, व्यावृत्ति, सुप्रतिष्ठित, उपनिषद्, उपादान, संप्रदान, व्याकरण, व्यावर्तक, उपाध्याय, आसमंतात्, इ०

३९८. दुसरीं कांहीं विशेषणें व अव्ययें संस्कृत शब्दांत उपसर्गांप्रमाणेंच शब्दांचे आरंभीं येतात. त्यांचाही येथेंच उल्लेख केला पाहिजे. कारण कीं, तींही स्वतंत्रपणें उपयोगांत येत नाहींत.

**अ**—अभाव, निषेध, इ०. उदा०:—अकल्पित, असंख्यात, अन्याय, अनीति, अधर्म, अज्ञान, अग, इ० स्वरादि शब्दांचे पूर्वी अचे जागीं अन् असें होऊन त्या न् मध्यें शब्दांचे आरंभींचा स्वर मिळतो.

जसें:—अनुत्तर, अनायास, अनेक, अनृत, अनिष्ट, अनाकृष्ट, इ०

**मराठी**:—अजाण अनोळखी, अपुरा, असमंजस, असडीक.

**अद्**—आश्चर्य. उदा०:—अद्भुत.

**अधस्**—खालीं. उदा०:—अधःपात, अधोमुख, अधस्तल, अधस्वस्तिक अधोगति, अधोभाग अधोभुवन, अधोलोक, अधोवायु, इ०

**अन्तर्**—आंत. उ०:—अन्तर्द्वार, अन्तःपुर, अन्तःकरण, अन्तर्मुख, अन्तर्गृह, अन्तर्दशा, अन्तर्धान, अन्तर्दृष्टी, अन्तःपट, ( म० अन्तर्पाट ), अन्तर्भाव, अन्तर्याम, अन्तर्वेदी, अन्तर्ज्ञान, अन्तःसाक्ष, अन्तःस्थ, अन्तःस्थिति.

**अमा**—जवळ. उदाहरण —अमावास्या, अमात्य.

**अलम्**—सुंदर. उदा०—अलंकार, अलंकृत, अलंकृति, हें अव्यय बहुधा कृ धातूचे पाठीमागें येतें.

**आविः**—उघड, बाहेर. उदा०—आविष्करण, आविर्भाव.

**इति**—असें, हें. उदा०—इत्यर्थ, इतिहास, इतिवृत्त, इतिकर्तव्यता.

**इत्थम्**—याप्रमाणें. उदा०—इत्थंभूत.

**कु, का.** वाईट. उदा०—कुकर्म, कुसंग, कुवासना, कापुरुष, कुरूप, कुशब्द, कुलक्षण, कुबुद्धि, कुसंतान, कुस्वभाव, कुमति, कुमार्ग कुचेष्टा, कुपथ्य.

**मराठी**—कुचाळ, कुमळणें, कुवळणें, इ०.

**चिर**—फार. उदा०—चिरकाल, चिरंजीव.

**दिवा**—दिवसास. उदा०—दिवाकर, दिवाभीत, दिवांध, दिवानिशि.

**धिक्**—धिक्कार. धिक्कृत.

**मराठी**—धिग्जिणें.

**न**—अभाव. उदा०—नक्षत्र, नास्तिक, नग, नपुंसक.

**मराठी**—नकळत, नये, नलगे, नुपेक्षा, नाठव, नसणें.

**नाना**—पुष्कळ. उदा०—नानाविध, नानारूप, नानाप्रकार.

**पश्चात्**—मागें, नंतर. उदा०—पश्चात्ताप, पश्चाद्द्वार.

**पुरस्**—पुढें, समोर, इ० उदा०—पुरस्कर्ता, पुरोगामी, पुरश्चरण.

**पुरा**—मागें. उदा०—पुरातन, पुरावृत्त.

**पुनर्**—पुन्हा. उदा०—पुनर्जन्म, पुनर्विवाह.

**प्राक्**—मागलें, पुढें. उदा०—प्राक्कर्म, प्राक्कथन, प्राक्तन, प्राग्विवेक, प्राग्भाषण.

**प्रातर्**—सकाळीं. उदा०—प्रातःकाळ, प्रातःसंध्या, प्रातःस्नान, प्रातर्भोजन, प्रातर्हवन, प्रातःस्मरण.

**प्रादुर्**—उघड. उदा०—प्रादुर्भाव, प्रादुर्बुद्धि.

**बहिर्**—बाहेर. उदा०—बहिर्द्वार, बहिष्कार.

**स** — सहित, निशीं, एक. उदा० — सजीव, सजातीय, सफल, सकाम, सप्रमाण, सशास्त्र, सगोत्र, सविभक्तिक, सदय, सबंध, सबल, ( म० सबळ ), सरस, इ०.

**मराठी** - सजोड, सढळ, सलग, सधड, सभोंवता.

**सत्** — चांगलें. उदा० — सज्जन, सत्कर्म, सत्पुत्र, सच्छास्त्र, सदाचार, सच्छिष्य, सद्गुरु, सदभिरुचि, ०.

**सह** — बराबर. उदा० — सहज, सहवास, सहगमन, सहाध्यायी, सहविकार, सहकुटुंब, सहपरिवार, सहचरिणी, सहकारी, सहानुभूति, सहोदर, सहचर.

**सायम्** — संध्याकाळीं. उदा० — सायंकाळ, सायंसंध्या.

**स्व** — आपलें. उदा० — स्वदेश, स्वराज्य, स्वबांधव, स्वभाव, स्वरूप, स्वधर्म, स्वभाषा, स्वजन, स्वकार्य, स्वतंत्र, इ०.

**स्वयम्** —स्वतः, एकदम. उदा०—स्वयमेव, स्वयंवर, स्वयंभू, स्वयंपाक, स्वयंसेवक.

**स्वर्** — आकाश, स्वर्ग. उदा० — स्वर्णदी, स्वर्गंगा, स्वर्लोक, इ०.

टीप—कृ आणि भू या संस्कृत धातूंचे पाठीमागें अशेच कांहीं शब्द—विशेषेंकरून नामें व विशेषणें—बहुधा ईकारान्त अव्ययात्मक होऊन येतात. उ०—समीकरण, वर्गीकरण, स्वीकार, स्पष्टीकरण, पुत्रीकृत, दूरीकरण, वर्गीभवन, बाष्पीभवन, घनीभूत, द्रवीभूत, अर्थीभूत, भस्मीभूत, कारणीभूत, जर्जरीभूत, इ०.

## उपसर्गघटित साधित शब्द.

### मराठी.

**अ** — अभाव, निषेध, उदा०—अजाण, अडाणी, ( सं० अज्ञानी ), असमंजस, असडीक, असोला, अवस्तु, इ०.

स्वरादि शब्दांपूर्वीं अच्या जागीं अन् येऊन न् हा शब्दाचे आरंभींच्या स्वरांत मिळून जातो, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. जसें:—अनोळखी, अनशी--( हा शब्द अन् आणि अश्—खाणें यांपासून आलेला दिसतो )—पोटीं, अनास्था, अबोला.

**अपवाद १** — कधीं कधीं हा अप्रत्यय व्यर्थही लागलेला आढळतो; जसें:—अचपळ (म्ह० चपळ)-अचपळ मन माझें नावरे आवरीतां— रामदास. अच्युतफल ( च्युतफळ=आंबा ).

**अपवाद २** — कधीं कधीं व्यंजनादि शब्दांचेही आरंभी अन असलेला आढळतो. जसें:— अनमान, अनमोल, अनभग्न, अनाठायीं, अनहित, अनवाणी ( अन + वहाणा + ई ). परंतु हे अपवाद सध्यां क्वचित् आढळतात. यांपैकीं बहुतेक शब्द जुने आहेत.

**अड** किंवा **आड**—लहान, गौणे, इ०. उदा०— अडगळी, अडसंधी, अडसर, अडमुठ्या ( अड + मूढ ), अडखीळ, अडकाम, इ०. आडवाट, आडनांव, आडकाठी, आडगिऱ्हाईक, आडरान, आडपडदा, आडगांव, आडबाप्या, आडबायको, आडकथा, आडकूस, आडपंचा, आडवांसा, आडजात, आडादिवस, आडघस्ती, आडवळण, आडवेळ इ०

**अद्**— ( सं० अर्ध या पासून ) अर्धे, निमें. उदा०—अदपाव, अदशेर (ह्या पासूनच अच्छेर हें रूप झालें), अदमण, अदमुरें, अदकोस, इ०.

**अव**—हीन, कमी. उ०— अवजड, अवकळा, अवघड, अवताण, अवलक्षण, अवचित, इ०.

**दु**—दूषित, दुष्ट, वाईट; ( हा दु, संस्कृत दुर्, दुस् ह्यांचा शेष आहे ). उदा०—दुवेत (दूषित किंवा वाईट वेत), दुकाळ [ दुष्काळ, वाईटकाळ ]

**नि**—रहित, अधिक. उदा०—निकामी, निजोरी, निढळ, निंतळ, निकोप, निगाळ, निधड्या, निलाजरा, निपणजा, निपणतू, निपणजी, निपणती, निगर्वी, निचळ, निनावी, निरस ( सं० नीरस ), निरोगी ( सं० नीरोगी ).

**निर्, निस्**—निर्फळ, निर्धास्त, निर्धोक, निर्गांठ, निर्जोरी, निष्काळजी.

**पड**—( सं० प्रति ) दुसरा, गौण. उदा०—पडजीभ, पडसाद, पडच्छाया, पडपापणी, पडचाकर, पडताळा, पडसाळा, इ०.

**पण** —पणजा ( पण + आजा ), पणजी, पणतू ( पण + नातू ), पणत—पणती ( पण + नात—ती ), पणतोंड = पणतवंड ( पण + नातु + वंड ); [ हा वंड प्रत्यय भावंड शब्दांतही आहे. ]

**फट**—फार, उघड. उदा०—फटफजीती, फटलंडी, फटरांड, फटकाळ, इ०

**भर**—पुरा, मुख्य. उदा०—भरदिवसा, भररात्रीं भरदोनप्रहरीं, भरसभेंत, भरकचेरींत, भरहंगाम, भरजरी, भरजवानी, भरधांव, भरदौड, भर-मजला, भररस्ता, इ०

# उपसर्गघटित साधित शब्द.

## फारसी व अरबी.

**ऐन**—( अ ) मुख्य, पूर्ण, पुष्कळ. उदा० :—ऐनदौलत, ऐनजबानी, ऐनआमदनी, ऐनहंगाम, ऐनजमा, ऐनखर्च, ऐनजिन्नस, ऐनजमाबंदी, ऐनदस्त, ऐनकाळी, ऐनवसूल, ऐनगल्ला, ऐनार्किमत, ऐनसोदा—लुच्चा—हराम, ऐनमोकासा, इ०

हाच उपसर्ग कांहीं मराठी शब्दांसही लागलेला आढळतो. त्याचा 'भर' या उपसर्गाचे जागीं उपयोग होतो. जसें:—ऐनउन्हाळा, ऐनहिंवाळा, ऐनपावसाळा, ऐनदोनप्रहर, ऐनभर, ऐनरंग ऐनघाई, ऐनमारामारी, ऐनकर्ज, इ०.

**कम**—( फा० )—कमी, अपुरा. उदा०—कमजोर, कमकूवत, कम-बख्त, ( दैवहीन ) कमनजर, कमअक्कल, कमतोल, कमदर, कमदस्त, इ०. हा उपसर्ग, कांहीं मराठी शब्दांस लागतो. जसें:—कमनशीब, कमजात.

**गैर**— वांचून, विना. उदा०—गैरहजर, गैरसमज, गैरवाजवी, गैरशिस्त, गैरखुशी, गैरचलन, गैरमर्जी, गैरमसलत, गैरमनसुबा, गैरहंगामी, गैरहुकमी, गैरमहसूल, गैरखर्च, गैरमाहित, गैरकायदा, इ०. हा उपसर्ग कांहीं मराठी व संस्कृत शब्दांसही लागलेला आढळतो. जसें:—गैर-प्रकारचा, गैरमान्य, गैरमार्ग, गैररीत, गैरवळण, गैरसंधी, गैरसावध, गैरसोय.

**टीप**—गैर ह्याचें अरबी मूळ घैर. हें विशेषण असतां त्याचा अर्थ 'दुसरा' असा आहे. त्याचें बहुवचन घैरह ( गैरा, गैरे ) आहे; त्याचे पूर्वी व ( आणि ) येऊन वगैरे ( आणि दुसरे ) हा शब्द झाला आहे.

**दर**—प्रत्येक. उदा०—दररोज, दरमहा, दरकूच, दरमजल, दरसाल, दरशेंकडा, दरमुक्काम,

**मराठी**—दरदिवस, दररात्र, दरगांव, दरझाड, दरमाणशीं, दरदिवशीं इ०. विभक्ति प्रत्ययान्त रूपें मूळचीं नव्हत. त्यांचे जागीं दरमाणूस, दरदिवस, असें व्युत्पत्तिदृष्ट्या पाहिजे. तथापि दर म्हणजे प्रत्येक हें जरी फारसींत शब्दयोगी अव्यय आहे, तरी मराठींत त्याचा प्रत्येक या अर्थीं विशेषणाप्रमाणें उपयोग होऊं लागल्यामुळें दरमाणशीं, दरदिवशीं, दरमणीं, दररुपयास, दरशेरास, असे प्रयोग आढळतात.

**ना**—अभावार्थक. [ सं० न ] उदा०—नाउमेद, नापसंत, नाहक-नाहक, नादार, नाखूष, नादान, नालायक, नामर्द, नाइलाज, नाकबूल, नाराज, नाराजी, नादुरुस्त, नाशाबूद, नाशाबीत, नाचक्की, इ०.

**बद**—वाईट. उदा०—बदफैली, बदलौकिक, बदख्याल, बदकर्म, बदनाम, बदमस्त [ यापासून बदमाश हा शब्द आला आहे असें दिसतें,] बदसूरत, बदसूर, बदबू, [ म० बद्दू—वाईट वास, घाण; पण मराठींत बद्दू शब्द विशेषण आहे ].

**ब**—प्रमाणें. उदा०—बजिन्स [ म० बजिन्नस—तपशील ], बदस्तुर [ रीतीप्रमाणें ], बशर्त, [ अटीप्रमाणें ], बइसम [ नांवाप्रमाणें, याशब्दापासूनच जुन्या पत्रांतून आढळणारा बेशमी शब्द आला. ]

**बर**—प्रमाणें. उदा०—बरहक [ न्यायानें ], बरहुक्म हुकुमाप्रमाणें ), बरतरफ ( एका बाजूस,; यापासूनच बडतर्फ, म्हणजे बाजूस काढलेला, पदच्युत, हा शब्द आला ), बरदास्त.

**बिन**—वांचून [ सं० विना ]. उदा०—बिनदिक्कत, बिनधोक, बिनतोड बिनचूक, बिनतक्रार, बिनखर्च, बिनआफत, बिनमजुरी, बिनहरकत,

**मराठी**—बिनअपराध, बिनपोटी, बिनभाड्याचें घर.

कधीं कधीं बिन हें वांचून या अर्थीं शब्दाचे पाठीमागें लावून आणखी 'वांचून' 'शिवाय' इ० त्याच अर्थाचे शब्द पुढें जोडण्यांत येतात. जसें—बिनपैशावांचून, बिनपैशाशिवाय इ०. परंतु ह्या ठिकाणीं अर्थाची द्विरुक्ति होत असल्यामुळें ही भाषा ठीक नव्हे हें उघड आहे.

**बे**—वांचून. उदा०—बेअब्रू, बेअदबी, बेइनसाफ, बेइमान, बेजबाब, बेदम, बेअक्क, बेफिकीर, बेफाम, बेवकूफ, बेशुमार, बेजान, बेचारा, [ निरुपाय, यापासून म० बिचारा ], बेहद, बेगुमान, बेचिराख, बेजरब,

बेजार, बेढब, बेदाद, बेदिल, बेदिकत, बेधडक, बेनिसबत, बेबाक, बेमुरवत, बेरोजगार, बेशरम, बेवारसा, बेहोष, बेकार, बेकायदा, बेजाहा [ म० बेजा—अयोग्य ].

बेला [ अ० बिला ]—वांचून. उदा०—बिलाकसूर, बेलाशक, बेलाग.

ला—लावारिस, लाचार.

सर—मुख्य. उदा०—सरकार, सरहद्द, सरदार, सरमोकादम, सरनौबत, सरसुभा, सरपंच, सरपोश, सरकारकून, सरपेच, [ यापासून म० शिरपेंच ], सरजोर, [ म० शिरजोर ].

हर—प्रत्येक. उदा०—हररोज, हरवक्त, हरघडी, हरकामी, हरहुनरी, हरसाल.

हम—समान, पूर्ण, सर्व. उदा०—हमचौरस, हमरंग, [सजाति], हमरस्ता [ सर्वांचा रस्ता, राजमार्ग ], हमजात.

टीप—यांपैकीं कांहीं उपसर्गोपासून झालेले शब्द समासांतही येऊं शकतील. कारण कीं हर, दर, कम, इ० जर स्वतंत्र शब्द मानिले, आणि ते तसे मानणें केवळच गैर नाहीं, तर अर्थात् पुढील शब्दांशीं त्यांचा समास झाला आहे असें समजणें ठीकच आहे. परंतु हर, दर, कम, इत्यादि उपसर्ग स्वतंत्र शब्दांप्रमाणें फार कमी उपयोगांत येतात म्हणून त्यांची येथें भरती केली आहे.

[ उपसर्ग म्हणजे शब्दांचे मागें लागणारीं अक्षरें. ह्यांच्या यादीमध्यें खेर यांनीं ज्या उदाहरणांचा समावेश केला आहे तीं पाहिलीं म्हणजे खेरांनीं हें प्रकरण केवळ डोळे मिटून लिहिलें असेंच म्हणावे लागते. या विधानाचे समर्थनार्थ आणि अशाच प्रकारच्या अप्रयोजकपणास किंवा आंधळेपणास पुन्हा थारा मिळू नये, ह्यासाठीं त्यांनीं दिलेल्या पैकीं कांहीं मासलेवाईक उदाहरणें पहा. उडतबातमी, एकबोली, पोरस्वभाव, परदेश, ह्या शब्दांमध्यें त्यांनीं उडत, एक, पोर, पर, हे उपसर्ग ( prefixes ) आहेत असें सांगितलें आहे. परंतु यांस उपसर्ग ( prefixes ) असें कां म्हणावयाचें हें एक मोठेंसे गूढ आहे. उडत, एक, पोर, पर, हे स्वतंत्र शब्द असून त्यांचा, वरील अर्थानेंच स्वतंत्र उपयोग मराठी भाषेंत आहे हें उदाहरणें देऊन सिद्ध करण्याची जरूर नाहीं. परंतु उडत, एक, पोर, पर, इ० शब्दांस उपसर्ग म्हणण्यांत जी चूक झाली आहे ती पुढील चुकीचे मानानें कांहींच नाहीं. आसतुडा, एकोपा, नातलग एथला, इत्यादि शब्दांत आस, एक, नात, एथ, हे उपसर्ग ( prefixes ) म्हणून खेर यांनीं सांगितले आहेत. हें पाहून मात्र हंसावें कीं रडावें हें ठरविणें कठीण आहे. आस, एक, नात, एथ हे जर उपसर्ग तर तुडा, ओपा, लग, ला, हे खेरांचे मतें शब्द होत असें दिसतें. तुडा, ओपा, लग, ला, यांस

आस, एक, नात, एथ, हे उपसर्ग लागले आहेत हें म्हणणें बरें किं आस, एक, नातें, एथें शब्दांस तुडा, ओपा, लग, ला, हे प्रत्यय लागून आसतुडा, एकोपा, नातलग, एथला, हे शब्द साधले आहेत असें म्हणणें बरें हें ठरविण्यास थोराची अक्कलही पुरे आहे. वास्तविक म्हटलें म्हणजे खेराची ही कृति टीका करण्याचे योग्यतेची नाहीं. तथापि ती एका प्रचलित असलेल्या व्यकरणांत झळकत असल्यामुळें तिच्याकडे लक्ष देणें भाग पडलें. अप ह्या उपसर्गापुढील उदाहरणांत जोशी यांनीं एक अपक्व असें उदाहरण दिलें आहे. तें केवळ दुर्लक्षानें येथें पडलें आहे हें उघड आहे. परंतु खेरांच्या वरील प्रकारास दुर्लक्षाची तरी सबब कशी पुढें करितां येईल तें आम्हांस तरी समजत नाहीं. एवंच खेरांची अक्षम्य नजरचूक सर्वथैव त्याज्य होय ह्यांत संशय नाहीं.

## उपसर्गघटित साधित शब्द.

### इंग्रजी.

सब्—पोटातला, हाताखालचा. उदा० —सब् इन्स्पेक्टर, सब ओव्हरसिअर, सब कॉंट्रॅक्टर, सब्र ऑफीस, इ०

सूचना—उपसर्ग-घटित साधित शब्द व इतर साधित शब्द इंग्रजींतून मराठांत कोणते आले आहेत हें आजच नक्की सांगतां येणार नाहीं. ही आयात किंवा भरतीची लाट सुरू आहे. ती अद्याप स्थिरावली नाहीं तेव्हां मराठी व्याकरणाच्या ह्या भागाची रचना आजच करणें शक्य व इष्टही नाहीं. असेंच अन्य प्रकारच्या इंग्रजी साधितशब्दांसंबंधानेंही समजावें. सब हा एक फक्त मासला दाखविला आहे.

# अध्याय ३.

## प्रत्ययघटित साधित शब्द.

३९६. या शब्दांचे कृदन्तें व तद्धितें असे मुख्य दोन भेद करितात. त्यापैकीं प्रथम कृदन्तांकडे वळूं.

### संस्कृत कृदन्तें.

**अ** — चुर्—चोर, सृप्—सर्प, दिव्—देव, स्मृ—स्मर, मिष्—मेष, हृ—हर, धृ—धर, प्लु—प्लव, चर—चर, कृ—कर, नद—नद, भू—भव, बुध्—बुध दीप्—दीप.

कृ—कार, वह्—वाह, व्यध्—व्याध, भज्—भाग, त्यज्—त्याग, भू—भाव, क्रम—क्राम, ज्ञा—प्राज्ञ, पा—द्विप, स्था—अन्तःस्थ-स्वस्थ, अधि+इ—अध्याय, आ+हृ—आहार, लभ्—लाभ, सम्+गम्—संगम, वि+श्रम्—विश्राम, सम्+चि—संचय, शम्—शम, नी—नय, प्र+ नी - प्रणय, रु—रव.

**अक**—कृ-कारक, नी—नायक, हन्—घातक, नृ—नर्तक, पच्—पाचक, दा—दायक, गै—गायक, पू—पावक, बाध्—बाधक, लिख—लेखक, युज—योजक, क्षिप्—क्षेपक, जन्—जनक, रक्ष्—रक्षक, हिंस—हिंसक, प्र+ईक्ष—प्रेक्षक, मृ—मारक, तृ—तारक.

**अत्**—हा प्रत्यय लागून अपूर्णक्रियाद्योतक शब्द संस्कृतांत होतात. परंतु त्यांचा प्रचार मराठींत नाहीं. कारण कीं तें व्यंजनान्त आहेत. तथापि, जगत्, जगती, दमयंती, अशीं कांहीं नामें मूळचीं कृदन्तें होत. यजमान, आणि पवमान हे शब्द मूळ अपूर्ण क्रियाद्योतक कृदन्तेंच होत. पण या ठिकाणचा प्रत्यय [ मान ] मात्र निराळा आहे.

**अन**—नंद्—नंदन, मद्—मदन, रम्—रमण, रु—रवण—रावण, अर्द्—अर्दन हा—हायन, सूद्—सूदन, रक्ष्—रक्षण, अव+लोक्—अवलोकन, स्पष्टीकृ—स्पष्टीकरण, स्था—स्थान, दा—दान, मृ—मरण, भुज् भोजन, भू—भवन, सम + पद्- संपादन, पच्—पचन, हु—हवन, पाल्—पालन, साध्—साधन सेव्-सेवन, दुष्-दुषण, शी-शयन, वद्—वदन.

**आना**—प्र+अर्थ-प्रार्थना, विद्—वेदना, रच्—रचना, वि+कत्थ् विकत्थना, वि+चक्ष्—विचक्षणा, घट्—घटना, तुल्—तुलना, भू भावना, सूच्—सूचना, अव+धृ—अवधारणा, अव+हेल्—अवहेलना, आ+राध्—आराधना,

**अनीय**—दर्शनीय, करणीय, प्रेक्षणीय, रमणीय, आचरणीय.

**आ**—इष—इच्छा, कथ्—कथा, गुह्—गुहा, चिंत्—चिंता, जृ—जरा, पीड—पीडा, व्यथ—व्यथा, त्वर्—त्वरा, त्रप—त्रपा, तुल्—तुला, प्र+शंस्—प्रशंसा शिक्ष्—शिक्षा, स्पृह्—स्पृहा, पूज्—पूजा, जिज्ञासा, पिपासा, जिगीषा, मुमुक्षा,

**अस्**—सृ—सरस, इ—एनस्, तम्—तमस्, वच्—वचस्, तिज्—तिजस, पय—पयस्, शृ—शिरस, वय्—वयस्, ऋ—उरस्, छंद—छन्दस.

टीप—ह्या शब्दांचें अन्तींचा स् अथवा ह्याचाच विसर्ग होतो. तो मराठीमध्यें समासांत दृष्टीस पडतो. जसें:—सरसिज, तेजःपुंज, पयोवाह, छंदःशास्त्र, इ०. यामुळें ह्या शब्दांचें मूळरूप जाणण्याची मराठी भाषेस थोडीशी आवश्यकता आहे. बाकी स्वतंत्रपणें हे शब्द अंतींचा स् गळून सर, तम, तेज, पय, इ०. असे अकारान्तच मराठींत वर्ततात.

**आलु**—स्पृह्—स्पृहयालु, शी—शयालु.

**इ**—हृ—हरि, भृ—भरि ( उदरंभरि )

**इन्**—हा प्रत्यय लागून जीं नामें होतात त्यांचें प्रथमेचें एकवचन ईकारान्त होतें. तेंच मराठींत रूढ आहे. म्हणून ह्या इन्नन्त शब्दांचीं ईकारान्तच रूपें येथें दिलीं आहेत.

त्यज्—त्यागी, दुष्-दोषी, द्विष्—द्वेषी, युज् योगी, द्रुह्-द्रोही, अप+राध् अपराधी, अनु+भू—अनुभवी, वद्-वादी, उप+कृ—उपकारी, अनु+या अनुयायी, सम्+यम्—संयमी, क्षि—क्षयी, आ+भृ आभारी, सह+चर सहचारी, सह+अधि+इ—सहाध्यायी, शेष+शी—शेषशायी. कार्य+कृ—कार्यकारी, सहकारी.

**इस्**—सृप्—सर्पिस, अर्च्—अर्चिस्, द्युत—ज्योतिस्, हु—हविस्.

टीप—अस् प्रत्ययाखालील टीप पहावी.

**इष्णु**—सह्—सहिष्णु, वृध—वर्धिष्णु.

स्थाणु आणि विष्णु ह्यांमध्यें फक्त नु हा प्रत्यय आहे. आणि जिष्णु ह्या शब्दांत ष्णु हा प्रत्यय आहे. नु व ष्णु हे इष्णु प्रत्ययाचेच शेष आहेत.

**उ**—भिक्ष्—भिक्षु, इच्छ्—इच्छु, [ हितेच्छु ].

**उक**—भू—भावुक, हन्—घातुक, कम्—कामुक, भिक्ष्—भिक्षुक.

**उर**—भास्—भासुर, भंज्—भंगुर, विद्—विदुर, भिद्—भिदुर.

**उस्**—चक्ष्—चक्षुस्, यज्—यजुस् [ यजुर्वेद ], इ—आयुस्, वप् वपुस्, धन्—धनुस्.

टीप—अस् प्रत्ययाखालील टीप पहावी.

**ऊक**—दश—दंदशूक, जागृ—जागरूक.

**त**—हा प्रत्यय लागून, पूर्णक्रियाद्योतक कृदन्तें तयार होतात. हीं मराठींत बरींच प्रचारांत आहेत. गम्—गत, भू—भूत, कृ कृत, मृ—मृत, जन्—जात, हन्—हत, च्यु—च्युत, ख्या—ख्यात, त्यज—त्यक्त, श्रु—श्रुत, वच्—उक्त, गुह्—गूढ, सिध्—सिद्ध, तृप् तृप्त, नश्—नष्ट, वृध्—वृद्ध, वृत् वृत्त, मुह्—मुढ, क्षुध्—क्षुधित, शंक्—शंकित, ग्रह्—ग्रहीत, मुद्—मोदित, वद्—उदित, विद्—विदित, कथ्—कथित, मद्—मत्त, त्रस्—त्रस्त, इष्—इष्ट, क्लिश—क्लिष्ट, नम्—नत.

[ अ ] ह्या त बद्दल कांहीं ठिकाणीं न किंवा ण येतो. ली—लीन, कॄ—कीर्ण [ संकीर्ण ], जॄ—जीर्ण, विदॄ—विदीर्ण, पॄ—पूर्ण वि+स्तॄ—विस्तीर्ण, उत्+विज् —उद्विग्न, खिद्—खिन्न. लज—लग्न, [ संलग्न ], हा—हानी, क्षि—क्षीण, दा—दान, इ०.

[ आ ] कांहीं धातूंस त आणि न हे दोन्ही लागून दोन दोन रूपें होतात.

त्रा—त्रात, त्राण; घ्रा—घ्रात,—घ्राण; पृ—पूर्त, पूर्ण, पूर—पूरित, पूर्ण; त्वर—त्वरित, तूर्ण.

[ इ ] ह्या त च्या जागीं क्वचित् क, म, व, हे अढळतात. शुष्—शुष्क, क्षै—क्षाम, पच्—पक्व.

**ता [ तृ ]**—मूळप्रत्यय तृ परंतु तृप्रत्ययान्त शब्दांचें पुल्लिंगी प्रथमेचें एकवचन ताकारान्त होतें. तेंच मराठींत मूळ रूप असल्यामुळें ताकारान्त रूपच येथें दिलें आहे. ह्यानें कर्तृत्ववाचक नामें व विशेषणें साधतात. दा—दाता, नी—नेता, श्रृ—श्रोता, वच्—वक्ता, भृ—भर्ता, प्रच्छ—प्रष्टा, भुज भोक्ता, सृज—स्रष्टा, द्विष—द्वेष्टा, शास्—शास्ता, अ०शासिता, गै—गाता.

टीप—या शब्दांचें स्त्रीलिंग मात्र मूळ तृ प्रत्ययान्त रूपासच मराठीमध्यें ई प्रत्यय लागून होतें हें पूर्वी सांगितलेंच आहे. जसें:—ग्रंथकर्त्री, धात्री, कवयित्री, इ०.

**तव्य**—कृ—कर्तव्य, भू—भवितव्य, ज्ञा—ज्ञातव्य, श्रु—श्रोतव्य, दा—दातव्य, नी—नेतव्य, गम्—गन्तव्य.

**ति**—कृ—कृति, बुध—बुद्धि, शक्—शक्ति, स्मृ—स्मृति, गम्—गति, युज—युक्ति, नी—नीति, यु—युति, प्री—प्रीति, सृज—सृष्टि, क्रम्—क्रांति, स्था-

स्थिति, गा—गीति, शुध-शुद्धि, मन्—मति-दृश-दृष्टि, प्र+नम्-प्रणति, वि+नम्—विनति.

[अ] क्वचित् ह्या ति प्रत्ययाबद्दल नि येतो. हा—हानि, ग्लै—ग्लानि,इ०.

**त्र**—नी-नेत्र, श्रु—श्रोत्र, पा—पात्र, शास्—शास्त्र, शस्—शस्त्र, अस—अस्त्र, स्तु—स्तोत्र, गम्—गात्र, क्षि—क्षेत्र, पत्—पत्र.

[अ] कांहीं शब्दांत त्र ह्या प्रत्ययाचे जागीं इत्र झालेला आढळतो. जसेः—खन्-खनित्र, पू—पवित्र. चर्—चरित्र.

**त्रिम**—कृ—कृत्रिम.

**न**—यत्—यत्न, स्वप्—स्वप्न, प्रच्छ—प्रश्न, यज्—यज्ञ.

**मन्**—दा—दाम, छद्—छद्म, नम्—नाम, सि—सीमा, रु—रोम, लू—लोम, हि—हेम, धा—धाम, जन्,—जन्म, चर्—चर्म, बृह्—ब्रह्म.

टीप—हीं अकारान्त रूपें मन्—मधील न् गळून झालेलीं आहेत. मूळ रूप व्यंजनान्त असून मराठी प्रचारांत नसल्यामुळें प्रथमेचें एकवचन दिलें आहे.

**य**—रम्—रम्य, कृ-कार्य, त्यज्—त्याज्य, भू—भव्य, वध्—वध्य, वच्—वाच्य, व वाक्य, भुज्—भोज्य—भोग्य, स्तु—स्तुत्य, दा—देय, विधा—विधेय, अमा+वस्—अमावास्या, आ+चर्—आचार्य, पुष्—पुष्य, वह्—वह्य, क्षम्—क्षम्य, गम्—गम्य, गद्—गद्य, गुह्—गुह्य, पद्—पद्य, भृ—भृत्य, शास्—शिष्य, वृ—वर्य [ गुरुवर्य, मित्रवर्य ].

**या**—विद्—विद्या, चर्—चर्या, परि+चर्—परिचर्या, कृ—क्रिया, शी—शय्या, मृग्—मृगया,

**र**—नम्—नम्र, हिंस्—हिंस्र, जस्—जस्र ( अजस्र ).

**रु**—दा—दारु, मि—मेरु.

**वर**—भास्—भास्वर, स्था—स्थावर, ईश—ईश्वर, नश्—नश्वर.

## संस्कृत तद्धितें

**अ**—( अ ) त्याचा मुलगा; किंवा त्या गोत्रांतला अथवा कुलांतला या अर्थी हा प्रत्यय होतो. भृगु—भार्गव, यदु—यादव, वसिष्ठ—वासिष्ठ, कश्यप—काश्यप, सुमित्रा—सौमित्र, पृथा—पार्थ, सुभद्रा—सौभद्र.

( आ ) **अ** हा प्रत्यय लागून कांहीं विशेषणेंही होतात.

चक्षुः—चाक्षुष, विष्णु—वैष्णव, चंद्र—चांद्र, ( मास, वर्ष ), सूर—सौर नक्षत्र—नाक्षत्र, पृथिवी – पार्थिव ( लिंग ) ; व्याकरण – वैयाकरण, चित्रा—चैत्र, विशाखा—वैशाख.

( इ ) इकारान्त, उकारान्त, शब्दांस अ हा प्रत्यय लागून कांहीं धर्मवाचक नामें साधतात. शुचि—शौच, मुनि—मौन, लघु—लाघव, मृदु—मार्दव.

**अक**—' तें शिकलेला ' ह्या अर्थी हा प्रत्यय होतो. जसें मीमांसक, नैयायिक इ०.

**आट, आल**—वाचाट, वाचाल.

**आमह,**—' त्याचा बाप ' ह्या अर्थी हा प्रत्यय होतो. जसें :—पितृ—पितामह, मातृ—मातामह.

**इ**—'त्याचा पुत्र ' उ०—दशरथ—दाशरथि ( राम ), कृष्ण—कार्ष्णि (मदन).

**इक**—ह्या पासून अनेक अर्थी विशेषणें होतात. वर्ष—वार्षिक, मास—मासिक, लोक—लौकिक, इतिहास—ऐतिहासिक, तत्काल—तात्कालिक, समय—सामयिक, द्वार—दौवारिक, धर्म—धार्मिक, आस्ति—आस्तिक, नास्ति—नास्तिक, देव—दैविक, नौ—नाविक, अहन्—आह्निक, सेना—सैनिक, काय—कायिक, वाच्—वाचिक, मन—मानसिक, संसर्ग—सांसर्गिक, पुराण—पौराणिक, वेद—वैदिक, इह—ऐहिक, अध्यात्म—आध्यात्मिक, अधिदेव—आधिदैविक, अधिभूत—आधिभौतिक, धन, धनिक.

**इत**—पुष्प—पुष्पित, फल—फलित, ( सुफलित ), सुख—सुखित, दुःख—दुःखित, कंटक—कंटकित, कुसुम—कुसुमित, पल्लवित, खंडित, मुद्रित, बुभुक्षित, पुलकित, उत्कंठित, हर्षित, त्वरित, मूर्च्छित, प्रतिबिंबित, दीक्षित.

**इन**—एतत्प्रत्ययान्त शब्दांचीं प्रथमेचीं एकवचनें न् गळून ईकारान्त होतात. तींच रूपें मराठींत रूढ असल्यामुळें तींच येथें दिलीं आहेत. हा प्रत्यय बहुत करून अकारान्त शब्दांस लागतो. शास्त्री, हली, तरंगिणी [ स्त्रीलिंग ], धनी, हस्ती, अर्थी, विद्यार्थी, पक्षी, सुखी, दुःखी, कुमुदिनी ( स्त्री० ), पुष्करिणी ( स्त्री० ), कमलिनी ( स्त्री० ), दंती

**टीप**—कांहीं शब्दांस हा प्रत्यय व वरील इक प्रत्यय हे विकल्पानें लागतात. असें:—माया—मायी, मायिक; नौ—नावी ( हें मराठींत प्रचारांत नाहीं ), नाविक इ०.

**इन**—हा प्रत्यय फल, मल, बर्ह, यांना पररूपसंधीनें लागतो. फलिन, मलिन, बर्हिण. बर्हिण ह्या शब्दाचें बर्ही असेंही रूप होतें.

( अ ) अधि आणि प्राक् या अव्ययांस हा प्रत्यय लागून अधीन व प्राचीन हे शब्द झाले आहेत.

**इम**—अग्र—अग्रिम, अंत—अंतिम, पश्चात्—पाश्चिम.

**इमा**—ह्या प्रत्ययानें धर्मवाचक नामें होतात. महत्—महिमा, लघु—लघिमा, रक्त—रक्तिमा, काल—कालिमा, प्रिय—प्रेमा, नील—नीलिमा.

**इय**—यज्ञ—यज्ञिय, राष्ट्र—राष्ट्रिय, श्रोत्र—श्रोत्रिय, क्षत्र—क्षत्रिय.

**इल**—तुंड—तुंडिल ( म० तोंडाळ ), पंक—पंकिल, तुंद—तुंदिल म० दोंदिल ), जटा—जटिल.

**ईन**—कुल—कुलीन, शाला— शालीन, नव—नवीन, हियंगु—हैयंगवीन, गदा—गदीन.

**ईमस**—मल—मलीमस.

**ईय**—त्वत्—त्वदीय, मत्—मदीय, अस्मद—अस्मदीय, युष्मद्—युष्मदीय, तद्—तदीय.

( अ ) स्व, पर, राजन्, ह्यांस हा प्रत्यय लागतांनां मध्यें क् हें व्यंजन येऊन स्वकीय, परकीय, राजकीय, अशीं रूपें होतात.

**उल**—मातृ—मातुल.

**एय**—( अ ) 'त्याचा मुलगा' या अर्थी हा प्रत्यय होतो. विनता—वैनतेय गंगा—गांगेय, कुंति—कौंतेय, भगिनी—भागिनेय, अत्रि—आत्रेय, ( दत्तात्रेय ) मृकंडु—मार्कंडेय, राधा—राधेय, पंडु—पांडवेय.

( आ ) निरनिराळ्या अर्थी. अग्नि—आग्नेय, पुरुष—पौरुषेय, पथिन्—पाथेय.

**क**—पुत्र—पुत्रक, बाल—बालक.

**कट**—हा प्रत्यय कांहीं उपसर्गांस लागून पुढील शब्द झाले आहेत. संकट, प्रकट, विकट, निकट उत्कट.

**कल्प**—द्वीपकल्प ( जवळ जवळ द्वीप म्ह० बहुतेक बेटच ).

**चित्**—कचित्, कदाचित्, किंचित्.

**ठ**—कर्मठ, जरठ.

**तन**—सदा ( सना )—सनातन, चिरं—चिरंतन, पुरा—पुरातन, **नव**—नूतन.

**तस्**—स्वरतः, वर्णताः, अर्थतः, यत्नतः, स्वतः, उभयतः.

**त्य**—दक्षिणा—दाक्षिणात्य, पश्चात्—पाश्चात्य, पुरस्—पौरस्त्य, अमा—अमात्य, नि—त्य, अत्र—अत्रत्य, तत्र—तत्रत्य.

**ता**—ह्यानें भाववाचक किंवा धर्मवाचक नामें साधतात.

गुरु—गुरुता, ब्राह्मण—ब्राह्मणता, कवि—कविता, सम—समता, नवनि—नवनिता. जनता, बंधुता, हे शब्द असेच झाले आहेत. परंतु ह्यांचा उपयोग जनसमूह ह्या अर्थींही कधीं कधीं होतो. उदा०——

प्रभुनें करुणा करुनी प्रणता **जनता** सदैव रक्षावी——मोरोपंत.

**त्व**——ह्या प्रत्ययानेंही धर्मवाचक नामें साधतात. गुरुत्व, ब्राह्मणत्व, पुरुषत्व, गोत्व, राजत्व, इ०.

**धेय** —— नामधेय, भागधेय.

**म** —— ह्यानें दोन तीन शब्द होतात.

मध्य—मध्यम, द्रु—द्रुम, अधस्—अधम.

**मय** —— काष्ठमय, गोमय, मृन्मय, अन्नमय, मांसमय.

**मत्**—— ( पु०—मान्, स्त्री०—मती, न०—मत् ) श्रीमान् ( म०—श्रीमंत ) धीमान्, गरुत्मान्, ककुद्मान्.

टीप——मत् ( मान् ) ह्याच्या सारखाच वत् ( वान् ) हा प्रत्यय आहे. तो पुढें पहावा.

**मिन्** —— स्व—स्वामी, वाक्—वाग्मी.

**य** —— ( अ ) यानें भाववाचक नामें होतात.

जड—जाड्य, ब्राह्मण—ब्राह्मण्य, वणिज्—वाणिज्य, सेनापति—सैनापत्य, स्वस्थ—स्वास्थ्य, दृढ—दार्ढ्य, अधिपति—आधिपत्य, इ०.

( आ ) त्याचा मुलगा, त्या वंशांतला, त्यासंबंधी, या अर्थींही हा प्रत्यय होतो. पाराशर—पाराशर्य, पुलस्ति—पौलस्त्य, शांडिल—शांडिल्य,

यज्ञवल्क—याज्ञवल्क्य, दिति—दैत्य, गर्ग—ग्यार्ग्य, जमदग्नि—जामदग्न्य, सोम—सौम्य, चतुर्मास—चातुर्मास्य, तालु—तालव्य, वायु—वायव्य, ग्राम—ग्राम्य, वन—वन्य, मुख—मुख्य, अंत—अंत्य, आदि—आद्य, दंत—दंत्य, गो—गव्य, पाद—पाद्य, धन—धान्य, पथ—पथ्य, मूल—मूल्य,

**र** — मधु — मधुर, मुख — मुखर, पाण्डु — पाण्डुर, नग — नगर.

**ल** — वत्स — वत्सल, पांसु—पांसुल.

**लु** — श्रद्धालु, कृपालु, दयालु.

**व** — केश — केशव ( चांगल्या केशांचा, विष्णु ), विषु ( सारखें )— विषुव ( दिनरात्र सम होण्याचा काल अथवा वृत्त ), राजी ( ओळ, रेघ ) — राजीव [ रेघेंत वाढणारें, कमल ], अर्णस [ पाणी ] — अर्णव [ समुद्र ].

**वत्** [ **वान्** ] — विद्यावान्, ज्ञानवान्, धनवान्, [ म० धनवंत ], तडित्त्वान्, भास्वान्, गुणवान्, रसवान् रूपवान्.

[ अ ] कांहीं सर्वनामांस हा प्रत्यय लागून अनिश्चित संख्यावाचकें होतात. यद् — यावान्, तद् — तावान्, एतद् — एतावान् [ इतकें ], तद् — तावती [ तितकी ].

[ आ ] वत् यानें कांहीं क्रियाविशेषणेंही होतात. जसें:—मातृवत्, पितृवत्, पुत्रवत्.

**वल** — [ स्त्री० — वला ] कृषीवल, ऊर्जस्वल, रजस्वला, शाद्वल, शिखावल [ मयूर ].

**विन्**—माया – मायावी, तेजस् – तेजस्वी, तपस् – तपस्वी, यशस्— यशस्वी, पयस्—पयस्विनी ( स्त्री० पुष्कळ दूध देणारी गाय ), मेधा— मेधावी, स्रक—स्रग्वी.

**व्य**—पितृव्य ( चुलता ), भ्रातृव्य ( पुतण्या ).

**शः**—क्रमशः, शब्दशः, बहुशः ( म० बहुशा ).

**सूचना**—संस्कृत कृदन्तें व तद्धितें फक्त जितकीं मराठीमध्यें प्रचारांत आढळतात तितक्यां पुरताच वरील विचार होय. यांशिवाय आणखी वेगळे

प्रत्यय लागून झालेलीं कृदन्तें व तद्धितें संस्कृतांत बरींच आहेत. त्यांपैकीं जर कांहीं एखाद्या जुन्या किंवा नव्या काव्यांत किंवा गद्य ग्रंथांत आढळलीं तर त्यांचाही समावेश वरील यादींत करावा लागेल. एवंच मराठी भाषा ही ज्या अर्थीं वाढती असून तिच्यांत, संस्कृताचा भरणा दिवसेंदिवस वाढत आहे, त्या अर्थीं वरील यादी ही बहुधा अपुरीच असावयाची. तथापि प्रचलित मराठीचे दृष्टीनें वरील यादी पुरेशी आहे असें वाचकांस आढळून येईल. संस्कृत, फारसी व अरबी ह्या भाषांतून आलेल्या साधित शब्दांसंबंधाचा विचार कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं आपल्या व्याकरणांत बराच सविस्तर केलेला आहे. ह्यामुळें या ग्रंथांत त्याच पुस्तकाचे आधारानें त्या त्या भाषांतील शब्दांचा संग्रह केला आहे. गोडबोले शास्त्री यांच्या या बाबतींल श्रमाबद्दल आपण त्यांचे फार आभार मानिले पाहिजेत.

४००. अखेरीस आणखी एका प्रकारच्या संस्कृत शब्दांची यादी देऊन हें संस्कृत साधित शब्दांचें प्रकरण संपवितों. हे शब्द बहुधा समासांमध्यें आरंभीं किंवा शेवटीं आढळतात. त्यांचा स्वतंत्र उपयोग फारसा होत नाहीं. ह्यामुळें त्यांस उपसर्ग किंवा प्रत्यय ह्यांमध्यें घालण्यास हरकत नाहीं; आणि त्याच दृष्टीनें त्यांचा मराठी व्याकरणांत उल्लेख करण्यांत येतो. त्यांची यादी मोल्स्वर्थच्या मराठी—इंग्रजी कोशाचे प्रस्तावनेंत दिली आहे. तिच्याच आधारानें पुढील यादी दिली आहे.

**अधीन**—स्वाधीन, कालाधीन, मंत्राधीन, दैवाधीन, प्रयत्नाधीन, उद्योगाधीन, पराधीन.

**अंकित**—आज्ञांकित, स्नेहांकित, ज्ञानांकित.

**अंतर्**—अन्तर्ज्ञान, अन्तःप्रवेश, अन्तःपुर, अन्तर्गृह, अन्तर्निष्ठ.

**अंतर**—देशांतर, वेशांतर, भाषांतर, मन्वंतर, अर्थान्तर, पाठांतर, वस्त्रांतर, रूपांतर.

**अन्वित**—दुःखान्वित, दोषान्वित, भयान्वित, क्रोधान्वित कामान्वित, लोभान्वित, मोहान्वित.

**अपह+**—शोकापह, दुःखापह, सुखापह, मानापह.

**अध्यक्ष**—दानाध्यक्ष, शालाध्यक्ष, स्थानाध्यक्ष, राजाध्यक्ष.

**अतीत**—कालातीत, गुणातीत, भावातीत, स्मरणातीत.

**अनुरूप**—गुणानुरूप, सामर्थ्यानुरूप, भक्त्यनुरूप, शक्त्यनुरूप.

टीप—मराठींत कधीं कधीं अनुरूप शब्दाच्या मागील शब्दाचें सामान्यरूप होऊन पुढील अनुरूप शब्दांतील आद्य अ गळतो. जसें:—आज्ञेनुरूप, योग्यतेनुरूप, इ०.

**अनुसार**—कर्मानुसार, भाग्यानुसार, दैवानुसार, समयानुसार.

टीप—अनुसार बद्दल अज्ञानानें अनसार असें येतें. जसें:—काळानसार, वेळेनसार. वेळेनसार ह्यामध्यें वरील अनुरूप शब्दाप्रमाणें वेळ शब्दाचें सामान्यरूप होऊन अनसार यांमधील आद्य अचा लोप झाला आहे.

**अनेक**—अनेकवचन, अनेकसत्ताक, अनेकवार.

**अन्यथा**—अन्यथाव्यय, अन्यथाभाव, अन्यथाज्ञान, अन्यथासिद्ध.

**अभिमुख**—दक्षिणाभिमुख, पूर्वाभिमुख, मरणाभिमुख, सेवाभिमुख.

**अवरोध**—प्राणावरोध, श्वासावरोध, मलावरोध.

**अर्थी**—धनार्थी, अन्नार्थी, विद्यार्थी, फलार्थी, यशोर्थी, लौकिकार्थी, मानार्थी, भोगार्थी, कीर्त्यर्थी.

**अर्ह+**—भक्षणार्ह, पूजार्ह, दंडार्ह, मानार्ह, दानार्ह, पूजनार्ह, विचारार्ह, स्वीकारार्ह.

**आक्रांत**—चिंताक्रांत. क्षुधाक्रांत, तृषाक्रांत, निद्राक्रान्त, भयाक्रांत, खेदाक्रांत, दुःखाक्रांत, क्रोधाक्रांत, लोभाक्रांत, मोहाक्रांत, व्यसनाक्रांत, पादाक्रांत.

**आतुर**—चिंतातुर, कामातुर, , अर्थातुर, क्षुधातुर, विषयातुर.

**आकुल**—भयाकुल, शोकाकुल, चिंताकुल, निद्राकुल.

**आकीर्ण**—जलाकीर्ण, मेघाकीर्ण, पुष्पाकीर्ण, तृणाकीर्ण.

**आप्लुत**—चिंताप्लुत, दुःखाप्लुत, मोहाप्लुत, हर्षाप्लुत.

**आपत्ति**—अर्थापत्ति, इष्टापत्ति, सुखापत्ति, अनर्थापत्ति.

**आपन्न**—दोषापन्न, खेदापन्न, सुखापन्न.

**आत्म**—आत्मस्तुति, आत्मनिंदा, आत्मप्रशंसा, आत्मघातकी, आत्मप्रतीति, आत्मनिवेद, आत्मसंयमन, आत्महत्या, आत्मसाक्षात्कार, आत्मज्ञान, आत्मानुभव, आत्माराम, आत्मार्पण, आत्महित, आत्मगत, आत्मबोध.

**आचार**—शिष्टाचार, पापाचार, पुण्याचार, कुलाचार.

**आवह**— हितावह, गुणावह, फलावह खेदावह, सुखावह.
**आनुकूल्य**— धर्मानुकूल्य, मतानुकूल्य, शक्त्यानुकूल्य, वित्तानुकूल्य.
**आयतन**— दोषायतन, गुणायतन, रोगायतन, सुखायतन.
**आर्त्त**— दुःखार्त्त शोकार्त्त, तृषार्त्त, क्षुधार्त्त, भयार्त्त.
**आरूढ**—योगारूढ, ध्यानारूढ, वैराग्यारूढ, ज्ञानारूढ.
**आरोप** — दोषारोप, गुणारोप, मिथ्यारोप, बजिारोप.
**आवेश** — क्रोधावेश, गर्वावेश कामावेश, वादावेश, विद्यावेश.
**आशय** — पुण्याशय पापाशय, सुखाशय, शद्वाशय.
**आशी** — अन्नाशी, मांसाशी, मिताशी.
**आस्पद** — दोषास्पद, निंदास्पद, लज्जास्पद, शंकास्पद, हास्यास्पद, पुण्यास्पद, पापास्पद, भयास्पद.
**आढ्य** — बलाढ्य, धनाढ्य, गुणाढ्य, गर्वाढ्य, विद्याढ्य.
**इषणा** — वित्तेषणा लोकेषणा, पुत्रेषणा.
**उत्तर** — लोकोत्तर, भोजनोत्तर, बलोत्तर, मर्यादोत्तर.
**उदार** — उदारयश, उदारमानस, उदारकृति, उदारचरित.
**उच्छेद** — वृत्त्युच्छेद, धैर्योच्छेद, अज्ञानोच्छेद, धर्मोच्छेद.
**उत्थ** — दाहोत्थ, पित्तोत्थ, धर्मोत्थ.
**उन्मुख** — अध्ययनोन्मुख, विजयोन्मुख, गमनोन्मुख, मरणोन्मुख.
**कर** — प्रभाकर, सुखकर, दुःखकर, प्रियकर, हितकर, श्रेयस्कर, दिनकर, दिवाकर.
**काम** — कामगति, कामभोगी, कामभाषी, सुराकाम, अध्ययनकाम, भोक्तुकाम.
**कामुक** — मोक्षकामुक, धनकामुक, उद्धारकामुक, विशयकामुक.
**कार** — चर्मकार, कर्मकार, ग्रंथकार, स्वाहाकार, स्वधाकार, श्रीकार, ॐकार, इ०
**कालीन** — समकालीन, पूर्वकालीन, गतकालीन, भूतकालीन, भविष्यकालीन, जन्मकालीन, विवाहकालीन.
**कृत** — कृतकार्य, कृतापराध, कृतावलंबन, कृताधिकार, कृतभोजन, कृतकृत्य.

**ग+**—खग, उरग, तुरग, तुरंग, विहग, विहंग, दुर्ग, अग, नग.

**गत** — गतश्री, गतवैभव, गताश्रय, गतलज्ज, गतायु, गतप्राण, गतधवा, संसारगत, कालगत, पापगत, मनोगत, श्रुतिगत, दृष्टिगत.

**गम+**—तुरंगम, विहंगम, दुर्गम, सुगम.

**गम्य** — प्रवासगम्य, विचारगम्य, कल्पनागम्य, बुद्धिगम्य.

**गर्भ** — गर्भसुखी, गर्भरोगी, गर्भपंगु, गर्भश्रीमान, [ म० गर्भश्रीमंत ].

**ग्रस्त** — भयग्रस्त, वादग्रस्त, दारिद्र्यग्रस्त, अज्ञानग्रस्त, चिंताग्रस्त, व्याधिग्रस्त.

**घात** — वासनाघात, आशाघात, विश्वासघात, प्राणघात, पक्षघात.

**घ्न+**—वातघ्न, कफघ्न, कृतघ्न,

**चर+**—रात्रिंचर, निशाचर, वनेचर, खेचर.

**चिंतक** — लाभचिंतक, ऐश्वर्यचिंतक, हितचिंतक.

**च्युत** — स्वर्गच्युत, धर्मच्युत, पदच्युत, अधिकारच्युत.

**छद्म** — छद्मसेवा, छद्मवेश, छद्मभक्ति.

**जात** — जातभय, जातकंप, जातधन, जाताधिकार, जातहर्ष, जातपक्ष, जाताभिमान, जातैश्वर्य, जातगर्व, शद्बजात, धनजात, अर्थजात, पाक्षिजात.

**जन्य** — पित्तजन्य, वातजन्य, क्रोधजन्य, अज्ञानजन्य, स्पर्शजन्य, रक्तजन्य,

**ज+**—अंडज, स्वेदज, जलज, सरसिज, पंकज, पित्तज, जारज, उद्भिज्ज, अनुज, पूर्वज, वारिज.

**जाल** —कर्मजाल, संसारजाल, प्रेमजाल, मायाजाल, वासनाजाल.

**जित** —जितकाम, जितेंद्रिय, जितक्रोध, जितस्वर्ग.

**जीवी** — वर्षजीवी, धनजीवी, कष्टजीवी.

टीप—कांहीं शद्बांत उपजीवी, असें येतें, जसें:—धान्योपजीवी, मांसोपजीवी, तृणोपजीवी.

**त्याग** — वासनात्याग, फलत्याग, कर्मत्याग, संसारत्याग, भवत्याग.

**दर्शी+**— सूक्ष्मदर्शी, दीर्घदर्शी, कालदर्शी.

**द+**— सुखद, दुःखद, मोक्षद, धनद, कामद, मानद, जलद.

**दायक** + —दुःखादायक, सुखदायक, आनंददायक, मंगलदायक.

**दायी** + —कल्याणदायी, मोक्षदायी, दुःखादायी.

**धर** +—महीधर, जलधर, पयोधर, छत्रधर शस्त्रधर, हलधर, गंगाधर.

**धार** + —सूत्रधार, कर्ण.

**धारक** + —आज्ञाधारक, सत्ताधारक.

**धारी** + —वेषधारी, दंडधारी, सत्ताधारी, रूपधारी.

**धर्म** + —राजधर्म, जातिधर्म, प्रजाधर्म, कुलधर्म, पुत्रधर्म.

**नाशक** + —कृमिनाशक, कफनाशक, विघ्ननाशक.

**निष्ठ**—कर्मनिष्ठ, योगनिष्ठ, आत्मनिष्ठ, राजनिष्ठ, सन्मार्गनिष्ठ, ब्रह्मनिष्ठ.

**पश्चात्**—पश्चात्ताप, पश्चद्बुद्धि,

**पर**+ —तत्पर, पुण्यपर, स्वार्थपर, भक्तिपर, धर्मपर.

**परायण**+—भक्तिपरायण, धर्मपरायण, स्वार्थपरायण.

**प्रवण**+ —विद्याप्रवण, ज्ञानप्रवण, धनप्रवण, परमार्थप्रवण.

**प्राप्त**+—प्राप्तश्री, प्राप्तधन, प्राप्तलौकिक, प्राप्ताधिकार, प्राप्तयौवन.

**बहिर**—बहिष्कृति, बहिःशुद्धि, बहिःस्थिति.

**बाह्य**—लोकबाह्य, धर्मबाह्य, जातिबाह्य.

**बुद्धि**—पापबुद्धि, पुण्यबुद्धि, धर्मबुद्धि.

**भाव**—भगवद्भाव, शुद्धभाव, व्याभिचारीभाव, स्थायीभाव, दृढभाव, स्त्रीभाव, बालभाव, परकीयभाव, मित्रभाव, शत्रुभाव, बंधुभाव, जन्यजनकभाव, अंगांगीभाव, सेव्यसेवकभाव, बिंबप्रतिबिंबभाव, कार्यकारणभाव.

**भूत**—विषयभूत, अंगभूत, निमित्तभूत, सारभूत, प्रमाणभूत.

**भेद**—बुद्धिभेद, पाठभेद, अर्थभेद.

**मर्यादा**—शिष्टमर्यादा, जनमर्यादा, धर्ममर्यादा, नीतिमर्यादा, आयुर्मर्यादा.

**मात्र**—पलमात्र, क्षणमात्र, तिलमात्र, लवमात्र, लेशमात्र.

**रहित**—ज्ञानरहित, भावरहित, प्रेमरहित.

**रूप**—सुखरूप, मनोरूप, वायुरूप, अग्निरूप, मायारूप.

**लब्ध**—लब्धकाम, लब्धमान, लब्धप्रतिष्ठित.

**शत्रु**—ज्ञानशत्रु, आत्मशत्रु, अक्षरशत्रु, हितशत्रु.

**शील**—धर्मशील, सहनशील, पुण्यशील, दानशील, सत्कर्मशील, स्नान-संध्याशील, अध्ययनशील.

**शाली+**—यशःशाली, प्रतापशाली, दैवशाली, भाग्यशाली, वैराग्यशाली.

**शून्य**—ज्ञानशून्य, द्रव्यशून्य, अर्थशून्य.

**शूर**—कर्मशूर, दानशूर, वादशूर, रणशूर. आरंभशूर

**शोधी**—ज्ञानशोधी, सूक्ष्मशोधी, सत्यशोधी. तत्त्वशोधी.

**साध्य**—द्रव्यसाध्य, कष्टसाध्य, यत्नसाध्य.

**स्थ+**—मार्गस्थ, ध्यानस्थ. गर्भस्थ, हृदयस्थ, जन्मस्थ, पात्रस्थ.

**हत**—हतदैव, हतभाग्य, हतवीर्य, हताश.

**हर**—पापहर, रोगहर, दुःखहर, पश्यतोहर.

**हर्ता**—[ हारक+—हारी+ ]—दुःखहर्ता, दोषहर्ता, कफहारक, वातहारक, दुःखहारक, श्रमहारी, तापहारी.

**हीन**—हीनबुद्धि, हीनदैव, हीनप्रभ, धनहीन, विद्याहीन, ज्ञानहीन, मतिहीन

**ज्ञ**—मर्मज्ञ, शास्त्रज्ञ, सर्वज्ञ, मंत्रज्ञ, तज्ज्ञ.

टीप—कांहीं उपसर्गांचेपुढेही ज्ञ येतो. जसें:—अज्ञ, प्राज्ञ, अभिज्ञ, सुज्ञ.

टीप—वरील यादीमध्यें ज्यांचे पुढें अधिक चिह्न (+) केलें आहे ते स्वतंत्रपणें उपयोगांत नाहींत. त्यांचा उपयोग बहुधा प्रत्ययांप्रमाणेंच होतो. बाकीचे स्वतंत्रपणें येतात, तरी त्यांचा सामासिक शब्दांत विशेष उपयोग होतो, म्हणून त्यांचा वरील यादींत अन्तर्भाव केला आहे.

---

# अध्याय ४.

## प्रत्ययघटित साधित शब्द—पुढें चालू.

४०१. जे तत्सम संस्कृत शब्द मराठींत आहेत, त्यांपैकीं प्रत्ययघटित शब्द गेल्या अध्यायांत सांगितले आतां तद्भव किंवा देशज असे जे मराठींत शब्द आहेत म्हणजे ज्यांस निवळ मराठी असें म्हणण्यास हरकत नाहीं, त्यांमधील प्रत्ययघटित साधित शब्दांचा विचार करावयाचा आहे. मागल्या अध्यायांतल्या प्रमाणें येथेंही मराठी कृदन्तें म्हणजे धातुसाधितें आणि तद्धितें किंवा ज्यांस दादोबा शब्दसाधितें असें म्हणतात तीं असे दोन प्रकार आहेत. तेव्हां येथेंही प्रथम कृदन्तें सांगून नंतर तद्धितांकडे वळूं

# निवळ मराठी कृदन्तें.

अथवा

## धातुसाधितें.

अ—हा प्रत्यय आकारान्त धातूंस पररूपसंधीनें लागून क्रियावाचक नामें साधतात. उदा०— कर नाहीं त्यास डर कशास पाहिजे, त्याची सारखी आदळ आपट चालली आहे, ही रड कधीं संपणार कोण जाणे, ह्याला तोड काय? इ०. या उदाहरणांत कर, डर, आदळ, आपट, रड, तोड, हीं क्रियावाचक नामें आहेत हें उघड आहे. ह्याप्रमाणें मार, बोल, धांव, पळ, उकड, मोड, बस, जम, उरक, भर, जोड, मोड, ओढ, इ०,

(अ) असें क्रियावाचक नाम साधतांना मूळ धातूंतील उपान्त्य इ व उ हे दीर्घ होतात. जसें :— फुट—फूट, लुट—लूट, भुल—भूल, झिज—झीज, विण—वीण, रिघ—रीघ, उर—ऊर, उब—ऊब, डुल—डूल, (लहान मुलांचे कानांतील दागिना), पिक—पीक, पिळ—पीळ, चिर—चीर.

(आ) कांहीं ठिकाणीं उपान्त्य ऱ्हस्व इ ला व उ ला गुण झालेला आढळतो. जसें :— मिळ—मेळ, फिर—फेर, खुट—खोट, (खुटणें यापासून खूट असेंही नाम होतें) जुड—जोड, डुल—डोल, झुक—झोक.

(इ) कांहीं ठिकाणीं अर्थामध्यें थोडा फरक होतो, आणि मूळ धातूच्या क्रियेचें कार्य असा होतो. जसें:—फूट—फुटून निघालेलें, लूट =लुटून आणलेलें, झीज=झिजून गेलेलें, इ०.

(ई) हा प्रत्यय लागून मूळ धातूंपासून कांहीं विशेषणेंही होतात. जसें:—उघड गोष्टीस खुलासा कशास पाहिजे, हा गोष्ट उघड आहे. इ० या ठिकाणीं उघड हें विशेषण आहे हें स्पष्ट आहे. तसेंच 'मोड विळा,' 'मोड सुरी,' या शब्दांत 'मोड' म्हणजे मोडणारी हें उघडच आहे. असेंच भरड म्हणजे जाड, किंवा बारीक न दळलेलें, असा अर्थ होतो: उदा० —भरड पीठ, वस्त्र—गाळ (गाळलेलें) पाय—घोळ (पायांपर्यंत घोळणारें), व पीक (झाडावर पिकलेलें).

(उ) कांहीं ठिकाणीं धातूंतील उपान्त्य अची वृद्धि होते. जसें :— उतर—उतार, बिघड—बिघाड, पड—पाड, खच—खाच.

( ऊ ) बीमोड, हिरमोड, घरफोड, कपाळफोड इ० ठिकाणीं मोड, फोड, हे शद्ब क्रियेचा भाव दाखवितात.

**आ**—कांहीं धातूंस हा प्रत्यय लागून नामें होतात. हा प्रत्यय अनेकार्थी लागतो.

[ अ ] मूळ धातु जी क्रिया दाखवितो त्याच क्रियेच्या अर्थी, म्हणजे त्या धातूस हा प्रत्यय लागून क्रियावाचक नाम होतें. जसें:—

वेढ—वेढा, झगड—झगडा, घेर—घेरा, घसर—घसरा, पुकार—पुकारा, पस्ताव—पस्तावा, उलगड—उलगडा, निवड—निवाडा, घोंटाळ—घोंटाळा, मुटक—मुटका.

[ आ ] कांहीं ठिकाणीं या आकारान्त कृदन्त नामांनीं मूळ क्रियेचें कार्य दाखविलें जातें.

जसें:—ठेवा [ ठेवलेला तो ], ठेंचा [ ठेंचून केलेला ], भरडा [ भरडून केलेला तो ], भरणा [ भरलेला पैसा ], रमणा [ रमलेला समूह ], कातरा [ कातरून निघालेला भाग किं० चुरा ], इ०.

[ इ ] कांहीं ठिकाणीं मूळधातूची क्रिया एकवार घडली असें या आकारान्त कृदन्त नामापासून समजतें. जसें:—ठोका [ एकवेळ ठोकणें ], चावा, हिसका, मुरका, उजळा, भुरका, कवळा, गचका, ठसका, हेलकावा.

[ ई ] कांहीं ठिकाणीं हा आ प्रत्यय कर्तृवाचक आढळतो. जसें:—ओढ [ ओढणारा तो ], झरा [ झरणारा तो ].

( उ ) या प्रत्ययानें अकर्मक क्रियापदापासून कांहीं विशेषणें साधतात. जसें:—लंगडा ( लंगडणारा ), नाचा ( नाचणारा ), सुटा ( सुटलेला, मोकळा. जसें:—सुटा पैसा ), उघडा ( न मिटलेला, खुला, मोकळा, किंवा अनाथ, रक्षणहीन. जसें:—आईबाप मेल्यानें हीं मुलें अगदीं उघडीं पडलीं आहेत. ). अशीच आणखी उदा० हरणें:—उलथा, पिका, सुका, किंवा सुखा, उलटा, सुलटा, अर्धजेवा, आंगराखा—अंगरखा, पायगोवा, इ०. या शद्बामध्यें जेवा, राखा, गोवा, ही कृदन्त विशेषणेंच होत. नवशिका यामध्यें शिका म्हणजे शिकणारा हें उघड आहे. तसेंच नाकतोडा, लोणकढें, घरबशा, या

शब्दांतील तोडा, कढा, बशा, हीं आकारान्त कृदन्त विशेषणें आहेत. यांपैकीं कांहीं विशेषणांमध्यें आ चे जागीं या असा आदेश झालेला विकल्पानें आढळतो. म्हणजे वरील कांहीं विशेषणांची नाच्या, खेळ्या, शिक्या, भटक्या, अशीहीं रूपें आढळतात.

[ ऊ ] धू धातूस हा प्रत्यय लागून धुआ किंवा धुवा अशीं दोन विशेषणें होतात. धुआ, किंवा धुवा म्हणजे धुतलेला, शुद्ध. उदा०—धुवा साखर. धुवाधार [ धबधबा. ]. या ठिकाणीं धुवा हें आकारान्त विशेषण अविकृत राहिलें आहे.

[ ऋ ] ज्यावर क्रिया घडते किंवा घडली त्याचे अर्थीं:—चार—चारा, चोंद—चोंदा.

[ ऌ ] हा प्रत्यय लागण्यापूर्वीं कांहीं धातूंचे उपान्त्यास गुण होतो. जसें:—तुट—तोटा, मिळ—मेळा, फिर—फेरा, पिळ—पेळा, जुड—जोडा, झुल—झोला, झुक—झोका, डुल—डोला.

[ ए ] ह्या प्रत्ययाचे पूर्वीं कांहीं धातूंचे उपान्त्य अ ची वृद्धि होते. जसें:— पसर – पसारा, रगड – रगाडा, [ ह्याचें रगडा असेंही रूप होतें. जसें:—रामरगाडा अ. रामरगडा ], उतर—उतारा [ अमली पदार्थाचा किंवा विषाचा परिणाम उतरणारा म्हणजे हटविणारा उपाय, अवतरण ], उकड – उकाडा, उमळ—उमाळा, फुग – फुगारा, ओंबकळ – ओंबकाळा किंवा ओंबकळा, ओरबड – ओरबडा किं० ओरबाडा, ओरखाड—ओरखडा किं० ओरखाडा.

**आई**—हा प्रत्यय कांहीं धातूंस लागून त्यांपासून स्त्रींलिंगी नामें होतात. त्यांचा अर्थ मूळधातुदर्शक क्रिया करण्याची मजुरी असा असतो. जसें:—घडाई [ घडण्याची मजुरी ], खोदाई [ खोदण्याची मजुरी ], चराई ( गुरें चरण्याची किंमत ), उजळाई [ उजळण्याची मजुरी ], मुंडाई [ मुंडण्याची मजुरी ].

**टीप**—हीं आई प्रत्ययान्त कृदन्त नामें मूळचीं हिंदी भाषेतील आहेत; व त्या भाषेतूनच तीं मराठींत आलीं आहेत. ही गोष्ट पुढील उदाहरणांवरून स्पष्ट होईल. धुलाई, शिलाई, लिखाई म्हणजे धुण्याची, शिवण्याची, व लिहिण्याची मजुरी, हे शब्द धुल, शिल, लिख, ह्या धातूंस आई प्रत्यय लागून साधले

आहेत, हें उघड आहे. परंतु हे मूळ धातू मराठींत प्रचारांत नसून हिंदींत आहेत; व त्यांपासून साधलेलीं धुलाई, शिलाई, व लिखाइ, हीं नामेंही हिंदींत प्रचारांत आहेत. या अर्थाचा मराठी प्रत्यय ' णावळ ' हा होय. तो लागून धुणावळ, शिवणावळ अशीं शुद्ध मराठी नामें होतात.

( आ ) हा आई प्रत्यय लागून झालेलीं कांहीं क्रियावाचक नामेंहीं मराठींत आहेत. जसें:—चढाई ( चढून म्हणजे चाल करून जाण्याची क्रिया ), लढाई ( लढण्याची क्रिया ), कमाई ( कमाना म्हणजे मिळविणें या हिंदींतील धातूपासून हा शब्द झाला आहे. मूळ अर्थ मिळविण्याची क्रिया, पण नंतर त्याचा अर्थ मिळकत असा झाला आहे. ) बढाई [ हा शब्दही बढना या हिंदी धातूपासूनच झाला आहे. त्याचा अर्थ बढण्याची म्हणजे वाढण्याची क्रिया किंवा भाव, म्हणजेच शेखी, ऐट असा आहे. ]

[ आ ] उतराई हा शब्द स्मरणीय आहे. उतरण्याची मजुरी असा ह्याचा एक अर्थ आहेच, व तो आई प्रत्ययाच्या मूळ अर्थाप्रमाणें आहे. परंतु आभारमुक्त म्हणजे दुसऱ्याच्या उपकारांतून सुटणें म्हणजे त्याची फेड करणें हा एक उतराई शब्दाचा अर्थ प्रचलित आहे. या अर्थी उतराई शब्द विशेषण आहे, व तो [ उतर + आई ] असाच साधलेला आहे. धातूस आई प्रत्यय लागून झालेलें दुसरें विशेषण मराठींत आढळत नाहीं.

**आऊ**—कांहीं धातूंस हा प्रत्यय लागून त्या त्या क्रियांस योग्य या अर्थी कांहीं विशेषणें होतात. जसें:—टाकाऊ ( टाकण्यास योग्य ), पाळाऊ ( पाळण्यास योग्य ), लढाऊ (. लढण्यास योग्य म्हणजे लढण्याचे कामीं उपयोगी ), जळाऊ [ जळण्यास योग्य म्हणजे जाळण्याचे कामाचें ], विकाऊ [ विकण्यास योग्य, विकावयास काढलेलें ], दिखाऊ—देखाऊ [ देखण्यास म्हणजे पाहण्यास योग्य, सुंदर, भपकेदार, अखेरीस वरून चांगला पण आंतून वाईट, निरुपयोगी, असा अर्थ झाला. ] धकाऊ, ओताऊ, शिकाऊ, विणाऊ, चलाऊ, इ०. मिळाऊ, हा शब्द मनमिळाऊ ह्या सामासिक शब्दांत आढळतो. मिळाऊ ह्याचा स्वतंत्रपणें फारसा उपयोग होत नाहीं.

**आट**—द्विरुक्ति धातूंस हा प्रत्यय लागून मूळ क्रियेचा भाव दाखविणारीं पुल्लिंगी भाववाचक नामें साधतात. जसें:—कलकलाट, गडगडाट, चकचकाट, लखलखाट, चिकचिकाट, सुळसुळाट, ठणठणाट, खडखडाट, घमघमाट, खळखळाट, भगभराट (स्त्री०), इ०

[अ] गोंगाट हा शब्दही असाच गोंगणें ह्या धातूस आट प्रत्यय लागून झाला आहे. तथापि यामध्यें धातूची द्विरुक्ति नाहीं.

[आ] चिपाट हा शब्द चेप धातूस आट प्रत्यय लागून झालेलाच आहे. परंतु हा धातु व वरील उदाहरणांतील धातू यांत फरक असून चिपाट कृदन्ताचा अर्थही निराळा आहे. चिपाट म्हणजे चेंपून म्हणजे पिळून गेलेलें उंसाचें कांडें; यावरून अगदीं सुकून गेलेला, किंवा आंवळलेला, असा अर्थ होतो.

**आड**—यानें कृदन्त विशेषणें होतात. जसें:—नास—नासाड, भी—भ्याड, खा—खादाड, [खा धातूचे जागीं खाद असें झालेलें अन्यत्रही आढळतात. जसें:—खादिला].

**आडा, डी**—हा प्रत्यय लागून कांहीं धातूंपासून भाववाचक नामें साधतात. उदा०—नास—नासाडा—डी, चुर—चुराडा, इ०

**आडी, डू**—खेळ या धातूस हा प्रत्यय लागून खेळाडू किंवा खिलाडू खिलाडी, असे शब्द होतात. खेळाडू म्हणजे खेळणारा, खेळाकडे लक्ष असणारा; आणि खिलाडू, खिलाडी, म्हणजे खेळांत प्रवीण असा अर्थ आहे.

**आंडी**—झुकांडी, चिळकांडी.

**आणा**—[हा प्रत्यय दाणा या शब्दाचा शेष दिसतो]. फुटाणा [फुटलेला दाणा.]

**आणूं**—हा प्रत्यय पररूप संधीनें लागून एकदोन कर्तृत्ववाचक नामें झालीं आहेत. उठाणूं [मूळअर्थ उठणारें ते. एका प्रकारचा गांठीचा फोड, गळूं] जिवाणूं [मूळ अर्थ—जिवंत असणारें नंतर एका प्रकारचा जीव, सरपटणारा प्राणी, जनावर, साप असा, अर्थ झाला. जिवाणूं हा शब्द जिवणें ह्या धातूपासून झाला आहे, पण हा धातु प्रचारांत नसून त्याचे जागीं जिणें असा धातु

प्रचारांत आहे. जीव या नामापासून जिवाणूं हा शब्द झाला असें म्हटल्यास त्याचा तद्धित शब्दांत अंतर्भाव केला पाहिजे ].

**आफ**—मिलाफ [ मिलाप हा मूळ हिंदी शब्द मिल धातूस आप प्रत्यय लागून झालेला आहे. त्याजपासून मराठी मिलाफ झाला आहे. ]

**आर**—चुकार, लुटार हीं आर प्रत्ययान्त कृदन्तें विशेषणें आहेत. चुकार–चुकणारा, टाळणारा; लुटार–रू–लुटणारा, लुटण्याचा स्वभाव आहे ज्याचा.

**आरा**—ह्या प्रत्ययानें कांहीं धातूंपासून क्रियावाचक नामें होतात जसें:— उब–उबारा; ओक–ओकारा; बांध–बांधारा, बंधारा; फुग–फुगारा; भबक–भबकारा.

**आरी**—कांहीं धातूंपासून या प्रत्ययानें, ती क्रिया करणारा, या अर्थी म्हणजे कर्तृत्वाचक नामें तयार होतात. जसें:—पुजारी [ पुजणारा ], ओतारी [ धातूंचा रस ओतणारा ], पिंजारी [ पिंजणारा ], मापारी [ मापणारा ], लुटारी [ लुटणारा, लुटारी याचे जागीं लुटारू हें रूप विशेष प्रचारांत आहे ]

[ अ ] रंगारी हा शब्दही रंग+आरी असाच झाला आहे. पण त्याचा अर्थ रंगणारा असा नसून रंगविणारा असा प्रयोजक कर्तृवाचक आहे ].

[ आ ] ओकारी शब्दही ओक धातूस आरी प्रत्यय लागून झाला आहे. पण येथें आरी प्रत्यय कर्त्रर्थी नसून भावार्थी आहे. ओकारी म्हणजे ओकणारा नव्हे, तर ओकण्याचा भाव, ओकण्याची क्रिया, किंवा जें ओकलेलें तें, असे अर्थ होतात.

**आव**—हा प्रत्यय अनेक अर्थांनीं लागून पुल्लिंगी कृदन्त नामें बनतात.

[ अ ] क्रियेचें स्थान किंवा साधन. जसें:—चढाव [ चढण्याचें स्थान म्हणजे उंच उंच होत जाणारी जागा, चढ; किंवा चढण्याचें साधन, जिना ] रिघाव [ रिघण्यास अवकाश, जागा; किंवा रिघणें, म्हणजे प्रवेश असा क्रियावाचकही अर्थ होतो. ]

[ आ ] मूळ क्रिया. जसें:—पाडाव [ पाडणें, पराभव ] छिटकाव किंवा छिडकाव किंवा शिडकाव [ म्हणजे छिटकण्याची क्रिया ], भराव

[ भरण्याची क्रिया किंवा भरण्याचे साधन, माती ], टिकाव [ टिकण्याची क्रिया ], शिरकाव [ शिरकण्याची क्रिया, प्रवेश ], याप्रमाणें फैलाव, धजाव, अडकाव.

[ इ ] कांहीं अकर्मक धातूंपासून या प्रत्ययानें भूतकालवाचक नामें साधतात. जसें:— जमाव [ जमलेला लोक समूह ], जडाव [ जडलेला किंवा जडवून केलेला पदार्थ, दागिना; किंवा जडण्याची क्रिया ], उठाव [ उठलेला म्हणजे वर आलेला भाग; किंवा उठण्याची क्रिया ], ठराव [ ठरलेली सूचना ].

[ ई ] बटाव ह्या शब्दांतील आव हा प्रत्यय आई किंवा णावळ ह्या प्रत्ययासारखा आहे; म्हणजे त्याचा अर्थ क्रियेची मजुरी असा आहे. बटाव ह्मणजे बटण्याची मजुरी किंवा किंमत. बट धातु आणि बटाव हा शब्द हे दोन्ही हिंदी दिसतात. बटाव ह्यांचें बटावा असेंहि रूप आढळतें.

[ उ ] सराव—ह्मणजे सवय. हा सराव शब्द स्राव ह्या संकृत शब्दापासून आला आहे असें मोल्स्वर्थच्या कोशांत दिलें आहे. परंतु तो सर ह्या धातूपासून आव प्रत्यय लागूनही बनण्याचा संभव आहे. तसें असल्यास त्याचा मूळ अर्थ सरण्याची क्रिया, नंतर अडथळ्याचा अभाव, नंतर सुलभता, शेवटीं सवय, असा अर्थ आला असावा.

**आवट**—बन— बनावट [ कृत्रिम ]

**आवा**—या प्रत्ययानें कांहीं धातूपासून कालवाचक नामें बनतात. जसें:— काढावा [ काढलेला भाग ], बोलावा [ बोललेला अर्थ, वार्ता— ह्या शब्दाचें विशेष प्रचारांतील रूप बोलवा असें आहे ], देखावा [ देखलेली, पाहिलेली गोष्ट, किंवा पाहाण्यास योग्य प्रेक्षणीय वस्तु ].

टीप—वाढावा व देखावा ह्याही शब्दांचीं वाढवा व देखवा अशींच रूपें कधीं कधीं आढळतात. परंतु ता आ—उपान्त्ययुक्त रूपांइतकीं प्रचारांत नाहींत.

[ अ ] मेळावा [ मेळा ] हा शब्द असाच साधला आहे. पण तो जुना आहे. ज्ञानेश्वरी [ ३. २०८ ]

[ आ ] पुरावा [ पुरें करणारा म्हणजे समर्थन करणारा मुद्दा ] हा शब्द कर्तृवाचक दिसतो.

[ इ ] तणावा हा ताण धातूपासून ताचे जागीं त होऊन आवा प्रत्यय लागून झाला आहे आणि तो भाववाचक आहे.

**आवा–वी–वें**––हें कृदन्त विशेषण असून लिंगवचनाप्रमाणें बदलतें आणि तें सर्व धातूंपासून साधतें. वाख्याताच्या तृतीय पुरुषाचें एक वचनाचें रूप आणि हें एकाच रीतीनें साधतात, व दिसण्यांत दोन्ही एकच आहेत. जसें:––करावा–वी वें, जावा–वी वें, धरावा–वी–वें इ०. या कृदन्तापासूनच करावयास, करावयाला, करावयाचा, करावया, कराया, हीं रूपें कशीं साधतात हें संयुक्त क्रियापदांचें विवेचनांत तदन्तर्भूत कृदन्तांचें जें स्पष्टीकरण आहे त्यांत येणार आहे. ते तेथें पहावें.

**आळ** –– या प्रत्ययानें क्रियेची संवय किंवा अतिशयार्थ दाखविणारी विशेषणें साधतात जसें:––ओढाळ [ ओढण्याची संवय आहे ज्याला ], खाजाळ [ खाजण्याचा स्वभाव आहे ज्याचा किंवा अति खाज आहे ज्याला ], भांडाळ.

**आळा**–– चोखाळा ( चोखून खाणारा, नाजुक खाणारा ).

**आळी** –– यानें क्रियावाचक नाम होतें. जसें:–– डरक–डरकाळी

**आळू**–– वर जो आल प्रत्यय दिला त्याचेंच अधिक प्रचारांतील रूप आळू हें होय. जसें:–– लाजाळू [ लाजण्याचा स्वभाव आहे ज्याचा], झोंपाळू, निजाळू, खाजाळू, सोसाळू, विसराळू.

**आळें** –– [ सं. आलय ] ह्यानें क्रियेचें साधन दाखविलें जातें. जसें:–– ओगराळें [ ओरडगें म्हणजे वाढणें या क्रियेचें साधन, एका विशेष प्रकारचें भांडें.]

**आं**–– हा प्रत्यय अनुकरणवाचक धातूंस लागून क्रियाविशेषणें होतात. जसें:–– कडकडां, खदखदां, धडाडां, ढळढळां, करकरां, चरचरां, घटघटां, पटपटां, घळघळां, इ०.

**ई**–– हा प्रत्यय बऱ्याच आकारान्त धातूंस पररूप संधीनें लागून ईकारान्त स्त्रीलिंगी नामें होतात. हा प्रत्यय अनेक अर्थीं लागतो.

[ अ ] मूळधातूच्या क्रियेचा अर्थ. उदा०—उडी [ उडण्याची क्रिया ] चोरी [ चोरण्याची क्रिया ], बुडी [ बुडण्याची क्रिया ], ओहटी [ ओहटण्याची क्रिया ], किंकाळीं, रडी, बोली [ बोलण्याची क्रिया ], भाषण, भाषा, ], खाई [ येथें संधि झाला नाहीं, व अतिशयार्थ आहे. खाई म्हणजे अतिशय खाण्याची क्रिया. ], उलटी, उकळी, उचली.

[ आ ] कर्मवाचक. जसें:— थुंकी [ जें थुंकलेलें तें ], हांतरी [ हांतरावयाची ती, ], [ वाट ]—खर्चीं [ खर्चावयाची रकम ],

[ इ ] साधनवाचक. जसें:– थापी [ थापावयाचें साधन ], कातरी [ कातरण्याचें साधन ], खुरपी [ खुरपण्याचें साधन ], कढई.

[ ई ] कर्तृवाचक. जसें:–गु–राखी [ गुरें राखणारा. येथें गु हें गो ह्या संस्कृत शब्दाचें रूपांतर होय असें म्हणावें किंवा गुरें+राखी या ठिकाणीं रेंच्या पुढें रकार आल्यामुळें रें ह्या अक्षराचा लोप झाला आहे असें म्हटलें तरीही चालेल. तथापि पहिलाच पक्ष बरा होय. ].

[ उ ] भूतकालवाचक नामें. जसें:—सांगी [ सांगितलेली गोष्ट, सूचना ] तुटी [ तुटलेली वस्तु, तूट–तुटी हा शब्द कवितेंत येतो ], कढी [ कढलेली ती ], पोळी [ पोळलेली ती, ] चुणी.

[ ऊ ] ई हा प्रत्यय लागून कांहीं कृदन्त विशेषणेंही बनतात. जसें छापी [ छापलेलें ], लेखी [ लिहिलेलें ], मोडी [ मोडलेलें–मोडून लिहिलेलें ].

[ ऋ ] ह्या ई प्रत्ययाचे पूर्वीं कधीं कधीं उपान्त्य अची वृद्धि होते. जसें:— उघड–उघाडी, उतर–उतारी.

[ ऌ ] कधीं कधीं ह्या प्रत्ययापूर्वी उपान्त्य इ व उ ह्यांस गुण होतो. जसें —फिर–फेरी. डुल–डोली–ळी, झुल–झोळी.

**ईक**—हा प्रत्यय पररूप संधीनें लागून कांहीं विशेषणें होतात.

[ अ ] कर्तृवाचक जसें—खर्चीक [ खर्च करणारा ], सोशीक [ सोसणारा, ], त्राशीक [ त्रासणारा ]. शेवटच्या दोन उदाहरणांत मूळ अन्त्य स्‌चा श्‌ झाला आहे. आणि सर्व उदाहरणांमध्यें अधिक्यार्थ आहे, हें उघड आहे.

(आ) पूर्णक्रियावाक जसें:—सडीक (सडलेले), पढीक (पढलेला).

(इ) तिडणें ह्या धातूपासून ईक प्रत्यय लागून तिडीक हें नाम झालें आहे. त्याचप्रकारचें होईक हें हो धातूपासून संधि न होतां ईक प्रत्यय लागून झालेलें नाम किंवा विशेषण होय. होईल म्हणजे भावी, होणारें; हा शब्द जुन्या कवितेंत आढळतो.

**ईत**—ह्या प्रत्ययानें कांहीं कृदन्त विशेषणें होतात. संधि—पररूप होतो.

(अ) अपूर्णक्रियाद्योतक. जसः—लखलखीत (लखलखणारें), थबथबीत (थबथबणारें), भुसभुशीत, चकचकीत, खरखरीत, खणखणीत, झणझणीत, इ०. द्विरुक्त व अनुकरणवाचक धातूंपासून अशा प्रकारचीं ईत प्रत्ययान्त विशेषणें होतात.

(आ) पूर्णक्रियावाचक. उदा०—विसकळीत (विसकळलेलें), पडीत (पडलेली—जमीन), वाहीत (वाहलेली—हाकलेली—जमीन), बुडीत (बुडालेला, अनुत्पादक—खर्च).

टीप—'पडीत घर' या ठिकाणीं पडीत म्हणजे पडलेल असा अर्थ नसून पडणारें म्हणजे पडूं लागलेलें असा अर्थ आहे.

(इ) याच प्रत्ययानें झालेले भाकीत आणि भरीत हे शब्द आहेत. हे शब्द नामें आहेत. भाकीत म्हणजे भाकलेलें, पुढलें आधीं सांगितलेलें, भविष्य. आणि भरीत म्हणजे भरलेलें—तिखट, मीठ इत्यादिकांनीं भरलेलें. जसें:—वांग्याचें किंवा भोंपळयाचें भरीत. याप्रमाणेंच लिखित (लिहिलेलें—पत्र) आणि वाळीत (वाळलेला म्हणजे टाकलेला, बहिष्कृत. वाळीत ह्याचा भाववाचकाप्रमाणें उपयोग होतो. तेव्हां त्याचा अर्थ बहिष्कार असा असतो.)

**ईर**—हा प्रत्यय लागून पररूपसंधीनें पूर्ण क्रियाद्योतक कांहीं विशेषणें होतात. जसें:—फुगीर (फुगलेला), फुटीर फुटलेला किंवा फुटण्यास योग्य).

टीप—ईर ह्या प्रत्ययापासूनच इरडा हा प्रत्यय झालेला दिसतो. मुत + इरडा = मुतिरडा (मुतलेला) ह्या प्रमाणेंच हगिरडा. या दोन्ही ठिकाणीं पररूप संधि झाला आहे. परंतु घाणेरडा ह्या शब्दांत (अ + इ = ए) असा नियमानुसार संधि झालेला दिसतो.

**ईल**—ह्या प्रत्ययानें पूर्णक्रियाद्योतक कांहीं विशेषणें होतात. जसें— छापील ( छापलेला ); सडील-सडेल ( सडलेला, कुजलेला ), रंगील— रंगेल [ रंगलेला किंवा रंगण्याचा म्हणजे आनंद करण्याचा स्वभाव आहे ज्याचा ], डागील—डागेल [ डाग लागलेला ], ह्याचप्रमाणें डंखील—डंखेल; अडील—अडेल [ या ठिकाणीं अडणारा असा अर्थ आहे ].

[ अ ] या प्रत्ययानें साधललीं कांहीं नामेंहीं आढळतात. जसें:— आंबील, ओढील—ळ, वाहील.

टीप—अ + ईल ह्यांचा पररूप संधि सर्वत्र आढळतो. परंतु कांहीं ठिकाणीं नियमाप्रमाणें ए असाही संधि विकल्पानें होतो हें वरील उदाहरणांवरून कळेलच.

**ईव**—हा प्रत्यय पररूपसंधीनें लागून कांहीं कृदन्त विशेषणें होतात. या विशेषणांनीं मूळ क्रियेची पूर्णता किंवा योग्यता दाखविण्यांत येते. जसें:—सोलींव ( सोललेलें किंवा सोलाया जोगें ), कोरींव ( कोरलेलें किंवा कोरण्याजोगें ); आणखी उदाहरणें:—घडींव, घोंटीव, ओतींव, आटींव, रेखींव, भरींव, पाळींव, पेरींव, भरडींव, मढींव, इ०.

( अ ) जाणीव, नेणींव हे शब्द असेच जाण, व नेण ह्या धातूंपासून प्रकृत प्रत्ययानें साधलेले असून नामें आहेत; पण त्यांमधील उपान्त्य अक्षरावरील बिंदु उडाला आहे. जाणीव—जाणण्याची शक्ति; नेणीव जाणिवेचा अभाव; हे शब्द जुन्या कवितेंत आढळतात.

ज्ञान म्हणों तरी नाहीं जाणिव । अज्ञान म्हणों तरी नाहीं नेणिव॥
अभाव म्हणों तरी ठेय । नवल आनंदाची ॥ विवेकसिंधु.

**ईस**—कासाव—कासाविस ( घाबरा ). कासाव हा धातु मात्र फारसा प्रचारांत नाहीं.

**ऊ**—हा प्रत्यय पररूप संधीनें लागून कांहीं नामें व विशेषणें होतात. त्यांचे अर्थ पुढें दिल्याप्रमाणें:—

( अ ) क्रियेचा कर्ता. उदा०—मारू [ मारणारा, वेधणारा, मन हरण करणारा, चटकदार ], लागू [ लागणारा ], चालू ( चालणारा ), झाडू ( झाडणारा—मनुष्य, भंगी; किंवा खराटा, केरसुणी ), उतारू ( उतरणारा,—आगगाडी, आगबोट वगैरे वाहनांतून उतरणारा,

म्हणजेच त्यांचे द्वारा प्रवास करणारा ), असेच भिडू, चाटू, घाटू, वगैरे शब्द समजावे.

( आ ) क्रियेस योग्य, किंवा क्रियेचें कर्म. जसें:—खाऊ [ खाण्यास योग्य किंवा जें खावयाचें तें, असा मूळ अर्थ; नंतर चैनीने किंवा मजेनें खाण्याचा पदार्थ ]; गाऊ ( नान्ह्या मुलास निजवितांना पाळणा हालवितांना जे गाणें गातात तो—दादोबा )

( इ ) असलीं ऊ प्रत्ययान्त कृदन्तें मराठी समासांतीं बरींच आढळतात. जसें:—पोटभरू, मारखाऊ, खेंटरखाऊ गळेकापू, खिसेकापू, खिसेकातरू, माथेफिरू, गरजकाढू, इ०. ‘ क्वचित् या ऊकारान्त धातु साधितांस पुढें आणखी विनोदार्थ बा, जी, हे आदरार्थी शब्द जोडून धातुसाधित नामें करितात; जसें:—देऊबा, घेऊबा, घेऊजी, देऊजी इ० ’ —दादोबा.

ऊत—समज—समजूत.

ऊं—हा प्रत्यय लागून सर्व धातूंपासून बहुधा उपक्रमवाचक किंवा दादोबा म्हणतात त्याप्रमाणें निमित्तवाचक कृदन्त अव्ययें तयार होतात. ह्यांचा संयुक्त क्रियापदें बनविण्यांत कोठें उपयोग होतो तें संयुक्त क्रियापदाचे अध्यायांत पहावें.

टीप—ऊआख्याताचें प्र० पु० ए० व० व हें कृदन्त दिसण्यांत एक; तरी दोहोंची व्युत्पत्ति भिन्न आहे. ऊआख्याताचे प्रत्यक्ष संस्कृत लोट च्या प्रत्ययांपासून निघाले आहेत; आणि ऊं हा कृदन्त प्रत्यय संस्कृत तुम् या प्रत्यया पासून निघाला आहे. जसें:—कर्तुं—करदुं—करूं, इसितुं—इसेउं—हसूं इ०.

( अ ) ऊं कृदन्ताचा संयुक्त क्रियापदामध्यें जेव्हां उपयोग होतो, तेव्हां त्याचा बहुधा उपक्रम किंवा उद्देश हाच अर्थ असतो. जसें:—करूं लागतो, बसूं पहातो, इ०. तथापि कांहीं संयुक्त क्रियापदांत ह्या कृदन्ताचा निराळा अर्थ असतो. तो हें काम करूं शकतो, तो त्याला मारूं किंवा उचलूं पावेल, इत्यादि ठिकाणीं करूं, मारूं, उचलूं, हीं उपक्रमवाचक नसून क्रियासंपादनाचे अर्थानें उपयोगांत आहेत हें उघड आहे. त्याचप्रमाणें आई मुलांस जेऊं घालते, तिला न्हाऊं घाल, किंवा माखुं घाल, इ० वाक्यांत जेऊं, न्हाऊं माखुं, ह्या कृदन्तांचा क्रियोपक्रम किंवा क्रियासंपादन

ह्यांपैकीं एकही अर्थ नसून हीं केवळ क्रियावाचक आहेत हें उघड आहे. यामुळें जेऊं घालते इत्यादिकांस संयुक्त क्रियापदें मानणें बरें. कांहींकांच्या मतें जेऊं, न्हाऊं, मारूं, हीं या ठिकाणीं नामें असून घाल या धातूचीं कर्में आहेत. आमच्या मतें न्हाऊं, मारूं हीं मूळचीं अव्ययें आहेत; नामें नव्हत. म्हणून जेऊं घालतें, न्हाऊं घाल, यांस संयुक्त क्रियापदें म्हणणेंच अधिक युक्त आहे.

[ आ ] ह्या कृदन्त अव्ययांपैकीं कांहींचा क्रियावाचक नामांप्रमाणें उपयोग होतो. तथापि त्यांस विभक्तिप्रत्यय लागत नाहींत; म्हणजे फक्त प्रथमेमध्येंच त्यांचा उपयोग होतो. जसें:—हसूं ( हसणें, हास्य उदा०—त्याला हसूं आवरेना ), रडूं ( रडणें, उदा० —त्याला रडूं कोसळलें. ). तथापि अशा ठिकाणीं हसें, रडें या नामांचा उपयोग अधिक शिष्ट व अधिक प्रशस्त आहे.

टीपः—याच अर्थीं हसें, रडें अशा जीं एकारान्त नामें प्रचारांत आहेत, त्यांस विभक्ति प्रत्यय लागतात.

[ इ ] कांहीं ऊं प्रत्ययान्त कृदन्तें कर्तृवाचक नामांप्रमाणें उपयोगांत आहेत. जसें :—गळूं ( मूळ अर्थ—गळणारें, यावरून या शब्दास एका प्रकारचा विशेष फोड, करट हा अर्थ त्या फोडाचे प्रकृतिविशेषास अनुसरून प्राप्त झाला आहे हें उघड आहे. ), उबाळूं [ मूळ अर्थ—उबाळणारें; नंतर त्याचा गळूं शब्दाप्रमाणेंच अर्थ झाला, ] बोळूं [ बोळणारें, स्निग्ध करण ].

**ऊन**—सर्व धातूंस हा प्रत्यय लागून अव्ययें तयार होतात. हा प्रत्यय ऊआख्याताचे प्र० पु० प्रत्ययांप्रमाणें लागतो. म्हणजे दोहोंचे पूर्वी धातूंस एकच विकार होतात. ह्यास बहुधा पूर्वकालवाचक अव्यय असें म्हणतात. ह्याचा तिन्ही काळीं उपयोग होतो. ह्या प्रत्ययानें सर्व धातूंपासून कृदन्त क्रियाविशेषण अव्ययें तयार होतात. त्याचा संयुक्त क्रियापदांचे कामीं कसा व कोठकोठें उपयोग होतो, हें त्या क्रियापदांचे अध्यायांत सविस्तर आहे. ह्याचा बहुधा क्रियासमाप्ति हा अर्थ असतो. उदा :—देऊन, घेऊन, करून, बोलून, चालून, मारून, निजून पळून, इ०.

याचे क्रियासमाप्तीशिवाय इतर अर्थ येणेंप्रमाणें:—

[ अ ] अपूर्णक्रिया. ह्या अर्थानें त्याचा करीत, बसत, शिकत, ह्या कृदन्ताप्रमाणें उपयोग होतो. हा उपयोग एकदेशी असल्यामुळें गौण होय. उदा० तो बसून किंवा शिकून आहे, असतो, इ०.

[ आ ] कार्यकारणभाव, जसें:—तो खाऊन माजला, तो गिळून मस्त झाला आहे, तो एकटा राहून बेपर्वा होत चालला आहे, इ०. या ठिकाणीं खाऊन म्हणजे खाण्यामुळें, गिळून म्हणजे गिळल्यामुळें, आणि राहून म्हणजे राहिल्यामुळें, असा अर्थ आहे हें उघड आहे.

[ इ ] क्रियासमाप्तीपासून. जसें:—हें शिकून मला दहा वर्षें झालीं; त्याला मरून आज पंचवीस वर्षें झालीं, इ०. या उदाहरणांत शिकून म्हणजे शिकण्याची क्रिया संपल्यापासून आणि मरून म्हणजे मरण्याचे काळापासून, असा अर्थ आहे हें स्पष्टच आहे.

[ ई ] कांहीं ऊन कृदन्तांचा क्रियाविशेषणांप्रमाणें उपयोग होतो. जसें:—फिरून यत्न करून पहा; तो होऊन म्हणाला; खच्चून, रगडून जेवला; कडकडून भेटला; त्यानें हें कृत्य जाणूनबूजून केलें; दाटून करितो; इ०. या ठिकाणीं फिरून=पुन्हा; होऊन=स्वतः, स्वस्फूर्तीनें; खच्चून, रगडून=आकंठ, पुष्कळ; कडकडून=प्रेमपूर्वक; जाणूनबुजून=मुद्दाम; दाटून=हट्टानें, मुद्दाम; असा अर्थ आहे.

( उ ) म्हणून. हें म्हण धातूपासून याच ऊन प्रत्ययानें साधलेलें कृदन्त होय. त्याचा क्रियासमाप्तीचे अर्थीं इतरांप्रणामाणें उपयोग होतोच. जसें:— असें म्हणून ( बोलून ) तो निघून गेला. शिवाय म्हणून ह्याचा स्वरूपदर्शक उभयान्वयीं अव्ययाप्रमाणें उपयोग होतो. जसें:—राभा म्हणून ( या नांवाचा ) एक मुलगा होता; ज्ञानेश्वर म्हणून ( असें ) ज्याला म्हणतात तोच ज्ञानदेव होय, इ०. शिवाय म्हणून त्या कृदन्ताचा परिणामबोधक व उद्देशदर्शक उभयान्वयी अव्ययांप्रमाणें उपयोग होतो. तो उभयान्वयी अव्ययांचे विवेचनांत सविस्तर दिला आहे तेथें पहावा.

( ऊ ) करून आणि वांचून, या ऊन कृदन्तांचा शब्दयोगी अव्ययांप्रमाणें उपयोग होतो. जसें:—तेणेंकरून, त्यावांचून इ०.

( ऋ ) अकर्मक धातु, आणि सकर्मक धातूंच्या कर्माची विवक्षा नसता जेव्हां त्यांचा अकर्मकाप्रमाणें उपयोग होतो तेव्हां ते, ह्यांच्या ऊन कृदन्ताचा कधीं कधीं नामाप्रमाणें उपयोग होतो असें म्हणतात. जसें:—त्याचें निजून झालें का, त्याचें लिहून झालें का, इ० ठिकाणीं लिहून म्हणजे लिहिणें आणि निजून म्हणजे निजणें असा अर्थ आहे, आणि तीं झालें या क्रियापदाचे कर्तृस्थानीं आहेत असें पुष्कळांचें म्हणणें आहे. परंतु आमच्या मतें निजून झालें, लिहून झालें हीं संयुक्त क्रियापदें असून 'त्याचें' हा त्यांचा षष्ठ्यन्त कर्ता असून या वाक्यांत भावे प्रयोग आहे. ( सविस्तर खुलाशासाठीं प्रयोग विवेचन पाहावें. )

(ऌ ) हांतरूण, आणि पांघरूण, हीं हांतर आणि पांघर ह्या धातूंपासूनच ऊन प्रत्यय लागून कृदन्तें झालीं आहेत; आणि प्रत्ययांतील नचा मागल्या रचे योगानें ण झाला आहे. हांतरूण आणि पांघरूण, ह्यांचा प्रचलित उपयोग नामाप्रमाणेंच होतो, आणि त्यांस विभक्तिही लागतात. ऊन प्रत्ययान्त कृदन्त अव्ययांप्रमाणें त्यांचा उपयोग होत नाहीं. हांतर व पांघर ह्या धातूंपासून ह्याप्रकरचीं कृदन्त अव्ययें हांतरून व पांघरून अशींच होतात. जसें:—सतरंजी हांतरून किंवा पासोडी पांघरून तो निजला. यामुळें हांतरूण, पांघरूण, ह्यांस स्वतंत्र कृदन्त नामें मानलें तरी चालेल. म्हणजे त्यांस ऊन प्रत्ययांन्त न म्हणता ऊण हा वेगळाच प्रत्यय मानिला तरी चालेल.

टीप १—कवितेंत या ऊन प्रत्ययाचीं अनेक विचित्र रूपें दृष्टीस पडतात. तीं अशीं :—ऊनि, ऊनी, उनि, उनी, उनियां, ऊनियां, उनी यां, ओन, ओनि, ओनी, ओनियां ओनि, औनियां, ऊं, औं, इ०.

टीप २—ह्या ऊन प्रत्यय संस्कृत त्वा प्रत्ययापासून आला आहे, संस्कृत-त्वा चा प्राकृतांतही तूण किंवा ऊण होतो; ह्यांपैकीं ऊण पासून मराठी ऊन ह्या निघाला. जसें:—

| संस्कृत | प्राकृत | मराठी |
|---|---|---|
| दत्वा | दातूण, दाऊण | देऊन |
| गृहीत्वा | घेत्तूण, घेऊण | घेऊन |
| इ० | इ० | इ० |

ऊस—आंबूस.

**एं**—कांहीं धातूंस हा प्रत्यय पररूपसंधीनें लागून निरनिराळ्या अर्थांचीं कृदन्तें होतात. तीं अशीं:—

[ अ ] क्रियावाचक. उदा०:—हसें, रडें, इ० यांचा हसणें, रडणें, असा अर्थ आहे.

[ आ ] क्रियासाधनद्योतक. जसें:—खुरपें [ खुरपण्याचें साधन ], घोटें [ घोटण्याचें म्हणजे घोट घेवविण्याचें साधन; गुरांस पातळ औषधें पाजण्याचे नळीस घोटें असें म्हणतात. ] वल्हें, [ वल्हविण्याचें साधन ], [ पान ]–कापें [ कापण्याचें साधन ], डोळे–ढापें [ ढापण्याचें म्हणजे झांकण्याचे साधन. ]. ह्याप्रमाणेंच कुडबुडें, पिटपिटें, खटखटें, वेढें, इ०.

[ इ ] कर्तृवाचक जसें:—वाढें [ वाढणारे, उंसाचा पात्यांसह शेंडा; हा रसाचे कामीं निरुपयोगी असतो, पण कांहीं झाडांचे फांदीप्रमाणें जगतो व वाढतो, त्यास वाढें असें म्हणतात. ], वळें [ वळलेलें, सोनें वळवून केलेली आंगठी. ]

[ इ ] पूर्णक्रियाद्योतक जसें:—[ अद ]–मुरें [ मुरलेलें हें विशेषण आहे. [ लोण ]–कढें

[ उ ] क्रियेची योग्यता दाखविणारीं विशेषणेंही या प्रत्ययानें झालेलीं आढळतात. तीं सामासिक शब्दांत येतात. जसें:— [ पळी ]–वाढें [ पळीनें वाढण्यास योग्य ]. [ बोट ] – चेपें [ बोटानें चेपण्यास योग्य किंवा चेपतां येण्यासारखें ], हातखुरपें.

**एरा**—कर्तृवाचक. बोंच–बोंचेरा.

**एल**—कांहीं धातूंस हा प्रत्यय लागून पररूप संधीनें 'ती क्रिया करण्याचा स्वभाव आहे ज्याचा' अशा अर्थीं विशेषणें होतात. जसें— रंगेल [ चैनित रंगण्याचा स्वभाव आहे ज्याचा ], उखडेल ( उखडण्याचा म्हणजे एकदम बिथरून जाण्याचा स्वभाव आहे ज्याचा ), अडेल ( अडण्याची संवय आहे ज्याला ); याचप्रमाणें तंडेल, दंडेल, चढेल.

**टीप**—रंगेल व अडेल या शब्दांचीं रंगील व अडील अशींही रूपें क्वचित् आढळतात. तीं वर ईल प्रत्ययापुढें पहावीं.

**ओका**—अटोका.

**ओती**—ठर ठरोती [ ठराव ] हें भाववाचक नाम आहे.

**ओसा**—साधनार्थीं–अडोसा, पडोसा.

**ओशी**—कस—कसोशी [ कसण्याचा भाव, काळजी )

**ओळा**—चाख–चाखोळा ( आईच्या पानांत मुलानें जेवण्याचा मुंजीच्या वेळचा समारंभ, मातेजवळ मुलांचें अखेरचें जेवण. )

**अंता**—वद–वदंता.

**अंती**—वद–वदंती. वदन्ती हा शब्द मूळ वदत् या संस्कृत वद धातूच्या वर्तमानकालवाचक कृदन्ताचें स्त्रीलिंगी रूप होय. वदन्ती म्हणजे वदणारी, बोलणारी. यावरून वदंती म्हणजे बातमी, वार्ता असा अर्थ आला. अशाच अर्थानें वदन्ती ह्या संस्कृत रूपाचाही 'किंवदन्ती' या शब्दामध्यें नामासारखा उपयोग दिसतो हें तज्ञांस स्मरेलच.

**क**—या प्रत्ययानें कांहीं नामें व विशेषणें होतात.

( अ ) विशेषणें—वेंचक, निवडक, तुटक, इ० हीं विशेषणें वेंचलेला, निवडलेला, तुटलेला, या अर्थाचीं आहेत.

( आ ) नामें किंवा विशेषणें—ढाळक, रेचक, मारक, इ० ह्यांचा अर्थ 'ती क्रिया करणारा' असा आहे.

( इ ) भाववाचकनाम–अटक, अडक, ( आडकाठी ).

टीप १—कांहीं अनुकरणवाचक मूळ अव्ययांस हा प्रत्यय लागून साधित धातूही होतात. जसः—चर–चरकणें, चुर–चुरकणें, भुर–भुरकणें, खट–खटकणें भड भडकणें, धड–धडकणें.

**कट**—या प्रत्ययानें कांहीं कृदन्त विशेषणें होतात.

( अ ) कुजकट, जळकट, मळकट, पुसकट, इ०. या ठिकाणीं 'ती क्रिया ज्याचे ठायीं सुरू झाली आहे किंवा अर्धवट झाली आहे असा हा अर्थ आहे.

( आ ) मारकट, बसकट, इ० ठिकाणीं 'ती क्रिया करणारा' असा अर्थ आहे. बसकट या शब्दाचा बैठक, आसन, बसणें, ह्या अर्थी नामाप्रमाणें उपयोग होतो.

**कटी**—वळकटी ( वळलेली ती, गुंडाळी, बिछान्याची गुंडाळी, किंवा गुंडाळलेला बिछाना, वगैरे. )

**कत**—मिळकत ( मिळालेलें किंवा मिळणारें द्रव्य, उत्पन्न, लाभ ).

**कर**—( अ ) नामें:—विणकर ( विणण्याची क्रिया ), बसकर ( बैठक, आसन ).

( आ ) विशेषणें:—रुचकर, ओढकर, खेळकर, फुटकर, विटकर इ०. याठिकाणीं कर म्हणजे ती क्रिया करणारें. रुचकर=रुचणारें, ओढकर=ओढणारें, खेळकर=खेळणारें, इ०.

**कळ**—( अ ) मोडकळ, पडकळ, हीं नामें असून त्यांचीं मोडकळी, पडकळी, अशींहीं रूपें आढळतात. त्यांचा अर्थ मोडकी, पडकी स्थिति.

( आ ) फुटकळ हें विशेषण आहे.

**का**—या प्रत्ययानें बहुधा विशेषणें होतात. तीं दोन प्रकारचीं असून आकारान्त असल्यामुळें लिंगवचनाप्रमाणें बदलतात.

( अ ) 'ती क्रिया करणारा' या अर्थाचीं:—मारका, जळका, बोलका, पडका, गळका, इ०. मारका=मारणारा. जळका=जळणारा, इ०.

( आ ) 'तीं क्रिया झालेला' या अर्थाचीं:—फुटका, मोडका, भिजका, भाजका, मोजका, नेमका, सडका, कुचका, नासका, इ०. फुटका=फुटलेला, भाजका=भाजलेला, नेमका,=नेमलेला, इ०.

( इ ) सुटका ( मोकळीक ) हें भाववाचक नाम असेंच साधलें आहे. वळका हें ह्याच प्रकारचें भाववाचक नाम होय. पण तें प्रचारांत नाहीं.

( ई ) फाळ फाळका हें एक सामान्यनाम धातुसाधित आहे.

**कार**—ह्या प्रत्ययानें कांहीं भाववाचक नामें साधतात. जसें:-देकार, होकार, बैसकार; इ०. हे शब्द कवितेंत बहुधा आढळातात.

**की**—ह्या प्रत्ययानें कांहीं भाववाचक नामें होतात. जसें:—हुशारकी, उनाडकी, डुलकी, फिरकी.

**कूर**—फाटणें- फटकूर [ हें रूप अनियमित आहे, अथवा फट ह्या हिंदी भाषेंतील धातूपासून तें साधलें आहे असें म्हणणें बरें ).

**खोरं**—हा प्रत्यय खोड या शब्दाचें रूपान्तर असावा. यापासून कांहीं कृदन्त विशेषणें होतात. जसें:—भांडखोर ( भांडण्याची खोड आहे ज्याला ), चिडखोर ( चिडण्याची खोड आहे ज्याला ), त्याप्रमाणेंच चिडखोर, उधळखोर, अकडखोर, इ०

**गत**—हा गति शब्दाचा शेष असून तो धातूंस लागून कांहीं भाववाचक कृदन्त नामें होतात. जसें— फसगत [ फसण्याची गति म्हणजे स्थिति ], त्याचप्रमाणें भरगत, इत्यादि शब्द समजावे.

**गा**—ह्यानें कांहीं धातुसाधित विशेषणें होतात.

[ अ ] भांडगा [ भांडण्याची खोडी आहे ज्याला ]

[ आ ] बाटगा [ बाटलेला किंवा ज्याचा शुद्ध आचार नाहीं असा ]

[ इ ] माजगा [ माजलेला, मस्त ] ह्या शब्दाचें माजगेला असेंही रूप आढळतें.

**घस्त**—हा प्रत्यय संस्कृत ग्रस्त शब्दाचा अपभ्रंश दिसतो. ह्यापासून ओढघस्त हें विशेषण झालें आहे. ह्यामधील ओढ ह्यास धातु समजलें तर हें कृदन्त होय; आणि ओढ यास नाम समजलें तर ह्यास तद्धित म्हटलें पाहिजे. तद्धिताचा पक्ष बरा दिसतो.

**चीक**—ह्यानें झालेलें 'लवचीक' हें एकच कृदन्त विशेषण दिसतें. लवचीक=लवण्यासारखें.

**ट**—ह्या प्रत्ययानें बरींच कृदन्त विशेषणें होतात. त्यांचा नेहमींचा अर्थ 'ती क्रिया ज्याचे ठायीं झाली आहे असा' आहे. उदा०—कुजट [ कुजलेला ], आंबट [ आंबलेला ], भिजट, पिकट, पुसट, पसरट, कळकट, करपट, खवट, सुखट, सुकट, इ०. चावट शब्द असाच चाव धातूपासून निघालेला आहे. परंतु त्याचा अर्थ चावलेला असा नसून शब्दांनीं, थट्टेनें, साध्या शिव्यांनीं चावणारा म्हणजे त्रास देणारा, थट्टेबाज असा झाला आहे. तसेंच घसरट, हा शब्दही ट प्रत्ययान्तच आहे; तरी अर्थाचे दृष्टीनें निराळा आहे. घसरट म्हणजे घसरलेलाही नव्हे आणि घसरणाराही नव्हे, तर घसरविणारा असा आहे. घसरट जागा, घसरट उतार, या ठिकाणच्या त्याच्या उपयोगावरून वरील अर्थ स्पष्ट होईल.

**टा**—काप—कापटा, कपटा [ कापलेला तुकडा ], चिरटा इ०. चोरटा ( चोरण्याची सवय आहे ज्याला तो ).

**ठा**— पुरव—पुरवठा, [ पुरविलेला भाग. ]

**ड**—घसरड, निसरड [ म्हणजे पाय घसरण्याची किंवा निसरण्यासारखी जागा ], सुकड—सुखड [ म्हणजे सुखलेला असोली नारळ ]. हे शब्द स्त्रीलिंगी आहेत.

**डा**—घसरडा—डें, निसरडा—डें, उकिरडा, खवडा, हंबरडा, इ०. हीं नामें आहेत.

[ अ ] ह्यानें क्वचित् विशेषणेंही होतात. जसें:—वांकडा [ वांकलेला ]

**डी**—फुगडी.

**ण**— ( संस्कृत अन ह्या कृदन्त प्रत्ययापासून हा आला आहे. संस्कृत धातु बहुधा व्यंजनान्त असतात आणि मराठीमध्यें ते स्वारान्त आहेत. या संस्कृत अन मधील आद्य अ गळून नचा ण झाला ). हा प्रत्यय लागून अनेकार्थी कृदन्तें होतात.

[ अ ] भावार्थ. जसें:—तारण, पोषण, सारवण, भांडण, वळण, घडण, इ० हे सर्व शब्द नपुंसकलिंगी आहेत. पण गाळण, लोळण, इ० हे स्त्रीलिंगी.

[ आ ] कर्मार्थ. जसें दळण, नेसण, चाटण, मिरवण, घुसळण, मिसळण, जेवण, देण, लेण, कांडण, सडण, इ० नपुंसकलिंगी आहेत. पण ठेवण, शिवण इ० हे स्त्रीलिंगी.

[ इ ] करणार्थ जसें:—झाडण, धरण, कालवण, झांकण, लागण, कोंदण, इ० नपुंसकलिंगी आहेत. परंतु याच अर्थाचे चाळण, कुडण, लिंपण, इ० स्त्रीलिंगी आहेत.

[ ई ] अधिकरणार्थ जसें:—दडण, लवण, वांकण, कोंदण, इ० नपुंसकलिंगी आहेत. पण चढण, उतरण, इ० हे स्त्रीलिंगी आहेत.

**टीप १**—कधीं कधीं एकच शब्द अनेक अर्थी उपयोगांत येतो. जसें दळण म्हणजे दळण्याची क्रिया, जें दळलेलें तें, आणि दळावयाचें जे तें. क्रमानें उदाहरणें:—सखूच दळण चांगलें असतें; आजचें दळण भरड आलें आहे, इतकें दळण एकटीच्यानें कसें दळवेल. अशींच दुसऱ्या शब्दांचीं उदाहरणें समजावीं. विस्तारभयास्तव देतां येत नाहींत.

टीप २—कर, जा, ये, शीक, इ० कांहीं धातूंपासून हें कृदन्त होत नाहीं.

णा—[ अ ] कर्तृवाचक नाम. उ०—पाळणा [ पाळणारा तो ], अडाणा [ अडणारा किंवा अडविणारा तो ], रमणा [ रमणारा किंवा रमण्यासाठीं जमलेला लोकसमूह, [ जीव ]—घेणा [ घेणारा ].

( आ ) कर्मवाचक नाम. उदा०—भरणा [ भरलेली किंवा भरावयाची रकम. भरणा ह्या शब्दाचा भावार्थींही उपयोग होतो. जसें:—आज भरणा करावयाचा आहे. ]

( इ ) भाववाचक नाम. उदा०—भरणा, उगाणा ( उगवून म्हणजे गोळा करून नाहींसें करणें; हा शब्द जुन्या कवितेंत येतो. जसें:—दोष कांहीं नाणीं मना, करोनि पापाचा उगाणा, दाखवीं चरण मजलागीं ॥

( ई ) विशेषण. उदा०—देखणा [ देखण्यास म्हणजे पहाण्यास चांगला किंवा योग्य, सुंदर ], पोषणा—पोसणा—पोष्णा [ पोसण्यासाठीं आणलेला, बैल, हैस, इ० ], राखणा.

टीप—ण ह्या प्रत्ययाप्रमाणेंच णा हा प्रत्ययही संस्कृत अना प्रत्ययापासून आलेला दिसतो. परंतु प्रार्थना, सूचना, वेदना, हा अना प्रत्ययान्त कृदन्तें स्त्रीलिंगी आहेत; आणि रमणा, भरणा, इ० मराठी कृदन्तें पुल्लिंगी आहेत. तथापि हेलना, तुलना, ह्या संस्कृत शब्दांचे अपभ्रंश हेळणा, तुळणा, इ० मराठी शब्द मूळ संस्कृत शब्दांप्रमाणेंच स्त्रीलिंगी आहेत. परंतु ह्यांचा प्रचार कमी.

णाईत—दुखणाईत [ दुखण्यानें पडलेला, आजारी ].

णाऊ—हा प्रत्यय लागून ‘ ती क्रिया करण्याची योग्यता किंवा शक्यता ’ दाखविणारीं कांहीं कृदन्त विशेषणें साधतात. जसें:-ठेवणाऊ [ ठेवण्यास योग्य ], खाणाऊ, शिकणाऊ, इ०.

णार—या प्रत्ययानें कर्तृवाचक विशेषणें व नामें साधतात. हा प्रत्यय सर्व धातूंस लागतो. जसें:—करणार, खाणार, देणार, येणार, जाणार इ. उदाहरणें. ‘ एक जोडणारा आणि पन्नास खाणार ’ ‘ तुम्हीं पानें वाढिलींत परंतु जेवणार कोठें आहेत, किंवा जेवणार मंडळी कोठें आहे ’ इ०.

टीप—दादोबा म्हणतात ‘ हा प्रत्यय होऊन कोठें भविष्यकाळीं क्रियापदें होतात. जसें:—जाणार, येणार, निजणार, इ०. उदाहरणें:— मी उद्यां तेथें

जाणार, तुम्ही आलेत तर तोही तेथें येणार, इ० वाक्यांत जाणार, येणार हीं भविष्य-कालवाचक क्रियापदं जाणावा ' (पृष्ठ २९४). गुंजीकरांचेंही मत असेंच आहे. परंतु आमच्या मतें णार प्रत्ययानें क्रियापदें कोठेंच होत नाहींत. तसें म्हटल्यास त्यांचीं दोन्हीं वचनीं तिन्हीं पुरुषीं रूपें समान; म्हणजे एक करणार हें रूप सर्वत्र सारखें; हें एक विचित्र होय. तेव्हां मी उद्यां जाणार, ह्या वाक्यांत जाणार हें क्रियापद नसून उद्देशवाचक कृदन्त विशेषण होय; आणि 'आहे' हें साधित क्रियापद अध्याहृत समजून जाणार आहें, येणार आहे, अशीं संयुक्त क्रियापदें मानणें चांगलें. शिवाय व्युत्पत्तिदृष्टयाही जाणार, येणार, यांना स्वतंत्र क्रियापद मानणें योग्य दिसत नाहीं. तसेंच यांचा सहाय क्रियापदांवांचून जो उपयोग होतो तो बहुधा बोलण्याच्या भाषेंत होतो. लेखांत किंवा ग्रंथांतील गद्य शिष्ट भाषेंत क्वचित्; आणि पुरुष–लिंग–वचनद्योतक एकही आख्यात प्रत्यय यांस लागलेला दिसत नाहीं; ह्यामुळें जाणार, येणार ह्यांस कृदन्तेंच म्हणणें बरें.

**णारा**—सर्व धातूंस हा प्रत्यय लागून कर्त्रर्थी विशेषणें होतात. जसें:—

करणारा, बोलणारा, देणारा, घेणारा, पिणारा, धुणारा, गाणारा, खाणारा, इ०.

इच्छ व लिह ह्या धातूंस मात्र णें, णार, णारा, हे प्रत्यय लागतांना अन्त्य असा इकारादेश होतो. जसें.—इच्छिणें, –णार, णारा, लिहिणें, – णार, – णारा.

टीप—णार व णारा हे प्रत्यय ण प्रत्ययास आर व आरा लागून झाले आहेत. ण प्रत्यय संस्कृत अन पासून आला आहे हें पूर्वीं सांगितलेंच आहे. आर हा प्रत्यय संस्कृत कार या प्रत्ययापासून आला आहे. उदाहरणें:—

कुंभकार — कुंभ + आर = कुंभार.

रक्षणकार { —रक्षण + आर = रक्षणार.
 —राखण + आर = राखणार.

पोषणकार —पोसण + आर = पोसणार.

दलनकार —दळण + आर = दळणार.

इ०. इ०.

आणि ज्याप्रमाणें दलनं, पोषणं, रक्षणं, इत्यादि प्रथमेचे एकवचनापासून दळणें, पोसणें, राखणें, इ० णें कृदन्तें आलीं, त्याचप्रमाणें येथेंही प्रकार आहे. म्हणजे कार ह्याचेपासून आर हा प्रत्यय आला; आणि त्या कार ह्याचें जें कारः असें प्र० ए० व० आहे, त्यापासून आरा हा प्रत्यय येऊन णारा प्रत्ययान्त कृदन्तें मराठींत झालीं आहेत. जसें:—यानकारः—जाणार, रक्षणकारः—

रक्षणारा, पोषणकारः---पोसणारा, इ०. हीं आकारान्त असल्यामुळें लिंगवचनभेदानें बदलतात. णार कृदन्ताचाच संयुक्त क्रियापदांचे रचनेंत उपयोग होतो.

**णावळ**—' क्रियेचें मोल किंवा मजुरी ' या अर्थीं कांहीं धातूंस हा प्रत्यय लागून धर्मवाचक नामें साधतात. तीं सर्व स्त्रीलिंगी असतात. णें हा प्रत्यय लावून धातू सांगण्याची जी रीत आहे, त्या रीतीप्रमाणें णेंच्या जागीं णावळ लावावें म्हणजे झालें. जसेंः---लिहिणावळ, दळणावळ, घडणावळ, धुणावळ, इ०.

टीप—खाणावळ ( याचा मूळ अर्थ खाण्याबद्दलची किंमत असाच आहे; आणि त्याचा त्या अर्थानें थोडासा उपयोगही होतो. जसेंः---तुम्हांस खाणावळ काय पडते. त्याचा ' मोलानें खाण्याला घालण्याचें दुकान ' असा जो अर्थ आला, तो नंतरचा होय. या अर्थानें त्याची साधनिका खा धातूस णावळ प्रत्यय लागला आहे अशी मानणें बरें नाहीं. म्हणजे त्यास या अर्थानें कृदन्त समजणें ठीक दिसत नाहीं. तर त्यास तद्धित मानावें. ' जेवणखाण ' या ठिकाणीं खाण शब्दाचा खाणें या अर्थीं नामाप्रमाणें उपयोग आहे. या खाण शब्दाचा स्वतंत्र उपयोग मराठींत फारसा नाहीं. या खाण शब्दास आवळ ( सं० आवलि ) हा प्रत्यय लागून खाणावळ व त्याचप्रमाणें जेवणावळ हे तद्धित शब्द झाले आहेत. पण त्यांचा चुकीनें णावळ या प्रत्ययाचे पुढें कृदन्तामध्यें अन्तर्भाव करितात; तसें केल्यानें या शब्दांच्या अर्थाचा योग्य खुलासा होत नाहीं. परंतु त्यांस येथें सांगितल्याप्रमाणें तद्धितें समजलें, म्हणजे त्यांच्या अर्थाचें स्पष्टीकरण सहज होतें. खाणावळ = भोजनाच्या पंक्ति ज्या ठिकाणीं होतात ती जागा; या अर्थांत खाण्याची किंमत या अर्थाचीही भर आहेच. जेवणावळ = जेवण्याची पगत, प्रयोजन, समाराधना. जेवणावळ या शब्दामध्यें तरी णावळ प्रत्यय मानणें साफ चुकीचें आहे. ह्यामध्यें जेवण ह्या नामास आवळ हा आवलि, पंक्ति या अर्थाचा प्रत्यय लागला आहे. आणि जेवणावळ हें कृदन्त नसून तद्धित आहे हें खास. खाणावळ यास कांहीं अंशीं कृदन्त म्हटल्यास चालण्यासारखें आहे. कारण कीं, त्यांत णावळ प्रत्ययाचे अर्थाचा संबंध आहे. परंतु जेवणावळ या शब्दासंबंधानें मात्र तसें म्हणण्यास कांहींच जागा नाहीं. एवंच, वाटल्यास खाणावळ यास कृदन्त म्हणा; पण जेवणावळ ( समाराधन ) यास तद्धित म्हणणें भाग आहे.

टीप २ — दादोबा म्हणतातः---'थोडक्या धातूंवरून ती ती क्रिया घडल्यानें जी कसर जाते त्या अर्थीही हा प्रत्यय होतो; जसेंः—सुकणावळ, झिजणावळ, कापणावळ, वेरणावळ, इ०. म्हणजे सुकल्यानें, झिजण्यानें, कापण्यानें, वेरल्यानें जी त्या त्या पदार्थांत कसर जाते ती.' परंतु आजकालच्या भाषेंत या अर्थीं णावळ प्रत्ययाचा उपयोग करण्याचा प्रचार कमी दिसतो. तथापि या अर्थानें प्रस्तुत

प्रत्ययाचा उपयोग करणें भाषादृष्ट्या सोईचें आहे. त्याचे जागींही नवीन मार्ग कांहीं उत्पन्न झालेला दिसत नाहीं. तेव्हां झिजणावळ, सुकणावळ, अशासारखे शब्द अर्थदृष्ट्या इष्ट आहेत. तरी त्यांचा प्रचार कां कमी होत चालला हें समजत नाहीं. भोषस त्यांची जरूरी लागल्यास ते पुन्हा प्रचारांत येतीलच.

**णी**—हा प्रत्यय लागून स्त्रीलिंगी कृदन्त नामें होतात.

[ अ ] भावार्थीं. जसें:—करणी, पाहणी, टेहळणी, मिळवणी, राहणी, वांटणी, कापणी, इ०.

[ आ ] कर्मार्थीं. जसें:—पेरणीं, पुरवणी, लावणी, देणी, घेणी, ओंवाळणी, इ०.

[ इ ] करणार्थीं म्हणजे साधनार्थीं. जसें:— रोखणी, चाळणी, तासणी, लेखणी, काढणी, अडणी, जेवणी, खवणी, किसणी, वेळणी, फोडणी, पाठवणी.

[ ई ] अधिकरणार्थीं. जसें:—न्हाणी [ न्हाण्याची जागा, मोरी ].

टीप— १ शिकवणी हा शब्द कोणत्या अर्थाचे सदरांत घालावा हे ठरविणें कठीण आहे. शिकवणी म्हणजे शिकविण्याची क्रिया किंवा त्या क्रियेचा भाव ह्या अर्थानें तो पहिल्या सदरांत येईल. परंतु 'त्याला दोन शिकवण्या आहेत' अशासारख्या वाक्यांत जो त्या शब्दाला नवीन अर्थ आला आहे, त्या अर्थी तो या अखेरच्या अधिकरणार्थ सदरामध्येंच घालणें बरें. शिकवणी म्हणजे शिकविण्याची जागा, म्हणजे पैसे घेऊन खासगी रीतीनें शिकविण्यास मिळालेला विद्यार्थी.

टीप २ —ह्या णी प्रत्ययान्त एकाच शब्दाची अनेक अर्थीही उपयोग होतो. जसें:— करणी = क्रिया; उदा०—ईश्वराची करणी आणि नारळांत पाणी. करणी = मंत्रतंत्रप्रयोग; उदा०—त्याला हल्लीं वेड लागल्यासारखें झालें आहे; त्याच्या शत्रूंनीं कांहीं करणी केली आहे असें म्हणतात. करणी = लग्नामध्यें वराला दिलेली किंवा द्यावयाची देणगी; उदा०—पांचशें हुंडा व पांचशांची करणी असा ठराव झाला आहे. करणी = करण्याचें साधन; उदा० – गंवड्याचें करणीशिवाय कसें चालेल.

**णूक**—हा प्रत्यय कांहीं धातूस लागून क्रियावाचक, भाववाचक, किंवा कर्मवाचक स्त्रीलिंगी कृदन्त नामें साधतात. आणि एकाच कृदन्ताचा अनेक अर्थीं उपयोग होतो. जसें:—निभावणूक, वर्तणूक, मिरवणूक, वागणूक, छळणूक, नाडणूक, जाचणूक, अडवणूक, नेमणूक, करमणूक, निवडणूक, फसणूक, इ०.

णे —— ह्या प्रत्ययानें क्रियादर्शक, कर्मदर्शक, करणदर्शक, अशीं कृदन्त नामें बनतात. धातूंचा निर्देशही या कृदन्ताचे स्वरूपानें करण्याची चाल आहे. जसें :—— बोलणें, लिहिणें, मिरवणें, खेळणें, लेणें, गाणें, इ०.

टीप—अन प्रत्ययान्त कृदन्तांपासून मराठींतील ण प्रत्ययान्त कृदन्त आलें आहे. संस्कृत दलन, कंडन, भरण, पोषण, इ० रूपांपासून मराठींतील दळण, कांडण, भरण, पोषण, इ० हीं अकारान्त रूपें होतात. परन्तु दळणें, कांडणें, भरणें, पोषणें, इ० हीं एकारान्त रूपें वरील संस्कृत अकारान्त कृदन्तांच्या प्रथमेच्या एकवचनी रूपांपासून—दलनं, कंडनं, भरणं, पोषणं, इ० यांपासून आलेला आहेत. ण कृदन्तांच्या व णें कृदन्तांच्या व्युत्पत्तीमधील हा सूक्ष्म भेद आजपर्यंत फारसा कोणीं लक्षांत न घेतल्यामुळें णें कृदन्तामधील —— दळणें कांडणें, देणें, घेणें करणें, इ० मराठी शब्दांतील——अन्त्य बिंदूस व्युत्पत्तीचा आधार नाहीं, असें समजून तो साफ उडवून देण्याची सूचना कांहीं वर्षांपूर्वी निघाली होती. परन्तु ती सर्वस्वी निराधार आणि म्हणूनच अग्राह्य होय ह्यांत संशय नाहीं.

एकाच शब्दाचा अनेक अर्थीं उपयोग होतो. जसें :——बोलणें म्हणजें बोलण्याची क्रिया व बोललेलें भाषण असे अर्थ होतात.

( अ ) करणदर्शक नामें :——लाटणें, कांतणें, चोपणें, गाळणें, ( कान )—कोरणें, ( दांत )——कोरणें, चोखणें, इ०. यांचा क्रियावाचक नामांप्रमाणेंही उपयोग होतो.

विंधणें——हें करणदर्शकच आहे. परंतु त्यांतील विंध हा धातु मात्र मराठींत फारसा प्रचारांत नाहीं.

उलथनें——[ कलथा, कावलथा, ] हा शब्द उलथ धातूपासूनच झाला आहे. पण त्यामध्यें णेंच्या जागीं नें हा प्रत्यय दिसत आहे. इतकाच फरक.

बोलावणें——[ निमंत्रण, निमंत्रण घेऊन जाणारा मनुष्य ] हें क्रियावाचक व करणवाचकही आहे.

त——हा प्रत्यय लागून अपूर्णक्रियाद्योतक कृदन्त अव्ययें सर्व धातूंपासून साधतात. प्रथमताख्याताचे प्रत्यय लागण्यापूर्वीं धातूंस जे विकार होतात, तेच विकार होऊन हीं कृदन्तें साधतात. अकारान्त सकर्मक

धातूंस होणारा इकारादेश त ह्या प्रत्ययापूर्वीं विकल्पेंकरून दीर्घ लिहिण्याची चाल आहे. ही चाल अन्तींच्या अपूर्णोच्चरित अ ह्या स्वरामुळें पडली आहे. जसें:—करित; करीत; आणित, आणीत; पण पडत, जात, घेत, इ०. ह्या कृदन्ताचा संयुक्त कियापदें बनण्यांत उपयोग होतो.

अपवाद—ईकारान्त धातु प्रथमताख्याताचे प्रत्ययांपूर्वीं ऱ्हस्व होतात. [ जसें:—पितो, वित्ये, भितात, इ०. ] परंतु ह्या त प्रत्ययापूर्वीं ते दीर्घच राहतात. जसें:—पीत, वीत, भीत, इ०. ] कारण उघडच आहे की, प्रथमताख्याताचे रूपांत अन्तीं अपूर्णोच्चरित अ नाहीं व तो या कृदन्तांत आहे.

[ अ ] ह्या कृदन्ताचा क्वचित् नामाप्रमाणें उपयोग झाल्याचीं थोडी उदाहरणें आहेत. जसें:—उगवत [ पूर्व दिशा ], मावळत [ पश्चिम ], वेत [ ह्यामध्यें वी धातूस त हा प्रत्यय लागतांना अन्त्य ईस गुण झाला आहे. वेत म्हणजे विणें. ], अडात [ पाटाचा पाय अडण्याचें साधन. ]

[ आ ] कधीं कधीं ह्या कृदन्तांचा क्रियाविशेषणांप्रमाणें उपयोग होतो जसें:—माझ्या डोळ्यांदेखत तें घडलें, त्याला नकळत तो निसटून गेला, चुकतमाकत म्हणतो, हांसत कर्म करावें भोगावें रडत तेंचि परिणामीं. या उदाहरणांमध्यें देखत, नकळत, चुकतमाकत, हांसत रडत, हीं क्रियाविशेषणें आहेत हें उघड आहे.

[ इ ] याचा कधीं कधीं पद्यांत वर्तमानकाळाचे अर्थी उपयोग होतो. जसें:—मकरकुंडलें, तळपती श्रवणीं, कंठिं कौस्तुभमणि, विराजीत [ विराजतो ]—तुकाराम.

( ती—ते )—सर्व धातूंस हा प्रत्यय लागून कर्तृवाचक विशेषणें होतात. तीं आकारान्त असल्यामुळें लिंगवचनाप्रमाणें बदलतात. प्रथमताख्यातीचे रूपांप्रमाणेंच हें कृदन्त साधतें. जसें: देता, घेता, जाता, येता, खातें, पितें, शिकविता, रडता, हंसता, खेळविता, बोविता, मारविता, न्हाती, धुती, दुभती इ०. उदा०:—देता, घेता, जाता,

येतां, मनुष्य; खातें, पितें, नांदतें, घर; इ०. ह्यांचाही संयुक्त क्रियापदांचे कामीं उपयोग होतो. तो पुढें पहावा.

टीप--भावता, निसुटता, ओझरता, इ० कांहीं विशेषणें हीं मूळ ह्या प्रकारचीं कृदन्तेच होत, हें ध्यानांत ठेवाव.

**तां**—ह्या प्रत्ययानें कृदन्त अव्ययें साधतात. सर्व धातूंस हा प्रत्यय लागतो वरील तकृदन्तास **आं** हा कालाधिकरणवाचक प्रत्यय लागून तांकृदन्तें तयार होतात.

[ अ ] हें तांकृदन्त दीर्घस्वरान्त असल्यामुळें ह्याच्या उपान्त्य अक्षरांतील दीर्घ ई व ऊ हे स्वर नेहमी ऱ्हस्व होतात. जसें:—करितां, पितां, धुतां, इ०

[ आ ] 'क्रियेच्या वेळीं' अशा अर्थानें या कृदन्ताचा क्रियाविशेषणाप्रमाणें उपयोग होतो. जसें:—तो जातां जातां म्हणाला, पडतां, पडतां सांवरला, तो हांहां म्हणतां पळाला, इ०.

आहो जातां येतां उठत बसतां कार्य करितां
सदा देतां घेतां वदनिं वदतां ग्रास गिळितां
घरीं दारीं शय्येवरि रतिसुखाचे अवसरीं
समस्तांची लज्जा त्यजुनि भगवच्चिंतन करीं ॥—वामन.

टीपः—'क्रियेच्या वेळीं' या अर्थानें या कृदन्ताचा उपयोग पद्यांत फार होतो. ह्मणून पद्यांतील उदाहरण दिलें. गद्यांतही तसा उपयोग आहे, तथापि गद्यांत या प्रसंगीं त्याची बहुधा पुनरुक्ति होते हें वरील उदाहरणांवरून कळेलच. या अर्थीं त्याचा एकेरी उपयोग गद्यांत कमी. एकेरी उपयोग करितांनां त्याचे पुढें आणखी नां हा प्रत्यय लागतो, म्हणजे 'क्रियेच्या वेळीं' या अर्थीं तां प्रत्ययान्त कृदन्तापेक्षां पुढील तांनां प्रत्ययान्त कृदन्ताचाच गद्यांत प्रचार विशेष आहे. तथापि तां प्रत्ययान्ताचा एकेरी उपयोग गद्यांत क्वचित् आढळतो—जसें:—उद्यां नऊ वाजतां ये, त्यानें न समजतां हें काम केलें, न कळतां, खरें पहातां तुमचें करणें अयोग्यच, इ०.

**तांना**—हें कृदन्तही सर्व धातूंपासून होऊन त्याचा 'क्रियेच्या वेळीं' या अर्थानें नेहमीं उपयोग होतो. जसें:—करितांनां, बोलतांनां, जातानां देतांनां करवितांनां, भरवितांनां, इ०

टीप १:—या कृदन्तांतील अखेरच्या अक्षरांतील म्हणजे ना वरील बिंदु लेखनप्रचारांत वैकल्पिक आहे; आणि ना हें अक्षर अनुनासिक पडल्यामुळ त्यावरील

बिंदु गाळण्याकडेच लेखकांचा विशेष कल दिसतो. बाकी हा नां मूळ संस्कृत षष्ठीचा अनेकवचनाचाप्रत्यय असल्यामुळें व्युत्पत्तिदृष्ट्या त्याजवर बिंदु असणें योग्य आहे. तथापि लिपीमध्यें त्याचा विकल्प आहे हें निःसंशय आहे.

टीप २:—क्रियेच्या वेळीं असा अर्थ असतां तां प्रत्ययान्त कृदन्ताच्या एकेरी उपयोगापेक्षां तांनां प्रत्ययान्त कृदन्ताचाच गद्यांत विशेष प्रचार आहे, तरी याच अर्थी आणखी एक पर्याय आहे; आणि त्याचा प्रचारही फार आहे. तो असाः अमुक क्रियेच्या वेळीं असें म्हणावयाचें असतां त्या धातूच्या त प्रत्ययान्त कृदन्ताचे पुढें अस धातूचें तां प्रत्ययान्त किंवा तांनां प्रत्ययान्त कृदन्त जोडण्याचा फार प्रचार आहे. जसेंः—रामा स्टेशनावर जात असतां (त्याच्या जाण्याची क्रिया चालली होती तेव्हां) मी त्यास ही गोष्ट सांगितली, वक्ता बोलत असतांनां मध्येंच कोणी बोलूं नये, इ०. अशा ठिकाणीं जात असतां, बोलत असतां, जात असतांनां, बोलत असतांनां, ह्यांस कृदन्तात्मक संयुक्त क्रियाविशेषण म्हणावें. जात, बोलत आणि असतां किंवा असतांनां ह्यांचें अलग अलग व्याकरण करणें ठीक नव्हे, तसें केल्यानें अर्थाची फार हानि होते. म्हणून दोहोंस मिळून कालवाचक संयुक्त क्रियाविशेषण असें व्याकरण करणेंच चांगलें.

टीप ३:—त, तां तांनां, या प्रत्ययांनीं बनणाऱ्या सर्व कृदन्तांस वर्तमानकालवाचक असें बऱ्याच वैयाकरणांनीं म्हटलें आहे. तें बहुधा इंग्रजी व्याकरणास अनुसरून असावें. परंतु हीं कृदन्तें तिन्ही काळीं येत असल्यामुळें तें नांव ठीक नाहीं-ही गोष्ट ध्यानांत येऊनच कीं काय खेरांनीं यांस समानकालवाचक असें म्हटलें आहे. परंतु दुसरींही बरींच कृदन्तें समानकालवाचक असल्यामुळें यांसच तें नांव देण्यांत विशेष मतलब नाहीं हें उघड आहे. एवंच व्याकरणामध्यें अशीं नांवें देणें धोक्याचेंच होय. म्हणूनच या ग्रंथांत तकृदन्त, ताकृदन्त, तांकृदन्त, लाकृदन्त, लेलाकृदन्त, ऊनकृदन्त, इ० सूचक, सुबोध, सार्थ, आणि अनपवादक नांवांनीं त्यांचा उल्लेख केला आहे.

ती— ह्या प्रत्ययानें कांहीं कृदन्त नामें होतात.

[ अ ] क्रियावाचक. उदा०—गणती [ गणना ], फिरती [ फेरी ], झडती, पाळती—थी, भरती [ भर ], बढती [ वाढ, यांतील बढ धातु मात्र मराठींत प्रचारत नसून हिंदींत आहे. ] सुकती [ सुकण्याची क्रिया, ओहटी ].

[ आ ] करणवाचक. उ०— खणती [ खणण्याचें साधन, कुदळी ], गळती [ गळण्याचें साधन, अभिषेकपात्र ], ओकती [ ओकण्याचें म्हणजे बाहेर काढण्याचें साधन, पोहरा किंवा बादली ].

**टीप १**—पावती ( आरंभीं याचा अर्थ पावण्याची क्रिया, पोंच, असाच असावा; पण आतां त्यास तद्दर्शक लेख असा अर्थ आला आहे ).

**टीप २**—ह्या ती प्रत्यय व पुढचा तें प्रत्यय हे मूळचे वर आलेल्या ता ह्या प्रत्ययाचींच अनुक्रमें स्त्रीलिंगवाचक व नपुंसकलिंगवाचक रूपें होत असें स्थूलदृष्टीस किंवा सकृद्दर्शनीं वाटतें. तथापि ता प्रत्ययान्त कृदन्त विशेषणांचीं बाह्यतः दिसणारीं जीं हीं स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी रूपें त्यांचा पुल्लिंगी रूपांहून वेगळा अर्थ व वेगळा उपयोग दिसत असल्यामुळें त्यांची पुन्हा स्वतंत्र प्रत्यय म्हणून गणना केली आहे. गणती, फिरती, खणती, ह्यांस स्त्रीलिंगी नामें म्हणून जो अर्थ आहे त्याचा आणि गणता, फिरता, खणता, ह्या विशेषणांचीं जीं गणती फिरती, खणती, हीं स्त्रीलिंगी रूपें ह्यांचा अर्थाअर्थीं संबंध नाहीं. गणती, फिरती, खणती, ह्या विशेषणांचा गणणारी, फिरणारी, खणणारी, असा अर्थ आहे; आणि गणती, फिरती, खणती, ह्या स्त्रीलिंगी नामांचे वर दिलेले अर्थ ह्या अर्थांपासून अगदीं भिन्न आहेत, आणि त्या अर्थाचे दृष्टीनें त्यांचें पुल्लिं किंवा नपुंसकलिंग होऊंच शकत नाहीं हें उघड आहे. असेंच पुढील तें प्रत्ययान्त कृदन्तासंबंधानें समजावें. एवंच ती व तें ह्यांस स्वतंत्र प्रत्यय मानणें अवश्य आहे हें निर्विवाद आहे.

**तें** — ह्या प्रत्ययानें कांहीं क्रियावाचक नामें होतात. जसें :— गळतें ( गळणें, छपरांतून पाणी गळणें, असें पाणी गळण्याचें स्थान ), पडतें ( पडणें, पड; उदा०—पडतें घेणें = कमीपणा घेणें ) भरतें ( भरणें, भर; उदा०— त्याला आनंदाचें भरतें आलें ), इ०.

दुभतें हा शब्द असाच दुभणें ह्या धातूपासून तें प्रत्यय लागून झाला आहे. ह्या नामाचा मूळ अर्थ दुभणारें म्हणजे दूध देणारें गुरूं असा आहे. पण त्याचा दुधासंबंधाचें सर्व काम म्हणजे दूध तापवून तें विजरणें, ताक करणें, लोणी काढणें, तें कढवून त्याचें तूप करणें, वगैरे काम, अशा अर्थीही उपयोग होतो, जसें :— तुमच्या घरीं दुभतें कोण करितें ? ह्या अर्थाचेपुरता ह्या शब्दाचा येथें अन्तर्भाव केला आहे. दूध देणारें ह्या अर्थानें तें पूर्वींच्या ता प्रत्ययान्त कृदन्त विशेषणाचें नपुंसक रूप असून त्याचा नामाप्रमाणें उपयोग होतो असें म्हटलें पाहिजे.

**त्रा** — भी—भित्रा किंवा भितरा ( भिणारा ), हें कर्तृवाचक विशेषण आहे. भितरा या रूपांत तरा असा प्रत्यय मानावा.

**नें** — उलथनें ( उलथावयाचें साधन, कलथा, काविलथा ).

**प**— कांहीं क्रियावाचक नामें प्रत्ययानें साधतात. जसें:— कांडप ( कांडण ), दळप ( दळण ), वाढप ( वाढणें ), रांधप ( रांधणें, स्वयंपाक ), वांटप ( वांटणी मालमत्तेची ), तळप.

**पी**—ज्या धातूंपासून प प्रत्ययान्त कृदन्तें साधतात, त्याच धातूंपासून बहुधा पी प्रत्ययान्त कर्तृवाचक पुल्लिंगी नामें साधतात. जसें:— कांडपी ( पु० ), कांडपीण ( स्त्री० ), दळपी ( पु० ), दळपीण ( स्त्री ), वाढपी ( पु० ), वाढपीण ( स्त्री० ), इ०.

**पट्टी**—ह्या प्रत्ययानें निंदावाचक धातूंच्या अर्थास अधिक तीक्ष्णता प्राप्त होऊन भाववाचक नामें साधतात जसें:— खरडपट्टी, तासटपट्टी, भोंसडपट्टी, भादरपट्टी, उधळपट्टी, इ०. उधळपट्टी या शब्दाचा फाजील किंवा बेताल खर्च असाही एक अर्थ प्रचारांत आहे.

**पुटा**— यास कर्तृवाचक अर्थ आहे. उदा०:— पळपुटा [ पळणारा ].

**पें**—जोडा-जोडपें ( जोडी-युग्म ). हा स्वार्थी प्रत्यय आहे.

**मट**—( हा प्रत्यय माती शब्दाचें रूपांतर दिसतो. ) जळमट ( जळणाच्या धुरानें छपरास किंवा भिंतीस लागून लोंबणारीं जीं काळीं कोळिष्टकें असतात त्यांत जळमटें म्हणतात. )

**बू**—खा-खाबू ( खाण्यावर ज्याचें विशेष लक्ष आहे असा ).

**या**—कित्येक निवळ मराठी धातूंस हा प्रत्यय लागून कर्तृवाचक विशेषणें तयार होतात. या विशेषणाचे अर्थांत निंदा, तिरस्कार किंवा न्यूनत्व ह्यांचा थोडासा ध्वनि आहे. हा प्रत्यय एकाक्षरी धातूंस लागत नाहीं. आणि ज्या इतर धातूंस लागतो त्यांचा अन्त्य स्वर या प्रत्ययापूर्वीं लुप्त होतो. जसें:—बश्या, झड्या, पोंश्या, रड्या, लाट्या, हग्या, उचल्या, ओरड्या, उधळ्या, उपट्या, खोक्या, नाच्या, मऱ्या, रोडया, इ०. अशा प्रकारचीं कांहीं कृदन्त विशेषणें समासान्तीं दृष्टीस पडतात. जसें:—आग-लाऱ्या, लांकुड-तोडया, वाघ माऱ्या, इ० कधीं कधीं विशेषणासही हा प्रत्यय लागून क्रियाविशेषण साधतें. जसें—उभ्याउभ्या,

**र**—या प्रत्ययानें थोडींशीं ( अ ) क्रियावाचक नामें आणि ( आ ) विशेषणें होतात. जसें:—क्रियावाचक नामें:—टोकर, फुंकर, इ०. विशेषणें:—चुकर ( ह्याचें चुकार असेही रूप आढळतें ), ताठर, इ०.

**रड**—हगरड, मुतरड, इ०. म्हणजे त्या त्या क्रियेचें विकारद्योतक आधिक्य किंवा अतिशयत्व. ह्यामध्यें रड असा स्वतंत्र शब्द मानून सबंध शब्द सामासिक होय असें म्हटलें तरी चालेल.

**रा**—( री– रें ) ह्या प्रत्ययानें कांहीं धातूंपासून 'त्या क्रियेनें युक्त' किंवा 'ती क्रिया वारंवार करणारा' ह्या अर्थाचीं विशेषणें होतात. तीं आकारान्त असल्यामुळें लिंगवचनाप्रमाणें बदलतात. जसें—हंसरा–री–रें, कांपरा–री–रें, चावरा–री–रें, नाचरा, बुजरा, साजरा, सांडरा. लाजरा, दुखरा, इ०.

( अ ) ह्या प्रत्ययानें कांहीं नामेंही साधतात. पुल्लिंगी—विकरा ( विक्रय, खप ), भोंवरा. स्त्रीलिंगी—विकरी ( खप ), खुपरी ( खुपणारी सूज, एका प्रकारचा पापणीचा विकार ), मुतरी—( मुतण्याची जागा ), हगरी ( शेतखाना ), इ०. नपुंसकलिंगी—कांपरें ( कंप ), धांवरें—( एका प्रकारचा रोग ).

**ला, लेला**—ह्या दोन्ही प्रत्ययांनीं पूर्णक्रियाद्योतक कृदन्त विशेषणें साधतात व तीं आकारान्त असल्यामुळें लिंगवचनाप्रमाणें बदलतात. लाख्याताचीं रूपें ज्या तऱ्हेनें बनतात, त्याच तऱ्हेनें हीं तयार होतात. लाख्याताचें तृतीय पुरुषीं एकवचन व हें लाकृदन्त दिसण्यांत एकच. लेला प्रत्ययान्त कृदन्त हें अर्थात् ला प्रत्ययाचे पाठीमागें ले अक्षर लाविलें म्हणजे बनतें, म्हणजे ला आणि लेला हे प्रत्यय धातूंस एकाच प्रकारें लागतात. या दोन प्रत्ययांचे उपयोगांतील फरक इतकाच कीं लाप्रत्ययान्त कदन्ताचा संयुक्त क्रियापदाचे कामीं उपयोग होतो; आणि लेला प्रत्ययान्त नेहमीं विशेषणाप्रमाणेंच उपयोगांत येतें; त्याचा संयुक्त क्रियापदांचे कामीं उपयोग होत नाहीं. ला प्रत्ययान्त कृदन्ताचाच तसा फार उपयोग आहे. ला प्रत्ययान्त कृदन्ताचा विशेषणाप्रमाणेंही उपयोग होतोच, म्हणजे याचे दोन उपयोग आहेत; पण लेला प्रत्ययान्ताचा मात्र एकच, विशेषणाप्रमाणें, उपयोग होतो. ला प्रत्ययान्त कृदन्ताचा

संयुक्त क्रियापदांचे कामीं होणारा उपयोग संयुक्त क्रियापदांचे विवेचनांत सविस्तर पहावा. तेव्हां आतां दोन्ही कृदन्तांच्या विशेषणत्वाचीं उदाहरणें देतों. जसें:—पिकलें पान, पडलें फळ, मेला माणूस, निजलेला मनुष्य, इ० ह्या विशेषणांचा संबंध म्हणजे ह्यांचीं विशेष्यें अनेक प्रकारचीं असतात. तीं येणेंप्रमाणें:—

( अ ) कर्म—लिहिलेला ग्रंथ, वाचलेलें पुस्तक, मारलेला वाघ, इ० या उदाहरणांतील ग्रंथ, पुस्तक, वाघ, हीं विशेष्यें त्यांच्या विशेषणांतील लिह, वाच, मार ह्या धातूंचीं मूळचीं कर्में आहेत हें उघड आहे.

( आ ) करण—लिहिलेली लेखणी, बांधलेली दोरी, शिवलेली सुई, इ०. या ठिकाणीं लिहिलेली म्हणजे जिनें लिहिलें गेलें ती असा अर्थ आहे. याचप्रमाणें अन्यत्र समजावें.

( इ ) संप्रदान—दिलेला ब्राह्मण, दिलेला मुलगा, म्हणजे ज्या मुलास किंवा ब्राह्मणास दक्षिणा, बक्षिस, वगैरे देऊन झालें आहे असा.

टीप—सकर्मक धातूंपासून झालेल्या ह्या कृदन्तांचीं वरील तिन्ही अर्थीं विशेष्यें असतात. अकर्मक धातूंपासून झालेल्या ह्या कृदन्तांचीं कर्ता आणि अधिकरण या दोनच अर्थीं विशेष्यें आढळतात. त्यांचीं उदाहरणें:—

( इ ) कर्ता—पिकलेलें पान, जळलेलें लांकूड, पडलेला मुलगा, इ०. या उदाहरणांमधील पान, लांकूड, व मुलगा, हीं विशेष्यें आपआपल्या विशेषणांतील, पिक, जळ आणि पड, ह्या धातूंचे मूळ कर्ते आहेत हें उघड आहे.

( उ ) अधिकरण—राहिलेलें घर, बसलेली जागा, इ०. या ठिकाणीं राहिलेलें म्हणजे ज्यांत राहून झालें तें, आणि बसलेली म्हणजे ज्या जागीं बसून झालें ती, असा अर्थ,

टीप :—१—कांहीं सकर्मक धातूंपासून साधिलेल्या या प्रकारच्या विशेषणांचा विशेष्यें त्यांचीं मूळ कर्में किंवा त्यांचे मूळ कर्ते ह्यांपैकीं कोणतींही होऊं शकतात. जसें:—एकदां बोललेल्या मनुष्यानें ( कर्ता ) पुन्हा बोलावयाचें नाहीं, बोललेलें भाषण ( कर्म ) बोलण्यांत काय अर्थ ? शिकलेल्या माणसानेंही ( कर्ता ) असें म्हणावें हें विचित्र होय. शिकलेला धडा ( कर्म ) तुला येऊं नये ? ह्याचप्रमाणें लिहिलेला कागद, आणि लिहिलेला मुलगा; चावलेला कुत्रा ( कर्ता ) आणि चावलेला पाय ( कर्म ); नेसलेलें धोतर ( कर्म ) आणि पितांबर नेसलेला मनुष्य ( कर्ता ); पांघरलेला शेला (कर्म), आणि शेला पांघरलेला मनुष्य [ कर्ता], इ०.

टीप २—हीं लेला-प्रत्ययान्त सकर्मक धातूंचीं कृदन्तें कर्तृगामी किंवा कर्तृनिम्न असतात, त्यावेळीं त्या धातूंचीं कर्मे बहुधा त्यांचे मागें येतात. जसें :—काम केलेला, फार देश हिंडलेला, विपत्ति भोगलेला, हाल सोसलेला, इ०.

टीप ३—या दोन्ही कृदन्तांस भूतकालवाचक असें वैयाकरणांचें नांव आहे. पण हीं तिन्हीं काळीं येत असल्यामुळें तें नांव योग्य नाहीं हें उघड आहे.

ला—ह्या प्रत्ययानें कांहीं थोडींशीं कृदन्त नामें होतात. जसें:—खवला (खोबरें खवण्याचें साधन), खोकला (खोकण्याची क्रिया), दाखला [दाखविण्याचें म्हणजे स्पष्ट करण्याचें साधन, उदाहरण, दृष्टांत].

ह्या प्रत्यय वरील ला–प्रत्ययापासून वेगळा मानण्याच्या कारणांसाठीं वरील ती प्रत्ययाखालील दुसरी टीप पहा.

लें—ह्यानेंही कांहीं कृदन्त नामें साधतात. जसें:—वाढलें (न्हाण-वलीला वाढून नेलेलें अन्न) गांठलें (गांठलेल्या थोड्याशा पुतळ्या, एक दागिना) घाटलें (घाटून केलेलें खिरीसारखें एक अन्न) इ०.

ल्या—(अ) जागल्या, (जागणारा, पहारेकरी)

(आ) यानें कांहीं क्रियाविशेषण अव्ययें साधतात. जसें:—उठल्या-बसल्या, (कांहीं) केल्या, पडल्या पडल्या, इ०. ह्याचे अन्तीं कोणी बिंदु देतात, म्हणजे अन्त्य स्वर अनुनासिक करितात.

व—ह्या प्रत्ययानें क्रिया, कर्म, किंवा भाव दाखविणारीं स्त्रीलिंगी नामें साधतात. जसें:—देवघेव, (देण्या–घेण्याची क्रिया, किंवा दिला घेत-लेला पैसा.

वट—धु–धुवट (धुतलेलें),

वटा—भाग–भागवटा (भागलेपणा, थकवा, शीण,) भोगवटा [भोग, उपयोग].

वटी—फुग–फुगवटी, [फुगा, वायूनें फुगणें]. या शब्दापासूनच फुगोटी हा शब्द झाला आहे. फुगवटीमधील व चा उ होऊन त्याचा मागील अ शीं संधि झाला आहे.

वड—लागवड [लागण्याची दशा, जसें:—झाड लागवडीस आलें आहे. लागण्याची किंवा लावण्याची क्रिया; जसें:—या शेताची लागवडच नीट झाली नाहीं.]

**वण**—हगवण [ अति हगण्याचा विकार, अतिसार ] आंबवण [ आंबवण्यास टाकलेलें किंवा आंबवलेलें, यापासूनच आंबोण हा शब्द झाला ], भिजवण [ भिजूं घातलेला पदार्थ ], भरवण [ भर करण्याकारितां आणलेले जिन्नस, किंवा माल, किंवा पूर्ण भरल्याची स्थिति ], धुवण, [ ज्या पाण्यानें तांदुळ वगैरे धुतले तें पाणी ].

**वय्या**—हा कर्तृत्ववाचक हिंदी प्रत्यय दिसतो. गवय्या, लढवय्या, बजवय्या, इ०

**वळ**—हा प्रत्यय ओळ शब्दापासून झाला असावा. गुतवळ, गुंतवळ, [ गुंतलेल्या केसांची जुडी, गुंतलेले केंस, तुटलेला केंस असाही अर्थ होतो ].

**वत**—हा प्रत्यय पत्र शब्दापासून झालेला दिसतो. सुखवत [ सुखलेलें पत्र, केळीचें सुकलेलें पान ], रुखवत [ रुक्ष + पत्र = सुकें पान—नवऱ्या मुलास फराळाचें सुकें अन्न वाढलेलें पात्र किंवा पान ]

**वळी**—हा प्रत्ययही ओळी शब्दापासूनच झाला असावा. जसें:—उखिरवळी [ उखिरण्याचें म्हणजे उकरून निघालेली ओळ म्हणजे घरांतील जमीन खरवडन निघालेली माती ].

**वा**—[ अ ] या प्रत्ययानें क्रिया किंवा भाव दाखविणारीं कांहीं नामें साधतात. जसें:—येवा, जावा, थकवा, बोलवा, रुसवा, ठेवा, देवा, लेवा, इ०.

[ आ ] या प्रत्ययानें थोडींशीं विशेषणेंही बनतात. जसें:—नटवा [ नटणारा ], रडवा [ रडणारा, रडण्याची संवय आहे ज्याला ].

**वा**—( वी, वें )—हा प्रत्यय लागून होणारें कृदन्त आणि वाख्याताचें तृतीय पुरुषीं एकवचनी रूप हीं दोन्ही समान आहेत. हें वाख्याताच्या रूपांप्रमाणेंच लिंगवचनानुसार फिरतें. जसें:—करावा, करावी, करावें; करावे, कराव्या, करावीं; इ०.

[ अ ] ह्या कृदन्ताचा अर्थ वाख्याताच्याप्रमाणें विधि, कर्तव्य, आवश्यकता, अशाच प्रकारचा आहे. आणि वाख्याताच्या रूपांप्रमाणेंच सकर्मक धातूंपासून साधलेलीं हीं कृदन्तें बहुधा कर्मणि असतात, आणि अकर्मक धातूंपासून साधलेलीं हीं बहुधा भावी असतात. तथापि दोहोंचा कर्तरि उपयोगही होतो. ह्या कृदन्ताचा संयुक्त क्रिया

पदांचे कामीं फार उपयोग होतो. तो संयुक्त क्रियापदाचें विवेच-नांत पहावा.

( आ ) या कृदन्तास स, ला, चा, हे तीन प्रत्यय लागून त्याचीं आणखी तीन रूपें तयार होतात. जसें:—करावयास, करावयाला, करावयाचा; जावयास, जावयाला, जावयाचा, इ० ह्यांतील वकार गळून होणारीं करायास, करायाला, करायाचा, जायास, जायाला, जायाचा, अशींही रूपें प्रचारांत आहेत. या दोन्ही प्रकारच्या रूपांतील प्रत्यय गळून उरणारीं करावया, जावया, कराया, जाया, हीं रूपें कवितेंत आढळतात. शिवाय ला व चा हे प्रत्यय दीर्घ: स्वरान्त असल्यामुळें ह्या प्रत्ययांनीं होणाऱ्या वकारहीन रूपांच्या उपान्त्याक्षरांतील ' या ' चे जागीं विकल्पेंकरून य होतो. म्हणजे करायाला, करायाचा, ह्यांचे बराबर करायला, करायचा, अशीं अकारान्त उपान्त्याक्षरानें युक्त रूपही आढळतात, इतकेंच नव्हे तर ह्यांचाच व्यावहारिक भाषेंत फार प्रचार आहे.

**शहा–शा**—दपटशहा–शा [ दपटणें म्हणजें धाक, तगादा ].

**शी**—मोडशी [ अपचन ].

**स**—अडस,

**सर**—आटपसर, आवळसर. हीं कृदन्त विशेषणें आहेत.

**सा**—वळसा ( वळ ह्या धातूपासून क्रियावाचक नाम, वेढा, फेरा ).

**सुरा**—निजसुरा ( अर्धवट निजलेला ). आळसुडा ( आळशी ) ह्यांतील सुडा व प्रकृत सुरा हे एकच दिसतात.

**स्त**—ह्या प्रत्यय संस्कृत स्थ ह्या प्रत्ययापासून झाला असावा. **नेमस्त** [ सं. नियमस्थ, नियमनिष्ठ, बेताचा ].

**ळ** —भोंवळ [ भोंवण्याची विकृति, चक्कर ]; ठोकळ [ मोठा, मजबूत ]. पहिलें नाम व दुसरें विशेषण आहे.

---

# अध्याय ५.

## प्रत्ययघटित साधितशब्द—पुढें चालू.

४०२. गेल्या अध्यायांत निवळ मराठी कृदन्तें सांगितलीं. या अध्यायांत त्याचप्रमाणें निवळ मराठी तद्धितांचा संग्रह करावयाचा आहे. धातूंशिवाय इतर कोणत्याही शब्दापासून प्रत्ययानें साधलेल्या रूपास **तद्धित** म्हणतात. यांसच दादोबांनीं शब्दसाधितें असें म्हटलें आहे. शब्दसाधितें या नांवांतील 'शब्द' या शब्दाचा अर्थ धातूंशिवाय इतर शब्द असा आहे, हें दादोबांनीं सांगितलेंच आहे.

# निवळ मराठी तद्धितें.

अथवा

## शब्दसाधितें.

**अ** — ह्या प्रत्ययानें कांहीं साधित धातू होतात.

[ अ ] नामधातूः—दूण – दुणणें; कानस – कानसणें, थोबाड – थोबाडणें, बुधवार – बुधवारणें, ( बुधवारीं विणें ), फुल – फुलणें; आंबणें, चारणें.

[ आ ] विशेषणधातु :—आंखूड – आंखुडणें, लांब – लांबणें,—गढूळ—गढूळणें.

टीप—नामांस व विशेषणांस धातूंचें रूप येतांना पररूपसंधीनें अ प्रत्यय लागतो असें म्हणावें; नाहीं तर नामें व विशेषणेंच धातूप्रमाणें उपयोगांत येतात असें म्हणावें. यांस नामधातु व विशेषणधातु असें म्हणतात. या दोन्ही ठिकाणीं उपान्त्य दीर्घ ऊस बहुधा—ऱ्हस्वत्व येतें. नामांस व विशेषणांस प्रत्यय लागून व अन्य विकृतीनें होणाऱ्या धातूंस नाम—साधित व विशेषण—साधित धातू असें म्हणावें. म्हणजे दोहोंमधील फरक व्यक्त होईल.

[ इ ] हा प्रत्यय कांहीं नामांस पररूप संधीनें लागून नामसाधित धातु होतात. जसें:—सुरकुती – सुरकुतणें, गळाठा—गळाठणें, पिसारा—पिसारणें.

**अट** — हा प्रत्यय पररूप संधीनें लागून कांहीं नामसाधित धातू होतात. जसें:—पिसा – पिसाटणें, चीक – चिकटणें.

**अड**—या प्रत्ययानें पररूपसंधीनें कांहीं नामसाधित धातू होतात. जसें:—चिरमी-चिरमडणें.

**अव**—हा प्रत्यय पररूप संधीनें लागून कांहीं नामसाधित व विशेषण-साधित धातू होतात. जसें:—पान्हा – पान्हवणें, ओला – ओलवणें.

**अळ**—यानेंही कांहीं नामसाधित धातू बनतात. संधी पररूप होतो. जसें:—चकि – चिघळणें.

**आ**—[ अ ] हा प्रत्यय कांहीं विशेषणांस लागून धर्मवाचक नामें होतात. जसें:—ताठ–ताठा, चिकट–चिकटा, गारठ–गारठा, गरम–गरमा, सफेत–सफेता, खराब–खराबा.

[ आ ] क्वचित् नामासही हा प्रत्यय लागून धर्मवाचक नाम होतें. जसें:—दुजोर–दुजोरा.

[ इ ] क्वचित् एका सामान्य नामापासूनही या प्रत्यानें दुसरें सामान्य-नाम होतें. जसें:—अभ्र [ मेघ ] – अभ्रा [ आवरण, गादीचें किंवा उशीचें वेष्टण, खोळ ], सावकार–सावकारा [ सावकारांचा समूह किंवा सावकार ज्या ठिकाणीं राहतात ती जागा किंवा तो रस्ता ], सराफ–सराफा [ सावकार शब्दाप्रमाणेंच ], चुर–चुरा, जोड–जोडा.

[ ई ] दांत–दांता, बाळ–बाळा, इ० शब्दही अशा प्रकार-चेच होत असें वाटण्याचा संभव आहे. परंतु या शब्दांतील आकारान्त रूप हें संस्कृत प्रथमेच्या विसर्गयुक्त एकवचनापासून आलेलें आहे. असा प्रकार विशेषनामांसंबंधींही आढळतो. जसें:—राम रामा, गोपाळ–गोपाळा, इ०. याप्रमाणें कांहीं ठिकाणीं संस्कृत मूळ शब्दापासून एक, रूप इ रूप आणि त्याचे प्रथमेच्या एकवचनापासून दुसरें रूप, अशीं दोन दोन रूपें मराठींत येतात. ही गोष्ट पूर्वीं सांगितलीच आहे. तेव्हां या शब्दांतील आ आणि अभ्रा, सावकारा, सराफा, इ० शब्दांतील आ हे निरनिराळे आहेत हें उघड आहे.

( उ ) कांहीं नामांस हा प्रत्यय लागून विशेष्यनिघ्न म्हणजे विशे-ष्याचे लिंगावचनाप्रमाणें बदलणारीं विशेषणें होतात. जसें:—करमर–करमरा [ करमर फळाचे आकाराचा ], मूग–मुगा [ मुगांसारखा ], ऊद–उदा [ उदाच्या रंगाचा ], तहान–तहाना–तान्हा [ तहान

ज्याला आहे तो, अंगावर पिणारा ], वेड—वेडा, खूळ—खुळा, शेंबूड—शेंबडा, कापूस—कापशा, इ०.

टीप —ह्यांपैकीं मुगा व उदा ह्या शब्दांचीं मुगी व उदी अशीं ईकारान्त रूपें अधिक प्रचारांत आहेत.

[ ऊ ] कांहीं विशेषणांस हा प्रत्यय लागून त्याच अर्थाचीं आकारान्त विशेषणें होतात. जसें:—स्वस्त—स्वस्ता—सस्ता, लहान—लहाना, [ ल्हाना—न्हाना हीं दोन रूपें लहाना शब्दाचींच होत; परंतु शिष्ट भाषेंत येत नाहींत. ]

[ ऋ ] समोर ह्या क्रियाविशेषणास हा प्रत्यय लागून सामोरा हें लिंगवचनाप्रमाणें बदलणारें दुसरें क्रियाविशेषण बनलें आहे. मात्र या प्रत्ययाचे पूर्वी आद्य अक्षरांतील अ ह्या स्वराची वृद्धि झाली आहे.

[ ऌ ] पदार्थाचें स्थूलत्व दाखवावयाचें असतां तत्पदार्थवाचक शब्दाचे अन्त्य स्वराच्या जागीं ह्या आ प्रत्ययाचा उपयोग होतो. जसें:— विळी—विळा, पोळी—पोळा, पानगी—पानगा, भाकरी—भाकरा, सुरी—सुरा, चूल—चुला, डबी—डबा,

टीप १—हा प्रत्यय बहुधा ईकारान्त स्त्रीलिंगी नामांस लागतो. क्वचित् अकारान्त स्त्रीलिंगी शब्दांसही आ प्रत्यय लागलेला आढळतो. चूल-चुला हें उदाहरण वर दिलेंच आहे. परंतु अकरान्त स्त्रीलिंगी नामास स्थूलत्वार्थी ईश्वर शब्द जोडण्याची बरीच चाल आहे. जसें:—दऊत—दउतेश्वर, लवंग—लवंगेश्वर जीभ—जिभेश्वर, टीच—टीचेश्वर, शिंप—शिंपेश्वर, इ०. ईश्वर हा शब्द इतर शब्दांसही प्रथम अकारान्त रूप देऊन नंतर नियमानुसार संधीनें जोडण्यांत येतो. जसें:—पोळी—पोळेश्वर. विळी—विळेश्वर, पाट—पाटेश्वर, सोटा—सोटेश्वर, इ०.

टीप २—ह्या शब्दांसंबंधानें दादोबांनीं जें लिहिलें आहे तें स्मरणीय आहे. 'असे शब्द स्वच्छंदानें व विनोदानें हवे तितके साधितां येतील; जसें:—माकरा, छत्रा, झोळा, घोंघटा, साडा, लेखणा, इ०. परंतु साधणारांनीं मात्र जे चौघांच्या कानास गोड लागतील त्यांशिवाय भलतेच साधून आपला विनोद करून घेऊं नये, इतकें सांभाळावें.'

[ ए ] सादृश्यार्थी—चिमटी—चिमटा, तुंबी—तुंबा.

[ ऐ ] द्वार—द्वारां; येथें आ प्रत्ययानें नामापासून अव्यय झालें आहे. मूळ 'द्वारां' या सप्तमीचें रूपांतील अन्त्य बिंदु उडून द्वारा हें रूप साधलें आहे.

**आं**—[ अ ] हा प्रत्यय अधिकरणार्थी आहे. हा कांहीं अव्ययांस लागतो. जसें :— मागें—मागां, पुढें—पुढां, मग—मगां, मघां, इ०. हीं आं प्रत्ययान्त अव्ययें बहुधा कवितेंत येतात.

[ आ ] उदय—उद्यां [ उदय + आं ] हें नामसाधित अव्यय होय.

**आई** —[ अ ] हा प्रत्यय कांहीं विशेषणांस व नामांस लागून धर्मवाचक नामें साधतात. जसें: — शीतळ—शीतळाई, धीट—धिटाई, भला-भलाई, दांडगा—दांडगाई, चतुर—चतुराई, नवा—नवाई, बंड—बंडाई [ पुंडाई ], कमताई, चिकणाई, बारीक—बारकाई, शिष्ट—शिष्टाई.

[ आ ] ह्या प्रत्ययानें कांहीं सामान्यनामेंही तयार होतात. जसें —मिठा [ मिष्ट; मिठा हा शब्द मराठींत फारसा प्रचारांत नाहीं. तो हिंदी मीठा शब्दापासून आलेला दिसतो ]—मिठाई हा शब्द गोडी या अर्थानें प्रचारांत नाहीं, तर बर्फी, पेढे, इ० गोड पदार्थ या अर्थानें उपयोगांत आहे. ], थंड—थंडाई [ ह्या शब्दाचा गारवा असा अर्थ असतो तेव्हां थंडाई हें धर्मवाचक नाम होय, आणि गारवा उत्पन्न करणारें, उष्णतेचें शमन करणारें औषध, घोंटा, भांग, इ० असा अर्थ असतां थंडाई हें सामान्य नाम होय. ], तिजा—तिजाई [ तिसरा हिस्सा ], चौथा—चौथाई [ चौथा हिस्सा ], सव्वा—सवाई, इ०

टीप—आई प्रत्ययान्त सर्व तद्धित शब्द स्त्रीलिंगी आहेत.

[ इ ] ताब्यांतील प्रदेश, अंमल. उदा०—पेशवाई, मोंगलाई.

**आईत, आयत**—[ अ ] स्थलवाचक. उदा०—बागाईत, बागायत, जिराईत, जिरायत, इ०.

[ आ ] धर्मबोधक. उदा०—कबुलायत.

**आऊ**—ह्या प्रत्ययानें थोडींशीं तद्धित विशेषणें होतात. कर्जाऊ [ व्याजानें लागलेली किंवा आणलेली—रक्कम ], घराऊ [ घरीं झालेला किंवा तयार केलेला—पदार्थ ] कुणबाऊ [ कुणब्याचे संबंधी ] अहेराऊ [ अहेरास योग्य.

**आट**—खालीं—खालाट, वर वलाट.

ह्या शब्दांचे अर्थ अनुक्रमें खालचा व वरचा ठाय [ प्रदेश ] असे आहेत. हे स्त्रीलिंगी असून त्यांचीं खालाटी–ठी, वलाटी–ठी, अशींही रूपें आढळतात.

पेंच–पेंचाट, पेंचाटी [ पेंचांतली जागा म्हणजे संकट. ]

[ आ ] ह्या प्रत्ययानें कांहीं नामसाधित धातू होतात. जसें:—गोफ-गोफाटणें [ घोंटाळ्यांत पडणें ], चोंदा–चोंदाटणें [ खच्चून भरणें ], मूत-मुताटणें [ मुतानें त्रस्त होणें.]

**आटा–टी**—हाकाटा–टी (नांवाचा पुकारा, ओरडा, वारंवार हाका मारणें, हाकाटा पुल्लिंगी व हाकाटी स्त्रीलिंगी आहे,). हाकाटा ह्या शब्दाचें क्वचित् हाकारा असही रूप आढळतें.

**आंटा**—सर-सरांटा; खर-खरांटा, खराटा; फर-फरांटा. हा प्रत्यय स्वार्थीं आहे.

**आंटी**—वेलांटी, घोलांटी.

हा आंटी प्रत्यय काठी शब्दाचा शेष आहे, असें मोल्स्वर्थच्या कोशांत दिलें आहे.

**आठी**—[ हा प्रत्यय काठी शब्दापासून झालेला दिसतो ]. उ०–तूर + काठी = तूरकाठी = तुराठी.

**आड**—हा प्रत्यय मोठेपणा, विस्तार, अधिक्य इत्यादि अर्थीं लागतो. तो असा:—

[ अ ] कांहीं विशेषणांस लागून विशेषणें होतात. जसें:—उंच–उंचाड, मोठा – मोठाड, ओस–ओसाड, इ०.

[ आ ] कांहीं नामांस लागून विशेषणें होतात. जसें:—गुंत–गुंताड [ गुंतलेला ]; रेंदा–रेंदाड [ रेंद्यानें युक्त ]; रेती-रेताड [ रेतीनें युक्त किंवा भरलेला ]; लात–लाताड–लाथाड ( लाता किंवा लाथा मारणारा ) रेताड व लाथाड ह्यांचीं रेताळ, व लाथाड अशीं ळकारान्तही रूपें आढळतात.

( इ ) कांहीं नामांस लागून नामें होतात. जसें:—पाठ पाठाड; भोंकाड [ हा शब्द भोंक शब्दापासून झाला असून रडणाऱ्या मुलाच्या उघडया तोंडास निंदेनें लावण्यांत येतो ]; ह्याप्रमाणें दांताड, खांदाड, गाताड, हत्ताड, छाताड, भिंताड, इ० शब्द समजावे.

[ ई ] नरकाड—डी, टेकाड, हे शब्दही असेच साधले असावे असें वाटतें. टेक शब्द मात्र फारसा प्रचारांत नाहीं. आड प्रत्ययान्त कांहीं नामांचें ईकारान्तही रूप प्रचारांत आहे. टेंकाड ह्याचें टेंकडी असें अनियमित होतें; परंतु दांताडी, गाताडी इ० नियमित आहेत.

[ उ ] ह्या प्रत्ययानें कांहीं नामसाधित व कांहीं विशेषणसाधित धातू बनतात. जसें :—चोंदा—चोंदाडणें, उंच—उंचाडणें ( उंच होणें ), बुचा—बुचाडणें [ बुचा करणें ], लुचा—लुचाडणें [ लुचेगिरी करणें, फसविणें, लुटणें. याच अर्थी लुबाडणें हा शब्द येतो; परंतु त्यांतील लुबा शब्दाचा माग लागत नाहीं. ]

**आडा**—[ अ ] नामांपासून नामें:—पोंवा—पोंवाडा, पवाडा, [ पोंव्यावर म्हणजे मुरलीवर म्हणण्याचें गाणें हा मूळ अर्थ—नंतर स्तुतिपर गाणें, नंतर ऐतिहासिक गाणें, असा अर्थ झाला ]; सूत – सुताडा [ जाड कापड ].

[ आ ] विशेषणापासून विशेषण:—लांब—लंबाडा—ड्या [ लांब पायांचा, लांबटांग्या ].

**आडी**—आडया—[ अ ] हा प्रत्यय कांहीं नामांस लागतो, जसें:—नाव—नावाडी—डया, [ नाव चालविणारा, खलाशी ]; वाट—वाटाडी—डया, [ वाट दाखविणारा, मार्गदर्शक ]; सोंग—सोंगाडी-डया ( सोंग आणणारा ); पाणी—पाणाडी—डया, ( पाणी कोठें लागेल तें सांगणारा)-

[ आ ] घिसाडी—हा शब्दही असाच झाला असावा. घीस म्हणजे घांसणें, यावरून लोखंड घांसणारा म्हणजे लोखंडाचें ठोकळ सामान करणारा मनुष्य, किंवा त्याची जात असा अर्थ झाला.

[ इ ] स्वार्थीं—नासाडी, राखाडी किंवा रखाडी.

**आंडी**—मुसकें—मुसकांडी, मुसांडी, मुसंडी, ( डोकें पुढें करून पळणें किंवा गर्दींत शिरणें; ह्या तीन शब्दांपैकीं मुसंडी हें रूप अधिक प्रचारांत आहे ).

**आडें**—[ अ ] धूर—धुराडें [ धूर जाण्यासाठीं चुलीवर ठेवलेलें छपरांतील भोंक; इंग्रजींत ज्याला चिमणी म्हणतात त्याचा अर्थही धूर जाण्याचा वाटोळा मार्ग किंवा नळ असा आहे ].

[ आ ] कोय–कोयांडें [ पिकलेल्या आंब्याची साल काढून मीठ, मोहरी वगैरे लावून केलेलें एक तोंडीं लावणें .]

**आण**—[ अ ] हा प्रत्यय घाण शब्दाचा शेष दिसतो. उबटाण [ उबटल्याची घाण ], पिकटाण [ पिकटल्याची घाण ], दिपुष्टाण ( दिपुष्टाची म्हणजे–दीप+उच्छिष्ट=दीपोच्छिष्ट –दिव्यांतील जळलेल्या तेलवातीची घाण ).

**टीप**—कोरष्टाण ( कोऱ्या मडक्याची घाण ), कुजष्टाण, वाळगष्टाण, पादष्टाण, इ. शब्द दिपुष्टाण ह्या शब्दाचे सादृश्यानें साधलेले दिसतात. परंतु दिपुष्टाण ह्या शब्दामध्यें आण ह्या प्रत्ययाचे पूर्वी ष्ट हें अक्षर येण्यास जसें व्युत्पत्तिदृष्ट्या कारण आहे तसें कोरष्टाण वगैरे शब्दांत नाहीं; परंतु केवळ सादृश्यानुसार वरील रूपें साधलीं आहेत.

[ आ ] कांहीं शब्दांत आण हा प्रत्यय स्थान या शब्दाचा शेष दिसतो. जसें:—मोंगल–मोंगलाण ( मोंगलांचें स्थान म्हणजे मोंगलांचें ताब्यांतील प्रदेश ); हबशी–हबशाण ( हबशाचे ताब्यांतील प्रदेश ); फिरंगाण.

[ इ ] भयाण हा शब्द भय + स्थान = भय + आण = भयाण, असा साधला असेल किंवा संस्कृत भयानक शब्दापासून उत्पन्न झालेला असेल; त्याची व्युत्पत्ति संदिग्ध आहे.

**आणा**—हा प्रत्यय दाणा शब्दाचा शेष दिसतो. जसें:—फक–फकाणा, गप–गपाणा [ फकाणा व गपाणा म्हणजे तोंड भरून घेणें ]. मीठ–मिठाणा ( मिठानें युक्त म्हणजे मीठ घालून शिजविलेला दाणा ), मुका –मुकाणा ( भिजत घातला तरी ज्याला मोड येत नाहीं तर जो जशाचा तसाच कठिण राहतो तो, चहाड किंवा चोर ).

**आणी**—दूध–दुधाणी ( दूध तापविण्याचें मडकें ).

**आणें** —बीं–बियाणें [ पेरण्यालायक बीज अथवा बीं. यापासूनच बेणें हा शब्द झाला. अर्थ तोच. ]

**आर**—( अ ) हा प्रत्यय कार या संस्कृत प्रत्ययाचा अपभ्रंश आहे.उदा०:—कुंभ–कुंभार, [ कुंभ म्हणजे मडकें करणारा ];लोह–लोहार ( घिसाडी–लोह म्हणजे लोखंड घडणारा ); सोनें–सोनार; चाम [ चर्म,

कातडें ]—चामार, चांभार, इ०. परंतु सुतार शब्दांतील आर प्रत्यय धार शब्दाचा अपभ्रंश आहे. कारण कीं, संस्कृत सूत्रधार या शब्दापासून मराठी सुतार शब्द आला आहे.

( आ ) आर प्रत्ययानें कांहीं विशेषणें होतात. जसें:—गर्भ—गर्भार, भीक—भिकार, ( यापासून भिकारी, भिकार—डा अशीं यापुढें तद्धितें होतात ), फूल—फुलार, ( फुलाप्रमाणें पसरलेलें, फुललेलें ).

( इ ) कांहीं ठिकाणीं हा प्रत्यय स्वार्थीं आढळतो. जसें:—खिड—खिडार, खांड—खांडार.

( ई ) कांहीं शब्दांमध्यें आर हा प्रत्यय अन्तर किंवा आड शब्दाचा शेष दिसतो. जसें:—तिजार—तिजारा--तिजारें तीन दिवसांचे अंतरानें येणारा ताप ), चौथार—रा—रें ( चार दिवसांचे अंतरानें येणारा ताप ), एकांतरा किंवा एकांत्रा ह्मणजे एका दिवसाचे अंतरानें येणारा ताप; यावरून वरील अर्थ व व्युत्पत्ति स्पष्ट होईल.

( उ ) मागें—माघार ( मागें परतणें, घेणें, निवृत्ति, हें याच प्रत्ययानें साधलेलें एक स्त्रीलिंगी धर्मवाचक नाम आहे. हा शब्द पुढाकार याचे उलट अर्थाचा आहे. यावरून माघार शब्दांतील आर हा प्रत्यय कार याचाच अपभ्रंश आहे असें दिसतें. ) शिवाय पुढार ( पुढें + आर ) असाही शब्द क्वचित् येतो; यापासूनच पुढारी शब्द साधला आहे.

( ऊ ) शींव—शिवार ( सीमेवरील जमीन, शेतें ).

( ऋ ) ह्या प्रत्ययानें कांहीं विशेषणांपासून धातू साधतात. जसें:—एक—एकारणें, ( एका बाजूस सरणें, गोळा होणें ); उभा—उभारणें ( उभा करणें ); तर्र—तरारणें ( तरतरीत होणें ); भर—भर्र—भरारणें ( वृद्धि पावणें ).

**आरा**—( अ ) हा प्रत्यय आधिक्य, मोठेपणा, किंवा विस्तार दाखवितो व पररूप संधीनें लागतो. जसें:—पीस—पिसारा, पेटी—पेटारा, भपका—भपकारा, वाफ—वाफारा, बुंध—बुंधारा, कांठ—कांठारा, लिंबू—लिंबारा, डोला—डोलारा, डोल्हारा; गुबा—गुबारा, इ०.

( आ ) या प्रत्ययानें झालेलीं पुढारा [ पुढें + आरा ], माघारा [ मागें + आरा ] हीं क्रियाविशेषणें आढळतात.

( इ ) सोपा–सोपारा.

( ई ) स्वार्थीं नामें:—ढीग–ढिगारा, ऊब–उबारा.

**आरी**—पान–पानारी [ पानें विकावयास आणतो तो ], फूल–फुलारी ( फुलें विकणारा, माळी ), चित्त [ सं० चित्र ]—चितारी ( चित्रकार ), भूस [ सं० बुस ]–भुसारी ( धान्य विकणारा, धान्यविक्या ).

**आरें**—सात–सातारें ( सातव्या महिन्यांत उपजलेलें मूल ).

**आव**—कांहीं नामांस व विशेषणांस आणि क्वचित् क्रियाविशेषणांसही हा प्रत्यय लागून धातू होतात. जसें:—दुःख–दुखावणें, सुख–सुखावणें, स्थिर–स्थिरावणें, वेडा वेडावणें, डोकें–डोकावणें, खूण–खुणावणें, रोड–रोडावणें, आशा–आसावणें, दूर–दुरावणें, खालीं–खालावणें, आळस–आळसावणें, आंबट–आंबटावणें.

**आव**—कुणबी–कुणबावा, ( कुणब्याचा धंदा, शेती ).

**आविष्ट**—कोप–कोपाविष्ट ( कोपयुक्त ), लोभ–लोभाविष्ट.

**आस**—हा आधिक्यदर्शक आहे. भग–भगास ( फाटलेलें, उघडें ), भक–भकास ( ओसाड ).

**आसें**—मुंड–मुंडासें [ लहानसें पागोटें किंवा डोक्यास गुंडाळावयाचें गरीब मजूर लोकांचें वस्त्र. ]

**आळ**—(अ) हा प्रत्यय कांहीं नामांस लागून 'त्यानें युक्त' किंवा 'त्याचें आधिक्य ज्यांत आहे असा' या अर्थाचीं विशेषणें होतात. जसें:—चीक–चिकाळ, दूध–दुधाळ [ पुष्कळ दूध देणारी ], बंब–बंबाळ ( बंबासारखें मोठें, रक्तबंबाळ म्हणजे रक्तानें भरलेलें ), घाय–घायाळ [ घायानें युक्त, जखमी ]. याचप्रमाणें दयाळ, कृपाळ, फेंसाळ, कोयाळ, खडकाळ, रेताळ, दगडाळ, केंसाळ, मिसाळ, मिशाळ, आशाळ, रवाळ, रसाळ, इ०.

तोंडाळ–( तोंडानें युक्त, फार बोलणारा, भांडखोर, कज्जेदलाल ), वाचाळ–( वाचेनें युक्त, फार बोलणारा, बडबड्या, बोलघेवडा ), खोड्याळ–( खोड्या करणारा ), हाताळ–( वस्तूंस न कळत हात

लावणारा, चोरटा), पायाळ [ पाय पुढें येऊन जन्मास येणारा, अशुभ. अशा मनुष्याचे अंगीं भूमिगत द्रव्य दिसण्याची, कांहीं दुखणीं बरीं करण्याची, वगैरे शक्ति असते असें म्हणतात ]. पायाळ शब्दाचें पायाळू असेंही रूप आढळतें.

( आ ) गचाळ [ हा शब्द गच्च म्हणजे घट्ट यापासून झालेला आहे. त्याचा मूळ अर्थ गर्दीनें युक्त किंवा घोंटाळ्याचा असा असून नंतर त्याचा अव्यवस्थित असा अर्थ झाला आहे. ], मवाळ [ सं० मृदु, मऊपणा किंवा मृदुत्व अंगीं आहे ज्याच्या ]. गचाळ, व मवाळ हीं विशेषणें मूळ गच्च व मऊ या विशेषणांपासूनच जरा अनियमितपणें झालीं आहेत.

( इ ) आळ प्रत्ययानें झालेलीं नामेंही क्वचित् आढळतात. जसें:— आभा—आभाळ, [ आभा म्हणजे प्रभा, तिनें युक्त तें आकाश ],विटाळ [ वीट म्हणजे कंटाळा,तिरस्कार, शिसारी, हीं ज्यापासून उत्पन्न होतात तो; अमंगळपणा, मळीणपणा, मळ, मळीणाचा स्पर्श. ], नवाळ. [ ई ] हा प्रत्यय लागून कांहीं धातूही साधतात. जसें:—माणूस—माणसाळणें, हात—हाताळणें, पिस—पिसाळणें, पोट—पोटाळणें, फेंस—फेंसाळणें, इ०.

( उ ) कांहीं शब्दांत हा आलय शब्दाचा अपभ्रंश आहे. जसें:— चुनाळ ( चुन्याचें घर ); घंगाळ, गंगाळ [ गंगा+आलय=स्नानाचें पाणी ठेवण्याचें भांडें ], घड्याळ [घडीचें घर, घडी दाखविण्याचें यंत्र.]

( ऊ ) समुदायाथा - किटाळ, भेंडाळ.

**आळा**—( अ ) हा प्रत्यय आलय शब्दाचा अपभ्रंश असावा. जसें:— जीव-जिव्हाळा, ल्हा-ल्हाळा, डोंब-डोंबाळा.

( आ ) दुसऱ्या कांहीं शब्दांत हा प्रत्यय काळ ह्या शब्दाचा अपभ्रंश असावा. जसें: —उन्ह—उन्हाळा, पाऊस—पावसाळा, हींव—हिंवाळा.

**आळी**—( अ ) कांहीं ठिकाणीं या प्रत्ययाचा अर्थ आरोळी असा आहे. जसें:—कागाळी ( कागांची म्हणजे कावळ्यांची आरोळी, कावकाव हा मूळ अर्थ; नंतर ओरडा, तक्रार, शिकायत, असा अर्थ झाला. ), बंडाळी [ बंडाची आरोळी, बंडाची क्षुब्धता, पुंडपणा ].

( आ ) अन्यत्र याचा अर्थ आवलि म्हणजे पंक्ति, ओळ असा आहे. जसें:—दिवाळी ( दिव्यांची ओळ, दिवे लावण्याचा सण ).

टीप—तांबटआळी, सोनारआळी इत्यादि ठिकाणचा आळी शब्दही आवलि म्हणजे पंक्ति, ओळ या संस्कृत शब्दापासूनच आला आहे. तांबटआळी = तांबटांच्या घरांची ओळ, असेंच अन्यत्र समजावें.

**आळू**—दयाळू, मायाळू, कृपाळू, लोभाळू, कष्टाळू, निद्राळू, झोंपाळू, सोसाळू, इ०.

**आळें**—हा प्रत्यय संस्कृत आलयम् ह्या शब्दापासून आलेला असून जवळ जवळ त्याच अर्थानें तो लागून तद्धित शब्द साधतात. उदा०:— खण—खणाळें [ खणांचा गण किंवा गट म्हणजे समुदाय, न कापलेले एकत्र खण ], खुंटी—खुंटाळें [ खुंट्यांची पट्टी किंवा चौकट ], दिवा—दिवाळें [ दिव्याचें घर, म्हणजे ज्या घरीं पैशाचे अभावानें सावकारास आपला धंदा चालवितां येत नाहीं या सूचनेसाठीं दिवसा दिवा लावून ठेवतात तें घर, पैशांचा अभाव, टंचाई, गरिबी, नापत ]. कोंडाळें ( वाटोळें कडें ); गोताळें ( किंवा गोतावळें, सं० गोत्र म्हणजे गोत किंवा कुटुंब, त्याचें आलय म्हणजे समुदाय; कुटुंबांतील व जवळ जवळच्या नातेवाईक माणसांचा समूह ); चवाळें ( डोळीच्या चार गडयांचा समुदाय ); विटाळें ( विटा पाडण्याचा सांचा ); ताईताळें किंवा तायताळें ( ताईती व सोन्याच्या इतर वस्तु—पुतळ्या, वाघनखें वगैरे—एकत्र गुंफून केलेला दागिना ); संताळें [ संताचा मेळा, संत मंडळ ], लाथाळें [ लाथांचा सुकाळ, लाथालाथी, आपसांतील भांडण ], मुदाळें [ भाताची मूद वाढण्याचें साधन, वाढपांतील एक भांडें ], वेंटाळें [ वर्तुळ किंवा कडें, हा शब्द वेंट म्हणजे गवत किंवा काथ्या वळून केलेला दोर त्यास आळें प्रत्यय लागून झाला असून अर्थ गुंडा, गुंडाळें असा आहे. वेंटाळें व गुंडाळें या शब्दांत आळें प्रत्ययास विशेष अर्थ नसून तो स्वार्थी आहे असें म्हटल्यास चालेल. मुलाचा हग काढून टाकण्याचे कामीं कोंकणांत बायका गवताच्या कांहीं काडया एकत्र गुंडाळून त्या गवताच्या गुंडाळ्याचा उपयोग करितात, यामुळें मुलाचा हग काढून टाकण्यास ‘ वेंटाळी काढणें ’ असें म्हणण्याचा तिकडे प्रघात आहे. ], उन्हाळें

[ ऊन पाण्याचा झरा; हा शब्दही उन्ह + आलय असाच झाला आहे, आणि या पासूनच विशेष प्रचारांतील ' उन्हेरें ' हा शब्द आला आसावा असें वाटतें ], दंताळें.

ई—( अ ) हा प्रत्यय कांहीं नामांस लागून विशेषणें होतात. जसें:— माप—मापी [ मापानें मोजलेला ], वजनी [ वजनानें मोजलेला ], रेशमी [ रेशमाचा केलेला ], सुती [ सुताचा म्हणजे कापसाचे सूताचा केलेला ]. याचप्रमाणें, लांकडी, लोखंडी, पितळी, दगडी, बेगडी, जस्ती, कोंकणी, देशी, सरकारी, मारवाडी, गुजराती, मुगी, बैंगणी, गुळी, केशरी, पोपटी, कुसुंबी, नाटकी, शोकी, गुलाबी, हौशी, कृष्णंभट्टी, अंबी, अपेशी, गृहस्थी, भटी, ब्राह्मणी, सोनारी, छंदी, ढोंगी माघी, पुशी, इत्यादि शब्द जाणावे.

( आ ) कांहीं अकारन्त व आकारन्त नामांस हा प्रत्यय लघुत्व, अल्पत्व, ह्या अर्थी पररूप संधीनें लागून स्त्रीलिंगी नामें साधतात. जसें:—डोंगरी, [ लहान डोंगर ] आरसा—आरशी [ लहान आरसा ], दांडा—दांडी, खडा—खडी, बेडूक—बेडकी, गुंडा—गुंडी, खळगा—खळगी, चिक—चिकी, घुमट—घुमटी, लोटा—लोटी, घाट—घाटी, अर्ज—अर्जी, जोडी, घरटी; दोरा—दोरी,—येथें लघुत्वाच्या नियमास अपवाद दिसतो. दोरा हा दोरीपेक्षां लहान किंवा बारीक असतो. परंतु दोर—दोरी, या उदाहरणामध्यें दोर दोरीपेक्षां जरी अधिक बारीक नसला तथापि दोरी ही दोरापेक्षां लघु नसते, तर दोर आणि दोरी हे शब्द प्रायः समत्वदर्शकच होत. बोंड—बोंडी.

( इ ) कांहीं एकारन्त व अकारन्त नपुसकलिंगी नामांसही हा लघुत्वार्थी ई प्रत्यय पररूप संधीनें लागून स्त्रीलिंगी नामें होतात. जसें:— तपेलें—तपेली, बोगणें—बोगणी, पिठ—पिठी [ बारीक पिठ ], उखळ—उखळी, कवाड—कवाडी, फूल—फूली (फुलासारखें लहानसें चिह्न).

( ई ) कांहीं जातीचे वाचक शब्द असेंच बनले आहेत. उदा०:— तांबोळी ( सं० तांबूल म्हणजे विड्याचें पान, तीं पानें विकणारा ), तेली ( तेल काढणार ), माळी, इ०.

( उ ) कांहीं विशेषणांस हा प्रत्यय लागून धर्मवाचक नामें साधतात. जसें:—गरीब–गरिबी, श्रीमंत–श्रीमंती; याचप्रमाणें लांबी, रुंदी, बंदी, सरळी, सरशी, सलगी, मंदी, तेजी, आगांतुकी, दिढी, एकी, एकंदरी [ बेरीज एकत्र स्थिति ].

( ऊ ) कांहीं संख्यावाचक म्हणजे गणनावाचक संख्याविशेषणांस हा ई प्रत्यय लागून कांहीं स्त्रीलिंगी नामें साधतात. जसें:—चाळीस–चाळिशी, [ चाळिसावें वर्ष, चाळीस वर्षांचें वय, तितकी उमर, या वयाचे वेळीं डोळ्यांस आरशी लावण्याचा प्रसंग येतो म्हणून आरशी ], साठी [ साठ वर्षांची उमर ], ह्याचप्रमाणें तिशी, विशी, पंचविशी, पन्नाशी, इ०.

अशाच मासल्याचीं दुसरीं उदाहरणें:—बत्तिशी, [ बत्तीस वस्तूंचा समुदाय, जसें:—सिंहासन बत्तिशी–बत्तीस गोष्टी, बत्तीस दांतांचा समुदाय; बहात्तरी, [बहात्तर वस्तूंचा समुदाय], असें:—शुकबहात्तरी–बहात्तर गोष्टी ]; पंचविशी [पंचवीस गोष्टी–वेताळ पंचविशी ]; इ०.

[ ऋ ] कांहीं नामांसही हा प्रत्यय लागून धर्मवाचक नामें साधतात. जसें:—कलाल–कलाली [ कलालाचा धंदा ], दलाल–दलाली [ धंदा, त्याचें वेतन ], अंधार–अंधारी [ काळोख ], काळोख–काळोखी, चाकर–चाकरी, नोकर–नोकरी ( सेवा, सेवेची जागा ), शेत–शेती, सावकार सावकारी, भाग–भागी, चिटणीस–चिटणिशी, धोंडभट–धोंडभट्टी [ धोंडभटा सारखी वागणूक, स्नान न करितां गंध लावून स्नान केल्याचें ढोंग करणें. ]

( ऌ ) कांहीं सामान्य नामांसही हा प्रत्यय लागून दुसरीं सामान्य नामें होतात. जसें:—अंग–अंगी ( लहान मुलाचें एका प्रकारचें अंगडें ), मळ–मळी, ( मळाची वडी किंवा मळाची लहन गोळी ), बंद–बंदी ( बाराबंदी, बंदी म्हणजे बंद आहेत जिला ती ). ‘ बंदी ’ या शब्दापासूनच बंडी हा शब्द झाला. मळ–मळई, मलई ( मळई म्हणजे पावसाळ्यांत वाहून आलेली माती, कचरा वगैरे जा सांचतो तो; आणि मलई म्हणजे दुधावरील साय ), शेत–शेती ( शेतीचा धंदा करणार, शेतकरी ).

पोपट ( हा शब्द मध्यप्रांतांत वाल किंवा पावटे या धान्यास लावितात. )—पोपटी [ पोपट म्हणजे वाल किंवा पावटे घालून केलेली रसभरित भाजी ज्या वनभोजनांत असते तें, अथवा ती भाजी. हा शब्द कोंकणांत प्रचलित आहे. वालाच्या अर्थाचा मध्यप्रांतांतील शब्द कोंकणांत मुळींच ठाऊक नसतां तो ' पोपटी ' या शब्दांत कसा आढळतो, हें भाषेतिहाससंशोधकांनीं मनन करण्यासारखें आहे. ]

[ ए ] माघारा—माघारी [ माघारें म्हणजे मुलीला माहेरीं परत नेण्यासाठीं आलेला इसम. ], याचप्रमाणें पुढारी हा शब्दही पुढार [ पुढें + आर ; आर प्रत्यय कार ह्यापासून झाला आहे हें वर सांगितलेंच आहे ] ह्या फारशा प्रचारांत नसलेल्या शब्दांपासूनच झाला आहे. पुढारी म्हणजे लोकांस पुढें नेणारा, अग्रेसर, अध्वर्यु, लोकनायक. माघारी व पुढारी हे शब्द माघार व पुढार ( पुढाकार ) ह्या धर्मवाचक नामांपासून साधले आहेत.

[ ऐ ] पैठण—पैठणी ( पैठण शहरीं झालेलें. पैठणी हा शब्द मूळचा विशेषण, परंतु आतां बायकांचें एक उंची सोंवळें या अर्थीं पैठणी हा शब्द स्त्रीलिंगी नाम आहे. हीं सोंवळीं प्रथम पैठण येथें नामांकित होत; ह्यामुळें त्यांस पैठणीं हें नांव प्राप्त झालें. ) मथुरी, नागपुरी, अमदाबादी, मारवाडी; गुलाबी, हौशी, पितळ—पितळी ( पितळेचें केलेलें एका प्रकारचें भांडें ).

[ ओ ] कांहीं नामांस हा प्रत्यय लागून ' तें काम करणारा ' या अर्थाचीं दुसरीं नामें साधतात. जसें:—स्वयंपाक—स्वयंपाकी ( स्वयंपाक करणारा. आचारी. या शब्दाचें सैंपाक—सैंपाकी असेंही रूप आढळतें. ), नांगर—नांगरी [ नांगर धरणारा, नांगरण्याचें काम करणारा], वाढप—वाढपी, भोरप—भोरपी, बहुरूप — बहुरूपी ( बहुरूपी शब्दापासूनच भोरपी शब्द झाला असावा. )

[ औ ] पुल्लिंगावरून स्त्रीलिंग साधावयाचे कामीं ह्या प्रत्ययाचा उपयोग होतो, तो लिंगाध्यायांत पहावा. आकारान्त विशेषणांसही स्त्रीलिंगी हा प्रत्यय लागतो. बोडका (डोक्यास कांहीं किंवा वस्त्र आवरण नसलेला)—बोडकी ( विधवा, केशरहित स्त्री ); काळी ( काळ्या रंगाची—जमीन ).

[ अं ] स्त्रीलिंगी विशेषनामाचें संक्षिप्त रूप या प्रत्ययानें होतें. जसें:—पार्वती—पारी, वाराणशी—वारी, यमुना—यमी, नर्मदा—नमी, गोदावरी—गोदी, इ०.

[ अः ] हंगाम, अधिकार. उदा०—आखाडी, खोती.

[ क ] समुदायार्थी—झाडी, पत्री.

[ ख ] त्याचें झाड किंवा वेल या अर्थी—कापशी, डाळिंबी, जांबळी, घेवडी भोंपळी.

[ ग ] भूषणार्थी—आंगठी, कंठी, मनगटी.

[ घ ] तदाधार—गंगाजळी [ गंगाजळाचें भांडें ].

[ ङ ] तेथील रोग—कोपरी, गुडघी.

[ च ] पदार्थ बोधक—आंबट-आंबटी.

**ईक**—[ अ ] कांहीं विशेषणांस पररूप संधीनें हा प्रत्यय लागून धर्मवाचक नामें होतात. जसें:—सोयरा [ सं० स्वीय ]—सोयरीक [ सोयरेपणा, नातें ], मोकळा—मोकळीक [ मोकळेपणा, मुक्तता, परवानगी, मुभा, निर्बंधता ], वेगळीक [ वेगळेपणा, भेद, भिन्नता ], आगळीक किंवा अगळीक [ आगळा किंवा अगळा म्हणजे मर्यादेच्या बाहेर, त्यावरून आगळीक म्हणजे मर्यादेच्या बाहेर जाणें, अमर्याद किंवा स्वैर, फाजील वर्तन, अपराध ].

[ आ ] अधिकरणार्थी—उदयीक, उदईक.

**ईट**—राग-रागीट [ रागयुक्त, रागवणारा ].

**ईण**—हा प्रत्यय स्त्रीलिंगवाचक आहे. यानें पुल्लिंगावरून स्त्रीलिंग साधतें, हें लिंगाध्यायांत आलेंच आहे. तथापि कांहीं शब्दांत हा प्रत्यय आढळतो, पण त्याचें अनुरूप पुल्लिंग नसतें. जसें:—बाळंतीण, सवाशीण, सासुरवाशीण, माघारीण, माहेरवाशीण, इ०. [ अं. २७० ].

**ईल**—[ अ ] या प्रत्ययानें कांहीं नामांपासून विशेषणें साधतात. जसें:—दोंद—दोंदील, अंड—अंडील, वरकस—वरकशील, शेवट शेवटील.

[ आ ] कांहीं स्थलवाचक व कालवाचक अव्ययांपासूनही या प्रत्ययानें पररूपसंधीनें विशेषणें होतात. जसें:—इकडे—इकडील,

मागें—मागील, आंत—आंतील, खालीं—खालील, पुढें—पुढील, मध्यें—मधील, बाहेर—बाहेरील, येथें येथील, इ०.

**ईळ**—या प्रत्ययानें साधित विशेषणें होतात.

[ अ ] विशेषणापासून:—गोड—गोडीळ [ जरा गोड ].

[आ] नामापासून:—तप—तपीळ [ तपोवान्, रागीट ].

**इष्ट**—हा प्रत्यय कांहीं नामांस पररूप संधीनें लागून ' ह्यानें युक्त ' अशा अर्थाचीं विशेषणें होतात. जसें—चव—चविष्ट, नाद—नादिष्ट, नेम—नेमिष्ट, पाप—पापिष्ट, छंद—छंदिष्ट [ या ठिकाणीं पहिल्या अक्षरांतील अची वृद्धि झाली आहे; म्हणजे छांदिष्ट हें रूप अनियमित आहे ]. ह्याचप्रमाणें गर्विष्ट, रागिष्ट, कोपिष्ट, भ्रमिष्ट, इ०.

**उकली**—हा प्रत्यय अल्पत्वसूचक आहे. जसें—धनु—धनुकली, अंड—अंडुकली, चांद—चांदुकली, [ लहानशी भाकरी ], चिंधी—चिंधुकली.

**उडा**—खरूज—खरजुडा [ खरूज झालेला ].

**उरडा**—भट—भटुरडा [ येथें उरडा प्रत्यय तिरस्कारद्योतक आहे. ] नख—नखुरडा—डें [ बोटाचें नख फोडानें सुजलें म्हणजे त्यास हा शब्द लावितात.], हिंगुरडें.

**उरी**—देश—देसुरी [ देशस्थांसंबंधीं ].

**उला-ली-लें**—बारा—बारुळा-ळी-ळें [ बारोळा-ळी-ळें अशींही रूपें होतात; अर्थ—बारा पायल्यांनीं होणारें], सोळा—सोळुला-ली-लें [सोळा पायल्यांचें.]

**ऊ**—[ अ ] कांहीं नामांस हा प्रत्यय स्वार्थीं लागून अन्य नामें साधतात. जसें:—दांडा—दांडू, भोंक—भोंकू, बंब—बंबू [ हा शब्द बहुधा वेडबंबू किंवा येडबंबू ह्यामध्यें आढळतो, ] लंब—लंबू.

टीप—कांहीं विशेष नामांस हा प्रत्यय लागून आंखुडशीं प्रेमळ नांव बनतात. जसें:—रामचंद्र—रामू, जगन्नाथ—जगू, परशुराम—परसू, दत्तात्रय—दत्तू, मोरेश्वर—मोरू, केशव—केसू. तसेंच कांहीं बहुमानार्थक पदांसही हा प्रत्यय लागतो. जसें:—बाप—बापू, बाबा—बाबू, नाना—नानू, बाळा—बाळू.

[ आ ] कवितेंत आणि विशेषेंकरून जुन्या कवितेंत हा प्रत्यय नामांस लागलेला फार आढळतो. जसें:—भाव—भावु, समुद्र—समुद्रु, वात—वातु, अंत—अंतु इ०.

[ इ ] कांहीं नामांपासून या प्रत्ययानें विशेषणें होतात. जसें:—विश्वास—विश्वासू [ विश्वासयोग्य ], घर—घरू [ घरीं केलेला ], ढब—ढबू [ दुदांडी किंवा दुवाली पैसा, अर्धा आणा ], चीक—चिकू [ ज्याच्या हातांतून पैसा सुटत नाहीं तो ].

[ ई ] कांहीं अन्य भाषांतून आलेल्या शब्दांसही हा प्रत्यय लागतो. जसें:—गरज—गरजू, गबर—गबरू, इ०.

[ उ ] स्त्रीलिंगार्थी—काका—काकू.

**ऊक**—[ अ ] कांहीं नामांस लघुत्वार्थीं किंवा अल्पत्वार्थीं पररूपसंधीनें हा प्रत्यय लागतो. जसें:—काठी—काटूक, किडा—किडूक, चिंधी—चिंधूक, हाड—हाडूक, भेत—भेतूक.

[ आ ] कांहीं विशेषणेंही या प्रत्ययानें साधलीं आहेत. जसें:—विश्वास—विश्वासूक, अंध—अंधूक.

**ऊण**—[ अ ] एकूण ( एक करून म्हणजे एकत्र ).

[ आ ] एकोण किंवा एकूण [ एक उणा म्हणजे कमी. ] जसें:—एकोणतीस, एकूणचाळीस, इ०.

**ऊत**—नाम—धड—धडूत [ धड म्हणजे भक्कम टिकाऊ वस्त्र ], विशेषण—बहु—बहूत.

**ऊन**—स्थलवाचक व कालवाचक अव्ययांस पररूपसंधीनें हा प्रत्यय लागतो जसें:—इकडे—इकडून, पाशीं—पासून, येथें—येथून; याचप्रमाणें तेथून, आंतून, मधून, खालून, मागून, आडून, दुरून, वरून, बाहेरून, लांबून, जवळून, उंचून, इ०.

**ऊरा—ऊरगा—डा**—हा प्रत्यय तिरस्कारार्थीं लागतो. जसें:—भट—भटूरा, भटूरगा, भटूरडा. हा प्रत्यय लागतांना नियमित संधि होऊन भटोरा, भटोरगा—डा, अशीं रूपेंही झालेलीं आढळतात.

**ऊल**—ह्या प्रत्ययानें कांहीं नामांपासून अल्पत्व किंवा लघुत्वद्योतक नामें साधतात. जसें:—कणगा – कणगूल, परडी – परडूल, पडगा – पडगूल, करंडा – करंडूल, इ०. ह्यांची आकारान्त व ईकारान्त म्हणजे पुल्लिंगी व स्त्रीलिंगी रूपेंही क्वचित आढळतात. कणगुला, कणगुली,

करंडुला, करंडुली, पडगुली, इ० ह्या वेळीं उपान्त्य ऊ नियमाप्रमाणें ऱ्हस्व होतो.

**ऊस**—हा प्रत्यय कांहीं थोडयाशा विशेषणांस लागून तद्दर्शक गुणाचें अल्पत्व दाखविणारीं विशेषणें साधतात. जसें:—आंबट-आंबूस [ आंबटासारखा, जरासा आंबट ], तांबडा—तांबूस [ जरासा तांबडा ].

[ अ ] हा प्रत्यय कांहीं नामांस क्वचित् स्वार्थीं लागतो. जसें:— टीप—टिपूस, बाप — बापूस; ह्या प्रत्ययानें झालेल्या नामांचा प्रचार फक्त कोंकणांत आहे.

**ऊळ**—हा प्रत्यय थोडयाशा नामांस लागून विशेषणें होतात. जसें:— पांगा—पांगूळ [ पांग्या मुलांच्या उपयोगीं पडणारी ], पीठ—पिठूळ [ पिठासारखा ] ,वात—वातूळ [ वातकारक ].

**ऊं**—हा प्रत्यय कांहीं नामांस स्वार्थीं लागतो. जसें—टीप—टिपूं, रेडका—की रेडकू, माजर—माजरूं, बकरूं, शेरडूं, केरडूं, इ०.

**ए**—कड—कडे, वाट—वाटे, इ० हीं पहिलीं सामान्यरूपें, नामसाधित अव्ययें होत.

**एं**—[ अ ] ह्या प्रत्ययानें कांहीं नामें साधतात.

बाळंत—बाळंतें [ बाळंत स्त्रीजवळचें चिरगूट किंवा फडकें ]. मेंग [ साप वगैरे प्राणी कातडें टाकतात तें, कांत ]—मेंगें ( अशक्त, दुबळें किंवा मूर्ख मूल ].

[ आ ] कांहीं प्राणिवाचक पुल्लिंगी नामांस लिंगविवक्षाभावीं हा प्रत्यय पररूप संधीनें लागून नपुंसकलिंगी नामें साधतात. जसें:— घोडें, बकरें, कुत्रें, इ०.

[ इ ] यानें कांहीं नामसाधित अव्ययें बनतात. जसें:—द्वारें, मुळें कारणें, प्रमाणें, मध्यें इ०. येथें, जेथें, तेथें पुढें, मागें, कोठें, इ० हींही मूळचीं अशींच साधलीं आहेत

**एज**—यानें झालेले कांहीं नामसाधित धातू कवितेंत आढळतात. जसें:— भूक—भुकेजणें, राग—रागेजणें.

**एटा**—कोश—कोशेटा ( लघु कोश, लहान कवच ).

**एण**—हा प्रत्यय तृण शब्दाचा शेष दिसतो. उदा॰:—भात—भातेण [ भाताचें तृण म्हणजे गवत, ह्यास कोंकणांत पेंढा असें म्हणतात ],

हरीक—हरकेण [ हरकांचें गवत म्हणजे हरीक हें धान्य मळून घेत-ल्यानंतर जें शिल्लक राहतें तें, हें गुरें गवताप्रमाणें खातात ].

**एता**—ओला—ओलेता [ ओल्यानें युक्त ].

**एर, एरें**—जुना—जुनेर, जुनेरें [ जुनें वस्त्र ]; फणेरें [ दोऱ्याची फणी, सुया वगैरेची पिशवी ].

**एरा**—पात—पातेरा [ वाळलेल्या पानांचा समूह ], घाण—घाणेरा [ घाणीनें युक्त, घाण ह्या शब्दास एरडा प्रत्यय होऊन घाणेरडा असें त्याच अर्थीं रूप साधतें. मूत ह्या शब्दास इरडा प्रत्यय लागून मुतिरडा असें रूप होतें, तसेंच हगिरडा ], मातेरा [ मातीनें युक्त, याचा भाव-वाचक नामाप्रमाणेंही उपयोग होतो. ] गोंडेरा हें विशेषण आहे.

**एल**—हा प्रत्यय तेल या शब्दाचा शेष दिसतो. जसें:—तीळ—तिळेल [ तिळांचें तेल ]. ह्याप्रमाणेंच मोगरेल, खोबरेल, उंडेल, करंजेल, एरंडेल, उदेल, कवठेल, मुठेल ( ओल्या नारळाचें मुठीनें पिळून काडलेलें तेल ), कुट्टयेल ( हा शब्द मजेदार आहे, याचा मूळ अर्थ कुटून काढलेलें तेल असा आहे. परंतु खूप मार देणें ह्यास आंगाचें तेल काढणें असें म्हणतात. यावरून कुट्टयेल किंवा कुब्येल काढणें म्हणजे खूप मार देणें असा अर्थ होतो. )

**टीप**—या संबंधानेंच राकेल, घाष्टेल, हे दोन शब्द फारच मनोरंजक आहेत. रॉक ऑईल म्हणजे ज्यास मातीचें तेल असें म्हणतात तें खडकांतील झऱ्यां-पासून पाण्याप्रमाणें मिळतें. म्हणून त्यास इंग्रजींत रॉक ऑईल ( दगडतेल, खडकतेल ) असें म्हणतात. रॉक ऑईल ह्याचा राकेल हा अपभ्रंश सार्थ व मजेदार होय. मात्र रॉक शब्द इंग्रजी होय, इतकेंच त्यांत व्यंग आहे. एवंच राकेल म्हणजे धोंडेल, दगडेल किंवा खडकेल असें म्हणण्यापैकींच आहे. ह्या राकेल शब्दापेक्षांही घाष्टेल शब्दाचा इतिहास फारच मजेचा आहे. ग्यास लाइट म्हणजे धुराचा दिवा. हे धुराचे दिवे हिंदुस्थानांत राकेल आल्यानन्तर लौकरच सुरू झाले. प्रथम प्रथम राकेलाचे दिवे आणि धुराचे दिवे यांमधील फरक अन-भिज्ञ लोकांस कळेना. त्यांच्यामतें राकेल आणि घासलेट ( इंग्रजी—ग्यास्—लाइट् ) हीं एकच. म्हणून ते राकेलासच घासलेट म्हणूं लागले घासलेट हा शब्द राकेलाचे अर्थीं अद्यापही प्रचलित आहेच. परन्तु घासलेट हा शब्द त्यांचे मतें तेलवाचक असल्यामुळें मराठी भाषेंतील खोबरेल, मोगरेल, इ० शब्दांस अनु-सरून त्यांनीं घासलेट ह्या शब्दास अखेरच्या दोन अक्षरांतील व्यंजनांचा बदल

करून घासटेल असें रूप दिलें, म्हणजे त्यांचे मतें घासलेट हें रूप चुकीचें असून घासटेल हें अधिक शुद्ध होय. घासलेट ह्या शब्दापासूनच उच्चारसौकर्यास अनुसरून पुढें घास्टेल, घाश्टेल, घाष्टेल, अशीं रूपें झालीं आहेत. एवंच या शब्दांची परम्परा अशी:—

ग्यास लाइट्—घासलेट—घासटेल—घास्टेल—घाष्टेल.

यावरून ज्या ग्यास् लाइट् मध्यें तेलाचा कांहीं सम्बन्ध नाहीं त्याचे ठायीं तेलाचे भ्रांतीनें तद्वाचक शब्दाचे रूपांत कसा मनोहर चमत्कार झाला आहे आणि ह्या शब्दाचे व्युत्पत्तींत किती इतिहास भरला आहे तो पहा!

[ आ ] अर्ध—अर्धेल [ उत्पन्नाचा अर्धा भाग ], तिर्धेल [ उत्पन्नाचा तिसरा भाग ]. तिर्धेल हा शब्द तीन + अर्ध + एल असा बनला आहे. परंतु त्याचे अर्थामध्यें अर्ध शब्दाचा पत्ताही लागत नाहीं. तर अर्धेल या शब्दाचे सादृश्यानेंच तिर्धेल हा शब्द साधला आहे इतकेंच.

[ इ ] खल—खलेल [ खलत्व, दांडगाई, उर्मटपणा. ]

[ ई ] दंड—दंडेल [ दांडगा ], छट [ सं० शठ ]—छटेल [ लबाड ] हीं विशेषणें आहेत.

**एला**—या प्रत्ययानें दोन प्रकारचीं विशेषणें साधतात.

[ अ ] विशेषणांपासून जीं विशेषणें साधतात तीं मूळ गुणांचें न्यूनत्व किंवा अल्पत्व द्योतक असतात. जसें:—उंच—उंचेला [ कांहींसा उंच ], काळा—काळेला [ कांहींसा काळा ], ह्याप्रमाणेंच टारगेला, कोडगेला, जाडगेला, गोरटेला, जाडेला, गोरेला.

[ आ ] नामांपासून जीं विशेषणें साधतात तीं मूळ नामानें दाखविले जाणारे धर्मच दाखवितात. जसें:—तहान—तहानेला, तान्हेला [ तहान लागलेला ], हट—हटेला [ हट्टी, दांडगा ], भूक—भूकेला, ह्याप्रमाणेंच फोडेला, नाकेला, इ०. वाशेळें हा शब्द असाच वास ह्या शब्दास एला [ नपुंसकलिंग एलें ] प्रत्यय लागून झाला आहे, मात्र स चा श आणि ल चा ळ झाला आहे. वाशेळें म्हणजे वास येणारें, म्हणजेच वाईट वास येणारें, असा अर्थ असून वाशेळें हा शब्द वाईट तुपास बहुधा लावण्यांत येतो.

**एली**— खांदा—खांदेली [ खांदा घालणारे, खांदेकरी ], भाग—भागेली [भागीदार], दंड—दंडेली [दांडगा, दांडगाई. दंडेली शब्दाचा विशेषणा-प्रमाणें व धर्मवाचक नामाप्रमाणें दोन्ही प्रकारांनीं उपयोग होतो ]. ओझें—ओझेली [ ओझें उचलणारा, ओझेकरी. ह्याचें ओझेरी असेंही एक रूप कचित् आढळतें. ]

**ओका**—चिंच—चिंचोका.

**ओटी**—[ अ ] लघुत्वद्योतक. जसें:—चिंधी—चिंधोटी, धांद—धांदोटी, रेघ—रेघोटी, फांस—फांसोटी, लंग—लंगोटी.

[ आ ] तीर्थ—तिर्थोटी [ तीर्थ + वाटी, तीर्थाची वाटी ], शेक—शेकोटी, शेकुटी [ शेकाची जागा, थंडीच्या दिवसांत घराबाहेर शेकण्यासाठीं सुकलेल्या फांद्या, काठ्या वगैरे पेटवून केलेली आगटी. ]

**ओडा**—लांब—लांबोडा [ लांबट, जरा लांब ], ह्याचें लांबोळा असेंही रूप आढळतें. हात,—हातोडा [ हें नाम आहे ]

**ओती**—धड—धडोती [ टिकणें, हें धर्मवाचक नाम आहे. हें धडूत, धडोत, ह्यास ई प्रत्यय लागून झालें आहे असेंही म्हणण्यास हरकत नाहीं. धड यापासूनच धडूत, धडोत, हे शब्द झाले आहेत. ]

**ओत्रा**—हा प्रत्यय संस्कृत उत्तर शब्दापासूनच आलेला दिसतो. जसें:—एकोत्रा, दुहोत्रा, दिढोत्रा, इ०, म्हणजे एक, दोन, दीड हा दरमहा दरशेंकडा व्याजाचा दर; पण एकोत्रें म्हणजे कोणत्याही संख्यचा वर्ग.

**ओपा**—शिळा [ सं० शिला. थंड, गार ]—शिळोपा [थंड वेळ, सायंकाळ], एक—एकोपा [एकी], सुखोपा [चैन], हातोपा [ बाही, हातोपा या शब्दाचें हातपा असेंही रूप आढळतें ].

**ओबा**—[ अ ] घर—घरोबा [ स्नेह ] हें धर्मवाचक नाम आहे.

[ आ ] आदरार्थी हा प्रत्यय कांहीं नामांस लागतो. जसें:—गणु गणोबा, मोरु—मोरोबा, आजा—आजोबा, पंजा—पंजोबा, लखु—लखोबा, इ०.

[ इ ] कांहीं देवांच्या नांवांसही हा प्रत्यय लावतात. जसें:—विठू—विठोबा, म्हसासुर [ सं० महिषासुर ] म्हसोबा, खंडु—खंडोबा,

नरसोबा [ हा शब्द स्वतंत्रपणें उपयोगांत नाहीं. तर नरसोबाची वाडी या नांवांत आहे. ]

( ई ) आयता—आयतोबा [ श्रम न करितां आयतें मिळवूं पाहणारा, आळशी ], हा शब्द आयता या विशेषणापासून साधला आहे.

**ओर**—( अ ) टप—टपोर—रा [ मोठा, फुगीर, वाटोळा ], पीठ—पिठोरा, पिठोरी [ आषाढांतील अंवसेस पिठाचे दिवे करितात म्हणून तिला पिठोरी अंवस असें म्हणतात. ]

[ आ ] कुत्सितार्थी. जसें:—चिटी—चिटोरा—रें, भट—भटोरा.

**ओशी**—अंबोशी.

**ओसा**—हात—हातोसा [ मदत, साहाय्य ], आडोसा.

**ओळ**—[ अ ] हा प्रत्यय आलय शब्दापासून झालेला दिसतो. जसें:—आजा—आजोळ [ आजाचें घर, आईच्या बापाचें घर ], पंजा—पंजोळ [ आईच्या आजाचें घर ].

[ आ ] अंग—अंघोळ [ अंग—होळ, होळणें म्हणजे धुणें, यावरून अंघोळ म्हणजे अंग धुणें, स्नान असा अर्थ झाला. ].

**ओळा**—आठ—आठोळा [ आठव्या महिन्यांत जन्मास आलेला ], सात—सातोळा, [ सातव्या महिन्यांत जन्मास आलेला.]

**ओळी**—[ अ ] हा प्रत्यय लघुत्वद्योतक आहे. जसें:—फांस—फांसोळी, मासा—मासोळी [ कवितेंत ], चिरटा [ चिंधी ]—चिरटोळी [ दुधांत बुडवून लहान मुलाचे तोंडांत चोखण्यासाठीं चिंधी देतात ती. ]

[ आ ] आंब—आंबोळी, अंबोळी [ ह्या शब्दांतील ओळी हा प्रत्यय पोळी शब्दाचा शेष दिसतो. ]

[ इ ] पागोळी [ हा शब्द पाघळणें आणि ओळ या शब्दांपासून झालेला दिसतो. तथापि पाघळ हा संबंध धातु पागोळी शब्दांत दिसत नाहीं. तेव्हां यास कृदन्त म्हणण्याची अडचण. तसेंच पाग हा शब्द पाघळणें ह्या अर्थी किंवा ह्याच्या सारख्या अर्थी आढळत नाहीं, म्हणून यास तद्धित म्हणणेंही त्याहून कठीण. ह्यामुळें तो कोठेंतरी द्यावयाचा; तो येथें सुचला म्हणून येथें दिला आहे. तथापि तो कृदन्त असण्याचा अधिक संभव आहे. ]

( ई ) बीजवाचक—पारोळी, निंबोळी, चारोळी इ०.

**ओळें**—( अ ) हा प्रत्ययही आलय शब्दाचा शेष दिसत आहे, जसें:— पिंड-पिंडोळें, भिंड—भिंडोळें, भेंड—भेंडोळें, या सर्वांचा अर्थ एकच गुंडाळें. थारा—थारोळें, थारळें ( ज्या ठिकाणीं दूध मंदागीं तापत ठेवितात ती जागा. )

( आ ) घामोळें ( घामानें ज्या लहान लहान पुळ्या अंगावर उठतात त्यांस हें नांव आहे. या ठिकाणीं ओळें म्हणजे ओलें असा अर्थ आहे. )

**अंड**—भाऊ—भावंड [ बहीण किंवा भाऊ ]; नातु—नातवंड, नात्वंड, नातोंड, नातुंड ( आपल्या मुलाचें किंवा मुलीचें मूल. )

**अंडी**—पररूपसंधीनें हा प्रत्यय लागतो.

पोतें—पोतंडी ( पुरचुंडी ), मुस ( मुसकें, सं० मुख )—मुसंडी ( डोकें पुढें करून गर्दींत शिरणें किंवा पळणें ).

**अंत**—हा प्रत्यय संस्कृत वत् प्रत्ययापासून जो मराठींत वंत प्रत्यय झाला आहे त्याचा शेष होय. ( वंत प्रत्यय पुढें पहावा ) जसें:—बाळ—बाळंत (बाळयुक्त, अपत्यवती, प्रसूत ), जीव—जिवंत (जीववान्, सजीव).

**क**—( अ ) अव्ययांपासून नामें:—धड—धडक, थड—थडक.

( आ ) समुदायवाचक—पंचक, सप्तक, अष्टक.

( इ ) तें करणारा या अर्थीं. जसें:—जाचक, ढाळक.

( ई ) या प्रत्ययानें कांहीं नामांपासून धातु साधतात. जसें.—मूठ—मुटक [ मुठीनें मारणें किंवा चेंचणें ], शिर—शिरक [ शिर म्हणजे डोकें आंत घालणें, प्रवेश करणें ].

( उ ) स्वार्थीं. जसें:—इत्यादिक, अस्मादिक, कांहींक [ उदा०—कांहींकांचें म्हणणें ], इ०.

**कट**—( अ ) हा प्रत्यय ' त्यानें युक्त ' या अर्थीं नामांस लागून कांहीं विशेषणें होतात. जसें:—धूर—धुरकट, भूस-भुसकट, तेल—तेलकट, मेण—मेणकट, बळकट, मळकट, पोरकट [ पोराप्रमाणें ].

टीप—पैकीं भुसकट हा शब्द नामाप्रमाणेंही उपयोगांत आहे. त्याचा अर्थ भूस हाच, तेव्हां ' कट ' हा प्रत्यय या नामामध्यें स्वार्थीं आहे असें समजावें.

[ आ ] या प्रत्ययानें कांहीं नामसाधित धातू होतात जसें:—धुर-कटणें, मळकटणें, इ०

**कड**—वर—वरकड ( वगैरे इत्यादि ). परंतु वरकड शब्दाचा उपयोग मात्र वगैरे, इत्यादि, शब्दांहून निराळा आहे. वरकड ह्याचा उपयोग 'या शिवाय' किंवा 'इतर' अशा शब्दांप्रमाणें होतो. जसें:— 'वरकड बातमी किंवा मजकूर विशेष नाहीं.'

**कडी**—समुदायवाचक—छकडी.

**कन**—अनुकरणवाचक मूळ शब्दांस हा प्रत्यय लागून क्रियाविशेषणें होतात. जसें:—झटकन, कटकन, चटकन, पटकन, गटकन, तटकन, मटकन, काडकन, फाडकन, इ०.

**कर**—( अ ) या प्रत्ययानें कांहीं विशेषणें साधतात. जसें:—खोड—खोडकर [ खोड असणारा ], खेळ—खेळकर, साळ [ सं० शाला ]—साळकर [ शाळेसंबंधीं, शाळेंत जाणारा ], काम—कामकर [ काम करणारा ], होळी—होळकर ( होळीसंबंधीं, होळीस जाणारा ), इ०.
( अ ) या प्रत्ययानें गांवांच्या नांवांपासून बरीच आडनांवें किंवा टोपणनावें साधतात. जसें:—पाटणकर, कुरुंदवाडकर, नागपुरकर, नगरकर, सातारकर, करंदीकर, महाडकर, मेणवलीकर, सुरतकर, राजापुरकर, होळकर, चिपळूणकर, दांडेकर, दाभोळकर, काशीकर, वांईकर, इ०.

( इ ) वीट—विटकर [ विटेचा चूर ]

( ई ) स्वार्थीं—वीण—विणकर.

**करी**—कांहीं नामांस हा प्रत्यय लागून तद्धित शब्द होतात. ते मूळचे विशेषणें होत. तथापि त्यांचा नामाप्रमाणेंच पुष्कळ उपयोग होतो.
[ अ ] मूळ नामांत कांहीं एक फरक न होतां कधीं कधीं हा प्रत्यय लागतो. जसें:— देणें—देणेकरी, घेणेकरी, रीणकरी, कामकरी, गांवकरी [ ग्रामस्थ, गांवांत राहणारा ], गडकरी, [ गडावर राहणारा, गडाचा रक्षक ], महालकरी, भाडेकरी [ भाड्यानें राहणारा, या शब्दांत मूळ भाडें शब्दाचे अंतींचा बिंदु तेवढा उडाला आहे. ], वारकरी [ नेमलेल्या वारीं जेवण्यास येणारा ], धारकरी [ धार म्हणजे

तलवार धारण करणारा, शिपाई, वीर ], शेत–शेतकरी, तापकरी, कथेकरी, सेवेकरी, मानकरी, इ०.

[ आ ] आकारान्त पुल्लिंगी शब्दांस हा प्रत्यय लागतांना त्या शब्दांचें अनेकवचन होतें. जसें:—मारा–मारेकरी, मेणा–मेणेकरी, वांटा–वांटेकरी, मेळा–मेळेकरी, ताशा–ताशेकरी, नळा–नळेकरी, पहारा–पहारेकरी, गाडा गाडेकरी.

[ इ ] ईकारान्त शब्दांच्या अन्त्य स्वराचे जागीं अ हा आदेश होतो. जसें:—डोळी–डोळकरी, वारी–वारकरी [ दरसाल वारी करणारा ].

[ ई ] आकारान्त स्त्रीलिंगी शब्दांचें या प्रत्ययापूर्वी एकवचन सामान्य रूप होतें. जसें:—कथा–कथेकरी, सेवा–सेवेकरी.

**करू**—यात्रेकरू [ यात्रा करणारा, या शब्दाचें यात्रेकरी असेंही रूप प्रचारांत आहे. ], होतकरू [ होण्यासारखा, कोणती तरी विद्या किंवा कला शिकून तयार होण्या जोगा ].

**कली**—धनु [ सं० धनुः ] + कली = धनुकली.

**कळ**—[ अ ] पच–पचकळ [ वेडा, अचरट, अडाणी ], फट–फटकळ [ मनास येईल तें बोलणारा, ज्याच्या जिभेला हाड नाहीं असा ] हीं, दोन्ही विशेषणें पच व फट ह्या अनुकरणवाचक शब्दांपासून साधलीं आहेत.

[ आ ] या प्रत्ययानें कांहीं नामसाधित धातू होतात. जसें:— मूठ–मुठकळ किंवा मुटकळ [ मुठीनें मारणें किंवा दाबणें, पिळणें ].

**का**—[ अ ] हा प्रत्यय स्वार्थीं कांहीं नामांस लागतो. जसें:—थेंब–थेंबका, चूळ–चुळका, माणि–मणका, पुंजा–पुंजका, सुळा–सुळका, डेरा–डेरका, धिंड–धिंडका, मेढ–मेढका–मेढकी, ओंडा-ओंडका; घोळ-घोळका, अप [ सं० अप–पाणी ]–अपका, माळ–माळका, इ०. शब्दाचे अन्त्य स्वरास का प्रत्ययापूर्वीं सर्वत्र अकारादेश होतो.

[ आ ] कांहीं विशेषणांसही हा प्रत्यय लागून विशेषणें होतात. जसें:—पांढरा–पांढुरका [ सं० पांडुर या शब्दांतील उकार या साधित विशेषणांत आला आहे. ], रिकामा–रिकामका, पर–परका,

घड—घडका, ( न फाटलेला ), नीट—नेटका ( येथें उपान्त्य दीर्घ ईस गुण झाला आहे ), थोडा—थोडका.

( इ ) कांहीं नामांस हा प्रत्यय लागून विशेषणें होतात. जसें:— हात—हातका ( हातभर, एक हात रुंदीचा ), कीड—किडका, नेम—नेमका, पोर— पोरका ( आईबाप मेलेला, अनाथ ).

टीप—मुटका, चरका, चुरका, भुरका, घडका, भडका, इ० शब्द हा का प्रत्यय लागून झालेले आहेत, असें वाटण्याचा संभव आहे. परंतु ते मुटकणें, चटकणें, चुरकणें, भुरकणें, भडकणें, घडकणें, इ० कान्त धातूंस आ प्रत्यय लागून झालेली कृदन्त नामें होत हें उघड आहे. त्यांत का हा प्रत्ययही नाहीं आणि तीं तद्धितेंही नव्हत.

**कार**—या प्रत्ययानें कांहीं अव्ययांपासून भाववाचक नामें होतात. जसें:—पुढें—पुढाकार, न—नकार ( अभाव, निषेध ), ढ—ढकार ( ढेंकर ), हुं—हुंकार ( हुं हुं म्हणणें ).

**कारा**—हुं—हुंकारा, हो-होकारा.

**की**—( अ ) कांहीं नामांस हा प्रत्यय लागून धर्मवाचक नामें साधतात. जसें:—खोतकी, पाटीलकी, गांवकी, माणुसकी, शेतकी, म्हारकी, मास्तरकी, कुंटणकी,

( आ ) कांहीं विशेषणांपासूनही या प्रत्ययानें धर्मवाचक नामें साधतात. जसें: —शिंदळकी, कुचाळकी, हरामकी, लबाडकी, टवाळकी.

( इ ) सोळा—सोळकी [ एकच वस्तू उचलण्यास लागलेल्या सोळा गड्यांचा समूह. जसें:—सोळकीचा धोंडा, वाघ, इ—. ]

( ई ) सामास—सामासकी [ प्रत्येक वर्षास विणारी गाय जी त्यामुळें फक्त सहा महिनेच दूध देते तिला हें विशेषण लावतात ] या शब्दाचें सामाशी असेंही रूप आढळतें.

( उ ) लघुत्वार्थींही हा प्रत्यय कांहीं नामांस लागतो. जसें:— खूर—खुरकी, चांद—चांदका [ लहान भाकरी ], मेढ—मेढकी, ओंडा—ओंडकी,

( ऊ ) शेण—शेणकी ( शेण टाकण्याची जागा ).

( ऋ ) बेकी ( दुही, दोहोंचा एक गट ).

( ऌ ) टिम–टिमकी ( टिम टिम ध्वनि ज्यापासून निघतो अशा प्रकारचें एक ढोलकें ).

[ ए ] यानें स्वार्थी विशेषण होतें. जसें:—पर–परकी.

[ ऐ ] हा नामास स्वार्थी लागलेला आढळतो:—खोड–खोडकी.

**कुची**—अणकुची [ हा शब्द अणु किंवा अणी ह्या शब्दांतील अन्त्य स्वरास अकारादेश होऊन नंतर त्यास कुची प्रत्यय लागून झाला आहे. ]

**कुला**—ह्या प्रत्ययानें कांहीं प्रेमळ लघुत्वसूचक विशेषणें होतात. जसें:—चिमुकला [ चिमणी शब्दाचें चिमी, चिमू अशीं रूपें होतात. त्यांपैकीं चिमूपासून चिमुकला असें झालें आणि त्यापासून चिमकुला झालें असें म्हणावें. अथवा चिमी, चिमू ह्यांचे अन्त्याक्षरास अकारादेश होऊन नंतर कुला हा प्रत्यय लागला असें म्हणावें. येथें दुसरा पक्ष स्वीकारून उदाहरण दिलें आहे. ], सोनकुला [ सोन्या ह्या लाडक्या नांवापासून कुला प्रत्ययानें नियमितपणें झाला आहे. ]

**कुली**—फुसकुली, अंडकुली किंवा अंडुकली, चांदकुली, घरकुली, कुरकुली.

**कुळा, कोळा**—काटकुळा, काटकोळा [ ह्या शब्दांपैकीं काट हा काठी शब्दाचा शेष असावा, किंवा काष्ट शब्दाचा अपभ्रंश असावा. ]

**कूट**—हीर–हिरकूट.

**कूल**—अल्पत्वार्थी हा प्रत्यय कांहीं ठिकाणीं झालेला दिसतो. जसें:—घरकूल, मड [ मडकें ]–मडकूल, भेद [ तुकडा ]–भेतकूल.

**कूर**—ढोणकूर.

**कें**—[ अ ] लघुत्वदर्शक:—जसें:—बिंड–बिंडकें; पुडा–पुडकें, नाळ–नाळकें, ओंडा–ओंडकें; ठाव–ठावकें, होडी–होडकें, पेंढ–पेंढकें, डेरा–डेरकें, ढोल–ढोलकें.

[ आ ] पाव–पावकें, निमा–निमकें, पाऊण–पाऊणकें, सव्वा–सवायकें [ हें रूप अनियमित आहे ], दीड–दिडकें, अडीच–अडिचकें, औट–औटकें, अकरा–अकरकें. हे सर्व शब्द बहुधा अनेकवचनीं आढळतात.

**टीपः**—सर्वत्र मूळ शब्दांतील अन्त्य स्वरास अकारादेश होतो.

**को**—[ अ ] धन–धनको [ धन ज्यापाशीं आहे तो, कर्ज देणारा ], रीण–रिणको [ रीण म्हणजे कर्ज करणारा ].

[ आ ] बाई–बायको ( येथें को प्रत्यय स्वार्थी दिसतो ).

**कोळ**—काठकोळ ( काठि + कोळ, किंवा काष्ठ ह्याचा अपभ्रंश काठ + कोळ ), किरकोळ ( अनुकरणवाचक किर + कोळ = किरकोळ अशी ह्याची व्युत्पत्ति दिसते. किरकोळ विक्रींत किरकिर फार असते हें उघडच आहे. )

**क्या**—पाणी–पाणक्या ( पाणी आणणारा, ब्राह्मण किंवा गुजराथी )

**खा**—( अ ) नवा–नवखा ( अनोळखी, नवीन, अज्ञान ).

( आ ) बूड–बुडखा ( येथें खा प्रत्यय स्वार्थी दिसतो ).

**खुरा, खोरा**—डावा–डावखुरा, डावखोरा.

**खोर**—ह्या प्रत्ययानें ' त्याची संवय आहे ज्याला ' या अर्थी बरींच विशेषणें साधतात. हा प्रत्यय मूळचा फारसी असून त्याचा मूळ अर्थ ' खाणारा ' असा आहे. पण तो प्रत्यय निवळ मराठी शब्दांसही लागतो म्हणून तो येथें दिला आहे. जसें:—कागाळी–कागाळीखोर, भांडखोर, चहाडी–चहाडखोर, कज्जा–कज्जेखोर; थट्टा–थट्टेखोर, चेष्टा–चेष्टेखोर, दिवाळें-दिवाळखोर, चिकित्सा–चिकित्सेखोर, संशयखोर. शंका–शंकेखोर, चुगली–चुगलखोर, बंड–खोर, तंटेखोर, इ०.

**टीप**—आकारान्त स्त्रीलिंगी शब्दांचें खोर प्रत्यायापूर्वी एकारान्त असें म्हणजे त्याच्या सामान्यरूपासारखें रूप होतें. ईकारान्त व एंकारान्त शब्दांचे अन्त्य स्वरास अकारादेश होतो; या नियमास कागाळी शब्द अपवादक दिसतो. आकारान्त पुल्लिंगी शब्दांचे अन्त्य स्वरासही, आकारान्त स्त्रीलिंगी शब्दांप्रमाणें एकारादेश होतो, असें वरील उदाहरणांवरून कळेल.

**गट**—खोलगट ( जरासा खोल ), चारगट ( चार करणारा, ( खोड्याळ ).

**गत**—हा प्रत्यय गति शब्दाचा अपभ्रंश आहे.

[ अ ] हा प्रत्यय कांहीं नामांस स्वार्थी लागतो. जसें:—कलह–कलागत ( यामध्य मुळांतील हकाराचा अ होऊन तो मागल्या अ मध्यें मिळून आ झाला आहे. ), काम–कामगत.

[ आ ] क्वचित् नाम व विशेषण, यांपासून या प्रत्ययानें धर्मवाचक नामें साधतात. जसें:--दिवस-दिवसगत, ओशाळा-ओशाळगत.

[ इ ] यानें क्रियाविशेषणापासून विशेषणही क्वचित् होतें. जसें-- खास-खासगत.

**गळ**--हा प्रत्यय अल्पत्वार्थी आहे. वेड-वेडगळ.

**गा**--[ अ ] हा प्रत्यय कांहीं नामांस स्थूलत्वार्थी लागतो. जसें:-- सोंटा-सोंटगा [ मोठा सोंटा ], जुडी-जुडगा [ मोठी जुडी ], वाटी-वाटगा-वाडगा [ मोठी वाटी ], खळी-खळगा, रोट-रोटगा, मूळ-मुलगा, पोर-पोरगा, इ०.

या शब्दांपैकीं कांहींचीं स्त्रीलिंगी [ ईकारान्त ], कांहींचीं नपुंसकलिंगी [ एंकारान्त ] आणि कांहींचीं तिन्ही लिंगी रूपें आढळतात. जसें-- खळगा-खळगी, सोंटगा-सोंटगें, जुडगा-गी-गें, मुलगा,-गी-गें, इ०.

[ आ ] कांहीं विशेषणांसही स्वार्थी हा प्रत्यय लागतो. जसें-- दांड-दांडगा, टार-टारगा, खुळा-खुळगा, लहान-लहानगा.

टीप--या दोन्ही ठिकाणीं आकारान्तेतर शब्दांस हा प्रत्यय लागतांना अन्त्यास अकारादेश होतो.

[ इ ] पान-पानगा [ पानावर पीठ थापून त्या पानासह भाजून केलेली भाकरी ]. ह्या शब्दाचें लघुत्वार्थी पानगी असें रूप होतें.

**गिरी**--[ अ ] धंदा दाखविणारीं-शिपायगिरी, वैद्यगिरी.

[ आ ] धर्मवाचक--लुच्चेगिरी, सावधगिरी.

**गी**--[ अ ] पोट-पोटगी.

[ आ ] खाणें-खादगी, देणें-देणगी.

[ इ ] कांहीं यावनी शब्दांसही हा प्रत्यय लागतो. जसें:- परवाना-परवानगी, रवाना-रवानगी, बिदा-बिदागी, खास-खासगी.

**गूत-द**-नाळगूत-द ( बेंबीवरील फोड ).हा प्रत्यय गूत-गुंतणें, या धातूपासून आला असल्यास नकळे ?

**गें**--हा प्रत्यय अल्पत्वार्थी लागलेला आढळतो. जसें :--झारा-झारगें, वाडी--वाडगें.

**गेला**--[ गा + एला ]--रोडगेला, दांडगेला, वेडगेला, जाडगेला, इ०. हीं सर्व विशेषणें होत.

**चट**--मुळचट, मेणचट, पाणचट [ हा शब्द पाणी शब्दापासून साधला आहे हें उघड आहे ].

**चा**--या प्रत्ययानें कांहीं अव्ययांपासून विशेषणें साधतात. तीं अशीं:--
[ अ ] क्रियाविशेषणांपासून--एकदांचा, केव्हांचा, आजचा, काल्चा, आतांचा, इकडचा, तिकडचा, अलीकडचा, पलीकडचा [ इकडे, तिकडे इत्यादि शब्दांत कड हा मूळ शब्द आहे; त्यास चा हा प्रत्यय सामान्यरूप न होतां लागला आहे. ], येथचा, तेथचा इ०.
[ आ ] शब्दयोगी अव्ययांपासून--वर-चा, पुढचा, मागचा, खालचा, मधचा, इ०.

टीपः--अकारान्तेतर अव्ययांस हा प्रत्यय लावतांना तीं अकारान्त होतात, हें वरील उदाहरणांवरून स्पष्टच आहे. मध्यें यांजपासून 'मधचा' हें रूप ध्य ह्या अक्षराचे जागीं ध येऊन झालें आहे. तसेंच हा प्रत्यय बहुधा स्थलवाचक व कालवाचक अव्ययांस लागतो. चा चे जागीं ला प्रत्ययही लागतो.

**चारः**--[ हा प्रत्यय सं० आचार शब्दापासून आलेला दिसतो. ] याचे-पूर्वीं मूळ शब्द अकारान्त होतो. जसें:--पाहुणचार, मेहुणचार.

**चें**--लोणचें [ लोण म्हणजे मीठ, विशेषेंकरून त्यानें युक्त जें तें. ]

**जा**--क्रमवाचक--दुजा, तिजा.

**जी**--[ अ ] हा प्रत्यय ब्राह्मणेतर लोकांचे नांवापुढें आदरार्थीं लावितात, जसें:- रामजी पाटील, विठोजी जाधव, रघोजी भोंसले, मालोजी, संभाजी, शिवाजी. इ०.

टीपः--भटजी, गुरुजी, कृष्णाजी, इ० कांहीं शब्दांत ब्राह्मणांमध्यें आढळतो.
[ आ ] या प्रत्ययानें कांहीं निंदाव्यंजक शब्द तयार होतात. जसें:--आयता--आयतोजी, गोमा--गोमाजी, टिका--टिकोजी, इ०.

**ट**--[ अ ] या प्रत्ययानें कांहीं नामांपासून विशेषणें होतात. जसें:--अरबट, रेंवट, मातट [ माती + ट ] आंबट, खारट, तिखट [ तिखें (सं० तीक्ष्ण) + ट ], रोगट, जिवट [ जीव + ट ], वाझट, वातट, दणकट [ दणका + ट. ह्याचेंच पुढें दणगट असें अधिक

प्रचलित रूप झालें.], पोंचट [ पोंचा + ट ], घामट, उबट, शेंबडट [ शेंबूड + ट ], तेलट, तुपट, भंगट, ताकट, तापट.

[ आ ] क्वचित् अल्पत्वार्थीं हा प्रत्यय होतो. जसें:—खोपट, मुसकट [ मुसकें + ट ] पिसाट [ पिसें + ट ], सळप–सळपट, धलपा--धलपट.

[ इ ] कांहीं विशेषणांसही हा प्रत्यय लागून मूळ गुणाचा अल्पांश दाखविणारीं नवीन विशेषणें साधतात. जसें:—लांबट, रुंदट, उंचट, उभट, नवट, जुनाट, पिचकट [ पिचका + ट ], पिंवळट, हिरवट, लालट, हलकट, मळकट [ मळका + ट ], फिकट, पिंगट.

[ ई ] तांबट [ सं० ताम्रकुट्ट ].

**टळ**—वावटळ.

**टा**—[ अ ] कांहीं नामांस अल्पत्वार्थी हा प्रत्यय लागतो. जसें:—रोपटा [ लहान रोंपा ] घरटा–टें [ लहान घर ], दिवटा–टी [ लहान दिवा ], बाहुटा [ लहान बाहु–खांद्यापासून कोंपरापर्यंतचा भाग. ध्वज किंवा पताका या अर्थाचा बाहुटा शब्द निराळा आहे. तोही बाहु शब्दापासून साधलेला असण्याचा संभव आहे. ], चोरटा [ अल्पचोर ] पोरटा.

[ आ ] एकटा, दुकटा [ हा शब्द एकटा ह्या शब्दाच्या सादृश्यानुरूप तयार झाला असून बहुधा त्याचे बराबरच याचा उपयोग होतो. ], गोरटा [ गोरा + टा ].

( इ ) क्वचित् या प्रत्ययानें सामान्यनामापासून भाववाचक नामही जसें:—चीक–चिकटा.

**टी** –( अ ) अल्पत्वार्थीं हा प्रत्यय कांहीं नामांस लागतो. जसें:—आगटी, शेकटी, किंवा शेकुटी किंवा शेकोटी. सालटी–टें, सायटी–टें, शेप शेपटी, भुगा–भुगटी, थापटी.

( आ ) या प्रत्ययानें कांहीं नामांपासून विशेषणें साधतात. हा प्रत्यय सं० स्था धातूशीं संबद्ध असावा असें वाटतें. जसें:—रानटी, तारवटी ( तारवांतून आलेला ).

**ठण**—हा प्रत्यय ठाण ( सं० स्थान ) शब्दापासून आलेला दिसतो. गोठण ( गाईचें, गुरांचें स्थान ), पायठण–णी ( पाय ठेवण्याची जागा पायरी ), गांवठण ( गांवाचे स्थान, ठिकाण ).

ठा--( अ ) गांवठा (ग्रामस्थान. येथील ठा प्रत्यय सं० स्था धातूशीं संबद्ध आहे ) उंबरठा [ उंबऱ्याचा ठाय म्हणजे जागा. )

[ आ ] गारठा [ फार गार हवा ].

ठी--हा प्रत्ययही सं० स्था धातूपासूनच आलेला आहे. जसें:—गांवठी [ गावांत म्हणजे—शहरांत किंवा नगरांत नव्हे—बनवलेला, तयार झालेला; ह्याचे विरुद्ध शहरी किंवा नागरी ].

ड--[ अ ] वरील ट प्रत्ययाचेंच ड हें दुसरें रूप होय. रातड [ जरासा राता ], हेंकट—ड [ हेका धरणारा, हेकेखोर ], मातट—ड, वातट—ड [ ह्यापासूनच पुढें वात्रट—ड हे शब्द उत्पन्न झाले ].

[ आ ] जख्ख—जख्खड [ येथें ड प्रत्यय स्वार्थी आहे. ]

[ इ ] यानें क्वचित् नामसाधित धातु होतात. जसें:—लाथ—लाथडणें किंवा लाथाडणें; बोखा—बोखाडणें किंवा बोखडणें [ टोंक तोडणें ].

डा--[अ] हा कांहीं नामांस अल्पत्वार्थी लागतो. जसें:—कोन-डा, कोना-डा, जरडा [ जर हा संस्कृत ज्वर शब्दाचा अपभ्रंश आहे ], थेंब—डा, जिवडा [ जीव शब्दांतील जी ऱ्हस्व झाली आहे. ], पगडा [ पग म्हणजे पद ], बाप—डा, बापुडा [ बापू हा शब्दही बाप यापासूनच ऊ प्रत्यय लागून झाला आहे ], गधडा [ ह्यांतील गधा शब्द हिंदी आहे ], वांस—डा, मुख—डा, विंचडा [ विंचू शब्दांतील अन्त्य ऊस अकारादेश झाला आहे ], नथ—डा, पांय—डा [ पाय + डा अशा प्रकारेंच पांयडा हा शब्द झाला आहे. मात्र अर्थामध्यें थोडा फरक आहे. पांयडा म्हणजे पाय ठेवण्यासाठीं झाडाला पाडलेली खाप किंवा झाडावर चढण्याचे वेळीं पायांत दोरीचें वेंटाळें अडकवितात तें. पांयडा शब्द पुल्लिंगी आहे ], आंकडा, इ०.

[ आ ] कांहीं नामांस व विशेषणांसही हा प्रत्यय लागून नवीन विशेषणें तयार होतात. जसें:—वावडा [ वाव म्हणजे वायु ], सावडा [ हा शब्द सांव शब्दास डा प्रत्यय लागून आद्याक्षरांतील अनुस्वार उडून बनला आहे ], भावडा [ भाव + डा; ह्याचें भाबुडा असेंही रूप आढळतें ], कोरडा [ कोरा + डा; कोरा शब्द सं० कुमार शब्दापासून आला आहे. उदाहरणार्थ, कुमरी

यापासून, कोर—फड शब्दांतील प्रथमार्ध आला आहे तो पहा], नागडा [ नागा—नंगा हे शब्द हिंदी आहेत ], आळसडा [ ह्याचें आळसुडा असेंही रूप आढळतें ], खरुजडा, खरजुडा, वांक-वांकडा.

[ इ ] कांहीं जातींच्या नांवांपुढें तिरस्कारार्थी हा प्रत्यय येतो. जसें:—म्हारडा, चांभारडा, कुंभारडा, न्हावडा [ न्हावी + डा ], जोगडा [ योगी, जोगी + डा ], गोसावडा, महारडा, इ०.

डी—( अ ) कांहीं नामांस लघुत्वार्थी हा प्रत्यय लागतो, आणि त्यांपैकीं कांहीं ठिकाणीं त्याचें डें असें रूप होतें. जसें:—गात—डी, पोतडी ( पोतें + डी )—डें, चामडी-डें, ( चाम म्हणजे चर्म, चामडी ह्या शब्दाचें चमडी असेंही रूप होतें ) चिंधडी ( चिंधी + डी ), टंग—डी, टेंक—डी, डफडी किंवा डफरी, तबक—डी, पलंग—डी, साल—डी—डें, कात—डी—डें, ( ह्या ठिकाणचा, कात शब्द स्वतंत्रपणें प्रचारांत नाहीं. परंतु सापाच्या शरीरावरून गळून पडलेली जी त्याची कातडी ती दाखविणारा कांत हा शब्द प्रचारांत आहे. कांत शब्द सं० कांति शब्दापासून आला आहे ), पानडी ( पानाच्या आकृतीचा तायतळ्यांत घालण्याचा एक लहानसा नग; पिंपळपान या नांवाचा एक लहानसा दागिना आहेच. एवंच पान शब्द तत्सदृश दागिन्यास लागतो, आणि त्याजपासूनच पानडी शब्द उत्पन्न झाला आहे. ), लाल—डी.

( आ ) वावडी ( वाव म्हणजे वायु, त्यानें उडणारी ती वावडी; येथील डी प्रत्यय संस्कृत डी धातूशीं संबद्ध असावासें वाटतें. )

( इ ) कांहीं लघुसमुदायवाचक नामांस स्वार्थी हा प्रत्यय लागतो. जसें:—पंचक—डी, ( पांच वस्तूंचा समुदाय ), छकडी ( छक हा सं० षट्क शब्दापासून आला आहे ). दसकडी ( दसक-सं० दशक, म्हणजे दहा पदार्थांचा समुदाय ).

डें—हा प्रत्यय लघुत्वार्थी कांहीं नामांस लागतो ( डी प्रत्ययाचे जागीं याच अर्थी हा प्रत्यय होतो हें वर सांगितलेंच आहे. तथापि कांहीं शब्दांत हा स्वतंत्र आढळतो, म्हणजे त्या शब्दांचें ईकारान्त रूप आढळत नाहीं. ) जसें:—अंगडें ( अंगी + डें ), कुंचडें ( कुंची + डें ), टोपडें ( टोपी + डें ), सुपडें, रुपडें, इ०.

**ढळ**—गांवढळ.

**ढा, ढें**—लघुत्वार्थक. जसें:—गांवढा, गांवढें.

**ण**—[ अ ] ढुंगण, कुंपण, गोफण, पोखरण.

[ आ ] तैलंगण ( या शब्दांतील ण, स्थानवाचक आहे. तैलंगण म्हणजे तैलंगांचें स्थान म्हणजे कर्नाटक प्रांत. )

[ इ ] वरण ( सं० वर + अन्न ) या ठिकाणीं ण हा प्रत्यय **अन्न** शब्दाचा शेष दिसत आहे.

[ ई ] विशेषणांपासून क्वचित् या प्रत्ययानें भाववाचक नामें साधितात. जसें:—दाटण, लांबण, ताठण.

**णा**—गुणितार्थी. दुणा.

**णी**—[ अ ] लघुत्वार्थक. जसें: चांदणी नथणी.

[ आ ] दुधणी अ० दुधाणी ( दूध तापवावयाचें मडकें ).

[ इ ] आभावणी [ आभाव म्हणजे कल्पना. आभावणी म्हणजे अंदाज]

**णें**—चांदणें [ चंद्राचा प्रकाश ].

**ता**—[ अ ] नामास व सर्वनामास स्वार्थी हा प्रत्यय क्वचित् लागतो. जसें:—गोण—गोणता, कोण—कोणता.

[ आ ] कांहीं विशेषणांसही स्वार्थी हा प्रत्यय लागतो. जसें:—जोगा-जोगता, भला—भलता [ येथें अर्थामध्यें थोडा फरक झाला आहे.], दीड—दिडता अ० दिडका, दुणा—दुणता, पर-परता,

[ इ ] कांहीं स्थलवाचक अव्ययांस हा प्रत्यय लागून अव्ययें होतात. जसें: खालीं—खालता, पुढें—पुढता, वर-वरता, माग-मागता—मागुता. ह्या अव्ययांचीं खालतीं—तें, पुढतीं—तें, वरतीं—तें, मागुतीं—तें, अशीं ईकारान्त व एंकारान्तही रूपें प्रचारांत आहेत.

**तें**—[ अ ] रायतें [ राई म्हणजे मोहरी घालून केलेलें तें ].

[ आ ] ओलें—ओलेंतें [ ह्या ठिकाणीं तें हा प्रत्यय स्वार्थी झाला आहे, असेंच दिसतें. ]

[ इ ] पायतें—थें [ अंथरुणाची पायांकडील बाजू, म्हणजे ज्या बाजूस पाय करून निजावयाचें ती बाजू ]

**थळ**--[ अ ] पाणथळ ( पाणी + थळ; येथील थळ हा प्रत्यय स्थळ शब्दापासून आलेला दिसतो. )

[ आ ] नवथळ--नवथर [ ह्यांपैकीं नवथर हेंच रूप विशेष प्रचारांत आहे. नवथर म्हणजे नुकतेंच, थोडयाच काळापूर्वी. )

**था**--क्रमवाचक-चवथा.

**दर**--एक-एकंदर ( एकत्र, सर्व मिळून ).

**दा**--पाचुंदा ( पांचांचा समूह ).

**दां**--इतक्या वेळां या अर्थीं या प्रत्ययानें क्रियाविशेषणें साधतात. जसें:--एकदां, पांचदां, अनेकदां, पुष्कळदां इ०. सर्वदा ( हा शब्दही असाच झाला आहे. पण त्याचे अन्त्याक्षरावर बिंदु नाहीं. )

**दाड**--भगदाड ( दाड हा प्रत्यय महत्व अथवा स्थूलतादर्शक आहे. भगदाड या शब्दाचीं भगदड--दळ अशींही रूपें आढळतात. त्या ठिकाणीं दड किंवा दळ असा प्रत्यय मानावा. )

**दार**--हा प्रत्यय त्यानें युक्त, तें धारण करणारा, तें राखणारा, धरणारा, इ० अर्थांनीं लागतो. हा प्रत्यय मूळचा हिंदी दिसतो. म्हणजे तो बहुधा हिंदी शब्दांत आढळतो. जसें:--नोकदार, छानदार, खुबीदार, अंमलदार, हिस्सदार, टुमदार, इ०. पण तो आतां मराठी शब्दांसही लागलेला आढळतो. जसें:--घोंसदार, अणीदार, गुंडीदार, कंठीदार, कंगणीदार, पैलूदार, मोजणीदार, भागीदार, राखणदार, चवदार, पाणीदार, अगीदार, इ०.

**प**--यानें नामसाधित धातू झालेला आढळते. जसें:--कोळ--कोळपणें ( कोळ म्हणजे तेजोहीन किंवा निस्तेज होणें ) झोड--झोडपणें ( झोड करणें, झोडीत सुटणें ).

**पट**--स्वार्थी--सालपट ( सालटी--सालटें--डें ), लेळपट.

**पण, पणा**--ह्या प्रत्ययांनीं नामांपासून व विशेषणांपासून भाववाचक नामें साधतात. जसें:--मनुष्यपण, देवपणा, थोरपण, लहानपण.

**टीप**--आकारान्त विशेषणांस हा प्रत्यय लागतांना ते शब्द एकारान्त होतात. जसें:--भला--भलेपणा, बरा--बरेपणा, वेडा--वेडेपणा, काळा--काळेपणा, गोरा--गोरेपणा, पुरता--पुरतेपणा, खोटा--खोटेपणा. अपवाद--शहाणा--शहाणपण, म्हातारा--म्हातारपण.

**पट्टी**—कुत्सितार्थी हा प्रत्यय कांहीं नामांस लागून इतर नामें साधतात. जसें:—धुळपट्टी, हजामपट्टी, तासडपट्टी, झोडपट्टी, इ०.

**पें**—स्वार्थी. जोडा— जोडपें.

**प्रा**—स्वार्थी. कांठप्रा, खुंटाप्रा

**णा**—[ अ ] हातपा [ सदरा, कोट, बंडी, इ० कपडयांचा हात. ह्या शब्दाचें हातोपा असेंही रूप कचित् आढळतें. ]

[ आ ] स्वार्थी. जसें:—टोणा-टोणपा, वेडा—वेडपा.

[ इ ] भावार्थी. जसें:—वजा वजपा [ कसर ].

**फट**-ड—[ सं० पट शब्दाशीं ह्या प्रत्ययाचा संबंध असावा असें दिसतें. याचा अर्थ प्रदेश. ] कानफड—ड, गालफट-ड.

**बा**—[ अ ] अल्पत्वार्थी-कोठिंबा [ लहान कोठी ]

[ आ ] पाठ पाठिंबा [ पाठ देणारा, मदतगार, सहाय; किंवा मदत, साहाय्य ].

**मट**—या प्रत्ययानें कांहीं नामसाधित धातू होतात. जसें:—घस—घसमटणें [ एकमेकांवर जोरानें घांसणें, अति निकट येणें ], चुरा—चुरमटणें [ चूर होणें, चुरणें ].

**मंत**—हा प्रत्यय संस्कृत मान् प्रत्ययापासून आला आहे. 'त्यानें युक्त' अथवा 'तें आहे ज्यास' या अर्थी हा प्रत्यय कांहीं शब्दांस लागतो. जसें—श्रीमंत, बुद्धिमंत.

**या**—[ अ ] तें करणारा, तें आहे ज्यास, त्या साधनानें उपजीविका करणारा, या अर्थी जराशी निंदेची व्यंजना असतां कांहीं नामांस हा प्रत्यय लागतो. जसें:—टकल्या, ओनाम्या, मस्कऱ्या, पिरपिऱ्या, कावडया, वेठ्या, कोंक्या, खवल्या, आडमुठ्या, सुकाण्या, सारंग्या, तबल्या, पोट्या, हुप्या, हुम्या, घुम्या, दम्या, खोकल्या, धाप्या, बायक्या, भांग्या.

[ आ ] कांहीं ठिकाणीं स्वार्थीही हा प्रत्यय होतो. निंदेचा ध्वनि येथेंही आढळतो. जसें:—रट्टा—रट्ट्या, आत—आत्या. माथा—माथ्या [ हा शब्द ताक करण्याचे रवीचे बोंडास लागतो ], बापु—बाप्या,

सत्ता—सत्त्या, अठ्ठा—अठ्या, नहला—नहल्या, दहला—दहल्या, साखर—साखऱ्या, रोड—रोडया,—सोंटा—सोंटया, लोटा—लोट्या.

[ इ ] अनादर, तिरस्कार, निंदा, इ० विकार दाखवावयाचे असतां विशेषनामांस व बहुधा एकारान्त आडनांवांस हा प्रत्यय लागतो, जसें:- गोंद्या, महाद्या, राम्या, दत्त्या, केश्या, निळ्या, मोऱ्या, नाऱ्या, जग्या, दामल्या, देशपांडया, फडक्या, साठया, इ०.

[ ई ] 'त्याचा केलेला' या अर्थीं हा प्रत्यय क्वचित् होतो. जसें:— तांब्या ( तांबें या नांवाच्या धातूचा केलेला, एक भांडें ).

र —सासू—सासुर ( सासूचें घर; ह्या शब्दाचीं सासर व सासरें हीं रूपें विशेष प्रचारांत आहेत. ) माय—माहेर ( आईचें घर ) या ठिकाणचा र प्रत्यय गृहवाचक आहे.

रा——तें देणारा, तें असणारा, इ० अर्थीं हा प्रत्यय होतो. आणि प्रत्यय लागतांना मूळ शब्दास अनियमित विकार होतात. जसें:—— शिवरा ( शिव्या देणारा ), लातरा ( लाथा मारणारा ), दांतरा ( दांत पुढें असणारा मनुष्य, किंवा दांत पडलेलें हत्यार—चाकू, कात्री वगैरे ), कांटेरा ( कांटे असणारा ), गोंडेरा ( गोंडे असणारा ) महागरा महाग विकणारा ), डावरा ( डाव्या हातानें काम करणारा ), हीं सर्व विशेषणें आहेत.

राव—कुत्सितार्थीं कांहीं शब्दांस हें पद जोडतात. जसें:—— अरेराव, तिरशिंगराव, झुंजारराव, हिंमतराव.

री—[ अ ] या प्रत्ययानें कांहीं विशेषणें होतात. पुणेरी [ पुण्यास बनलेला किंवा त्याच्या सारखा ], रुपेरी [ रुप्याचा ], सोनेरी [ सोन्याचा ], कणेरी [ कण्यांची केलेली लापशी ].

[ आ ] पायरी [ पाय ठेवण्याची जागा, पायठणी ], पोटरी [ गुडघ्या खालील पायाच्या भागाची मांसल बाजू ], डफरी [ लहान डफ ].

रूं—कुत्सितार्थीं किंवा क्षुद्रत्वार्थीं हा प्रत्यय होतो. जसें:—— मेंढरूं, शिंगरूं म्हसरूं, रांडरूं, लेंकरूं, वाघरूं, इ०.

रूड—हा प्रत्ययही कुत्सितार्थीं होतो. जसें:——मिसरूड, म्हसरूड.

**रें**—हा प्रत्ययही कुत्सितार्थीं व अल्पत्वार्थीं होतो. जसें:—टोप—टोपरें किं० टोपडें; डफ—डफरें, डफडें; डबा—डबरें किं० क्वचित् डबडें.

**ल**—( अ ) अल्पत्वार्थीं हा प्रत्यय झालेला आढळतो. जसें:—तांबूल [ लहान तांब्या ], डोंबल [ लहान डोबें म्हणजे खोबरें तयार न झालेलें असें शहाळें; यावरून डोंबल शब्द बुद्धिहीन मनुष्याचे डोक्यास तिरस्कारपूर्वक लावितात ].

[ आ ] नवल [ चमत्कार, नवीन गोष्ट ].

[ इ ] या प्रत्ययानें क्वचित् नामसाधित धातू होतात. जसें:—बोंब—बोंबलणें [ बोंब मारणें ], पोंचा—पोंचलणें [ पोंचा येणें, हापटणें ].

**लग**—हा प्रत्यय लाग धातूचा शेष दिसतो.

[ अ ] यानें कांहीं सामान्यनामें साधतात. जसें:—नातलग जिवलग०

[ आ ] यापासून क्वचित्, विशेषणही बनतें. जसें:—डांकलग.

**लट**—हा प्रत्यय लोट धातूचा शेष दिसतो. उदा०—अंगलट.

**ला**—[ अ ] हा प्रत्यय लाग धातूचा शेष दिसतो; आणि कांहीं ठिकाणीं तो चा ह्या षष्ठीच्या प्रत्ययाचें रूपांतर असावा असें वाटतें. कांहीं स्थलवाचक व कालवाचक अव्ययांपासून या प्रत्ययानें विशेषणें साधतात. हा प्रत्यय लागण्यापूर्वीं आकारान्तेतर अव्ययें अकारान्त होतात. [ वास्तविक म्हटलें म्हणजे या अव्ययांत अकारान्तच मूळ शब्द आहेत. ] जसें:—मागला, पुढला, आंतला, बाहेरला, मधला, शेवटला.

[ आ ] कांहीं क्रियाविशेषणांस हा प्रत्यय लागून अन्य क्रियाविशेषणें बनतात. जसें:—आजला [ ह्या दिवसापर्यंत], भोंवताला.

[ इ ] विशेषणांपासून यानें क्वचित् नामें साधतात. जसें:— अर्धा-अधला किंवा अधेला [ अर्धा पैसा ], पाव—पावला.

[ ई ] बहुतेक स्वार्थीं, जसें:—शिंप—शिंपला, खांब—खांबला, चांद—चांदला, टिका—टिकला, धूर—धुरला—ळा.

[ उ ] बाहु—बाहुला.

[ ऊ ] संधि—संधला किंवा संदला [ संधि म्हणजे भेग बुजविण्याचा चांगला तयार केलेला चुना ].

[ ऋ ] थोर—थोरला. येथेंही बहुतेक मूळ अर्थच आहे.

[ लृ ] सर्वनामसाधित विशेषणांस पृथक्त्वार्थीं हा प्रत्यय लागून अन्य विशेषणें होतात. जसें:—इतकाला, एवढाला, असलाला, तसलाला, केवढाला, इ०.

अन्य विशेषणांसही कधीं कधीं हा प्रत्यय लागलेला आढळतो; जसें:—अर्धाला, सगळाला.

**ली**—अल्पत्वार्थीं हा प्रत्यय कांहीं शब्दांस होतो. जसें:—टिका—टिकली, डाव—डावली, ताट—ताटली, दिवा—दिवली, शिंप—शिंपली, सूप-सुपली, जीभ—जिभली, तांब्या—तांबुली.

**लें**—[ अ ] हा प्रत्यय अल्पत्वार्थीं कांहीं शब्दांस होतो. जसें:—बोंड—लें, खाट—लें, बाज—लें, झबा—झबलें, बिंदु—लें, तांब्या—तांबलें.

[ आ ] पीठ—पिठलें.

**लंड**—न्यूनत्वबोधक:—अधलंड, मधलंड, धर्मलंड.

**व**—यानें क्वचित् नामसाधित धातू होतो. जसें:—सटवणें, किंवा सठवणें [ सठीचे दिवशीं सटवाईची बाधा होणें ].

**वट**—[ अ ] या प्रत्ययानें कांहीं नामें साधतात. त्यांतील प्रत्यय संस्कृत वटी शब्दापासून आलेला आहे. जसें:—मसणवट [ सं० श्मशानवटी ] धुळवट, मळवट, इ०.

[ आ ] या प्रत्ययानें कांहीं विशेषणें साधतात. त्यांतील वट हा प्रत्यय संस्कृत वत् प्रत्ययापासून आला आहे. जसें:—उपळवट, कातळवट, रानवट, काळवट, लालवट, किंवा लालट, कडवट, गहाणवट, वाळवट, तारवट.

[ इ ] पाथरवट सं० प्रस्तरकुट्ट ].

[ ई ] काळा—काळवटणें [ काळा होणें ].

**वटा**—या प्रत्ययापासून ओटा असा प्रत्यय होऊन तो वटा ह्याचे जागीं विकल्पानें लागतो. [ मराठीमध्यें व आणि ओ हे परस्परांबद्दल झालेले कांहीं ठिकाणीं आढळतात. ] जसें:—मुखवटा किंवा मुखोटा, दुखवटा खोटा, उंचवटा.

**वटी**—राजवटी किंवा राजोटी, हातवटी, किंवा हातोटी [ हातवटी ह्यापेक्षां हातोटी हेंच रूप अधिक प्रचारांत आहे. ]

**वंट**—वाळू-वाळवंट, सुरवंट [ वंट हा, सं० वत् म० वंत, या प्रत्ययापासून आला असावा. ]

**वंटा**—वरवंटा.

**वठा**—अंगवठा, पाणवठा, दारवठा.

**वडा**—[ अ ] हा प्रत्यय वाडा शब्दाचा शेष दिसतो. जसें म्हारवडा, रांडवडा, हे शब्द भाववाचक नामें आहेत.

[ आ ] कालबोधक. उदा०—आठवडा, पंधरवडा.

[ इ ] कुत्सितार्थीः—धिंडवडा, कीर्तवडा [ वाईट कीर्ति ].

**वंड**—[ अ ] या प्रत्ययाची ओंड, अंड, अशींही रूपें आढळतात.

नातवंड—नातोंड, पणतवंड—पणतोंड, भावंड.

[ आ ] समुदायार्थीः—केळवंड, साळवंड.

[ इ ] काळा—काळवंडणें [ काळा होणें ].

**वण**—दांतवण, हगवण.

**वणी**—हा प्रत्यय पाणी शब्दाचें रूपांतर होऊन झाला आहे. गुळवणी, चिंचवणी, उन्हवणी, हातवणी, ताकवणी, पेजवणी, मधवणी.

**वंत**—हा प्रत्यय संस्कृत वत् [ वान् ] या प्रत्ययापासून निघाला आहे. जसेंः—भगवंत, गरजवंत, धनवंत, बलवंत, गुणवंत, कलावंत, [ ह्याचें स्त्रीलिंगी रूप कलावंतीण, कळवंतीण हें होय. ]

**वर**—कांहीं स्थलवाचक व कालवाचक क्रियाविशेषणांस हा प्रत्यय लागून दुसरीं क्रियाविशेषणें तयार होतात. जसेंः—आजवर, कालवर, जोंवर, येथवर, तेथवर, इ०.

**टीपः**—या वर प्रत्ययाचीं वेरीं, वरी, अशींही रूपें आढळतात. म्हणजे वरील शब्द आजवेरीं, आजवरी, जोंवेरीं, जोंवरी, इ० असेही बहुधा कवितेंत आढळतात.

**वरा** ( ओरा )—फुलवरा किंवा फुलोरा.

**वला**—हा वळणें धातूपासून आला असावा. जसेंः—कानवला, ( कान म्हणजे टोंकें वळवून केलेला ), गंव्हला ( गव्हाप्रमाणें वळलेला ),

गुंजवला ( गुंजा लाऊन वळलेला म्हणजे तयार केलेला मेणाचा गोळा; त्याच्यासारखें एक फळ ).

**वली, उली**—[ अ ] मावली किंवा माउली.

[ आ ] हा प्रत्यय वळणें धातूपासून आलेला दिसतो. उदा०:—वांकवली किंवा वांकुली [ हा शब्द बहुधा अनेकवचनीं येतो. ]

[ इ ] पुढील शब्दांसारख्या शब्दांतील वली प्रत्यय संस्कृत वत् प्रत्ययापासून आलेला दिसतो. उदा०:—नहाणवली किंवा न्हाणवली करवली [ करा किंवा कऱ्हा + वली ].

**वळ**—[ अ ] हा प्रत्यय ओळ शब्दाचें रूपांतर होऊन आला आहे. जसें:—शितवळ [ शितांची ओळ ], उष्टावळ [ उष्ट्यांची ओळ ].

[ आ ] तत्संबंधीं, तेथील, या अर्थी हा प्रत्यय होतो. संस्कृत वत् पासून हिंदी वाला, व त्याचे पासून वळ झाला असावा. जसें:—गयावळ, प्रयागवळ, गंगावळ, खेडवळ, रायवळ, इ०.

**वळा**—[ अ ] वळणें धातूपासून हा प्रत्यय आलेला आहे. जसें:—अंगवळा, तोंडवळा, एकवळा.

[ आ ] गोतवळा [ येथील वळा प्रत्यय सं० वलय शब्दापासून आलेला दिसतो. ]

[ इ ] लेंकवळा [ येथील वळा प्रत्ययही वळणें धातूपासून आलेला असण्याचा संभव आहे. लेंकवळा म्हणजे लेंकाचे वळणांतला राखेचा मुलगा ].

[ ई ] कोठवला [ कोठीवरील अधिकारी ].

**वा**—[ अ ] विशेषणांपासून या प्रत्ययानें कांहीं भाववाचक नामें साधतात. जसें:—गारवा, ओलावा, थंडावा, गोडवा [ स्तुति, हा शब्द बहुधा अनेकवचनीं येतो ].

टीप:—हा प्रत्यय संस्कृत त्व प्रत्ययापासून आलेला आहे. कांहीं शब्दांत या वा प्रत्ययाचे पूर्वी अन्त्य अ स, आ हा आदेश होतो. थंडावा, बंडावा, पुंडावा, दुष्टावा, परावा.

[ आ ] कांहीं नामांस लागूनही या प्रत्ययानें भाववाचक नामें साधतात. जसें:—नेट—नेटावा, पाऊल—पाउलवा, दोर—दोरवा.

[ इ ] कांहीं विशेषणांस हा प्रत्यय स्वार्थीं लागतो. जसें:—बरा—बरवा, आडा—आडवा, कडु—कडवा, नागा [ हिंदीं ] नागवा, मुगा—मुगवा, तिडा—तिडवा.

[ ई ] कांहीं नामांसही हा प्रत्यय तत्सदृश अर्थीं लागून अन्य नामें साधतात. जसें:—तळवा [ हाताचा किंवा पायाचा तळ ], चांदवा [ मंडप, छत्री, वगैरे वरील वाटोळें आवरण ], अंबवा [ आंब्याच्या रंगासारखा जवळ जवळ एका प्रकारचा रंग ].

[ उ ] बोटवा [ बोटानें वळलेला म्हणून; गंव्हला ].

[ ऊ ] पों-पोंवा [ पों आवाज काढणारें एक वाद्य ], ह्याचें पांव असेंही रूप आढळतें.

[ ऋ ] क्रमवाचक:—पांचवा, दहावा, विसावा, पंचविसावा.

**वाईक**—नातेवाईक, तऱ्हेवाईक, मासलेवाईक, थट्टेवाईक, दाखलेवाईक, इ०. या प्रत्ययाचे पूर्वीं मूळ शब्दाचे अन्त्य स्वरास ए असा आदेश होतो.

**वाणा**:—हा प्रत्यय संस्कृत वर्ण शब्दापासून वाण—वाणी हे जे मराठी शब्द आले आहेत त्यांचे द्वारें आला आहे. वाणा याचा अर्थ प्रमाणें. जसें:-गोजिरा—गोजिरवाणा, लाजरा—लाजिरवाणा, वाईट—वाईटवाणा [ या शब्दापासून वाइटावणा हा त्यापेक्षां अधिक प्रचारांतील शब्द आला आहे. ], कंटाळा—कंटाळवाणा, केवल—केविलवाणा, काकुळत—काकुळतवाणा, दीनवाणा.

**वान**—हा प्रत्यय संस्कृत वत् प्रत्ययापासून आला आहे. जसें:—गाडीवान, बागवान.

**वार**—[ अ ] संख्यावाचक विशेषणांपासून या प्रत्ययानें क्रियाविशेषणें साधतात. जसें:—एकवार, दोनवार, इ०. हा प्रत्यय संस्कृत वार म्हणजे दिवस या शब्दाचाच एक प्रकारचा उपयोग आहे हें संस्कृतज्ञास सांगावयास नकोच.

[ आ ] बेतवार [ बेताचा ].

**वाला**—गाडीवाला, कंठीवाला, भाजीवाला, टांगावाला, टोपीवाला, कापडवाला, घोडेवाला. येथील प्रत्यय सं० वत् प्रत्ययापासून आला आहे.

**वी**—[ अ ] ठाणवी.

[ आ ] थोरवी.

**वीस**—हा दिवस या शब्दाचा अपभ्रंश आहे. उदा०:—वाढवीस [ वाढ दिवस ].

**वें**—-जोडा—जोडवें.

**शा**—[ सं० शः ]—यानें विशेषणांपासून क्रियाविशेषणें तयार होतात. जसें:—बहुशः—बहुशा, अनेकशः—शा.

**शीर**—अनुभवशीर, कायदेशीर, वक्तशीर, हवाशीर, अदबशीर. हा प्रत्यय बहुधा यावनी शब्दांस लागलेला आढळतो.

**शां, शी, शीं, शें**—हे सर्व असा, अशी, असें, ह्यांचे शेष आहेत. उदा०:—आतांशीं, विटाळशी, गर्भारशी, टापशी, मघांशीं, आताशें, इ०.

**स**—[ अ ] कांहीं शब्दांत हा प्रत्यय सह अव्ययाचा शेष दिसतो. त्यानें नामांपासून विशेषणें होतात. जसें:—डोळा—डोळस, रूप—रूपस, गोंडा—गोंडस, हाड—हाडस.

[ आ ] कांहीं नामांस हा स्वार्थीं किंवा निरर्थक लागतो. जसें:—टिपूं—टिपूस, तडस, आईस, बापूस.

**टीप** आईस आणि बापूस हे शब्द फक्त कोंकणांत अशिक्षितांचे तोंडीं आढळतात. तडस ह्याचा उपयोग क्रियाविशेषणाप्रमाणेंही होतो.

[ इ ] कांहीं विशेषणांस हा प्रत्यय लागून विशेषणें होतात. त्यांत स हा असा शब्दाचा शेष दिसतो. जसें:—नीटस, तिरका—तिरकस, खुला—खुलास.

[ ई ] मागें ह्या क्रियाविशेषणास स हा प्रत्यय लागून मागस हें विशेषण होतें, आणि त्याच्या विरुद्ध अर्थानें आगस [ आगा—आगें + स ] हा शब्द मागस या शब्दाबरोबर येतो.

**टीप**—आगस आणि मागस ह्यांचा धातूंप्रमाणेंही उपयोग होतो. जसें:—तो मागसला आहे [ मागें पडला आहे ]. अशा ठिकाणीं ह्यास क्रियाविशेषण-साधित धातु असें म्हणावें.

[ उ ] स हा चतुर्थीचा प्रत्यय कांहीं नामांस लागून क्रियाविशेषणें होतात. जसें:—परटीस, परसाकडेस, पाठंगुळीस, वठणीस, इ०. यांस क्रियाविशेषणें म्हणण्याचें कारण इतकेंच कीं ह्या शब्दांतील नामें व

त्यांच्या इतर विभक्तींचीं रूपें फारशीं आढळत नाहींत; तेव्हां हीं चतुर्थ्यन्त रूपें क्रियाविशेषणांप्रमाणें उपयोगांत आहेत असेंच म्हणणें बरें.

[ ऊ ] तणस, तणसडी, तणसुडी. हा शब्द संस्कृत तृण + शंड [ मूळ ] या प्रकारें झाला आहे. त्यांतील शंड याचें मराठी सड आणि त्यांतील स तेवढाच काईम राहून तणस शब्द झाला आहे.

[ ऋ ] यानें क्वचित् नामसाधित धातू होतात. जसें:—धूम—धुमसणें तळ—तळसणें [ तळापासून नाहींसें करणें. ]

**सट**—भोळसट.

**सर**—सर म्हणजे समत्व, या शब्दाचाच प्रत्ययाप्रमाणें कांहीं शब्दांत उपयोग झाला आहे. जसें:—मऊसर, गोडसर, आंबटसर, जाडसर, वेडसर, ओलसर; काळसर, आटपसर, भोळसर.

**सरा**—क्रमवाचक. उदा०—दुसरा, तिसरा.

**सा**—[ अ ] हा प्रत्यय असा शब्दाचा शेष कांहीं विशेषणांत दिसतो. जसें:—धडसा, भलतासा किंवा भलतसा, इवलासा, थोडासा, मोठासा, फारसा, लहानसा.

[ आ ] कांहीं नामांस हा प्रत्यय स्वार्थीं होतो. जसें—कवडसा किंवा कवडासा [ सूर्याचे किरण लहानशा छिद्रांतून येऊन जो वाटोळा प्रकाश पडतो त्यास कवडा म्हणतात. त्या शब्दापासून हे शब्द आले आहेत. ], कोळसा [ कोळ म्हणजे आंबा, चिंच पिकून राहिलेला गाळ, त्यापासून कोळसा म्हणजे जळून पडलेला तुकडा ], बावसा; [ बाहु ].

**सें**—बाळसें, बोंडसें.

**हेरी**—हा प्रत्यय फेर या अर्थाचा असून तो एक, दोन, तीन, चार, यांस लागून तितक्या फेऱ्यांचा किंवा 'घड्यांचा' अशा अर्थाचीं विशेषणें होतात. जसें:—एक + हेरी = एकेरी [ त्या शब्दांत ह् या व्यंजनाचा लोप झाला आहे. ], दुहेरी, तिहेरी, चव्हेरी किंवा चोहेरी. यापुढील पूर्णांक वाचकांस या अर्थानें फेरी हा शब्द जोडतात. जसें:—पांचफेरी, दहाफेरी, इ०.

टीप १—एकेरी, दुहेरी, तिहेरा, चव्हेरी, हीं विशेषणें आकारान्त नसल्या-

मुळें अर्थात् तिन्ही लिंगां समान. तथापि त्यांचा पुल्लिंगीं आकारान्त व नपुंसकलिंगीं एकारान्त अशींही रूपें आढळतात. जसें:—दुहेरी किंवा दुहेरा अंगरखा, एकेरी किंवा एकेरें धोतर, इ०.

टीप २—हेरी व फेरी हे हेर व फेर या मूळ शब्दांस ई प्रत्यय लागून झालले आहेत.

ळ—[ अ ] 'त्यानें युक्त' या अर्थीं हा प्रत्यय कांहीं शब्दांत आढळतो. जसें:— गांठळ, हातळ, [ याचें हाताळ असेंही रूप आढळतें. याचा मूळ अर्थ हातानें युक्त, नंतर दुसऱ्याचे वस्तूस नकळत हात लावणारा म्हणजे चोरटा असा अर्थ झाला ], प्रेमळ, दयाळ, कृपाळ, रवाळ.

[ आ ] कांहीं नामांस हा प्रत्यय बहुतेक स्वार्थीं लागतो. जसें:—ओघळ, तुसळ, भगळ.

[ इ ] या प्रत्ययानें क्वचित् नामसाधित व विशेषणसाधित धातू होतात. जसें:—पिसा–पिसाळणें–पिसळणें ( पिसा म्हणजे वेडा होणें ); चोख–चोखाळणें, चोखळणें [ चोख म्हणजे साफ करणें ].

ळा—[ अ ] हा प्रत्यय कांहीं नामांस व विशेषणांस बहुतेक स्वार्थीं लागतो. जसें:—कपा–कपळा, माथा–माथाळा. अंध–अंधळा, पांगा–पांगळा, धूर–धुरळा [ धुरासारखा

[ आ ] ठोक–ठोकळा, हें विशेषणापासून नाम झालें आहे.

ळी—हा प्रत्यय कांहीं नामांस लघुत्वार्थीं लागतो. जसें:—मासा मासळी, फांसा–फांसळी, कांठळी, गुठी–गुठळी, पांक–पांकळी, गठा–गठळी, किंवा गठडी, वेंट–वेंटळी किंवा वेंटाळी, सरफळी, [ हा शब्द सर्प ह्या संस्कृत शब्दापासून हलकट मराठींत जो सरप शब्द आहे त्यापासून झाला आहे.

# अध्याय ६.

---

## प्रत्ययघटित साधितशब्द—पुढें चालू.

### यावनी.

फारसी व अरबी भाषांतून जे साधित शब्द मराठींत आले आहेत, त्यांचा या अध्यायांत समावेश करावयाचा आहे. पूर्वी सांगितलेंच आहे

कीं, कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं आपल्या नवीन मराठी व्याकरणांत अशा प्रकारच्या शब्दांचा चांगलाच संग्रह केला आहे. गोडबोल्यांच्यापेक्षां या दिशेनें अद्याप कोणी अधिक परिश्रम केलेले दिसत नाहींत. फारसी व अरबी यांचा परिचय असलेल्या मराठी विद्वानाचे हातून हें काम पूर्ण होईपर्यंत गोडबोल्यांनींच केलेल्या कामगिरीनें समाधान मानून येथेंही इतरांप्रमाणें त्यांचाच अनुवाद करणें भाग आहे.

## फारसी साधित शब्द.

### नामें

४०३. **गर, गार, बान** [ क्वचित् वान ], या प्रत्ययांनीं नामांपासून "नामप्रदर्शित व्यापार कर्ते ' म्हणजे ' त्या त्या नामानें दाखविला जाणारा व्यापार करणारे ' या अर्थाचे शब्द तयार होतात. जसें:-

**गर**—सौदा [ व्यापार ]–सौदागर ( व्यापारी ), जर ( सोनें )–जरगर [ सोनार ], कारिगर [ म० कारागीर–कुशलतेचें काम करणारा ], जिनगर.

**गार**—गुनाह ( म० गुन्हा, पाप, अपराध )–गुनाहगार ( म० गुन्हेगार ), खिदमत् ( अर० चाकरी )–खिदमदगार ( चाकर ), मदद ( अर० साहाय्य )–मददगार, रोज ( दिवस )—रोजगार ( दिवस घालविणारा, धंदा ), कामगार, शिकलगार ( शस्त्रें साफ करणारा ).

**बान**—बागवान, सार, ( शुतुर=उंट )–सारवान ( शुतुरबान उंट राखणारा किंवा उंटावर बसणारा ), मिहर ( प्रीति— म० मेहेर )–मिहरबान ( म० मेहेरबान–कृपाळू ), मेज–मेजबान किंवा मेजवान ( मेजवानी देणारा, पाहुणचार करणारा ).

४०४. **जार, दान, स्तान.** यांनीं स्थानदर्शक नामें हातात. जसः—

**जार**—गुल ( फूल, गुलाब )–गुलजार ( पुष्पवाटिका; परंतु मराठींत हा शब्द विशेषण असून त्याचा उत्तम, सुरेख, गोड, मजेदार, असा अर्थ आहे. )

**दान**—कलम ( अर० लेखणी )—कलमदान ( लेखण्या ठेवण्याची पेटी ), शमअ ( अर० दिवा, बत्ती, समई )–शमअदान ( म० शामदान–बत्तीचें भांडें, दिवा ), गुलदान–( पुष्पपात्र, फुलपात्र ), जुजदान

( म०—जुगदान—फणेरें, झोळणा ), ताव ( सं० ताप )—तावदान, खानदान, पानदान, तोसदान ( म० तोस्तान, पिशवी ), बारदान ( सांठविण्याचें भांडें, पेटी, थैली, इ० ).

टीप—ह्यापासून मराठींत दाणी प्रत्यय आला आहे. जसें:—अत्तरदाणी ( अतरदान ), गुलाबदाणी, पिकदाणी, ( पिंक टाकण्याचें पात्र, तस्त ), मच्छरदाणी ( माशा, चिलटें, ढेंकूण, यांस बिछान्यावर आंत न येऊं देणारा पडदा ), बाळदाणी, डीकदाणी, गोंददाणी, चहादाणी.

**स्तान**—हिंदू ( काळा मनुष्य )—हिंदुस्तान, अरबस्तान, तुर्कस्तान, आफ्घानी ( आफघानांचें ) स्तान, कबर [ थडगें ]—कबरस्तान [ स्मशान, मसणवट ] बलुचिस्तान, राजस्तान.

टीप—स्थान हा संस्कृत शब्द स्थलवाचक व तत्सदृश असल्यामुळें वरील शब्दांमध्ये 'स्तान' चे जागीं स्थान लिहिण्याचाच प्रचार पडलेला दिसतो.

४०५. **चा** किंवा **ईचा**—हा प्रत्यय नामांस अल्पत्वार्थी लागतो. बाग—बागीचा— ( बगीचा ), घाली ( अरबी—फा० काली—सतरंजी )—घालीचा ( फा० कालीचा—लहान सतरंजी, म० गालीचा ).

४०६. विशेषणांस **ई** हा प्रत्यय लागून भाववाचक नामें होतात. जसें: —नेक [ खरा ] नेकी [ खरेपणा ], खूश—खुशी [ खुषी, संतोष ], खूब [ चांगला, सुंदर ]—खूबी, सियाह् [ काळा ] सियाही [ काळेपणा, शाई ], दुरुस्त—दुरुस्ती.

[ अ ] हाच प्रत्यय नामांस लागून अधिकार, गुण किंवा स्थिति दाखविणारीं नामें साधतात. जसें:—पादशाही, बादशाही, फकिरी, सौदागरी, दोस्ती, सराफी, हमाली, [ हमालाचा धंदा किंवा त्याबद्दल वेतन ], मजुरी [ मजुराचा धंदा, त्याबद्दल वेतन ].

[ आ ] शब्दांतींच्या ह् बद्दल ग् येतो. जसें:—बंदह् [ बंदा, सेवक ]—बंदगी [ सेवा, दास्य, रामराम ] रवानह् [ रवाना, प्रेषित ]—रवानगी [ प्रेषण, पाठविणें ], ताजह् [ ताजा, नवा, तरुण, सुंदर ]—ताजगी [ नवेपणा, तारुण्य ].

[ इ ] विशेषणांस **आ** आणि **ती** लागून कांहीं भाववाचक नामें होतात. जसें:—गरमा—गरमी [ उष्णता ], कम—कमती [ न्यूनत्व;

परंतु कमती ह्या शब्दाचा मराठींत कमी ह्या **अर्थीं** म्हणजे विशेषणां प्रमाणेंच उपयोग होतो. )

जादह्—जास्ती ( हें मूळ भाववाचक असून कमती प्रमाणेंच मराठींत विशेषण आहे. )

[ ई ] **गिरी** व **शाई** ह्या प्रत्ययांनींही कांहीं भाववाचक नामें साधतात, जसें:—गुलामगिरी, सोदेगिरी, लुच्चेगिरी, भामटेगिरी, सोदेशाई, शिंदेशाई, निजामशाई, गुलामशाई, बेबंदशाई.

## विशेषणें.

४०७. **आ, गीन, मंद, वर** ( आवर ), **वार**, हे प्रत्यय नामांस लागून 'तें बाळगणारा' किंवा 'त्यानें पूर्ण, युक्त' अशा अर्थाचीं विशेषणें होतात. जसें:—

**आ**—दान ( ज्ञान ]–दाना ( म० दाणा–ज्ञानी ).

**गीन**—सुरमह् [ सुरमा, अंजन ]–[ सुरमह्गीन ].

**मंद** —अकल [ अर० ज्ञान ]–अकलमंद [ ज्ञानी ], दौलतमंद, दानिश [ ज्ञान ]–दानिशमंद [ ज्ञानी ].

**वर**—जान [ प्राण ]–जानवर [ म०. जनावर, प्राणी ], जोरावर [ बळकट ], नामवर किं० नामावर [ प्रसिद्ध ].

**वार**—उमीद [ आशा ]–उमीदवार [ उमेदवार म्हणजे साश, पुढल्या आशेनें शिकणारा. ]

४०८ कांहीं नामांस अह् [ आ ] लागून अनेक अर्थाचीं नामें होतात. जसें:–हफ्त् [ सं० सप्त, सात ]–हफ्ता [ हप्ता–आठवडा; याचा मराठींमध्यें मुदती मुदतीनें करावयाचा भरणा असा अर्थ होतो ]. चश्म [ सं० नेत्र, चक्षु ]–चश्मा [ म० चष्मा उपनेत्र ], दस्त [ सं० हस्त ]–दस्ता [ मूठ, बंदुकीचा दस्ता ], पेश [ पुढें ]–पेशा [ धंदा. उद्योग. ]

[ अ ] ई जोडल्यानें नानार्थक विशेषणें होतात, जसें:–ईरान–ईरानी म० इराणी ], शहरी, जंगली, हिंदी.

४०९. **आना ( इयाना, ईना ), वार**—ह्या प्रत्ययांनीं नामांपसून विशेषणें आणि क्रियाविशेषणें होतात. जसें:–रोज–रोजना ( रोजीना–

दिवसाचा पगार ), साल—सालियाना ( सालिना—वार्षिक, वार्षिक प्राप्ति ), माह—माहियाना ( महिना—मासिक, प्राप्ति ), दस्त ( हात )—दस्ताना ( हातमोजे ), नजर ( अर० नेत्र )—नजराना ( नजराणा—देणगी ), देव ( भूत ) —देवाना [ दिवाणा—मूर्ख, वेडा ], शब [ रात्र ]—शबीना [ छबीना—रात्रीची, स्वारी ].

अंगुश्त् ( अंगुलि, बोट )—अंगुश्ताना [ अंगुस्तान, अंगुष्ठाण, सं० अंगुलित्राण ].

**वार**—तफ्सील [ वर्णन, विभाग ]—तफ्सीलवार [ तपशीलवार, वेगळें वेगळें करून ], सादिल्वार, असामीवार, इसमवार, खानेवार, सालवार, विल्हेवार, बेतवार.

टीप—पद्धतवार, संगतवार, प्रतवार, नांववार, हीं मराठी शब्दांस वार प्रत्यय लागल्याचीं उदाहरणें आहेत.

४१०. नामाची द्विरुक्ति होतांना मध्यें **आ** येऊन कांहीं विशेषणें व क्रियाविशेषणें होतात. जसें:—बर ( छाती, ऊर )—बराबर ( छाती पर्यंत, तंतोतंत, सारखा ), सर ( सं० शिर—मस्तक, मूळ, टोंक )—सरासर ( टोंकापासून टोंकापर्यंत, पूर्ण, सर्व एकंदर ), रंग—रंगारंग ( नानाविध ).

गरमागरम हा शब्द असाच गरम या विशेषणावरून झाला आहे.

४११. नामांस कांहीं कृदन्तें लागून कांहीं नामें व विशेषणें होतात. त्यांपैकीं येथें कांहीं दिलीं आहेत. कश ( ओढणारा )—बारकश ( म० बारकस—व्यापारी गलबत ), कुन—( करणारा )—कार ( कार्य )—कारकून [ कार्यकर्ता ] बर्क [ अर० विद्युत्, वीज ]— अंदाज [ फेंकणारा, सोडणार ]=बरकअंदाज [ म० बरकंदाज-बंदूक सोडणारा ], तीरंदाज [ धनुर्धारी ]. गोलह् ( गोळा )—गोलंदाज [ गोळा सोडणारा ], घरंदाज हा शब्द असाच घर शब्दास अंदाज हा फारसी प्रत्यय लागून झाला आहे. मात्र घरंदाज शब्दामध्यें अंदाज याचा मूळ अर्थ नष्ट झाला आहे.

**गीर** [ ग्राहक ]—आफ्ताब [ सूर्य, ऊन ]—अफताबगीर [ म० अबदागीर-छत्री ] जहान [ सं० जगत् ]—जहानगीर [ जग जिंकणारा, नामविशेष ], आलम [ अरबी ]—आलमगीर [ जग जिंकणारा-नामविशेष ].

**खोर**—खाणारा. उ०—खून [ रक्त ]—खूनखोर [ खून करणारा ], हलाल [ अर. न्याय्य, सत्य ]—हलालखोर [ न्यायानें पोटभरणारा हा मूळचा अर्थ; परंतु मराठींत हा शब्द बहुधा भंग्यास लावितात ], हराम [ अर. अन्याय, अशुद्ध ]—हरामखोर [ अनीतीनें पोट भरणारा ].

टीप—हा प्रत्यय निवळ मराठी शब्दांस लागलेलाही आढळतो. उदाहरणे निवळ मराठी तद्धित प्रत्ययांचे यादींत दिलीं आहेत; तीं पहावीं.

**दान**—जाणता. उ०—कदर [ अर. महत्त्व ]—कदरदान [ योग्यता जाणणारा ]

**दार**—राखणारा, बाळगणारा. उ०—चोब [ काठी ]—चोबदार, भालदार, पोतह् ( पिशवी, थैली )—पोतेदार ( म० पोतदार—थैली म्हणजे पैसा राखणारा ), दुकानदार, फौजदार, जमीनदार किंवा जमीनदार ऐटदार, कमानदार, छानदार, नखरेदार, इनामदार, इमानदार, सुभेदार, अर्जदार, मोजणीदार, जबाबदार.

**नवीस**—लेखक. उ०—चिठ्ठी—चिठ्ठीनवीस ( म० चिटनीस ), पोतह्नवीस [ पोतनीस—जमाखर्च लिहिणारा], फडनवीस [फडाकडील लेखक—म० फडणीस ], वाकिअ [ अर. नित्यकृत्य, वर्तमान ]—वाकिअनवीस [ म० वाकनीस—वर्तमान लिहिणारा ], कारखाननवीस, मदतनीस.

**बंद**—बांधणारा, बद्ध. उ०—नालबंद [ नाल बसाविणारा], छपरबंद, पगडबंद, हत्यारबंद, कमरबंद ( कमर बांधणारा, पट्टा किंवा कमर बांधलेला, तयार )

टीपः—यावरूनच मराठी चिरेबंदी, विटेबंदी, ठाणबंदी, जायबंदी, हीं विशेषणें व नाकेबंदी, तटबंदी, घाटबंदी, हीं धर्मवाचक नामें आलीं आहेत.

**बर**—आणणारा. उ०— पैघम [ निरोप ]—पैघमबर [ म० पैगंबर—ईश्वराचा निरोप आणणारा, देवदूत ].

**बरदार**—वर घेणारा. उ०—खासबरदार [ यजमानाची बंदूक वगैरे हत्यारें घेणारा ].

**आवेज**—लोंबणारा, अवलंबित. उ०—दस्त [ हात ]—दस्तआवेज [ म० दस्त ऐवज, दस्तायवज, दस्तैवज—हातचा कागद, ज्यावर अवलंबितां येतें तो. ]

**बाज**—खेळणारा, रमणारा. उ०—इश्क [ अ० स्त्रीप्रीति ] इश्कबाज [ म० इषकबाज—स्त्रैण, विषयी ] शतरंज [ अर० फारसी—शतरंग, सं० चतुरंग—बुदबळें ]—शतरंजबाज [ बुदबळें खेळणारा ], रांडबाज किंवा रंडीबाज, दारूबाज, अफूबाज, कावेबाज, ऐटबाज, नखरेबाज, चैनबाज, अक्कलबाज, कुर्रेबाज, दगलबाज, किंवा दगाबाज किंवा दगेबाज, थट्टेबाज.

**बीन**—पाहणारा. उ०—दूरबीन [ दूरदर्शक यंत्र, दूरदृष्टि मनुष्य, मराठी—दुर्बीण. ]

**माल**—पुसणारा, घांसणारा. उ०—रु [ तोंड ]—रूमाल [ तोंड पुसण्याचें वस्त्र ], दस्तमाला [ भुजवस्त्र ].

टीपः—रुमाल ह्या शब्दाचे मूळ अर्थाच्या अज्ञानानें हातरुमाल म्हणजे हात पुसण्याचा फडका हा शब्द झाला आहे. अथवा हातरुमाल म्हणजे हात व तोंड पुसण्याचा फडका असा अर्थ समजावा. कांहीं झालें तरी हातरुमाल शब्द संकीर्ण होय. मराठीमध्यें रुमाल ह्या शब्दाचा मूळ अर्थ फारसा माहीत नसल्यानें त्यास ‘ शिरोवेष्टन ’ हा विस्तृत अर्थ आला आहे हें उघड आहे.

**जादा**—उत्पन्न झालेला, जात, पुत्र. उ०—शाहजाहा [ म० शहाजादा—राजपुत्र ], शाहजादी [ म० शहाजादी—राजकन्या ].

४१२. फारसींतील समास बहुधा तत्पुरुष आणि बहुव्रीहि आहेत. त्यांचीं उदाहरणें येणेंप्रमाणें:—

**खाना** [ स्थान ]—कारखाना, दौलतखाना, सिह्हत [ अर. आरोग्य, शुद्धि ] + खाना=सिह्हतखाना [ म० शेतखाना ], फिराश [ अ० ] खाना [ म० फरासखाना—आस्तरणस्थान. ], तोप [ तुर्की ] खाना [ म० तोफखाना ], गाडीखाना, हमामखाना, [ स्नानगृह ], जवाहिर-खाना, पीलखाना ] हत्तीखाना ], मालखाना, किताबखाना, अजब-खाना, दवाखाना.

**आबाद** [ स्थान ]—औरंगाबाद [ सिंहासनस्थान ], हैदर [ सिंह ]—हैदराबाद, अहमद [ स्तुत्यतम ]—अहमदाबाद, दौलताबाद, फत्तेआबाद [ फत्याबाद—जयस्थान, स्थानविशेष ].

**नामा**—( पत्र, ग्रंथ, इतिहास ) —हुक्मनामा ( म० हुकुमनामा ), रोजनामा ( दिनचरित ), जाहिरनामा, करारनामा, शाहनामा, ( राजावलिवर्णन ) मुखत्यारनामा.

**खूश**—( चांगला ) खूश + आमद ( आगमन, प्राप्ति ) = खुशामद ( म० खुशामत—आर्जव ), खुशबू ( सुगंध ).

**पेश**—( पुढील, मागील ) —पेशबंद ( खोगिराचा बंद ) पेशवा (पुढीलपणा किंवा पुढारीपणा दिलेला, मुख्य, पुढारी ).

**सर**—( मस्तक, मुख्य )—सरकार ( मुख्य काम ज्याचें तो, राजा ) सरदार ( मुख्यत्व राखणारा, मुख्य ), सरपोश ( मुख्य आच्छादन ).

**आब्** ( पाणी )—गुलाब ( पुष्परस ), गिल मृत्तिका ) + आब = गिलाब ( म० गिलावा—पाण्यानें भिजलेली माती ), आबरू ( मुखावरील पाणी, कीर्ति ), पंजाब ( पांच पाण्यें म्हणजे नद्या ज्यांत आहेत तो देश. )

४१३ फारसी समासांचीं आणखी फुटकळ उदाहरणें:—कारबार ( म० कारभार ).

खरीदखत ( म० खरेदी खत ).

मीरजाफिर ( मीर—मुख्य, अ० जाफिर—विजयी ).

सलाबत म० सलामत—स्थैर्य )—जंग ( युधिष्ठिर )

नूर ( प्रकाश )—जहान ( जग )

पापोश ( म० पायपोस—पादत्राण, जोडा )

नेकनामदार ( खरें नांव राखणारा, प्रामाणिक, कीर्तिमान ]

चारपाई [ चतुष्पद, खाट ].

## अरबी साधित शब्द.

### कृदन्तें

४१४. अरबींतील धातू बहुतेक त्रिवर्ण आहेत, क्वचित् चतुर्वर्णही आहेत. धातूंच्या आरंभीं व अंतीं कांहीं वर्ण जोडून आणि धातूंतील वर्णांस कांहीं स्वर जोडून कृदन्त नामें व विशेषणें होतात. एका धातूपासून होणारीं सर्वच कृदन्तें मराठींत येत नाहींत, तर त्यांपैकीं कांहीं मात्र येतात, आणि मराठींत येतांनां त्यांचें रूपांतरही होतें. अरबींतील धातूंचे

एकंदर तेरा वर्ग केले आहेत. त्यांपैकीं पांच वर्गांतील धातूंपासून साधलेले शब्द मराठींत आलेले आढळत नाहींत. म्हणून ह्यापुढें फक्त आठ वर्गांतील धातूंपासूनच साधलेले शब्द स्पष्ट करण्यांत येतील. त्यामध्यें कित्येक शब्द मराठींत फारसे प्रचारांत नसलेले किंवा मुळींच प्रचारांत नसलेलेही आढळतील, तरी साधनिकेच्या स्पष्टीकरणासाठीं अशा शब्दांचा समावेश करणें प्राप्त आहे.

**वर्ग १**— या वर्गांतील धातूंच्या वर्णांस क्रमानें आ, इ, अ, हे स्वर जोडल्यानें कर्तरि विशेषणें होतात. तसेंच धातूच्या आरंभीं म लावून धातूंतील दुसऱ्या व तिसऱ्या वर्णांस अनुक्रमें ऊ आणि अ हे स्वर जोडल्यानें कर्मणि विशेषणें होतात. उदाहरणार्थ धातूचे वर्ण अनुक्रमें प, फ, ब, हे असतील तर त्यांपासून **पाफिब** ह्या सांच्याचें कर्तरि विशेषण होईल आणि **मपफूब** ह्या सांच्याचें कर्मणि विशेषण होईल. जसें:—

नजर [ पाहणें ]—नाजिर [ म० नाझर—द्रष्टा ], मनजूर [ म० मंजूर—दृष्ट पसंत केलें. ]

हुकम [ आज्ञा करणें ]—हाकिम [ म० हाकीम—शास्ता, न्यायाधीश, धनी, ऑफिसर ].

अलम [ जाणणें ]—आलिम [ ज्ञाता, पंडित ], मअलूम [ म० मालूम—ज्ञात ].

जहर [ दिसणें ]—जाहिर [ म० जाहीर—दिसणारा किंवा दृश्य ].

शहर—[ प्रसिद्ध करणें ]—शाहिर [ म० शाहीर-प्रकाशक कवि ].

मशहूर [ म० महशूर—प्रसिद्ध ].

मलक [ बाळगणें ]—मालिक [ म० मालक—धनी ].

जलम [ पीडणें ]—जालिम [ म० जालीम—पीडा करणारें ].

अमल [ करणें, चालविणें, इ० ]—आमिल [ कर घेणारा, राजादि ], मअमूल [ म० मामूल—सिद्ध, स्थापित ].

घफल [ हयगय करणें ]—घाफिल [ म० घाफिल—मूढ ].

अशक [ इच्छिणें ]—आशिक [ म० आशक किंवा आशुक—कामुक ], मअशूक [ म० माशूक—इष्ट ].

कदर (सोसणें)—कादिर (समर्थ बळकट), मकदूर (म० मगदूर—शक्ति).
घरर ( माजणें, मस्त होणें )—मघरूर ( म० मगरूर—उन्मत्त ).
जबत ( राखणें, स्थिरावणें )—मजबूत ( स्थिर, बळकट ).
हमद ( स्तवणें )—महमूद ( म० महमद— स्तुत्य, नामविशेष ).
जकर ( सांगणें )—मजकूर ( उक्त, कथित )
सहब (बराबर राखणें, राहणें)—साहिब (म० साहेब—धनी, सहचर)
हसल ( जमा करणें )—हासिल ( म० हांशील—उत्पन्न, परिणाम, लाभकर ), महसूल ( कर, उत्पन्न, जकात ).
जमन ( उत्तर देणें )—जामिन ( म० जामीन— उत्तर देणारा, प्रतिभू ).
मजमून ) सांगितलेला, मजकूर ).
अमर ( आज्ञा करणें )—आमिर ( म० अमीर )—शास्ता.
लयक ( योग्य होणें )—लायिक ( म० लायक—योग्य )
( अ ) स्वरांत नियमित फरक होणारे:—
मजव [ जाणें ]—माजी [ गत ].
रजव [ संतुष्ट होणें ]—राजी [ संतुष्ट ].
कजअ [ न्याय करणें ]— काजी ( न्यायाधीश ).
कवम [ राहणें ]—काइम [ म० कायम उभा, स्थिर ].
हमअ [ राखणें ]—हामी [ म० हमी—रक्षक ].

**टीप**—एक धातु अनेक वर्गांत येतो हें पुढील उदाहरणांवरून वाचकांचे नजरेस येईलच.

**वर्ग २**—धातूंतील वर्ण प, फ, ब, हे जर मानिले तर या वर्गांतील धातूंपासून **मुपफ्फिब** ह्या सांच्याचें कर्तरी विशेषण होतें, **मुपफ्फब** असें कर्मणि विशेषणें होतें, आणि **तपफीब** ह्या सांच्याचें क्रियावाचक नाम होतें. जसें:—

अलम (शिकविणें, वाट दाखविणें )—मुअल्लिम ( म० मालीम—गलबतावरील वाट दाखविणारा ), तअलीम [ म० तालीम—शिक्षण, कसरत ].
हसल [ जमविणें, गोळा करणें ]—मुहस्सिल [ करसंचयी, मिळवता ], तहसील [ करसंचय, लाभ, तालुका ].
हमद [ स्तवणें ]—मुहम्मद [म० महंमद-स्तुत, नामविशेष, मुसलमानी धर्म स्थापणारा ].

हरम [ पवित्र राखणें ]–मुहर्‌रम [ म० मोहरम–पवित्र, पूज्य, मुसलमानी वर्षाचा पहिला महिना ].

रबब [ राखणें ]–मुरब्‌बी [ मालक, रक्षक ], मुरब्‌बा [ म० मुरब्बा, मुरांबा, मोरांबा–राखलेला पदार्थ, ह्या शब्दांचा आंबा ह्या शब्दाशीं कांहीं संबंध नाहीं. ]

जफर [ जिंकणें ]–मुजफ्‌फर [ विजयी ].

करर [ स्थापणें, ठेवणें ]–मुकर्‌रर [ म० मुकरर स्थापित ],

कदम [ जाणें, पुढें चालणें ]–मुकद्‌दम [ म० मोकदम, मोकादम, मुकादम–मुख्य, अग्रेसर ], मकद्‌दमा [ म० मोकदमा, मुकदमा–पूर्वभाग, प्रस्तावना, फिर्याद, दावा ]

लमअ [ आच्छादणें ]–मुलम्‌मअ [ सोन्यारुप्यानें आच्छादित ], मूलम्‌आ [ म० मुलामा–आच्छादित वस्तु, कपट, आच्छादन ].

कसम [ विभागणें ] तक्‌सीम [ म० तक्षीम–विभाग, वांटणी ].

रतब [ व्यवस्था राखणें ]–तरतीब [ व्यवस्था ].

नबह [ शिक्षा करणें ] तन्‌बीह [ म० तंबी उपदेश, शिक्षा, कानउघाडणी. ]

फसल [ विभागणें ]–तफ्‌सील [ म० तपशील–विभागीकरण, तुकड्या तुकड्यानें सविस्तर वर्णन ].

अरफ [ वर्णणें, स्तवणें ]–तअरीफ [ म० तारीफ–वर्णन, स्तुति ]

सदअ [ पीडणें ]–तसदी [ पीडा ].

जवज [ शोध करणें, पाहणें ]-तज्‌वीज [ शोध, युक्ति, वि

कसर [ अन्याय करणें ]–तक्‌सीर [ अन्याय, अपराध ].

करर [ बोलणें ]–तक्‌रार [ पुनर्वचन, वादाविवाद, कलह, फिर्याद ]

**वर्ग २**—धातूंतील वर्ण प, फ, ब, असल्यास या वर्गांतील धातूंपासून होणाऱ्या कर्तरी विशेषण, कर्मणि विशेषण, व क्रियावाचक नाम ह्यांचे सांचे अनुक्रमें **मुफाफिब, मुफाफब** आणि **मुफाफाबत** [ किंवा **मुफाफबा** ] असे होतात. जसें:—

सफर [ जाणें, प्रवास करणें ]–मुसाफिर [ म० मुशाफर–प्रवासी ], मुसाफरत [ प्रवास ].

नसब ( जुळणें, योग्य होणें )—मुनासिब ( म० मुनासब—योग्य ).
अमल [ अधिकार चालविणें ]—मुआमलत किंवा मुआमला [ म० मामलत, मामला—उद्योग, अधिकार ].

कबल [ लावून पाहणें ]—मुक़ाबला [ तुलना, साम्य, लढाई ].
अफव [ सोडणें ]—मुआफ [ म० माफ—त्यक्त, क्षमा केलेला ].
वफक [ जुळणें, योग्य होणें ]—मुवाफिक [ म० माफक—हवें तसें, अनुरूप, बेताचें ].

बदल [ देवघेव करणें ]—मुबादला [ म० मोबदला—विनिमय ].
बरक [ आशीर्वाद देणें ]—मुबारक [ आशीर्वादित, सुखी ], मुबारक-खान [ नाम विशेष. ]

लकय [ भेटणें ]—मुलाकात [ म० मुलाखत—भेट, संभाषण ].

**वर्ग ४**—धातूंतील वर्ण प, फ, ब, कल्पिले तर **मुपफिब, मुपफब** आणि **इपफाब** ह्या सांच्यांचीं, या वर्गांतील धातूंपासून अनुक्रमें कर्तरि विशेषणें, कर्मणि विशेषणें, व क्रियावाचक नामें हीं साधतात. जसें:—
नसफ [ न्याय करणें ]—मुनसिफ [ म० मुनसफ—न्याय कर्ता ], इनसाफ [ म०इन्साफ—न्याय ].

नशअ [ लिहिणें ]—मुनशी [ लेखक, पंडित ]

नवब [ नेमणें, राखणें ]—मुनीब [ म० मुनीम—हस्तक नेमणारा, कूळ, धनी ].

अमन [ विश्वासानें वागणें ]—मुमिन [ धार्मिक; म० मोमीन—मुसलमान साळी ], ईमान [ म० इमान—विश्वास, धर्म ].
रवद [ इच्छिणें ] मुरीद [ इच्छु, विद्यार्थी ], मुराद [ इच्छित ], इरादा [ इच्छा, हेतु. ]

दबर [ मागें जाणें, परतणें ]—इदबार [ पश्चाद्गमन, दुर्दैव ].
करर [ बोलणें, स्थापणें ]—इकरार [ म० करार—वचन, प्रतिज्ञा ].
रसल [ पाठविणें ]—इरसाल [ प्रेषण, प्रेषणीय, पाठविण्यास योग्य, उत्तम ].

सलम [ सुखी होणें ]—मुसलिम [ मुसलमान, धार्मिक ], इसलाम [ मुसलमानी धर्म ].

जरय [ वाहाविणें, शुद्ध करणें ]—मुजरा [ सन्मान, नमस्कार. ].

**वर्ग ५**—या वर्गांतील धातूंपासून **मुतपफफिब, मुतपफफब** आणि **तपफफुब** अशीं अनुक्रमें कर्तरि विशेषणें, कर्मणि विशेषणें, व क्रियावाचक नामें होतात. जसें:—

अलक [ आश्रय करणें, अवलंबणें ]—मत अल लिक [ म० मुतालिक—आश्रय करणारा, आश्रित ], त अल् लुक किंवा तअल्लुका म० तालुका, तालुक—नातें, आश्रय, भूमि, धन, वगैरे ].

सदय [ गणना करणें, हिशेब राखणें ]—मुतसद्दी [ म० मुत्सद्दी—गणक, लेखक, हिशेबराख्या, व्यवहारकुशल ].

कलब [ बदलणें ]—तकल्लुब [ भेद, रूपांतर ] तखलुबी [खोटें, बदलेलें].

**वर्ग ६**—या वर्गांतील धातूंपासून होणाऱ्या कृदन्तांचे सांचे येणेंप्रमाणें:—

कर्तरि विशेषण -**मुतपाफिब**, कर्मणि विशेषण—**मुतपाफब**, क्रियावाचक नाम—**तपाफुल** जसें:—

लशय [ शोधणें ] तलाश [ म० तलाश-शोध ]

फवत [ बदलणें ]—तफावुत [ म० तफावत— भेद, अंतर ].

कवय [ मदत करणें ]—तकावी [ म० तगाई—साह्य, कुळास पैशाचे रूपानें आगाऊ मदत देतात ती ].

मशय [ दाखविण ]—तमाशी [ म० तमाशा· दर्शन, देखावा ]

**वर्ग ७**—या वर्गांतील धातूंपासून होणाऱ्या कृदन्तांचे सांचे असे:—

कर्तरि विशेषण — **मुप्तफिब**, कर्मणि विशेषण **मुप्तफब**, आणि क्रियावाचक नाम **इप्तिफाब** जसें:—

अदद [ गणण ]—मुअतद्द [ म० मोताद—मोजलेला, मोजका ].

कसर [ संक्षेप करणें ]—मुक्तसर [ संक्षिप्त ].

अबर [ विश्वासणें ]—मुअतबर [ म० मातबर—विश्वासू, श्रीमंत ], इअतिबार [ म० इतबार-विश्वास ].

खयर [ निवडणें ]—मुखतार [ म० मुखत्यार—निवडक, स्वतंत्र, अधिकारदत्त ], इखतिआर [ म० अखत्यार—इच्छा, अधिकार शक्त. ]

दअअ ( इच्छिणें, बोलणें ) मुद्दई ( म० मुद्दई—वादी ), मुदआ ( म० मुद्दा—इच्छा, हेतु, वाद ).

महन [ पाहणें, परीक्षा करणें ]—इमतिहान [ परीक्षा ].

**वर्ग ८**— या धातूंपासून होणारीं कृदन्तें अशीं:—**मुस्तप्फिब**—कर्तरि, वि०, **मुस्तपफब**—कर्मणि वि०, आणि **इस्तिपफाब**—क्रियावाचक नाम जसें:- कब्ल [ विचारणें, पुसणें ], मुस्तक्बिल [ भविष्यकाळ ]

अमल [ चालवणें, वहिवाटणें ]—मुस्तअमाल [ म० मुस्तमाल-वहिवाटींतला, नेहमींचा ] इसातिअमाल [ मं० इस्तमाल रीति, वहिवाट ].

४१५. पहिल्या वर्गांतील धातूंपासून होणाऱ्या नामांचे जे दोन प्रकार वर दिले आहेत त्यांशिवाय त्यांचे आणखी पुष्कळच प्रकार आहेत. त्यांपैकीं कांहीं पुढें दिले आहेत. धातूचे वर्ण पफब समजून त्यापासून होणाऱ्या नामांच्या प्रकाराचा सांचा प्रथम देऊन पुढें उदाहरणें दिलीं आहेत.

**पफ्ब** [—बा ] फर्क् [ म० फरक ] घर्क् [ म० गर्क ], खर्ज् [ फा० व म० खर्च ], तर्फ, कर्ज, अर्ज जर्ब [ म० जरब ], अक्ल [ म० अक्कल ] शक्क, हक्क, अद्ल [ म० अद्दल—याचा मूळ अर्थ न्याय. परंतु मराठींत याचा भलताच अर्थ झाला आहे. तो असा:—अनिष्ट गोष्टीनें मिळालेला अनुभव किंवा ज्ञान ], कह्र [ म० कहर—प्रसंग, बलात्कार ], कत्ल [ म० कत्तल—वध ], कब्र [ म० कबर-थडगें ], दब्बा [ मं०डबा ], घल्ला [ म० गल्ला ], नक्श किंवा नक्शा [ म० नकाशा ], नक्ल [ म० नक्कल—प्रत ], कसब [ कसब—उद्योग, चातुर्य ], हल्वा [ मिठाई ].

**पिफ्ब** [—बा ]—इश्क [ म० इशक किंवा इषक ] इल्म [ म० इल्म—ज्ञान ] फिक्र [ म० फिकिर—विचार, काळजी ] इम्ला [ म० इमला—कृत्य, हवेली ].

**पुफ्ब** [-बा ] — हुक्म [ म० हुकूम, जुल्म [ जुलूम ] उर्स [ उरूस ], मुल्क [ म० मुलूख ], कुफ्ल [ कुलूप ], तर्रा [ म० तुरा ] उह्दा [ म० हुद्दा ].

**पफब**—अर्क, सफर, अमस, घजब [ म० गहजब ], सबब, तबक, दवा, घरज, [ म० गरम ], खबर, सनद, तलब [ म० तलफ.

याचा मूळ अर्थ निमंत्रण. परंतु त्याचा मराठींत 'हुकी' असा अर्थ झाला आहे. उदा०—त्याला तंबाखूची तलप [ हुकी ] आली आहे ], तरफ, फना [ म० फन्ना—नाश ], कलम [ लेखणी ], कदम [ पाऊल ].

**पफाब** [—बा ]—खलास, सलाम, सलाह, [ म० सल्ला—विचार, मंत्र ], शराब [ मद्य ], फसाद [ म० फिसाद—दुष्टत्व, लढाई ], रवाज [ म० रिवाज—रीति ], अलाका [ म० इलाखा—नातें ] कमाल [ पूर्णता ], जबाब [ जाब, जबाब उत्तर ], मताअ [ म० मत्ता—सामानसुमान ].

**पिफाब** [—बा ]—हिसाब ] म० हिशेब, हिशोब ] दिमाघ ] म० दिमाख—गर्व, डौल ], इलाज [ उपचार ], किताब [ लेख, ग्रंथ ], कियास [ म० कयास—तुलना, मत, तर्क ], फिराश [ म० फरास—आस्तरण, सतरंजी, जाजम ].

**पुफाब** [—बा ]—सुवाल [ म० सवाल—प्रश्न ], खुलासा, खराबा [ नाश ].

**पफ्‌बत**—खल्‌बत, [ म० खलबत ], दह्‌शत [ दहशत ] शरबत [ म० सरबत ], गफ्‌लत [ म० गफलत—दुर्लक्ष ], हज्‌रत, [ म० मजरत—दर्शन ], लज्‌जत [ म० लजत—रुचि ], कसरत [ म० कसरत—वैपुल्य, वृद्धि, अभ्यास, शारिरिक खेळ ]

**पिफ्‌बत**—हिकमत, दिक्कत, निस्बत [ नातें, संबंध ], मिल्कत [ म० मिळकत—प्राप्ति ].

**पुफ्‌बत**—हुज्‌जत, [ म० हुजत—तर्क, वाद ], हुरमत [ हुरमत—मान, प्रतिष्ठा ] सुह्‌बत [ म० सोबत, सोभत ] रुख्‌सत [ आज्ञा, मोकळीक, रजा ], फुरसत [ फुरसत—मोकळीक, आराम ].

**पफबत**—हरकत, दौलत [ धातु—द्वल ] बरकत [ लाभ, समृद्धि ].

**पफाबत**—हजामत, अदावत [ द्वेष ] अदालत [ न्याय, न्यायसभा ], सलामत सुरक्षितपण ] सलाबत [ काठिण्य, योग्यता ] जमाअत [ म० जमात—मंडळी, वर्ग ].

**पिफाबत**—इमारत [ बांधणी, हवेली ], कीमत, [ धा० कवमत, किंमत ], किफायत [ वैपुल्य, नफा ].

**पफीबत**—हकीकत, तबीयत [ म० तब्यत, तब्येत—प्रकृति ] फजीहत [ म० फजिती—अपमान ], नसीहत [ म० नसीहत, नस्यत—उपदेश, शिक्षा ].

**पुफूबत**— हुकूमत् [ म० हुकमत—अधिकार, सत्ता ], सूरत [ धा०— सअर— सूरत—रूप, आकृति, रीति ].

**पाफिब**—[—बा ] खातिर [ म० खातर—री ] रातिब [ म० रतीब—नित्यान्न ], फाइदा [ म० फायदा ], काइदा [ म० कायदा ].

**पफूब**—जरूर.

**पुफूब** —हुजूर [ दर्शन ], शुरूअ [ म० सुरू—आरंभ, हें मूळचें नाम आहे. पण मराठींत याचा ' आरंभ झालेलें ' या अर्थी विशेषणाप्रमाणें उपयोग होतो ], शुरूआत—[ म० सुरवात—हें प्रस्तुत शब्दाचें वास्तविक बहुवचन होय. पण त्याचा मराठींत आरंभ या अर्थी एकवचनींच उपयोग होतो. ], कुसूर [ म० कसूर=दोष, अपराध ] वुकूफ [ म० वकूफ—ज्ञान], वुसूल ( म० वसूल ), रुजूअ ( म० रुजू—समक्षता, ह्याचा मराठींत हजर, लागू, तयार किंवा स्वीकृत, या अर्थी विशेषणाप्रमाणें उपयोग होतो ), रुजूआत ( म० रुजवात हें रुजू ह्याचें वास्तविक बहुवचन. परंतु रुजवात ह्याचा एकवचनी नामाप्रमाणें उपयोग होतो. )

**पुफ्बान**—नुक्सान, अर्आन [ धा० कुरअ, म० कुराण—मुसलमानाचा धर्मग्रंथ ], तूफान [ धा० तवफ, म० तुफान—पूर, वादळ, झंझावात ].

**पफिब** [—बा ]—काजिया [ म० कज्या, कज्जा ], कैद [ धा० कअद ]. दीन [ धर्म ],

**पफीब** [—बा ]—वसीला [ संयोग, संबंध, आधार, आश्रय. ]

४१६. धातूच्या आरंभीं म, मि, मु, हीं अक्षरें लावून आणि धातूंतील मूळ व्यंजनास अनुक्रमें अ, इ, उ, हे स्वर जोडून अनेक अर्थांचीं नामें तयार होतात. जसें:—मखमल, मर्जी, मीरास ( वडिलोपार्जित धनादि, धा. वरस ), मदीना [ शहर, धा० दयन—राखणें], मर्तबत किंवा मरतबा [ म० मरातब—अधिकार, पदवी, मान ], मरम्मत [ म० मरामत—दुरुस्ती, नेटनेटकेपणा ], मिहराब [ म० मेहरब-कोनाडा, कमान ], मुरुवत [ म० मुरवत—धैर्य, प्रीति, भीड ].

[ अ ] असलीं नामें स्थलवाचक आणि क्वचित् कालवाचकही आढळतात. जसें:—मबूलघ [ फा० आगमस्थान, रोकड, पैसा; म० मुबलक—बहुत ], मश्अल् [ म० मशाल—दीप ], मद्रसा [ म० मद-

रसा—शाळा, विद्यालय ], मन्सब [ म० मनसब—अधिकार ], मजूलस [ म० मजलस—सभा, सभास्थान ], मस्जिद [ म० मशीद ], मन्‌- जिल [ म० मजल—प्रवासांत राहण्याची जागा, रोजचें जाणें, ] मौसिम [ धा० वसम, म० मोसम—ऋतु, हंगाम ], मकान [ धा० कवन म० मकाण—घर ], मकाम किंवा मुकाम [ धा० कवम, म० मुकाम ], मनार किंवा मनरा किंवा मीनार [ धा० नवर. म० मनोरा—घुमट ], मौजा [ धा० वजअ, म० मौजा—वसतिस्थान, गांव, देश ], महल [ म० महाल ], मुत्बख [ म० मुदबक, मुदपाक—पाकशाळा ].

४१७. येथपर्यंत जी अरबी कृदन्तें सांगितलीं त्यांशिवाय आणखीं कांहीं व्यापार, कार्य, धंदा, इ० दाखविणारीं कृदन्तें आहेत. त्यांचे सांचे व उदाहरणें:—

**फईल**—तबीब [ वैद्य ], फकीर [ भिक्षुक ], हकीम [ वैद्य ], शरीक [ विभागी ], घरीब [ म० गरीब—प्रवासी, परका, निष्कांचन ], वकील, वजीर

**फअ्आल**—हज्जाम [ म० हजाम-तुंबडी लावणारा, केश काढणारा ], हम्माल [ म० हमाल—ओझें वाहणारा ], अत्तार [ सुवासिक तैलादि विकणारा ], सर्राफ [ म० सराफ-पैशाची घडामोड करणारा ], कस्साब [ म० कसाब—कसाई, खाटीक ], फर्राश [ म० फरास—अंथरूण किंवा बैठक घालणारा ].

**फुअ्लान**—सुल्तान [ अधिकारी, राजा ].

**मुफ्अ्लान**—मुसल्मान [ धा. सुलम—सुखी राहणें, होणें ].

**फैअ्आल**—शैतान [ धा० शतन—आज्ञा न मानणें, द्वेषी होणें; म० सैतान—पिशाच ], तैयार [ म० तयार ].

**फआल**—हराम [ अशास्त्र ], हलाल [ सशास्त्र, युक्त ], खराब, हलाक [ म० हलक—नष्ट, क्लांत ], तमाम [ पूर्ण, सर्व ].

**फुअ्आल**—जुल्लाब [ धा० जुलब—ओढणें, आकर्षणें; म० जुलाब—ढाळक, रेचक ].

**फाऊल**—जासूस [ ० जासूद—दूत ].

**मस्ख़रा**—मसूखरा ( धा० सखर—थट्टा करणें; म० मस्कऱ्या—विदूषक ).
**मिस्कीन**—मिसकीन ( दरिद्री, गरीब ).

## अरबी तद्धितें.

**ई**—नामांस हा प्रत्यय लागून अनेक विशेषणें व कांहीं नामेंही होतात. जसें—मिस्र् ( देशविशेष )-मिसरी, अरबी, हल्वा ( मिठाई )-हलवाई ( मिठाईवाला ), मुज्रा-मुजराई ( मुजरा करणारा, चाकर ).

**ची**— ( म० जी ) ह्या तुर्की प्रत्ययानें कांहीं व्यापारबोधक नामें होतात. जसें :—मशअलची [ म० मशालजी ], पखालची [ म० पखालजी ], बावर [ फा० विश्वास, भरंसा ] बावरजी [ म० बबरजी-विश्वासू, स्वयंपाकी, आचारी ].

**म**—ह्या तुर्की प्रत्ययानें कांहीं स्त्रीलिंगें साधतात. जसें:—बेग [ गृहस्थ ]-बेगम [ बाई ] खान [ फा० राजकुमार ]-खानम [ राजकन्या ].

४१८. अरबींत समास नसल्यामुळें दोन नामें जोडतांनां मध्यें उल् [ चा ] हें शब्दयोगी अव्यय येतें. जसें:-सिराज [ प्रकाश, सूर्य ] आणि दौलत [ संपत्ति ] यांपासून सिराज्उल्दौलह् [ सिराजउद्दौला-संपत्तिप्रकाश ] असा शब्द होतो. या ठिकाणीं दौलत ह्याचें पुलिंगी रूप दौलह् [ दौला ] असें आहे; आणि उल् ह्यांतील ल् ह्या व्यंजनाचे जागीं पुढें आलेल्या दकारामुळें द् हें व्यंजन आलें आहे. आणखी उदहरणें:—

अब्द् [ भक्त ] + उल् + करीम [ ईश्वर ] = अब्दुलकरीम [ ईश्वरभक्त ].
निजाम [ व्यवस्थापक ] + उल् + मुल्क = निजामउल्मुल्क [ म० निजामउल्मुल्ख-देशाधिकारी, नामविशेष. ]

शजअ [ स्तंभ ] + उल् + दीन = शजाउद्दीन [ म० शाजाउद्दीन —धर्माचा स्तंभ, नामविशेष. ]

अला [ साधन ] + उल् + दीन = अलाउद्दीन [ म० अल्लाउद्दीन-धर्माचें द्वार, नामविशेष. ]

अब्द + उल् + रहीम = अब्दुलरहमान [ कृपाळु ईश्वरभक्त, नामवि-

४१९. इब्न ह्याचा संक्षेप बिन, वलद [ दोहोंचा अर्थ पुत्र ] आणि कौम [ म० कोम—कुटुंब, स्त्री ] हे अरबी शब्द मराठींत दोन विशेष-

नामांच्या मध्यें त्याच अर्थानें येतात. जसें:—कृष्णंभट बिन बचंभट=बचंभटाचा मुलगा कृष्णंभट, धोंडू बिन रामा=रामाचा मुलगा धोंडू. बाळू वलद भिवा = भिवाचा मुलगा बाळू. गंगा कोम विठोबा = विठोबाची स्त्री गंगा.

---

# अध्याय ७.

—०*०—

## समासघटित किंवा सामासिक शब्द.

४२०. दोन किंवा अधिक शब्दांचा परस्पर संबंध दाखविणारे शब्द किंवा प्रत्यय लोप पावून त्या दोन किंवा अधिक शब्दांचा जो एक स्वतंत्र शब्द तयार होतो त्या शब्दास **सामासिकशब्द** असें म्हणतात आणि त्या दोन अथवा अधिक शब्दांचा जो हा एकत्र संयोग होतो त्यास **समास** असें म्हणतात. जसें:—गणेश म्हणजे गणांचा ईश. या उदाहरणांत गण आणि ईश या दोन शब्दांचा संबंध दाखविणारा जो षष्ठीचा प्रत्यय तो लुप्त होऊन गणेश असा स्वतंत्र शब्द बनतो. ह्यामुळें गणेश हा सामासिक शब्द होय, आणि गण व ईश हे दोन शब्द ज्याप्रकारें संबद्ध झाले आहेत, त्याचें नांव समास होय. आणखी उदाहरणें—रघुनाथ, भाषासौंदर्य, देशभक्ति, घरजांवई, काळमांजर, इ०.

टीप—समास या शब्दाचा जरी वरील अर्थ मूळ होय, तरी त्याचा सामासिक शब्द या अर्थीही प्रचलित भाषेत उपयोग होतो. हें या अध्यायांतील भाषेवरून स्पष्ट होईलच.

४२१. दोन अथवा अधिक शब्द याप्रमाणें जेव्हां जोडले जातात तेव्हां ते संधिनियमाप्रमाणें एकत्र जोडण्यांत येतात. संस्कृत शब्दांमध्यें हे संधि अवश्य होतात. मराठी व अन्य भाषांतील शब्दांत कधीं कधीं होत नाहींत. उदा०:—लंब + उदर=लंबोदर, दश + आनन=दशानन, मनस् + भंग = मनोभंग, तपस् + बल = तपोबल. परंतु जांवई + आग्रह = जांवईआग्रह, बे + इमान = बेइमान, जमीन + अस्मान = जमीनअस्मान, कमी + अधिक = कमीअधिक, इ०.

४२२. समासांतर्गत शब्दांचा संबंध व्यक्त करून दाखविण्याचे रीतीस **विग्रह** असें म्हणतात. विनयसंपन्न या समासाचा ‘ **विनयानें**

संपन्नं [ युक्त ] ' हा विग्रह होय. त्यावरून विनयसंपन्न या समासांतील विनय आणि संपन्न हे शब्द तृतीयाविभक्तीनें संबद्ध आहेत; असें आपणास स्पष्ट समजतें. याचप्रमाणें सूर्यप्रकाश, घनश्याम, हताश, ह्या समासांचे 'सूर्याचा प्रकाश,' 'घनाप्रमाणें श्याम' आणि 'हत आहे आशा ज्याची' हे अनुक्रमें विग्रह हात.

४२३. कोणत्याही सामासिक शब्दास विभक्तिप्रत्यय लावावयाचे असतां ते त्या समासांतील शेवटल्या शब्दांस लावितात. उदा०:— राजपुरुषास, तळघरानें, आईबापांचा, इ०.

**टीप १**—या नियमास संस्कृतांत एकही अपवाद नाहीं. तथापि मराठीमध्यें कांहीं द्वंद्वसमासांतील शेवटल्या शब्दाच्या मागल्या शब्दांचें अशा प्रसंगीं सामान्यरूप होतें. जसें:—नावरूप—नांवारूपास, हातपाय—हातापायाला, कोळी-माळी—कोळयामाळ्यांनीं इ०. द्वंद्वेतर कोणत्याही प्रकारच्या सामासिक शब्दांतील अन्त्यपदाशिवाय इतर पदांस कांहीं एक विकार होत नाहीं. आणि द्वंद्व समासाचे पुष्कळ उदाहरणांस हाच नियम लागू आहे. तथापि कांहीं उदाहरणांतील अन्त्यपदाचे मागल्या पदाचें आतां सांगितल्याप्रमाणें सामान्यरूप होतें. यासंबंधाचा ऊहापोह द्वंद्वसमासाचे विवेचनांत पाहावा.

**टीप २**—मराठीमध्यें संस्कृत सामासिक शब्दांचा भरणा फार आहे, आणि तो दिवसेंदिवस वाढतच चालला आहे. अन्य भाषांतील आणि विशेषेंकरून इंग्रजींतील कल्पना मराठींत व्यक्त करण्यासाठीं संस्कृत शब्दांचा उपयोग अलीकडे फार होऊं लागला असून प्रसंगवशात् बरेच नवीन शब्द प्रचारांत येत आहेत. त्यांमध्यें सामासिक शब्द बरेच आढळतात. निवळ मराठी समास कमी, आणि ते बहुधा दोन शब्दांचे बनलेले असतात. परंतु संस्कृत समास बरेच लांबलांबही आढळतात.—"ऱ्हस्वस्वरपूर्वकोकारान्त्य' असा दादोबांनीं आपल्या थोरल्या व्याकरणांत योजिलेला बराच लांब सामासिक शब्द या पुस्तकांत आलाच आहे. त्यांत पांच शब्द आहेत. आपला अर्थ थोडक्यांत व्यक्त करण्याचे कामीं समासांचा फार उपयोग होतो; तथापि असले लांब लांब समास करण्याची मराठी भाषेची प्रवृत्ति दिसत नाहीं. तिच्या दृष्टीनें बहुधा दोन किंवा फारच झालें तर तीन शब्दांचा समास नीट दिसतो. यापेक्षां समास लांबविणें बेढब व अवजड होय.

४२४. समासांचे मुख्य चार भेद आहेत. ज्या दोन शब्दांचा बहुधा समास होतो, त्यांच्या प्राधान्याप्राधान्यावरून हे भेद करण्यांत आले आहेत.

ज्या समासांत पहिला शब्द प्रायः प्रधान असतो, त्यास **अव्ययीभाव समास** असें म्हणतात. ज्या समासांत दुसरा शब्द प्रधान असतो, त्यास **तत्पुरुष** असें म्हणतात. ज्यामध्यें दोन्ही शब्द प्रधान असतात, त्यास **द्वंद्व** असें म्हणतात. आणि ज्यांत कोणताच शब्द प्रधान नसतो, त्यास **बहुव्रीहि** असें म्हणतात. ह्या चार मुख्य भेदांचे आणखी उपभेद आहेत; ते कमीजास्त महत्त्वाचे आहेत. ते सर्व पुढें त्या त्या समासाचे विवरणप्रसंगीं सांगण्यांत येतील.

## अव्ययीभाव समास.

४२५. ज्या सामासांत पहिला शब्द प्रधान असतो आणि जो सगळा सामासिक शब्द क्रियाविशेषण अव्यय असतो, त्यास **अव्ययीभाव** समास असें म्हणतात. जसें:——यथाशक्ति, प्रतिक्षण, दरदिवस, इ०.

टीप —संस्कृत भाषेंतील अव्ययीभाव समासांत पहिला शब्द अव्ययच असतो आणि दुसरा शब्द नाम किंवा विशेषण असतो. तथापि अव्ययीभाव समासाच्या निवळ मराठी उदाहरणांत पहिल्या अव्ययाचे जागीं नामही आलेलें आढळतें; हें पुढें ४२८ व्या अंकांतील उदाहरणांवरून स्पष्ट होईल.

४२६. [ अ ] यथा [ प्रमाणें ], आ [ पर्यंत पासून ], प्रति [ प्रत्येक ], यावत् [ पर्यंत ], वि [ शिवाय ], ही अव्ययें ज्यांत प्रथम येतात, असे संस्कृत अव्ययीभाव समास मराठींत बहुधा फार येतात. जसें:—

| | |
|---|---|
| यथाशक्ति | आमरण |
| यथाविधि | आजन्म |
| यथान्याय | आचंद्रार्क |
| यथायुक्त | प्रतिदिन |
| यथायोग्य | प्रतिक्षण |
| यथाक्रम | प्रतिवर्ष |
| यथावकाश | यावज्जीव |
| यथाकालोचित | व्यर्थ |

[ आ ] अक्षि [ नेत्र ] हा शब्द अव्ययीभाव समासाचे अन्तीं अक्ष असा अकारान्त होतो. जसें:—प्रत्यक्ष [ अक्षासमोर ], समक्ष [ अक्षांनीं म्हणजे डोळ्यांनीं, डोळ्यांपुढें ], परोक्ष [ अक्षांचे आड, पाठीमागें ], अपरोक्ष [ अक्षांचे आड नव्हे म्हणजे त्यांचे समोर ].

टीप—परोक्ष आणि अपरोक्ष हे शब्द मराठीमध्यें अज्ञानानें उलट अर्थी योजितात, म्हणजे त्यांच्या अर्थाचा विपर्यास झालेला आढळतो. परंतु सत्यज्ञान झालें असतां अज्ञानाचा लोप झालाच पाहिजे. आणि तो त्याप्रमाणें होतही आहे.

४२७. पुढील [ ४२८ ] अंकांत सांगण्यांत येणारे समास वर्ज केले असतां निवळ मराठी शब्दांचे संस्कृत पद्धतीचे अव्ययीभाव समास मराठींत नाहींतच असें म्हटलें असतां चालेल. संस्कृताशिवाय जे अव्ययीभाव समास मराठींत दिसतात, ते दोन प्रकारचे आहेत.

[ अ ] यावनी म्हणजे फारसी किंवा अरबी. जसें:—दरकूच, दरमजल, दररोज, बिनधोक, बिनहरकत, बिनतकरार, बेलाशक, बेमालूम, बेशक, बेकायदा, बरहुकूम, बजिन्नस, गैरकायदा, इ०.

टीपः—हरवक्त, हररोज, हरहमेष, इ० शब्दांतील हर हें मूळ विशेषण आहे. त्यास अनुसरून ह्या शब्दांचा कर्मधारय समासांत अन्तर्भाव झाला पाहिजे. परंतु ह्यांचा क्रियाविशेषणांप्रमाणेंच उपयोग होत असल्यामुळें ह्यांस अव्ययीभाव समास म्हणणें बरें.

[ आ ] संकीर्ण म्हणजे निरनिराळ्या, भाषांतील शब्द एकत्र येऊन झालेले. जसें:—दरदिवस, दरवर्ष बिनअपराध, बिनतोड, हरदिवस, हरघडी, इ०.

४२८ प्रतिदिन, प्रतिवर्ष, इ०, संस्कृत अव्ययीभाव समासांच्या विग्रहाकडे [ उदा०—दिने दिने प्रतिदिनम् ] लक्ष दिलें असतां असें दिसून येईल कीं, प्रति ह्या अव्ययाचा अर्थ जरी प्रत्येक असा असला, तरी तें पुढील नामाची द्विरुक्ति टाळण्यासाठीं आलेलें आहे असें दिसतें. परंतु मराठीमध्यें प्रति ह्या अव्ययाचा उपयोग न करितां पुढील नामच द्विरुक्त होऊन अव्ययीभाव समास होतात. मात्र त्या नामाच्या प्रथमोक्तीचे वेळीं त्याच्या अन्त्यास ओ हा आदेश होतो. जसें:—घरोघर, जागोजाग, गांवोगांव, दारोदार, घडोघडी, इ०.

टीप—ह्या समासांचीं घरघर, गांवगांव, अशीं रूपेंही कधीं कधीं आढळतात.

[ अ ] दिवसेंदिवस असें प्रथमोक्तीमध्यें एं आदेश झालेलें एक रूप आढळतें, तथापि दिवसेंदिवस ह्यासही वरील उदाहरणांप्रमाणें अव्ययीभाव समास म्हणण्यास हरकत नाहीं.

[ आ ] दिवसानदिवस, घरानघर, इ० कांहीं ठिकाणीं नामाची द्विरुक्ति होत असतां प्रथमोक्तीचे अन्ती अन हें लागलेलें आढळतें. हें बहुधा संस्कृत अनु ह्या अव्ययाचें रूपान्तर असावें. ह्या शब्दांचाही क्रियाविशेषणांप्रमाणें उपयोग होत असल्यामुळें त्यांसही अशाच प्रकारचें अव्ययीभाव समास म्हणण्यास हरकत दिसत नाहीं.

४२९. वरील टीपेंत सांगितलेल्या घरघर, गांवगांव, इ० आणि घरानघर, गांवानगांव, इत्यादि शब्दांचा नामाप्रमाणेंही उपयोग होतो. जसें:—त्यानें घरघर किंवा घरानघर तपासिलें, इ०. अशा ठिकाणीं त्या शब्दांचा प्रत्येक घर, घरापाठीमागून घर, असा अर्थ असल्यामुळें त्यांस कर्मधारय समास म्हणावें.

४३०. अव्ययीभाव समासांस कधीं कधीं सप्तमी व क्वचित् तृतीया ह्या विभक्तीचे ई व ए हे प्रत्यय लागलेले आढळतात. जसें:—यथाकाळीं, दरवेळीं, दरदिवशीं, आजरोजीं, देशोदेशीं, घरोघरीं, रस्तोरस्तीं, गल्लोगल्लीं, यथाज्ञानें, यथानुक्रमें, इ०.

टीप—अशाप्रकारें अव्ययीभाव समासांतील, दुसऱ्या स्थानच्या नामास विभक्तिप्रत्यय विकल्पेंकरून लागलेले संस्कृत भाषेंतही क्वचित् आढळतात. उदा०—आमुक्त अ० आमुक्ते; आबाल अ० आबालेभ्यः; इ०.

४३१. गांवोगांव, घरोघर, या प्रकारच्या नामद्विरुक्तीनें झालेल्या शब्दांप्रमाणें अव्ययद्विरुक्तीनेंही कांहीं शब्द तयार होतात. जसें:—मधोमध, तंतोतंत, बरोबर, समोरासमोर, खरोखर, खालोखाल, इ०. या शब्दांसही खेर यांनीं अव्ययीभाव समास म्हटलें आहे. येथें मूळचीं अव्ययें द्विरुक्त झालीं असून त्यांमध्यें व्याकरणदृष्ट्या कांहीं फरक झाला आहे असें दिसत नाहीं. ह्यामुळें त्यांस सामासिक शब्द म्हणावें कीं नाहीं याची आम्हांस जबर शंका येते. तीं क्रियाविशेषण अव्ययें असल्यामुळें त्यांस अव्ययीभाव हें नांव केवळ अयोग्य दिसत नाहीं. तथापि त्यांमध्यें मुळीं समासच नसल्यामुळें त्यांची अव्ययीभाव समासांत गणना करणें बरें नाहीं असें आमचें मत आहे.

## तत्पुरुष समास.

४३२ ज्या समासांत दुसरा शब्द प्रधान असतो त्यास तत्पुरुष असें म्हणतात. ह्या समासामध्यें पहिला शब्द बहुधा नाम किंवा विशेषण

असतो. आणि विग्रहामध्यें त्यास प्रथमा व संबोधन यांशिवाय इतर सर्व विभक्ति लागतात.

४३३. तत्पुरुष समासाचे मुख्य भेद दोन आहेत: एक व्यधिकरण तत्पुरुष आणि दुसरा समानाधिकरण तत्पुरुष. ज्या तत्पुरुष समासाचे विग्रहांत त्यांतील शब्दांस निरनिराळ्या विभक्तींचे प्रत्यय लागतात त्यास व्यधिकरण तत्पुरुष असें म्हणतात. ज्याला नेहमीं तत्पुरुष, तत्पुरुष, असें म्हणण्याचा प्रचार आहे, तो हाच व्यभिकारण तत्पुरुष होय. समानाधिकरण तत्पुरुषाचे विग्रहामध्यें त्यांतील दोन्ही शब्दांची एकच विभक्ति असते. समानाधिकरण तत्पुरुषाचें प्रचलित नांव **कर्मधारय** हें होय. म्हणजे रूढ भाषेनें बोलावयाचें म्हटलें म्हणजे विस्तृत अर्थानें म्हटल्या जाणाऱ्या तत्पुरुष समासाचे तत्पुरुष व कर्मधारय ह्या नांवांचे मुख्य दोन भेद आहेत. ह्यांपैकीं कर्मधारय हा एक मुख्य भेद बाजूस ठेऊन प्रथम इतर भेदांचें व्याख्यान करूं आणि अखेरीस कर्मधारयाकडे वळूं.

४३४. व्यधिकरण तत्पुरुषाचे पहिल्या अवयवाचे विभक्तीचा लोप झालेला असतो. जी विभक्ति लुप्त असते त्या विभक्तीचें नांव त्या समासास देतात. त्याप्रमाणें ह्या समासाचे पुढील प्रकार संभवतात. प्रथमा आणि संबोधन या दोन विभक्ति प्रथमावयवास लागत नाहींत.

**तृतीया तत्पुरुषः**—संस्कृत—ईश्वरनिर्मित [ ईश्वरानें निर्मित ], दयार्द्र [ दयेनें आर्द्र ], भक्तिवश [ भक्तीनें वश ], द्रव्यसाध्य, कष्टसाध्य, ईश्वरदत्त, नखभिन्न, मनःकल्पित, कृपावलोकन, मातृसदृश [ मातेशीं सदृश ], तत्सम [ त्याशीं सम ], एकोन [ म० एकोण किंवा एकूण—एकानें उणा ], गुणहीन, दैवहत, इ०.

मराठी—गजमोजणी, तोंडपाठ, उपासमार, घोडेमात, प्यादेमात, बुद्धिजड, कपाळकरंटा, तोंडजबानी, दुप्पट [ दोहोंनीं जी पट ती ] चौपट, पांचपट, हगोलें [ हगानें ओलें ], मुतोलें. इ०.

**चतुर्थी तत्पुरुषः**—संस्कृत—कृष्णाश्रित [ कृष्णाप्रत किंवा कृष्णास आश्रय पावलेला ], देशगत [ देशास गेलेला ], राजाश्रित, कृष्णार्पण, [ कृष्णाला अर्पण ], काकबलि [ काकार्थ बलि ], पूजाद्रव्य [ पूजेकरितां

द्रव्य ), विद्यागृह ( विद्येकरितां गृह ), क्रीडाभुवन ( क्रीडेकरिता भुवन ), ब्राह्मणभोजन, परपीड, द्विजदंड इ०.

मराठी:—गायरान, बाइलवेडा, डोईजड, पोळपाट, चोळखण, आतेचोर, आतेवाण, व्याहीजेवण, व्याहीभोजन, वाटखर्च, व्यवहारोपयोगी, मेंढवाडा, बाजारवाडा, गांवसमाराधना, कमरबंद, कमरपट्टा, इ०.

**पंचमी तत्पुरुषः**—संस्कृत—चोरभय ( चोरांपासून भय, ), ऋणमुक्त ( ऋणापासून मुक्त ), स्वर्गपतित, स्वर्गभ्रष्ट, जातिभ्रष्ट, रोगमुक्त, पापविमोचन, भवतारण, पदच्युत, जन्मस्वभाव, इ०.

मराठी:—वडिलोपार्जित, गर्भगळित, गर्भश्रीमंत, जन्मखोड, लंगोटीयार, लंगोटीमित्र, इ०

**षष्ठी तत्पुरुषः**—संस्कृत—देवालय, दवपूजा, भूपति, नृपति, राजमंदिर सूर्यप्रकाश, विद्याभ्यास, देवभक्ति, मदुद्धरण त्वल्लीला, लक्ष्मीकांत, गणपति, राधारमण, पद्मपत्र, भ्रातृजाया ( म० भावजय ), इ०.

मराठी—केळफूल, राजवाडा, घरधनी, पिंपळपान, हातचाळ, हातघाई, राजदरबार, आपमतलब, घोडदौड, समुद्रकांठ, गायमुख, मर्जीसंपादन, धर्मवेड, वाघनख, तक्ताधिपति, इलाखाधिपति, नदीकांठ, अगरमिठी, आंबराई, तोंडसुख, तोंडओळख, तोंडबळ, गांवकसूं; इ०.

**सप्तमी तत्पुरुषः**— संस्कृत—शास्त्रपंडीत ( शास्त्रांत पंडीत ) कूपमंडूक [ कूपांतला मंडूक ], कलाकुशल, स्वर्गवास, मध्यस्थ, युद्धचातुर्य, कुलोत्पन्न, दानशूर, वनभोजन, रणशूर, समयसूचक, प्रसंगावधान, कर्मकुशल, गृहप्रवेश, पोटशूळ, इ०.

मराठी—रानडुकर, घरकोंबडा, अवसानघातकी, घरजांवई, देऊळघाट, गांवदेवी, घरधंदा, घरफूट, घरकलह, पाणकोंबडा, वनगाय, इ०.

**टीप**—त्या सर्व प्रकारच्या उदाहरणांतील विभक्तीसंबंधानें मतभेद होण्याचा संभव आहे पण तो फारसा महत्वाचा नाहीं. वरील सर्व उदाहरणें व्यधिकरण तत्पुरुषाचीं आहेत याबद्दल जोंपर्यंत एकवाक्यता आहे तोंपर्यंत अमुक एक उदाहरण तृतीया तत्पुरुषाचें होय, का षष्ठीतत्पुरुषाचें होय हा मुद्दा फारसा महत्त्वाचा नाहीं. हातघाई हें तृतीया तत्पुरुषाचें उदाहरण होय असें कांहींस वाटतें. तेव्हां त्यांचे मतें 'हातांनीं घाई' असा त्याचा विग्रह असावा, या विग्रहास अनुसरून हातघाई हा तृतीयातत्पुरुष समास होय हें म्हणणें योग्य आहे.

पण ज्यांस हा विग्रह मान्य न होऊन हातघाई म्हणजे 'हातांची घाई' असा विग्रह करावा असें ज्यांचें म्हणणें असेल ते त्यास षष्ठी तत्पुरुष म्हणतील. तसेंच कृष्णाश्रित ह्यास संस्कृतांत द्वितीया तत्पुरुष म्हणतात. मराठींत द्वितीया नसल्यामुळे संस्कृत विग्रहास अनुसरून त्यास चतुर्थी तत्पुरुष असें इतर वैयाकरणांप्रमाणें आम्हींही म्हटलें आहे. तथापि कृष्णाश्रित ह्याचा जर कोणी 'कृष्णाचा आश्रित' असा मराठींत विग्रह केला आणि त्यास षष्ठी तत्पुरुष म्हटलें तर मराठींतील विग्रहास अनुसरून त्यास तेंच नांव योग्य आहे असें कोण म्हणणार नाहीं. एवंच अमुक एका तत्पुरुष समासास कोणत्या विभक्तीचें नांव द्यावें हा प्रश्न त्या समासाचे योग्य विग्रहावर अवलंबून आहे. विग्रहामध्यें पहिल्या नामाची जी विभक्ति आली असते. त्या विभक्तीचें नांव त्या समासास मिळतें. हा नियम ध्यानांत ठेवला म्हणजे झालें.

४३५. व्यधिकरण तत्पुरुष समासामध्यें कधीं कधीं पहिल्या पदाची विभक्ति तशीच काईम असते. अशा समासांस **अलुक्** समास असें म्हणतात. जसें:—सं०—अग्रेसर, युधिष्ठिर, कर्तरिप्रयोग, कर्मणिप्रयोग, आत्मनेपद, वाचस्पति, पंकेरुह, मनासिज, सरासिज, इ०.

**मराठी**—फोडणीसतांदुळ, तोंडींलावणें.

**टीप**—"कधीं कधीं तत्पुरुष समासांत पहिले पदाच्या विभक्तिप्रत्ययाचा लोप होऊन सामान्यरूप तसेंच राहतें, तेव्हां अलुक् समास मानिला असतां चालेल. उदा०—रामाकरीं, डोंबाघरीं, पिशाच्चा हातीं, इ०." असें कांहींकांचें म्हणणें आहे. [मध्यम व्याकरण, क० १९३ (उ).] परंतु तें प्रशस्त दिसत नाहीं. कारण कीं हे शब्द रामाच्या घरीं, डोंबाच्या घरीं, पिशाच्याचे हातीं, ह्या वाक्यांशाचीं अनुक्रमें संक्षिप्त रूपें होत. इतिहास—संशोधक राजवाडे ह्यांचे मतें रामा, पिशाचा, हीं रूपें राम व पिशाच 'ह्या अकारान्त पुल्लिंगी व नपुंसक नामांच्या षष्ठीच्या एकवचनीं आहेत' (ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण, पृष्ठ १४). इतिहास—दृष्ट्या 'हे प्रयोग अलुक समासाचे समजणें अशास्त्र आहे' असें राजवाडे यांनीं आपलें मत दिलेंच आहे. शिवाय दुसरें असें कीं, रामाकरीं, डोंबाघरीं, पिशाचा हातीं, इ० शब्दांतील कर, घर, हात, ह्या द्वितीय पदांस विभक्तिप्रत्यय लागलेला आहे. तो काढून टाकला असतां जर त्या शब्दाचीं रामा कर, डोंबा घर, पिशाचा हात, इ० अशीं रूपें शिल्लक राहिलीं असतीं तर हीं अलुक् समासांचीं उदाहरणें होत, ह्या म्हणण्यास बळकटी आली असती. युधिष्ठिर इ० हीं जशीं संस्कृतामध्यें द्वितीयपद प्रथमान्त असलेलीं अलुक् समासाचीं उदाहरणें आहेत तशीं जर प्रकृत उदाहरणें असतीं तर त्यांस अलुक् समास म्हणण्यास हरकत नव्हती. परंतु द्वितीयपद प्रथमान्त झालें असतां

त्यांतील रामा, डोंबा, पिशाचा, ह्या पहिल्या पदांतील सामान्यरूप, किंवा राजवाडे सांगतात त्याप्रमाणें, षष्ठयन्त रूप नष्ट होतें. यावरून हें षष्ठयर्थी सामान्यरूप किंवा षष्ठयन्त रूप मूळ संबंध शब्दांतील काईमचें नसून पुढल्या सविभाक्तिक शब्दानेंच होतें हें उघड आहे. म्हणून वादविषयक शब्द मुळीं समासच नव्हत हें निर्विवाद आहे.

४३६. 'दीनानाथ' शब्द व्याकरणदृष्ट्या विचारार्ह आहे. वास्तविक म्हटलें म्हणजे 'दीननाथ' या मूळ शब्दांतील न हें अक्षर अभंगादिकांचे चालींत ओढून लांबट म्हणण्यांत येऊं लागल्यामुळें त्याचें 'दीनानाथ' असें रूपांतर झालें हा तत्पुरुष समासच असल्यामुळें आणि दीना हें दीन शब्दाचें षष्ठयर्थी सामान्यरूप असल्यामुळें दीनानाथ हें एक अलुक् तत्पुरुषाचेंच उदाहरण होय. यास अलुक् हें नांव देणें जर कोणास बरें वाटत नसेल तर यास **सामान्यरूप** तत्पुरुष असें म्हणावें.

४३७. जेव्हां तत्पुरुष समासामधील दुसरें पद, ज्याचा स्वतंत्र उपयोग होत नाहीं अशा प्रकारचें, कृदन्त म्हणजे धातुसाधित असतें तेव्हां त्यास **उपपदतत्पुरुष** असें म्हणतात. जसें:—कुंभकार [ कुंभ करणारा ], ग्रंथकार [ ग्रंथ करणारा ], गृहस्थ [ गृहांत राहणारा ], शेषशायी [ शेषावर निजणारा ], द्विज [ द्विः म्हणजे दोनदां जन्मणारा—ब्राह्मण, दांत, पक्षी ), इ०. या उदाहरणांतील कार, स्थ, शायी, ज, ही दुसरीं पदें कृ, स्था, शे, जन्, ह्या धातूंपासून आलेलीं असून त्यांचा असल्या सामासिक शब्दांशिवाय अन्यत्र स्वतंत्र उपयोग होत नसल्यामुळें वरील शब्द उपपद समासाचीं उदाहरणें होत. परंतु पयोधर, ग्रंथकर्ता, यांतील धर आणि कर्ता हीं जरी धृ आणि कृ धातूंपासून आलेलीं कृदन्तें आहेत तरी त्यांचा अन्यत्र स्वतंत्र उपयोग होत असल्यामुळें पयोधर व ग्रंथकर्ता हीं उपपद समासाचीं उदाहरणें होऊं शकत नाहींत. तर तीं केवळ षष्ठी तत्पुरुषाचींच उदाहरणें होत. उपपद समासाचीं आणखीं उदाहरणें:—

**संस्कृत**—कच्छप, द्विप, पश्यत्तोहर, खेचर, विधुंतुद, मार्गस्थ, उरग, भुजग, खग, भूप, नृप, सुज्ञ, कृतज्ञ कृतघ्न, जलद, अंबुद, घाउक.

**मराठी**—पांथस्थ, घातुक, ढाळक, रेचक, जाचक, शेतकरी, कामकरी, आगलाव्या, लांकुडतोडया भाजीविक्या, लांचखाऊ, वाघमाऱ्या, नवशिका, नाकतोडा, कानफाटा—टया, पळीवाढें, बोटचेपें, पानकापें, डोळ-

ढापें, लोणकाप्या, वस्त्रगाळ, जगनाड, घरबुडव्या. पायघोळ बाजारबसवी, लंगोटबंद, ठाणेबंद, इ०. या मराठी शब्दांतील करी, लाव्या, तोड्या, विक्या, माऱ्या, शिका—क्या, तोडा, फाटा—फाट्या, इ० धातुसाधितांचा स्वतंत्र उपयोग आढळत नाहीं. त्यांचा समासांतींच उपयोग आढळतो. म्हणून शेतकरी, आगलाव्या, इ० शब्द मराठी उपपद तत्पुरुष समास होत.

४३८. मनसिज, पंकेरुह, सरसिज, इ० कांहीं समास अलुक् व उपपद या दोन्ही प्रकारचे आहेत. कारण कीं मनसि, पंके, सरसि, हीं विभक्त्यन्त पदें आहेत आणि ज, रुह, ज, हीं अस्वतंत्र धातुसाधितें आहेत. परंतु यांस **उभय तत्पुरुष** असें म्हटलें असतां बरें. हीं उदाहरणें जरी संस्कृत आहेत तरी उभय तत्पुरुष अशी संज्ञा संस्कृतांत नाहीं. परंतु जर हे शब्द दोन्ही प्रकारचे आहेत तर त्यांचा वेगळा वर्ग करणें जरी कदाचित् अवश्य नसलें, तरी शास्त्रदृष्ट्या इष्ट आहे.

उभय तत्पुरुषांची **मराठी** उदाहरणेंही आढळतात. जसें:——मळेकरी, वांटेकरी, पहारेकरी, मारेकरी, पांखरेंविक्या, गळेकापू, खिसेकातरू, गांजेकस, कडेलोट, इ०. या ठिकाणीं पहिलीं पदें प्रथमान्त अनेकवचनें असून दुसरीं पदें अस्वतंत्र धातुसाधितें आहेत.

टीप १—मराठींत नामाचें मूळरूप व प्रथमेचें एकवचन एकच आहे. तेव्हां तत्पुरुष व इतर समासांतील प्रथमपद प्रथमान्त असतें असें एकवार म्हटलें तरी चालेल असें कित्येकांस वाटण्याचा संभव आहे पण तें म्हणणें ठीक नाहीं, कारण कीं विग्रहामध्यें त्या पदांस प्रथमेतर विभक्ति लागतात. म्हणून तीं मूळ रूपेंच होत. तरी मराठींत नामाचें मूळ व प्र० ए० व० हीं बहुधा एकच असल्यामुळें प्रथमपद प्रथमेच्या एकवचनीं असतें असें म्हणण्यास मराठी समासांत बऱ्याच ठिकाणीं हरकत नाहीं, परंतु मळेकरी, वांटेकरी इ० उदाहरणांतील प्रथमपद प्रथमेचीं अनेकवचनेंच होत हें त्यांच्या विग्रहावरूनही स्पष्टच आहे.

टीप २—संस्कृत नियमांप्रमाणें अलुक् समास तृतीया विभक्तीपासून पुढें होतो, म्हणजे अलुक् समासांत प्रथमपदाची प्रथमा व द्वितीया कधीं नसते. मळेकरी वांटेकरी, इ० शब्दांत प्रथमाच असल्यामुळें हे संस्कृतदृष्टीनें अलुक् समास नव्हत. म्हणून यांस **उभय तत्पुरुष** म्हणजे दोन प्रकारचा तत्पुरुष ही वेगळीच संज्ञा बरी. यांत प्रथमपदाचें प्रथमेचें अनेकवचन व द्वितीय पद अस्वतंत्र कृदन्त असतें; हे या समासाचे दोन विशेष होत.

टीप ३--कथेकरी, यात्रेकरी, सेवेकरी, इ० शब्द वरील मासल्याचेच आहेत. परंतु त्यांत पहिल्या नामांचें सामान्यरूप आहे. त्या दृष्टीनें हे सामान्यरूप तत्पुरुष ( अं० ४३६ ) समास होत, आणि करी हें दुसरें पद अस्वतंत्र धातु-साधित आहे म्हणून हें उपपद समास होत. ह्यामुळें ह्यांसही दुसऱ्या प्रकारचे उभय तत्पुरुष समास म्हणावें.

४३९. अभाव किंवा निषेध या अर्थी व्यंजनादि शब्दांचे पूर्वी अ आणि स्वरादि शब्दांचे पूर्वी अन् हीं अव्ययें येऊन जे तत्पुरुष समास होतात, त्यांस नञ् तत्पुरुष ही संज्ञा आहे. जसें:—सं०—अब्राह्मण [ न ब्राह्मण ] अन्याय [ न न्याय ], अयोग्य [ न योग्य ], अनादर [ न आदर ], अनिष्ट [ न इष्ट ], अनृत, इ०.

**मराठी** - अजाण, असमंजस, असडीक, अपुरा, अनोळखी, अनशेे [ पोट ], इ०.

[ अ ] कांहीं ठिकाणीं निषेधार्थी न हें अव्यय येतें. जसें:—नक्षत्र, नास्तिक, नपुंसक.

टीप १---नाइलाज, नाउमेद, नापसंत, इ० शब्दांतील आदि ना फारसी आहे. तो असाच अभाव किंवा निषेध या अर्थीच आहे म्हणून प्रकृत शब्दांतही नञ् तत्पुरुष समास आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

टीप २--वरील उदाहरणांवरून सूक्ष्म दृष्टीस असें दिसून येईल कीं निषेध तीन अर्थी होतो. पहिला--पुढील नामाच्या अर्थाहून भिन्न अर्थ; जसें:--अब्राह्मण म्हणजे ब्राह्मणभिन्न किंवा ब्राह्मणेतर. दुसरा--पुढील नामाच्या अर्थाविरुद्ध अर्थ; जसें:--अधर्म, अन्याय. तिसरा--पुढील नामाच्या अर्थाचा फक्त अभाव जसें:--अपूर्ण, अदृष्ट.

४४०. ज्या तत्पुरुष समासांत प्रथम स्थानीं उपसर्ग येतो त्यास संस्कृत व्याकरणांत **प्रादिसमास** असें म्हटलें आहे. उदा०--प्रवात ( प्रकृष्ट म्हणजे जोराचा वारा ), अतिरथ ( अतिक्रान्तो रथं रथिनं वा म्हणजे रथ अथवा रथी ह्याचे पलिकडचा ), याप्रमाणेंच अतिमात्र उत्क्रांति, प्रगति, अवगुण, इ०.

## समानाधिकरण—तत्पुरुष किंवा कर्मधारय.

४४१. ज्या तत्पुरुष समासाचे विग्रहांत दोन्ही पदांस एकच प्रथमा विभक्ति लागते, त्यास समानाधिकरण तत्पुरुष किंवा **कर्मधारय** समास असें म्हणतात.

४४२. कर्मधारय सामासाचे दोन प्रकार आहेत. ज्या कर्मधारय समासांनीं विशेष्यविशेषणभावाचा अर्थ दाखविला जातो, त्यांस **विशेषणत्वसूचक** कर्मधारय असें म्हणतात; आणि ज्यांनीं उपमानोपमेय-भाव सुचविला जातो त्यांस **उपमासूचक** कर्मधारय असें म्हणतात.

४४३. विशेषणत्वसूचक कर्मधारयाचे सात प्रकार आहेत. ते असेः—

**I विशेषणपूर्वपदः**—ज्यांमध्यें प्रथम पद विशेषण असतें तो.

सं० उदाहरणें:—रक्तचंदन, महाराज, पूर्वरात्र, उत्तररात्र, पीतांबर, नीलोत्पल, महादेव, इ०.

**मराठी** उदाहरणें:—काळमांजर, तांबडमाती मात, पोकळखर्च, शिवायजमा, सांवळाराम, भोळानाथ, उपजतस्वभाव, मरतमढें, देखतहुकूम, उपजतगुण, भिजतकांबळें, देखतभुलें, रडतराऊत, खडीसाखर, पिठीसाखर, शेंडेनक्षत्र ( शेंडी असणार नक्षत्र—धूमकेतू ) साडेतीन, एकोणतीस, इ०.

**II विशेषणोत्तर पदः**—ज्यांमध्यें दुसरें पद विशेषण असतें तो. संस्कृत उदाहरणें:—देशांतर, भाषांतर, ( ह्यांतील अंतर शब्द अन्य या अर्थाचा आहे. ) पुरुषोत्तम, छात्रवंचक, इ० ( उत्तम जो पुरुष, आणि वंचक जो छात्र, असे विग्रह केले असतां, हीं येथें योग्य उदाहरणें आहेत. परंतु पुरुषांत उत्तम, छात्रांत वंचक, असे विग्रह केले असतां हीं तत्पुरुषांचीं उदाहरणें होतात. )

**मराठी** उदाहरणें:—रामदयाळ, दालचिनी.

**III विशेषणोभयपदः**—ज्यांमध्यें दोन्ही पदें विशेषणें असतात तो. संस्कृत उदाहरणें:—स्नातानुलिप्त, पीतप्रतिबद्ध, शुक्लकृष्ण, कृताकृत, दृष्टादृष्ट, श्यामसुंदर, इ०.

**मराठी** उदाहरणें:—उपजतशहाणा, उपजतवेडा.

**IV विषयपूर्वपदः**—देवबुद्धि, (देव आहे अशी बुद्धि, देवविषयक बुद्धि), घटशब्द ( घट असा शब्द ), धर्मबुद्धि (धर्मविषयक बुद्धि ), अहंमति, अहंबुद्धि, सुतवर ( सुतविषयक वर ), इ०.

माग वर असें म्हणतां **सुतवर** मागे नृपाळ तो नमुनी—मोरो०, सभापर्व.

**मराठीः**—पुरुषमाणूस, बायकोमनुष्य, बायकोमाणूस, गडीमाणूस.

V **अव्ययपूर्वपदः**—स्वल्प, दुर्व्यसन, सुवासना, कुवासना, कुयोग, कुपुत्र, निराशा.

VI **संख्यापूर्वपदः**—ज्या कर्मधारय समासांत पहिलें पद संख्यावाचक म्हणजे गणनावाचक विशेषण असून त्या समासानें समाहाराचा म्हणजे समुदायाचा अर्थ सुचविला जातो, त्यास संख्यापूर्वपद कर्मधारय ही संज्ञा आहे. यासच **द्विगु** असें संस्कृत व्याकरणांत नांव आहे. हा समास बहुधा स्त्रीलिंगी किंवा नपुसकलिंगी असतो. उदा०:—त्रिभुवन ( तीन भुवनांचा समाहार ), त्रैलोक्य ( तीन लोकांचा म्हणजे भुवनांचा समाहार ), या शब्दाचें त्रिलोकी असें स्त्रीलिंगींही रूप आढळतें.

हो त्वद्यशें **त्रिलोकी** राया कुरु सत्तमा अगा धवला—मोरोपंत.

पंचपदी ( पांच पदांचा समुदाय ), पंचारती, अष्टाध्यायी, त्रिदल, पंचवटी, चतुःसूत्री, सप्तग्रहीं, नवरात्र.

**मराठी** उदाहरणें:—पंचपाळें, बारभाई, वीसखेडें, चाळीसगांव, पांचशेरी—पांसरी, अडीचशेरी, छदाम, छटाक, चौघडी, ( चारघड्या घातलेलें वस्त्र, हा शब्द स्त्रीलिंगी आहे ), बावनखणी, पंचपात्र—त्री, पंचखाजें, दुफळी, पंचक्रोशी.

**अपवादः**—चव्हाटा किंवा चवाठा ( चार + वाट ), सप्ताह किंवा सप्ताहा ( सप्त + अहन् ), चतुर्मास ( चतुर् + मास ), इ० कांहीं द्विगु समास पुल्लिंगी आहेत. चौमास, चौफळा, चौकडा—डी, इ०.

VII **मध्यमपदलोपी** किंवा **लुप्तपदः**—ज्या समासांत पहिल्या पदाचा दुसऱ्या पदाशीं संबंध दाखविणारा शब्द समासांत अध्याहृत असतो, त्यास मध्यम पदलोपी किंवा लुप्तपद समास असें म्हणतात. या समासाच्या विग्रहामध्यें सामासिक शब्दांतील दोन पदांचा संबंध स्पष्ट करण्यासाठीं त्या अध्याहृत शब्दाचा उल्लेख करावा लागतो; एरवीं विग्रह होणें शक्य नाहीं. या समासांत अध्याहृत असणारें पद बहुधा मधलें असतें म्हणून यास मध्यमपदलोपी असें म्हणतात. परंतु मराठींत कांहीं उदाहरणांत आरंभीचें पदही अध्याहृत असतें असें दिसून येईल. म्हणून या समासास **लुप्तपद** समास म्हणणें बरें. जसें:—

संस्कृत—शाकपार्थिव ( शाकप्रिय पार्थिव ).

**मराठी** उदाहरणें:—साखरभात ( साखरयुक्त भात ), वांगीभात, बटाटेभात, कांदेपोहे, डाळवांगें, पुरणपोळी, गुळांबा, पायदळ घोडेस्वार, बाळमित्र, जन्मदारिद्री, भोजनभाऊ ( भोजनापुरता भाऊ ), पंक्तिपठाण, पंक्तिप्रारगीर, कातरविडा, गुडधाना, गुडधानी, इ०.

चुलतभाऊ ( चुलत्याच्या द्वारा भाऊ, चुलत्याचा पुत्र म्हणून भाऊ ), मामेभाऊ ( मामाच्या द्वारा भाऊ, मामाचा मुलगा म्हणून भाऊ ), नातसून [ नातवाची बायको म्हणून किंवा नातवाचे द्वारा सून ], नातजांवई [ नातीचा नवरा म्हणून किंवा नातीचे द्वारा जांवई ], आजेसासरा [ नवऱ्याचा किंवा बायकोचा आजा म्हणून सासरा ], चुलत सासरा [ नवऱ्याचा किंवा बायकोचा चुलता म्हणून सासरा ], इ० नातें दाखविणारे सामासिक शब्द लुप्तपद समासच होत. आजे—सासरा, चुलत-सासरा, इ० शब्दांत मात्र विशेषेकरून आरंभींच्या पदाचा लोप दिसत आहे; इतर सर्व उदाहरणांत पदाचाच लोप आहे.

**टीपः**—चुलतभाऊ, आतेभाऊ यांस मध्यम व्याकरणकारांनीं तृतीया तत्पुरुष म्हटलें आहे. तें जरी सर्वस्वी अयोग्य नसलें तरी त्यांस इतर मराठी वैयाकरणांनीं म्हटल्याप्रमाणें मध्यमपदलोपी समासाचे वर्गांतच घलणें आम्हास बरें दिसतें. चुलत्यानें भाऊ, आतेनें भाऊ असें कोणी म्हणत नाहींत. तेव्हां या विग्रहाचे ऐवजीं वर दिलेला विग्रह अधिक प्रशस्त होय. व या विग्रहास अनुसरून त्यांस मध्यमपदलोपी किंवा लुप्तपद समास हेंच नांव योग्य होय.

४४४. उपमासूचक कर्मधारयाचे चार भेद आहेत ते असेः—

I **उपमानपूर्वपद**:- ज्याची उपमा द्यावयाची तद्वाचक शब्द जेव्हां समासांत आधीं येतो तेव्हां त्यास उपमानपूर्वपद असें म्हणतात. जसें:—कमलमुख, [ कमलासारखें मुख ], घनश्याम [ घनाप्रमाणें श्याम ], चंद्रमुख, वज्रदेह, कमलनेत्र, इंदुमुख, चंद्रवदन, इ०.

**मराठी**:—साखरलिंबू घाडनवरी.

II **उपमानोत्तरपद**:—मुखकमल, नरसिंह, पुरुषव्याघ्र, नरशार्दूल, मुखेंदु, इ०.

III **अवधारणापूर्वपद**:—ज्या समासांत प्रथम पदाचे अर्थावर उत्तर पदाचे अर्थाचा आरोप केलेला असतो त्यास अवधारणापूर्वपद

असें म्हणतात. जसें:—विद्याधन (विद्या हेंच धन किंवा विद्यारूपी धन), भवसागर, विद्युल्लता, काव्यामृत, संसाराटवी, पदपद्म, चरणकमल, चरणारविंद, इ०.

**मराठी**—घागरगड, उंबरघाट.

IV **अवधारणोत्तरपद**:—ज्या समासांत दुसऱ्या पदाचे अर्थावर पहिल्या पदाचे अर्थाचा आरोप केलेला असतो त्यास अवधारणोत्तरपद कर्मधारय असें म्हणतात. जसें:—कृतान्तकटकामलध्वजजरा (येथें जरेवर कृतान्तकटकामलध्वजेचा आरोप केलेला आहे हें उघड आहे.)

## द्वंद्व.

४४५. ज्या समासांतील सर्व पदें प्रधान असतात अथवा ज्यामध्यें त्यांचा समाहार प्रधान असतो त्यास **द्वंद्व** समास असें म्हणतात.

४४६. द्वंद्व समासाचे तीन प्रकार आहेत. ते असे:—

I **इतरेतर द्वंद्व**:—ज्या समासांतील पदें **आणि** किंवा **व** या समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडलेलीं असून ज्यांत तें अव्यय अध्याहृत असतें त्यास इतरेतर द्वंद्व समास असें म्हणतात. जसें:—हरिहर, भीमार्जुन, रामलक्ष्मण, ब्रह्मविष्णुमहेष, ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्र, इ०.

**मराठी**—एकवीस, एकतीस बेवीस, बत्तीस, आईबाप, नाकडोळे, बापलेंक, स्त्रीपुरुष, बहीणभाऊ, सुखदुःखें इ०. हे शब्द अनेकवचनीं असून त्यास शेवटच्या नामाचें लिंग आहे.

(अ) परंतु भिन्न लिंगांचे शब्द समस्त झाले असतां सगळा सामासिक शब्द बहुधा नपुंसकलिंगी अनेकवचनीं असतो. जसें:—आईबापें, स्त्रीपुरुषें, दादलाबायलें, मातापितरें, बहीणभावंडें, मायलेंकरें.

(आ) कांहीं ठिकणीं भिन्न लिंगांचे शब्द एकत्र येऊन सर्व सामासिक शब्द अन्त्यलिंगी व एकवचनीं असतो. जसें:—विटीदांडू, तांब्यापंचपात्री, पोळपाटलाटणें, [illegible], न्हाणखोड, सुंठसाखर, सुंठगूळ, [illegible], दहींभात, दौतलेखणी.

टीप—[illegible] जरी दोन्ही शब्द प्रधान आहेत तरी तद्वाचक दोन पदार्थांमिळून जणुं कांहीं एकच वस्तूचा बोध होत असल्यामुळें हे समास एकवचनीं व अन्त्यलिंगी आहेत हें उघड आहे.

II **समाहार द्वंद्वः**—ज्या द्वंद्व समासांत त्यांतील पदांच्या अर्थाशिवाय आणखी तशाच प्रकारच्या अर्थाचा अन्तर्भाव होतो त्यास समाहार द्वंद्व असें म्हणतात, जसें:—आहारनिद्राभय ( आहार आणि निद्रा आणि भय इतकेंच नव्हे तर प्राणिविषयक सर्व धर्म ), मीठभाकर ( मिठ आणि भाकर ह्यांशिवाय आणखी भात, भाजी वगैरे सर्व साधें अन्न ), भाजीपाला, पानपत्रावळ, घरदार, देवब्राह्मण, कोळीमाळी, शेटसावकार, शेतमळा, सरकारदरबार, फंदफितूर, शेलापागोटें, चूकभूल, आंथरूणपांघरूण, इ०. समाहार द्वंद्व समासांचा मराठींत फारच मोठा भरणा आढळतो. त्याच्या निरीक्षणानें त्यांत प्राधान्यें करून पुढील प्रकार आढळतात:—

( अ ) जवळ जवळच्या अर्थाचीं पदें एकत्र येऊन होणारे:—काजळकुंकूं, मीठभाकर, भाजीभाकरी, कुणबीमाळी, अन्नपाणी, टिळाटोपी, वेणीफणी, वस्त्रपात्र, दारूगोळा, घरदार, शेतभात, आचारविचार नेआण, घडमोड, चढउतर, आदळआपट, जाये, देघे, हेळसांड, घडामोड, तोडजोड, इ०.

( आ ) जवळ जवळ एकाच अर्थाच्या पदांनीं होणारे:—शाकभाजी, पानपत्रावळ, शेटसावकार, सरकारदरबार, चूकभूल, लांकुडफांटें, पोरबाळ, केरकचरा, रांडमुंड, पैसाअडका, दानधर्म, जीवजंतु, बागबगीचा, पाऊसपाणी, शेतमळा, घासकाडी, झाडझुडूप, सगासोयरा, आदरातिथ्य इ०.

**टीपः**—असे कांहीं विशेषणोभयपद समास आढळतात. ते नामाप्रमाणें उपयोगांत असतां द्वंद्व आणि विशेषणाप्रमाणें उपयोगांत असतां कर्मधारय होत. उदाहरणें:—आंधळापांगळा, लंगडालुळा, एवढाकेवढा, उलटासुलटा, उघडानागडा, उघडाबोडका, इ०

( इ ) ज्यामधील एक शब्द प्रचलित असून स्वतंत्रपणें उपयोगांत असतो, परंतु दुसरा त्याच्याशीं अनुप्रासानें जुळणारा म्हणजे बहुतेक सारख्याच उच्चाराचा सार्थ किंवा अर्थहीन व स्वतंत्रपणें फारसा उपयोगांत नसणारा असा असतो, अशा प्रकारचे:—खाणाखुणा, दाणादुणा, शेजारीपाजारी, भिकारीटाकारी, अडोशीपडोशी, सोयराधायरा, ओळखपाळख, खिडुकमिडुक, इडापिडा, चट्टीपट्टी, इ०.

टीप—अशा प्रकारचीं कांहीं विशेषणेंही आढळतात:—उदारपाधार, ओबडधोबड, आवळाजावळा, वांकडातिकडा, आडवातिडवा, इ०.

( ई ) ज्यांमधील पहिला शब्द रूढ असून त्याचे आद्याक्षराचे जागीं बि किंवा क्वचित् गि अक्षराचा उपयोग करून तोच शब्द पुन्हा त्याचे पुढें येतो ते. उदाहरणें:— घोडाबिडा, कागदबिगद, लेखणीबिखणी, दगडगिगड, इ०

टीप १—पहिल्या पदाच आद्यक्षरांत बिंदु असल्यास तो दुसऱ्या पदाचे बि किंवा गि ह्या आद्यक्षरावर येतो. जसें:—घोंडागिंडा, तंटाबिंटा, भांडणबिंडण, इ०.

टीप:—२ कधीं कधीं, प्रथमपद विशेषण असतां, त्याचे आद्य व्यंजनाचे जागीं स् हें व्यंजन आलेलें आढळतें. जसें:—लहानसहान, वाईटसाईट, लुंगासुंगा, भलतासलता, उलटसुलट, इ०. हा प्रकार नामसंबंधानेंही क्वचित आढळतो. जसें:—लुंगीसुंगी, पोरसोर.

III **वैकल्पिक द्वंद्वः**—हा एक नवीन प्रकार मराठींत आढळतो. जेव्हां दोन पदें अर्थदृष्ट्या **किंवा**, **अथवा**, इ० विकल्पबोधक उभयान्वयी अव्ययांनीं जोडलेलीं असून तें उभयान्वयी अव्यय लुप्त होऊन समास होतो, तेव्हां त्यास वैकल्पिक द्वंद्व असें म्हणतात. जसें:—पापपुण्य, धर्माधर्म, न्यायान्याय, सत्यासत्य, भक्ष्याभक्ष्य, खरेंखोटें, बरेंवाईट. अशा प्रकारच्या समासांतील द्वितीय पद हें अर्थदृष्ट्या पहिल्या पदाचे विरुद्ध असतें. ह्या सामासिक शब्दांचा विकल्पार्थीं विशेषणाप्रमाणें उपयोग झाल्यास त्यास विशेषणोभयपद वैकल्पिक कर्मधारय असें म्हणावें; आणि नामाप्रमाणें उपयोग झाल्यास वैकल्पिक द्वंद्व म्हणावें. या उदाहरणांचा इतरेतर द्वंद्वाप्रमाणेंही उपयोग होतो. म्हणजे कधीं कधीं त्यांतील पदें **आणि** ह्या समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडलेलीं आहेत असें अर्थदृष्ट्या म्हणावें लागतें. त्यावेळीं त्यास इतरेतर द्वंद्व म्हणावें. परंतु जेव्हां अर्थदृष्ट्या यांचे पदांमध्य **किंवा** या विकल्पबोधकाचा अध्याहार समजणें अवश्य असतें, तेव्हां त्यांस वैकल्पिक द्वंद्व असें नांव द्यावें.

टीप—१—तीनचार, पांचदहा, दहावीस, इ० संख्यावाचक किंवा गणनावाचक विशेषणें एकत्र येऊन झालेल्या सामासिक शब्दांस या दृष्टीनें विशेषणोभयपद वैकल्पिक कर्मधारय किंवा वैकल्पिक द्वंद्व असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. परंतु ह्याचा नामाप्रमाणें बहुधा फारसा उपयोग होत नसल्यामुळें हीं

बहुधा कर्मधारयाचींच उदाहरणें होत; तथापि क्वचित् त्यांस वैकल्पिक द्वंद्व म्हणण्याचाही प्रसंग येतो. जसें:—पांचदहांनीं त्याचें कसें भागणार, इ०.

टीप २—जेव्हां समस्त संख्यावाचक किंवा गणनावाचक विशेषणें अनुक्रमानें म्हणजे लागोपाठ येणारीं असतात, तेव्हां त्या सामासिक शब्दाचा विकल्पार्थ सरळच आहे. जसें:—एकदोन म्हणजे एक किंवा दोन, तीनचार म्हणजे तीन किंवा चार इ०. परंतु ज्यावेळीं त्यांचे मध्यें कांहीं अंतर असतें म्हणजे तीं लागोपाठ येणारीं नसतात, तेव्हां त्या सामासिक शब्दाचा विकल्पार्थ वरील अर्थापेक्षां कांहींसा भिन्न असतो. त्यावेळीं केवळ इतके किंवा तितके इतकाच अर्थ नसून त्या दोन संख्यांमधील कोणत्याही संख्येइतके असा विस्तृत विकल्पार्थ असतो. जसें:—पांचदहा म्हणजे पांच किंवा दहा इतकेंच नव्हे तर पांच, किंवा सहा, किंवा सात, किंवा आठ, किंवा नऊ, किंवा दहा, असा अर्थ आहे हें उघड आहे. याच प्रमाणें अन्यत्र समजावें.

टीप ३:—क्रमवाचक संख्याविशेषणांचाही असा वैकल्पिक समास होतो. जसें:—पहिलादुसरा, अकरावाबारावा, आठवादहावा, विसावाबत्तिसावा, इ०.

टीप ४:—कधीं कधीं पहिल्या क्रमवाचकाचे ऐवजीं केवळ संख्यावाचक म्हणजे गणनावाचक विशेषणांचाही उपयोग झालेला आढळतो. जसें:—पंधरासोळावा, आठनववावा, इ० परंतु हा प्रकार बहुधा दहांचे आंतील संख्यासंबंधानें बोलतांना सहसा आलेला दृष्टीस पडत नाहीं. एकदुसरा, पांचसहावा, आठदहावा, असे प्रयोग प्रचारांत नसून त्यांचे जागीं पहिलादुसरा, पांचवासहावा, आठवादहावा, असेच, पहिल्या स्थानींही क्रमवाचक विशेषणच असणारे, प्रयोग प्रचारांत आहेत.

४४७. वरील तिन्ही प्रकारच्या द्वंद्व समासांच्या मराठी उदाहरणांसंबंधानें एक विशेष गोष्ट सांगितली पाहिजे. ती अशी. त्यांस विभक्तिप्रत्यय लागतांना कांहीं उदाहरणांतील प्रथम पदाचें सामान्यरूप होतें. परंतु हा प्रकार कोठें होतो व कोठें होत नाहीं, ह्याबद्दलचा साधारण नियम सांगतां येत नाहीं. तेव्हां हा प्रकार केवळ अनिश्चित होय असेंच म्हटलें पाहिजे. उदाहरणें:—हातपाय—हातापायांस, कुलुपकिल्ली—कुलुपाकिल्लीचा, घरदार—घरादाराला, पाऊसपाणी—पावसापाण्याचा, तंटाबिंटा—तंट्याबिंट्याला, खरेंखोटें—खऱ्याखोट्याचा, वीसपंचवीस—विसांपंचविसांनीं, पांचव्यासहाव्याला, इ०.

टीप—कधीं कधीं दोन्ही पदांसही एकच विभक्तिप्रत्यय लागलेला आढळतो. तेव्हां त्यांचा समास मानण्याचें कारण नाहीं. तर ते भिन्न भिन्न दोन शब्द

होतं हें उघड आहे. जसें:—हाताला पायाला, हातांपायां, नाकीं डोळीं, घरीं दारीं, खऱ्याला खोट्याला, इ०.

(द्वंद्व समासाचा एकशेष द्वंद्व म्हणून एक प्रकार संस्कृतात आहे. जेव्हां दोन पदांपैकीं एकाचा लोप होऊन बाकीचें एकच शेष म्हणजे शिल्लक राहतें, तेव्हां त्यास एकशेष द्वंद्व असें म्हणतात. जसें:—माताच पिताच पितरौ, श्वश्रूश्च श्वशुरश्च श्वशुरौ, हंसीच हंसश्च हंसौ, इ०. परंतु ह्या प्रकारचीं संस्कृत उदाहरणेंही मराठींत दिसत नाहींत; तेव्हां निवळ मराठी उदाहरणें कोठून सांपडणार. पितर हा शब्द मराठींत आहे. परंतु त्याचा आई आणि बाप इतक्याच अर्थानें मराठींत फारसा उपयोग झालेला आढळत नाहीं. तर त्यांच्या शिवाय इतर बऱ्याच परलोकवासी निकट नातेवाईकांचा त्यांत अन्तर्भाव होतो. दुसऱ्या उदाहरणाचा तर मराठींत झालेला उपयोग आढळतच नाहीं. तेव्हां पितर या शब्दाचा जर संस्कृत पितरौसारखा कोठें उपयोग होत असला, तर त्यास एकशेष द्वंद्व समास म्हणावें. परंतु मराठींत पितर शब्द पुल्लिंगीं येवो किंवा पितरें असा नपुंसकलिंगी येवो, त्याचा बहुधा वरील विस्तृत अर्थानेंच उपयोग होत असल्यामुळें आणि मराठींत तशा प्रकारचीं आणखी उदाहरणें नसल्यामुळें एकशेष द्वंद्व हा प्रकार मराठींत मानण्याचें कांहीं प्रयोजन दिसत नाहीं.

खेरांनीं हा प्रकार मानून पुढील उदाहरणें दिलीं आहेत. 'त्याचीं पितरें जेवलीं म्हणजे मातापितरें; भांवडें (भाऊबहीण), नातवंडें, पणतंडें इ०.' (Kher's Marathi Gramr Page 267) परंतु पहिल्या उदाहरणांत पितरें याचा मृत आई आणि बाप एवढाच मर्यादित अर्थ नसून वर सांगितलेला विस्तृत अर्थ आहे हें कोणीही कबूल करील. भांवडें, नातवंडें, इ० उदाहरणेंही सर्वथा अयोग्य होत. कारण कीं बहीण आणि भाऊ यांपैकीं भाऊ हा शब्द, तसेंच नातू आणि नात ह्यांपैकीं कोणतातरी एक शब्द, शेष राहून त्याचा दोहोंच्या अर्थानें उपयोग होत आहे असें म्हणतां येत नाहीं. तर भाऊ या शब्दापासून भावंड हा लिंगभेदाची विवक्षा नसतां, उपयोगांत येणारा नपुंसकलिंगी शब्द साधला आहे हें उघड आहे. त्याचप्रमाणें नातवंड व पडतोंड किंवा पणतवंड हे नातु व पणतु या शब्दांपासून लिंगभेद विवक्षेच्या अभावीं नपुंसकलिंगी शब्द साधले आहेत हें उघड आहे. शिवाय भावंड, नातवंड, पडतोंड, इ० शब्दांच्या प्रचारांतील एकवचनी प्रयोगावरूनही ते समासघटित शब्द नव्हत तर एकेरी शब्द होत हें स्पष्ट होतें. ज्याप्रमाणें कुत्रें, घोडें, अपत्य, मूल, इ० नपुंसकलिंगी एकवचनी शब्द लिंगाची विवक्षा नसतां उपयोगांत येतात, त्याचप्रमाणें वरील शब्दांचा उपयोग होतो. कुत्रा, घोडा यांपासून कुत्रें, घोडें, हे तद्धित शब्द बनले. त्याचप्रमाणें भाऊ, नातु, पणतु, यांपासून भावंड, नातवंड, पडतोंड, हे तद्धित शब्द बनले. त्यांस

मुळीं सामासिक हें नांवच शोभत नाहीं. तेव्हां त्यांस एकशेष द्वंद्व हें नांव देणें सर्वथा गैर होय. एवंच भावंड, नातवंड हीं जर एकशेष द्वंद्व समासाचीं उदाहरणें होत तर कुत्रें, घोडें, बकरें, अपत्य, मूल, इ० शब्दांसही सामासिक शब्द म्हणून त्यांची एकशेष द्वंद्व समासांत गणना करावी लागेल. परंतु स्वतः खेरही तसें करण्यास तयार दिसत नाहींत. म्हणून एकशेष द्वंद्व हा द्वंद्वाचा प्रकार मराठींत नाहीं असेंच म्हणणें प्रशस्त आहे हें उघड आहे.

द्वंद्व समासाचा समाहार द्वंद्व म्हणून जो प्रकार आहे, त्याचे पोटीं अ, आ, इ, ई, या सदरांमध्यें वर चार प्रकारचीं उदाहरणें दिलीं आहेत. त्यांपैकीं पहिल्या दोन सदरांतील शब्दांसंबंधानें कांहीं वाद असण्याचें कारण नाहीं. काजळकुंकू, मीठभाकर, शाकभाजी, पानपत्रावळ, इ० शब्द सामासिक होत. आणि तीं समाहार द्वंद्वाचींच उदाहरणें होत याविषयीं मतभेद होण्यास अवकाश नाहीं. तथापि इ, ई. या तिसऱ्या व चवथ्या सदरांतील शब्दांसंबंधानें मतभेद होण्याचा बराच संभव आहे. खाणाखुणा, दाणादुणा, घोडाबिडा, दगडगिगड, इ० शब्दांस प्रथम सामासिक शब्दच म्हणावें कीं नाहीं याची कोणास शंका आल्यास त्यांत नवल नाहीं. दादोबा आपल्या पूरणिकेंत म्हणतात. (पृ० १८१) ' सोयराधायरा आणि आंथरूणपांघरूण हे दोन शब्द त्यांच्या आंतील घटनेंत व अर्थांत भिन्न आहेत. ते असे—सोयराधायरा म्हणजे सोयराच. सोयरा हा शब्द सामान्यें करून बोलावयाचा असतां तदनुकरणवाचक धायरा हा एक अर्थरहित शब्द कल्पून सोयरा या मुख्य शब्दास जोडला आहे; परंतु आंथरूणपांघरूण इ०. शब्दांत दोन्ही शब्द अर्थवान् असून ते जोडल्यानें तदन्तर्गत त्या सारख्या पासोडी वगैरे दुसऱ्या वस्त्रांचाही यांत संग्रह होतो इतका अर्थविशेष यांत आहे. म्हणोन या दोन शब्दांच्या कोटी निराळ्या समजल्या पाहिजेत.' दादोबांनीं या शब्दांचे घटनेंतील दाखविलेला फरक यथार्थ आहे. एका स्थळीं दोन्ही पदें अर्थवान् आणि स्वतंत्र उपयोगांत येणारीं अशीं आहेत. परंतु दुसऱ्या स्थळीं फक्त एक पदच तशा प्रकारचें असून दुसरें त्याच्याशीं अनुप्रासानें जुळणारें अर्थहीन व स्वतंत्रपणें उपयोगांत नसणारें असें आहे, यांत संशय नाहीं. परंतु त्यांनीं दाखविलेला अर्थाचा फरक मात्र शंकास्पद आहे इतकेंच नव्हे तर निःसंशय चूक आहे असें म्हणावें लागतें. दादोबा म्हणतात सोयराधायरा म्हणजे सोयराच. हा अर्थ बरावर नाहीं. सोयराधायरा या शब्दाचे अर्थांत् सोयऱ्याशिवाय मित्र, परिचित, वगैरे मंडळीचाही अन्तर्भाव होतो. म्हणजे अर्थदृष्ट्या दोहोंमध्यें कांहीं अंतर नाहीं. यामुळें दादोबांनीं वरील फरकावरून काढलेलें अनुमानही जर कोणास संमत नसेल तर त्यांत नवल नाहीं. ते म्हणतात ' यांत मला सूक्ष्म भेद इतकाच दिसून येतो कीं, असे दोन शब्द जोडले असतां जर त्यांतला एक शब्द पूर्ण अर्थवान् नसून दुसऱ्या

शब्दाच्या अर्थाचें सामान्यें करून निदर्शन करावयाचें असल्यास, अथवा दार्ढ्य आणायाचें असल्यास, अनुकरणाप्रमाणें अथवा उपमेप्रमाणें जोडला असतो, तेव्हां असे शब्द प्रातिशाब्दिक कोटींत घालावे व बाकीचे समाहारद्वंद्व कोटींत घालावे हा मार्ग सुकर दिसतो ' वर दिलेला अर्थांतील चुकीचा फरकच येथें ग्राह्य धरून दादोबा सोयराधायरा वगैरे शब्दांस समाहारद्वंद्वांत घालण्यास तयार नाहींत. त्यांनीं आपल्या व्याकरणामध्यें त्यांस समाहारद्वंद्व म्हटलें आहे. परंतु ते आपल्या पूरणिकेंत त्यांस त्या वर्गांत घेण्यास तयार नाहींत. पूरणिका अधिक सूक्ष्म विचारांतीं लिहिलेली असल्यामुळें हेंच मत त्यांचें दृष्टीनें विशेष ग्राह्य असें दिसतें. परंतु सोयराधायरा आणि आंथरूणपांघरूण या शब्दांचे कोटींत कांहीं फरक नसून दोहोंचा अर्थ बहुतेक एका प्रकारचाच आहे हें वर दाखविलें आहे. मात्र त्या शब्दांचे घटनेंतील फरक यथार्थ आहे. आणि दोन्ही पदें अर्थवान् असणाऱ्या प्रकारांत जसे अ, आ, हे दोन भेद आम्हीं दाखविले आहेत, त्याचप्रमाणें एकच पद अर्थवान् असणाऱ्या प्रकारांतही इ, ई, हे दोन भेद दिसतात हेंही सर्वसंमत आहे. आतां या त्यांच्या केवळ घटनेंतील फरकास धरून अ, आ, ह्यांस समाहार द्वंद्व आणि इ ई यांस प्रातिशाब्दिक अशीं भिन्न भिन्न नांवें देणें कितपत योग्य आहे इतकाच प्रश्न उरला. खुद्द दादोबांसही त्यांच्यातील केवळ घटनाभेद हा त्यांच्या वर्गभेदास योग्य कारण होय असें वाटत नाहीं असें दिसतें. कारण कीं त्यांच्या वरील दोन अवतरणांपैकीं पहिल्यामध्यें त्यांनीं प्रकृतशब्दांत घटना व अर्थ या दोन्ही दृष्टींनीं अंतर आहे असें जरी म्हटलें आहे तरी दुसऱ्या अवतरणांत त्यांतील वर्गभेद सांगतांना त्यांचा त्यांतील अर्थ भेदावरच विशेष जोर आहे हें उघड आहे. म्हणजे वर्गभेद जर मानावयाचा आहे तर त्यास घटनाभेदाचा आधार योग्य व पुरेसाही नाहीं, तर त्यास वास्तविक अर्थभेदाचाच आधार पाहिजे हें दादोबांसही मान्य होण्यासारखें आहे असें दिसतें. परंतु त्यांमध्यें अर्थभेद आहे असें जरी दादोबा म्हणतात तरी तसा अर्थभेद प्रचलित भाषेंत उपलब्ध नसल्यामुळें केवळ वाद्विषयक शब्दांतील घटनाभेदाचे आधारावर त्यांमध्यें वर्गभेद मानणें अयोग्य दिसतें. म्हणूनच आम्हीं त्यांतील अर्थसाम्याचे आधारावर दोहोंसही समाहारद्वंद्व या एकाच वर्गांत घालून त्यांमधील घटनाभेद समाहारद्वंद्वाचे पोटीं फक्त नसूद करून ठेविला आहे.

आतां या द्वंद्व समाससंबंधाचा आणखी एक मुद्दा राहिला. तो असा. कै० बाळकृष्ण विष्णु भिडे हे आपल्या व्याकरणांत म्हणतात पृ० १२३ क० ४३१ ) 'हातपाय नाकडोळा, लहानसहान, खरेंखोटें, या शब्दांना विभक्त्यादि प्रत्ययांमुळें होणारे विकार दोहोंशब्दांसही सारखेच होतात म्हणून हे शब्द समास नव्हत हें उघडच आहे. जसें:—त्याचे हातपाय मजबूत आहेत. येथें हात

पाय हा एक शब्द आहे असा भास होतो. परंतु त्याच्या हातापायांला किंवा हाताला पायाला कळा लागल्या आहेत, या उदाहरणावरून दोन्ही शब्दांस विभक्तीप्रत्ययामुळें विकार होऊन निरनिराळीं रूपें होतात, म्हणून हातपाय हा समास नव्हे. याचप्रमाणें आंधळापांगळा, नाकडोळे, लहानसहान, खरेंखोटें, इत्यादि शब्द जाणावे.' यासंबंधानें कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात कीं, 'हातपाय, नाकडोळे, घरदार, इ. रूपांस कोणी द्वंद्व समास मानितात व तसें मानण्यास कांहीं बाध आहे असें नाहीं.' (निबंध पृ. २२५) अशाप्रकारें ह्या शब्दासंबंधानें मतभेद दिसतो. भिडे यांस दुसऱ्या कोणत्याच वैयाकरणाचा दुजेरा नाहीं. त्यांच्या सूचनेस अनुमोदनही मिळूं नये इतकी ती त्याज्य आहे काय? तथापि अर्वाचीन सार्वजनिक निर्णयपद्धतीस अनुसरून बोलावयाचें म्हटलें तर, जरी ती एकाएकीं त्याज्य ठरली नाहीं तरी बहुमत, आणि फारच मोठें बहुमत, तिच्या विरुद्ध आहे हें निर्विवाद आहे. शास्त्रीय विषयांत बहुमतानें निकाल करण्याची पद्धति आम्हांस तरी मान्य नाहीं; म्हणूनच भिड्यांचे म्हणण्याचा अशाप्रकारें निकाल न करितां त्याचा ऊहापोह केला पाहिजे. एकदा दोन किंवा अधिक पदांचा समास झाला म्हणजे त्या सामासिक शब्दास विभक्तिप्रत्यय लागतांना फक्त त्यांतील अन्त्य पदासच कायते विकार होतात, हा सामासिक शब्दांबद्दलचा भिडे यांचा गर्भित सिद्धांत कोणासही मान्य होण्यासारखा आहे. तेव्हां वादविषयक शब्दांतील अन्त्य पदाशिवाय आणखी त्याच्या मागल्या पदांसही जर विकार होत असतील तर वादविषयक शब्द समास नव्हत हें भिडे यांचें अनुमान न्यायशास्त्रशुद्ध नाहीं असें कोण म्हणेल? एवंच त्यांनीं जो सिद्धांत प्रमाण समजून प्रकृत अनुमिति काढिली आहे तो सिद्धांत जर निर्बाध असेल तर त्यांचीं अनुमिति स्वीकारिलीच पाहिजे. त्यास दुसरी तोडच नाहीं. भिडे यांचा प्रमाणभूत सिद्धांत संस्कृत भाषेसंबंधानें अगदीं अनपवादक आहे हें तज्ज्ञांस सांगावयास नकोच. मराठीमध्येंही हा सिद्धांत द्वंद्वेतर समासांसंबंधानें तितकाच निरपवादक आहे. परंतु द्वंद्व समासासंबंधानें मात्र हा नियम मराठींत सर्वस्वी निर्बाध नाहीं, तर द्वंद्व समासाच्या तिन्ही प्रकारच्या उदाहरणांत या नियमास अपवाद सांपडतात हें आम्हीं वर ४४७ वे अंकांत दाखविलेंच आहे. समाहारद्वंद्वाचे उदाहरणांत भिडे यांनीं पानपत्रावळ हें उदाहरण दिलें आहे. यासही विभक्ति प्रत्यय लागतांनां यांतील पहिल्या पदास विकल्पानें विकार झालेला आढळतो. जसें:—या गांवांत पानपत्रावळीला किंवा पानापत्रावळीला तोटा नाहीं. त्याप्रमाणें द्वंद्व समासाचीं जीं संस्कृत उदाहरणें आहेत, त्यांपैकीं सुद्धां कांहींस विभक्तिप्रत्यय लागतांनां प्रथम पदास विकार झालेला आढळतो. देवदानव हें द्वंद्व समासाचें उदाहरण भिडे यांचे पुस्तकांतलेंच आहे. त्याचेसंबंधानें युद्ध, समासांस विभक्ति प्रत्यय लागण्यासंबंधाचा संस्कृतांतील निरपवादक सिद्धांत मराठींत कधीं कधीं एकी-

सिद्धांतास मराठींतील द्वंद्व समासाचीं कांहीं उदाहरणें अंशत: अपवादक होत, असें समजून त्यास विभक्तिप्रत्यय लागतांना त्यांतील पहिल्या पदाचेंही सामान्य-रूप होतें असा कांहींसा विचित्र नियम मानणें प्राप्त झालें. ]

## बहुव्रीहि.

४४८. ज्या समासांतील कोणतेंही पद प्रधान नसून सर्व सामासिक शब्द तद्भिन्न अशा एका निराळ्या नामाचं विशेषण असतो त्यास **बहुव्रीहि** समास असें म्हणतात. जसें:—चक्रपाणि ( चक्र आहे पाणी-मध्यें ज्याच्या तो विष्णु ), अनंग ( नाहीं अंग ज्याला तो मदन ), कृत-कृत्य ( कृत म्हणजे केलेलें कृत्य ज्यानें तो मनुष्य ), इ०.

४४९ या समासाचे विग्रहामध्यें संबंधी सर्वनामास जी विभक्ति लागते त्या विभक्तीचें नांव त्यास देतात.

तत्पुरुष समासांतल्या प्रमाणेंच प्रथमा व संबोधन यांशिवाय बाकीच्या विभक्तींस अनुसरून हे भेद होतात. उ०:—

**तृतीया बहुव्रीहि:**—जितकाम ( जित आहे काम ज्यानें ), जितें-द्रिय ( जित आहेत इंद्रियें ज्यानें ), त्यक्तायुध ( त्यक्त आहे आयुध ज्यानें ). कृतकृत्य, जितकोप, दत्तधन, आहिताग्नि, पूरितलोककाम, हुतवहार्पितखांडव, इ०.

**चतुर्थी बहुव्रीहि**—दशानन ( दश आहेत आननें ज्याला ), पंच-मुख, चतुर्मुख, दशमुख, इ०.

मराठी चौकौन, दुतोंडें, इ०.

**पंचमी बहुव्रीहि**—निर्धन ( निघून गेलें आहे धन ज्या पासून ), निर्बल, गलितपर्ण ( गलित आहेत पर्णे ज्यापासून ), इ०.

**षष्ठी बहुव्रीहि**—लंबोदर ( लंब आहे उदर ज्याचें ), शूलपाणि, तपोबल, मानधन, तीर्थपाद, शशिशेखर, चंद्रशेखर.

मराठी घारडोळ्या, काळतोंडया, गायमुख्या, पांढरपेश्या, दुप्पट, पांचपट.

**सप्तमी बहुव्रीहि**—वीरपुरुष ( वीर आहेत पुरुष ज्यांत असा गांव ), भीमादि, नाक ( न म्हणजे नाहीं अक म्हणजे दु:ख ज्यांत तो स्वर्ग ).

**टीप:**—ज्या बहुव्रीहि समासाचे विग्रहांत दोन्ही पदें एकाच विभक्तींत असतात त्यास **समानाधिकरण** बहुव्रीहि असे म्हणतात; आणि ज्याचे विग्रहांत

त्या पदांची विभक्ति भिन्न भिन्न असते त्यास **व्यधिकरण** बहुव्रीहि असें म्हणतात. वरील उदाहरणांपैकीं जितेंद्रिय, कृतकृत्य, दशानन, इ० हीं समानाधिकरण बहुव्रीहीचीं आणि चक्रपाणी, शूलपाणी, तीर्थपाद, पद्मनाभ, इ० हीं व्यधिकरण बहुव्रीहीचीं उदाहरणें होत.

४५०. बहुव्रीहि समासाचे दुसऱ्या दृष्टीनें आणखीही पुढील प्रकार होतात. ते व त्यांचीं उदाहरणें.

I **विशेषणपूर्वपदः**—नीलकंठ, लंबोदर, रक्तवस्त्रा, सुग्रीव.
मराठी—बांकडमान्या, आंखुडशिंगी, बहुदुधी, अल्पमोली, इ०.

II **विशेषणोत्तरपदः**—गुडप्रिय ( गुड आहे प्रिय ज्याला ), तक्रप्रिय, मराठी—पायाशुद्ध [ शुद्ध आहे पाया ज्याचा ].

III **उपमानपूर्वपदः**—कमलनेत्र, चंद्रमुखी, शशिवदना, चंद्रानना, राजीवाक्ष, पुंडरीकाक्ष.

IV **विषयपूर्वपदः**—अहमभिमान [ अहं म्हणजे मी असा ज्यास अभिमान आहे तो ], शिवशब्द [ शिव असा ज्याचा शब्द आहे तो तपस्वी ].

V **अवधारणापूर्वपदः**—यशोधन, [ यश हेंच धन आहे ज्याचें ], तपोबल, विद्याधन.

VI **लुप्तपद** किंवा **मध्यमपदलोपीः**—मृगनयना [ मृगाच्या नयनांप्रमाणें नयन आहेत जिचे ], हरिणाक्षा, गजगति, सिंहकटि, अभिज्ञानशाकुंतल, मुद्राराक्षस, हस्तिपाद,

**मराठी**—गायमुख्या, घोडमुख्या, उंटमान्या.

VII **नञ्बहुव्रीहिः**—अनादि [ आदि नाहीं ज्याला तो ], अंनत, अव्यय, नाक, अज्ञान, अनाथ, अकर्मक.

VIII **संख्यापूर्वपद**—त्रिनयन, एकदंत, त्र्यंबक, चतुरानन, पंचतुण्ड, चतुर्भुज, अष्टभुजा, इ०.

मराठी—चौकोन, दुतोंडें, दुमजला, तिमजला, [ दुमजला, तिमजला या बहुव्रीही समासांचीं दुमजली, तिमजली, अशीं ईकारान्तही रूपें आढळतात. असेंच दुसडा—दुसडी ], एकडोळ्या, अष्टपैलू, तिकोनी, तिधारी किंवा त्रिधारी, चौसोपी, इ०.

IX **संख्योत्तरपद**—उपदश [ दहांचे जवळ आहेत ते नऊ किंवा अकरा ], [ त्रिसप्त [ तीन सात आहेत जींत ती संख्या—एकवीस ].

X **सहबहुव्रीहिः**—सदार [ दार म्हणजे बायकोसह ], सपुत्र, सकर्मक, सांब, सहोदर, सोदर, सादर, सहकुटुंब, सहपरिवार, सरूप, सवर्ण, सविस्मय, सनाथ, सफल, समूल, सचैल.

मराठी—सजोड, सढळ.

XI **दिगंतराल बहुव्रीहि**—दोन दिशांच्या मधील दिशा दाखविणारा. [ मराठींत याचा प्रचार बहुधा नाहींच ]:—दक्षिणपूर्व [ आग्नेयी दिशा ] पश्चिमोत्तर [ वायव्य दिशा ].

XII **व्यतिहार बहुव्रीहिः**—ज्या समासानें एकाप्रकारचें भांडण किंवा युद्ध, दोन्ही पक्षांचें समान युद्धसाधन, आणि त्यांचा आघात व प्रत्याघात, ह्या गोष्टींचा बोध होतो त्यास व्यतिहार बहुव्रीहि असें म्हणतात.

संस्कृत उ०:—दंडादंडि [ एकमेकांस दंड म्हणजे दांडकीं किंवा काठ्या मारून चाललेलें युद्ध ] मुष्टीमुष्टि, मुसलामुसलि. संस्कृतांत हे समास नपुंसकलिंगी एकवचनी व अव्ययरूपी असतात.

मराठी—उदाहरणें:—लठ्ठालठ्ठी, मारामारी, बदाबदी, बुक्काबुक्की, लाथालाथी, खेंटराखेंटरी, गुद्दागुद्दी, इ०.

मराठीमध्यें हे समास स्त्रीलिंगी एकवचनीं असतात. यांतील पहिल्या स्वराचे अन्त्य स्वरास आ आदेश होतो आणि अन्त्य पदाचे अन्त्यस्वरास ई आदेश होतो.

XIII **प्रादि** अथवा **अव्ययपूर्वपद बहुव्रीहिः**—प्रपर्ण [ प्रपतित आहेत पर्णें ज्यांचीं असा—वृक्ष ], निर्घृण [ निर्गता म्हणजे गेलेली आहे घृणा म्हणजे दया ज्याची असा ], निर्दय, निष्फळ, विफल, उच्छृंखल, उन्मुख, निस्पृह, निस्संग, निर्लेप, निष्कंटक, नीरस, निःशंक, निष्काम, विधवा, विमुख, विरूप, निःशंक, कुरूप, इ०.

[ आतां कांहीं मतभेदांचा विचार करूं ].

( अ ) लठ्ठालठ्ठी; बुक्काबुक्की, खेंटराखेंटरी इ० शब्द केवळ द्विरुक्त होत असें कांहींचें म्हणणें आहे. परंतु लठ्ठ, बुक्का, खेंटर, इत्यादि शब्दांचीं हीं केवळ

IX **संख्योत्तरपद**—उपदश [ दहांचे जवळ आहेत ते नऊ किंवा अकरा ], [ त्रिसप्त [ तीन सात आहेत जींत ती संख्या—एकवीस ].

X **सहबहुव्रीहिः**—सदार [ दार म्हणजे बायकोसह ], सपुत्र, सकर्मक, सांब, सहोदर, सोदर, सादर, सहकुटुंब, सहपरिवार, सरूप, सवर्ण, सविस्मय, सनाथ, सफल, समूल, सचैल.

मराठी—सजोड, सढळ.

XI **दिगंतराल बहुव्रीहि**—दोन दिशांच्या मधील दिशा दाखविणारा. [ मराठींत याचा प्रचार बहुधा नाहींच ]:—दक्षिणपूर्व [ आग्नेयी दिशा ] पश्चिमोत्तर [ वायव्य दिशा ].

XII **व्यतिहार बहुव्रीहिः**—ज्या समासानें एकाप्रकारचें भांडण किंवा युद्ध, दोन्ही पक्षांचें समान युद्धसाधन, आणि त्यांचा आघात व प्रत्याघात, ह्या गोष्टींचा बोध होतो त्यास व्यतिहार बहुव्रीहि असें म्हणतात.

संस्कृत उ०:—दंडादंडि [ एकमेकांस दंड म्हणजे दांडकीं किंवा काठ्या मारून चाललेलें युद्ध ] मुष्टीमुष्टि, मुसलामुसलि. संस्कृतांत हे समास नपुंसकलिंगी एकवचनी व अव्ययरूपी असतात.

मराठी—उदाहरणें:—लठालठी, मारामारी, बदाबदी, बुक्काबुक्की, लाथालाथी, खेंटराखेंटरी, गुद्दागुद्दी, इ०.

मराठीमध्यें हे समास स्त्रीलिंगी एकवचनीं असतात. यांतील पहिल्या स्वराचे अन्त्य स्वरास आ आदेश होतो आणि अन्त्य पदाचे अन्त्यस्वरास ई आदेश होतो.

XIII **प्रादि** अथवा **अव्ययपूर्वपद बहुव्रीहिः**—प्रपर्ण [ प्रपतित आहेत पर्णें ज्यांचीं असा—वृक्ष ], निर्घृण [ निर्गता म्हणजे गेलेली आहे घृणा म्हणजे दया ज्याची असा ], निर्दय, निष्फल, विफल, उच्छृंखल, उन्मुख, निस्पृह, निस्संग, निर्लेप, निष्कंटक, नीरस, निःशंक, निष्काम, विधवा, विमुख, विरूप, निःशंक, कुरूप, इ०.

[ आतां कांहीं मतभेदांचा विचार करूं ].

( अ ) लठालठी; बुक्काबुक्की, खेंटराखेंटरी इ० शब्द केवळ द्विरुक्त होत असें कांहींचें म्हणणें आहे. परंतु लठ, बुक्का, खेंटर, इत्यादि शब्दांचीं हीं केवळ

द्विरुक्त रूपें होत असा सकृद्दर्शनीं झालेला ग्रह योग्य नाहीं. कारण कीं हे मूळ शब्द ज्या लिंगीं आहेत तें मूळ लिंगही सबंध शब्दांस लागत नाहीं; तर सबंध सामासिक शब्द स्त्रीलिंगी होतो. तेव्हां हा वेगळाच शब्द मानणें अवश्य आहे. दुसरें असें कीं, लठ्ठ, खेंटर, इ० शब्दांपासून झालेल्या लठ्ठालठ्ठी, खेंटराखेंटरी, या रूपांकडे नीट लक्ष दिलें असतां असेंही आढळून येईल कीं लठ्ठ व खेंटर या शब्दांस दोन्ही ठिकाणीं विकार झाले आहेत. प्रथम स्थळीं त्यांचे अन्त्य स्वरास आ आणि द्वितीय स्थळीं ई असे आदेश झाले आहेत. म्हणजे एकाही स्थळीं त्याचें अविकृतरूप आढळत नाहीं. बुकाबुकी या शब्दांत मूळ शब्द आकारान्तच असल्यामुळें प्रथम स्थळीं तो अविकृत दिसतो. तरी प्रथम पदाचे अन्त्य स्वरास आ आदेश होतो, या नियमास तो कांहीं अपवाद नाहीं. तात्पर्य प्रकृत शब्दांस केवळ द्विरुक्त म्हणणें नीट नाहीं.

[ आ ] दादोबा म्हणतातः—“ कोणी एकडोळया, बाबरओठ्या, उंचमान्या, घोडतोंड्या, इत्यादि शब्दांचा ‘ एक आहे डोळा ज्याचा तो ’ एक डोळया, असा विग्रह करून त्यास बहुव्रीहिसमास घटित शब्द मानितात; परंतु मला हें प्रशस्त दिसत नाहीं. कारण या बहुव्रीहि समासाचें जें लक्षण कीं–दोन शब्दांचा संयोग असतां ज्यावरून तिसऱ्या पदार्थाची उपलब्धि होते त्याची पूर्ण पर्याप्ति होत नाहीं. हीं केवळ शब्द-साधितें होत. एकडोळा ज्यास आहे तो एक डोळया, घोडतोंड ज्यास आहे तो घोड तोंड्या इ० ” ( क० ६१० ). शिवाय ते आपल्या पूरणिकेंत म्हणतातः—‘ शब्दसाधितें तर अशाच प्रकारें समासघटित शब्द साधून त्यावरून प्रत्यय लागून साधतात, मग त्या नुसत्या समासघटित शब्दाचा बोलण्यांत प्रचार असो वा नसो. जसें—काळतोंड्या काळटिक्या, उंटमान्या, गायमुख्या, घोडतोंड्या इ० ’ ( क० १७९ ).

कृष्णशास्त्री गोडबोलेही म्हणतातः—‘ पण नामांस या आणि ई लाविल्यानें विशेषणें होतात, आणि हेच प्रत्यय वरील उदाहरणांत आहेत. म्हणून एक डोळा, तीन मजले, आंखूड शिंगें, इत्यादि कर्मधारयाच्या उदाहरणांस या आणि ई प्रत्यय लागून वरील विशेषणें झालीं आहेत असें समजावें. ( नवीन व्याकरण, क० ५७८ ( व ) पहा. )

प्रकृत शब्दांनीं तिसऱ्या पदार्थाची उपलब्धि होत नाहीं, ह्या दादोबांच्या व्यर्थ आक्षेपास कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं आपल्या निबंधांत उत्तर दिलेंच आहे. ‘ एकडोळया हा शब्द त्या दोन्ही ( एक आणि डोळा ) शब्दांचा अर्थ नव्हे, असा जो एक डोळयाचा मनुष्य वगैरे प्राणी तद्रूप निराळा अर्थ दाखवितो असें असतां या समासास बहुव्रीहीचें लक्षण पूर्णपणें येत नाहीं म्हणणें केवळ भ्रांति आहे, हें उघड आहे. ( निबंध पृष्ठ २३७. )

दादोबा व गोडबोले यांचा दुसरा मुद्दा असा कीं, एकडोळ्या, वांकडमान्या, आंखूडशिंगी इ० हे एक डोळा, वांकडमान, आंखूड शिंग, इत्यादि समासांस या हा प्रत्यय लागून झालेलीं तद्धित विशेषणें होत. त्या समासाचा 'बोलण्यांत प्रचार असो वा नसो' ही व्यवस्था संस्कृत व्याकरणास धरून आहे हें तज्ञांस कळेलच. तथापि ती मराठीमध्यें विशेष सोईची नसल्यामुळें वरील शब्दांस बहुव्रीहि समासाचीं उदाहरणें मानण्यास हरकत नाहीं. यामुळेंच संस्कृताभिमानी व संस्कृतभाषापारंगत कृष्णशास्त्री चिपळूणकर यानींही 'आखूडशिंगी, तिमजली, हीं समानाधिकरण बहुव्रीहीचीं उदाहरणें होत; माणुसघाण्या, रडतोंड्या, हीं व्यधिकरण बहुव्रीहीचीं उदाहरणें होत.' असें म्हटलें आहे, जोशी, खेर यांनी निमूटपणें चिपळूणकरांचें म्हणणें स्वीकारलें आहे. तथापि चिपळूणकर किंवा त्यांचे अनुयायी जोशी किंवा खेर यांपैकीं कोणीहि दादोबा व गोडबोले यांचे विरुद्ध मार्गाचें अवलंबन करण्याचें सयुक्तिक कारण दाखविलें नाहीं. तेव्हां संस्कृत व्याकरणांतील व्यवस्था बाजूस ठेवून नवीन व्यवस्था कां स्वीकारावी ह्या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर देणें अवश्य आहे. आमच्या मतें या कारणाचा निर्देश अंशतः दादोबांच्या पूरणिकेंतील अवतरणामध्यें आलेला आहे. 'मग त्या नुसत्या समासघटित शब्दांचा बोलण्यांत प्रचार असो वा नसो' असें जें दादोबांनीं म्हटलें आहे तेंच नवीन व्यवस्थेचें मूळ कारण होय दादोबांनीं अर्थात् हें जें सांगितलें तें आपल्या संस्कृत व्यवस्थेच्या समर्थनार्थ नव्हे; तर एकडोळा, वांकडमान, उंचमान, इत्यादि कर्मधारय समाज जरी प्रचारांत नसले तरी ते कल्पून त्यांजपासून एकडोळ्या वगैरे शब्दांची 'या' ह्या तद्धित प्रत्ययानें सिद्धि करावयाची असें सांगण्याचे ओघांत त्या समासघटित शब्दांचा 'बोलण्यांत प्रचार असो वा नसो' असें त्यांनीं जातां जातां म्हटलें आहे. आतां एक तर एक डोळा, उंच मान, आंखूड शिंग इत्यादि समास प्रचारांत नाहींत आणि त्यांस कर्मधारय समास असे कोणी म्हणत नाहीं व म्हणण्याची जरूरही नाहीं. तांबडमात हा जसा समास आहे, त्याप्रमाणें वांकडमान असा जर शब्द असेल तर तोही सामासिक शब्द म्हणावा लागेल. परंतु एक डोळा, * आंखूड शिंग, उंच मान, यांस समास कां म्हणावें

† टीप—या संबंधानें एक दोन गोष्टी ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत. गोडबोले यांनीं एक डोळा, तीन मजले ह्यांस कर्मधारय समास म्हणतांना हे शब्द असेच तोडून लिहिले आहेत. कदाचित् हा त्यांचे दृष्टीनें छापखान्याचाही दोष असेल. पण कसेंहि असलें तरी ते अलग अलग छापले जाणें व त्यांची दुरुस्ती न होणें ह्यावरून त्यांस कर्मधारय समास असें कोणी मराठींत म्हणत नाहीं व असें म्हणण्याची जरूर नाहीं असें जें आम्ही वर म्हटलें आहे त्याची सत्यता अंशतः तरी उघड होते. दादोबांनीं मात्र एकडोळा, घोडतोंड असे हे शब्द त्यांच्या स्वतःच्या मतास अनुसरून

ह्याचें कारण कोणीही सांगितलें नाहीं. असें झालें तर आकारान्त व इतर कांहीं विशेष्यनिघ्न विशेषणें वर्ज करून बाकीचें कोणतेंही विशेषण मराठींत अवि विशेषण असतां तें व त्याचें विशेष्य मिळून जेथें तेथें समास मानावा लागेल; आणि त्यायोगें मराठींत सामासिक शब्दांची व्यर्थ रेलचेल उडून जाईल; तेव्हां एक डोळा, उंच मान, आंखूड शिंग हे मराठीचे दृष्टीनें मुळीं सामासिक शब्दच नव्हत; तेव्हां तीं गोडबोले समजतात त्याप्रमाणें, कर्मधारय समासाचींही उदाहरणें समजणें योग्य नाहीं हें उघड आहे. म्हणून एकडोळ्या, उंचमान्या, आंखूडशिंग्या, इत्यादि शब्दांस एकडोळा, उंचमान, आंखूडशिंग, या नामधारी समासांपासून साधलेले तद्धित शब्द समजणें इष्ट नाहीं. ज्या ठिकाणीं वांकड-मान यासारखा योग्य समास समजण्यास हरकत नसेल, मग तो समास प्रचारांत असो वा नसो, त्या ठिकाणीं वांकडमान्या या शब्दासारखे शब्द त्या प्रचलित अथवा कल्पित समासापासून साधलेले होत असें प्रतिपादणें चालण्यासारखें आहे. परंतु वांकडमान, काळतोंड, यांसारखे समास प्रचलित नाहींत ही एक निरुपायाची गोष्ट समजली पाहिजे.

आतां घोडतोंड्या, गायमुख्या, उंटमान्या, ह्या उपमानपूर्वपद शब्दांकडे पहा. हे शब्द घोडतोंड, गायमुख, उंटमान, या प्रचलित किंवा कल्पित समासांपासून साधलेले तद्धित शब्द होत, असें म्हणणें मराठीचे दृष्टीनें कितपत सुयुक्तिक आहे तें पाहूं. घोडतोंड, गायमुख, उंटमान, हे समास षष्ठीतत्पुरुष

---

योग्य रीतीनें म्हणजे जोडून एकत्र लिहिले आहेत. तथापि घोडतोंड्या या शब्दाचें दादोबांनीं केलेलें स्पष्टीकरण सूक्ष्म विचारांतीं बरोबर नाहीं असें दिसून येईल. 'घोड-तोंड ज्यास आहे तो घोडतोंड्या' असें दादोबांनीं म्हटलें आहे. म्हणजे घोडतोंड हा समास होय. त्याचा विग्रह अर्थात् घोड्याचें तोंड असाच केला पाहिजे. त्यामुळें त्यांचे मतें घोडतोंड्या म्हणजे घोड्याचें तोंड ज्यास आहे तो. परंतु गजानन म्हणजे गजाचें आनन ज्यास आहे तो असें जरी गणपतीचे संबंधानें म्हणतां आलें तरी घोडतोंड्या म्हणजे घोड्याचें तोंड ज्यास आहे तो असा घोडतोंड्या या शब्दाचा अर्थ प्रचारांत नाहीं. तर घोडतोंड्या म्हणजे घोड्याचे तोंडाप्रमाणें तोंड आहे ज्याचें असाच अर्थ प्रचारांत आहे हें उघड आहे. त्याचप्रमाणें बाबरओंठ्या म्हणजे बाबर-ओंठ ज्यास आहेत तो असा दादोबांचा अर्थ ग्राह्य नसून बाबराचे ओंठाप्रमाणें ओंठ आहेत ज्याचे तोच बाबरओंठ्या, आणि उंटाचे मानेप्रमाणें मान आहे ज्याची तो उंटमान्या असा अर्थ आहे हें उघड आहे. तात्पर्य इतकेंच कीं, घोडतोंड्या, बाबर-ओंठ्या, उंटमान्या, हे शब्द घोडतोंड, बाबरओंठ, उंटमान, या सामासिक शब्दांस 'या' हा तद्धित प्रत्यय लागून साधले असें जरी म्हटलें तरी दादोबांनीं 'घोडतोंड ज्यास आहे तो' असा जो त्यांचा अर्थ केला आहे तो बराबर नसून 'घोड्याचे तोंडा-प्रमाणें तोंड आहे ज्याचें' अशाच प्रकारचा प्रकृत शब्दांचा अर्थ आहे हें निर्विवाद आहे.

आहेत व त्यांचे, घोड्याचें तोंड, गाईचें मुख, उंटाची मान, असे विग्रह होतात हें उघड आहे. म्हणून या षष्ठीतत्पुरुष समासापासून वरील शब्द साधले असें म्हटलें असतां त्या शब्दांचे, घोड्याचें तोंड आहे ज्याला, गाईचें मुख आहे ज्याला, उंटाची मान आहे ज्याला, असे अर्थ समजावे लागतील. परंतु अशा प्रकारचे प्राणी सध्या तरी आढळत नाहींत; आणि घोडतोंड्या, गायमुख्या, उंटमान्या, ह्या शब्दांचे उपयोगावरून त्यांचा तसा अर्थ होत नाहीं हें खालील टिपेंत स्पष्ट केलेंच आहे. ह्यांचा घोड्याचे तोंडासारखें तोंड आहे ज्याचें तो, असा अर्थ प्रचारांत असून त्यास अनुसरून हे शब्द उपमानपूर्वपद आहेत हें उघड आहे. परंतु घोडतोंड, गायमुख, उंटमान, हे प्रचलित अथवा कल्पित शब्द षष्ठीतत्पुरुष आहेत. तेव्हां या षष्ठीतत्पुरुषापासून उपमानपूर्वपद शब्द साधले असें म्हणणेंही जरा चमत्कारिकच दिसतें. एवंच अर्थदृष्ट्या व भाषादृष्ट्या दादोबा व गोडबोले यांचें मत जरी अगदीं चुकीचें नाहीं तरी जरा चमत्कारिकच होय ह्यांत संशय नाहीं.

सारांश, वादविषयक, शब्दांचे तीन वर्ग दिसतात. (१) वांकडमान्या, काळतोंड्या, इ० विशेष्यनिघ्न विशेषणपूर्वपद शब्द म्हणजे ज्या शब्दांत विशेष्याचे लिंगवचनाप्रमाणें बदलणारें विशेषण पूर्वपद असून त्यास ज्या शब्दांत कांहीं विकार झालेला आहे ते. (२) एकडोळ्या, उंचमान्या, आखूडशिंग्या, इ० विशेष्यनिघ्नेतर म्हणजे विशेष्याचे लिंगवचनाप्रमाणें न बदलणारीं अथवा अविकृत विशेषणें ज्या शब्दांमध्यें पूर्वपदें आहेत ते. आणि (३) घोडतोंड्या गायमुख्या, उंटमान्या, इ० उपमानपूर्वपद शब्द. ह्यांपैकीं पहिल्या विशेष्यनिघ्न विशेषणपूर्वपदांसंबंधानें मात्र दादोबा—गोडबोले—मत एकवार चालण्यासारखें आहे. पण वांकडमान, काळतोंड, इ० समास बहुधा कल्पितच होत; ह्यामुळें वांकडमान्या काळतोंड्या ह्यांसही त्या कल्पित समासांपासून साधलेले म्हणणें बरें नव्हे. उंचमान्या, आंखूडशिंग्या, इ० अविकृत विशेषण पूर्वपदांसंबंधानें दादोबादिकांच म्हणणें अयोग्य होय. कारण कीं, उंचमान आंखूडशिंग, ह्यांस मराठात कोणी समास म्हणत नाहीं व त्यांस समास म्हणण्याची जरूरही नाहीं. आणि घोडतोंड्या, इ० उपमानपूर्वपद शब्दांसंबंधानेंही दादोबादिकाच मत चमत्कारिकच होय हें अर्थदृष्ट्या व भाषादृष्ट्या स्पष्ट केलेंच आहे. एवच ह्या प्रकारच्या शब्दांसंबंधानें दादोबादिकांचें मत स्वीकारार्ह नाहीं हें उघड आहे.

म्हणून ह्या तिन्ही प्रकारच्या शब्दांस आम्हीं बहुव्रीहि समासांत घातलें आहे. आणि असें करणें अयोग्य नाहीं, इतकेंच नव्हे तर तेंही मूळ परंपरेस धरून व म्हणूनच सुयुक्तिक आहे हें आतां दाखवितों. वांकडमान्या, एकडोळ्या, घोडतोंड्या, इ० शब्दांचे अनुरूप वक्रमन्यः, एकाक्षः किंवा एकनयनः, अश्वतुंडः,

इत्यादि बहुव्रीहि समास संस्कृतांत होतात; म्हणजे ह्या संस्कृत बहुव्रीहि समासघटित विशेषणांचें पुल्लिंगी सविसर्ग अकारान्त असतें. आतां सविसर्ग अकारान्त पुल्लिंगाचे जागीं मराठींत आकारान्त पुल्लिंगी रूप होतें, हें याच ग्रथांत पूर्वी एक दोन ठिकाणीं सांगितलेंच आहे. जसें:—बालः–बाळा, रामः–रामा, दंतः–दांता, इ०. ह्याप्रमाणें वरील वादविषयक शब्दांचीं संस्कृतास अनुसरून पुल्लिंगी बहुव्रीहिरूपें वांकडमाना, एकडोळा, घोडतोंडा, अशीं व्हावीं; पण मराठींत या अन्त्य आचे जागीं या येउन वांकडमान्या, एकडोळ्या, घोडतोंड्या, अशीं बहुव्रीहि समासाचीं पुल्लिंगी रूपें होतात; आणि देशपांड्या, वाघमान्या, इ० शब्दांचीं जशीं देशपांडी, वाघमारी, इ० स्त्रीलिंगी व वाघमारें, इ० नपुंसकलिंगी रूपें होतात, त्याचप्रमाणें प्रकृत शब्दांचीं वांकडमानी, एकडोळी, घोडतोंडी, इ० स्त्रीलिंगी ईकारान्त व वांकडमानें एकडोळें, इ० नपुंसकलिंगी एकारान्त रूपें होतात. म्हणून वादविषयक शब्दांतील अन्त्य या हा तद्धित प्रत्यय न समजतां, जसा संस्कृतामध्यें कांहीं ( नपुंसक, व्यूढोरस्क, गतवयस्क इ० ) बहुव्रीहि समासांत समाससूचक अन्त्य क आढळतो तसा मराठीमध्यें प्रकृत शब्दांतील या हा बहुव्रीहिसमासद्योतक एक चिह्न होय असें समजणें चांगलें. मात्र या ह्या चिह्नाचे पूर्वी द्वितीयपदांतील अन्त्य स्वराचा लोप होतो.

( इ ) वरील चर्चेमधील तत्वांस अनुसरूनच तिकोन, तिधारी, चौसोपी, इ० समासांसही तद्धित न समजतां आम्ही संख्यापूर्वपद बहुव्रीहि म्हटलें आहे. कारण उघडच आहे. एक तर तिकोन, चौसोपी, इ० समास कल्पित व चमत्कारिक होत; आणि दुसरें तीन कोन, तीन धार, चार सोपे, ह्यांस समास हें नांव कोणी देत नाहीं. व तें देण्याची कांहीं जरूर नाहीं, तेव्हां ह्या शब्दांतील अन्त्य ई सुद्धां बहुव्रीहीचें चिह्न होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. ह्याचे पूर्वीही द्वितीय पदांतील अन्त्य स्वराचा लोप होतो. ]

पुष्कळ संस्कृत समास मराठींत प्रचारांत आहेत. म्हणून आतां संस्कृत समासाचे कांहीं विशेष सांगतों. आणि नंतर मराठी समासांचे कांहीं विशेष सांगू.

## संस्कृत समासविशेष.

४५१. विशेषणांचा ज्याप्रमाणें क्रियाविशेषणांप्रमाणें उपयोग होतो, त्याप्रमाणें कांहीं बहुव्रीहि समासांचाही अव्ययीभाव समासाप्रमाणें उपयोग होतो. जसें:—विनयपूर्वक, प्रमाणपूर्वक, सविनय, सोत्कंठ, सादर, इ०.

४५२. तत्पुरुष समाससंबंधानें पुढील विशेष व अनियमित प्रकार लक्षांत ठेवण्यासारखे आहेत.

(अ) अहन् शब्द अंतीं असतां कांहीं समासांत त्याचे अह्न असें रूप होतें जसें:—अपराह्ण, पूर्वाह्ण, मध्याह्न, इ०.

(आ) राजन्, शब्दांतील अन्त्य व्यंजनाचा लोप होतो. जसें:—आंग्लराज, पांचालराज, राजकुमार राजाज्ञा, इ०.

(इ) ज्यावेळीं या समासांतील पहिलें पद सर्वनाम असतें त्यावेळीं निरनिराळ्या सर्वनामांचीं रूपें होतात. तीं पुढें दिल्याप्रमाणें:—

| मराठी. | संस्कृत. | विकृतरूप. | उदाहरण. |
|---|---|---|---|
| मी | अहम् | मत् | मन्मन, मदुद्धरण, मद्गुण, इ०. |
| आम्ही | वयम् | अस्मत | अस्मद्भाग्य, अस्मद्धेतु इ०. |
| तूं | त्वम् | त्वत् | त्वद्गुण, त्वल्लीला, त्वद्रूप, इ० |
| तुम्ही | यूयम् | युष्मत् | युष्मच्चरण युष्मत्कीर्ति, इ. |
| | भवान् | भवत् | भवत्स्तुति, भवच्चरण, इ. |
| तो, ती, तें ते, त्या, तीं | तद् (प्रातिपादिक) | तत् | तद्रूप, तद्गुण, तच्चरित, इ० |
| हा, हीं हें हे, ह्या, हीं | एतद् (प्रातिपदिक) | एतत् | एतन्नाम, एतत्स्वरूप, एतद्देशीय, इ०. |
| जो, जी, जें जे ज्या, जीं | यद् (प्रातिपदिक) | यत् | यच्छित |

(ई) आत्मन शब्द प्रथम पद असतां अन्त्य व्यंचनाचा लोप होतो. जसें:—आत्मविचार, आत्मास्वरूप, आत्मदोष, इ०.

टीप—आत्मन या सर्वनामाबद्दल निज आणि स्व ह्या शब्दांचा उपयोग फार होतो. जसें:—स्वदोष, स्वगुण, निरपराध, निजकार्य, इ०

(ऊ) कधीं कधीं तत्पुरुष समासांतील प्रधान शब्द प्रथमही येतो. जसें:—पूर्वकार्य (कायाचें म्हणजे शरीराचें पूर्व म्हणजे पुढला भाग), मध्याह्न (अह्नः म्हणजे दिवसाचें मध्य), राजहंस (हंसांचा राजा),

उत्तमर्ण ( ऋणानीं, ऋण देण्यांत उत्तम; सावकार ), अधमर्ण ( ऋणानीं, उसनें परत देण्यांत अधम कर्जदार ) इ०.

( ऊ ) अन्नन्त व इन्नन्त संस्कृत शब्द मराठींत आकारान्त व ईकारान्त होतात. म्हणजे ह्यांचें प्रथमेचें एकवचन मराठींत प्रचारांत आहे. त्यासंबंधानें असें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं ते शब्द तत्पुरुषसमासांत प्रथम स्थानीं आले असतां त्यांतील अन्त्य व्यंजन उडून जातें, किंवा मराठी शब्दाचे, म्हणजे त्याच्या प्रथमेच्या एकवचनाचे, संबंधानें बोललें असत आकारान्त शब्द अकारान्त होतात आणि दीर्घ ईकारान्त शब्द ऱ्हस्व इकारान्त होतात. जसें:—राजपुरुष, राजदंड, राजमार्ग, हस्तिदंत, प्राणिमत्सर, प्राणिवध, प्राणिसंहार, इ०.

( ऌ ) विद्वान्, भगवान्, श्रीमान्, इ० जे संस्कृत शब्द मराठींत प्रचारांत आहेत त्यांचीं मूळ रूपें विद्वस्, भगवत्, श्रीमत्, इ० आहेत. समासामध्यें हीं मूळ रूपें येतात. जसें:—विद्वज्जन, भगवद्भक्त, श्रीमद्भागवत, श्रीमच्छंकराचार्य, विद्वद्रत्न इ०.

( ए ) अनियमितः—वाचस्पति, रात्रिंचर, बलाहक, ( वारीणां वाहकः—जलाचा वाहक—मेघ ), पिशाच ( पिशितप्राशन करणारे ), बृहस्पति, वनस्पति, प्रायश्चित्त, इ०.

४५३. कर्मधारय समासासंबंधानें संस्कृत व्याकरणांतील पुढील गोष्टी मराठींमध्यें संस्मरणीय आहेत.

( अ ) महत् शब्दाचें महा असें रूप होतें. जसें:—महाराज, महादशा, महादेव, महाकाव्य, महापूजा, महालक्ष्मी, इ०.

अपवाद—महदंतर, महदुपकार, महत्कार्य.

( आ ) अन्नन्त शब्द द्वितीयस्थानीं असल्यास अन्त्य नकाराचा प्रायः लोप होतो. जसें—महाराज, महोक्ष ( मोठा बैल ).

( इ ) रात्रि शब्द समासान्तीं अकारान्त होतो. जसें—पूर्वरात्र, अपरात्र.

( ई ) कु ह्या बदल कांहीं उदाहरणांत आरंभीं कत्, कव, आणि का, हीं, येतात. जसें:—कदन्न, कदुष्ण, कवोष्ण, कापुरुष.

४५४. बहुव्रीहि समासाचे खालील विशेष मराठींमध्यें महत्त्वाचे आहेत.

( अ ) महत् बद्दल प्रारंभीं प्रायः महा येतें. जसें:—महाबल ( मोठें आहे बल ज्याचें ), महाकाय. ).

अपवाद—महद्भूत, ( मोठा झालेला जो तो )

( आ ) सहबद्दलः प्रायः स आणि समान बद्दल क्वचित् स समासारंभीं येतो. जसें—सादर, सविस्मय, इ० आणि सवर्ण, सजाति, सरूप, इ०.

( इ ) अक्षि ( डोळा ), सखि, ( मित्र ), इत्यादि कांहीं इकारान्त शब्द समासान्तीं अकारान्त होतात. जसें:—राजीवाक्ष, मरुत्सख, पद्म-नाभ ( पद्म आहे नाभींत ज्याच्या तो विष्णु ).

( ई ) अन्नन्त शब्द समासांतीं असतां अन्त्य नकाराचा प्रायः लोप होतो. जसें:—मनुष्यजन्मा, शरजन्मा, शेषशायी, इ०.

( उ ) समासान्तीं जाया ( स्त्री ) या शब्दाबद्दल जानि असें येतें. जसें:—जानकीजानि ( राम ) मगधभूजानि, रेवतीजानि, इ०.

( ऊ ) कांहीं समासांचे अंतीं क हें अक्षर लागतें. जसें:—रोग-मूलक, पापमूलक, अल्पवयस्क, समवयस्क, ईश्वरकर्तृक इ०.

( ऋ ) अनियमितः— द्वीप ( ज्याच्या दोहोंकडून पाणी आहे तें—बेट ), अंतरीप ( बेट ) समीप ( पाण्याबराबर, जवळ ), अधिज्यधन्वा, शतधन्वा, सपत्नी ( समान पति आहे जिचा ती ), सुगंधि, सुदती ( चांगले दांत आहेत जिला ती ).

४५५. द्वंद्व समासाचीं पुढील उदाहरणें मनन करण्यास योग्य आहेत.

( अ ) कांहीं ठिकाणीं प्रथम पदांतील अन्त्य स्वर दीर्घ होतो. जसें:—मित्रावरुणौ, सूर्याचंद्रमसौ, अग्नीषोमौ.

( आ ) अनियमितः—माता + पिता = मातापितरौ, पितरौ, मातरपितरौ; जाया + पति = दंपती, जंपती, जायापती; अन्य + अन्य = अन्योन्य; पर + पर = परस्पर; स्त्री + पुमान् = स्त्रीपुंसौ; द्यौः + पृथिवी = द्यावापृथिव्यौ, दिवस्पृथिव्यौ; त्याचप्रमाणें द्यावाभूमी द्यावाक्षमे, छत्र + उपानह = छत्रोपानहम् ( समाहारद्वंद्व ), अहन् + रात्रि = अहोरात्र, दिवसरात्र, रात्रौ + दिवा = रात्रिन्दिवम् ( म० रात्रंदिवस ), इ०

टीप—अहोरात्र, दिवसरात्र, रात्रंदिवस ह्यांचा मराठींत बहुधा क्रियाविशेषणांप्रमाणें उपयोग होतो. त्याप्रमाणेंच चंद्रदिवाकरौ हा द्वंद्व समास आहे. त्याचा स्वतंत्र उपयोग मराठींत नाहीं. पण 'यावच्चंद्रदिवाकरौ' या वाक्यांगाचा क्रियाविशेषणाप्रमाणें उपयोग होतो.

## मराठी समासविशेष.

४५६. मराठींतील अव्ययीभाव समासाचें साधारण स्वरूप वर आलेंच आहे. त्याशिवाय आणखी कांहीं अनियमित उदाहरणें आढळतात. तीं अशीं:—

(अ) नामाच्या सामान्यरूपास गणीक किंवा गणीत हा शब्द लागून 'त्या नामानें दाखविल्या जाणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला' या अर्थी कांहीं समास होतात. जसें:—वृक्षागणीक किंवा वृक्षागणीत, (प्रत्येक वृक्षाला), गृहागणिक, माणसागणीक, खेपेगणीत, रोमागणीक, रोमागणीत, इ०.

टीप—या उदाहरणांमध्यें येणारा गणीक किंवा गणीत शब्द गण धातूपासून झालेलें कृदन्त असून त्याचा शब्दयोगी अव्ययाप्रमाणें उपयोग झाला आहे. गणीक किंवा गणीत यास एक शब्दयोगी अव्ययही म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. तथापि दरवर्ष, प्रतिवर्ष, इत्यादि शब्दांत जसा प्रत्येक व्यक्तीचा पृथक्त्वानें निर्देश होत आहे, त्याचप्रमाणें प्रकृत शब्दांत गर्भितार्थ असल्यामुळें यांस अव्ययीभाव समास म्हटलें आहे. बाकी गणीक किंवा गणीत ह्यास प्रकृत शब्दांत केवळ शब्दयोगी अव्यय असें म्हणणें व्याकरणदृष्ट्या अधिक प्रशस्त आहे.

(आ) भारंभार, अपरंपार, वारंवार, हे अनियमित आहेत.

(इ) हातोहात, रातोरात, हातोहातीं, हे शब्द घटनादृष्ट्या गांवोगांव, घरोघर, इ० अव्ययीभाव समासाचीं जीं मराठी उदाहरणें अंक ४२८ मध्यें दिलीं आहेत त्यांच्या सारखेच आहेत. परंतु अर्थदृष्ट्या मात्र भिन्न आहेत. हातोहात किंवा हातोहातीं म्हणजे प्रत्येक हातांत आणि रातोरात म्हणजे प्रत्येक रात्रीं असा अर्थ नाहीं, तर पहिल्याचा अर्थ एका हातांतून दुसऱ्या हातांत, जलदीनें, चलाखीनें, आणि दुसऱ्याचा अर्थ चालू रात्र संपण्यापूर्वीं असा आहे हें स्मरणीय आहे. तसेंच, आपाप, आपोआप, हे शब्दही घटनादृष्ट्या तसेच पण अर्थदृष्ट्या भिन्न आहेत. आपाप किंवा आपोआप म्हणजे आपल्या आपण, स्वतःच.

( ई ). दिवसाढवळ्या हा शब्द विशेषणोत्तरपद असून क्रियाविशेषणाप्रमाणें उपयोगांत आहे. त्याचा अर्थ ढवळ्या दिवसा म्हणजे भर दिवसास अथवा भर दोनप्रहरीं असा आहे. तेव्हां यासही एका अनियमित अव्ययीभाव समासाचें उदाहरण म्हणण्यास हरकत नाहीं. अशाच प्रकारचा, घरबसल्या, हा अनियमित अव्ययीभाव समास होय.

४५७. तत्पुरुष ( व्यधिकरण म्हणजे मर्यादित अर्थाचा तत्पुरुष ) समासाचे पुढील विशेष मराठींत आढळतात.

( अ ) घोडा, कुतरा, राजा, आंबा, डोळा, गळा, चुना, कांकडा, इ० आकारान्त पुल्लिंगी शब्द तत्पुरुषाचे प्रथमपदीं आले असतां आकारान्त होतात. उदाहरणें:—घोडनवरा, घोडदौड, कुतरओढ, राजवाडा, राजदरबार, आंबराई, आंबरस, डोळढापें, गळफांस, गळपट्टी, गळसर, गळसरी, चुनखडी, चुनकळी, कांकडआरती, नगारखाना, इ०.

डोळढापें, गळसर, गळसरी व कांकडआरती ह्यांची डोळेढापें, गळेसर, गळेसरी, व कांकडेआरती, अशींही रूपें आढळतात.

अपवाद—घोडागाडी.

( आ ) कांहीं तत्पुरुष समासांत वरील व इतर अनेक आकारान्त पुल्लिंगी शब्दांचें अनेकवचन प्रथम स्थानीं आलेलें आढळतें. त्यांस मराठी अलुक् समास म्हणण्यास हरकत नाहीं. पण कोणास तें नांव आवडत नसल्यास त्यांस तत्पुरुषाचीं अनियमित उदाहरणें समजावें. जसें:—घोडेवाट, घोडेराऊत, डोळेफोड, डोडेझांक, गळेकापू, गाडेवाट, गाडेउतार, सोंटेपान्हवण, कोहळेपाक, भोंपळेपाक, आरसेमहाल, कांटेझाड, कांटेधोतरा, कांटेरिंगणी, कांटेलगाम, माथेफिरू, खिसेकातरू, कज्जेदलाल, खडेफोड, कोल्हेकुई, गळेलठ्ठ किंवा गलेलठ्ठ, इ०.

गाडेउतार ह्या रूपाबराबर गाडीउतार असेंही रूप येतें. याच प्रकारचीं मळेकरी, वांटेकरी, पहारेकरी, इ० उदाहरणें अंक ४३८ मध्यें आलीं आहेतच.

अनियमितः—डोकेफोड, आलेपाक, ओझेकरी, खातेवही, खातेबाकी, हे शब्द डोळफोड, कोहळेपाक, वांटेकरी, ह्या शब्दांप्रमाणेंच दिसतात.

ह्यांत फरक इतकाच कीं, प्रकृत अनियमित उदाहरणांतील प्रथम पदें नपुंसक लिंगी असून त्यांच्या मूळ रूपांतील फक्त अन्त्य बिंदु उडाला आहे.

टीप—चुनेगच्ची, चेहेरेपट्टी, माथेशूळ, इ० कांहीं ठिकाणीं चुना, चेहरा, माथा इ० शब्दांचीं प्रथम स्थानीं चुनें, चेहेरे, माथें, हीं अनेकवचनें आहेत असें वाटतें. पण (प्रकृती स्थळीं) ही अनेकवचनें होत, असें म्हणण्यांत कांहीं विशेष अर्थगौरव दिसत नाहीं, तेव्हां वरील सामासिक शब्दांत चुना, चेहरा, माथा, इ० आद्य पदांचे अन्त्यास केवळ एकारादेश झाला आहे असें म्हणावें हें बरें.

(इ) साळी, चिमणी, मेथी, माती, चोळी, पाणी, लोणी, इ० कांहीं ईकारान्त शब्द तत्पुरुषामध्यें प्रथम स्थानीं अकारान्त होतात. उदा०:—साळवाडा, चिमणवाडा, चिमणसाळ, मेथकूट, किंवा मेतकूट, मातकण, मातकाम, मातखाण, चोळखण, पाणउतार, पाणदोरी, पाणदिवड, पाण-चूल, पाणकोंबडा, पाणमोटली, लोणकाप्या, लोणकढें, इ०

(ई) वाळू, गुरूं, लेकरूं, इ० कांहीं शब्द सुद्धां तत्पुरुष समासांत प्रथम स्थानीं अकारान्त होतात. जसें:—वाळदाणी, गुरुचरण, गुरुचराई, लेंकुरस्वभाव, गुराखी.

टीप—लेंकुरस्वभाव या उदाहरणामध्यें लेंकरूं शब्दाच्या अन्त्य स्वरांतील फरकाशिवाय आणखी उपान्त्य अक्षरामधील अ चे जागीं उकार आला आहे. आणि गुराखी हेंही उदाहरण स्मरणीय आहे. गुरूं + राखी (राखणें या धातुपासून झालेलें स्वतंत्र कृदन्त) + गुरराखी असें प्रकृत नियमाप्रमाणें रूप व्हावयाचें; परंतु र ह्याचे पुढें रकार आल्यामुळें उच्चारसौकर्यासाठीं मागील र चा लोप होऊन गुराखी हें रूप सिद्ध होतें.

(उ) मिरें व सोनें हे शब्दही तत्पुरुषांत प्रथम स्थानीं अकारान्त होतात—जसें:—मिरपूड, सोनचाफा, सोनकिडा, सोनपितळ, सोनखत.

टीप १—सोनामुखीं (सं० सुवर्णामुखी) या ठिकाणीं सोनें शब्दाचें आकारान्त रूप आढळतें. सोना हें सुवर्ण शब्दाचें हिंदी रूप आहे.

टीप २—या नियमास अनुसरून अलीकडील प्रचारांत एक घेडगुजरी शब्द साधला आहे. शिसपेनसिल किंवा शिसपेन या ठिकाणीं शिसें शब्दापुढें इंग्रजी शब्द येऊन समास झाला आहे, व त्यांत प्रथमपद अकारान्त झालें आहे.

(ऊ) वरोपचार (वरचा उपचार) ह्या समासांत वर हें नामाप्रमाणें उपयोगांत आहे.

( ऋ ) मनदेवता, मनलज्जा, मनकामना, इ० कांहीं उदाहरणांत दोन्ही शब्द संस्कृत असून मराठीप्रमाणें समास झाला आहे. कारण उघडच आहे कीं मन शब्द मराठींत विशेष परिचयाचा असल्यामुळें त्याचें संस्कृतत्व समासांत लुप्त झालें आहे. संस्कृत नियमाप्रमाणें त्यांची मनोदेवता, मनोलज्जा, अशीं रूपें होतात हें तज्ज्ञांस स्मरेलच.

( ऌ ) उपपद समासामध्यें ज्याप्रमाणें दुसरें स्थानीं अस्वतंत्र कृदन्त म्हणजे स्वतंत्रपणें उपयोगांत नसणारें कृदन्त येतें, त्याप्रमाणें तत्पुरुष समासांत अस्वतंत्र कृदन्त आरंभीं असणारे कांहीं सामासिक शब्द मराठींत आढळतात. असा प्रकार संस्कृतांत नाहीं. हा मराठीचाच विशेष आहे. यांतील अस्वतंत्र कृदन्तें हीं दिसण्यामध्यें केवळ मूळ धातूंचीच रूपें असतात. तेव्हां या प्रकारच्या तत्पुरुष समासास धातुपूर्वपद तत्पुरुष असें म्हणण्यास हरकत नाहीं. उदा:—कोंडवाडा, ( चुकार व त्रासदायक गुरें वगैरे कोंडावयाचा वाडा ), कोंडमारा ( कोंडण्यामुळें होणारा मारा ), सोडचिठ्ठी ( बायको, नोकर वगैरे सोडावयाची चिठ्ठी ), सोडपत्र, सोडमुंज, सांडपाणी [ सांडलेलें पाणी ], बसफुगडी ( बसल्या बसल्या घालावयाची फुगडी ), सरगांठ ( सरणारी गांठ ), सरकपडदा, जोडाक्षर, जोडनळी, जोडबंद, पडजीभ, काढशह ( कोणतेंही बुदबळ बाजूस काढून दिलेला शह ), पडकेश, चीरकाम [ चिरण्याचें काम ), खोदकाम, तासकाम, सांगकाम, इ०.

( ए ) या समासाचे प्रथम स्थानीं आपण शब्दाचें आप होतें.जसें:—आपसुख, आपमतलब, आपस्वार्थ.

[ ऐ ] पोटदुखी या समासांत अन्त्य ई संवय दाखविणारी दिसते. अर्धशिशी, यामध्येंही अन्त्य ई तशीच आहे. शिवाय अर्धशिशी या शब्दांत दु:ख हा जो अर्थ आहे, त्यांतील दु:खार्थवाचक शब्दाचा लोप आहे. म्हणून हा लुप्तपद तत्पुरुष समास होय.

( ऐ ) अनियमित:—सासुरवाड ( सासरा + वाडी ) सासुरवास सासरें + वास , सासुरवाशिण, भावजय, ( भाऊ + जाया ), इ०

४५८. कर्मधारय समासाचे मराठींतील विशेष येणेंप्रमाणें::—

( अ ) जीं आकारान्त विशेषणें कर्मधारयाचे प्रथम स्थानीं येतात तीं

त्या वेळीं अकारान्त होतात. मात्र अशीं कृदन्तेतर विशेषणें फारच थोडीं आहेत. आकारान्त कृतन्त विशेषणेंच अकारान्त झालेलीं बरींच आढळतात उदा०:—काळमांजर, तांबडमाती, अर्धमेला, अर्धकच्चा, पढतमूर्ख, उडतराऊत, कढतपाणी, उडतबातमी, मरतमढें, उपजतबुद्धि, उपजतस्वभाव, इ०.

टीप:—अखेरच्या उदाहरणांसंबंधानें थोडा मतभेद होण्याचा संभव आहे. पढतमूर्ख, रडतराऊत, इ० शब्दांत पढत, रडत, अशीं अकारान्त कृदन्तेंच आहेत असें कोणास वाटण्याचा संभव आहे. परंतु तो बरोबर दिसत नाहीं कारण कीं पढत, रडत, इ० अकारान्त कृदन्तांचा विशेषणाप्रमाणें उपयोग झालेला आढळत नाहीं तर हें कृदन्त केवळ अव्यय आहे. पढता, रडता, असें जें आकारान्त कृदन्त तें मात्र विशेषणरूप आहे. तेव्हां त्या आकारान्त कृदन्त विशेषणाचेंच प्रकृत समसांत प्रथम स्थानीं अकारान्तरूप होतें असें म्हणणें हें व्यवस्थेशीर व सुयुक्तिक दिसतें. शिवाय रडता राऊत, कढतें पाणी, इ० प्रयोग प्रचलित आहेत. आतां कांहीं ठिकाणीं ह्या विशेषणांचा उपयोग चमत्कारिक दिसतो हें खरें. उपजतबुद्धि अशा सारख्या उदाहरणांत उपजती म्हणजे ‘ उपजण्याचे वेळची ’ अथवा उपजण्याचे वेळेपासून असणारी असा अर्थ केला पाहिजे, हें उघड आहे. तथापि जाती वेळ लाभता काळ, चालताकाळ, पडती दशा, इत्यादि जे प्रयोग मराठींत प्रचलित आहेत, त्यांमध्येंही या विशेषणांचा असा उपयोग आढळतो. म्हणजे जाणारी, लाभता म्हणजे लाभणारा ही विशेषणें वास्तविक म्हटलें म्हणजे वेळ किंवा काळ यास मूळ अर्थानें लागणारीं नाहींत; तर तीं मूळ अर्थानें संपत्ति किंवा पैसा अशा सारख्या विशेष्णांस योग्य रीतीनें लागतात. तथापि तीं प्रकृतस्थळीं एका प्रकारच्या लक्षणेनें दुसऱ्याच विशेणांस लावण्यांत आलीं आहेत. अशा प्रकारच्या विशेषणांस transferred epithets संक्रान्त विशेषणें असें म्हणतात. उपजणारी हें मुलास लागतें हें यथार्थ आहे; तरी त्याचा संक्रान्त विशेषणासारखा उपयोग होण्यास हरकत नाहीं. या दृष्टीनें पढत, रडत कढत, उपजत, इ० वादविषयक समासांतील प्रथम पदें मूळ आकारान्त कृदन्तांचीं समसांतर्गत अकारान्त रूपें होत आणि म्हणूनच पढतमूर्ख, रडतराऊत, इ० शब्द वरील नियमाचीं योग्य उदाहरणें होत हें उघड आहे.

अपवाद:—भोळानाथ, सावळाराम, गोराराम, काळाराम.

( आ ) कमी शब्द कमजास्त या ठिकाणीं अकारान्त होतो; परंतु कमीअधिक या उदाहरणांत अविकृतच असतो.

[ इ ] नातें दाखविणारे शब्द लुप्तपद कर्मधारय समासांत शरीर-संबंधवाचक उदाहरणांत प्रथम स्थानीं आले असतां: त्यांस जे विकार होतात ते येणेंप्रमाणें:——

| नातें दाखविणारे मूळ शब्द. | विकृत रूप. | सामासिक उदाहरणें. |
|---|---|---|
| चुलता | चुलत | चुलतभाऊ, चुलतसासरा चुलतचुलती, इ०. |
| मामा | मामे | मामेबहीण, मामेसासू, इ०. |
| आत, आते | आत | आतेभाऊ, आतेसासरा इ,०. |
| मावशी | माऊस, मावस (क्र०) | माऊसभाऊ, माऊससासू, मावसबहीण, इ०. |
| आजा, आजी | आजे | आजेसासरा, आजेचीर, आजे-गुरु, इ०. |
| नातू, नात | नात | नातजांवई, नातसून. |
| पणतू, पणती | पणत | पणतसासरा, पणतसासू, पण-तसून, पणतजांवई, इ०. |
| भाचा, भाची | भाचे अ० भाच | भाचेजांवई, भाचेसासू, भाच-जांवई, भाचसून, इ०. |
| पणजा, पणजी | पणजे | पणजेसासू, पणजेसासरा, इ०. |
| साडू | साड | साडभाऊ (ह्याचा अर्थ साडू ह्याच, साड् म्हणून भाऊ ). |

( ई ) लुप्तपद कर्मधारयाचे कांहीं मराठी उदाहरणांत प्रथम पदाचें अनेकवचनही आढळतें. जसें:—बटाटेभात, वांगींभात, तोंडलींभात, वांगींपोहे, तोंडलींपोहे, कांदेपोहे, इ.

( उ ) कर्मधारय समासाचे विशेषणोत्तरपद, विशेषणोभयपद, आणि उपमानपूर्वपद असे प्रकार पूर्वीं सांगितलेच आहेत. ह्या प्रकारांत येणारीं कांहीं मराठी उदाहरणें आहेत. विशेषणानें दाखविल्या जाणाऱ्या गुणाचें आधिक्य किंवा अतिशयत्व दाखवावयाचें असतां त्या विशेषणाची पुनरुक्ति करून किंवा त्याचेपुढें तशाच प्रकारचें दुसरें विशेषण लावून किंवा त्याचे

पुढें उपमान—शब्दाची योजना होऊन अशा प्रकारचे शब्द बनतात. त्यांस सर्वत्र समास म्हणतां येत नाहींच. तथापि ते असेः—

आंबट—आंबटढाण, आंबटढसाण, आंबटचिंच.

टीपः—कधीं कधीं पहिल्या विशेषणाची द्विरुक्ति होऊन नंतर पुढील विशेषण किंवा उपमानशब्द येतो जसेंः आंबटआबटढाण, आंबटआंबट चिंच, इ॰. असेंच खालील स्थळींही समजावें.

कोरा—कोराकरकरीत.

कोरडा—ठणठणीत, कोरडाटांक, कोरडाखडखडीत.

कडू—कडूजहर, कडूवीख, कडूकवंडल, कडूकारलें, कडूकाजरा.

उघडा—उघडानागडा, उघडाबोडका, उघडाबंब, उघडाधोत.

कोंवळा—कोंवळा लुसलुशीत.

काळा—काळाठिक्कर, काळाकुळकुळीत, काळाढुस्स, काळामांग, काळाकोळसा, काळाकुट्ट, काळाकुट, काळाशिद्दी, काळाबेरड, काळाकोळी काळाढेंकूण, काळाढोण, काळीघूस.

गोरा—गोरापान, गोरांपीठ.

उभा—उभा तरतरीत, उभासोंट, उभातांठ.

गोड—गोडगोड साखर, गोडगोड दूध.

कढत—कढतकढत आग, कढतऊन,

तांबडा—तांबडालाल, तांबडाबुंद, तांबडाभडक.

निवळ—निवळशंख, निवळदूध.

निळा—निळानीळ.

पांढरा—पांढरासफेत, पांढराफटक, पांढराफेक, पांढराफटफटीत, पांढरेंदूध, पांढरें पीठ.

तिखट—तिखट झणझणीत, तिखट डोंब, तिखट आग.

पिंवळा—पिंवळा धमक, पिंवळा जरद, पिंवळें रांजण, पिंवळी हळद, पिंवळाजर्द, पिंवळा चटक, पिंवळा धमधमीत.

लाल—लाललाल, लालभडक, लालगुंद, लालबुंद, लालगुंज, लालजोत, लाललाल तोंडलें, लाललाल पोंवळें, लाललाल रगत, लाललाल आग.

सडा—सडासोंट, सडेसोंट.

सरळ---सरळसोट, सरळखांब.

हिरवा---हिरवागार, हिरवाचार, हिरवेंहिरवें गवत.

ओला---ओलाचिंब.

वाटोळा---वाटोळा गरगरीत, वाटोळादाणा, वाटोळागोळा, वाटोळागोटा.

लांब---लांबलचक.

जुना---जुनापुराणा, जुनापान्हा.

४५९. बहुव्रीहि समासाचे संबंधानें पुढील विशेष आढळण्यांत येतातः—

( अ ) जीं थोडीं आकारान्त नामें व विशेषणें समासांत प्रथम स्थानीं येतात तीं आकारान्त होतात. जसें:---घोडमुख्या, वांकडमान्या, पांढरपेशा.

टीप १---आपलपोट्या हा शब्द असाच ( आपला ह्या विशेषणार्थक षष्ट्यन्तरूपाचें आकारान्त स्वरूप प्रथम येऊन झाला आहे.

टीप २---या ठिकाणीं अन्त्य या हें अक्षर पूर्वी सांगितल्याप्रमाणें बहुव्रीहीचें द्योतक चिन्ह होय. पांढरपेशा या उदाहरणांत उच्चार विशेषास अनुसरून त्यांतील यकार लुप्त झाला आहे.

( आ ) धातुपूर्वपद म्हणून जो एक तत्पुरुषाचा मराठींतील विशेष प्रकार सांगितला त्याचप्रकारचा **धातुपूर्वपद बहुव्रीहि** समासही मराठींत क्वचित् आढळतो. जसें:---सांगकाम्या, रडतोंड्या.

( इ ) माती शब्द जरी तत्पुरुषामध्यें आद्य स्थानीं अकारान्त होतो तरी मातीमोल ( मातीचें मोल आहे ज्याला, मातीच्या किंमतीचा ) या उदाहरणांतील प्रथम पद अविकृत आहे. कवडीमोल यांतही प्रथम पद अविकृत आहे.

( ई ) कांहीं आकारान्त पुल्लिंगी नामांचें प्रथम पदीं अनेकवचन आलेलें आढळतें:---काटेतोल ( काट्यानें तोल झाला आहे ज्याचा, तंतोतंत, जोखलेलें ), आंबेमोहोर ( आंब्याच्या मोहोराप्रमाणें वास आहे ज्याला तो तांदुळांचा प्रकार; ह्या समासांत अन्त्य पद—वास—लुप्त आहे. )

( उ ) कमी शब्द प्रथम स्थानीं आकारान्त होतो. जसें:---कमजोर, कमकुवत, कमनशीब.

(ऊ) दक्षिणोत्तर (दक्षिणेकडून उत्तरेकडची लांबी वगैरे), पूर्व-पश्चिम, हे बहुव्रीहि समास मराठींत संस्मरणीय आहेत.

टीपः--या शब्दांचा ज्या वेळी क्रियाविशेषणाप्रमाणें उपयोग होतो, तेव्हां त्यांस अव्ययीभाव समास म्हणावे. जसेः--ती गादी दक्षिणोत्तर ( दक्षिणेकडून उत्तरेकडून-अर्थात लांबीच्या दृष्टीनें हें बोलणें आहे ) पसर.

(ऋ) शेंकडा, लाख, वगैरे संख्यावाचक शब्द, मण, खंडी, वगैरे मापवाचक शब्द, आणि महिना, वर्ष, वगैरे कालवाचक शब्द यांचा गणती या शब्दाशीं जेव्हां बहुव्रीहि समास होतो, तेव्हां त्या शब्दाचे अन्त्य स्वरास ओकारादेश होतो. जसेंः—शेंकडोगणती [ शेंकड्यांनीं गणती आहे ज्याची ], मणोगणती, खंडोगणती, महिनोगणती वर्षोगणती,इ०.

टीप—या शब्दांतील ओकार विकल्पानें बिंदुयुक्तही आढळतो. जसेंः—शेंकडोगणती किंवा शेंकडोंगणती, वर्षोगणती किंवा वर्षोंगणती, इ०

टीप २—वर्षोगणती, महिनोंगणती इ० कालवाचक सामासिक शद्बांचा क्रियाविशेषणाप्रमाणें उपयोग होतो तेव्हां त्यांस अव्ययीभाव समास समजावें जसेंः—तें काम वर्षोगणती ( अनेक वर्षे पर्यंत ) चाललें होतें

(ऌ) वजा ( अरबी—वजह्—तऱ्हा, प्रकार ) हा शब्द नामाचे पुढें येऊन कांहीं बहुव्रीहि समास मराठींत होतात. जसेंः—कुणब्रीवजा ( कुणब्याच्या वजेप्रमाणें वजा म्हणजे तऱ्हा आहे ज्याची ) मातीवजा, शिपाईवजा, ब्राह्मणवजा, इ०

टीप १---आकारान्त पुल्लिंगी नामापुढें वजा शब्द येऊन समास होतांनां त्याच्या अन्त्यास एकारादेश होतो म्हणजे त्याचें दिसण्यांत अनेकवचन होतें. जसेंः---खडेवजा, पत्रेवजा, सुताडेवजा, तमाशेवजा, तारेवजा, इ०.

टीप २—एकारान्त नपुंसकलिंगी नामांपुढें हा वजा शब्द आला असतां त्या नामांतील अन्त्य अनुनासिकाचा लोप होतो. जसेंः---सोनेवजा, रुपेवजा, घोंसाळेवजा, इ०.

टीप ३—वजा शब्दान्त बहुव्रीहि समास जरी आकारान्त विशेषणें आहेत, तरी तीं विशेष्याचे लिंगवचनाप्रमाणे विकार पावत नाहींत. जसेंः—सुताडेवजा लुगडें, सुताडेवजा पीतांबर, सुताडेवजा धोतरें, इ०.

(ए) सोनें याचे पुढें सळ हा शब्द येऊन सोनसळा असा बहुव्रीहि समास होतो. म्हणजे सोनें शब्द आद्य स्थानीं तत्पुरुषाप्रमाणेंच अकारान्त होतो, आणि एकंदर समास आकारान्त होतो. हा आकार बहुव्रीहि

समासद्योतक होय. सोनसळ [ सोन्याची सळ म्हणजे काडी ] हा समास तत्पुरुष आहे. परतु सोनसळा [ सोन्याची सळ आहे ज्यामध्यें ] हा बहुव्रीहि होय.

४६०. द्वंद्व समासाच्या मराठींतील विशेषांचें सविस्तर विवरण. पूर्वी आलेंच आहे. द्वंद्व समासांतील पदांचे क्रमासंबंधानें संस्कृत व मराठी या दोन्ही व्याकरणांत कांहीं नियम देण्याची पुरातन चाल दिसतें. ते फारसे पाळले जातात असें नाहीं; तर त्यांस अनेक अपवाद आढळतात. परंतु नवीन समास बनविण्याचे कामीं त्यांचा उपयोग होण्यासारखा आहे म्हणून ते येथें देतों. आणि म्हणूनच त्यांस नियम म्हणण्यापेक्षां सूचना म्हणणें बरें.

( अ ) वर्ण व जाति यांचीं नांवें उच्चनीचतेच्या क्रमानें यावीं.

( आ ) भावांच्या नांवांचा निर्देश ज्येष्ठकनिष्ठत्वाचे क्रमास अनुसरून असावा.

( इ ) कोणत्यहि प्रकारच्या नामांचा समास करावयाचा असतां त्याच्या प्रधानाप्रधानते कडे लक्ष पुरवून प्रधान नामास आद्य स्थान द्यावें व बाकीचीं त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें मागें पुढें बसवावीं.

( ई ) भिन्न लिंगांच्या नामांचा समास करतांनां पुल्लिंग, स्त्रीलिंग, व नपुंसकलिंग हा क्रम ठेवावा.

( उ ) आप्तेष्टांचीं नावें वय, मान, ममता, इत्यादि दृष्टींपैकीं कोणत्यातरी एका दृष्टीनें क्रमवार यावीं.

( ऊ ) आंखूड नांव प्रथम यावें लांब नांव नंतर यावें. ही सूचना प्रथम अमलांत आणून नंतर वरील सूचनाकडे होतां होईल तितकें लक्ष द्यावें.

द्वंद्व समासाचीं जीं अनेक उदाहरणें पूर्वी दिलीं आहेत, त्यांवरून वरील सूचनांस प्रचलित भाषेंत कितपत मान मिळत आहे हें विद्यार्थ्यांस समजेल. तथापि इतकें खरें कीं, भाषेस नीटनेटकें रूप द्यावयाचें असल्यास नवीन सामासिक शब्द घडवितांनां या सूचनांकडे लक्ष देणें इष्ट आहे.

## समासांसंबंधाच्या सर्व साधारण गोष्टी.

४६१ कांहीं समासांमध्यें संख्यावाचक किंवा गणनावाचक विशेषणें आद्य स्थानीं यावयाचीं असतां त्यांचीं विकृत रूपें होतात. त्यांपैकीं कांहीं पुढें देतों:—

| गणनावाचक. | विकृतरूप. | उदाहरण. |
|---|---|---|
| दोन | दु | दुघड, दुघडी, दुफळी, दुप्पट, इ०. |
| तीन | ति | तिफण, तिमजली, तिकोनी, |
| | तिर | तिरपगडें, तिरकाठी, तिरघेल. |
| चार | चौ, चव | चौघडी, चौताल, चौफळा, |
| | | चवकडा, चौकडा, चवकट, चौकट. |
| पांच | पंच | पंचक्रोशी पंचखाजें, पंचपाळें. |
| सहा | छ + | छदाम, छटांक, छकडी. |
| दहा | दस | दसकडी, दसनहाण, दसप्यादा. |
| बारा | बार | बारभाई, बारमास, बारमाह. |
| सोळा | सोळ | सोळन्हाण, सोळवंड. |

+ टीप—याचें छतार (सतार) असें एक जोशीबुवांनीं उदाहरण दिलें आहे. (प्रौढबोध. क० ३६५. पण तें अज्ञानमूलक आहे. सतार ह्या शब्दाचें मुळरूप जोशीबुवा समजतात त्याप्रमाणें छतार म्हणजे सहा तारांचें (वाद्य) असें नाहीं; तर सेतार (से म्हणजे फारसींत तीन, तेव्हां तीन तारांचें (वाद्य) असें आहे. यावरून, सतारीस प्रथम तीनच तारा लावीत असत, हा इतिहासही समजतो. हा शब्द अशा प्रकारें विशेष महत्त्वाचा असल्यामुळें छतार हा गैरसमज मुद्दाम घालवावा लागला.

४६२. एकाच समासांत येणारे सर्व शब्द एकाच भाषेंतून आलेले असावे. निरनिराळ्या भाषांतून आलेल्या शब्दांचा समास सहसा करूं नये. हा सामान्य नियम होय. परंतु यास अपवाद पुष्कळच येतात. जसें—शाळामास्तर, आगबोट, मनमुरार, दिवाबत्ती, तारमास्तर, डाकघर, पायाशुद्ध, इ०.

अशा प्रकारचीं अनेक उदाहरणें पूर्वी आलीं आहेत. ह्या संबंधानें इतकेंच लक्षांत ठेवावयाचें कीं असे समास जरूरीच्या वेळीं आपोआप अस्ति-

त्यांत येतात. इलाखाधिपति, शाळामास्तर, तारमास्तर, जिल्हासभा, पोस्टखर्च, रेल्वेभाडें, पैसाफंड, इ० जे अनेक शब्द नवीन परिस्थितीस अनुसरून अस्तित्वांत येऊन भाषेंत रूढ होतात, त्यांचा स्वीकार कांहीं झालें तरी केलाच पाहिजे. तथापि होतां होईल तों विजातीय म्हणजे निरनिराळ्या भाषांतून आलेल्या शब्दांचा समास न करणें हें भाषादृष्ट्या अधिक श्रेयस्कर आहे त्यांस संशय नाहीं.

४६३. कधीं कधीं एकच समास अर्थानुरोधानें अनेक प्रकारें सोडवावा लागतो, म्हणजे त्याचा निरनिराळ्या जागीं अर्थास अनुसरून निरनिराळा विग्रह करावा लागतो. जसें:—– त्रिनयन म्हणजे तीन डोळे असा अर्थ असतां त्रिनयन हा संख्यापूर्वपद कर्मधारय म्हणजे द्विगु समास होय. परंतु त्रिनयन म्हणजे तीन नयन आहेत ज्याला तो शंकर असा अर्थ असतां तो बहुव्रीहि समास होय. त्याचप्रमाणें सत्यव्रत ह्याचे तीन विग्रह शक्य आहेत. पहिला—सत्याचें व्रत, दुसरा—सत्य असें व्रत, आणि तिसरा—सत्य आहे व्रत ज्याचें. या विग्रहांस अनुसरून सत्य व्रत ह्यास अनुक्रमें तत्पुरुष, कर्मधारय, व बहुव्रीहि हीं नांवें दिलीं पाहिजेत. ह्यांपैकीं विशिष्ट स्थळीं त्याचा विग्रह कसा करावा व त्यास कोणतें नांव द्यावें हा प्रश्न मागल्या पुढल्या संबंधावरून ठरविला पाहिजे. ह्याच्या उलट कधीं कधीं असेंही होतें कीं, अर्थामध्यें फरक न होतां एकाच सामासिक शब्दाचे एकाच स्थळीं दोन विग्रह संभवतात. जसें:—–लक्ष्मीकांत म्हणजे लक्ष्मीचा कांत किंवा लक्ष्मी आहे कांता ज्याची. पहिल्या विग्रहास अनुसरून लक्ष्मीकांत हा तत्पुरुष समास होय; आणि दुसऱ्यास अनुसरून तो बहुव्रीहि होय. अशा ठिकाणीं दोन्ही विग्रह सारखेच ग्राह्य असल्यामुळें कोणताही विग्रह केला तरी हरकत नाहीं.

४६४. ज्या शब्दांचा समास करावयाचा असतो ते संधिनियमाप्रमाणें जोडले पाहिजेत. हा नियम संस्कृत सामासिक शब्दांत मात्र अवश्य पाळला पाहिजे व तो तसा पाळलेलाही आढळतो. मात्र मराठी काव्यामध्यें छंदास अनुसरून संधिरहित संस्कृत समासही कधीं कधीं आढळतात. तरी असा प्रकार केवळ गौणच होय. उदा०:—–स्वपदाब्जीं मन्मानसभृंग रमो उगउं दे **कृपा–अरुणा**—मोरोपंत. म्हणे उपहार करून उदकास देतां, तरी **निद्रा-आळस** येईल आतां—महीपति.

परंतु संस्कृतेतर सामासिक शब्दांत कधीं कधीं जरी संस्कृत नियमानुसार संधि झालेला आढळला, तरी बहुधा संधि झाल्याशिवाय समास होतो असें मागील शेंकडों उदाहरणांवरून कळून येईल. धुळाक्षर, जोडाक्षर, वरोपचार, इत्यादि कांहीं उदाहरणांत योग्य संधि झाला आहे. पण तोंड ओळख, गोडेउतार, बेअक्कल, नाउमेद, नेआण, चढउतार, पैसाअडका, कमीअधिक, अधिकउणा, इ० अनेक उदाहरणें संधिहीन आहेत हें उघड आहे. आणि अन्य कांहीं ठिकाणीं जर संधि झालेला आढळला तर तो बहुधा पररूप संधि होतो.

४६५. मराठीमध्यें अनेक शब्द असे आहेत कीं, ते जरी मूळ संस्कृत समासांपासून निघाले असल्यामुळें वास्तविक समास होत, तरी त्यांचें रूप इतकें छिन्नभिन्न झालेलें आहे कीं, मराठीमध्यें त्यांस आतां समास म्हणणेंही अडचणीचेंच झालें आहे. त्यांतील पदांची स्वतंत्र ओळख स्पष्टपणें होत नाहीं आणि त्यांचें सामासिकत्व केवळ संस्कृतानभिज्ञ मनुष्यास पटावयाचें नाहीं. ह्यामुळें त्यांचा तद्धित शब्दांमध्येंच अन्तर्भाव होणें रास्त आहे. उदाहरणार्थ, घंगाळ हा शब्द घ्या. हा मळ गंगा + आलय = गंगालय या संस्कृत शब्दा-पासून आला आहे. परंतु गंगा ह्याचें घंगा आणि आलय ह्याचें आळ असें विकृतरूप होऊन घंगाळ हा शब्द झाला आहे. त्याचप्रमाणें हिम-काल या पासून हिंवाळा हा शब्द झाला, पण हिंवाळा ह्या शब्दांत काल ह्याचा पत्ता संस्कृतानभिज्ञ मनुष्यास कसा लागावा! तेव्हां हिंव या शब्दास आळा हा प्रत्यय लागून हिंवाळा शब्द झाला आहे, असेंच मराठीचे दृष्टीनें म्हणणें चांगलें. तसेंच गंगा शब्दास आळ प्रत्यय लागून गंगाळ, घंगाळ, असे शब्द झाले असेंच म्हटलें पाहिजे.

---

## अध्याय ८.

### अभ्यस्त शब्द.

४६६. अभ्यस्त शब्द हा साधित शब्दांचा अखेरचा प्रकार होय. उपसर्गघटित, प्रत्ययघटित, आणि समासघटित, ह्या तीन प्रकारांचें विवेचन

येथपर्यंत झालें. अभ्यस्त शब्दांचा विचार या ग्रंथांत प्रसंगोपात्त थोडासा आलेलाच आहे. तथापि त्यांचें एकत्र व व्यवस्थित विवेचन होणें इष्ट आहे. म्हणून या अध्यायांत त्यांचें दिग्दर्शन करावयाचें आहे. ज्या-प्रमाणें समासांचें विवेचन जातिदृष्ट्या पूर्ण असतें त्याचप्रमाणें अभ्यस्त शब्दांच्या निरनिराळ्या जाति म्हणजे त्यांचे वेगळे वेगळे सांचे होतां होईल तों पूर्णपणें सांगावयाचें. उपसर्ग व प्रत्यय ह्यांचा ज्याप्रमाणें सविस्तर व्यक्तिशः संग्रह करण्याचा प्रयत्न केला आहे, त्याप्रमाणें अभ्यस्त शब्दांची यादी देण्याचा उद्देश नाहीं व तशी यादी अवश्यही नाहीं. म्हणून या अध्यायांत फार तर शब्दांचा अभ्यास म्हणजे पूर्णपणें द्विरुक्ति किंवा पुनरुल्लेख किंवा अंशतः पुनरुल्लेख कोणकोणत्या प्रकारें होतो आणि तो कोणकोणत्या अर्थीं होतो एवढेंच पहावयाचें आहे. या प्रकरणाचा दादोबांनीं आपल्या पूरणिकेंत बराच विस्तारपूर्वक विचार केला आहे. तथापि त्यांनीं ह्या शब्दांचें शास्त्रीयदृष्ट्या होतां होईल तितकें सुव्यवस्थित वर्गीकरण करण्याचा प्रयत्न केलेला दिसत नाहीं. हा अध्याय मुख्यतः पूरणिकेच्याच आधारानें लिहिला असून त्यांत तसें वर्गीकरण करण्याचा प्रयत्न केला आहे.

४६७. अभ्यस्त शब्दांचे मुख्य प्रकार तीन आहेत. **पूर्णाभ्यस्त, अंशाभ्यस्त** आणि **अनुकरणवाचक.**

४६८. जेव्हां एक सबंध शब्द लागोपाठ बहुधा दोनदां किंवा कधीं कधीं तीन चार वेळही उपयोगांत येतो, म्हणजे त्याचा तितक्यानदां लागोपाठ उल्लेख होतो, तेव्हां त्या अभ्यस्त शब्दास पूर्णाभ्यस्त म्हणतात. जसें:— घरघर, तोतोतो, इ०.

४६९. एका शब्दाचे मागें किंवा पुढें त्याच्याशीं एक दोन अक्षरांचें यमक जुळणारा किंवा निदान एकाद्या व्यंजनाचा अनुप्रास जुळणारा दुसरा शब्द जोडण्यांत येऊन जो एक शब्द तयार होतो, त्यास अंशा-भ्यस्त शब्द असें म्हणतात. या ठिकाणच्या मूळ शब्दाशीं यमक जुळणारा अथवा अनुप्रास जुळणारा जो नवीन शब्द त्याचे मागें किंवा पुढें येतो, तो प्रचलित भाषेंत रूढ नसला किंवा त्याला कांहीं अर्थ नसला तरी त्यास हरकत नाहीं. जसें:—दाणादुणा, लहानसहान, शेजारीपाजारी, इ०.

४७०. या जगांत जे अनेक ध्वनि ऐकूं येतात ते ध्वनि दाखविणारीं अव्ययें बहुधा दोनदां किंवा तिनदां लागोपाठ उच्चारून जे ध्वनिद्योतक शब्द तयार होतात, त्यांस अनुकरणवाचक शब्द असें म्हणतात. जसें:—कटकट, फटफटां, कडकडून इ०.

आतां या तीन प्रकारच्या शब्दांच्या पोटभेदांकडे वळूं.

टीप—अभ्यस्त शब्दांसंबंधानें एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ती अशी. सामासिक शब्द ज्याप्रमाणें, नामें, विशेषणें, किंवा अव्ययें असतात तरी त्यांचा साधनिकेच्या दृष्टीनें स्वतंत्रपणें विचार करितात, त्याचप्रमाणें अभ्यस्त शब्दांपैकीं बरेच शब्द सामासिक शब्द आहेत. तथापि साधनिकेच्या दृष्टीनें व स्वरूपाचे दृष्टीनें त्यांचा येथें स्वतंत्रपणें विचार करावयाचा आहे.

## पूर्णाभ्यस्त शब्द.

४७१. ह्या शब्दांचे अनेक प्रकार आढळतात. कधीं कधीं सबंध शब्द जसाचा तसा पुन्हा येऊन त्या दोहों मिळून एक शब्द होतो. आणि कधीं कधीं दोन उक्तीमध्यें एखादें अक्षर घुसतें. ह्या सर्वांचें आतां सोदाहरण निरूपण करूं.

४७२. नामांची पुनरुक्ति पुढील अर्थीं होते.

( १ ) नामानें दाखविल्या जाणाऱ्या वस्तूंचा पृथक् पृथक् निर्देश. उदाहरणें:—मी घरघर ( प्रत्येक घरीं ) हिंडलों, परंतु मला तो मुलगा आढळला नाहीं; कवडीकवडी, ( एक एक कवडी करून ) माया जोडी; गांवगांव, देशदेश, झाडझाड, इ०.

टीप १—या द्विरुक्त शब्दांचा नामांप्रमाणें व विशेषणांप्रमाणें उपयोग झाल्यास त्यांस कर्मधारय आणि क्रियाविशेषणांप्रमाणें उपयोग झाल्यास त्यांस अव्ययीभाव समास म्हणावें. जसें:—त्याणें घरघर तपासलें, रामानें रानरान हुडकिलें तो शिंपी बोटबोट कापड चोरितो, त्याचें काळिज तिळतिळ तुटतें, ती डबऱ्यांतून ओंजळ ओंजळ पाणी भरते, या उदाहरणांत घरघर आणि रानरान ( प्रत्येक घर आणि प्रत्येक रान या अर्थीं ) हे कर्मधारय समास होत; आणि बोटबोट ( बोटभर बोटभर, थोडथोडे ) आणि ओंजळओंजळ ( ओंजळीनें ओंजळीनें, आधीं एक ओंजळ नंतर दुसरी ओंजळ ह्याप्रमाणें ) व तीळतिळ ( थोडथोडें ) हीं क्रियाविशेषण अव्ययें असल्यामुळें अव्ययीभाव समासाचीं उदाहरणें होत.

टीप— २—ह्या शब्दांची गांवोगांव, देशोदेश, घरोघर, गांवोगांव, देशोदेशीं दिवसानदिवस, घरानघर, इ० रूपें आढळतात हें समासप्रकरणीं सांगितलेंच आहे तेथें पहावें.

( २ ) अतिशयता किंवा अतिशयार्थः— त्याणें त्याचे हालहाल ( फार हाल ) केले, मग तिला घामघाम ( फारच घाम ) फुटला, त्याची तेथें वाहवा वाहवा ( फार वाहवा ) झाली, इ०.

( ३ ) अन्योन्य संबंध, एकजातीयत्व, किंवा पृथक्त्व, ह्या अर्थीं दोन वस्तूंसंबंधानें पृथक्त्वानें बोलावयाचें असल्यास बहुवचनीं प्रयोग आढळतो; पण समुच्चयाचे दृष्टीनें बोलावयाचे असल्यास बहुवचनीं प्रयोग होतो; आणि दोहोंपेक्षां जास्त वस्तूंसंबंधानें बोलावयाचें असतां बहुवचनीं प्रयोग आढळतो. जसें:— बहिणबहिण ( परस्पर संबंध, पृथक्त्वानें दोन बहिणी ) मिळाली म्हणजे सासरच्या गोष्टी चालतात, सवतीसवती ( परस्पर संबंध, एकाच नवऱ्याच्या दोन किंवा अधिक बायका समुच्चयदृष्ट्या, ) बायकाबायका ( एकजातीयत्व, अनेक बायका ) मिळाल्या म्हणजे जसें कांहीं बाजार भरल्यासारखें होतें, त्यांतून आंबे आंबे ( एकजातित्व, अनेक आंबे ) निराळे काढ, इ०.

( ४ ) पृथक्त्वपूर्वक अनेक वस्तूंच्या समुच्चयाचा निर्देश; येथें सदोदित अनेकवचनींच प्रयोग होतो. जसें:—त्या शूरानें आपल्या तलवारीनें त्या दुष्टाचे तुकडे तुकडे केले, त्या मारानें त्याचीं हाडें हाडें अगदीं मऊ होऊन गेलीं, इ०.

( ५ ) अनुक्रम, सजातीयत्व, इ०—त्याणें त्या ग्रंथाचें पान पान किंवा प्रकरण प्रकरण चाळून पाहिलें इ०.

टीप १—पूर्णाभ्यस्त नामांस विभक्तिप्रत्यय लावण्याचे तीन प्रकार आहेत. पहिला—नामाच्या प्रत्येक उक्तीस प्रत्यय लावणें. जसें:—ब्राम्हणाला ब्राह्मणाला, पोरांना पारांनीं, माणसाचा माणसाचा, इ०. हे दुसरा—नामाच्या पहिल्या उक्तीचें सामान्यरूप करून फक्त दुसऱ्या उक्तीसच प्रत्यय लावणें, जसें:—भाऱ्या भाऱ्यानें, गुरागुराला, उवाउवांनीं, भांड्या भांड्यांत, इ०. हे दोन्ही प्रकार सर्व पूर्णाभ्यस्त नामांस सारखेच लागू पडतात. परंतु पुढील तिसरा प्रकार कांहींसच लागतो; इतरांस लागत नाहीं. तिसरा—पूर्णाभ्यस्त नामाच्या फक्त दुसऱ्या उक्तीसच विभक्तिप्रत्यय लागणें म्हणजे पहिली उक्ति निवळ अविकृत राहून संबंध शब्दाचे अंतीं विभक्तिप्रत्यय लागणें. जसें:—वाघवाघास, नदीनदीचा, लेंकलेंकाचा, जिभ—

जिभेला, रोगरोगानें, इ० हा प्रकार कोणत्याही आकारान्त आणि पुल्लिंगी व नपुंसकलिंगी ईकारान्त या नामांस मुळाच लागू पडत नाहीं. सोंवाल्यानें, जागाजागेंत, न्हावीन्हाव्यांत, लोणीलोण्याचा, इ० प्रयोग कधींच आढळत नाहींत. तेव्हां या सर्व शब्दांचा वरील दोन प्रकारांपैकीं कोणत्या तरी एका प्रकारानें विभक्तिप्रत्यय लाविले पाहिजेत. तसेंच शब्द वर्ज करून ज्या इतर अन्त्याचे शब्दांस हा प्रकार लागू होतो, त्यांपैकींसुद्धां द्व्यक्षरी शब्दांस तो लागू पडतो. अधिकाक्षरी शब्द कोणत्याही अन्त्याचे व कोणत्याही लिंगी जरी असले, तरी ते या तिसऱ्या प्रचारांत कधींही येत नाहींत. हे सर्व शब्द बहुधा दुसऱ्या प्रकाराप्रमाणें व क्वचित् पहिल्या प्रकाराप्रमाणें चालतात. जसें:—सोंट्यासोंट्यानें, जागाजागेंत, न्हाव्यान्हाव्यांत, लोण्यालोण्याचा, कुरणाकुरणाला, रजपुतारजपुतानें, इ०.

४७३. सर्वनामाची पुनरुक्ति नामाप्रमाणेंच समजावी. पुनरुक्त सर्वनामाचे अर्थ व उदाहरणें सर्वनामाचे अध्ययांत आलीं आहेतच, तेथें पहावीं.

४७४. विशेषणांचीही पुनरुक्ति विशेषणाध्यायांत आली आहेच. तथापि गुणवाचक विशेषणासंबंधाच्या कांहीं गोष्टी विशेषें करून सांगावयाच्या आहेत, त्या अशा:—

[ १ ] त्या त्या गुणांनीं युक्त वस्तूंचीं इतर तत्सदृश किंवा तद्वर्गीय वस्तूंतून निवड दाखविण्यासाठीं गुणवाचक विशेषणाची पुनरुक्ति होते. जसें:—ह्या भिकाऱ्यांपैकीं आंधळा आंधळा, लंगडालंगडा, अशांस मात्र भिक्षा घाल, ह्या लोकांपैकीं गोरेगोरे तितके इंग्रज आणि काळेकाळे तितके नीग्रो, इ०

[ २ ] एखाद्या गुणाचें उत्तरोत्तर म्हणजे क्रमाक्रमानें होणारें आधिक्य किंवा न्यूनत्व गुणविशेषणांचे पुनरुक्तीनें कधीं कधीं व्यक्त होतें. जसें:—वातावरण वरवर विरलविरल होत जातें, मुळाकडे उंस गोड गोड असतो, दिवसेंदिवस त्याचें दुखणें जडजड होत गेलें, इ०.

[ ३ ] कधीं कधीं परंपरा, पौनःपुन्य, आधिक्य, इत्यादि अर्थांची छटा गुणविशेषणांचे पुनरुक्तींत आढळते. जसें:—गोडगोड बोलून आपलें काम करून घेतो, या झाडावर मोठमोठे आंबे लागले आहेत, हें बारीकबारीक लिहिलेलें आहे, इ०.

[ ४ ] कोठें कोठें नुसतेंच गुणाधिक्य ध्वनित असतें. जसें:—हा रंग लाललाल आहे, ही कढी आंबटआंबट झाली आहे, आजचें ताक घण-घण आहे, इ०.

[ ५ ] कांहीं आकारान्त विशेषणांची पुनरुक्ति होतांना त्याच्या प्रथमोक्तींत तें विकल्पानें अकारान्त होतें. जसें:—थोडाथोडा, थोडथोडा, मोठामोठा, मोठमोठा; इ०.

[ ६ ] कधीं कधीं प्रथमोक्तीमध्यें त्र्यक्षरी शब्दाचे अन्त्याक्षराचा लोप होतो आणि उपान्त्याक्षर आकारान्त असल्यास तें अकारान्त होतें. जसें:—निरनिराळा, वेगवेगळा, भलभलते.

४७५. क्रियापदांची पुनरुक्ति पुढील अर्थीं होते:—

( १ ) पौन:पुन्य, आधिक्य, इ:—ते देतील देतील तर किती देतील; तो लिहितो लिहितो, पण अद्याप त्याचें अक्षर वळत नाहीं; तो गातोगातो तरी किती, इ०.

( २ ) संशय, अनिश्चय, वानवा:—मी जाईन जाईन म्हणतों, पण जाईन तेव्हां खरें; ते मुलीला सासरीं नेऊंनेऊं म्हणतात; केलेंकेलें, न केलें न केलें, असा त्याचा निष्काळजी स्वभाव आहे; इ०.

( ३ ) सातत्य:—बसावेंबसावें तरी कोठपर्यंत, तुम्ही चालतां चालतां तरी केव्हांपासून, आला आला प्राणि जन्मासि आला, गेला गेला बापुडा व्यर्थ गेला.

( ४ ) द्वितीय पुरुषीं आज्ञार्थीं क्रियापदांची पुनरुक्ति होते त्यावेळीं आदर, त्वरा, आग्रहपूर्वक, विनंति. अनादार इ० अर्थ सुचविले जातात. जसें: – घेईं घेईं माझे वाचे गोड नाम राघवाचें, भजभज भवजलधि-माजि मनुजा शिवाला, उलट उलट माघारा प्राण्या फिर गोते खाशी, जो जा हो चालता, इ०.

४७६. सहायक्रियापदांचे घटनेमध्यें उपयोगी पडणारीं कृदन्तें म्हणजे धातुसाधितेंही पुनरुक्त होतात. त्यांचे अर्थ बहुतेक वर दिलेल्या क्रिया-पदांच्या पुनरुक्तीसारखेच आहेत. बहुतेक सर्व प्रकारचीं उदाहरणें खालीं देतों: —

तो हंसतहंसत बोलतो, त्यानें आपला धडा चुकतचुकत म्हटला, तो उडतउडत चालतो, इ०.

तो मुलगा चालतांचालतां थकला, पाहतांपाहतां चाकू नाहींसा झाला, बोलतांबोलतां पहाट झाली, इ०.

मी त्याला सांगूनसांगून दमलों, मीं त्याला पढवूनपढवून पाहिलें, तो मार खाऊन खाऊन निगरगट्ट झाला आहे, इ०.

टीप—ह्या सर्व पुनरुक्त कृदन्तांमध्यें प्रथमोक्तीचे स्थानीं केवळ मूळ धातूही विकल्पानें आढळतो. जसें:—देखतदेखत किं० देखदेखत, पळतां पळतां किं० पळपळतां, जेवतां जेवतां किं० जेवजेवतां, मारूनमारून किं० मारमारून, तोडूनतोडून किं० तोडतोडून, इ०.

४७७. धातुसाधित नामें पुनरुक्त होतात तेव्हां त्यांस बहुधा पौनःपुन्य किंवा अतिशयत्व हाच अर्थ असतो. जसें:—खाणेंखाणें म्हणजे किती, बोलण्याबोलण्यांत तरी प्रकार असतात, माझी नुसती जाजा येथे झाली, त्याची सारखी देदे चालली आहे.

टीपः—अकारांत धातुसाधित नामांच्या पुनरुक्तरूपांतील प्रथमोक्तीचे अन्त्यास आ असा आदेश करण्याचा प्रचार या भाषेत फार आहे. जसः—मारामार, धांवाधांव, ओरडाओरड, फिरवाफिरव, ताणाताण, चुकवाचुकव, इ०

४७८. क्रियाविशेषणांची पुनरुक्ति बहुधा पौनःपुन्य, उत्तरोत्तर न्यूनाधिक्य, इत्यादि अर्थीं होते. जसें:—हळूहळू, लौकरलौकर, दूरदूर, आतांआतां, जेव्हांजेव्हां, वरवर, खालींखालीं, पुढेंपुढें, मधूनमधून, बाहेरूनबाहेरून, जिकडेजिकडे—तिकडेतिकडे, पुन्हापुन्हा, कधींकधीं, कुठेकुठे, केव्हांकेव्हां इ०

टीप—कांहीं पुनरुक्त क्रियाविशेषणांचे प्रथमोक्तींत अन्त्य स्वरास ओकारादेश होतो. जसें:—बरोबर अथवा बराबर, मधोमध मागोमाग, तंतोतंत, हालोहाल, इ०. उदाहरणें:—हें उदाहरण बरोबर आहे, तें लांकूड मधोमध ठेव, तीं घरें समोरासमोर आहेत, इ०.

टीप—समोरासमोर यांत फक्त आकारादेश होतो.

४७९. वरील टिपेंत सांगितलेलीं अव्ययें शब्दयोगी अव्ययांप्रमाणेंही उपयोगांत येतात, या शब्दयोगी अव्ययांशिवाय इतरांची पुनरुक्ति होत

[ इ ] अव्ययांची अशा प्रकारची द्विरुक्ति चे किंवा च्या ह्यांचे जागीं ले किंवा ल्या हें अक्षर येऊनही होते. जसें:—वरलेवर किं० वरल्यावर, खालल्याखालीं, मागलेमागें, मधल्यामध्यें, इ०.

( ई ) या सर्व रूपांचा उपयोग:—त्या त्या अव्ययानें निर्दिष्ट होणाऱ्या प्रदेशाची अन्यव्यावृत्ति म्हणजे इतर सर्वांस सोडून त्याचाच स्वीकार कर्तव्य असतां प्रचलित भाषेंत या शब्दांचा उपयोग होतो. जसें:—त्यानें तो चेंडू वरच्यावर झेलला, त्यांनीं तो गुन्हा आंतल्या आंत जिरविला, मी त्याला पाहून मागचेमागें परतलों, ह्याप्रमाणें त्याच्या पुढील पात्र पुढच्यापुढेंच लांबविण्यांत आलें, इ०.

## अंशभ्यास्त शब्द.

४८५. त्यांचें साधारण स्वरूप वर [ अंक ४६९ मध्यें ] सांगितलेंच आहे. या शब्दांपैकीं कांहींचा उल्लेख समाहारद्वंद्व समासाचे विवेचनांत आला आहे. तथापि या प्रसंगीं त्या व तत्सदृश इतर शब्दांकडे निराळ्याच दृष्टीनें पहावयाचें असल्यामुळें त्यांची द्विरुक्ति झाल्यास तिला दोष देतां कामा नये हें उघड आहे. असें आहे तरी होतां होईल तों द्विरुक्ति टाळूनच पुढील विवेचन करण्याचा प्रयत्न केला आहे. अंशाभ्यस्त शब्द साधण्याचे पुढील प्रकार आढळतात.

[ अ ] ज्या ठिकाणीं दोन्ही शब्द अर्थवान् असून फक्त एक दोन अक्षरांचें यमक जुळणारे असतात, म्हणजे ज्यांच्या आरंभींचीं एकदोन अक्षरें भिन्न असून अखेरचीं एकदोन अक्षरें एकच असतात ते. जसें:—

नामें:—लाडीगोडी, ओळखदेख, आगतस्वागत, ख्यालीखुशाली.

विशेषणें:—फुटकातुटका, असातसा, इतकातितका, अमूकतमूक, उलटासुलटा, आरतापरता, उघडानागडा.

धातु:—पारखणेंसुलाखणें; समजणेंउमजणें, बोलणेंचालणें.

अव्ययें:—वेडेंवांकडें, इकडेतिकडे, जेव्हांतेव्हां, कधींमधीं, सदासर्वदा, जिकडेतिकडे, येथेंतेथें, समजूनउमजून, अधींमधीं, अध्यांतमध्यांत,इ०.

**टीप १**—या वरील उदाहरणांचा अर्थ दोन्ही दळांचे अर्थापेक्षां भिन्न नाहीं. मात्र अशा प्रकारच्या कांहीं अव्ययांचा अर्थ दोन्ही दळांचा अर्थाहून कांहींसा भिन्न असल्यामुळें सांगितला पाहिजे. जेव्हांतेव्हां, जेथेतेथें, जिकडेतिकडे, इ० जीं

संबंधी व अनुसंबंधी ह्यांचे जोडीनें बनली आहेत, त्यांचा अर्थ केवळ त्या संबंधी व अनुसंबंधीचे अर्थांपासून स्पष्ट समजत नाहीं. जेव्हांतेव्हां=सदोदित; जेथें जिकडेतिकडे=सर्वत्र; इ० असा ह्या संबंधीं व अनुसंबंधी ह्यांचे जोडयांपासून साकल्याचा अर्थ निष्पन्न होतो हें उघड आहे.

[ आ ] अंशाभ्यस्त शब्दांचे दळांपैकीं कधीं कधीं पहिलें किंवा दुसरें कोणतें तरी एक दळ अर्थहीन असतें; परंतु त्याचें अर्थवान् दळाशीं एकदोन अक्षरांचे यमक जुळतें.

नामें:—शेजारीपाजारी, अडोशीपडोशी, दाणादुणा, सोयराधायरा, भिकारीटाकारी, ओखळपाखळ.

विशेषणें:—चाडजूड, खराखुरा, उधारपाधार, अर्धामुर्धा, औरस-चौरस, आंबटचिंबट, अचकटविचकट, अघळपघळ, आडवातिडवा, अक्राळविक्राळ.

धातु:—आंजरणेंगोंजरणें, अरतणेंपरतणें, झाडणेंझुडणें, अडणेंभिडणें, जळफळणें, धुसमुसणें.

अव्ययें:—वरील नामविशेषणांपैकीं ज्यांचा क्रियाविशेषणांप्रमाणें, उपयोग होतो. तीं त्यावेळीं, येथेंही दाखवितां येतात.

टीप—या शब्दांचे अर्थामध्यें अर्थवान् दळानें दाखविला जाणारा व तशाच प्रकारचा आणखी अर्थ इतक्याचा समावेश होतो. म्हणजे अर्थवान् दळानें दाख-विल्या जाणाऱ्या अर्थाची मर्यादा आसपासच्या प्रदेशावर थोडीशी वाढविण्यांत येते. म्हणूनच वरील नामांस समाहारद्वंद्व समासांत घातलें आहे. पण इतर शब्दांस तसें करितां येत नाहीं. म्हणून त्यांस वाटेल तर अर्थसादृश्यदृष्ट्या समाहारक विशषणें धातु, किंवा अव्यय म्हणावें.

कधीं कधीं अर्थवान् दळापासून अर्थहीन दळ कांहीं नियमितपणें साधतें.

[ १ ] अर्थवान् शब्द प्रथम येऊन त्याचे आद्याक्षराचे जागीं बि किंवा गि हें अक्षर येऊन तोच शब्द पुन्हा येतो. अशा प्रकारें सर्वनामांवांचून सर्व प्रकारच्या व्ययी शब्दांपासून अंशाभ्यस्त शब्द तयार होतात. पहिल्या अर्थवान् दळाचे आद्याक्षरांत बिंदु असल्यास तो अर्थहीन दळाचे आद्य बि किंवा गि ह्या अक्षरावरही येतो [ समासाध्याय पहा. ] उदाहरणें:—

नामें:—दगडबिगड, दगडगिगड, धोंडाबिंडा, धोंडागिंडा, फलाणा—बिस्ताणा, इ०.

विशेषणें:—काळाबिळा, कडूबिडू, आंबटबिंबट, इ०. परंतु कसेंबसें,

क्रियापदें:——गेलाबिला, करीलबिरील, निजेलबिजेल, इ०.

धातुसाधितें:——करूंबिरूं, पिळूनबिळून, उठतांबिठतां इ०.

टीप १——विशेषणें व धातु यांचे संबंधानें बि ह्या अक्षराचाच उपयोग आढळतो. गि ह्या अक्षराचा प्रचार यांचे संबंधानें फारसा कोठें ऐकूं येत नाहीं आणि साधारणपण पहातां गि ह्या अक्षराचेपेक्षां बि ह्या अक्षराचीच व्यापकता अधिक आहे.

टीप २——या सर्व शब्दांचा अर्थ वर सांगितल्याप्रमाणें समाहार द्वंद्वाचे अर्थाप्रमाणें आहे.

( २ ) कधीं कधीं कांहीं नामांच्या व विशेषणांच्या आद्य व्यंजनाचे जागीं स् हें व्यंजन येऊनही अभ्यास होतो. जसें:——लुंगासुंगा, वाईटसाईट, पोरसोर, इ०. ( समासाध्याय पहा. ).

[ ३ ] कधीं कधीं नाम आणि विशेषण ह्यांचे आद्य व्यंजनाचे जागीं त्याच्या अभ्यासामध्यें म् हें व्यंजन अनियमितपणें आलेलें आढळतें. जसें:——अर्धामुर्धा [ येथें आद्य अचे जागीं मु झाला आहे ], खिडूकमिडूक [ कुडूक ह्याचा अपभ्रंश किडूक होऊन किडूकमिडूक झालें व त्यापासून खिडूकमिडूक झालें ], चट्टामट्टा, साळकोजीमाळकोजी, टकमक इ०.

[ ४ ] धातूंस ‘ सवरणें हा पालवपदाप्रमाणें उगीच एक नवा कल्पित धातु ’ पुढें जोडून समाहारार्थी जोडधातू साधतात. जसें:——करणेंसवरणें लिहिणेंसवरणें, बोलणेंसवरणें, वाचणेंसवरणें, पहाणेंसवरणें, जाणेंसवरणें, खेळणेंसवरणें, हिंडणेंसवरणें, इ०.

[ ५ ] कांहीं धातूंच्या आद्य व्यंजनाचा अभ्यास होतो, व तें बहुधा दीर्घ स्वरान्त होऊन मूळ धातूच्या आरंभीं येऊन पौनःपन्यार्थी नवीनच धातू तयार होतात. जसें:——ढें—ढाळणें, गा—गजणें, लोलवणें, रोखणें, भांबावणें, चांचपणें, फोंफावणें, कैंकाटणें इ०. संस्कृतांतही धातूंचीं अशा प्रकारचीं पौनःपुन्यार्थी स्वतंत्र रूपें साधतात. हें तज्ज्ञांस स्मरेलच.

[ ६ ] दोन्ही दळें अर्थवान् असून त्यांमध्यें फक्त एखाद्या व्यंजनाचा अनुप्रास जुळतो. उदाहरणें:——

पुसतपास, लंगडालुळा, झाडझुडूप, सगासोयरा, बागबगीचा, भांगभुरका, टिळाटोपी, केरकचरा, बाळीबुगडी, इ०.

[ ई ] दोन दळांपैकीं फक्त एक अर्थवान् असून दुसऱ्या अर्थहीन दळाचा त्याच्याशीं फक्त एखाद्या व्यंजनाचा अनुप्रास जुळतो. जसें:— टाकमटिकला, चट्टीपट्टी, ठाकठीक, मागमूस.

टीप १ — कळकळ, मळमळ, हळहळ, हुरहुर, तळमळ, अळंटळं, खटपट, चटपट, इ० कांहीं शब्दांमध्ये सकृद्दर्शनीं पूर्णाभ्यास किंवा अंशाभ्यास आहे असें दिसतें. परंतु सकृद्दर्शनीं दिसणारीं त्यांतील दळें भिन्न भिन्न केलीं तर असें दिसून येईल कीं, त्यांतील एकही दळ अर्थवान् नाहीं. अर्थात् त्यांमध्यें अशा प्रकारें कांहीं दळें कल्पिण्यास मुळींच आधार नाहीं. तेव्हां जरी त्यांचे ठायीं पूर्णाभ्यास किंवा अंशाभ्यास ह्याचा अभ्यास झाला तरी त्यांस अभ्यस्त शब्द असें म्हणतांच येत नाहीं हें उघड आहे.

किरकिर, बडबड, चडफड, इ० पुढें सांगण्यांत येणारे अनुकरणवाचक शब्दही अशाच प्रकारचे आहेत. म्हणजे त्यांत भासमान होणारीं दळें सोडविलीं असतां त्यांचा स्वतंत्रपणें कांहींच अर्थ होत नाहीं. किर, बड, चड, फड, यांपासून अर्थबोध होत नाहीं हें उघड आहे. पण किरकिर, बडबड, चडफड, इ० शब्द सार्थ आहेत. अशाच प्रकारचे कळकळ, मळमळ, हळहळ, इ० वरील शब्द होत हें उघड आहे. परंतु हे शब्द प्रत्यक्ष ध्वनिद्योतक नसल्यामुळें ह्यांस अनुकरणवाचक हें नांव कसें द्यावें, इतकाच प्रश्न आहे. कळकळ, मळमळ, हळहळ, हे ज्या अर्थाचे द्योतक आहेत त्यांत सूक्ष्म ध्वनि आहेच किंवा निदान ते अप्रत्यक्षपणें तरी ध्वनिसंबद्ध आहेत असें जर मानिलें, तर त्यासही अनुकरणवाचक शब्दांचे वर्गांत घालण्यास हरकत नाहीं. आणि ज्या अर्थी या शब्दांचा वेगळा वर्ग करण्यापासून व्याकरणांत कांहीं फायदा होण्याचा संभव दिसत नाहीं त्या अर्थी प्रस्तुत शब्दांस अनुकरणवाचक शब्दांचे वर्गांत कसें तरी ढकलण्यास हरकत नाहीं. मात्र त्यांस पूर्णाभ्यस्त किंवा अंशाभ्यस्त समजणें नीट नव्हे. अनुकरणवाचक शब्दांतीलही कांहीं शब्द असेच आहेत, म्हणजे त्यांस वर सांगितल्याप्रमाणें पूर्णाभ्यस्त किंवा अंशाभ्यस्त समजणें नीट नाहीं. तथापि ते दिसण्यामध्यें अभ्यस्त आणि अनुकरणवाचक आहेत; आणि अनुकरणवाचक शब्द हा अभ्यस्त शब्दांचा एक भेद मानिला आहे. तेव्हां सर्वांस सरसकट अनुकरणवाचक शब्दांचे वर्गांतच घालावें हें बरें दिसतें.

टीप २ —हे चारी प्रकारचे सर्व अंशाभ्यस्त शब्द बहुधा व्यावहारिक भाषेंत उपयोगांत येतात. त्यांचा अभिज्ञ ग्रंथकारांचे किंवा वक्त्यांचे भाषेमध्यें फारसा

प्रचार नाहीं. नेहमींच्या व्यवहारांतील भाषेंत मात्र त्यांचा फार प्रचार असून त्यांच्या योगें बोलण्यांतील भाषेस एक प्रकारची ऐट, खुबी, आणि शोभाही प्राप्त झाली आहे. हे शब्द शिष्ट लोकांचेही व्यावहारिक भाषणांत येतात. आणि कादंबऱ्या व विशेषें करून नाटकें यांमध्यें बोलण्याचीच भाषा येत असल्यामुळें अशा प्रकारच्या पुस्तकांतही ह्या अंशाभ्यस्त शब्दांचा भरणा बराच आढळतो.

[ यांशिवाय दादोबांनीं आणखी एका प्रकारच्या शब्दांचा याच वर्गांत समावेश केला आहे. चूकभूल, शेटसावकार, भांगटिळा, भाजीपाला, पैसाअडका, अन्नपाणी, मीठभाकर, नेआण, जाये, चढउतर, इत्यादि मराठींतील उत्तम समाहारद्वंद्व समासांस दादोबांनीं वरील अंशाभ्यस्त शब्दांचेच पंक्तीस बसवून सर्वांस सरसकट एकच ' प्रातिशब्दिक शब्द ' असें नांव दिलें आहे. तें आमच्या-मतें प्रशस्त नाहीं. अंशाभ्यस्त शब्द वरील टीपेंत सांगितल्याप्रमाणें बहुधा बोल-ण्याचेच भाषेंत येत असल्यामुळें एका प्रकारें गौणच समजले पाहिजेत. दुसरें असें कीं, प्रातिशब्दिक शब्द हा वर्ग पुनरुक्त शब्दांचा होय असें दादो-बांनींच सांगितलें आहे. ' आणि जेथें केवळ पुनरुक्ति न करितां त्या शब्दाच्या अथवा त्याच्या अंगाच्या स्थानीं रूपांतरानें नियत प्रतिशब्द कल्पून त्यास तो जोडिल्यानें जो शब्द साधितात, त्यास प्रातिशब्दिक शब्द म्हटलें आहे ' ( पूराणिका क० २१६ ) ह्या त्यांच्या व्याख्येंतील ' जेथें केवळ पुनरुक्ति न करितां ' या शब्दांकडे पाहिल्यानें वाचकांस तेव्हांच समजेल कीं ' प्रातिशब्दिक शब्द ' हे दादोबांचे मतें पुनरुक्त होत म्हणजे पुनरुक्त शब्दांचाच तो एक वर्ग आहे. परंतु चूकभूल, भांगटिळा, भाजीपाला, इ० प्रकृत शब्दांत कोणती पुनरुक्ति आहे ती त्यांची त्यासच माहीत ! एवंच हे शब्द मुळीं पुनरुक्तच नसल्यामुळें त्यांना या प्रकरणांस वास्तविक स्थळच मिळूं नये. ही गोष्ट इतकी सूर्यप्रकाशाप्रमाणें स्पष्ट असतां दादोबांच्या कशी नजरेस आली नसावी हें एक आश्चर्यच आहे. पण त्याचें उत्तर बहुतकरून त्यांच्या सदोष परिभाषेंत आहे असें वाटतें. त्यांनीं पहिल्या प्रकारच्या अभ्यस्त शब्दांस द्विरुक्त किंवा पुनरुक्त असें म्हटलें आहे, आणि दुसऱ्या प्रकारच्या शब्दांस केवळ प्रातिशब्दिक शब्द हें नांव दिलें आहे. यामुळें प्रातिशब्दिक शब्द ही एक पुनरुक्त शब्दांचीच जात आहे हा जो त्यांचे व्याख्येमधील व व्यवस्थेमधील मुद्दा तो ' प्रातिशब्दिक शब्द ' या नांवांत ध्वनित होत नसल्यामुळें ते तो मुद्दा स्वाभाविकरीत्या तेव्हांच विसरून गेले. आणि ' प्रातिशब्दिक ' या नांवानें

जेवढा अर्थ प्रत्यक्ष सुचविला जातो तेवढाच त्यांच्या डोळ्यासमोर कायम राहून ते चूकभूल, मांगटिळा, भाजीपाला, इ० शब्दांस प्रातिशब्दिक शब्दांचे वगात घालण्यास तयार झाले यांत नवल नाहीं. एवंच पूरणिकेमध्यें जरी त्यांनीं अशाच प्रकारच्या शब्दांचीं शेंकडों उदाहरणें देऊन त्यांचा वाक्यांत उपयोग करून दाखविला आहे आणि एकंदर विषयास पन्नास पृष्ठें दिलीं आहेत तरी तें एकंदर सर्व विवेचन वाचल्यावर 'काय हा पसारा पडला आहे' असा वाचकांचा ग्रह झाल्यावांचून राहत नाहीं. म्हणजे त्यांच्या एकंदर विवेचनपद्धतींत व्यवस्थेच्या ऐवजीं अव्यवस्थाच फार झाली आहे. आणि हा सर्व परिणाम सदोष परिभाषेचा होय. ह्या सबंध प्रकरणास प्रथम त्यांनीं 'द्विरुक्तादि शब्द-विचार' असें म्हटलें आहे; आणि त्या द्विरुक्तादि शब्दांचे द्विरुक्त किंवा पुनरुक्त, प्रातिशब्दिक आणि अनुकरणवाचक, असे तीन चार प्रकार दिले आहेत. म्हणजे द्विरुक्त हें नांव सबंध जातीस व तिच्या एका उपजातीस आहे, आणि 'प्रातिशब्दिक' नांवामध्यें पुनरुक्तीचा ध्वनि मुदलींच होत नाहीं. अशा प्रकारचे दोष दादोबांचे परिभाषेंत असल्यामुळें त्यांच्या विवेचनांत आणखीही दोष शिरले आहेत. आपणच निर्माण केलेल्या शब्दांच्या व्याख्या नीट न ठरविल्यामुळें आणि ज्या व्याख्या एकदां दिल्या त्या पूर्णपण सदोदित लक्षांत न वागविल्यामुळें सर्व घोंटाळा उत्पन्न झाला आहे. पात्रापात्र, धर्माधर्म, न्यायान्याय, इ० शब्द जरी सकृद्दर्शनीं द्विरुक्त दिसले तरी ते एका शब्दाचे द्विरुक्तींत झाले नाहींत हें थोड्याशा विचारांतीं समजण्या सारखें आहे. त्याचप्रमाणें लाताताती. मारामारी, खेंटराखेंटरी, इ० शब्द केवळ द्विरुक्त शब्दांमध्यें येऊं शकत नाहींत तर त्यांतील पहिल्या व दुसऱ्या दोन्ही उक्तींच्या अन्तीं विकार झालेला असून हीं बहुव्रीहि समासाचीं उदाहरणें होत हें संस्कृत व्याकरणावरून उघडच आहे. त्याचप्रमाणें घरचेंघर, डोंगरचे डोंगर, पोथीचीं पोथी, बायकोची बायको, ही कीं ती, बरें कीं, वाईट, मी ना तूं, असें ना तसें, काळें ना गोरें, शेरासशेर, रुपयास रुपया, इत्यादि ज्या शब्दासमुच्चयांस वाक्यांगें म्हटलें पाहिजे, आणि ज्यां मधील शब्द, विभक्तिप्रत्यय आणि उभयान्वयी अव्ययें इत्यादिकांनीं जोडण्यांत आले आहेत त्या सर्वांस, केवळ त्यांच्या बाह्यरूपानें चकून जाऊन, द्विरुक्त किंवा पुनरुक्त म्हणण्यास ते मागे पुढें पहात नाहींत. यांस त्यांनीं एकदां पुनरुक्त शब्द असें म्हटल्यामुळें ही कीं ती, बरें का वाईट इ० शब्दसमुच्चय हीकींती, बरेंकींवाईट, असे एका शब्दाप्रमाणें एकत्रीं लिहून दाखविले

आहेत ! फणस हीं 'फण' ह्या शब्दाची चतुर्थी होय असेंच म्हणण्यासारखा हा सर्व प्रकार नाहीं काय ? हे सर्व दोष दूषित परिभाषेचे होत. यामुळें जरी हा सर्व विषय आम्हीं दादोबांचे पूर्णिकेचे आधारानें लिहिला आहे तरी त्यांची परिभाषा बदलून सर्व विषयाची संगतवार मांडणी नवीनच तयार करणें आम्हांस भाग पडलें आहे. खेरांनीं हा विषय दादोबांचे पूर्णिकेतून बहुतेक जशाचा तसा संक्षेपानें घेतला असल्यामुळें त्यांच्या पुस्तकांतही दादोबांचा सर्व अप्रयोजकपणा कायम राहिला आहे. या पुस्तकांतील या विषयाची व्यवस्था पूर्णिकेंतील किंवा खेरांचे पुस्तकांतील व्यवस्थेशीं नीट ताडून पाहिली असतां आमच्या म्हणण्याची सत्यता वाचकांचे नजरेस आल्यावांचून राहणार नाहीं. )

## अनुकरणवाचक.

४८६. स्पष्ट किंवा अस्पष्ट, वास्तविक किंवा काल्पनिक ध्वनींचे वाचक आणि त्या ध्वनींचें अल्पांशानें तरी अनुकरण करणारे म्हणजे त्या ध्वनीशीं जरासे तरी जुळणारे असे जे स्वरूपतः अभ्यस्त शब्दांसारखे दिसणारे किंवा वास्तविक अभ्यस्त शब्द त्यांस अनुकरणवाचक शब्द असें म्हणतात.

टीप—गेल्या अंकांतील ई सदराखालील टीप १ मध्यें सांगितलेले कळकळ, मळमळ, खटपट, इ० शब्दांचा अनुकरणवाचक शब्दांत अन्तर्भाव होण्यासाठीं वरील व्याख्येंत 'वास्तविक किंवा काल्पनिक ध्वनींचे वाचक' असें म्हटलें आहे.

अनुकरणवाचक शब्दांचीं उदाहरणें:—

[ अ ] नामें:—किरकिर, कळकळ, कलकल, चुटपुट, चुणचुण, चटपट, खटपट, तगमग, तडफड, पिरपिर, पुटपुट, बडबड, बुरबुर, मळमळ, मिरमिर, मुरमुर, लटपट, लगबग, वटवट, हळहळ, हुरहुर, इ०.

टीप—अशाच अनुकरणवाचक शब्दांपासून आट प्रत्ययानें साधिलेलीं तद्धित नामें आढळतात:—कलकलाट, गडगडाट, चकचकाट, लखलखाट, सुळसुळाट, इ० ( तद्धिताध्याय पहा. )

[ आ ] विशेषणें:—हीं अनुकरणवाचकांपासून ईत प्रत्ययानें साधतात. अनुकरणवाचक मूळ विशेषणें आढळत नाहींत. करकरीत, खर-

खरीत, गरगरीत, गटगटीत, चमचमीत, झणझणीत, टणटणीत, तुरतुरीत, तरतरीत, पिळपिळीत, फुसफुशीत, ुसभुशीत, लुटलुटीत, सुडसुडीत, घवघवीत.

**टीप १** ——अशीं कांहीं ईत प्रत्ययान्त विशेषणें प्रचारांत आहेत. परंतु त्यांचे मूळ अनुकरणवाचक शब्द बहुधा प्रचारांत आढळत नाहींत. उदा०:— किड-किडीत, गुबगुबीत, सडसडीत इ०. ह्यांतील किडकिड, गुबगुब, इ० जी मूळ-रूपें दिसतात त्यांचा स्वतंत्र उपयोग झालेला आढळांत नाहीं.

**टीप २** ——अशीं याकारान्त नामेंही साधातात. जसें:—किरकिऱ्या लटपट्या, बडबड्या, इ०.

[ इ ] धातु:— कडकडणें, खरखरणें, गडगडणें, घडघडणें, चकचकणें जळजळणें, झणझणें, डगमगणें, तणतणणें, फुरफुरणें, लटलटणें, इ०.

अनुकरणवाचक धातूंचा आणखी एक प्रकार आढळतो. तो असा:— वरील कांहीं धातूंतील प्रथम दळास आकारान्त करून द्वितीय दळाचें आद्य अक्षराचा लोप केल्यानें वरीलच अर्थाचे जरा संक्षिप्त धातु तयार होतात. जसें:——कडाडणें, धडाडणें, चकाकणें, थरारणें, भरारणें, भणा-णणें. रटाटणें, इ०.

( ई ) क्रियाविशेषणें:——अनुकरणवाचक क्रियाविशेषणांचा भरणा मराठींत फार आहे. उदाहरणें:——कडकड, गटगट, घमघम, चरचर, छमछम, तुरुतुरु, दुरुदुरु, टकमक, तडफड, वणवण, ढळढळ, खदखद, धबधब, गदगद, लखलख, झगमग, लपलप, डबडब, कलकल, ट्यांव-ट्यांव, फुसफुस, इ०.

( या क्रियाविशेषणांचें सविस्तर विवेचन क्रियाविशेषणाध्यायांत पहावें.)

४८७. येथपर्यंत साधित शब्दांचें जे प्रकार देण्यांत आले त्यांशिवाय ‘ आणखी कितीएक शब्द स्वच्छंदानें व बेबंदपणानें पाहिजे तसे रचिले असतात त्यांस छांदिष्ट किंवा अनर्गल शब्द असें म्हणतात. ’——दादोबा. त्यांतील कांहीं मासल्यासाठीं पुढें दिले आहेत.:——अगडबंब, अकडंतिकडं,

ओकसाबोकशीं, अननंतननं, अनमानधबका, लपंछपं, अळंटळं, टंगळ-मंगळ, घणघणघंटा, लटपटपंची, ढकलपंचविशी, कोट्यापंचोत्री, रक्तबंबाळ साळकायघोळकाय, अवाचेसवा, आपसातुपशीं, गयांवायां, माभळभट, हमळोश्यामळो ढणढणण्णा, गोदडशाई, लङ्कभारती, इ०. या शब्दांचा वेगळा वर्ग करण्याची जरूर दिसत नाहीं, अभ्यस्त शब्दांचे जे निर-निराळे प्रकार या आध्ययांत सांगितले आहेत त्यांपैकींच कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारांत वरील शब्दांचा सूक्ष्म विचान्तीं समावेश कर-ण्यास पंचाईत पडणार नाहीं. म्हणजे हे शब्द अभ्यस्त शब्दांच्या कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारचीं उदाहरणें होत असें आढळून येईल. म्हणून त्यांचा वेगळा वर्ग या ग्रंथांत मानिला नाहीं.

---

# भाग ३.

—:-०-:—

## वाक्यविचार.

—०*०—

### विषयोपन्यास.

व्याकरणाची प्रवृत्ति मुख्यत्वेंकरून वाक्याचे स्पष्टीकरणासाठीं होते. वाक्याचें पूर्ण आकलन होण्यासाठीं त्याचे जे घटक शब्द त्यांचा विचार व्हावा लागतो; आणि त्यांचा चांगला परिचय व्हावा म्हणून शब्दाचे घटक जे वर्ण त्यांचें विवेचन अवश्य आहे. ह्यामुळेंच प्रथम वर्णविचार नंतर शब्दविचार आणि अखेरीस वाक्यविचार अशा क्रमानें व्याकरणाची रचना होते. ह्या तीन विचारांपैकीं येथपर्यंत वर्णविचार आणि शब्दविचार या दोहोंचें पहिल्या दोन भागांत यथासांग उद्‌घाटन झालें. ते सर्व अर्थांतच वाक्यस्पष्टीकरणाचे उद्देशानें होय. तेव्हां पहिले दोन भाग हे तिसऱ्या भागाचे पोषक आहेत. व्याकरणाचा मुख्य भाग हाच होय, म्हणून आतां या भागांत कोणकोणते विषय कोणत्या क्रमानें यावयाचे आहेत तें प्रथम पाहूं.

वाक्य म्हणजे काय हें पूर्वीं सांगितलेंच आहे. वाक्याचा अर्थ स्पष्ट कळविण्यासाठीं त्यांतील पदांचा परस्पर संबंध समजला पाहिजे. हा संबंध अनेक प्रकारचा आहे. वाक्यामध्यें मुख्य शब्द दोन आहेतः कर्ता आणि क्रियापद. जसें:—रामा चालतो. या वाक्यांत चालणारा जो रामा तो कर्ता आणि चालतो हें क्रियापद आहे. कर्ता व क्रियापद या दोन शब्दांशिवाय वाक्य कधींही पूर्ण होत नाहीं. जेव्हां क्रियापद सकर्मक असेल त्यावेळीं आणखी कर्महि असलें पाहिजे. ‘रामा पत्र वाचितो’ येथील वाचितो हें क्रियापद सकर्मक असल्यामुळें रामा या कर्त्याशिवाय आणखी पत्र ह्या कर्मद्योतक शब्दाची जरूर आहे. एवंच प्रत्येक वाक्यांत कर्ता व क्रियापद आणि अवश्य जागीं कर्म हीं असलींच पाहिजेत. ह्यापैकीं कर्ता व कर्म हीं नामें किंवा नामांप्रमाणें योजिलेले इतर शब्द—म्हणजे तेवढ्यापुरतीं नामेंच—असतात; आणि क्रियापदें हीं धातूंचीं वेगवेगळीं रूपें असतात. तेव्हां प्रथम नामांचा क्रियापदांशीं संबंध कसा असतो आणि

त्यांचा परस्परसंबंध काय असतो हें समजलें पाहिजे. हे संबंध नामांच्या विभक्त्यन्त रूपांवरून आणि धातूंच्या आख्यातरूपांवरून समजतात. तेव्हां प्रथम **विभक्तींचे** व **आख्यातांचे निरनिराळे अर्थ** कोणते तें पाहिलें पाहिजे. तसेंच क्रियापद हें कधीं कधीं संयुक्त असल्यामुळें **संयुक्त क्रियापदांचे** रचनेची माहितीही प्रथम झाली पाहिजे. तेव्हांच क्रियापदाचा कर्ता व कर्म ह्यांच्याशीं कोणत्या प्रकारचा संबंध असतो हें ध्यानांत येण्यास सुलभ होईल. या संबंधासच मराठी व्याकरणांत **प्रयोग** असें म्हटलें, आहे. ह्याचे नंतर नामविशेषणें आणि क्रियाविशेषणें व इतर अव्ययें **यांचा वाक्याशीं** काय व कसा **संबंध** असतो तें सांगतात; आणि अखेरीस वाक्यामध्यें जीं एकंदर पदें असतात तीं बहुधा कोणत्या क्रमानें येतात हें ज्या अध्यायांत सांगितलें असतें त्यास **पदक्रम** असें म्हणतात.

या ठिकाणीं कोणास अशी शंका उत्पन्न होईल कीं, शब्दांच्या ज्या **आठ** जाति पूर्वीं सांगितल्या आहेत, त्यांपैकीं नाम, विशेषण, क्रिया किंवा धातु, आणि क्रियाविशेषण, इतक्या चारांचाच वरील विवेचनांत संबंध आलेला दिसतो. तर मग बाकीच्या चारांची वाक्यास कांहीं जरूरीच नाहीं कीं काय? त्यांचा वाक्यविचारांत कांहींच संबंध येत नाहीं काय? या शंकेचें समाधान असें वांक्यविचाराचे दृष्टीनें नामें व सर्वनामें हीं बहुधा एकच; त्यांच पृथक् पृथक् विचार करण्याची विशेष जरूर नाहीं. शिवाय सर्वनामांचे अर्थ व उपयोग हे पूर्वीं वर्गीकरणांतच दाखविले आहेत. तथापि या वाक्यविचारांत नामाचे अनुरोधानें त्यांचा उल्लेख अवश्य स्थळीं करण्यांत येईल. उभयान्वयी अव्ययें हीं बहुधा दोन वाक्यांमधील संबंध दाखविणारीं असल्यामुळें त्यांचा प्रत्येक वाक्याचे स्पष्टीकरणांत फारसा संबंध पोंचत नाहीं. शब्दयोगी अव्ययान्त शब्द हे वाक्याचे दृष्टीनें क्रियाविशेषणें होत, हा मुद्दा पूर्वीं अनेक प्रसंगीं सांगितलाच आहे. म्हणून शब्दयोगी अव्ययांचा वाक्यविवेचनांत स्वतंत्रपणें निर्देश करण्याची आवश्यकता नाहीं. आणि केवलप्रयोगी अव्ययें हीं मागल्या किंवा पुढल्या कोणत्याच वाक्याचा साक्षात् अवयव होत नसल्यामुळें म्हणजे तीं वाक्याचे बाहेरील स्वतंत्र शब्द असल्यामुळें त्यांचा वाक्यविवेचनाशीं अर्थाअर्थीं संबंध नाहीं. याप्रमाणें वाक्यदृष्ट्या सर्वनामें

नामांत, व शब्दयोगी अव्ययें क्रियाविशेषणांत, बहुधा समाविष्ट होत असल्यामुळें आणि उभयान्वयी व केवलप्रयोगी अव्ययें वाक्याचे बाहेरचीं असल्यामुळें सर्वनाम, शब्दयोगी, उभयान्वयी, आणि केवलप्रयोगी, यांचा स्वतंत्र उल्लेख वाक्याचे उद्‌घाटनांत फारसा होत नाहीं. तथापि सर्वनामें व उभयान्वयी अव्ययें ह्यांचा प्रसंगोपात्त थोडासा विचार या भागांतही येईलच.

येणेंप्रमाणें वाक्यविचार या भागांत **विभक्त्यर्थ** व **आख्यातार्थ, संयुक्त क्रियापदें, प्रयोग**, कर्ता, कर्म, व क्रियापद ह्यांशिवाय **इतर शब्दांचा वाक्याशीं संबंध**, आणि **पदक्रम** हे विषय येतात. येथें व्याकरण हा विषय बहुतेक संपलाच असें म्हणावयाचें. परंतु अलीकडे इंग्रजीचे सहवासानें आणखी एका महत्त्वाच्या विषयाची वाक्यविचारामध्यें भर पडली आहे. त्यास **वाक्यपृथक्करण** असें म्हणतात. या प्रकरणामध्यें वाक्यांच्या निरनिराळ्या जाति कोणत्या आणि वाक्यांतील पदांचें पृथक्करण कोणत्या दृष्टिनें होतें ह्या मुद्यांचा सविस्तर विचार येतो. या प्रकरणास जर **वाक्य-पृथक्करण** असें म्हटलें तर त्याचे दृष्टिनें वर सांगितलेल्या प्रकरणास **वाक्यरचना** असें नांव देण्यास हरकत नाहीं. कारण कीं, त्या प्रकरणांत आपण शब्दांपासून निघून ते जोडण्यानें वाक्य कसें तयार होतें, म्हणजे वाक्य तयार करण्यासाठीं शब्द कसकसे जोडावे लागतात, ह्या मुद्याचा विचार करितों; आणि या नवीन आंग्लागत प्रकरणामध्यें आपण वाक्यां-पासून निघून अर्थदृष्ट्या त्याचे तुकडे पाडितों. अशी या दोन प्रकरणां-तील दृष्टि भिन्न भिन्न आहे.

सारांश, वाक्यविचाराचीं मुख्य दोन प्रकरणें आहेतः—**वाक्यरचना व वाक्यपृथक्करण**. यांपैकीं वाक्यरचनेमध्यें विभक्त्यर्थ व आख्यातार्थ, संयुक्त क्रियापदें, प्रयोग, अन्यशब्दसंबंध, आणि पदक्रम, असे विषय येतात; आणि वाक्यपृथक्करणामध्यें वाक्यांच्या निरनिराळ्या जातींचा व त्यांच्या अवयवांचा अलग अलग विचार केलेला असतो. याच क्रमानें वाक्यविचाराचें विवेचन करण्यांत येईल.

---

# प्रकरण १.

—•-*-•—

## वाक्यरचना.

## अध्याय १.

### विभक्त्यर्थ व आख्यातार्थ.

४८८. विभक्तींनीं नामांचा क्रियापदांशीं किंवा इतर पदांशीं संबंध जोडण्यांत येतो. क्रियापदांशीं संबंध जोडणाऱ्या विभक्तीला **कारक विभक्ति** असें म्हणतात. आणि इतर शब्दांशीं संबंध जोडणाऱ्या विभक्तीला **उपपद विभक्ति** असें म्हणतात. तसेंच लक्षणेनें कारक विभक्तीच्या अर्थास **कारकार्थ** आणि उपपद विभक्तींचे अर्थास **उपपदार्थ** असें म्हणतात.

**टीप**—निरनिराळी शब्दयोगी अव्ययें निरनिराळ्या विभक्तींचे जागीं येऊन त्या त्या विभक्तींचें कार्य करितात, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. त्याचप्रमाणें कोणकोणतीं शब्दयोगी अव्ययें कोण कोणत्या विभक्तींचे जागीं येतात हेंही सविस्तर देण्यांत आलें आहे. ह्याप्रमाणें शब्दयोगी अव्ययांनींही विभक्तांचे अर्थ दाखविले जातात हें उघड आहे.

४८९. कारकार्थ किंवा कारकें **सहा** आहेत. **कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान,** आणि **अधिकरण.**

( अ ) **कर्ता**—ह्याची व्याख्या व हा शोधून काढण्याची रीति पूर्वींच देण्यांत आली आहे, उदा०:—**पृथ्वी** सूर्याभोंवती फिरते. या वाक्यांत फिर हा धातु आहे; त्यापासून णारा प्रत्ययान्त कृदन्न फिरणारा हें होय. ह्या ठिकाणीं ' फिरणारी कोण ' ह्या प्रश्नाचें पृथ्वी हें उत्तर येत असल्यामुळें पृथ्वी हा शब्द कर्ता होय.

( आ ) **कर्म**—ह्याची व्याख्याही पूर्वीं आलीच आहे. उदा०:—रामानें **रावणास** मारिलें; मुलगा **पुस्तक** वाचितो. पहिल्या वाक्यांत मारण्याची क्रिया रामापासून निघून रावणावर घडली आहे; आणि दुसऱ्यांत वाचण्याची क्रिया पुस्तकावर घडत आहे, किंवा त्याचे दिशेनें होत आहे. म्हणून ' रावणास आणि ' पुस्तक ' हीं या वाक्यांतील कर्में होत.

(इ) **करण**—क्रियेचें साधन; ज्या साधनानें किंवा ज्याचे साहाय्यानें क्रिया घडते तें. ‘ कृष्णा **लेखणीनें** लिहितो ’ येथें लिहिण्याची क्रिया लेखणीचे साहाय्यानें किंवा साधनानें होत असल्यामुळें म्हणजे लिहिण्याचें साधन लेखणी असल्यामुळें ‘ लेखणीनें ’ हें पद करणदर्शक आहे.

(ई) **संप्रदान**—देणें, बोलणें, सांगणें, इ० अर्थाच्या क्रिया ज्याला उद्देशून घडतात त्यास संप्रदान असें म्हणतात. ‘ रामानें लंकेचें राज्य **बिभीषणास** दिलें ’ या वाक्यांत देण्याची क्रिया बिभीषणास उद्देशून घडली आहे. म्हणून ‘ बिभीषणास ’ हें पद संप्रदानार्थी आहे. त्याचप्रमाणें ‘ राम सीतेस म्हणाला,’ ‘ नारदानें धर्मराजास सांगितलें,’ सर्व कर्मे ईश्वरास अर्पण करावीं ’ इत्यादि वाक्यांमध्यें सीता, धर्मराज, ईश्वर, इत्याकांस उद्देशून म्हणणें, सांगणें, अर्पण करणें ह्या क्रियांचा उपयोग होत असल्यामुळें सीतेस, धर्मराजास, ईश्वरास, इ० पदें संप्रदानवाचक आहेत हें उघड आहे.

(उ) **अपादान**—एखाद्या क्रियेच्या संबंधानें ज्यापासून एखाद्या वस्तूचा वियोग दाखवावयाचा असतो त्यास अपादान म्हणतात. हस्तिनापुराहून श्रीकृष्ण द्वारकेस गेले.’ या ठिकाणीं जाण्याचे क्रियेसंबंधानें श्रीकृष्णाचा हस्तिनापुराहून वियोग होत आहे असें विधान आहे. म्हणून ‘ हस्तिनापुराहून ’ हें अपादानद्योतक पद होय.

(ऊ) **अधिकरण**—ज्या काळीं आणि ज्या स्थळीं क्रिया घडते त्या काळास आणि स्थळास त्या क्रियेचें अधिकरण म्हणतात. ‘ तो रोज **सकाळीं शाळेंत** जातो.’ या वाक्यांत जाण्याची क्रिया सकाळ या काळीं व शाळा या स्थानीं घडत असल्यामुळें तदर्थक ‘ सकाळीं ’ व ‘ शाळेंत ’ हीं पदें अधिकरणवाचक होत. यांपैकीं “ सकाळीं ’ हें **कालाधिकरण** व ‘ शाळेंत ’ हें **स्थलाधिकरण** दाखवितें.

४९०. विभक्तींचे **उपपदार्थ अनेक** आहेत. त्यांची गणना आणि व्याख्या करण्याचें व्याकरणदृष्ट्या विशेष महत्त्वाचें नसल्यामुळें ते ते अर्थ जेथल्या तेथेंच सांगण्याची चाल आहे.

४९१. प्रथमेचे अर्थ खालीं दिल्याप्रमाणें:—

**I प्रथमा—कारकार्थ.**

( अ ) **कर्ता**—**मुलें** खेळतात; **तो** गेला; **रामा** रस्त्यानें चालला असतां त्याला **ठेंच** लागली; इ०. या ठिकाणीं मुलें, तो, रामा, ठेंच, हे प्रथमान्त शब्द असून प्रथमेचा अर्थ कर्ता आहे.

( आ ) **कर्म**—मुलें **अभ्यास** करितात, त्यानें **काम** केलें, तो **चित्रें** पहात आहे, इ०. या वाक्यांत अभ्यास, काम, चित्रें, हे शब्द प्रथमान्त असून प्रथमेचा अर्थ कर्म आहे.

( इ ) **अधिकरण**—हिंडणें, फिरणें, चालणें, हे व या अर्थाचे धातू वाक्यांत आले असतां, ज्या ठिकाणीं तद्दर्शक क्रिया घडते तद्वाचक शब्द कधीं कधीं प्रथमान्त असतो. जसें:—तो दहा **गांवें** हिंडला, तो सगळें **शहर** फिरला, इ०. या ठिकाणीं गांवें व शहर हे शब्द प्रथमान्त असून प्रथमेचा अर्थ स्थलाधिकरण आहे. कालवाचक नामांचाही असा वाटेल त्या क्रियेसंबंधानें प्रथमेंत उपयोग होतो. जसें:—तो सगळा **दिवस** खेळला, गोपाळा दहा **वर्षें** शिकत आहे, इ०. ह्याप्रमाणें प्रथमेनें स्थलाधिकरण व कालाधिकरण हीं दोन्हीं दाखविलीं जातात.

## II प्रथमा उपपदार्थ.

( अ ) उद्देश:—**नानाफडणवीस** हा मोठा मुत्सद्दी होता, मी **गरीब** तेथें कशास जाऊं, **रामा** आणि **गोविंदा** हे शाळेंत गेले, इ० या वाक्यांत हा, मी, आणि हे, ह्या कर्त्रर्थी प्रथमा आहेत; आणि नानाफडनवीस, गरीब, रामा, गोविंदा, ह्या उद्देशार्थी प्रथमा आहेत; म्हणजे या शब्दांचा हा, मी, आणि हे शब्दांकडे उद्देश आहे.

( आ ) **विधान**—नानाफडनवीस **मुत्सद्दी** होता, तो हंबीररावाची **बायको** झाला होता, इ० या वाक्यांतील मुत्सद्दी व बायको ह्या विधानार्थी प्रथमा आहेत.

**टीप**—ज्याप्रमाणें नामांचा असा विधानार्थी उपयोग होतो त्याचप्रमाणें विशेषणांचाही असा उपयोग होतो. जसें:—तो **शहाणा** आहे, तो **शूर** आहे, इ०. या ठिकाणीं शहाणा व शूर हीं विशेषणें विधान करितां विशेष्याचेनंतर योजिलीं आहेत. याप्रमाणें, विधान करण्यासाठीं जेव्हां एखादें विशेषण त्याच्या विशेष्याचे नंतर योजिलेलें असतें तेव्हां त्यास विधिविशेषण असें म्हणतात.

( इ ) **अंतर** किंवा **अवधि**—दोन वस्तूंमधील अंतर व कालमान दाखविणारीं नामें प्रथमान्त असतां हा अर्थ असतो. उदा०:—मुंबईहून

**नागपुर** पांचशें मल किंवा अडीचशें **कोस** आहे; कोणत्याही विद्येचा निदान एक **तप** तरी अभ्यास केला पाहिजे. या वाक्यांत मैल व कोस, **हे** प्रथमान्त शब्द अंतर दाखवितात; आणि तप हा प्रथमान्त शब्द **अवधि** दाखवितो.

( **ई** ) **ईयत्ता** किंवा **परिणाम**—माप, वजन, लांबी, रुंदी, उंची, जाडी **आकार**, इ०. दाखविणारीं नामें या अर्थीं प्रथमान्त असतात. उदा०:— **दोन खंडी** गहूं, चार **शेर** तूप, सहा **हात** लांब, पांच **तोळे** सोनें, इ०. या ठिकाणच्या खंडी, शेर, हात, तोळे ह्या प्रथमा ईयत्ता किंवा परिणाम दाखवितात. हीं परिणामवाचक नामें ज्या वस्तूचें परिणाम दाखवितात **तद्वाचक** नामाचे बहुधा पाठीमागें तीं येतात.

[ **उ** ] **मूल्य**—चांगले संत्रे सहा **रुपये** शेंकडा मिळतात, हें कापड चार **आणे** वार मिळतें, माणशीं पांच **रुपये** भाडें पडतें, मणीं दोन **पैसे** हमाली लागते, इ० वाक्यांत रुपये, आणे, रुपये, पैसे, हे प्रथमान्त शब्द **मूल्यवाचक** आहेत.

[ **ऊ** ] **प्रमाण**—वरील पहिल्या दोन उदाहरणांतील शेंकडा, व **वार** ह्या प्रथमा प्रमाणद्योतक आहेत.

४९२. तृतीयेचे अर्थ येणेंप्रमाणे:—

## I तृतीया—कारकार्थ

[ **अ** ] कर्ता—इंग्रजी **सरकारानें** बाजीरावास पेनशन दिलें, **माझ्यानें** **हें** काम करवेल, **त्यानें** जावें, **रामनें** रावणास मारिलें, इ०. या वाक्यांत **सरकारानें**, माझ्यानें, त्यानें, रामानें ह्या कर्त्रर्थी तृतीया आहेत. या अर्थी **तृतीयेचे** नें, नीं, हेच प्रत्यय लागतात; इतर प्रत्यय प्रचलित गद्यांत **बहुधा** लागत नाहींत.

[ **आ** [ **करण**—**चाकूनें** लेखणी करितात, त्यानें एका क्षणांत **तलवारीनें** त्याचे दोन तुकडे उडविले, इ०. या ठिकाणीं चाकूनें व **तलवारीनें** हीं करणार्थी तृतीयेचीं उदाहरणें होत.

[ **इ** ] **अधिकरण**—गमनार्थक धातूंशीं संबंध असतां वाट, मार्ग, इ०. स्थलवाचक शब्द तृतीयान्त असतात. जसें:—त्या **वाटेनें** कांटे **फार** आहेत, तो **रस्त्यानें** बसत बसत गेला, तो नदीच्या **कांठानें** चालला,

इ०. या वाक्यांत वाटेनें, रस्त्यानें, कांठानें, ह्यांचा अर्थ त्या त्या ठिकाणीं असा असल्यामुळें ह्या अधिकरणार्थीं तृतीया होत.

## II तृतीया—उपपदार्थ.

(अ) **हेतु** किंवा **निमित्त**—आपल्या **आशीर्वादानें** आमचें काम तडीस गेलें, त्या **बातमीनें** त्याला मोठा धक्का बसला, तो **भिडेनें** बोलत नाहीं, तो **मर्यादेनें** वागत नाहीं, अशा **दांडगाईनें** तुझा निभाव लागणार नाहीं, इ०. या वाक्यांतील जाड ठशांनीं छापलेले तृतीयान्त शब्द हेतु किंवा निमित्त दाखवितात. या तृतीयान्त शब्दांचा क्रियापदांशीं संबंध असल्यामुळें हीं उदाहरणें योग्य नव्हत आणि तीं वरील करणार्थाचे खालीं येतात असें जर कोणास वाटलें तर पुढील निःसंशय उदाहरणें पहा. **भिडेनें** स्तब्ध, **गर्वानें** फुगलेला, **नांवानें** प्रसिद्ध, इ०

सूचना—कारकार्थ व उपपदार्थ ह्यांमधील फरक केवळ शास्त्रीय आहे; ह्यामुळें तो महत्वाचा नाहीं. दुसरें असें कीं, या अध्यायांत सांगितलेले विभक्तींचे उपयोग सर्वथा परस्पर भिन्न आहेत असें म्हणतां यावयाचें नाहीं. एकच उदाहरण निरनिराळया दृष्टीनें अनेक सदरांत येण्याचा संभव आहे. तथापि येथें विभक्तीच्या अर्थांबरोबरच त्यांचे उपयोगही सांगण्याचा उद्देश असल्यामुळें असा प्रकार टाळणें, म्हणजे सर्वथा परस्पर भिन्न असेच अर्थ देणें, हें जवळ जवळ अशक्यच आहे असें म्हटलें तरी चालेल. ही गोष्ट ध्यानांत ठेविल्यानें यापुढील उदाहरणांवर साहजिक उत्पन्न होणारे क्षुल्लक आक्षेप तेव्हांच निरस्त होतील.

(आ) **साहित्य**—अमुक एक पदार्थ बरोबर घेऊन म्हणजे त्याच्या सह, त्याच्या बरोबर, असा अर्थ असतां, तद्वस्तुवाचक शब्द तृतीयान्त असतो. जसें:—तो एका **अंगवस्त्रानें** बाहेर पडला, **सर्वांशीं** गोड बोलावें, तो हजार **स्वारांनिशीं** शत्रूवर चाल करून गेला, इ०.

टीप—निशीं हें शब्दयोगी अव्यय आहे. तें कृष्णशास्त्री गोडबोले म्हणतात त्याप्रमाणें नीं आणि शीं या तृतीयेच्या दोन प्रत्ययांचे संयोगानें अस्तित्वांत आलें असण्याचा बराच संभव आहे. गोडबोल्यांनींही या विधानाचे पुढें प्रश्नचिह्न केलें आहे.

(इ) **अंगविकार**—ज्या अवयवाची न्यूनता, वैगुण्य किंवा व्यंग दाखवावयाचें असतें, तद्वाचक शब्द तृतीयान्त असतो. जसें:—**डोळ्यानें** आंधळा, **कानानें** बहिरा, **पायानें** लंगडा, इ०.

( ई ) **अपेक्षा, विषय** किंवा **बाब**—अमुक एका बाबतींतील विशिष्टत्व दाखविणारें गुणाविशेषण पुढें आलें असतां ती बाब दाखविणारा मागला शब्द तृतीयान्त असतो, जसें:—**स्वभावानें** गरीब, **प्रकृतीनें** सशक्त, **शरिरानें** बळकट, **जातीनें** गरीब, **बुद्धिनें** मंद, **पैशानें** श्रीमंत—गरीब—किंवा उणा, **स्वभावानें** तापट, इ०.

( उ ) **प्रमाण**—एखाद्या गुणाचें न्यूनाधिक्यप्रमाण दाखवावयाचें असतां हें प्रमाण दाखविणारे शब्द तृतीयान्त येतात जसें:—**अधपावानें** कमी, चार **बोटांनीं** उंच, पांच **वर्षांनीं** वडील, इ०.

( ऊ ) **मूल्य**—या अर्थीं तृतीयेचा उपयोग कमी आढळतो. जसें:—चार **पैशांनीं** शेर, **पैशानें** पासरी, तूप हल्लीं **रुपायानें** शेर मिळतें, पण लग्नसराईंत दीड **रुपायानें** शेरही मिळण्याची पंचाईत पडते, इ०. या ठिकाणीं प्रथमेचाच उपयोग अधिक आढळतो.

( ऋ ) **अधिक**—अमुक एक काळ गेल्यावर असा कालावधीचा अर्थ असतां तो काळ दाखविणारा शब्द तृतीयान्त असतो जसें:—तो चार **वर्षांनीं** आला, मी बारा **वर्षांनीं** घरीं गेलों इ०.

( ऌ ) **इयत्ता** किंवा **परिमाण**—ही दाखवावयाचीं असतां त्यांचा वाचक शब्द तृतीयेंत असतो. जसें—तांदूळ **पल्ल्यानें** किंवा **खंडीनें** विकतो, त्याच्याकडे लांकडें **खंडीनें** किंवा **टनानें** मिळतात, **मणानें** मिळत नाहींत, इ०.

[ ए ] **तुलना**—एका वस्तूची दुसऱ्या वस्तूशीं तुलना करावयाची असतां ज्या वस्तूशीं तुलना करावयाची असते, तद्वाचक, म्हणजे उपमानवाचक शब्दांची **शीं** प्रत्ययान्त तृतीया होते. जसें:—मुखचंद्र शब्दांत मुखाची **चंद्राशीं** तुलना केली आहे, तांबडा रंग हिरव्याशीं जुळत नाहीं, हें त्याच्याशीं ताडून पहा, इ०.

[ ऐ ] **सांनिधि**—या अर्थींही **शीं** प्रत्ययान्त तृतीया येते जसें:—लोडाशीं बसा, तो बापाशीं भांडला, त्याचे घराशींच ( किंवा घरापाशींच ) माझें घर आहे, इ०.

( ओ ) **रीती**—ज्या रीतीनें क्रिया घडते, त्या रीतीचा वाचक शब्द तृतीयान्त असतो. जसें:—**ऐटीनें** चालतो, तो **जलदीनें** किंवा **घाईनें** बोलतो, **मोठ्यानें** वाचतो, इ०.

( औ ) **मनःस्थिति** किंवा **मनोविकार**—मनाच्या ज्या स्थितींत किंवा ज्या मनोविकारांच्या प्रभुत्वाखालीं क्रिया घडते, ती मनःस्थिति किंवा ते मनोविकार दाखविणारे शब्द तृतीयान्त असतात. जसें:—तो **आनंदानें** म्हणाला, तो **रागानें** बोलला, तिची सासू तिला **ममतेनें** वागविते, **धिमेपणानें, शांतपणानें** किंवा **थोरपणानें** वागावें, पक्षीही लहान घरटीं बांधोनि **गुण्यागोविंदानें** नांदताती, इ०.

**विरोधाविरोध**—कोणाशीं शत्रुत्व अथवा मित्रत्व दाखवावयाचें असतां तद्वाचक शब्दाची **शीं** प्रत्ययान्त तृतीया होते. जसें: —**त्याच्याशीं** वैर, रामाचें **रावणाशीं** युद्ध, वालीशीं सख्य, इ०.

( अः ) **अनुरोध**—कायदा, नियम, धर्म, मत, इत्यादिकांस अनुसरून म्हणजे त्यांचे अनुरोधानें असा अर्थ असतां, कायदा, नियम, इत्यादिकांचे वाचक शब्द तृतीयान्त येतात. जसें— ही गोष्ट **कायद्यानें** होणार नाहीं, तुला **कायद्यानें** शिक्षा झाली पाहिजे, अमुक **नियमानें** असें रूप होत नाहीं, **नीतीनें** व **स्वधर्मानें** वागणें हें मनुष्याचें आद्य कर्तव्य होय, तो बायकोच्या **तंत्रानें** वागतो, माझ्या **मतें** तो शहाणा आहे, इ०.

४९३. चतुर्थीचे अर्थ असे:—

**I चतुर्थी—कारकार्थ.**

( अ ) **कर्ता**—**त्याला** काम करवतें, **त्याला** बोलतां येतें, **त्याला** बसवतें, इ०. या वाक्यांत त्याला हा शब्द कर्ता आहे.

( आ ) **कर्म**—मी **त्याला** ओळखितों त्यानें **मुलास** मारिलें, रामानें **रावणास** मारिलें, इ०. या वाक्यांत त्याला, मुलास, रावणास, हे चतुर्थ्यन्त शब्द कर्मे होत.

( इ ) **करण** —त्यानें त्याचे एका **घावास** दोन तुकडे उडविले. या वाक्यांत घावास=घावानें, घावाचे तडक्यानें, असा साधनार्थ असल्यामुळें ही करणी चतुर्थी होय.

( ई ) **संप्रदान**—दे, सांग, विचार, बोल, म्हण, इ० क्रिया ज्यांस उद्देशून घडतात तद्वाचक शब्दांची संप्रदानार्थी चतुर्थी होते. जसें:— तो **ब्राह्मणास** दक्षणा देतो, मीं **त्याला** सांगितलें, त्यानें **भावाला** पत्र पाठविलें शिक्षकानें **विद्यार्थ्यांस** हा धडा शिकविला, इ०. येथें ब्राह्मणास,

त्याला, भावाला, विद्यार्थ्यांस, हीं संप्रदानार्थी चतुर्थीचीं, उदाहरणें होत. ह्यांसच इंग्रजी व्याकरणास अनुसरून कोणी कोणी **अप्रत्यक्ष कर्म** असें म्हणतात.

( उ ) **अपादान**—त्याच्या **डोळ्यांना** गळती लागली आहे, **नाकाला** धार लागली आहे, त्याच्या **लग्नाला** चार वर्षें झालीं, इ०.

( ऊ ) **अधिकरण**—अमुक ठिकाणची स्थिति अशी आहे, किंवा अमुक ठिकाणाकडे गमन आहे असा अर्थ असतां त्या ठिकाणाच्या वाचक शब्दाची अधिकरणार्थी चतुर्थी होते. ही स्थलाधिकरणवाचक होय. जसें:—**भांड्याला** भोंक पडलें आहे, त्याच्या **डोक्याला** रुमाल होता, **मुंबईस** प्लेग आहे, **दाराला** कडी आहे, या **घराला** पूर्वेच्या **बाजूस** दोन दारें आहेत, त्याच्या **हाताला** खरूज झाली आहे, तो **मुंबईस** गेला, तो आतां **नागपुरास** पोंचला असेल, इ०.

टीप १—कधीं कधीं कालवाचक शब्दांचीही अधिकरणार्थी चतुर्थी होते. जसें तूं उद्यां दिवसास मजकडे ये, या वर्षास प्रवासखर्चच फार झाला; रात्रीस, पहांटेस, दिवाळीला, दसऱ्याला, एकादशीस, इ०. ही कालाधिकरणचतुर्थी होय.

टीप २—याप्रमाणें पुरुषाधिकरण चतुर्थीही आढळते. एखाद्या व्यक्तीचे ठायीं कांहीं शारीरिक किंवा मानसिक विकार उत्पन्न होत आहेत किंवा त्या व्यक्तीचे ठायीं कसली तरी आवश्यकता किंवा उणीव भासत आहे. असें सांगावयाचें असतें तेव्हां त्या व्यक्तीच्या वाचक शब्दाची चतुर्थी होते. अशा वाक्यांत बहुधा हो, पाहि, नको, ये, लाग, वाट, भास, रुच, आवड इ० धातूंचा उपयोग होतो. ( ह्या प्रकारचे धातु व त्यांच्यासंबंधाचा ऊहापोह पूर्वीं आलाच आहे ) जसें:—**मला** भात हवा, त्याला पोळी नको, त्याला ताप येत आहे, **मला** भूक लागली आहे. तुला वाटतें अ० भासतें, **मुलांना** खेळ आवडतो, इ०. या पुरुषाधिकरणाचा एका दृष्टीनें स्थलाधिकरणामध्यें अन्तर्भाव होतो असें म्हटलें तरी चालेल.

II **चतुर्थी—उपपदार्थ.**

( अ ) **उद्देश, हेतु, प्रयोजन**—तो **कीर्तीला** झटतो, **कामाला** चालला, त्यानें मला **जेवावयास** बोलाविलें आहे, तो **मुंजीला** गेला आहे, **लग्नाला** जातों मी द्वारकापुरा, तो **प्राणास** प्राण देणारा मित्र आहे, इ०.

( आ ) **योग्यता**—ह्या अर्थाची चतुर्थी बहुधा हो धातूबरोबर येते. जसें:—धोत्रें **फाटायला** झालीं आहेत, ही मुलगी **लग्नाला** झाली आहे,

मुलगा आतां **मुंजीला** झाला, इ०. अशा ठिकाणच्या चतुर्थ्यन्त शब्दाचे पुढें योग्य हा किंवा तदर्थक शब्द विकल्पानें योजण्याची चाल आहे.

( इ ) **मूल्य** किंवा **विनिमय**--पदार्थाच्या खरेदीविक्रीचा भाव सांगण्यांत आणि अदलाबदलीविषयीं बोलतांना या अर्थीं चतुर्थीचा उपयोग होतो. जसें:--**पैशाला** पांच आंबे मिळतात, ही शाल मी पन्नास **रुपयांस** घेतली, पूर्वीं तीस रुपये खंडी भात मिळे पण हल्लीं **खंडीस** पन्नास रुपयेही पडतात, **शेरास** सव्वाशेर, **बुक्कीस** बुक्की, **शिवीस** शिवी, **जशास** तसें, **पानास** रुपया याप्रमाणें त्याला त्या पुस्तकाचे पांचशें रुपये मिळाले, **शब्दास** शब्द भाषान्तर कर इ०.

( ई ) **शरीरसंबंध** किंवा **नातें**—या अर्थीं चतुर्थीचा उपयोग बहुधा अस आणि हो या धातूंबरोबर होतो. जसें:—**त्याला** चार भाऊ आहेत, **त्याला** आज मुलगा झाला, **त्याला** दोन बायका आहेत, **त्याला** कोणी नाहीं, इ०.

( उ ) **स्वामित्व**—स्वामित्ववाचक शब्दांची कधीं कधीं चतुर्थी होते. जसें:—**त्याला** हा गांव जहागीर आहे, **रामभाऊला** वतनवाडी पुष्कळ आहे, **त्याला** घरदार कांहीं नाहीं, इ०

( ऊ ) **अंगांगिभाव**—शरीर आणि अवयव, संबंध वस्तु आणि तिचा भाग, ह्यांमधलि संबंध कधीं कधीं चतुर्थीनें दाखविला जातो. जसें:— **हाताला** पांच बोटें असतात, **घोड्याला** आयाळ असते, **टेबलास** बहुधा चार पाय असतात. **फणसास** कांटे असतात, **मांजरास** तीक्ष्ण नखें असतात, एका **मालगाडीस** कधीं कधीं पन्नासपर्यंतही डबे लावितात, इ०.

( ऋ ) **वियोग**--या अर्थीं चतुर्थीचा संयोग बहुधा अंतरणें, बुडणें, मुकणें, आंचवणें, इ० धातूंबराबर होतो. जसें:--तो **नोकरीला** मुकला; तो वारल्यामुळें आपल्या **आप्तेष्टांस** मुकला, तो सर्व **सुखास** आंचवला, तो त्या व्यापारांत शंभर **रुपयांस** बुडाला, मी **तुला** नाहीं आणि तूं **मला** नाहींस, मी **तुला** मेलों, आणि तूं **मला** मेलास असें समज, इ०.

( ऌ ) **प्रमाण**--**चारांस** आठ तसें **पांचांस** दहा, **पैशाला** दोन तर चार **पैशांनां** किती ? इ०.

( ए ) **अपेक्षा विषय**, किंवा **बाब**--अमुक एका बाबतींतील गुणासंबंधानें बोलतांना तद्गुणवाचक विशेषणाचा उपयोग करावयाचा असतो

त्याचे मागें ती बाब दाखविणाऱ्या नामाची चतुर्थी येते. जसें:--हा आंबा **खायला** बरा आहे, पण **रसाला** चांगला नाहीं, **रुचीला** गोड, **कानाला** किंवा ऐकण्याला कडू, **दिसायला** वाईट, **मरायला** तयार **लढायला** सज्ज, **चालावयास** राजी, इ०.

( **ऐ** ) **मर्यादा**—काल, माप, वजन, इत्यादिकांच्या मर्यादेच्या म्हणजे परिमाणविशेषाच्या संबंधानें बोलावयाचें असतां त्यांची ती मर्यादा दाखविणारा शब्द चतुर्थ्यन्त असतो. जसें:—**नवांस** दहा मिनिटें कमी आहेत, **अकरांना** ( अकरावें वर्ष पूर्ण होण्याला ) एक महिन्याचा अवकाश आहे, **मणास** एक शेर कमी आहे, **शंभरांस** दोन वर्षें कमी असतांना तो मेला, त्याच्या **लग्नाला** किंवा मुंजीला अवकाश आहे, इ०.

४९४. पंचमीचे अर्थ येणेंप्रमाणें:—

**I पंचमी--कारकार्थ.**

( **अ** ) **अपादान**—तो **घराहून** आला, परसू नागपुराहून मुंबईस गेला, इ०.

( **आ** ) **करण**—त्याच्या **हातून** हें होणार नाहीं, इ०.

**II पंचमी--उपपदार्थ.**

( **अ** ) **अंतर**—दोन स्थळांमधील किंवा काळांमधील अन्तर दाखवावयाचें असतां ज्या स्थळापासून किंवा काळापासून प्रारंभ करितात, त्याची पंचमी होते. जसें--**मुंबईहून** काशी सातशें मैल आहे, तुमच्या **घराहून** कचेरी बरीच लांब आहे, त्याला **सोमवारपासून** शुक्रवारपर्यंत ताप येत होता, पुढल्या पहिल्या **तारखेपासून** सुटीस आरंभ होईल, इ०. यावरून कालारंभवाचक शब्दापुढें पासून हें अपादानवाचक अव्यय येतें हें कळेलच.

( **आ** ) **तारतम्य**--दोन वस्तूंची तुलना होऊन जर असें दृष्टोत्पत्तीस आलें कीं, एकीमध्यें कोणता तरी एक गुण दुसरीपेक्षां न्यूनाधिक्यानें वसत आहे, तर तें न्यूनाधिक्य दाखविण्याचे वेळीं एकाची पंचमी विभक्ति होते. जसें:—हा मुलगा **त्याहून उंच** आहे, तो **मजहून** वडील आहे, रामा **गोविंदाहून** अधिक किंवा कमी हुषार आहे, **साखरेहून** गूळ अधिक गोड असतो, **लोण्याहून** मऊ, **कोळशाहून** काळा, इ०.

( इ ) **भेद**—दोन वस्तूंमधील फरक दाखवावयाचा असतां एका वस्तूच्या वाचक पंचम्यन्त नामापुढें अन्य, इतर, दुसरा, निराळा, वेगळा, भिन्न, हे किंवा ह्यांसारखे शब्द येतात. जसें:—**जांबाहून** पेरू वेगळा आहे, सांब **विष्णूहून** निराळा आहे किंवा नाहीं, इ०.

४९५. षष्ठीचे अर्थ पुढीलप्रमाणें:—

I **षष्ठी—कारकार्थ.**

( अ ) **कर्ता**—**त्याचें** लिहून झालें, **त्याचें** पढून होईल, इ०.

( आ ) **करण**—त्याच्या **बोलण्याचा** मला राग आला, इ०.

( इ ) **अपादान**—**शिंक्याचें** सुटलें आणि बोक्याचें पिकलें, तिला त्याच्या **पोटचें** एक मूल झालें, मी येथें केवळ्या **वेळचा** बसलों आहें, इ०.

( ई ) **अधिकरण**—तो **दिवसाचा** चालतो, तो **दिवसाचा** निजतो, आणि **रात्रीचा** जागतो, तो **उन्हाळ्याचा** महाबळेश्वरास जातो, इ०.

II **षष्ठी—उपपदार्थ.**

( अ ) **प्रयोजन** किंवा **हेतु**—**स्नानाची** खोली, **निजावयाची** खोली, **उपाध्यायाचें** पागोटें, **मोटेचा** बैल, **संध्येची** पळी, इ०.

( आ ) **स्थित्यन्तर**—**गरिबाचा** श्रीमंत झाला, **श्रीमंताचा** गरीब, **मूर्खाचा** शहाणा, परिसानें **लोखंडाचें** सोनें होतें, **पांढऱ्याचें** पिवळें, **रंकाचा** राव, **रावाचा** रंक, **मराठीचें** इंग्रजी, **इंग्रजीचें** मराठी, इ०.

( इ ) **मूल्य** किंवा **माल**—**रुपयाचें** तूप, **तुपाचा** रुपया, **पैशाचा** तंबाखू, **तंबाखूचा** पैसा, इ०.

( ई ) **कार्य** किंवा **कारण**, ( कार्यकारणभावसंबंध )—**दागिन्याचें** सोनें, **मूर्तीचा** दगड, **सोन्याचा** दागिना, **दगडाची** मूर्ति, **खुर्चीचें** लांकूड, **लांकडाची** खुर्ची, इ०.

टीप:—लोखंडाची कांब, सोन्याची चीप, इ० हीं प्रकृतिविकृतीचीं उदाहरणें कार्यकारणभावांतच येतात.

( उ ) **जन्य** किंवा **जनक** ( जन्यजनकभावसंबंध )—या **मुलाचा** बाप, **त्याचा** मुलगा, **मुलाची** आई, **तिचा** मुलगा, **जगाचा** कर्ता, **काव्याचा** कर्ता, **मोरोपंतांचें** काव्य, **त्याचा** अपराध, **रामाचा** जय, **रावणाचा** वध, इ०.

टीप—रामाचा जय आणि मोरोपंताचं काव्य, इ० ठिकाणीं षष्ठीचा जनक ह्या अर्थ आहे; हीसच इंग्रजींत कर्तृवाचक षष्ठी असें म्हणतात. रावणाचा वध काव्याचा कर्ता, इ० ठिकाणीं षष्ठीचा जन्यार्थ आहे; हीसच इंग्रजींत कर्मवाचक षष्ठी असें म्हणतात. इंग्रजी नांवांपेक्षां आपली जन्यजनकभावसंबंध ही भाषा सरस आहे. कर्ता, कर्म, या इतर ठिकाणच्या शब्दांचा येथें उपयोग करून घोटाळा उत्पन्न होण्याचा संभव तरी कशास पाहिजे.

( ऊ ) **अन्य शरीरसंबंध** म्हणजे **नातें**—**त्याचा** भाऊ, **माझा** चुलता, इ०.

( ऋ ) **स्व किंवा स्वामी** ( स्व स्वामिभावसंबंध ) —**वाड्याचा मालक**, **नानाचा** वाडा, **घराचा** धनी, **माझें** घर, ह्या **पुस्तकाचा** मालक, हें पुस्तक **कोणाचें** ? इ०.

( ऌ ) **अंग** किंवा **अंगी** ( अंगांगिभावसंबंध )—**खुर्चीचा** पाय, चार **पायांची** खुर्ची, **मेजाचा** खण, दोन **खणांचें** मेज, दोन **हातांचा** मनुष्य, **मनुष्याचा** हात, **हाताचीं** बोटें, सहा **बोटांचा** हात. इ०.

( ए ) **वाह्य** किंवा **वाहक** ( वाह्यवाहकभावसंबंध )—**गाडीचा** घोडा **घोड्याची** गाडी, **डोलीचे** गडी, चार **गड्यांची** डोली इ०.

( ऐ ) **आधार** किंवा **आधेय** ( आधाराधेयभावसंबंध )—**विहिरीचें** पाणी **पाण्याची विहिर**, **आगबोटीचे** उतारू, **उतारूंची** आगबोट, **पेंवाचे** गहूं, **गव्हांचें** पेंव इ०.

( ओ ) **धर्म** किंवा **धर्मी** ( धर्मधर्मिभावसंबंध )—**योग्यतेचा** माणूस, **माणसाची** योग्यता, **नीतीचा** मनुष्य, **मनुष्याची** नीति, **डोक्याचा** मनुष्य, या **मनुष्याचें** डोकें, इ०.

( औ ) **अभेद** किंवा **प्रकारविशेष**—**खादीचें** कापड, **हगवणीचा** आजार, **खुनाचा** अपराध, **तपाचा** श्रम, **विद्येचें** तप, **पोळीचें** खाणें, **वेताची** काठी, **आंब्याचें** झाड, **स्लेटीचा** दगड, **भोंपळ्याची** भाजी इ०.

( अं ) **अपेक्षा, विषय, बाब** या अर्थीं षष्ठ्यन्त शब्दापुढें बहुधा विशेषण येतें. जसें:—**तोंडाचा** फटकळ, **कमरेचा** ढिला, **हाडाचा** मऊ, **जातीचा** शूर, **मनाचा** मोकळा, **बुद्धीचा** जड, **हाडाचा** बळकट इ०.

( अः ) **योग्यता**—**लग्नाची** मुलगी ( लग्नाला योग्य जाहलेली ), **मुंजीचा** मुलगा, इ०.

(क) **साकल्य** – एकाच वस्तूसंबंधाच्या भाषणांत ती सगळी किंवा सबंध वस्तु असा अर्थ असतां तद्वाचक शब्दाचे षष्ठ्यन्त रूपापुढें तोच शब्द येण्याची चाल आहे. जसें:—**गांवचा** गांव, **घरचें घर**, **शहरेंचीं** शहरें, **बागचे** बाग, **थवेचे** थवे, **गाडीची** गाडी, इ०.

टीप १—यावेळीं षष्ठीचे प्रत्ययापूर्वी नामांचे सामान्यरूप होत नाहीं. तर नामाच्या प्रथमेचे एकवचनापुढें व अनेकवचनापुढें षष्ठीचा प्रत्यय जोडून देण्यांत येतो.

टीप २—प्राणिवाचक शब्दांचा असाच उपयोग होतो. त्यावेळीं साकल्याचे अर्थाशिवाय आणखी अवधारणेचा अर्थ असतो. जसें:— पैशापरी पैसा गेला आणि **मूलचें** मूल गेल, **माझा** मी, **तुमचे** तुम्ही, ज्याचा तो, **कोणाचें** कोण, **कोणाचे** कोण आणि **पितळेचे** होन इ०

टीप ३—**घरेंचीं** घरें, **शहरेंचीं** शहरें, बागचे बाग, इ. नामांच्या द्विरुक्ती-मध्यें विशषनिष्ठ चा प्रत्यय येऊन झालेले शब्दसमुच्चय आणि घरेंच घरें, शहरेंच शहरें, बागच बाग, दूधच दूध, गूळच गूळ, इ. नामाच्या द्विरुक्तीमध्यें च हें अव्यय येऊन झालेले शब्दसमुच्चय ह्यांच्या अर्थांतील फरक स्मरणीय आहे. **घरेंचीं** घरें, इ० ठिकाणीं वर सांगितल्याप्रमाणें सबंध घरें असा साकल्याचा अर्थ आहे; आणि घरेंच घरें, म्हणजे पुष्कळ घरें असा या दुसऱ्या प्रकारच्या शब्दांत बाहुल्याचा अर्थ आहे. म्हणजे षष्ठीप्रत्यययुक्त शब्दांनीं साकल्याचा बोध होतो; आणि च ह्या अव्यययुक्त शब्दांनीं बाहुल्याचा बोध होतो.

(ख) **नियमितत्व**—वरील (क) मध्यें सांगितल्याप्रमाणें शब्दरचना होऊन द्वितीय उक्तीस विभक्तिप्रत्यय लागल्यानें मागील षष्ठ्यन्त उक्तीचे सामान्यरूप होऊन जी शब्दरचना होते तिनें विशेषेंकरून कालवाचक शब्दांसंबंधानें कालाचा नियमितपणा दाखविला जातो. जसें:—**वेळच्या** वेळीं (नियमित वेळीं), **सोमवारच्या** सोमवारीं (नियमानें प्रत्येक सोमवारीं) पहिल्या **तारखेच्या** पहिल्या तारखेस (नियमानें प्रत्येक पहिल्या तारखेस), इ.

टीप १—घरच्या घरीं किंवा घरचे घरीं ही रचना अशीच आहे; परंतु येथें प्रकृत अर्थ मात्र नाहीं. घरच्या घरीं म्हणजे स्वतःच्याच घरीं असा अर्थ आहे हें उघड आहे.

टीप २—घरचें घर, गांवचा गांव अशी जी साकल्यार्थी शब्दरचना (क) मध्यें सांगितली तिच जागीं त्याच अर्थी कधीं कधीं (ख) ह्या प्रस्तुत सदरांतील रचनाही दृष्टीस पडते. जसें **घरच्या** घर, **गांवच्या** गांव, **शहरेंच्या** शहरें, इ०.

म्हणजे ( ख ) या सदरांतील शब्दरचनेचा नियमितत्वाशिवाय कधीं कधीं साकल्य असाही अर्थ होतो; परंतु ( क ) या सदरांतील शब्दरचनेचा मात्र नियमितत्व असा अर्थ कधींच होत नाहीं.

**[ ग ] अविकार**—( ख ) या सदरांत जी शब्दरचना सांगितली तशा प्रकारची शब्दरचना विशेषणांसंबंधानें झाली असतां विकाराचा किंवा स्थित्यंतराचा अभाव म्हणजे बदल न होणें असा अर्थ होतो, जसें:—तो आज इतक्या वर्षें शिकत आहे तरी तो **वेडाच्या** वेडा आहे, **जशाच्या** तसा, **कोराच्या** कोरा, **ढच्या** ढ ( किंवा **ढचा** ढ **असाही** प्रचार आहे. ) इ०.

४९६. आतां सप्तमीचे अर्थ सांगतों:—

**I सप्तमी—कारकार्थ.**

[ अ ] **अधिकरण**—तो **सायंकाळीं घरींच** राहातो, मी पुढल्या **वर्षी कोंकणांत** जाणार आहें, **पायांत** जोडा घाल, **अंगांत** अंगरखा घाल, **बोटांत** आंगठी घाल, इ०.

**[ आ ] करण**—देखोनि **डोळां** हृदयाभिरामा, **पायीं** चालला, **तोंडीं** सांग, त्याच्या **हातीं** हें करावा इ०.

**II सप्तमी—उपपदार्थ.**

[ अ ] **हेतु, प्रयोजन**—मी तुझ्या **पायीं** बुडलों ह्या **कामीं** माझें बरेंच नुकसान झालें, तो सारखा **ऐटींत** मरतो आहे, इ०.

**[ आ ] विषय, संबंध, बाब**—तूं ह्या **कामांत** किंवा **बाबतींत** मला कांहीं विचारूं नको, तो **गणितांत** कच्चा आहे, **खेळण्यांत** निपुण, इ०.

टीप—हुशार, निपुण, कुशल, चतुर, प्रवीण, पक्का, कच्चा, इ० प्रवीणतेचें न्यूनाधिक्य दाखविणारीं विशेषणें या अर्थी सप्तम्यन्त शब्दापुढें येतात. जसें:—शास्त्रांत निपुण, स्वयंपाकांत कुशल, इ०.

( ई ) **सर्वोत्तमत्व**—एखाद्या वस्तूचें सर्वांमध्यें श्रेष्ठत्व वर्णन करावयाचें असतां त्या वस्तूंच्या वाचक शब्दाची सप्तमी होते; आणि या सप्तम्यन्त शब्दापुढें तोच शब्द प्रथमान्त येतो; किंवा श्रेष्ठ, प्रवीण, उत्तम अशीं श्रेष्ठत्वसूचक विशेषणें येतात. जसें:—**मनुष्यांत** मनुष्य, **शहाण्यांत** शहाणा, **लहानांत** लहान, **सर्वांत** लहान, **सर्वांत** श्रेष्ठ, सर्व **विद्यार्थ्यांत** उत्तम, इ०.

[ ई ] **साहित्य**—अशी द्राही ६ तोफांचे **सलामींत** फिरविण्यांत आली, एकतीस तोफांचे **सलामींत** त्यांचें स्वागत करण्यांत आलें, मंगल वाद्यांचे अतिमनोहर **गजरांत** त्याचें मोठया थाटानें लग्न लागलें, इ०.

४९७. संबोधनाचा अर्थ एकच संबोधन म्हणजे हांक मारणें. जेव्हां दुसऱ्याचें लक्ष आपणाकडे वेधून घ्यावयाचें असतें किंवा त्याला हांक मारावयाची असते तेव्हां या विभाक्तीचा उपयोग करीतत. जसें:— **गोविंदा** इकडे ये, **मुलांनो** तुम्ही आपले पाठ वेळच्या वेळीं नीट करित जा, तुका म्हणे माझ्या जीवा ॥ कधीं भेटशी **केशवा** ॥ इ०

४९८. कोणकोणत्या विभक्तीचे अर्थानें कोणकोणतीं शब्दयोगी अव्ययें येतात हें पूर्वी सांगितलेंच आहे. विभक्तींचे अर्थ व उपयोग येथें संपले. ह्यांपैकीं बरेच अर्थ तशाच अर्थाच्या शब्दयोगी अव्ययांचा उपयोग करून दाखवितां येतात. कोणत्या जागीं कोणत्या शब्दयोगी अव्ययांचा उपयोग होतो हें शब्दयोगी अव्ययांचे अर्थावरून सहज समजण्यासारखें आहे. तथापि त्यांतल्या त्यांत असें दिसून येतें कीं, पंचमीच्या प्रत्ययाचे ऐवजीं पंचमी शब्दयोगी अव्ययांचा उपयोग जितका होतो, तितका इतर शब्दयोगी अव्ययांचा इतर विभक्तींचे जागीं झालेला आढळत नाहीं.

( कारकद्वारा विभक्तींच लक्षण केल्यानें विभक्तिप्रकरणांत काय काय घोंटाळे उत्पन्न झाले आहेत हें पूर्वी सविस्तर सांगितलेंच आहे. या अध्यायांत सर्व विभक्तींचे जे अर्थ व उपयोग वर दिले आहेत, त्यांवरून वाचकांचे तेव्हांच लक्षांत येईल कीं संबोधनाशिवाय सर्व विभक्तास कारकार्थ व उपपदार्थ असे दोन्ही प्रकारचे अर्थ आहेत; आणि कारकार्थापेक्षां बहुधा उपपदार्थच अधिक आहेत. कोणते अर्थ अधिक आहेत हा मुद्दा महत्त्वाचा नाहीं. तथापि इतकें खरें कीं, उपपद विभक्तींस कारकविभक्तींचें लक्षण लागू व्हावयाचें नाहीं. यामुळें कारकद्वारा केलेलें विभक्तींचें लक्षण कोणत्याच विभक्तीस पूर्णपणें लागत नाहीं; म्हणून तें सर्वथा त्याज्य होय. हें आतां भरपूर पुराव्यानें निःसंशय सिद्ध झालें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. तसेंच ज्याप्रमाणें कारकद्वारा केलेलें विभक्तींचें लक्षण सर्व विभक्तींस केवळ अंशतः लागू पडतें तसें तें मराठींतील षष्ठीसही लागू पडतें; आणि जसें तें मराठींतील षष्ठीस लागू पडत नाहीं तसेंच तें इतर विभाक्तींसही लागू पडत नाहीं. ह्या गोष्टीही वरील पुराव्यानें निर्विवाद सिद्ध होत आहेत. यामुळें कारकद्वारा केलेलें विभक्तींचें लक्षण जरी क्षणभर ग्राह्य म्हटलें तरी षष्ठीचें विभक्तित्व त्यायोगें जाऊं शकत नाहीं.

षष्ठीस कारक नाहीं, षष्ठी ही कारकविभक्ति नाहीं, हीं विधानें खरीं नाहात. हीं विधानें जर खरा मानिलीं तर कोणत्याच विभक्तीस कारक नाहीं किंवा कोणतीच विभक्ति कारकविभक्ति नाहीं, हीं विधानें तितकींच खरीं आहेत असें कबूल करावें लागेल. आतां कोणी असें म्हणेल कीं इतर विभक्तीस जसें निरनिराळें स्वतंत्र कारक आहे तसें षष्ठीस स्वतंत्र कारक नाहीं; तर ह्या म्हणण्यांत कांहींच तथ्य नाहीं. हें सिद्ध करावयास या अध्यायांतील वरील पुरावा पुरेसा आहे. इतर विभक्तींपैकी प्रत्येक विभक्तीस स्वतंत्र कारक आहे हें विधान इंग्रजी भाषेविषयीं अनपवादक आहे असें जरी घेऊन चाललें तरी तें मराठीभाषेविषयीं मुदलींच सत्य नाहीं. कारण कीं, कर्ता हें कारक प्रथमा, तृतीया, चतुर्थी या विभक्तींस; करण हें तृतीया, चतुर्थी व सप्तमी यांस; संप्रदान हें मात्र एका चतुर्थीस अपादान हें चतुर्थी, पंचमी, षष्ठी, यांस; आणि अधिकरण हें प्रथमा, तृतीया, चतुर्थी; षष्ठी, आणि सप्तमी इतक्यांस आहे. म्हणजे मराठींत एका चतुर्थीस संप्रदान हें स्वतंत्र एक कारक आहे. दुसऱ्या कोणत्याही विभक्तीस स्वतंत्र कारक नाहीं. तेव्हां कर्ता, कर्म, करण, इत्यादि कारकें अनुक्रमें प्रथमा, द्वितीया, तृतीया, इत्यादि विभक्तींचीं होत असा आपला समज जो आमच्या मराठी वयाकरणांनीं करून घेतलेला दिसतो आणि पुष्कळांचा केलेला दिसतो, तो इंग्रजी व्याकरणाचे अभ्यासापासून आणि आमच्या विभक्तिसंज्ञांच्या इंग्रजी भाषान्तरापासून उत्पन्न झालेला निवळ भ्रम होय असें मराठी भाषेसंबंधानें बिनधोक म्हणण्यास कोणाची भीति बाळगण्याचें कारण नाहीं. प्रस्तूत विधान मराठीमध्यें फक्त एका चतुर्थीसंबंधानें फार तर सत्य आहे. तेव्हां असल्या भ्रामक किंवा धाष्ट्यांचे विधानाच्या आधारावर षष्ठीस स्वतंत्र कारक नाहीं म्हणून ती विभक्ति नव्हे, हें ठरवूं पहाणें म्हणजे न्यायशास्त्राचा खून करण्यासच तयार होण्यासारखें नाहीं काय ? तेव्हां षष्ठीला विभक्तींतून हद्दपार करण्याचा प्रयत्न करण्याचें धाष्टर्य यापुढें तरी कोणी सुज्ञ मनुष्य करणार नाहीं, अशी दृढ आशा बाळगून या विषयाची अखेरची रजा घेतों.

विभक्तींसंबंधाचा आणखीं एक मुद्दा असा कीं, प्रथमा म्हणजे कर्तृविभक्ति, द्वितीया = कर्मविभक्ति, तृतीय = करणविभक्ति, अशीं दिसण्यांत सार्थ नांव विभक्तीस देणें हें निदान मराठींत योग्य नाहीं. इंग्रजीमध्यें अशीं सार्थ नांवें असल्यामुळें त्यांच्या दृढ संस्कारानें मराठी व संस्कृत यांतील चिह्नमय परिभाषेंतही आमच्या लोकांस इंग्रजींतला अर्थ भासूं लागला; आणि आमच्या वैयाकरणां-पैकीं निदान एकानें तरी—रे० नवलकर यांनीं—चिह्नमय परिभाषा बाजूस सारून कर्तृविभक्ति, कर्मविभक्ति, इत्यादि दिखाऊ सार्थ परिभाषेचा राजरोस स्वीकार केला आहे. परंतु वर सांगितल्याप्रमाणें आपल्या भाषेंत एका चतुर्थीशिवाय कोणत्याही विभक्तीला अनन्यसाधारण असें कारक नाहीं.

आणि ज्याप्रमाणें प्रत्येक विभक्तीचे कारकार्थ अनेक आहेत, त्याचप्रमाणें संप्रदानाशिवाय प्रत्येक कारक अनेक विभक्तींचे अर्थांमध्यें येत असल्यामुळ इंग्रजींतील सार्थ नांवें मराठी विभक्तीस देणें म्हणजे मोंगलाई अंमल गाजवून जबरीनें मुंडन करून मुसलमानी दीक्षा देण्यासारखेंच नाहीं काय ? संस्कृत परंपराही सार्थ नांवाच्या विरुद्धच आहे. फक्त संबोधन हें एकच नांव सार्थ आहे. आणि त्या विभक्तीचा संबोधन हा एकच अर्थ असून तो तिचा अनन्य-साधारण अर्थ असल्यामुळें, म्हणजे तो कोणत्याही अन्य विभक्तीस नसल्यामुळें फक्त तेवढ्या एकाच विभक्तीस सार्थ नांव देणें योग्य होतें; आणि त्याप्रमाणें त्या एकाच विभक्तीस संस्कृत वैयाकरणांनीं सार्थ नांव दिलेलें आहे. यावरून या कामीं आधुनिकांपेक्षां प्राचीन महर्षींनींच अधिक गहन, विस्तृत, व शास्त्रीय विचार केलेला आहे असें सिद्ध होत नाहीं काय ? परंतु वाडवडिलांपेक्षां आपण अधिक जाडे विद्वान् झाल्याची घमेंड आमच्यांत उत्पन्न झाल्यामुळें नसता अप्रयोजकपणा व घोंटाळा अस्तित्वांत आला आहे. त्याचा जितक्या लौकर प्रतिकार होईल तितकें चांगलें. ]

४९९. आख्यात रूपांचा **काळ** व इतर **अर्थ** ह्यांचे संबंधानें कसा-कसा उपयोग होतो, हें पाहण्यापूर्वी प्रथम काळ व अर्थ ह्यांच्या स्वरूपाचें स्पष्टीकरण केलें पाहिजे.

( अ ) काळ म्हणजे वेळ हें सर्वांस माहीतच आहे. काळ अनादि आणि अनंत आहे; आणि त्याचा प्रवाह अप्रतिहत चालला आहे. त्यामध्यें भाग पाडणें शक्य नाहीं. तथापि वक्त्याचे किंवा लेखकाचे दृष्टीनें काळाचे तीन भाग कल्पितां येतात. ज्यावेळीं वक्ता बोलत असतो किंवा लेखक लिहीत असतो तो वर्तमानकाळ, त्याचे पूर्वींचा तो भूतकाळ, आणि त्याचे नंतरचा तो भविष्यकाळ होय. म्हणजे वर्तमान, भूत, आणि भविष्य हे काळाचे भाग वक्त्याचे किंवा लेखकाचे दृष्टीनें कल्पिलेले म्हणजे केवळ सापेक्ष आहेत हें उघड आहे. ह्यांपैकीं वर्तमानकाळ हा अगदीं मर्यादित असून त्याच्या मागें लगेच भूतकाळ. आणि पुढें लगेच भविष्य काळ आहे. म्हणजे एका बाजूस भूत व दुसऱ्या बाजूस भविष्य असे वर्तमानकाळाचे दोन्ही बाजूंस दोन काळ अव्यवहितपणें चिकटलेले असून त्या दोघांच्या संधींत तो सांपडला आहे. परंतु भूत आणि भविष्य हे मात्र, एका बाजूला जरी वर्तमानकाळानें मर्यादित असले, तरी दुसऱ्या बाजूनें अमर्याद किंवा अनंत आहेत. म्हणजे भूतकाळाचे अन्तीं

जरी वर्तमानकाळ आहे तरी त्यास आरंभ नाहीं; आणि भविष्यकाळाचे आरंभीं जरी वर्तमानकाळ आहे तरी त्यास अन्त नाहीं. किंवा दुसऱ्या तऱ्हेनें असेंही म्हणतां येईल कीं, वर्तमानकाळापासूनच दोहोंस आरंभ होऊन ते दोन परस्पर विरुद्ध दिशांनीं पसरलेले असून त्यांस अंत नाहीं. कसेंही म्हटलें तरी इतकें खरें कीं, वर्तमानकाळाप्रमाणें भूत व भविष्य हे दोन्ही बाजूंनीं मर्यादित नसून केवळ एकाच बाजूनें समर्याद आहेत. आतां वर्तमानकाळ हा जरी दोन्ही बाजूंनीं मर्यादित आहे, तरी त्याच्या मागील पुढील मर्यादा अगदीं ठरलेल्या नाहींत; तर त्या केवळ वक्त्याचे व लेखकाचे त्या त्या वेळच्या लहरीवर अवलंबून आहेत. यामुळें वर्तमान-काळ हा कधीं कधीं एका क्षणाइतक्या संपुष्टांत येईल तर कधीं कधीं तो युग, मन्वंतर किंवा कल्प ह्यांच्या इतकाही लांबेल. म्हणजे तो रबरा-प्रमाणें वाटेल तितका, ताणीतां येतो. एका निमिषापासून किंवा निमि-षार्धापासून तो पळ, घटिका, मुहूर्त, प्रहर, दिवस पक्ष, महिना, वर्ष, शतक, युग, मन्वंतर, किंवा कल्प यांच्या लांबीइतकी वर्तमानकाळाची लांबी वक्त्याचे किंवा लेखकाचे लहरीप्रमाणें आणि दृष्टीप्रमाणें लांबू शकते हें विसरतां कामा नये.

[ यावरून व्याकरणामध्यें अपूर्णवर्तमान, पूर्णवर्तमान, रीतिवर्तमान, अपूर्णभूत पूर्णभविष्य, इ० जीं काळांचीं अनेक नांवें दिसतात तीं कशीं अप्रयोजक आहेत हें तेव्हांच कळेल. अपूर्णवर्तमान, पूर्णवर्तमान, ह्यांपेक्षांही वर्तमानवर्तमान, भूतवर्तमान, भविष्यवर्तमान, वर्तमानभूत, भविष्यभूत, इ० पारिभाषिक शब्द तर फारच विचित्र व हास्यास्पद वाटतात. संस्कृत व्याकरणांत असली अप्रयोजक विलक्षण, आणि विरोधी भाषा कोठेंच आढळत नाहीं. इंग्रजी व्याकरणापासूनच मराठीस ही जोड प्राप्त झाली आहे. तथापि तिचा मराठीस इतका कांहीं दृढ सहवास घडला आहे कीं, त्या दाहाचा आतां जवळ जवळ एकजीव होऊन गेल्यासारखाच आहे. ह्यामुळें आतां या अनिष्ट व त्याज्य भागाचाही यापुढें त्याग करितां येईल कीं नाहीं ह्याची शंकाच वाटते. म्हणून पदरांत पडलें आणि पवित्र झालें या न्यायानें त्याचा आतां तसाच स्वीकार करून त्यास होतां होईल तितकें पवित्र करूनच घेतलें पाहिजे. या ठिकाणीं पुढील विषय गृहीत धरून चालणें भाग आहे. तथापि हा मुद्दा तज्ञ लोकांकरितांच असल्यामुळें तसें कर-

ण्यास हरकत नाहीं. तेव्हां प्रथम या विचित्र नांवांच्या कांहीं काळांचीं उदाहरणें घेऊं. तीं येणेंप्रमाणें:—

| उदाहरण | दादोबांचें नांव | गोडबोल्यांचें नांव |
|---|---|---|
| बसत आहे | अपूर्ण वर्तमान | अपूर्णवर्तमान |
| बसला होता | भूतभूत | पूर्णभूत |
| बसणार असेल | भविष्यभविष्य | उद्देश्यभविष्य |
| इ० | इ० | इ० |

अशाच प्रकारचीं अन्य उदाहरणें समजावीं. वास्तविक म्हटलें म्हणजे ह्या उदाहरणांमध्यें वर्तमान, भूत, आणि भविष्य, ह्यांस कांहीं पूर्ण, अपूर्ण, भूत, भविष्य, इ० विशेषणें लावितां येत नाहींत. तेव्हां 'बसत आहे' हा अपूर्ण वर्तमान होय ह्या म्हणण्याचा अर्थ काय तें पाहिलें पाहिजे. 'बसत आहे' म्हणजे बोलणारा ज्यावेळीं बोलत आहे त्यावेळीं बसण्याची क्रिया चालली होती, तिला आरंभ होऊन गेला होता परंतु ती पूर्ण झालेली नव्हती, असा अर्थ आहे. हा अर्थ 'बसत आहे' ह्या शब्दांतून कसा निष्पन्न होतो तें पहा. 'आहे' ह्या पदानें केवळ वर्तमानकाळाचा बोध होतो; म्हणजे बोलण्याच्या वेळीं बसण्याच्या क्रियेसंबंधानें कांहीं तरी विधान होत आहे, असें 'बसत आहे' ह्यांपैकीं 'आहे' या शब्दानें समजतें. अर्थात् 'आहे' हें पद येथें कालदर्शक आहे. 'बसत' हें कालदर्शक नाहीं; तर 'बसत' ह्यानें बसण्याची क्रिया बोलण्याचे वेळीं अपूर्ण होती असें समजतें हें उघड आहे. 'बसला आहे' हें पूर्णवर्तमान कालाचें म्हणून उदाहरण देतात. ह्यांतही 'आहे' हेंच पद वर्तमानकालदर्शक असून 'बसला' या पदानें बोलण्याचे वेळीं बसण्याची क्रिया पूर्ण झाली होती असें समजतें. त्याचप्रमाणें 'बसला होता' ह्यांपैकीं 'होता' हेंच पद कालदर्शक असून 'बसला' यानें क्रियेचें पूर्णत्व दाखविलें जातें हें उघड आहे. तसेंच, बसणार आहे, बसणार असेल, बसणार होता, इ० उदाहरणांत आहे, असेल, होता, हेच अंन्तींचे शब्द म्हणजे हींच आख्यातप्रत्ययान्त पदें कालदर्शक आहेत; आणि बसणार ह्यानें बसणें ही क्रिया केवळ उद्दिष्ट आहे, होती, किंवा असेल असें समजतें. असें जरी आहे तरी बसत ह्यास वर्तमानकालवाचक, बसला यास भूतकालवाचक, आणि बसणार ह्यास भविष्यकालवाचक असें म्हणण्याची पुष्कळांची तयारी आहे. तर मग बसत ह्यास अपूर्णक्रियाद्योतक, बसला ह्यास पूर्णक्रियाद्योतक, आणि बसणार ह्यास उद्दिष्टक्रियाद्योतक असें म्हणावें असें वाटण्याचा संभव आहे. हीं किंवा अशा प्रकारचीं नावें वरील कालवाचक नांवांपेक्षां पुष्कळ बरीं यांत संशय नाहीं. बसत ह्यानें बहुधा अपूर्ण क्रिया, बसला यानें बहुधा पूर्ण क्रिया, आणि बसणार यानें बहुधा

उद्दिष्ट क्रिया किंवा क्रियोद्देश समजतो हें खरें; तथापि बसत, बसला, बसणार, हीं नेहमीं याच अर्थानें उपयोगांत येतात असें कोणी समजूं नये. 'अक्रूर हांसोनियां बोलत (बोलतो), तुमचे दृष्टीसी हा बाळ दीसत (दिसतो), परी कृतान्तासी शिक्षा करित (करितो), कृष्णनाथ निर्धारें'——श्रीधर. अशा ठिकाणीं बसत=बसतो; आणि 'ह्यांतला शिव्या देणार (ज्यानें शिव्या दिल्या तो) कोणता ?' अशा ठिकाणीं बसणार म्हणजे बसला तो असा अर्थ होतो हें उघड आहे. तथापि बसत, बसणार, इत्यादिकांचे हे उपयोग विशेष प्रकारचे असल्यामुळें त्यांच्या नेहमींच्या अर्थास धरून त्यांस अपूर्ण-क्रियाद्योतक वगैरे नांवें देणें कांहीं अंशीं बरें. परंतु हीं कृदन्तें म्हणजे धातुसाधितें कालदर्शक नसल्यामुळें त्यांस वर्तमानकालवाचकांसारखीं कालद्योतक नांवें देणें सर्वथा अयोग्य होय. ह्यामुळें संस्कृत व्याकरणांत ह्यांपैकीं कोणत्याच प्रकारची परिभाषा आढळत नाहीं; तर विभक्तींच्या व आख्यातांच्या परिभाषेप्रमाणें केवळ चिह्नमय भाषा योजिलेली आहे. त्या भाषेस अनुसरून बसत ह्यास त–प्रत्ययान्त धातुसाधित, अथवा धातुसाधित याचे जागीं प्रचारांत आलेला कृदन्त हा लहान शब्द योजून संक्षेपानें तकृदन्त, बसला ह्यास लाकृदन्त आणि बसणार यास णारकृदन्त अशीं खुणांप्रमाणें अर्थहीन तथापि सार्थ व सुबोध नांवें देणें फार चांगलें. हीं नांवें ध्यानांत धरण्यास किंवा त्यांचा उपयोग करण्यास कोणत्याच प्रकारची अडचण नसल्यामुळें आम्हीं याच पारिभाषिक शब्दांचा उपयोग करण्याचें योजिलें आहे. असो. हा विषय जरासा पुढचा असल्यामुळें सध्यां प्रकृत प्रश्नाकडे वळूं. काळ हा कांहीं कधीं अपूर्ण, पूर्ण, किंवा उद्दिष्ट अशा प्रकारचा नसतो; तर काळामध्यें घडणारी क्रिया अपूर्ण, पूर्ण, किंवा उद्दिष्ट, अशी असूं शकते. म्हणून अपूर्णवर्तमान, पूर्णवर्तमान, किंवा भूतवर्तमान आणि भविष्यवर्तमान ह्यांचा असा अर्थ समजावा कीं, या सामासिक नांवांतील दुसऱ्या शब्दानें दाखविल्या जाणाऱ्या काळीं दिलेली क्रिया पूर्ण, अपूर्ण, किंवा उद्दिष्ट अशी आहे. म्हणून अपूर्णवर्तमान म्हणजे वर्तमानकाळीं क्रिया अपूर्ण, आहे किंवा संक्षेपानें अपूर्णक्रियाद्योतक वर्तमान; पूर्णवर्तमान किंवा भूतवर्तमान=पूर्णक्रियाद्योतक वर्तमान; भविष्यभविष्य=उद्दिष्ट क्रियाद्योतक भविष्य; असे अर्थ आहेत हें उघड आहे. हे वास्तविक म्हणजे वस्तुस्थितिदर्शक अर्थ ध्यानांत धरून संक्षेपानें अपूर्णवर्तमान, पूर्णवर्तमान, उद्दिष्टवर्तमान, इ० प्रचारांत असलेले शब्द योजण्यास हरकत नाहीं. हा अर्थ ध्यानांत नसल्यामुळेंच कांहींनीं 'बसत आहे' यास वर्तमान–वर्तमान, 'बसला आहे' यास भूत–वर्तमान, आणि 'बसणार आहे' यास भविष्य–वर्तमान अशी परिभाषा योजिली आहे. ह्या योजनेंत जी चूक दिसते ती अशी. बसत, बसला, बसणार, हीं रूपें कालदर्शक आहेत असें वरील परिभाषा योजणारांस वाटतेंसें दिसतें. परंतु वर सांगितल्या-

प्रमाणें हीं रुपें कालदर्शक नाहींत तर क्रियास्थितिदर्शक आहेत. ह्यामुळें वर्तमान–वर्तमान, भूत–वर्तमान, भविष्य-वर्तमान, अशा प्रकारच्या नांवांपेक्षां अपूर्णवर्तमान, पूर्णवर्तमान, उद्दिष्टवर्तमान, अशीं नांवें बरीं. मात्र त्यांचा शब्दशः दिसणारा उत्तानार्थ बाजूस ठेवून वर स्पष्ट केलेला गंभीरार्थ ध्यानांत धरावा म्हणजे झालें. तथापि इतकें सांगणें अवश्य आहे कीं, साधारण लोक किंवा वैयाकरण समजतात त्याप्रमाणें हे वास्तविक काळाचे भेद नसून क्रियेसंबंधाचे भेद होत. काळ तीनच. वर्तमान, भूत, आणि भविष्य, अपूर्णवर्तमान, पूर्णवर्तमान, उद्दिष्टवर्तमान इ०. हे वर्तमानादि काळांचे भेद नसून त्या त्या काळीं धातुनिर्दिष्ट क्रिया कोणत्या स्थितींत आहे, हें दाखविणारे शब्द आहेत हें विसरतां कामा नये. काळ हा वास्तविक एक अर्थ होय. आतां इतर अर्थांकडे वळूं.

धातूंस आख्यात प्रत्यय लागून क्रियापदें तयार होतात. क्रियापदांनीं काळाचा व आज्ञा, उपदेश, अपेक्षा- इ० अनेक अर्थांचा बोध होतो. धातुरूपाच्या ज्या शक्तीनें काळाशिवाय हे अधिक अर्थ समजतात, त्या शक्तीस वैयाकरण अर्थ असें म्हणतात. स्वार्थ, आज्ञार्थ, विध्यर्थ, संकेतार्थ, व संशयार्थ, असे पांच अर्थ आहेत असें कोणी म्हणतात; कोणी म्हणतात कीं, ह्यांपैकीं संशयार्थ, वगळून बाकीचे चारच अर्थ आहेत; आणि कोणी असें म्हणतात कीं, स्वार्थ हा निरर्थक असून केवळ आज्ञार्थ, विध्यर्थ, व संकेतार्थ हे तीनच अर्थ आहेत. कारण, त्यांच्याच अर्थाचीं वेगळीं क्रियापदें आढळतात. वास्तविक म्हटलें म्हणजे काळ हाही एक अर्थ आहे. आणि काळ भेदानें किंवा अर्थभेदानें धातूंचीं रूपें बदलतात ह्या म्हणण्यांत कांहींच अर्थ नाहीं. कारण कीं, ज्याप्रमाणें एकाच विभक्तीच्या रूपांस अनेक अर्थ आहेत, त्याचप्रमाणें एकाच आख्याताचे रूपांचाही अनेक अर्थीं, किंवा आजकालच्या व्याकरणपरिभाषेनें निरनिराळ्या काळीं व निरनिराळ्या अर्थीं, उपयोग होतो, हें पुढें दिलेल्या आख्यातांचे उपयोगांवरून उघडच होईल. ह्यामुळें भाषेंत तीनच, चारच, किंवा पांचच, अर्थ आहेत असें मानणें किंवा अमुक प्रत्ययान्त धातुरूपें नेहमीं अमुक एकाच काळीं किंवा अमुक एकाच अर्थीं येतात असें समजणें हें योग्य नाहीं. शिवाय काळ जसे तीनच आहेत असें सांगता येतें, त्याप्रमाणें हे काळांचे शिवाय अन्य अर्थ अमुकच आहेत असें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. ]

( आ ) आख्यात रूपांचा काळाशिवाय ज्या अनेक अर्थीं उपयोग होतो, त्यांपैकीं आज्ञा, प्रार्थना, इच्छा, उद्देश, सामर्थ्य, आश्चर्य, संभव, विधि, संशय, संकेत, हे मुख्य होत.

५००. **प्रथम ताख्यात** ( वर्तमानकाळ )—–या आख्यताचा पुढील अर्थीं उपयोग होतो:—

(अ) **वर्तमानकाळ**:—तो **जातो**, रामा पुस्तक **वाचितो**, इ०. यांचा अर्थ असा कीं, त्याचे जाणें व रामाचें वाचणें बोलण्याचें किंवा लिहिण्याचें वेळीं घडतें.

टीप—प्रथम ताख्याताचा हा मुख्य उपयोग होय. ह्यामुळेच त्यास वर्तमान काळ असें म्हणतात. परंतु त्याचा अन्यकाळीं व अन्य अर्थींहि उपयोग होतो, हें पुढील विस्तारावरून कळल.

(आ) **स्थिरसत्य**—साधारण नियम किंवा सिद्धान्त सांगावयाचा असतां म्हणजे अमुक एक गोष्ट सर्व काळीं व स्थळीं सत्य आहे असा अर्थ असतां, किंवा काईमची स्थिति वर्णन करावयाची असतां, या आख्याताचा उपयोग होतो. जसें:—पृथ्वी सूर्याभोंवती **फिरते**, दोन व दोन मिळून चार **होतात**, गंगा बंगालचे उपसागरास **मिळते**, 'कारण चिंतारोगें जन ऐसे क्षीणकाय **होतात**' मोरोपंत, इ०.

(इ) **ऐतिहासिक वर्तमान**—गतकाळीं घडलेल्या गोष्टी जणुं आपल्या डोळ्यांसमोर घडत आहेत, असें चटकदार व हुबेहूब वर्णन करितांना. जसें:—सूत शौनकास **सांगतो**, शुक्राचार्य परीक्षितीस **म्हणतात**. इ०.

(ई) **अवतरण**—दुसऱ्याच्या भाषणाचा किंवा लेखाचा उतारा घ्यावयाचा असतां. जसें:—तुकाराम **म्हणतो**, कवि **म्हणतो**, पंत **म्हणतात**, कृष्णशास्त्री **लिहितात**, इ०.

(उ) **उद्देश**—भाषणाचे काळानंतर लगेच क्रिया घडावयाची आहे, असा अर्थ असतां. जसें:—तुम्ही पुढें चला, मी **येतोंच**; चला, मी तुम्हांस एक मौज **दाखवितों**; इ०.

(ऊ) **संनिहित भूत**—भाषणाच्या काळाचे जरा पूर्वीं क्रिया घडली असा अर्थ असतां. जसें:—तुम्ही कधीं आलां ? हा **येतों** इतकाच.

(ऋ) **निःसंशय भविष्य**—पुढें होणाऱ्या गोष्टीबद्दल बोलणाराची खात्री असतां. जसें:—त्याची प्रकृति इतकी बिघडली आहे कीं, आतां तो **मरतो** (खास मरणार); थांब हो, ही गोष्ट मी उद्यां तुझ्या बापास **सांगतों** (खात्रीनें सांगेन); आतां त्याला शिक्षा **होते** [खास होईल] यांत संशय नाहीं; इ०.

( ऌ ) **रीतिवर्तमान**—अमुक एक गोष्ट वारंवार किंवा नेहमीं घडते, असा रीतीचा अर्थ असतां. जसें: --तो सदोदित आजारी **असतो**, जेवण झाल्यावर मी रोज वामकुक्षि **करितों**, तो नेहमीं उशिरां **येतो**.

शुक्र म्हणे वत्से मी **वांचवितों**, परि पुनः पुन्हा **मरतो** ॥—मोरोपंत.

टीप—-संकेतवाक्यांतही वरील अनेक अर्थीं प्रथमताख्याताचा उपयोग होतो. जसें:—( १ ) जर तूं अभ्यास **करितोस** तर तुला एकाही प्रश्नाचें उत्तर देतां येऊं नये; जरी तो मेहनत **करितो** तरी तो एकच पोळी **खातो**. इ०. येथें करितोस, करितो, खातो, या प्रथम ताख्याताचे रूपांचा रीतिवर्तमान हा अर्थ आहे हें उघड आहे. ( २ ) जर तुम्ही **विचारितां** तर **सांगतों**; जर तुम्हीं मुंबईस जात आहां तर चष्मा येथें कशाला घेतां ? इ०. येथें विचारितां ह्यानें वर्तमानकाळाचा आणि सांगतों व घेतां ह्यानें उद्देशाचा बोध होत आहे.

५०१. **द्वितीय ताख्यात** [ संकेतार्थ ] ह्याचा पुढील अर्थीं उपयोग होतो:--

[ अ ] **असिद्ध संकेत** [ भूत ]—एक गोष्ट दुसरीवर अवलंबून असून दुसरी न घडल्यामुळें पहिलीही घडली नाहीं असा अर्थ असतां. जसें:—त्यास जर वेळेवर औषध **पोचतें** तर तो खास **जगता**, गुदस्तां हस्त नक्षत्राचा जर एक पाऊस **पडता** तर सोळा आणे सोडून अठरा आणे पीक येतें, इ०.

[ आ ] **असिद्ध संकेत** [ भविष्य ]—-एखादी कल्पना घेऊन त्या कल्पनेप्रमाणें जर गोष्टी घडून येतील, तर अमुक अमुक परिणाम घडतील; असें निवळ कल्पनासृष्टींतील साक्षेप विधान करावयाचें असतां. जसें:— हिंवाळ्यांतल्यासारखें उन्हाळ्यांतही जर पाणी स्वाभाविक गार **मिळतें** तर किती बरें मौज **होती** ? इ०.

टीप १—यावरून असें दिसून येईल का, द्वितीय ताख्याताचा ज्या वाक्यांत उपयोग होतो त्यात ' जर–तर ' या किंवा यासारख्या उभयान्वयी अव्ययांचा उपयोग असावयाचाच. ह्यांपैकीं जर ह्याचा अध्याहारही होतो. जसें:—तूं काल येतास तर बरें होतें.

टीप २—द्वितीय ताख्यातास संकेतार्थ असें म्हणतात. याप्रमाणें वाख्यातास विध्यर्थ व ऊआख्यातास आज्ञार्थ असें म्हणतात. हीं तीन आख्यातें विशेषेकरून कोणताच काळ स्पष्टपणें दाखवित नाहींत. ह्या आख्यातांतील रूपांचा

तिन्ही काळीं उपयोग होतो. पण स्थलविशेषीं कोणत्या काळीं उपयोग झाला आहे, हें या आख्यातांचे रूपांवरून कळत नाहीं; तर केवळ पूर्वापर संबंधावरूनच. ठरवावे लागतें.

५०२. **लाख्यात** ( भूतकाळ )—ह्याचे अर्थ येणेंप्रमाणें:—

( अ ) **भूतकाळ**—धातूनें दाखविली जाणारी क्रिया बोलण्याचे किंवा लिहिण्याचे आधीं घडली असा अर्थ असतां, गतकालीन स्थिति वर्णन करावयाची असतां. जसें:—काल पाऊस **पडला,** त्यानें चांगला लौकिक **संपादिला,** तो दहा वाजतां **निजला,** या ठिकाणीं पूर्वीं घोर अरण्य होतें, इ०.

( आ ) **सन्निहित भविष्य**—तुम्ही पुढें व्हा, मी **आलोंच;** हें पहा माझें जेवण **झालेंच** म्हणून समजा; इ०. अशा ठिकाणीं विवक्षित क्रियेस कधीं आरंभ झालेला असेल किंवा नसेलही. जेवणास सुरवात झाल्यावर किंवा लौकरच सुरवात व्हावयाचीही असतां दुसऱ्या उदाहरणाचा उपयोग करितां येतो हें उघड आहे.

( इ ) **निःशंक भविष्य**—मी म्हणतों असें जर तुम्ही कराल तर तुमच्या धंद्यांत तुम्हांस यश **आलेंच** म्हणून समजा, तुम्ही हो म्हणण्याचा उशीर कीं मी **निघालोंच,** इ०.

( ई ) **असिद्ध संकेत**—ज्या संकेतवाक्यांत म्हणजे ज्या वाक्यांत 'जर—तर' यांचा उपयोग आहे त्या वाक्यांत, पूर्वामधील गोष्टीची शक्यता किंवा संभव दाखवावयाचा असतां. जसें:—तूं जर मुंबईस **आलास** तर मला भेटल्यावांचून जाऊं नको, यंदां पाऊस **पडला** तर ठीक, इ०.

( उ ) **प्रश्न**—एखाद्या विधानावर जोर देऊन तत्संबंधाचा प्रश्न करावयाचा असतां त्या विधानाचे बहुधा पुढें कळ, समज, पाह इ०. धातूंच्या लाख्याताचा प्रश्नार्थी उपयोग होतो. जसें:—ह्यांत कांहीं संशय नाहीं, **कळलें**? पण मी काय म्हणतों हें तूं **समजलास**? ही **पाहिली** का काय मौज आहे ती! इ०. अखेरच्या उदाहरणांत पाहिली का = पहा. येथें लाख्यातांतील प्रश्नाचा वर्तमानकाळीं नम्र आज्ञेच्या अर्थी उपयोग झाला आहे.

( ऊ ) **संकेत भविष्य**—ज्या संकेत वाक्याचे पूर्वामध्यें पुढें होणाऱ्या गोष्टीचा उल्लेख असून त्याचे अखेर ' म्हणजे ' किंवा ' कीं ' अव्यय येतें आणि त्या पूर्वांतील गोष्टीचे घडण्यावर उत्तरांतील गोष्ट अवलंबून असतें, त्या संकेतवाक्याचे पूर्वामध्यें भविष्यकाळाचे अर्थानें ह्या आख्याताचा उपयोग होतो. जसें:—तो **आला** म्हणजे मी जाईन, तो **गेला** कीं मला कळीव, तो **आला** म्हणजे तुला बोलवणें पाठवीन, इ०. येथें आला म्हणजे=येईल तेव्हां; गेला कीं=जाईल तेव्हां; इ०.

( ऋ ) **अपूर्व वर्तमान**—वर्तमान काळीं चालू असलेली क्रिया पूर्ण होण्याचे बेतांत आहे असा अर्थ असतां. जसें:—ही पहा गाडी **आली.** येथें आली म्हणजे येत आहे.

५०३. **वाख्यात** ( विध्यर्थ )—पुढील अर्थी या आख्याताचा उपयोग होतो:—

( अ ) **कर्तव्यें**—प्रत्येक मनुष्यानें ईश्वरास स्मरून **वागावें** ।
सत्यातें **जोडावें** सुज्ञें धर्मासि पळ न **सोडावें** ॥ — मोरोपंत.

( आ ) **शक्यता, योग्यता, सामर्थ्य** हें पद त्यानेंच **म्हणावें** किंवा **गावें**, व्यापार असा इंग्रजांनींच **करावा**, पुरणाची पोळी तिनेंच **करावी** इ०.

( इ ) **आश्चर्य, वैलक्षण्य, निराशा**—हे अर्थ वाख्यातानें प्रश्नार्थक वाक्यांत उत्पन्न होतात, जसें:—तुला काय **म्हणावें** ? त्या प्रसंगाचें शब्दांनीं काय वर्णन **करावें** ? अशा प्रसंगी माणसानें तरी काय **करावें** इ०.

( ई ) **उद्देश, हेतु**—त्या गूण **पडावा** म्हणून येथें आणिलें, मनुष्याची उन्नति **व्हावी** म्हणून त्याला ईश्वरानें बुद्धि ही अलौकिक देणगी दिली आहे, इ०.

( उ ) **रीतिभूत**—त्यानें तिला एकसारखें मारीत **सुटावें** व शिव्या **द्याव्या**, तूं लहानपणीं नित्य **रडावेंस**, इ०.

( ऊ ) **भविष्यसंभव**—भविष्यकाळची संभवनीय गोष्ट, तर्क, किंवा अंदाज दाखवावयाचा असतां जसें:—उद्यां त्याचें पत्र **यावें**, आज बहुधा पाऊस **पडावा**, चीन देशांत लौकरच जागृति **व्हावी** असें दिसतें, इ०.

( ऋ ) **इच्छा, मनोरथ**—आपणास पुत्र **व्हावा**, तो या संकटांतून **सुटावा** अशी सर्वांची इच्छा आहे, इ०.

( ऌ ) **प्रार्थना, आर्जव, विनंति**—आपण मेहेरबानीनें माझ्या या नम्र विनंतीस मान **द्यावा**, पत्राचें उत्तर जरूर **पाठवावें**, इ०.

( ए ) **मृदु आज्ञा** किंवा **अनुज्ञा**—आतां आपण **जावें**, आपण **चलावें** मी आलोंच, इ.०

( ऐ ) **प्रश्नपूर्वक भूत**—आश्चर्यद्योतक किंवा प्रश्नार्थक वाक्यांत निवळ भूतकाळाचा अर्थ असतां. जसें—तुमच्या हातून हें कसें **व्हावें** ( झालें ) हें मला समजत नाहीं, त्यानें शिव्या **द्याव्या** ( दिल्या ) हें मोठेंच आश्चर्य होय. इ०.

( ओ ) **आवश्यकता, अपरिहार्यता**—अशा दुष्काळांत उपाशीं मरणाऱ्या गरिबांनीं चोरी न **करावी** तर काय **मरावें**, अशा स्थितींत जगण्यापेक्षां जीव **द्यावा**, इ०.

( औ ) **प्रश्न**—कोणत्याही बाबतींत दुसऱ्यास कांहीं विचारावयाचें असतां. जसें:—आतां मीं काय **करावें** ( करूं ) तें मला सांगा, तो असें म्हणतो त्यास मी काय जबाब **द्यावा** ( देऊं ), इ०.

( अं ) **वर्तमान, भूत** किंवा **भविष्य संभव**—तो या वेळेस कचेरींत गेला **असावा**, तो या कटांत सामील **असावा**, तो कालच्या सभेस हजर **असावा**, इ०.

( अः ) संकेतवाक्यांतही ह्या आख्याताचा कधीं कधीं उपयोग होतो. जसें:—जर त्यानें जावें तर मीही कां न जावें, जर मीं जावें तर तूंही चल, इ०.

५९४. **ईआख्यात** ( रीतिभूत )—ह्या आख्याताचे उपयोग पुढें दिल्याप्रमाणें:—

( अ ) **वर्तमान**—कवितेंत या आख्याताचा वर्तमानकाळाचे अर्थानें उपयोग होतो. तथापि हा उपयोग केवळ जुन्या कवितेंतच येतो असें नसून नवीन आधुनिक कवितेंतही हा उपयोग प्रचारांत आहे. म्हणून यास जुना वर्तमानकाळ हें नांव योग्य नाहीं. तेव्हां यास वाटेल तर ‘ पद्यवर्तमान ’ असें म्हणावें. जुनीं, नवीं उदाहरणें:—

तुका म्हणे माझ्या जीवा ॥—तुकाराम.

स्नेहकरी हृष्ट करी तर्पी रक्षी सदैव संमानीं ॥

पावे सुखें सुखहि तें मित्र असें म्हणति सर्वही ज्ञानी ॥—मोरोपंत.

सज्जन संचय करिती केवळ दुःखितदुःख हराया ॥—कृष्ण० चिपळूणकर

विश्वातें करिसी जो त्या सदया ईश्वरा नमीं तूंतें ॥—भा० दा० पाळंदे.

उतरे चढे हि वर्षे गर्जे पाडी घनांधकारातें ॥

प्राप्तनवश्री पुरुषापरि मेघ धरी अनेक रूपांतें ॥ परशु० तात्या गोडबोले.

नांवावरीच भुलती जनरीति ऐशी ॥ —पां० गो० शास्त्री पारखी.

अतिशीत शुक्ल ज्यावरि वाहति वारिप्रवाह चोंहिकडे ॥

जणों मुक्ताहारा घालिती कंठीं हिमाद्रिचेहि कडे ॥ बापुसा० कुरुंदवाडकर.

माता तशी स्वभाषा सेवाया होय आपणां उचित ॥

किंबहुना मातेहुनि अधिक हिची योग्यता असे खचित ॥ गं० रा० मोगरे.

नसती भिन्न रस हे । शृंगारराजा नवदल त्याला ॥ सकला किरणरंगा दावी

इंद्रधनुषीं जननयनाला ॥ प्रेमभावें जीव जगिं० ॥ मानापमान खाडीलकर.

(आ) **रीतिभूत**—या अर्थी ईआख्याताचा उपयोग गद्य व पद्य या दोहोंत आढळतो. जसें:— तो आपला काळ नेहमीं नामस्मरणांत घालवी,

भोजन दे चोराला, आदर आग्रह करी स्वयें मोठा ॥

साधु प्रसन्नचित्तें बांधुनि लागे वहावया मोठा ॥ मोरो० एकनाथावर.

(इ) **भूत**—पद्यांत ह्याचा निवळ भूतकाळींही उपयोग होतो. जसें:—

बहु सांत्वन धर्म करी न शमे न वळे परंतु तो चैद्य ॥—मोरोपंत.

भेटोनि तितिक्षेचे गुण **सांगे** साधु बाप तनयेतें ॥—मोरोपंत.

(ई) **क्रियासंतति**—सुरू असलेल्या क्रियेची प्रगति किंवा समाप्ति दाखविण्याकरितां या आख्याताचा उपयोग तिन्ही काळीं होतो; आणि त्यावेळीं त्याचे पुढें **ना, पर्यंत, तों, तोंपर्यंत, पावेतों,** हे शब्द येतात.

जसें:—करीना, वाचींना, माझें जेवण होईपर्यंत, तो प्राण जाईपर्यंत लढला, उद्यां सूर्य मावळेपर्यंत ये, इ०.

( उ ) **रीतिभूत संभव**—संकेतवाक्यांतील पूर्वामध्यें भूतकालीन संभव दाखवावयाचा असतां ह्या आख्याताचा उपयोग होतो. जसें:—जर तो अभ्यास करी तर त्याला एकही गुण मिळूं नये? जर तूं त्याचे घरीं जास, तर तुला त्याचा भाऊ कधीं तरी दिसला पाहिजे होता, इ०.

**टीपः**—या आख्याताचा वर्तमान ( अ ) अर्थ असतां द्वि० पु० ए० वचनीं व तृ० पु० अ० वचनीं त्याच्या प्रत्ययांत जो थोडासा फरक पडतो, तो स्मरणीय आहे. [ अंक ३८० ( औ ) पहा. ]

४०५. **ऊआख्यात** ( आज्ञार्थ )—ह्याचे उपयोग व अर्थ असे:—

( अ ) **अनुमोदनप्रश्न**—प्रथम पुरुषीं दोन्ही वचनीं इच्छापूर्वक प्रश्न विचारण्याचे कामीं याचा उपयोग होतो. जसें:—मी **जाऊं**? आम्ही **खेळूं**? या ठिकाणीं, माझी जाण्याची व आमची खेळण्याची इच्छा असून तिला दुसऱ्याची संमति, अनुज्ञा, किंवा परवानगी मिळण्यासाठीं त्याल प्रश्न विचारिला आहे, असा अर्थ आहे.

( आ ) **सौम्य आज्ञा**—प्रथम पुरुषीं दोन्ही वचनीं कधीं कधीं इच्छा पूर्वक सौम्य आज्ञेचाही अर्थ असतो. जसें:—**पाहूं** बरें तुझें अक्षर कसें आहे तें. पाहूं=माझी पहाण्याची इच्छा असून तूं मला दाखवावें. आतां आपण फिरावयास **जाऊं**. जाऊं = जाण्याची माझी इच्छा असून तुम्हीं माझ्याबरोबर चलावें.

( इ ) **आज्ञा, उपदेश**—द्वितीय पुरुषीं बहुधा आज्ञा, हुकूम, हा अर्थ असतो. जसें:—**वाच** पुढें, मुलांनो लिहावयास **बसा**, वेळेवर शाळेंत **जा**, इ०.

( ई ) **प्रार्थना**,—द्वितीयपुरुषाच्या रूपांचा असाही अर्थ असतो. जसें:—हे राजा, माझें संकट निवारण **कर**; महाराज, मज गरिबावर दया **करा**;

हेंचि दान **दे** गा देवा ॥ तुझा विसर न व्हावा ॥ —तुकाराम.

तुका म्हणे व्हाल, ऐकत करुणा । तरी नारायणा, उडी **घाला**।—तुका.

(उ) **आग्रहपूर्वक विनंति**—बरोबरीच्या लोकांस, किंवा एकंदर जनसमूहास आग्रहाची विनंति करावयाची असतां या आख्याताचे द्वि० पु० वाचक रूपांचा उपयोग होतो. जसें:—**चला, उठा,** उद्योगास **लागा.**

जन हो मन **मुंडा** मन **मुंडा**। व्यर्थ मुंडितां मुंडा ॥ जन हो मन०॥

(ऊ) **संमति प्रत्यवायाभाव,**—कोणी मनुष्य कांहीं करीत असतां त्यास आपली संमति असली, किंवा निदान हरकत नसली, किंवा आपणांस तत्संबंधीं औदासिन्य दाखवावयाचें असतां या आख्याताचे तृतीय पुरुषाचा उपयोग होतो. जसें:—तो **जाऊ** अ० **जावो,** ते **खेळोत,** ते मेले तर **मरोत** आम्हांला काय त्याचें, इ०

(ऋ) **सदिच्छा, आशीर्वाद, शाप**—ह्या अर्थींही तृतीय पुरुषाच्या रूपांचा उपयोग होतो. जसें:—

**वसो** नृपतिच्या मनीं सदयता समा बुद्धि ती
प्रजाजनहिं सूद्यमें **करुत** आत्मदेशोन्नति ॥—किर्लोस्कर.
नृपति म्हणे तरि सुंदरि सुदति सुदतिशय तुला मला हि **घडो**
सत्कृतिशीं रसिकांची तुजशीं माझी तशीच गांठि **पडो** ॥—मोरोपंत
त्याचा संग नको मजलागीं ॥ त्याच्या तोंडा **लागो** आगी ॥ आनंदतनय

(ऌ) **संकेतार्थीं उपदेश**—संकेतवाक्यांतील पूर्वामध्यें या आख्याताच्या द्वितीय पुरुषाचा उपयोग होतो. ‘ जर—तर ’ हीं संकेतदर्शक उभयान्वयी अव्ययें **न** येतां ‘ म्हणजे, ‘ **व** ‘ कीं ’ ह्यांचा उपयोग होतो. जसें:—तुम्ही भक्तीनें ईश्वरास **आळवा म्हणजे,** तो तुम्हांस पावल्यावांचून राहणार नाहीं. तुम्ही मनापासून यत्न **करा कीं,** ईशकृपेनें सिद्धि ठेवलेलीच आहे; इ०. येथें आळवा म्हणजे = जर आळवाल तर, करा कीं = जर कराल तर; म्हणून तुम्ही तसें करावें—आळवावें व यत्न करावा, असा अर्थ आहे.

५०६. **ईलाख्यात** ( भविष्यकाळ )—ह्याचे अर्थ येणेप्रमाणें:—

(अ) **भविष्यकाळ**—आज पाऊस **पडेल,** पुढल्या वर्षीं दत्तूची मुंज **होईल,** ते उद्यां **जातील,** इ०.

(आ) **संमति, अनुकूल इच्छा**—प्रथमपुरुषीं या आख्यातानें वक्त्याचें अनुमोदन किंवा क्रिया करण्याची तयारी दाखविली जाते.

जसें:--तुमच्या म्हणण्याप्रमाणें मी **वागेन—करीन**, इ०. तुम्ही भिऊं नका मी त्याचा बंदोबस्त **करीन**; तुम्ही सामान इकडे आणा आम्ही तें नीट **लावूं**, इ०.

( इ ) **शक्यताशक्यता, औचित्यानौचित्य**—प्रश्नार्थक वाक्यांत ह्या आख्याताचा या अर्थी उपयोग होतो. जसें:—तो तेथें कसा **जाईल** ? मी कां **पळेन** ? तो कां नुकसान **सोशील** ? तो असल्या फंदांत किंवा भानगडींत कशास **पडेल** ? सर्वच लोक विद्वान् कसे **होतील** ? इ०.

( ई ) **संकेत**—संकेतवाक्यांतील पूर्वामध्यें या अर्थी ईलाख्याताचा उपयोग होतो. जसें:—तुम्ही त्याला औषध **द्याल** तर तो तुमचे आभार जन्मभर विसरणार नाहीं; मला एवढी मदत **देशील** तर पहा, किंवा फार बरें होईल; इ०.

( उ ) **औदासीन्य**—पुढें घडणाऱ्या गोष्टीबद्दल औदासीन्य, निष्काळजी, किंवा बेपर्वाई, दाखवावयाची असतां संकेतवाक्यांतील पूर्व व उत्तर या दोन्ही वाक्यांत एकाच धातूचा या आख्यातीं उपयोग होतो; किंवा पूर्वांत हें आख्यात येऊन उत्तरांत बहुधा ऊआख्यात येतें. [ अंक ४९५ ( ऊ ) पहा. ] जसें:—ते या रस्त्यानें **जातील** तर **जातील** किंवा **जावोत**, तूं **रागावशील** तर **रागावशील** किंवा **रागाव**, इ०.

टीप—उत्तर वाक्यांतही ईलाख्यांत असतां कधीं कधीं नुसत्या संभवाचाही अर्थ निष्पन्न होतो. जसें:—ते **जातील** तर **जातील** काय सांगावें, इ०. या संभवार्थी पूर्वामध्येंमात्र लाख्याताचा उपयोगही बहुधा होतो. जसें:—मी **गेलों** तर जाईन, इ०.

( ऊ ) **विनंति**--प्रश्नार्थक वाक्यांत या अर्थी इलाख्यात येतें, जसें:—तुम्ही माझ्या म्हणण्याकडे जरासें लक्ष **द्याल** काय ? माझें एवढें काम **कराल** का ? इ०.

( ऋ ) **संभव**—जसें:—कोणी तरी यास बरें करणारा **भेटेल**, कसें तरी मला पोटास **मिळेल**, त्याची माझी कधीं तरी गांठ **पडेल**, इ०.

( ऌ ) **संशय**—अस धातूच्या या आख्याताचा कोणत्याही काळचा संशय, किंवा संभव दाखविण्याचेच कामीं उपयोग होतो; जसें:—तो आतां दवाखान्यांत **असेल**; प्रश्न—त्यास दम्याचा विकार होता काय ? उत्तर—**असेल**, इ०.

[ यावरून प्रत्येक आख्याताचे अर्थ व उपयोग किती आहेत आणि प्रत्येक आख्यात निरनिराळ्या काळीं व अर्थीं कसें उपयोगांत येतें, हें वाचकांचे नजरेस आलेंच असेल. यामुळें आख्यातांस असलेलीं प्रचलित नांवें कशीं असमाधानकारक व एकदेशी आहेत हें उघड होईल. बाकी इतकें खरें कीं, प्रचलित नांवें कांहीं सर्वथा अयोग्य नव्हत; त्यांनीं त्या त्या आख्याताचा एक विशेष अर्थ किंवा उपयोग सूचित होतो यांत संशय नाहीं. तसें नसतें तर तीं प्रथम उपयोगांतही आलीं नसतीं, आणि त्यांचा प्रसारही झाला नसता. त्यांनीं कसा तरी निर्वाह होत आहे. इंग्रजी भाषेंत तीं अधिक योग्य आहेत; व इंग्रजींतूनच मराठींत तीं आलेलीं आहेत. तेव्हां इंग्रजीच्या अभ्यासास त्यांचा मराठींतला उपयोग कमी पडतो हें खरें. तथापि मराठींत हीं नांवें योग्य दिसत नाहींत, हें मागल्या अंकावरून स्पष्टच आहे आणि पुढील विवेचनावरून आणखी स्पष्ट होईलच. तेव्हां संस्कृत परिभाषेस अनुसरून व विभक्तींच्या नांवाचा नमुना पाहून या ग्रंथांत जीं केवळ चिन्हमय नांवें दिलीं आहेत, त्यांची श्रेष्ठता, इष्टता, सुलभता, व उपयुक्तता वाचकांचे नजरेस आल्यावांचून राहणार नाहीं. तथापि आरंभीं आरंभीं जुन्या नांवांचा विकल्पानें उपयोग करण्यास हरकत नाहीं. आतां कांहीं धातूंच्या विशेष अर्थांकडे व उपयोगाकडे वळूं. ]

५०७. अस धातूचीं वर्तमानकाळीं तीन प्रकारचीं रूपें होतात असें म्हणतात. तीं, असतो, आहे, व होय, हीं होत. ह्या रूपांचा वर्तमान काळाचे अर्थानें उपयोग होतो ह्यांत संशय नाहीं. परंतु हीं तिन्ही एकाच आख्याताचीं रूपें नव्हत, म्हणजे एकच आख्यातप्रत्यय लागून झालेलीं रूपें नाहींत, हें मागील विकरणप्रकरणावरून समजेलच. राम, रामानें, रामाला, ह्या तीन रूपांचा जरी एकाच अर्थानें—कर्ता म्हणून—उपयोग झाला तरी तीं एकाच विभक्तीचीं रूपें नव्हत, त्यांस भिन्न भिन्न विभक्तिप्रत्यय लागलेले असल्यामुळें जर प्रथमा, तृतीया, व चतुर्थी, अशीं निरनिराळीं नांवें द्यावयाचीं, तर असतो, आहे, व होय, हीं जरी एकाच काळार्थानें येत असलीं तरी भिन्न प्रत्ययान्त असल्यामुळें आणि त्यांचे अन्य अर्थ व उपयोगही भिन्न असल्यामुळें त्यांस एकच नांव देणें म्हणजे तीं एकाच आख्याताचीं रूपें होत असें म्हणणें योग्य नाहीं. ह्या गोष्टी आतां वाचकांचे नजरेस चांगल्या आल्या असतीलच. तेव्हां आतां पुढें जाऊं.

असतो, आहे, व होय हीं जरी वर्तमानकाळाचे अर्थानें येत असलीं, तरी असतो हें एकच रूप प्रथमताख्याताचें ( वर्तमानकाळाचें ) आहे;

आणि आहे व होय हीं रूपें ई—आख्याताचीं ( रीतिभूतकाळाचीं किंवा पक्षवर्तमानकाळाचीं ) आहेत. शिवाय आहे ह्यांत अस धातु मानितां येत नाहीं, हें आतां विद्वज्जनमान्य झाल्यासारखेंच आहे. आणि होय ह्यास आमच्या वैयाकरणांप्रमाणें अस धातूचा वर्तमान कां म्हणावें हेंच आम्हांस समजत नाहीं. हें वास्तविक हो धातूचें रूप होय, हें सूर्यप्रकाशाइतकें स्पष्ट असतां मराठी वैयाकरणांस व त्यांजबराबर आम्हांस इतके दिवस कशी भुरळ पडली ईश्वर जाणे!

त्याचप्रमाणें झाला आणि होता हीं हो धातूचीं भूतकाळाचीं रूपें होत असें कांहीं वैयाकरण म्हणतात; तर दुसरे कांहीं असें म्हणतात कीं होता हें अस धातूचा भूतकाळ आहे! या ग्रंथांत पूर्वीं दिलेल्या धातुरूपावलीवरून असें निर्विवाद सिद्ध आहे कीं, झाला हें हो धातूचें लाख्यात ( भूतकाळ ) होय; आणि होतो हें हो धातूचें प्रथमताख्यात ( वर्तमानकाळ ) आणि होता हें हो धातूचें द्वितीयताख्यात ( संकेतार्थ ) होय. होता ह्याचा भूतकाळाचे अर्थानें उपयोग होतो हें खरें. तथापि झालों, केलें, पडलों, पढलों, इत्यादि रूपांस ज्या दृष्टीनें भूतकाळाचीं रूपें असें म्हणतात, त्या दृष्टीनें होता यास भूतकाळाचें रूप म्हणतां येत नाहीं; म्हणजे भूतकाळाचे म्हणून जे प्रत्यय आमच्या वैयाकरणांनीं दिलेले आहेत, त्यांपैकीं एकही प्रत्यय ‘ होता ’ या रूपांत दिसत नाहीं हें एक पोरही सांगू शकेल. होता ह्याचा उपयोग भूतकाळीं म्हणजे भूतकाळाचे अर्थीं होतो, म्हणून त्यास जर भूतकाळाचें रूप असें म्हणावयाचें तर सूत शौनकास सांगतो, तो काळ येता तर बरें होतें, त्यानें शिव्या द्याव्या हें मोठेंच आश्चर्य होय, नृपति म्हणे, इत्यादि वाक्यांतील सांगतो, येता, द्याव्या, म्हणे, हींही सर्व भूतकाळाचींच रूपें होत! एवंच परिभाषा सदोश असल्यामुळें म्हणजे तींत रूप आणि अर्थ ह्यांचा घोटाळा केला असल्यामुळें वरील गैरसमज उत्पन्न झाला आहे हें उघड आहे.

आतां असतो हें अस धातूचें वर्तमानकाळाचें रूप होय, असें बहुतेक सर्व वैयाकरण म्हणतात. पण ह्यासंबंधानें गोडबोले काय म्हणतात तें पहा:—‘ अस धातूस पूर्वोक्त वर्तमानकाळाचे प्रत्यय ( तो, तात, इ० ) लावून जीं रूपें होतात त्यांनीं रीतीचा बोध होतो, म्हणून ती रीतिवर्त-

मानकाळाचीं रूपें होत. जसें:--हा मुलगा आपल्या वर्गांत पहिला **असतो**, पण आज दहावा **आहे**. ह्यावरून गोडबोले ह्यांचे मतें '**आहे**' हा वर्तमानकाळ आणि '**असतो**' हा रीतिवर्तमान, आणि इतरांचें मतें 'असतो' हा वर्तमान आणि 'असत असतो' हा रीतिवर्तमान होय. तात्पर्य, ह्या आख्यातप्रकरणांत आमच्या वैयाकरणांनीं विभक्तिप्रकरणांतल्या पेक्षांही अधिक गोंधळ व्यर्थ माजविला आहे, हें उघड आहे. ह्या सर्व बीज सदोष परिभाषा हें होय.

५०८. आहे आणि असतो हीं दोन्हीं रूपें मूळ संस्कृत अस् धातूचीं होत. परंतु मराठींत आहे यांत अस धातु मानितां येत नाहीं, तर आहे असा धातु मानावा आणि आहे हें त्या धातूचें ईआख्यात होय हें पूर्वींच सांगितलें आहे. त्याचा नेहमीं वर्तमानकाळाचे अर्थीं उपयोग होतो. तसेंच 'असतो' हें अस धातूचें प्रथमताख्यात असून त्याचाही वर्तमान-काळीं उपयोग होतो. तथापि आहे व असतो ह्यांचे अर्थांत् फरक आहे. 'आहे' ह्यानें वर्तमानकाळीं असणें ह्या क्रियेचें घडणें म्हणजे 'अस्फुट अस्तित्व' दाखविलें जातें; अर्थात् 'आहे' यानें असण्याची क्रिया कोणत्या विशेष स्थितींत आहे ह्याचा स्फोट म्हणजे खुलासा होत नाहीं. पण 'असतो' यानें असण्याच्या क्रियेची रीति, चाल, प्रचार, सातत्य, इ० दाखविण्यांत येतें, यांत संशय नाहीं. म्हणून **आहे** या ईआख्याताचा **अस्फुट वर्तमान**, आणि '**असतो**' या प्रथमताख्याताचा '**रीतिवर्तमान**' असा अर्थ आहे हें उघड आहे. असतो ह्यामधील अस ह्या धातूंतच रीतीचा अर्थ असल्यामुळें इतर धातूंस रीति, चाल, प्रचार, इत्यादि अर्थ देण्याचे कामीं त्याचा उपयोग होतो. त्याबद्दल सविस्तर खुलासा पुढें संयुक्तक्रियापदांचे विवेचनांत येईल. 'असता' ह्याचा वास्तविक अर्थ 'रीतिवर्तमान' हा असल्यामुळें जरी गोडबोल्याशिवाय इतर वैयाकरणांनीं इतर धातूंच्या रूपांप्रमाणें अस धातूचेंही 'असत असतो' असें रीतिवर्तमानकाळाच्या अर्थाचें रूप बळेंच बनविलें आहे, तरी त्याचें अस्तित्व भाषेंत कोठें आढळूं नये यांत आश्चर्य नाहीं. असणें ह्या धातूच्या अस्फुट वर्तमान या अर्थीं आहे हें आहे धातूचें ईआख्याताचें रूप येतें आणि रीतिवर्तमानकाळाचे अर्थीं असतो हें प्रथमताख्याताचें रूप येतें. आणि रीतिवर्तमानाचे अर्थीं वैयाकरणप्रणीत 'असत असतो' या रूपाची

जरूर नाहीं व भाषेंत त्याचा व्याकरणग्रंथांशिवाय इतर कोठेंही प्रचार आढळत नाहीं.

५०९. **हो** धातु—ह्या धातूच्या आख्यातरूपांचा धातूंच्या साधारण आख्यातरूपांप्रमाणें उपयोग होतोच; पण ह्याच्या फक्त द्वितीयताख्याताचा एक विशेष उपयोग आहे, तेवढा येथें सांगतों. होतों, होतास, होता, इ० जीं ह्या हो धातूचीं द्वितीय ताख्याताचीं रूपें आहेत, त्यांचा सर्वसाधारण उपयोग होऊन शिवाय एक विशेष उपयोग आहे. आहे ह्यांतील आहे धातूचीं ई आख्याताशिवाय अन्य आख्यातांचीं रूपें होत नाहींत. अस धातूचीं [ असला, असलीं, असलें, इ० ] लाख्याताचीं रूपें मिळतात. परंतु अस धातूंत रीतीचा अर्थ सन्निविष्ट असल्यामुळें 'आहे' या निवळ वर्तमानार्थास अनुरुप असें अस धातूचें भूतकाळार्थीं रूप मिळत नाहीं. म्हणून भूतकाळाचे निवळ अस्तित्वाचे अर्थानें होतों, होतास, होता, इ० हो धातूच्या द्वितीयताख्याताचे रूपांचा प्रयोग होतो. म्हणजे होतों, होतास, होता, इ०, हो धातूच्या द्वितीयताख्याताचे रूपांत हो धातूचा अन्यत्र आढळणारा अर्थ जाऊन त्यास निवळ अस्तित्वाचा अर्थ आला आहे; आणि झाला, झाली, झालें, या ला-ख्याताचे [ भूतकाळाचे ] रूपांत हो धातूचा नेहमींचा बनणें हा अर्थ दिसतो आहे. म्हणजे 'आहे' ह्या वर्तमान अर्थास 'होता' ह्या द्वितीयताख्याताचे रूपाचा भूतार्थ अनुरूप म्हणजे साजेसा आहे; आणि 'झाला' ह्याचा भूतार्थ 'होतो' या हो धातूच्या प्रथमताख्याताचे वर्तमानार्थीं साजेसा आहे, हें उघड आहे.

५१०. **नाहीं**—हें क्रियापद 'आहे' ह्याचें विरोधी किंवा निषेधक आहे. आहे आणि नाहीं हीं दोन्ही ई—आख्याताचीं रूपें आहेत. आणि आहे हें जसें अस्फुट वर्तमानाचे अर्थीं उपयोगांत येतें म्हणून वर सांगितलें, त्याचप्रमाणें नाहीं हें अस्फुट वर्तमानाचे निषेधार्थीं उपयोगांत येतें. जसेः—मी श्रीमंत नाहीं, तो मूर्ख नाहीं, तूं धीट नाहींस, ते हुषार नाहींत, इ०.

५११. **नहो** धातु—याचीं दोन आख्यातीं रूपें आढळतात. द्वितीयताख्यातीं नव्हता, वगैरे; आणि ई—आख्यातीं नव्हे, वगैरे.

[ अ ] नव्हता—हें होता याचें विरोधी. दोहोंचे अर्थ द्वितीयताख्याताच्या साधारण अर्थाप्रमाणेंच समजावे.

(आ) **नव्हे**—हें होय ह्याचें विरोधी. होय हें जसें अस्फुट वर्तमानार्थीं येतें, त्याचप्रमाणें नव्हे या ई-आख्याताचाही त्या अर्थाचा निषेध करण्याचे कामीं उपयोग होतो. जसें:—हें रामाचें घर होय—हें रामाचें घर नव्हे, इ०.

५१२. **नस** धातु—अस धातूचे पाठीमागें न येऊन पररूपसंधीनें हा निषेधक धातु झाला आहे. हा सर्व आख्यातीं असप्रमाणेंच चालतो. आणि ह्याचा अर्थ अस धातूच्या अर्थाचा सर्वत्र निषेध करितो.

५१३. **पाहिजे**—ह्याचा उपयोग येणेंप्रमाणें:—

(अ) **वर्तमान** अपेक्षा—मला आंबा **पाहिजे**, त्याला हें पुस्तक **पाहिजे**, इ०.

(आ) **भविष्यकालीन** अपेक्षा:—मला उद्यां दोन रुपये **पाहिजेत**, जाधळ्यास ह्यापुढें आणखी एक पाऊस **पाहिजे**.

(इ) पाहिजेल असें ह्याचें जें एक ईलाख्यातीं रूप आढळतें त्याचा संकेतवाक्याचे पूर्वामध्यें **वर्तमान** व **भविष्यकालीन** अपेक्षा या अर्थीं उपयोग होतो. जसें:—तुला **पाहिजेल** तर तूं जा, त्याला **पाहिजेल** तर तो जाईल, इ०.

टीप—पाहिजे ह्याच्या अर्थीं हो धातूच्या वाख्याताचे—व्हावा, हवा इ०. रूपांचा उपयोग होतो हें पूर्वीं सांगितलेंच आहे.

५१४. **नको**—हें पाहिजे ह्याचें निषेधक होय. ह्याचे उपयोग पाहिजे ह्याच्या उपयोगांप्रमाणेंच समजावे.

५१५. **नये**—हें ये धातूच्या ई-आख्याताचें निषेधक आहे. नये ह्याचा मुख्य क्रियापदाप्रमाणें प्रचलित भाषेंत फारसा उपयोग होत नाहीं. संयुक्त क्रियापदामध्यें होणारा याचा उपयोग पुढील अध्यायांत पहावा.

५१६. **नलगे**—हें पाहिजे ह्याच्या निषेधक अर्थानें येतें. अर्थात् नलगे आणि नको ह्या दोहोंचा अर्थ व उपयोग बहुधा एकच. तथापि नलगे हें नकोपेक्षां अधिक जोरदार आहे असें दिसतें.

येथें आख्यातरूपांचे अर्थ व उपयोग संपले. अर्थात् वाक्यामध्यें कोणत्याही धातूचें स्वतंत्रपणें, एकाकी, असहाय, किंवा संयुक्त रूप कोणतेही आख्यातप्रत्यय लागून झालेलें असो, त्याच्या अर्थाबद्दलचें व उप-

योगाबद्दलचें विवेचन पूर्ण झालें. आतां पुढील अध्यायांत संयुक्तक्रियापदांचें विवेचन हातीं घेऊं.

---

# अध्याय २.

## संयुक्तक्रियापदें.

५१७. धातूंच्या कांहीं विशेष कृदन्तांपुढें कांहीं धातूचीं आख्यातरूपें येऊन जीं क्रियापदें बनतात, त्यांस **संयुक्तक्रियापदें** असें म्हणतात. जसें:—**करित आहे, करूं नको, केलें होतें**, इ०. या ठिकाणीं करित, करूं, आणि केलें, हीं कृदन्तें असून ह्यांचे पुढें आहे, नको, होतें, हीं क्रियापदें आलेलीं आहेत; आणि कृदन्त + आख्यातरूप, मिळून संयुक्त-क्रियापद तयार झालें आहे. संयुक्तक्रियापदांत मुख्य क्रियेचें कृदन्त असतें; आणि गौण क्रियेचें आख्यात असतें. म्हणजे कृदन्तांतील धातु **मुख्य धातु** होय आणि आख्यात रूपांमधील धातु हा **सहायधातु** होय.

५१८. एकाद्या धातूच्या कृदन्तापुढें सहाय म्हणविल्या जाणाऱ्या धातूचें आख्यात रूप आलें म्हणजे नेहमींच संयुक्तक्रियापद होतें असा नियम नाहीं. ‘त्यानें हें सबंध पुस्तक लिहून काढिलें’ या वाक्यांत मुख्य क्रिया किंवा धातु **लिहिणें** आहे आणि **काढणें** नाहीं; म्हणून ‘लिहून काढिले’ हें संयुक्तक्रियापद होय परंतु ‘त्यानें हे आंबे झाडावर चढून काढिले’ या वाक्यांत ‘चढून काढिले’ हें संयुक्तक्रियापद नाहीं. या वाक्यांत आंबे हें कर्म काढ धातूचें आहे; चढ धातूचें नाहीं. कारण चढ धातु मुळीं अकर्मक आहे. तेव्हां ‘चढून’ हें ऊनकृदन्त केवळ पूर्वकालार्थीं अव्ययाप्रणें उपयोगांत आलें असून ‘काढिलें’ हेंच एकेरी मुख्य क्रियापद आहे, हें उघड आहे. ज्या ठिकाणीं सहायधातूप्रमाणें उपयोगांत येणाऱ्या धातूनें दाखविली जाणारी क्रियाच मुख्य क्रिया असते, त्या ठिकाणीं त्या धातूचें आख्यातरूप जरी दुसऱ्या एकाद्या धातूच्या कृदन्तापुढें आलें असलें, तरी तेथें संयुक्तक्रियापद मानितां येत नाहीं. अर्थात् कृदन्तांतील धातूनें दाखविली जाणारी क्रिया मुख्य असून आख्यात-

रूपांतील धातूचा केवळ गौणत्वानेंच म्हणजे मुख्य क्रियेच्या अर्थास साहाय्य होण्याकरितांच उपयोग झालेला असतो, तेव्हांच कृदन्त व आख्यात ह्यांचे संयोगापासून संयुक्तक्रियापद होतें. एवंच हा प्रश्न वाक्यांतील अर्थावर अवलंबून असून तो जेथल्या तेथेंच सोडविला पाहिजे.

५१९ संयुक्तक्रियापदामध्यें मुख्य धातूचें कृदन्तरूप आणि सहायधातूचें आख्यातरूप ह्यांचा संयोग झालेला असतो, हें वर सांगतलेंच आहे. संयुक्तक्रियापदाचें आख्यात सहायधातूच्या आख्यातावरून ठरतें, आणि मुख्य धातूच्या कृदन्तावरून मुख्य धातूनें दाखविल्या जाणाऱ्या क्रियेची स्थिति समजते. म्हणजे सहाय धातूचें जें आख्यात तेंच सबंध संयुक्तक्रियापदाचें आख्यात होय. आणि मुख्य क्रियेची स्थिति कधीं कधीं केवळ मुख्य धातूचे कृदन्तावरून आणि कधीं कधीं मुख्य धातूचें कृदन्त आणि सहाय धातूचा अर्थ ह्या दोहोंवरून समजते; म्हणजे संयुक्त क्रियापदाचा एकंदर अर्थ समजावयास मुख्य धातूच्या कृदन्ताचा अर्थ, सहायधातूचा अर्थ, आणि सहाय धातूचे आख्याताचा अर्थ, इतक्या गोष्टी ध्यानांत घेतल्या पाहिजेत. पैकीं आख्यातांचा अर्थ गेल्या अध्यायांत आलाच आहे. कृदन्ताचे अर्थही व्युत्पत्तिकरणांत आलेच आहेत. तथापि संयुक्त क्रियापदाचे कामीं बहुधा कोणकोणत्या कृदन्तांचा कधीं कधीं उपयोग होतो, हें सांगितलें पाहिजे आणि सहायधातु कोणते व त्यांचे विशेष अर्थ काय हेंही सांगणें अवश्य आहे. तेव्हां प्रथम संयुक्त क्रियापदांगभूत कृदन्तांकडे वळूं व नंतर सहायधातु हातीं घेऊन अखेरीस ह्यांच्या संयोगापासून कोणकोणतीं संयुक्तक्रियापदें तयार होतात तें पाहूं.

५२०. **संयुक्तक्रियापदांगभूत कृदन्तें** व त्यांचे येथील प्रधान अर्थ खालीं दिल्याप्रमाणें:—

**त-कृदन्त**—करित, देत, घेत, इ०. अर्थ—**अपूर्णक्रियाद्योतक.** हें अव्यय आहे.

**ता-कृदन्त**—करता, देता, घेता, इ०. अर्थ—**कर्तृवाचक** म्हणजे क्रियेचा कर्ता दाखविणारें. हें आकरान्त विशेषण असून त्यास आकारान्त विशेषणांचे नियम लागू आहेत.

**तां-कृदन्त**—करितां, देतां, घेतां, इ०. अर्थ—**क्रियावाचक,** म्हणजे प्रकृत क्रियेच्या बाबतींत किंवा विषयांत. वरील त कृदन्तासच अधिकरणवाचक आं हा प्रत्यय लागून प्रस्तुत कृदन्त साधलें आहे. हें अर्थातच अव्यय आहे.

**ला-कृदन्त**—केला, दिला, घेतला, इ०. अर्थ — **पूर्णक्रियाद्योतक.** हेंहीं आकारान्त विशेषण असून आकारान्त विशेषणांप्रमाणें बदलतें

**वा-कृदन्त**—करावा, द्यावा, घ्यावा, इ०. अर्थ — **विध्यर्थक** म्हणजे विधि, कर्तव्य, आवश्यकता, इ०. अर्थ दाखविणारें. हेहीं आकारन्त विशेषण असून आकारान्त विशेषणांप्रमाणें फिरतें.

**चतुर्थ्यन्त व षष्ठ्यन्त वाकृदन्त**—करावयास, करावयाला, करावयाचें, इ०. ह्यांचा अर्थही वरील वा कृदन्ताच्याप्रमणेंच होय.

**ऊं-कृदन्त**—करूं, देऊं, घेऊं, इ०. अर्थ—**क्रियोपक्रमवाचक,** कधीं कधीं **क्रियावाचक** हें अव्यय आहे. (ह्यास दादोबा निमित्तवाचक असें म्हणतात.)

**ऊन-कृदन्त**—करून, देऊन, घेऊन. इ०. अर्थ—**क्रियासमाप्तिवाचक,** कधीं कधीं **अपूर्णक्रियावाचक.** हेंहीं अव्ययच आहे.

**णार-कृदन्त**—करणार, देणार, घेणार, इ०. अर्थ **उद्दिष्टक्रियावाचक,** म्हणजे क्रियेबद्दल कर्त्याचा उद्देश आहे असें दाखविणारें. हें अव्ययच आहे.

टीप—ह्या कृदन्तांची साधनिका व त्यांच्या अर्थांचा व अन्य उपयोगांचा खुलासा कृदन्ताध्यायांत पहावा.

५२१. सहायधातूंचे मुख्य दोन प्रकार आहेत. पहिल्या प्रकारच्या सहायधातूंनीं मुख्य क्रियेच्या अर्थांत फारशी भर पडत नाहीं, तर त्यांनीं मुख्यत्वेंकरून संयुक्तक्रियापदांचें आख्यात समजतें; आणि दुसऱ्या प्रकारच्या सहाय धातूंनीं क्रियेच्या अर्थांत भर पडून आख्यातही समजतें. म्हणून ह्यांस अनुक्रमें **अर्थहीन** व **अर्थवान् सहायधातु** असें म्हणतात.

५२२. अर्थहीन सहायधातु तीन प्रकारचे आहेत. **विधायक** म्हणजे दादोबांच्या भाषेनें करणरूप दाखविणारे म्हणजे क्रियेचा अस्तिपक्ष दाखविणारे; **निषेधक** म्हणजे अकरणरूप दाखविणारे म्हणजेच

क्रियेचा नास्तिपक्ष दाखविणारे; आणि **प्रयोगान्तरबोधक** म्हणचे प्रयोग बदलण्याचे कामीं उपयोगी पडणारे.

( अ ) **विधायक**—आह हो.

( आ ) **निषेधक**—नाह, नस, नहो, नको, नये, नलगे.

( इ ) **प्रयोगान्तरबोधक**—जा, ये, हो. ( ह्यांच्याबद्दलचें सर्व विवेचन पुढील प्रयोगाध्यायांत येईल.

५२३. अर्थवान् सहायधातूंच्या अर्थावरून आठ प्रकार होतात. ते येणेंप्रमाणें:—

**रीतिदर्शक**—अस.

**सातत्यदर्शक** किंवा **अभ्यासदर्शक**—ये, जा चल, चाल, बस, राह, सूट आण.

**शक्यार्थदर्शक**—ये, शक, पाव.

**कर्तव्यदर्शक**—पाहिजे, लाग, पड.

**इच्छादर्शक**—पाह, चाह, इच्छ.

**पराकाष्ठादर्शक** किंवा **प्रकर्षदर्शक**—ठेव, टाक, घे, दे, बस चूक, जा, सोड, काढ.

**सहाय्यदर्शक** किंवा **सेवादर्शक**—घाल, लाग.

**अनुमोदनदर्शक** किंवा **अनुज्ञादर्शक**—दे

५२४. आतां संयुक्तक्रियापदांगभूत कृदन्तें व सहायधातू ह्यांचे संयोगापासून कोणकोणतीं क्रियापदें बनतात. तें सांगतों. येथें इतकें सांगणें अवश्य आहे कीं, मुख्य धातूंच्या वर सांगितलेल्या सर्वच कृदन्तांपुढें सर्वच सहाय धातूंच्या सर्वच आख्यातांचा उपयोग होऊन संयुक्तक्रियापदें साधतात असें नाहीं, म्हणून आतां प्रत्येक सहाय धातु घेऊन त्याचे साहाय्यानें कसकशीं संयुक्तक्रियापदें तयार होतात, हें जरासें सविस्तर सांगितलें पाहिजे.

५२५. **आह**—हा फक्त ईआख्यातीं चालतो व त्याचा अर्थ वर्तमान आहे, हें पूर्वींच सांगितलें आहे. हा धातु अस्तित्वार्थक आहे खरा, तरी त्याच्या रूपानें असण्याचा क्रियेचा स्फूटार्थ समजत नाहीं, हें विसरूं

नये. एवंच संयुक्तक्रियापदाचें कामीं केवळ निषेधाच्या उलट अर्थी ह्याचा उपयोग होतो. म्हणूनच न्यायशास्त्रांत ह्यास केवळ 'संयोजक' म्हणजे उद्देश्य व विधेय यांमधील दुवा असें म्हटलें आहे. ह्यापासून पुढील संयुक्तक्रियापदें तयार होतात. उदाहरणें फक्त तृतीयपुरुषीं एकवचनीं दिलीं आहेत. हीच गोष्ट या अध्यायांत सर्वत्र ध्यानांत ठेवावी.

**( अ ) तकृदन्त + आहे**—उदा०:—करित आहे. ह्यासच अपूर्णवर्तमान असें म्हणतात. अर्थात् वर्तमानकाळीं करण्याची क्रिया चालू आहे, अपूर्ण आहे.

**टीप**—तकृदन्ताचे जागीं कधीं कधीं प्रथम ताख्यातांचेंही रूप घेऊन संयुक्त क्रियापद बनतें. जसें:—करित आहे किंवा करितो आहे, बसत आहे किंवा बसतो आहे, इ०. ह्या दोन्ही प्रकारच्या रूपांचा अर्थ बरोबरीनें एकच आहे. तथापि 'करितो आहे' हें 'करित आहे' ह्यापेक्षां विशेष जोरदार असून त्याचा व्यावहारिक भाषेंत अधिक प्रचार आहे. पण लेखनामध्यें 'करितो आहे' अशा प्रकारचीं रूपें क्वचित येतात. म्हणजे नीटनेटक्या लेखी भाषेंत 'करित आहे' अशाच प्रकारची रूपें विशेषेंकरून आढळतात.

**( आ ) लाकृदन्त + आहे**—उदा०—केला आहे. ह्यासच पूर्णवर्तमान असें म्हणतात; अर्थात् करण्याची क्रिया वर्तमानकाळीं संपली आहे.

**टीप**—लाकृदन्त व लाख्यातीं तृ० पु० च ए० व० ही एकच आहेत. वास्तविक म्हटलें म्हणजे लाख्यातच मुळीं कृदन्त आहे. ह्यामुळें संयुक्तक्रियापद कर्तरि असतां लाकृदन्ताचे जागीं सर्व पुरुषीं लाख्यातांचींच रूपें कृदन्तें म्हणून येतात. जसें:—मी बसलों आहें, तो शिकला होता, ते शिकले असतील, इ०. द्वितीय पुरुषाचे एकवचनींचा स हा प्रत्यय मात्र संयुक्तक्रियापदांगभूत लाकृदन्तास विकल्पेंकरून लागतो. जसें:—तूं बसला आहेस किंवा बसलास आहेस, तूं शिकला होतास किंवा शिकलास होतास, तूं शिकला असशील किंवा शिकलास असशील, इ०. तथापि, संयुक्त क्रियापदांमध्यें मुख्य धातूचें कृदन्त व सहाय धातूचें आख्यात रूप येत असल्यामुळें, बसला आहेस, शिकला होतास, इत्यादि सहाय धातसच सप्रत्यय लागलेलीं रूपें विशेष प्रचारांत आहेत; हें योग्यच आहे. शिकलास होतास, इ० कृदन्तांसहीं स लागलेली रूपें कधीं कधीं आढळतात; पण तीं गौणच होत.

**[ इ ] णारकृदन्त + आहे**—उदा०:—धरणार आहे. ह्यास दादोबा 'वर्तमानभविष्य' व कृष्णशास्त्री चिपळूणकर 'भविष्यवर्तमान' असें

म्हणतात. पण ह्या दोहोंपेक्षांही कृष्णशास्त्री गोडबोले ह्यांचे–उद्देश्यवर्तमान ' हें नांव बरें आहे. अर्थात् धरणाराचा, धरण्याचा वर्तमानकाळीं उद्देश आहे; बाकी क्रियेस आरंभही झालेला नाहीं, हें उघड आहे.

( ई ) **षष्ठ्यन्त वाकृदन्त + आहे**—उदा०:—धरावयाचें आहे. ह्यास संयुक्तक्रियापदांत कां गणूं नये, हें आम्हास कळत नाहीं. वरील संयुक्तक्रियापदांचे प्रमाणें ह्यास ' विधिवर्तमान ' असें म्हणावें. तथापि ह्याचे अनेक अर्थ होतात. कर्त्याचे मनांत धरण्याचा उद्देश आहे, कर्त्यांचें धरणें हें कर्तव्य आहे, कर्त्याला धरणें ही क्रिया अवश्य करावयाची आहे, किंवा ती क्रिया करणें त्यास प्राप्त अथवा भाग आहे, इ०. विवक्षित स्थळीं कोणता नक्की अर्थ आहे, हें पूर्वापरसंबंधास अनुसरून ठरविलें पाहिजे.

टीप १—'तो जाणार आहे,' आणि ' तो जावयाचा आहे ' या दोहों मधील अर्थाचा फरक स्मरणीय आहे. पहिल्यानें फक्त क्रिया करण्याचा उद्देश दाखविण्यांत येतो, म्हणजे भविष्यकाळाचा ध्वनि उमटतो. दुसऱ्यामध्यें हा ध्वनि असून शिवाय त्यांस कर्तव्य, विधि, किंवा आवश्यकता अशा प्रकारचा अधिक अर्थ आहे.

**टीप २**—मध्यहिंदुस्थानांत ' धरून आहे, करून आहे, धरून राहिला आहे, येऊन राहिला आहे ' असे प्रयोग धरित आहे, येत आहे अशा अपूर्णवर्तमानाचे अर्थी आढळतात. आणि त्यांचा महाराष्ट्रांतही थोडासा प्रवेश झाला आहे. तथापि हा प्रचार मूळचा हिंदी असून मराठींत तो अद्याप एकदेशीच आहे.

**टीप ३**—पाहिजे आहे, हवा आहे, नको आहे, नलगे आहे, अशा प्रकारचीं संयुक्तक्रियापदें आढळतात. त्यांचा अर्थ पाहिजे, हवा, नको, नलगे, ह्या केवळ क्रियापदांच्या अर्थाप्रमाणेंच आहे. परंतु त्यांमध्यें काळाचा अर्थ स्पष्ट नसल्यामुळें वर्तमानाचे अर्थी त्यांचेपुढें ' आहे ' हें सहाय क्रियापद जोडण्यांत येतें आणि भूतकाळाचे अर्थी ' होता ' ह्याचा तसाच उपयोग होऊं लागून पाहिजे होता, नको होता, वगैरे क्रियापदें अस्तित्वांत येतात. आणि त्याचप्रमाणें भविष्यकाळाचे अर्थानें ' असेल ' ह्या क्रियापदाचे संयोगानें पाहिजे असेल, नको असेल, इ० संयुक्त क्रियापदें बनतात.

५२६. **हो** — हा धातु साती आख्यातीं चालतो. आणि याचा साती आख्यातीं सहाय धातूप्रमाणें उपयोग होतो. याजपासून निरनिराळ्या आख्यातांत जीं संयुक्तक्रियापदें साधतात, ती येणेंप्रमाणें:—

**( १ ) प्रथम ताख्यात—होतो.**

**( अ ) ताकृदन्त + होतो**—उदा०:—बसता होतो, शिकता होतो, इ०. यानें दोन अर्थ निष्पन्न होतात. कधीं कधीं क्रियेचा आरंभ कर्ता करीत आहे असा अर्थ होतो, आणि कधीं कधीं त्या क्रियेचा अस्फुट वर्तमान असा अर्थ होतो. ह्या प्रकारच्या संयुक्तक्रियापदांचा उपयोग साधारणपणें क्वचित् होतो.

**( आ ) चातुर्थ्यन्त वाकृदन्त + होतो**—उदा०:—( त्याला ) बसावयास—ला होतें ( भावी ). अर्थ—**अवश्य वर्तमान** किंवा **विधिवर्तमान.**

**टीप:**—ह्या दोन्ही प्रकारच्या संयुक्तक्रियापदांचा संयुक्तक्रियापदांत कां अन्तर्भाव करण्यांत आलेला नाहीं, हें समजत नाहीं.

**( २ ) द्वितीय ताख्यात — होता.** द्वितीयताख्याताचे रूपाचा मुख्य अर्थ असिद्ध संकेत. पण होता या सहाय क्रियापदास असिद्ध संकेत हा अर्थ कधींच नसतो. तर 'आहे' या ईख्याताचा जसा वर्तमानकाळाचे अर्थानें उपयोग होतो, तसा 'होता' या द्वितीयताख्याताचा भूतकाळाचें अर्थानें उपयोग होतो. म्हणूनच 'होता' यास कोणी कोणी अस धातूचा भूतकाळ असें म्हणतात. 'होता' हें अस धातूचें रूपच नसून हो धातूचें लाख्यातीं नव्हे, तर द्वितीयताख्यातीं तृ० पु० चें ए० व० आहे. 'आह' ह्या धातूस एकच आख्यात असल्यामुळें आहे ह्या वर्तमानार्थास अनुरूप भूतार्थाचें रूप पाहिजे. परंतु अस धातूचें 'असला' हें लाख्याताचें ( वैयाकरणांचे भाषेनें भूतकाळाचें ) रूप भूतार्थानें न येतां संशय, संभव, वगैरे अर्थानें येतें. 'असे' हें अस धातूचें ईआख्यात असून त्यास भूतार्थ आहे. पण तो निवळ भूतार्थ नसून रीतिभूतार्थ आहे. ह्यामुळें निवळ अस्तित्वाचा भूतकाळीं, म्हणजेच भूतकालीन निवळ अस्तित्वाचा, उल्लेख करावयाचा असतां हो धातूच्या द्वितीय ताख्याताचा उपयोग होतो. 'होता' या सहायक्रियापदापासून पुढील संयुक्तक्रियापदें बनतात.

**( अ ) तकृदन्त + होता**—बसत होता. अर्थ—**अपूर्ण भूत.**

**( आ ) लाकृदन्त + होता**—बसला होता. अर्थ—**पूर्ण भूत.** क्वचित् **पूर्ण वर्तमान** [ उ०—विनायकराव हा आपणास एक विनंति करण्यास आला होता, म्हणजे आला आहे.

( इ ) णारकृदन्त + होता—उदा०:—बसणार होता. अर्थ—उद्देश्यभूत; अर्थात् क्रिया करण्याचा कर्त्याचा भूतकालीन उद्देश.

टीप—ह्यास दादोबा भविष्यभूत असें म्हणतात. हीं अप्रयोजक नांवें देऊन व्यर्थ विस्तार करित नाहीं. वाचकांनीं तीं दादोबांचे व्याकरणांत जरूर वाटल्यास पहावीं.

( इ ) वाकृदन्त + होतें:—उदा०:— ( त्यानें ) बसावें होतें ( भावी ). अर्थ—विधिभूत. अर्थात् भूतकाळाचें कर्तव्य, वगैरे.

( उ ) षष्ठ्यन्त वाकृदन्त + होता—उदा०:—( तो ) बसावयाचा होता ( कर्तरि ), ( त्यानें ) बसावयाचें होतें ( भावी ), ( त्यानें धंदा ) करावयाचा होता ( कर्मणि ), ( तो इंग्रजी ) शिकावयाचा होता ( कर्तरी ), ( त्यानें इंग्रजी ) शिकावयाचें होतें ( कर्मणि ), इ०. अर्थ—भूतकालीन कर्तव्य, विधि, उद्देश, आवश्यकता, इ०. यास संक्षेपानें वाटेल तर ‘ विधिभूत ’ असें म्हणावें.

( ऊ ) ऊनकृदन्त + होता —उदा०:—( तो इतका वेळ तेथें ) बसून होता. अर्थ—भूतकालीन क्रियेचें सातत्य. यास वाटल्यास ‘ पूर्णभूत ’ असें म्हणावें. ‘ बसून होता ’ ह्याचा अर्थ जवळ जवळ ‘ बसला होता ’ असा आहे.

टीप १—बसून होता, शिकून होता, इ० क्रियापदांचा अपूर्णभूत या अर्थीही कधीं कधीं उपयोग होतो. बसून आहे, शिकून आहे, येऊन आहे, अशा प्रकारचा गेल्या अंकांत जो प्रांतिक किंवा एकदेशीय अपूर्णवर्तमान अर्थाचा एक हिंदींतून आलेला भाषाप्रचार सांगितला, त्याच मासल्याचा हा अपूर्णभूतार्थ होय.

टीप २—पाहिजे होता, हवा होता, नको होता, नलगे होता, ह्या संयुक्तक्रियापदांसंबंधानें मागील अंकांतील तिसरी टीप पहावी.

( २ ) लाख्यात—झाला.

[ अ ] ताकृदन्त + झाला—उदा०:—कारितां झाला, बसता झाला, इ० ह्याचा दोन अर्थीं उपयोग होतो. तो करिता झाला, म्हणजे तो करूं लागला किंवा त्यानें केलें, असा अर्थ आहे हें उघड आहे. करूं लागला या अर्थानें ह्या संयुक्त क्रियापदाचा अर्थ उपक्रमभूत आणि ‘ केलें ’ या अर्थानें ‘ अस्फुटभूत ’ आहे असें म्हणावें. कारण कीं, पहिला अर्थ उपक्रम

किंवा आरंभ दाखवितो, परंतु दुसऱ्या अर्थापासून क्रियेची स्थिति स्पष्ट-पणें कळत नाहीं. ह्यांपैकीं ह्या दुसऱ्या अर्थानेंच याचा फार उपयोग होतो.

(आ) करून झाला, शिकून झाला, वाढून झालीं, हीं क्रियापदें कर्मणि आहेत. ह्यांच्यासंबधाचें सविस्तर विवेचन प्रयोगाध्यायांत येईल.

(४) वाख्यात—व्हावा.

(अ) ऊनकृदन्त + व्हावा—उदा०:—शिकून व्हावा (कर्मणि), खेळून व्हावें (भावी), इ०. अर्थ—पूर्ण विधि किंवा संभव.

हो धातूचें वाख्यात एकाच ऊनकृदन्तापुढें येऊन एकच संयुक्तक्रिया-पद बनतें. मूळ धातु सकर्मक असल्यास तें कर्मणि असतें, व अकर्मक असल्यास भावी असतें.

(५) ईआख्यात—होई.

(अ) ऊनकृदन्त + होई—उदा०:—शिकून होई (कर्मणि), खेळून होई (भावी), इ०. अर्थ—पूर्णरीतिभूत.

(६) ऊआख्यात— हो.

(अ) ताकृदन्त + हो—उदा०:—देता हो, घेता हो, इ०. अर्थ—देण्यास घेण्यास आरंभ कर किंवा देणें, घेणें, पूर्ण कर असे दोन प्रकारचे अर्थ होतात. आज्ञा हा अर्थ मात्र द्वितीय पुरुषीं असतो. प्रथम व तृतीयपुरुषीं विनंति, प्रार्थना, वगैरे अर्थ असतात, हें ईआख्याताचें अर्थांत सांगितलेंच आहे. द्वि० पु० चा अर्थ संक्षेपानें 'उपक्रमाज्ञा' किंवा 'पूर्णताज्ञा' हा होय.

(आ) ऊनकृदन्त + होवो—उदा०:—शिकून होवो (कर्मणि), अर्थ—पूर्णतेच्छा; अर्थात् क्रियेच्या पूर्णत्वाची इच्छा, किंवा विनंति, इ०.

टीपः—हें क्रियापद कर्मणि असल्यामुळें याचा प्रथम व द्वितीयपुरुषीं फारसा उपयोग होत नाहीं.

(७) ईलाख्यात—होईल.

(अ) ताकृदन्त + होईल—उदा०:—करिता होईल, देता होईल, इ०. अर्थ —अस्फुट भविष्य, किंवा उपक्रम भविष्य.

(आ) ऊनकृदन्त + होईल—उदा०—करून होईल, शिकून होईल, इ०. अर्थ—पूर्णभविष्य.

टीप—करून होईल, शिकून होईल, ह्यांतील प्रयोगासाठीं प्रयोगाध्याय पहावा.

५२७. **नाहीं, नस**—ह्याचीं रूपें तंतोतंत आह आणि अस ह्यांचे जागीं निषेधार्थीं येऊन संयुक्तक्रियापदें होतात. आह पासून कोणतीं संयुक्तक्रियापदें होतात, हें वर (५२५) सांगितलेंच आहे, अस-पासून कोणतीं होतात हें पुढें (अंक ५३३) पहावें. उदाहरणें:—

| | |
|---|---|
| जात आहे—जात नाहीं. | जात असतो—जात नसतो. |
| गेला आहे—गेला नाहीं. | गेला असला—गेला नसला. |
| जाणार आहे—जाणार नाहीं. | जाणार असावा—जाणार नसावा |
| इ०. | इ०. |

शिवाय, जातो, गेला, जाईल, हीं जीं अस्फुट वर्तमान, अस्फुट भूत, अस्फुट भविष्य, ह्या अर्थाचीं एकेरी किंवा असंयुक्त क्रियापदें आहेत, त्यांचींही निषेधक संयुक्त क्रियापदें अनुक्रमें जात नाहीं, गेला नाहीं, जाणार नाहीं, अशी होतात.

टीप—आजकाल इंग्रजी शिकलेल्या लोकांचे भाषणांत 'नाहीं' ह्याचे जागीं 'नाहीं आहे' असा प्रयोग क्वचित् ऐकूं येतो. त्यास अनुसरून जात नाहीं आहे, गेला नाहीं आहे, जाणार नाहीं आहे, इ० रूपेंही कधीं कधीं ऐकूं येतात. परंतु 'नाहीं' चे जागीं 'नाहीं आहे' असा प्रयोग करण्याची कांहीं जरूर नसल्या-मुळें ह्याचा फारसा प्रसार दिसत नाहीं.

५२८. **नहो**—हा धातु द्वितीयताख्यातीं (नव्हता) आणि ई आख्यातीं (नव्हे) मात्र चालतो. ह्यांपैकीं द्वितीयताख्याताचा [नव्हता याचा] मात्र सहाय क्रियापदाप्रमाणें उपयोग होतो. आणि हो धातूचा द्वितीयताख्यातीं जेथें जेथें सहाय क्रियापदाप्रमाणें उपयोग होतो [अंक ५२६ (२)] तेथें तेथें नहो ह्याच्या द्वितीयताख्याताचा निषेधार्थीं उपयोग होतो. उदाहरणें:—

बसत होता—बसला नव्हता.

बसला होता—बसला नव्हता. इ०.

५२९. **नको**—हें निषेधदर्शक सहाय क्रियापद फक्त आज्ञार्थीं प्रथम व द्वितीय पुरुषीं मात्र मुख्य धातूचें ऊकृदन्तापुढें येऊन संयुक्तक्रिया-पदें होतात.

(अ) ऊंकृदन्त + नको—उदा०:—करूं नको, किंवा करूं नकोस, मी करूं नको ? इ०.

तृतीय पुरुषीं नको ह्याचा सहाय क्रियापदाप्रमाणें उपयोग होत नाहीं. ऊआख्याताच्या (आज्ञार्थाच्या) तृतीय पुरुषाचीं निषेधक रूपें अन्य निषेधक रूपांप्रमाणें न हें अव्यय मागें स्वतंत्रपणें येऊन होतात. जसें:— न करो, न करोत, न जावो, न जावोत, इ०.

५३०. नये—हें फक्त ईआख्यातीं चालतें. याजपासून एकच संयुक्त-क्रियापद बनतें.

(अ) ऊंकृदन्त + नये—उदा०:—बसूं नये (मुख्य क्रियापद अकर्मक असतां—भावी); सोडूं नयेत (मुख्य क्रियापद सकर्मक असतां—कर्मणि), सोडूं नये (मुख्य क्रियापद सकर्मक असतां—कर्मणि किंवा भावी), इ०. अर्थ—कर्तव्य, विधि, इ०.

मुख्य क्रियापद अकर्मक असतां कधीं कधीं कर्तरि प्रयोगही होतो जसें:—अंगरखे उसवूं नयेत असे नीट शीव.

टीप १—कधीं कधीं ता प्रत्ययान्त कृदन्तापुढेंही याचा सहाय क्रियापदाप्रमाणें उपयोग होतो; आणि त्या दोहोंचे मध्यें कामा किंवा कामास हा शब्द विकल्पेंकरून येतो. जसें:—करितां नये, जातां नये, जातां कामा नये, करितां कामास नये, इ०. यांपैकीं कामा हा शब्द मध्यें येऊन होणारा प्रयोगच अधिक प्रचारांत आहे.

टीप २—कधीं कधीं कामा या शब्दाबद्दल कामाचें हें षष्ठ्यन्त रूप येतें; त्या वेळीं 'नये' याचे जागीं 'नाहीं' हें क्रियापद येतें. जसें:—करितां कामाचें नाहीं, जातां कामाचें नाहीं, इ०. 'कामाचें' याचे जागीं कधीं कधीं 'उपयोगीं' किंवा 'उपयोगाचें' हेही शब्द आलेले आढळतात. जसें:— करितां उपयोगीं नाहीं, किंवा उपयोगाचें नाहीं, इ.

टीप ३—या दोन्ही टीपांतील रचना संक्षिप्त आहे. करितां कामा नये= करितां तें कामा नये, करितां कामाचें नाहीं=करितां तें कामाचें नाहीं, करितां उपयोगीं नाहीं=करितां तें उपयोगीं नाहीं. इ०. या स्पष्टीकरणावरून प्रस्तुत रचनेंतील शब्दांचें व्याकरण कसें करावें हें तेव्हांच समजेल.

५३१. नलगे—हें फक्त ईआख्यातींच चालतें.

(अ) वाकृदन्त + नलगे—उदा०:—करावा नलगे (कर्मणि), जावें नलगे (भावी), इ०. अर्थ—आवश्यकतेचा निषेध.

(आ) **चतुर्थ्यन्त वाकृदन्त + नलगे**—उदा०:— करावयास किंवा करावयाला नलगे, (कर्मणि किंवा भावी), जावयास किंवा जावयाला नलगे (भावी), इ अर्थ—आवश्यकतेचा निषेध.

५३२. निषेधक क्रियापद करण्याचे, किंवा क्रियापदास निषेधार्थ जोडण्याचे, आणखी जे कांहीं प्रकार मराठींत आहेत, तेही या ठिकाणीं नमूद करणें इष्ट दिसतें. हे निषेधाचे अन्य प्रकार येणेंप्रमाणें:—

(अ) धातूच्या ई-आख्याताच्या रूपांस पुढें ना हें निषेधक अव्यय जोडून निषेधार्थी रूपें होतात. अशा वेळीं या आख्याताच्या रूपांतील रीतीचा अर्थ अन्तर्धान पावून त्यांस केवळ वर्तमान किंवा भूतकाळाचा अर्थ प्राप्त होतो. व्यंजनादि प्रत्यय असतां म्हणजे द्वि० पु० ए० व आणि तृ० पु० अ० व० या दोन ठिकाणीं 'ना हें अव्यय त्या व्यंजनादि प्रत्ययांपूर्वीही येतें. जसें:—

| पुरुष० | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० | करींना | करूंना |
| द्वि० | करीसना, करीनास | करांना |
| तृ० | करीना | करीतना, करीनात. |

टीप—ईआख्याताच्या रूपांशिवाय इतर क्रियापदांपुढें **ना** हें अव्यय आलें असतां प्रश्नार्थक वाक्यांत त्यानें प्रश्नास जोर येतो; म्हणजे जो अस्तिपक्षीं किंवा विधायक ह्मणजे करणरूपीं प्रश्न असतो, त्यास **ना** या निषेधक अव्ययानें काकु प्रश्नाचें स्वरूप येतें. ज्या निषेधक प्रश्नाचें उत्तर विधायक म्हणजे करणरूपी असून तें प्रश्नाच्या झटक्यावरूनच समजतें, तें वेगळें सांगण्याची जरूर नसते, त्या प्रश्नास काकु प्रश्न असें ह्मणतात. जसें:—तो गेलाना? = माझें मतें तो गेला आणि तसेंच माझ्या प्रश्नास उत्तर येईल असें मला वाटतें; तूं जातोसना? तो जाईलना? मी जाऊं ना? इ०.

(आ) आतांपर्यंत जीं निषेधक सहाय क्रियापदें सांगितलीं, त्यांनीं भाषेमध्यें सर्व प्रकारच्या निषेधाचें कार्य होतें, तथापि ज्या ज्या ठिकाणीं हीं येतात ह्मणून सांगितलें, त्या त्या ठिकाणीं त्यांचा उपयोग केलाच पाहिजे असा नियम नाहीं. तर कधीं कधीं तीं गाळून मुख्य धातूच्या आख्यात रूपाचे पाठीमागें **न** हें अव्यय लावूनही निषेधक अर्थाची उपलब्धि होते. जसें:—

| निषेधक संयुक्तक्रियापद. | न अव्ययानें युक्त क्रियापद. |
|---|---|
| तो गेला नाहीं तर ? | तो न गेला तर ? |
| त्यानें जाऊं नये. | त्यानें न जावें. |
| तो गेला नसता तर ? | तो न जाता तर ? |
| तो येतां कामा नये. | त्यानें आलें न पाहिजे. |
| तो येतां उपयोगीं नाहीं. | त्यानें न आलें पाहिजे. |
| इ०. | इ०. |

(इ) मुख्य धातूच्या आख्यातरूपाचे पाठीमागें येणारा हा **न** गद्यापेक्षां पद्यांत फार आढळतो. मात्र धातु स्वरादि असतां हा न वेगळा राहत नाहीं, तर त्याचा व पुढील स्वरादि क्रियापदाचा पररूपसंधि होतो. जसेः—

न करिल कां पित्याची दुर्गतिची माउली सुरा माती—मोरोपंत.

कांरे नाठवीसी (न + आठव), कृपाळु देवासी,

पोषितो जगासी एकलाची ॥ —तुकाराम.

षडारिघ्न तुम्ही गुरु हो षडरिजित मदासि काय हरिना मी ।

अरि हरिनें नुचलावें (न+उचल) अघ दलनीं बल उदंड हरिनामीं॥—मोरो०

अचपळ मन माझें नावरे (न + आवर) आवरीतां ।

तुजविण शिण होतो धांव रे धांव आतां ॥—रामदास.

न + अस = नस हें ह्या प्रकारचें उदाहरण गद्यांत आहेच. कवितेंत कधीं कधीं व्यंजनादि धातूंपूर्वीं **न** ह्या अव्ययाचें **ने** असें रूप होतें; आणि कधीं कधीं धातूच्या प्रथमाक्षरांतही कांहीं बदल होतो. जसेंः—

वृक्ष नेदी (न + दे) पुष्पफळ । काय करील वसंतकाळ ॥—तुकाराम.

तुका म्हणे मधीं । कोठे नेघे (न + घे) विसावा—तुकाराम.

न + जाणता = नेणता.

५२२. **अस**—आह आणि अस ह्या धातूंचे अर्थांतील फरक पूर्वीं सांगितलाच आहे. तो फार महत्वाचा आहे. 'आह' ह्यांत अस्तित्वाचा अस्फुट अर्थ आहे. अस धातमध्यें अस्तित्वाचा अर्थ स्फुट म्हणजे स्पष्ट झाला आहे. अस धातूनें वर्तमान व भूत या दोन काळीं असण्याचे क्रियेची रीति, चाल, वहिवाट, संवय, पुनरुक्ति, किंवा सतत अनेकवार

अथवा नियमित वेळीं होणारी एकसारखी घटना, इत्यादि परस्परसदृश अर्थांचा बोध होतो. आणि म्हणूनच संयुक्तक्रियापदामध्यें ह्याचे योगानें मुख्य धातूचे अर्थांत प्रकृत अर्थाचा ध्वनि उमटत असतो. अस धातूचा ईलाख्यातीं ( भविष्यकाळीं ) मात्र असा अर्थ होत नाहीं; तर केवळ शक्यता, संभव, संशय वगैरे ईलाख्यातांत सांगितलेले अर्थ असतात. ह्या धातूपासून, प्रत्येक आख्यातांत जीं संयुक्तक्रियापदें साधतात, तीं येणेंप्रमाणें:--

**( १ ) प्रथम ताख्यात--असतो.**

**( अ ) तकृदन्त + असतो**--उदा०:--शिकत असतो, जात असतो, इ. अर्थ-- अपूर्णरीतिवर्तमान म्हणजे वर्तमानकाळीं [ हा प्रथम ताख्याताचा अर्थ ] शिकण्याची क्रिया अपूर्ण असून [ हा तकृदन्ताचा अर्थ ] ती सारखी चालू आहे [ हा अस या सहायधातूचा अर्थ आहे. ] असेंच अन्यत्र समजावें.

**[ आ ] लाकृदन्त + असतो**--उदा०:--शिकला असतो, बसला असतो, इ०. अर्थ--पूर्ण रीतिवर्तमान.

**[ इ ] णारकृदन्त + असतो**--उदा०:--शिकणार असतो, इ०. अर्थ -उद्दिष्ट रीतिवर्तमान. शिकणार हें उद्दिष्ट क्रियावाचक आणि असतो हें वर्तमान रीतिवाचक आहे हें उघड आहे.

**( ई ) षष्ट्यन्त वाकृदन्त + असतो,** उदाहरणः--शिकावयाचा असतो इ०. अर्थ कर्तव्य रीतिवर्तमान, किंवा अवश्य रीतिवर्तमान, इ०.

**टीप १**--'शिकावयाचा आहे' ह्याचा अर्थ विधिवर्तमान हें पूर्वी सांगीतलेंच आहे. 'शिकावयचा असतो' या संयुक्तक्रियापदानें विधिवर्तमान या अर्थांत अस धातूनें दाखविल्या जाणऱ्या रीतीची भर पडली आहे. इतकाच कायतो दोहोंत फरक आहे.

**टीप २**--'बसून असतो' हें अपूर्णवर्तमानाचे अर्थी भाषणांत कधीं कधीं येतें. 'बसत असतो' आणि 'बसून असतो' या दोहोंचा अर्थ बहुतेक सारखाच. तथापि 'बसून असतो' यामध्यें बसत असतो यांतील अर्थाचीच अधिक पुष्टि दिसत आहे. असेंच पुढील अख्यातांतील ह्याच प्रकारच्या संयुक्तक्रियापदां संबंधानें समजावें.

**( २ ) द्वितीयताख्यात--असता.**

( अ ) **तकृदन्त + असता**—उदा०:—शिकत. असता. अर्थ—अपूर्ण संकेत.

( आ ) **ऊनकृदन्त + असता**—उदा०:—शिकून असता. अर्थ—अपूर्ण संकेत. ( अ व आ ह्यांचे अर्थासंबंधानें वरील टीप २ पहावी. )

( इ ) **लाकृदन्त + असता**—उदा०:—शिकला असता. अर्थ—पूर्ण संकेत.

( ई ) **णारकृदन्त + असता**—उदा०:—शिकणार असता. अर्थ उद्दिष्ट संकेत.

( उ ) **षष्ठ्यन्त वाकृदन्त + असता**—उदा०:—शिकावयाचा असता. अर्थ—विधी संकेत.

द्वितीय ताख्यातास कालाचा अर्थ गौण असल्यामुळें आणि केवळ असिद्ध संकेताचाच अर्थ प्रधान असल्यामुळें अस धातूच्या रीत्यर्थाचा ध्वनि वरील रूपांत प्रत्ययास येत नाहीं. या सर्व संयुक्तक्रियापदांचा वर्तमान व भूत या काळांचे अर्थी उपयोग होतो. कोणत्या ठिकाणीं कोणता काळ गर्भित आहे, हें वाक्यांतील अर्थास उद्देशून ठरविलें पाहिजे. जसें:—तो जर इंग्रजी शिकला असता तर त्याला उदरनिर्वाहाची पंचाईत पडली नसती. या वाक्यांत ‘ शिकला असता ’ यानें भूतकाळाची प्रतीति होत आहे; आणि ‘ पडली नसती ’ यानें भूत व वर्तमान या दोन्ही काळांचा अर्थ ध्वनित होत आहे. तो जर जिवंत असता तर आज बी. ए. झाला असता. या वाक्यांत ‘ झाला असता ’ यांत वर्तमान-काळाचा अर्थ गर्भित आहे. एवंच द्वितीयताख्यात मुख्यत्वेंकरून काल-सूचक नसल्यामुळें काळाचा अर्थ पूर्वापरसंबंधानेंच ठरविला पाहिजे. तो आख्यातरूपांपासून निघत नसून, गौण असल्यामुळें सांगण्याची गरज नाहीं.

( ३ ) **लाख्यात—असला.** हें अस धातूचें लाख्यातीं रूप होय. यास आमचे वैयाकरण भूतकाळ असें म्हणतात, परंतु ‘ असतो ’ यास जरी ते वर्तमान काळ असें म्हणतात तरी ज्याप्रमाणे त्याचा वास्तविक अर्थ रीतिवर्तमान असा आहे, त्याचप्रमाणें ‘ असला ’ ह्यास जरी त्यांनीं भूतकाळ असें म्हटलें तरी त्यास भूतार्थ मुळींच नाहीं; तर केवळ संशय,

संभव, असा अर्थ असल्यामुळें अस धातूंतील रीतीचा ध्वनि येथेंही उमटत नाहीं. ' असला ' याजपासून पुढील संयुक्तक्रियापदें साधतातः—

( अ ) **तकृदन्त + असला**—उदा०:—शिकत असला. अर्थ अपूर्ण-संभव म्हणजे अपूर्ण क्रियेचा संभव.

( आ ) **ऊनकृदन्त + असला**—उदा०:—शिकून असला. अर्थ-अपूर्ण संभव.

( इ ) **लाकृदन्त + असला**—उदा०:—शिकला असला. अर्थ-पूर्णसंभव म्हणजे पूर्णक्रियेचा संभव.

( ई ) **णारकृदन्त + असला**—उदा०:—शिकणार असला. अर्थ उद्दिष्ट संभव.

( उ ) **षष्ठ्यन्त वाकृदन्त + असला**—उदा०:—शिकावयाचा असला. अर्थ—विधिसंभव.

[ या संयुक्तक्रियापदांपैकीं ( अ ), ( इ ), ( ई ), यांना अपूर्ण भूतकाळ, पूर्णभूतकाळ, व भविष्यभूतकाळ हीं मराठी व्याकरणांतील नांवें कितपत शोभतात याचा आतां वाचकांनींच विचार करावा. या सर्व संयुक्तक्रियापदांचा उपयोग संकेतवाक्यांत होतो. जसें:—तो इंग्रजी शिकत असला तर मला कळीव, तो संस्कृत शिकला असला तर त्याला वैद्यकाचा अभ्यास सुलभ जाईल, तो इंग्रजी शिकणार असला तर बरें, तो इंग्रजी शिकावयाचा असला तर त्यास ह्या वस्तूचा उपयोग, इ०. ह्यांपैकीं एकांतही भूतकाळाचा अर्थ नाहीं. पूर्वापरसंबंधानें कोणत्याही काळाचा ध्वनि उमटेल. मग ह्यांस भूतकाळाचे प्रकार म्हणण्यांतच काय विशेष औचित्य आहे तें नकळे ! अस धातूच्या लाख्यातीं रूपांचा जेव्हां स्वतंत्रपणें मुख्य क्रियापदाप्रमाणें उपयोग होतो. तेव्हांही त्यांस भूतकाळाचा अर्थ नाहीं. आणि नेहमीं त्यांचेपुढें तर, म्हणजे, तरी, इ० उभयान्वयी अव्ययें येऊन नंतर दुसरें वाक्य येतें; म्हणजे त्यांचा संकेतवाक्यांतच उपयोग होतो, जसें:—दत्तू असला तर माझें कार्य होईल, थंडी असली म्हणजे मी बाहेर पडत नाहीं, विद्या असली तरी आजकाल वशिला पाहिजे, इ. तेव्हां अस धातूच्या लाख्याताचे स्वतंत्र क्रियापदांसही भुतकाळ हें नांव योग्य नाहीं हें उघड आहे. ]

( ४ ) **वाख्यात—असावा** या आख्यातास काळाचा अर्थ प्राधान्येंकरून नाहींच. तथापि संयुक्तक्रियापदांत या आख्यातानें वर्तमानकाळाचा ध्वनि उठत असतां आणि क्रियापद कर्मणि किंवा भावी असतां या आख्या-

ताचा कर्तव्य, उपदेश, आवश्यकता, इ० म्हणजे सांकेतिक भाषेनें विधि असा अर्थ असतो; आणि कर्तरि क्रियापद असतां संशय, संभव, असा अर्थ असतो; व ह्यावेळीं अस धातूच्या रीति ह्या अर्थाचा ध्वनि क्रियापदांत उमटत नाहीं. परंतु वर सांगितल्याप्रमाणें वर्तमान विधि असा अर्थ असून कर्मणि किंवा भावी क्रियापद असतां अस धातूच्या रीति ह्या अर्थाचा स्पष्ट उद्बोध होतो.

**( अ ) तकृदन्त + असावा** — उदा ० :—१ शिकत असावा ( कर्तरि ),—अर्थ अपूर्णविधि वर्तमान किंवा अपूर्ण विधि संभव, २ ( त्यानें हा धंदा ) शिकत असावा ( कर्मणि ), ३ ( त्यानें हा धंदा) शिकत असावें ( भावी ). अर्थ —अपूर्ण रीति—विधि.

**( आ ) ऊनकृदन्त + असावा**—उदा० :— १ शिकून असावा, ( कर्तरि ) अर्थ—अपूर्ण विधि वर्तमान. २ शिकून असावा ( कर्मणी ), ३ शिकून असावें ( भावी ) अर्थ—वरील प्रमाणेंच.

**( इ ) लाकृदन्त + असावा**—उदा०:—( तो ) शिकला असावा ( कर्तरी ), ( त्यानें ) शिकला असावा ( कर्मणि ) अर्थ—पूर्ण क्रियासंभव.

**( ई ) णारकृदन्त + असावा**—उदा०:—शिकणार असावा ( कर्तरि ) अर्थ उद्दिष्ट क्रियासंभव.

**( उ ) षष्ठ्यन्त वाकृदन्त + असावा**—उदा:—( तो ) शिकावयाचा असावा ( कर्तरि ), ( त्यानें ) शिकावयाचा असावा ( कर्मणि ) अर्थ—उद्दिष्ट क्रियासंभव किंवा अवश्य क्रियासंभव.

**( ५ ) ईआख्यात—असे**. येथें धातु व आख्यात या दोहोंत रीतीचा अर्थ स्पष्ट आहे.

**( अ ) तकृदन्त + असे**—उदा०:—शिकत अस, अर्थ—अपूर्ण रीति भूत.

**( आ ) ऊनकृदन्त + असे** ( क )—उदा०:—शिकून असे. अर्थ—अपूर्ण रीतिभूत.

**( इ ) लाकृदन्त + असे**—उदा०:—भरला असे. अर्थ—पूर्णरीतिभूत.

**( ई ) णारकृदन्त + असे**—उदा०:—भरणार असे. अर्थ—उद्दिष्ट रीतिभूत.

( उ ) **षष्ठ्यन्त वाकृदन्त + असे**—उदा० :—भरावयाचा असे, अर्थ–विधिरीतिभूत.

( ६ ) **ऊआख्यात–असो**, अस ( द्वि० पु० ए० व० ). ह्या आख्याताचे निरनिराळ्या पुरुषीं निरनिराळे अर्थ आहेत. तरी यास आज्ञार्थ म्हणतात. आज्ञा हा विशेषेकरून द्वितीय पुरुषाचा अर्थ असल्यामुळें संयुक्तक्रियापदांत द्वितीय पुरुषाचेच एक वचनांत उपयोग केला आहे. इतर पुरुषांचे अर्थ ह्या द्वितीय पुरुषाचे संयुक्तक्रियापदांच्या अर्थावरून समजावें.

( अ ) **तकृदन्त + अस**—उदा०:—शिकत अस, अर्थ—अपूर्ण आज्ञा अर्थात्, अपूर्ण क्रियेची आज्ञा.

( आ ) **ऊनकृदन्त + अस** ( क० ) उदा०:—शिकून अस, अर्थ—वरीलप्रमाणें.

( इ ) **लाकृन्दत + अस**—उदा०:—शिकला अस, अर्थ—पूर्ण क्रियेची आज्ञा.

( ई ) **णारकृदन्त + अस**—उदा०:—शिकणार अस, उद्दिष्ट क्रियेची आज्ञा.

( उ ) **षष्ठ्यन्त वाकृदन्त + अस**—उदा०:—शिकावयाचा अस, अर्थ—कर्तव्याची आज्ञा.

टीप—या आख्यातांत अस धातूस रीति हा अर्थ नाहीं, तर केवळ आस्तित्व असाच अर्थ आहे.

( ७ ) **ईलाख्यात—असेल**. या आख्यातांतही अस धातूस रीतीचा अर्थ नाहीं. ह्यानें भविष्य व संशय किंवा संभव असे अर्थ सुचविण्यांत येतात. ह्यामुळें संयुक्तक्रियापदांचेही तसेच अर्थ होतात. कोणता अर्थ विवक्षित आहे, हें वाक्यौघावरून ठरवावें.

( अ ) **तकृदन्त + असेल** उदा०:—शिकत असेल. अर्थ—अपूर्ण भविष्य किंवा अपूर्ण क्रियासंभव, अपूर्णक्रिया—संशय.

( आ ) **ऊनकृदन्त + असेल** [ क० ] उदा०:—शिकून असेल, अर्थ–वरील प्रमाणेंच.

( इ ) **लाकृदन्त + असेल**—उदा०:—शिकला असेल. अर्थ—पूर्ण भविष्य किंवा पूर्ण क्रियासंभव, पूर्णक्रिया संशय.

( ई ) **णारकृदन्त + असेल**—उदा०:—शिकणार असेल, अर्थ—उद्दिष्ट भविष्य किंवा उद्दिष्ट क्रियासंभव, उद्दिष्ट क्रिया संशय.

( उ ) **षष्ठयन्त वाकृदन्त + असेल** —उदा०:—शिकावयाचा असेल, अर्थ—कर्तव्य भविष्य, किंवा कर्तव्य क्रियेचा संभव अथवा संशय.

५३४. **सातत्यदर्शक** किंवा **अभ्यासदर्शक सहायधातु**—हे मुख्य धातूच्या तकृदन्तापुढें येतात. जसें:—लिहीत आला, करित जा, गात बसावें, घोटीत रहा, इ०. ( हे सर्व व पुढील प्रकारचे सहायधातु अंक ५२३ मध्यें दिले आहेत, तेथें पहावें. )

एखाद्या क्रियेचें सातत्य किंवा अभ्यास वर्तमानकाळापासून पुढें निरंतर किंवा कांहीं कालपर्यंत विवक्षित असतां **जा** धातूचा उपयोग होतो. जसें—तूं असेंच लिहीत गेलास, तर एक दोन वर्षांत तुझें अक्षर चांगलें वळणदार होईल. परंतु क्रियेचें सातत्य किंवा अभ्यास, ती क्रिया भूतकाळीं कधीं तरी सुरू होऊन वर्तमानकाळापर्यंत चालू आहे अशा अर्थीं विवक्षित असतां **ये** या सहाय धातूचा उपयोग होतो. जसें:—तो आज चार वर्षें सारखा लिहित आला म्हणून त्याचें अक्षर वळणदार झालें आहे.

टीप:—राह धातूचा याच अर्थीं ऊनकृदन्तापुढेंही उपयोग होतो, जसें:—निजून रहा, वसून राहतो, इ०.

५३५. **शक्यार्थदर्शक सहायधातु**—ये, शक, पाव, या धातूचा या अर्थीं उपयोग होतो. ये हा धातु या अर्थीं तांकृदन्त, चतुर्थ्यन्त वाकृदन्त, व क्वचित् ऊंकृदन्त, यांपुढें येतो. जसें—त्याला धांवतां येतें, त्याला दगड मारितां येतो, त्याला लिहावयास येतें, आपण म्हणूं या, करूं यें समाधान जो मूर्ख त्याचें, इ०. परंतु शक आणि पाव हे धातु फक्त ऊंकृदन्तापुढें येतात. जसें:—तो पोहूं शकतो, तो त्याला मारूं पावेल, तो हें चांगलें वाचूं शकेल, इ०.

५३६. **कर्तव्यबोधक**—पाहिजे, लाग, पड, या धातूंचा या अर्थीं सहाय्यधातूंप्रमाणें उपयोग होतो.

( १ ) **पाहिजे**—पाहिजे हें मुख्य असंयुक्त क्रियापद असतें तेव्हां
ा अर्थ ( सं० प्राप्यते–प्राप् ह्या धातूचें कर्मणि रूप ) ' अपेक्षित
 इष्ट आहे ' असा असतो. परंतु पाहिजे ह्याचा जेव्हां सहायक्रिया-
माणें उपयोग होतो, तेव्हां त्याचा भिन्न अर्थ होतो. पाहिजे हें सहाय
ापद ( सं० प्रार्ह्यते–प्रार्ह् धातूचें कर्मणिरूप ) ' कर्तव्य आहे,
य आहे ' ह्या अर्थी उपयोगांत येतें. ह्यानें वर्तमान व भविष्य-
न आवश्यकता समजते. भविष्यकालीन आवश्यकता दाखवावयाची
ां ह्याचें विकल्पानें पाहिजेल असेंही रूप होतें. हें **लाकृदन्त** आणि
**र्थ्यन्त वाकृदन्त** ह्यांचें पुढें येऊन दोन संयुक्तक्रियापदें तयार होतात.
 धातु अकर्मक असतां संयुक्तक्रियापद कर्तरि किंवा भावी असतें,
 मुख्य धातु सकर्मक असतां संयुक्तक्रियापद कर्मणि किंवा भावी
. उदाहरणें:—

**अ ) लाकृदन्त + पाहिजे**—उदा०;— ( तो ) गेला पाहिजे
र्तरि ), ( त्याला ) गेलें पाहिजे ( भावी ) , त्यानें किंवा त्याला हा
) सोडिला पाहिजे ( कर्मणि ), ( त्यानें किंवा त्याला शत्रूला ]
लें पाहिजे [ भावी ], इ०. अर्थ–वर्तमान किंवा भविष्य आवश्य-
 येथें लाकृदन्तास पूर्णत्वाचा विशेष अर्थ नाहीं हें उघड आहे.

**आ ] चतुर्थ्यन्त वाकृदन्त + पाहिजे**–उदा०:–[ तो ] जावयास
 जायला पाहिजे [ कर्तरि ], [ त्यानें अ० त्याला ] जायला पाहिजे
], [त्यानें किंवा त्याला ही संवय] सोडायला पाहिजे [कर्मणि किंवा भावी].
—वर्तमान किंवा भविष्य आवश्यकता.

**प**—मुख्य धातु उभज धातूच्या गणांतील असतां संयुक्तक्रियापद कर्तरि
कर्मणि किंवा भावी असतें. जसें:— ( तो हें काम ) शिकला पाहिजे
रि ), ( त्यानें हा धंदा ) शिकला पाहिजे ( कर्मणि ), त्यानें हा धंदा
 पाहिजे ( भावी ).

२ ] लाग–हा धातु सर्व आख्यातीं चालतो, व सर्व आख्यातीं याचें
संयुक्तक्रियापदें बनतात. हा धातु वाकृदन्तापुढें येतो तेव्हांच
कर्तव्य किंवा आवश्यकता असा अर्थ असतो. जसें:—

**अ ] वाकृदन्त + लाग**—[ त्याला हा धंदा ] सोडावा लागतो
णि ], बसावें लागतें [ भावी ], **अर्थ—विधि वर्तमान.**

हा धातु जेव्हां चतुर्थ्यन्त वाक्‌कृदन्तापुढें आणि ऊंकृदन्तापुढें येतो, तेव्हां त्याचा आरंभदर्शक किंवा साहाय्यदर्शक असा अर्थ होतो. जसें:—बसूं लागतो, करूं लागला, बसावयाला लागला, चालावयास लागेल, इ०.

**टीपः**—लाग धातूपासून अशीं संयुक्तक्रियापदें सर्व आख्यातीं बनतात. तीं व त्यांचे अर्थ येथपर्यंतच्या संयुक्तक्रियापदांचे वर्णनावरून सहज समजतील. म्हणून आतां विस्तार नको.

( २ ) **पड**—या सहायधातूपासून **कर्तव्य** किंवा **आवश्यकता** ह्या अर्थीं पुढील संयुक्तक्रियापदें साधतात.

**( अ ) चतुर्थ्यन्त वाक्‌कृदन्त + पड**—उदा० :—( त्याला रोज स्टेशनावर ) जायला पडतें किंवा जावयास पडतें.

**[ आ ] षष्ठ्यन्त वाक्‌कृदन्त + पड** [ क० ]—उदा०—त्याला कचेरींत रोज पांच सहा सात ] लिहावयाचें पडतें.

पड हा सहायधातु ऊनकृदन्त व तकृदन्त ह्यांपुढें येतो, तेव्हां त्याचा निराळा अर्थ होतो. ह्या वेळीं त्याचा **स्थितिदर्शक** अर्थ असतो. जसें:—( तो त्यांच्या अंगावर ) धांवून किंवा तुटून पडला, [ हें घोंगडें ] भिजत पडलें आहे, तो मरत पडला आहे, इ०.

५३७. **इच्छादर्शक सहायधातु**—**पाह** ( सं० प्रार्थ् ), **चाह**, आणि **इच्छा**, या धातूंचा या अर्थीं उपयोग होतो. सर्व आख्यातीं संयुक्त क्रियापदें साधतात.

[ अ ] **ऊंकृदन्त + पाहतो, चाहतो, इच्छितो**—उदा०:—जाऊं पाहतो, करूं इच्छितो, भेटूं चाहतो, अर्थ—वर्तमान क्रियेच्छा.

[ आ ] **चतुर्थ्यन्त वाक्‌कृदन्त + पाहतो**—उदा०:—[ तो इंग्रजी ] शिकयला पाहतो, इच्छितो, इ०. अर्थ—वर्तमान क्रियेच्छा.

५३८. **पराकाष्ठादर्शक किंवा प्रकर्षदर्शक सहायधातु**—**ठेव, टाक, घे, दे**, इ० धातूंनीं मुख्य धातूच्या अर्थाची अत्यन्त पूर्णता, किंवा पराकाष्ठा दाखविली जाते. **मुख्य क्रियेची पूर्ण परिसमाप्ति** आणि **कर्त्याची त्या क्रियेंतून साफ मुक्तता** असा दुहेरी अर्थ ह्यांपासून होणाऱ्या संयुक्तक्रियापदांत उत्पन्न होतो. हे धातु ऊनकृदन्तापुढें येतात. ऊनकृदन्तानें क्रियेची परिसमाप्ति व या सहायधातूंनीं कर्त्याची मुक्तता सूचित होते.

[ अ ] **ऊकृदन्त + ठेव, टाक, दे,** इ०—उदा०:—पुढील प्रसंगासाठीं आधीं तरतूद करून ठेव, तूं इतकें कर्ज फेडून टाक, त्यानें आपलें कार्य साधून घेतलें, तो तुला हांकून देईल, तो तळीराम गार करून बसला, तो ह्या भानगडी कधींच करून चुकला, विहीर अगदीं आटून गेली, त्या पोरानें मला अगदीं भंडावून सोडिलें, हे अभंग उतरून काढ, इ०.

**५३९. साहाय्यदर्शक** किंवा **आरंभदर्शक सहायधातु—घाल, लाग.**

[ अ ] **ऊकृदन्त + घाल, लाग**—उदा०:—न्हाऊं—मारूं—जेऊं—घालते, करूं लाग, उचलूं लागला, इ०.

**५४०. अनुमोदनदर्शक** किंवा **अनुज्ञार्थक सहायधातु—दे** हा एकच धातु या अर्थी येऊन दोन प्रकारचीं संयुक्तक्रियापदें बनतात. तीं अशीं:—

[ अ ] **ऊकृदन्त + दे:**—उदा०—त्याला वाचूं दे, त्यानें मला बोलूं दिलें, तो तुला इतक्या लौकर कसें जाऊं देतो, इ०.

( **आ** ) **चतुर्थ्यन्त वाकृदन्त + दे**—उदा०:—त्यानें मला बोलावयास दिलें. ह्या तापानें मला आजच खायला दिलें, इ०.

**टीप**—सर्व संयुक्तक्रियापदांमध्यें मुख्य धातु आणि सहायधातु यांचा कर्ता एकच असतो. परंतु या नियमास अनुज्ञार्थक दे धातु अपवाद आहे. मुख्य धातूचा कर्ता, म्हणजे या अनुज्ञार्थक दे धातूच्या पूर्वी जें कृदन्त येतें त्यांतील धातूचा कर्ता, तो धातु अकर्मक असल्यास संयुक्तक्रियापदाचें कर्म होतो, आणि तो सकर्मक असल्यास संयुक्तक्रियापदाचें अप्रत्यक्ष कर्म होतो; आणि दे या अनुज्ञार्थक सहायधातूचा कर्ता संयुक्तक्रियापदाचा कर्ता होतो. उदा०:—त्यानें मला जाऊं दिलें, या वाक्यांत जा हा मुख्य धातु व दे हा सहायधातु आहे. जा ह्या अकर्मक मुख्य धातूचा कर्ता मी हा 'जाऊं दिलें' ह्या संयुक्तक्रियापदाचें चतुर्थ्यन्त कर्म आहे; आणि दे या सहायधातूचा कर्ता तो हा 'जाऊं दिलें' या संयुक्तक्रियापदाचा तृतीयान्त कर्ता झाला आहे. 'त्याला वाचूं दे' या वाक्यांत वाच हा मुख्य धातु आणि दे हा सहायधातु आहे. वाच धातूचा कर्ता 'त्याला' या शब्दांतील 'तो' हा आहे. परंतु हा शब्द वरील वाक्यांत चतुर्थ्यन्त असून 'वाचूं दे' या संयुक्तक्रियापदाचें अप्रत्यक्ष कर्म आहे. 'त्याला' हा चतुर्थ्यन्त शब्द 'वाचूं दे' या संयुक्तक्रियापदाचा कर्ता होऊंच शकत नाहीं. त्याचा कर्ता 'तूं' हा अध्याहृत आहे, हें उघड आहे. तेव्हां 'त्याला वाचूं दे' या वाक्यांत तूं हा अध्याहृत कर्ता, त्याला हें अप्रत्यक्ष कर्म, पत्र, पुस्तक, अशासारखें अध्याहृत प्रत्यक्ष कर्म, आणि 'वाचूं दे' हें संयुक्त क्रियापद, सकर्मक कर्तरि प्रयोग.

[ हें मत आजपर्यंतच्या बहुतेक वैयाकरणांचे विरुद्ध आहे. तेव्हां त्यांच्या [मतांचें समूळ खंडन आणि ह्यांचें यथार्थ मंडन करणें अवश्य आहे.

जोशी यांचे मतें ' त्याला पुस्तक वाचूं दे ' यांत ' वाचूं दे ' हें संयुक्तक्रियापद करणें योग्य नाहीं. त्यांच्या मतें या वाक्यांत ' तूं ' हा कर्ता, ' वाचूं ' हें कर्म, आणि ' दे ' हें क्रियापद सकर्मक कर्तरि प्रयोग. याच्या समर्थनार्थ ते असें म्हणतात कीं, ' यांतलीं कृदन्तें हीं क्रियावाचक नामें आहेत, व त्यांची द्वितीया विभक्ति होऊन तीं कर्में झालीं आहेत. ' त्यानें मला बोलूं दिलें ' यांत ' बोलूं ' हें मूळचें कर्म, कर्माणि प्रयोग असल्यामुळें कर्ता झालें आहे, मला आणि तुला ( हें मागल्या वाक्यसमुदायांतील वाक्यांत आलेलें आहे. तें वाक्य असेंः—मी तुला मुळींच येऊं देणार नाहीं. ) हीं अप्रत्यक्ष कर्में आहेत. ' [ जोशी ह्यांचें प्रौढबोध व्याकरण, क० ६९०—( ११ ) टीप; पृष्ठ ३५७ ]. ' त्याला पुस्तक वाचूं दे ' या वाक्यांत अर्थातच जोशी ह्यांचे मतें ' तूं ' हा अध्याहृत कर्ता, ' वाचूं ' हें कर्म, आणि ' दे ' हें क्रियापद, सकर्मक कर्तरि प्रयोग. म्हणजे त्यांचे मतें पुस्तक हा शब्द वाचूं ह्या ऊंकृदन्ताचें कर्म होय. ही व्यवस्था थेट इंग्रजी रचनेस ( Allow him to read the book ) धरून आहे, हें तज्ञांस सांगावयास नकोच.

गोडबोल्यांचें मत जरासें निराळें आहे. ' त्यानें मला खाऊं दिलें ' या वाक्यांत ' त्यानें ' हा कर्ता, 'मला' हें कर्म आणि ' दिलें ' हें क्रियापद, भावी प्रयोग. जोशी ह्यांचें मतें ' त्यानें ' हा कर्ता ' जाऊं ' हें कर्म, आणि ' दिलें ' हें क्रियापद, कर्माणि प्रयोग. म्हणजे गोडबोले हे ' जाऊं ' यास ' दिलें ' याचें कर्म करण्यास तयार दिसत नाहींत. ' त्याला पुस्तक वाचूं दे ' ह्या ठिकाणीं कसें व्याकरण करावें हें त्यांनीं स्पष्ट सांगितलेलें नाहीं. ह्या ठिकाणीं त्यांच्या भावी प्रयोगानें कशी व्यवस्था लागावी ! ' तूं ' हा कर्ता, ' त्याला ' हें कर्म, आणि ' दे ' हें क्रियापद, इतकें त्यांचें मत स्पष्ट आहे. पण ' त्यानें मला जाऊं दिलें ' या ठिकाणीं भावी प्रयोग करण्याची जी सवड सकृद्दर्शनीं दिसते ती ' त्याला पुस्तक वाचूं दे ' या वाक्यांत दिसत नाहीं. तेव्हां ह्या ठिकाणीं त्यांच्या मतें ' तूं ' हा अध्याहृत कर्ता, ' त्याला ' हें कर्म, दे हें क्रियापद, अर्थात् सकर्मक कर्तरि प्रयोग, असेंच म्हटलें पाहिजे. परंतु ' दे ' ह्या अनुज्ञार्थक सहायधातूची अशी व्यवस्था लावणें योग्य दिसत नाहीं. ' मुलाला मजपाशीं दे ' या ठिकाणीं ' तूं ' हा कर्ता, ' मुलाला ' हें कर्म, ' दे ' हें क्रियापद, सकर्मक कर्तरि प्रयोग, असें म्हणणें जसें योग्य आहे, तसें वरील वाक्यांत तें योग्य नाहीं. कारण कीं, ' दे ' या धातूस दोन कर्में लागतात, एक प्रत्यक्ष व दुसरें अप्रत्यक्ष. ' मुलाला मजपाशीं दे ' या वाक्यांत ' मुलाला ' हें प्रत्यक्ष कर्म आहे; ' मजपाशीं ' हें अप्रत्यक्ष कर्म शब्दयोगी अव्ययान्त आहे इतकेंच. तसें ' त्याला पुस्तक वाचूं दे ' या वाक्यांत काय कीं ' त्यानें मला जाऊं दिलें ' या वाक्यांत काय, ' त्याला ' आणि ' मला ' हीं अप्रत्यक्ष कर्में होतील, प्रत्यक्ष होणार नाहींत. तेव्हां प्रत्यक्ष कर्माबद्दल

गोडबोले मुग्ध आहेत. कारण कीं, 'त्यानें मला जाऊं दिलें' या वाक्यांत 'जाऊं' हें त्यांचे मतें अव्यय आहे. तेव्हां 'दिलें' हें मुख्य क्रियापद करून त्याचे प्रत्यक्ष कर्माबद्दल मौन धरणें हें कांहीं समाधानकारक नाहीं हें उघड आहे.

जोशी यांनीं या बाबतींतील मुग्धता सोडून 'जाऊं' 'वाचूं' यांस साफ कर्म असें म्हटलें आहे. आणि 'दे' यास मुख्य धातु मानिला असतां तसें करणें ओघासच येतें. परंतु असें करणें योग्य नाहीं. गोडबोले यांनीं ज्याप्रमाणें आपल्या समोरील उदाहरणांकडेच पाहून निर्णय केला असें दिसतें, त्याचप्रमाणें जोशी व खेर ह्यांची या कामीं तीच स्थिति झाली आहे असें वाटतें. म्हणजे एखाद्या मुद्याचा जितक्या विस्तृतदृष्ट्या विचार व्हावयास पाहिजे, तितक्या विस्तृत दृष्टीनें त्या विषयाकडे न पाहतां आपल्या समोर त्याचा जेवढा भाग येईल, तेवढ्यावरूनच सर्वसाधारण सिद्धांत बेधडक ठोकून द्यावयाचा, हा न्यायशास्त्राचे दृष्टीनें एक मोठा दोष आहे; यास अवलोकनात्मक विगमन असें म्हणतात. मराठी व्याकरणांतील या दोषांचीं अनेक उदाहरणें यापूर्वीच आलीं आहेत. तेथेंही तोच दोष दिसतो. जोशी यांनीं 'जाऊं,' 'बोलूं,' या कृदन्तास 'दिलें' याचें कर्म केलें आहे. परंतु जाऊं, बोलूं, हीं कृदन्तें गोडबोले यांनीं म्हटल्याप्रमाणें अव्ययें आहेत. ह्यांस एकही विभक्ति लागत नाहीं! आणि त्यांचा वादविषयक स्थळांशिवाय अन्यत्र नामाप्रमाणें उपयोग झालेला आढळत नाहीं. मूळ संस्कृतांतही गन्तुं, वक्तुं, ह्यांची कधींच कोणी नामांमध्यें गणना करीत नाहीं म्हणजे मराठी व्याकरणाचे दृष्टीनें, आणि जाऊं, बोलूं, ह्यांचे व्युत्पत्तीचे दृष्टीनें ऊंकृदन्तास नाम म्हणणें अनुचित आहे हें उघड आहे. जोशी ह्यांनीं 'दे' ह्या धातूचें प्रत्यक्ष धर्म सांगण्याचें धाडस केलें हें बरें झालें. परंतु दे ह्यास मुख्य धातु मानण्याची जी मूळ चूक झाली आहे, तिच्या योगें ऊंकृदन्तास नाम मानण्याची चूक ओघासच आली, त्यास जोशी ह्यांचा काय इलाज!

या दोन्ही चुका खेर ह्यांचे नजरेस आल्या होत्या असें दिसतें. ते म्हणतात कीं, 'दे' धातूस क्रियापद मानणें म्हणजे असल्या वाक्यांतील अर्थाकडे पूर्ण दुर्लक्ष करणें होय. 'त्यानें मला रुपये दिले' अशा वाक्यांत 'दे' ह्या मुख्य धातूचा स्वाधीन करणें असा जो अर्थ आहे, तो वादविषयक वाक्यांत नाहीं; आणि ऊंकृदन्त हें वर्तमानकालवाचक अव्यय आहे. खेर ह्यांचीं हीं दोन्हीं विधानें अगदीं यथार्थ आहेत, वादविषयक वाक्यांत 'दे' हा सहायधातु असून, त्याचा अनुमोदन किंवा अनुज्ञा म्हणजे परवानगी (किंवा गोडबोले म्हणतात त्याप्रमाणें परमागणी) देणें असा अर्थ आहे, स्वाधीन करणें असा अर्थ नाहीं हें उघड आहे. त्याचप्रमाणें ऊंकृदन्त, हें अव्ययच होय. त्यास वर्तमानकालवाचक हें खेरांचें नांव योग्य नाहीं. त्यापेक्षां त्यास उपक्रमवाचक म्हणणें कांहीं अंशीं बरें. हा मुद्दा सध्या गौण आहे. कांहीं झालें तरी ऊंकृदन्त हें अव्यय होय, हें खेरांचें म्हणणें

निःसंशय योग्य आहे. आणि वादविषकय वाक्यांतील प्रयोगांबद्दलचा त्यांचा निकाल त्यांच्या समोर असलेल्या उदाहरणांपुरता जरी ठीक आहे, तरी तेही वर निर्दिष्ट केलेल्या मर्यादित दृष्टिदोषास बळी पडले आहेत. ते म्हणतात, ' तो मला जाऊं देत नाहीं, त्यानें त्याला कां मारूं दिलें, या वाक्यांत अनुक्रमें कर्तरि आणि भावी प्रयोग आहेत. मला व त्याला हीं संयुक्तक्रियापदांचीं कर्में आहेत. तेव्हां हे दोन्ही प्रयोग सकर्मक आहेत हें उघड आहे. ' इतकें खेर ह्यांचें म्हणणें अगदीं व्यवस्थित व यथार्थ आहे. परंतु या संयुक्त क्रियापदांचा कर्मणि प्रयोग होत नाहीं, ( Khers' Marathi Grammar p. 413 ) हें त्यांचें निषेधक विधान साफ चुकीचें आहे. ह्यांच्या कर्मणि प्रयोगाबद्दल जर त्यांनीं कांहींच विधान केलें नसतें तर फार बरें झालें असतें. त्यांजवर तशा स्थितींत फार तर अपूर्णतेचाच दोष आला असता. पण व्याकरणांत अपूर्णता हा कांहीं मोठासा दोष नाहीं. या जगांत काय पूर्ण आहे ! पण ' ह्यांचा कर्मणि प्रयोग होत नाहीं ' असें विधान करून त्यांनीं एक चूक मुद्दाम आपल्या पदरांत बांधून घेतली आहे. ह्याचें कारण इतकेंच दिसतें कीं, त्यांस योग्य उदाहरण सहज आढळलें नाहीं किंवा हा विषय लिहितांना सुचलें नाहीं. तेव्हां अर्थात् कर्मणि प्रयोग होत नाहीं हें म्हणणें त्यांच्या कोत्या दृष्टीनें ठीकच झालें. परंतु ' त्यानें मला पोथी लिहूं दिली ' ' त्यानें त्याला आपलीं पुस्तकें पाहूं दिलीं ' ' मीं त्याला या आंब्यांतून दोन आंबे घेऊं दिले ' अशांसारखीं उदाहरणें जर त्यांचे समोर आलीं असतीं, तर ' कर्मणि प्रयोग होत नाहीं ' असें त्यांनीं डोळे मिटून कधींच म्हटलें नसतें हें उघड आहे.

ह्यावरून असें दिसून येईल कीं, दे हा अनुज्ञार्थी सहायधातु असतां मुख्य क्रियापद अकर्मक असलें तरी संयुक्तक्रियापद सकर्मक होतें; आणि अनुज्ञार्थी दे ह्या सहायधातूनें सकर्मक कर्तरि, सकर्मक भावी किंवा कर्मणि असे तिन्ही प्रयोग होतात. उदाहरणें:—

तो मला जाऊं देतो—सकर्मक कर्तरि

त्यानें मला जाऊं दिलें—सकर्मक भावी

त्यानें मला पोथी लिहूं दिली—कर्मणि

' त्यानें मला पुस्तक वाचूं दिलें ' या ठिकाणींही कर्मणि प्रयोगच आहे. परंतु पुस्तक या तृतीय पुरुषीं नपुंसकलिंगी एकवचनी कर्माप्रमाणें क्रियापद तृ० पु० न० लिं० ए० वचनीं असल्यामुळें येथें भावी प्रयोगाचा आभास होण्यास अवकाश आहे. परंतु भावी प्रयोग हा येथें केवळ आभासच होय; कारण पुस्तक ह्याचें पुस्तकें असें अनेकवचन केलें म्हणजे संयुक्तक्रियापद ' वाचूं दिलीं ' असें होतें; आणि पुस्तकाचे जागीं पोथी शब्द घातल्यानें ' वाचूं दिली, ' पोथ्या शब्द घातल्यानें ' वाचूं दिल्या, ' धडा शब्द घातल्यानें ' वाचूं दिला, ' आणि धडे शब्द घातल्यानें ' वाचूं दिले, ' ह्याप्रमाणें येथील संयुक्त

क्रियापद कर्माचे पुरुषलिंगवचनाप्रमाणें बदलतें यांत संशय नाहीं, असें तेव्हांच कळून येईल. तसेंच ऊंकदन्तास अशा स्थळीं दे या अनुज्ञार्थक सहाय्यधातूचें कर्म मानणें व्याकरणदृष्ट्या साफ चुकीचें आहे, असेंही सूर्यप्रकाशांतल्याप्रमाणें स्पष्ट दिसल. ' त्यानें मला पुस्तक वाचूं दिलें ' या वाक्यांत वाचूं हें दिलें ह्याचें कर्म म्हणण्यांत जी चूक होते, ती स्पष्टपणें उठून दिसत नाहीं हें खरें. तथापि पुस्तकाचे ऐवजीं पोथी शब्द घालून वरील वाक्य ' त्यानें मला पोथी वाचूं दिली ' असें बदललें म्हणजे ' वाच ' हें दे ह्या धातूचें कर्म म्हणणें कसें आंधळेपणाचें आहे हें वाचकांस तेव्हांच कळून येईल. इंग्रजीमध्यें .( Infinitive mood ) नामाप्रमाणें उपयोगांत येते व ती कर्त्याचे व कर्माचे ठिकाणीं येऊं शकते, येवढ्या आधारावर तिच्या अर्थाचे ऊंकदन्तास मराठींत तोच नियम लागू करणें म्हणजे धाडसच होय. एवंच मराठी व्याकरणास इंग्रजी व्याकरणाचा मार्ग लावतांना फार सावधगिरी बाळगिली पाहिजे. केवळ सकृद्दर्शनीं दिसणाऱ्या बाह्य सादृश्यानें चकून जातां कामा नये. जोशी यांनी वादविषयक वाक्यांत कर्मणिप्रयोग मानिला आहे. " त्यानें मला बोलूं दिलें ' या ठिकाणीं त्यांचे भाषेनें सांगावयाचें म्हटलें म्हणजे, त्यानें हें कर्तृपद, बोलूं हें दिलें ह्याचें कर्म येथें कर्ता दिलें ह्या क्रियापदाचा, आणि दिलें हें क्रियापद, कर्मणि प्रयोग. जोशी ह्यांची व्यवस्था व भाषा अपूर्व असल्यामुळें त्यांच्या व्याकरणव्यवस्थेस अनुसरून अशी विलक्षण भाषा वापरावी लागावी ह्यांत नवल नाहीं. एवंच जोशी यांनीं जो कर्मणि प्रयोग मानिला आहे तो विचित्रच होय. ' त्यानें मला पोथी वाचूं दिली ' या ठिकाणीं आमच्या मतें त्यानें हा कर्ता, पोथी हें कर्म, वाचूं दिली हे संयुक्त क्रियापद, कर्मणि प्रयोग. परंतु हा कर्मणि प्रयोग जोशी यांचे व्यवस्थेशीं कसा जुळावा ! ते म्हणणार वाचूं हें दिली ह्याचें कर्म; परंतु वाचूं हा त्यांचे भाषेनें दिली ह्याचा ' कर्ता ' म्हणजे वास्तविक धातुरूपेश कसा होणार ? तेव्हां त्यांचे दृष्टीनें हा प्रयोग कोण हें एक गूढच आहे. ते जर असें म्हणतील कीं, ' वाचूं ' हें नाम तिन्ही लिंगीं व दोन्हीं वचनीं समान असून तें ' त्यानें मला पोथी वाचूं दिली ' या वाक्यांत स्त्रीलिंगी एकवचनी आहे, आणि ' त्यानें मला धडे वाचूं दिले ' या वाक्यांत ' वाचूं ' हें पुल्लिंगी अनेक वचनीं आहे, तर मात्र या वाक्यांतील कर्मणि प्रयोग त्यांचे दृष्टीनेंहीं स्थापित होईल. परंतु असें पोरकटपणें बरळण्यास कोणी सुज्ञ मनुष्य तयार होईल असें वाटत नाहीं. खरी गोष्ट इतकीच कीं, ' त्यानें मला पोथी वाचूं दिली ' अशा प्रकारचीं वाक्यें वेळीं नजरेस न आल्यामुळें ते, गोडबोले, खेर, हे सर्व या ठिकाणीं अगदीं चुकले आहेत असें म्हणणें भाग आहे.

या ठिकाणीं जोशी यांनीं गोडबोल्यांचें पुढें एक पाऊल टाकिलें तर एक माघारें घेतलें. खेर यांनीं मात्र दोघांच्या चुका ओळखून बरेंच सत्य स्थापित

केलें. परंतु ' कर्मणि प्रयोग होत नाहीं ' असें म्हणून मात्र त्यांनीं आपल्या पदरीं न्यूनत्वाचे ऐवजीं एक महत्त्वाचा दोष व्यर्थ बांधून घेतला. दादोबांनीं आपल्या व्याकरणांत या विषयाचा कोठेंच स्पष्ट खुलासा केलेला दिसत नाहीं, परंतु त्यांनीं आपल्या पूरणिकेंत या विषयावर आपलें मत दिलें आहे. ते म्हणतातः— ' ११२. दे— अकर्मक निमित्तवाचक धातुसाधितापुढें ह्या सहायधातूचा योग केला असतां तें सारें संयुक्त सकर्मक क्रियापद होतें. उदा०:—तो मला जेऊं देत नाहीं, त्याणें मला तेथें बसूं दिलें नाहीं, ती सुनेला माहेरीं राहूं देणार नाहीं. इ० स्थळीं मला, त्याला, सुनेला, इ० जेऊं देत नाहीं. बसूं दिलें नाहीं, राहूं देणार नाहीं, इ० या संयुक्त क्रियापदांचीं कर्में मानण्यांत मला मोठीशी अडचण दिसत नाहीं. बसूं देणें, राहूं देणें, हीं मूळचीं सकर्मक संयुक्त क्रियापदें त्यांची हीं त्या त्या काळाचीं रूपें होत. ' दादोबांचा हा खुलासा फार संक्षिप्त व अपुर्ण आहे. त्यांनीं कर्मणि प्रयोगाचें एकही उदाहरण दिलें नसल्यामुळें त्यांचें मत इतरांस पसंत पडलें नसावें. काय असेल तें असो. कर्मणि प्रयोगाच्या येथें दाखविलेल्या उदाहरणांकडे कोणाचेंच लक्ष न गेल्यामुळें या बाबतींतील कोणाचाच निकाल बराबर नाहीं हें उघड आहे. तात्पर्य, आजपर्यंत या मुद्याचा विस्तृत विचार न झाल्यामुळें आणि त्याच्या-संबंधानें बरींच अप्रयोजक आणि चुकीचीं मतें प्रमाणभूत म्हणून समजण्यांत येऊं पहात असल्यामुळें, ह्या मुद्याचा येथें इतका सविस्तर ऊहापोह करणें भाग पडलें. यानंतर तरी या बाबतींतील अज्ञान व चूक पुढें न चालो म्हणजे झालें. ]

५४०. अर्थवान् सहायधातूंच्या कृदन्तापुढें आणखी अर्थहीन सहाय-धातूंचीं आख्यातरूपें येऊन तीन तीन किंवा चार चार शब्दांचींही संयुक्त क्रियापदें कधीं कधीं बनतात. जसें:—बसूं लागत आहे, बसायला लागूं पहातो, मिळूं लागलें असलें पाहिजे. इ०. ह्या क्रियापदांबद्दल स्वतंत्र विवेचन करण्याची जरूर नाहीं, मागल्या संयुक्तक्रियापदांतल्याप्रमाणेंच शेवटल्या धातूचें जें आख्यात तेंच सर्व संयुक्त क्रियापदाचें आख्यात होय; आणि मागील सर्व कृदन्ताचा व अखेरच्या आख्याताचा अर्थ मिळून एकंदर संयुक्तक्रियापाचा अर्थ बनतो. जसें:—बसूं लागत आहे, ह्याचें ईआख्यात होय; कारण आहे हें ईआख्यात होय. आणि सर्व क्रियापदांचा, आरंभ—अपूर्ण—वर्तमान किंवा अपूर्णारंभ वर्तमान असा अर्थ होतो. बसायाला लागूं पाहातो, ह्या संयुक्त क्रियापदाचें प्रथम ताख्यात असून त्याचा विधि—आरंभ—वर्तमान असा अर्थ होतो. तसेंच मिळूं लागलें

असलें पाहिजे, हें संयुक्तक्रियापद ईआख्यातीं असून त्याचा अर्थ आरंभ–पूर्णत्व–संभव–आवश्यकता म्हणजे पूर्णारंभसंभवाची आवश्यकता असा आहे हें उघड आहे.

५४१ कृदन्तें आणि सहायधातु ह्यांचे मदतीनें संयुक्तक्रियापदें कशीं होतात हें आख्यातवार सविस्तर दाखवून त्यांचे अर्थही सांगितले. आतां काळ व अर्थ या दृष्टीनें त्यांचें जें दादोबादि वैयाकरण वर्गीकरण करितात, तें या ग्रंथांत दिलेल्या संयुक्तक्रियापदांचे अर्थांसह समोरासमोर मांडून दाखवितों. मात्र येथें इतकें ध्यानांत ठेवावें कीं, काळ व अर्थ ह्यांचे संबंधानें आजपर्यंत फक्त आह, अस, हो, या सहायधातूंनीं होणारीं संयुक्तक्रियापदें तेवढींच देण्यांत आलीं आहेत; आणि तींही सर्व येत नाहींत. ह्यामुळें तुलनेसाठीं एकंदर सर्व संयुक्तक्रियापदें येथें देण्यांत नाहींत; तर केवळ आह, अस, हो, या सहायधातूंनीं होणारीं तेवढींच येथें दाखवितों. या ग्रंथांतील अर्थ प्रचलित नांवांपासून जेथें भिन्न आहे तेथेंच तो दिला आहे.

| प्रचलित नांव | संयुक्तक्रियापद | येथील अर्थ |
|---|---|---|
| शुद्धवर्तमान | शिकतो | अस्फुट वर्तमान ( बहुधा असा अर्थ; परंतु क्वचित् भूत, भविष्य, रीति, इ० ) |
| अपूर्णवर्तमान | शिकत आहे<br>शिकतो आहे | |
| वर्तमानभूत | शिकला आहे | पूर्णवर्तमान |
| वर्तमानभविष्य | शिकणार आहे<br>शिकावयाचा आहे | उद्देशवर्तमान किंवा वर्तमान उद्देश |
| रीतिवर्तमान | शिकत असतो | अपूर्ण रीतिवर्तमान |
| | शिकला असतो | पूर्णरीतिवर्तमान |
| | शिकणार असतो<br>शिकावयाचा असातो | उद्दिष्ट रीतिवर्तमान |
| | शिकता होतो | अस्फुट वर्तमान किंवा उपक्रमवर्तमान |

| | | |
|---|---|---|
| | बसायास—ला होतें | अवश्यवर्तमान किंवा विधिवर्तमान |
| शुद्धभूत | बसला | अस्फुट भूत [ बहुधा ] भविष्य, वर्तमान, संभव, इ० हे क्वचित्. |
| | बसत असला | अपूर्ण क्रियासंभव किंवा अपूर्ण रीतिसंभव |
| | बसला असला | पर्णभूत संभव |
| | बसणार असला<br>बसावयाचा असला | उद्देशसंभव |
| रीतिभूत | बसे | पद्यांत—वर्तमान किंवा भूत<br>गद्यांत—रीतिभूत किंवा भूत |
| रीतिभूत | बसत असे | अपूर्णरीतिभूत |
| | बसला असे | पूर्णरीतिभूत |
| | बसणार असे<br>बसावयाचा असे | उद्दिष्टरीतिभूत |
| अपूर्णभूत | बसत होता | |
| भूतभूत | बसला होता | पूर्णभूत |
| भविष्यभूत | बसणार होता<br>बसावयाचा होता | उद्दिष्टभूत |
| | बसावें होतें<br>बसावयाचें होतें | विधिभूत |
| पूर्णभूत | बसता झाला | अस्फुटभूत |
| शुद्धभविष्य | शिकेल | भविष्य किं० संभव |
| अपूर्णभविष्य | शिकत असेल | अपूर्णभविष्य किंवा अपूर्णक्रियासंभव |
| भूतभविष्य | शिकला असेल | पूर्णभविष्य किंवा पूर्णक्रियासंभव |

| | | |
|---|---|---|
| विध्यभविष्य | शिकणार असेल<br>शिकावयाचा असेल | उद्दिष्ट भविष्य किंवा<br>उद्दिष्ट क्रियासंभव |
| | शिकता होईल | अस्फुट भविष्य किंवा<br>उपक्रम भविष्य |
| संकेतार्थ | शिकता | अस्फुट संकेत [ वर्तमान<br>भूत किंवा भविष्य ] |
| | शिकत असता | अपूर्ण संकेत |
| | शिकला असता | पूर्ण संकेत |
| | शिकणार असता<br>शिकावयाचा असता | उद्दिष्ट संकेत |
| विध्यर्थ | शिकावा | अस्फुट विधि, कर्तव्य,<br>संभव, इ०. [ वतमान<br>भूत किंवा भविष्य. ] |
| | शिकत असावा<br>[ कर्तरि ] | अपूर्णविधि. किंवा<br>अपूर्णक्रियासंभव |
| | शिकत असावा<br>[ कर्मणि ];<br>शिकत असावें<br>[ कर्मणि किंवा भावी ] | अपूर्णरीतिविधि<br>किं०. अपूर्ण रीतिसंभव |
| | शिकला असावा<br>[ कर्तरि ];<br>शिकला असावा<br>[ कमाण ];<br>शिकलें असावें<br>[ कमाण किंवा भावी ] | पूर्णविधि किंवा<br>पूर्णक्रियासंभव |

| | | |
|---|---|---|
| | शिकणार असावा<br>शिकावयाचा असावा | उद्दिष्टक्रियासंभव |
| आज्ञार्थ | शीक | अस्फुट आज्ञा [ वर्तमान. आज्ञेचा अर्थ फक्त द्वि० पुरुषीं ]. |
| | शिकून अस | अपूर्ण रीतिची आज्ञा. |
| | शिकला अस | पूर्ण क्रियेची आज्ञा. |
| | शिकणार अस<br>शिकावयाचा अस | उद्दिष्ट क्रियेची आज्ञा. |

**टीप**—यावरून असें दिसून येईल कीं, आजपर्यंतचें संयुक्तक्रियापदांचें विवेचन ज्या संकुचित मर्यादेनें करण्यांत आलें आहे, त्या संकुचित मर्यादेंतसुद्धां तें अपूर्णच आहे. तसेंच काळ व अर्थ ह्यांच्या अनुरोधानें दिलेलीं नांवेंही समाधानकारक नाहींत. ह्या बाबतींत कृष्णशास्त्री गोडबोले ह्यांचीं नांवें बरींच चांगलीं आहेत; व त्यांनीं इतरांपेक्षां ह्या विषयाचें बरेंच चांगलें विवेचन केलें आहे असें आढळून येईल. तरी तें पूर्वींच्या संकुचित दृष्टीनेंच केलेलें असल्यामुळें स्वभावतः अपूर्ण आहे.

[ संयुक्तक्रियापदांचें आणि त्यांस दादोबा, चिपळूणकर, गोडबोले, वगैरे वैयाकरणांनीं जीं निरनिराळीं नांवें दिलीं आहेत ( तीं त्यांचे त्यांचे पुस्तकांत पहावीं ) त्यांचे सूक्ष्म निरीक्षण केलें म्हणजे असें आढळून येईल कीं, विभक्तिप्रकरणांत प्रत्ययांवरून विभक्ति व अर्थावरून विभक्ति या दोहोंचा जसा आजपर्यंत मराठी व्याकरणांत व्यर्थ घोंटाळा करण्यांत आला आहे, त्याचप्रमाणें प्रत्ययांवरून आख्यात व अर्थावरून आख्यात ह्या दोहोंचा आख्यात प्रकरणांत तितकाच किंबहुना अधिक घोंटाळा झालेला आहे. नामांस लागणाऱ्या चरम प्रत्ययांचे जे वर्ग आहेत, त्यास मराठी व्याकरणांत विभक्ति हें एक सर्वसाधारण नांव तरी आहे. परंतु धातूंस लागणाऱ्या चरम प्रत्ययांचे जे वर्ग होतात, त्यांस सर्वसाधारण असें एक नांवही प्रचारांत नाहीं. त्यांपैकीं कांहींस काळ म्हणतात व कांहींस अर्थ म्हणतात. हा सर्व घोंटाळा इंग्रजीचे सहवासापासून आमच्यांत उत्पन्न झाला आहे. हा घोंटाळा आणखी किती दिवस चालू राहणार किंवा आम्ही ठेवणार ? आमच्या मतें त्याचें समूळ निराकरण जितकें लौकर होईल तितकें चांगलें. म्हणूनच या ग्रंथांत असल्या घोंटाळ्याचा जागजागीं सविस्तर परिस्फोट करून त्यास हद्दपार करण्याचा किंवा त्याजवर बहिष्कार घालण्याचा प्रयत्न केला आहे. त्यास पूर्ण यश देणें न देणें हें लोक जागृतीवर म्हणजे

'पांचांमुखीं' असलेल्या परमेश्वराच्या इच्छेवर अवलंबून आहे. म्हणून या मताची सत्यता व इष्टता सर्व लोकांचे प्रत्ययास आणून देण्याकरितां केलेल्या विस्ताराबद्दल व कांहीं ठिकाणच्या पुनरुक्तीबद्दल क्षमेचा पूर्ण भरंवसा मनांत बाळगून पुढें सरतों.

तेव्हां धातूंस लागणाऱ्या चरम प्रत्ययांचे वर्गांस सर्वसाधारण असें एक नांवही मराठींत प्रचारांत नाहीं ही पहिली मोठी उणीव होय. ती आख्यात ह्या शब्दानें भरून निघेल. या आख्यातांपैकीं कांहींस काळ व कांहींस अर्थ अशीं नांवें प्रचारांत आहेत. आमच्या मतें काळ व अर्थ यांमधील फरक व्याकरणांत फारसा महत्वाचा नाहीं. कारण कीं, ज्या आख्यातास अर्थ म्हटलें आहे तीं 'काळ' मुदलींच दाखवित नाहींत किंवा ज्यांस काळ म्हटलें आहे, त्यांनीं अर्थ कधींच दाखविला जात नाहीं, असें थोडेंच आहे? शिवाय 'अर्थ' या शब्दास दिलेला, मराठी व्याकरणांतील मर्यादित अर्थ सुद्धां योग्य व अवश्य नाहीं. हा संकुचित अर्थ संस्कृतागत नसून इंग्रजीपासूनच घेतलेला आहे. तथापि अर्थ या शब्दाचा नेहमींचा विस्तृत अर्थ सुद्धां व्याकरणांत घेण्यास हरकत नाहीं. या नेहमींच्या विस्तृत अर्थानें काळ हाही एक धातूच्या आख्यात प्रत्ययांचा अर्थच आहे. ज्या आख्यातांस काळ म्हणतात, त्यांस संकेत, विधि, आज्ञा, वगैरे अर्थ फारसे नसतात आणि ज्या आख्यातांस अर्थ हें नांव देतात, त्यांचा बहुधा तिन्ही काळांचे अर्थीं उपयोग होत असल्यामुळें त्यांस एका विशिष्ट काळाचा अर्थ नाहीं हें खरें; तरी ज्यांस काळ म्हणतात त्या आख्यातांचाही एकाच काळीं नेहमीं उपयोग होतो असें नाहीं; हें गेल्या अध्यायांतील आख्यातांचे अर्थांवरून स्पष्ट होईलच. तथापि काळ, किंवा व्याकरणांतील मर्यादित अर्थ, किंवा नेहमींचा विस्तृत अर्थ ह्यांशी, धातूंस चरम प्रत्यय लागून होणाऱ्या रूपांच्या वर्गीकरणांत, वैयाकरणांस विशेष कर्तव्य नसल्यामुळें, या वर्गांपैकीं कांहींस काळ व कांहींस अर्थ अशीं भिन्न भिन्न नांवें देणें योग्य नव्हे. ज्यांस काळ व ज्यांस अर्थ असें म्हणतात, तीं सर्व पदें धातूंस चरम प्रत्यय लागून झालेलीं असल्यामुळें त्या सर्वांस साधारण असें एक नांव असणें इष्ट व अवश्य आहे आणि तें आख्यात हें होय.

दुसरा प्रश्न असा कीं, आख्यातें प्रत्ययांवरून मानितात कीं अर्थावरून मानितात? आमच्या वैयाकरणांनीं तो (त्ये, ते, ती,-तें) आणि तात असे तृतीय पुरुषीं वर्तमानकाळाचे म्हणून प्रत्यय दिले आहेत. यांवरून ज्या आख्यातास वर्तमानकाळ असें म्हटलें आहे तें लिंगानुसार बदलतें हें उघड आहे. परंतु 'आहे' व 'आहेत' हीं तृतीय पुरुषाचीं रूपें जरी वर्तमानकाळाचीं आहेत असें त्यांचें मत आहे, तरी या रूपांत वरील प्रत्ययही नाहींत किंवा हीं रूपेंही लिंगानुसार बदलणारीं नाहींत. त्याचप्रमाणें ज्या आख्यातास भूतकाळ असें म्हण-

तात, त्याचे ला–ली–लें आणि ले–ल्या–लीं असे तृतीय पुरुषाचे प्रत्यय सांगतात आणि होता–ती–तें आणि होते–त्या–तीं ह्या हो धातूच्या रूपांस ते भूतकाळाचीं रूपें अस म्हणतात. परंतु या रूपांत वैयाकरणांचें भूतकाळाच्या प्रत्ययांचाचसा काय, पण त्यांच्या कोणत्याही काळाच्या प्रत्ययांचा मुदलींच पत्ता नसून हीं रूपें ज्यास तें संकेतार्थ असें म्हणतात, त्याचीं आहेत; म्हणजे ह्या रूपांत त्यांच्या संकेतार्थाचे प्रत्यय दिसत आहेत हें उघड आहे. बरें अर्थावरून आख्याताचे भेद मानण्यांत आले आहेत म्हणूनच त्यांस वर्तमानकाळ, विध्यर्थ, आज्ञार्थ, अशीं अर्थपूर्ण नांवें देण्यांत आलीं आहेत असें म्हणावें, तर तसेंही दिसत नाहीं. कारण कीं एकाच आख्याताचीं म्हणून जीं रूपें सांगण्यांत येतात त्यांस निरनिराळे अर्थ आहेत आणि एकाच अर्थाचीं रूपें निरनिराळ्या आख्याताचीं आहेत असेंही म्हटलेलें आढळतें. उदाहरणार्थ, गेल्या अध्यायांतील आख्यातार्थ पहावे. त्यांवरून एकाच आख्यातास कसे अनेक अर्थ आहेत, इतकेंच नव्हे तर इतर आख्यातांचेही अर्थ आहेत हें चांगलें समजेल. आणि गेल्या अंकांत (५४१) दिलेल्या रूपावलीकडे पहावें म्हणजे एकाच संभव किंवा संशय या अर्थाचीं किंवा विधि या अर्थाचीं रूपें अनेक आख्यातांत म्हणजे वर्गांत आलेलीं आढळतील. एवंच, प्रचलित आख्यातव्यवस्थेंत विभक्तींच्या व्यवस्थेंतल्या सारखाच ब्रह्मघोटाळा माजला आहे, हें उघड आहे. तर मग आख्यातें अर्थावरून मानावीं कीं प्रत्ययांवरून मानावीं? ह्या प्रश्नाचे उत्तरासाठीं आतां विस्तार करण्याची मुळींच जरूर नाहीं. ह्याच प्रकारचा प्रश्न विभक्तिप्रकरणीं सोडविण्यांत आला आहे. तेथील विवेचनावरून वाचकांचे लक्षांत तेव्हांच येईल कीं, व्याकरणाचे शास्त्रीय पद्धतीस अनुसरून विभक्तींप्रमाणेंच आख्यातेंही प्रत्ययांवरूनच मानिलीं पाहिजेत, हें उघड आहे.

प्रत्ययांवरून आख्यातें मानावयाचीं इतकें ठरल्यानंतर तीं किती आहेत हा फारसा कठिण प्रश्न नाहीं. या ग्रंथांत आख्यातें सात मानण्यांत आलीं आहेत. जोशी यांनीं आठ मानिलीं आहेत. परंतु त्यांचा जुना वर्तमान व रीतिभूत ह्यामध्यें एक दोन प्रत्ययांचाच फरक असल्यामुळें त्या दोहोंचें एकच आख्यात मानून कृष्णशास्त्री चिपळूणकरांप्रमाणें त्याचे निरनिराळे दोन उपयोग सांगणें बरें. गुंजीकरांनीं शिकणार, करणार, देणार, इ० हें एक स्वतंत्र आख्यातच मानिलें आहे. परंतु हें आख्यात नसून एक कृदन्त आहे, हें संयुक्तक्रियापदांचे विवेचनावरून कळेलच. आतां कधीं कधीं 'णार' प्रत्ययान्त रूपाचा क्रियापदाप्रमाणें उपयोग झालेला दिसतो हें खरें. जसें:—तो उद्यां जाणार, तूं कधीं जाणार, इ०. तथापि या ठिकाणीं 'जाणार' हें वास्तविक क्रियापद नसून कृदन्त आहे; आणि त्याचे पुढें सहायक्रियापद गुप्त आहे. म्हणजे वरील वाक्यें पूणपणें लिहावयाचीं असें म्हटलें असतां तीं—तो उद्यां जाणार आहे तूं कधीं

जाणार आहेस—अशीं लिहिलीं पाहिजेत हें उघड आहे. शिवाय अशीं पूर्ण वाक्येंही प्रचारांत आहेतच. ह्यावरून वरील वाक्यांत जाणार ह्याचा क्रियापदाप्रमाणें उपयोग झाला आहे, असें म्हणण्यापेक्षां त्याचे पुढील सहायक्रियापदच गुप्त आहे असें म्हणणें बरें. धातूंचीं 'णार' प्रत्ययान्त रूपें क्रियापदें नसून कृदन्तेंच होत असें म्हणण्यास आणखी एक सबळ कारण आहे. तें असें कीं, जाणार, करणार, देणार, हीं रूपें तिन्ही पुरुषीं दोन्हीं वचनीं, व तिन्ही लिंगी समान आहेत; म्हणजे धातूंचें 'णार' प्रत्ययान्त रूप पुरुषावरून, वचनावरून, किंवा लिंगावरून—कशावरूनही बदलत नाहीं हें उघड आहे. बरींच कृदन्तें अशीं आहेत; परंतु गौण क्रियापदांशिवाय असें अविकृत एकही क्रियापद आढळत नाहीं; आणि गौण धातूंपासून 'णार' प्रत्ययान्त रूप मुळींच होत नाहीं. यामुळें धातूंचें 'णार' प्रत्ययान्त रूप आख्यात रूप नसून वास्तविक कृदन्तच होय, हें निर्विवाद सिद्ध होत नाहीं काय ? म्हणून सातांपेक्षां अधिक आख्यातें मानण्याची जरूर नाहीं.

आतां आख्यातांस जीं नांवें द्यावयाचीं, तीं अर्थपूर्ण कामाचीं नाहींत; तर केवळ सांकेतिक चिह्नांसारखी पाहिजेत, हें विभक्तींच्या ऊहापोहांत केलेल्या खुलाशावरून स्पष्ट कळेलच. एकाच आख्यातास अनेक अर्थ असल्यामुळें अर्थपूर्ण नांव जरी बऱ्याच अंशी यथार्थ असलें, तरी तें कांहीं अंशी तरी अप्रयोजक ठरणारच. ह्यामुळेंच संस्कृत व्याकरणांत विभक्तींस प्रथमा, द्वितीया इत्यादि सांकेतिक चिह्नमय नांवें दिलीं आहेत. 'अर्थपूर्ण' नांवांच्या अप्रयोजकत्वाचें ढळढळित उदाहरण पाहिजे असल्यास तें आज्ञार्थ हें होय. हें नांव तर बहुतांशीं यथार्थ नाहीं. कारण कीं, लिंगभेदानें न फिरणाऱ्या प्रत्येक आख्याताचीं सहा सहा रूपें असतात. आणि ज्या आख्यातास आज्ञार्थ असें म्हणतात, त्या आख्याताच्या द्वितीय पुरुषाच्या दोन रूपांचाच आज्ञेच्या अर्थीं बहुधा उपयोग होतो. म्हणून आज्ञार्थ हें नांव फार तर एक तृतीयांशानेंच यथार्थ आहे. आणि दोन तृतीयांशांनीं म्हणजे बहुतांशीं अप्रयोजक होय हें उघड आहे. म्हणून आख्यातांस द्यावयाचीं नांवें खुणांसारखीं सांकेतिक असावीं. आतां प्रचलित नांवांचे जागीं त्यांचा प्रसार व्हावयाचा असल्यामुळें तीं फारच सुलभ म्हणजे सहज ओळखण्यासारखीं व ध्यानांत राहाण्यासारखीं पाहिजेत. यामुळें विभक्तीप्रमाणें त्यांस पहिल, दुसरें, तिसरें, इ०, ज्या ठिकाणीं वास्तविक कांहीं क्रम नाहीं अशा ठिकाणीं क्रमसूचक नांवें देणें उपयोगाचें नाहीं. कारण कीं, असलीं नांवें अभ्यासावांचून ध्यानांत राहण्यास कठिण आणि त्यांचा सहज प्रसार होण्यास लायक नाहींत. ह्यामुळें आख्यातांस आम्हीं ताख्यात, लाख्यात, वाख्यात, इत्यादि सांकेतिक पण सुलभ, आणि आख्यातें ओळखण्याचे कामीं उलट साहाय्य करणारीं अशीं नांवें दिलीं आहेत. त्यांचें योग्य चीज होवो.

यावरून ही गोष्ट उघडच आहे कीं, क्रियापद चालवितांना काळ व हल्लींच्या पद्धतीनें न सांगतां फक्त "त्याचें आख्यात सांगून त्या आख्याताचा अर्थ सांगितला म्हणजे झालें. उदा०:—मी आलोंच तुम्ही पुढें चला." या वाक्यांतील 'आलों' हें ये धातूचें स्वार्थीं भूतकाळीं प्रथम पुरुषाचें एकवचन असें न म्हणतां 'आलों' हें ये धातूचें लाख्यातीं प्रथम पुरुषाचें एकवचन, अर्थ—संनिहित भविष्य. त्याचप्रमाणें 'चला' हें 'चल' धातूचें ऊआख्यातीं द्वितीय पुरुषाचें अनेकवचन, अर्थ—आज्ञा, असें ह्मणावें. म्हणजे नामाचें व्याकरण करितांना ज्याप्रमाणें प्रथम विभक्ति सांगून मग तिचा जो काय अर्थ असेल तो सांगावयाचा, त्याचप्रमाणें क्रियापदाचें व्याकरण करितांना त्याचें आख्यात सांगून त्या आख्याताचा अर्थ सांगावयाचा. संयुक्तक्रियापद असतां सहायधातु ज्या आख्यातीं असेल तें त्या संयुक्तक्रियापदाचें आख्यात होय. जसें:—करित असतो, केला असतो, करणार असतो, इत्यादि सर्वांचें प्रथमताख्यात होय. गेला असेल, जाता होईल, करावयाचें असेल ह्या सर्वांचें ईलाख्यात होय. असेंच अन्यत्र समजावें.

याशिवाय क्रियापदाचे व्याकरणामध्यें रूप आणि भेद अशा दोन गोष्टी सांगण्याची चाल आहे. भेदांसंबंधीं सविस्तर विवेचन पूर्वीं केलेंच आहे. त्यावरून भेद सांगण्याची कांहीं जरूर नाहीं हें उघड आहे. "तो मजकडून अभ्यास करवितो" ह्या वाक्यांतील 'करवितो' ह्याचें व्याकरण करावयाचें आहे, असें समजा. हल्लींचे पद्धतीप्रमाणें कर या सकर्मक धातूचें प्रयोजक भेदीं इ०. असें जें म्हणतात, त्याचे ऐवजीं करव या साधित सकर्मक धातूचें, आणि ह्याहीपेक्षां करव धातूचा अधिक स्पष्ट खुलासा हवा असल्यास, करव या प्रयोजक धातूचें इतकें थोडक्यांत म्हटलें म्हणजे पुरे आहे. त्याचप्रमाणें 'मला काम करवतें' ह्या वाक्यांतील 'करवतें' ह्याचें व्याकरण करितांना कर या सकर्मक धातूचें शक्य भेदीं असें न म्हणतां 'शक्य भेदीं' हे शब्द गाळून, अखेरीस प्रयोग सांगतांना फक्त 'शक्य कर्मणि प्रयोग' असें म्हणावें म्हणजे झालें. ह्याचाही खुलासा अंशतः भेदांचे विवेचनांत आलाच आहे. बाकीचा पुढील प्रयोगाध्यायांत होईल.

करणरूप व अकरणरूप अशीं दोन प्रकारचीं 'रूपें' दादोबांनीं मानिलीं आहेत. जे वैयाकरण तीं मानित नाहींत, ते वाक्यांतील निषेधक अव्यय क्रियापदांत जरी मिसळलेलें असलें, तरी तें वेगळें काढून त्याचें स्वतंत्र व्याकरण करितात. म्हणजे 'नव्हता' या क्रियापदांतील 'न' वेगळा काढून 'होता' ह्याचें व्याकरण वेगळें करणें भाग आहे. 'नसता = न + असता.' परंतु करीनास, अशा सारख्या ज्या कांहीं क्रियापदांत निषेधार्थक अव्यय मध्येंच मिसळून गेलें आहे, तेथें क्रियापदाचे तुकडे पाडणें सुद्धां जरा कठिणच पडतें. म्हणून मराठी व्याकरणांत रूप मानणें बरें. ]

५४२. क्रियापदाच्या विधायक किंवा निषेधक उपयोगास **रूप** असें म्हणतात. रूपें **दोन** आहेत. **करणरूप** व **अकरणरूप**.

[ अ ] जेव्हां क्रियापदाचा विधायक म्हणजे अस्तिपक्षीं उपयोग होतो, तेव्हां त्याचें **करणरूप** आहे असें म्हणतात. जसें:—करितो, पाहिजे, असतो, इ०.

[ आ ] जेव्हां क्रियापदाचा निषेधक अर्थानें म्हणजे नास्तिपक्षीं उपयोग होतो, तेव्हां त्याचें **अकरणरूप** आहे असें म्हणतात. हें बहुधा न, ना, नाहीं, इ० निषेधक शब्दांच्या वाक्यांतील अस्तित्वानें समजतें. जसें:—न करितो, नसतो, न द्यावें, देत नाहीं, इ०.

[ आतां अखेरीस एका मुद्याचें विवेचन करावयाचें आहे. तो संयुक्तक्रियापदांचे संबंधाचा होय. आम्हीं तर संयुक्तक्रियापदें मानिलींच आहेत. दादोबा, चिपळूणकर, गोडबोले, यांनींही तीं मानिलीं आहेत. खेरांनींही बहुतेक मानिलीं आहेत. बहुतेक म्हणण्याचें कारण इतकेंच कीं त्यानीं व्याकरण करितांना कधीं कधीं संयुक्तक्रियापदें फोडून त्यांतील कृदन्तांचें व आख्यातांचें वेगळ वेगळें व्याकरण केलें आहे. एवंच जेथें संयुक्तक्रियापद मानणें त्यांस सोईचें वाटलें तेथें तें त्यांनीं मानिलें आहे; आणि जेथें त्याचे तुकडे पाडणें सोईस्कर वाटलें तेथें त्यानीं त्याजवर घाव घालण्यास मागेंपुढें पाहिलेलें नाहीं. एकंदरींत या मुद्याविषयीं निश्चित मत ठरविण्याचा त्यांनीं विशेष प्रयत्न केलेला दिसत नाहीं. आणि ह्यामुळें त्यांचे व्याकरणांत कोणती तरी एक संगतवार व्यवस्था दिसत नाहीं; तर धरसोडीचा प्रकार दिसतो. दादोबा आणि गोडबोले यांनीं जरी संयुक्तक्रियापदें मानिलीं आहेत, तरी ह्या कामीं त्यांनीं कांहीं कांहीं ठिकाणीं माघार घेतलेली आहे; म्हणजे त्या ठिकाणीं संयुक्तक्रियापदें मानण्यास ते कचरले आहेत. चिपळूणकरांचे निबंधांतही कांहीं अंशीं असा प्रकार दिसतो. यामुळेंच बहुधा खेरांचे व्याकरणांत दोन व्यवस्थांचा घोंटाळा किंवा धरसोडीचा प्रकार आहे. वर सांगितल्याप्रमाणें त्यांनीं स्वतः या गोष्टीचा स्वतंत्र विचार केलेला दिसत नाहीं. तेव्हां जुन्या पद्धतीचे दोष त्यांच्या व्याकरणांत तसेच किंवा कमजास्त मानानें दिसणें साहजिक आहे. दुसरे नवीन व्याकरणकार जोशी यांनीं भाषेमधील संयुक्तक्रियापदच नाहींसें करून टाकिलें आहे; आणि जिकडे तिकडे आहे, असतो, होता, इ० सहाय क्रियापदांसच मुख्य क्रियापदें मानिलें आहे. तेव्हां असें करण्याचीं त्यांचीं कारणें कोणतीं हें प्रथम समजून घेणें अवश्य आहे. त्याकरितां त्यांचे व्याकरणांतून एक उतारा घेतों. तो जरासा लांब आहे. तथापि त्यांचे म्हणण्याचा कोणत्याही तऱ्हेनें विपर्यास होऊं नये, म्हणून त्यांचें म्हणणें त्यांच्याच शब्दांनीं अक्षरशः पुढें देतों.

जोशी यांनीं आपल्या व्याकरणाचे प्रस्तावनेनंतर ‘ या व्याकरणांत ज्या नवीन गोष्टी आहेत त्यांविषयीं ’ ह्मणून एक उपोद्घातादाखल लेख लिहिला आहे. त्यांपैकीं विभक्ति आणि कर्तृपद व कर्ता ह्यासंबंधाच्या नवीन गोष्टी कोणत्या व त्यांची किंमत काय ह्याबद्दल या ग्रंथांत अन्यत्र खुलासा झालेलाच आहे. ज्याला ते ‘ काळांची व्यवस्था ’ असें ह्मणतात ती व्यवस्था प्रथम कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं सुचविली; आणि ती दादोबांचे व्यवस्थेपेक्षां अधिक शास्त्रीय असल्यामुळें तिच्या योगें दादोबांचे व्याकरणांतील काळविचार अगदींच रद्द झाला आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. मात्र या नवीन व्यवस्थेस ‘ काळाची व्यवस्था ’ असें म्हणण्यापेक्षां आख्यातांची व्यवस्था असें ह्मटलें असतें, तर चांगलें झालें असतें. आख्यात या शब्दाची आवश्यकता व इष्टता वर दाखविलीच आहे. ह्या आख्यात शब्दाचा उपयोग केला ह्मणजे एकंदर आख्यातप्रकरण विभक्तिप्रकरणाप्रमाणें कसें निर्दोष होतें, हें वाचकांस कळलेंच असेल. तेव्हां आतां संयुक्तक्रियापदांचे संबंधाची जोशी यांची जी ‘ नवीन गोष्ट ’ तिजबद्दल ते काय ह्मणतात तें पहा.

‘ संयुक्तकाळ—मराठींत पुष्कळ संयुक्तक्रियापदें व संयुक्तकाळ मानित असतात. संयुक्तक्रियापद म्हणजे प्रथमतः एखादें कृदन्त घेऊन त्यापुढें कांहीं नियमित धातु आहेत, त्यांपैकीं एखाद्याचें पूर्ण काळाचें रूप घेऊन झालेलें जोडक्रियापद. या जोडक्रियापदांत साधारणतः दोन अवयव असतात, क्वचित् तीनही असतात. क्रियापदाचा पूर्ण अर्थ या जोडक्रियापदांत असतो. ह्मणून अर्थदृष्टया मागील कृदन्त व पुढलें क्रियापद मिळून दोहोंसही क्रियापद म्हटलें पाहिजे हें खरें. परंतु असें केल्यास प्रत्येक संयुक्तक्रियापदास काळाचें संयुक्त नांव द्यावें लागेल. व जितकीं संयुक्तक्रियापदें तितके भिन्न भिन्न संयुक्त काळही होतील, हें उघडच आहे. इंग्रजी भाषेंत अशा प्रकारचे कांहीं नियमित संयुक्तकाळ आहेत, त्यांचें अनुकरण करून पूर्व व्याकरणकारांनीं संयुक्त काळ मानिले. असे संयुक्त काळ मानण्यास कांहीं हरकत आहे असें नाहीं. परंतु मराठींत असलीं जोडक्रियापदें फार होतात. संस्कृतांत असलीं जोडक्रियापदें आहेत, परंतु तीं मराठींत आहेत त्यांपेक्षां कमी आहेत; व त्या भाषेंत त्यांचे संयुक्तकाळ न मानितां कृदन्तास निराळें मानून पुढील पूर्ण क्रियापदास मात्र मुख्य क्रियापद मानितात. मराठींत संयुक्त काळ मानण्यास अडचण अशी आहे कीं, त्यांचे जेवढे भिन्न प्रकार होतात, त्या सर्वांना व्याकरणांत भिन्न भिन्न नांवें देणें हें फार कठीण आहे, व एवढी खटपट करून व शिकणारांना साठ सत्तर संयुक्त काळांचीं नांवें ध्यानांत ठेवण्यास लाविल्यापासून व्याकरणांत कांहीं विशेष चांगली व्यवस्था होते किंवा शिकणाराची कांहीं जास्त सोय होते असें मुळींच नाहीं. संयुक्तकाळांचे प्रथमावयव जीं कृदन्तें तीं विशेषणें किंवा अव्ययें आहेत,

अशी त्यांची ओळख प्रथमतः करून द्यावीच लागते. तेव्हां व्याकरण चालवितांनाही तीं तशींच मानावीं हें चांगलें. त्यांचीं संयुक्तक्रियापदें बनवून मग पुष्कळशी संयुक्त काळांचीं नांवें ध्यानांत धरण्यापासून तादृश कांहींच फायदा नाहीं. त्यांतून ह्या रूपांची संख्या थोडकीच असती ह्मणजे एका अर्थी ठीक झालें असतें. परंतु असलीं जोडक्रियापदें फारच आहेत. दादोबांनीं पंधरा संयुक्त काळ मानिले आहेत. त्यांत त्यांनीं फक्त तीन काळांच्या भेदांची मात्र व्यवस्था केली असूनही ती अपूर्णच आहे. चिपळूणकर यांनीं एकंदर तीस संयुक्त काळ मानिल आहेत. व गोडबोले यांनीं मुख्य तीन काळांचेच तेवढे एकोणीस निरनिराळे भेद केले आहेत. हे सर्व भेद विचारांत घेतले तरी ज्यांनां अजून कोणी नांव दिलें नाहीं अशीं पुष्कळ रूपें शिल्लक राहतात; असें माझ्या व्याकरणांतील संयुक्तक्रियापदांचे विवरणावरून दिसून येईल, ( पहा, क० ६८४ ते ६९० ). माझा अजमास असा आहे कीं सर्व प्रकारच्या संयुक्तक्रियापदांची गणना केल्यास सुमारें सत्तर तरी संयुक्त काळ मानावे लागतील. एवढ्या खटाटोपीपासून शिकणारांस यत्किंचित् तरी फायदा आहे, असें मला वाटत नाहीं. माझ्या व्याकरणाचे प्रथमावृत्तींत मी इंग्रजी संयुक्त काळांचे धर्तीवर शुद्ध, पूर्ण, अपूर्ण असे थोडकेसे संयुक्त काळ मानिले होते. परंतु विचारान्तीं मला असें दिसून आलें कीं, एक तर संयुक्त काळ जितके उपलब्ध होतील तितके सर्व मानावे किंवा मुळींच मानू नयेत. मला दुसराच मार्ग सोईचा दिसला, ह्मणून या आवृत्तींत संयुक्त काळ मुळींच मानिले नाहींत. जेथें जोडक्रियापद येईल तेथें पुढलें रूप आठ काळ–व–अर्थ यापैकीं ज्या प्रकारचें असेल तसें मानून पूर्वीचें कृदन्त क्रियावाचक नाम, विशेषण किंवा अव्यय जसें असेल तसें मानावें. यामुळें पुष्कळशीं संयुक्त काळांचीं नांवें ध्यानांत ठेवावयास नकोत. इतकेंच नाहीं, तर फार दिवसांपासून चालत आलेल्या व्याकरण चालविण्याच्या ज्या अनेक अडचणीं, त्यांचेंही या व्यवस्थेपासून निवारण होतें; असें या संबंधाचें या व्याकरणांतील प्रकरण पाहिलें असतां ध्यानांत येईल.'

आख्यात या शब्दाचे अभावीं 'आठ काळ–व–अर्थ' असे काळ व अर्थ हे शब्द मुद्दाम एकत्र लिहून मारून मुटकून कसा तरी दिसण्यांत एक शब्द बनवून निर्वाह करावा लागला आहे. तेव्हां विभक्ति या शब्दाप्रमाणें आख्यात शब्द कसा इष्ट व आवश्य आहे हें सहज समजेल. असो; आतां संयुक्तक्रियापदांच्या मुद्याकडे वळूं. या प्रकरणाला जें नांव देण्यांत आलें आहे, तेंच प्रथम अज्ञानमूलक आहे. पुष्कळांचे मतें संयुक्तक्रियापदें आणि संयुक्त काळ ह्यांची इतकी कांहीं घट्ट सांगड बांधली गेली आहे कीं, एकाचे बरोबर नेहमीं दुसऱ्याची कल्पना अपरिहार्यपणें मनांत येते, ह्यामुळें एकास जणुं कांहीं दुसऱ्याचा अर्थ असें म्हणण्यास हरकत नाहीं. संयुक्तक्रियापदें व संयुक्त काळ

हीं ‘ वागर्थाविव संपृक्तौ ’ आहेत, असा साधारण लोकांचा समज एकवार क्षम्य आहे. परंतु खुद्द वैयाकरणांचा असा ग्रह असणें केवळ शोचनिय होय. गेल्या अध्यायांतील अंक ४९९ मध्यें काळाचा अर्थ स्पष्ट करितांना आम्हीं या मुद्याचें जें विवेचन केलें आहे, त्यावरून काळ ही वस्तु अनाद्यनन्त असून अभेद्य आहे, हें उघड आहे. तथापि वक्त्याचे किंवा लेखकाचे दृष्टीनें काळाचे तीन भाग कल्पिले आहेत व त्यांस वर्तमान म्हणजे चालू, भूत म्हणजे गेलेला, आणि भविष्य म्हणजे येणारा, अशीं सापेक्ष नांवें दिलीं आहेत. म्हणूनच या नांवांचा अर्थ नेहमीं वक्त्याचे दृष्टीनेंच समजावा लागतो. एरवीं या नांवांत कांहीं अर्थ नाहीं. काळाचे जरी हे तीन भाग कल्पिले आहेत तरी त्याचे पूर्ण अपूर्ण असे भाग कल्पितां येत नाहींत. कारण कीं, वक्त्याच्या दृष्टीनें भाषणाचे वेळीं भूत काळ हा नेहमींच पूर्ण आहे. तो अपूर्ण कसा होणार ? त्याचप्रमाणें वर्तमान हा नेहमींच अपूर्ण असावयाचा; त्यास पूर्ण म्हणण्यांत काय मतलब आहे ! सूक्ष्म दृष्टीनें म्हटलें म्हणजे वर्तमान काळ हा अत्यन्त सूक्ष्म क्षण होय आणि त्यास पूर्ण किंवा अपूर्ण ह्यांपैकीं कोणतें नांव योग्य होय हें सांगणें कठिण आहे. तथापि वर्तमान म्हणजे चालू असा अर्थ असल्यामुळें त्यास पूर्ण हे नांव शोभत नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्याचप्रमाणें भविष्य काळास जर आरंभच झालेला नाहीं तर त्यास तरी पूर्ण किंवा अपूर्ण ह्यांपैकीं कोणतेंच नांव शोभत नाहीं, हेंहीं निर्विवाद आहे. एवंच वर्तमान, भूत, आणि भविष्य ह्या काळांचे सापेक्ष भागांमध्यें आणखीं पूर्ण, अपूर्ण, इ० भेद मानितां येत नाहींत. वास्तविक म्हटलें म्हणजे पूर्ण, अपूर्ण, हीं विशेषणें काळांस नीट लावितांच येत नाहींत. तर तीं वास्तविक क्रियेस लागतात हें पूर्वीं सांगितलेंच आहे. त्याच दृष्टीनें ‘ संयुक्त काळ ’ ही भाषाच कशी विचित्र दिसते पहा ! काळांचा संयोग कसा करणार ? भूत व वर्तमान यांचा आणि वर्तमान व भविष्य यांचा अपरिहार्य संयोग दिसत आहे. परंतु तो संयोग अनुचारी आहे सहचारी नाहीं; आणि भूत व भविष्य ह्यांचा अव्यवहित असा कोणत्याही प्रकारचा संयोग अशक्यच आहे, ही तात्त्विक किंवा सूक्ष्म दृष्टि जरी बाजूस ठेविली, तरी ‘ संयुक्त काळ ’ ही भाषा अप्रयोजक होय. शिकत असे, बसाला असावा, बसलें पाहिजे, बसत असता, बसूं लागे, बसत जा, बसत जावो, इ० हीं संयुक्तक्रियापदें आहेत. यांस संयुक्त काळ कसें म्हणावें, अथवा हीं संयुक्त काळांची उदाहणें कशीं व कां हें आम्हांस समजत नाहीं. ‘ शिकत असे ’ यास रीतिभूतकाळ असें म्हणतात; त्याचप्रमाणें ‘ शिके ’ यासही रीतिभूतकाळ असें म्हणतात. हें संयुक्त काळाचें नांव आहे काय ? ‘ शिकत असे ’ हें निदान संयुक्तक्रियापद तरी आहे; परंतु ‘ शिके ’ हें संयुक्तक्रियापदही नाहीं. असलीं नांवें संस्कृतांत नाहींत. हीं नांवें इंग्रजी व्याकरणांतून घेतलीं आहेत. तथापि ‘ संयुक्त काळ ’ या अर्थानें जर त्यांचा उपयोग करावयाचा असेल तर तीं

भ्रामक असल्यामुळें त्याज्यच होत. परंतु तीं आपल्या व्याकरणशरीराचा जणुं कांहीं एक अवयव होऊनच बसल्यामुळें त्यांचा यापुढें सहज त्याग करणेंही जवळ जवळ अशक्यच झालें आहे. म्हणून त्याचा योग्य दृष्टीनें व अर्थानें जपून उपयोग केला पाहिजे. रीतिभूत हा काळाचा भेद न मानितां ' शिके ' व ' शिकत असे ' ह्या क्रियापदांचा तो अर्थ होय, असें समजावें म्हणजे झालें. हें गेल्या अध्यायांत सांगितलेंच आहे. शिवाय, या इंग्रजी भाषेनें तरी बसलें पाहिजे, करित जाव, शिकत असा, इ० वर सांगितलेल्या संयुक्तक्रियापदांस ' संयुक्त काळ ' हें नांव तरी कसें द्यावें ? आतां कोणी असें म्हणेल कीं, काळ हा शब्द जर तुम्हास आवडत नसेल तर त्याचें जागीं वाटल्यास तुमचाच आख्यात हा शब्द घाला म्हणजे झालें कीं नाहीं ? यास उत्तर इतकेंच कीं हा आवडीनावडीचा प्रश्न नाहीं. ' संयुक्त काळ ' आणि ' संयुक्त आख्यात ' हीं दोन्ही नांवें व्याकरणदृष्ट्या सारखींच आक्षेपार्ह आहेत. कारण कीं, बसत असे बसणार असावा, इ० उदाहरणांत काळ ज्याप्रमाणें संयुक्त नाहीं, त्याप्रमाणें आख्यातही संयुक्त नाहीं. असे, असावा, इत्यादि प्रकारें असंयुक्त क्रियापदांतल्या प्रमाणें संयुक्तक्रियापदांतही आख्यात हें नेहमींच एकाएकी किंवा असहाय असतें. अर्थात् संयुक्तक्रियापदांमध्यें सहायधातु तेवढाच आख्यात–प्रत्यय लागलेला असतो; आणि त्याचे मागें मुख्य धातूचें कृदन्त असतें उघड हें आहे. यास्तव ' संयुक्त आख्यात ' हें वर्णन सुद्धां ' संयुक्त काळ ' ह्या वर्णनाइतकेंच योग्य किंवा आयोग्य होय. ' संयुक्तक्रियापद ' हें नांवही तितकेंच आयोग्य नाहीं काय ? कारण कीं, बसत असे, बसत असावा, इ० ठिकाणीं क्रियापदांचा तरी संयोग कोठें आहे ? वास्तविक म्हटलें म्हणजे अशा ठिकाणीं कृदन्त व क्रियापद ह्यांचा संयोग आहे; तेव्हां ' संयुक्तक्रियापद ' ही भाषासुद्धां निर्दोष नाहीं; असें क्षणभर वाटण्याचा संभव आहे. परंतु संयुक्तक्रियापद म्हणजे ज्यामध्यें दोन क्रियापदांचा संयोग झालेला आहे तें क्रियापद, असा भलताच अर्थ समजून वरील आक्षेप घेण्यांत काय अर्थ आहे ? संयुक्तक्रियापद म्हणजे ज्या पदांत क्रिया म्हणजे धातु संयुक्त असतो, म्हणजे दोन अथवा अधिक क्रिया किंवा धातु ह्यांच्या संयोगापासून जें पद तयार होतें तें संयुक्तक्रियापद होय. असा ' संयुक्तक्रियापद ह्या संज्ञेचा योग्य अर्थ केला म्हणजे वरील आक्षेपास आवकाशच राहात नाहीं, हें उघड आहे. ह्या संयुक्त क्रियांपैकीं किंवा धातूंपैकीं एक धातु मुख्य असून एक किंवा अधिक सहायधातु असतात, हें उघड आहे. असो.

आतां संयुक्तक्रियापदें मानण्याचे विरुद्ध जोशी ह्यांचें काय म्हणणें आहे तें पाहूं. त्यांच्या पुस्तकांतील वर जो जरासा लांबच उतारा दिला आहे, त्यांतील मुख्य मुद्दा इतकाच आहे कीं, संयुक्तक्रियापदें फार आहेत; केवळ पंचवीस तीसच आहेत असें नाहीं, तर तीं सरासरी सत्तरांपर्यंत असावीं. आणि इतकीं संयुक्त

क्रियापद मानिल्यास 'प्रत्येक संयुक्त क्रियापदास काळाचें संयुक्त नांव द्यावें लागेल व जितकीं संयुक्त क्रियापदें तितके भिन्न भिन्न संयुक्त काळही होतील हें उघडच आहे.' 'या सर्वांना निरनिराळीं नांवें देणेंही फार कठिण आहे व एवढी खटपट करून व शिकणारांना साठ सत्तर संयुक्त काळांचीं नांवें ध्यानांत ठेवण्यास लाविल्यापासून व्याकरणांत कांहीं विशेष चांगली व्यवस्था होते असें मुळींच नाहीं.' म्हणजे मराठींत संयुक्तक्रियापदांची संख्या फार आहे ही एक अडचण होय. ह्याहीपेक्षां दुसरी मोठी अडचण अशी कीं, प्रत्येक संयुक्तक्रिया-पदास संयुक्त काळाचें निरनिराळें नांव तरी कोठून आणावें? आणि आणि-लेंच तरी इतकीं सारीं नांवें ध्यानांत तरी कशीं धरावीं? आणि तेंही कसें बसें महत्प्रायासानें केलेंच, तरी त्याचा शिकणारास किंवा व्याकरणास काय उपयोग? हा जोशी ह्यांचे लांबलचक प्रतिपादनाचा निष्कर्ष होय. ह्यांमध्यें संयुक्तक्रियापद व संयुक्त काळ ह्यांची पूर्वी सांगितल्याप्रमाणें 'वागर्थाविव संपृक्तौ' अशी जी निराधार सांगड घालण्यांत आली आहे, ती अगदींच अयोग्य व अनावश्यक असल्यामुळें तिच्या पायावर रचलली सर्वच इमारत लगेच कोसळून पडत आहे. तात्पर्य इतकेंच कीं, संयुक्तक्रियापदें मानिल्यानें संयुक्त काळ किंवा संयुक्त आख्यातें मानण्याची जरूर नाहीं व तसें करणें योग्यही नाहीं. यामुळें इतक्या काळांस निरनिराळीं नांवें देण्याची व तीं ध्यानांत धरण्याची काल्पनिक प्रचंड अडचण मुळीं उत्पन्नच होत नाहीं. संयुक्तक्रियापदें किती कां असतना; त्यां-पासून कोणतीच अडचण उत्पन्न होत नाहीं. जोशीबोवांनीं मराठींतील संयुक्त-क्रियापदांचा अंदाज साठसत्तरपर्यंत केला आहे. संयुक्तक्रियापदें हीं मूख्य धातूंचीं कृदन्तें व सहायधातूंचीं आख्यातें यांपासून बनतात; म्हणून अशा संयुक्तक्रिया-पदांची संख्या साठ सत्तरच काय, पण आमच्या मतें दोनशांचे वर भरेल; आणि निषेधक रूपें म्हणजे अकरणरूपी क्रियापदें जर हिशेबांत धरिलीं, तर ही संख्या चार-पांचशांपर्यंत जाईल असा आमचा अंदाज आहे. असें असूनही संयुक्तक्रियापदें मानण्यांत आम्ही माघार घेत नाहीं कारण कीं, जोशी ह्यांच्या अडचणी आरंभींच मुळीं गैरसमजावर उभारिलेल्या असल्यामुळें त्यांचा अडथळा या कामीं मुदलींच भासत नाहीं. संयुक्तक्रियापदांबरोबर संयुक्त काळ आलाच; हाच काय तो मुख्य गैरसमज होय. तोच नाहींसा झाल्यावर तदुत्पन्न अडचणी कशास उरत आहेत? तर मग इतकीं असंख्य संयुक्तक्रियापदें मानून त्यांची व्याक-रणांत काय व्यवस्था करावयाची हा प्रश्न उरला. त्याचें उत्तर काय, हें मागृ अध्यायावरून वाचकांस समजलेंच असेल. तें इतकेंच कीं, आख्यातें, संयुक्त-क्रियापदांगभूत कृदन्तें, आणि सहायधातु, इतक्या गोष्टी सांगितल्या म्हणजे संयु-क्तक्रियापदांचें विवेचन संपलें. ह्यापैकीं आख्यातें हीं सांगावींच लागतात. कृदन्तें पुढें मागें सांगावीं लागतात; आणि अमुक अमुक धातूंचा संयुक्तक्रियापदांसर्के

सहायधातु म्हणून उपयोग होतो, असेंही कधीं तरी सांगणें भागच आहे. तात्पर्य, संयुक्तक्रियापदें जर भाषेंत आहेत तर व्याकरणांत कोणत्या ना कोणत्या तरी स्थलीं त्यांचें स्पष्टीकरण झालेंच पाहिजे हें उघड आहे. जोशी यांनीं संयुक्तक्रियापदें मानिलीं नाहींत तरी त्यांनीं क्रियापद–विचारामध्यें धातुसाधित शब्द या माथाळ्याखालीं संयुक्तक्रियापदांगभूत कृदन्तांचा विचार केला आहे; आणि वाक्यरचनेमध्यें क्रियापद या सदराखालीं सहायधातु सांगून संयुक्त क्रियापदें कशीं बनतात, हें निमूटपणें सांगितलें आहे. अशा प्रकारें संयुक्तक्रियायदांचें विवेचन तर टाळितां टळत नाहीं तर मग तीं मानावयाचीं नाहींत म्हणजे काय ? ह्याचा अर्थ इतकाच दिसतो कीं, जोशीबोवांना त्यांचे योगानें संयुक्त काळ मानण्याची व त्यांस निरनिराळीं नांवें देण्याची जी अडचण भासली होती ती त्यांनीं टाळली. परंतु हीं नांवे देण्याचीं पंचाईत मुळीं अनावश्यक होय. ज्याप्रमाणें एकेरी किंवा केवल क्रियापदांचें आख्यात सांगून त्यांचा अर्थ सांगावयाचा, त्याचप्रमाणें संयुक्तक्रियापदांचेंही आख्यात सांगून त्यांचा अर्थ सांगावयाचा; मात्र या ठिकाणीं मुख्य धातूचें कृदन्त व सहायधातूचें आख्यात ह्या दोहों मिळून आणि कधीं कधीं त्यांतच सहायधातूचा अर्थ मिळवून सबंध अर्थ सांगावयाचा. जोशीबोवांनींही कृदन्तांचे अर्थ, आख्यातांचे अर्थ, व सहायधातूंचे अर्थ, ह्या गोष्टी दिल्याच आहेत. तेव्हां ह्या गोष्टी माहित झाल्यावर संयुक्तक्रियापदाचा अर्थ सांगण्याचें काम कोणीही करूं शकेल हें उघड आहे. संयुक्त काळ सृष्टींत किंवा व्याकरणांत स्वभावतः कोठेंच नसल्यामुळें त्यांच्या नांवरसीची नसती उठाठेव करण्याची पंचाईत नको. ही संयुक्त काळांच्या संख्येची व नांवांची जर अडचण नसती आणि ती वर दाखविल्याप्रमाणें वास्तविक नाहींच–तर संयुक्तक्रियापदें मानण्यास जोशी यांची हरकत नाहीं; इतकेंच नव्हे, तर ' अर्थदृष्ट्या मागील कृदन्त व पुढलें क्रियापद मिळून दोहोंसही क्रियापद म्हटलें पाहिजे ' असें त्यांनीं प्रांजलपणें कबूलच केलें आहे.

पण असली भीड भिकेची बहीण कशास पाहिजे ? संयुक्तक्रियापदें मानल्यावांचून गत्यन्तरच नाहीं. अंक ५४० व त्या खालीं केलेला ऊहापोह यावरून कळून येईलच कीं, तशा ठिकाणीं संयुक्तक्रियापदें मानिल्यावांचून निभावच नाहीं. आणि तीं जर कांहीं ठिकाणीं मानणें भागच आहे, तर त्यांस सर्वत्रच मान देणें शहाणपणाचें नाहीं काय ?

आतां हें खरें कीं, काळ व अर्थ, काळांचे भेद, किंवा संयुक्त काळ व त्यांचीं नांवें ह्या गोष्टी जोशीबोवांच्या नसून तत्संबंधाचे दोषाबद्दल जोशी यांस जबाबदार धरणें हें ठीक नाहीं. ही जोड त्यास पूर्वींचे वैयाकरणांपासूनच मिळालेली आहे. तिचा त्यांनीं विचार केला आहे. संयुक्तक्रियापदें मानावीं तर तीं किती मानावीं

व त्यांचे काळांस काय नांवें द्यावीं हे प्रश्न त्यांचे नाहींत. हे पूर्वीच्याच व्याकरणकरांचे व्यवस्थेंतून उत्पन्न होत होते. तेव्हां जोशीबोवांनीं पाहिलें कीं, जर संयुक्तक्रियापदें मानावयाचीं तर तीं जितकीं उपलब्ध असतील तितकीं सर्व मानिलीं पाहिजेत, नाहीं तर मुळींच मानूं नयेत. पण दादोबांसारखीं कांहीं आख्यातांत मात्र पंधरा, चिपळूणकरांसारखीं तीस, आणि गोडबोल्यांसारखीं एकोणीस, ह्याप्रमाणें थोडींशीं मानणें कधींच प्रशस्त नाहीं. हा जोशी ह्यांचा मुद्दा अक्षरशः खरा आहे. तसेंच त्यांच्या पूर्वीच्या वैयाकरणांनीं संयुक्तक्रियापदांस असा अर्धवट मान दिल्यामुळें किंवा त्यांच्यात असा पंक्तिप्रपंच केल्यामुळें कांहीं शब्दांचें व्याकरण करण्याबद्दलही बऱ्याच अडचणी उत्पन्न होतात; हेंही त्यांच्या नजरेस चांगलें आलेलें दिसतें. तेव्हां जोशीबोवांचे पुढें मुख्य प्रश्न असा उभा राहिला कीं, जुन्या वैयाकरणांची संयुक्तक्रियापदांची व्यवस्था घेऊन इतक्या—त्यांचे मतें साठसत्तर, आमच्या मतें बहुतेक अगणितच—संयुक्तक्रियापदांचे काळांस भिन्न भिन्न नांवें कोठून आणावीं, आणि त्यांच्या पद्धतींतील कांहीं शब्दांचें व्याकरण करण्याच्या अडचणींतूनही कसें निसटून जावें, असा त्यांना दुहेरी पेंच पडला. त्यांतून सुटून जाण्याचा मार्ग त्यांस न सुचल्यामुळें त्यांनीं तो साफ तोडूनच टाकण्याचें धैर्य केलें, आणि ते सर्वच संकटांतून मोकळे झाले. आपल्या **नवीन** गोष्टींच्या उल्लेखाचे अखेरीस ते म्हणतातः—' जुन्या मराठी व्याकरणांत धातुसाधित नामें, विशेषणें, अव्ययें, व क्रियावाचक नामें, व विशेषणें मानिलेलीं असून त्यांची नीट व्यवस्था केलेली नाहीं, व वाक्यांत ह्यांचा उपयोग कसा होतो हें नीटपणें सांगितलें नसल्यामुळें मोठा गोंधळ होऊन गेला आहे. परीक्षेच्या वेळीं अशीं अनेक वाक्यें वारंवार येत असतात कीं, ज्यांतील कित्येक शब्दांचें व्याकरण कसें करावें याबद्दल, शिकणारांना मोठी पंचाईत पडते. एखाद्या धातूपासून नाम, विशेषण, अव्यय, किंवा क्रियावाचक नाम कोणचेंही रूप झालें तरी तें क्रियापदाचेंच रूप समजावें, व तें मुख्य क्रियापदाबरोबर घेऊन दोन्ही मिळून संयुक्त क्रियापद मानावें; किंवा तें एकाकी आल्यास त्यालाच क्रियापद म्हणावें अशी पद्धत पडली आहे. उदाहरणार्थ, मला मुंबईस **जावयाचें** आहे, आईनें मुलास **जेऊं** घातलें, मला गुजराथी **वाचावयास** येतें, बाजिरावास इंग्रजांना **पुणें द्यावें** लागलें, इत्यादि वाक्यांत जाडे अक्षरांनीं लिहिलेले शब्द हे क्रियापदाचे अंश समजतात व मी मुंबईस जाणार, असें असलें तर जाणार ह्यालाच क्रियापद म्हणतात. यामुळें व्याकरण नीट होत नाहीं. हे शब्द उपयोगाप्रमाणें धातुसाधित नामें, विशेषणें किंवा क्रियावाचक नामें आहेत; असें मानणें ही गोष्ट नवीन नसून दादोबांचे व्याकरणांत व इतर व्याकरणांत ते तसे आहेत म्हणून सांगितलें आहे. परंतु योग्य रीतीनें व्याकरण करण्याची पद्धत मात्र आजपर्यंत

कोणीं लावून दिली नव्हती. मीं आपल्या व्याकरणांत असल्या सर्व वाक्यांची नीट व्यवस्था लावून दिली आहे.'

पूर्वींच्या व्याकरणकारांची संयुक्तक्रियापदांबद्दलची अर्धवट रचना आणि तज्जन्य अडचण ही जोशीबोवांनीं उत्तम सांगितली आहे. पण ती त्यांनीं ज्या रीतीनें दूर केली आहे ती रीति मात्र, ते समजतात त्याप्रमाणें, योग्य नव्हे हें वर दाखविलेंच आहे. तथापि ती रीत त्यांना कां स्वीकारावी लागली ह्याचें जें कारण त्यांनीं सांगितलें आहे, तें लक्षांत आणिलें म्हणजे त्या रीतीचें अवलंबन करण्याची जरूर नाहीं हें कसें स्पष्ट होतें हेंही वर दाखविलेंच आहे. आतां जुनीच पद्धति कायम राखून तिला योग्य वळण लावून तिची पूर्तता केली, म्हणजे व्याकरण करण्याबद्दलच्या अडचणी कशा दूर होतात. हें फक्त दाखवावयाचें; तें सविस्तर या ग्रंथाचे अखेरीस येईल. त्याचें येथें थोडक्यांत दिग्दर्शन करावयाचें म्हणजे असें. भाषेमध्यें एकंदर कृदन्तें पुष्कळच आहेत. तीं सर्व व्युत्पत्तिप्रकरणांत दिलीं आहेत. त्या सर्वांचा संयुक्तक्रियापदें साधण्याचें कामीं उपयोग होतो असें नाहीं; तर त्यापैकीं फक्त आठ—दहा कृदन्तांचाच असा उपयोग होतो. तीं कोणतीं हें ह्या अध्यायाचे आरंभीं ( अंक ५२० ) सांगितलें आहे. ह्या आठ—दहांचा अन्यत्र उपयोग होत नाहीं असें नाहीं. तर अन्य कृदन्तांप्रमाणें त्यांचाही स्वतंत्रपणें उपयोग होतो. परंतु कृदन्तांनीं मराठींतील वाक्य पुरें होत नाहीं; आणि संयुक्तक्रियापद मानण्यास व्याकरणाची कोणतीच हरकत नाहीं. ह्या गोष्टी लक्षांत ठेविल्या म्हणजे सर्व अडचणी दूर होतात. उदाहरणार्थ, जोशी-बोवांनीं दिलेलींच अडचणींचीं वाक्यें घेऊं.

**मला मुंबईस जावयाचें आहे**—ह्यांत मला हा चतुर्थ्यन्त कर्ता, व जावयाचें आहे हें ई आख्यातीं संयुक्तक्रियापद; अर्थ आवश्यक वर्तमान किंवा विधि वर्तमान; अकर्मक भावी प्रयोग. कारण उघडच आहे कीं, जावयाचें आहे हें क्रियापद कर्त्याचे पुरुष—लिंग--वचनाप्रमाणें नसून तृतीयपुरुषीं नपुंसकलिंगीं एकवचनीं आहे व बदलत नाहीं. जसें:—तुला, त्याला, आम्हांला तुम्हांला, त्यांना, जावयाचें आहे. या ठिकाणीं जावयाचें आहे ह्या संयुक्तक्रियापदाचे ‘ जावयाचें ’ आणि ‘ आहे ’ असे दोन तुकडे पाडून आहे ह्यास मुख्य क्रियापद मानणें आणि ‘ जावयाचें ’ ह्यास कृदन्त विशेषण—या ठिकाणीं प्रथमान्त नाम, आहे ह्याचा कर्ता, कर्तरि प्रयोग——असें जोशीबोवा सांगतात त्याप्रमाणें मानून अर्थास छिन्न—विच्छिन्न करून कसा तरी निर्वाह करून घेण्याची जरूर नाहीं. जावयाचें आहे ह्यास संयुक्त क्रियापद मानूनही व्याकरण—व्यवस्था वर सांगितल्याप्रमाणें यथासांग जुळते, हें कोणीही कबूल करील.

**आईनें मुलास जेवूं घातलें**--येथें आईनें हा तृतीयान्त कर्ता, मुलास हें कर्म, जेवूं घातलें हें लाख्यातीं संयुक्तक्रियापद; अर्थ साहाय्यभूत, सकर्मक भावी

प्रयोग. या ठिकाणीं जेव हा धातु अकर्मक धातूप्रमाणें योजिला आहे. यामुळें जर कोणी असें म्हणेल कीं, मुलास ही संप्रदानार्थी चतुर्थी, तर हा अकर्मक भावी प्रयोग होय. याचा सकर्मक धातूप्रमाणेंही उपयोग होतो. जसें:--आईनें मुलास भात जेवूं घातला, या वाक्यांत आईनें हा कर्ता, मुलास ही संप्रदानार्थी चतुर्थी किंवा नवीन भाषेनें अप्रत्यक्ष कर्म, भात हें प्रत्यक्ष कर्म, जेवूं घातला हें लाख्याती संयुक्तक्रियापद, अर्थ साहाय्यभूत, कर्मणि प्रयोग. या ठिकाणीं ' त्यानें मला पोथी वाचूं दिली ' या वाक्यांतल्याप्रमाणें जेवूं या ऊंकृदन्तास घातला ह्याचें कर्म मानणें जुळणार नाहीं. एवंच अशा ठिकाणीं संयुक्तक्रियापद मानून कर्मणि प्रयोग मानणें भाग्च आहे.

**मला गुजराथी वाचावयास येतें**—या वाक्यांत मला हा कर्ता, गुजराथी हें कर्म, वाचावयास येतें हें संयुक्तक्रियापद, कर्मणि प्रयोग. मला गुजराथी येतें, इंग्रजी येतें अशा वाक्यांत गुजराथी, इंग्रजी, या शब्दांचा गुजराथी लेखनवाचन, इंग्रजी लेखनवाचन, असा अर्थ आहे हें उघड आहे. नाहीं तर येतें हें क्रियापद नपुंसकलिंगी होणार नाहीं. अन्यत्र क्रियापदाचें लिंग बदलतें. जसें:--त्याला भूगोल येतो, त्याला इंग्रजी भाषा येते, त्याला पांच भाषा येतात, मला उर्दू पत्रें वाचावयास येतात किंवा येत नाहींत, त्याला इंग्रजी कागद वाचतां येतो, इ०.

**बाजिरावास इंग्रजांना पुणें द्यावें लागलें**—या वाक्यांत बाजिरावास हा कर्ता, इंग्रजांना हें अप्रत्यक्ष कर्म, पुणें हें प्रत्यक्ष कर्म, द्यावें लागलें हें लाख्याती संयुक्तक्रियापद, अर्थ विधिभूत, कर्मणि प्रयोग.

**मी उद्यां जाणार**—या वाक्यांत मी हा कर्ता, जाणार आहें हें संयुक्तक्रियापद, अर्थ उद्दिष्ट वर्तमान, अकर्मक कर्तरि प्रयोग. या ठिकाणीं आहें हें ईआख्याताचें सहायक्रियापद अध्याहृत आहे.

[ वास्तविक म्हटलें म्हणजे हा विषय पुढील होय. परंतु जोशीबोवांनीं दाखविलेली, जुन्या वैयाकरणांचे अर्धवट पद्धतींतील उणीव दूर करण्यास जोशीबोवांप्रमाणें संयुक्तक्रियापदांचे तुकडे पाडण्याचें प्रयोजन नाहीं, तर संयुक्तक्रियापदांचीच नीट पूर्ण व्यवस्था लाविली असतां ती उणीव सहज दूर होते; इतकेंच नव्हे तर कांहीं ठिकाणीं जर संयुक्तक्रियापदें मानल्याशिवाय भागतच नाहीं, तर तीं सर्व अवश्य ठिकाणीं मानून उत्तम व्यवस्था होते व कोणत्याही ठिकाणच्या शब्दाचें व्याकरण करण्यास पंचाईत पडत नाहीं, हें स्पष्ट करण्यासाठीं येथें हा खुलासा करावा लागला. बाकी व्याकरण करण्याचा विषय या ग्रंथाचे अखेरीस समग्र येणारच आहे, तेथें असल्या सर्व गोष्टी आणखी स्पष्ट होतील. ]

५४३. संयुक्तक्रियापदांमध्यें धातु कोणता मानावा हा एक प्रश्न आहे. बसत होता, बसणार आहे, बसलें पाहिजे, इ०. ठिकाणीं पूर्व वैया-

करणांचे पद्धतीप्रमाणें कृदन्तांताल धातु मानण्यांत येतो. उदाहरणार्थ, बसत होता हें त्यांचे मतें बस या धातूचें अपूर्णभूतकाळाचें रूप होय. आमच्या मतें हें ठीक नाहीं. करून टाक, लिहितां येतें, करूं शकला, इत्यादि स्थळीं नुसते कर, लिह, कर, हे धातु मानणें अर्थदृष्ट्या प्रशस्त नाहीं. आणि लिहूं दिलें, जाऊं दिलें, जेवू घातलें, या ठिकाणीं तर लिह, जा, जेव, हे एकाकी धातु मानणें चूकीचें होय; कारण कीं, या ठिकाणीं कृदन्तांतील धातु व आख्यातरूपांतील धातु ह्यांचे कर्ते भिन्न भिन्न आहेत. तेव्हां या ठिकाणीं लिहूं दे, जाऊं दे, जेवूं घाल, असे कृदन्तयुक्त संयुक्त धातु मानणें अवश्य आहे. हा मुद्दा पूर्वीं सविस्तर येऊन गेलाच आहे. तेव्हां इत्यर्थ इतकाच कीं:—

( अ ) जेव्हां आह, अस, हो, वगैरे अर्थहीन सहायधातु असतात, तेव्हां त्यांनीं होणाऱ्या संयुक्तक्रियापदामध्यें नुसता कृदन्तातीलच एकेरी धातु मानला तरी हरकत नाहीं.

( आ ) दुसऱ्या कांहीं ठिकाणीं संयुक्तक्रियापदांमध्यें नुसत्या कृदन्तांतीलच धातु मानणें प्रशस्त नाहीं; कारण कीं संयुक्तक्रियापदांतील सबंध अर्थाचा, नुसत्या कृदन्तांतील धातूंमध्यें, बीजरूपानें पूर्ण उल्लेख होत नाहीं.

( इ ) शिवाय कांहीं ठिकाणीं तर नुसत्या कृदन्तांतलिच धातु मानणें केवळ प्रशस्त नाहीं, इतकेंच नव्हे तर तसें करणें अडचणीचें व चुकीचें आहे.

म्हणून आमच्यामतें सर्वत्र असा नियम करणें चांगलें कीं संयुक्तक्रियापदांमध्यें सहायक्रियापदांतील धातु घेऊन तो त्या क्रियापदाच्या मागील कृदन्तास जोडून तो एक संयुक्त धातु मानावा. जसें—बसत आहे, बसला होता, बसणार असेल, बसलें पाहिजे, लिहूं दिलें, जेवूं घातलें, इ० संयुक्तक्रियापदांत अनुक्रमें बसत आहे, बसला हो, बसणार अस, बसलें पाहिजे, लिहूं दे, जेवूं घाल, असें संयुक्त धातु मानणें बरें. म्हणजे अर्थास व व्याकरणास तें नीट जुळून सर्वत्र एकच नियम लावितां येईल. नाहीं तर वर सांगितल्याप्रमाणें कांहीं ठिकाणीं एक नियम तर कांहीं ठिकाणीं दुसरा नियम असा घोंटाळा करावा लागेल. शिवाय कांहीं ( याच अंकांतील इ मध्यें सांगितलेल्या ) ठिकाणीं संयुक्त धातु मानणें

जर अवश्य आहे आणि तसा संयुक्त धातु अन्यत्र मानण्यास जर कांहीं एक प्रत्यवाय नाहीं, तर संयुक्तक्रियापदांमध्यें आतां सांगितल्याप्रमाणें सर्वत्र संयुक्त धातु मानणेंच श्रेयस्कर व इष्ट आहे. संस्कृत भाषेचाही या व्यवस्थेस आधार आहे. प्रमाणीक, पयोधरीभू, इ० संयुक्त धातु मानण्याची त्या भाषेंत चाल आहेच हें तज्ञांस स्मरेलच. आणि संयुक्तक्रियापदें म्हणजे दोन किंवा अधिक क्रिया म्हणजे धातु ह्यांचा संयोग होऊन झालेलीं क्रियापदें असा जो संयुक्तक्रियापदें या पदाचा अर्थ वरील ऊहापोहांत दिला आहे, त्या अर्थाशीं प्रकृत व्यवस्था सुसंगत आहे हें उघड आहे.

५४४. नवीन वैयाकरण आणखी एका प्रकारचीं संयुक्तक्रियापदें मानितात. दादोबांचे व या ग्रंथांतील मताप्रमाणें कांहीं ठराविक कृदन्तांपुढें सहाय धातूचें आख्यात येऊन होणाऱ्या क्रियापदास संयुक्तक्रियापद असें म्हटलें आहे. परंतु नामांपुढें आणि नामांच्या विभक्त्यन्त रूपांपुढेंही कांहीं धातूंचें आख्यात आल्यास त्यांस संयुक्तक्रियापद म्हणण्याचा नवीनांचा कल दिसतो. Khers' grammar. p. 87.§161 जसें:—युद्ध करणें, पारख करणें, गोंधळ करणें, मार खाणें, अंगांत येणें, डोकीस घालणें, रागें भरणें, सिद्धीस नेणें, इ०.

त्यांच्या मतें नामांशीं संयोग पावणारीं क्रियापदें येणेंप्रमाणें:—कर, खा, घाल, घे, ठेव, दे, धर, फोड, बस, बाळग, भांड, मार, ये, लाग, लाव, मांड, शिर, इ०. हे आणि याच अर्थाचे धातु नामांपुढें येऊन संयुक्तक्रियापदें होतात असें एक नवीन मत प्रचलित होऊं पहात आहे.

परंतु आमच्या मतें इंग्रजी भाषेच्या दृढ परिचयाचा हा परिणाम होय. पायांत घालणें, प्रीति करणें, रागें भरणें, भय घालणें, विश्वास धरणें, उपकार करणें, विचार करणें, इत्यादि अर्थाचीं इंग्रजी भाषेंत एकाकी स्वतंत्र क्रियापदें आहेत हें खरें. तथापि तेवढ्यावरून त्यांच्या अर्थाच्या शब्दसमुच्चयास कोणत्याही भाषेंत संयुक्तक्रियापद म्हणणें हें ठीक नाहीं. इंग्रजी भाषेमध्येंही परीक्षा करणें या अर्थीं जसा एक examine हा एक एकेरी स्वतंत्र धातु उपयोगांत आहे, त्याचप्रमाणें to make an examination of असा 'परीक्षा करणें' ह्या अर्थाचा व अशाच स्वरूपाचा एक शब्दसमुच्चय उपयोगांत आहे. परंतु या शब्दसमुच्चयास इंग्रजी वैयाकरणही कोणी

संयुक्तक्रियापद म्हणत असल्याचें आमच्या ऐकिवांत नाहीं. Threatens, Loves, Considers इत्यादिकांस क्रियापदें म्हणतात; परंतु एतदर्थक uses thereats, shows love, takes into consideration ह्या शब्दसमुच्चयांस संयुक्त-क्रियापदें म्हणण्याचा इंग्रजी भाषेंतही प्रचार नाहीं. रेव्हरंड नवलकरांनीं साहेबलोकांकरितां इंग्रजींत लिहिलेल्या मराठी व्याकरणामध्यें अशा तऱ्हेचीं संयुक्तक्रियापदें मानून षष्ठ्यन्त व शब्दयोगी अव्ययान्त शब्दांसही कर्म म्हटलें आहे. ही व्यवस्था मराठी शिकणाऱ्या इंग्रज साहेबाचे दृष्टीनें कितीही सोईची असली तरी ती मराठी भाषेस साजत नाहीं. तुम्ही त्याचा विश्वास धरूं नका, आईबापांवर प्रीति करा, मी तुमच्या सूचनेचा किंवा सूचनेविषयीं विचार करीन, या वाक्यांत साहेब लोकांस मराठी शिकविणाऱ्या पंडितास—विश्वास धरूं नका' प्रीति करा, विचार करीन हीं संयुक्तक्रियापदें असून, त्याचा, आईबापांवर, आणि सूचनेचा किंवा सूचनेविषयीं, हीं त्या संयुक्तक्रियादांचीं कर्में होत—असें आपल्या शिष्य-वर्गास सांगणें विशेष सोईचें असेल. तथापि ज्यांची मातृभाषा मराठी आहे, त्यांनींही तोच मार्ग स्वीकारूं पहाणें हें भाषेच्या साम्राज्यांतही इंग्रजी प्राबल्य विनाकारण कसें वाढत चाललें आहे, ह्याचें एक ढळढळींत उदाहरण आहे. प्रीति करणें, शिक्षा करणे, ह्यांस जर संयुक्त धातु म्हणावयाचें तर काम करणें, मेहनत करणें, उद्योग करणें, अभ्यास करणें, इत्यादि शेंकडों नव्हे हजारों ठिकाणीं संयुक्तक्रियापदांची आपत्ति येईल. फार तर काय सर्वच क्रियापदांचे प्रत्यक्ष कर्माचा क्रियापदांत अन्तर्भाव करण्यास हरकत नाहींशी होईल. वाक्यमीमांसेचे दृष्टीनें तसें करणें कदाचित् अयोग्य नसेल. तथापि व्याकरणाचे दृष्टीनें तसें करणें सर्वथा अग्राह्य होय यांत संशय नाहीं.

५४५. आतां कोणी असें म्हणेल कीं, त्यानें पैसा संपादन केला, मी ही कथा श्रवण केली, त्यानें पंधरा लाडू भक्षण केले, रामानें दोन गाई दान दिल्या किंवा दान केल्या, इत्यादि स्थलीं, संपादन केला, श्रवण केली, भक्षण केले, दान दिल्या किंवा दान केल्या, ह्यांस तुम्ही संयुक्त क्रियापदें म्हणत नाहीं काय? आणि जर ह्यांस संयुक्त क्रियापदें मानावयास हरकत नाहीं, आणि जर संपादन, श्रवण, भक्षण, दान हीं नामें होत तर प्रीति करणें, अंगांत घालणें, इ० गेल्या अंकांतील नामयुक्त

क्रियापदांस संयुक्त क्रियापदें असें म्हणण्यास काय हरकत आहे? ही शंका कांहीं अंशीं योग्य आहे. तिचें समाधान करणें जरासें कठिणच आहे. तेव्हां प्रथम या वाक्यांसंबंधानें आमचे जुने वैयाकरण काय म्हणतात तें पाहूं.

दादोबा सांगतात कीं, श्रवण करणें, भक्षण करणें, इत्यादि 'प्रकारच्या पदांचा जेव्हां सकर्मक क्रियापदांप्रमाणें उपयोग करितात, तेव्हां व्याकरण सांगते समयीं यांस संयुक्तक्रियापदें मानून निर्वाह केल्याशिवाय दुसरा उपाय दिसत नाहीं.' गोडबोले म्हणतात कीं, 'येथें क्रियापदापूर्वीं आलेलें नाम कर्मपद असून तें नपुंसकलिंगीं व एकवचनीं असल्यामुळें क्रियापद नपुंसकलिंगीं व एकवचनीं पाहिजे, आणि कर्मपदाशीं त्या मागील नाम संबंधी विशेषणानें युक्त पाहिजे. म्हणजे पैशाचें संपादन केलें, कथेचें श्रावण केलें, इ०. अर्थातच वरील प्रयोग अशुद्ध आहेत. हे वरील प्रयोग मराठी न जाणणाऱ्या शास्त्री व पुराणिक लोकांनीं प्रथम उपयोगांत आणिले, व तेच लोकांत पुढें चालू झाले. असले अशुद्ध प्रयोग अलीकडे नाहींतसे होत चालले आहेत, [ ६४० ( अ ) ].' ह्या प्रकारें गोडबोले हे संपादन करणें, श्रवण करणें, ह्यास संयुक्तक्रियापदें मानण्याचें विरुद्ध आहेत. ते म्हणतात, 'जर संपादन करणें यास क्रियापद म्हटलें तर पांच दिवसानीं संपादन करणें ह्यास आणि ह्यांसारख्या दुसऱ्या रूपांसही संयुक्तक्रियापद म्हणावें लागेल.' 'लोकांत आहे म्हणून हा प्रयोग शुद्ध आहे, असें म्हटल्यास संपादन, श्रवण, इत्यादि नामें विशेषणरूपी म्हणजे संपादित, श्रत या अर्थीं आहेत असें म्हणावें.'

अशा प्रकारचे प्रयोग 'मराठी न जाणणाऱ्या शास्त्री पुराणिकांनीं प्रथम उपयोगांत' आणिलेले असोत किंवा त्यांची दुसरी कांहींही उत्पत्ति असो, जर ते शिष्टसंमत आहेत तर त्यांस 'अशुद्ध' म्हणण्याचा कोणा-सच अधिकार नाहीं हें उघड आहे. व्याकरणकारास त्यांची फार अड-चण होते हें खरें, तथापि त्यानें त्यांचा संग्रह करून त्यांची व्याकरणांत कांहीं तरी योग्य व्यवस्था लाविली पाहिजे. गोडबोले यांनीं अखेरीस सुचविलेली व्यवस्था कांहीं वावगी नाहीं. त्या व्यवस्थेप्रमाणें संपादन, श्रवण, भक्षण, इत्यादिकांस संपादित, श्रुत, भक्षित, या अर्थीं विशेषणें मानणें कांहीं वाईट नाहीं. परंतु संपादन करणें, श्रवण करणें, भक्षण

५४९. कर्तरि प्रयोगाचे दोन प्रकार आहेत. अकर्मक कर्तरि आणि सकर्मक कर्तरि. जेव्हां क्रियापद अकर्मक असतें, तेव्हां अकर्मक कर्तरि प्रयोग होतो आणि जेव्हां क्रियापद सकर्मक असतें तेव्हां सकर्मक कर्तरि प्रयोग होतो. जसें:––ती बसल्ये, हा अकर्मक कर्तरि; आणि तो पुस्तक वाचितो, हा सकर्मक कर्तरि प्रयोग होय.

**टीप**—वास्तविक म्हटलें म्हणजे, हे कर्तरि प्रयोगाचे दोन प्रकार होत, असें म्हणणें योग्य नाहीं; तर अकर्मक व सकर्मक, ह्या दोन्ही प्रकारच्या धातूंचा कर्तरि प्रयोग होतो असें म्हणणें बरें. कारण दोन्हीं ठिकाणीं प्रयोग एकच असून क्रियापदांतच काय तो फरक आहे. पण कर्तरि–प्रयोगाचे दोन प्रकार आहेत असें म्हणण्याची रूढि पडली आहे आणि ती निरुपद्रवी आहे, यामुळें रूढीसच अनुसरून प्रकृत अंकांतील भाषा लिहिली आहे.

५५०. कर्तरि प्रयोगामध्यें कर्ता हा नेहमीं प्रथमा विभक्तींत असतो, आणि कर्म हें प्रथमेंत किंवा चतुर्थींत असतें. जसें:––**मी** गेलों, **तो** पत्र लिहितो, **ते** मला ओळखतात, इ०. या उदाहरणांतील मी, तो, ते, हे सर्व कर्ते प्रथमान्त आहेत; आणि दुसऱ्या उदाहरणांतील पत्र **हें** कर्म प्रथमान्त आहे. व तिसऱ्यांतील मला हें कर्म चतुर्थ्यन्त आहे.

५५१. कर्तरि प्रयोगांतील कर्माच्या विभक्तीसंबंधानें गद्यामध्यें पुढील नियम साधारणपणें दृष्टीस पडतात. पण पद्यांत हे नियम फारसे पाळले जात नाहींत.

( अ ) अप्राणिवाचक शब्द कर्मस्थानीं असतां तो नेहमीं प्रथमान्त असतो. जसें:––तो **काम** करितो, तो **आंबे** आणील, ते **कपडे** रंगवितात, इ०.

परंतु कवितेंत हा नियम फारसा पाळण्यांत येत नाहीं. वृत्तास अनुसरून गणमात्रांचे सोईसाठीं पुष्कळदां प्रकृत नियमाचें उल्लंघन होऊन अप्राणिवाचक कम सुद्धां चतुर्थ्यन्त आलेलें आढळतें. जसें:––

धनिक वेंची **धनातें** ॥ दरिद्री नाचरे **तपातें** ॥––मुक्तेश्वर.

सीता म्हणे अहाहा धांवा हो मारितात **हांकेला** ॥––मोरोपंत.

यापरि वदोनि हितमित वर्णी कर्णामृता खऱ्या **वचना** ॥––मोरोपंत

( आ ) जेव्हां वाक्यांत संप्रदानार्थीं चतुर्थी असते तेव्हां कर्म नेहमीं प्रथमान्त असतें; अथवा नवीन भाषेनें वाक्यांत एक ( अप्रत्यक्ष ) कर्म

चतुर्थ्यन्त असतें, तेव्हां दुसरें ( प्रत्यक्ष ) कर्म प्रथमान्त असतें. मग तें प्राणिवाचक शब्द असो किंवा अप्राणिवाचक शब्द असो. जसें:—तो ब्राह्मणास **दक्षिणा** देतो, मी तुला एक **गाय** देईन, हा **उंदीर** त्या मांजरास दाखव, तो अखेरीस त्या म्हाताऱ्याला आपली **मुलगी** देणार आहे, मी तुला **गोविंदराव** दाखवितों, युधिष्ठिर **द्रौपदी** पणास लाविता झाला, न्यायाधीश अपराध्यास **शिक्षा** करितो किंवा सांगतो, तो **वेडा** लोकांस **दगड** मारितो, त्यानें मला दोन **प्रश्न** विचारले इ०.

( इ ) मनुष्यवाचक सामान्यनाम किंवा विशेषनाम कर्म असतां तें बहुधा चतुर्थ्यन्त असतें, पण कधीं कधीं प्रथमान्तही आढळतें. जसें:— मी **मामाला** बोलावितों, तूं **काकाला** आण, **शिंप्याला** तिकडे ने, तो **गोविंदरावास** जिंकील किंवा हरवील, तूं **कृष्णीला** पोंचव, इ०. परंतु गद्यांतही कधीं कधीं मनुष्यवाचक कर्में प्रथमान्त आलेलीं आढळतात; तथापि या स्थळीं चतुर्थीचाच प्रचार फार आहे ह्यांत संशय नाहीं. उदा०:—काल जो आचारी आला होता **तोच** किंवा **त्यालाच** आज बोलाव. तो आपला **मुलगा** रामरावाकडे गणित शिकण्यास पाठवितो, अरे एक चांगला **न्हावी** घेऊन ये बरें, इ०.

( ई ) मनुष्येतर प्राणिवाचक शब्द कर्मस्थानीं असतां तो चतुर्थ्यन्त किंवा प्रथमान्त असतो. जसें तो **गाय** किंवा **गायीला** बांधितो; रामा, **घोड्याला** किंवा **घोडा** इकडे आण; तो **गुरें** किंवा **गुरांना** राखितो, चारितो; इ०. या ठिकाणीं प्रचलित मराठी भाषेची प्रवृत्ति वरील ( इ ) या सदरांतल्या उलट दिसते. म्हणजे मनुष्यवाचक कर्म जर बहुधा चतुर्थ्यन्त योजण्याकडे शिष्ट कल आहे असें दिसतें, तर मनुष्येतर प्राणिवाचक कर्म प्रथमान्त योजण्याकडे शिष्ट कल होत चालला आहे. तो गुरांना राखितो असें म्हणण्यापेक्षां गुरें राखितो असेंच म्हणण्याचा अधिक प्रचार आहे.

तथापि सूक्ष्म विचारान्तीं असें दिसून येतें कीं, मनुष्येतर प्राण्यांपैकीं हत्ती, घोडा, उंट, इत्यादि उच्च प्रतीच्या प्राण्यांसंबंधानें कर्मस्थानीं प्रथमा व चतुर्थी ह्यांचा उपयोग विकल्पानें होतो; म्हणजे प्रथमेचा व चतुर्थीचा प्रचार बहुतेक सारखाच आढळतो; आणि क्षुद्र प्राण्यासंबंधानें चतुर्थीपेक्षां प्रथमेचाच प्रचार अधिक आढळतो. कारण उघडच आहे कीं,

क्षुद्र प्राण्यांना अचेतन सृष्टीमध्येंच गणण्याचा प्राय: मनुष्याच्या मनाचा कल आहे; आणि अचेतन सृष्टींतील म्हणजेच पदार्थवाचक कर्में बहुधा प्रथमान्त असतात; म्हणून क्षुद्र प्राणिवाचक कर्मेंही प्राय: प्रथमान्तच येतात. जसें मांजर उंदरास धरितें, तो ढेंकुणास मारितो, माकड उवांस खातें, इत्यादि चतुर्थ्यन्त कर्मांनीं युक्त वाक्यांपेक्षां, मांजर उंदीर धरितें, तो ढेंकूण मारितो, माकड उवा खातें, इत्यादि प्रथमान्त कर्में ज्यांत आढळतात, अशाच प्रयोगांचा भाषेंत अधिक प्रचार आहे. परंतु उच्च प्रतीच्यां प्राण्यासंबंधानें कर्मस्थानीं प्रथमा व चतुर्थी ह्या दोन्ही सारख्याच प्रचारांत आहेत. जसें सईस घोडा किंवा घोड्यास बांधित आहे, ती म्हैस किंवा त्या म्हैशीला इकडे आण, ही गाय किंवा ह्या गाईस चरायला नेत जा, हा महात हत्ती किंवा हत्तीला चांगला चालवितो, हें उंट किंवा ह्या उंटास धर, इ०.

(उ) जेव्हां क्रयविक्रयादि प्रसंगीं उच्च प्राण्यांनाही जड सृष्टींतील पदार्थांप्रमाणें लेखण्यांत येतें, तेव्हां उच्च प्राणिवाचक कर्में सुद्धां प्रथमान्तच येतात. जसें:—तो दोन **घोडे** विकीत आहे, मी एक **गाय** घेणार आहें, तुम्ही एक **म्हैस** घ्या, इ०. अशा स्थळीं कर्म चतुर्थ्यन्त कधींच आढळत नाहीं म्हटलें तरी चालेल.

(ऊ) मार धातूचा उपयोग मात्र विशेषेंकरून लक्षांत ठेवण्यासारखा आहे. ह्या धातूचें प्राणिवाचक कर्म जेव्हां प्रथमान्त असतें तेव्हां मारणें ह्याचा त्या प्राण्याला ठार मारणें, त्याचा प्राण घेणें, वध करणें, असा अर्थ होतो. आणि जेव्हां मार धातूचें प्राणिवाचक कर्म चतुर्थ्यन्त असतें, तेव्हां मारणें ह्याचा त्या प्राण्याला मार देणें, त्याला इजा करणें, शिक्षा करणें, असा अर्थ असतो. जसें तो **वाघ** मारितो, त्याने दोन **सिंह** मारिले म्लेंच्छ लोक **गाई** मारितात, इत्यादिवाक्यांत मारणें म्हणजे वध करणें होय; आणि तो **गाईस** मारितो, हा शिक्षक **विद्यार्थ्यांस** फार मारतो, इत्यादि वाक्यांत मारणें म्हणजे एका तऱ्हेचा त्रास देणें, शासन करणें, असा अर्थ आहे, हें उघड आहे.

हा वेडा लोकांस दगड मारितो, त्यानें मला काठी मारिली, शिक्षक मुलांस गुद्दे मारितो, इत्यादि वाक्यांत दगड, काठी, गुद्दे हीं प्रथमान्त कर्में आहेत आणि मारणें म्हणजे शासन करणें असा अर्थ असल्यामुळें

लोक, मी, मुलें, हीं प्राणिवाचक नामें चतुर्थ्यन्त आहेत. या चतुर्थीचा अर्थ संप्रदान करणें चांगलें. तथापि तिचा अर्थ कर्म करून, मार धातूस येथें दोन कर्में आहेत असें म्हटलें तरी चालण्यासारखें आहे. तो मला दगड मारितो म्हणजे दगडानें मारितो, काठी मारितो म्हणजे काठीनें मारितो, असा अर्थ असल्यामुळें दगड, काठी, ही करणी प्रथमा होय असें वाटण्याचा संभव आहे. परंतु शिक्षक मुलास दोन छडया मारितो, ह्याला चार छडया मारा, अशा ठिकाणीं दोन छडयांनीं मारणें किंवा चार छड्यांनीं मारणें असा अर्थ दिसत नाहीं; तर छडीनें दोनदां किंवा चारदां मारणें, अथवा, आणखी सूक्ष्म दृष्टीनें तंतोतंत अर्थ सांगावयाचा म्हटलें तर, छडीचे दोन किंवा चार फटके मारणें असा अर्थ आहे, हें उघड आहे. ह्यामुळें छडया ह्या प्रथमेचा अर्थ करण असें म्हणणें प्रशस्त दिसत नाहीं. एवंच सर्वत्र लागू पडणारा अर्थ करणें बरें, असें समजून दगड मारितो, काठी मारितो छडया मारितो इ० सर्व ठिकाणीं प्रथमेचा अर्थ कर्म असेंच म्हणणें योग्य आहे. काठीनें, छडीनें, रुळानें मारितो, अशी जेव्हां स्पष्ट तृतीया असेल त्यावेळीं ती करणी तृतीया होय, हें सांगायलाच नको.

( ऋ ) विशेषेंकरून म्हटलीं जाणारीं पुरुषवाचक सर्वनामें अथवा प्रधानपुरुषवाचक सर्वनामें म्हणजे प्रथम व द्वितीय पुरुषवाचक सर्वनामें कर्मस्थानीं असतां तीं नेहमीं चतुर्थ्यन्तच असतात. जसें:—तो मला ओळखतो, मी तुम्हांला जाणतों, तुम्ही आम्हांस सांभाळा, इ०.

( ऌ ) तृतीय पुरुषवाचक सर्वनामें कर्मस्थानीं असतां त्यांस त्यांच्या पूर्वनामांचा नियम लागतो. म्हणजे त्यांचें पूर्वनाम मनुष्यवाचक असल्यास तीं बहुधा चतुर्थ्यन्त येतात; आणि मनुष्येतर प्राणिवाचक किंवा पदार्थवाचक असल्यास त्यांस त्या त्या नामाबद्दल वरील नियम लागू पडतात. जसें:—तूं तिला ( मुलगीला ) येथें ठेव, त्याला ( त्या धोब्याला ) बोलाव, मी त्याला ( त्या मुलाला ) शिकवितों, तें ( भांडें ) इकडे आण, तो ती ( वाटी ) मागत आहे, त्याला ही ( वाटी ) नको, इ०.

ज्या नामांसंबंधानें कर्मस्थानीं प्रथमा व चतुर्थी ह्यांचा विकल्प आहे, त्या नामांबद्दल येणाऱ्या कर्मस्थानच्या तृतीय पुरुषवाचक सर्वनामांसही तो विकल्प तितकाच लागू आहे.

५५२. आतां धातूंच्या आख्याताचे दृष्टीनें कर्तरि-प्रयोगाचा विचार करूं.

( अ ) लाख्यात आणि वाख्यात म्हणजे जुन्या परिभाषेनें भूतकाळ आणि विध्यर्थ या दोन आख्यातांशिवाय बाकी सर्व आख्यातांमध्यें सकर्मक व अकर्मक या दोन्ही धातूंचा सर्वत्र कर्तरि—प्रयोग होतो. उदाहरणें:—

प्रथमताख्यात....मी काम करितो, मी जातों.

द्वितीयताख्यात....तो काम करितो, तो जाता.

ई-आख्यात....तूं काम करीस, तूं जास.

ऊ-आख्यात....तूं काम कर, तूं जा.

इलाख्यात.... ती काम करील, तें जाईल.

( आ ) लाख्यातामध्यें सर्व अकर्मक धातूंचा कर्तरि—प्रयोग होतो. जसें:— मी गेलों. तूं बसलास, तो निजला, इ०. परंतु सकर्मक धातूंचें एकेरी म्हणजे असंयुक्त क्रियापद असतां लाख्यातामध्यें कर्तरि—प्रयोग होत नाहीं, असा साधारण नियम आहे. परंतु ह्यास कांहीं अपवाद आहेत; ते येणेंप्रमाणें:—

**अपवाद १**—उमज धातूच्या गणांतील धातूंचा लाख्यातीं कर्तरि—प्रयोगच होतो. जसें:— तो तें उमजला, तो तें सारें औषध ओकला, ती गाय गोऱ्हा व्याली, मुलें धडे विसरलीं, ती तो रस्ता भुलली, इ.

**अपवाद २**—आचर धातूच्या गणांतील धातूंचा लाख्यातीं कर्तरि—प्रयोग विकल्पानें होतो, म्हणजे त्यांचा कर्तरि प्रयोग होतो आणि कर्मणि—प्रयोगही होतो. जसें: — मी हें व्रत आचरलों, किंवा मी हें व्रत आचरिलें; तूं सोंगट्या खेळलास, किंवा त्वां सोंगट्या खेळल्या; त्याला साप चावला, त्यानें आपलाच ओंठ चावला; ती नव लुगडें नेसली, तिनें नवें लुगडें नेसलें; तो शास्त्र पढला, त्यानें शास्त्र पढलें; इ०.

**अपवाद ३**—कर आणि धू या धातूंचा लाख्यातीं कोंकणस्थ लोकांचे भाषणांत कांहीं विशेष प्रसंगीं मात्र कर्तरि—प्रयोग होतो. स्नान, संध्या, आंघोळ, फराळ, जेवण, हीं कर धातूचीं कर्मे असतां आणि अंग किंवा अवयवदर्शक शब्द धू धातूचें कर्म असतां कर आणि धू या दोन धातूंचा लाख्यातीं विकल्पानें कर्तरि—प्रयोग होतो. जसें:— मी स्नान केलों किंवा मी स्नान केलें; तो आंघोळ केला किंवा त्यानें आंघोळ केली; मी फराळ केलों किंवा मीं फराळ केला; तो अंग, हात, पाय, तोंड,

इ० धुतला, किंवा त्यानें अंग, हात, पाय, इ० धुतले किंवा धुतलें. या प्रसंगीं कर आणि धू हे धातु आचर धातूच्या गणामधील धातूंप्रमाणें उपयोगांत आहेत असें म्हटलें म्हणजे झालें. तथापि कर आणि धू या धातूंचे हे कर्तरि–प्रयोग एकदेशी होत यांत संशय नाहीं.

(कांहीं वैयाकरणांचे मतें कर व धू धातूचे लाख्यातीं होणारे हे अपवादक कर्तरि–प्रयोग चुकीचे किंवा अशुद्ध होत. परंतु शिष्टसंप्रदायाशिवाय शुद्धतेची दुसरी कसोटी जोंपर्यंत प्रचलित भाषेच्या विषयांत सर्वसंमत ठरलेली उपलब्ध नाहीं, तोंपर्यंत व्याकरणाचे साधारण नियमांच्या उल्लंघनानें अशुद्धता सिद्ध होत नाहीं. दुसरें असें कीं, आचर धातूचा गण म्हणून एक धातूंचा वर्ग सर्व वैयाकरण मानित आहेत. ह्या आचर गणांतील धातूंचा लाख्यातीं कर्मणि–प्रयोगा-प्रमाणें कर्तरि–प्रयोगही जर आमच्या वैयाकरणांत मान्य आहे, तर कर आणि धू या धातूंच्याच ते इतके कां विरुद्ध असावेत हें पाहिलें पाहिजे. त्याचें कारण कदाचित् असें असेल कीं, कर आणि धू हे धातु आचरणांत धातूप्रमाणें सर्वदा उपयोगांत नाहींत, तर केवळ कांहीं प्रसंगीं मात्र–त्यांस विशिष्ट कर्में असतात तेव्हांच—ते तसे उपयोगांत येतात. हें विधान वर दिलेल्या तिसऱ्या अप-वादांत सांगितल्याप्रमाणें खरें आहे. परंतु कांहीं धातु कांहीं प्रसंगींच तशा प्रकारचे दिसत असले, तर ते धातु त्याच प्रसंगीं तशा प्रकारचे आहेत अन्य प्रसंगीं नाहींत, असें म्हणण्यास वैयाकरणांची कांहीं हरकत असण्याचें योग्य कारण नाहीं. तेव्हां या ठिकाणच्या वैयाकरणांचे विरोधास ह्याहूनही बलवत्तर कारण असलें पाहिजे. आणि तें असें दिसतें कीं, कर आणि धू या धातूचे हे प्रासंगिक कर्तरि–प्रयोग आचरगणांतील धातूंच्या कर्तरिप्रयोगाप्रमाणें सर्व प्रकारच्या शिष्ट लोकांत आढळत नाहींत; तर केवळ शिष्ट कोंकणस्थांतच आढळतात, ही गोष्ट निर्विवाद आहे. परंतु ते कोणत्या तरी शिष्टांस मान्य असल्यामुळें अशुद्ध या नांवास सर्वथा पात्र ठरत नाहींत. ह्यामुळेंच या ग्रंथांत त्यांस एकदेशी असें म्हटलें आहे.)

टीप—लाख्यातामध्यें वरील अपवादक धातूंशिवाय इतर सकर्मक धातूंचा मराठींत कर्तरि–प्रयोग होत नाहीं, हें विधान असंयुक्त म्हणजे एकेरी क्रिया पदांसंबंधानें खरें आहे. परंतु सकर्मक धातूंच्या ताकृदन्तापुढें ‘ झाला ’ हें हो या सहायधातूचें लाख्याताचें रूप योजून सकर्मक धातूंचें लाख्यातीं संयुक्तक्रियापद केलें असतां त्यांचा लाख्यातींही कर्तरि–प्रयोग होतो. जसें:—तो काम करिता झाला, त्या धोत्रें नेत्या झाल्या, तूं पुस्तक वाचता झालास, इ०. एवंच वऱ्याच सकर्मक धातूंचा लाख्यातीं स्वतंत्रपणें कर्तरिप्रयोग होत नाहीं. परंतु संयुक्त-क्रियापदाची योजना केली असतां तसा प्रयोग होतो हें उघड आहे. तरी या प्रयोगाचा शिष्ट प्रचार मागें पडत चालला आहे, हें सूक्ष्म दृष्टीस

करून येईल. तरी लाख्यातीं विशेषेंकरून सकर्मक धातूंची कर्तरि रचना करायाची असतां हा प्रयोग अत्यन्त उपयुक्त असल्यामुळें पुनरपि पुढें येणें कांहीं वाईट नाहीं.

( इ ) वाख्यातांत अकर्मक धातूंचा कर्तरि—प्रयोग होतो. परंतु वाख्यातांत हा प्रयोग अवश्य नसून त्याचे जागीं त्यांचा भावी प्रयोगही होतो. जसें:—उद्यां त्याचें पत्र यावें, वास्तविक पाहतां तो काल यावा, तूं या संकटांतून सुटावास, तो कालच्या सभेस हजर असावा, माझ्या मतें तुम्हीं कालच यावेत, इ०. भावीप्रयोगाचीं उदाहरणें त्यानें यावें, त्यानें हजर असावें, त्वां जावें, इ०.

लाख्यातांतल्याप्रमाणें या आख्यातांतही सकर्मक धातूंचा कर्तरि—प्रयोग होत नाहीं, असा साधारण नियम असून त्यास उमज धातूचा गण व आचर धातूचा गण हे दोन मुख्य अपवाद आहेत. या दोन्ही गणांतील सकर्मक धातूंचा कर्तरि—प्रयोग विकल्पानें होतो, म्हणजे कर्तरि—प्रयोगाबरोबर आणखी कर्मणि—प्रयोगही होतो. ह्या दोन गणांतील धातूंशिवाय इतर सकर्मक धातूंचा वाख्यातीं कर्तरि प्रयोग शक्यच नाहीं. उदाहरणें:—तो हें उमजावा, किंवा त्यानें हें उमजावें; तो हें औषध ओकावा, किंवा त्यानें हें औषध ओकावें; ती हें लुगडें नेसावी, किंवा तिनें हें लुगडें नेसावें; तो वाट चुकावा, किंवा त्यानें वाट चुकावी; इ०. प्रयोगान्तराबरोबर थोडेंसें अर्थान्तरही आहे. म्हणजे या दोन्ही रचना समानार्थक नाहींत हें उघड आहे. परंतु सध्या आपलें लक्ष केवळ वाक्यरचनेकडे आहे.

टीप—वाख्याताचे जे अनेक अर्थ पूर्वी सांगितले आहेत, त्यांपैकीं संभवाचे अर्थीं किंवा इच्छा, मनोरथ, आशीर्वाद, उद्देश, ह्या अर्थींच सर्व अकर्मक धातूंचे व कांहीं अपवादक सकर्मक धातूंचे कर्तरि—प्रयोग होतात. कर्तव्य, प्रार्थना, आवश्यकता, इत्यादि इतर अर्थीं अकर्मक व अपवादक सकर्मक धातु यांपैकीं कोणाचाच वाख्यातीं कर्तरि—प्रयोग होत नाहीं; त्या अर्थानें अकर्मक धातूंचा भावेप्रयोग होतो व सकर्मक धातूंचा कर्मणि—प्रयोग होतो. जसें:—त्यानें हें काम करावें, त्यानें जावें, त्यानें हा विषय शिकावा, असे कर्तव्यादि अर्थीं कर्मणि व भावे प्रयोग होतात. परंतु, तो जावा, तो ही गोष्ट उमजावा, असले कर्तरि-प्रयोग फक्त संभवार्थीं होतात.

५५३. वाक्यांत संयुक्तक्रियापद असतां कोणता प्रयोग होतो, हें महत्त्वाचे स्थळीं संयुक्तक्रियापदांचे अध्यायांतच तीं तीं रूपें देतांना त्यांचे पुढें कंसांत कर्तरि, कर्मणि, भावी, अशा शब्दांनीं सांगण्यांत आलें आहे.

५५४. कर्तरि–प्रयोगासंबंधानें जी मुख्य गोष्ट ध्यानांत ठेवावयाची ती अशी कीं, :या प्रयोगामध्यें कर्ता नेहमीं प्रथमान्त असतो आणि क्रियापद कर्तृगामी म्हणजे कर्त्याचे पुरुषलिंगवचनाप्रमाणें बदलणारें असतें. कर्म प्रथमान्त असेल किंवा चतुर्थ्यन्त असेल आणि चतुर्थीचे जागीं कवितेंत कधीं कधीं सामान्यरूपही येईल; अर्थात् कर्माची चतुर्थी सप्रत्यय असेल किंवा अप्रत्ययही असेल. एवंच कर्तरि–प्रयोगांतील कर्माचे रूपाबद्दल एक नियम नाहीं; पण कर्ता नेहमीं प्रथमान्त असतो व धातूचें णारा–प्रत्ययान्त कृदन्त ज्यास लागू पडतें तो कर्ता होय; ह्या गोष्टी अगदीं निश्चित व निरपवाद असल्यामुळें कर्तरि–प्रयोग ओळखण्यास कधींच अडचण पडूं नये.

५५५. कांहीं थोड्याशा अकर्मक धातूंचा कधीं कधीं सकर्मकांप्रमाणें उपयोग होतो; तेव्हां त्या धातूंच्या अर्थाचेंच नाम त्याचें कर्म असतें. अशा सकर्मक धातूंचा लाख्यातीं कर्तरि—प्रयोगच होतो. जसें:—तो झुंज झुंजला, मी कुस्ती लढलों किंवा खेळलों, तो तप तपला, इ०.

## कर्मणि–प्रयोग.

५५६. कर्मणि–प्रयोगांत क्रियापद कर्मणि असतें, म्हणजे तें कर्माचे पुरुषलिंगवचनाप्रमाणें बदलतें. कांहीं आख्यातात धातूचीं तिन्ही लिंगी रूपें समान असतात, त्या वेळीं कर्मणि–प्रयोगांतील क्रियापद हें अर्थातच कर्माचा पुरुष व वचन इतक्यांप्रमाणेंच फिरतें. कर्मणि–प्रयोगांत कर्ता प्रथमान्त कधींच नसतो तर तो तृतीयान्त, चतुर्थ्यन्त, षष्ठयन्त, किंवा शब्दयोगी अव्ययान्त असतो.

**टीप**—अकर्मक धातूंचा कर्मणि–प्रयोग होणें शक्यच नाहीं, हें उघड आहे.

५५७. कर्मणि–प्रयोगाचे मुख्य दोन भेद आहेत. प्रधानकर्तृक कर्मणि व गौणकर्तृक कर्मणि; आणि ह्या गौणकर्तृक कर्मणि–प्रयोगाचे पुन्हा चार प्रकार आहेत. पुराण कर्मणि, नवीन कर्मणि, शक्य कर्मणि,

आणि समापनकर्मणि. ह्यामुळें कर्मणि प्रयोगाचे एकंदर पांच प्रकार मराठींत आढळतात.

[ वास्तविक म्हटलें म्हणजे कर्मणि प्रयोगांत कर्मासच प्राधान्य असल्यामुळें कर्ता हा सदोदित गौण असावा; आणि त्याप्रमाणें संस्कृत व इंग्रजी या दोन्ही भाषांतील कर्मणि प्रयोगामध्यें कर्ता हा नेहमीं गौणच असतो. परंतु मराठींतील एका प्रकारच्या कर्मणि प्रयोगांत कर्त्यास गौणत्व दिसत नाहीं. त्यानें काम केलें, किंवा काम करावें, हीं वाक्यें अशा प्रकारच्या कर्मणि प्रयोगाचीं उदाहरणें होत. तो काम करितो हा प्रथमताख्याताचा ( वर्तमानकाळाचा ) कर्तरि–प्रयोग होय. ह्याच्या बरोबरीचे संस्कृत व इंग्रजी भाषांतील प्रयोग असेः––स कर्म करोति, आणि He does the work या संस्कृत व इंग्रजी वाक्यांचे भूतकाळीं व विध्यर्थी जे कर्तरि प्रयोग होतात ते असेः––स कर्माऽकरोत्, व स कर्म कुर्यात् आणि He did the work व He sholud do the work. अर्थात् मागील म्हणजे वर्तमानकाळींच्या व या वाक्यांत कर्ता व कर्म अभिन्न असून फक्त कर धातूच्या आख्यात रूपांतच काय तो फरक आहे. परंतु मराठींत ' तो काम करितो ' या कर्तरि–प्रयोगांतील कर या धातूचें फक्त आख्यातरूप बदलून भूतकाळीं व विध्यर्थी म्हणजे लाख्यातीं व वाख्यातीं मराठींत कर्तरि–प्रयोग प्राप्त होत नाहीं. तर त्या आख्याताबरोबर वाक्यरचनाही बदलावी लागते; म्हणजे कर्त्याची तृतीया करून क्रियापदास कर्मणि म्हणजे कर्मगामी करावें लागतें. अर्थात् ' तो काम करितो ' यापासून मराठींत नेहमींच्या प्रचारांत भूतकाळाच्या व विध्यर्थाच्या अर्थानें त्यानें काम केलें ' आणि ' त्यानें काम करावें, असा कर्मणि प्रयोग होतो. कांहीं धातु शिवाय करून बहुतेक सकर्मक धातूंसंबंधानें असेंच आढळतें. म्हणचे लाख्यातीं व वाख्यातीं त्यांचा कर्तरि प्रयोग होतच नाहीं. संस्कृत व इंग्रजी या दोन्ही भाषांत त्या भाषांतील प्रत्येक आख्यातांत दोन्ही प्रयोग होतात. मराठींत तसें नाहीं. म्हणून लाख्यातीं व वाख्यातीं होणारा ' त्यानें काम केलें ' व ' त्यानें काम करावें ' असा कर्तरि–प्रयोग संस्कृतांतील व इंग्रजींतील भूतकाळीं व विध्यर्थी येणाऱ्या कर्तरि प्रयोगाचेच अनुरूप असल्यामुळें जरी बाह्यतः दिसण्यांत कर्मणि आहे, तरी अर्थदृष्ट्या त्यांतील कर्मास प्राधान्य नसून कर्त्यासच प्राधान्य आहे. ' त्याच्याकडून काम केलें जातें ' इत्यादि प्रकारचे जे मराठींत कर्मणि–प्रयोग आहेत ते संस्कृत व इंग्रजी कर्मणि प्रयोगांच्या तोडीचे असून त्यांत कर्त्यास प्राधान्य नाहीं. परंतु ' त्यानें काम केलें ' आणि त्यानें काम करावें ' या वाक्यांत कर्मास प्राधान्य नसून कर्त्यास आहे. म्हणून जरी येथें स्वरूपदृष्ट्या कर्मणि प्रयोग आहे तरी अर्थ दृष्ट्या कर्त्याकडेच प्राधान्य असल्यामुळें ह्यास प्रधानकर्तृक कर्मणि–प्रयोग असें आम्ही स्वतंत्र नांव दिलें आहे. या प्रकारच्या प्रधानकर्तृक कर्मणि–प्रयोगाचा

एक व्याकरणविशेष आहे, तो असा. ह्यांतील कर्ता नेहमीं तृतीयान्त असतो; आणि ही कर्तृवाचक मूळ शब्दाचीच तृतीया असावी लागते; तिच्या जागीं सविकरण तृतीया खपावयाची नाहीं. त्यानें काम केलें, रामानें श्लोक म्हटला, महादेवानें मला हें पुस्तक दिलें, इत्यादि वाक्यांत त्यानें, रामानें, महादेवानें, यांचे जागीं त्याच्यानें, रामाच्यानें, महादेवानें, अशा प्रकारचीं सविकरण तृतीयान्त रूपें कधींच येत नाहींत, हें उघड आहे.

प्रधानकर्तृक कर्मणि-प्रयोगाचा आणखी नमुना मराठींत आहे. 'त्याला हें काम करवतें,' आणि 'त्याला हा रुमाल सोडावा लागतो,' हीं दोन कर्मणि-प्रयोगांचींच उदाहरणें आहेत. दोहोंमध्यें 'त्याला' हा चतुर्थ्यन्त कर्ता आहे, तरी पहिल्यांतील 'त्याला' ह्याचे जागीं 'त्याच्यानें' अस सविकरण तृतीयेचें रूप येऊं शकतें. म्हणजे 'त्याला हें काम करवतें' ह्याचे बद्दल 'त्याच्यानें हें काम करवतें' असेंही म्हणतां येतें. परंतु त्याला हा रुमाल सोडावा लागतो ह्या वाक्यांतील 'त्याला' चे जागीं त्याच्यानें असें म्हणतां येत नाहीं; अर्थात् येथील त्याला ही चतुर्थी कर्तृवाचक मूळ शब्दाची असून पर्यायहीन आहे. पण त्याला काम करवतें, या वाक्यांतील त्याला ही चतुर्थी सपर्यास आहे, म्हणजे 'त्याला' चे जागीं 'त्याच्यानें' हा सविकरण तृतीयेचा पर्याय चालूं शकतो. 'त्याच्यानें किंवा त्याला काम करवतें' यांतील करवतें " शक्तिबोधक क्रियापद व्युत्पत्तिदृष्ट्या कर्मणि आहे, म्हणजे त्याचा उपयोग संस्कृत कर्मणि-क्रियापदा-सारखा आहे, हें पूर्वीं सविस्तर ऊहापोह करून सिद्ध केलें आहे. तेव्हां, त्याच्यानें किंवा त्याला काम करवतें हा कर्मणि-प्रयोग संस्कृत व इंग्रजी यांतील कर्मणि-प्रयोगा-प्रमाणें गौणकर्तृक आहे " उघड आहे. परंतु, त्याला रुमाल सोडावा लागतो, हा कर्मणि-प्रयोग संस्कृत किंवा इंग्रजी ह्यांपैकीं कोणत्याच भाषेंत कर्मणि नाहीं; म्हणजे ह्याचें अनुरूप भाषांतर संस्कृतांत किंवा इंग्रजींत केवळ कर्तरि-प्रयोगानेंच होतें हें तज्ज्ञांस कळेलच. अर्थात् हा प्रयोग गौणकर्तृक कर्मणि म्हणजे खरा कर्मणि नसून केवळ बाह्यतः कर्मणि म्हणजे प्रधानकर्तृक कर्मणि होय, हें उघड आहे.

यावरून असा नियम करण्यास हरकत नाहीं कीं, ज्या कर्मणि-प्रयोगांत कर्तृवाचक मूळ शब्दाची तृतीया किंवा चतुर्थी असून ती पर्यायहीन असते, म्हणजे तिच्या जागीं त्या शब्दाची सविकरणतृतीया चालत नाहीं त्या कर्मणि-प्रयोगांत कर्मास प्राधान्य नस-ल्यामुळें तो प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोग होय.

तात्पर्य इतकेंच कीं, संस्कृत व इंग्रजी भाषणांमध्यें कर्मणि-प्रयोग म्हटला कीं त्यांतील कर्ता गौण असलाच पाहिजे असें ज्याप्रमाणें म्हणतां येतें; तसें मराठींतील कर्मणि-प्रयोगांसंबंधानें एकजात म्हणतां येत नाहीं. तर मराठींत, त्यानें काम केलें, त्यानें काम करावें, त्याला रुमाल सोडावा लागतो, ह्या नमुन्याचा

प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोग असल्यामुळें मराठींतील कर्मणि-प्रयोगाचे प्रधानकर्तृक कर्मणि व गौणकर्तृक कर्मणि असें दोन भेद मानणें भाग आहे. हा फरक केवळ व्याकरणदृष्ट्या फारसा महत्वाचा नाहीं. व्याकरणांत अमुक एक प्रयोग कर्तरि आहे कीं कर्मणि आहे कीं भावी आहे इतकें समजलें म्हणजे पुरे, हें आम्हांस मान्य आहे. परंतु वाक्यमीमांसा किंवा वाक्यपृथक्करण हा जो नवीन महत्त्वाचा विषय इंग्रजींतून मराठींत आला आहे, त्या विषयांत वाक्यार्थाची दृष्टि वाक्य स्वरूपाचे दृष्टीपेक्षां कांहीं अंशीं बलवत्तर असल्यामुळें अर्थदृष्ट्या दिसणारा मराठीं-तील कर्मणि-प्रयोगांतील हा फरक सांगणें भाग आहे. या मुद्याकडे दुर्दैवानें जोशीबोवांचें लक्ष जावें तितकें न गेल्यामुळें त्यांची वाक्यापृथक्करणाची पद्धति बरीच दूषित राहिली आहे, असें मोठ्या दिलगिरीनें म्हणावें लागतें. प्रधानकर्तृक कर्मणि व गौणकर्तृक कर्मणि यांमधील या फरकाचें खरें रहस्य व महत्व वाक्यपृथक्करणाचे वेळीं लक्षांत येईल.

प्रधानकर्तृक कर्मणि व गौणकर्तृक कर्मणि हा अर्थदृष्ट्या केलेला फरक व्याकरण-दृष्ट्याही समजण्यास व ओळखण्यास फारच सोपा आहे. ज्या कर्मणि प्रयोगांत कर्तृवाचक मूळ शब्द तृतीयांत असतो, किंवा चतुर्थन्त असून त्या चतुर्थीचे जागीं सविकरण तृतीया येऊं शकत नाहीं, तो प्रधानकर्तृक कर्मणि-प्रयोग होय. आणि ज्या कर्मणि-प्रयोगांत कर्तृवाचक मूळ शब्द तृतियांत किंवा पर्यायहीन चतुर्थ्यन्त नसतो, म्हणजे शब्दयोगी अव्ययांत, किंवा सविकरण तृतीयांत, किंवा तिच्या जागीं येणाऱ्या चतुर्थी विभक्तींत, किंवा षष्ठी विभक्तींत असतो तो गौणकर्तृक कर्मणि होय. एवंच प्रथमान्त कर्ता ज्याप्रमाणें संस्कृत व इंग्रजी ह्या दोन्ही भाषांत नेहमी प्रधान असतो, त्याप्रमाणें प्रचलित मराठी गद्यांत प्रथमान्त, तृतियांत, व चतुर्थ्यन्त, हे तिन्ही कर्ते प्रधान असतात; मात्र ह्या प्रधान कर्त्याची तृतीया कर्तृत्ववाचक मूळ शब्दाची पाहिजे, त्याची सविकरण तृतिया कामाची नाहीं; आणि त्याची चतुर्थी पर्यायहीन पाहिजे, म्हणजे त्या चतुर्थीचे जागीं सविकरण तृतीया चालतां कामा नये. म्हणजें सविकरण तृतीया वर्ज करून कर्मणि-प्रयोगांत तृतीयान्त कर्ता असल्यास तो, आणि पर्यायहीन चतुर्थ्यन्त कर्ता म्हणजे ज्याचे जागीं सविकरण तृतीयान्त कर्ता चालत नाहीं तो हे दोन्ही प्रथमांत कर्त्याइतकेच प्रधान असतात. यावरून प्रधानकर्तृक कर्मणि-प्रयोगाच्या दोन खुणा आहेत असें दिसून येईल. त्या ह्याः -कर्मणि-प्रयोगां तील कर्त्याची मूळ तृतीया आणि पर्यायहीन चतुर्थी. ज्या कर्मणि प्रयोगांतील कर्त्याचे ठायीं या खुणा नसतील, ते सर्व गौणकर्तृक कर्मणि होत.

गौणकर्तृक कर्मणि प्रयोगासही स्वतःचीं स्वतंत्र चिन्हें आहेत; जो प्रधान-कर्तृक नव्हे तो गौणकर्तृक अशा केवळ अभावरूप चिह्नांनींच तो ओळखिला पाहिजे असें नाहीं. तर उलट त्याचे ठायीं दोन प्रकारचीं चिह्नें आढळतात.

कर्तृगत आणि क्रियापदगत. म्हणजे गौणकर्तृक कर्मणि-प्रयोग कर्त्याचे स्वरूपावरून व क्रियापदाचे स्वरूपावरून, अर्थात् दोन लक्षणांनीं ओळखतां येतो. गौणकर्तृक कर्मणि-प्रयोगाचे चार उपभेद आहेत म्हणून वर सांगितलें. ते व त्यांचीं उदाहरणें येणेंप्रमाणें:—

| | |
|---|---|
| पुराण कर्मणि ... ... | नळें इंद्रासी असें बोलिजेलें. |
| नवीन कर्मणि ... ... | शिपायाकडून चोर धरिला जातो.<br>शिपायाकडून चोर धरण्यांत येतो. |
| समापनकर्मणि ... ... | त्याचें पत्र लिहून झालें. |
| शक्य कर्मणि ... ... | त्याला अथवा त्याच्यानें काम करवतें. |

ह्या भेदांचें सविस्तर निरूपण आतां येणारच आहे. येथें फक्त त्यांचीं चिन्हें दाखवितों. पुराण कर्मणि केवळ पद्यांत येतो, तो प्रचलित गद्यांत सहसा येतच नाहीं. नवीन कर्मणिमध्यें कर्ता शब्दयोगी अव्ययान्त असतो. (शिपायानें चोर धरिला जातो असें क्वचित् म्हणतात; तेव्हां मात्र कर्ता मूळ तृतीयान्त असतो; तरी ही तृतीया पर्यायहीन नाहीं इतकेंच नव्हे, तर तिच्या जागीं शिपायाकडून हें शब्दयोगी अव्ययान्त रूपच अधिक प्रशस्त दिसतें). समापनकर्मणिमध्यें कर्तृपदाची षष्ठी विभक्ति असते. आणि शक्य कर्मणिमध्यें कर्ता विकल्पानें चतुर्थ्यन्त किंवा सविकरण तृतीयान्त असतो. गौणकर्तृक कर्मणि-प्रयोगाचीं हीं कर्तृगत चिन्हें होत. आतां त्यांच्या क्रियापदगत चिन्हांकडे पहा. धातूस इज आगम लागून झालेलें क्रियापद (बोलिजेलें) ज्या कर्मणि-प्रयोगांत असतें तो पुराण कर्मणि; मुख्य धातूच्या लाकृदन्तापुढें जा या सहाय धातूचा उपयोग होऊन बनलेलें संयुक्त क्रियापद (धरिला जातो) किंवा धातूच्या सप्तम्यन्त णेंकृदन्त नामापुढें ये या सहाय धातूचा उपयोग होऊन बनलेलें संयुक्तक्रियापद (धरण्यांत येतो) ज्या कर्मणि-प्रयोगांत असतो तो नवीन कर्मणि; मुख्य धातूच्या ऊनकृदन्तापुढें हो धातूचा उपयोग होऊन बनलेलें संयुक्तक्रियापद (लिहून झालें) ज्या कर्मणि प्रयोगांत असतें तो समापनकर्मणि; आणि धातूस व आगम होऊन झालेलें क्रियापद (करवतें) ज्या कर्मणि प्रयोगांत असतें, तो शक्य कर्मणि. अशा प्रकारचीं लहान मुलांसही तेव्हांच उमजून पडणारीं भेददर्शक असंदिग्ध चिन्हें उपलब्ध असतां कर्मणि प्रयोगांचे या ग्रंथांत सांगितलेले भेद मोठ्या आनंदानें सत्वर स्वीकारण्यास कोण समंजस मनुष्य तयार होणार नाहीं? यासंबंधानें आणखी अंक ५६६ मधील ऊहापोह पहावा.]

**५८८. प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोग**—ह्या प्रयोगांत क्रियापद जरी कर्मगामी असलें, तरी त्याचा कर्ताच प्रधान असतो आणि तो मूल तृतीयान्त असतो, म्हणजे सविकरण तृतीयान्त नसतो; किंवा पर्यायहीन चतु-

र्थ्यन्त असतो, म्हणजे ह्या चतुर्थीचे जागीं सविकरण तृतीयेचा पर्याय विकल्पानें चालत नाहीं. प्रधानकर्तृक कर्मणि हा मराठींतील कर्मणि प्रयोगाचा एक विशेषभेद आहे. असा प्रकार संस्कृतांत किंवा इंग्रजींत नाहीं. उदाहरणें:—त्यानें पुस्तक आणिलें, कृष्णानें पांडवांनां साहय्य केलें, रामानें बिभीषणास लंकेचें राज्य दिलें, त्वां चांगला अभ्यास करावा, तुम्हीं आम्हांस दर आठवड्यास एक पत्र पाठवित जावें, मला तो धंदा सोडावा लागला, त्याच्या चुलत्याला त्याचा खर्च द्यावा लागतो, त्यानें किंवा त्याला ही संवय सोडिली पाहिजे, त्याला ही गांठ सोडितां यावी किंवा सोडितां येईल, इ०.

**टीप**—प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोगांत कर्त्याची सविकरण तृतीया वर्ज आहे; तिचा त्याला प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षही संसर्ग कामाचा नाहीं. अर्थात् कर्त्याच्या प्रत्यक्ष सविकरण तृतीयेनें प्रयोगास गौणकर्तृत्व येतें आणि चतुर्थ्यन्त कर्त्याचे जागीं जरी ती केवळ विकल्पानें येणारी असली, तरी सविकरण तृतीयेशीं इतका निकट संबंध ठेवणारी चतुर्थीही प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोगास खपत नाहीं; तर असल्या वैकल्पिक किंवा सपर्याय चतुर्थीनेंही प्रयोगास गौणकर्तृत्व येतें. एवंच प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोगांतील कर्ता मूळ तृतीयान्त किंवा पर्यायहीन चतुर्थ्यन्त असतो हें संस्मरणीय आहे.

५५९. **पुराण कर्मणि प्रयोग**—हा प्रयोग मूळ संस्कृत कर्मणि प्रयोगापासून आलेला आहे. त्याची व्युत्पत्ति पूर्वीं (अंक ३८८ सविस्तर दिलेली आहे. हा प्रयोग बहुधा जुन्या कवींचे काव्यांत आढळतो. निदान प्रचलित गद्यांत तरी त्याचा उपयोग होत नाहीं. यामुळें आम्हीं त्यास पुराण कर्मणि हें नांव दिलें आहे. उदा०:—त्वां काय कर्म करिजे लघु लेंकरानें इ०.

संस्कृत व इंग्रजी या भाषांतील कर्मणि–प्रयोगाप्रमाणें हा मराठींतील पुराण कर्मणि–प्रयोगही सर्व आख्यातांत येण्यास हरकत नाहीं. तथापि वाख्यातीं व उआख्यातीं झालेला ह्या प्रयोगाचा उपयोग उपलब्ध नाहीं, बाकीच्या पांच आख्यातांपैकीं ईआख्यातांत त्याचा उपयोग पुष्कळ आढळतो. त्या मानानें इतर आख्यातांत कमी. प्रत्येक आख्यातांतील उदाहरणें विकरण प्रकरणीं आलेलीं आहेतच; तेथें पहावीं.

५६०. **नवीन कर्मणि**--( अ ) हा प्रयोग जुन्या काव्यांत फारसा येत नाहीं. या प्रयोगाची रचना अशीः---ज्या सकर्मक धातूचा हा प्रयोग करावयाचा असेल त्या धातूचे कर्त्याचे पुढें **कडून** ह्या शब्दयोगी अव्ययाचा उपयोग करावा, कर्म प्रथमान्त ठेवावें, आणि त्या धातूच्या कर्मगामी किंवा कर्मनिष्ठ लाकृदन्तापुढें 'जा' या सहाय धातूचे विवक्षित आख्यात योजावें. जसें:---शिपायाकडून चोर धरिला जातो, त्याच्याकडून हें काम केलें जाईल, त्याकडून हा वाघ मारिला गेला किंवा जाईल, इ०.

हा प्रयोग संस्कृत व इंग्रजी कर्मणि-प्रयोगाप्रमाणें सर्व आख्यातांत होतो. आख्यातवार उदाहरणें:---

| | |
|---|---|
| प्रथमताख्यात .... .... | धरिला जातो. |
| द्वितीयताख्यात .... .... | धरिला जाता. |
| लाख्यात .... .... | धरिला गेला. |
| वाख्यात .... .... | धरिला जावा. |
| ईआख्यात .... .... | धरिला जाई. |
| उआख्यात .... .... | धरिला जाऊं किं जावो. |
| इलाख्यात .... .... | धरिला जाईल. |

ह्यामुळें कोणत्याही सकर्मक कर्तरि किंवा प्रधानकर्तृक कर्मणि किंवा सकर्मक भावी प्रयोगाचे रूपांतरानें हा नवीन गौणकर्तृक कर्मणि प्रयोग तयार करितां येतो. जसें:---

| सकर्मक कर्तरि. | नवीन कर्मणि. |
|---|---|
| शिपाई चोर धरितो. | शिपायाकडून चोर धरला जातो. |
| शिपाई चोरास धरितो. | वरीलच. |
| मी हें काम करीन. | मजकडून हें काम केलें जाईल. |
| इ०. | इ०. |

| प्रधानकर्तृक कर्मणि. | नवीन कर्मणि. |
|---|---|
| त्यानें हें काम केलें. | त्याकडून हें काम केलें गेलें. |
| त्यानें हें काम करावें. | त्याकडून हें काम केलें जावें. |
| इ०. | इ०. |

| सकर्मक भावी. | नवीन कर्मणि. |
| --- | --- |
| रामानें रावणास मारिलें. | रामाकडून रावण मारला गेला. |
| त्यानें नोकरास पाठविलें. | त्याजकडून नोकर पाठविला गेला. |
| इ०. | इ०. |

ह्या नवीन कर्मणि-प्रयोगामध्यें ‘ कडून ’ शब्दयोगी अव्ययान्त कर्ता नेहमीं गौण असल्यामुळें, तो कधीं कधीं वाक्यांत अध्याहृतही राहतो. यामुळें चोर धरला जातो किंवा गेला, तो वाघ मारिला गेला अशी गुप्तकर्तृपद रचना बरीच आढळते.

टीप—हा नवीन कर्मणि-प्रयोग पुराण कर्मणि-प्रयोगापासूनच निघाला आहे. संस्कृत कर्मणि-प्रयोगामध्यें धातूंस लागणाऱ्या य ह्या आगमापासून मराठींत ज येऊन करिज, धरिज, हीं कर्मणि अंगें होऊन त्यांपासून करिजेतो, धरिजेतो, बोलिजेतो, अशीं प्रथमताख्याताचीं कर्मणि रूपें तयार होतात, तीं बहुधा जुन्या कवितेंत आढळतात. या रूपांपासूनच पुढें केला जातो, धरिला जातो, बोलला जातो इ० नवीन रूपें उत्पन्न झालीं आहेत. हीं नवीन रूपें कोणत्या काळीं उत्पन्न झालीं हें ठरविणें भाषेतिहाससंशोधकांचें काम आहे. या नवीन कर्मणि-प्रयोगाचा उपयोग मोरोपंतांचे कवितेंत क्वचित् आढळतो. जसें:—

जे साधु सत्पथीं स्थित ते वाङ्मात्रें न दूषिले जाती ॥
सिंहें गजसा पार्षद गुरुपुत्रें शीघ्र मारिला जातो ॥—कर्णपर्व

पंतांचे कालापूर्वीं हा प्रयोग मराठी काव्यांत किंवा इतर लेखांत आलेला आहे किंवा नाहीं हें प्रस्तुत लेखकांस माहीत नाहीं. तथापि इतकें खरें कीं करिजेतो, बोलिजेतो, इ० पुराण कर्मणि-प्रयोगाचा प्रचार त्या काळीं बराच असल्यामुळें या नवीन कर्मणि-प्रयोगाची जरूर त्याकाळीं त्या मानानें कमी भासत असली पाहिजे. जसजसा जुन्या प्रयोगाचा प्रसार कमी होत गेला, तसतसा नवीनाचा प्रचार वाढत चालला असावा असें वाटतें. दोन्ही प्रयोग एकाच संस्कृत मूळापासून आले असून दोहोंचा उपयोग व अर्थही जवळ जवळ एकच आहे; आणि त्यापैकीं एकाची उत्पत्ती दुसऱ्यापासून झाली आहे. म्हणजे एकाचें हळुहळु दुसऱ्यांत रूपांतर झालें आहे. ह्यामुळेंच एकाचे वेळीं दुसऱ्याचा प्रचार कमी आढळतो. म्हणूनच एकास पुराण कर्मणि म्हणजे प्रचलित गद्यांत नसलेला कर्मणि आणि दुसऱ्यास नवीन कर्मणि म्हणजे त्याचे नंतर प्रचारांत आलेला व हल्लीं प्रचलित असणारा कर्मणि अशीं नांवें दिली आहेत. दादोबा ह्या नवीन कर्मणि-प्रयोगास **कर्मकर्तरि-प्रयोग** असें म्हणतात. दादोबांचें हें नांव या प्रयोगास योग्य नसून तो कर्मणि-प्रयोगाचाच एक प्रकार होय, हें आतां

बहुतेकांस कबूल झालें आहे; आणि ह्यांतील क्रियापद कर्तरि म्हणजे कर्तृगामी नसून कर्मणि म्हणजे कर्मगामी असल्यामुळें हा, कर्मकर्तरि ' म्हणजे एका प्रकारचा कर्तरि–प्रयोग खास नाहीं. तर कर्मणि–प्रयोगच होय हें उघड आहे. ह्या प्रयोगाचा प्रचार अद्याप कमी प्रमाणावरच आहे. तथापि तो दिवसेंदिवस वाढत आहे. आणि विशेषेंकरून लेखी भाषेंत व कायदेकानूंमध्यें आणि एकंदर सकारदरबारचे व्यवहारांत ह्याचा उपयोग अधिकाधिक होत आहे. ह्याचें कारण उघडच आहे कीं, ह्या प्रयोगामध्यें मुख्य धातूच्या कर्त्यास गौणत्व असून तो वाक्यांत स्पष्ट सांगण्याची नेहमीं जरूर नसते; तर तो अध्याहृतही असूं शकतो. ह्यामुळें जेव्हां कर्त्यांची अपेक्षा नसते किंवा कांहीं कारणानें तो अमुक होय असें निःशंकपणें माहीत नसतें, किंवा माहीत असूनही तो स्पष्ट पणें सांगणें राजकीयदृष्ट्या इष्ट नसतें, त्या वेळीं या प्रयोगाची आवश्यकता व इष्टता भासूं लागते. इंग्रजी भाषेंत या प्रयोगाचा फार प्रचार आहे. आणि मराठीमध्यें जरी त्याचा प्रचार वाढत आहे, तरी त्याचें कार्य मराठीमध्यें दुसऱ्या अनेक प्रकारच्या रचनेनें किंवा पर्यायांनीं होत असल्यामुळें इंग्रजींतल्या कर्मणि प्रयोगाइतका हा मराठींतील नवीन कर्मणि–प्रयोग अगदीं नेहमींचा किंवा विशेष परिचयाचा होईल, असा रंग दिसत नाहीं.

( आ ) या नवीन कर्मणि–प्रयोगाचा आणखी एक प्रकार मराठींत आढळतो. तो असाः—मूळ धातूच्या णें कृदन्ताचे सप्तम्यन्त नामापुढें ये ह्या सहाय धातूच्या विवक्षित आख्याताचा उपयोग करून हा प्रयोग होतो. वरील प्रयोगांत व ह्या प्रयोगांत इतकाच फरक आहे कीं, पहिल्यामध्यें मूळ धातूच्या ला कृदन्ताचा व जा या सहाय धातूचा उपयोग होतो; आणि या दुसऱ्या प्रकारच्या प्रयोगांत मूळ धातूच्या णें–कृदन्ताचे सप्तम्यन्त रूपाचा व ये ह्या सहाय धातूचा उपयोग होतो. कर्ता हा दोन्ही प्रकारांत 'कडुन' शब्दयोगी अव्ययान्तच असतो. हा प्रकारही सर्व आख्यातांत दृष्टीस पडतो. जसें:—धरण्यांत–येतो,–येता,–आला,–यावा,–येई,–येवो–येईल. प्रयोगान्तराचीं उदहरणें:—

| सकर्मक कर्तरी. | नवीन कर्मणि. |
|---|---|
| शिपाई चोर धरितो | ( अ ) शिपयाकडून चोर धरिला जातो |
| | ( आ ) ,, ,, धरण्यांत येतो |
| **प्रधानकर्तृक कर्मणि.** | **नवीन कर्मणि.** |
| त्यानें काम करावें | ( अ ) त्याकडून काम केलें जावें |
| | ( आ ) ,, ,, करण्यांत यावें |

सकर्मक भावी. नवीन कर्मणि.

रामानें रावणास मारिलें { (अ) रामाकडून रावण मारला गेला
(आ) ,, ,, मारण्यांत आला

नवीन कर्मणि प्रयोगाचा हा दुसरा प्रकार पहिल्या प्रकाराइतकाच महत्त्वाचा आहे. पहिल्यांतील जा हा सहाय धातु जसा मूळ संकृत यकारापासून आला आहे, तसाच दुसऱ्यांतील ये हा सहाय धातू त्याच यकारापासून आला असावा, असें दिसतें. या दुसऱ्या प्रकारचा उल्लेख दादोबांनी केला आहे. परंतु त्यास त्यांनीं एका कोंपऱ्यांत फेंकून दिलें असल्यामुळें व्याकरणदृष्ट्या तो आजपर्यंत मागें पडला आहे. आमच्या मतें हा दुसरा प्रकार पहिल्या प्रकाराइतकाच महत्त्वाचा आहे; इतकेंच नव्हे, तर त्याचेपेक्षां या दुसऱ्याच प्रकारास शिष्ट भाषेंत अधिक मान मिळत आहे. मात्र इंग्रजींतील कर्मणि-प्रयोगाचे समोरासमोर पहिल्याप्रमाणें हा दुसरा प्रकारही येणें इष्ट आहे, असें या प्रयोगाचें निरूपण वाचून प्रत्येकास वाटल्यावांचून राहणार नाहीं. नवीन कर्मणि प्रयोगाच्या पहिल्या प्रकारचे उपयोगासंबंधानें वर जें निरूपण केलें आहे तें सर्व या प्रकारासही तसेंच लागू आहे. कर्ता अध्याहृत ठेऊन कर्मणि वाक्यरचना करावयाची असतां ह्या दुसऱ्या प्रकाराचा फारच उत्तम उपयोग करितां येतो, हें सूज्ञ वाचकांचे तेव्हांच नजरेस येईल.

५६१. ह्या नवीन कर्मणि किंवा दादोबांच्या कर्मकर्तरि प्रयोगाचे अर्थ दाखविणारे मराठींतील अनेक पर्याय दादोबांनीं आपल्या व्याकरणांत व पूरणिकेंत दिले आहेत, ते वाचकांच्या माहितीकरितां येथें देतों.

(अ) कधीं कधीं शुद्ध सकर्मक धातूचा अकर्मकाप्रमाणें उपयोग करितात. जसें:-या जात्यानें हरभरे चांगले दळतात (दळले जातात), या चाकूनें खर्बूजही चांगलें कापत नाहीं (कापलें जात नाहीं), इ०.

(आ) कधीं कधीं प्रथमताख्यातीं (वर्तमानकाळीं) धातूचें तृतीयपुरुषाचें अनेकवचनाचें रूप योजून कर्त्याचा अध्याहार करितात. जसें:—असें सांगतात (सांगितलें जातें किंवा सांगण्यांत येतें) कीं, त्या देशांत बायकांचें प्राबल्य बरेंच आहे, छापखान्यांत निराळीच शाई वापरितात [वापरण्यांत येते], बंदुकींत खचून दारू भरितात [भरण्यांत येते], इ०

( इ ) कधीं कधीं विवक्षित सकर्मक धातूच्या जवळ जवळ अर्थाचा अकर्मक धातु योजितात. जसें:--तो तरेल ( तारला जाईल ), तो लढाईंत मेला ( मारला गेला ), इ०.

( ई ) कधीं कधीं धातूच्या लाकृदन्तापुढें वर्तमान काळीं आह ह्या सहायधातूचा उपयोग करून प्रस्तुत अर्थी संयुक्तक्रियापद योजितात. जसें:--म्हटलें आहे कीं ( म्हटलें जातें कीं, म्हणण्यांत येतें कीं, ) भिक्षापति तो लक्षापति, इ०.

नवीन कर्मणि प्रयोगाचा अर्थ प्रकट करण्याचे इ अपरपर्याय होत. हा प्रयोग इतक्या प्रकारचा आहे किंवा हे नवीन कर्मणि प्रयोगाचेच इतके निरनिराळे प्रकार होत असें मात्र समजूं नये. या पर्यायांतील प्रयोग अर्थात् स्वतंत्रपणें ठरविले पाहिजेत. म्हणजे जरी अर्थदृष्ट्या वरील रचना नवीन कर्मणि प्रयोगाशीं कांहीं अंशीं सदृश असल्या, तरी प्रयोगदृष्ट्या त्या भिन्न आहेत हें विसरतां कामा नये. उदाहरणार्थ--' असें म्हणतात कीं' ह्या ठिकाणीं सकर्मक कर्तरि प्रयोग आहे; 'तो तरेल ' या ठिकाणीं अकर्मक कर्तरि आहे; असेंच अन्यत्र समजावें.

५६२. **समापनकर्मणि**--या प्रकाराचा वैयाकरणांनीं जसा गौरव करावयास पाहिजे होता तसा केलेला नाहीं, इतकेंच नव्हे. तर त्याचा त्यांनीं फारसा कोठें उल्लेखही केलेला दिसत नाहीं. हा प्रयोग साधण्याचा प्रकार असा. मूळ सकर्मक धातूच्या ऊनकृदन्तापुढें **हो** या सहायधातूचा उपयोग होऊन सर्व आख्यातांत कर्मणि प्रयोग होतो; आणि नवीन कर्मणि प्रयोगामध्यें ज्याप्रमाणें मूळ सकर्मक धातूच्या कर्त्याचा उल्लेख करून या शब्दयोगी अव्ययान्त असतो त्याप्रमाणें या समापनकर्मणिमध्यें कर्त्याची षष्ठी विभक्ति होते आणि हा षष्ठयन्त कर्ता कर्माचे पाठीमागें जोडण्यांत येऊन तो कर्मनिष्ठ असतो; म्हणजे त्याचें षष्ठयन्त रूप कर्माचे लिंग-वचनाप्रमाणें फिरतें. जसें:--त्याचा धडा शिकून झाला, त्याचें पत्र लिहून होईल, इ०.

सर्व आख्यातांतील उदाहरणें.

| | | | |
|---|---|---|---|
| प्रथम-ताख्यात | .... | .... | त्याचा धडा शिकून होतो |
| द्वितीय-ताख्यात | .... | .... | ,, ,, शिकून होता |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| लाख्यात | .... | .... | .... | त्याचा धडा शिकून झाला |
| वाख्यात | .... | .... | .... | ,, ,, शिकून व्हावा |
| ई-आख्यात | .... | .... | .... | ,, ,, शिकून होई |
| उ-आख्यात | .... | .... | .... | ,, ,, शिकून होवो |
| ई-लाख्यात | .... | .... | .... | ,, ,, शिकून होइल |

आतां मूळ सकर्मक कर्तरि किंवा प्रधान—कर्तृक कर्मणि व भावे प्रयोगांपासून तदनुरूप समापनकर्मणि प्रयोग साधल्याचीं उदाहरणें देतों:—

| सकर्मक कर्तरि. | समापनकर्मणि. |
|---|---|
| तो पत्र लिहितो | त्याचें पत्र लिहून होतें |
| तो पत्र लिहीत आहे | त्याचें पत्र लिहून होत आहे |
| तो पत्र लिहील | त्याचें पत्र लिहून होईल |
| इ०. | इ०. |
| प्रधानकर्तृक कर्मणि | समापनकर्मणि. |
| त्यानें पत्र लिहिलें | त्याचें पत्र लिहून झालें |
| त्यानें पत्र लिहावें | त्याचें पत्र लिहून व्हावें |
| इ० | इ० |
| सकर्मक भावी. | समापनभावी. |
| त्यानें रामाला प्रसन्न केलें | त्याचें रामाला प्रसन्न करून झालें |
| इ०. | इ०. |

या प्रयोगासंबंधानें एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. ती अशी कीं, पूर्वीं ज्याचें दिग्दर्शन झालें आहे, व जो पुढील अंकीं सांगण्यांत येणार आहे, त्या शक्य कर्मणि प्रयोगांत जसा शक्तीचा अर्थ विशेष आहे, त्याचप्रमाणें या समापनकर्मणि प्रयोगांत **क्रियासमाप्ति** हा विशेष अर्थ आहे. त्याकडून पत्र लिहिलें गेलें किंवा लिहिण्यांत आलें, आणि त्याचें पत्र लिहून झालें, ह्या दोन रचनांमध्यें अर्थाचें सर्वांशीं साम्य नाहीं; तर 'त्याचें पत्र लिहून झालें' या समापनकर्मणिमध्यें क्रियासमाप्तीवर कटाक्ष आहे, म्हणजे क्रियेच्या समाप्तीचा विशेषेंकरून निर्देश होत आहे. अर्थात् मूळ सकर्मक धातूनें दाखविल्या जाणाऱ्या क्रियेच्या समाप्तीचा मुख्यत्वेंकरून उल्लेख करावयाचा असतां, या षष्ठयन्त कर्त्यानें युक्त कर्मणि प्रयोगाचा उपयोग

होतो. आणि यामुळें जी क्रिया एका क्षणांत: ताबडतोब होते, म्हणजे जिला फारसा वेळ लागत नाहीं, तद्वाचक धातूपासून समापनकर्मणि प्रयोग होण्याचा संभव नाहीं. 'रामानें गणूस एक पुस्तक दिलें' या वाक्यांतील दे धातूनें दाखविली जाणारी क्रिया क्षणमात्रांत होते. ह्यामुळें 'रामाकडून गणूला एक पुस्तक दिलें गेलें' किंवा 'रामाकडून गणूला एक पुस्तक देण्यांत आलें' अशा नमुन्याचे जरी नवीन कर्मणि प्रयोग सहज झाले, आणि ते 'रामानें गणूस एक पुस्तक दिलें' याच अर्थी उपयोगांत आले, तरी ज्याप्रमाणें 'रामाच्यानें गणूला एक पुस्तक देववलें' हा शक्य कर्मणि प्रयोग केवळ विशेष अर्थानेंच उपयोगांत आहे, त्याचप्रमाणें 'रामाचें गणूला एक पुस्तक देऊन झालें' हा समापनकर्मणि प्रयोगही वरील प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोगाचे जागीं उपयोगांत न येतां केवळ विशेष अर्थानेंच उपयोगांत येऊं शकतो. रामा जर चेंगट मनुष्य असून एका क्षणांत होणाऱ्या कामास एक घटका घेणारा असेल तर त्याला देणें या क्रियेस बराच वेळ लागण्याचा संभव असल्यामुळें 'काय रामा चेंगट मनुष्य आहे पहा! मी जेऊन उठेपर्यंत रामाचें गणूला एक पुस्तक देऊन होत आहे, किंवा माझें जेवण संपलें तरी रामाचें गणूला एक पुस्तक देऊन झालें नाहीं' अशा प्रकारचीं वाक्यें दे या धातूसंबंधानें संभवतात. यावरून हें उघडच आहे कीं, या समापनकर्मणि नांवाच्या प्रयोगांत क्रियेच्या समाप्तीवर वक्त्याचा विशेष जोर असतो. यामुळें जेव्हां कोणतीही क्रिया घडून येण्यास कालावधि लागतो व त्यायोगें क्रियेची समाप्तिही तिच्या आरंभापासून व प्रगतीपासून भिन्नपणें सहज लक्षांत येण्यासारखी असते, तेव्हां तद्वाचक धातूपासून अशा प्रकारचा प्रयोग फार संभवतो. कोणताही लेख लिहिणें ही अशा प्रकारची क्रिया आहे; म्हणून वर लिह धातूचें उदाहरण दिलें आहे. परंतु जेव्हां एखादी क्रिया एका क्षणांत घडते व त्यामुळें तिचा आदि व अंत हे पृथक्त्वानें सहज लक्षांत येण्यासारखे नसतात, तेव्हां हा समापनकर्मणि प्रयोग संभवत नाहीं.

टीपः—त्याचें पत्र लिहून होत आहे, या वाक्यांत लिहून म्हणजे लिहिणें असा अर्थ करून लिहून ह्यास क्रियावाचक नाम समजणें व तो होत आहे ह्या क्रियापदाचा कर्ता करणें हा एक पक्ष आहे. पण हा पक्ष आमच्या मतें

योग्य नाहीं. कारण लिहून म्हणजे लिहिणें असा अर्थच करणें सर्वस्वी प्रशस्त नाहीं. त्यामुळें लिहून शब्दानें क्रियासमाप्तीचा जो अर्थ ध्वनित होत आहे, तो साफ लय पावतो. प्रस्तुत स्थळीं लिहून म्हणजे लिहिणें, असा अर्थ करणें म्हणजे लिहून शब्दांतील स्वारस्याकडे दुर्लक्ष करणें होय. परंतु प्रस्तुत वाक्यांतील लिहून या शब्दाचें व्याकरण कसें करावें हा प्रश्न उत्पन्न झाल्यावर जेव्हां त्याचें अन्य प्रकारें व्याकरण करणें कोणास सुचत नाहीं, तेव्हां तो, लिहून म्हणजे लिहिणें असा एक स्थूलमानाचा अर्थ करून लिहून यास क्रियावाचक नाम म्हणण्यास तयार होतो. कारण कीं ऊन कृदन्ताचा नामाप्रमाणें उपयोग कधींच होत नसून तें केवळ अव्यय होय. तेव्हां व्याकरणाचे अडचणीमुळें लिहून म्हणजे लिहिणें असा अर्थ निघाला; आणि या अर्थामुळें लिहून यास नाम म्हणण्यांत आलें. तेव्हां ही व्याकरणाची अडचण जर सहज निघाली, तर लिहून म्हणजे लिहिणें असा अप्रयोजक अर्थ करून कसा तरी निर्वाह करण्यास कोणी कबूल होणार नाहीं, हें उघड आहे. येथील व्याकरणाची अडचण कशी दूर होते हें वरील समापनकर्मणि प्रयोगाचे निरूपणावरून वाचकांचे लक्षांत आलें असेलच. आतां या ठिकाणीं समापनकर्मणि प्रयोग मानणेंच एकंदर व्याकरणव्यवस्थेस कसें जुळतें तें दाखवितों.

ज्याप्रमाणें संस्कृतांत सकर्मक धातूंस कर्मणि रूप येतांना होणाऱ्या विकारांनीं अकर्मक धातूंपासून भावे क्रियापदें तयार होतात ( उदा०—क्रियते हें कर्मणि व गम्यते हें भावे ) आणि ज्याप्रमाणें मराठींत शक्य कर्मणि रूपाचे विकार अकर्मक धातूंस होऊन शक्य भावी क्रियापदें बनतात ( उदा०—करवतें हें शक्य कर्मणि व जाववतें, बसवतें, इ० हीं शक्य भावी ) त्याचप्रमाणें समापनकर्मणि प्रयोगाच्या अनुरूप अकर्मक धातूंपासून समापनभावी प्रयोग होतो, म्हणजे सकर्मक धातूंच्या ऊन कृदन्तापुढें हो या सहायधातूचा सर्व आख्यातीं उपयोग होऊन जशीं समापनकर्मणि क्रियापदें तयार होतात, त्याचप्रमाणें अकर्मक धातूंच्या ऊन कृदन्तापुढें हो या सहायधातूचा उपयोग होऊन समापनभावे क्रियापदें साधतात. समापनकर्मणि क्रियापद असतां मुख्य धातूचा कर्ता षष्ठी विभक्तींत कर्माचे पूर्वी येतो व तो षष्ठ्यन्त कर्ता कर्मभिन्न असतो हें वर सांगितलेंच आहे. समापनभावे प्रयोगांत कर्म नसल्यामुळें षष्ठ्यन्त कर्ता नेहमीं नपुंसक लिंगान्त म्हणजे नपुंसकलिंगप्रत्ययान्त असतो; अर्थात् समापनभावे प्रयोगांत मुख्य अकर्मक धातूच्या कर्त्यास षष्ठीचा चें प्रत्यय लागतो. या षष्ठ्यन्त कर्त्याचा संबंध केवळ क्रियेच्या भावाकडे असल्यामुळें ज्याप्रमाणें भावे प्रयोगांतील क्रियापद तृतीयपुरुषीं एकवचनीं व शक्य तेथें ( कारण कीं, कांहीं आख्यातांत लिंगाप्रमाणें क्रियापद बदलत नाहीं. ) नपुंसकलिंगी असतें ज्याप्रमाणें ह्या समापनभावे प्रयोगांतील कर्त्यास लागणारा षष्ठीचा प्रत्यय नेहमीं

एकवचनी व नपुंसकलिंगी म्हणजे चें हाच असतो; चा ह्या प्रत्ययाचें इतर कोणतेंही रूप समापनभावेमध्यें कर्तृस्थानीं दिसत नाहीं. उदाहरणें:—

| समापनकर्मणि. | समापनभावे. |
|---|---|
| त्याचें पत्र लिहून झालें. | त्याचें निजून होत आहे. |
| त्याचा ग्रंथ लिहून झाला. | तिचें निजून झालें. |
| त्याची पोथी लिहून झाली. | त्यांचें निजून झालें. |
| इ० | इ० |

या उदाहरणांवरून असेंही दिसून येईल कीं, लिहून ह्याचा लिहिणें असा अर्थ करून, लिहून ह्यास क्रियावाचक नाम समजणें व त्यांस पुढील हो धातूचा कर्ता करणें हा पक्ष गौण किंवा अप्रशस्त आहे, इतकेंच नव्हे तर व्याकरणदृष्ट्या साफ चुकीचा आहे; आणि येथें सांगितलेला कर्मणि प्रयोगच बराबर आहे. कारण कीं, हो धातूचें रूप पत्र, ग्रंथ, पोथी, ह्या शब्दांचे लिंगवचनाप्रमाणें बदलून झालें, झाला, झाली, अशीं रूपें येत आहेत. ह्यांचा लिहून या अव्ययी कर्त्याशीं कसा संबंध जोडावयाचा? तेव्हां प्रस्तुत स्थळीं लिहून झालें, वगैरे संयुक्तक्रियापदें असून कर्मणि प्रयोग आहे असें म्हणणें भाग आहे. मग त्यास समापनकर्मणि म्हणावें किंवा दुसरें कांहीं अधिक योग्य नांव द्यावें. नांवाचा प्रश्न गौण आहे. हा एका तऱ्हेचा कर्मणि प्रयोग आहे इतकेंच विद्वान् लोकांनीं मान्य केलें म्हणजे झालें. मग समापनकर्मणि हें नांव त्यांस रुचो वा न रुचो! त्याबद्दल माझें कांहींच म्हणणें नाहीं.

५६३. **शक्य कर्मणि**—ह्या प्रयोगांतील क्रियापद कसें सिद्ध होतें हें पूर्वींच सांगितलें आहे. ह्या प्रयोगामध्यें कर्तृवाचक शब्द सविकरण तृतीयान्त किंवा चतुर्थ्यन्त असतो; आणि कर्म, कर्मणि प्रयोगाचे नियमाप्रमाणें प्रथमान्त असतें. जसें:—माझ्यानें अथवा मला हें काम करवतें, त्याच्यानें अथवा त्याला इतकी रकम देववणार नाहीं, इ०.

टीप—करवतें, देववणार नाहीं, ह्या क्रियापदांमध्यें करव व देवव असा शक्तिबोधक साधित धातु प्रयोजक धातूप्रमाणें मानितां येत नाहीं; आणि करवतें, इ० शक्तिबोधक क्रियापदें मूळ संस्कृत कर्मणि क्रियापदांपासूनच निघालीं आहेत, इत्यादि मुद्यांचें समर्थन विस्तारपूर्वक झालें आहे. त्याचप्रमाणें हीं शक्य कर्मणि क्रियापदें सर्व आख्यातांत येतात हेंहीं सोदाहरण दाखविलेंच आहे.

[यावरून असें दिसून येईल कीं, सर्व प्रकारच्या कर्मणि प्रयोगांत कर्म नेहमीं प्रथमान्त असून क्रियापद कर्मानिष्ठ किंवा कर्मगामी असतें; हेंच कर्मणि प्रयोगाचें वास्तविक लक्षण होय. कर्ता तृतीयान्त किंवा चतुर्थ्यन्त किंवा षष्ठ्यन्त असतो. पुराण कर्मणि, नवीन कर्मणि, समापनकर्मणि, व शक्य कर्मणि हे

गौणकर्तृक कर्माणि प्रयोगाचे भेद ओळखण्यासही अतिचें सुलभ असून प्रधान-कर्तृक कर्माणि हाही ओळखण्यास तितकाच सुलभ आहे, इतकेंच नव्हे तर प्रत्येक भेदाच्या अलग अलग स्वतंत्र खुणा असून त्यांच्या योगानें हे भेद लहान मुलां-सही ओळखतां येण्यासारखे आहेत, इत्यादि गोष्टी वर स्पष्ट केल्याच आहेत. तेव्हां आतां पुढें चलावें. ]

५६४. प्रचलित गद्य भाषेंत कर्माणि प्रयोगांतील क्रियापद बहुधा तृतीय पुरुषीं असतें. म्हणजे प्रथम व द्वितीय पुरुषांचीं सर्वनामें कर्माचे जागीं फारशीं येत नाहींत; ह्यामुळें क्रियापद प्रथम व द्वितीय पुरुषीं अस-लेलें फारसें अढळत नाहीं. म्हणून या पुरुषांचीं कर्मणि रूपें बहुधा निरू-पयोगी होत. परंतु कवितेंत कर्माणि प्रयोगांतही प्रथम व द्वितीय पुरुषीं कर्म येऊन तदनरूप क्रियापद असलेलें क्वचित् सांपडतें. अर्थात् प्रथम व द्वितीय पुरुषांचीं सर्वनामें कर्माणि प्रयोगांत प्रथमान्त कर्माचे जागीं आलेलीं कधीं कधीं दृष्टीस पडतात. उदाहरणें:--

प्रेमें रक्षितिल सदा म्हणूनि **दिलें मी** जयांसि मत्तातें।
ते गंधर्व उपेक्षिति मज कां कां मारिती न मत्तातें ॥--मोरोपंत

इंद्रियांचीं दीनें ॥ **आम्ही केलों** नारायणें ॥--तुकाराम.

जाऊनि तो सूत म्हणे कृष्णे द्यूतांत **तूं** स्वयें धर्में।
**हारविलीस** सूयोधन सदनाप्रति ये करावया कर्में ॥--मोरोपंत.

त्यांतें प्रद्युम्न म्हणे मायेसि **तुम्ही दिलां** उपायनसे ॥--मोरोपंत.

## भावी प्रयोग.

५६५. ज्या वाक्यांतील क्रियापद कर्तृगामी नसतें व कर्मगामीही नसतें म्हणजे तें कर्ता किंवा कर्म ह्यांपैकीं कोणाच्याच पुरुषलिंगवचनाप्रमाणें बदलत नाहीं तर नेहमीं तृतीयपुरुषीं नपुसकलिंगीं एकवचनीं असतें, त्या वाक्यांत **भावी प्रयोग** आहे असें म्हणतात.

५६६. भावी प्रयोगाचे मुख्य तीन भेद आहेत: प्रधानकर्तृक भावी, गौणकर्तृक भावी आणि अकर्तृक भावी

[ प्रधानकर्तृक कर्माणि असा कर्माणि प्रयोगाचा मराठींत एक विशेष भेद मानणें अवश्य आहे असें पूर्वी दाखविलेंच आहे. त्याचप्रमाणें प्रधानकर्तृक भावी असा एक भावी प्रयोगाचाही भेद मानणें मराठींत अवश्य आहे. 'तो काम करितो' ह्या कर्तरी प्रयोगास अनुरूप लाख्यातीं व वाख्यातीं मराठींत बऱ्याच सकर्मक धातूंचे कर्तरि प्रयोग होत नाहींत, तर केवळ कर्माणि प्रयोगच होतात.

तथापि हे लाख्यातीं व वाख्यातीं होणारे कर्मणि प्रयोग इतर भाषांतील कर्मणि प्रयोगांप्रमाणें गौणकर्तृक नसून प्रधानकर्तृक आहेत आणि ह्यांचीं गौणकर्तृक कर्मणिप्रयोगांचीं रूपें निराळींच आहेत; हें पूर्वीं विस्तृतपणें दाखविलेंच आहे. मराठी भाषेच्या याच प्रकृतिविशेषास अनुसरून मराठींत प्रधानकर्तृक भावी हा एक भावी प्रयोगाचा भेद विशेष मानणें भाग आहे. नाहीं तर वास्तविक म्हटलें असतां, ज्याप्रमाणें कर्मणि प्रयोग हा नेहमीं गौणकर्तृक असावयाचा त्याच-प्रमाणें भावे प्रयोग सुद्धां सदोदित गौणकर्तृकच असावयाचा. तथापि ज्या कार-णानें मराठींत प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोग उत्पन्न झाला, त्याचकारणानें प्रधान-कर्तृक भावे प्रयोगही अस्तित्वांत आला आहे. कर्तरि प्रयोगांतील कर्म कधीं कधीं प्रथमान्त असतें आणि कधीं कधीं चतुर्थ्यन्त असतें हें वाचकांस स्मरेलच. प्रथमान्त कर्म असणाऱ्या कर्तरि प्रयोगाच्या प्रथमताख्यातांतील ( वर्तमान-काळांतील ) क्रियापदाचे जागीं वाख्यातांतील ( विध्यर्थाचें ) किंवा लाख्या-तांतील ( भूतकाळाचें ) क्रियापद घातल्यानें जसा प्रधानकर्तृक कर्मणिप्रयोग उत्पन्न होतो, त्याचप्रमाणें चतुर्थ्यन्त कर्म असणाऱ्या कर्तरि प्रयोगाचे प्रथमता-ख्यातांतील क्रियापदाचे जागीं वाख्यातांतील किंवा लाख्यातांतील क्रियापद घातल्यानें प्रधानकर्तृक भावे प्रयोग उत्पन्न होतो. जसेंः—

| कर्तरि. | प्रधानकर्तृक कर्मणि | प्रधानकर्तृक भावी. |
|---|---|---|
| तो काम करितो | त्यानें काम केलें<br>त्यानें काम करावें | |
| तो भावाला बोलावितो | | त्यानें भावाला बोलाविलें<br>त्यानें भावाला बोलवावें |

यावरून तेव्हांच असें स्पष्ट दिसेल कीं, तो काम करितो, आणि तो भावाला बोलावितो, ह्या कर्तरि प्रयोगाच्याच तोलाचे त्यानें काम केलें, आणि त्यानें भावास बोलाविलें हें, व वाख्याताचे कर्मणि आणि भावे प्रयोग होत. अर्थात् तो काम करितो, या वाक्यांतील कर्त्यास अर्थदृष्ट्या जितकें प्राधान्य आहे तितकेंच तदनुरूप कर्मणि व भावे प्रयोगांतील कर्त्यासही आहे. परंतु अर्थदृष्ट्या असणारें हें कर्त्याचें समान प्राधान्य व्याकरणदृष्ट्या, मराठी भाषेच्या प्रकृतिविशेषामुळें शब्दांच्या स्वरूपांतही स्पष्ट दिसूं नये हें कदाचित् तुम्हांआम्हांस गैर सोईचें असेल; पण त्यास इलाज नाहीं. तेव्हां अशा अडचणींतून होईल तितका व्यव-स्थित मार्ग काढणें हेंच वैयाकरणांचें कर्तव्य होय. म्हणून भाषादृष्ट्या जरी ‘ त्यानें काम केलें ’ व ‘ त्यानें भावास बोलाविलें ’ हे प्रयोग कर्मणि व भावे ठरले म्हणजे त्यांतील कर्त्यास गौणत्व आलें आहे असें दिसलें, तरी त्याचे ठायीं अर्थदृष्ट्या वास्तविक प्राधान्य आहे, ही गोष्ट वाक्यपृथक्करणाचे दृष्टीनें अत्यंत

महत्वाची असल्यामुळें वैयाकरणानें ती वेळींच नमूद करून ठेविली पाहिजे हें उघड आहे. म्हणूनच कर्मणि व भावे या दोन्ही प्रयोगांत प्रधानकर्तृक कर्मणि व प्रधानकर्तृक भावे असे भेदविशेष मराठीच्या प्रकृतिविशेषास अनुसरून मानणें प्राप्त झालें आहे हें निर्विवाद आहे.

त्यानें काम केलें व त्यानें भावास बोलाविलें, या वाक्यांतील कर्त्याच्या प्राधान्याचे समर्थनासाठीं आणखी एक गोष्ट सांगतों. कांहीं सकर्मक धातूंचा लाख्यातीं कर्तरि प्रयोग होतो हें वाचक विसरले नसतीलच. उदाहरणार्थ, रामा ही गोष्ट विसरला. आतां ह्याचा गौणकर्तृक कर्मणि प्रयोगांपैकीं नवीन कर्मणि प्रयोग करूं; तो असाः—रामाकडून ही गोष्ट विसरली गेली, किंवा विसरण्यांत आली. आतां प्रश्न इतकाच आहे कीं, 'रामानें हें काम केलें,' हें वाक्य अर्थदृष्ट्या 'रामा ही गोष्ट विसरला' ह्या वाक्याशीं अधिक अनुरूप आहे कीं, 'रामाकडून ही गोष्ट विसरली गेली, किंवा विसरण्यांत आली' या वाक्यांशीं अधिक अनुरूप आहे? कोणीही विचारपूर्वक असेंच उत्तर देईल कीं, 'रामानें हें काम केलें, हें वाक्य अर्थदृष्ट्या 'रामा ही गोष्ट विसरला' याच वाक्याशीं अधिक अनुरूप आहे. असें जर आहे तर रामा हा कर्ता दुसऱ्या वाक्यांत जितका प्रधान आहे तितकाच 'रामानें' हा कर्ता पहिल्या वाक्यांत प्रधान आहे हें उघड आहे. आतां कोणी जर असें म्हटलें कीं, 'रामानें हें काम केलें' हें वाक्य अर्थदृष्ट्या 'रामाकडून ही गोष्ट विसरली गेली' या वाक्याशींच अधिक अनुरूप आहे, तर त्यास इतकेंच उत्तर आहे कीं, हें म्हणणें वितंडवादाचें असून भ्रममूलकही आहे. कारण कीं, 'रामानें हें काम केलें' आणि 'रामाकडून ही गोष्ट विसरली गेली' ह्या वाक्यांत जें सादृश्य किंवा आनुरूप्य आहे, त्यापेक्षां 'रामाकडून हें काम केलें गेलें' आणि 'रामाकडून ही गोष्ट विसरली गेली' ह्या दोन वाक्यांत अधिक सादृश्य किंवा आनुरूप्य आहे हें निर्विवाद आहे. एवंच, 'रामाकडून हें काम केलें गेलें' हा प्रयोग गौणकर्तृक आहे हें जसें स्पष्ट दिसतें, तसेंच 'रामानें हें काम केलें' आणि 'रामा ही गोष्ट विसरला' ह्या प्रयोगांच्या अर्थसादृश्यावरून व अर्थानुरूप्यावरून 'रामानें हें काम केलें' हा प्रयोग प्रधानकर्तृक आहे, असें स्पष्ट दिसत नाहीं काय? अशाच प्रकारें 'त्यानें भावाला बोलाविलें' या भावी प्रयोगांतील कर्त्याचेंही प्रधानत्व वाचकांचे नजरेस आल्यावांचून राहणार नाहीं.

धातु अकर्मक असतां कर्मणि प्रयोग होणें मुळीं अशक्यच आहे. तेव्हां अकर्मक धातूंचा लाख्यातीं आणि वाख्यातीं कर्तरि प्रयोगच होतो. जसें:--तो गेला; तो जावा, इ० तथापि लाख्यातांत जरी नाहीं तरी वाख्यातांत अकर्मक धातूंपासून भावेप्रयोगही होतो (अंक ५५२ इ०), जसें:—त्यानें जावें, त्यानें बसावें, त्यानें यावें, इ०. या वाख्याताच्या भावे प्रयोगांतील कर्ता

सुद्धां प्रधान असल्यामुळें यासही प्रधानकर्तृक भावे हेंच नांव योग्य आहे. असे अकर्मक धातूंचे आणि कधीं कधीं सकर्मक धातूंचेही प्रधानकर्तृक भावे प्रयोग अन्य आख्यतांतही झालेले पुष्कळ आढळसात. जसें:—त्यानें किंवा त्याला गेलें पाहिजे, त्याला बसावें लागतें, त्याला बसतां येतें, आम्हांस या गाईला रोज सोडावें लागतें, त्याला बैलाना चांगलें हांकतां येतें, इ० अशा प्रकारचीं अनेक उदाहरणें संयुक्त क्रियापदांचे निरूपणांत आलीं आहेत तीं पहावीं.

अकर्मक धातूंचे वाख्यातांतील हे वैकल्पिक कर्तरि व भावे प्रयोग अर्थदृष्ट्या भिन्न आहेत. तो जावा, तो यावा, या कर्तरि प्रयोगांमध्यें वाख्याताचा 'विधि' हा साधारण अर्थ नसतां केवळ संभवाचा अर्थ आहे आणि त्यानें जावें, त्यानें यावें, या भावे प्रयोगांमध्यें विधि, कर्तव्य, संमति, इत्यादि अर्थ आहेत; हें पूर्वी (अंक ५५२ अखेरची टीप) सांगितलेंच आहे. ह्या दोन्ही प्रयोगांतील क्रियापद जरी एकाच आख्यातीं असलें, तरी त्यास दोन्हीं ठिकाणीं विध्यर्थ असें म्हणणें ठीक नाहीं हें उघड आहे. असो. ]

**५६७ प्रधानकर्तृक भावी प्रयोगः**—या प्रयोगांतील कर्तृवाचक शब्द प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोगांतल्याप्रमाणें मूल तृतीयांत किंवा पर्यायहीन चतुर्थ्यन्त असतो, म्हणजे सविकरण तृतीयान्त किंवा सविकरण तृतीया ज्या चतुर्थीचे जागीं विकल्पानें चालते, तशा प्रकारचा चतुर्थ्यन्त कर्ता असतां कामा नये. आणि तिन्ही लिंगीं समान असणाऱ्या आख्यातांत क्रियापद नेहमीं तृतीय पुरुषीं एकवचनीं असतें, आणि लिंगानुसार बदलणाऱ्या आख्यतांत तें नेहमीं तृतीय पुरुषीं एकवचनीं नपुंसकलिंगीं असतें. धातु सकर्मक असल्यास कर्म बहुधा चतुर्थ्यन्त असतें; पण कधीं कधीं प्रथान्तही आढळतें. जसें:—रामानें रावणास मारिलें, त्यानें वाघास धरिलें, त्यानें गाईस धरावें, त्यानें जावें, त्यानें गेलें पाहिजे, मला जातां येतें, त्यानें जाऊं नये, त्याला चोरास सोडावें लागतें किंवा लागलें किंवा लागेल, त्यानें हा धंदा शिकलें पाहिजे किंवा शिकत असावें, इ०

यावरून प्रधानकर्तृक भावी प्रयोग हा सकर्मक व अकर्मक या दोन्ही प्रकारच्या धातूंवरून होतो हें उघड आहे. अर्थात् प्रधानकर्तृक भावी प्रयोगाचे सकर्मक व अकर्मक असे दोन्ही प्रकार आढळतात.

**टीप**—ज्या सकर्मक कर्तरि प्रयोगामध्यें प्रथमताख्यातीं कर्म बहुधा चतुर्थ्यन्त असतें, म्हणजे कर्मस्थानीं मनुष्यवाचक किंवा उच्च प्राणिवाचक शब्द असतो, त्या सकर्मक कर्तरि प्रयोगापासून लाख्यातीं व वाख्यातीं सकर्मक भावी प्रयोग होतो; आणि ज्यामधील कर्म प्रथमान्त असतें त्यापासून कर्मणि प्रयोग होतो.

असें:—तो रामाला पाठवितो ( कर्तरि )—त्यानें रामाला पाठविलें ( भावी ), धर्म कृष्णास बोलावितो ( कर्तरि )—धर्मानें कृष्णास बोलाविलें किंवा बोलवावें ( भावी ), इ०; परंतु तो पत्र लिहीतो ( कर्तरि )—त्यानें पत्र लिहिलें किंवा लिहावें ( कर्मणि ), तो म्हैस विकतो ( कर्तरि )—त्यानें म्हैस विकली किंवा विकावी ( कर्मणि ), इ०. हा साधारण नियम झाला. पण कवितेंत ज्याप्रमाणें कर्तरि प्रयोगांत अप्राणिवाचक शब्दांचीही कर्मस्थानीं चतुर्थी आढळते, त्याप्रमाणें अप्राणिवाचक शब्द कवितेंत कर्मस्थानीं चतुर्थी विभक्तींत येऊन कर्मणि प्रयोगाचे जागीं भावी प्रयोग झालेला आढळतो. जसें:—

सत्याते जोडावें सुज्ञे धर्मासि पळ न सोडावें ।
पाशातें तोडावें धीरें न कदापि पाप जोडावें ॥—मोरोपंत.

या ठिकाणीं प्रचलित गद्यांत सुज्ञें सत्य जोडावें, धर्म न सोडावा, धीरें पाश तोडावा, इत्यादि कर्मणि प्रयोगांचाच प्रचार आहे.

५६८. **गौणकर्तृक भावी प्रयोगः**—हाच वास्तविक खरा भावी प्रयोग होय. म्हणजे कर्मणि व भावे हे दोन्ही प्रयोग वस्तुतः गौणकर्तृक असल्यामुळें, ज्याप्रमाणें गौणकर्तृक कर्मणि प्रयोग हाच वास्तवीक कर्मणि प्रयोग ह्या नांवास सर्वथा योग्य होय, त्याप्रमाणेंच गौणकर्तृक भावी प्रयोग हाच स्वरूप व अर्थ या दोन्ही दृष्टींनीं खरा भावी प्रयोग होय. गौणकर्तृक भावी प्रयोगाचे भेद बहुतेक गौणकर्तृक कर्मणि प्रयोगाचेच भेदास अनुरूप असे आहेत. पुराण कर्मणि, नवीन कर्मणि, समापनकर्मणि, आणि शक्य कर्मणि, ह्या चार प्रकारच्या गौणकर्तृक कर्मणि प्रयोगांस अनुसरून पुराण भावी, नवीन भावी, समापन भावी व शक्य भावी असे गौणकर्तृक भावी प्रयोगाचे चार प्रकार असावे. परंतु नवीन कर्मणि प्रयोगास अनुसरून नवीन भावी प्रयोग आढळत नाहीं. यामुळें गौणकर्तृक भावी प्रयोगाचे तीनच प्रकार आहेत. पुराण भावी, समापनभावी, आणि शक्य भावी. उदाहरणें:—स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजे ॥ पापात्मकें पापें नरका जाइजे ॥—ज्ञानेश्वर, त्याचें निजून झालें, त्याला अथवा त्याच्यानें जाववतें. इ०.

**टीप**—गौणकर्तृक भावी प्रयोग हा नेहमीं अकर्मक धातूंपासूनच होतो. कारण कीं सकर्मक धातूंपासून जे गौणकर्तृक प्रयोग होतात ते स्वाभाविकपणें कर्मणि असतात, हें मागल्या पुराण कर्मणि, समापनकर्मणि, व शक्य कर्मणि ह्या प्रयोगांचे निरूपणावरून कळेलच. संस्कृत भाषेंत ज्या विकारांनीं सकर्मक धातूंपासून कर्मणि क्रियापदें उत्पन्न होतात, त्याच विकारांनीं सकर्मक धातूंपासून

भावी क्रियापदें साधतात, हें तज्ज्ञांस स्मरेलच. जसें:—क्रियते, वध्यते, इ० कर्मणि, आणि गम्यते, आस्यते, इ० भावे. या संस्कृत भाषेच्या प्रचारास अनुसरूनच मराठींत सकर्मक धातूंस होणाऱ्या कर्मणि विकारासारखे विकार अकर्मक धातूंस होऊन पुराण भावी, समापनभावी, आणि शक्य भावी क्रियापदें बनतात. एवंच, खरा भावी प्रयोग गौणकर्तृत्व असून अकर्मकच असतो व त्याचे हे तीन प्रकार कसे होतात हें यावरून स्पष्ट होईल.

५६९. **अकर्तृक भावी**—यासच दादोबांनीं भावकर्तृक असें म्हटलें आहे. त्याचें नांव कां प्रशस्त नाहीं, ह्या संबंधाचा सविस्तर ऊहापोह पूर्वी केला आहे; तो वाचकांनीं पुन्हा एक वेळ पहावा. म्हणजे त्यावरून दादोबांचे पेक्षां कृष्णशास्त्री चिपळूणकरांचेंच मत या बाबतींत कसें व कां ग्राह्य होय हें त्यांस नीट समजेल. असो. तात्पर्य इतकेंच कीं, कळमळतें, सांजावलें, फावलें, इत्यादि क्रियापदांस वाक्यामध्यें अध्याहृत किंवा स्पष्ट असा कोणताच कर्ता नाहीं, व हीं अकर्मक आहेत, अर्थात् ह्यांचें रूप कर्ता किंवा कर्म ह्यांपैकीं कोणत्याही एकाचे लिंग-वचन-पुरुषाप्रमाणें फिरत नसून, तें नेहमीं भावी प्रयोगांतील क्रियापदांप्रमाणें तृतीयपुरुषीं, नपुंसकलिंगीं, एकवचनीं असतें. ह्यामुळें हीं भावी क्रियापदेंच होत हें निर्विवाद आहे.

ज्या मनुष्याचे संबंधानें या अकर्तृक भावी क्रियापदांचा उपयोग होतो तद्वाचक शब्द चतुर्थ्यन्त असतो. ह्या चतुर्थीचा अर्थ कधीं कधीं **अपेक्षा** आणि कधीं कधीं **अधिकरण** असा असतो. जसें:—मला उजाडतें सांजावलें, इत्यादि उदाहरणांत मला म्हणजे माझे संबंधानें असा अर्थ असल्यामुळें मला ह्या चतुर्थीचा अर्थ अपेक्षा हा होय. आणि मला कळमळतें, मळमळलें, फावलें, इत्यादि ठिकाणीं मला म्हणजे माझे ठायीं असा अर्थ असल्यामुळें मला ही पुरुषाधिकरण चतुर्थी होय.

## संकीर्ण प्रयोग.

५७०. कर्तरि, कर्मणि, आणि भावी असे तीन प्रयोग आहेत. त्यांपासून फार तर तीन संकर म्हणजे संकीर्ण प्रयोग उत्पन्न व्हावे. कर्तृकर्मसंकर, कर्तृभावसंकर, आणि कर्मभावसंकर. या तीन संभवनीय संकीर्ण प्रयोगांपैकीं कर्तृभावसंकराचें उदाहरण कोठेंच आढळत नाहीं. परंतु **कर्तृकर्मसंकर** आणि **कर्मभावसंकर** ह्या दोन संकीर्ण प्रयोगांचा व्यावहारिक भाषणांत बराच प्रचार आहे.

५७१. **कर्तृकर्मसंकर**—ज्या संकीर्ण प्रयोगामध्यें धातूस कर्तृद्योतक व कर्मद्योतक असे दोन्ही प्रत्यय लागून क्रियापद साधलेलें असतें, म्हणजे जो प्रयोग अंशतः कर्तरि दिसतो आणि अंशतः कर्मणि वाटतो, त्यास **कर्तृकर्मसंकर** असें म्हणतात. जसें:—तूं मला पुस्तक दिलेंस, तुम्ही किती पुस्तकें वाचलींत, इ०. या वाक्यांतील **दिलेंस** आणि **वाचलींत,** हीं क्रियापदें पहा. या क्रियापदांतील अन्त्य **स** आणि **त** हीं अक्षरें तूं आणि तुम्ही ह्या कर्त्यांना उद्देशून क्रियापदांत आलेलीं आहेत; आणि **लें** आणि **लीं** हे आख्याताचे प्रत्यय पुस्तक आणि पुस्तकें या कर्मांस उद्देशून आलले आहेत. यामुळें दिलेंस, आणि वाचलींस, हीं क्रियापदें अंशतः कर्तरि आणि अंशतः कर्मणि आहेत, हें उघड आहे; म्हणून प्रकृत वाक्यांत **कर्तृकर्मसंकर** हा प्रयोग आहे.

या संकरामध्यें कर्ता आणि कर्म हीं दोन्ही प्रथमान्त असतात. ‘ तूं मला पुस्तक दिलेंस’ या वाक्यांतील तूं हीं प्रथमाच आहे; तृतीया नव्हे. तूं या सर्वनामाचीं तूं, त्वां, तुशीं, तुजशीं, हीं तृतायेच्या एकवचनीं रूपें होतात. ह्यांपैकीं शीं-प्रत्ययान्त रूपांचा कर्तृस्थानीं उपयोग होत नाहीं. तेव्हां वरील वाक्यांतील तूं ह्याचे जागीं जर त्वां हें रूप चाललें असतें म्हणजे ‘ त्वां मला पुस्तक दिलेंस ’ असें म्हणण्याचा जर प्रघात असता, तर तूं ही तृतीया होय, असें म्हणतां आलें असतें. परंतु तसा प्रघात नाहीं. म्हणून वरील उदाहरणांतील तूं आणि तुम्ही हीं प्रथमेचींच रूपें होत. हा कर्तृकर्मसंकर फक्त तूं आणि तुम्ही हीं द्वितीय पुरुषवाचक सर्वनामेंच कर्तृस्थानीं असतां संभवतो. या संकरांत कर्ता व कर्म ह्या दोहोंचा अधिकार क्रियापदावर असतो; तेव्हां कर्ता व कर्म हीं दोन्ही प्रथमान्त असणें स्वाभाविक आहे. कदाचित् ‘त्वां मला पुस्तक दिलेंस ’ अशा प्रकारचें तृतीयान्त कर्ता आलेलें उदाहरण क्वचित् सांपडेल, नाहीं असें नाहीं. तथापि तें हिणकसच होय. आधींच प्रस्तुत प्रयोग संकीर्ण होय, तेव्हां ह्या कर्तृकर्मसंकरामध्यें तृतीयान्त कर्ता असलेला संकर प्रशस्त नव्हे आणि त्याप्रमाणें तो फारच क्वचित् आढळावा हेंही योग्यच आहे.

कर्ता प्रथम पुरुषीं असतां हा संकर कधींच आढळत नाहीं. कर्ता तृतीय पुरुषीं असतां असा संकर कधीं कधीं आढळतो. जसें.—

त्यानें काम केलेंन, त्यांनीं काम केलेंनी, त्यानें कामें केलींन, त्यांनीं कामें केलींनीं, इ०. परंतु हा संकर केवळ प्रांतिक व एकदेशी असल्यामुळें त्यास महत्व नाहीं. ह्याचा लेखी भाषेंत मुदलींच प्रचार नाहीं असें म्हटलें तरी चालेल; यावरूनही त्याचा कर्मीपणा व्यक्त होतो. द्वितीय पुरुषीं कर्ता असतां आढळणारा कर्तृकर्मसंकर मात्र सार्वत्रिक आढळतो. कवितेंतही या संकराचीं उदाहरणें सांपडतात. जसें:—

विप्रें कथिलें मज कीं, वत्से **लिहिलेस** उत्तम श्लोक ॥ — मोरोपंत.

दैन्यवेष कासयासि **घेतलासि** सांगिजे ॥ — कचेश्वर.

५७२. **कर्मभावसंकर**—ज्या प्रयोगांतील कर्त्याचे व कर्माचे विभक्तीवरून क्रियापद भावी असणें म्हणजे तृ० पु० ए० व० नपुंसकलिंगी असणें व्याकरणदृष्ट्या स्वाभाविक दिसतें त्या ठिकाणीं जेव्हां तें कर्मणि असतें म्हणजे कर्मनिघ्न असतें, तेव्हां त्या प्रयोगास **कर्मभावसंकर** असें म्हणतात. जसें:—आईनें मुलीला निजविली, त्यानें मुलाला शाळेंत घातला, गोविंदरावांनीं तिला आतां माहेरीं पाठविली पाहिजे, इ०. या वाक्यांत आईनें, त्यानें, गोविंदरावांनीं हे कर्ते तृतीयान्त असून मुलीला, मुलाला, तिला, हीं कर्में चतुर्थ्यन्त आहेत. कर्तरि प्रयोगांत कर्ता नेहमीं प्रथमान्त असतो; आणि कर्मणि प्रयोगांत कर्म नेहमीं प्रथमान्त असतें; आणि ज्या वाक्यांत कर्ता आणि कर्म ह्यांपैकीं कोणताच शब्द प्रथमान्त नसतो, त्या वाक्यांत भावी प्रयोग होतो; असा साधारण नियम आहे. वरील उदाहरणांतील कर्ते तृतीयान्त व कर्में चतुर्थ्यन्त आहेत; यामुळें क्रियापदें भावे म्हणजे तृ० पु० ए० व० नपुंसकलिंगीं असावीं, हें व्याकरणदृष्ट्या प्रशस्त दिसतें. म्हणजे वरील वाक्यांचे जागीं आईनें मुलीला निजविलें, त्यानें मुलाला शाळेंत पाठविलें, गोविंदरावांनीं तिला आतां माहेरीं पाठविलें पाहिजे, असे सरळ भावी प्रयोग व्हावे. परंतु शिष्ट भाषणांतील रूढि व्याकरण नियमास प्रतिकूल असल्यामुळें प्रकृत कर्मभावसंकर वैयाकरणांस मानणें अवश्य आहे.

अशा प्रकारच्या वाक्यांत वाक्यौघास अनुसरून भावे प्रयोग व्हावा. परंतु त्यांमधील कर्मणि क्रियापद तसेंच कायम ठेवून चतुर्थ्यन्त कर्म प्रथमान्त केलें असतां नियमितपणें सरळ कर्मणि प्रयोगही होऊं शकतो. जसें:—आईनें मुलगी निजविली, त्यानें मुलगा शाळेंत पाठविला, इ०.

परंतु असें प्रथमान्त कर्म करून होणारा कर्मणि प्रयोग फारसा रूढ नाहीं, हें उघड आहे. ह्यामुळें अशा स्थळीं भावे प्रयोगच सर्वांत अधिक प्रशस्त होय ह्यांत संशय नाहीं.

या संकरामध्येंही क्रियापदाचे अन्तीं तृ० पुरुषीं कधीं कधीं नकार व नीकार आलेले आढळतात. जसें:—आज त्याच्या आईनें त्याला खूप मारलान त्यानें आपल्या मुलीला कालच सासरीं पाठविलीन, त्यानें मोलकरणींना घालवून दिल्यान, रामरावांनीं त्याला साफ घालवून लावलानी, इ०. परंतु पूर्वीं सांगितल्याप्रमाणें असे प्रयोग फक्त कोंकणस्थांमध्यें कधीं कधीं भाषणांतच ऐकूं येत असल्यामुळें आणि त्यांचा ग्रंथान्तरीं कोठेंच उपयोग होत नसल्यामुळें वैयाकरणांनीं त्यांजकडे लक्ष पुरविण्याचें कारण दिसत नाहीं.

वर सांगितलेला संकर हा **प्रधानकर्तृक कर्मभावसंकर** होय. ह्याशिवाय आणखी एका नमुन्याचा कर्मभावसंकर मराठींत आढळतो. तो **गौणकर्तृक कर्मभावसंकर** होय. तो असा:—वाक्यांतील क्रियापदावरून ज्या ठिकाणीं नवीन कर्मणि प्रयोग व्हावा असें दिसतें म्हणजे कर्म प्रथमान्त असावें असें वाटतें, त्या ठिकाणीं तें चतुर्थ्यन्त असतां हा संकर होतो. जसें:—त्याला कधीं पकडण्यांत येईल, किंवा त्याला कधीं पकडलें जाईल याचा नेम नाहीं. तुम्हांला या कामांत जबाबदार धरिलें जाईल, इ०. या वाक्यांतील पकडण्यांत येईल, पकडलें जाईल, धरिलें जाईल. हीं क्रियापदें पूर्वीं सांगितल्याप्रमाणें नवीन कर्मणि प्रयोगाचे नमुन्याचीं आहेत यांत संशय नाहीं. त्याप्रमाणें ह्या वाक्यांतील कर्में प्रथमान्त येऊन तो कधीं पकडण्यांत येईल, किंवा तो कधीं पकडला जाईल, अशा प्रकारची नवीन कर्मणि प्रयोगास साजेल अशी वाक्यरचना असावयास पाहिजे. परंतु तिचे जागीं भावे प्रयोगांतल्याप्रमाणें चतुर्थ्यन्त कर्में येऊन गौणकर्तृक कर्मभावसंकर झाला आहे, हा अनुकरणीय नाहीं. ह्याचाही प्रचार बहुधा कमीच आढळतो.

[ या दोन्ही संकरांस दादोबा, गोडबोले, इत्यादि पहिले मराठी वैयाकरण अशुद्ध म्हणतात; आणि असे प्रयोग कधींही योजूं नयेत असा निषेधनियम घालितात. परंतु जोशीबोवादि अलीकडील वैयाकरणांचा अभिप्राय योग्य दिशेनें बदललेला दिसतो. 'त्यांना अशुद्ध असें जरी न म्हटलें तरी चमत्कारिक असें म्हणावें तरी यावेंच लागेल' (प्रौढबोध क० ४८३ टीप.) दादोबादि आरंभींच्या

वैयाकरणांनीं संकीर्ण प्रयोग शिष्टजनांचे भाषणांत येत असतांही त्यांस अशुद्ध म्हटल्यामुळें त्या वैयाकरणांवर लोकमत बरेंच क्षुब्ध होऊन गेलें. यामुळें अलीकडील वैयाकरणांनीं ह्या संकीर्ण प्रयोगांकडील आपला मोर्चा बदलिला, हें योग्यच झालें. तथापि 'हे प्रयोग मराठी भाषेची मूलभूत जी संस्कृत भाषा तींतील वाक्यरचनेच्या पद्धतीस अनुसरून नसल्यामुळें + + + ... मराठी व्याकरणकर्त्यांनीं त्यांचा संग्रह केला नाहीं असें दिसतें.' ( चिपळूणकरांचे निबंध, पृष्ठ २४४ ) या अवतरणावरून, हे प्रयोग 'संस्कृत वाक्यरचनेच्या पद्धतीस अनुसरून' नाहींत असें शास्त्रीबोवांचें मत दिसतें. आणि हेंच मत सर्वत्र ग्राह्यझाल्यासारखेंही वाटतें. तेव्हां त्यांत कितपत तथ्य आहे तें पाहूं.

**कर्तृकर्मसंकर**–उदा०—तूं मला लेखणी दिलीस. हा संकीर्ण प्रयोग आमच्या मतें संस्कृत भाषेंतील वाक्यरचनेच्या पद्धतीस अनुसरूनच आहे. 'त्वं मे लेखनीं ददासि' म्हणजे तूं मला लेखणी देतोस हा कर्तरि प्रयोग होय. 'त्वं मे लेखनीमददाः' किंवा 'त्वं मे लेखनीं ददाथ' हा संस्कृतांतील भूतकाळाचा कर्तरि प्रयोग होय. परंतु मराठी भाषेच्या प्रकृतिविशेषास अनुसरून लाख्यातीं ( भूतकाळीं ) मराठींत कर्तरि प्रयोग न होतां, 'त्वां किंवा तूं ( तृतीया ) मला लेखणी दिली' असा कर्मणि प्रयोग होतो; आणि तो वास्तविक 'त्वं मे लेखनीमददाः' या कर्तरि प्रयोगाचेच अर्थी येत असल्यामुळें त्यास प्रधानकर्तृक कर्मणि असें म्हणणें बरें, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. ही मराठी भाषेंतील अडचण कां उत्पन्न झाली हें सांगणें कठिण नाहीं. मराठींतील लाख्याताचे [ भूतकाळाचे ] प्रत्यय संस्कृतांतील आख्यात प्रत्ययांपासून निघालेले नाहींत; तर ते त प्रत्ययान्त कर्मणि व्ययी कृदन्तापासून निघालेले आहेत. यामुळेंच मराठींतील लाख्याताचे प्रत्यय लिंगाप्रमाणें बदलतात, आणि लाख्यातीं मराठींत कर्तरि प्रयोगाचे जागीं स्वरूपतः कर्मणि प्रयोग होतो. तेव्हां 'तूं [ तृतीया ] किंवा त्वां मला लेखणी दिली' हें मराठींतील वाक्य अर्थदृष्ट्या जरी 'त्वां मे लेखनीमददाः, किंवा त्वं मे लेखनीं ददाथ' या संस्कृत कर्तरिवाक्यांच्या तोलाचें आहे, तरी स्वरूपतः तें त्वया मे लेखनी दत्ता, या कर्मणि वाक्यास अनुरूप आहे, त्वया मे लेखनी दत्ता=त्वां मला लेखणी दिली, हें भाषादृष्ट्या अगदीं तंतोतंत आहे. त्वया=त्वां, मे=मला, लेखनी=लेखणी, दत्ता=दिली. या ठिकाणीं दत्ता हें संस्कृत व्ययी कृदन्त कर्मणि आहे; आणि त्यापासूनच दिली. हें मराठींतील व्ययी लाख्याताचें रूप निघालें आहे. आतां 'त्वया मे लेखनी दत्ता, यांतील दत्त या कर्मणि कृदन्तास वत् प्रत्यय लागून पुन्हा कर्तरि स्वरूप प्राप्त होतें. म्हणजे दत्तवान् हें दत्त या मूढ कर्मणि कृदन्ताचें कर्तरि रूप होय. ह्याचा जर वरील वाक्यांत उपयोग केला तर तें पुन्हा 'त्वं मे लेखनीं दत्तवान्' असें कर्तरि होतें. हें संस्कृत भाषाभिज्ञांस माहीतच आहे. म्हणजे

दत्त ह्या कर्मणि कृदन्तास वत् प्रत्यय लागून कर्तरि स्वरूप आल्यामुळें त्वया ह्या तृतीयान्त कर्त्याचे जागीं पुन्हा त्वं हा प्रथमान्त कर्ता, आणि लेखनी या प्रथमान्त कर्माचे जागीं लेखनीं हें द्वितीयान्त कर्म आलें. याच संस्कृत वाक्यरचना पद्धतीस अनुसरून मराठींतील 'त्वां किंवा तूं ( तृतीया ) मला लेखनी दिली' ह्यांतील 'दिली' या कर्मणि आख्यातास स हा प्रत्यय लागून दिलीस असें कर्तरि रूप प्राप्त झालें; त्यामुळेंच त्वां किंवा तूं या तृतीयान्त कर्त्याचे जागीं तूं हा प्रथमान्त कर्ता येऊन 'तूं ( या ठिकाणीं तृतीया जरी क्वचित् आढळली तरी ती कां प्रशस्त नव्हे, हेंही यानरून कळेलच ) मला लेखणी दिलीस' असा मराठींत प्रयोग होऊं लागला. मराठींत द्वितीया व प्रथमा ह्यांचें स्वरूप बहुधा एकच असल्यामुळें लेखणी शब्दाचे स्वरूपांत कांहीं एक बदल न होतां तो जशाचा तसाच राहिला. यावरून 'तूं मला लेखणी दिलीस' हा मराठींतील संकीर्ण प्रयोग 'त्वं मे लेखनीं दत्तवान्' या संस्कृत वाक्यरचनेच्या पद्धतीस अनुसरून आहे असें निर्विवाद सिद्ध होत नाहीं काय ? आतां 'त्वं मे लेखनीं दत्तवान्' या प्रयोगास जर संस्कृत व्याकरणांत अशुद्ध किंवा चमत्कारिक ह्यांपैकीं कांहींच नांव ठेवीत नाहींत तर मराठींतील 'तूं मला लेखणी दिलीस' या प्रयोगास तरी दादोबांप्रमाणें अशुद्ध किंवा जोशीबोवांप्रमाणें चमत्कारिक तरी कां म्हणावें हें आम्हांस समजत नाहीं. हा प्रयोग संस्कृत वाक्यरचनेच्या पद्धतीस अनुसरून नाहीं असा जो अज्ञानमूलक गैरसमज शास्त्रीबोवांपासून जोशीबोवांपर्यंत सारखा चालत आला आणि जो अद्यापही तसाच आहे, त्यामुळेंच ह्या प्रयोगाची प्रथम अशुद्धांत व नंतर चमत्कारिकांत गणना झाली. परंतु हा 'पतित परावर्तनाचा मार्ग' प्रकृत प्रयोगाचे संबंधानें अस्थानीं होय. या ठिकाणीं अशी भीड भिकेची बहीण कशास पाहिजे. प्रस्तुत प्रयोगास संस्कृताचें व शिष्टसंमतीचें भरपूर पाठबळ असल्यामुळें त्यास प्रथम अशुद्ध ठरवून त्याजवर अज्ञानानें बहिष्कार घालणें आणि रूढीस मान देऊन मोठ्या उदार अंतःकरणानें त्याजवर चमत्कारिक असा छाप मारून कसें तरी करून पंक्तिपावन करून घेणें ह्यांपैकीं कोणत्याच पक्षाची येथें जरूर नाहीं हें उघड आहे. आतां दुसऱ्या संकराकडे वळूं.

**कर्मभावसंकरः**—उदा०–'त्यानें गोविंदाला स्टेशनावर पाठविला' हा संकीर्ण प्रयोग मात्र वरील प्रयोगाप्रमाणें अगदीं सशास्त्र होय असें म्हणवत नाहीं. तथापि येथेंही एक विचार आहे, तो असा. 'तो गोविंदाला पाठवितो' या कर्तरि प्रयोगांत कर्म मनुष्यवाचक असल्यामुळें चतुर्थ्यन्त आहे, 'तो काम करितो' या कर्तरि प्रयोगापासून 'त्यानें काम केलें' असा लाख्यातीं कर्मणिप्रयोग होतो, ह्यामध्यें काम हें मूळ प्रथमान्त कर्म तसेंच राहून कर्ता तृतीयान्त व क्रियापद लाख्यातीं झालें आहे. तसेंच 'तो गोविंदाला पाठवितो' या वाक्यांतील कर्म अविकृत ठेऊन कर्त्याची तृतीया केली व क्रियापद लाख्यातीं केलें म्हणजे

"त्यानें गोविंदाला पाठविला' हें वाक्य प्राप्त होतें. म्हणजे 'त्यानें काम केलें' हें ज्याप्रमाणें प्रधानकर्तृक कर्मणिवाक्य बनतें, त्याचप्रमाणें 'त्यानें गोविंदाला पाठविला' हेंही प्रधानकर्तृक कर्मणिवाक्य बनतें. परंतु ज्या शब्दाचा अधिकार क्रियापदावर चालतो, म्हणजे जो शब्द धातुरूपश असतो, तो मराठींत बहुधा प्रथमान्त असतो आणि वाक्यांत कर्ता किंवा कर्म ह्यांपैकीं कोणताच शब्द प्रथमान्त नसतां क्रियापद तृ०पु०ए०व० नपुंसकलिंगी म्हणजे भावी असतें; असे साधारण नियम असल्यामुळें 'त्यानें गोविंदाला पाठविलें' हें वाक्य व्याकरणदृष्ट्या विशेष मानास लायक ठरतें; आणि 'त्यानें गोविंदाला पाठविला' हें त्या दृष्टीनें कमी दर्जाचें दिसतें, इतकेंच. बाकी 'त्यानें गोविंदाला पाठविला किंवा पाठवावा' हा प्रयोग स्वाभाविक आहे, हें वरील विवेचनावरून कोणीही कबूल करील. तसेंच तो बराच शिष्टसंमतही आहे, हेंही निर्विवाद आहे. ह्यामुळें ह्याचाही मराठी वैयाकरणानें संग्रह केलाच पाहिजे. येथें साधारण नियमाप्रमाणें भावी प्रयोग व्हावा, पण रूढीप्रमाणें कर्मणि प्रयोग होत आहे. म्हणून ह्यास कर्मभावसंकर असें म्हटलें आहे. यास मात्र संस्कृतरचनेचा आधार नाहीं हें खरें आहे.]

---

# अध्याय ४.

## कर्ता, कर्म, क्रियापद.

### कर्तरिप्रयोग.

५७३. कर्तरि प्रयोगांत कर्ता हा नेहमीं प्रथमान्त असतो व क्रियापद नेहमीं कर्तृनिघ्न म्हणजे कर्त्याचे पुरुष-लिंग-वचनाप्रमाणें बदलणारें असतें. सात आख्यातांपैकीं पहिलीं चार—दोन ताख्यातें, लाख्यात, व वाख्यात—इतकींच लिंगाप्रमाणें बदलतात; बाकीचीं तीन—ई-आख्यात, ऊ-आख्यात आणि ईलाख्यात—तिन्ही लिंगीं समान असतात. ह्यामुळें क्रियापद कर्त्याचे लिंगाप्रमाणें फक्त पहिल्या चार आख्यातांतच बदलतें, हें उघड आहे. जसें:——मी जातों, तूं कालच यावास, ती स्वयंपाक करिती झाली, ते—त्या—तीं बसतील किंवा जावोत, इ०.

**टीप**——क्रियापदाची ही कर्तरि प्रयोगांतील कर्तृनिघ्नता किंवा कर्तृगामिता लिंगासंबंधानें जशी मर्यादित आहे, तशीच त्याची कर्मणि प्रयोगांतील कर्मनिघ्नता किंवा कर्मगामिता मर्यादित आहे असें समजावें.

५७४. कर्तरि प्रयोगामध्यें कर्ता पुढील स्थलीं बहुधा अध्याहृत असतो.

( अ ) ऊ-आख्यातांतील द्वितीय पुरुषाचें क्रियापद असून आज्ञा हा अर्थ असतां कर्ता हा बहुधा अध्याहृत असतो. जसें:—चला व्हा चालते, रामा जरा इकडे ये, इ०.

( आ ) जेव्हां विवक्षित क्रियेचा कर्ता विशिष्ट नसतो, म्हणजे तिचा अमुक एक कर्ता होय असें निश्चयपूर्वक सांगतां येत नाहीं, किंवा एखाद्या चालीरीतीचें सामान्येंकरून विधान करावयाचें असतें, तेव्हां कर्ता अध्याहृत असून क्रियापद तृतीय पुरुषीं अनेकवचनीं येतें. जसें:--असें म्हणतात कीं, पोटाचे आंतील भागाचा फोटो काढण्याची युक्ति निघाली आहे; पुढल्या सालीं चांगली सुबत्ता येईल असें सांगतात; थंड देशांत कातड्याचेही कपडे करितात; कांहीं देशांत शौचाकरितां कागदांचा उपयोग करितात असें म्हणतात; इ०.

या ठिकाणीं म्हणणारे, सांगणारे, करणारे कोण हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. यामुळें कर्त्याचा स्पष्ट उल्लेख करण्याचें मनांत आणिलें, तरी तें अशक्य नसलें तरी अडचणीचें आहे. अशा वाक्यांत 'लोक' हा सर्वसाधारण अनिश्चितार्थक शब्द कर्ता होय, असें समजून निर्वाह करून घेण्याची वैयाकरणांची चाल आहे; व ती योग्य आहे.

( इ ) म्हणीमध्यें संबंधी सर्वनाम हें कर्त्याचें जागीं बहुधा अध्याहृत असतें. जसें:--गर्जेल तो पडेल काय ? पिण्डीं तें ब्रह्माण्डीं, सदा मरे त्याला कोण रडे ? इ०.

( ई ) म्हणींमध्यें अनिश्चित कर्ता असतां तो अध्याहृत राहून क्रियापद तृतीय पुरुषीं एकवचनीं येतें. जसें:—असेल तेव्हां दिवाळी नसेल तेव्हां शिमगा, लोकां सांगे ब्रह्मज्ञान आपण कोरडा पाषाण, इ०. पहिल्या वाक्यांत असेल व नसेल या क्रियापदांचा कर्ता संपत्ति किंवा ज्याच्यासंबंधानें बोलणें चाललें असेल तो पदार्थ म्हणजे भाषणाविषयक वस्तु होय, आणि दुसरा उदाहरणांत सांगे या क्रियापदाचा भाषणविषयक मनुष्य हा कर्ता होय, हें उघड आहे.

( उ ) प्रथम व द्वितीय पुरुषीं कर्ता असतां, तो क्रियापदाचे रूपावरून समजण्यासारखा असल्यामुळें पुष्कळदां अध्याहृत असतो. जसें:—अहो रामभाऊ, कधीं आलांत ? राम०--हा आतांच आलों.

**ऐक** सभा तुज **कथितों** देवांच्याही परीस रुचिरा ज्या ॥—मोरोपंत.

नसेन **दिसलों** कसा नयन सर्वसाक्षी रवि ॥—मोरोपंत.

मागध म्हणे मखार्थ प्रोक्षित नृपपशु भयें न **सोडीन** ॥

कर ईश्वरासि किंवा तद्रूप ब्राह्मणांसि **जोडीन** ॥ —मोरोपंत.

५७५. वाक्यांतील कर्ता एकच व्यक्ति असूनही जर त्याचा बहुमानार्थी अनेकवचनीं उल्लेख होत असेल, तर क्रियापदही अनेकवचनींच येतें. जसें:—**भीष्म** म्हणतात, आमच्या गांवांत गोविंदराव म्हणून एक **गृहस्थ** होते, **काका** उद्यां यावयाचे आहेत, **लक्ष्मीबाई** मोठ्या भाग्यवान् आहेत, इ०.

**टीप**—स्त्रीवाचक शब्दांचा आदरार्थी बहुवचनीं कर्तृस्थानीं उपयोग असतां क्रियापद क्वचित् नपुंसकलिंगींही आढळतें. जसें:—माईसाहेब कालच आलीं असतीं, माईसाहेब मोठीं सुज्ञ आहेत, इ०.

५७६. वाक्यांमध्यें कर्त्याशिवाय जर कांहीं प्रथमान्त नामें उद्देश्यार्थी किंवा विधानार्थी उपयोगांत असलेलीं असतील, तर क्रियापदाचे रूपाशीं त्यांचा कांहीं एक संबंध नसतो. म्हणजे कर्तरि प्रयोगामध्यें कर्ता हाच धातुरूपेश होय; उद्देशनाम किंवा विधिनाम हें धातुरूपेश कधींच नसतें. जसें:—सौभद्रामध्यें केशव हा सुभद्रा होतो, अर्जुन बृहन्नडा बनला, काल तो नटी झाला होता, या वाक्यांत प्राणिवाचक शब्द कर्म होतो, इ०.

५७७. कर्तरि प्रयोगांत अनेक कर्ते असल्यास त्यांच्या संबंधाचे पुढील नियम आढळतात:—

( अ ) एकाच पुरुषाचे व एकाच लिंगाचे अनेक कर्ते समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडण्यांत आले असल्यास क्रियापद त्याच पुरुषीं त्याच लिंगीं अनेकवचनीं असतें. जसें:—विष्णु, परसु, आणि दत्तु, शाळेंत गेले, राम आणि लक्ष्मण वनवासास गेले, जिकडे तिकडे गवत आणि झाडें उगवलीं आहेत, इ०.

( आ ) परंतु अनेक नामें किंवा नामांप्रमाणें योजिलेलीं विशेषणें एकाच व्यक्तीस किंवा वस्तूस उद्देशून कर्तृस्थानीं आलीं असतां क्रियापद एकवचनींच येतें. जसें:—माझा हितचिंतक व पालक आज गेला, त्याचा बाप व माझा वडील भाऊ उद्यां यावयाचा आहे, इ०.

( इ ) भिन्न भिन्न पुरुषांचे अनेक कर्ते वाक्यांत आले असून त्यांपैकीं एक जर प्रथम पुरुषीं असेल तर क्रियापद प्रथम पुरुषीं अनेकवचनीं येतें; आणि

त्यांपैकीं एकही कर्ता प्रथमपुरुषीं नसेल तर क्रियापद द्वितीय पुरुषीं येतें. म्हणजे सर्व पुरुषांमध्यें प्रथम पुरुषास आधीं व त्याचे अभावीं द्वितीय पुरुषास मान मिळतो. जसें:--मी, तूं, आणि ते, उद्यां जाऊं; तूं आणि तो आजच निघा किंवा बोला; इ०.

टीप--हा नियम आम्ही व तुम्ही ह्या प्रथम व द्वितीय पुरुषांच्या अनेकवचनीं येणाऱ्या सर्वनामांच्या अर्थास धरून आहे. आम्ही म्हणजे मी व मत्संबंधीं दुसरे, तुम्ही म्हणजे तूं व त्वत्संबंधीं दुसरे, ( अंक १२१ व १२३ ).

( ई ) समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडण्यांत येणारे अनेक कर्ते निरनिराळ्या लिंगांचे असतील, आणि त्या सर्वांचा एकवटीनें क्रियापदाशीं संबंध दाखवावयाचा असेल, तर क्रियापद नपुंसकलिंगीं अनेकवचनीं असतें. क्रियापदाचे पुरुषासंबंधानें वरील ( इ ) हा नियम लागतो. जसें:-राजा व राणी आलीं; मी, माझी बायको, व मुलगा, उद्यां जावयाचीं आहों; रामा, गोविंदा, मनी, आणि गंगू, काल मुंबईस गेलीं; इ०.

( उ ) समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडण्यांत येणाऱ्या कर्त्यांचा क्रियापदाशीं एकवटीनें संबंध असतां त्यांचे शेवटीं हा हें दर्शक सर्वनाम अथवा त्यापासून निघालेलें विशेषण नामापुढें उपयोगांत येतें. अशा वेळीं सर्व कर्ते एकाच लिंगीं असल्यास 'हा' हें दर्शक सर्वनाम किंवा तदुत्पन्न विशेषण त्याच लिंगीं अनेक वचनीं येऊन क्रियापद त्याप्रमाणें असतें. पण जर ते कर्ते भिन्न भिन्न लिंगांचे असतील, तर हा हें दर्शक सर्वनाम किंवा तज्जन्य विशेषण आणि क्रियापद हीं नपुंसकलिंगीं अनेकवचनीं असतात. अर्थात् लिंगासंबंधानें वरील ( ई ) हा नियम लागतो. जसें:--रामा, गोविंदा, आणि विष्णु हे सर्व नीट वाचतात; मनी, आवडी, काशी, ह्या आज आल्या; ज्ञान व नीति हीं दोन्ही अत्यन्त महत्वाचीं आहेत; रामा, कृष्णा, दत्तू, आणि नारायण असे किंवा इतके आज गेले; घोडे, बंदुका, तोफा, शिपाई, हीं, किंवा अशीं किंवा इतकीं, लढाईंत फार महत्वाचीं आहेत; इ०.

कधीं कधीं निरनिराळ्या सर्व कर्त्यांचा एकाच जातींत अन्तर्भाव करून, जाति दाखविणारें सामान्यनाम दर्शक विशेषणापुढें अनेकवचनीं येतें व क्रियापद ह्या जातिवाचक नामाच्या लिंगाचें व अनेकवचनीं असतें. जसें:--रस्त्यानें एक म्हातारा, एक मुलगी व दोन मुलगे हीं ( किं०

अशीं कि० इतकीं ) माणसें चाललीं होतीं; धर्म व नीति ह्या गोष्टी आजकाल मागें पडत आहेत; ह्या औषधांत कापूर, मिऱ्यें, हिंग, दालचिनी, बडीशेप, जिरें, हे ( किंवा इतके ) पदार्थ असावे; इ०.

जातिवाचक सामान्यनामाचे जागीं कधीं कधीं समुदायवाचक नामाचा एकवचनीं प्रयोग होतो; आणि त्या समुदायवाचक नामाच्या पुरुषलिंगानुसार क्रियापद एकवचनीं येतें. जसें:—एक हजार स्वार व दोन हजार पायदळ, इतकें सैन्य रवाना झालें; त्यास चार मुली आणि पांच मुलगे, इतकी संतति आहे; इ०.

( ऊ ) जेव्हां अनेक भिन्न लिंगी कर्ते समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडलेले असून, त्यांपैकीं प्रत्येकाचा क्रियापदाशीं पृथक् पृथक् म्हणजे वेगळा वेगळा संबंध दाखवावयाचा असतो, तेव्हां अखेरचा कर्ता क्रियापदेश होतो; म्हणजे त्याच्या लिंगवचनाप्रमाणें क्रियापद असतें. जसें:—या जमिनींत ज्वारी व कापूस पिकतो; त्याच्या घरीं दोन बैल, एक म्हैस, व एक तट्टू आहे; इ०.

( ऋ ) जेव्हां अनेक कर्ते विकल्पबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडण्यांत येतात, तेव्हां अखेरचा कर्ता धातुरूपेश होतो. जसें:—तूं अथवा तुझा मुलगा आला म्हणजे मी निघेन; रामा, गणू, किंवा गजी आली, तरी चालेल; आज बाजारांत भोंपळे, वांगीं, बटाटे, कांकड्या, केळीं, किंवा संत्रे मुळींच दिसले नाहींत; इ०.

( ऌ ) जेव्हां दिसण्यामध्यें समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडलेले दोन किंवा अधिक कर्ते दिसतात, परंतु वास्तविक त्या दोहोंमिळून एकाच वस्तूचा बोध होतो, तेव्हां क्रियापद एकवचनीं व तद्वस्तुवाचक शब्दाच्या लिंगानुसार असतें. जसें:—'हरि आणि त्र्यंबक' मुलांना वाचण्यास फार चांगलें आहे; तेथें बरींच पुस्तकें पडलीं होतीं, पण त्यांत 'विक्रम आणि शशिकला' कोठेंच आढळलें नाहीं; इ०.

( ए ) जेव्हां सबंध वाक्य कर्तृस्थानीं येतें, तेव्हां त्याचे पुढें **हें** किंवा **असें, ही गोष्ट** किंवा **अशी स्थिति**, हे किंवा या अर्थाचे शब्द येऊन क्रियापद त्या शब्दांप्रमाणें असतें. जसें:—तो त्या वेळीं आला नाहीं हें फार वाईट झालें; त्याच वेळीं त्याची प्रकृति बिघडली **ही गोष्ट** दुर्दैवाचीच होय;

तो निजला आहे **असें** मला वाटलें; त्याच्या मालमत्तेची नीट व्यवस्था पाहणारें सध्या कोणी नाहीं, **ही स्थिति** त्यांच्या नजरेस आली आहे; इ०.

५७८. कर्तरि प्रयोगांतील क्रियापद सकर्मक असल्यास त्यांतील कर्माची कोणत्या स्थळीं कोणती विभक्ति असते, यासंबंधानें नियम मागील अध्यायांतच देण्यांत आले आहेत.

५७९. क्रियापदासंबंधाचे नियम कर्त्याच्या नियमांबरोबरच आले आहेत. कांहीं कांहीं वाक्यांत ज्याप्रमाणें कर्ता अध्याहृत असतो, त्याचप्रमाणें कांहीं कांहीं वाक्यांत आह किंवा अस धातूचीं रूपें क्रियापदें असतां तीं अध्याहृत असतात. तीं स्थळें येणेंप्रमाणें:—

**( अ )** प्रश्नार्थक वाक्यांत:—तुझें नांव काय? तुझा गांव कोणता? इ०.

**( आ )** प्रश्नांस उत्तरें देण्याचे वेळीं:—माझें नांव नारायण, माझें गांव नागांव.

**( इ )** खात्रीपूर्वक जोरानें विधान करावयाचें असतां:—तो अगदीं वेडा, तो मोठा दीडशहाणा, मी उद्यां जाणार, मूर्खच बेटा, इ०.

**( ई )** म्हणींमध्यें:—अति तेथें माती, घरोघरीं मातीच्याच चुली, साखरेचें खाणार त्याला ईश्वर देणार, इ०.

**( उ )** शब्दार्थ सांगण्यांत व कोष्टकांचे वाचनींत:—अश्व म्हणजे घोडा, त्रिकोण म्हणजे तीन सरळ रेघांनीं होणारी आकृति, तीन पै म्हणजे पैसा, चार पैसे म्हणजे एक आणा, इ०.

**( ऊ )** उद्गारवाचक वाक्यांत:—काय चमत्कार! काय उंची ही! केवढी विलक्षण बुद्धि इ०.

**( ऋ )** तुलनेच्या वेळीं:—त्याच्यासारखा दक्ष तोच, तुझ्यापेक्षां तो अधिक हुषार, इ०.

**( ऌ )** कवितेंत कवीच्या मर्जीप्रमाणें व छंदाच्या सोईप्रमाणें:—

धर्मा जी धनद सभा तीही शतयोजनायता रम्या।
शम्यानंदकरी शिवपदपूता तज्जनेतरागम्या॥
ब्रह्मसभाचि गुरुसभा तन्न्यूना वर्णिल्या सुरसभा ज्या।
देन्गुल्य शाकभाज्या किंवा हे शाक या सुरस भाज्या॥—मोरोपंत.
दया क्षमा शांति॥ तेथें देवाची वसति॥—तुकाराम.

## कर्मणि प्रयोग.

५८०. कर्मणि प्रयोगामध्यें कर्ता तृतीयान्त, सविकरण तृतीयान्त, चतुर्थ्यन्त, शब्दयोगी अव्ययान्त, किंवा षष्ठयन्त असतो; कर्म नेहमीं प्रथमान्त असून क्रियापद कर्मगामी असतें; या गोष्टी मागल्या अध्यायांत आल्याच आहेत. त्याचप्रमाणें कर्त्याची कोणती विभक्ति कोणत्या प्रकारच्या कर्मणि प्रयोगांत असते, हेंही सविस्तर येऊन गेलेंच आहे.

५८१. कर्मणि प्रयोगांत कर्माप्रमाणें क्रियापद असतें. ह्यामुळें कर्तरि प्रयोगांतील कर्ता व क्रियापद ह्यांच्या अन्वयाबद्दलचे जे नियम वर दिले आहेत, तेच कर्मणि प्रयोगांतील कर्म व क्रियापद ह्यांचे अन्वयास योग्य फरकानें लागू पडतात. तें कसें हें थोडक्यांत उदाहरणांनीं स्पष्ट करून दाखवितों. त्याकरितां अंक ५७७ मधील नियम यथाक्रम घेऊं.

( अ ) एकलिंगी अनेक कर्में समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडलेलीं असतां क्रियापद त्याच लिंगी अनेकवचनीं असतें: मात्र प्रथम व द्वितीय पुरुषीं कर्म फारसें येत नाहीं. जसें:—त्यानें जोंधळे, गहूं, आणि तांदूळ, आणिले; त्यानें एक गाय व दोन म्हशी विकत घेतल्या; इ०.

( आ ) कर्मस्थानीं येणारे अनेक शब्द एकाच व्यक्तीस किंवा पदार्थास उद्देशून येत असतील, तर क्रियापद एकवचनींच येतें. जसें:—त्यानें जेव्हां आपला हितचिंतक व रक्षक पाहिला, तेव्हां त्याला फार आनंद झाला; इ०.

( इ ) प्रथम व द्वितीय पुरुषीं कर्म बहुधा येत नाहीं. तेव्हां भिन्न भिन्न पुरुषांच्या कर्माबद्दल बोलण्याची गरजच नाहीं.

( ई ) समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडलेलीं अनेक कर्में भिन्न भिन्न लिंगी असल्यास क्रियापद नपुंसकलिंगी अनेकवचनीं असतें. जसें:—त्यानें बाजारांतून द्रोण व पत्रावळी आणिलीं; त्यानें आपल्या गाई, म्हशी, व बैल गांवास धाडिलीं; इ०.

( उ ) अशा प्रकारच्या अनेक कर्मांचे अन्तीं दर्शक सर्वनाम किंवा विशेषण नामाप्रमाणें अनेकवचनीं येऊन क्रियापद त्याप्रमाणें असतें. जसें:—त्यानें एक गाय, दोन म्हशी व दोन बैल हीं विकत घेतलीं.

कधीं कधीं ह्या दर्शक शब्दापुढें एक अनेकवचनी सामान्यनाम किंवा एकवचनी समुदायवाचक नाम घेऊन क्रियापद त्याप्रमाणें असतें. जसें:—त्यानें बटाटे, कोबी, वांगीं, ह्या भाज्या विकत घेतल्या; त्यानें पांचशें स्वार, हजार पायदळ, दोन तोफा, व चार हत्ती, इतकी मदत पाठविली; इ०.

( ऊ ) समुच्चयबोधक अव्ययानें जोडलेल्या भिन्न लिंगी किंवा भिन्न वचनीं कर्मांचा क्रियापदाशीं पृथक् संबंध दाखवावयाचा असतां क्रियापद शेवटल्या कर्माप्रमाणें असतें जसें:—त्यानें एक घोडा व एक म्हैस विकत घेतली. त्यानें दोन हरिणें व एक वाघ मारिला, इ०.

( ऋ ) अनेक कर्मे विकल्पबोधक अव्ययानें जोडण्यांत आलीं असल्यास क्रियापद अन्त्य कर्माप्रमाणें असतें. जसें:—त्यानें मुलांकरितां खारका, खडीसाखर, द्राक्षें, किंवा दुसरा कांहीं खाऊ आणिला आहे काय?

( ऌ ) समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडिलेलीं अनेक कर्मे जेव्हां वास्तविक एकाच वस्तूचा बोध करितात, तेव्हां क्रियापद तद्वस्तुवाचक शब्दाप्रमाणें असतें. जसें:—तुम्ही हरि आणि त्र्यंबक वाचिलें काय? मीं विक्रम-शशिकला पाहिलें आहे, इ०.

( ए ) संबंध वाक्य कर्मस्थानीं असतां त्याचे पुढें दर्शक शब्द येतात व त्याचेप्रमाणें क्रियापद असतें. जसें.—त्याला चांगली जागा मिळाली, हें मीं कालच ऐकिलें; त्याच्या मुलीला अखेरीस उत्तम स्थळ मिळालें, ही गोष्ट तुम्ही ऐकिली काय? तुम्ही पुढें व्हा मी मागाहून येतों, असें त्यानें सांगून पाठविलें आहे; इ०.

टीप—हे कर्मक्रियापदान्वयाचे नियम बहुतेक ५७७ अंकांतील कर्तृक्रियापदान्वयाचेच नियमांप्रमाणें असल्यामुळें व ते त्याच क्रमानें दिले असल्यामुळें, या ठिकाणीं त्यांचा उल्लेख जरासा स्थूलदृष्टीनें म्हणजे जराशा शिथिल भाषेनेंच केला आहे. तंतोतंत भाषेसाठीं ५७७ अंक पहावा.

५८२. कर्मणि प्रयोगांतही कर्ता कधीं कधीं अध्याहृत असतो. गौणकर्तृक कर्मणि प्रयोगाचा नवीन कर्मणि म्हणून जो एक भेद आहे, त्यांतील शब्दयोगी अव्ययान्त कर्ता अनेक स्थळीं अध्याहृत असतो. जसें:—तो लढाईंत मारला गेला, तो चोर अद्याप पकडला गेला नाहीं, निकाल उद्यां सांगण्यांत येईल, घेउनी असा शब्द बोलण्यांत येत नाहीं, ही इमारत यंदांच बांधण्यांत आली, इ०.

टीपः—रांगोळ्या घातल्या, पानें मांडलीं, इत्यादि कांहीं ओब्याशा व्यावहारिक भाषेंतील उदाहरणांत कर्ता अनिश्चित व अज्ञात असल्यामुळें किंवा जरी निश्चित व ज्ञात असला, तरी तो वास्तविक अर्थदृष्ट्या गौण असल्यामुळें अध्याहृत आहे हें योग्यच आहे. पण या वाक्यांत कोणत्या प्रकारचा कर्मणि प्रयोग आहे ? हा प्रश्न आहे. आजपर्यंतच्या वैयाकरणांनीं कर्मणि प्रयोगाचे आमच्या प्रमाणें भेद मानिले नसल्यामुळें त्यांच्या दृष्टीनें प्रकृत प्रश्न उभा रहात नाहीं. तथापि वरील वाक्यांत कोणता प्रयोग आहे ? ह्या प्रश्नाचें त्यांच्या दृष्टीनें जें उत्तर येतें तें पहाण्यासारखें आहे. त्यांचे मतें 'घालणारांनीं किंवा मांडणारांनीं' हे किंवा ह्यांसारखे तृतीयान्त कर्ते वरील वाक्यांत अध्याहृत असून रांगोळ्या व पानें हीं कर्में होत आणि घातल्या व मांडिलीं हीं क्रियापदें कर्मांच्याप्रमाणें असल्यामुळें या वाक्यांत कर्मणि प्रयोग आहे. त्यांच्या मतें 'असें सांगतात कीं,' 'असें म्हणतात कीं,' इत्यादि वाक्यांत 'लोक' हा कर्ता ज्याप्रमाणें अध्याहृत समजतात, त्याचप्रमाणें प्रस्तुत वाक्यांत 'घालणारांनीं, लोकांनीं, मालकानें, यजमानानें, नोकरांनीं इ०.' हे किंवा अशा प्रकारचे शब्द कर्तृस्थानीं अध्याहृत आहेत; ह्या म्हणण्यांत कांहींच अर्थ नाहीं असें नाहीं. हें म्हणणें कांहीं अंशीं बरें आहे. ह्या मताप्रमाणें जर घालणारांनीं, नोकरांनीं इत्यादिकांसारखा मूल तृतीयान्त शब्द कर्ता मानिला तर त्यांचे मतें, आमच्या भाषेस अनुसरून प्रकृत वाक्यांत प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोग आहे असें दिसतें. पण असें म्हणावें तर प्रकृत वाक्यांतील कर्ता इतका कांहीं गौण आहे कीं, तो कोणता हें अनिश्चित आहे. इतकेंच नव्हे तर त्या कर्त्याची व्यवहारांत कोणी विचारपूस करण्याचीही फारशी पंचाईत करीत नाहीं; म्हणजे तो जाणण्याची कोणासच बहुधा इच्छा होत नाहीं. म्हणजे अर्थदृष्ट्या 'पानें वाढलीं' 'रांगोळ्या घातल्या' हे प्रयोग गौणकर्तृक आहेत हें उघड आहे. तेव्हां यांमध्यें 'घालणारांनीं,' 'लोकांनीं' ह्यांसारखे मूल तृतीयान्त कर्ते मानून त्यांस बाह्यतः प्रधानकर्तृक कर्मणि ठरवूं पहाणें योग्य नाहीं हें उघड आहे. याजवर कोणी असें म्हणतील कीं, 'ही तुमचीच विसंगति आहे. मूळ तृतीयान्त कर्ता असतां होणारा कर्मणि प्रयोग प्रधानकर्तृक असतो असा तुमचाच नियम आहे. तेव्हां प्रकृत उदाहरणांत वास्तविक अर्थदृष्ट्या गौणकर्तृक कर्मणि प्रयोग असल्यामुळें आणि त्यांत बहुजनमताप्रमाणें मूळ तृतीयान्त कर्ता असल्यामुळें तुमचीच प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोगाची व्याख्या नीट नाहीं.' ही शंका प्रस्तुत प्रचलित असलेल्या 'पानें वाढलीं' वगैरे वाक्यांच्या व्याकरण व्यवस्थेप्रमाणें खरी आहे. आणि 'पानें वाढलीं' रांगोळ्या घातल्या' इत्यादि प्रयोगांत घालणारांनीं, लोकांनीं, असे मूल तृतीयान्त कर्ते अध्याहृत आहेत, हा आजपर्यंतचा वैयाकरणांचा प्रचलित समज ज्या मानानें वस्तुतः खरा असेल, त्या मानानें वरील शंका प्रबल ठरेल हें निर्विवाद आहे. परंतु आमच्या मतें प्रचलित सम-

णच मुळीं योग्य नाहीं. म्हणजे वरील वाक्यांत ' मांडणारांनीं, ' ' लोकांनीं ' अशा प्रकारचे मूळ तृतीयान्त कर्ते अध्याहृत समजून वादविषयक वाक्यांस, त्यानें पत्रें लिहिलीं, त्यानें आपलीं कामें केलीं, त्यानें छत्र्या आणिल्या, इत्यादि कर्मणि प्रयोगांचे पंक्तीस बसविणेंच गैर आहे. तर मग प्रकृत प्रयोगांची दुसरी कोणती समाधानकारक व्यवस्था करावयाची ? हा प्रश्न उत्पन्न होतो. आमच्या मतें प्रधानकर्तृक कर्मणि व गौणकर्तृक कर्मणि हा भेद प्रधान्येंकरून अर्थदृष्ट्या मानण्यांत आला असल्यामुळें आणि पानें वाढलीं वगैरे प्रयोग अर्थदृष्ट्या निःसंशय गौणकर्तृक कर्मणि असल्यामुळें त्यांस गौणकर्तृक कर्मणि हेंच नांव देणें सर्वथा योग्य आहे. तर मग हा कोणत्या प्रकारचा गौणकर्तृक कर्मणि प्रयोग होय हा प्रश्न साहजिकच उत्पन्न होतो; त्याचा विचार करूं. गौणकर्तृक कर्मणि प्रयोगाचे चार प्रकार सांगितले आहेत. एक पुराणकर्मणि, हा प्रचलित गद्यांत फारसा येत नसून त्यांतील क्रियापदांतील धातूंत इज असा आगम दिसत असतो. ह्यामुळें वादविषयक वाक्यांत पुराणकर्मणि प्रयोग नाहीं हें उघड आहे. त्याचप्रमाणें प्रस्तुत वाक्यांत समापनकर्मणि व शक्य कर्मणि हे प्रयोग नाहींत हेंहीं उघडच आहे. समापनकर्मणि प्रयोगांतील कर्ता षष्ठ्यन्त असतो व त्यांत ऊन-कृदन्ताचे पुढें हो या सहायधातूचा उपयोग होतो; आणि शक्य कर्मणि प्रयोगांत क्रियापद वकारयुक्त असतें व त्यास शक्तिघटित अर्थ असतो, आणि कर्ता साविकरण तृतीयान्त किंवा चतुर्थ्यन्त असतो. ह्यामुळें ' पानें मांडलीं ' यासारख्या वाक्यांत समापनकर्मणि व शक्य कर्मणि ह्या प्रयोगांचा भासही होण्याचें कारण नाहीं. तेव्हां आतां गौणकर्तृक कर्मणि प्रयोगाचा नवीन कर्मणि म्हणून जो एक भेद उरला, त्यामध्यें प्रस्तुत उदाहरणांची गणना होणें संभवनीय आहे कीं काय ? अथवा प्रस्तुत उदाहरणांतील गौणकर्तृक कर्मणि प्रयोगांचा आणखी एक निराळाच पांचवा भेद मानावयाचा कीं काय ? असे प्रश्न सहजरीत्या उत्पन्न होतात, तेव्हां आतां त्यांजकडे वळूं.

नवीन कर्मणि प्रयोग दोन नमुन्यांचा दृष्टीस पडतो. एक—शिपायाकडून चोर धरला गेला; आणि दुसरा—शिपायाकडून चोर धरण्यांत आला; ह्या दोहों मधील शिपायाकडून हा शब्दयोगी अव्ययान्त कर्ता गौण आहे. कधीं कधीं अशा ठिकाणचा कर्ता प्रसिद्धही नसतो आणि तो जाणण्याची कोणास फारशी अपेक्षाही नसते. चोराचें काय झालें, इतकेंच जाणण्याची सर्वत्र इच्छा असल्यामुळें कर्त्याचा निर्देशच न होतां असला नवीन कर्मणि प्रयोग बहुधा उपयोगांत येतो. म्हणजे चोर धरला गेला, चोर धरण्यांत आला असे कर्तृहीनच प्रयोग वारंवार ऐकूं येतात. ह्यामुळें राजकीय व्यवहारांत असला प्रयोग फार उपयोगी पडतो हें पूर्वी सांगितलेंच आहे. असो. चोर धरला गेला, आणि चोर धरण्यांत आला, ह्यांपैकीं चोर धरण्यांत आला या नमुन्याचा आणखी

संक्षेप होणें शक्य दिसत नाहीं. चोर, घरण्यांत, आला, या तीन शब्दांपैकीं कोणताही एक वगळिला असतां अर्थ होत नाहीं. तेव्हां हा नमुना बाजूस ठेवूं. चोर धरला गेला, ह्याचा मात्र आणखी एक संक्षेप कधीं कधीं आढळतो. ह्यापैकीं गेला हें सहायक्रियापद वगळून 'चोर धरला' असा संक्षेप होतो. या संक्षेपाचीं आणखी उदाहरणें पहा-'अहो, हरि रामोशी पकडला,' 'वासुदेव बळवंत पकडला,' 'त्याचीं कांहीं पत्रें पकडलीं असें म्हणतात' इत्यादि उदाहरणांत जा ह्या सहाय धातूचें आख्यातरूप गुप्त आहे. अशीं अतिसंक्षेप दिलेलीं नवीन कर्मणि प्रयोगाच्या एका नमुन्याचीं रूपें व्यावहारिक भाषेत कधीं कधीं ऐकूं येतात. या ठिकाणीं धरला=धरला गेला, पकडला=पकडला गेला, पकडलीं=पकडलीं गेलीं, असा अर्थ आहे हें उघड आहे. म्हणजे धरला, पकडला, पकडलीं, हीं आख्यातरूपें नसून लकृदन्ताचीं कर्मगामीं रूपें होत हें उघड आहे. आणि याच मासल्याचीं प्रस्तुत वादविषयक वाक्यें होत असें आमचें मत आहे. म्हणजे पानें वाढलीं या वाक्यांत कांहीं तरी मूळ तृतीयान्त कर्ता अध्याहृत समजून या वाक्याचा नमुना प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोगासारखा आहे, असें मानण्याचा जो आजपर्यंतचा व्याकरणप्रचार आहे तो बरा दिसत नाहीं. तर 'पानें वाढलीं' या वाक्यास नवीन कर्मणि प्रयोगाचें वर्णन कसें तंतोतंत लागू पडतें तें पहा. या वाक्यांतील कर्ता केवळ गौण आहे; इतकेंच नव्हे, तर तो जाणण्याचीही फारशी कोणास इच्छा नसते. येथें फक्त पानांची स्थिती काय आहे, हेंच जाणण्याची बहुधा सर्वत्र इच्छा असल्यामुळें कर्त्यास अजीच फांटा देण्यांत येत आहे; म्हणजे अमक्याकडून असें म्हणण्याची जरूर नसल्यामुळें 'पानें वाढलीं गेलीं' किंवा पानें वाढण्यांत आलीं' असे गौणकर्तृक नवीन कर्मणि प्रयोग उपयोगांत येतात. आणि 'पानें वाढलीं गेलीं' यांतील गेलीं या सहायक्रियापदाचा अध्याहार होऊन 'पानें वाढलीं' असें संक्षिप्तरूप प्रचारांत आलें. एवंच 'रांगोळ्या घातल्या' 'पानें वाढलीं' इत्यादि संक्षिप्त वाक्याचीं अमक्यानें-कोणींतरी-रांगोळ्या घातल्या' 'अमक्यानें—कोणींतरी—वाढणारांनीं-पानें वाढलीं' अशीं पूर्ण व मूळ वाक्यें न मानितां, रांगोळ्या घातल्या गेल्या, पानें वाढलीं गेलीं, हीं पूर्ण व मूळ वाक्यें मानणें अधिक प्रशस्त आहे; असें सर्व पूर्वग्रह व दुर्ग्रह व दुराग्रह बाजूस ठेविले असतां, कोणीही विचारी मनुष्य कबूल करील अशी आमची खात्री आहे. वाक्यपृथक्करणाचेही दृष्टीनें हा पक्ष पूर्वीच्या मताहून अधिक प्रशस्त आहे असेंच दिसून येईल. कारण कीं, 'पानें वाढलीं' इत्यादि प्रस्तुत वाक्यांमध्यें अर्थदृष्ट्या कर्माबद्दल विशेषेंकरून विधान होत असल्यामुळें 'पानें' ह्यासच उद्देश्य समजणें योग्य आहे. परंतु 'त्यानें काम केलें' अशा प्रकारच्या प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोगामध्यें काम ह्या कर्माबद्दल विधान केलेलें नसून, 'तो' ह्या कर्त्याबद्दलच विधान

असल्यामुळें 'त्यानें' हा शब्द उद्देश्य होय हें उघड आहे. आतां 'पानें वाढलीं' याचें मूळ व पूर्ण वाक्य 'आचाऱ्यांनीं किंवा वाढप्यांनीं पानें वाढलीं' असें जर समजलें तर यामध्यें आचाऱ्यांनीं किंवा वाढप्यांनीं ह्यास उद्देश्य करावें लागेल. परंतु मूळ विधान आचाऱ्यांबद्दल किंवा वाढप्यांबद्दल नसल्यामुळें तसें करणें प्रशस्त दिसत नाहीं. 'पानें वाढलीं' या वाक्यांत बोलणाराचा उद्देश पानांबद्दलच विशेषेंकरून विधान करण्याचा असल्यामुळें या वाक्याचें मूळ व असंक्षिप्त रूप पानें वाढलीं गेलीं, असें गौणकर्तृक कर्मणि प्रयोगाच्या नवीन कर्मणि या उपभेदाचें समजून 'पानें' ह्यासच उद्देश्य करितां येण्याजोगी सुलभ व्यवस्था करणें चांगलें. हा प्रश्न सत्यासत्याचा नसून केवळ बऱ्यावाईट व्यवस्थेचा आहे. आणि येथें सुचविलेली व्यवस्था पूर्वीच्या व्यवस्थेच्या मानानें अधिक समाधानकारक आहे हें दाखविण्यासाठीं इतका विस्तार करणें प्राप्त झालें.

५८३. गौणकर्तृक कर्मणि प्रयोगाच्या नवीन कर्मणि ह्या भेदांतील **जा** या सहाय धातूचें लाल्यांतीं रूप व्यावहारिक भाषेंत कधीं कधीं गुप्त असतें. जसें:—पानें वाढलीं (गेलीं), चोर पकडला (गेला), वाघ मारला (गेला), इ०.

५८४. अनेक कर्ते असून त्यांस कर्मणि प्रयोगांतील तृतीया वगैरे विभक्ति लावावयाच्या असतां दोन प्रकार आढळतात. एक तर प्रत्येक कर्तृवाचक शब्दास स्वतंत्रपणें विभक्तिप्रत्यय लावणें किंवा ते सर्व शब्द प्रथमान्त ठेवून त्यांचे पुढें **हा** ह्या दर्शक सर्वनामाचें त्या विभक्तीचें अनेकवचन योजणें. हा ह्या दर्शक सर्वनामाचीं अनेकवचनीं प्रथमेतर विभक्तीचीं तिन्ही लिंगी रूपें समान असल्यामुळें लिंगासंबंधाचा पृथक् विचार करण्याची येथें जरूरच नाहीं. जसें:— रामनें, गोविंदानें, व कृष्णानें हें काम केलें; किंवा रामा, गोविंदा, आणि कृष्णा, ह्यांनीं हें काम केलें; इ०.

कधीं कधीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें प्रथमान्त शब्दाचे पुढें येणाऱ्या दर्शक शब्दाचे नंतर त्या सर्व शब्दांचा ज्या एका जातींत अन्तर्भाव होण्यासारखा असेल, त्या जातीचा जो वाचक शब्द त्याची योजना करून त्यास विभक्तिप्रत्यय लावितात. जसें:—दत्तू, गोपाळ, श्यामराव, ह्या विद्यार्थ्यांनीं आपले पाठ केले आहेत, इ०.

**टीप**—अनेक कर्त्यांस विभक्तिप्रत्यय लावण्याचे हे दोन मार्ग केवळ कर्त्यासंबंधानेंच किंवा कर्मासंबंधानेंच उपयोगांत आहेत असें नाहीं, तर वाक्यांतील इतर कोणत्याही अनेक नामांस एकच विभक्ति किंवा एकच शब्दयोगी अव्यय

जोडावयाचें असल्यास त्या ठिकाणींही प्रकृत दोन्ही मार्ग खुले आहेत. जसें:—
रामा, गोविंदा, व कृष्णा, ह्यांनां किंवा ह्या मुलांना प्रत्येकीं एक एक आणा आज खाऊला दे; किंवा रामाला, गोविंदाला, व कृष्णाला, इ०. रामावांचून व गोविंदावांचून त्याचें क्षणभरही चालत नाहीं; किंवा रामा व गोविंदा ह्यांवांचून ह्या मुलांकिंवा कारकुनांवांचून त्याचें क्षणभरही........ इ०.

५८५. अनेक कर्ते व अनेक कर्में ह्यांचेपुढें कधीं कधीं हा व असा हे दोन्ही शब्द योजण्यांत येतात. जसें:—

मी कर्ण कृप द्रोण द्रौणि असे हे रणांत पांच कसा
उतरो धनंजयाच्या कीं नुरो तूंचि मात्र वांच कसा ॥—मोरोपंत.

५८६. कधीं कधीं एका कर्त्यापुढें व एका कर्मापुढेंही हा हें दर्शक सर्वनाम येतें; आणि त्याच्याप्रमाणें कर्तरि व कर्मणि ह्या प्रयोगांतील क्रियापद असतें. जसें:—मुंबई हें एक शहर आहे, दशरथ हा एक राजा होता, आंबा हें फळ खावयास फार चांगलें आहे, त्यानें आपल्या मुलाचें चंद्रशेखर हें नांव ठेविलें, मीं मधुमक्षिका हें किंवा हें पुस्तक वाचिलें आहे, इ०.

## भावीप्रयोग.

५८७. भावी प्रयोगाचे मुख्य तीन प्रकार आहेत. प्रधानकर्तृक भावे, गौणकर्तृक भावे व अकर्तृक भावे. ह्यांपैकीं प्रधानकर्तृक भावे हा सकर्मक व अकर्मक या दोन्ही प्रकारच्या धातूंपासून होतो. गौणकर्तृक भावे हा केवळ अकर्मक धातूंपासून होतो; आणि अकर्तृक भावे हा अकर्तृक म्हणजे दादोबांच्या भावकर्तृक धातूंपासून मात्र होतो.

५८८. प्रधानकर्तृक भावे प्रयोगांतील क्रियापद एकेरी असतां कर्ता नेहमीं मूल तृतीयान्त आणि कर्म चतुर्थ्यन्त असतें. जसें:—रामानें रावणास मारिलें किंवा मारावें, ह्यानें जावें, इ०.

परंतु प्रधानकर्तृक भावे प्रयोगांतील क्रियापद संयुक्त असतां कर्तृवाचक शब्द कधीं कधीं तृतीयान्त व कधीं कधीं चतुर्थ्यन्त असतो, जसें:—गोविंदरावांनां आपल्या मुलास रोज मारावें लागतें, त्या मुलास बैलांना हाकतां येतें, त्याला किंवा त्यानें गेलें पाहिजे, त्यानें जाऊं नये, इ०.

टीप—सकर्मक भावे प्रयोगांतील कर्म चतुर्थ्यन्त असतें असा साधारण नियम आहे परंतु तो अनपवादक नाहीं. एकेरी किंवा असंयुक्तक्रियापद असतां हा नियम अनपवादक आहे. परंतु संयुक्तक्रियापद भावी असतां कर्म कधीं कधीं प्रथमान्तही आढळतें. जसें:—त्यानें नेहमीं ग्रंथ किंवा पोथी, किंवा पोथ्या, किंवा वर्तमानपत्रें वाचीत असावें; त्यानें हा धंदा शिकलें पाहिजे किंवा शिकत असावें; इ०.

५८९. गौणकर्तृक भावे प्रयोगाचे तीन प्रकार आहेत. त्यांपैकीं पुराण भावेमध्यें कर्ता नेहमीं तृतीयान्त असतो, समापनभावेमध्यें षष्ठयन्त असतो, आणि शक्य भावेमध्यें चतुर्थ्यन्त किंवा सविकरण तृतीयान्त असतो.

५९०. भावी प्रयोगांतील अनेक कर्त्यांस किंवा कर्मांस विभक्तिप्रत्यय लावण्याचे नियम कर्तरि व कर्मणि प्रयोगांतील नियमांप्रमाणेंच आहेत.

टीप १—कर्ता व कर्म ह्यांशिवाय या प्रयोगांतील अनेक नामांस एकच विभक्ति लावण्याचा प्रसंग आल्यास, त्या ठिकाणींही पूर्वी सांगितलेले दोन्ही प्रकार आढळतात. जसें:—

नेत्रांत, घ्राणांत श्रवणांत मुखांत सर्व कटकाच्या ।
बहु शिरकल्या इषिका जेंवि जगीं शक्ति विश्व घटकाच्या ॥—मोरोपंत.

थाकें अशनीं शयनीं
ध्यानीं स्वप्नीं जनीं वनीं मनिं नयनीं ।
हरि पाहे परम रणीं
होय हरिच अरिवरीही गति परमरणीं ॥—मोरोपंत.

सायुध सरथ नकुलसहदेवार्जुनभीम यांस दासत्व ।
न शिवावें हें यावें मज यांचें स्थिर असो सदा सत्त्व ॥—मोरोपंत.

टीप २—या मुद्यासंबंधानें गद्यांत काय किंवा पद्यांत काय, एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे, ती अशी. एकच विभक्ति अनेक नामांस पृथक्त्वानें लावावयाची असतां तिचा एकच प्रत्यय सर्व नामांस एकसारखा लागतो; निरनिराळ्या नामांस निरनिराळे प्रत्यय लागत नाहींत, हें वरील उदाहरणांवरून कळेलच. नेत्रांत, घ्राणांत, श्रवणांत, मुखांत इत्यादि असें न म्हणतां नेत्रीं, घ्राणीं, श्रवणांत, मुखां, अशीं सप्तमीचीं निरनिराळीं रूपें एकापाठीमागून एक अशीं एकत्र गोंवणें व्याकरणदृष्ट्या किंवा अर्थदृष्ट्या जरी केवळ चुकीचें नसलें तरी भाषासरणीचे दृष्टीनें अप्रशस्तच होय हें उघड आहे.

# अध्याय ५.

## इतर शब्द

### ( सर्वनामें, विशेषणें व अव्ययें ).

वाक्यांतील कर्ता, कर्म, व क्रियापद या तीन अवयवांचा विचार गेल्या अध्यायांत झाला. कर्ता व कर्म हीं बहुधा नामें किंवा नमांप्रमाणें उपयोगांत आलेले इतर शब्द असतात. कर्ता व कर्म हीं नामांचीं वाक्यांतील दोन स्थळें होत. ह्यांशिवाय नामांचा इतर कोणत्या स्थळीं उपयोग होतो, हें विभक्तींच्या अर्थांचे द्वारा सांगण्यांत आलेंच आहे. तेव्हां आतां सर्वनाम, विशेषण, क्रियाविशेषण, उभयान्वयीं व शब्दयोगी यांजकडे वाक्यरचनेच्या दृष्टीनें पहावयाचें आहे. वर्गीकरण—प्रकरणांत ह्यांच्या उपयोगासंबंधानें बराच विचार योऊन गेला आहे. तथापि विशेषेंकरून वाक्यरचनेच्या दृष्टीनें त्यांजविषयीं आणखी कांहीं गोष्टी सांगण्यासारख्या आहेत कीं काय, हें ह्या अध्यायांत पहावयाचें आहे. तसेंच कृदन्त म्हणजे धातुसाधितें ह्यांचा संयुक्तक्रिपदांमधील उपयोग पूर्वीं येऊन गेलाच आहे; आणि त्यांचे इतर उपयोगही कृदन्तांचे निरूपणांत सांगण्यांत आले आहेत. तथापि कृदन्तांचा वाक्यांमध्यें स्वतंत्रपणें होणारा उपयोग वाक्यरचनेच्या व वाक्य, पृथक्करणाच्याही दृष्टीनें महात्त्वाचा असल्यामुळें त्यांजकडेही एका स्वतंत्र अध्यायांत विशेषेंकरून पाहिलें पाहिजे.

५९१. कांहीं सर्वनामांसंबंधानें पुढील गोष्टी ध्यानांत ठेवण्यासारख्या आहेत.

( अ ) तृतीय पुरुषवाचक, दर्शक, आणि संबंधी हीं सर्वनामें ज्या नामाबद्दल येतात, त्या नामाचें म्हणजे त्याच्या पूर्वनामाचें लिंगवचन त्यांस अवश्य असतें; परंतु पूर्वनामाची विभक्ति त्यांस असलीच पाहिजे, असा नियम नाहीं. तर त्यांस अर्थानुरोधानें ती किंवा इतर कोणतीही विभक्ति असते. जसें:—**जो** डोळस आहे **त्याला** हें सहज समजेल; **मनुष्याला** जरी बुद्धि आहे, तरी **त्यास** अनंताचें आकलन पूर्णपणें होणें शक्य नाहीं;

**आपासाहेब** मोठे दैववान् होते **त्यांना** अपशय म्हणून माहित नाहीं; **जा** पहांवा **तो** आळशी, इ०.

( **आ** ) वाक्यांतील कर्तृवाचक नामाचा किंवा सर्वनामाचा त्याच वाक्यांत पुन्हा उल्लेख करावयाचा असतां, आत्मवाचक आपण किंवा स्वतः यांचा उपयोग होतो. जसें:—रामरावानें **आपलें** बिऱ्हाड बदललें, त्यानें **आपलें** किंवा **स्वतःचें** व्यर्थ नुकसान करून घेतलें, इ०.

आत्मवाचक आपण किंवा स्वतः, मागल्या वाक्यांत येऊन गेलेल्या नामाबद्दल किंवा सर्वनामाबद्दल येत नसल्यामुळें आत्मवाचक सर्वनाम वाक्यारंभीं येत नाहीं किंवा वाक्यामध्यें कर्तृस्थानीं येत नाहीं.

त्याचप्रमाणें एका वाक्यांत दोन कर्ते असून दुसऱ्या कर्त्याचे उल्लेखांत पहिल्या कर्त्याचे संबंधाचा निर्देश होत असेल, तर ह्या पहिल्या कर्त्याचे संबंधाचा निर्देश करण्याचे कामीं आत्मवाचक सर्वनामाचा उपयोग होत नाहीं. जसें:—गोविंदा व त्याचा भाऊ हे उद्यां यावयाचे आहेत, मी व माझा मुलगा उद्यां जाणार, इ० या वाक्यांत गोविंदा व आपला भाऊ, आणि मी व आपला मुलगा असें कधींच कोणी म्हणत नाहीं, म्हणजे वरील वाक्यांतील त्याचा व माझा या शब्दाचे जागीं आत्मवाचक सर्वनामांचा उपयोग होत नाहीं, हें उघड आहे.

( इ ) वाचकास किंवा श्रोत्यास अपरिचित अशा वस्तूबद्दल बोलावयाचे असतां तद्वाचक नामापुढें ‘ हा ’ या दर्शक सर्वनामाचा, किंवा ‘ हा ’ ह्या दर्शक विशेषणानें युक्त सामान्यनामाचा, किंवा ‘ म्हणून ’ या अव्ययाचा, उपयोग होतो जसें:—हस्तिनापूर हें दिल्लीचें प्राचीन नांव होय; कलकत्ता **हें नांव** कालीदेवीचे नावापासून निघालें आहे असें सांगतात; प्राचीन काळीं मिथिला **या नांवाची** एक मोठी नगरी होती, तेथें जनक **म्हणून** एक राजा झाला; इ०.

५९२. अधिविशेषणांसंबंधानें वाक्यरचनेंत पुढील विशेष नियम आढळतात.

( अ ) प्रथमेतर विभक्तींमध्यें विशेष्य आलें असतां, किंवा त्यास शब्दयोगी अव्यय लागलें असतां, किंवा विशेष्याचें कांहीं कारणानें सामान्यरूप झालें असतां, त्याच्या विशेष्यनिघ्न ( विशेष्याचें लिंगवचनाप्रमाणें

फिरणाऱ्या ) अधिविशेषणाचें सामान्यरूप होतें. षष्ठीचे प्रत्ययही पुढील नामाचे लिंगवचनाप्रमाणें बदलणारे असल्यामुळें त्यांसही हा नियम लागू आहे. जसें:—**मोठ्या** शहरांत महिने महिनेही एकमेकांच्या गांठी पडत नाहींत, **त्याच्या** घरावर काल दगड आले असें सांगतात, **माझ्या फडताळाच्या समोरच्या** मोठ्या कोनाड्यांत एक पुडी आहे, इ०.

( आ ) वाक्यांत अनेक विशेष्यें असून त्यांचे मागें एकच विशेष्य-निघ्न विशेषण येत असेल, तर तें प्रथम विशेष्याचे लिंगवचनाप्रमाणें असतें. जसें:—परवांच्या वादळानें आमच्या बागेंतील **मोठमोठे** सर्व **झाड**, पोफळी, व केळी मोडून पडल्या; ह्या **हवेंतलीं** सर्व **जनावरें** पशु, पक्षी व वनस्पती, येथें पाहण्यास मिळतात; इ०.

षष्ठ्यन्त नामालाही हा नियम लागू आहे. जसें:—**त्याचा** एक **मुलगा** दोन मुली, आणि एक भाऊ हीं मेल्या प्लेगांत दगावलीं; **माझा कोट,** टोपी व काठी घेऊन ये; इ०.

( इ ) जेव्हां एका विशेष्याचे मागें अनेक विशेषणें येतात; तेव्हां त्या विशेषणाचे अंतीं व विशेष्याचे लागच पाठीमागें **असा** ह्या शब्दाचा उपयोग होतो. जसें:—इतक्यांत येथें एक सुंदर, कुलीन व तरुण, असा मनुष्य प्राप्त झाला; तुमच्या पाहण्यांत गरीब पण हुषार, सशक्त, व सुशील असा एखादा मुलगा आहे काय? इ०.

या अनेक विशेषणांपैकीं जर कांहीं विशेष्यनिघ्न असलीं, तर त्यांचीं रूपें अर्थात् विशेष्याच्या लिंगवचनाप्रमाणें बदलतात, आणि विशेष्य हें विभक्तिप्रत्ययान्त किंवा शब्दयोगी अव्ययान्त असलें, तर त्याचें बहुधा सामान्यरूप होतें. जसें:—एका **द्वांड्या** व निर्लज्ज अशा मुलानें त्यास मारिलें; **चांगल्या, शहाण्या,** व हुषार अशा मुलांचा कोण गौरव करणार नाहीं? इ०.

विशेषणें व विशेष्य ह्यांचेमध्यें दिसणारा **असा** हा शब्द कधीं कधीं येतही नाहीं. जसें:—त्यानें आपले जुने व **फाटके कपडे** भिकाऱ्यास दिले; प्रफुल्लित, सुवासिक, व सुंदर फुलें निवडून त्यांचा देवांसाठीं एक हार कर, इ०.

टीप—खेर व जोशी यांनीं या ठिकाणच्या असा ह्या शब्दाचे जागीं 'हा' हा शब्दही येतो, असें म्हटलें आहे; [ खेर-क० ६०५; जोशी-प्रौढबोध-क० ६६८

( आ ) पहा ]. परंतु अनेक विशेषणान्तीं ' हा ' ह्या शब्दाचा उपयोग झालेलें एकही उदाहरण खेर किंवा जोशी ह्यांचे व्याकरणांत आढळत नाहीं. जी गोष्ट भाषेंत नाहीं, ती व्याकरणांत कशी येणार ? अशा प्रकारची चूक दुर्लक्षानें नवीन वैयाकरणांचे पुस्तकांत शिरून ती चिरस्थायी व्हावी हें मराठी व्याकरणाचें दुर्दैवच होय. अनेक कर्ते किंवा कर्मे वाक्यांत आलीं असतां त्यांचे पुढें हा व असा या दोन्ही शब्दांचा विकल्पानें उपयोग होतो, असा जो नियम मागल्या अध्यायांत सांगितला आहे त्याच्या सादृश्यावरून केवळ अंधपणें अनेक विशेषणांचे नियमांतही असा या शब्दाबराबर ' हा ' याचा अन्तर्भाव करण्यांत आला असल्यास नकळे ! आमच्या मतें खेर व जोशी यांच्या प्रकृत नियमांतील हा या शब्दास साफ हरताळ फांसला पाहिजे.

५९३. विधिविशेषणाचे उपयोगासंबंधानें पुढील नियम आढळतात.

( अ ) वाक्यांतील कर्त्याचें विधिविशेषण आकारान्त असल्यास तें आधिविशेषणाप्रमाणेंच विशेष्यनिघ्न असतें. जसें:—तो **काळा** आहे, ती **गोरी** आहे, त्याचे केंस **पिंगे** आहेत, इ०.

( आ ) एकाच लिंगाच्या मनुष्यवाचक अनेक विशेष्यांसंबंधानें एका विशेष्यनिघ्न विधिविशेषणाचा उपयोग होत असतां, तें त्याच लिंगीं अनेक वचनीं असतें; आणि विशेष्यें निरनिराळ्या लिंगीं असतां, त्यांचें विधिविशेषण नपुंसक लिंगीं असतें. जसें:—मनी, काशी व गंगू **चांगल्या** किंवा **गोऱ्या** आहेत; त्याचे मुलगे व मुली **काळीं** आहेत, इ०.

अशा ठिकाणीं अनेक नामांनंतर हा असा वगैरे जे दर्शक शब्द किंवा सामान्य नाम येतें, त्याचेप्रमाणें विधिविशेषण असतें. जसें:—दत्तु, गणु, व विष्णु. हे मुलगे **शहाणे** आहेत; उष्ण प्रदेशांतील मनुष्यें, पशु, पक्षी, वगैरे सर्व प्राणी **मोठे** असतात; इ०.

( ई ) भिन्न लिंगी मनुष्येतर प्राणिवाचक व अचेतन विशेष्यासंबंधानें येणाऱ्या विधिविशेषणासही मागला नियम लागू आहे. तरी अशा वेळीं विधिविशेषण कधीं कधीं केवळ शेवटल्या विशेष्याचे लिंगवचनाप्रमाणेंही असतें. जसें:—या प्रांतांतील जोंधळा व हरभरा चांगले असतात; या प्रांतांतील ज्वारी, गहूं, हरभरा हीं धान्यें चांगलीं असतात; त्याची छाती व डोकें मोठें आहे; इ०.

**टीप**—( आ ) व ( इ ) या दोन्ही ठिकाणीं अनेक विशेष्यांनंतर **हा** व **असा** हे दर्शक शब्द किंवा तद्युक्त अनेकवचनीं सामान्यनाम घालून विधि-

विशेषणाचें लिंगवचन त्याच्या लिंगवचनाप्रमाणें ठेवणें ही वाक्यरचना सुबोध, सरळ, आणि प्रशस्त असल्यामुळें तिचाच प्रचार स्वाभाविकपणें विशेष आढळतो.

( ई ) प्रथमान्त कर्माचे नंतर येणाऱ्या त्याच्या विधिविशेषणास त्या कर्माचें लिंगवचन असतें. जसें:— त्यानें आपला **हात** शाईनें अगदीं **काळा** केला, तिनें खडूनें सर्व **जमीन पांढरी करून** टाकली.

सोडोनि **मोकळे कच** येथील पथीं अशाचि आरडत ॥—मोरोपंत.

( उ ) ज्याप्रमाणें अनेक कर्त्यांचे पुढें किंवा कर्मांचे पुढें दर्शक शब्द आले असतां, क्रियापद त्या दर्शक शब्दांचे तंत्रानें चालतें, त्याचप्रमाणें कोणत्याही अनेक नामांचे पुढें दर्शक शब्द आले असतां, त्या सर्वांस लागणारें विधिविशेषण त्या दर्शक शब्दांचे लिंगवचनाप्रमाणें असतें. जसें:—रामा, कृष्णा, व गोविंदा **हे विद्यार्थी** आमच्या **शाळेंतले** आहेत; नाना व मनी हीं दोन्ही **शहाणीं** असल्यामुळें एकमेकांशीं नेहमीं प्रेमानें वागतात; इ०.

( ऊ ) कर्ता प्रथमान्त नसून कर्म चतुर्थ्यन्त असतां भावे प्रयोग होतो, असा साधारण नियम आहे; त्याचप्रमाणें कर्म चतुर्थ्यन्त असतां त्याचें विधिविशेषण नपुंसकलिंगी एकवचनीं असावें असा साधारण नियम आहे. जसें:—वैद्यानें रोग्यास **बरें केलें**, त्यानें आपल्या घोड्याला **चांगलें** सजविलें आहे, तिनें आपल्या बाहुलीला पाटावर **उभें** केलें आहे, इ०.

परंतु चतुर्थ्यन्त कर्म असलें तरी ज्याप्रमाणें 'त्यानें आपल्या मुलीला सासरीं पाठविली' अशा तऱ्हेचा कर्मभावसंकर प्रयोग प्रचारांतील शिष्ट भाषणांत आढळतो; त्याचप्रमाणें चतुर्थ्यन्त कर्म असतांही त्याचें विधिविशेषण त्याच्याच लिंगवचनाप्रमाणें उपयोगांत आलेलें आढळतें. जसें:—त्यानें तिला **बरी** केली, तिनें आपल्या बाहुलीला पाटावर **आडवी** ठेविली आहे, इ०.

( ऋ ) समजणें, मानणें, म्हणणें, इत्यादि कांहीं धातूंच्या चतुर्थ्यन्त कर्मानंतर त्या कर्मांचीं विधिविशेषणें कर्मनिष्ठ म्हणजे कर्माचे लिंगवचनाप्रमाणें असतात. जसें:—मी तिला **शहाणी** समजलों, बापानें त्याला **शहाणा** म्हटलें म्हणून तो चढला आहे, तूं त्याला **मोठा** मानूं नको, त्याच्या शिक्षकानें त्याला **दांडगा** मानिलें, इ०.

ह्यांपैकीं 'मी तिला शहाणी समजलों, तूं त्याला मोठा मानूं नको, इ०' ज्या वाक्यांत कर्तरि प्रयोग आहे, त्या ठिकाणीं कर्माचें विधिविशेषण कर्मनिघ्न असणें साहजिक आहे. तसेच 'बापानें त्याला शहाणा म्हटलें, शिक्षकानें त्याला दांडगा मानिलें' इत्यादि समज, मान, म्हण, या धातूंच्या प्रयोगांतही कांहीं दोष आहे असें म्हणतां येत नाहीं; इतकेंच नव्हे, तर बापानें त्याला शहाणें म्हटलें, शिक्षकानें त्याला दांडगें मानिले, अशा प्रकारचीं नपुंसकलिंगीं विधिविशेषणयुक्त वाक्यें फारशीं कोठें उपयोगांतही नाहींत. तेव्हां अशा प्रकारच्या वाक्यांचा विशेष विचार व योग्य खुलासा होणें इष्ट आहे.

प्रथम अशा प्रकारचीं कांहीं उदाहरणें घेऊं:—

गट—I
१ बापानें त्याला शहाणा म्हटलें, किंवा म्हटला.
२ शिक्षकानें त्याला दांडगा मानिलें, किंवा मानिला.
३ त्वां त्याला वेडा समजावें, किंवा समजावा.
४ मीं त्याला निजलेला पाहिलें, किंवा पाहिला.
५ त्यानें त्याला मेलेला पाहिलें, किंवा पाहिला.

इत्यादि.

या सर्व उदाहरणांतील विधिविशेषण चतुर्थ्यन्त कर्माचे लिंगवचनाप्रमाणें आहे. आतां गेल्या ( ऊ ) कलमांतील उदाहरणांकडे पहा.

गट—II
१ वैद्यानें रोग्यास बरा केला.
२ तिनें बाहुलीला उभी ठेविली
३ मालकानें त्याला मोकळा सोडिला.

इत्यादि.

या दुसऱ्या गटांतील उदाहरणांतही पहिल्याप्रमाणें विधिविशेषण चतुर्थ्यन्त कर्माचे लिंगवचनाप्रमाणें आहे. तेव्हां आतां पहिल्या व दुसऱ्या गटांतील उदाहरणांत काय फरक आहे असा प्रश्न साहजिक उत्पन्न होतो. त्याचें उत्तर असें कीं, या दुसऱ्या गटांतील उदाहरणांत येणारीं विधिविशेषणें भावे प्रयोगामध्यें विकल्पानें नपुंसकलिंगीं एकवचनींही येऊं शकतात. जसें:—

गट—II ( भावी प्रयोग)
१ वैद्यानें रोग्यास बरें केलें किंवा बरा केलें.
२ तिनें बाहुलीला उभें ठेविलें किंवा उभी ठेविलें.
३ त्यानें त्याला मोकळें सोडिलें किंवा मोकळा सोडिलें.

इत्यादि.

यावरून असें दिसून येईल कीं, पहिल्या गटांतील उदाहरणांतलीं विधिविशेषणें नेहमी चतुर्थ्यन्त कर्माचे लिंगवचनाप्रमाणें असतात; म्हणजे क्रियापद भावी ( तृ० पु० न० लिं० ए० वचनी ) झालें तरी चतुर्थ्यन्त कर्मांचें विधिविशेषण कर्मनिघ्नच राहतें. परंतु दुसऱ्या गटांतील उदाहरणांतलें क्रियापद भावी झालें असतां, चतुर्थ्यन्त कर्मांचीं विधिविशेषणें कर्मनिघ्न राहतात किंवा विकल्पानें नपुंसकलिंगी, म्हणजे क्रियापदाप्रमाणें भावी, होतात. दोन्ही गटांतील वाक्यांत कर्मभावसंकर किंवा भावी हे दोन्ही प्रयोग होतात. परंतु पहिल्या गटांतील उदाहरणांत कर्मभावसंकर हा प्रयोग असो किंवा भावी प्रयोग असो, त्यांतील कर्मांचीं विधिविशेषणें नेहमीं कर्मनिघ्नच असतात; तीं क्रियापदाबरोबर भावी ( नपुंसकलिंगी एकवचनीं ) कधींच होत नाहींत. तथापि दुसऱ्या गटांतील उदाहरणांत कर्मभावसंकर हा प्रयोग असतां, जरी कर्मांचीं विधिविशेषणें कर्मनिघ्नच असतात, तरी ह्या गटांतील उदाहरणांत भावी प्रयोग असतां, हीं विशेषणें विकल्पानें कर्मनिघ्न किंवा भावी होतात. इतकाच दोन गटांतील वाक्यांत फरक आहे.

[ कोणी म्हणतात कीं, भावेप्रयोगांचे वेळीं अशा प्रकारचीं विधिविशेषणें क्रियापदाबराबर सर्वत्र भावे म्हणजे नपुंसकलिंगी एकवचनीं व्हावीं; पण ह्या म्हणण्यांत अर्थ नाहीं, हें गोडबोले यांनीं आपल्या नवीन व्याकरणांत दाखविलें आहे. गोडबोले म्हणतातः—"म्यां तुला शहाणा केलें येथें शहाणाबद्दल शहाणें असावें असें अलीकडील कितीएक विद्वानांचें मत आहे. परंतु या मतास व्याकरणाचा कांहींच आधार दिसत नाहीं. जर शहाणाबद्दल शहाणें करावें तर ( शिवाजीनें आपणास राजा म्हणविलें, या उदाहरणांत ) राजाबदल राजें कां करूं नये ? जरी शहाणा हें विशेषण आहे तरी त्याचा अर्थ शाहाणा मनुष्य असा आहे. आणि म्यां तुला शहाणा मनुष्य केलें, हें वाक्य जर अशुद्ध होत नाहीं, तर म्यां तुला शहाणा केलें हें वाक्य अशुद्ध कसें होईल ? [ नवीन मराठी व्याकरण क० ६३७ ( ब ) पहा. ] आमच्या मतें या ठिकाणीं विधिविशेषणांसंबंधानें दोन्ही प्रकारचा प्रघात आहे. जेव्हां कर्मानंतर येणारें विधिविशेषण कर्मानिघ्न

असेल, तेव्हां त्यास कर्माचें विधिविशेषण म्हणावें; आणि जेव्हां तें क्रियापदाप्रमाणें नपुंसकलिंगी एकवचनीं असेल. तेव्हां त्यास क्रियाविशेषण म्हणावें हें बरें. असें केल्यानें वैकल्पिक रूढीची व्याकरणव्यवस्था योग्य होते. जातां जातां असें सांगतों कीं, विधिशेषणामध्यें क्रियाविशेषणत्व अंशतः नेहमींच असतें हें खरें, तथापि जोशीबोवांप्रमाणें ( प्रौढबोध क० ६६५ ) विधिविशेषण व क्रियाविशेषण ह्यां मधील फरक सर्वथा दूर करून विधिविशेषणास क्रियाविशेषणच म्हणणें योग्य नाहीं. असो.

कोणी असें म्हणेल कीं, 'वैद्यानें रोग्यास बरा केला' इत्यादि दुसऱ्या गटांतील उदाहरणांत आणि 'मीं त्याला निजलेला पाहिला' अशा मनुष्याचे पहिल्या गटांतील उदाहरणांत कर्मभावसंकर हा प्रयोग आहे, असें मानण्याचें तरी कारण काय? कर्मणि प्रयोगांतील कर्म प्रथमान्त असतें व भावे प्रयोगांतील कर्म चतुर्थ्यंत असतें, हा तरी तुमचाच नियम कीं नाहीं? जरी कर्म चतुर्थ्यन्त असलें, तरी क्रियापद कधीं कधीं कर्मणि असतें असा जर भाषेचा प्रचार स्पष्ट दिसतो आहे तर कर्मणि प्रयोगामध्यें कर्म प्रथमान्त असतें, असा साधारण नियम मानणें कसें योग्य होईल? एवंच 'वैद्यानें रोग्यास बरा केला' यास संकीर्ण प्रयोग समजण्याची आवश्यकता नाहीं; तर त्यास निव्वळ कर्मणि प्रयोग असें म्हणण्यास हरकत नसावी; आणि कर्मणि प्रयोगांतील कर्म कधीं कधीं चतुर्थ्यन्त असूनही धातुरूपेश असलें म्हणजे त्याचा धातूचे रूपावर अधिकार चालतो, असें म्हटलें म्हणजे झालें हें म्हणणें सकृद्दर्शनीं बरें दिसतें. परंतु सूक्ष्म विचारांतील त्यांतील शुष्कता व्यक्त होते. 'वैद्यानें रोग्यास बरा केला' इत्यादि वरील उदाहरणांतील सर्व कर्में तृतीय पुरुषीं आहेत, म्हणून वरील म्हणण्यांत कांहीं तरी तथ्य आहे असें वाटतें. परंतु या वाक्यांतील कर्मांचे जागीं प्रथम पुरुषीं किंवा द्वितीय पुरुषीं कर्म घालून पहा. 'वैद्यानें मला किंवा तुला बरा केला', 'त्यानें आम्हांला किंवा तुम्हांला मोकळे सोडिलें' अशा ठिकाणीं कर्मणि प्रयोग मानणें शक्य तरी आहे काय? केला, सोडिलें, हीं क्रियापदें मला व तुला, आणि आम्हांला व तुम्हांला ह्यांचे लिंगवचनांप्रमाणें आहेत हें खरें, तथापि तीं प्रथम किंवा द्वितीय पुरुषाचीं आहेत असें म्हणतां येत नाहीं; अर्थात् येथील क्रियापदांवर चतुर्थ्यन्त कर्मांचा पूर्ण छाप उठत नाहीं हें उघड आहे. यामुळें कर्म चतुर्थ्यन्त असतांही निव्वळ कर्मणि प्रयोग होऊं शकतो असें म्हणणें जरी कांहीं उदाहरणांवरून सकृद्दर्शनीं बरें वाटलें, तरी वास्तविक अशा ठिकाणीं संकीर्ण प्रयोगच आहे असें म्हणणें भाग आहे. तेव्हां कर्मभावसंकर हा प्रयोग असतां, दोन्ही गटांतील उदाहरणें अगदीं एक होत. मात्र भावी प्रयोगाचे वेळीं दुसऱ्या गटांतील वाक्यांतलें कर्माचे विधिविशेषण विकल्पेंकरून नपुंसकलिंगी एकवचनीं होतें; तसें तें पहिल्या गटांतील वाक्यांतल्या भावेप्रयोगाचे वेळीं होत नाहीं तर कर्मनिघ्नच राहतें; हा फरक वर सांगितलाच आहे.

तथापि क्वचित् ' शिक्षकानें त्या विद्यार्थ्यास **वेडें** किंवा **शहाणें** मानिलें ' असा नपुंसकलिंगी एकवचनीं विधिविशेषण असलेला पहिल्या गटांतील वाक्यांचाही भावी प्रयोग क्वचित् आढळेल, नाहीं असेंच म्हणतां येत नाहीं. तरी तो एकदेशी, व विलक्षण असून, स्वीकारार्ह नाहीं हें उघड आहे. तेव्हां व्याकरणदृष्ट्या तो जमेस धरण्याचें कारण नाहीं.

आतां या वाक्यांसंबंधानें अलीकडील नवीन वैयाकरणांचें काय मत आहे तें पाहूं. जोशीबोवा म्हणतातः--' करणें, समजणें, मानणें, इत्यादि थोड्या क्रियापदांसच फक्त विशेषणात्मक अप्रत्यक्ष कर्म असतें. ' [ प्रौढबोध, क० ६७१. पहा. ]. खेर यांनीं आपल्या व्याकरणांत [ इंग्रजी क० ६०८ Note (b) पहा. ] जोशीबोवांच्या नियमाचेंच बहुतेक भाषान्तर केलें आहे. तेव्हां जोशी व खेर ह्यांचे मताप्रमाणें पहिल्या गटाचे वाक्यांतील चतुर्थ्यन्त शब्द प्रत्यक्ष कर्म असून, त्या कर्माचे नंतर येणारें तन्निष्ठ विधिविशेषण हें विशेषणात्मक अप्रत्यक्ष कर्म होय. येथील विधिविशेषणास अप्रत्यक्ष कर्म म्हणणें हें आमच्या मतें प्रशस्त नाहीं. जोशीबोवांचें हें मत अलीकडे बदललें असावें, असें म्हणण्यास जागा आहे. मराठी व्याकरणावरील त्यांच्या अलीकडल्या एका पुस्तकांत ते म्हणतातः--' करणें, बनविणें, नेमणें, म्हणणें, म्हणविणें, समजणें, मानणें, इत्यादि क्रियापदांशीं कित्येक कर्मपदांचा निकट संबंध येऊन जसें काय त्या कर्मपदांसह हें संयुक्तक्रियापद बनतें. आणि ती ती क्रिया ज्याच्यावर घडते तें कर्मपद असें अर्थात् वाटतें. जसेंः—मी त्याला आपला मित्र समजतों, शाहूनें बाळाजीस पेशवा केलें किंवा नेमिलें, इत्यादि. यांत मित्र आणि पेशवा हीं कर्मपदें असून, त्याला आणि बाळाजीस यांची संप्रदानार्थी चतुर्थी विभक्ति आहे. संप्रदानार्थी चतुर्थी हें अप्रत्यक्ष कर्मपदच असतें. ' [ विद्याखात्यानें मंजूर केलेलें जोशीकृत बालबोध व्याकरण. पुस्तक दुसरें, पृष्ठ १६२ ( आ ) पहा. ] या उताऱ्यावरून वादविषयक वाक्यांतील विधिविशेषणास विशेषणात्मक अप्रत्यक्ष कर्म समजण्यास ते पूर्वीप्रमाणें हल्लीं तयार असतील असें वाटत नाहीं. म्हणजे अलीकडील त्यांच्या मताप्रमाणें हीं विधिविशेषणेंच वास्तविक खरीं कर्मे असून चतुर्थ्यन्त शब्द संप्रदानार्थी होत म्हणजे चतुर्थ्यन्त शब्दच अप्रत्यक्ष कर्मे होत असें दिसतें. या मताप्रमाणें ' बापानें त्याला शहाणा म्हटला, शिक्षकानें त्यांनां दांडगे मानिले, त्वां त्याला वेडा समजावा ' इत्यादि वाक्यांतील त्याला, त्यांना, त्याला हे चतुर्थ्यन्त शब्द अप्रत्यक्ष कर्मे असून शहाणा, दांडगे, वेडा हीं प्रत्यक्ष कर्मे होत; आणि म्हटला, मानिले, समजावा हीं क्रियापदें ह्या प्रत्यक्ष कर्मांप्रमाणें असल्यामुळें या वाक्यांत कर्मणिप्रयोग आहे. परंतु या वाक्यांतील त्याला सारखे चतुर्थ्यन्त शब्द केवळ संप्रदानार्थी अप्रत्यक्ष कर्मे आणि शहाणा, दांडगा, हीं विधिविशेषणें प्रत्यक्ष कर्मे होत, हें जोशीबोवांचें नवीन मत

पाहून त्यांचें पूर्वीचेंच मत बरें म्हणावें लागतें. आमच्या मतें या वाक्यांतील चतुर्थ्यन्त शब्दच प्रत्यक्ष कर्में असून शहाणा, दांडगे, वेडा, हीं त्यांचीं कर्मगामी विधिविशेषणें होत. आणि क्रियापदें चतुर्थ्यन्त कर्मांच्या लिंगवचनाप्रमाणें फिरत असल्यामुळें या वाक्यांत वर सांगितल्याप्रमाणें कर्मभावसंकर हा प्रयोग आहे हें उघड आहे. आतां वरील वाक्यांचीं 'बापानें त्याला शहाणा म्हटलें,' 'शिक्षकानें त्यांनां दांडगे मानिले,' 'त्वां त्याला वेडा समजावें,' अशीं जीं तृ० पु० न० लिं. ए. वचनीं क्रियापदानें युक्त रूपें होतात, त्यांतील रचनेची व्यवस्थाही सरळ आहे. ती अशीः—या वाक्यांत बापानें, शिक्षकानें, त्वां, हे तृतीयान्त शब्द कर्ते होत; त्याला, त्यांना त्याला, हे चतुर्थ्यन्त शब्द कर्में; आणि म्हटलें, मानिलें, व समजावें हीं तृ० पु० न० लिं० एकवचनीं क्रियापदें होत. हीं क्रियापदें कर्ता किंवा कर्म ह्यांपैकीं एकाचेही तंत्रानें वागत नसून केवळ स्वतंत्र असल्यामुळें या वाक्यांत भावेप्रयोग आहे हें उघड आहे.

शिवाजीनें आपणास राजा म्हणविलें' या वाक्यांत राजा हें म्हणविलें या क्रिपापदाचें Factitive object म्हणजे एका प्रकारचें अप्रत्यक्ष कर्म होय असें खेर यांनीं P. 414 म्हटलें आहे. यावरून जोशी यांच्या प्रौढबोधांतील मताप्रमाणें त्यांचेही मतें वरील वाक्यांत विशेषणात्मक अप्रत्यक्ष कर्में आहेत. आतां शिवाजीनें आपणास राजा म्हणविलें,' 'बापानें त्याला शहाणा म्हटलें' इत्यादि वाक्यांत राजा, शहाणा-इ० नामांस किंवा विशेषणास अप्रत्यक्ष कर्म न म्हणतां कर्मगामी विधिनामें किंवा विधि, विशेषणें असेंच कां म्हणावें ह्याचें स्पष्टीकरण केलें पाहिजे. याकरितां या वाक्यांचें मूळ स्वरूप पाहूं. प्रथम 'बापानें त्याला शहाणा म्हटलें' या उदाहरणाकडे पहा. याचें आरंभींचें स्वरूप असेंः—बापानें--तो शहाणा आहे असें म्हटलें, ह्यांपैकीं 'तो शहाणा आहे.' या वाक्यांत तो हा कर्ता आणि शहाणा हें विधिविशेषण कर्तृगामी आहे हें उघड आहे. या विस्तृत वाक्यांतील तो हा कर्ता, संक्षिप्त वाक्यांत कर्म होऊन शहाणा हें त्याचें विधिविशेषण तसेंच राहून 'बापानें त्याला शहाणा म्हटलें' असा प्रयोग प्रचारांत आला. यावरून शहाणा हें म्हटलें ह्याचें अप्रत्यक्ष कर्म नव्हे हें उघड आहे. आतां याचप्रमाणें 'शिवाजीनें आपणास राजा म्हणविलें' या वाक्याकडे पहा. यांतील क्रियापद प्रयोजक आहे. तेव्हां त्यांतील अगदीं मूळ धातूपासून निघून येथपर्यंत कसकशी वाक्य-रचना होत जातें तें पहा. लोक—तो राजा आहे—असें म्हणाले लोक त्याला राजा म्हणाले; शिवाजीनें लोकांकडून आपणाला ( हा शब्द त्याला ह्याचेबद्दल येत आहे; आपणाला हें कर्त्यासंबंधानें येणारें आत्मवाचक सर्वनाम होय ) राजा म्हणविलें, शिवाजीनें आपणाला राजा म्हणविलें. अशी या वाक्याचे स्वरूपांची परंपरा दिसते. या परंपरेंत राजा या नामाचे ठायीं कर्मत्वाचा भास कोठेंही होत नसून, राजा हें नाम सर्वत्र विधिनाम आहे हें उघड आहे. संस्कृ-

तांतही अशा प्रकारची रचना आढळते. ' क्रमादमुं नारद इत्यबोधि सः,' 'अवैमि चैनामनघेति' ( Apte's Guide to Sanskrit Composition § 255 a) या ठिकाणीं नारद हा शब्द विधिनाम आणि अनघा हा शब्द विधिविशेषण आहे; आणि हे दोन शब्द अमुं आणि एनां या कर्मांस उद्देशून आलेले आहेत, व त्यांचे ठायीं कर्माचा आभासही नाहीं हें उघड आहे. परंतु इति हें अव्यय जर वरील संस्कृत रचनेंतून काढून टाकिलें, तर नारद आणि अनघा हे शब्द द्वितीया विभक्तींत येतात; म्हणजे वरील वाक्यें ' क्रमादमुं नारदमबोधि सः, ' आणि ' अवैमि चैनामनघाम् ' अशीं होतात. तथापि या ठिकाणींसुद्धां नारदं आणि अनघां ह्या पदांतील द्वितीया अबोधि आणि अवैमि या क्रियापदांस उद्देशून आलेली नसून ती अमुं आणि एनां या कर्मांसच उद्देशून आलेली आहे.

आतां ' शिवाजीनें आपणास राजा म्हणविलें ' आणि ' बापानें त्याला शहाणा म्हटलें ' हीं वाक्यें आणि ' शिवाजीनें लोकांकडून आपणाला--तूं राजा आहेस-- असें म्हणविलें ' आणि ' बापानें त्याला--तूं शहाणा आहेस--असें म्हटलें ' हीं वाक्यें सर्वस्वी एकच होत असें जर म्हटलें, तर आपणास आणि त्याला हीं चतुर्थ्यन्त पदें अप्रत्यक्ष कर्में होऊन राजा आणि शहाणा ह्यांचे नंतर ' असें ' हें प्रत्यक्ष कर्म अध्याहृत समजावें लागेल. आणि भावी प्रयोगाचे जागीं प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोग मानावा लागेल. या मताप्रमाणें सुद्धां राजा आणि शहाणा या शब्दांकडे अप्रत्यक्ष कर्मत्व किंवा प्रत्यक्ष कर्मत्व येत नाहीं, तर या शब्दांची प्रथमा मानून तिचा अर्थ उद्देश असें ह्या अध्याहृत कर्माकडे, असें व्याकरण केलें पाहिजे. हा पक्ष जोशीबोवांच्या नवीन मतास कांहींसा अनुकूल आहे. परंतु ते राजा व शहाणा ह्यांसच जर प्रत्यक्ष कर्म असें म्हणत असतील तर तें मात्र बरोबर नाहीं हें उघड आहे.

येथपर्यन्तचें सर्व विवेचन म्हण, मान, समज, या व या अर्थाचे धातूंस लागू आहे. परन्तु बनविणें, करणें, नेमणें या धातूंस जोशीबोवांनीं यांचेच मालिकेंत गोंविलें आहे. त्यांस जोशीबोवांचें हें नवीन मत लागू करणें कठिण आहे. दुर्योधनानें कर्णास राजा केलें-बनविलें, सरकारनें त्यास मामलेदार नेमिलें, शाहूनें बाळाजीस पेशवा केलें-नेमिलें, इ० वाक्यांत कर्णास, त्यास, बाळाजीस, ' ह्यांची संप्रदानार्थी चतुर्थी विभक्ति आहे. संप्रदानार्थी चतुर्थी हें अप्रत्यक्ष कर्मपदच असतें ' असें म्हणून राजा, मामलेदार, पेशवा, या शब्दांस प्रत्यक्ष कर्म कसें करावें किंवा त्याचें नंतर ' असें ' हा शब्द तरी कसा अध्याहृत समजावा हें एक कोडेंच आहे. ' दुर्योधनानें कर्णास राजा असें केलें ' अशा प्रकारें ' असें ' शब्द असलेली रचना कोठेंच आढळत नाहीं, आणि या ठिकाणीं तो शब्द अध्याहृत समजण्यास कांहीं कारणही दिसत नाहीं. आणि ' शाहूनें बाळाजीस पेशवा केलें-नेमिलें ' या सारख्या वाक्यांत ' पेशवा ' वगैरे प्रथमान्त नामांस जर

अप्रत्यक्ष कर्म मानिलें, तर या वाक्यांतील प्रयोगाचीही एक नसतीच अडचण उत्पन्न होते. म्हणजे या वाक्यांतील क्रियापद असहाय किंवा असंयुक्त असूनही प्रथमान्त कर्म असलेला अपवादक भावी प्रयोग झाला आहे, असें विनाकारण म्हणावें लागेल. आमच्या मतें प्रस्तुत वाक्यांत कर्णास, व्यास, बाळाजीस हीं चतुर्थ्यन्त नामेंच प्रत्यक्ष कर्में असून राजा, मामलेदार, पेशवा हीं प्रथमान्त नामें कर्मगामी विधिनामें असून सरळ रीतीचा प्रधानकर्तृक भावी प्रयोग आहे. आमच्या मताचे पुष्ट्यर्थ एक मुद्दा सांगतों. तो असा. त्यानें ब्राह्मणास दक्षणा दिली, यासारख्या ज्या वाक्यांत वास्तविक दोन कर्में आहेत त्यांचा नवीन कर्मणिप्रयोग दोन प्रकारांनीं होतो. जसें:—त्याच्याकडून ब्राह्मण दक्षणा दिला गेला, आणि त्याच्याकडून ब्राह्मणास दक्षणा दिली गेली. म्हणजे नवीन कर्मणि प्रयोगांत मूळ प्रयोगांतील प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष या दोन कर्मांपैकीं कोणतेंही कर्म धातुरूपेश होणें स्वाभाविक आहे. परंतु शाहूकडून बाळाजी पेशवा केला गेला, किंवा नेमिला गेला अशा तऱ्हेचा एकच नवीन कर्मणि प्रयोग होतो. शाहूकडून बाळाजीस पेशवा केला गेला अशा प्रकारचा प्रयोग होतो असें दिसत नाहीं. यावरूनही प्रस्तुत वाक्यांत दोन कर्में नाहींत, आणि यांतील प्रथमान्त नामें हीं वास्तविक कर्में नसून केवळ कर्मगामी विधिनामें किंवा विधिविशेषणें आहेत हें उघड आहे.

५९४. क्रियाविशेषणांपैकीं जीं आकारान्त क्रियाविशेषणें मूळचीं विशेषणें आहेत तीं कर्ता किंवा कर्म ह्यांचे तंत्रानें फिरतात. त्यांच्याबद्दलचे नियम पूर्वीं विकरणप्रकरणीं दिले आहेत. (अंक ३८९ पहा.)

(अ) संबंधी क्रियाविशेषणें वाक्येंही जोडतात; म्हणून तीं अंशतःउभयान्वयी अव्ययेंही असतात. जसें:—जेव्हां मी त्याचे घरीं गेलों तेव्हां तो घरीं नव्हता; या ठिकाणीं 'मी त्याचे घरीं गेलों' आणि 'तो घरीं नव्हता' हीं दोन वाक्यें जेव्हां व तेव्हां या क्रियाविशेषणांनीं जोडण्यांत आलीं आहेत, म्हणून तीं वाक्यमीमांसेचे दृष्टीनें अंशतः उभयान्वयी अव्ययांचें काम करीत आहेत हें उघड आहे.

**टीप**—जोशी ह्यांचे मतें विधिविशेषणें व क्रियाविशेषणें यांचेमध्यें फरक नाहीं; म्हणून ते विधिविशेषणांस एकजात क्रियाविशेषणें असें म्हणतात. (प्रौढबोध. क० ६६५). विधिविशेषणें क्रियापदाजवळ येतात व त्यांनीं कधीं कधीं क्रियेचें विशिष्टत्वही अंशतः दाखविलें जातें, ह्या गोष्टी खऱ्या आहेत. तरी त्यांनां एकजात क्रियाविशेषणें म्हणणें योग्य नव्हे. हा मुलगा उंच आहे, तो मुलगा हुषार आहे, त्याला मी निजलेला पाहिला, इत्यादि ठिकाणचीं उंच, हुषार, निजलेला, हीं विशेषणें केवळ विधिविशेषणें होत; म्हणजे तीं आपल्या

विशेष्यांचे नंतर आलीं आहेत. तीं क्रियापदाच्या जवळ आलीं आहेत, हें खरें; तथापि त्यांनीं क्रियेचें विशिष्टत्व दाखविलें जात आहे असें म्हणतां येत नाहीं. म्हणून व्याकरणदृष्ट्या विधिविशेषणांस सर्वत्र क्रियाविशेषणें म्हणणें योग्य नाहीं. त्याचप्रमाणें वाक्यपृथक्करणाचे दृष्टिनेंही विधिविशेषण व क्रियाविशेषण ह्यांमध्यें फरक आहे. तो वाक्यपृथक्करणाचे निरूपणांत स्पष्ट होईल. सध्या इतकेंच सांगणें पुरे आहे कीं वाक्य-पृथक्करणाचे दृष्टिनें क्रियाविशेषणें हीं नेहमीं विधेयाविस्तार या सदरांत येतात. म्हणून विधिविशेषणें जेव्हां विधेयविस्तार या सदरांत येतील तेव्हांच त्यांस क्रिया-विशेषणें हें नांव साजेसें आहे. परंतु तीं पूरकाच सदरांत येतात त्या वेळींही त्यांस क्रियाविशेषणें हें नांव देणें नुसतें अयोग्यच नव्हे तर साफ चुकीचें आहे हें उघड आहे. म्हणून जोशीबोवांच्या ह्या दोषाचें मुद्दाम आविष्करण करून निराकारण करणें भाग पडलें. ]

५९५. वाक्यांतील दोन नामें किंवा इतर शब्द जेव्हां **आणि, व,** इ० समुच्चयबोधक अथवा **किंवा, अथवा,** इत्यादि विकल्पबोधक उभया-न्वयी अव्ययांनीं जोडण्यांत येतात, तेव्हां हीं अव्ययें त्या दोन शब्दांचे मध्यें येतात; आणि जेव्हां जोडण्यांत येणारे शब्द दोहोंपेक्षां अधिक असतात तेव्हां तीं बहुधा शेवटल्या दोन शब्दांचे मध्यें येतात किंवा कधीं कधीं प्रत्येक जोडीचेही मध्यें येतात. जसें:—रामा आणि गोविंदा गेले; मला एक चाकू किंवा कात्री दे; नाम, सर्वनाम, विशेषण, व क्रिया-पद हे विकारी शब्दांचे चार वर्ग आहेत; मला भात, किंवा भाकरी किंवा पोळी, कांहींही चालेल; इ०.

टीपः—यासंबंधानें इतकेंच ध्यानांत ठेवावें कीं, समुच्चयबोधक किंवा विकल्पबोधक उभयान्वयी अव्यय प्रत्येक जोडीचे मध्यें घालावयाचे असतां तें ह्या सर्व जोड्यांचेमध्यें एकच घालावें; म्हणजे एकदां एक व नंतर दुसरें, म्हणजे पहिल्या व दुसऱ्या शब्दांचे मध्यें एक, दुसऱ्या व तिसऱ्या शब्दांचे मध्यें दुसरें, असा फरक करणें भाषासरणीचे दृष्टीनें प्रशस्त नाहीं. जसें:—राम व लक्ष्मण, व सीता हीं वनवासास गेलीं; तूं किंवा रामा किंवा गोविंदा ह्यांपैकीं कोणी आला तरी चालेल; इ० या ठिकाणीं राम व लक्ष्मण आणि सीता असें म्हणणें आणि तूं किंवा रामा अगर गोविंदा अथवा कृष्णा असें म्हणणें भाषेस शोभत नाहीं हें उघड आहे.

५९६. संकेतदर्शक उभयान्वयी अव्ययांचे संबंधानें पुढील गोष्टी स्मरणीय आहेत.

( अ ) संकेतवाक्याचे पूर्वामधील अट आज्ञार्थानें दाखविण्यांत आली असतां, म्हणजे त्यांतील क्रियापद ऊ— आख्यातीं असतां ‘ म्हणजे ’ किंवा

' कीं ' या उभयान्वयी अव्ययाचा पूर्वाचे अंतीं व उत्तराचे आरंभीं उपयोग होतो; आणि त्यांच्या जोडीनें दुसरें अव्यय त्यांच्या मागें किंवा पुढें यावें लागत नाहीं. जसें:—तूं खरा प्रकार काय तो सांग म्हणजे तुला माफी मिळेल, तूं अभ्यास चांगला कर म्हणजें तूं खात्रीनें उत्तीर्ण होशील, तूं दादासाहेबांची शिफारस मिळव कीं, तुझें कार्य खात्रीनें होईल, इ०.

( आ ) संकेतवाक्याचे पूर्वामधील विधान जेव्हां वक्त्यास किंवा लेखकास मान्य असतें आणि त्याला जेव्हां पूर्व व उत्तर ह्यांचे मधील विरोध व्यक्त करावयाचा असतो, तेव्हां तो जर–तर ह्याचा उपयोग न करितां त्यांचे जागीं जरी–तरी, यद्यपि–तथापि, किंवा, किती कां–या अव्ययांचा उपयोग करितो; जसें:—त्यानें मला जरी बोलाविलें तरी मी जाणार नाहीं, रामा गोविंदापेक्षां जरी शक्तीनें सरस आहे तरी गोविंदाचें कौशल्य त्याचे अंगीं नाहीं, तो किती कां शक्तिमान् असेना त्याचें तुझ्यापुढें कांहीं एक चालावयाचें नाहीं; त्यानें जरी हें पाप केलें तरी तो श्रेष्ठच आहे; इ०.

( इ ) कधीं कधीं आज्ञा, ताकीद, धाक, धमकी, अशा प्रकारचा निवळ अर्थ असतां जर–तर ह्या अव्ययांचे उपयोगानें झालेलें संकेत-वाक्य आढळतें. जसें:—येथून हालशील तर खबरदार=येथून हालूं नको, तूं ह्यापुढें जर एक चकार शब्द बोलशील तर तें माझ्या कामास पडावयाचें नाहीं=तूं ह्यापुढें एक चकार शब्दही बोलतां कामा नये किंवा बोलूं नको, इ०.

५९७. शब्दयोगीं अव्ययांसंबंधाचें सविस्तर निरूपण झालेंच आहे. कांहीं शब्दयोगी अव्ययांचा उपयोग धातूंच्या ईआख्यातांतील रूपांपुढें होतो. तेव्हां तें शब्दयोगी अव्यय मागल्या संबंध वाक्यापुढें आलें आहे असें म्हणतात. जसें मी तिकडून येईपर्यंत तूं थांब, या ठिकाणीं पर्यंत हें शब्दयोगी अव्यय ' मी तिकडून येई ' या नामासारख्या वाक्याचे पुढें आलें आहे. या दृष्टीनें पर्यंत, पावेतों, हीं शब्दयोगी अव्ययें या ठिकाणीं उभयान्वयी अव्ययांचेंही काम करीत आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

( अ ) ईआख्याताचे रूपापुढें पर्यंत वगैरे शब्दयोगी अव्ययें येतात, त्या वेळीं या आख्यातापासून वर्तमान, भूत, आणि भविष्य, या तिन्ही काळांचा बोध होतो, जसें:--सूर्य उगवेपर्यंत ( उगवतो तोंपर्यंत ) तो निजतो; सूर्य मावळेपर्यंत ( मावळला तोंपर्यंत ) आम्ही काल वाचीत होतों; माझें जेवण संपेपर्यंत ( संपेल तोंपर्यंत ) तूं बस. इ०.

( आ ) ईआख्याताचे पुढील पर्यंत वगैरे शब्दयोगी अव्ययांच्या उपयोगासंबंधानें दादोबा आपल्या पूरणिकेंत म्हणतात:--' यांत प्रथम आणि तृतीय पुरुषांचे रूपांपुढें मात्र असा प्रयोग प्रशस्त; परंतु द्वितीय पुरुषाच्या आणि अनेकवचनाच्या रूपांपुढें तोंपर्यंत या संयुक्त क्रियाविशेषणाचा प्रयोग प्रशस्त जाणावा. ' ( पूरणिका. क० २६ )

जोशीबोवा म्हणतात:--' परंतु द्वितीय पुरुषीं एकवचनीं व तृतीय पुरुषीं बहुवचनीं शेवटच्या ' ई ' चा लोप होतो, व द्वितीय पुरुषीं बहुवचनीं जाई असें रूप होतें. ' [ प्रौढबोध, क० ७३२ ( ऋ ) पहा.]

जोशी यांचीं उदाहरणें.

| | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० पु० | मी जाई पर्यंत | आम्ही जाऊं पर्यंत |
| द्वि० पु० | तूं जास पर्यंत | तुम्ही जाईपर्यंत |
| तृ० पु० | तो जाई पर्यंत | ते जात पर्यंत |

आमच्या मतें ईआख्याताचे तृतीयपुरुषाच्या एकवचनापुढें पर्यंत हें शब्दयोगी अव्यय येऊन होणारें ' जाईपर्यंत ' ह्या सारखें रूप तिन्ही पुरुषीं दोन्हीं वचनीं सर्वत्र दृष्टीस पडतें; मात्र तृतीय पुरुषाचे अनेक वचनीं विकल्प आढळतो. तेव्हां शिष्टप्रचार पुढीलप्रमाणें दिसतो.

| | ए० व० | अ० व० |
|---|---|---|
| प्र० पु० | मी जाईपर्यंत | आम्ही जाईपर्यंत |
| द्वि० पु० | तूं जाईपर्यंत | तुम्ही जाईपर्यंत |
| तृ० पु० | तो जाईपर्यंत | ते जाईपर्यंत किंवा जातपर्यंत |

तृतीय पुरुषीं अनेक वचनीं मात्र ' ते जाईपर्यंत ' ह्याचे बरोबर ' ते जातपर्यंत ' असा नियमित प्रयोगही बराच आढळतो. जोशीबोवांनीं

दिलेलीं प्रथम व द्वितीय पुरुषांच्या एकवचनाचीं रूपें क्वचित् आढळत असतील; पण ' आम्ही जाऊंपर्यंत ' हें प्रथम पुरुषाच्या अनेक वचनाचें रूप तर आमच्या ऐकिवांत मुळींच नाहीं. एवंच ' जाईपर्यंत ' हें रूप जसें तिन्ही काळीं एकच तसेंच तें तिन्ही पुरुषीं, तिन्ही लिंगीं, व दोन्ही वचनीं एकच. मात्र तृतीय पुरुषाचे अनेक वचनीं ' जातपर्यंत ' ह्याचाही विकल्पानें प्रचार आढळतो.

---

# अध्याय ६.

## इतर शब्द—पुढें चालू.

### ( कृदन्त–विचार. )

आतां कृदतांच्या उपयोगाकडे वाक्यरचनेच्या दृष्टीने पहावयाचें आहे. कृदन्तांची साधनिका, त्यांचा संयुक्तक्रियापदांचे कामीं होणारा उपयोग आणि त्यांचे अर्थ ह्या गोष्टींचा विचार पूर्वीं होऊन गेलाच आहे. येथें त्यांचा वाक्यरचनेच्या दृष्टीनें म्हणजे विशेषेंकरून त्यांतलि धातूंचा कर्ता, कर्म, व त्यांचा कृदन्तांशीं संबंध या दृष्टीनें विचार करावयाचा आहे. हा विचार कांहीं अंशीं रे० नवलकर ह्यांनीं केलेला दिसतो. परंतु त्याच्याशिवाय इतर वैयाकरणांचे या मुद्याकडे जावें तितकें लक्ष गेलेलें दिसत नाहीं. तेव्हां आतां प्रत्येक मुख्य मुख्य कृदन्त घेऊन त्याकडे पाहूं.

**णें-कृदन्त** ( जाणें, येणें, करणें, इ० )

५९८. या कृदन्तासंबंधानें पुढील गोष्टी आढळतातः—

( अ ) ह्याचा जेव्हां क्रियावाचक नामाप्रमाणें उपयोग होतो, तेव्हां तें बहुधा त्यांतील धातूच्या कर्तृवाचक शब्दाचे षष्ठीपुढें येतें. हें भाववाचक म्हणजे धर्मवाचक नाम असल्यामुळें ह्याचा अनेकवचनीं फारसा उपयोग होत नाहीं. तथापि तद्दर्शक धर्माचे प्रकार दाखविणें झाल्यास त्याचे अनेकवचनाचा उपयोग होतो. तरी एकंदरींत अनेकवचन क्वचित् येतें यांत संशय नाहीं. जसें:—अशा प्रसंगीं **त्याचें** तेथें जाणें योग्य नाहीं, **आपल्या** येण्यानें विशेष शोभा येणार आहे, **त्याच्या**

कालच्या वागण्याचा हा परिणाम आहे, **त्याचीं बोलणीं** कोठपर्यंत सहन करावीं ? इ०.

या सर्व उदाहरणांत येणें, जाणें, बोलणें, इत्यादि शब्दांचे जागीं आगमन, गमन, भाषण, इत्यादि संस्कृत नामें जरी घातलीं तरी रचना व अर्थ हीं जशींच्या तशींच राहतात. जसें:—त्याचें गमन योग्य नाहीं, आपल्या आगमनानें शोभा येणार आहे, इ०. यावरून प्रकृत कृदन्तें वरील उदाहरणांत नामांप्रमाणें उपयोगांत आलीं आहेत हें उघड आहे.

( आ ) नामांप्रमाणें यांचे पुढें शब्दयोगी अव्ययें आणि मागें विशेषणें येऊं शकतात. जसें:—त्याच्या **येण्यावर** पुढील गोष्टी अवलंबून आहेत. त्याच्या **जाण्यापासून** तुला काय फायदा ? त्याचें **अस्पष्ट** बोलणें मला समजलें नाहीं, इ०.

( इ ) हीं **णें** कृदन्तें व त्यांच्या पाठीमागें येणारे त्यांचे षष्ठयन्त कर्ते यांचे मध्यें कधीं कधीं क्रियाविशेषणेंही येतात. हीं क्रियाविशेषणें त्या कृदन्त नामांतील धातूच्या क्रियेची रीति किंवा प्रकार दाखवितात. जसें:—त्याच्या **बरें** होण्यावर बऱ्याच गोष्टी अवलंबून आहेत; तुझ्या **जलद** चालण्यानें मला त्रास होत आहे, ह्याचें **तेथें** बसणें मला पसंत नाहीं, इ०.

( ई ) या नामांतील धातूंच्या क्रियेशीं क्रियाविशेषणांशिवाय अन्य शब्दांचाही संबंध येऊं शकतो. जसें:—त्याचें **घोड्यावर** बसणें, तुझें **जमिनीवर** निजणें, त्याचें **अनवाणी** किंवा **पायीं** चालणें, त्याचें **एका वस्त्रानें बाहेर** पडणें, इ०.

( उ ) हें णेंकारान्त धातुसाधित नाम सकर्मक धातूपासून आलें असल्यास त्या धातूचे कर्तरि प्रयोगांतील नियमाप्रमाणें प्रथमान्त किंवा चतुर्थ्यन्त कर्म, षष्ठयन्त कर्ता व धातुसाधित नाम ह्यांचे मध्यें येतें. जसें:—त्याचें पत्र लिहिणें संपेल तेव्हां, तुझें नेहमीं नाटकें व कादंबऱ्या वाचणें चांगलें नाहीं, मांजराचें उंदरास पकडणें तूं कधीं पाहिलें आहेस काय ! गोविंदरावांचें मुलास मारणें केवळ अविचारचें होय, इ०.

**टीप**—णेंकारान्त कृदन्त नाम आणि णकारान्त कृदन्त नाम ह्यांमधील फरक ध्यानांत ठेवावा. णेंकारान्त कृदन्तनाम सर्व धातूंपासून साधतें; णकारान्त कृदन्त नाम कांहीं धातूंपासूनच साधतें; कर, जा, इत्यादि कांहीं धातूंपासून साधत नाहीं. णेंकारान्त कृदन्त सकर्मक धातूपासून साधलें असल्यास त्यांचें

कर्म त्याचे मागें प्रथमान्त किंवा चतुर्थ्यन्त असतें, णकारान्त कृदन्त नाम सकर्मक धातूपासून साधलें असल्यास त्याचें कर्म त्याचे मागें षष्ठ्यन्त असावें लागतें. जसें:—त्यानें त्याला तारणें, स्वाभाविक आहे; त्याजकडून त्याचें तारण झालें, मला पोसणें, माझें पोषण; इ०.

५९९. णेंकारान्त नामाचा कर्ता कधीं कधीं तृतीयान्त आढळतो, जसें:—अशा वेळीं त्यानें जाणें बरें नाहीं, त्वां किंवा तूं त्याला वारंवार बोलणें इष्ट नाहीं, तूं किंवा तुझ्या भावानें असा परस्पर व्यवहार करणें मला पसंत नाहीं, इ०.

**टीप**—कर्ता तृतीयान्त असतां णेंकृदन्त नामास तृतीयेशिवाय इतर सर्व विभक्ति व शब्दायोगी अव्ययें लागतात. जसें:—त्यानें **जाण्याला** कांहीं हरकत नाहीं, त्यानें तेथें **जाण्यापासून** काय फायदा, रामानें तिकडे **जाण्यापेक्षां** इकडे येणें अधिक हितावह नाहीं काय, त्यांनीं इतका खटाटोप करण्याचा काय उपयोग ? आतां त्यानें तेथें **जाण्यांत** कांहीं अर्थ नाहीं, त्यानें पास **होण्यावरच** सर्व अवलंबून आहे, इ०. परंतु त्यानें जाण्यानें, त्यानें लिहिण्यानें असे प्रयोग सहसा होत नाहींत. ह्यांचे जागीं त्याचे जाण्यानें, त्याच्या लिहिण्यानें असें म्हणण्याचा शिष्ट प्रचार दिसतो. म्हणजे या णेंकारान्त धातुसाधित नामास तृतीयेचे प्रत्यय लागतांनां त्यांचा कर्ता तृतीयान्त न राहतां षष्ठ्यन्त होतो.

६००. अकर्मक धातूंपासून साधलेल्या या कृदन्ताचा कर्ता कधीं कधीं प्रथमान्तही आढळतो. जसें:—तो येणें किंवा जाणें चांगलें, अशा प्रसंगीं त्याचा बाप मरणें हे मोठेंच दुर्दैव होय, इ०. परंतु तो काम करणें, तो पत्र लिहिणें, गोविंदा पुस्तक वाचणें, असे प्रयोग कधींच होत नाहींत.

( अ ) प्रथमान्त कर्ता असतांही अकर्मक धातूंपासून साधलेल्या या नामांस सर्व विभक्ति व शब्दयोगी अव्ययें लागतात. जसें:—तो उठण्याशीं तुला काय करावयाचें आहे, तो उठण्याला अद्याप अवकाश आहे. तो जाण्यापासून तुझें कांहीं नुकसान नाहीं, तो येण्याचाच अवकाश आहे त्याचा भाऊ इकडे इतक्या लांब येण्यांत फक्त कालाचा व पैशाचा अपव्यय होणार, रामा मुंबईहून येण्यावर ती गोष्ट अवलंबून आहे, इ०.

( आ ) अशा ठिकाणचे धातुसाधित नाम चतुर्थ्यन्त असतां त्यांतील धातूचा कर्ताही विकल्पेंकरून चतुर्थ्यन्त होतो. जसें:—तो येण्याला किंवा त्याला येण्याला हरकत नाहीं, तो जायला किंवा त्याला जायला परवानगी आहे, इ०.

**टीप**—जाणें, करणें, देणें, घेणें, इत्यादि णें–कारान्त कृदन्त नामांस पंचमीचे प्रत्यय लागत नाहींत; म्हणजे ह्यांचीं पंचम्यान्त रूपें सहसा कोठें आढळत नाहींत. पंचमीच्या प्रत्ययांचे जागीं पासून, पेक्षां, इत्यादि पंचमीचीं शब्दयोगी अव्ययेंच त्यांस लागून पंचमीचें कार्य होतें. जाण्याहून, करण्याहून, हे शब्द फारसे प्रचारांत नाहींत; तर त्यांचे जागीं जाण्यापासून, करण्यापासून, जाण्यापेक्षां, करण्यापेक्षां, अशा शब्दायोगीअव्ययान्त शब्दांचाच पंचमीचे अर्थानें बहुधा सर्वत्र उपयोग होतो.

६०१. या णेंकृदन्ताचा कर्ता मुख्य वाक्यांत कोणत्याही विभक्तींत येत असल्यास त्याचा ‘ णेंकृदन्ताचा कर्ता ’ या नात्यानें स्वतंत्र उल्लेख होत नाहीं; तर तो अशा स्थलीं बहुधा अध्याहृत असतो; आणि भाषा-सरणीचे दृष्टीनें अशा स्थलीं त्याचा अध्याहारच बरा दिसतो. जसें:—आपल्या मित्रास टाकून अशा रीतीनें पुढें निघून जाणें तुम्हांस किंवा त्याला किंवा कोणाही मनुष्यास शोभत नाहीं; असें बेपर्वाईनें वागणें त्याच्याच नाशास कारण होईल; मुलाचे लाड करणें त्यानें हल्लीं सोडून दिलें आहे; अशा शिव्या देणें त्याचे ठायीं संभवत नाहीं; इ०.

यावरून असें दिसून येईल कीं, एखाद्या वर्गासंबंधानें, णें–कृदन्ताचा उपयोग करून सामान्य विधान करावयाचें असतांही या कृदन्ताचा कर्ता अध्याहृत ठेवण्याचाच प्रचार आहे. जसें:—लहान मुलास इतकी शिक्षा करणें चांगलें नाहीं; वडील माणसांचा योग्य मान राखणें प्रत्येकाचें कर्तव्य आहे; इ०.

६०२. हें णें–कारान्त कृदन्त नाम कधीं कधीं वाख्याताचे रूपांबद्दल विध्यर्थीं येतें; तेव्हां त्याचा कर्ता तृतीयान्त असतो. याचा हा उपयोग कवितेंत बराच आढळतो; आणि गद्यांत खासगी पत्रव्यवहारांत क्वचित् होतो. जसें:—

आयुष्याच्या साधनें ॥ सच्चिदानंद पदवी घेणें ( घ्यावी ); ॥—तुका०
तुम्ही त्याला बोलावून चार उपदेशाच्या गोष्टी सांगणें ( सांगाव्या );
वरचेवर पत्र पाठवून समाचार कळवित जाणें ( जावा ); इ०.

६०३. णें–कृदन्ताच्या पुढें पड धातूचा आवश्यकता, कर्तव्य, निरुपाय, अशा अर्थीं उपयोग होतो. जसें:-तो मनुष्य इतका चांगला नाहीं, तरी कामासंबंधानें त्याजकडे मला पुष्कळदां जाणें पडतें, ( जाणें भाग

आहे, प्राप्त होतें, जावें लागतें ); मी कोणाला कांहीं कधीं देणार नाहीं असें म्हणून चालत नाहीं, शेजार धर्मास अनुसरून पैसा नाहीं तरी लहानसहान चीजवस्त नेहमीं दुसऱ्यास देणें पडतें, ( द्यावी लागते; इ०.

या ठिकाणीं जाणें पडतें, देणें पडतें, हीं संयुक्तक्रियापदें करावीं असें आमचें मत आहे. तसें करणें व्याकरणदृष्ट्या प्रशस्त नाहीं असें कोणास वाटण्याचा संभव आहे. कारण कीं, त्यांच्या मतें या वाक्यांत मला, त्याला, तुला, आम्हांला, इत्यादि चतुर्थ्यन्त कर्ते असून, वस्तु, पदार्थ, इत्यादि प्रथमान्त कर्में असतात. आणि अनेक वस्तु देणें पडतें, पैसा देणें पडतें, असे प्रयोग होत असल्यामुळें क्रियापद कर्माप्रमाणें बदलत आहे असें दिसत नाहीं; म्हणून देणें पडतें ह्यास जर संयुक्तक्रियापद म्हटलें तर प्रथमान्त कर्म असूनही भावी प्रयोग मानावा लागेल. तसें करणें व्याकरणदृष्ट्या चमत्कारिक दिसतें. म्हणून पडतें हें स्वतंत्र क्रियापद मानून, देणें हें कृदन्त नाम त्याचा कर्ता होय, असें म्हणणें बरें असें कांहीं लोकांचें मत पडण्याचा संभव आहे.

हें मत सकृद्दर्शनीं बरें दिसतें. पण कधीं कधीं पड धातूचें रूप अशा ठिकाणीं मागील कृदन्तांतील धातूच्या कर्माप्रमाणें बदलतें. त्यावेळीं पड हा सहायधातु मानून, मुख्य धातूच्या णें-कृदन्तासह पड धातूच्या आख्यातास संयुक्तक्रियापद मानिलेंच पाहिजे. उदाहरणः—त्यानें मागितल्यावर मला त्याला हीं पुस्तकें देणें पडतात; गोपाळरावांच्या मुरवतीस्तव मला त्यांच्या पुतण्याला माझी सतार देणें पडते; त्यांच्या हाताखालीं वागावयाचें असल्यामुळें त्यांना त्याच्या शिव्या खाणें पडतात; अशा स्थळीं देणें पडतात = द्यावीं लागतात, देणें पडतें = द्यावी लागते, खाणें पडतात = खाव्या लागतात, हें उघड आहे. या ठिकाणीं देणें पडतात, देणें पडते, इत्यादि हीं संयुक्तक्रियापदें मानून कर्मणि प्रयोग मानणें अवश्य आहे, हें उघड आहे.

ह्याप्रमाणें णेंकृदन्तापुढें पड धातूचें आख्यात आलें असतां, कांहीं ठिकाणीं जर संयुक्तक्रियापद मानणें भाग आहे, तर वरील उदाहरणांतही जाणें पडतें, देणें पडतें, हीं संयुक्तक्रियापदें मानण्यास काय हरकत आहे ? वरील ठिकाणीं प्रथमान्त कर्म असूनही भावी प्रयोग मानावा लागतो ही एक

अडचण आहे असें वाटण्याचा संभव आहे. पण भावे प्रयोगांत कर्म चतुर्थ्यन्त असतें, हा वैयाकरणाचा नियम संयुक्तक्रियापदांसंबंधानें अनपवादक नाहीं, हें पूर्वीं प्रयोगाध्ययांत (अंक ५९८. टीप) सांगितलेंच आहे. म्हणजे संयुक्तक्रियापद असतां भावी प्रयोगांतील कर्म प्रथमान्तही असूं शकतें. उदा०:—जरी त्याच्या परीक्षेस इतिहास हा विषय नाहीं, तरी त्यानें नेहमीं इतिहास वाचीत बसावें हें बरें, या ठिकाणीं 'त्यानें इतिहास वाचीत असावें' हा भावी प्रयोग होय हें उघडच आहे. एवंच प्रथमान्त कर्म असतांही जर कधीं कधीं भावी प्रयोग मानावाच लागतो; तर 'त्याला पैसा देणें पडतें' अशा ठिकाणींही प्रथमान्त कर्म असून भावे प्रयोग आहे असें समजण्यास कांहीं हरकत नाहीं. शिवाय अर्थदृष्ट्या 'पडतें' हें क्रियापद नसून 'देणें पडतें' असें संयुक्तक्रियापद आहे हें उघड आहे. तेव्हां जर संयुक्तक्रियापदें मानिलींच पाहिजेत, आणि जर प्रथमान्त कर्म असूनही भावी प्रयोग होतो, हेंही कबूल केलेंच पाहिजे, तर 'त्याला दुसऱ्यास पैसा देणें पडतें' या वाक्यांत 'देणें पडतें' हें संयुक्तक्रियापद मानून भावी प्रयोग आहे, हेंच म्हणणें आम्हांस प्रशस्त व सुसंगत दिसतें. 'त्याला जाणें पडतें,' 'उठणें पडतें,' इत्यादि ठिकाणीं म्हणजे मुख्य धातु अकर्मक असतां जाणें पडतें, उठणें पडतें, हीं संयुक्तक्रियापदें मानून अकर्मक भावी प्रयोग मानण्यास कोणतीच अडचण नाहीं, हें उघड आहे.

६०४. आह या धातूच्या रूपांशींही णें—कृदन्ताचा असाच संयोग होतो. जसें:——मला लग्न करणें आहे, त्याला मुंबईस जाणें आहे, इ०. या ठिकाणीं करणें आहे = करावयाचें आहे; जाणें आहे = जावयाचें आहे. अशा वाक्यांतसुद्धां आहे हें एकेरी म्हणजे असंयुक्त क्रियापद समजून करणें, जाणें, अशा प्रकारचें णें—कृदन्त त्याचा कर्ता आहे असें म्हणावें असें कांहीं जणांस वाटण्याचा संभव आहे. परंतु कधीं कधीं यांतील सकर्मक धातूच्या कर्माप्रमाणें पुढील आहे धातूचें आख्यातरूप फिरतें. तेव्हां वरील अंकांत सांगितल्याप्रमाणें या णें—कृदन्तासह पुढील आह ह्याचे आख्यातास संयुक्तक्रियापद मानून कर्माणिप्रयोग करणें अवश्य आहे. मला मुंबईस आठ पंधरा दिवसांत जाणें आहे, सर्वांस कधीं तरी मरणें आहे, अशा स्थळीं जाणें, मरणें, हे कर्ते समजून अकर्मक कर्तरि

प्रयोग मानणें शक्य आहे. परंतु मला त्याचे पांच रुपये देणें आहेत, मला हीं पुस्तकें वाचणें आहेत, अशा स्थळीं देणें आहेत, वाचणें आहेत, हीं संयुक्तक्रियापदें मानून कर्माणि प्रयोग करणें भाग आहे हें उघड आहे. सर्वत्र एक सूसंगत व्यवस्था असणें इष्ट आहे. णें-कृदन्तास त्याच्या पुढील आहे ह्या धातूच्या क्रियापदाचा कर्ता समजणें सर्वत्र शक्य नसल्यामुळें जाणें आहे, मरणें आहे, देणें आहेत, वाचणें आहेत, या सर्वांस एकच नियम लावून संयुक्तक्रियापदें मानणें चांगलें. शिवाय या ठिकाणीं देणें, जाणें, मरणें, ह्यांचा द्यावयाचें, जावयाचें, मरावयाचें, असा विध्यर्थ किंवा आवश्यकतार्थ आहे, हें उघड आहे. म्हणून अशा स्थळीं देणें आहे, जाणें आहे, वगैरे, हीं संयुक्त क्रियापदें होत असें अर्थ-दृष्ट्या समजणें इष्टच आहे. णेंकृदन्तांतील धातु अकर्मक असतां अशा ठिकाणीं भावी प्रयोग होतो ( त्याला जाणें आहे ); आणि तो धातु सकर्मक असतां कर्माणि प्रयोग होतो ( मला हीं पुस्तकें वाचणें आहेत. )

टीप १—'मला त्याचे पांच रुपये देणें आहे' हें वाक्य चूक आहे. या ठिकाणीं एक तर 'मला त्याचे पांच रुपये देणें आहेत' असें शुद्ध वाक्य होऊन वर सांगितल्याप्रमाणें कर्माणि प्रयोग होतो. ( येथें देणें आहेत = द्यावयाचे आहेत ); अथवा 'मला त्याचें पांच रुपये देणें आहे' असाही शुद्ध प्रयोग होतो. या दुसऱ्या ठिकाणीं देणें म्हणजे कर्ज, ऋण, असा अर्थ असून देणें हें नाम आहे, हें मागील 'त्याचें' या शब्दावरून स्पष्टच आहे; तसेंच या दुसऱ्या ठिकाणीं मला ही कर्त्रर्थी चतुर्थी नसून अधिकरणार्थी आहे, आणि पांच रुपये ही कर्मार्थी किंवा परिमाणार्थी प्रथमा असून देणें ही कर्त्रर्थी प्रथमा, व आहे हें क्रियापद, अकर्मक कर्तरि प्रयोग, अशी रचना आहे. या वाक्यांत देणें ह्यास विध्यर्थ नाहीं, हें उघड आहे.

टीप २—करणें, देणें, घेणें, इत्यादि णें-कृदन्तांस याप्रमाणें दोन अर्थ आहेत हें उघड आहे. एक क्रियार्थ आणि दुसरा विध्यर्थ. या भिन्न अर्थांस अनुसरून त्यांची व्युत्पत्ति भिन्न आहे; म्हणजे क्रियार्थक करणें, देणें, हीं आणि विध्यर्थक करणें, देणें, हीं निरनिराळ्या संस्कृत मुळांपासून उत्पन्न झालीं आहेत. क्रियार्थक करणें, देणें, राखणें, पोसणें, हीं संस्कृत करणम्, दानम्, रक्षणम्, पोषणम्, ह्या अन प्रत्ययान्त नामांच्या प्रथमेच्या एकवचनापासून आलेलीं आहेत. आणि विध्यर्थक करणें, देणें, रक्षणें, पोसणें, हीं संस्कृत करणीयम्, रक्षणीयम्, पोषणीयम्, ह्या अनीय प्रत्ययान्त विध्यर्थक विशेषणांच्या प्रथमेच्या एकवचनापासून आलीं आहेत. राजवाडे म्हणतात :— 'करणीय = करणें, वल्हणीय = बोलणें, मरणीय = मरणें,

वगैरे रूपें ह्या ( अनीय ) प्रत्ययाचीं मराठींत आहेत. इदं कर्म मे करणीयमस्ति =' हें काम मला करणें आहे.' ( राजवाड्यांचें व्याकरण, पृष्ठ १०६ ). वर सांगितलेली प्रयोगव्यवस्था या व्युत्पत्तीशीं व अर्थाशीं सुसंगत आहे, हें सुज्ञ वाचकांचे ध्यानांत येईलच.

## त—कृदन्त ( देत, घेत, करित, करीत, बोलत, इ० ).

[ हें कृदन्त अपूर्ण क्रियाद्योतक अव्यय आहे. ह्यास वर्तमान कालवाचक असें इंग्रजी व्याकरणास अनुसरून म्हणण्याची चाल पडली आहे. परंतु हें वाटेल त्या काळीं येतें, ह्यामुळें यास तें नांव योग्य नाहीं; आणि आख्यातांप्रमाणें कृदन्तांसही अर्थवान् नांवें देणें प्रशस्त नाहीं; वगैरे मुद्दे पूर्वीं आलेच आहेत. यांच्यासंबंधानें जोशीबोवा म्हणतातः—" या रूपांस विशेषणें मानावें किंवा अव्ययें मानावें, याविषयीं कोणास संशय उत्पन्न होईल, पण हीं केवळ विशेषणें आहेत; यांचा उपयोग बहुधा क्रियाविशेषणांसारखा होतो. तथापि यांचा साध्या विशेषणांसारखाही उपयोग होतो, व तेव्हां त्यांस आकारान्त विशेषणांप्रमाणें लिंगादि विकारही होतात; उदा०—' रांगतें मूल', ' चालता बोलता मनुष्य', ' जळत्या घराचा वांसा, ' ' नसती उठाठेव, ' इ०." [ प्रौढबोध, क० ७१९ ( इ ) ]. यावरून हीं कृदन्तें विशेषणें होत, याबद्दल आपणास संशय नाहीं, असें म्हणण्याचा जोशीबोवांचा आव दिसतो. पण हीं कृदन्तें निव्वळ अव्ययें होत, याबद्दल जोशीबोवांशिवाय दुसऱ्या कोणास संशय असेल असें फारसें वाटत नाहीं. तथापि जोशीबोवांनीं ह्यांच्याबद्दलचा प्रश्न उपस्थित केल्यामुळें ' वादे वादे जायते तत्त्वबोधः ' या न्यायानें तत्त्वबोध होण्यासाठीं वाद करणें प्राप्त आहे.

' याविषयीं कोणास संशय उत्पन्न होईल, पण हीं केवळ विशेषणें आहेत असें जरी जोशीबोवा प्रथम म्हणतात, तरी त्यांच्या पुढील भाषेवरून यासंबंधानें त्यांचा त्यांसच संशय आहे असें दिसतें. कारण, ते लगेच पुढें सांगतात कीं, ' यांचा उपयोग बहुधा क्रियाविशेषणांसारखा होतो ' अर्थात् शब्दपर्यायानें, हीं बहुधा अव्ययें आहेत असेंच त्यांच्या भाषेवरून ठरत नाहीं काय? परंतु येथें कोणी असें म्हणेल कीं, क्रियाविशेषण हें तरी एका प्रकारचें विशेषण आहे कीं नाहीं? होय. पण क्रियाविशेषणें व नामविशेषणें हीं दोन्हीं जरी विशेषणें असलीं, तरी त्यांमधील फरक व्याकरणांत सर्वमान्य आहे. नामविशेषणें अव्ययें नाहींत व क्रियाविशेषणें अव्ययें आहेत, हें जोशीबोवांसही मान्य आहेच. नाम-विशेषणें या यथार्थ संज्ञेच्या जागीं संक्षेपानें विशेषणें असें म्हणण्याचा परिपाठ पडला आहे. आणि जोशीबोवांची एकंदर परिभाषा या पाठास अनुसरून आहे. तेव्हां क्रियाविशेषणें हीं एका प्रकारचीं विशेषणें होत, हा मुद्दा जोशीबोवां-सारखा वैयाकरण तरी पुढें आणणार नाहीं, म्हणून त्यांच्या वरील म्हणण्या-प्रमाणें प्रस्तुत कृदन्ताचा ' उपयोग बहुधा क्रियाविशेषणासारखा ' होत असल्या-

मुळें हें कृदन्त बहुधा अव्यय होय; असेंच त्यांचें मत आहे, असें समजण्यास हरकत नाहीं. पण पुढें ते सांगतात कीं, 'तथापि यांचा साध्या विशेषणांसारखाही उपयोग होतो.' म्हणजे या त-कृदन्तांचा बहुधा क्रियाविशेषणांसारखा आणि कधीं कधीं साध्या विशेषणांसारखाही उपयोग होतो, असें जोशीबोवांचे मतें ठरतें आणि ते 'पण हीं केवळ विशेषणें आहेत' असें जरी निक्षून म्हणतात, तरी त्यांचें मत संदिग्धच दिसतें. 'याविषयीं कोणास संशय उत्पन्न होईल' हें जरी त्यांनीं दुसऱ्यांस उद्देशून लिहिलें आहे, तरी त्यांच्या पुढील भाषेवरून हीं कृदन्तें बहुधा क्रियाविशेषणें व क्वचित् विशेषणें होत असें त्यांचें मत दिसतें. आणि याविषयींही त्यांचा त्यांसच थोडासा संशय असावा असेंही वाटतें. कारण कीं, जरी ते प्रथम ह्यांस 'केवळ विशेषणें' म्हणून नंतर नुसतें 'यांचा साध्या विशेषणांसारखाही उपयोग होतो' एवढेंच लिहितात, तरी त्यांचें हें-त्यांच्याच मताप्रमाणें कधीं कधीं दिसणारें-विशेषणत्वही त्यांस विलक्षण वाटलें असावें. म्हणून 'तेव्हां त्यांस आकारान्त विशेषणाप्रमाणें लिंगादि विकार होतात' असें वाक्य जास्त लिहावें लागलें. परंतु आकारान्त असून लिंगवचनाप्रमाणें न फिरणारीं जरी कांहीं अपवादक आकारान्त विशेषणें मराठींत सांपडतात, तरी अकारान्त किंवा आकारान्तेतर इतर कोणतींही विशेषणें लिंगादि विकार झालेलीं मराठी गद्यांत तरी सहसा आढळत नाहींत. परंतु एकदां या त कारान्त कृदन्तांस केवल विशेषणें म्हणण्याचें ठरविल्यामुळें जोशीबोवांना अशी धरसोड करावी लागली आहे ! त्यांना विशेषणें म्हटल्यानंतर उदाहरणें जो पाहतात तों तों बहुतेक क्रियाविशेषणांचीं; तेव्हां त्यांचा 'बहुधा' तसा उपयोग होतो असें त्यांस लिहावें लागलें. पण त्यांनीं प्रथम खात्रीचा आव आणून 'केवळ विशेषणें' असें म्हटलें असल्यामुळें, विशेषणांसारखा त्यांचा उपयोग ते पाहूं लागले. तेव्हां त्यांस 'रांगतें मूल', 'नसती उठाठेव' हीं उदाहरणें आडळलीं. पण ह्यांतील विशेषण विशेष्यनिघ्न पडलें. तेव्हां वादविषयक विशेषणें जरी अकारान्त आहेत, तरी तीं आकारान्त विशेषणांप्रमाणें विशेष्याचे लिंगवचनाप्रमाणें बदलतात, असा त्यांस विलक्षण शेरा मारावा लागला. एवंच जोशीबोवांनीं ही 'नसती उठाठेव' केली नसती तर बरें झालें असतें. असो.

वादविषयक त-कारान्त कृदन्तें हीं जरी संस्कृत कृदन्तविशेषणांपासून निघालीं आहेत, तरी तीं मराठींत निःसंशय क्रियाविशेषणेंच होत; व त्यांचा विशेषणांप्रमाणें कोठेंही उपयोग होत नाहीं. आणि जर तसा उपयोग होत असेल तर तीं आकारान्त विशेषणांप्रमाणें बदलावीं हा एक विलक्षणच प्रकार होय. आकारान्तेतर विशेष्यनिघ्न विशेषणें जरी मराठींत असलीं, तरी तीं हाताचे बोटांवर मोजतां येण्यासारखीं असून शिवाय तीं संख्याविशेषणेंच आहेत; असें विशेष्यनिघ्न गुणविशेषण एकही नाहीं. आणि काळा, काळी, काळें, ह्यांप्रमाणेंच जर रांगता,

रांगती, रांगतें, उडता, उडती, उडतें, अशीं रूपें दिसत आहेत; आणि उडत-बातमी या समासाप्रमाणेंच काळमांजर असा समासही जर दिसत आहे तर काळा यास मात्र मूळ आकारान्त विशेषण मानून, उडता ह्यास आकारान्त विशेषण न म्हणतां उडता, उडती, उडतें, व उडतबातमी ह्यांत उडत हें आकारान्त विशेषण असून तेंच आकारान्ताप्रमाणें बदलतें असें म्हणणें कितपत सुसंगत आहे तें वाचकांनींच ठरवावें. यावरून संगतवार बोलावयाचें म्हटलें म्हणजे असें दिसून येईल कीं, रांगतें मूल चालता बोलता मनुष्य, या ठिकाणीं रांगत, चालत, बोलत, हे शब्दच मुळीं नाहींत. आतां संगति जरी बाजूस ठेविली तरी सुद्धां रांगतें, चालता, बोलता, हीं रांगत, चालत, बोलत, ह्यांचींच नपुंसक व पुलिंगी रूपें होत असें म्हणणें कोणत्याही दृष्टीनें कसें प्रशस्त नाहीं तें पहा. रांगत, बोलत, हीं त-कारन्त कृदन्तें संस्कृत अपूर्ण क्रियाद्योतक किंवा वैयाकरणांचे भाषेनें वर्तमानकालवाचक कृदन्तांपासून आलेलीं आहेत; आणि रांगता, बोलतां, इत्यादि ता-कारान्त कृदन्तें संस्कृत ऋकारान्त कर्तृवाचक कृदन्त विशेषणाच्या पुल्लिंगीं प्रथमेच्या एकवचनापासून आलीं आहेत, हें संस्कृतज्ञांस तेव्हांच समजेल. संस्कृतापेक्षां इंग्रजीकडे जोशीबोवांचा ओढा अधिक दिसतो. तेव्हां इंग्रजींतला आधार त्यांस अधिक पटेल असें जाणून इंग्रजींतही असाच प्रकार आहे असें दाखवितो. Act ह्या एका धातूपासून acting आणि actor असें दोंन भिन्न भिन्न शब्द साधतात. संस्कृतांतही कृ धातूपासून अशाच प्रकारें कुवत् आणि कर्तृ ( कर्ता ) असें दोन भिन्न भिन्न शब्द साधतात. त्याचप्रमाणें मराठींत कर, रांग, ह्या धातूंपासून करीत, रांगत हे आणि करितां, रांगता, हे दोन भिन्न भिन्न प्रकारचे शब्द साधतात. तेव्हां व्युत्पत्तिदृष्ट्या रांगत, बोलत, हीं त-कृदन्तें रांगता , बोलता, या आकारान्त ताकृदन्तांपासून भिन्न आहेत, हें उघड आहे. शिवाय आ-कारान्त विशेषणें क्रियाविशेषणें झालीं तरी तीं कर्त्याचे व कधीं कधीं कर्माचे लिंगवचनाप्रमाणें बदलतात ( अंक ३८९ पहा ). तेव्हां हीं अकारान्त कृदन्तें जर मूळची वास्तविक विशेषणें असून आकारांत विशेषणांप्रमाणें बदलणारीं असतीं तर हीं अकारान्त कृदन्तविशेषणें क्रियाविशेषणांप्रमाणें उपयोगांत आलीं असतां कधीं तरी कर्त्याचे किंवा कर्माचे लिंगवचनाप्रमाणें बदललेलीं आढळावीं कीं नाहीं? परंतु जोशीबोवांचे दुर्दैवानें तीं तशीं बदलत असलेलीं कोठेंच आढळत नाहीत. तिसरें असें कीं अर्थदृष्ट्याहीं तकृदन्त आणि ताकृदन्त हीं अगदीं भिन्न आहेत. तकृदन्त बहुदा अपूर्णक्रियाद्योतक असतें आणि ताकृदन्त कर्तृवाचक असतें. तेव्हां रांगत, चालत, बोलत, या क्रियाविशेषणांचा आणि रांगता, चालता, बोलता या नामविशेषणांचा अर्थाअर्थी कांहीं एक संबंध नाहीं हें उघड आहे. जोशीबोवांसारख्या राजमान्य व म्हणून अधिकारायुक्त वैयाकरणांचें प्रचलित व अध्यापित ग्रंथांत जर हा घोंटाळा व ही धरसोड आली

नसती तर तिच्याकडे काना डोळा करण्यासही हरकत नव्हती. परंतु असल्या महत्त्वाच्या ग्रंथांत असा दोष राहूं देणें इष्ट नसल्यामुळें त्याबद्दल ही 'नसती उठाठेव' करावी लागत आहे. तेव्हां यापुढें तरी मराठींतील तकृदन्तास कोणी विशेषण न म्हणो म्हणजें झालें. ]

६०५. संयुक्तक्रियापदांमध्यें या कृदन्ताचा उपयोग कधीं होतो हें संयुक्तक्रियापदांचे आध्यायांत आलेंच आहे. ह्या कृदन्तानें होणारें संयुक्त क्रियापद नेहमीं कर्तरि असतें. जसें:—तो शिकत आहे, तो बसत असला, बसत होता, शिकत असेल, शिकत असता, शिकत अस, बसत जा, इ०.

**अपवाद:**—सकर्मक धातूच्या त-कृदन्तापुढें जेव्हां अस धातूचें वाख्यातीं रूप येतें, त्यावेळीं कधीं कधीं विकल्पानें भावी प्रयोगही होतो. जसें:—तो वर्तमानपत्रें वाचीत असावा ( कर्तरि ), किंवा त्यानें वर्तमानपत्रें वाचीत असावें ( भावी ), तो हें पुस्तक वाचीत असावा ( कर्तरि ), किंवा त्यानें हा विषय वाचीत असावें ( भावी ), इ०.

टीप—या ठिकाणीं कर्मणि प्रयोग सहसा होत नाहीं. म्हणजे ज्या वेळी कर्ता तृतीयान्त होतो, त्या वेळीं अस धातूचें वाख्यातीं रूप बहुधा तृतीय पुरुषीं नपुंसकलिंगीं एकवचनीं आढतें. जसें:—त्यानें हा विषय वाचीत असावें, त्यानें पोथ्या वाचीत असावें, त्यानें वर्तमानपत्रें वाचीत असावें, इ०. या वाक्यांत सकर्मक भावी प्रयोग आहे, 'त्यानें हा विषय वाचीत असावा,' 'त्यानें पोथ्या वाचीत असाव्या' अशा प्रकारची कर्मणि रचना प्रस्तुत स्थळीं होत नाहीं असें दिसतें; वर सांगितल्याप्रमाणें कर्तरि आणि भावी रचनाच शिष्टप्रचारास मान्य दिसते. अर्थात् या ठिकाणीं जर कर्मणि रचना क्वचित् कोठें आढळली तर ती प्रशस्त नाहीं हें उघड आहे.

( अ ) 'तो पोथी वाचीत असावा' हा कर्तरि प्रयोग आणि 'त्यानें पोथी वाचीत असावें' हा भावे प्रयोग ह्यांतील प्रयोगभेदाबरोबर अर्थभेदही आहे. पहिल्यांत म्हणजे कर्तरिप्रयोगांत अपूर्णक्रियेचा संभव असा अर्थ आहे; आणि दुसऱ्यांत म्हणजे भावे प्रयोगांत अपूर्ण रीतीचा विधि किंवा भूतरीति म्हणजे कर्त्याची संवय असा अर्थ आहे, हें थोडयाशा विचारान्तीं समजेलच.

**टीप**—या ठिकाणचा भावी प्रयोग पूर्वीं सांगितल्याप्रमाणें साधारण समजुतीचा नाहीं. म्हणजे यांतील कर्म प्रथमान्तच आहे. संयुक्तक्रियापद असतां भावी प्रयोगांतील कर्म प्रथमान्तही असूं शकतें. हें या अध्यायांत व मागील एका अध्यायांत ( अंक ५८८ टीप ) आलेंच आहे. त्याच प्रकारचा प्रस्तुत भावी प्रयोग आहे.

( **आ** ) अस ह्या सहायधातूच्या अर्थाचे राह, सूट, इत्यादि जे आणखी सहाय धातु आहेत, त्यांचें वाख्यातही मुख्य धातूच्या त-कृदन्तापुढें आलें असतां असेच कर्तरि किंवा भावी प्रयोग होतात. जसें:—तो शिव्या देत सुटावा, किंवा रहावा, कर्तरि; त्यानें शिव्या देत सुटावें, किंवा रहावें ( भावी ); इ०. या ठिकाणींही भावी प्रयोगांतील कर्म प्रथमान्त आहे.

६०६. त-कृदन्ताचा क्रियाविशेषणाप्रमाणें उपयोग होतो. जसें:—त्यानें **डोळ्यांदेखत** तें पळविलें, तो **अडखळत** बोलतो, तो रामरक्षा **चुकतमाकत** म्हणतो, इ०. अशा वेळीं त-कृदन्ताची बहुधा द्विरुक्ति होते जसें:—**चुकतचुकत** म्हणतो, **उडतउडत** चालतो, तो **बोलतबोलत** जेवतो, इ०.

**टीप**—त-कृदन्ताचे एकंदर सर्व उपयोग कृदन्ताध्यायांत पहावे.

## **ता-कृदन्त** ( करिता, देता, घेता, इ०. )

६०७. हें कृदन्त कर्तृवाचक असून त्याचा नामाप्रमाणें आणि विशेषणाप्रमाणें उपयोग होतो. आणि तें आकारान्त असल्यामुळें त्यास ई आणि एं हे प्रत्यय पररूपसंधीनें लागून त्यापासून अनुक्रमें स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी शब्द साधतात. जसें:—मारत्याचा हात धरवतो, पण बोलत्याचें तोंड धरवत नाहीं; रांगतें मूल; न्हाती धुती मुलगी; ती करती सवरती आहे; इ०.

या विशेषणांचा पूर्वीं ( अंक ४५८ टीप ) सांगितल्याप्रमाणें लाक्षणिक उपयोग मराठींत बराच आढळतो. जसें:—नांदतें घर, जाती वेळ, लाभता काळ, इ०.

[ दादोबा म्हणतात—'मी करिते समयीं, जेविते वेळीं, इत्यादि स्थळींही हींच रूपें ( रीति-भूत काळाचीं ) जाणावीं. मी करिते समयीं म्हणजे मी करीं ते समयीं, तो जेविते वेळीं म्हणजे तो जेवी ते वेळीं असा अर्थ. व्याकरण करिते समयींही असाच पदच्छेद करून निर्वाह करावा. दुसरा उपाय मला

दिसत नाहीं ' ( क० ४४२ ). खरही असेंच म्हणतात. ' तो निघते वेळीं मला म्हणाला ' या ठिकाणीं निघते वेळीं हें निघे ते वेळीं याबद्दल संक्षपानें आलें आहे, असें ते सांगतात;--( Parsing 41. page 416. ). दादोबांनीं दिलेलें मत त्यांस स्वतःसही पूर्णपणें मान्य आहे, असें त्यांच्या वरील उताऱ्यावरून दिसत नाहीं. ' निर्वाह करावा दुसरा उपाय मला दिसत नाहीं. ' ह्या त्यांचे उद्गारांवरून निरुपायास्तव हा मार्ग स्वीकारला पाहिजे, असें त्यांचें मत आहे हें उघड आहे. आतां त्यांनीं वर दिलेल्या उदाहरणांत त्यांनीं सांगितलेल्या तऱ्हेचा पदच्छेद जरी सकृद्दर्शनीं बरा दिसतो, तरी अन्य उदाहरणांत सर्वत्र तशा प्रकारचा पदच्छेद शक्य नाहीं. दादोबा--खेर यांचीं उदाहरणें:--मी करिते समयीं=मी करीं ते समयीं, तो जेविते वेळीं=तो जेवी ते वेळीं, तो निघते वेळीं=तो निघे ते वेळीं, इ०. हीं उदाहरणें प्रथम व तृतीय पुरुषांचे एकवचनाचीं आहेत. परंतु प्रथम व तृतीय पुरुषांचे एकवचनींही असा पदच्छेद सर्वत्र उपलब्ध नाहीं. जसें:--मी जाते वेळीं, ती धुते वेळीं, या ठिकाणीं मी जाई ते वेळीं आणि ती धुई ते वेळीं अशीं पदें स्पष्टपणें निघत नाहींत. ह्यामुळेंच निघते वेळीं हें निघे ते वेळीं ह्याचें संक्षिप्त रूप आहे, असें खेर यांनीं म्हटलें असेल. परंतु आम्ही जेविते वेळीं, तूं वाचते वेळीं, तुम्ही श्वास घेते वेळीं, ते धांवते वेळीं या ठिकाणीं जेविते वेळीं=जेवूं ते वेळीं, वाचते वेळीं,=वाचीत ते वेळीं, घेते वेळीं=घ्या ते वेळीं, धांवते वेळीं=धांवत ते वेळीं असा पदच्छद कसा करावा हें आम्हांस समजत नाहीं. या ठिकाणीं खेर यांच्या ' निघते वेळीं ' या उदाहरणांतल्या प्रमाणें संक्षेप होऊन चमत्कारिक रूपें झालीं आहेत असेंच म्हणावयाचें कीं काय ? ह्याचें उत्तर कोणी वैयाकरणानें दिलेलें आमच्या पाहण्यांत नाहीं. येथील संक्षेप कसा होतो व तो सर्वत्र एकच कां वगैरे प्रश्नांचीं उत्तरें जरी समाधानकारक नसलीं, तरी येथील दादोबांनीं सांगितलेला पदच्छेद किंवा खेरांनीं म्हटलेला संक्षेप निरुपायास्तव पतकरावा असें पुष्कळांस वाटण्याचा संभव आहे. आणि जर खरोखरच या ठिकाणीं दुसरा अधिक समाधानकारक राजमार्ग उपलब्ध नसेल, तर या आडमार्गानें कांट्यांकुट्यांतून व खांचखळग्यांतून धडपडत कां होईना, कसा तरी मार्ग काढणें हें केवळ स्तंभाप्रमाणें उभें राहण्यापेक्षां बरें असें कोण म्हणणार नाहीं ?

आमच्या वैयाकरणांचें जें चुकतें तें बहुधा येथेंच. त्यांचा बहुधा त्यांच्या समोरील उदाहरणांपुरताच विचार असतो. त्यांच्या पलीकडे त्यांची दृष्टि जात नाहीं. परंतु शास्त्रिय विवेचनांत अशा प्रकारच्या कोत्या दृष्टीनें तत्त्वनिर्णय सहसा होत नाहीं. मराठी वैयाकरणांच्या मर्यादित किंवा संकुचित दृष्टीचीं बरींच उदाहरणें या ग्रंथांत पूर्वीं आलींच आहेत. ह्या दोषापासून शास्त्रीय शोधास कसा अडथळा होतो, हेंही त्यांवरून न्यायशास्त्रानभिज्ञ वाचकांसही

समजून चुकलेंच असेल. प्रस्तुत स्थळींही हीच कोती दृष्टि तत्त्वनिर्णयाचे आड आली आहे, असें पुढील विवेचनावरून वाचकांचे तेव्हांच नजरेस येईल.

निघते वेळीं, करिते वेळीं, जाते वेळीं, अशा प्रकारची रचना केवळ प्रथम व तृतीय पुरुषांचे एकवचनींच आढळते असें नाहीं. तर ती तिन्ही पुरुषीं दोन्ही वचनीं एकसारखीच येते; असें आम्हीं वर दिलेल्या उदाहरणांवरून वाचकांस समजलेंच असेल. करिते वेळीं = करीं ते वेळीं, जेविते वेळीं = जेवी ते वेळीं, असा पदच्छेद दादोबांस दिसत असलेल्या प्रथम व तृतीय पुरुषाचे एकवचनाचे उदाहरणांत सकृद्दर्शनीं बरा दिसला; यामुळें ई आख्याताचे म्हणजे रीतिभूतकाळाचे रूपांपुढें 'ते वेळीं' हे शब्द येऊन वरील भाषाप्रचार उत्पन्न झाला, असें त्यांस वाटून त्यांनीं आपला मार्ग सुचविला. यानंतर खेरांस निघते वेळीं हें उदाहरण दिसलें. त्यांत निघे ते वेळीं अशीं पदें तितकीं स्पष्ट दिसत ना, तेव्हां निघे ते वेळीं ह्याचें निघते वेळीं असें संक्षिप्त रूप झालें; असें म्हणण्याची तोड त्यांना सुचली. परंतु ही तोडही सर्वच ठिकाणीं सारखी समाधानकरक नाहीं हें आम्हीं वर दाखविलेंच आहे.

येथपर्यंत प्रचलित व्याकरणाचा असमाधानकारकपणा आणि अप्रयोजकपणा दाखविला. आतां याहीपुढें जाऊन त्याचा नालायकपणा दाखवितों. निघते वेळीं करते वेळीं, जाते वेळीं, इत्यादि भाषणप्रचार तिन्ही पुरुषीं दोन्ही वचनीं ज्याप्रमाणें येतात, त्याप्रमाणें ते तिन्ही काळींही येतात. जसें:——तो जाते वेळीं त्याचें पागोटें पडून त्यास अपशकुन झाला; तो जेविते वेळीं बोलतो आहे; तुम्ही उद्यां जाते वेळीं मला भेटून जा. दादोबांचा पदच्छेद, जेवी ते वेळीं हा 'तो जेविते वेळीं बोलतो' अशा वर्तमान—रीत्यर्थक वाक्यांत काहीं अंशीं चालण्यासारखा आहे. त्याचप्रमाणें 'तो निजते वेळीं पाणी पीत असे' अशा प्रकारचा रीतिभूत काळाचा अर्थ असतां निजते वेळीं = निजे ते वेळीं असें म्हणणें गैर दिसत नाहीं. परंतु 'तो जाते वेळीं पडला' या निवळ भूतार्थीं जाते वेळीं = जाई ते वेळीं, आणि 'तो जेविते वेळीं बोलतो आहे' या निवळ वर्तमानार्थीं, जेविते वेळीं = जेवी ते वेळीं, आणि 'तो उद्यां जाते वेळीं मला भेटेल' या भविष्यार्थीं जाते वेळीं = जाई ते वेळीं, असा पदच्छेद निवळ स्वरूप दृष्ट्या तरी कसा करावा आणि त्या पदच्छेदानुरूप अर्थ तरी कसा लावावा हें एक गूढच आहे. 'तो जाते वेळीं पडला' म्हणजे तो जाई ते वेळीं पडला हा पदच्छेद भूतार्थीं एकवार कसा तरी अर्थदृष्ट्या धकवून घेतां येईल; कारण कीं, ई-आख्याताचा कवितेंत निवळ भूतार्थींही कधीं कधीं उपयोग होतो. हें म्हणणें ठीक असें जरी क्षणभर कबूल केलें, तरी 'तो उद्यां जाते वेळीं मला भेटेल' अशा भविष्यार्थीं जाते वेळीं = जाई ते वेळीं हा पदच्छेद व अर्थ धकवून घेण्यासारखाही नाहीं. जाई या ई—आख्याताचे रूपाचा भविष्यका-

ळाचे अर्थानें उपयोग क्वचित् तरी होतो असें म्हणतां येईलसें दिसत नाहीं. यामुळें दादोबांनीं सुचविलेला व खेरांनीं अनुमोदन दिलेला मार्ग केवळ असंमाधानकारक आहे, इतकेंच नव्हे, तर अगदींच अयोग्य होय, असें मोठ्या दिलगिरीनें म्हणावें लागतें.

परंतु प्रस्तुत स्थळीं 'दुसरा उपाय मला दिसत नाहीं' या दादोबांचे म्हणण्यांत जर सत्यता असेल तर त्यांचा मार्ग त्याज्य ठरवून नुसतें विध्वंसक बनण्यापासून काय फायदा? तेव्हां विध्वंस करून उघड्या पडलेल्या जागीं नवीन रचना करणें इष्ट व अवश्य आहे. ती रचना सुदैवानें फारच सोपी व सरळ आहे. आमच्या मतें प्रस्तुत स्थळीं ता-कृदन्ताचा विशेषणाप्रमाणें उपयोग झाला आहे. हें कृदन्त मूल कर्तृवाचक जरी आहे, तरी लक्षणेनें त्याचा संक्रांत विशेषणांसारखा उपयोग होतो, हें पूर्वीं एका स्थलीं ( अंक ४५८ टीप ) सांगितलेलें वाचकांस स्मरत असेलच. या दृष्टीनें जाते वेळीं, निघते वेळीं, करते वेळीं, ह्या ठिकाणीं जाते, निघते करते हीं जाती, निघती, करती, या स्त्रीलिंगी ता-कृदन्त विशेषणांचीं पुढील वेळीं या सविभक्तिक शब्दाचे योगानें झालेलीं सामान्यरूपें होत. ह्यांचीं आणखी जात्या, निघत्या, करत्या, अशींही सामान्यरूपें होतात आणि त्यांचा वरील स्थलीं उपयोग होऊन जात्या वेळीं, निघत्या वेळीं, करत्या वेळीं, अशी जी भाषा होते तिचाही प्रचार कमीजास्त आहे. या दुसऱ्या वैकल्पिक प्रकारावरूनही जाते वेळीं, निघते वेळीं, करते वेळीं, या ठिकाणीं ई-आख्याताचे रूपापुढें 'ते वेळीं' हे शब्द आले आहेत, या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं हें कळून येईल. अर्थात निघते, करते, जाते, ह्यामध्ये रीतिभूतकाळाचा किंवा कोणत्याच विशिष्ट काळाचा किंवा आख्याताचा कांहीं एक संबंध नाहीं आणि ते हा स्वतंत्र शब्द नाहीं. तर निघते, करते, जाते, हीं मूळच्या आकारान्त विशेषणाचीं पुढील सविभक्तिक शब्दाचे योगानें झालेलीं सामान्यरूपें होत; आणि त्यांचा वाटेल त्या काळीं उपयोग होणें स्वाभाविक आहे हें उघड आहे. म्हणजे शब्दसिद्धीचे दृष्टीनें यांमध्यें आख्यातरूप नाहींच तर कृदन्त विशेषण आहे. यामुळें त्या विशेषणाचें सामान्यरूप कोणताही काळ, कोणताही पुरुष, व कोणतेंही वचन, यांचेसंबंधानें अविकृत येतें हेंही स्पष्टच आहे. दादोबांचे म्हणण्याप्रमाणें पदच्छेद केला असतां, ह्यांच्या अविकृतत्वाचें व्याकरणदृष्ट्या कांहींच स्पष्टीकरण करितां येत नाहीं. परंतु 'चांगले वेळीं' ह्यांतील चांगले हें चांगल्या ह्या आकारान्त विशेषणाचें सामान्यरूप, जसें काळ, पुरुष, वचन, ह्यांनीं अविकृत रहातें, त्याचप्रमाणें वादविषयक भाषाप्रचारांतील निघते, करते, जाते, हीं आकारान्त विशेषणाचीं सामान्यरूपें सर्वत्र अविकृत राहणें हें साहजिक आहे. तेव्हां भाषादृष्ट्या आतां प्रस्तुत स्थलीं कांहीं एक अडचण उरली नाहीं हें उघड आहे.

आतां अर्थदृष्ट्यांही हा मार्ग सरळ व प्रशस्त आहे असें दाखवितों. पडता काळ चालता काळ, नांदतें घर, इत्यादि उदाहरणांत पडता, चालता, नांदतें, हीं विशेषणें आहेत. आणि ती कर्तृवाचक असून काळ किंवा घर यांस प्रत्यक्ष लागत नाहींत हें निर्विवाद आहे. त्याचप्रमाणें जाते वेळीं, निघते वेळीं, या ठिकाणच्या जाती वेळ, निघती वेळ, या मूळ रूपांतील जाती, निघती हीं कर्तृवाचक विशेषणें असून तीं वेळ या शब्दास प्रत्यक्ष लागूं पडत नाहींत. पडता काळ म्हणजे ज्या काळीं एखादी व्यक्ति पडते, विपन्नावस्थेप्रत जाते, तो काळ; आणि चालता काळ म्हणजे ज्या काळीं एकादा मनुष्य चालतो, भरभराटींत असतो, तो काळ; असा अर्थ आहे. अर्थांत पडता, चालतां, हीं कर्तृवाचक विशेषणें पडणाऱ्या व चालणाऱ्या व्यक्तीस प्रत्यक्ष-पणें लागणारीं असून तीं प्रस्तुत स्थळीं लक्षणेनें काळास लागलीं आहेत; म्हणून त्यांस **संक्रान्तविशेषणें** म्हणजे योग्य विशेष्यापासून अन्य विशेष्याकडे गेलेलीं विशेषणें म्हणावें हें उघड आहे. त्याचप्रमाणें जाती वेळ म्हणजे ज्या वेळीं एखादा जातो ती वेळ, निघती वेळ म्हणजे ज्या वेळीं एकादा निघतो ती वेळ, असा अर्थ असून जाता, निघता, हीं कर्तृवाचक विशेषणें प्रत्यक्षपणें जाणाऱ्या, निघणाऱ्या, व्यक्तीस लागणारीं आहेत, आणि तीं जाते वेळीं, निघते वेळीं, या प्रस्तुत भाषाप्रचारांत कर्त्यापासून दूर होऊन एका प्रकारच्या लक्षणेनें त्याच्या क्रियेच्या काळास म्हणजे ती त्याची क्रिया ज्या काळीं घडते त्या काळास लागण्यांत आलीं असल्यामुळें तींही संक्रांत विशेषणें होत हें उघड आहे. एवंच या ग्रंथांत सुचविलेल्या मार्गानें अर्थदृष्ट्या जरी प्रत्यक्ष एकदम अर्थ प्राप्त होत नाहीं, तरी लक्षणेनें अर्थाचें ग्रहण सुलभ होतें; आणि या ठिकाणची लक्षणा मराठींत अशाच प्रकारच्या दुसऱ्या ठिकाणींही स्पष्टपणें दिसत असल्यामुळें वादविषयक स्थलीं, ती लक्षणा मानण्यास हरकत नाहीं. इतकेंच नव्हे, तर ती मानणेंच मराठीच्या स्वभावाचे दृष्टीनें उचित व प्रशस्त आहे हें उघड आहे.

सारांश, दादोबांनीं दाखविलेल्या कूटाचा भाषादृष्ट्या व अर्थदृष्ट्या असा साधा व समाधानकारक निकाल लागतो, हें समजलें म्हणजे त्यांनीं निरुपायास्तव सुचविलेला किमानपक्ष स्वीकारण्याची कांहीं गरज नाहीं हें तेव्हांच समजून येईल. ]

## तां-कृदन्त ( जातां, येतां, बोलतां, इ० )

६०८. या कृदन्ताचा कालवाचक क्रियाविशेषणाप्रमाणें उपयोग होतो. ह्याची गद्यांत बहुधा द्विरुक्ति होते; पद्यांत मात्र ह्याचा एकेरी उपयोग फार आढळतो. ह्या गोष्टी कृदन्तविवेचनांत आल्याच आहेत. गद्यांतही ह्याचा एकेरी उपयोग थोडासा आढळतो; आणि ह्याचे मागें जेव्हां न हें निषेधार्थी अव्यय लागतें, तेव्हां हें कृदन्त गद्यांतही एकेरीच येतें. जसें:—जो उद्योग न करितां व्यर्थ हिंडत आहे, तो न बोलतां आपलें कार्य

साधितो, इ०. तसेंच अस धातूचें हें कृदन्त म्हणजे असतां हें अव्यय अस धातु मुख्य असतो तेव्हां एकेरीच येतें. जसें:—तुझा शत्रु देवडीवर असतां तुझा आंत कसा प्रवेश झाला, संकेताचा अर्थ असतां जर—तर इत्यादि अव्ययांचा उपयोग होतो, इ०.

यावरून असें दिसतें कीं, देत, घेत, करीत, इत्यादि तकारान्त कृदन्तांसच कालाधिकरणदर्शक सप्तमीचा **आं** हा प्रत्यय लागून देतां, घेतां, करितां, इत्यादि तां-प्रत्ययान्त कृदन्तें झालीं आहेत.

६०९. ह्याच अर्थानें म्हणजे कालार्थानें मूळ धातूच्या त कृदन्तापुढें अस या सहायधातूचें ता-कृदन्त किंवा तांना-कृदन्त जोडण्याचा प्रचार आहे. जसें:—तो जात असतां, तो बोलत असतां, किंवा असतांना इ०. पूर्वी सांगितल्याप्रमाणें जात असतां, बोलत असतांना, ह्यांस संयुक्त क्रियाविशेषणें म्हणावें.

६१०. या कृदन्ताला जर स्वतंत्र कर्ता असला तर तो बहुधा प्रथमान्त असतो. जसें:—**राम** लंकेस जात असतां त्याला मध्यें जटायु भेटला, **दुसरा** बोलत असतां त्याला अडथळा करूं नये, इ०.

६११. सकर्मक धातूच्या या कृदन्ताचें कर्म कर्तरि प्रयोगांतील नियमांप्रमाणें प्रथमान्त किंवा चतुर्थ्यन्त असतें. जसें:—दुसरा **भाषण** करित असतां, तो **रामाला** मारित असतां, इ०.

६१२. जेव्हां मुख्य वाक्यांतील कर्ता व या कृदन्ताचा कर्ता एक असतो किंवा या कृदन्ताच्या कर्त्याबद्दलच किंवा तत्संबंधाचें मुख्य वाक्यांत कांहीं विधान असून त्याचा या कृदन्ताचे नंतर लगेच प्रथमेतर विभक्तींत उल्लेख असतो, तेव्हां या कृदन्ताचा प्रथमान्त कर्ता बहुधा अध्याहृत असतो. जसें:—( तो ) जेवतां जेवतां किंवा जेवत असतां त्यास घांस लागून त्याचा प्राण गेला, ( तो ) असें बोलतां बोलतां त्यानें प्राण सोडिला, ( मी ) हें पुस्तक वाचीत असतां मला झोंप लागली, ( मी ) पुस्तक वाचीत असतां मी झोंपीं गेलों.

धर्म प्रभु न पर प्रभु जेणें केला प्रसिद्ध तो करद ।
मोठया मोठयालाही बुडतां व्यसनाब्धिमाजि जो करद ॥ —

६१३. कधीं कधीं सकर्मक धातूंच्या तां-कृदन्ताचा कर्ता तृतीयान्तही आढळतो, त्या वेळीं हें तां-कृदन्त एकेरी येऊन त्याचे पुढें च हें शुद्ध-शब्दयोगी अव्यय येतें. अशा वेळीं त्यांत क्रियासमाप्तीचा अर्थ गर्भित असतो. अंक ६१० मध्यें सांगितल्याप्रमाणें कर्ता प्रथमान्त असून पुढें च हें शुद्धशब्दयोगी अव्यय नसतां तां–कृदन्तास अपूर्णक्रियेचा अर्थ असतो तेव्हां अपूर्णक्रियेच्या अर्थापासून एकदम क्रियासमाप्तीच्या अर्थावर या कृदन्ताची कशी उडी गेली असें वाटण्याचा संभव आहे. पण हा प्रश्न फारसा बिकट नाहीं. क्रिया संपण्याचे बेतांत जरी आली तरी अशा स्थितींत ती संपली असेंही स्थूल दृष्टीनें म्हणण्याचा प्रघात आहे. उदाहरणार्थ, आगगाडी स्टेशनवर येत असतां म्हणजे येतांना चांगली दिसावयास लागली, तरी ती येतच आहे म्हणजे तिच्या येण्याची क्रिया संपलेली नाहीं हें खरें; पण व्यवहारांत अशा वेळीं 'ही पहा गाडी आली' असेंच म्हणण्याचा प्रघात आहे. ह्यामुळें अपूर्ण क्रियेपासून क्रियासमाप्तीचा अर्थ प्रथम जितका दूर वाटतो तितका तो दूर नाहीं हें उघड आहे. ह्यामुळें कर्ता तृतीयान्त असून च हें शुद्धशब्दयोगी अव्यय पुढें आलें म्हणजे तां-कृदन्तास त्यांतील धातूनें दाखविली जाणारी क्रिया संपते न संपते तोंच असा अर्थ प्राप्त होतो; म्हणजेच त्यांत क्रियासमाप्तीचा ध्वनि उठतो. जसें:——त्यानें हात उगारतांच सर्व लोक धांवून गेले, त्यानें आपलें भाषण संपवितांच टाळ्यांचा गजर झाला, इ०. या ठिकाणीं उगारतांच म्हणजे उगारतो न उगारतो तोंच किंवा स्थूल मानानें उगारल्याबरोबर, आणि संपवितांच म्हणजे संपवितो न संपवितो तोंच किंवा संपविल्याबरोबर असा अर्थ आहे, हें उघड आहे.

६१४. परंतु उमजगणांतील धातूंच्या व अकर्मक धातूंच्या तां-कृदन्तांस हा क्रियासमाप्तीचा अर्थ असला, तरी त्यांचा कर्ता प्रथमान्त असतो. जसें:— तो असें बोलतांच, म्हणतांच, किंवा शिकतांच, इ०. पत्र पोंचतांच ( पोंचल्याबरोबर ) निघून यावें, इ०.

कोल्हाचि पाळिला त्वां, आरडला उपजतांचि जंबुकसा ॥——मोरोपंत.

६१५. जेव्हां या कृदन्ताचा तृतीयान्त कर्ता त्याच्यानंतर लगेच मुख्य वाक्यांत कोणत्याही विभक्तींत आलेला असतो, तेव्हां तो कधीं कधीं

अध्याहृत असतो. जसें:—( रामानें ) हें ऐकतांच रामा घाबरला, ( त्यानें ) माझा शब्द ऐकतांच तो चटकन उठून बसला, ( त्यानें ) खालीं पाहतांच त्याचा चष्मा गळून पडला, इ०.

परंतु मुख्य वाक्यांतील या कृदन्ताचे स्वतः कर्त्याबद्दल किंवा तत्संबंधाचें कांहीं विधान मुख्यत्वेंकरून नसतें व ह्यामुळें त्याचा उल्लेख जरी मुख्य वाक्यांत होत असला, तरी तो ह्या कृदन्ताचे लगेच नंतर स्वाभाविकपणें होत नाहीं, तर मुख्य वाक्यांतील कांहीं शब्दांचे नंतर होतो, तेव्हां तो कर्ता अध्याहृत राहूं शकत नाहीं. जसें:—रामानें मान वर करितांच शिक्षकानें त्यास प्रश्न विचारिला, मी त्याजकडे पाहतांच त्यानें मान फिरविली, इ०. या ठिकाणीं रामानें आणि मी हे करितां व पहातां या कृदन्तांचे कर्ते गुप्त ठेविल्यास अर्थाचा स्पष्ट बोध होणार नाहीं हें उघड आहे.

६१६. कधीं कधीं प्रकृत क्रियासमाप्तीचे अर्थीं या तां-कृदन्तापुढें च या अव्ययाचे जागीं **क्षणीं** हा शब्द किंवा **क्षणींच** असें दोन्ही मिळून येतात. जसें:—असें होतां क्षणीं, सूर्य उगवतां क्षणींच, चोरानें गांठोडें उचलतांक्षणीं किंवा क्षणींच, त्यानें बंदुकीचा चाप ओढतांच किंवा ओढतां क्षणीं किंवा ओढतां क्षणींच, इ०.

**टीप १**—तां-कृदन्ताचा कर्ता कधीं कधीं प्रथमान्त असतो आणि कधीं कधीं तृतीयान्त असतो. प्रथमान्त कर्ता असतां या कृदन्तास अपूर्ण क्रिया म्हणजे क्रियासंतति किंवा क्रियासमाप्ति असे दोन्ही अर्थ असतात. क्रियासंततिपासून क्रियासमाप्तीचा अर्थ सहज कसा येऊं शकतो हें वर दाखविलेंच आहे. कोणत्या जागीं कोणता अर्थ असतो, हें वाक्यौघावरून ठरतें. याप्रमाणें प्रथमान्त कर्ता असतां जरी दोन्ही अर्थ संभवतात तरी तृतीयान्त कर्ता असला म्हणजे क्रियासमाप्ति हा एकच अर्थ असतो; ह्या वेळीं क्रियासंतति हा अर्थ नीट जुळत नाहीं. आतां या ठिकाणाची रचना संस्कृतापासून कशी निघाली तें दाखवितो. संस्कृतांत सति सप्तमी म्हणून एक रचना आहे. तेथें अपूर्ण क्रियाद्योतक कृदन्ताबरोबर कर्ताही सप्तमी विभक्तींतच येतो, आणि मुख्य धातूचे कृदन्ताचे सप्तमीपुढें अस् धातूच्या त्याच प्रकारच्या कृदन्ताची सप्तमी विकल्पेंकरून येतें. जसें:— 'सूर्ये अस्तं गच्छति सति' 'म्हणजे सूर्य अस्तास जात असतां.' यावरून 'असतां' हें रूप संस्कृतांतील सति या कृदन्त-सप्तमीबद्दल आलेलें आहे, हें उघड आहे. अर्थात् सति हें जसें संस्कृत अस् धातूच्या सत् या कृदन्ताचें सप्तमीचें रूप होय, त्याचप्रमाणें असतां हें मराठींतील अस धातूच्या 'असत' ह्या

कृदन्ताचें सप्तमीचें रूप होय. 'गच्छति सति' याबद्दल संस्कृतांत सति हा शब्द वगळून नुसतें 'सूर्ये अस्तं गच्छति' असेंही म्हणतात. संस्कृतांत मुख्य धातूचें कृदन्त अस् या सहायधातूचें कृदन्त हीं दोन्ही सप्तम्यन्त असतात. मराठीमध्यें 'जात असतां' अशा संयुक्त उपयोगामध्यें फक्त अस या सहायधातूचेंच, कृदन्त सप्तम्यन्त आहे; कारण इतकेंच दिसतें कीं, त्या दोहों मिळून एकच शब्द होत असल्यामुळें शेवटच्यासच विभक्ति प्रत्यय लागला आहे. परंतु जेव्हां 'असतां' अध्याहृत असतें म्हणजे मुख्य धातूचेंच कृदन्त एकाएकीं येतें, तेव्हां तेंच सप्तम्यन्त असतें. अर्थात् जात असतां यांतील असतां हें नाहींसें होतें, त्या वेळीं जातां असेंच रूप येतें. यावरून जात असतां, उगवत असतां करीत असतां, ह्यांचे जागीं जातां, उगवतां, करितां, हीं रूपें कशीं येतात हें स्पष्ट होईल. असो. दुसरी एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे, ती अशी. संस्कृतांत ह्या कृदन्ताचे कर्त्याचीही सप्तमीच असते. परंतु मराठींत प्रथमाच येते. 'सूर्ये अस्तं गच्छति सति' याचे जागीं 'सूर्य अस्तास जात असतां' असें मराठींत येतें. जात असतां याचे जागीं नुसतें जातां हें कृदन्त बहुधा कवितेंत येतें. आणि वर सांगितल्याप्रमाणें क्रियासंततिपासून क्रियासमाप्तीचा अर्थ या कृदन्तास जेव्हां येतो, तेव्हां तें गद्यांतही एकाकी येतें. 'सूर्ये अस्तं गच्छति एव' किंवा 'सूर्ये अस्तं गते एव' याचे जागीं सूर्य अस्तास जातांच' अशी रचना झाली. क्रियासमाप्तीचे अर्थीही या रचनेचा मराठींत उपयोग होऊं लागल्यामुळें भूतार्थी बहुधा येणाऱ्या लाख्याताचे नियमही या कृदन्तास हळुहळु लागूं लागले. आणि लाख्यातीं सकर्मक क्रियापदाचा कर्ता जसा तृतीयान्त होतो, त्याप्रमाणें तां–कृदन्तास क्रियासमाप्तीचा अर्थ आल्यामुळें या अर्थी सकर्मक धातूंच्या तां–कृदन्ताचाही कर्ता तृतीयान्त असतो. प्रथमान्त कर्ता असतां क्रियासंतति हा अर्थ असून गद्यांत तां–कृदन्त एकाकी येत नसल्यामुळें मुख्य धातूचे; त–कृदन्तापुढें 'असतां' याचा उपयोग होऊन संयुक्तकृदन्त होतें. जसें:—तो पत्र लिहीत असतां मी तेथें गेलों. परंतु, 'त्यानें पत्र लिहितांच' ह्याप्रमाणें तृतीयान्त कर्ता मुख्य धातूचेंच तां–कृदन्त व त्याचे पुढें च हें अव्यय अशी रचना झाली कीं, तेथें क्रियासमाप्तीचा अर्थ उत्पन्न होतो. येथें तां–कृदन्ताचा भूतकाळीं उपयोग होतो अस कोणी म्हणतात, पण तें सर्वत्र खरें नाहीं. 'त्यानें आंत पाऊल टाकितांच सर्व लोक उठून उभे राहिले' अशा ठिकाणीं म्हणजे मुख्य वाक्यांतील विधान भूतकाळासंबंधाचें असतां तां–कृदन्तास भूतार्थ असतो. परंतु 'त्यानें आंत पाऊल टाकितांच सर्व लोक उभे राहतील' या ठिकाणीं त्यानें आंत पाऊल टाकितांच' म्हणजे 'तो आंत पाऊल टाकील तेव्हां' असा भविष्यकाळाचा अर्थ आहे हें उघड आहे. तसेंच, सोळावें वर्ष संपतांच तो विलायतेस जाणार आहे, इ०. सारांश इतकाच कीं, कोणत्याच कृदन्तास काळाचा विशिष्ट अर्थ नसतो; तो

मुख्यविधानाच्या काळावर अवलंबून असतो. तेव्हां अशा ठिकाणीं तां–कृदन्तास क्रियासमाप्तीचा अर्थ असतो असें म्हणणेंच रास्त आहे.

**टीप**—यासंबंधानें गुंजीकर म्हणतातः—पत्र पोंचतांच वर्तमान समजलें, येथें 'पोंचतांच' (पोंचे तआच) म्हणजे पोंचतें किंवा पोंचलें तेव्हांच, उचलतांच (उचली तआच) म्हणजे उचलतो किंवा उचललें तेव्हांच (संस्कृत 'तदा एव.') गुंजीकरांचा अर्थ बराबर आहे. परंतु पोंचतांच, उचलतांच, हीं रूपें कशीं साधलीं असें सांगण्याचा जर त्यांचा येथें उद्देश असेल, तर त्यांची ही साधनिका केवळ काल्पनिक होय, हें कोणाच्याही तेव्हांच लक्षांत येईल. म्हणून तिचें सविस्तर परीक्षण करण्याची जरूर नाहीं. पहिल्या टीपेंतील निरुपणाशीं ती ताडून पाहिली म्हणजे झालें.

६१७. तकृदन्तापुढें किंवा लाकृदन्तापुढें अस धातूच्या तां–कृदन्ताचा, म्हणजे असतां या शब्दाचा, उपयोग होतो, त्या वेळीं कधीं कधीं संकेताचा अर्थ असतो; म्हणजे संकेत वाक्यांतील पूर्वामध्यें अर्थानुरोधानें त–कृदन्ताचे पुढें किंवा ला–कृदन्ताचे पुढें असतां हें कृदन्त येतें. अशा वेळीं संकेतदर्शक उभयान्वयी अव्ययांचा उपयोग वाक्यांत होत नाहीं. जसें:—मी त्याला सांगत असतां तो गेला ह्या वाक्याचा अर्थ तुला पांच वेळ समजून सांगितला असतां येत नाहीं हें आश्चर्यच होय, इ०. या ठिकाणीं सांगत असतां=जरी सांगत होतों तरी; आणि सांगितला असतां=जरी सांगितला तरी.

(अ) कृदन्ताचा काळार्थ मुख्य वाक्यांतील क्रियापदाचे काळार्थानुसार असतो हें पूर्वीं सांगितलेंच आहे. जसें:—बाप त्याला सांगत असतां तो गेला, मी तुला सांगत असतां तूं जातोस हें ठीक नाहीं, मी त्याला सांगत असतां तो जाईल असें वाटत नाहीं; ह्यांपैकीं पहिल्या उदाहरणांत भूतार्थ व दुसऱ्यांत वर्तमानार्थ आहे; आणि तिसऱ्यांत भूतार्थ वर्तमानार्थ, किंवा भविष्यार्थही असेल; स्थलविशेषीं कोणता अर्थ आहे हें पूर्वापर संबंधानें ठरतें.

(आ) परंतु सांगत असतां, सांगितला असतां, ह्या प्रकारच्या संयुक्त कृदन्ताचे जागीं पद्यांत मुख्य धातूचेंच तां–कृदन्त एकाकी येतें. जसें:—

मत्तें श्वयूथपें श्वा सिंहीप्रति **धाडितां** धरायाला
जाईल कसा तैसा सूतहि भी कृर्म तें करायाला ॥—मोरोपंत.

धर्म म्हणे अन्यासीं अन्याचें द्यूत हें विषम वाटे।
ऐसेंहि असो परि परिणामीं भय **सोडितां** सुनय वाटे॥—मोरोपंत

( इ ) गद्यांतही पद्यांतल्याप्रमाणें पाह, म्हण, कर, इ० धातूंच्या या कृदन्ताचा प्रस्तुत अर्थीं एकाकी उपयोग झालेला कधीं कधीं आढळतो. जसें:—' परंतु सामान्यपणें **पहातां** वाग्देवीचे असले आवडते कंठमणि या दुनियेंत थोडेच निपजतात '—कृष्णशास्त्री चिपळूणकर, व्याकरणावरील निबंध पृ. ५; खरें **पाहातां**, खरें **म्हणतां**, सूक्ष्म विचार **करितां**, इ०. येथें पाहातां = पाहिलें तर, म्हणतां = म्हटलें तर, करितां = केला तर, असा अर्थ आहे हें उघड आहे.

**टीप १**—गेल्या ( ६१६ ) अंकांतील रचना ( सूर्य अस्तास जात असतां, किंवा जातां, किंवा जातांच ) संस्कृत सति सप्तमी-( सूर्ये अस्तं गच्छति सति ) पासून कशी निघाली आहे हें वर दाखविलेंच आहे. या अंकांतील रचनाही सति सप्तमीपासून निघाली आहे, गच्छत् सारख्या अपूर्ण क्रियार्थक कृदन्ताचा जसा सति सप्तमीचे कामीं उपयोग होतो त्याचप्रमाणें गत सारख्या पूर्ण क्रियार्थक कृदन्ताचाही त्या कामीं उपयोग होतो हें तज्ज्ञांस स्मरेलच. म्हणजे 'सूर्ये-अस्तं गच्छति सति' ह्याप्रमाणें 'सूर्ये अस्तं गते सति' असें अर्थानुरोधानें संस्कृतांत म्हणतां येतें, आणि सति सप्तमीचा संकेतार्थींही उपयोग होतो. जसें:—रुदति पुत्रे ( रुदतो वा पुत्रस्य ) पिता प्राव्राजीत्, मामेति व्याहरत्येव तस्मिन्पातालमभ्यगात्, इ०. अशा प्रकारचीच, मी तुला सांगत असतां किंवा सांगितलें असतां, खरें पाहतां, इ० या अंकांतील संकेतार्थी मराठी रचना आहे.

( ई ) ज्यावेळीं अस हाच धातु मुख्य असतो त्यावेळीं त्याचें तांकृदन्त संकेतार्थी गद्यांतही एकाएकीच येतें. जसें:—असें असतां तूं तेथें कसा गेलास; तूं आजारी असतां शाळेंत कां येतोस, इ०.

## तांनांकृदन्त ( देतांनां, करितांनां, इ०.)

६१८. तांकृदन्ताचा कालवाचक क्रियाविशेषणाप्रमाणें गद्यांत सहसा एकेरी उपयोग होत नाहीं, तर त्याची बहुधा द्विरुक्ति होते हें वर सांगितलेंच आहे. परंतु तांनांकृदन्त त्याचे जागीं एकाकीच येतें. जसें:—तो चालतां चालतां पडला, तो जेवीत असतां बोलत नाहीं, इत्यादि ठिकाणीं तो **चालतांनां** पडला, तो **जेवितांनां** बोलत नाहीं; इ० असें म्हणतात.

( अ ) तांकृदन्त व तांनांकृदन्त हीं दोन्ही बहुधा वाक्यांतील क्रियापदांचे कर्त्यास उद्देशून येतात; परंतु कधीं कधीं तीं क्रियापदाचे कर्मास ही उद्देशून आलेलीं आढळतात. जसें:—मीं आपल्या माडीवरून रामास खेळतांनां पाहिले. तूं त्याला असें बोलतांनां ऐकिलेंस काय ? इ०. या ठिकाणीं खेळतांनां व बोलतांनां ह्या कृदन्तांचा संबंध मी व तूं या पाहिलें व ऐकिलेंस या क्रियापदांच्या, कर्त्याकडे नसून रामास व त्याला या कर्मांकडे आहे म्हणजे त्या कर्मांस उद्देशून हीं कृदन्तें आलीं आहेत हें उघड आहे. अर्थात् खेळतांनां व बोलतांनां यांतील खेळ व बोल या धातूंचे किंवा क्रियांचे मी व तूं हे कर्ते नसून रामा व तो हे कर्ते आहेत.

( आ ) वाक्यांतील कृदन्त क्रियापदाचा कर्ता व कर्म या दोहोंकडे लागण्यासारखें असल्यास तें ज्यास लागावें अशी वक्त्याची इच्छा असेल त्याचे पुढें तें कृदन्त असावें. म्हणजे अशा स्थळीं वाक्यांतील पदांचा क्रम महत्त्वाचा आहे जसें:—मीं खेळतांनां त्यास पाहिलें, म्हणजे मी स्वत: खेळत होतों, तेव्हां त्यास पाहिलें; आणि मी त्यास खेळतांनां पाहिलें म्हणजे तो खेळत होता त्या वेळीं मीं त्यास पाहिलें, म्हणजे खेळण्याचे स्थितींत तो माझ्या दृष्टीस पडला असा अर्थ आहे हें उघड आहे.

[ जोशीबोवांचा या संबंधाचा नियम पहा. ' या अव्ययाचा क्रियेच्या अप्रत्यक्ष कर्माचे जागीं उल्लेख होतो. उदा०—मीं त्यास असें बोल–तां ( तांना ) ऐकतों, तर त्यास मीं दाबलें असतें; रामास मी घोड्यास मारतांना पाहिलें; इत्यादि. दुसरे उदाहरणांत कर्मणि प्रयोग असल्यामुळें कृदन्त हें क्रियापदाचा कर्ता झालें आहे. ' या नियमाचें सविस्तर परीक्षण करणें अनावश्यक आहे. तथापि जोशीबोवांची ही व्याकरण पद्धति जरी चुकीची नसली, तरी कशी चमत्कारिक आहे इतकें येथें दाखवितों.

प्रथम ' मी त्यास **बोलतां** ऐकितों ' असें म्हणण्याचा प्रघात निदान आम्हांस तरी माहीत नाहीं. त्याचे जागीं जोशीबोवांनीं कंसांत दाखविलेला **बोलतांना ऐकितों** असेंच म्हणण्याचा शिष्ट प्रघात आहे असें आम्हांस वाटतें. असो, या वाक्यांत जोशीबोवांचे मतें बोलतां किंवा बोलतांना हें ऐकितों ह्याचें अप्रत्यक्ष कर्म आहे. अशाच प्रकारें ' मला बोलतां येतें ' या वाक्यांत बोलतां हें धातुसाधित नामाप्रमाणें असून त्याचा येतें या क्रियापदाचे कर्त्याच्या जागीं उपयोग झाला आहे असें जोशीबोवा म्हणतात. परंतु एक तर येतें या ठिकाणीं

राकणें या अर्थी उपयोग असून शक या धातूचाही स्वतंत्रपणें फारसा उपयोग झालेला दिसत नाहीं. तेव्हां येथें यास स्वतंत्र क्रियापद मानणें प्रशस्त नाहीं. शिवाय दुसरीं उदाहरणें पाहिलीं असतां वाचकांस तेव्हांच असें दिसून येईल कीं अशा वाक्यांत बोलतां सारखें जें तांकृदन्त असतें तें कर्ता मानणें प्रशस्त नाहीं; इतकेंच नव्हे, तर साफ चुकीचें आहे. ‘ त्याला हें उदाहरण करितां येतें ’ या ठिकाणीं उदाहरण हें करितां या कृदन्ताचें कर्म आणि करितां हें कृदन्त नामाप्रमाणें उपयोगांत असून तें येतें याचा कर्ता आहे असें म्हणण्याची सकृद्दर्शनीं तरी जोशीबोवांस सवड आहे. बाकी येथें सुद्धां करितां ह्या नावाचें लिंग काय, तें कसें समजतें, तें नपुंसकलिंगी आहे हें समजण्याचें येतें या क्रियापदाशिवाय अन्य साधन आहे काय ? कर्त्याचें लिंग क्रियापदास असतें असें म्हणण्याचे जागीं येथें क्रियापदाचे लिंगावरून कर्त्याचें लिंग कळत नाहीं काय ? असे प्रश्न साहजिक उद्भवतात. तरी ते बाजूस ठेऊं. परंतु ‘ त्याला हा धातु चालवितां येतो, ’ ‘ त्याला ही आर्या लावितां येते, ’ ‘ त्याला हे शब्द चालविता येतात ’, इत्यादि वाक्यांत चालवितां, लावितां, चालवितां ह्या कृदन्तांस येतो, येते, येतात, या क्रियापदांचे कर्ते म्हणण्यास जोशीबोवा धजावतील कीं नाहीं ह्याची आम्हांस शंकाच आहे. तसें करण्यास तयार व्हावयाचें म्हणजे लावितां, चालवितां, इत्यादि तांकृदन्तें नामाप्रमाणें उपयोगांत येतात, तेव्हां त्यांचें एकच रूप तिन्हीं लिंगीं व दोन्ही वचनीं उपयोगांत येतें आणि त्यास प्रथमा किंवा जोशीबोवांची अप्रत्यय द्वितीया यांशिवाय कोणतीच विभक्ति लागत नाहीं असें म्हणणें भाग आहे. अशा प्रकारची हीं तांकृदन्तनामें म्हणजे मराठी भाषेंतील नामांचा ‘ नभूतो न भविष्यति ’ असा एक विचित्र मासलाच होय. सारांश, इतकाच कीं आम्ही दाखविलेल्या उदाहरणांत धातु, आर्या, शब्द, या कर्माप्रमाणें ये या सहाय्यधातूचें क्रियापद असल्या मुळें, जोशीबोवांची व्याकरण-पद्धति सर्वथैव त्याज्य होय असें निःशंकपणें सिद्ध होत नाहीं काय ? तसेंच तांप्रत्ययान्त कृदन्त आमच्या मतें नामाप्रमाणें कधींच उपयोगांत येत नाहीं. आणि तें तसेंच येत असलें तरी ‘ मला उदाहरण करितां येतें, त्याला ही आर्या लावितां येते, ’ इत्यादि वाक्यांत मला, त्याला, इ०. हे चतुर्थ्यन्त शब्द कर्ते; उदाहरण, आर्या, इ०. हीं प्रथमान्त कर्में; आणि करितां येतें, लावितां येते, इ० हीं क्रियापदें असून प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोग आहे हें उघड आहे. त्याचप्रमाणें मला बोलतां येतें, मला जातां येतें, मला धांवतां येतें, इत्यादि वाक्यांत भावेप्रयोग आहे हें उघड आहे. आतां जोशीबोवांच्या वरील उताऱ्यांतील उदाहरणांकडे वळूं.

मी त्यास बोलतां किंवा बोलतांनां ऐकतों, रामास मी घोड्यास मारतांनां पाहिलें, या वाक्यांत जोशीबोवांचे मतें बोलतांनां व मारतांनां हीं अप्रत्यक्ष कर्में होत; आणि दुसऱ्या उदाहरणांत कर्मणि प्रयोग असल्यामुळें कृदन्त हें क्रिया-

पदाचा कर्ता झालें आहे. प्रथम पहिल्या उदाहरणाकडे पहा. मी त्यास बोलतांना ऐकतों, या वाक्याची जोशीबोवांनीं लाविलेली व्यवस्था थेट इंग्रजी रचनेस अनुसरून दिसते. पूर्वी एका ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें जोशीबोवांचा स्वभाविक ओढा इंग्रजीकडे फार दिसतो. परंतु मराठीचा इंग्रजीशीं असलेला संबंध आनुवंशिक नसून आकस्मिक व आगंतुक आहे ही गोष्ट विसरतां कामा नये. ह्यामुळें कोणत्याही मराठी रचनेचें रहस्य समजून घेण्यासाठीं इंग्रजीकडे धांव घेणें योग्य नाहीं. युरोपियन रचना मुळीं आमचे आर्य रचनेहून फारच भिन्न आहे. ही गोष्ट प्रत्येक इंग्रजी शिकणाराचे पदोपदीं अनुभवास येत आहे. त्याप्रमाणें ती जोशीबोवांनांही स्वानुभवानें माहीत असली पाहिजे. असें असतां त्यांनीं आपल्या व्याकरणांत अनेक जागीं मराठी रचनेचे स्पष्टीकरणार्थ इंग्रजी चष्मा चढवावा हें आश्चर्यच होय. वास्तविक म्हटलें म्हणजे मराठीचे स्पष्टीकरणासाठीं तिची पूर्वपीठिका पाहिली पाहिजे. तशी पूर्वपीठिका जर साद्यंत व संगतवार मिळूं शकत नसली तर निदान संस्कृत मूलाचा तरी विचार करणें चांगलें. तेव्हां ‘ मी त्यास बोलतांना ऐकतों ’ या मराठी रचनेवर I hear him speak या इंग्रजी वाक्याचा प्रकाश पाडून तिचें रहस्य स्पष्ट करूं पाहणें म्हणजे पूर्व परंपरा साफ विसरून जाणें होय. आमच्या मतें वरील मराठी रचनेवर ‘ अहं तं ब्रुवन्तमाकर्णयामि ’ या संस्कृत रचनेचा प्रकाश पाडल्यानें मराठीची खुबी स्पष्ट दिसूं लागते. मराठी व संस्कृत या दोन्ही वाक्यांत मी व अहं हे कर्ते, त्याला व तं हीं कर्मे, बोलतांना व ब्रुवन्तं हीं कर्मगामी कृदन्तें, व ऐकतों आणि आकर्णयामि हीं क्रियापदें होत, या गोष्टी अगदीं स्पष्ट आहेत. संस्कृत ब्रुवन्तं व मराठी बोलतांना यांमध्यें फरक इतकाच कीं ब्रुवन्तं हें संस्कृत कृदन्त विशेषण असून तें कर्मनिष्ठ आहे, परंतु बोलतांना हें मराठी कृदन्त अव्यय आहे. संस्कृत व मराठी या दोन्ही वाक्यांत इंग्रजींतल्याप्रमाणें अप्रत्यक्ष कर्माची गरज नाहीं; आणि बोलतांना हें कधींच नाम नाहीं, ह्यामुळें त्यास प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष कोणतेंच कर्म म्हणतां येत नाहीं. परंतु इंग्रजींत Speak ही present infinitive कर्मासारखी दिसत असल्यामुळें जोशीबोवांनीं बोलतांना ह्यास मराठींतही अप्रत्यक्ष कर्म हें नांव दिलें. ऐकणें यास संस्कृतांत किंवा मराठींत दोन कर्में मुळीं लागतच नाहींत आणि प्रस्तुत वाक्यांत त्यास हें कर्म आहे ह्याबद्दल वाद नाहीं. तेव्हां दुसऱ्या कोणत्याही शब्दास जबरदस्तीनें कर्म ठरविण्याची गरज नाहीं.

आतां ‘ रामास मी घोड्यास मारतांनां पाहिलें ’ हें जोशीबोवांचे दुसरे वाक्य पहा. या वाक्यांत कर्मणि प्रयोग असल्यामुळें कृदन्त हें कर्ता झालें आहे असें जोशीबोवा म्हणतात. ह्याचा अर्थ असा कीं, या वाक्यांत जोशीबोवांचे मतें ( पुढील परिभाषा जोशीबोवांची नसून दादोबादिकांची आहे ) मीं हा कर्ता

मारितांनां हें कर्म, आणि पाहिलें हें क्रियापद; आणि हें क्रियापद मारतांनां या कर्माच्या लिंगवचनपुरुषाप्रमाणें असल्यामुळें या वाक्यांत कर्मणि प्रयोग आहे. हें मत एका वैयाकरणाचेंच पडल्यामुळें त्यास एकदम चूक न म्हणतां त्याचा थोडासा तरी विचार करणें जरूर आहे. आमच्या मतें वरील वाक्यांत मुळीं कर्मणि प्रयोगच नाहीं. तर मीं हा कर्ता, रामास हें कर्म आणि पाहिलें हें क्रियापद, भावे प्रयोग; आणि मारतांना हें अव्यय असून वरील प्रयोगांत सांगितल्याप्रमाणें तें रामास ह्या कर्मास उद्देशून आलेलें आहे. 'घोड्यास मारतांनां' हे शब्द कर्त्यास उद्देशूनही येऊं शकतील. तेव्हां ते क्रियापदाचे जवळ न घालितां कर्त्याचे मागें योजून 'घोड्यास मारतांना मी रामास पाहिलें' असें म्हणावें हें फार चांगलें. या ठिकाणीं 'मी घोड्यास मारीत असतां रामास पाहिलें' असा अर्थ आहे हें उघड आहे. परंतु 'रामास मी घोड्यास मारितांना पाहिलें' या जोशीबोवांचें उदाहरणांत तें रामास या कर्मास उद्देशून आलें आहे. त्यांचे मतें 'रामास' हा चतुर्थ्यन्त शब्द या कृदन्ताचा कर्ता होय. अर्थदृष्ट्या हें म्हणणें कोणीही कबूल करील. परंतु वरील संबंध वाक्याचे अर्थाच्या दृष्टीनें व व्याकरणाचे दृष्टीनें 'रामास' हें पाहिलें या क्रियापदाचें कर्म म्हणणें अवश्य आहे. 'मीं ती गाय चरतांना (किंवा चरत असतां) पाहिली' आणि 'मीं त्या गाईस चरतांना (किंवा चरत असतां) पाहिलें' ह्या दोन वाक्याकडे लक्षपूर्वक पहा. जोशीबोवांचे मतें या वाक्यांत रचतांना किंवा रचत असतां हीं कर्मे असून तींच धातुरूपेश होऊन कर्मणि प्रयोग झाला आहे. हें म्हणणें 'रामास मी घोड्यास मारतांनां पाहिलें' या त्यांच्या व 'मीं त्या गाईस चरतांनां पाहिलें' या येथें दिलेल्या उदाहरणांत एकवार साजेसें आहे परंतु 'मीं गाय चरतांना पाहिली' या वाक्यांत चरतांना यास कर्म म्हणणें शक्यच नाहीं. आमच्या मतें हीं तां व तांनां प्रत्ययांनीं होणारीं कृदन्तें नेहमीं अव्ययेंच असतात; आणि प्रकृत वाक्यांतही तीं अव्ययेंच आहेत. हें पुढील वाक्यांचे तुलनेनें स्पष्ट होईल.

| कर्तरि प्रयोग. | प्रयोगान्तर |
|---|---|
| मीं गाय चरतांनां पहातों | मीं गाय चरतांनां पाहिली (कर्मणि). |
| मी गाईस चरतांनां पाहतों. | मीं गाईस चरतांनां पाहिलें (भावी). |

या वाक्यांवरून असें साफ दिसून येईल कीं, 'रामास मीं घोड्यास मारतांनां पाहिले' या वाक्यांतील मारतांनां या कृदन्तास नाम समजून त्यास पाहिलें ह्याचें कर्म मानणें हें चुकीचे आहे. अशा प्रकारच्या जोशी, खेरं, वगैरे आधुनिक वैयाकरणांच्या अनेक चुका यापूर्वीं दाखविण्यांत आल्याच आहेत. तेव्हां आतां या प्रयोगासंबंधानें अधिक लिहिण्याची जरूर नाहीं.]

टीपः—देतां, घेतां, देतांनां, घेतांनां, करितांनां ह्यां तां आणि तांनां प्रत्ययान्त कृदन्तांच्या व्युत्पत्तीसंबंधानें राजवाडे म्हणतात कीं, 'अर्धमागधींतक्ताचा (या ठिकाणीं बहुधा क्त्वाचा असें पाहिजे असें वाटतें) अपभ्रंश होऊन हें कृदन्त होतें;' जसें:—वंदित्वा-वंदित्ता-वंदितां, नीत्वा-नेत्ता-नेतां,इ०. (क्त्वा=तॉं=तां). तसेच क्त्वा =त्ताणं = तानाँ. 'त्याच धर्तीवर मराठींत क्त्वा, त्ताणं, तानाँ अशा परंपरेनें आलेला तानां प्रत्यय धातूंना लागून भूतार्थी अव्ययी कृदन्तें होतात. भूत्वा = होतानाँ, यात्वा = जातानाँ, नीत्वा = नेतानाँ इ० इ० हें रूप वर्तमान मराठींत अति येतें.' (श्री ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण, पृष्ठ १०८, १०९). राजवाड्यांची ही व्युत्पत्ति अर्थदृष्ट्या बरोबर दिसत नाहीं. वंदितां, नेतां, ह्या कृदन्तांचा मूळ अर्थ अपूर्णक्रिया किंवा क्रियासंतति हा होय; त्यांचा कधीं कधीं क्रियासमाप्तीच्या अर्थी उपयोग होतो, हें वर सांगितलेंच आहे. तरी क्रियासमाप्ति हा त्यांचा मूळ अर्थ नाहीं. परंतु वंदित्वा, नीत्वा, ह्यांस अपूर्ण क्रियेचा अर्थ कधींच नसतो व हीं पूर्वकालवाचकें आहेत, म्हणजे ह्यांस केवळ क्रियासमाप्तीचा अर्थ आहे. तसेंच होतांना; जातांना, नेतांना यांसही क्रियासमाप्तीचा अर्थ कधींच नसून 'क्रिया चालली असतां' असाच अर्थ आहे. पण भूत्वा, यात्वा, नीत्वा यांस तसा अर्थ कधींच नसतो. ह्यामुळें जातां, नेतां, जातांना, नेतांना ह्यांची राजवाड्यांनीं यात्वा, नीत्वा, यांशीं जोडलेली सांगड अयथार्थ आहे. यात्वा, नीत्वा, यांपासून जाऊन नेऊन, हीं ऊन-कृदन्तें निघतात, हें सर्वमान्य व निर्विवाद असून, राजवाड्यांनींही आपल्या पुस्तकांत वरील पृष्ठाच्या मागल्याच पृष्ठावर तें सांगितलें आहे.

## ला-कृदन्त (केला, दिला, घेतला, इ०.)

६१९. धातूच्या ला-कृदन्तापुढें असतां हें कृदन्त येऊन जें संयुक्त कृदन्त होतें, त्याचा संकेत वाक्यांतील पूर्वांत उपयोग होतो. मात्र या वेळीं जर—तर, जरी—तरी, इत्यादि संकेतदर्शक उभयान्वयी अव्ययाचा उपयोग होत नाहीं. जसें:—उपाय केला असतां त्याला गूण येईल = जर उपाय केला तर इ०, त्यानें अभ्यास केला असतांही तो नापास झाला =जरी त्यानें अभ्यास केला तरी इ० (अंक ६३७ पहा.)

६२०. ला-कृदन्त आणि लाख्यातांचें तृतीय पुरुषीं रूप हीं वास्तविक एकच आहेत. तीं दोन्ही एकाच संस्कृत मूळापासून आलेलीं असून अर्थाचे दृष्टीनेंही त्यांमध्यें फारसा फरक नाहीं. जेव्हां या रूपास क्रियापद म्हणतां येत नाहीं, तेव्हां त्यास कृदन्त म्हणावयाचें. 'गेल्याचा शोक वृथा न करावा' या ठिकाणीं गेल्याचा म्हणजे, जें गेलें त्याचा, असा

अर्थ आहे. या ठिकाणीं गेल्याचा हें ला-कृदन्ताचें षष्ठयन्त रूप समजणें बरें. ला-कृदन्त मूळचें विशेषण असून त्याचा येथें नामाप्रमाणें उपयोग झाला आहे, हें उघड आहे.

६२१. ला-कृदन्ताचे कर्त्याच्या विभक्तीसंबंधानें लाख्यातांतील कर्तरि व कर्माणि रूपांबद्दलचे नियम लक्षांत ठेवणें जरूर आहे. साधारणपणें सर्व अकर्मक धातू आणि उमजगणांतील सकर्मक धातू ह्यांचा लाख्यातीं कर्तरि प्रयोग होतो आणि इतर सकर्मक धातूंचा कर्मणि प्रयोग होतो. म्हणजे अकर्मक व उमज-गणांतील धातू ह्यांच्या लाख्याताचे रूपांचा कर्ता प्रथमान्त असतो; व उमजगणेतर सकर्मक धातूंच्या लाख्याताचे रूपांचा कर्ता तृतीयान्त असतो. ला—कृदन्तास जेव्हां मराठींत स्वतंत्रपणें कर्ता असतो व त्याचा त्या ला-कृदन्तविशेषणाचें विशेष्य म्हणून लगेच पुढें उपयोग होत नाहीं, त्या वेळीं तो कर्ता प्रथमान्त किंवा तृतीयान्त असतो; आणि ला—कृदन्त नेहमीं प्रथमेतर विभक्तींत किंवा शब्दयोगी अव्ययानें युक्त असें असतें. ला-कृदन्ताच्या कर्त्याची प्रथमा व तृतीया या विभक्ती लाख्यातीं क्रियापदाच्या कर्त्याचे विभक्तींप्रमाणेंच असतात. ला-कृदन्त स्वतंत्रपणें प्रथमा विभक्तींत कधींच येत नाहीं. जसें:—

| कृदन्ताची विभक्ति. | उदाहरणें. |
|---|---|
| तृतीया--- | **तो** जेवल्यानें तुझें पोट कसें भरेल.<br>**त्यानें** लिहिल्यानें तुझें अक्षर कसें वळावें. |
| चतुर्थी—— | **तो** जेवल्यास त्याला दहीं वाढ.<br>**त्यानें** घर बांधल्यास पांच वर्षें झालीं. |
| पंचमी ( पासून )— | **तो** गेल्यापासून मला चैन पडत नाहीं.<br>**त्यानें** शिव्या दिल्यापासून मी त्याजकडे जात नाहीं. |
| षष्ठी — | **म्हातारी** मेल्याचें दुःख नाहीं, काळ सोकतो.<br>**त्यानें** पत्र लिहिल्याची अफवा खोटी आहे. |
| सप्तमी (क्वचित् )— | **तो** गेल्यांत मी गेलोंच कि० आल्यांत आलों.<br>त्या **पोरांनीं** शिव्या दिल्यांत आश्चर्य नाहीं. |

६२२. तां-कृदन्ताचा कर्ता ज्या परिस्थितींत अध्याहृत असतो म्हणून वर ( अंक ६१५ ) सांगितलें, त्याच परिस्थितींत प्रस्तुत कृदन्ताचा कर्ताही

अध्याहृत असतो. जसें:—सकाळीं जेवल्यानें उन्हाळ्यांत बरें असतें, येथें आल्यापासून माझी तब्यत बरी आहे, येथून गेल्यापासून तो सुधारत आहे, ही वाईट संवय सोडल्यापासून त्याचा बराच फायदा झाला आहे, इ०.

६२३. 'त्यानें घर बांधल्याला पांच वर्षें झालीं' अशा सारख्या उदाहरणांत जेव्हां चतुर्थ्यन्त ला-कृदन्ताचा कालारंभदर्शक उपयोग होतो, तेव्हां त्याच्या कर्त्याचे तृतीयेच्या किंवा प्रथमेच्या जागीं विकल्पेंकरून चतुर्थी विभक्ति होते. जसें:—त्यानें किंवा त्याला हें घर बांधल्याला, तो किंवा त्याला मेल्याला, मी किंवा मला आल्याला, त्यानें किंवा त्याला हा विषय शिकल्याला, पांच वर्षें झालीं; इ०.

**टीप**—कालारंभाचा अर्थ असतां संस्कृत भाषेंतही थेट अशीच वाक्यरचना आढळते; मात्र संस्कृतांत मराठी चतुर्थीचे जागीं षष्ठी विभक्ति येते. जसें:—तस्य मृतस्य आगतस्य वा पंच वर्षाणि जातानि, इ०. संस्कृत षष्ठीच्या प्रत्ययांपासून मराठींतील चतुर्थीचे प्रत्यय आले असल्यामुळें, येथील संस्कृत षष्ठीचे जागीं मराठींत चतुर्थी येणें स्वाभाविकच आहे. संस्कृतांत सकर्मक धातूचें भूतार्थक कृदन्त कर्मणि असतें. तेव्हां सकर्मक धातूच्या भूतकृदन्ताचे संबंधानें अशी वाक्यरचना आढळत नाहीं. त्यास पुन्हा वत् प्रत्यय लागून (उदा०—कृतवत्) कर्तरि रूप दिलें असतां अशी रचना होऊं शकते. परंतु केवळ भूतार्थक कृदन्तासंबंधानेंच बोलावयाचें असतां संस्कृतांत अशी रचना फक्त अकर्मक धातूंच्याच भूतकृदन्तांसंबंधानें आढळते. मराठींतही अकर्मक धातूंच्या ला-कृदन्ताचाच असा उपयोग विशेष प्रचारांत आहे. आणि उमज-गणामधील धातूंचा मराठींत अकर्मक धातूंप्रमाणेंच लाख्यातीं कर्तरि प्रयोग होत असल्यामुळें त्यांच्याही ला-कृदन्ताचा असा चतुर्थ्यन्त उपयोग बराच होतो. जसें:—मला बीजगणित शिकल्याला वीस वर्षें झालीं; इ० तथापि सकर्मक धातूंच्या ला-कृदन्ताचाही मराठींत असा उपयोग क्वचित् होतो, मुदलींच नाहीं असें नाहीं. जसें:—मला तीर्थयात्रा केल्यास दहा वर्षें झालीं, त्याला तें पुस्तक लिहिल्यास फार वर्षें झालीं, इ०. अशा ठिकाणीं कर्त्याची विवक्षा किंवा महती नसतां तो अध्याहृतही असतो. जसें:—हें तळें बांधल्याला शंभरांहून अधिक वर्षें झालीं, हें धोतर नेसावयास काढल्याला आज सहा महिने झाले, इ०.

**टीप** २—अशा ठिकाणच्या चतुर्थ्यन्त ला-कृदन्ताचे जागीं मराठींत कधीं कधीं ऊन-कृदन्ताचाही उपयोग होतो. अशा वेळीं या दोन्ही कृदन्तांस 'क्रियासमाप्तीपासून' असा अर्थ असतो. जसें:—त्याला मेल्याला किंवा मरून पांच वर्षें झालीं, त्याला हें घर बांधल्याला किंवा बांधून पांच वर्षें झालीं, इ०.

**टीप ३**—अकर्मक धातूचे ला-कृदन्ताचा कर्ता प्रथमान्त असतो; पण ' कालारंभ ' किंवा ' क्रियासमाप्तीपासून ' असा अर्थ असतां चतुर्थ्यन्त ला-कृदन्ताचा कर्ता विकल्पेंकरून प्रथमान्तही होतो, हें वर सांगितलें; त्याचप्रमाणें अकर्मक धातूंचें ला—कृदन्त तृतीयान्त असतें, तेव्हां त्याचाही कर्ता विकल्पेंकरून तृतीयान्त येतो. जसें:—तो जेवल्यानें किंवा त्यानें जेवल्यानें तुझें पोट कसें भरेल, तो गेल्यानें किंवा त्यानें गेल्यानें तुझें काम कसें भागेल, इ०.

[ आतां जेवल्यानें, लिहिल्यास, दिल्यापासून, मेल्याचें, गेल्यांत, इत्यादि विभक्त्यन्त किंवा शब्दयोगी अव्ययान्त पदांची साधनिका काय हा एक मोठाच प्रश्न आहे, कांहीं वैयाकरणांचे मतें या पदांची साधनिका अशीः—

तो जेवल्यानें = तो जेवला यानें ( या गोष्टीनें )

त्यानें लिहिल्यानें = त्यानें लिहिलें यानें ( या गोष्टीनें )

त्यानें घर बांधल्याला = त्यानें घर बांधिलें याला ( या गोष्टीला )

तो गेल्यापासून = तो गेला यापासून ( या कालापासून )

म्हातारी मेल्याचें = म्हातारी मेली याचें ( या गोष्टीचें )

तो आल्यांत = तो आला यांत ( या गोष्टींत ).

या दृष्टीनें लाख्याताचे क्रियापदांपुढें हा या दर्शक सर्वनामाचें विभक्त्यन्त रूप निकट सान्निध्यानें येऊं लागल्यामुळें त्या दोन रूपांचा एक प्रकारचा संधि होऊन जेवल्यानें, गेल्यापासून, वगैरे रूपें तयार झालीं असावीं. परंतु ह्या मताप्रमाणें सर्व ठिकाणीं समाधानकारक निकाल लागत नाहीं. मी आल्यानें, तूं आल्यानें, इत्यादि ठिकाणीं मी आलों यानें, तूं आलास यानें, असे तुकडे नीटपणें पडतात असें दिसत नाहीं. तसेंच तो जेवल्यास त्याला दहीं वाढ, त्यानें घर बांधल्यास त्याची बिन्हाडाची अडचण दूर होईल, वाक्यांतील जेवल्यास व बांधल्यास ह्या पदांचें जेवला यास, व बांधिलें यास, ह्याप्रमाणें कसें स्पष्टीकरण होईल तें होवो ! म्हणजे जेवला यास व बांधिलें यास ह्यांपासून जेवल्यास, व बांधिल्यास हीं पदें कशीं तयार होतात व ह्यांचा अर्थ तरी जेवला यास, बांधिलें यास, यांपासून कसा निघतो हें एक मोठें गूढच आहे. तसेंच तो आल्यावर मी येईन. तो शाळेंतून आल्यानंतर फिरावयास जातो, तूं हीं परीक्षा उत्तीर्ण झाल्यावांचून नोकरी मिळणार नाहीं, इत्यादि वाक्यांत लाख्यातीं क्रियापद व त्याचे पुढें दर्शक सर्वनाम आहे असें म्हणतां येत नाहीं. तो आल्यावर मी येईन, या ठिकाणीं तो आला यावर मी येईन हा पदच्छेद अर्थाशीं मुदलींच जुळत नाहीं हें उघड आहे. असाच वरच्या इतर उदाहरणांत प्रस्तुत मतानुसार पदच्छेद व अर्थ यांमध्यें विसंगतपणा आहे. तात्पर्य हा पदच्छेद वाक्यांतील क्रियापद भूतकाळीं असतां अर्थदृष्ट्या एकवार चालणसारखा आहे.

भाषादृष्ट्या मात्र भूतकाळींही प्रथम पुरुष ए० व०, द्वि० पु० ए० व० अशा कांहीं ठिकाणीं हा पदच्छेद जबरीचाच दिसतो; आणि वर्तमान व भविष्यकाळांचे आणि संकेताचे अर्थीं तर तो अगदींच अयथार्थ आहे. शिवाय या मतास इतिहासाचाही आधार दिसत नाहीं. तेव्हां हें मत केवळ काल्पनिक आहे, इतकेंच नव्हे तर बऱ्याच अंशीं अप्रयोजकही आहे.

आल्यानें, गेल्यावर, वगैरे ठिकाणीं भूतार्थक क्रियापद मानणें चुकीचें आहे. कारण कीं, त्यांचा वाटेल त्या काळीं उपयोग होतो. तो आल्यावर मी गेलों, तो आल्यावर मी जातों, तो आल्यावर मी जाईन, इत्यादि उदाहरणांवरून आल्यावर यास स्वतःचा काळार्थ नाहीं किंवा आज्ञा, विधि, संकेत, इत्यादि दुसरेही विशेष अर्थ त्यास नाहींत हें उघड आहे. म्हणजे 'आल्यावर' ह्यांत लाख्यातीं क्रियापद आहे हें म्हणणें भाषादृष्ट्या काय किंवा अर्थदृष्ट्या काय प्रशस्त नाहीं, हें वरील पुराव्यानें सिद्ध होत आहे. कृदन्ताचाच असा वाटेल त्या काळीं विशेष अर्थाशिवाय उपयोग होतो, आणि वाक्यांतील क्रियापदानें दाखविला जाणारा काळार्थ कृदन्तास बहुधा प्राप्त होतो, हा कृदन्तांचा स्वभाव आतां पूर्णपणें वाचकांस माहीत झालाच आहे. तेव्हां 'आल्यावर' अशा सारख्या पदांत लाख्यातीं क्रियापदाचे जागीं ला–कृदन्त आहे असेंच मानणें सर्वथा योग्य आहे.

आतां 'आल्यावर' 'आल्यानें' यांतील कृदन्ताचें मूळ रूप काय असा एक प्रश्न उद्भवतो; हा प्रश्न जरासा बिकटच आहे. ह्यांमध्यें ला–कृदन्त आहे असें ठरल्यावर त्याचें मूळ रूप काय हा प्रश्नच कां उत्पन्न व्हावा आणि तो बिकट तरी कां असावा ? असें पुष्कळांस वाटण्याचा संभव आहे. परंतु ला–कृदन्त आकारान्त विशेषण असल्यामुळें तें लिंगानुसार बदलतें. जसें:—चांगला, चांगली, चांगलें, त्याप्रमाणें आला, आली, आलें, अशीं लिंगानुसार रूपें होतात; आणि आकारान्त विशेषणें लिंगानुसार बदलून घोडा, नदी, तळें, ह्या शब्दांप्रमाणें चालतात. [ अंक ३६० (अ) पहा. ] हें पूर्वी आलेंच आहे. त्याप्रमाणें आला, आली, आलें, हीं रूपेंही घोडा, नदी, तळें, यांप्रमाणें अनुक्रमें चालावीं. घोड्यानें, नदीनें, तळ्यानें, ह्यांच्यासारखीं चांगल्यानें, चांगलीनें, चांगल्यानें, अशीं चांगला या विशेषणांचीं निरनिराळ्या लिंगी रूपें होतात; परंतु आला आणि आलें ह्यांचें जरी घोड्यानें व तळ्यानें ह्यांप्रमाणें आल्यानें हें पुल्लिंगी व नपुंसकलिंगी नियमित रूप होतें. तरी आली ह्याचें नदी शब्दाच्या नदीनें या रूपाप्रमाणें आलीनें असें रूप न होतां आल्यानें असेंच रूप होतें. म्हणजे आल्यानें हें एकच रूप तिन्ही लिंगीं येऊन तो आल्यानें, ती आल्यानें, तें आल्यानें असा भाषाप्रचार झाला आहे. तेव्हां या ठिकाणीं स्त्रीलिंगाचे वेळीं ला–कृदन्ताचें स्त्रीलिंगी रूप पुल्लिंगाप्रमाणेंच चालतें किंवा ला–कृदन्ताचीं विभक्त्यन्त रूपें तिन्ही लिंगीं समान आहेत असें म्हटलें पाहिजे, हें उघड आहे. एवंच ला–कृदन्ताचीं स्त्रीलिंगी रूपें विभक्ति–

विकरणाचे दृष्टीनें अपवादकच होत. शिवाय ह्यांचे कोणत्याही लिंगीं अनेकवचनीं निराळें रूप नाहीं. ते–त्या–तीं आल्यानें असाच भाषाप्रचार आहे. परंतु काळा, गोरा, ह्यांचीं काळ्यांनीं, गोऱ्यांनीं, अशीं अनेकवचनीं स्वतंत्र रूपें आढळतात तेव्हां ला–कृदन्तें हीं विभक्ति–विकरणाचे दृष्टीनें केवळ एकवचनीं चालून त्यांचीं तिन्ही लिंगीं रूपें पुलिंगाप्रमाणेंच होतात, हें उघड आहे.

येथील ला–कृदन्तांसंबंधानें आणखी एक प्रश्न उद्भवतो तो असा. ह्यांस विशेषण म्हणावें किंवा नाम म्हणावें. संस्कृतामध्यें हीं व ह्यांचे कर्ते नेहमीं एकाच लिंग–वचन–विभक्तीनें युक्त असतात. तया गतया, तस्य गतायै, तस्याः गतायाः इत्यादि संस्कृत प्रचार तज्ञांस स्मरेलच. परंतु मराठींत फार तर तृतीया व चतुर्थी ह्या दोनच विभक्ति दोहोंस लागलेल्या कधीं कधीं आढळतात. जसें:—त्यानें गेल्यानें, तिला गेल्याला, इ०. पण ह्याचे बराबर तो गेल्यानें, तीं गेल्याला, असाही भाषाप्रचार आहेच. इतर विभक्तींचे वेळीं मात्र ला–कृदन्त व त्याचा कर्ता हीं कधींच एका विभक्तींत नसतात, तर नियमानें निरनिराळ्या विभक्तींत असतात. तेव्हां संस्कृतांत गतया, गतायै, गतायाः, ह्यांस जरी विशेषण ही संज्ञा चालेशी असली, तरी मराठींत आल्यानें, आल्यास, आल्याचा, इत्यादि रूपांतील ला–कृदन्तास विशेषण म्हणणें कांहीं प्रशस्त दिसत नाहीं. एक तर मराठींत विशेषणास विशेषण या नात्यानें कधींच विभक्तिप्रत्यय लागत नाहींत आणि हीं ला–कृदन्तें तर प्रथमोत्तर विभक्तींतच नेहमीं आढळतात. आणि दुसरें कांहीं ठिकाणीं तृतीया व चतुर्थी ह्या जरी ला–कृदन्तास व त्याच्या कर्त्यास ( विशेष्यास ) लागलेल्या आढळल्या, तरी इतर सर्व ठिकाणीं म्हणजे बहुतेक ठिकाणीं त्यांची व त्यांच्या कर्त्यांची ( विशेष्याची ) विभक्ति भिन्न भिन्न असते; इतकेंच नव्हे तर विशेष्याचें लिंग–वचनही त्यास नसतें असें म्हणावें लागतें; हें वर सांगितलेल्या त्यांच्या अनियमित विकरणावरून उघड आहे. संस्कृतांत ह्यांपैकीं कोणतीही अडचण नसल्यामुळें गतया, गतायाः, ह्यांस त्यांच्या कर्त्यांचीं विशेषणें म्हणण्यास फारशी हरकत नाहीं. परंतु मराठींत आल्यानें, आल्यास, आल्याचा, ह्यांस त्यांच्या कर्त्यांचीं विशेषणें म्हणणें कठिणच आहे, हें वाचकांचे ध्यानांत आलेंच असेल. म्हणून ह्यांस **कृदन्त नामें** म्हणावें असें आम्हांस वाटतें. असें म्हटल्यानें सर्व अडचणी दूर होतात. त्या कशा तें पहा. आल्यानें–यांत आला किंवा आलें असें ला–कृदन्त किंवा लें–कृदन्त क्रियावाचक नाम मानिल्यानें तें त्याच्या कर्त्याचे लिंग–वचन–विभक्ति यांप्रमाणें फिरण्याची अडचण राहिली नाहीं. शिवाय त्यास विभक्तिप्रत्यय लागतात, ही त्यास विशेषण म्हणण्याचे मार्गांतली अडचणही दूर होते; आणि तें नेहमीं एकवचनीं कां चालतें, हेंही त्यास क्रियावाचक नाम म्हटल्यानें स्पष्ट होते. क्रियावाचक नाम हें धर्मवाचक किंवा भाववाचक नाम होय आणि भाववाचक नामें बहुधा एकवचनींच चालतात हें सर्वांस विदितच आहे.—

त्यामुळें प्रस्तुत कृदन्तही एकवचनींच चालणें साहजिक आहे हें उघड आहे. त्यास विशेषण म्हणावें, तर त्याच्या विशेष्याची ( कर्त्याची ) व त्याची विभक्ति बहुधा एक नसते, ह्या आक्षेपासही येथें जागा उरत नाहीं. एवंच येथील ला-कृदन्तास ( आतां ह्यांमध्यें आलें, गेलें, असें नपुंसकलिंगी क्रियावाचक नाम मूळ आहे असें म्हणावयाचें असल्यामुळें ला–कृदन्ताचे जागीं लें–कृदन्त म्हणणें बरें ) किंवा लें-कृदन्तास क्रियावाचक कृदन्तनाम म्हटल्यानें व्याकरणांतील बहुतेक अडचणी आपाप दूर होतात हें उघड आहे.

अखेरीस, येथील लें–कृदन्तास क्रियावाचक नाम म्हणावें या मताचे समर्थनार्थ आणखी एक कारण दाखवून हें विवेचन संपवितों. तया गतया, तस्याः गतायाः, या संस्कृतरचनेंत आणि त्यानें आल्यानें, त्याला आल्याला, या मराठी रचनेंत गतया व गतायाः आणि आल्यानें व आल्याला हे शब्द त्यांच्या कर्त्यांचे ( विशेष्यांचें ) पुढेंच आलेले बहुधा आढळतात. गतया तया, गतायाः तस्याः किंवा आल्यानें त्यानें, आल्याला त्याला, असा पदक्रम संस्कृतांत काय कीं मराठींत काय सहसा येत नाहीं. तेव्हां येथील कृदन्तांस जर विशेषणें म्हटलें तर हीं विशेषणें बहुधा विधिविशेषणें असतात म्हणजे तीं विशेष्याचे पुढें येतात असेंच म्हणावें लागेल. आणि तया गतया म्हणजे तिच्या गमनानें, तस्या गताया म्हणजे तिच्या गमनाला, त्यानें आल्यानें म्हणजे त्याच्या येण्यानें, त्याला आल्याला म्हणजे त्याच्या येण्याला, असे साधारणपणें अर्थ आहेत हेंही उघड आहे. म्हणून येथील लें–कृदन्तास नाम म्हणणेंच बरें. ]

६२४. चतुर्थ्यन्त ला–कृदन्तास कालारंभ म्हणजे क्रियासमाप्तीपासून असा अर्थ नसतां त्याचा संकेतार्थक वाक्यांत उपयोग होऊन त्या वाक्यांत जर–तर ह्या संकेतदर्शक अव्ययांची अपेक्षा राहत नाहीं. आणि अशा ठिकाणीं चतुर्थ्यन्त ला–कृदन्तास चतुर्थीचा स हाच प्रत्यय लागतो, इतर कोणताही प्रत्यय या ठिकाणीं चालत नाहीं. जसें:—तो आल्यास तुझें कार्य होईल, म्हणजे जर तो आला तर, असा अर्थ आहे. या ठिकाणीं, तो आल्याला किंवा आल्यातें ( पद्यांत ) तुझें कार्य होईल, असें म्हणतां येत नाहीं. तसेंच त्यानें स्वतः घर बांधल्यास त्याच्या अडचणी दूर होतील, तो जेवल्यास त्याला दहीं वाढ, इ०. या ठिकाणीं बांधल्यास, जेवल्यास, इत्यादि स्थळीं बांधल्याला, जेवल्याला, ह्या ला–प्रत्ययान्त चतुर्थीचा उपयोग होत नाहीं.

**टीप**—केल्यानें, आल्यावर, गेल्याचा, वगैरे ठिकाणच्या कृदन्ताचा ऐतिहासिकदृष्ट्या विचार करण्याकरितां राजवाड्यांचें ज्ञानेश्वरी भाषेचें व्याकरण

चालून पाहिलें. त्यांत त्यांनीं सता तृतीया, सते चतुर्थी, सति सप्तमी ह्मणून तीन प्रकार सांगितलेले आढळले. त्यांचे प्रयोगानें प्रस्तुत रूपांची परंपरा सर्वस्वी समाधानकारक रीतीनें लागते असें दिसत नाहीं. यांच्या निरूपणांत वर ज्या अनेक विशेष गोष्टी सांगितल्या आहेत त्यांचें योग्य स्पष्टीकरण ऐतिहासिकदृष्ट्या अद्याप होणेंच आहे असें वाटतें. मराठी व्याकरणांत सध्या त्यांची काय व्यवस्था लावावी इतक्याच प्रश्नाचा वर आम्हीं निकाल लाविला आहे. परंतु–इतिहास परंपरा अद्याप अनिश्चितच आहे. जातां जातां इतकें ह्मटल्याशिवाय राहवत नाहीं कीं, 'तें काम त्यांनीं केलें नि आन मी निघालों=तत्कर्म कृतैस्तैः हन्त अहं निर्गतः' (पृष्ठ २८) येथील 'तत्कर्मकृतैस्तैः' हा राजवाड्यांनीं दिलेला सता तृतीयेचा संस्कृत मासला केवळ अश्रुतपूर्वच होय!

## वें–कृदन्त (करावें, बोलावें, द्यावें, इ०.)

[यांस स, ला, चा, हे प्रत्यय लागून करावयास, करावयाला, करावयाचा, हीं आणखी तीन अनियमित रूपें होतात; आणि त्यांचींच पुढें करायास करायाला, करायाचा, आणि नंतर करायला, करायचा, हीं प्रचारांतील रूपें बनतात. या सर्व रूपांचा संयुक्त क्रियापदांचे जागीं जो उपयोग होतो, तो पूर्वीं आलाच आहे.

संयुक्तक्रियापदें दादोबांनीं मानिलीं आहेत. परंतु त्यांजबरोबरच इंग्रजी व्याकरणांतून संयुक्त काळांची कल्पना त्यांनीं मराठींत व्यर्थ आणिल्यामुळें जितकीं संयुक्तक्रियापदें मराठींत मानावयास पाहिजेत, तितकीं मानण्याचें धैर्य त्यांस झालें नाहीं. याचें कारण असें दिसतें कीं, इंग्रजीमध्यें साधारणपणें जितकीं संयुक्तक्रियापदें दिसतात किंवा मानितात, तितकींच किंबहुना त्याच नमुन्याचीं संयुक्तक्रियापदें त्यांनीं मानिलीं. परंतु ज्या मराठी संयुक्तक्रियापदांस अनुरूप अशीं इंग्रजी संयुक्तक्रियापदें मानलेलीं त्यांस आढळलीं नाहींत, त्या संयुक्त क्रियापदांस संयुक्तक्रियापदांचे वर्गांत कसें घालावें ह्याची त्यांस शंका आली असावी; यामुळेंच दादोबांचें संयुक्तक्रियापदांचें प्रकरण व प्रयोग–प्रकरण हीं असमाधानकारक आहेत. यासंबंधाचें एकच उदाहरण पहा. वें–कृदन्त व त्याचीं स, ला, चा, या प्रत्ययांनीं झालेलीं रूपें ह्यांचा संयुक्तक्रियापदांचे कामीं होणारा उपयोग दादोबांस मान्य दिसत नाहीं. कारण कीं इंग्रजींत या प्रकारचें कृदन्तही नाहीं, आणि त्यामुळें तें ज्यामध्यें आहे असें संयुक्तक्रियापदही नाहीं. आतां या कृदन्तांनीं होणारीं संयुक्तक्रियापदें न मानिल्यामुळें त्यांच्या संबंधाची व्यवस्था दादोबांनीं काय केली आहे, तें पाहणें अवश्य आहे.

'आतां मला जावें लागेल, त्याला तें काम करावें लागलें? इत्यादि वाक्यांत लागेल, लागलें, हीं भावकर्तृक क्रियापदें मानिलीं पाहिजेत.––मला जावें लागतें ह्मणजे म्या जावें हें अवश्य आहे, असा अर्थ; त्यास आपल्या कामा–

वर लौकर हजर व्हावें लागतें, या ठिकाणीं लागतें या क्रियापदाचा--आपल्या कामावर लौकर हजर व्हावें--हा सर्व वाक्यांश कर्ता मानावा, अथवा यापेक्षां जावें, व्हावें, यांस विधिवाचक धातुसाधित नामें मानून तीं कर्तृपदें मानावीं. याशिवाय मला दुसरी युक्ति आढळत नाहीं.' ( मोठें व्याकरण--क० ४८२ ).

मला जावें लागेल, त्याला तें काम करावें लागलें, ह्यांपैकीं लागेल, लागलें, हीं क्रियापदें भावकर्तृक मानावयाचीं असा एक पक्ष दादोबा सांगतात, परंतु आपल्या समोर असणाऱ्या एक दोन उदाहरणांवरून आमचे वैयाकरण कसे चकून जातात या गोष्टीचेंच हें एक उदाहरण आहे. भावकर्तरि प्रयोगांतील क्रियापदें म्हणजेच भावकर्तृक क्रियापदें नेहमीं तृतीयपुरुषीं नपुंसकलिंगीं एकवचनीं असतात, असा दादोबानींच आह्मांस नियम घालून दिला आहे. त्याप्रमाणें त्यांस वरील क्रियापदें आढळलीं-झालें—'त्यांस भावकर्तृक क्रियापदें मानिलीं पाहिजेत' असें त्यांनीं आपलें मत ठोकून दिलें. परंतु 'त्याला तें काम करावें लागलें' ह्या त्यांचें उदाहरणांतील कर्म बदलून काय प्रकार होतो तें पहा. 'त्याला तीं कामें करावीं लागलीं, त्याला तो धंदा करावा लागतो, त्याला ते धंदे करावे लागतात, त्याला ती व्यवस्था करावी लागते, त्याला त्या व्यवस्था कराव्या लागतात,' या उदाहरणांतील क्रियापदांस दादोबांचें दृष्टीनें भावकर्तृक कसें ह्मणावयाचें हें त्यांचें त्यांस तरी कळेल कीं नाहीं ह्याची शंका आहे. मर्यादित अवलोकनावर सामान्य नियमांची उभारणी करणें किती धोक्याचें व अशास्त्र आहे हें आतां आमच्या न्यायशास्त्रानभिज्ञ वाचकांसही वेगळें सांगण्याची बहुधा जरूर उरली नाहीं. तेव्हां ही 'भावकर्तृक क्रियापदें मानिलीं पाहिजेत' असा जो दादोबांचा पहिला पक्ष तो मर्यादितदृष्टिदोषाचा परिणाम असून साफ चुकीचा आहे हें उघड आहे.

आतां दादोबांचा दुसरा पक्ष पहा. 'अथवा जावें, व्हावें, यांस विधिवाचक धातुसाधित नामें मानून तीं कर्तृपदें मानावीं. याशिवाय मला दुसरी युक्ति आढळत नाहीं.' दादोबांची पहिली कल्पना जोशीबोवांस पसंत नाहींसें दिसतें. ह्मणून त्यांनीं दादोबांचे या दुसऱ्या कल्पनेचा स्वीकार केलेला दिसतो. जोशीबोवा ह्मणतात:—'बाजीरावास पुणें द्यावें लागलें, येथें पुणें हें द्यावें या क्रियावाचक नामाचें कर्म आहे, व द्यावें हा लागलें ह्याचा कर्ता आहे.' ( प्रौढबोध. क. ७३१—आ ). ह्याचे पूर्वीं कलम ७२७ पोटकलटम ( २ ) यामध्यें विधिवाचक कृदन्तनामासंबंधानें जोशीबोवा ह्मणतात:—'पुढल्या उदाहरणातला उपयोग मात्र शुद्ध नामांसारखा आहे:—बाजीरावास इंग्रजांना पुणें द्यावें लागलें, तुला पायीं चालावें लागलें, इ०.' यासंबंधानें इतकेंच सांगावयाचें कीं, द्यावें, चालावें, हीं विधिवाचक कृदन्तें जर शुद्ध नामें मानिलीं तर त्यांपैकीं सकर्मक धातूंचीं विधि-

वाचक कृदन्त तरी कर्मांच्या लिंग–वचनाप्रमाणें बदलतात, असें म्हटलें पाहिजे; आणि जोशीबोवा तसें म्हणण्यास तयारही आहेत. 'हीं सकर्मक धातूंवरून झालीं असतां त्यांचा अर्थ कर्मणि असून तीं कर्मांचीं विशेषणें असतात.' ( क० ७३१—अ ) म्हणजे त्यांस तें एकदां शुद्ध नामें म्हणतात आणि एकदां विशेषणें म्हणतात असें दिसतें. अर्थात् तीं शुद्ध नामें जरी नसलीं आणि त्यांस शुद्ध विशेषणें जरी न मानिलें, तरी जोशीबोवांचे दृष्टीनें तीं कांहीं अंशीं नामांसारखीं व कांहीं अंशीं विशेषणांसारखीं आहेत हें उघड आहे. बरें, जोशीबोवांचे स्पष्ट मताप्रमाणें हीं शुद्ध नामें होत असें समजलें, अथवा त्यांच्या दोन मतांचा मेळ घालून तीं अंशतः नामें व अंशतः विशेषणें होत असें समजलें, तरी आणखी एक अडचण उत्पन्न होते; ती अशी. जोशीबोवा म्हणतातः—'विध्यर्थक विशेषणांत व णें–प्रत्ययान्त धातुसाधित नामांस चतुर्थीचे प्रत्यय स, ला, व क्वचित् तें हे लागून नामें होतात.' [ प्रौढ बोध क० ७२७ पोट कलम दुसरें ( २ ), यास ( ३ ) म्हणावें तर त्याचे पुढें ( ३ ) हें स्वतंत्र आहेच, व मागें ( २ ) हें आहेच, म्हणून घोंटाळा टाळण्यासाठीं आम्हीं यास दुसरें ( २ ), असें म्हटलें आहे. ] यावरून जोशीबोवांचे मतें करावें हें नाम आणि करावयास, करावयाला हींही प्रथमान्त नामेंच, आणि करावयाचा–ची–चें–चे–च्या–चीं हींही त्यांनीं पुढें सांगितल्याप्रमाणें प्रथमान्त नामेंच होत. या स, ला, व चा, या प्रत्ययांनीं युक्त पदांस प्रथमान्त नामें म्हणण्यापासून काय परिणाम घडतो हा प्रश्न तूर्त बाजूस राहो. परंतु हींही जर प्रथमान्त नामें होत, तर करावें, या विधिवाचक नामास किंवा विशेषणांस किंवा विशेषणनामास एकाही विभक्तीचे प्रत्यय लागत नाहींत असें म्हटलें पाहिजे. दादोबांनीं या पक्षाचा विस्तृत विचार केला नसल्यामुळें ते या सर्व बाबतींत मुग्ध आहेत. जोशीबोवांनीं संयुक्तक्रियापदांस फांटा दिल्यामुळें त्यांना या मताचा विस्तृत विचार करावा लागला. ह्यामुळें ह्या मतासंबंधानें त्यांच्याच व्याकरणांत कशा प्रकारची विसंगति, धरसोड, घोंटाळा, आणि अडचण उत्पन्न होते, हें दाखविलें आहे. बाकी दादोबांच्या दुसऱ्या पक्षास हें सर्व विवेचन लागू आहे हें उघड आहे.

जोशीबोवांनीं प्रौढबोध व्याकरणांत संयुक्तक्रियापदें मुळींच मानिलीं नाहींत; तर त्यांचीं छकलें करून व त्यावराबरच अर्थाचा खून पाडून, संयुक्तक्रियापदान्तर्भूत कृदन्तांचें व त्यांचे पुढील आख्यातरूपांचें वेगळें वेगळें व्याकरण करावें असें त्यांनीं म्हटलें आहे. यामुळे त्यांस वरील सर्व भानगड स्वीकारावी लागली आहे. त्या भानगडीपैकीं कांहीं भाग स्वीकारल्याचें त्यांनीं स्पष्ट जाहीर केलें आहे, आणि कांहीं भागाबद्दल मौन धरिलें आहे, हें वरील विवेचनावरून वाचकांचे नजरेस येईलच. एकंदरीनें ही व्यवस्था कांहीं समाधानकारक दिसत नाहीं, हें कोणीही कबूल करील. जोशीबोवांनीं प्रौढबोधानंतर जीं व्याकरणावर पुस्तकें

लिहिलीं आहेत, त्यांपैकीं विद्याखात्यानें मंजूर केलेल्या एका पुस्तकांत त्यांनीं संयुक्तक्रियापदें व सहायधातू ह्यांस पुन्हां स्वस्थानापन्न करून त्यांचें विवेचन केलें आहे. तरी जोशीबोवांस संयुक्तक्रियापदें मराठींत मानणें पसंत आहे असें वाटत नाहीं, हें त्यांनीं त्या विवेचनाचे शेवटीं लिहिलेल्या टीपेवरून स्पष्टच आहे. एवंच संयुक्त क्रियापदांस त्यांनीं त्या पुस्तकांत दाखविलेला मान केवळ जुलमाचा राम राम दिसतो. संयुक्तक्रियापदें मानणें कां अवश्य आहे हें आम्हीं पूर्वीं सिद्ध केलेंच आहे. आणि जोशीबोवांच्या प्रौढबोधांतील त्यांच्या अत्यन्त प्रिय तथापि अप्रयोजक व चुकीच्या मतास शाळाखात्याचे अधिकाराचा पाठिंबा मिळून तद्वारा जोंपर्यंत त्या मताचा प्रसार होत नाहीं आहे, तोंपर्यंत त्याजवर विशेष टीका करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं.

आतां दादोबांनीं जर संयुक्तक्रियापदें मानिलीं आहेत आणि सहाय धातूंचे यादींत लाग या धातूचा अन्तर्भाव केला आहे; तर त्यांनीं असेंच मत देऊन ' त्याशिवाय मला दुसरी युक्ति आढळत नाहीं ' असें कां म्हणावें हें एक गूढच आहे. त्याचें समाधान केवळ त्यांजसमोरील इंग्रजी व्याकरणाचा कित्ता हें होय असें आम्हांस वाटतें. एरवीं, संयुक्त क्रियापदांस मनःपूर्वक योग्य मान देणाऱ्या दादोबांनींही ' मला जावें लागेल, त्याला तें काम करावें लागलें ' या वाक्यांतील जावें लागेल, करावें लागलें, या संयुक्त क्रियापदांस छिन्नभिन्न करावयास कसें तयार व्हावें या प्रश्नाचा योग्य खुलासा होत नाहीं. असो. ' मला जावें लागेल ' या वाक्यांत जावें हा लागेल याचा कर्ता असें जर समजलें, आणि ' बाजिरावास इंग्रजांना पुणें द्यावें लागलें, या वाक्यांत द्यावें हा लागलें याचा कर्ता, असें जर समजलें, तर मला आणि बाजिरावास या चतुर्थ्यन्त शब्दांची योग्य व्यवस्था लागत नाहीं असें अम्हांस वाटतें. या शब्दांचा संबंध जावें, द्यावें, या नामांकडे लागतो असें वाटत नाहीं. जावें, द्यावें, हीं प्रस्तुत स्थळीं स्वतंत्र क्रियापदें नाहींत; आणि त्यांस जरी एकवार क्रियापदें समजलें, तरी त्यांजकडे मला व बाजीरावाला या शब्दांचा संबंध लागत नाहीं. म्हणजे जावें, द्यावें या शब्दांशीं मला व बाजीरावास ह्या विभक्तींचा कारक किंवा उपपद ह्यांपैकीं कोणत्याही प्रकारचा संबंध नाहीं हें उघड आहे. आतां दादोबांच्या व जोशीबोवांच्या व्यवस्थेप्रमाणें जावें व द्यावें हे जर कर्ते होत, आणि मला व बाजीरावास ह्यांचा त्या शब्दांशीं कोणत्याही प्रकारचा संबंध नीट लागत नाहीं, आणि लागेल व लागलें हीं जर अकर्मक क्रियापदें असून , प्रकृत वाक्यांत जर अकर्मक कर्तरि प्रयोग आहे, तर कर्ता व क्रियापद यांशिवाय त्या वाक्यांतील इतर सर्व शब्द गाळून विधान होण्यास हरकत नसावी. परंतु ' जावें लागेल, ' ' द्यावें लागलें,' ह्यांनीं स्वतंत्रपणें पूर्ण विधान होतें आहे असें कोणी म्हणेलसें वाटत नाहीं, शिवाय वाक्यपृथक्करणाचे दृष्टीनें, लाग धातु अपूर्णविधान असून मला व

बाजीरावास हीं त्याचीं पूरकें होत, असेंही म्हणतां येईल असें वाटत नाहीं. आणि प्रकृत वाक्यांतील दादोबा व जोशीबोवा यांच्या मतास अनुसरून जावें व द्यावें हे कर्ते वाक्यपृथक्करणामध्यें उद्देश्यस्थानीं आल्यामुळें, आणि मला व बाजीरावास हे शब्द विधेयविस्ताराचे सदरांत गेल्यामुळें वाक्यपृथक्करणानें वाक्यार्थ विशद होण्याचे ऐवजीं अधिकच दुर्गम होत आहे, असें म्हणण्याची पाळी येते. कारण कीं, या वाक्यांत मी व बाजीराव ह्यांबद्दल विधान असून तें जावें व द्यावें ह्याबद्दल नाहीं, असें साधारणपणें सुज्ञांचें मत पडेल हें निर्विवाद आहे. मला व बाजीरावास हे शब्द विधेयविस्तारांतच पडत असल्यामुळें त्यांची विधानास आवश्यकता नाहीं, असें या वाक्यपृथक्करणानें ठरतें तेही सत्य नाहीं, हें वर दाखविलेंच आहे. ‘मला जावें’, ‘बाजिरावास इंग्रजांना द्यावें’ इतकालीं उद्देश्यपदें मानावीं असें म्हणणें विलक्षणच दिसतें. इंग्रजांना ह्याचा द्यावें ह्याशीं संप्रदानसंबंध किंवा कर्मसंबंध असल्यामुळें त्याचा उद्देश्यांत अन्तर्भाव होणें ठीक आहे. परंतु मला व बाजीरावास या शब्दांचा जावें व द्यावें ह्यांशीं व्याकरणदृष्ट्या वर सांगितल्याप्रमाणें कांहीं संबंध नसल्यामुळें त्यांचा उद्देश्यांत अन्तर्भाव होणें अवश्य दिसत नाहीं. शिवाय, मला जावें, आणि बाजीरावास इंग्रजांना द्यावें, हे शब्दसमुच्चय तरी व्याकरणदृष्ट्या किंवा अर्थदृष्ट्या म्हणजे आकांक्षा, योग्यता-ह्यांचे दृष्टीनें सुसंबद्ध आहेत असेंही दिसत नाहीं. ह्यामुळें दादोबांनीं जो दुसरा पक्ष सुचविला आहे आणि जो जोशीबोवांचेंमनापासून व जोराचें अनुमोदन मिळून इतरांचे पाठबळानें, पुढें सरसावला आहे, तो शास्त्रानभिज्ञ परंतु सुज्ञ लोकांच्या साधारण अर्थाचे दृष्टीनेंच नव्हे, तर व्याकरणाचे व वाक्यपृथक्करणाचे शास्त्रीयदृष्टीनेंही स्वीकारार्ह आहे, असें म्हणवत नाहीं हें उघड आहे.

आतां या ग्रंथांतील मताप्रमाणें जावें, द्यावें, इत्यादि विधिवाचक कृदन्तें संयुक्तक्रियापदान्तर्गत समजल्यानें सर्वतोपरी कशी उत्तम व्यवस्था लागते ती पहा. मला जावें लागेल, या वाक्यांत मला हा कर्ता, जावें लागेल हें क्रियापद भावी प्रयोग; त्याला तें काम करावें लागलें, किंवा ते धंदे करावे लागले, या वाक्यांत त्याला हा कर्ता, काम किंवा धंदे हें कर्म, आणि करावें लागलें किंवा करावे लागले, हें क्रियापद कर्मणि प्रयोग. त्याचप्रमाणें बाजीरावास इंग्रजांना पुणें द्यावें लागलें, या वाक्यांत बाजीरावास हा कर्ता, इंग्रजांना हीं संप्रदानार्थी चतुर्थी, पुणें हें कर्म, आणि द्यावें लागलें हें संयुक्तक्रियापद, प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोग. साधारण अर्थदृष्ट्याही मी व बाजीराव हेच कर्ते आहेत; आणि वाक्यपृथक्करणाचे दृष्टीनेंही मला व बाजीरावास हे कर्तेंच उद्देश्यपदें होऊन, जावें लागेल, आणि द्यावें लागलें, हीं विधेयपदें आहेत; अशी सर्व दृष्टींनीं उत्तम

व्यवस्था लागून साधारण अर्थ, व्याकरण, व वाक्यपृथक्करण ह्यांचा चांगला मेळ बसतो.

करावें हें आमच्या मतें कृदन्त-विशेषण आहे. मूळ संस्कृतांतही कर्तव्य गन्तव्य, हीं विशेषणेंच आहेत. याला स, ला, चा, हे प्रत्यय लागून होणारीं रूपेंही संयुक्तक्रियापदांचे रचनेंत आढळतात. जसें:- मला हें पुस्तक वाचावयास येतें. त्याला बोलायला फार पाहिजे; या जोशीबोवांचे उदाहरणांत त्यांचे मतें वाचावयास व बोलायाला हीं प्रथमान्त नामें, येतें व पाहिजे, ह्या क्रियापदांचे कर्ते आहेत. वाचावयास व बोलावयास यांना प्रथमान्त नामें म्हणणें वैयाकरणास कसें योग्य दिसतें तें त्याचें त्यांसच माहीत. शिवाय 'मला पुस्तक वाचावयास येतें.' यांत वाचावयास हा कर्ता, येतें हें क्रियापद, कर्तरि प्रयोग; असें म्हणणें साफ चुकीचें आहे. मला पुस्तकें वाचावयास येतात. मला धडा वाचावयास येतो, इत्यादि वाक्यें पाहिलीं म्हणजे या वाक्यांत मला हा कर्ता, पुस्तकें, धडा, हे शब्द कर्में, आणि वाचावयास येतात, वाचावयास येतो, वगैरे संयुक्तक्रियापदें असून, प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोग आहे असेंच म्हटलें पाहिजे. आणि जोशीबोवांचें मत साफ चुकीचें ठरतें हें निर्विवाद आहे.

त्याचप्रमाणें, रामाला मुंबईस जावयाचें आहे, मला तुम्हांपाशीं कांहीं बोलावयाचें होतें, या वाक्यांची ही जोशीबोवांची व्यवस्था, वरील वाक्यांच्या व्यवस्थेप्रमाणें जरी साफ चुकीची ठरत नाहीं, तरी अगदीं असमाधानकारक, अप्रशस्त व गैरशिस्त आहे असें म्हणणें भाग आहे. त्यांच्या मतें जावयाचें व बोलावयाचें हीं प्रथमान्त नामें, आहे व होतें या क्रियापदांचे कर्ते असून, या वाक्यांत कर्तरि प्रयोग आहे. ही व्यवस्था कोणत्याच दृष्टीनें कशी स्वीकारार्ह नाहीं, हें ऊहापोहावरून समजेलच. आमच्या मतें पहिल्या वाक्यांत रामाला हा कर्ता, जावयाचें आहे हें संयुक्तक्रियापद, भावी प्रयोग; आणि दुसऱ्या वाक्यांत मला हा कर्ता, कांहीं हें कर्म, आणि बोलावयाचें आहे हें संयुक्तक्रियापद; कर्मणि प्रयोग.

संयुक्तक्रियापदांची व्यवस्था एकदां स्वीकारिल्यानंतर अशा प्रकारचीं संयुक्तक्रियापदें इंग्रजींत नाहींत, म्हणून त्यांस संयुक्तक्रियापदें हें नांव देण्यास दादोबादि वैयाकरण कचरलेले दिसतात. परंतु तसें कचरण्याचें कांहींच कारण नाहीं; आणि येथें त्यांनीं माघार घेतल्यामुळेंच मराठी व्याकरणांत त्यासंबंधाचा समाधानकारक निकाल लागलेला नाहीं. परंतु संयुक्तक्रियापदांचे मार्गाचें अवलंबन केल्यानेंच या ठिकाणीं उत्तम व्यवस्था लागते, हें आतां वाचकांचें पूर्णपणें प्रत्ययास येऊन चुकलेंच असेल. हें विवेचन जरासें लांबलचक झालें आहे. परंतु अशाच प्रकारच्या अन्य स्थळींही आमच्या वैयाकरणाची व्यवस्था बहुधा अशींच तात्पुरती, व अप्रयोजक असल्यामुळें येथें एकदां सविस्तर ऊहापोह

करणें अवश्य पडलें. आतां यापुढें अशाच प्रकारच्या अन्य ठिकाणीं, वाचकांचे पुढें थोडक्यांत जरी मुख्य मुद्देच मांडले तरी, भागण्यासारखें आहे.

आतां वें-कृदन्ताच्या चतुर्थ्यन्त व षष्ठ्यन्त ( करावयास—ला, करावयाचा, ) रूपाचे संयुक्तक्रियापदान्तर्गत उपयोगाशिवाय वाक्यांत जे इतर उपयोग होतात त्यांजकडे वळूं.

६२५. ह्या कृदन्ताचे चतुर्थ्यन्त रूपाचा उद्देश, हेतु, किंवा प्रयोजन. असा अर्थ असतो. जसें:—त्याला मुलीचें लग्न करावयास देशीं जावयाचें आहे, त्यानें हीं पुस्तकें मला द्यावयास आणिलीं आहेत, त्यानें हीं पुस्तकें विकावयास घेतलीं आहेत, इ०. या उदाहरणांत करावयास, द्यावयास, विकावयास, इत्यादि वें-कृदन्ताच्या चतुर्थ्यन्त रूपांचे जागीं करण्यास, देण्यास, विकण्यास, हीं णें-कृदन्ताचीं चतुर्थीचीं रूपेंही येतात. या चतुर्थी-प्रत्ययाचे जागीं दोन्हीं कृदन्तांच्या रूपांत साठीं या शब्दयोगी अव्ययाचाही उपयोग करितां येतो. जसें:—लग्न करावयास किंवा करण्यास, किंवा करावयासाठीं किंवा करण्यासाठीं, असें म्हणतां येतें. तसेंच द्यावयासाठीं, किंवा देण्यासाठीं. इ०.

टीप १—या ठिकाणीं करावें, द्यावें, घ्यावें, इ० हीं करणें देणें, घेणें, इ० कृदन्तांप्रमाणें क्रियावाचक नामें आहेत, व त्यांस चतुर्थीचा प्रत्यय लागला आहे. हें उघड आहे. स ह्या प्रत्यायाचे जागीं ला हाही प्रत्यय लागतो. तें हा चतुर्थीचा प्रत्यय कवितेंत येतो. त्याप्रमाणें तो या क्रियावाचकांसही लागलेला आढळतो. या क्रियावाचक नामांस अनेकवचन नाहीं; म्हणून त्यांस चतुर्थीचा केवळ अनेक वचनीं येणारा नां हा प्रत्यय कधींच लागू नये, हें स्वाभाविकच आहे.

टीप २—सिद्ध, तयार, सज्ज, राजी, इत्यादि अर्थाच्या विशेषणांचाही य हेत्वर्थी चतुर्थ्यन्त वें—कृदन्ताबरावर उपयोग होतो. जसें:—मरावयास ( मरावयाकरितां, मरणासाठीं, मरणार्थ, ) सिद्ध, जावयास तयार, लढावयाला सज्ज, चालायला राजी, इ०.

[ देणें, घेणे, करणें, इत्यादि णें—कृदन्तांस क्रियावाचक आणि द्यावें, घ्यावें, करावें, इत्यादि वें—कृदन्तांस विधिवाचक असें म्हणण्याची आमच्या वैयाकरणांची चाल आहे. ती विशेष चांगली नाहीं. अशीं अर्थवान् नांवें देणें योग्य नाहीं, हा मुद्दा पूर्वी अनेकवार येऊन गेला आहे. वरील उदाहरणांत देणें, घेणें, आणि द्यावें, घ्यावें, ह्यांचा एकमेकांबद्दल उपयोग होतो हें उघडच आहे; दोन्ही कृदन्तांचा क्रियावाचक व विधिवाचक ह्या दोन्ही अर्थी उपयोग होत असल्यामुळें एकासच क्रियावाचक व दुसऱ्यासच विधिवाचक असें म्हणणें योग्य नाहीं

हें उघड आहे. तेव्हां एकास णें–कृदन्त व दुसऱ्यास वें–कृदन्त असेंच म्हणणें बरें. ]

[ दादोबांचे मतें, ' तो करावयास गेला ' म्हणजे करावें, यास गेला. परंतु असा पदच्छेद करण्याची एक तर जरूर नाहीं; आणि असा पदच्छेद करणें ठीकही नाहीं. या दादोबांच्या वाक्यांत करावयास हें करावें या वें–कृदन्ताचें चतुर्थ्यन्त रूप असून, चतुर्थीचा अर्थ उद्देश, हेतु, किंवा प्रयोजन आहे, हें उघड आहे. करावें असें वेगळें क्रियापद मानून त्याचा निराळाच एक कर्ता अध्याहृत समजण्याची गरज नाहीं. शिवाय ' यास ' या चतुर्थीचा जर तोच अर्थ समजला पाहिजे, तर करावयास या चतुर्थीचा तोच अर्थ समजण्यास काय हरकत आहे ? व्युत्पत्तिदृष्ट्याही करावें यास विभक्तिप्रत्यय लागण्यास मराठींत कांहीं एक अडचण नाहीं अखेरीस असेंही म्हटल्यावांचून राहवत नाहीं कीं, दादोबांचा पदच्छेद केवळ काल्पनिक दिसतो. त्यास इतिहासाचा आधार मुळींच नाहीं, म्हणून करावयास = करावें यास, हा दादोबांचा तदनुसार व्याकरणमार्ग स्वीकारार्ह नाहीं हें उघड आहे.

केल्यास, गेल्यानें, इत्यादि ठिकाणींही केलें यास, गेला यानें, असा पदच्छेद करावा अशी दादोबांची सूचना आहे. ( ह्या सूचनेचें सविस्तर विवेचन पूर्वी आलेंच आहे. ) तिचा जोशीबोवांनीं स्वीकार केला आहे. परंतु करावयास, जावयाचा, इत्यादि ठिकाणचा दादोबांचा तशाच प्रकारचा पदच्छेद स्वीकारण्यास जोशीबोवा तयार दिसत नाहींत; ह्यांचे कारण त्यांनीं सांगितलेलें नाहीं तरी तें आम्ही वर सुचविलेलेंच असावें असें वाटतें. असो. त्यांनीं प्रस्तुत स्थळीं जर दादोबांचा पदच्छेद स्विकारिला नाहीं, तर या ठिकाणीं ते काय व्यवस्था सुचवितात तें पाहिलें पाहिजे.

त्यांनीं आपल्या प्रौढबोध व्याकरणांत, आम्ही वर नुकतेंच सांगितल्याप्रमाणें चतुर्थ्यन्त वें–कृदन्तास साफ नाम असें म्हटलें आहे. त्याशिवाय ह्यासंबंधाचा त्यांचा स्पष्ट उल्लेख असलेला आढळत नाहीं. यामुळें त्यांच्या मतास अनुसरून करावयास, जावयास, यांना सर्वत्र नामें म्हणावयाचें कीं काय, असा प्रश्न उत्पन्न होतो. त्याला वाचावयास येतें इत्यादि उदाहरणांत तीं प्रथमान्त नामें असून, येतें वगैरे क्रियापदांचे कर्ते आहेत, असें त्यांनीं सांगितेंलच आहे. त्याप्रमाणेंच, तो मुलीचें लग्न करावयास मुंबईस गेला, इत्यादि या अंकांत दिलेल्या उदाहरणांतही करावयास वगैरे शब्दांस प्रथमान्त नामें समजावयाचें कीं काय, आणि जर तीं या ठिकाणींहीं प्रथमान्त नामें होत, तर जोशीबोवांचे दृष्टीनें या त्यांच्या प्रथमेचा अर्थ काय असे प्रश्न उत्पन्न होतात. या प्रश्नांचा ते काय खुलासा करितात हें स्पष्ट कळण्यासाठीं आम्हीं त्यांचे व्याकरण चाळून पाहिलें; तेव्हां त्यांचे प्रौढबोधांत पुढील प्रकार दिसला.

'करण्यास, करावयाला, जावयातें, बोलावयातें, इ० हीं कृदन्तें त्यांचे उपयोगाप्रमाणें नामें, विशेषणें, किंवा अव्ययें असतात. त्यांचा ज्यास्त विचार पुढें केला आहे.' [ क० २९० ( २ ) ]

यानंतर २९० कलमांतील पोटकलम ३ झाल्यावर ते एक टीप लिहितात, ती अशीः—'करावयास, करावयाला, करावयाचें, जायाचें, इत्यादि रूपें, स, ला, ते, हे चतुर्थीचे व च हा संबंधी विशेषणाचा प्रत्यय लागून होतात; यासंबंधानें ध्यानांत ठेवावें कीं, त्या विभक्त्यादि रूपांचा व या कृदन्तांचा कांहीं संबंध नाहीं. तेच प्रत्यय लागून हीं कृदन्तें होतात इतकेंच.'

नंतर कारकविचारांत चतुर्थीचे अर्थ सांगतांना ते लिहितातः—'कारण, हेतु, परिणाम, किंवा उपयोग दाखविण्यास ही विभक्ति येते.' असें म्हणून त्यांनीं जीं उदाहरणें दिलीं आहेत, त्यांत 'विद्यार्थी शिकावयास शाळेंत येतात' हें एक उदाहरण आहे, ( क० ५३९ ). अशाच प्रकारें 'विध्यर्थक विशेषणाची चतुर्थी होते' असें त्यांनीं अनेक ठिकाणीं सांगितलें आहे. आतां वरील टीपेचा व या विधानांचा मेळ कसा घालावयाचा हें वाचकांनींच ठरवावें.

पहिल्या उताऱ्यांत ते म्हणतात कीं, करण्यास, करावयाला, इ० स, ला, तें हे प्रत्यय लागून झालेलीं कृदन्तें, नामें, विशेषणें, किंवा अव्ययें असतात; आणि सांगतात कीं, यांचा ज्यास्त विचार पुढें केला आहे. तो पाहण्यासाठीं व्याकरण चाळलें असतां पुढें धातुसाधितें किंवा कृदन्तें आणि क्रियावाचक नामें या प्रकरणांत करावयास, बोलावयास, इत्यादि कृदन्तांचा त्यांच्या मताप्रमाणें फक्त नामांप्रमाणें होणारा उपयोग त्यांनीं दिलेला आढळला. परंतु त्यांचा विशेषणांप्रमाणें किंवा अव्ययांप्रमाणें कोठें व कधीं उपयोग होतो, हें त्यांनीं सांगितलेलें कोठेंच आढळत नाहीं.

तेव्हां, तो मुलाचें लग्न करावयास मुंबईस गेला, या आमचे उदाहरणांत व विद्यार्थी शिकावयास शाळेंत येतात, या त्यांचे उदाहरणांत करावयास व शिकावयास या शब्दांचें व्याकरण काय या प्रश्नाचा जोशीबोवांनीं स्पष्ट खुलासा केलेला कोठें दिसत नाहीं. एका टीपेंत ते म्हणतात—करावयास, शिकावयास, यांचा व चतुर्थी विभक्तीचा कांहीं एक संबंध नाहीं व कृदन्त प्रकरणांत ते सांगतात कीं, हीं नामें आहेत. आतां यांस जर प्रथमान्त नामें म्हणावयाचें, तर त्या प्रथमेचा सदरहू वाक्यांत अर्थ काय हें एक गूढच राहतें. तेव्हां प्रकृत वाक्यांत ते करावयास, शिकावयास, ह्यांस नामें म्हणावयास तयार होणार नाहींत असें दिसतें. परंतु हीं नाम, विशेषण, किंवा अव्यय ह्यांप्रमाणें उपयोगांत येतात म्हणून ते म्हणतात. ह्यामुळें प्रस्तुत स्थळीं जर तीं नामें नव्हत, तर विशेषणें किंवा अव्ययें असलीं पाहिजेत. आणि जरी त्यांनीं त्यांचा विशेषणांप्रमाणें किंवा अव्ययांप्रमाणें कधीं व कोठें उपयोग होतो हें सांगितलेलें नाहीं, तरी हें

त्यांचें मत प्रस्तुत स्थळीं लागू पडतें कीं काय तें पाहूं या. आमच्या मतें ते करावयास, व शिकावयास ह्यांस विशेषणें म्हणणार नाहींतच. कदाचित् त्यांस ते अव्ययें म्हणतील. परंतु शिकावयास ही चतुर्थी समजून तिचा ते कारण, हेतु, परिणाम किंवा उपयोग, असा स्पष्टपणें अर्थ सांगतात; आणि शिकावयास या शब्दांतील स चतुर्थीचा प्रत्यय नाहीं असेंही तितक्याच किंबहुना अधिक स्पष्टपणें टीपेंत म्हणतात. तेव्हां त्यांचें नक्की मत काय तें समजणें कठीण झालें आहे. तथापि सूक्ष्म विचारांतीं करावें, शिकावें, यांस वें-कृदन्त नामें समजून करावयास शिकावयास, हीं त्यांचीं प्रकृत स्थळीं चतुर्थ्यन्तरूपें आहेत, असेंच आमच्याप्रमाणें म्हणण्यास ते तयार होतील. म्हणजे जर आपल्या दोन परस्परविरोधी मतांपैकीं कोणत्या तरी एकास हरताळ फांसण्यास संगतीस अनुसरून ते कबूल झाले तर ते—करावयास, शिकावयास, ह्यांतील स प्रत्ययाचा चतुर्थी विभक्तीचे प्रत्ययाशीं कांहीं संबंध नाहीं—याच मतास हरताळ फांसतील असें वाटतें. ह्यानें विसंगतीचेंच मंडण करण्याकरितां पोरकटपणें अद्वातद्वा कोण समंजस मनुष्य बरळत सुटेल बरें !

यावरून, त्यानें मला हीं पुस्तकें वाचावयास दिलीं आहेत, अशासारख्या ज्या वाक्यांत वाचावयास या सारख्या सकर्मक धातूच्या चतुर्थ्यन्त वें-कृदन्ताचें व वाक्यांतील क्रियापदाचें कर्म एकच असतें व क्रियापद त्या कर्माप्रमाणें बदलतें, त्या वाक्यांत कर्मणि प्रयोग आहे हें उघड आहे. या ठिकाणीं मला ही संप्रदानार्थी चतुर्थी किंवा मला हें अप्रत्यक्ष कर्म, आणि वाचावयास ही हेत्वर्थी चतुर्थी होय. यासारखींच आणखी उदाहरणें:—त्यानें हा माल विकावयास आणिला आहे, त्यानें मला ही लेखणी चालवून पाहण्यास दिली आहे, त्यानें हा मुकटा नेहमी वापरावयास घेतला आहे, त्यानें ह्या गाई धर्मार्थ द्यावयास काढिल्या आहेत, त्यानें आपली म्हैस विकावयास बाजारांत पाठविली, इ०. ठिकाणीं वें-कृदन्त नामाची चतुर्थी हेत्वर्थी आहे हें उघड आहे. विकावयास पाठविली=विकण्यास पाठविली=विकावयासाठीं पाठविली=विकावयाकरितां पाठविली=विकण्यासाठीं पाठविली=विक्रयार्थ पाठविली, इत्यादि पर्यायांवरून विकावयास या हेत्वर्थी चतुर्थीबद्दल खात्रीच पटते. मुख्य क्रियापद अकर्मक असतां बहुधा या वें-कृदन्ताच्या चतुर्थीचा हेतु, प्रयोजन, असाच अर्थ असतो. जसें:—तो वर्तमानपत्र वाचावयास ( वाचण्याकरितां ) गेला, जातो, किंवा जाईल; तो हें शहर पहावयास ( पाहण्याकरितां ) आला आहे; तो निजावयास ( निजण्याकरितां ) आमचेकडे येतो, इ०.

या चतुर्थ्यन्त वें—कृदन्ताला कृष्णशास्त्री गोडबोले हे अव्ययी भविष्य कृदन्त असें म्हणतात, ( नवीन व्याकरण क० ३०३ ). या कृदन्तास भविष्य असें म्हणणें योग्य नाहीं. कारण कीं, कोणत्याच कृदन्तानें कोणत्याच विशिष्ट काळाचा अर्थ स्वतंत्रपणें दाखविला जात नाहीं, तर कृदन्ताचा काळार्थ

क्रियापदाचे काळार्थानुसार असतो, हें पूर्वी सांगितलेंच आहे. तसेंच विभक्ति-प्रत्यय बहुधा चरम प्रत्यय असल्यामुळें सर्वच विभक्त्यन्त शब्दांस अव्यय म्हणण्यास हरकत नाहीं. या दृष्टीनें चाकूनें, चाकूहून, करण्यांत, करण्यास, करावयास, इत्यादि सर्वच विभक्त्यन्त शब्द अव्ययें होत; फक्त सविकरण व साधिकरण तृतीयादि रूपें तेवढीं या अव्ययांचे राक्षसी जबड्यांत पडणार नाहींत! बाकी विकावयास, वाचावयास, ह्यांस अव्ययें ह्मटल्यानें जोशीबुवांच्या इतका घोंटाळा होत नाहीं, हें खरें; तथापि यानें प्रश्नाचा निकाल न लागतां तो फक्त टाळण्यांत येतो.

६२६. सांगणें याचा आज्ञा करणें, उपदेश करणें, असा अर्थ असतां त्याच्या, आणि शिकविणें, विसरणें, चुकणें ह्या धातूंच्या कर्मांचे स्थानीं कधीं कधीं चतुर्थ्यन्त वें-कृदन्ताचा उपयोग होतो. जसें:—डॉक्तर मला हवा पालटावयास सांगतो, मास्तरनें मला हीं पुस्तकें वाचावयास सांगितलें, त्यानें मला बसावयास सांगितलें, त्यानें मला इंग्रजी बोलायला शिकविलें, त्यानें मला गायला शिकविलें, त्याला तुमचा निरोप कळवावयास मी विसरलों, हें काम करावयास चुकूं नको किंवा भुलूं नको, इ० या वाक्यांतील चतुर्थ्यन्त वें-कृदन्तें त्या वाक्यांतील क्रियापदांचीं कर्में आहेत.

[ या ठिकाणीं जोशीबोवांचे मतांत व आमच्या मतांत थोडासा फरक आहे. पूर्वी सांगितल्याप्रमाणें ते पालटावयास, वाचावयास ह्यांसच नामें ह्मणतात; ह्मणजे त्यांचे मतें पालटावयास हाच मूळ शुद्ध व प्रथमेचें एकवचन होय. परंतु वर सांगितल्याप्रमाणें असें ह्मणणें ठीक नाहीं. परंतु जर वरील ऊहापोहान्तीं ठरविल्याप्रमाणें पालटावयास, वाचावयास, ह्यांचा चतुर्थीचे हेत्वर्थी उपयोग होतो, तर स, ला, यांस या ठिकाणींही चतुर्थीचे प्रत्यय ह्मणण्यास काय हरकत आहे? दुसरें असें कीं, जोशीबोवांचे मतें, मास्तरनें मला हीं पुस्तकें वाचावयास सांगितलें, अशा वाक्यांत 'वाचावयास' इत्यादि नामें प्रथमान्त किंवा प्रत्ययाभाव द्वितीयान्त असल्यामुळें त्या वाक्यांत कर्मणि प्रयोग आहे असें कदाचित् ते ह्मणतील, तर त्या ठिकाणीं आमचे दृष्टीनें भावी प्रयोग आहे हें उघड आहे. ]

**टीप १**—प्रस्तुत स्थळींही चतुर्थ्यन्त वें-कृदन्तांचे जागीं पालटण्यास, वाचण्यास, इत्यादि चतुर्थ्यन्त णें-कृदन्तांचा उपयोग होतो.

**टीप २**—अशा ठिकाणीं 'डॉक्टरनें मला हवा पालटावयासाठीं सांगितलें आहे' किंवा 'हवा पालटावयाकारतां सांगितलें आहे' असें ह्मटलेलें क्वचित् आढळ येतें, परंतु पालटावयास ही हेत्वर्थी किंवा प्रयोजनार्थी चतुर्थी नसल्यामुळें या

ठिकाणीं 'साठीं' किंवा 'करितां' या शब्दयोगी अव्ययांचा उपयोग करणें शिष्ट भाषेसही मान्य नाहीं आणि व्याकरणदृष्ट्याही योग्य नाहीं हें उघड आहे.

टीप ३—या ठिकाणीं दुसरा एक विकल्प आढळतो. 'मास्तरनें मला हीं पुस्तकें वाचावयास सांगितलें आहे,' ह्याचे जागीं, 'मास्तरनें मला हीं पुस्तकें वाचावयास सांगितलीं आहेत;' 'डॉक्टरनें मला हीं औषधें घ्यावयास सांगतलें आहे,' ह्याचे जागीं 'डॉक्टरनें मला हीं औषधें घ्यावयास सांगितलीं आहेत,' असाही शिष्टभाषेचा प्रचार आढळतो. या विकल्पांपैकीं दुसऱ्या प्रकारच्या वाक्यांत वाचावयास, घ्यावयास, हीं 'सांगितलीं आहेत' या क्रियापदाचीं कर्मे होत असें ह्मणतां येत नाहीं. हा प्रकार, त्यानें मला हीं पुस्तकें वाचावयास दिलीं आहेत, ह्या मागील (अंक ६२५ मधील) वाक्यांसारखा आहे, अर्थात् सांग या मुख्य धातूचें संयुक्तक्रियापद चतुर्थ्यन्त वें-कृदन्ताच्या कर्माप्रमाणें आहे-ह्यामुळें येथें कर्मणि प्रयोग आहे हें उघड आहे. परंतु 'पुस्तकें वाचावयास सांगितलीं आहेत, या ठिकाणीं 'पुस्तकें' हें 'सांगितलीं आहेत' या क्रियापदाचें प्रत्यक्ष कर्म झाल्यामुळें येथें वाचावयास ही कर्मार्थीं चतुर्थी होय असें ह्मणतां येत नाहीं; ह्मणजे सांग धातूसंबंधानें जो प्रस्तुत (६२६) नियम सांगितला त्यास हें स्थळ अपवादक आहे. ह्मणजे प्रस्तुत नियमाप्रमाणें भावे प्रयोग व्हावा; परंतु या दुसऱ्या प्रकारच्या वैकल्पिक रूढीप्रमाणें कर्मणि प्रयोगही होतो. अशा वेळीं वाचावयास यासारख्या चतुर्थ्यन्त वें-कृदन्तास हेत्वर्थी असेंच ह्मटलें पाहिजे. असो. प्रस्तुत प्रयोगभेदास अनुरूप असा थोडासा अर्थभेदही येथें दिसतो. पहिल्या ह्मणजे भावे प्रयोगांत वाचण्याचे क्रियेवर ह्मणजे पुस्तकांचे वाचनावर वक्त्याचा कटाक्ष असल्यामुळें वाचावयास हें चतुर्थ्यन्त वें-कृदन्त कर्म झालें आहे पण दुसऱ्या ह्मणजे कर्मणि प्रयोतांत 'हीं पुस्तकें' या शब्दांवर सांगण्याचे क्रियेसंबंधानें वक्त्याचा कटाक्ष असल्यामुळें 'हीं पुस्तकें' हें त्या क्रियेचें कर्म होऊन वाचावयास ही हेत्वर्थी चतुर्थी झाली आहे. ह्मणजे कर्मणि प्रयोगांत वाचावयास ह्याचे जागीं वाचण्याकरितां, वाचावयासाठीं, असें ह्मटलें असतां चालेल. परंतु भावे प्रयोगांत हा पर्याय चालावयाचा नाहीं, हें वरील टीप २ मध्यें सांगितेंलच आहे. या ठिकाणचा भावे प्रयोग व कर्मणि प्रयोग यांतील हा अर्थभेद त्यांच्या इंग्रजी भाषान्तरानेंही तज्ज्ञांस अधिक स्पष्ट दिसेल. 'मास्तरनें मला हीं पुस्तकें वाचावयास सांगितलें आहे, ह्याचें 'The master has asked me to read these books' असें सरळ भाषांतर दिसतें; परंतु 'मास्तरानें मला हीं पुस्तकें वाचावयास सांगितलीं आहेत,' ह्याचें वरील भाषान्तर तंतोतंत नसून, 'The master has recommended these books to me for my reading' यानें त्याचा खरा अर्थबोध होतो. पहिल्या ह्मणजे भावे प्रयोगामध्यें 'वाचावयास' हें चतुर्थ्यन्त कृदन्त सांग धातूचें प्रत्यक्ष कर्म होय आणि कर्मणि प्रयोगामध्यें पुस्तकें

हें त्याचें प्रत्यक्ष कर्म होय. ही व्याकरणाची बाब वरील निरनिराळ्या भाषान्तरानें स्पष्ट होऊन सांग धातूच्या अर्थामधीलही सूक्ष्म भेद तज्ञांचे नजरेसमोर सूक्ष्मपणें उभा राहील.

६२७. कधीं कधीं या चतुर्थ्यन्त वें-कृदन्ताचा 'त्या क्रियेच्या कामीं' असा विषय किंवा बाब दाखविणारा अर्थ असतो. गोड, कठिण, चांगला, इ० कांहीं गुणविशेषणांचे पूर्वीं आणि लावणें, चुकणें इ० धातूंच्या पूर्वीं जेव्हां ह्या कृदन्ताचा उपयोग होतो, तेव्हां बहुधा त्याचा हा अर्थ होतो. जसें:—खावयास (खाण्याचे कामीं) गोड, पचावयास (पचण्याचे कामीं) कठीण, दिसावयास (दिसण्याचे बाबतींत) चांगला किंवा सुरेख, त्यानें मला लांकडें फोडावयास (फोडण्याचे कामीं) लावलें, त्याला खडी फोडावयास (फोडण्याचे कामास) लावतात, इ०.

६२८. कधीं कधीं 'त्या क्रियेस योग्य' किंवा 'तत्क्रियोन्मुख' ह्या अर्थीं चतुर्थ्यन्त वें-कृदन्ताचा हो धातूबरोबर उपयोग होतो. जसें:—तो अगदीं मरावयास किंवा मरायला झाला आहे, हें धोतर फाटायला झालें आहे, इ०. मरावयास = मरणोन्मुख; फाटायला = फाटण्यास योग्य, फाटण्याचे बेतांत आलेलें.

६२९. षष्ठ्यन्त वें-कृदन्ताचा विशेषणांप्रमाणें होणारा उपयोग स्मरणीय आहे. हें कृदन्त षष्ठी विभक्तीप्रमाणें विशेष्यनिघ्न आहे. त्याचें विशेष्य अनेक प्रकारचें असतें. तें येणेंप्रमाणें:—

(१) **कर्ता**—बहुधा अकर्मक धातु, आणि कर्माची विवक्षा नसतां तें गाळून अकर्मकाप्रमाणें उपयोगांत येणारे सकर्मक धातु, ह्यांचें षष्ठ्यन्त वें-कृदन्त आपल्या कर्त्याचें विशेषण होतें. जसें:—एखादा इतक्यांतच मुंबईस जावयाचा मनुष्य तुमच्या आढळांत आहे काय? ह्या मुलांपैकीं परीक्षेस बसावयाचे मुलगे कोणते? पूर्व रात्रीं निजावयाचे पहारेकरी अद्याप आले नाहींत, उत्तर रात्रीं जावयाचे पहारेकरी येऊन निजले आहेत; अद्याप वाचावयाचे मुलगे किती राहिले आहेत, इ०. येथें 'जावयाचा मनुष्य' ह्या शब्दांपैकीं मनुष्य हें विशेष्य जावयाचा या षष्ठ्यन्त वें-कृदन्तांतील जा धातूचा कर्ता आहे, हें अर्थदृष्ट्या समजेलच. असेंच अन्यत्र समजावें.

(अ) क्वचित् सकर्मक धातूंच्या षष्ठयन्त वें-कृदन्तासही कर्तृनिष्ठत्व आलेलें आढळतें; त्यावेळीं त्याचें कर्म त्याचे पाठीमागें येतें. जसें:— इंग्रजी शिकावयाचे मुलगे, हें उदाहरण करावयाचे विद्यार्थी, इ०. शिकावयाचे = ज्यांस इंग्रजी शिकावयाचें आहे ते, उदाहरण करावयाचे = ज्यांचें अद्याप तें उदाहरण व्हावयाचें आहे, म्हणजे ज्यांस अद्याप तें करावयाचें आहे ते, इ०.

(आ) अशाच प्रकारच्या हो, व ये, या अकर्मक धातूंच्या षष्ठयन्त वें-कृदन्ताचा व ला कृदन्ताचा एक चमत्कारिक उपयोग आढळतो. जसें:—हा मुलगा लग्न झालेला आहे; हा लग्न व्हावयाचा आहे; तुमचे मुलगे केवढाले आहेत, उ०—एक मुंज झालेला आहे, आणि एक मुंज व्हावयाचा आहे. ह्यांचा अर्थ उघडच आहे कीं, लग्न झालेला म्हणजे ज्याचें लग्न झालें आहे असा आणि लग्न व्हावयाचा म्हणजे ज्याचें लग्न व्हावयाचें आहे असा, इ०. याप्रमाणेंच ताप आलेला मनुष्य, न्हाण यावयाची मुलगी, इ०.

टीप १—या ठिकाणीं लग्न व मुंज ह्यांचें स्वतंत्र व्याकरण काय? हा एक बिकट प्रश्न आहे. त्याचें उत्तर असें:—मुंज झालेला, लग्न व्हावयाचा, हीं संयुक्त विशेषणें मानावीं; (तथापि ह्यांमध्यें मुंज होणें, लग्न होणें, असे संयुक्त धातु मात्र मानितां येत नाहींत; कारण कीं, तो मुंज होतो, किंवा तो लग्न झाला, अशा प्रकारचा प्रयोग कोठेंच आढळत नाहीं हें उघड आहे.) हा एक पक्ष नाहीं तर मुंज, लग्न, ह्या प्रथमेचा अर्थ कर्ता झालेला, व्हावयाचा, इत्यादि कृदन्त विशेषणांचा, असें म्हणावें. मात्र झालेला, व्हावयाचा, हीं मुंज, व लग्न ह्या त्यांचें कर्त्याचीं विशेषणें नसून ज्याच्या मुंजीबद्दल किंवा लग्नाबद्दल भाषण चाललें आहे; त्या मनुष्याचीं आहेत हें उघड आहे. ह्याप्रमाणेंच ताप आलेला, न्हाण यावयाची इत्यादि ठिकाणच्या ताप, न्हाण, या शब्दांचें व्याकरण करावें. आमच्या मतें हा दुसराच पक्ष बरा दिसतो. कारण कीं, ह्याप्रमाणें प्रत्येक शब्दांचें व्याकरण स्पष्ट होतें. संयुक्त विशेषणाचा पक्ष केवळ निर्वाहापुरता आहे असें वाटतें. तथापि तोच कोणास बरा वाटल्यास तोही वाक्यपृथक्करणाचे दृष्टीनें चालण्यासारखा आहे. पण निवळ व्याकरणाचे दृष्टीनें दुसराच पक्ष आम्हांस बरा दिसतो.

टीप २—'ज्याचें किंवा जिचें लग्न व्हावयाचें आहे, या अर्थानें लग्न व्हावयाचा मुलगा किंवा लग्न व्हावयाची मुलगी, अशी ज्याप्रमाणें एका तऱ्हेची संक्षिप्त भाषा आढळत, त्याप्रमाणें या संक्षिप्त भाषेस आणखीही संक्षेप बसून,

लग्नाचा मुलगा, लग्नाची मुलगी, अशी अतिसंक्षिप्त भाषा झाली आहे. या ठिकाणच्या षष्ठीच्या अर्थ योग्यता असा आहे हें विभक्त्यर्थ–विचारांत सांगितलेंच आहे.

( २ ) **कर्म**—नेसावयाचें धोतर, शिकावयाचा धडा, आणवयाचें सामान, वाचावयाचें ( क्रि० वाचायाचें कि० वाचावयाचें ) पुस्तक, बरोबर न्यावयाचे कपडे, हातांत धरावयाची काठी, इ०.

( ३ ) **करण**—लिहावयाची लेखणी, लेखण्या करावयाचा चाकू, वाचावयाचा चष्मा, लांबचें पहावयाचा चष्मा, पाणी प्यावयाचें भांडें, पोतीं शिवावयाचा दाभण, इ०. सकर्मक धातूंच्याच षष्ठयन्त वें-कृदन्ताचे पुढें करणवाचक विशेष्य आलेलें आढळतें.

( ४ ) **अधिकरण**—बसावयाची खुर्ची, लिहावयाचा कागद, बसायची खोली, निजावयाची खोली, पाणी तापवावयाची चूल, पुस्तकें ठेवावयाचा कोनाडा, इ०.

६३०. एखाद्या क्रियेबद्दल निश्चय, खात्री, संभवातिशय म्हणजे फार मोठा संभव म्हणजेच संभवाधिक्य, किंवा एखाद्या क्रियेसंबंधाची कर्त्याची संवय, हा अर्थ दाखवावयाचा असतां त्या क्रियेच्या षष्ठयन्त वें-कृदन्ताचा वाक्यांत स्वतंत्रपणें उपयोग होतो. म्हणजे त्याचे पुढील आह, हो, किंवा अस, या धातूचें आख्यात अध्याहृत असतें. जसें:-—काल तो घोड्यावरून पडावयाचाच ( संभवाधिक्य ) पण थोडक्यांत वांचला; त्यानें तुला खरें सांगितलें नाहीं यांत नवल नाहीं, तो अशा वेळीं खोटें बोलावयाचाच ( खात्री किंवा संवय ); तुमचा घोडा एखाद्या दिवशीं कोणाला तरी चांगली इजा करावयाचा ( संभवाधिक्य ), यांत संशय नाहीं; तूं कांहीं म्हणालास तरी मला तेथें जायचें ( निश्चय ); इ०. येथेंहीं षष्ठयन्त वें-कृदन्तास क्रियापद म्हणतां येत नाहीं. कारण उघडच आहे कीं, क्रियापद म्हणजे कोणत्याही धातूचें आख्यातप्रत्यय लागून झालेलें रूप होय. ह्यामुळें अशा वाक्यांतील क्रियापद अध्याहृत आहे असेंच म्हटलें पाहिजे.

**टीप** १—चतुर्थ्यन्त वें–कृदन्ताचे जागीं चतुर्थ्यन्त णें–कृदन्ताचाही बऱ्याच ठिकाणीं उपयोग होतो; असें आतांपर्यंतच्या विवेचनावरून वाचकांचे ध्यानांत आलेंच असेल. तथापि त्यांचा एकमेकांचे जागीं सर्वत्र उपयोग होतोच असें नाहीं. ‘ त्याच्या बोलण्यास किंवा खेळण्यास काय म्हणावें हें समजत नाहीं.’ या वाक्यांत बोलण्यास व खेळण्यास ह्याचे जागीं बोलावयास, बोलायला व खेळा–

वयास, खेळावयाला, असें म्हणतां येत नाहीं. णें-कृदन्त हें नाम आहे आणि त्यास वाटेल ती विभक्ति लागते. परंतु करावें, बोलावें, खेळावें, यांचा प्रथमाविभक्तींत नामाप्रमाणें किंवा विशेषणाप्रमाणें उपयोग झालेला कोठेंच आढळत नाहीं तसेंच करावयाचा, बोलावयास, हीं रूपें करावें, बोलावें, यांपासून अनियमितपणेंच साधतात. षष्ठयन्त वें-कृदन्ताचे जागींही षष्ठ्यन्त णें–कृदन्ताचा उपयोग सहसा होत नाहीं.

टीप २—करावें, बोलावें, खेळावें, इ० मूळ रूपांचा जर प्रथमेमध्यें उपयोग झालेला कोठेंच आढळत नाहीं, तर करावयास, करावयाला, करावयाचें, ह्यांस करावें ह्याचीं चतुर्थीचीं व षष्ठीचीं रूपें म्हणावें कीं, नाहीं, असा एक प्रश्न उत्पन्न होतो, करावें खेळावें, बोलावें, इ० रूपांचा नामाप्रमाणें उपयोग होतो असें जे समजतात त्यांच्या दृष्टीनें हा प्रश्नच उत्पन्न होत नाहीं. करावें लागे, द्यावें लागतें, इत्यादि स्थळीं करावें, द्यावें, यांस कांहीं वैयाकरण नामें समजतात; त्यांचे दृष्टीनें करावयास, करावयाचा, हीं त्यांचीं विभक्त्यन्त रूपें होत हें सरळच आहे. आमच्या मतें करावें लागतें, द्यावें लागेल, वगैरे ठिकाणीं करावें, द्यावें, हीं कृदन्त विशेषणें संयुक्त क्रियापदान्तर्गत आहेत. कांहीं झालें तरी करावें, द्यावें, हीं नामें नव्हत असेंच आमचें मत आहे. त्यामुळें करावयास, करावयाचा, ह्यांस वें–कृदन्ताचीं चतुर्थ्यन्त व षष्ठ्यन्त रूपें कसें मानितां येईल. असा प्रश्न आमचे दृष्टीनेंच उत्पन्न होतो. ह्या प्रश्नाचें उत्तर इतकेंच कीं, करावयास, करावयाचा, हीं करावें यापासून अनियमितपणें साधलेलीं चतुर्थ्यन्त व षष्ठ्यन्त रूपें आहेत आणि त्यांचा वर दाखविल्याप्रमाणें चतुर्थीचे व षष्ठीचे अर्थीं उपयोग होतो, ह्या गोष्टी निर्विवाद आहेत. त्याचप्रमाणें करावयास, करवयाचा, इत्यादि रूपांतील जो मूळ शब्द 'करावें' त्याचा या दोन विभक्तींच्या एकवचनाशिवाय, कोणत्याच विभक्तींत व एकवचनीं इतर विभक्तींत कधींच उपयोग होत नाहीं, हेंही तितकेंच निर्विवाद आहे. ह्या गोष्टी जर वास्तविक सत्य आहेत, तर त्या तशाच नमूद करून ठेवणें हें वैयाकरणाचें काम आहे. त्या जर चमत्कारीक किंवा अपवादक दिसल्या, तर त्यानें तसा शेरा मारावा म्हणजे झालें.

## ऊन-कृदन्त ( करून, बोलून, निजून, इ०.)

६३१. ऊन-कृदन्ताचा व वाक्यांतील क्रियापदाचा कर्ता जेव्हां एक असतो, तेव्हां तो त्या क्रियापदाचे संबंधानें ज्या विभक्तींत असावयास पाहिजे त्याच विभक्तींत असतो; म्हणजे ऊन–कृदन्ताचा कर्ता अशा ठिकाणीं स्वतंत्रपणें येत नाहीं, जसें:—तो असें बोलून घरीं गेला, त्यानें असें बोलून रामाचा हात पकडला, त्याला गुडघ्यांवर हात टेकून हें वजन उचलतें, त्यानें प्रथम येथें येऊन मग तिकडे जावें, इ०.

६३२. ऊन-कृदन्ताचा कर्ता व वाक्यांतील क्रियापदाचा कर्ता हे जेव्हां एक नसतात, म्हणजे जेव्हां त्या कृदन्ताचे कार्याबद्दलच मुख्य विधान नसतें, तेव्हां:—

( अ ) वाक्यांतील मुख्य क्रियापदाचे कर्त्यासंबंधानेंच ऊन-कृदन्त-द्योतक क्रिया घडते असा तरी अर्थ पाहिजे; तरच ऊनकृदन्ताचा उपयोग होतो. जसें:—त्यास तें पत्र तेथें मिळून तो पुढें गेला, आम्हांला तुमची मनिऑर्डर मिळून किंवा पोंचून, आम्हीं काशी सोडिली, त्याला फुरसत होऊन तो इकडे येईल तों फार उशीर आहे, इ०.

( आ ) वाक्यांतील मुख्य क्रिया व ऊन—कृदन्तद्योतक क्रिया यांमध्यें कार्यकारणसंबंध असला पाहिजे, तरच ऊन—कृदन्ताचा उपयोग होतो. जसें:—असें ऐकून त्याचें धाबें दणाणून गेलें, हें वाचून त्याला फार दु:ख झालें, रामाचा बाण लागून रावण मेला, पाऊस पडून धान्य पिकतें, कोयनेल घेऊन ताप हटला, तो दगड मर्मीं लागून मांजराचा प्राण गेला, इ०.

परंतु जर वाक्यांतील क्रियापद—दर्शक क्रिया व ऊन—कृदन्त—दर्शक क्रिया या दोन क्रियांचे कर्त्यांचा कांहीं संबंध नसेल, तर त्यांचा एका वाक्यांत योग जुळणार नाहीं. रामा जेऊन गोविंदा गेला, सूर्य उगवून ते गेले, असें कोणी म्हणत नाहीं; तर, रामाचें जेवण झाल्यावर किंवा रामा जेवल्यावर, सूर्य उगवल्यावर, असा भाषणप्रचार आहे. परंतु दोन क्रियांमध्यें कार्यकारणसंबंध असतां नियमाप्रमाणें रचना होते.. जसें:—रामाला दगड लागून गोविंदा भ्याला.

६३३. ऊन—कृदन्ताचें कर्म व वाक्यांतील क्रियापदाचें कर्म हीं अर्थानुरोधानें एक असूं शकतात किंवा भिन्न भिन्नही असतात. जसें:—त्यानें हें पत्र हातांत घेऊन फोडिलें, असें बोलून रामानें त्यास पांच रुपये दिले, इ०.

परंतु वाक्यांतील क्रियापद कर्मणि किंवा सकर्मक भावी असतां ऊन—कृदन्ताचा कर्ता त्या क्रियापदाचें कर्म होऊं शकत नाहीं. जसें:—तें पत्र मिळून त्यानें तें वाचलें; ह्याचे जागीं, तें पत्र मिळाल्यावर त्यानें तें

वाचलें; आणि रामा खालीं पडून गोविंदानें त्यास मारिलें; याचे जागीं, रामा खालीं पडल्यावर गोविंदानें त्यास मारिलें; अशीं वाक्यें येतात.

६३४. ऊन—कृदन्तद्योतक क्रियेच्या घडण्यापासून कालाची गणना होऊन त्याबद्दल वाक्यांत विधान असतां, ऊन—कृदन्ताचा कर्ता प्रथमान्त किंवा चतुर्थ्यन्त असतो. जसें:—तो मरून पांच वर्षें झालीं किंवा त्याला मरून पांच वर्षें झालीं; मी येऊन किंवा मला येऊन दोन महिने झाले; इ०. अशा ठिकाणीं मी किंवा मला आपल्याला अशीही रचना होते.

[ त्याचें लिहून झालें, त्याचें निजून झालें, त्याचें लिहून होत आहे, इत्यादि उदाहरणांत लिहून म्हणजे लिहिणें असें समजून येथील ऊन-कृदन्तांस कोणी कोणी झालें या क्रियापदाचा कर्ता असें म्हणतात. परंतु असें म्हणणें योग्य नाहीं. सकर्मक धातूपासून साधलेले ऊन—कृदन्त अशा ठिकाणीं आलें असतां, या व्यवस्थेंतील अप्रयोजकपणा व चूक तेव्हांच उठून नजरेंत भरते. त्याचें पत्र लिहून झालें, या वाक्यांतही पत्र हें लिहून या कृदन्ताचें कर्म आणि लिहून हें झालें याचा कर्ता असें म्हणणें सुक्ष्दर्शनीं ठीक दिसतें. परंतु या उदाहणांत थोडासा फरक करून पहा, म्हणजे काय चमत्कार होतो तो तेव्हांच दृष्टीस पडेल. त्याचीं पत्रें लिहून झालीं, त्याचे पांच कागद लिहून झाले, त्याची पोथी लिहून झाली, इ० ठिकाणीं लिहून या कृदन्तास नाम समजून पुढील क्रिया-पदाचा कर्ता मानणें कितपत युक्त आहे, ह्याचा विचार आम्ही वाचकांवरच सोंपवितों. अशा तऱ्हेच्या आमच्या वैयाकरणांनीं घालून दिलेल्या व आजपर्यंत अंधपणें चालत आलेल्या चुका या ग्रंथांत अनेक प्रसंगीं सविस्तर दाखवून त्यांचा निषेध केला आहे. तेव्हां येथें तसाच विस्तार करण्याची जरूर नाहीं. ऊन—कृदन्त हें संस्कृत त्वा—प्रत्ययान्त कृदन्तअव्ययापासून निघालें आहे, आणि संस्कृतांत त्याचा नामाप्रमाणें कधींच उपयोग होत नाहीं. त्याचप्रमाणें मराठींतही ऊन कृदन्त केवळ अव्यय आहे. आणि त्याचा नामाप्रमाणें कधींच उपयोग होत नाहीं. त्याचें पत्र लिहून झालें, अशा वाक्यांत लिहून झालें, लिहून झालीं, इत्यादि हीं संयुक्तक्रियापदें असून एका प्रकारचा कर्मणिप्रयोग आहे आणि ज्या ठिकाणीं अकर्मक धातूचें ऊन—कृदन्त असतें, अशा वाक्यांत ( उदा०—त्याचें निजून झालें ) तशाच प्रकारचा भावे प्रयोग आहे, आणि ह्या कर्मणि व भावेप्रयोगांस समापनकर्मणि व समापनभावे अशीं नांवें आहेत हें प्रयोगाध्यायांत सविस्तर आलेंच आहे. या प्रयोगाकडे आमच्या वैयाकरणांचें जावें तसें लक्ष गेलें नव्हतें. या वाक्यांचा विचार करीत असतां त्यांतील ऊन—कृदन्तासच कर्ता मानण्याची भलतीच दिशा त्यांचे विचारास एकदां लागल्यामुळें त्यांच्या हातून या वाक्यांचें

समाधानकारक विवेचन न व्हावें हेंच स्वाभाविक आहे. ऊन-कृदन्त निवळ अव्यय होय; आणि या वाक्यांतील त्याचे पुढलें हो धातूचें क्रियापद त्याच्याप्रमाणें बदलत नाहीं, ह्या गोष्टी एकदां स्पष्टपणें नजरेस पडल्या म्हणजे प्रस्तुत वाक्यांत कर्माणि व भावे प्रयोग असतात ही गोष्ट तेव्हांच समजते. व त्या कर्माणि व भावे प्रयोगांस तुम्ही समापन कर्माणि व समापन भावे हीं नांवें द्या किंवा वाटेल तर दुसरीं नांवें द्या, त्यांबद्दल आमचें कांहीं म्हणणें नाहीं. पण अशा वाक्यांत कर्माणि व भावे प्रयोग मानिले पाहिजेत, या गोष्टीबद्दल तरी आतां कांहीं शंका असण्याचें प्रयोजन दिसत नाहीं.

तसेंच 'त्याला बोलून व्यर्थ आहे,' 'त्याला बोलून उपयोगाचें नाहीं,' येथें 'बोलून' ह्यास नाम समजणें आमच्या मतें योग्य नाहीं. ऊन–प्रत्ययान्त कृदन्त मूळचें अव्यय होय, आणि त्याचा मराठींतही शेंकडा नव्याण्णव जागीं अव्ययाप्रमाणेंच उपयोग होतो, ह्या गोष्टी निर्विवाद व सर्वमान्य आहेत. तेव्हां शेंकडा एक स्थळ जें वादग्रस्त राहिलें, त्याचा निकाल कसा करावा हा प्रश्न आहे. आमच्या मतें नव्याण्णव उदाहरणांत जी व्यवस्था लावितां येते, ती जर या वादग्रस्त जागीं कशी तरी करितां येत असेल तर ती स्वीकारणें चांगलें; हें सुज्ञांस तेव्हांच मान्य होईल. परंतु अशी व्यवस्था लावणें जर बहुतेक अशक्यच होत असेल, तर मात्र तें स्थळ बहुतेक अपवादात्मक समजून त्याची अपवादक भिन्न व्यवस्था करणें जरूर आहे. व्याकरण ही तरी एक व्यवस्थाच आहे. आणि व्यवस्थेची वरील तत्त्वें जोंपर्यंत सर्वसंमत आहेत, तोंपर्यंत त्यांच्याच अनुरोधानें वागणें इष्ट आहे. म्हणून आमच्या मतें, 'त्याला बोलून व्यर्थ आहे,' या वाक्यांत 'बोलून' यास नाम समजण्याची आवश्यकता नाहीं. तर मग त्याला नेहमींप्रमाणें अव्यय समजून काय व्यवस्था करावयाची हा प्रश्न उरतो. त्याच्या निकालासाठीं तशाच प्रकारच्या दुसऱ्या उदाहरणांकडे व त्यांच्या अर्थाकडे लक्ष देणें अवश्य आहे. 'त्याला बोलून काय उपयोग,' 'त्याला बोलून फायदा नाहीं,' हीं त्याच अर्थाचीं वाक्यें आहेत; आणि 'त्याला बोलून' इतका भाग सर्वांत एक असून 'व्यर्थ आहे' याबद्दल इतरांमध्यें 'काय उपयोग,' 'फायदा नाहीं,' हे याच अर्थाचे पर्याय आले आहेत. आणि तिन्ही वाक्यांची रचना जरी सर्वस्वी एक नसली, तरी बोलून या ऊन-कृदन्तासंबंधानें ती एकच आहे. प्रथम 'त्याला बोलून काय उपयोग' 'त्याला बोलून फायदा नाहीं,' 'त्याला बोलून व्यर्थ,' या वाक्यांतील ऊन-कृदन्ताचा अर्थ स्पष्ट करण्याकरितां त्या वाक्यांचा अर्थ पाहूं. आमच्या मतें तिन्ही वाक्यांचा अर्थ एकच असून, तो 'त्याला बोललें तरी त्या (बोलल्या) पासून फायदा नाहीं' अशा प्रकारचा आहे हें निर्विवाद आहे. म्हणजे 'बोलून' हें केवळ 'बोलणें' या अर्थानें वरील वाक्यांत आलेलें नसून, त्याचा या ठिकाणींही नेहमींचाच वास्तविक किंवा काल्प-

निक क्रियासमाप्तीचा अर्थ आहे, हें उघड आहे. तेव्हां या अर्थास अनुसरून त्यास नेहमींप्रमाणेंच अव्यय समजून वाक्याची व्यवस्था करणें इष्ट आहे. आतां 'त्याला बोलून फायदा नाहीं,' 'त्याला बोलून काय उपयोग,' ह्या वाक्यांतील 'बोलून' यास कोणी नाम म्हणतच नाहीं, तर त्यास सर्व लोक अव्ययच समजतात; आणि फायदा व उपयोग कशाचा, तर त्याला बोलल्याचा, असेंच मानितात. यावरून 'त्याला बोलून व्यर्थ,' म्हणजे त्याला बोलणें व्यर्थ असा अक्षरशः अर्थ नसून, 'त्याला बोललें तरी तें (त्याला बोललेलें) व्यर्थ आहे' असा अक्षरशः अर्थ आहे व तोच खरा आहे असें स्पष्ट कळेलच. आणि या अर्थास अनुसरून, ज्याप्रमाणें 'त्याला बोलून अर्थ काय,' 'त्याला बोलून फायदा नाहीं,' या वाक्यांत 'बोलून' ह्याचे नंतर, आणि अर्थ व फायदा ह्यांचे मागें 'त्याचा' म्हणजे त्या बोलल्याचा किंवा बोललेल्या भाषणाचा असा शब्द आपण अध्याहृत समजतों त्याचप्रमाणें 'त्याला बोलून व्यर्थ आहे,' या ठिकाणींही तशाच प्रकारचा 'तें' (त्याला बोललेलें) हा शब्द अध्याहृत समजणें योग्य आहे; आणि तो शब्द तसा मानिला म्हणजे त्या वाक्याची व्यवस्थाही तेव्हांच लागते. म्हणून 'त्याला बोलून व्यर्थ आहे' या वाक्यांत 'त्याला बोलून' ह्या शब्दांचे नंतर 'तें' (बोललेलें) हा शब्द अध्याहृत असून, तो 'आहे' ह्या क्रियापदाचा कर्ता होय; 'बोलून' हें अव्यय असून तें प्रस्तुत वाक्यांत कर्तृपद नाहीं हें उघड आहे.

अशाच प्रकारचें आणखी एक उदाहरण देतों. तें तां कृदन्ताबद्दलचें आहे. 'त्याला बोलतां उपयोगी नाहीं,' 'त्याला बोलतां कामा नये,' इ० वाक्यांत 'बोलतां' म्हणजे बोलणें असा अर्थ करून व त्यास नाम समजून तो नाहीं व नये, ह्यांचा कर्ता मानण्यांत येतो. परंतु आमच्या मतें तां-कृदन्त हें मराठींत नेहमीं क्रियाविशेषण अव्यय असून, त्याचा नामाप्रमाणें कधींच उपयोग होत नाहीं. तेव्हां या ठिकाणींही वरील वाक्यांतल्याप्रमाणें वरील तत्त्वांस अनुसरूनच योग्य व्यवस्था लागू शकते. परंतु, आजपर्यंत 'बोलतां' म्हणजे 'बोलणें' हें समजण्यांतच मूळ चूक झाली आहे, व त्या अर्थामुळें 'बोलून' ह्यास नाम समजण्याची कृति निघाली आहे. 'बोलतां' म्हणजे 'बोललें असतां' हा वास्तविक अर्थ असून, तो प्रकृत वाक्यांत कसा जुळतो तें पहा. त्याला बोलतां उपयोगी नाहीं=त्याला बोललें असतां तें (त्याला बोललेलें) उपयोगी नाहीं; त्याला बोलतां कामा नये=त्याला बोललें असतां तें (त्याला बोललेलें) कामा नये. हा अर्थ किती स्पष्ट व स्वाभाविक आहे आणि या अर्थानें त्यांतील शब्दांची व्याकरणदृष्ट्या कशी उत्तम व्यवस्था लागते! 'त्याला बोलतां कामा नये' आणि 'त्याला बोलतां उपयोगी नाहीं' या वाक्यांत 'बोलतां' या तां-कृदन्ताचा, पूर्वीं तां-कृदन्ताचे विवेचनांत सांगितल्याप्रमाणें, संकेतद्योतक अर्थ आहे, आणि वरील अर्थाचेंच तो स्पष्टीकरण करितो. 'जर किंवा जरी त्याला बोललें तर किंवा तरी तें कामा नये', 'जर किंवा जरी त्याला बोललें तर किंवा तरी

तें उपयोगी नाहीं.' अशीं विस्तृतपणें वरील वाक्यें लिहिलीं असतां त्यांच्या अर्थाचें व त्यांतील शब्दांच्या व्याकरणाचें स्वरूप, सूक्ष्मदर्शक यंत्रांतून त्यांजकडे पाहिल्याप्रमाणें स्पष्ट दिसतें. यावरून 'त्याला बोलतां उपयोगी नाहीं' आणि 'त्याला बोलतां कामा नये,' या वाक्यांत 'बोलतां' हा शब्द नेहमीप्रमाणे तां-कृदन्त क्रियाविशेषण असून, 'तें' (बोललेलें) हा नाहीं व नये. या क्रियापदांचा कर्ता अध्याहृत आहे; असें समजणेंच व्याकरणदृष्ट्या व अर्थदृष्ट्या विशेष संयुक्तिक व सुव्यवस्थित आहे हें उघड आहे.]

६३५. ऊन-कृदन्ताचा कधीं कधीं 'ती क्रिया चालली असतां' या अर्थीं कालवाचक क्रियाविशेषणाप्रमाणें उपयोग होतो. जसें:—तो निजून वाचतो; निजून किंवा पडून वाचण्यापेक्षां बसून किंवा उभें राहून वाचणें चांगलें इ०. या ठिकाणीं निजून, पडून, बसून, इ० ऊन कृदन्तांमध्यें क्रियासमाप्तीचा अर्थ मुदलींच नाहीं असें नाहीं; तर ती क्रिया संपून जी स्थिति प्राप्त होते, तिचें सातत्य म्हणजे पुढें चालणें, सुरू असणें, असा अर्थ गर्भित आहे. तो बसून वाचतो म्हणजे बसल्यानंतर वाचतो असा अर्थ नाहीं; तर बसण्याची क्रिया संपून बसणारा ज्या स्थितींत आला तीच स्थिति तशीच पुढें चालत असतां म्हणजे संक्षपानें 'बसलेला असतां' किंवा 'बसला असतां' तो वाचण्याची क्रिया करितो हें उघड आहे. म्हणून वरील वाक्यांत निजून = निजला असतां, बसून = बसला असतां, पडून = पडला असतां, इत्यादि अर्थ आहे. कांहींकांच्या मतें वरील वाक्यांत निजून म्हणजे निजत निजत, पडून म्हणजे पडत पडत, बसून म्हणजे बसत बसत, इत्यादि असा अर्थ आहे. तो बसून वाचतो ह्याचे जागीं तो बसत बसत वाचतो, असें दुर्लक्षानें किंवा अज्ञानानें म्हणण्याचा क्वचित् थोडसा प्रचार असेल; नाहीं असें नाहीं. परंतु तो प्रचार योग्य दिसत नाहीं. कारण कीं, त-कृदन्त हें बहुधा अपूर्णक्रियाद्योतक आहे. त्यामुळें बसून याचा जो अर्थ (बसला असतां) वर सांगितला आहे, तो दाखविण्याचे कामीं बसत याची योजना युक्त न दिसावी व तसा भाषाप्रचारही फारसा नसावा हें साहाजिक आहे. यापेक्षां, तो पडून वाचतो, ह्याचे जागीं, तो पडल्या पडल्या वाचतो, असें म्हणण्याचा जो विशेष प्रचार आढळतो, तो अर्थदृष्ट्या अधिक उचित होय. कोणास असें वाटेल कीं बसत बसत वाचतो, असें म्हटलें

काय आणि बसल्या बसल्या वाचतो, असें म्हटलें काय, दोहोंचा जर एकाच अर्थीं कधीं कधीं उपयोग होत आहे, तर त्यांत फरक करण्याचें कांहीं कारण नाहीं. हें म्हणणें एका दृष्टीनें अंशतः खरें आहे. परंतु भाषा व अर्थ यांचा जितका मेळ बसेल तितका चांगला. भाषेचा शब्दशः अर्थ एक आणि बोलणाराचा आशय निराळाच; असें झालें असतां गैरसमज उत्पन्न होण्याचा संभव असतो. बसत बसत, म्हणजे वास्तविक बसण्याची क्रिया सुरू असतां, म्हणजे तिला आरंभ होऊन ती संपण्याचे पूर्वीं असा अक्षरशः अर्थ आहे, हें निर्विवाद आहे. आणि तो बसून वाचतो, या ठिकाणीं बसून ह्याचा शब्दशः अर्थ तसा नाहीं, हेंहीं तितकेंच निर्विवाद आहे. तेव्हां बसून ह्याचा बसत बसत, या शब्दांनीं अर्थ सांगणें योग्य व इष्ट नाहीं. इंग्रजी भाषेंत वर्तमानकालवाचकाचा उपयोग करून, ' बसून ' ह्या शब्दाचें प्रस्तुत ठिकाणीं जरी इंग्रजी भाषान्तर होत असलें, तरी तेवढ्यानेंच मराठींत ' बसून ' म्हणजे ' बसत बसत ' असाच अर्थ होय, असा कोणी सुज्ञपणें आग्रह धरील असें वाटत नाहीं. तेव्हां प्रस्तुत स्थळीं बसून = बसलेल्या स्थितींत = बसल्या बसल्या, हें उघड आहे. बसून ह्यास नेहमींचा क्रियासमाप्तीचा अर्थ असतो तेव्हां, आणि ' बसल्या स्थितींत ' असा अर्थ असेल तेव्हां, दोन्ही वेळीं व्याकरण एकच--क्रियाविशेषण अव्यय. तथापि त्यास दोन्ही ठिकाणीं पूर्वकालवाचक अव्यय असें म्हणतां येणार नाहीं, हें वरील विवेचनावरून वाचकांस कळेलच.

---

# अध्याय ७.

## पदक्रम.

६३६. ज्या भाषेंत विकरण फार असतें म्हणजे व्ययी शब्दांस विभक्तिप्रत्यय व आख्यातप्रत्यय हे भरपूर लागून त्यांचीं निरनिराळ्या अर्थीं निरनिराळीं रूपें तयार होतात, त्या भाषेंत वाक्यांतील पदांच्या अनुक्रमाचा प्रश्न फारसा महत्त्वाचा नसतो. संस्कृत व संस्कृतोत्पन्न भाषांची अशीच स्थिति आहे. परंतु इंग्रजीसारख्या भाषांची गोष्ट भिन्न आहे. त्यांतील व्ययी शब्दांचें विकरण फारच संकुचित पडल्यामुळें वाक्यांतील

शब्दांचा परस्परसंबंध त्याचे क्रमावरून ठरवावा लागतो. ह्यामुळें पदक्रम या विषयास त्या भाषांत विशेष महत्व आहे. तथापि संस्कृतोद्भव भाषांत पदक्रमाचा मुद्दा जरी तितक्या महत्त्वाचा नसला, तरी याही भाषांमध्यें वाक्यांतील पदांचा स्वाभाविक क्रम बहुधा ठरल्यासारखाच आहे. प्रसंगविशेषीं आणि वक्ता व लेखक ह्यांचे इच्छेस व लहरीस अनुसरून त्यांत फरक होतो. ह्या फरकांपैकीं जे केवळ वक्ता व लेखक ह्यांचे इच्छेवर व लहरीवर अवलंबून आहेत, त्यांचे विषयीं सामान्येकरून विधान करणें म्हणजे त्यांच्या संबंधाचे सामान्य नियम देणें दुरापस्तच आहे. तेव्हां केवळ स्वाभावीक पदक्रम कोणता व त्यांत प्रसंगविशेषीं साधारणपणें काय फरक होतात, इतकेंच या आध्यायांत सांगावयाचें आहे. परंतु या विषयासंबंधानें यापूर्वीं अनेक प्रसंगीं अनेक साधारण गोष्टी सांगण्यांत आल्या आहेत. उदाहरणार्थ, विशेषणें हीं बहुधा विशेष्याचे पूर्वीं येतात; तीं विधिविशेषणें झालीं असतां विशेष्याचे नंतर येतात; क्रियाविशेषणें बहुधा क्रियेच्या जवळ तद्वाचक शब्दांचे पूर्वीं येतात; शब्दयोगी अव्ययें शब्दांचे पुढें विभक्तिप्रत्ययांप्रमाणें लागतात, इ०. तेव्हां त्यांचा पुनरुच्चार करून व्यर्थ जागा न अडवितां फक्त मुख्य मुख्य मुद्यांचा संक्षेपतः उल्लेख करावयाचें ठरविलें आहे.

६३७. कर्ता व क्रियापद ह्यांशिवाय वाक्य होतच नाहीं; आणि सकर्मक क्रियापद असल्यास त्यास कर्माचीही आवश्यकता असते. हीं मराठींत स्वाभाविकरित्या बहुधा कर्ता, कर्म व क्रियापद. ह्या क्रमानें म्हणजे प्रथम कर्ता नंतर असल्यास कर्म, आणि नंतर क्रियापद अशीं येतात. जसें:––तो जातो, त्यानें काम केलें, त्याच्यानें जाववेल, मला गेलें पाहिजे, माझीं पत्रें लिहून झालीं, शिपयाकडून चोर धरला गेला किंवा धरण्यांत आला, इ०.

६३८. वाक्यांत संप्रदानार्थी चतुर्थी आली असतां ती, अथवा नवीन भाषेनें बोलावयाचें असतां, वाक्यांत अप्रत्यक्ष कर्म असतां तें, कर्त्याचे नंतर व कर्माचे म्हणजे प्रत्यक्ष कर्माचे आधीं येतें. जसें:––रामानें गणूस पुस्तक दिलें, तो मला दगड मारितो, मीं त्याला हें सांगितलें किंवा कळविलें, इ०.

६३९. ह्याशिवाय इतर अर्थीं विभक्त्यन्त नामें येतात, त्यांचा कर्ता, कर्म, क्रियापद, ह्यांपैकीं ज्याच्याशीं संबंधं असेल ह्याच्या पाठीमागें बहुधा तीं येतात. जसें:—रामाचा भाऊ मुंबईहून पुण्यास मेलनें गेला, त्यानें किल्लेदारांच्या मुलासच आपली मुलगी दिली, इ०.

६४०. कर्ता, कर्म, करण, संप्रदान, इ० अर्थद्योतक नामांचीं विशेषणें व क्रियाविशेषणें बहुधा त्यांचे पाठीमागें येतात. विधिविशेषणें बहुधा क्रियापदाचे पूर्वीं त्याचे जवळ येतात.

६४१. जेव्हां–तेव्हां, जेथें–तेथें, इ० संबंधी क्रियाविशेषणांचा वाक्यांत उपयोग होत असतां, तीं बहुधा वाक्याचे आरंभीं येतात. जसें:—जेव्हां मी तुझ्याकडे आलों होतों, तेव्हां तुम्ही निजला होतां; जिकडे पहावें, तिकडे रडच दृष्टीस पडते; इ०.

६४२. ( अ ) उभयान्वयी अव्ययें ज्या शब्दांस किंवा वाक्यांस जोडतात, त्यांचेमध्यें येतात. जसें:—रामा आणि गोविंदा गेले, तो हुषार पण आळशी आहे, इ०.

( आ ) समुच्चयबोधक उयान्वयी अव्ययें अनेक शब्दांस किंवा वाक्यांस जोडीत असतां, बहुधा आखेरच्या शब्दाचे किंवा वाक्याचे आधीं येतात. जसें:—रामा, कृष्णा, व गोविंदा हे हुषार मुलगे आहेत; तो काल सायंकाळीं आला, जेवला व लगेच निघून गेला; इ०.

( इ ) जर, तर, जरी; तरी, इ० संकेतवाचक उभावान्वयी अव्ययें वाक्यारंभींच येतात. ह्यांपैकीं जर, जरी हीं पूर्ववाक्याचे आरंभीं, आणि तर, तरी, हीं उत्तरवाक्याचे आरंभीं येतात. जसें:—जर तो इतक्यांतच बरा होईल, तरच यंदां परीक्षेत बसूं शकेल; जरी तो परीक्षेच्या आधीं बरा झाला, तरी यंदांची त्याची परीक्षा बहुधा हुकलीच म्हणून समजावें; इ०.

६४३. काय ( संक्षिप्त–कां ) हें प्रश्नार्थक क्रियाविशेषण अव्यय वाक्याचे बहुधा शेवटीं येतें, आणि हें विकल्पेकरून अध्याहृत असतें. तें ज्या वेळीं आध्याहृत असतें, त्या वेळीं लेखनामध्यें प्रश्नाचा उद्देश प्रश्नचिह्नानें समजतो आणि भाषणामध्यें वाक्याचे अखेरीस उच्चारांतील प्रश्नद्योतक झट-

क्यानें समजतो. जसें:—तो आला काय? त्याचें लग्न झालें? तो गेला का? तो जावयाचा होता? तो जायचा होता का? तो जायचा होता काय? इ०.

६४४. प्रश्नार्थक इतर शब्द—सर्वनामें, विशेषणें, व क्रियाविशेषणें—आपापल्या ठिकाणीं येतात. म्हणजे प्रश्नार्थक सर्वनाम कर्ता, कर्म, करण, इत्यादिकांपैकीं ज्या अर्थानें येत असेल, त्या अर्थास अनुरूप असें त्यास वाक्यांत स्थान मिळतें; आणि प्रश्नार्थक क्रियाविशेषणें क्रियापदापूर्वीं बहुधा त्याचे जवळच येतात. जसें:—कोण आला होता? तूं कोणा मुलाला सांगितलेंस? तूं हें कशानें लिहिलेंस? तो कोठें आहे? तो मुंबईस कधीं येणार? इ०.

६४५. कर्ता व कर्म आणि तत्संबंधाचे शब्द शिवायकरून इतर विभक्त्यन्त किंवा शब्दयोगी अव्ययान्त शब्द वक्त्याचे किंवा लेखकाचे इच्छेप्रमाणें मागेंपुढें परंतु नेहमीं क्रियापदाचे पूर्वीं येतात. जसें:—ही उठाठेव केल्यावांचून तुला चैन पडत नाहीं काय? त्यानें कारणाशिवाय मला शिव्या दिल्या, कारणाशिवाय त्यानें मला शिव्या दिल्या, त्यानें मला कारणाशिवाय शिव्या दिल्या, इ०.

६४६. कोणत्याही स्वरूपाचें किंवा आशयाचें जरी वाक्य असलें, तरी त्यांतील शब्दांचा क्रम मराठींत बहुधा एकच असतो. जसें:—

करणरूपी—माझें पुस्तक घरीं आहे.
अकरणरूपी—माझें पुस्तक घरीं नाहीं.
आज्ञार्थक—माझें पुस्तक घरीं पोंचव.
प्रश्नार्थक—माझें पुस्तक घरीं पोंचवलेंस?
विध्यर्थक—माझें पुस्तक घरीं पोंचविण्यांत यावें.
उद्गारवाची—तुझें पुस्तक घरीं आहे! वा!
संकेतदर्शक--जर तुझें पुस्तक घरीं असेल, तर तूं शाळेंत वाय वाचणार?
आशीर्वाददर्शक—ईश्वर तुमचें कल्याण करो.

६४७. येथपर्यंत सांगितलेल्या स्वाभाविक पदक्रमामध्यें वक्त्याचे व लेखकाचे इच्छेप्रमाणें शिष्ट भाषणांत व लेखांत बरेच फरक झालेले आढळतात. त्यांतील मुख्य तत्त्व म्हटलें म्हणजें असें दिसतें कीं, वाक्यांतील ज्या शब्दावर वक्त्याला किंवा लेखकाला विशेष जोर द्यावयाचा असतो, किंवा जो शब्द श्रोत्यांचे किंवा वाचकांचे नजरेसमोर विशेषेंकरून यावा असें त्यास वाटत असतें, तो शब्द तो बहुधा प्रथम योजितो आणि जो बहुधा अगदीं क्षुल्लक असतो, त्याचा तो अध्याहार करितो. जसें:—मी रामभाऊंकडे गेलों होतों तेव्हां ते घरीं नव्हते, रामभाऊंकडे मी गेलों होतों तेव्हां इ०, त्यानें त्या गाडीवानास चाबकानें मारिलें, त्या गाडीवानाला त्यानें चाबकानें मारिलें, चाबकानें त्याला मारलें म्हणतात, त्यानें गाडीवानाला मारिलें, इ०.

६४८. व्यावहारिक भाषणामध्यें मात्र पदक्रमासंबंधानें पूर्ण स्वातंत्र्य आढळतें. जसें:—काल खूब सोंसाट्याचा वारा सुटला होता, गेला का हो तो, आतां या पोराला करावें तरी काय, करावें तरी काय आतां या पोराला, या पोराला आतां करावें तरी काय, काय तरी करावें बा आतां या पोराला, या पोराला काय तरी करावें आतां, इ०.

---

# प्रकरण २.

--*०*--

## वाक्य-पृथक्करण.

## अध्याय ४.

---

### विषयोपन्यास.

[ वाक्य-पृथक्करण हा विषय वाक्यार्थाचे दृष्टीनें फारच महत्त्वाचा आहे. आपल्या व्याकरणांतील प्रयोगप्रकरण जवळ जवळ या विषयासारखेंच आहे. परंतु त्या प्रकरणांत वाक्यांतील कर्ता, कर्म, आणि क्रियापद, इतक्याच पदांवर आपली सर्व दृष्टि असल्यामुळें त्यांशिवाय इतर पदांचा वाक्यांतील संबंध समजण्यास त्या प्रकरणाचा फारसा उपयोग होऊं नये हें स्वाभाविक आहे. आतां कर्ता,

कर्म व क्रियापद, यांशिवाय इतर शब्द वाक्यदृष्ट्या जरी गौण असले, म्हणजे त्यांची वाक्याचे अस्तित्वास जरी जरूर नसली, अर्थात् जरी त्याचे शिवाय वाक्याची मुख्य इमारत ढांसळली नाहीं, तरी एकंदर अर्थाचे दृष्टीनें त्यांचा कांहींच उपयोग नाहीं असें नाहीं. ज्याप्रमाणें मुख्य घर किंवा बंगला यांस आजूबाजूस पडव्या, सोपे, वरांडे, यांची जरी जरूर नसली, तरी ह्या गोष्टींनीं घरास किंवा बंगल्यास पुरवणी लागून अधिक सोय व शोभा प्राप्त होते; त्याचप्रमाणें कर्ता व क्रियापद व कधीं कधीं कर्ता, कर्म व क्रियापद, इतक्याच गोष्टींनीं जरी वाक्याचा सांगाडा तयार झाला, तरी त्यांच्याशिवाय वाक्यामध्यें जे इतर शब्द येतात, त्यांनीं मूळ वाक्याचा म्हणजे त्यांतील अर्थाचा विस्तार होऊन त्यास पूर्णता व शोभा प्राप्त होते यांत संशय नाहीं. तेव्हां वाक्यांतील अवयवांचे दृष्टीनें या इतर शब्दांचाही विचार झाला पाहिजे हें उघड आहे. अशा दृष्टीनें वाक्याचें पृथक्करण करून त्यांतील भिन्न भिन्न सर्व अवयव निरनिराळे मांडून त्यांचा परस्परसंबंध स्पष्ट करून सांगण्याची पद्धति वाक्यार्थाचे पूर्ण आकलनास विशेष उपकारक असल्यामुळें या आँग्लपद्धतीचा स्वीकार आमच्या व्याकरणानें केला आहे, ही फार समाधाकारक गोष्ट आहे. वाक्यपृथक्करण या विषयाचें थोडेसें दिग्दर्शन कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं आपल्या नवीन मराठी व्याकरणामध्यें, उभयान्वयी अव्ययें, व संयुक्त वाक्यें, यांचे संबंधानें केलेलें आहे. परंतु तें अगदीं त्रोटक असून त्यास त्यांनीं गौण स्थळ दिल्यामुळें तें वाचकांच्या नजरेंत मुळींच भरलें नाहीं; आणि तें तसेंच अलक्षित राहिलें. यानंतर प्रि० गोपाळ गणेश आगरकर, एम्. ए., यांनीं या विषयावर ' वाक्यमीमांसा ' या नांवांचें स्वतंत्र पुस्तक लिहून छापलें. त्यामुळें या विषयास मराठी भाषेमध्यें हवें होतें तें प्राधान्य मिळालें व त्याकडे स्वतंत्रपणें मराठी वाचकांची दृष्टि गेली. तथापि त्या स्वतंत्र पुस्तकानें या विषयाचा व्याकरणांत प्रवेश झाला नाहीं तो नाहींच, आणि या विषयाचा लोकांत विशेष प्रसारही झाला नाहीं. बाकी त्यांनीं त्या पुस्तकांत या विषयाचा शास्त्रीयरीत्या फारच उत्तम ऊहापोह केला आहे ह्यांत संशय नाहीं. तेव्हां हा विषय मराठी भाषेच्या परिचयाचा करून देण्याचें बहुतेक सर्व श्रेय त्यांसच दिलें पाहिजे हें उघड आहे. याच सुमारास प्रि० वामन शिवराम आपटे, एम्. ए., यांनीं हा विषय संस्कृत भाषेस लावून दाखविला. वाक्यपृथक्करणाचे दृष्टीनें संस्कृत वाक्यरचना विशेष सुलभ व सरळ असल्यामुळें त्यांस आगरकरांचे इतका त्रास व मेहनत पडली नाहीं. परंतु मराठी भाषेची वाक्यरचना कांहीं विलक्षण पडल्यामुळें हा अलंकार मराठी भाषेस चढवितांना विशेष कुशलतेची जरूर होती. आणि या कामीं आगरकरांनीं आपल्याकडून होईल तितकी दक्षता ठेवून आपलें काम बरेंच समाधानकारक रीतीनें पार पाडिलें आहे, असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. तथापि वाक्यपृथक्करणाचा मराठी

व्याकरणाशीं जोड जुळवावयाचा असल्यामुळें, ज्याप्रमाणें वाक्यपृथक्करण या आँग्ल विषयास मराठीच्या स्वभावास साजेसें रूप देणें अवश्य होतें, त्याचप्रमाणें ह्या नवीन विषयाची जोड मराठी व्याकरणास नीट लागावी, म्हणून मराठी व्याकरणासही अंशतः नवीन वळण लावणें जरूर होतें. प्रि० आगरकर यांनीं या दोन्ही मुद्यांचा विचार केला आहे. तथापि त्यांचे पुढें वाक्यपृथक्करणाचाच विषय प्राधान्येंकरून असल्यामुळें, म्हणजे मराठी व्याकरणावर ते ग्रंथ लिहीत नसल्यामुळें, त्यांचे वरील दोन मुद्यांपैकीं पहिल्याकडेच विशेष लक्ष असावें व त्यामुळें दुसऱ्याचें विवेचन त्यांचे हातून तात्पुरतें व्हावें, अथवा त्याचें केवळ स्थूलमानानें दिग्दर्शनच व्हावें, ह्यांत आश्चर्य नाहीं. वाक्यपृथक्करणास उपकारक होईल असें व्याकरणास कोणतें व कसें वळण लावावें हें तोंडानें सांगण्यापेक्षां प्रत्यक्ष करून दाखविणेंच आरंभीं अवश्य होतें. परंतु तें त्यांच्या हातून झालें नसल्यामुळें, त्यांचे नंतर जेव्हां वाक्यपृथक्करण व मराठी व्याकरण ह्यांमधील सांधा जोडण्याचें प्रत्यक्ष काम करण्याची वेळ आली, तेव्हां तें अशास्त्रीय, अप्रयोजक, व परप्रत्ययनेयबुद्धीचे हातांत पडल्यामुळें पुन्हां तें काम केवळ ओबडधोबडच होऊन पडलें. दोन लांकडाचा सांधा जोडावयाचा असतां दोहोंसही थोडथोडें छिलून व तासून, सांध्यास योग्य असें रूप द्यावें लागतें; हें साधारण मनुष्यासही समजतें. त्याप्रमाणें मराठी व्याकरण व वाक्यपृथक्करण ह्या दोहोंपैकीं वाक्यपृथक्करणावर अवश्य काम करून त्यास प्रकृतसंधियोग्य असें रूप आगरकरांनीं दिलें. आणि मराठी व्याकरणावरही अशाच प्रकारचें थोडेसें काम झालें असतां या दोहोंचा चांगला जोड जमेल असें त्यांनीं सांगितलें. परंतु हा जोड प्रत्यक्ष जुळविणारांचे अंगीं आगरकरांची योग्यता नसल्यामुळें त्यांनीं जें यथाशक्ति काम केलें, तें असमाधानकारकच होणें अगदीं स्वाभाविक होतें. आणि आपल्या शक्तीबाहेरचें काम स्वीकारून तें जर कोणीं ओबडधोबडपणेंच पार पाडिलें, तर त्याबद्दल त्यास दोष देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आतां त्यानें असलें काम मुळीं आपण होऊन आपल्या शिरावर घेतलें नसतें, तर बरें झालें असतें; हें खरें. परंतु वैद्यकीचा स्वतंत्र धंदा करूं लागलेल्या एखाद्या मिश्रकाची ( compounder कंपाउंडरची ) कष्टसाध्य रोगाशीं गांठ पडली असतां, धाडसानें किंवा अज्ञानानें त्याजवर स्वतंत्र योजना करून अखेरीस यश प्राप्त झालें नाहीं, म्हणजे तो आपल्या ओळखीच्या विद्वान् वैद्यांसच नांवें ठेवण्यास तयार होतो, तेव्हां मात्र असल्या शास्त्रानभिज्ञ चिकित्सक वैदूची व्यक्तिदृष्ट्या कींव करावी कीं लोकहितदृष्ट्या त्यास बहिष्कार घालावा, हें सुज्ञ वाचकांनींच ठरवावें. परंतु असा प्रकार झाला आहे हें खास. 'प्रोफेसर आगरकरांसारख्या इंग्रजी व संस्कृत या भाषांचें व्याकरण पूर्णपणें जाणणाऱ्या गृहस्थांचे हातून ही असली व्याकरणांतली अशास्त्र दुर्व्यवस्था निघूं नये, हें आश्चर्य आहे. त्यांनीं वाक्यमीमांसेवर उत्तम पुस्तक लिहून, केवळ मराठी व्याकरणास

एक नवीन महत्त्वाचें अंग जोडून दिलें; पण त्यांत त्यांनीं या गोष्टीची व्यवस्था करण्याकडे लक्ष पोंचविलें नाहीं. त्यांनीं केवळ जुनी तऱ्हाच अंधपरंपरेनें उचलली आहे.' (कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे व्याकरणावरील निबंधांस जोशी यांनीं आपल्या स्वतःच्या तीन निबंधांची पूरवणी जोडिली आहे. त्यांतील तिसऱ्या निबंधांतील हा उतारा आहे. पृष्ट ३३८ ). हे जोशीबोवांचे उद्गार वाचिले म्हणजे आमच्या वरील म्हणण्याची सत्यता वाचकांचे तेव्हांच ध्यानांत येईल. आमच्या वरील विधानाचें समर्थन करण्यासाठीं एकच परंतु विशेष महत्त्वाचें उदाहरण देतों.

वाक्यपृथक्करणामध्यें उद्देश्य व विधेय ह्या संज्ञा अत्यन्त महत्त्वाच्या आहेत; किंबहुना हेच वाक्याचे दोन मुख्य अवयव होत, ह्यांत संशय नाहीं. बाकीचे सर्व अवयव या दोहोंच्याच पोटांत येतात. तेव्हां वाक्यमीमांसकांची दृष्टि यांच्या व्याख्यांकडे व यांमधील फरकांकडे विशेषेंकरून लागणें योग्य आहे. ज्याविषयीं वक्ता बोलतो, त्यास उद्देश्य म्हणतात आणि उद्देश्याविषयीं तो जें बोलतो त्यास विधेय म्हणतात. उद्देश्य व विधेय ह्यांचा या व्याख्यांबद्दल कोणाचाच मतभेद नाहीं. इंग्रजींत व संस्कृतांत कर्तरि व कर्मणि हे दोन्ही प्रयोग सर्व आख्यातीं सारखे होतात. तेव्हां वाक्यांतील ज्या शब्दाचा क्रियापदावर अधिकार चालतो त्यास, म्हणजे क्रियापदेशास किंवा धातुरूपेशास नेहमीं उद्देश्य म्हणावें, हा नियम त्या भाषांत चालण्यासारखा आहे. इंग्रजींत भावे प्रयोग नाहींच. संस्कृतांत भावे प्रयोग आहे. त्या ठिकाणीं वरील नियम लागू करणें कठिण पडतें. कारण कीं, भावेप्रयोगांत क्रियापदेशच नसतो, तर भावे क्रियापद स्वतंत्र असतें. यामुळें भावे प्रयोग ज्यांत आहे, अशा वाक्यांतील उद्देश्य व विधेय हीं ठरविण्याचा प्रश्न संस्कृतामध्येंहीं बिकट झाला आहे. त्याचे समाधानकारक उत्तर आपटे यांनीं दिलें आहे असें आम्हांस वाटत नाहीं. या मुद्याचा त्यांनीं स्पष्टपणें मुळीं ऊहापोहच केलेला नाहीं. इंग्रजी वाक्यपृथक्करणाची पद्धति संस्कृतांतील बऱ्याच वाक्यांस सहज लागू पडण्यासारखी असल्यामुळें आपटे यांचे पुढें संस्कृतांतील भावेप्रयोगाचा प्रश्नच मुळीं स्पष्टपणें उभा राहिला नसावा. परंतु आगरकरांनीं या प्रश्नाचा ऊहापोह सविस्तर करून, त्याजवर आपलें योग्य मत दिलें आहे. संस्कृतामध्यें ही अडचण फक्त भावेप्रयोगासंबंधानेंच उत्पन्न होतें. परंतु मराठीमध्यें ही अडचण कर्मणि व भावे या दोन्ही प्रयोगांतील वाक्यांसंबंधानें प्राप्त होत असल्यामुळें, तिजकडे दुर्लक्ष करून मराठी वाक्यमीमांसकांचें भागावयाचें नाहीं. यामुळें आगरकरांनीं या विषयावर आपल्या वाक्यमीमांसेंत प्रथमच एक विस्तृत लेख लिहिला आहे. आणि या विषयाचा अर्थदृष्ट्या विचार करून अखेरीस असें ठरविलें आहे कीं, वाक्यांतील उद्देश्य प्रथमान्त असतें, हा इंग्रजीचा व साधारणपणें संस्कृताचा नियम मराठीस लागू करणें शक्य

नाहीं. आगरकरांचा निकाल पुढील उताऱ्यावरून कळेल. 'वाक्यपृथक्करण रूढ व्याकरणास धरून चाललें पाहिजे, व चालेल तितकें बरें. ज्या ठिकाणीं उभयतांत अपरिहार्य तेढ पडेल, त्या ठिकाणीं दोघांनीं दोन वाटा धरिल्या तरी हरकत नाहीं. पण जर तशी स्थिति नसेल, तर एकमेकांनीं एकमेकांच्या सलोख्यानें असावें हेंच योग्य आहे. अशानें व्याकरणापासून वाक्यमीमांसेला वाक्यमीमांसेपासून व्याकरणाला मदत मिळण्याचा व बळकटी येण्याचा संभव आहे. या दृष्टीनें विचार करितां, प्रथमा, तृतीया व चतुर्थी विभक्तीशिवाय इतर विभक्ति उद्देश्यस्थानीं फार वेळ येऊं द्याव्या लागतील असें वाटत नाहीं.' 'यासाठीं पुढील वाक्यपृथक्करणांत प्रस्तुत व्याकरणांस धरून, प्रथमा, तृतीया, किंवा क्वचित् स्थळीं चतुर्थी, या विभक्तींहून इतर विभक्तींत असलेले शब्द बहुशः विधेयक्रियाविशेषणवाचकांसारखे मानिले आहेत, असें दिसून येईल.' परंतु ह्या विद्वान् प्रोफेसरांचा निकाल आमच्या जोशीबोवांस पसंत न पडून, ते उलट त्यांजवरच अंधपरंपरेचा दोष लादीत आहेत.

जोशीबोवांच्या मतें उद्देश्य हें नेहमीं प्रथमा विभक्तींतीलच असलें पाहिजे. कर्मणि प्रयोगांतील क्रियापद कर्माचे तंत्रानें चालतें. आणि इंग्रजीमध्यें दोन्ही प्रयोग सर्वत्र होत असल्यामुळें, क्रियापदेशासच म्हणजे क्रियापदावर ज्याचा अधिकार चालतो त्यासच, सर्वत्र उद्देश्य म्हणणें साजतें. परंतु मराठींतील बऱ्याच सकर्मक धातूंचा लाख्यातीं व वाख्यातीं कर्तरिप्रयोग होणें संभवनीय नसून, बहुधा कर्मणि प्रयोगच होत असल्यामुळें, इंग्रजीचा नियम बेधडक मराठीस लागू करणारांचेच पदरीं अंधत्वाचा दोष येत नाहीं काय? "त्यांनीं घोडे बांधिले,' 'रामानें रावण मारिला,' असल्यां मराठी वाक्यांविषयीं जर असें म्हटलें कीं, यांतील क्रियापदें कर्मानुगामि आहेत, म्हणून हीं कर्माविषयीं विधान करितात, कर्त्याविषयीं करीत नाहींत, सबब कर्मपदांनाच उद्देश्य म्हणावें व कर्तृपदें क्रियाविशेषणें मानावीं, तर ठीक दिसेल काय? असल्या मताचा सर्वत्र स्वीकार होईल काय? व सार्वत्रिक स्वीकाराहूनही विशेष महत्वाची जी गोष्ट कीं,-वाक्यमीमांसेंत खरोखरीच ज्याविषयीं वक्यांत विधान मुख्यत्वेकरून होत असेल तेंच उद्देश्य मानावें,-ती केली असें होईल काय?" आगरकरांनीं ह्या शंका व हे प्रश्न जरी आधींच विचारून ठेविले आहेत, तरी जोशीबोवांनीं 'रामानें रावण मारिला' आणि 'त्यांनीं घोडे बांधिले' या दोन्ही वाक्यांत रावण व घोडे हींच कर्मपदें उद्देश्य मानिलीं आहेत. म्हणजे इंग्रजी व्याकरणांत ज्याप्रमाणें क्रियापदेशास किंवा धातुरूपेशास म्हणजे क्रियापद ज्याच्या तंत्रानें वागत असेल, त्यासच उद्देश्य म्हणावयाचें असा नियम आहे, त्याचप्रमाणें मराठींतही त्यांनीं तोच नियम स्वीकारिला आहे. ह्यामुळें 'रामानें रावण मारिला' आणि 'रामाकडून रावण मारिला गेला, किंवा रामाकडून रावण मारण्यांत आला' या वाक्यांत

जोशीबोवांचें मतें कांहीं एक फरक नाहीं. दोहोंमध्यें त्यांच्या मतें रावणाबद्दलच विधान आहे; आणि म्हणूनच दोहोंमध्यें रावण हेंच उद्देश्य आहे. परंतु जोशीबोवांशिवाय इतर लोकांस या वाक्यांतील अर्थ एकसारखाच दिसत नाहीं. आगरकरांनीं तर साफ सांगितलेंच आहे कीं, 'रामानें रावण मारिला' या वाक्यांत रामाबद्दलच विधान होत असून रावणाबद्दल नाहीं. जोशीबोवांचें मत जरी शाळाखात्यानें मंजूर करून त्याचा प्रसार जारीनें चालविला आहे, तरी तें बऱ्याच लोकांस मान्य नाहीं. दोन वर्षांपूर्वी रा० रा० सखाराम रघुनाथ दांडेकर ह्यांचें एक पत्र विविधज्ञानविस्तार मासिक पुस्तकांत छापलें होतें, त्यावरून आगरकरांनीं आधींच काढून ठेविलेली शंका किती योग्य होती, हें सिद्ध होत आहे. असो. ह्या कर्मणि प्रयोगाच्या संबंधानें जोशीबोवांनीं दिलेलें मतही एकवार ग्राह्य होण्यासारखें आहे, असें म्हटलें तरी त्यांचें भावे प्रयोगाबद्दलचें मात्र मत वाचून हंसावें कीं रडावें हें आम्हांस समजत नाहीं. ते म्हणतातः—भावे प्रयोगांत मुळीं उद्देश्य नसतेंच. कारण कीं, क्रियापद, कर्ता किंवा कर्म किंवा दुसरा कोणताही नियमित शब्द यांचे तंत्रानें वागत नसून केवळ स्वतंत्र असतें. यामुळें, उद्देश्य म्हणजे क्रियापदेश, असें इंग्रजी व्याकरणास अनुसरून एकदां ठरलें, म्हणजे भावेप्रयोगांत उद्देश्य नाहीं, असें म्हणणें ओघासच येतें. आणि तें पतकरण्याचें धाष्टर्य जोशीबोवांनीं दाखविलें आहे; यांत संशय नाहीं. तथापि या म्हणण्याचा वास्तविक काय अर्थ होतो, ह्याचा जोशीबोवांनीं विचार केला आहे असें दिसत नाहीं. 'रामानें रावण मारिला' आणि 'रामानें रावणास मारिलें' या दोन्ही वाक्यांत ज्याबद्दल विधान केलेलें आहे, तें पद आणि जें विधान करण्यांत आलें आहे, तें हीं दोन्ही एकच आहेत; असा साधारणपणें सर्व समंजस लोकांचा समज होईल असें वाटतें. म्हणजे मराठीचे दृष्टीनें या दोन्ही वाक्यांतील उद्देश्यें व विधेयें एकच आहेत, ह्याविषयीं बहुतेक विचारी मनुष्यांचें एकच मत पडेल ह्यांत शंका नाहीं. आतां कर्मणि वाक्यांत रामानें हें उद्देश्य किंवा रावण हें उद्देश्य याबद्दल जरी मतभेद असला, तरी त्यांत जोशीबोवांचे मतें उद्देश्य आहे, ही गोष्ट कांहीं अल्पसमाधानकारक नाहीं. परंतु त्याच्याच जोडीच्या व त्याच्याच अर्थाच्या 'रामानें रावणास मारिलें' या भावे वाक्यांत जेव्हां उद्देश्यच नाहीं, असें जोशीबोवा निक्षून सांगतात, तेव्हां त्यांस काय म्हणावें हें समजत नाहीं. 'रामानें रावणास मारिलें' या वाक्यांत मुळीं कशाबद्दल विधान केलेलेंच नाहीं, असें म्हणण्यासारखें आहे; आणि हें म्हणणें जोशीबोवा तरी शांतपणें स्वीकारण्यास स्वतः तयार होतील कीं नाहीं, याची आम्हांस जबर शंका आहे. कळमळतें, सांजावलें, फावलें, इ० बाह्यतः अकर्तृक क्रियापदांसही कळमळणें, सांजावणें, फावणें, इ० क्रियावाचक नामें आहेत असें समजावें; असें

जे कांहीं लोक म्हणतात, त्यांत कितपत तथ्य आहे हा प्रश्न वेगळा. पण त्यावरून इतकें सिद्ध होतें कीं, वाक्यामध्यें स्पष्ट किंवा अध्याहृत असें उद्देश्य पाहिजेच; उद्देश्याशिवाय वाक्य व्हावयाचेंच नाहीं. म्हणजे कशाविषयीं तरी विधान झालें पाहिजे. 'कांहीं नाहीं' याबद्दल कांहीं बोलतां यावयाचें नाहीं, हें निर्विवाद आहे. यामुळें 'रामानें रावणास मारिलें, अशासारख्या भावे प्रयोगांत उद्देश्य नाहींच, म्हणजे ह्या वाक्यांत कशाबद्दलही विधान केलेलें नाहीं, असें म्हणणें हें स्वतःशीं विसंगत आहे; इतकेंच नव्हे, तर वाक्यत्वविघातक आहे हें उघड आहे. परंतु या ठिकाणीं जोशीबोवांचे वतीनें असें सांगण्यांत येईल कीं, 'रामानें रावण मारिला' या कर्मणि प्रयोगास 'रामानें रावणास मारिलें' असें भावे रूप प्राप्त झाल्यानें यांतील उद्देश्य वास्तविक नष्ट होतें, तरी त्याचें वाक्यत्व नष्ट होत नाहीं. त्यांतील पहिल्या उद्देश्याचे जागीं आतां 'मारिलें' या क्रियेचा भाव ह्यास उद्देश्य मानिलें म्हणजे 'रामानें रावणास मारिलें' ह्याचें वाक्यत्व पूर्वीप्रमाणेंच कायम राहतें. परंतु हें म्हणणें कितपत सर्वसंमत होईल कोण जाणे ! 'रामानें रावणास मारिलें' या वाक्यांत मारणें हा क्रियार्थ उद्देश्य आहे, म्हणजे मारणें ह्या क्रियार्थाबद्दलच विधान केलेलें आहे, असें कोण समंजस मनुष्य कबूल करील तो करो. 'रामानें रावणास मारिलें' असें पुराणांत किंवा कीर्तनांत सांगणाऱ्या पुराणिकाला किंवा हरिदासाला, जोशीबोवांचा एकादा पट्टशिष्य—प्रौढबोधाच्या अध्ययनानें प्रबुद्ध झालेला एकादा प्रौढ—जर असें म्हणूं लागला कीं, "अहो, आपल्या वाक्याचा स्पष्ट खुलासा मी कसा उत्तम प्रकारें करितों पहा ! 'रामानें रावणास मारिलें' या वाक्यांत राम किंवा रावण यांपैकीं कोणाबद्दलही आपण बोललां नाहीं, तर मारणें या क्रियार्थाबद्दलच आपण बोलला आहां. खरें कीं नाहीं !" तर त्यावर वक्ता, पुराणिक, किंवा हरिदास, त्याला 'आपला खुलासा विलक्षणच दिसतो' असें उलट म्हणाला, तर त्यांत कांहीं नवल नाहीं. एवंच 'रामानें रावण मारिला' यांत रावण हें उद्देश्य होय, हें जोशीबोवांचें मत, 'रामानें रावणास मारिलें' या भावे प्रयोगांत उद्देश्यच नाहीं, किंवा फारच झालें तर मारणें हें उद्देश्य होय, ह्या त्यांचे मताचे मानानें पुष्कळच चांगलें असें म्हटलें पाहिजे; हें उघड आहे. एवंच 'ज्याविषयीं वाक्यामध्यें कांहीं विधान करण्यांत येतें, त्यास उद्देश्य म्हणतात.' ह्या उद्देश्याचे लक्षणाचा, वाक्यमीमांसेच्या व्यवहारामध्यें जोशीबोवांनीं कसा चुथडा करून टाकिला आहे तो पहा ! आणि इतकें करूनही ते 'रामानें रावण मारिला' आणि 'रामानें रावणास मारिलें' या कर्मणि व भावे प्रयोगांतील रामानें या तृतीयान्त पदास उद्देश्य ठरविणाऱ्या आगरकरांसच जुन्या तऱ्हेचें अंधपरंपरेनें अवलंबन करणाऱ्या आंधळ्यांचे वर्गांत काढूं पहातात, तेव्हां त्यांस काय म्हणावें ! असो.

आगरकरांनीं या मुद्याचा सविस्तर ऊहापोह केल्यानंतरही जर त्यांस जोशी हे अंध म्हणण्यास तयारच आहेत, आणि त्यांनीं अप्रयोजक किंवा त्याज्य ठरविलेल्या मार्गाचेंच अवलंबन करीत आहेत, तर याविषयीं आणखी ऊहापोह होण्याची जरूर आहे असें दिसतें. जोशीबोवांच्या मताबद्दल आगरकरांनीं प्रथमच आपली असंमति दर्शविली आहे, आणि तो मार्ग ' कोणत्याही विचारी मनुष्यास मान्य होणार नाहीं ' असें साफ म्हटलें आहे. ( वाक्यमीमांसा पृष्ठ ३१ ). हें त्यांचें म्हणणें अनुभवानें खरें ठरलें आहे. रा. रा. दांडेकर हे जोशी यांच्या व्याकरणांवरील पुस्तकांस उद्देशून विविधज्ञानविस्तारांत लिहितात. ' इंग्रजी भाषेंतील वाक्यरचनेची प्रयोगपद्धति वाक्यार्थमीमांसेस पूर्ण अनुकूल आहे. त्या भाषेंत भावेप्रयोग नाहीं. दोनच प्रयोग असून, सकर्मक धातूंवरून इच्छेप्रमाणें तिन्ही काळीं पाहिजे तो प्रयोग करितां येतो; आणि क्रियापद नेहमीं उद्देश्यास अनुसरतें व अर्थातच उद्देश्याची विभक्ति नेहमीं प्रथमा असते. त्यामुळें ते इंग्रजींतील प्रयोग वाक्यार्थमीमांसेस पूर्ण अनुकूल होतात. पण मराठी भाषेंत भावेप्रयोग असल्यामुळें व प्रयोगांचे बाबतींत आणखी अनेक अडचणी असल्यामुळें, मराठी व्याकरणांतील प्रयोगपद्धति वाक्यार्थमीमांसेस तितकी अनुकूल नाहीं. या गोष्टीकडे जावें तितकें लक्ष न गेल्यामुळें सदर्हू पुस्तकांमध्यें वाक्यपृथक्करणाचे बाबतींत माझ्या मतें चुका झाल्या आहेत. ' ( वि० वि० मे १९०९ ). ' या गोष्टीकडे जावें तितकें लक्ष न गेल्यामुळें ' असें जोशीबोवांसंबंधानें दांडेकर म्हणतात. परंतु आगरकरांच्या वाक्यमीमांसेंतील या विषयाचें विवेचन ध्यानांत घेतलें, म्हणजे अनुकूल व प्रतिकूल पुराव्याचें महत्त्व तंतोतंत ठरविणारा एखादा दृश्य धारवाडी कांटा उपलब्ध झाला असता, तर बरें झालें असतें असें म्हणावें लागतें. कारण कीं, त्या कांट्याचे दोन पारड्यांत त्यांचें व आगरकरांचें हीं मतें टाकलीं असतीं, म्हणजे ' काचः काचो मणिर्मणिः ' हें निर्विवाद सिद्ध झालें असतें. परंतु अशा दृश्य कांट्याचे अभावीं अज्ञान व चूक ह्यांचें माप कोणाच्याही पदरीं घालणें कठीणच; आणि त्यांत दुराग्रही व पक्षांध मनुष्याशीं गांठ पडली म्हणजे बोलावयासच नको. दांडेकर ह्यांचे शंकांचें समाधान करितांना जोशीबोवा म्हणतात कीं,:—

" ( ४ ) प्रत्येक वाक्यांत उद्देश्य असलेंच पाहिजे, असा नियम करितां येणार नाहीं. ज्यांत उद्देश्य निराळें दाखविलें नाहीं, अशीं वाक्यें मराठीमध्यें असतात, ही मराठी भाषेची एक विशेष गोष्ट आहे.

( ५ ) क्रियापद हें उद्देश्याशीं जुळलें पाहिजे. क्रियापदाचें लिंग, वचन, आणि पुरुष हीं उद्देश्याचे लिंगवचनपुरुषाप्रमाणें असलीं पाहिजेत.

( ६ ) उद्देश्य हें निरंतर प्रथमा विभक्तींतच असलें पाहिजे, तें इतर कोणत्याही विभक्तींत असूं शकणार नाहीं."

दांडेकरांस जोशी यांनीं जें उत्तर दिलें आहे, त्यांतील मुद्दे जोशी यांनींच स्पष्ट काढून दिले आहेत. ते सात आहेत. पहिले तीन व शेवटचा हे येथें महत्त्वाचे नसल्यामुळें गाळले आहेत. जोशी यांचीं वरील विधानें कशीं अशास्त्रीय, अनिर्बंध, अप्रमाण व धृष्ट आहेत, हें तज्ज्ञांस स्पष्ट करून दाखविण्याची जरूर नाहीं. तेव्हां त्यांच्या मतांचें सविस्तर खंडन करीत न बसतां, योग्य रचना करण्यासच लागावें हें चांगलें. ह्या कामासाठीं प्रथम वाक्यपृथक्करणासंबंधानें मुख्य मुख्य कल्पनांचें योग्य स्पष्टीकरण करणें जरूर आहे.

वाक्याशीं जसा व्याकरणाचा तसा न्यायशास्त्राचाही निकट संबंध आहे. व्याकरणाचा मुख्य विषय वाक्य आहे; तसा न्यायशास्त्राचा मुख्य विषय मात्र वाक्य नव्हे. न्यायशास्त्राचा मुख्य विषय अनुमान होय. परंतु वाक्याचे स्पष्टीकरणासाठीं ज्याप्रमाणें व्याकरणामध्यें वर्णविचार व शब्दविचार हीं दोन प्रकरणें प्रथम येतात, व नंतर वाक्यविचार हें मुख्य प्रकरण येतें, त्याप्रमाणें न्यायशास्त्रांतील अनुमानप्रकरणाचे पूर्वीं पदें व वाक्य ह्यांचा विचार प्रथम येतो. वाक्यपृथक्करण हा विषय मूळ न्यायशास्त्रापासूनच आलेला असल्यामुळें प्रथम न्यायशास्त्राचे दृष्टीनें व पदें वाक्यें ह्यांचें थोडक्यांत दिग्दर्शन करितों. ( या विषयाचे सविस्तर विवेचनासाठीं जिज्ञासूंनीं प्रस्तुत लेखकानें लिहिलेलें न्यायशास्त्रावरील निगमन हें पुस्तक, किंवा न्यायशास्त्रावरील दुसरें एखादें पुस्तक पहावें. )

व्याकरणाचे दृष्टीनें वाक्य हें मराठींत एकापासून अनेक शब्दांचें होऊं शकतें. ' उजाडलें ' ह्या एकशब्दात्मक वाक्यापासून तों पांच पांच दहा दहा ओळींचीं व कधीं कधीं एकेक पृष्ठभर लांबणारींही वाक्यें सांपडूं शकतात. परंतु न्यायशास्त्राचे दृष्टीनें वाक्य म्हटलें कीं, त्यांत फक्त तीनच गोष्टी असावयाच्या दोन पदें आणि एक विधानचिह्न. त्या दोन पदांस उद्देश्य व विधेय असें म्हणतात आणि विधानाचिह्न संयोजक " नांव आहे. म्हणजे न्यायशास्त्राचे दृष्टीनें प्रत्येक वाक्यांत एक उद्देश्य एक विधेय आणि एक संयोजक, अशा नेहमीं तीन आणि तीनच गोष्टी असतात; तिहींपेक्षां एकही कमी चालावयाची नाहीं किंवा तिहींपेक्षां एकही अधिक खपावयाची नाहीं. आणि प्रत्येक वाक्यांत उद्देश्य व विधेय हीं एकमेकांशीं जुळतात किंवा नाहीं म्हणजेच त्यांमधील संगति किंवा विसंगति, संवाद किंवा विसंवाद, याबद्दल बिधान केलेलें असतें; आणि उद्देश्य, व विधेय यांमधील संवादाचें किंवा त्याच्या अभावाचें विधान संयोजक दाखवितें; म्हणूनच त्यास विधानचिह्न असेंही म्हणतात. कोणतेंही अत्यन्त लहान किंवा अत्यन्त मोठें वाक्य घ्या, त्यांत उद्देश्य, विधेय व संयोजक, ह्या गोष्टी असल्याच पाहिजेत. आणि या तीन गोष्टी नेहमींच्या भाषणांतील व लेखनांतील

वाक्यांत पुष्कळ वेळां भिन्न भिन्न किंवा स्पष्ट दिसत नसल्यामुळें भाषेंतील प्रचलित वाक्यांत न्यायशास्त्रदृष्ट्या योग्य स्वरूप कसें द्यावें, हा एक न्यायशास्त्रामध्यें महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न होतो हें तज्ञांस सांगावयास नकोच. ज्या कशाविषयीं विधान केलेलें असतें त्यास उद्देश म्हणतात, उद्देश्याविषयीं जें कांहीं विधान करितात त्यास विधेय म्हणतात; आणि विधानद्योतक चिह्नास संयोजक म्हणतात. ह्या तिन्ही गोष्टी न्यायशास्त्रशुद्ध वाक्यामध्यें अगदीं स्पष्ट मांडाव्या लागतात. 'सोन्याचे दागिनें करितात' या वाक्यांत व्याकरणदृष्ट्या लोक हा अध्याहृत कर्ता (सोन्याचे) दागिने हें कर्म, आणि करितात हें क्रियापद, सकर्मक कर्तरि प्रयोग. आतां याच वाक्याकडे वाक्यपृथक्करणाचे प्रचलित व सर्वसंमत पद्धतीप्रमाणें पहा. लोक हें अध्याहृत उद्देश्य, करितात, हें विधेय आणि सोन्याचे दागिनें हें विधयपूरक होय. ह्या पृथक्करणासंबंधानें कोणाचाच वाद नाहीं. आतां न्यायशास्त्राचे दृष्टीनें या वाक्याकडे पहा. उद्देश्य, विधेय, व संयोजक, या गोष्टी प्रस्तुत वाक्यांत स्पष्ट नाहींत; तेव्हां न्यायशास्त्राचे दृष्टीनें पहिला प्रश्न उत्पन्न होतो तो असा. या वाक्यांत कशाबद्दल विधान केलेलें आहे; म्हणजे वक्ता कोणत्या गोष्टीविषयीं म्हणजे कशास उद्देशून बोलतो आहे. अर्थात् या वाक्यांतील उद्देश्य काय? या प्रश्नांचें उत्तर जर हिंदु लोक असें आलें, तर ह्या वाक्यांतील उद्देश्य हिंदु लोक हें होय. संयोजक हें नेहमीं आहे किंवा नाहीं यांचें वर्तमानकाळाचें रूप असतें असा सामान्य नियम आहे. तेव्हां हिंदु लोक हें उद्देश्य व आहेत हें संयोजक या दोन गोष्टी ठरल्या; ह्यावरून वरील वाक्यांतील तिसरी गोष्ट 'विधेय' हिचा शोध लावावयाचा. ती 'सोन्याचे दागिने करणारे' ही होय, असें दिसतें. यावरून न्यायशास्त्रदृष्ट्या वरील वाक्य मांडून दाखवावयाचें असतां त्यास 'हिंदु लोक सोन्याचे दागिने करणारे आहेत' हें किंवा अशासारखें स्वरूप प्राप्त होईल. त्यांत हिंदु लोक हें उद्देश्य, सोन्याचे दागिने करणारे हें विधेय आणि आहेत हें संयोजक होय. आतां वक्ता जर असें म्हणेल कीं हिंदुलोक किंवा लोक या संबंधानें बोलण्याचा माझा उद्देश नाहीं; ह्यामुळेंच मी या वाक्यामध्यें त्यांपैकीं कोणाचाच स्पष्ट उल्लेख केला नाहीं; तर माझ्या मनांत केवळ सोन्याबद्दलच मुख्यत्वेंकरून बोलावयाचें आहे, तर त्याचें म्हणणें 'सोन्याचे दागिने करितात' या वाक्याचे रचनेच्या व अर्थाच्या दृष्टीनें रास्त आहे, असे कोण समंजस मनुष्य कबूल करणार नाहीं? वक्त्याचा जर असा आशय असेल, तर त्या आशयास अनुरूप असें प्रस्तुत वाक्यास न्यायशास्त्रदृष्ट्या भिन्न स्वरूप प्राप्त होतें. कारण कीं, ह्या अर्थानें सोनें हें उद्देश्य व आहे हें संयोजक होय; आणि दागिन्यांच्या कामीं उपयोगी पडणारा एक पदार्थ हें किंवा अशासारखें विधेय होय; तेव्हां 'सोनें दागिन्यांच्या कामीं उपयोगी पडणारा एक पदार्थ आहे' हें किंवा अशासारखें वरील वाक्यास न्यायशास्त्राचे दृष्टीनें योग्य असें

स्वरूप प्राप्त होतें. असो. या विषयाचा सविस्तर खुलासा करण्याचें हें स्थळ नव्हे, तथापि हें एक उदाहरण देऊन त्याचें व्याकरण, वाक्यपृथक्करण, आणि न्यायशास्त्र, ह्या तीन दृष्टींनीं कसें कसें स्वरूप बदलतें हें जें दाखविलें, त्यावरून पुढील गोष्टी वाचकांचे तेव्हांच नजरेस येतील.

उद्देष्य व विधेय या मूळ न्यायशास्त्रांतील पारिभाषिक संज्ञा आहेत. उद्देष्य व विधेय हीं पदें म्हणजे एक एक शब्द नव्हे. एकशब्दात्मक उद्देश्य व एकशब्दात्मक विधेय संभवनीय आहेत. तथापि तीं अनेकशब्दात्मकही असूं शकतात. उद्देश्य म्हणजे कर्ता नव्हे; आणि विधेय म्हणजे क्रियापद नव्हे. 'सोन्याचे दागिने करितात' या वाक्यांत जर सोन्यासंबंधानें बिधान करण्याचा वक्त्याचा उद्देश असेल तर सोनें हाच शब्द न्यायशास्त्रदृष्ट्या उद्देश्य ठरतो. करितात या क्रियापदाचा लोक हा अध्याहृत कर्ता कधीं कधीं न्यायशास्त्रदृष्ट्याही उद्देश्य होऊं शकेल यांत संशय नाहीं. तथापि वक्त्याचा जरी विशेषेंकरून सोन्याबद्दल विधान करण्याचा उद्देश असला, तरी लोक हा व्याकरणांतील अध्याहृत कर्ता न्यायशास्त्रदृष्ट्याही नेहमीं उद्देश्य होय, असें जर कोणी दुराग्रहानें म्हणूं लागला, तर त्यास न्यायशास्त्राचा ओनामा शिकण्यासाठीं प्रथम उपदेश केला पाहिजे हें उघड आहे. एवंच, वाक्यांत व्याकारणदृष्ट्या जो कर्ता असतो, तो न्यायशास्त्रदृष्ट्या उद्देश्य होईल किंवा होणार नाहीं; अर्थात् कर्ता व उद्देश हे शब्द समानार्थक नाहींत. त्याचप्रमाणें क्रियापद व विधेय हे शब्दही समानार्थक नाहींत. कर्म हें न्यायशास्त्राचे दृष्टीनें वाक्यांतील स्वतंत्र पदच नव्हे. त्याचा न्यायशास्त्रदृष्ट्या बहुधा विधेयांत अन्तर्भाव होईल. परंतु वक्त्याचे दृष्टीनें जर कर्माविषयींच मुख्यत्वेंकरून विधान होत असेल, तर न्यायशास्त्रदृष्ट्या त्यासच उद्देश्य करावें लागेल. तसेंच 'परवांचे दंग्यांत रामाला बराच मार बसला' या वाक्यांत वक्ता रामाविषयीं विधान करीत आहे. हें उघड आहे. यामुळें या वाक्यांत न्यायशास्त्रदृष्ट्या रामा हेंच उद्देश होय. प्रचलित भाषेंतील वाक्यांतला वाटेल त्या विभक्तींतील शब्द न्यायशास्त्राचे दृष्टीनें उद्देश्य होऊं शकतो. जेव्हां व्याकरणदृष्ट्या आहे, नाहीं, अशा प्रकारचेंच क्रियापद असेल तेव्हां तेंच संयोजक होईल. एरव्हीं क्रियापदामध्यें बहुधा विधेय व संयोजक यांचा मिलाफ झालेला असतो. म्हणजे संयोजक हें भाषेंतील नेहमींच्या वाक्यांत स्वतंत्रपणें आलेलें फारच क्वचित् आढळतें. अशाप्रकारें न्यायशास्त्र व व्याकरण यांचे दृष्टीमध्यें बराच फरक आहे. व्याकरणांतील प्रयोगप्रकरण हें कर्ता, कर्म व क्रियापद, ह्यांचे रूपांतील संवादावर उभारिलेलें आहे. न्यायशास्त्रांत वाक्याचा विचार अर्थदृष्टीचा असून तो उद्देश्य व विधेय या वस्तूंतील संवादावार अथवा विसंवादावर उभारिलेला आहे. कर्ता, कर्म, आणि क्रियापद, यांजकडे दृष्टी देऊन व्याकरणदृष्ट्या वाक्यांतील प्रयाग ठरविला, तरी वाक्यांतील अर्थांचें पूर्ण आक-

लन होण्यास केवळ प्रयोगज्ञान पुरेसें होत नाहीं. यामुळें त्यास न्यायशास्त्राचे दृष्टीची जोड लाविली असतां चांगलें, असें वैयाकरणांस वाटूं लागल्यामुळें वाक्यपृथक्करण अस्तित्वांत आलें. परंतु वर दाखविल्याप्रमाणें व्याकरणाची दृष्टि केवळ शब्द व त्यांचीं रूपें यांजवर असल्यामुळें आणि न्यायशास्त्राची दृष्टि उद्देश्य व विधेय या पदांवर असल्यामुळें व्याकरण व न्यायशास्त्र यांमध्यें कांहीं तडजोड करून त्यांचा मिलाफ करणें भाग पडलें. प्रचारांतील प्रत्येक वाक्यास न्यायशास्त्राचे दृष्टीनें योग्य स्वरूप द्यावें लागतें. असें कांहीं व्याकरणांत करितां येत नाहीं. तेव्हां प्रचलित भाषेतील वाक्यांचें स्वरूप आहे तसेंच कायम ठेवून त्यांस न्यायशास्त्रांतील उद्देश्य व विधेय हा मुख्य भेद होतां होईल तितका लागू करण्यापासून कांहीं फायदा आहे कीं काय, अशा विचारानें व्याकरणांतील वाक्यपृथक्करण अस्तित्वांत आलें. व्याकरण व न्यायशास्त्र यांमधील जें अंतर वर स्पष्ट करून सांगितलें आहे, म्हणजे यांमध्यें जो विरोध दिसतो म्हणून वर सांगितलें तो विरोध होतां होईल तितका मिटून त्यांमध्यें जी तडजोड करण्यांत येते तिचेंच नांव वाक्यपृथक्करण होय. अर्थात् वाक्यपृथक्करणामध्यें केवळ व्याकरणाचेच तंत्रानें चालतां येत नाहीं, किंवा केवळ न्यायशास्त्राचेच तंत्रानें चालतां येत नाहीं. म्हणून त्यांतील विरोध म्हणजे अंतर मिटावयास पाहिजे असल्यास, व्याकरण व न्यायशास्त्र या दोन्ही पक्षांनीं आपआपल्या वास्तविक उच्चस्थानापासून खालीं येऊन एकमेकांस भेटण्यासाठीं दोन पावलें आपण होऊन एकमेकांकडे गेलें पाहिजे; तरच त्यांचें सख्य होणार. अशा प्रकारें व्याकरण व न्यायशास्त्र आपआपलें स्थान सोडून ज्या मधल्या प्रांतीं हातांत हात घालतात, त्या स्थानास वाक्यपृथक्करण असें म्हणतात. तथापि ही भेट व्याकरणाचेच फायद्यासाठीं करावयाची असल्यामुळें न्यायशास्त्राच्याच बाजूनें बहुतेक सईल सोडावयाचें आहे व तसें झाल्यानेंच न्यायशास्त्राचा फायदा व्याकरणास मिळणार आहे. तेव्हां आतां ह्या तडजोडीचें साधारण स्वरूप दाखविलें, म्हणजे वरील म्हणण्याची सत्यता वाचकांस पटल्यावाचून रहाणार नाहीं.

न्यायशास्त्राचे दृष्टीनें उद्देश्य, विधेय व संयोजक या तीन गोष्टी वाक्यांत असल्याच पाहिजेत. परंतु संयोजक हें साधारण भाषेतील वाक्यांत बहुधा विधेयांत मिसळलेलें असल्यामुळें तें त्यांतून अलग करून भिन्नपणें सांगण्याची जरूर वाक्यपृथक्करणांत राहिली नाहीं. त्यामुळें वाक्यपृथक्करणाचे दृष्टीनें वाक्यामध्यें दोनच गोष्टी कायत्या मुख्य होत; उद्देश्य आणि विधेय. दुसरें असें कीं, न्यायशास्त्राचे दृष्टीनें ज्यास उद्देश्य म्हणावयाचें तें कोणत्याही विभक्तींत असलें तरी चालतें हें खरें. तरी उद्देश्य व विधेय हीं अलग घेऊन जेव्हां त्यांस संयोजकानें वाक्यामध्यें जोडण्यांत येतें, तेव्हां उद्देश्य हें व्याकरणदृष्ट्या संयो-

जकाचे कर्तृस्थानीं येतें. आणि संयोजक हें जरी नेहमीं क्रियापद असतें, तरी तें ठराविक असल्यामुळें आणि साधारण वाक्यांतील क्रियापदांत तें मिळून गेलेलें असल्यामुळें, साधारण वाक्यांतील क्रियापदाच्या कर्त्यास उद्देश्य म्हणण्यास हरकत नाहीं असें व्याकरणदृष्ट्या दिसतें. परंतु जेव्हां कर्माविषयीं विशेषेंकरून विधान करण्यांत येतें आणि त्यामुळें कर्मणिप्रयोग करून कर्त्याला गौणत्व देण्यांत येतें म्हणजे क्रियापद कर्माचे तंत्रानें चालतें, तेव्हां कर्त्याला उद्देश्य म्हणतां येत नाहीं. यामुळें साधारणपणें कर्तरि प्रयोगांतील कर्त्यास आणि कर्मणि प्रयोगांतील कर्मास न्यायशास्त्राचे दृष्टीनें उद्देश्य म्हणण्यास कांहीं हरकत नसावी, असें इंग्रजींतील वाक्यपृथक्करणांत ठरविण्यांत आलें. इंग्रजीमध्यें कर्तरि व कर्मणि हे दोन्ही प्रयोग अप्रतिहतपणें सर्व आख्यातीं सारखे होतात, तेव्हां इंग्रजी व्याकरणाचे दृष्टीनें केलेली ही व्यवस्था न्यायशात्रास पसंत पडावी यांत नवल नाहीं.

याप्रमाणें न्यायशास्त्रांतील संयोजकास फांटा देऊन आणि बोलणाराचा उद्देश वास्तविक कोणत्याही पदार्थाबद्दल बोलावयाचा असो, म्हणजे न्यायशास्त्रदृष्ट्या वास्तविक उद्देश्य कांहींही असो, इंग्रजी भाषेंतील कर्तरि प्रयोगांतील कर्त्यास व कर्मणि प्रयोगांतील कर्मास उद्देश्य म्हणावयाचें आणि बाकीचें सारें विधेय समजावयाचें अशी व्याकरणास न्यायशास्त्रानें सवलत दिली; आणि व्याकरणानें न्यायशास्त्राचा आपणावरील अंमल कबूल केला. व्याकरण व न्यायशास्त्र यांच्यामधील या तडजोडीस वाक्यपृथक्करण असें म्हणतात; किंवा या अटींवरच न्यायशास्त्राचा व्याकरणांत प्रवेश होऊन, त्यास वाक्यपृथक्करण हें नांव मिळालें असें म्हणावें बरें. याप्रमाणें उद्देश व विधेय ह्यांमधील न्यायशास्त्रांतला मुख्य भेद थोड्याशा रूपांतरानें व्याकरणानें मान्य करून, त्यांचे पोटीं व्याकरणास योग्य दिसणारे निरनिराळे भेद मानून, एकंदर वाक्यपृथक्करणाची पद्धति सुरू केली.

या तडजोडीचें इंग्रजी व्याकरणांतीलच स्वरूप वर देण्याचें कारण असें कीं, वाक्यपृथक्करणाची पद्धति आपण इंग्रजीपासून उचलीत आहों. तेव्हां प्रथम ती पद्धति कोणत्या तत्त्वांस धरून कशी अंमलांत आली, हें आपण प्रथम समजून घेतलें असतां, ती मराठी व्याकरणास कशी लागू करावी हें आपणास चांगल्या प्रकारें समजेल. असो. म्हणून आतां याच तत्वांस धरून इंग्रजी व मराठी वाक्यरचनेच्या तुलनेनें मराठी वाक्यपृथक्करणाची पद्धति कशी ठरविणें स्वाभाविक व योग्य आहे याचा आपण विचार करूं.

'तो लिहितो, बसतो, जाईल, जावो' इ० ज्या कर्तरि प्रयोगांतील कर्त्याबद्दल कांहीं तरी विधान करण्याचा वक्त्याचा किंवा लेखकाचा उद्देश दिसतो, त्या कर्तरि प्रयोगांतील कर्त्यास उद्देश्य म्हणणें रास्तच आहे. परंतु 'सोन्याचे दागिने करितात,' 'तुझी माझ्याशीं गांठ आहे,' 'असें करण्यापासून तुला काय फायदा

आहे,' 'त्याच्या हातून असें कधींच व्हावयाचें नाहीं,' 'त्याच्या जिवावरचा प्रसंग टळला,' 'ह्या कामीं तुझ्यावर माझा विश्वास नाहीं, इ० वाक्यांत लोक (अध्याहृत), गांठ, फायदा, असें, प्रसंग, व विश्वास, हे अनुक्रमें कर्ते असून कर्तरिप्रयोग आहे. परंतु या वाक्यांत वक्त्याचा यांजबद्दलच बोलण्याचा उद्देश आहे, असें कोणी विचारी मनुष्य ह्मणेल असें वाटत नाहीं. अमुक एका वाक्यांत वास्तविक उद्देश्य काय, ह्मणजे वास्तविक कशाविषयीं वक्ता बोलत आहे, हें निश्चयानें सांगणें एका वक्त्याशिवाय दूरापास्तच आहे. यामुळें या प्रश्नासंबंधानें निरनिराळीं मतें पडणें साहजिक आहे. तथापि वाक्यौघास अनुसरून ह्या प्रश्नाचा साधारणपणें निर्णय करण्यास हरकत नाहीं. 'सोन्याचे दागिने करितात,' या वाक्यांतील कर्ता मुळींच अध्याहृत असल्यामुळें, या वाक्यांत सोन्याबद्दलच विधान करण्याचा वक्त्याचा कल दिसतो. 'तुझी माझ्याशीं गांठ आहे' या वाक्यांत गांठ शब्द कर्ता होय; तथापि वास्तविक उद्देश गांठ नव्हे यांत संशय नाहीं. या वाक्यांतील वास्तविक उद्देश्या-बद्दल मतभेद होण्याचा संभव आहे. कोणी ह्मणेल 'मी' कोणी म्हणेल 'तूं' तरी इतकें खरें कीं, व्याकरणदृष्टीचा कर्ता कांहीं या वाक्यांतील उद्देश नाहीं. 'असें करण्यापासून तुला काय फायदा आहे' या वाक्यांतही व्याकरणदृष्ट्या असणारा फायदा हा कर्ता वास्तविक उद्देश्य नसून 'असें करणें' किंवा 'तूं' ह्यांपैकीं एक वास्तविक उद्देश होऊं शकेल. 'त्याच्या हातून असें कधींच व्हावयाचें नाहीं,' या वाक्यांत 'असें' हा कर्ता कदाचित् वास्तविक उद्देश्य असण्याचा संभव आहे; आणि कदाचित् 'तो' हा उद्देश्य असण्याचा संभव आहे. तसेंच 'त्याच्या जिवावरचा प्रसंग टळला,' या वाक्यांत 'प्रसंग' हा कर्ता वास्तविक उद्देश्य नसून 'तो' वास्तविक उद्देश्य होय हें उघड आहे. या उदाहरणांवरून वाचकांस असें स्पष्ट कळून येईल कीं, कर्तरि प्रयोगांतील कर्ता नेहमींच वास्तविक उद्देश्य असतो असा नियम नाहीं. परंतु वास्तविक उद्देश्याचा प्रश्न बिकट असून त्याज-बद्दल मतभेद असण्याचा संभव आहे. न्यायशास्त्रासही ही गोष्ट मान्य आहे. परंतु त्याबद्दल न्यायशास्त्राचें ह्मणणें इतकेंच कीं, तुमच्या मतें ज्याबद्दल विधान करण्याचा वक्त्याचा उद्देश असेल, त्यासच उद्देश्य ह्मणून वाक्यास न्यायशास्त्र संमत असें रूप द्या ह्मणजे झालें. परंतु या ठिकाणीं ज्याप्रमाणें प्रचलित वाक्यस्वरू-पाचा स्वीकार न करितां, त्यास स्वसंमत रूप देण्यास न्यायशास्त्र तयार होतें तसें व्याकरणास करितां येत नाहीं. कारण कीं न्यायशास्त्राचा मुख्य विषय प्रचलित वाक्य नसून अनुमान आहे, आणि व्याकरणाचा मुख्य विषयच मुळीं प्रचलित वाक्य होय. ह्यामुळें प्रचलित वाक्य जसें असेल तसेंच घेऊन चालणें व्याकरणास प्राप्त आहे. न्यानशास्त्रदृष्ट्या वाक्यांतीत वास्तविक उद्देशासच प्राधान्य दिलें पाहिजे. व्याकरणदृष्ट्या कर्तरिप्रयोगांतील कर्त्यासच प्राधान्य आहे हें उघड आहे. आणि पूर्वीं सांगितल्याप्रमाणें खऱ्या उद्देश्यास प्राधान्य देऊन वाक्यास

न्यायशास्त्रसंमत स्वरूप दिलें असतां, त्या वाक्यांत उद्देश्य कर्तृस्थानीं येतें. या मुळें कर्तरि प्रयोगांत कांहीं स्थळीं जरी वास्तविक उद्देश कर्तृव्यतिरिक्त असलें, तरी व्याकरणदृष्ट्या कर्त्यासच प्राधान्य असल्यामुळें त्यासच वाक्यपृथक्करणांत उद्देश्य समजण्यास हरकत नाहीं; असा सोईसाठीं साधारण नियम करण्यांत आला. याचें आणखी एक कारण असें दिसतें कीं, संयोजकास फांटा मिळून क्रियापदासच प्राधान्येकरून विधेय ह्मणावयाचें असल्यामुळें तें ज्याच्या तंत्रानें चालतें, ह्मणजे त्याच्यावर ज्याचा अधिकार चालतो, त्या कर्तरिप्रयोगांतील कर्त्यास एकवार उद्देश्य म्हटल्यास तें अगदींच गैर नाहीं.

ह्याच तत्वास अनुसरून इंग्रजींतील कर्मणि प्रयोगांतील कर्मास एकजात उद्देश्य ह्मणावयाचें ठरलें. परंतु मराठींतील कर्मणि प्रयोगाची गोष्ट सर्वस्वी इंग्रजींतील कर्मणि प्रयोगासारखी नाहीं, हें एक; आणि मराठीमध्यें असणारा भावे प्रयोग तर इंग्रजींत मुदलीच नाहीं, यामुळें या प्रयोगासंबंधानें इंग्रजी व्यवस्था जशीच्या तशी उचलणें प्रशस्त नाहीं. मराठी वाक्यरचनाच जर प्रस्तुत स्थळीं इंग्रजी वाक्यरचनेहून भिन्न आहे, तर दोघींस एकच नियम कसा लागू करावा! ज्याप्रमाणें शरीरप्रकृतीस अनुसरून औषधयोजना करणें हें विद्वान व कुशल वैद्याचें काम आहे, आणि अमुक रोगावर अमुक औषध इतकेंच ज्ञान असल्यामुळें, एकाच प्रकारच्या सर्व रोग्यांस स्थूलदृष्टि नामधारी मिश्रक वैद्यबोवांप्रमाणें एकच ठराविक औषध देणें केवळ मूर्खपणाचें होय; त्याचप्रमाणें इंग्रजी व मराठी या भाषांतील वाक्यरचनेचा भेद ध्यानांत न आणितां, इंग्रजींतील वाक्यपृथक्करणाची पद्धति जशीच्या तशी मराठी भाषेस सर्वत्र लागू करण्यास तयार होणें, हेंही केवळ स्थूल दृष्टीसच शोभण्यासारखें आहे. तेव्हां आतां मराठींतील कर्मणि प्रयोगाची व भावी प्रयोगाची वाक्यपृथक्करणाचे दृष्टीनें कशी व्यवस्था करणें योग्य आहे या मुद्याकडे वळूं.

मराठीमधील कर्मणि प्रयोग मुख्यत्वेंकरून दोन प्रकारचा आहे. प्रधानकर्तृक कर्मणि आणि गौणकर्तृक कर्मणि, हें या ग्रंथांतील प्रयोगविवेचनावरून वाचकांस माहीत झालेंच असेल. या दोन भेदांपैकीं प्रधानकर्तृक कर्मणि हा प्रयोग, ज्या ज्या जागीं सकर्मक कर्तरि प्रयोग मराठी भाषेच्या स्वभावास अनुसरून होत नाहीं, त्याच येत असल्यामुळें, तो एका प्रकारचा वास्तविक कर्तरिप्रयोगच होय; हें या ग्रंथांत प्रयोगप्रकरणीं सविस्तर दाखविलें असल्यामुळें, त्याच जागीं येथें पुनरुक्ति करण्याची जरूरी नाहीं. म्हणजे प्रधानकर्तृक कर्मणि हा वस्तुतः कर्तरि आणि गौणकर्तृक कर्मणि हाच वस्तुतः कर्मणि असल्यामुळें प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोगांत वाक्यपृथक्करणाचे दृष्टीनें कर्तरि प्रयोगांतल्याप्रमाणें कर्त्यासच उद्देश्य म्हणणें उचित होय. यावरून उद्देश्य हें नेहमीं प्रथमा विभक्तींतच असलें पाहिजे, हा इंग्रजीचा नियम मराठींतील कर्मणि

प्रयोगास सरसकट लागू करणें कसें चुकीचें आहे, हें तेव्हांच स्पष्ट समजतें. मराठीमध्यें जर संस्कृतांतल्याप्रमाणें वेषधारी कर्मणि पण वस्तुतः कर्तरि असा प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोग नसता, आणि केवळ गौणकर्तृक कर्मणि म्हणजेच वस्तुतः कर्मणि, एवढाच जर कर्मणि प्रयोगाचा मासला असतां तर इंग्रजी नियम मराठीसही लागू करण्यास हरकत नव्हती. परंतु मराठींतील कर्मणि प्रयोगाच्या या दोन प्रकारांतील सूक्ष्म अर्थभेद वाक्यपृथक्करणाच्या अर्थदृष्टीनें महत्त्वाचा आहे, ही गोष्ट जोशीबोवांचे लक्षांत न आल्यामुळें, आणि आगरकरांनीं दाखवून दिली तरी ती त्यांस न पटल्यामुळें त्यांनीं इंग्रजींतीलच नियम हट्टानें मराठीस लागू केला आहे. तेव्हां त्यांचा अज्ञानमूलक अविचारी स्वमताभिमान आमच्या वरील विवेचनावरून दूर होईल, अशी आम्हांस मुदलींच आशा नाहीं. तथापि जोशीबोवांचें किंवा कोणाच्याही व्यक्तिमताचे पेक्षां प्रस्तुत विषयांतील ग्राह्याग्राह्यतेची किंवा युक्तायुक्ततेची चाड सुज्ञ वाचकांस अधिक असल्यामुळें, त्यांसच उद्देशून आम्हीं विद्वद्वर्य मि० आगरकर यांच्या मताचें जोशीबोवांचे विरुद्ध समर्थन करण्याचा खटाटोप केला आहे. या विषयासंबंधानें येथें वाचकांनीं त्यांचें ‘ वाक्यमीमांसा ’ हें पुस्तक अवश्य पहावें, अशी त्यांस आमची शिफारस आहे.

भावे प्रयोग इंग्रजींत नाहींच. संस्कृतांत फक्त अकर्मक धातूंचा भावेप्रयोग आढळतो. मराठींतील भावे प्रयोगाची मर्यादा विस्तृत होऊन सकर्मक धातूंचाही एक प्रकारचा भावेप्रयोग अस्तित्वांत आला आहे. परंतु संस्कृतांत वाक्यपृथक्करणाची पद्धति नसल्यामुळें आणि प्रि० आपटे यांनी जरी ती संस्कृत भाषेस लावून दाखविली आहे, तरी भावेप्रयोगाचा प्रश्न हातीं घेऊन त्याजविषयींचा स्पष्ट निर्णय त्यांनीं कांहींच न दिल्यामुळें, वाक्यपृथक्करणाचे दृष्टीनें भावेप्रयोगाची व्यवस्था काय करावी, हा प्रश्न आपणांस मराठी कर्मणि प्रयोगाच्या वरील तत्त्वास धरूनच सोडविला पाहिजे. आणि कर्मणि प्रयोगांतील प्रधानकर्तृक कर्मणि व गौणकर्तृक कर्मणि ( म्हणजे वास्तविक कर्मणि ) हा आमचा भेद ज्याप्रमाणें या प्रश्नाचे निर्णयास उपयोगी पडला आहे, त्याचप्रमाणें प्रधानकर्तृक भावे व गौणकर्तृक भावे ह्यांमधील आमचा भेद वाक्यपृथक्करणास फारच उपयोगी आहे. प्रधानकर्तृक भावे हा प्रयोग प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोगाप्रमाणेंच निवळ वेषधारी भावे पण वस्तुतः कर्तरि असून, ज्या ठिकाणीं मराठी भाषेच्या स्वभावास अनुसरून कर्तरि प्रयोग होणें शक्य नाहीं, त्याच ठिकाणीं कर्तरि प्रयोगाचे ऐवजीं येत असल्यामुळें, त्यासही वाक्यपृथक्करणांत कर्तरि प्रयोगाच्याच व्यवस्थेचा नियम लागू करणें म्हणजे कर्त्यासच उद्देश्य म्हणणें प्रशस्त आहे हें उघड आहे. प्रधानकर्तृक भावे व गौणकर्तृक भावे या प्रयोगांतील फरक, त्यांचीं उदाहरणें, व तसा फरक करण्याचें कारण, हीं प्रयोग प्रकरणीं स्पष्ट केलींच आहेत. आतां कोणीं असें म्हणेल कीं, प्रधानकर्तृक कर्मणि व गौणकर्तृक

कर्मणि आणि प्रधानकर्तृक भावे व गौणकर्तृक भावे यांमधील मर्चा फरक जरी यथार्थ असला, तरी तो साधारण बुद्धीच्या मनुष्यास कसा कळवा; तर त्यासंबंधानें इतकेंच सांगतों कीं, हा फरक जरी विशेषेकरून अर्थदृष्ट्या केलेला आहे हें खरें तरी तो साधारण बुद्धीच्या मनुष्यासच नव्हे, तर केवळ नवीन शिकणाऱ्या विद्यार्थ्यांसही सहज ओळखतां येण्यासारखा आहे; कारण कीं, या अर्थभेदास अनुरूप व्याकरणदृष्ट्या शब्दांचे रूपांतही फरक दिसत असल्यामुळें, हा अर्थभेद व्याकरणांतही मानणें अवश्य व सुलभ आहे. या अर्थभेदाची चिन्हें कोणतीं हें प्रयोग प्रकरणीं सविस्तर विशद केलें आहे, तेथें तें पहावें.

एवंच, मराठीमध्यें कर्तरिप्रयोग, प्रधानकर्तृक कर्मणिप्रयोग, आणि प्रधानकर्तृक भावे-प्रयोग, ह्यामध्यें कर्त्यासच उद्देश्य म्हणावयाचें. मग वक्त्याचा त्याचे विषयीं बोलण्याचा जरी कांहीं ठिकाणीं प्रधान उद्देश नसला, तरी व्याकरणदृष्ट्या या प्रयोगांतील कर्ता नेहमीं प्रधान असल्यामुळें त्यासच एकजात उद्देश्य म्हणावयाचें. आणि असें करणें जरी न्याय-शास्त्रदृष्ट्या कांहीं स्थळीं अंधपणाचें असलें, तरी न्यायशास्त्राची सूक्ष्मता बाजूस ठेवूनच व्याकरणांतील वाक्यपृथक्करण अस्तित्वांत आलें असल्यामुळें प्रस्तुत विषयांत जराशी स्थूल-दृष्टीच स्वीकारणें प्रशस्त आहे आणि मराठींतील गौणकर्तृक कर्मणि हाच इंग्रजीतील कर्मणि प्रयोगास वस्तुतः साजेसा असल्यामुळें, आणि व्युत्पत्तिदृष्ट्या संस्कृत कर्मणि प्रयो-गापासून निघाला असल्यामुळें, त्यासच इंग्रजींतील कर्मणि प्रयोगाची वाक्यपृथक्करणाची पद्धति लागू करणें योग्य आहे. म्हणजे गौणकर्तृक कर्मणि प्रयोगामध्येंच कर्मास उद्देश्य म्हणावयाचें आणि प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोगामध्यें कर्तरि प्रयोगांतल्या प्रमाणें कर्त्यासच उद्देश्य समजून कर्माचा विधेयांतच अन्तर्भाव करावयाचा.

परंतु गौणकर्तृक भावेप्रयोगाची काय व्यवस्था करावयाची हा प्रश्न उरलाच. गौणकर्तृक कर्मणि प्रयोगांत कर्ता गौण होऊन कर्मास प्राधान्य असल्यामुळें कर्त्याचे जागीं कर्मासच उद्देश्य म्हणून वाक्यपृथक्करणाची सोय निघते; परंतु गौणकर्तृक भावेमधील अडचण यानें दूर होत नाहीं. इंग्रजींत भावे प्रयोग नसल्यामुळें या ठिकाणीं इंग्रजीला आमचें मार्गदर्शकत्व प्राप्त होत नाहीं. संस्कृतांत वाक्यपृथक्करण नसल्यामुळें तिच्याकडेही या कामीं धांव घेणें व्यर्थ आहे. तेव्हां येथें आपली आपणासच युक्तायुक्तता ठरविली पाहिजे.

गौणकर्तृक भावेप्रयोगांत, गौणकर्तृक कर्मणि म्हणजे वस्तुतः कर्मणि, या प्रयो-गांतल्याप्रमाणें कर्त्यास गौणत्व असल्यामुळें, त्यास उद्देश्य म्हणणें रास्त व सुसंगत नाहीं. 'माझ्यानें अथवा मला जाववतें' हा एका प्रकारचा गौणकर्तृक भावे-प्रयोग आहे. ह्यास आम्ही शक्यभावे म्हटलें आहे. यास अनुरूप असा 'माझ्यानें अथवा मला काम करवतें' हा शक्य कर्मणि नांवाचा एक गौण-कर्तृक कर्मणि प्रयोग आहे. शक्य क्रियापदांसंबंधानें व या प्रयोगासंबंधानें जें

एकंदर विवेचन या ग्रंथांत येऊन गेलें आहे, त्यावरून या प्रयोगांतील कर्त्यांस भाषादृष्ट्या व अर्थदृष्ट्या गौणत्व आहे, हें वाचकांस कळलेंच असेल. यामुळें यांतील कर्त्यांस वाक्यपृथक्करणाचे वेळीं उद्देश्य म्हणणें, म्हणजे त्यांस पुन्हां प्राधान्य देणें, प्रशस्त नाहीं हें उघड आहे. तथापि आगरकर या दोन्ही ठिकाणीं 'माझ्यानें' अथवा 'मला' यांस उद्देश्य करण्यास तयार आहेत. न्यायशास्त्राचे दृष्टीनें जरी त्यांचें म्हणणें कांहीं स्थळीं बराबर असलें, तरी शक्य क्रियापदाची व्युत्पत्ति, उपयोग, आणि खोल अर्थ, ह्यांचे दृष्टीनें आगरकरांचें मत व्याकरणांत सर्वसंमत होईल, असें आम्हांस वाटत नाहीं. वाक्यपृथक्करणासंबंधीं या महत्वाचे बाबतींत त्यांचा आमचा मतभेद आहे; तो आम्हीं स्पष्टपणें सांगितला आहे. तेव्हां त्यांची या भावे प्रयोगाबद्दलची व्यवस्था आमच्या मतें स्वीकारार्ह नसल्यामुळें, पुन्हा भावे प्रयोगाची व्यवस्था काय हा प्रश्न उतरतोच.

आमच्या मतें मराठींतील गौणकर्तृक भावे प्रयोग ( म्हणजेच वस्तुतः भावेप्रयोग ) तीन प्रकारचा आहे; पुराण भावे ( उदा०—स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजे ) समापन भावे ( उदा०—त्याचें निजून झालें ), आणि शक्य भावे ( उदा०—माझ्यानें अ० मला जाववतें ). शिवाय अकर्तृक भावे ( उदा०—उजाडलें, दादोबांचा भावकर्तरि ) हा जो भावे प्रयोगाचा भेद आहे, त्याचाही यांच्या बराबरच विचार केला पाहिजे. यांपैकीं पहिल्या तिहींत कर्ता आहे; पण तो गौण आहे. आणि शेटवल्यास स्पष्ट कर्ता दिसतच नाहीं. तेव्हां या वाक्याचें पृथक्करण कसें करावें, म्हणजे यांत उद्देश्य कोणतें व विधेय कोणतें हा प्रश्न आहे. हे सर्व प्रयोग जर एकाच मुख्य सांच्याचे आहेत, तर त्या सर्वांस एकच पद्धति लागू करणें सुसंगत व इष्ट आहे. यांपैकीं पुराण भावेचा स्वतंत्र विचार आगरकरांचे वाक्यमीमांसेंत आलेला आढळत नाहीं. समापन भावे हा भावे प्रयोग आजपर्यंत कोणीं मानलेला दिसत नाहीं. आणि शक्य भावेप्रयोगासंबंधाची त्यांची व्यवस्था प्रशस्त नाहीं. तेव्हां प्रथम ते अकर्तृक भावे प्रयोगासंबंधानें काय म्हणतात आणि ह्या संबंधाची त्यांची व्यवस्था वरील प्रकारच्या भावे प्रयोगांस कितपत लागू पडते हें पाहूं. त्यांच्या म्हणण्याचा सारांश असा कीं, "या क्रियापदांस कर्ता नसतो असें म्हणण्यापेक्षां क्रियेचा भाव तोच कर्ता असतो असें म्हणणें बरें. कारण उद्देश्य व विधेय यांशिवाय जसें वाक्य होतच नाहीं, त्याचप्रमाणें व्याकरणदृष्ट्या कर्त्याशिवाय वाक्य होत नाहीं. तेव्हां यांतील कर्ता क्रियापदांतच गुरफटला असल्यामुळें तो व्याकरणासाठीं स्पष्ट करून सांगणें कांहीं गैर नाहीं. इंग्रजीमध्येंही कांहीं ठिकाणीं ( e. g. It dawned. It rained etc. ) कर्तृस्थानच्या it ( तें ) या सर्वनामास 'वस्तुस्थिति' किंवा 'सृष्टिव्यापार' असा अर्थ द्यावा लागतो. 'म्हणून मराठी वैयाकरणांनीं उजाडलें, सांजावलें,

इत्यादि क्रियापदांस उजाडणें, सांजावणें, इत्यादि त्या त्या क्रियेचे भावदर्शक शब्द कर्ते घ्यावे म्हणून जो नियम घातला आहे, तो कै० कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात तितका अप्रशस्त किंवा दूष्य नाहीं असें आम्हांस वाटतें." ( वाक्यमीमांसा पृ० ५ ). ह्या दादोबांनीं सुचविलेल्या त्यांच्या भावकर्तृक क्रियापदांच्या प्रयोगास अनुसरून त्या क्रियापदांनीं युक्त असे वाक्य असतां, त्यांत 'उजाडणें' सारखा भावार्थ हाच उद्देश्य मानण्यांत यावा असें आगरकरांचें मत आहे. 'माझ्यानें अथवा मला जाववतें' या वाक्यांतही दादोबांचे मतें भावकर्तृक प्रयोगच आहे; तेव्हां त्यांतही 'जाणें' यासारखें उद्देश्य मानणें वरील मतास अनुसरून कांहीं गैर नाहीं; आणि हीच विचारसरणी इतर गौणकर्तृक भावे प्रयोगांस—पुराण भावे व समापन भावे यांस—लागू करण्यास हरकत नाहीं. जोशीबोवांनींही हीच पद्धति सर्व भावी प्रयोगांस एक जात लागू केली आहे. आगरकरांस तें संमत नाहीं, आणि प्रधानकर्तृक भावे प्रयोगांस हा नियम लागू करणें कां प्रशस्त नाहीं, हें आम्हीं दाखविलेंच आहे. तरी गौणकर्तृक भावे प्रयोगाच्या सर्व प्रकारांस ती लागू करण्यास हरकत नसावी असें वाटतें. हा प्रचलित पक्ष झाला. तथापि जोशीबोवांचा हा नियम गौणकर्तृक भावे प्रयोगासंबंधानें स्वीकारितांना त्यांच्या एका विधानास पूर्ण संमति देणें कठिणच पडतें. ते म्हणतात कीं, भावे प्रयोगांत उद्देश्य नसतें. ज्या वाक्यांत गौणकर्तृक भावेप्रयोग असतो, त्या वाक्यांतील उद्देश्याचा स्पष्ट उल्लेख वाक्यांत झालेला आढळत नाहीं, तर तें त्या वाक्यांतील क्रियापदांतच अन्तर्धान पावलेलें असतें, अशा अर्थानें वरील सिद्धान्त स्वीकारण्यास हरकत दिसत नाहीं. मात्र त्याचा अक्षरशः अर्थ भ्रामक आहे, हें उघड आहे. कारण कीं, उद्देश्यावांचून वाक्य, म्हणजे बोलण्याचे विषयाशिवाय बोलणें होय. तेव्हां त्यांच्या वरील ( गौणकर्तृक भावे प्रयोगांत उद्देश्य नसतें या ) सूत्राचा नक्की अर्थ बिसरतां कामा नये, हें उघड आहे.

गौणकर्तृक भावे व अकर्तृक भावे या प्रयोगांची वाक्यपृथक्करणाचे दृष्टीनें आणखी एक व्यवस्था करणें संभवनीय आहे. ती अशीः—उद्देश्य व विधेय या दोन गोष्टींशिवाय न्यायशास्त्राचे दृष्टीनें संयोजक म्हणून तिसरी एक गोष्ट वाक्यांत उद्देश्य व विधेय यांच्या इतकीच महत्त्वाची आहे; संयोजकावांचून विधानच व्हावयाचें नाहीं. असें जरी आहे तरी व्याकरणांत तिला अजीच फांटा देण्यांत आला आहे, हें पूर्वीं सांगितलेलें वाचकांस स्मरतच असेल. संयोजकास कां फांटा देण्यांत आला हेंही विसरतां कामा नये. वाक्यांतील संयोजक प्रचलित वाक्यांमध्यें बहुधा क्रियापदांत म्हणजे न्यायशास्त्रदृष्ट्या विधेयाचे कांहीं भागांत गुरफटलेलें असतें. म्हणजे नेहमींच्या भाषेंत विधेयाचा कांहीं भाग आणि संयोजक ह्यांचें एक गांठोडें बांधलेलें असतें किंवा स्वरूपतः तीं एकच

दिसतात. आणि न्यायशास्त्रसंमत वाक्यांत जरी संयोजक अलग करावयाचें असतें, तरी व्याकरणास प्रचलित भाषा जशीच्या तशीच घेऊन चालवयाचें असल्यामुळें, संयोजक हा तिसरा अवयव वाक्यपृथक्करणामध्यें गाळण्यांत येऊन त्याचा विधेयांतच अन्तर्भाव होतो. संयोजकाच्या ह्या व्यवस्थेंतील तत्त्वास अनुसरूनच गौणकर्तृक भावे प्रयोगांतील वाक्यपृथक्करणाची पद्धति ठरवितां येते. उजाडलें, सांजावलें, कळमळतें, इ० ठिकाणीं उजाडणें, सांजावणें, कळमळणें, इत्यादि क्रियार्थदर्शक शब्दच व्याकरणांत कर्ते समजणें बरें आणि वाक्यपृथक्करणांतही त्यांस उद्देश्याचे जागीं घालण्यास सोईचें पडतें, या वर्तमान समजुतीवरून एक गोष्ट उघड होत आहे: ती ही कीं, उजाडलें, सांजावलें, इ० एका शब्दांतच कर्ता आणि क्रियापद हीं एकत्र बांधिलीं गेलीं आहेत. ही गोष्ट सर्वांसच मान्य आहे. आणि उजाडलें, कळमळतें, इ० क्रियापदांत उजाडणें, कळमळणें, हे धातू आहेत ही गोष्टही सर्वसंमत आहे. या धातूंचे त्यांतील धात्वर्थच कर्ते मानणें कितपत सयुक्तिक आहे, ह्याबद्दल फक्त कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनींच शंका काढिलेली दिसते. तथापि आगरकरांनीं वर दाखविल्याप्रमाणें पुन्हां जुने मत कायम केल्यामुळें, वाक्यपृथक्करणांत त्याचा स्वीकार झालेला दिसत आहे. आणि हा प्रश्न जरी कांहींसा महत्त्वाचा वाटला नाहीं, तरी शास्त्रीयदृष्ट्या त्याचें महत्त्व कमी आहे असें आम्हांस वाटत नाहीं. या प्रश्नासंबंधाचें कृष्णशास्त्री चिपळूणकर ह्यांचेंच मत आम्हांस विशेष ग्राह्य दिसतें. त्यांनीं आपलें मत व क्रियार्थास कर्ता मानण्याचें दादोबांचे जुनें मत, याची आपल्या निबंधांत योग्य तुलना करून स्वमताचें समर्थन केलें आहे. तेव्हां त्यांचें म्हणणें त्यांच्याच शब्दांनीं वाचकांपुढें ठेवितों.

कृष्णशास्त्री चिपळूणकर म्हणतात—' प्रत्येक धातूस कर्म असतें असा जसा नियम नाहीं, तसा प्रत्येक धातूस कर्ता असतोच असा नियम म्हणतां येत नाहीं. जसें:—उजाडतें, मळमळतें; या धातूंच्या पोटांत कर्ता व क्रिया या दोहोंचाही समावेश झाल्यामुळें, त्यांस कर्तृपदाची अपेक्षा लागत नाहीं. उजाडतें व मळमळतें, येथें उजेड होतो, व मळमळ होते, असा कर्ता व क्रिया या दोन्हीचाही बोध एका क्रियापदानेंच होतो. असल्या क्रियापदांस अकर्तृक क्रियापदें असें म्हणावें; कारण, त्यांस स्वतंत्र कर्ता असत नाहीं. कोणी कोणी असें म्हणतात कीं, भाव म्हणजे क्रियापदाचा अर्थ जो व्यापार तोच कर्ता, असें समजून त्या क्रियापदांस भावकर्तृक क्रियापदें असें नांव द्यावें. परंतु युक्तीच्या दृष्टीनें पाहतां हें नांव बरोबर दिसत नाहीं. कारण, कर्ता म्हणजे क्रियेचा उत्पादक, किंवा तिचें अधिष्ठान होय; तेव्हां व्यापाराचा उत्पादक व अधिष्ठान तो व्यापारच कसा होईल? उजाडणें किंवा मळमळणें, उजाडण्यापासून किंवा मळमळण्यापासून होतें, ह्याचा अर्थ काय? कोणतीही गोष्ट स्वतः आपणास आपण कारण होत नाहीं व आपली

आपण अधिष्ठान असत नाहीं. तेव्हां क्रियेचा अर्थच क्रियापदाचा कर्ता हें संभवत नसल्यामुळें, भावकर्तृक ही संज्ञा क्रियापदास संभवत नाहीं हें उघड आहे. आतां कर्त्यावांचून क्रिया असत नाहीं. यास्तव अकर्तृक हें नांव तरी क्रियापदास कसें संभवतें, अशी कोणी शंका करील, तर तिचें उत्तर असें आहे कीं, अकर्तृक हें विशेषण आम्हीं क्रियेस लावीत नाहीं, तर क्रियापदास लावितों; व त्याचा अर्थ ज्या क्रियापदास कर्तृपद निराळें लागत नाहीं तें, असा समजावयाचा;' (निबंध ११ पृष्ठ १११).

यावरील आगरकरांच्या मताचा उल्लेख पूर्वीं केलाच आहे. ते म्हणतात, "पुष्कळदां विधेयार्थांत उद्देश्यार्थ इतका येऊन गेलेला असतो कीं, उद्देश्याचे जागीं कोणता शब्द घालावा याचा निश्चय करण्याची मोठी पंचाईत पडते, व याच पंचाइतीमुळें अशा प्रकारच्या विधेयांस किंवा क्रियापदांस अकर्तृक क्रियापदें म्हणावें, असा कै० कृष्णशास्त्री चिपळूणकरांनीं अभिप्राय दिला असावा असें वाटतें. 'उजाडलें' या क्रियापदास 'उजाडणें' हा कर्ता किंवा उद्देश्य मानणें हें विचित्र वाटतें, यांत संशय नाहीं; पण तरुण मुलांच्या समजुतीसाठीं अशाच प्रकारचा कांहीं तरी सुबोध शब्द कर्तृस्थानीं घेतला पाहिजे, हें तरुण शिष्यांच्या मनावर बिंबविलेंच पाहिजे." 'उजाडणें' हा कर्ता किंवा उद्देश्य मानणें हें विचित्र वाटतें, असें खुद्द आगरकरही कबूल करितात. तेव्हां त्यांची सबब काय ती तरुण मुलांसंबंधाची. आमच्या मतें त्यांची अडचण दूर करण्यासाठीं विचित्र किंवा अयुक्त मताचा प्रसार करणें नीट नाहीं. तरुण मुलें काय, त्यांस जें समजून सांगावें तें तीं ध्यानांत ठेवितात. आणि 'उजाडणें उजाडतें' ह्यापेक्षां 'उजाडतें' म्हणजे 'उजेड होतो' हें त्यांस अधिक लौकर व सहज समजेल असें आम्हांस वाटतें. म्हणजे कर्ता व क्रियापद ह्यांशिवाय वाक्य होत नाहीं, ही त्यांची समजून कायम राखूनही 'उजाडतें' यास अकर्तृक ही संज्ञा लावण्यास हरकत दिसत नाहीं; इतकेंच नव्हे, तर तेंच अधिक सुलभ व इष्ट आहे असें आम्हांस वाटतें. मात्र अकर्तृक क्रियापद म्हणजे ज्या क्रियापदाला स्वतंत्रपणें सांगितलेल्या कर्त्याची जरूर नाहीं, पण ज्याचा कर्ता त्या क्रियापदामध्येंच समाविष्ट असतो, तें क्रियापद; असा अर्थ असून, ज्याला कर्त्याची मुदलींच जरूर नाहीं असा अर्थ नव्हे; हें तरुण विद्यार्थ्यांचे मनावर बिंबविलें म्हणजे झालें.

कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे या मतास अनुसरून अकर्तृक भावे व गौणकर्तृक भावे प्रयोगाचें वाक्यपृथक्करण कसें करावयाचें तें आतां पाहूं. ज्याप्रमाणें संयोजक बहुधा क्रियापदांतच समाविष्ट झाल्यामुळें, तें वेगळें सांगण्याची व्याकरणानें जरूरी ठेविली नाहीं, त्याप्रमाणेंच गौणकर्तृक भावे प्रयोगांतील उद्देश्य क्रियापदात समाविष्ट झालें असल्यामुळें, तेंही वेगळें सांगण्याची आवश्यकता नसावी,

तर क्रियापद हें विधेयाचे सदरांत घालावें आणि त्यांत ' उद्देश्यासह ' असा शेरा मारावा. आणि आणखी उद्देश्याचे सदरांत त्यांतील उजेड, कळमळ, मळमळ, हे शब्द कंसांत घालून त्यांचे पुढें ' क्रियापदान्तर्गत ' असा शेरा मारावा म्हणजे झालें. असें केल्यानें उद्देश्यावाचून वाक्य असूं शकतें, असा भलता समज म्हणजे अशी भ्रामक कल्पना विद्यार्थ्यांचे मनांत उद्भवणारच नाहीं. आतां हीच व्यवस्था सर्व प्रकारच्या गौणकर्तृक भावे प्रयोगांत कशी लावावी हें स्पष्ट सांगतों. ह्या अकर्तृक भावे प्रयोगाशिवाय, तीन प्रकारचे गौणकर्तृक भावे प्रयोग आहेत. ते असेः—पुराण भावे, उ०—स्वर्गा पुण्यात्मकें पापें येइजे; शक्य भावे, उ०—माझ्यानें अथवा मला जाववतें, आणि समापन भावे, उ०—त्याचें निजून झालें. या सर्व प्रयोगांतील क्रियापदें उजाडतें, कळमळतें, इ० अकर्तृक क्रियापदांप्रमाणें विधेयाचे सदरांत घालून, त्यांचे पुढें ' उद्देश्यासह ' असा शेरा मारावा. आतां उद्देश्याचे सदरांत ज्याप्रमाणें उजेड, कळमळ, हे शब्द कंसांत घालून, त्यांचे पुढें ' क्रियापदान्तर्गत ' असा शेरा मारावयाचा, त्याप्रमाणें वरील उदाहरणांतील येईजे, जाववतें, निजून झालें, या क्रियापदांत प्रविष्ट झालेलें असें कोणतें उद्देश्य दाखवावें हा प्रश्न उरला. आगरकरांचे मतें स्वर्गा पुण्यात्मकें पापें येईजे, यांत नरें किंवा मनुष्यें हें अध्याहृत उद्देश्य, आणि माझ्यानें किंवा मला जाववतें, ह्यांत माझ्यानें किंवा मला हेंच उद्देश्य होय. परंतु माझ्यानें अथवा मला जाववतें, यांतील जाववतें या क्रियापदाचे साधनिकेसंबंधानें जरी दादोबांचें व आमचें एकमत नसलें, तरी ' माझ्यानें अथवा मला जाववतें ' यांतील अर्थासंबंधानें आणि विशेषेंकरून माझ्यानें अथवा मला ह्या शब्दांचे गौणत्वासंबंधानें त्यांचें म्हणणें योग्य आहे असें आम्हांस वाटतें. वरील वाक्यांत न्यायशास्त्रदृष्ट्या मनुष्यें ( अध्याहृत ) किंवा नरें, आणि माझ्यानें किंवा मला हीं उद्देश्यें होत ह्याबद्दल शंका नाहीं. तथापि यांस व्याकरणदृष्ट्या गौणत्व असल्यामुळें, पुन्हा त्यांस प्राधान्य देणें बरें नाहीं हेंही उघडच आहे, ह्यामुळें नरें किंवा मनुष्यें, आणि माझ्यानें अथवा मला यांस वाक्यपृथक्करणांत उद्देश्य न म्हणतां, विधेयांतील विधेयविस्तार या पोटसदरांत घालावें आणि येइजे, म्हणजे येणें होतें, जाववतें म्हणजे जाणें होतें, असा अर्थ असल्यामुळें, येणें, जाणें, हीं क्रियावाचक नामें उद्देश्य या सदरांत कसांत घालून, त्यांचे पुढें ' क्रियापदान्तर्गत ' असा शेरा मारावा, हें अम्हांस प्रशस्त दिसतें. त्याचप्रमाणें ' त्याचें निजून झालें ' हें क्रियापद विधेयाचे सदरांत घालून त्याचे पुढें ' उद्देश्यासह ' असा शेरा मारावा, आणि उद्देश्याचे सदरांत ' निजणें ' हें कंसांत घालून, त्याचे पुढें ' क्रियापदान्तर्गत ' असा शेरा मारावा आणि ' त्याचें ' हा गौण कर्ता विधेयविस्तारांत घालावा.

गौणकर्तृक भावे व अकर्तृक भावे या प्रयोगांचें वाक्यपृथक्करण कसें करावें या मुद्याचें सविस्तर विवेचन संपलें. यासंबंधानें दोन पक्ष दिसतात. एक

दादोबांच्या व आगरकरांच्या सांजावलें, फावलें, इ० क्रियापदांचे व्यवस्थेवरून सुचलेला व जोशी यांनीं स्वीकारिलेला; आणि दुसरा, सांजावलें, फावलें, यांबद्दलच्या कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या अभिप्रायानुसार वर सांगितलेला. या दोहोंमध्यें तात्त्विकदृष्ट्या जरी कांहीं फरक असला, तरी वाक्यपृथक्करणाचे व्यावहारिक कामांत या दोन पक्षांमध्यें फारसा फरक नाहीं. तेव्हां या दोन मार्गांपैकीं जो ज्यास पसंत पडेल तो त्यानें स्वीकारण्यास हरकत नाहीं.

येथपर्यंत कर्तरि, कर्मणि, आणि भावे, या तीन प्रयोगांचा वाक्यपृथक्करणाचे दृष्टीनें सविस्तर विचार झाला. आतां या विषयासंबंधानें मराठींतील संकीर्ण प्रयोगांचा प्रश्न उरला, तो फारच सोपा आहे. ' तूं मला पुस्तक दिलेंस ' हें कर्तृकर्मसंकराचें उदाहरण होय. या वाक्यास जरी ' त्वां मला पुस्तक दिलें ' असें शुद्ध कर्मणि प्रयोगाचें रूप दिलें, तरी हा प्रधान कर्तृक कर्मणि प्रयोगच होत असल्यामुळें, दोहोंचे वाक्यपृथक्करणांत मुळींच फरक नाहीं. म्हणजे शुद्ध प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोगांत ज्याप्रमाणें त्वां किंवा तूं हें उद्देश्य त्याचप्रमाणें कर्तृकर्मसंकरामध्यें तूं हेंच उद्देश्य होय. कर्मभावसंकरांत ही कांहीं एक अडचण नाहीं. ' आईनें मुलीला निजविली, ' हें कर्मभावसंकराचें उदाहरण होय. याचें ' आईनें मुलगी निजविली ' हे शुद्ध कर्मणि, आणि ' आईनें मुलीला निजविलें ' हें शुद्ध भावे रूप होय. हीं दोन्ही रूपें प्रधानकर्तृकच आहेत. तेव्हां या तिन्ही प्रयोगांत आईनें हा तृतीयान्त कर्ताच उद्देश्याचे सदरांत येतो, हें उघड आहे. प्रधानकर्तृक कर्मभावसंकराची ही व्यवस्था होय. आतां गौणकर्तृक कर्मभावसंकर म्हणून जो दुसऱ्या प्रकारचा कर्मभावसंकर आहे त्याजकडे वळूं. त्याला कधीं पकडण्यांत येईल किंवा ' त्याला कधीं पकडलें जाईल ' याचा नेम नाहीं, तुम्हांला या कामांत जबाबदार धरिलें जाईल, इत्यादि वाक्यें गौणकर्तृक कर्मभावसंकराची उदाहरणें होत. यांचें पृथक्करण गौणकर्तृक कर्मणि प्रयोगाच्या नवीन कर्मणि या प्रकारच्या वाक्यांच्या पृथक्करणाप्रमाणें होतें. अर्थात् यांमध्यें त्याला, तुम्हांला हीं उद्देश्यें आणि पकडण्यांत येईल, धरिलें जाईल, इत्यादि विधेयें होत; हें उघड आहे. कर्तृभावसंकर ( उ०—तूं घरीं जायचें होतेंस. हा संकीर्ण प्रयोग परिशिष्टांत पहावा ) हा प्रधानकर्तृकच असल्यामुळें ह्यांतील कर्त्यास उद्देश म्हणणें ठीकच आहे.

याप्रमाणें न्यायशास्त्राची दृष्टि साधारण भाषेंतील प्रचलित वाक्यांस लावण्याचे उद्देशानें व्याकरणांतील वाक्यपृथक्करण हा भाग कसा अस्तित्वांत आला, आणि न्यायशास्त्रांतील उद्देश्य आणि विधेय या मूळ कल्पनांमध्यें वाक्यपृथक्करणांत काय काय फरक करण्यांत येतो आणि तो कां, तसेंच ह्या कल्पना मराठींतील सव प्रकारच्या प्रयोगांस कशा लागू कराव्या, व त्या तशा कां लागू कराव्या, ह्या मुद्यांचें सविस्तर विवेचन झालें. यामध्यच जोशीबोवांच्या मतांचें आणि त्यांच्या निरनिराळ्या मुद्यांचें अप्रत्यक्ष परीक्षण झालें आहे, हें सुज्ञ वाचकांस तेव्हांच

कळून येईल, आगरकरांच्या पुस्तकांतील मुद्यांची द्विरुक्ति करण्याचें होतां होईल तों टाळूनच वरील विवेचन केलें असल्यामुळें, या ठिकाणीं त्यांचें वाक्यमीमांसा हें पुस्तकही पुरवणीसाठीं वाचकांनीं अवश्य वाचावें.]

---

# अध्याय २.

—०-*-०—

## वाक्य व वाक्यांचे भेद.

६४९. एक पूर्ण विचार भाषेंत व्यक्त करणाऱ्या शब्दसमुच्चयास **वाक्य** म्हणतात.

६५०. वाक्याचे मुख्य अवयव **दोन** आहेत. **उद्देश्य** आणि **विधेय.**

(**अ**) ज्याविषयीं वाक्यांत कांहीं सांगितलेलें असतें, म्हणजे ज्याविषयीं वक्ता बोलतो किंवा लिहितो, म्हणजेच ज्याचे विषयीं विधान करितो, त्यास **उद्देश्य** म्हणतात. जसें:—मनुष्य मर्त्य आहे, तो चालतो, रामानें रावणास मारिलें, मला जावयाचें आहे, इत्यादि वाक्यांत मनुष्य, तो, रामानें, आणि मला, हीं उद्देश्यें आहेत. कारण कीं, त्यांच्याविषयीं या वाक्यांत विधान केलेलें आहे.

(**आ**) उद्देश्याविषयीं वाक्यांत जें विधान करण्यांत येतें त्यास **विधेय** असें म्हणतात. जसें:—वरील उदाहरणांतील मनुष्य, तो, रामानें, मला, या उद्देश्यांविषयीं अनुक्रमें मर्त्य आहे, चालतो, रावणास मारिलें, जावयाचें आहे, हीं विधानें केलीं आहेत; म्हणून यांस विधेय असें म्हणतात.

६५१. उद्देश्य आणि विधेय हे दोन अवयव प्रत्येक वाक्यांत बहुधा स्पष्ट असतात. परंतु गौणकर्तृक भावे व अकर्तृक भावे या प्रयोगांतील क्रियापदांमध्येंच उद्देश हें समाविष्ट होतें. जसें:—त्याच्यानें जाववतें, मला कळमळतें, इत्यादि वाक्यांत जाववतें, म्हणजे जाणें होतें, कळमळतें म्हणजे कळमळ होते; आणि यांतील जाणें, कळमळ, हीं उद्देश्यें जाववतें, कळमळतें, या क्रियापदांतच गुरफटून गेलेलीं आहेत; हें उघड आहे.

६५२. वाक्यें **तीन** प्रकारचीं आहेत. **केवल** वाक्यें, **मिश्र** वाक्य, आणि **संयुक्त** वाक्य.

(अ) ज्या वाक्यांत एकच उद्देश्य असून एकच क्रियापद असतें, त्यास **केवल** वाक्य असें म्हणतात. जसें:—तो तेथेंच स्तब्ध राहिला, तुझें स्वरूप निर्विकार व निर्मळ आहे, मी त्याला वंदन करितों, त्यानें माझें कल्याण केलें; इ०.

**टीपः**—यासच अन्य वाक्यमीमांसक शुद्ध वाक्य असें म्हणतात. येथें शुद्ध किंवा अशुद्ध या अर्थाचा फारसा संबंध नसल्यामुळें, शुद्ध वाक्य यापेक्षां केवल वाक्य हीच संज्ञा आम्हांस अधिक प्रशस्त दिसते.

(आ) ज्या वाक्यांत एक मुख्य उद्देश्य व एक मुख्य विधेय असतें, आणि दोन अथवा अधिक क्रियापदें असतात, त्यास **मिश्र** वाक्य असें म्हणतात. जसें:—जो मनुष्य परमेश्वराच्या लीला श्रवण करीत नाहीं, त्याचे कान भिंतीस असलेल्या बिळाप्रमाणें होत; भगवत्कथाश्रवणांत जो काल जातो, तोच सार्थकीं लागतो; कसलाही प्रसंग असला, तरी त्याची चित्तवृत्ति सारखी असते; मी काय करीन, तें सांगत नाहीं; घन-परमाणूंच्या मध्यें जशीं अंतरें असतात तशीं प्रवाही पदार्थांच्या परमाणूंच्या मध्यें मध्यें असतात; जेव्हां तो सुटलेला वाघ लोकांनीं पाहिला, तेव्हां तंबूंत एकच गडबड उडून गेली; इ०.

मिश्र वाक्यांतील मुख्य उद्देश्य व मुख्य विधेय यांनीं होणारें जें वाक्य त्यास **प्रधान** वाक्य असें म्हणतात; आणि इतर वाक्यांस **गौण** वाक्य किंवा **अवलंबी** वाक्य असें म्हणतात. वरील उदाहरणांत त्याचे कान भिंतीस असलेल्या बिळांप्रमाणेंच होत, तोच सार्थकीं लागतो, त्याची चित्तवृत्ति सारखी असते, मी सांगत नाहीं, तशीं प्रवाही परमाणूंच्या मध्यें मध्यें असतात, तेव्हां तंबूंत एकच गडबड उडून गेली, हीं प्रधान-वाक्यें होत व बाकीचीं वाक्यें ह्यांवर अवलंबून असल्यामुळें, त्यांस अव-लंबी किंवा गौण वाक्यें असें म्हणतात.

(इ) ज्या वाक्यांमध्यें केवल व मिश्र वाक्यांचा संयोग झालेला असतो, त्यांस **संयुक्त** वाक्य असें म्हणतात. हे संयोग तीन प्रकारचे संभवतात. केवलकेवल संयोग, मिश्रमिश्र संयोग, आणि केवलमिश्र संयोग; म्हणजे दोन अथवा अधिक केवल वाक्यांचा; दोन अथवा अधिक मिश्र वाक्यांचा; आणि एक किंवा अधिक केवल वाक्यें आणि एक किंवा अधिक मिश्र वाक्यें ह्यांचा. अशा संयोगांनीं होणाऱ्या वाक्यांस

अनुक्रमें **केवलसंयुक्त**, **मिश्रसंयुक्त**, व **केवलमिश्रसंयुक्त** अशीं नांवें आहेत. तथापि संयुक्त वाक्यांचे हे पोटभेद सांगण्याची विशेष चाल नाहीं तर यांस सरसकट संयुक्त वाक्येंच म्हणण्याचा परिपाठ आहे. उदाहरणें:—तो आला आणि लगेच गेला ( केवलसंयुक्त ), जो श्रीमंत असतो त्याला विद्येची गोडी नसते आणि ज्याला विद्येची गोडी असते त्याला अनुकूलता नसते ( मिश्रसंयुक्त ), श्रीमंताला विद्या नको आणि ज्याला विद्या हवी असते त्याला शिकण्यापुरताही पैसा मिळत नाहीं ( केवलमिश्रसंयुक्त ), इ०.

संयुक्त वाक्यांत ज्या दोन किंवा अधिक वाक्यांचा संयोग झालेला असतो, त्यांस समानाधिकरण किंवा समान वाक्यें असें म्हणतात. हीं सर्व प्रधान असतात.

**टीप १**—पदक्रमाध्यायांत ( अ० ६४६ ) करणरूपी, अकरणरूपी, आज्ञार्थक, प्रश्नार्थक, वगैरे वाक्यांचे जे भेद सांगितले आहेत, ते साधारण दृष्टीनें दिसणारे ठोकळ भेद होत. ते शास्त्रीय भेद नव्हत; कारण उघडच आहे कीं, आज्ञार्थक वाक्य करणरूपी असेल किंवा अकरणरूपी असेल, म्हणजे ते भेद परस्पर विलग्न नाहींत. शिवाय ते भेद वाक्यपृथक्करणांत निरुपयोगी आहेत. येथें सांगितलेले भेदच वाक्यपृथक्करणदृष्ट्या महत्त्वाचे असून, ते परस्पर भिन्न आहेत; आणि मागें सांगितलेले भेद यांपैकीं कोणत्या ना कोणत्या तरी वर्गांत येतातच. ह्यामुळें ते ह्यांशिवाय अलग होत असें समजूं नये. या प्रकरणांत येणारीं पुष्कळशीं उदाहरणें सत्तावाचक वाक्यांचीं करणरूपी किंवा अकरणरूपी असतील; तथापि यांची जी व्यवस्था लावावयाची, तशीच प्रश्नार्थकादि इतर वाक्यांची होय. कारण कीं, प्रश्नार्थक वाक्य तरी केवल, मिश्र, किंवा संयुक्त ह्यांपैकीं कोणत्या तरी एका प्रकारचें असावयाचेंच; आणि तें ज्या प्रकारचें असेल त्याप्रमाणें त्यांचें पृथक्करण व्हावयाचें.

**टीप २**—वाक्यांचे वरील लक्षणांतील क्रियापद ह्या शब्दाचा वास्तविक अर्थ ध्यानांत ठेविला पाहिजे. क्रियापद म्हणजे क्रियेचें किंवा धातूचें कोणत्या तरी आख्यातांतील रूप होय. त्यांत संयुक्त क्रियापदांचाही अन्तर्भाव होतो. तसेंच क्रियापद आणि विधेय यांमधील फरकही संस्मरणीय आहे. कधीं कधीं नुसतें क्रियापदच विधेय असतें; परंतु अनेक जागीं विधेयामध्यें क्रियापदाशिवाय पुष्कळ अन्य शब्दांचा अन्तर्भाव होतो. तथापि वाक्यपृथक्करणामध्यें क्रियापद हेंच विधेयाचा मुख्य भाग असल्यामुळें त्यास **मूळ विधेय** असें म्हणावें. क्रियापदाशिवाय म्हणजे मूळ विधेयाशिवाय विधेयामध्यें आणखी कोणकोणत्या शब्दांचा समावेश होतो

आणि त्यांस काय काय नांवें आहेत हें पुढें सांगण्यांत येईल. कृदन्तें व क्रियावाचक नामें ह्यांचा क्रियापदांत अन्तर्भाव होत नाहीं, हें विसरतां कामा नये. म्हणजे वाक्यामध्यें त्यांचा जेव्हां स्वतंत्र उपयोग होतो, तेव्हां त्यांस क्रियापद म्हणतां येत नाहीं. तसेंच संयुक्तक्रियापदांत येणाऱ्या नुसत्या कृदन्तांसही क्रियापद ही संज्ञा लागावयाची नाहीं. तथापि संयुक्तक्रियापदान्तर्गत कृदन्तांचा त्या संयुक्त क्रियापदांत समावेश होतो हें उघड आहे.

६५३. केवल वाक्य हें एकच स्वतंत्र वाक्य असून तें प्रधान असतें. मिश्रवाक्यामध्यें एक स्वतंत्र व एक किंवा अधिक परतंत्र किंवा अवलंबी वाक्यें असतात. ह्यांपैकीं स्वतंत्र वाक्यास **प्रधान** वाक्य आणि परतंत्र किंवा तदवलंबी वाक्यास **गौण** वाक्य असें म्हणतात. एका मिश्र वाक्यांत दोन किंवा अधिक गौण वाक्यें असल्यास त्यांस **परतंत्र समानाधिकरण** वाक्यें किंवा **गौण समान** वाक्यें असें म्हणतात. संयुक्त वाक्यांत ज्या वाक्यांचा संयोग झाला असतो, तीं दोन्ही स्वतंत्र असतात; म्हणजे दोन्ही प्रधान वाक्यें असतात. यामुळें संयुक्त वाक्यांतील प्रधान वाक्यांस **स्वतंत्र समानाधिकरण** वाक्यें किंवा **प्रधान समान** वाक्यें असें म्हणतात. या प्रधान समान वाक्यांतील एक किंवा सर्व मिश्र वाक्यें असल्यास, त्यांत पुन्हा एक प्रधान व एक किंवा अनेक गौण वाक्यें किंवा परतंत्र वाक्यें असतात. गेल्या चार अंकांत सांगितलेल्या लक्षणांवरून ही परिभाषा सहज समजण्यासारखी आहे.

६५४. एका मिश्र व एका संयुक्त वाक्यांत दोन किंवा अधिक केवल वाक्यें असतात, यांस जर त्या सबंध मिश्र किंवा संयुक्त वाक्याचे अवयव असें म्हटलें, तर मिश्र वाक्याच्या दोन किंवा अधिक अवयवभूत वाक्यांपैकीं एक अवयव प्रधान असतो व बाकीचे गौण असतात; आणि संयुक्त वाक्याचे दोन किंवा अधिक अवयवभूत वाक्यांपैकीं प्रत्येक स्वतंत्र किंवा प्रधान असतें. परंतु संयुक्त वाक्याच्या अवयवभूत वाक्यांपैकीं एखादें मिश्र असल्यास, त्यांत पुन्हा एक प्रधान वाक्य व एक किंवा अधिक गौण अवयववाक्यें असलीं पाहिजेत; हें उघड आहे.

६५५. वाक्य आणि वाक्यांग ह्यांतील फरक संस्मरणीय आहे. वाक्यांत एक विचार पूर्णपणें व्यक्त झालेला असतो, वाक्यांगांत तसें नसतें. या आर्थिक फरकास अनुरूप वाक्य व वाक्यांग यांमध्यें व्याकरणदृष्ट्याही

फरक आढळतो, तो असाः——वाक्यामध्यें क्रियापद असतें, वाक्यांगांत तें नसतें; वाक्यांग हें बहुधा कृदन्तात्मक किंवा क्रियावाचक असतें. हा फरक केवल व मिश्र वाक्यांतील भेदास उपयोगाचा आहे. जसेंः——असें करणें तुला शोभत नाहीं; मी गांवीं नसतां तुझें पत्र आलें; या वाक्यांत असें करणें, मी गांवीं नसतां, हीं वाक्यांगें होत. वाक्यांग ह्याचा जराशा विस्तृत अर्थानेंही कधीं कधीं उपयोग करितात. वाक्यांतील कोणत्याही परस्परसंबंध दोन किंवा अधिक क्रियापदेतर शब्दांस वाक्यांग म्हणतात. या अर्थानें 'या चार दिवसांत,' 'आमच्या गांवापासून,' 'तुमच्या घराच्या उत्तरेस,' इ० हीं वाक्यांगेंच होत.

---

# अध्याय ३.

——:०:——

## केवल वाक्य.

६५६. केवल वाक्य हें एकेरी वाक्य आहे; म्हणजे याचे पोटीं वाक्य येऊं शकत नाहीं. केवल वाक्यांत एक नाम उद्देश्य व एक क्रियापद विधेय असतें. आणि हें नाम मूल उद्देश्य व हें क्रियापद मूल विधेय होय. उद्देश्य हें मूल विधेयाचे म्हणजे क्रियापदाचे कर्तृस्थानीं किंवा कर्मस्थानीं असतें. कर्तरि प्रयोगांतील उद्देश्य कर्तृस्थानीं प्रथमान्त असतें, प्रधानकर्तृक कर्मणि व प्रधानकर्तृक भावे प्रयोगांतील उद्देश्य कर्तृस्थानीं, मूल तृतीयान्त किंवा पर्यायहीन चतुर्थ्यन्त असतें; गौणकर्तृक कर्मणि प्रयोगांतील उद्देश्य मात्र कर्मस्थानीं प्रथमान्त असतें; आणि गौणकर्तृक भावे व अकर्तृक भावे या प्रयोगांतील उद्देश्य हें क्रियापदांतच समाविष्ट असतें. जसेंः——

| उद्देश्य. | उदाहरण. |
| --- | --- |
| प्रथमान्त कर्ता—— | **तो** जातो, **तो** काम करितो, **तो** काम करिता झाला, **वामनराव** येतील, **तो** यावा, **ईश्वर** आमचें रक्षण करो, इ०. ( सर्व ठिकाणीं कर्तरि प्रयोग ). |

मूल तृतीयान्त कर्ता——**त्यानें** काम केलें, **त्वां** हें पुस्तक वाचावें, (प्रधान-कर्तृक कर्मणि प्रयोग); **रामानें** रावणास मारिलें, **त्वां** जावें, इ० (प्रधानकर्तृक भावे प्रयोग).

पर्यायहीन चतुर्थ्यन्त कर्ता——**मला** हा धंदा करावा लागतो, **त्याला** पेरू खातां येतो, (प्रधानकर्तृक कर्मणि); **त्याला** गेलें पाहिजे, **मला** जावयाचें आहे, **त्याला** बसतां येतें, इ० (प्रधानकर्तृक भावे).

प्रथमान्त कर्म——शिपायाकडून **चोर** धरिला गेला, **चोर** धरण्यांत आला, त्याचा **धडा** शिकून झाला, त्याच्यानें किंवा त्याला **काम** करवतें, इ० (गौणकर्तृक कर्मणि).

क्रियापदान्तर्गत——मला जाववतें (**जाणें** होतें किंवा जाण्याची शक्ति आहे), माझें निजून झालें (पूर्ण **निजणें** झालें), उजाडलें (**उजेड** झाला), इ० (गौणकर्तृक भावे व अकर्तृक भावे प्रयोग).

६५७. मूल उद्देश्य हें नाम असतें म्हणून सांगितलें. तरी त्याचे जागीं नामांप्रमाणें उपयोगांत येणारे इतर शब्द उद्देश्य होऊं शकतात. उद्देश्याचे जागीं एकंदर पुढील शब्द येतात.

(अ) नाम—हल्लीं **धूमकेतु** दिसतो.

(आ) सर्वनाम—**तो** पळाला.

(इ) विशेषण—दुष्काळाचे दिवसांत **गरीबानें** कसे दिवस काढावे,

(ई) क्रियाविशेषण (क्वचित्)—त्याच्या प्रकृतींत **आंतबाहेर** नाहीं.

(उ) वाक्यांग——**खोटें बोलणें** अनीतीचें आहे, त्याला **खोटें बोलणें** आवडत नाहीं.

(ऊ) कोणताही नामाप्रमाणें योजिलेला शब्द——**करितां** कृदन्त आहे, परंतुरामायणांतील प्रत्येक आर्येंत ‘परंतु’ आलें आहे, ‘बाकी’ हें त्याचें पालवपद आहे, इ०.

टीपः——वाक्यसुद्धां नामाप्रमाणें उपयोगांत येऊन उद्देश्यस्थानीं येतें. परंतु मग सबंध वाक्य केवळ वाक्य म्हणजे एकेरी राहत नाहीं; तर तें मिश्रवाक्य

होतें. त्यानें तुला विनाकारण त्रास द्यावा हें आश्चर्यच होय, या वाक्यांत ' त्यानें तुला विनाकरण त्रास द्यावा ' हें वाक्य, आणि ' हें ' हा ' होय ' ह्याचा कर्ता, हे समानाधिकरण शब्द आहेत. म्हणजे होय ह्याचा वास्तविक कर्ता ' त्यानें तुला विनाकारण त्रास द्यावा ' हें वाक्यच आहे, आणि ' हें आश्चर्य होय ' हें प्रधान वाक्य आहे. ' त्यानें तुला इ० ' हें नामवाक्य गौण असून प्रधान वाक्यांतील उद्देश्य होय. एवंच उद्देश्यस्थानीं वाक्य येतें. परंतु त्यायोगें सबंध वाक्य मिश्र होतें हें विसरतां कामा नये.

६५८. वाक्यांतील मूल उद्देश्यास विशेषणादि शब्द जोडण्यांत येऊन त्याचा **विस्तार** होतो. उद्देश्याचा विस्तार पुढील शब्दांनीं होतो.

( अ ) अधिविशेषण——**तांबडा** घोडा विजयी झाला, पानपतच्या लढाईंत **पुष्कळ शूर** व **पराक्रमी असे लहान मोठे** योद्धे पडले, इ०.

( आ ) कृदन्त—विशेषणें किंवा कृदन्तविशेषणान्त वाक्यांगें——**गाणारा** मनुष्य पुढें आला; **मुंबईस जाणारा** कोणी मनुष्य तुझ्या पाहण्यांत आहे काय; **काल आम्हांस बाजारांत आढळलेला** बोवा हाच होय; ' **लोकांनीं पूज्य मानलेला शत्रूंस काळारूपी झालेला** व **मित्रांस कोणी साहाय्यकर्ता असा भासलेला** तो सरदार मरण पावला, ' इ०.

( इ ) षष्ठ्यन्त शब्द——**पित्तप्रकृतीच्या** मनुष्यानें उन्हांत बसूं नये, **माशांच्या काळजाचें** तेल पौष्टिक असतें, तुमच्या वर्गांतले **परीक्षेस बसावयाचे** मुलगे कोणते, **माझी रोजची लिहावयाची** लेखणी कोठें आहे, प्रत्येक मनुष्यानें **सदोदित खरें बोलण्याचा** नियम पाळण्यास कठीण आहे, ' **निढळाच्या घामानें** मिळविलेल्या **पैशाचा** व्यय हवा तसा करवत नाहीं, ' इ०.

( ई ) समानाधिकरण पद——**शिवाजीचा भाऊ** व्यंकोजी तंजावरास गेला ' अलिकडे आम्ही **ब्राह्मण** अगदीं नादान झालों आहों, ' **हिंदुस्थानची अधिस्वामिनी** आणि **इंग्लंदची राणी** व्हिक्टोरिया हिनें साठ वर्षांवर राज्य केलें. '

टीप १—षष्ठ्यन्त शब्द विशेषणसदृश आहेत. (अ), (आ), (इ) हीं सर्व विशेषणें, आणि (ई) हीं नामें होत; तेव्हां उद्देश्याचा विस्तार बहुधा विशेषणांनीं व कधीं कधीं समानाधिकरण नामांनीं होतो. विशेषणांचे पाठीमागें विभक्त्यन्त किंवा शब्दयोगीअव्ययान्त शब्द येतात. जसें:—खाण्याला गोड, माझ्याहून मोठा, पायानें लंगडा, बोलण्यांत हुषार, जिवावर उदार, मनाचा मोकळा, सुखदुःखाविषयीं बेपर्वा, खालपासून वरपर्यंत एकसारखा, इ०. यांस विशेषणवाक्यांश असें म्हणतात. यांनींही उद्देश्यविस्तार होतोच.

टीप २—यांपैकीं एका किंवा अनेक प्रकारच्या शब्दांनीं उद्देश्याचा विस्तार होतो. मूळ उद्देश्याचा विस्तार करणाऱ्या या शब्दांस उद्देश्य-विस्तारक या सदरांत घालतात. म्हणजे उद्देश्यामध्यें दोन पोटसदरें आहेत. एक मूळ उद्देश्य आणि दुसरें उद्देश्य-विस्तारक.

६५९. मूळ विधेय क्रियापद असतें, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. जसें:—राम चालतो, तो धांवतो, इ०. या ठिकाणीं चालतो, धांवतो, हीं मूळ विधेयें होत. मूळ विधेय उद्देश्याची स्थिति, स्थित्यन्तर किंवा कृति दाखवितें. जसें:—कोळसा काळा असतो, तो विद्वान् आहे, इ० वाक्यांत असतो व आहे, ह्यांनीं स्थिति दाखविण्यांत येते; त्याला ताप आला आहे, सरकारनें त्याला मामलेदार नेमिलें, इ० वाक्यांत आला आहे, आणि नेमिलें, ह्यांनीं स्थित्यन्तर समजतें; आणि तो धांवतो, मी लिहीत आहें, या वाक्यांतील धांवतो, व लिहीत आहें, हीं मूळ विधेयें कृतिदर्शक आहेत हें उघड आहे. आतां मूळ विधेय म्हणजे क्रियापद, ह्याचा अर्थ कधीं कधीं त्या क्रियापदांतच पूर्ण असतो; परंतु कधीं कधीं त्या क्रियापदाचा अर्थ पूर्ण होण्यास आणखी कांहीं शब्दांची जरूर लागते. तो धांवतो, मी गेलों, इ० उदाहरणांतील धांवतो व गेलों या क्रियापदांचे अर्थ त्यांनींच पूर्ण समजतात; म्हणजे त्यांच्या अर्थाचे पूर्णतेस दुसऱ्या कोणत्याही शब्दांची आवश्यकता नाहीं. परंतु तो काम करितो, तो पुस्तक वाचितो, ह्या वाक्यांतील करितो, व वाचितो, या क्रियापदांचे अर्थ काम आणि पुस्तक ह्यांचे शिवाय पूर्णपणें समजत नाहींत. म्हणजे तो करितो, तो वाचितो, इतक्यानें पूर्ण अर्थ मनांत येत नाहीं; त्यास काम आणि पुस्तक या शब्दांची जरूर आहे. त्याचप्रमाणें त्यानें पुस्तक दिलें, त्यानें दोन प्रश्न विचारिले, या वाक्यांतील दिलें व विचारले या मूळ विधेयांचा म्हणजे क्रियापदांचा अर्थ पुस्तक व प्रश्न या त्यांच्या कर्मांनीं जरी अधिक स्पष्ट होत आहे, तरी

त्यानें **मला** पुस्तक दिलें, त्यानें **रामाला** दोन प्रश्न विचारिले, ह्याप्रमाणें त्या वाक्यांत मला व रामाला ह्या चतुर्थ्यन्त शब्दांची भर घातली म्हणजे मूल विधेयांचा अर्थ अगदीं पूर्ण होतो. परंतु मला व रामाला ह्यांचेशिवाय जरी पुस्तक व प्रश्न ह्यांनीं दिलें व विचारिले, यांच्या अर्थास बरीच पूर्णता आली, तरी तो मला व रामाला ह्यांचे शिवाय अगदीं पूर्ण होत नाहीं हें उघड आहे. यावरून सकर्मक क्रियापद मूळ विधेय असतां त्याचा अर्थ कर्माशिवाय पुरा होत नाहीं; आणि दे, सांग, विचार, इ० कांहीं सकर्मक धातूंचे मूळ विधेयास कर्माशिवाय आणखी एका संप्रदानी चतुर्थीची अर्थपूर्णतेस आवश्यकता आहे, हें उघड आहे. या संप्रदानी चतुर्थ्यन्त शब्दास कोणी कोणी अप्रत्यक्ष कर्म असेंही म्हणतात; आणि वास्तविक कर्मास त्यामुळें प्रत्यक्ष कर्म असें म्हणतात. यावरून सकर्मक क्रियापद विधेय असतां, त्यांचा अर्थ पूर्ण होण्यास प्रत्यक्ष कर्माची व कधीं कधीं अप्रत्यक्ष कर्माची गरज असते, हें वाचकांस समजेलच. यांस **विधेय-पूरकें** असें म्हणतात.

यावरून अकर्मक क्रियापदें नेहमीं स्वतंत्रपणें पूर्ण अर्थ दाखवितात आणि त्यांचा अर्थ पूर्ण होण्यास इतर शब्दांची कधींच जरूर लागत नाहीं असें समजूं नये. तर कांहीं अकर्मक क्रियापदांसही अर्थपूर्णतेस इतर शब्दांची जरूर लागते. जसें:——तो शहाणा आहे. तो श्रीमंत झाला आहे, इ०. या वाक्यांत आहे व झाला आहे, हीं अकर्मक क्रियापदें अपूर्णार्थ असल्यामुळें, त्यांस शहाणा व श्रीमंत या शब्दांची अर्थपूर्णतेच्या कामीं जरूर आहे हें उघड आहे. यावरून **कांहीं थोडींशीं अकर्मक क्रियापदेंही अपूर्णार्थ** किंवा **अपूर्णविधान** असतात हें उघड आहे. म्हणून शहाणा, श्रीमंत, अशा सारख्या शब्दांस या अकर्मक क्रियापदात्मक विधेयांचे संबंधानें विधेयपूरकें असेंच म्हणतात.

यावरून विधेय पूरकें **तीन** प्रकारचीं आहेत हें उघड आहे. **प्रत्यक्ष कर्म, अप्रत्यक्ष कर्म** आणि **विधिशब्द** म्हणजे विधिनामें व विधिविशेषणें. ह्यांपैकीं प्रत्यक्ष कर्म व अप्रत्यक्ष कर्म यांचा कर्म या एकाच सदरांत समावेश करितात; आणि विधिशब्दांसच विशेषेंकरून **पूरक** ही संज्ञा देण्याची वाक्यमीमांसकांची चाल आहे. याप्रमाणें **सर्व सकर्मक** क्रियापदें व **कांहीं**

थोडींशीं अकर्मक क्रियापदें हीं अपूर्णविधान आहेत. म्हणजे बहुतेक अकर्मक क्रियापदें काय तीं पूर्ण विधान आहेत. अर्थात् अर्थपूर्णतेच्या कामीं त्यांना इतर शब्दांची पुरवणी जोडण्याचें प्रयोजन नाहीं.

६६०. आतां क्रियापदें पूर्णविधान असोत किंवा अपूर्णविधान असून त्यांचा अर्थ कर्मांनीं व पूरकांनीं पूर्ण झालेला असो, सर्वांच्या अर्थाचा विस्तार करितां येतो. तो काल धांवत होता, तो या महिन्याच्या पहिल्या तारखेस येथून मुंबईस गेला, त्यानें तें पुस्तक जलद जलद वाचून परवांच संपविलें, इ०. या वाक्यांत काल, या महिन्याचे पहिल्या तारखेस येथून मुंबईस, जलद जलद वाचून परवांच, या शब्दांची विधानपूर्णतेस गरज नाहीं. त्यांच्या शिवाय तो धांवत होता, तो गेला, त्यानें तें पुस्तक संपविलें, हीं विधानें अर्थानें पूर्ण होतात यांत संशय नाहीं. तथापि वरील शब्दांनीं त्यांच्या अर्थाचा विस्तार होत आहे. म्हणून विधानपूर्णतेच्या कामीं ज्या शब्दांची मूल विधेयास आवश्यकता नसते, अशा मूल विधेयास उद्देशून येणाऱ्या शब्दांस **विधेय विस्तारकें** असें म्हणतात.

६६१. कर्म हें उद्देश्याप्रमाणें प्रायः नाम आहे. तरी उद्देश्याचे जागीं नामाप्रमाणें येणारे इतर शब्द जसे आढळतात, तसे ते कर्माचे जागींही आलेले आढळतात. उदाहरणें:—

( अ ) नाम—मीं **धूमकेतु** पहिला.
( आ ) सर्वनाम—तो **मला** शिवतो किंवा शिवला.
( इ ) विशेषण—तो **गरिबाला** मारतो व **श्रीमंताला** भितो.
( ई ) क्रियाविशेषण [ क्वचित् ]—तो **मागेंपुढें** करीत आहे.
( उ ) वाक्यांग—मीं त्याला **ही गांठ मारणें** शिकविलें, मी **तुझें म्हणणें** यापुढें ऐकणार नाहीं.
( ऊ ) कोणताही नामाप्रमाणें योजिलेला शब्द—परंतु रामायणाचे प्रत्येक आर्येत मोरोपंतानें ‘ परंतु ’ आणिलें आहे.

६६२. अप्रत्यक्ष कर्माचे जागींही वरील शब्द आढळतात.

( अ ) नाम—मीं **गोविंदाला** धूमकेतु दाखविला.
( आ ) सर्वनाम—मीं **त्याला** ही बातमी कळविली.

( इ ) विशेषण—तो दर अंवसेस प्रत्येक **आंधळ्यास** एकेक पैसा देतो.
( ई ) क्रियाविशेषण ( क्वचित् )—ही गोष्ट **तिकडे** ( नवऱ्याला ) कळविलीस का ?
( उ ) वाक्यांग—**वीस वर्षांचे मुलानें पांच हात लांब उडी मारणें याला** मी मुळींच किंमत देत नाहीं.
( ऊ ) कोणताही नामाप्रमाणें योजिलेला शब्द—त्याच्या 'शाबास' ला कोणीही महत्त्व देणार नाहीं.

टीप १— कर, म्हण, दे, शिकव, सांग, विचार, दाखव, इ० आणि ह्यांच्याच अर्थांच्या धातूंस प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष हीं दोन्ही कर्मे असतात.

टीप २—प्रत्यक्ष कर्म व अप्रत्यक्ष कर्म ह्यांचे जागीं नामवाक्यही येऊं शकतें पण तसें झाल्यास पूर्वी उद्देश्यावरील टिपेंत सांगितल्याप्रमाणें सबंध वाक्य केवल वाक्य न राहतां मिश्रवाक्य होतें.

६६३. विधिशब्द म्हणजे पूरकें बहुधा नामें व विशेषणें असतात. अपूर्णविधान क्रियापद अकर्मक असतां, पूरक हें कर्त्यास उद्देशून येतें. आणि तें सकर्मक असल्यास पूरक हें कर्मास उद्देशून येतें.

६६४. कर्तृगामी म्हणजे कर्त्यासंबंधानें आलेल्या विधिशब्दांचीं म्हणजे पूरकांचीं उदाहरणें:—

विधिनाम—तो **राजा** झाला, तो **आनंदांत** दिसला, **मजेंत** दिसला, तो एक **ऋषिच** होता, इ०.

टीप—कधीं कधीं उद्देश्य व विधिनाम हें पूरक, हीं 'म्हणजे' या स्वरूपदर्शक उभयान्वयी अव्ययानें जोडण्यांत येतात. जसें:—अश्व म्हणजे घोडा होय, यावेळीं त्याला रागावणें म्हणजे त्याला सर्वस्वी आपल्या कक्षांतून बाहेर घालविणें आहे, इ०.

विधिविशेषण ( षष्ठयन्त नामासह )—रामा **वेडसर** दिसला, तो आंबा **चांगला** निघाला, गोविंदराव आपल्या कामांत नेहमीं दक्ष असतात, तो **रागावलेला** दिसला, तो **रागांत असल्यासारखा** दिसला, हा कपडा **निरनिराळ्या रंगांचा** आहे, इ०

टीप—आहे, अस, हो, दिस, निघ, इ० अकर्मक धातु अपूर्णविधान आहेत. यांचीं पूरकें कर्तृगामी असतात म्हणजे तीं कर्त्यास उद्देशून येतात.

आणि तीं कोणत्याही प्रकारचीं विशेष्यनिष्ठ विधिविशेषणें असल्यास अर्थात् तीं कर्त्याच्या लिंगवचनाप्रमाणें बदलतात.

६६५. कर्मगामी विधिशब्दांचीं म्हणजे पूरकांचीं उदाहरणें:—

विधिनाम—दुर्योधनानें कर्णास **राजा** केलें, सरकारनें त्याला **जज्ज** नेमिलें.

विधिविशेषण ( षष्ठ्यन्त नामासह )—त्यानें आपला धंदा **चांगला** चालविला आहे. तिनें बाहुल्या पाटावर **उभ्या** ठेविल्या, त्यानें रोग्यास **बरा** केलें, मी ही गोष्ट **महत्त्वाची** समजतों. इ०.

कृदन्त अव्यय—मी त्यास **बोलतांना** ऐकिलें, मी रामाला **घोड्यास मारितांना** पाहिलें, इ०.

टीप १—कर, बनव, नेम, या व या अर्थाच्या धातूंच्या कर्मासंबंधानें मात्र कर्मगामी विधिनामें आलेलीं आढळतात.

टीप २—कर, बनव, नेम या धातूंस द्विकर्मक धातूंच्याच यादींत जोशी व खेर यांनीं घातलें आहे; पण तें रास्त नाहीं. एकंदरींत येथें दिलेला कर्मगामी विधिशब्दांसंबंधाचा सर्व अभिप्राय त्यांच्या मताहून कमीजास्त भिन्न आहे. यासंबंधाचा सविस्तर ऊहापोह पूर्वी ( अंक ५९३ ) करण्यांत आला आहे. तो नीट लक्षपूर्वक वाचिला म्हणजे येथील व्यवस्थेची इष्टता वाचकांचे ध्यानांत येईल.

६६६. वाक्यांतील क्रियापदास एकच कर्म असल्यास तें कर्तरि प्रयोगांत प्रथमान्त किंवा कधीं कधीं चतुर्थ्यन्त असतें. आणि प्रयोगांत नेहमीं प्रथमान्त असतें; आणि भावे प्रयोगांत बहुधा चतुर्थ्यन्त असतें व क्वचित् प्रथमान्तही असतें. ह्या गोष्टी प्रयोगप्रकरणीं सोदाहरण व सविस्तर सांगण्यांत आल्याच आहेत.

६६७. वाक्यांतील क्रियापदास प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष अशीं दोन्ही कर्में असल्यास अप्रत्यक्ष कर्म नेहमीं चतुर्थ्यन्त असतें व प्रत्यक्ष कर्म बहुधा प्रथमान्त असतें असा नियम आहे. या ठिकाणीं प्रत्यक्ष कर्मासंबंधानें ‘ बहुधा ’ हा शब्द मुद्दाम घातला आहे. कारण कीं, प्रत्यक्ष कर्माचे प्रथमा विभक्तीच्या नियमास एक अपवाद दिसतो. तो असा:—सांगणें [ आज्ञा-उपदेश करणें या अर्थीं ] शिकविणें, विसरणें, चुकणें, इ० क्रियापदांचीं प्रत्यक्ष कर्मेंही कधीं कधीं चतुर्थ्यन्त वें कृदन्तें असतात. [ अंक ६२६ ] उदाहरणें:—त्यानें मला हीं कामें करावयास सांगितलें, त्यानें मला इंग्रजी बोलावयास शिकविलें, इ०.

६६८. उद्देश्य, प्रत्यक्ष कर्म, आणि अप्रत्यक्ष कर्म, हीं सर्व मुख्यत्वें-करून नामें असल्यामुळें, उद्देश्याप्रमाणें प्रत्यक्ष कर्म व अप्रत्यक्ष कर्म, यांचाही विस्तार होतो. तथापि तो वाक्यमीमांसेंत पृथक् सांगण्याची चाल नाहीं.

प्रत्यक्ष कर्माचा विस्तार उद्देश्यविस्तारक शब्दांनींच होतो. उदाहरणें:—

अधिविशेषण—तो तांबडा पलंग आणितो, त्यानें लाल शाई घेतली, इ०.

कृदन्त विशेषण किंवा वाक्यांग—तो गाणाऱ्या मुलास चाहतो, त्याला मुंबईस जाणारा मनुष्य सांपडला नाहीं, त्यानें परवां आमच्याकडे आलेल्या आचाऱ्यासच बोलाविलें, इ०.

समानाधिकरण पद—त्या प्रसंगीं धर्मराजानें, सज्जनांचा हितकर्ता, भक्तांचा कल्पद्रुम, आणि पांडवांचा पालक, कृष्ण यास बोलाविलें.

षष्ठ्यन्त शब्द—लग्नासाठीं गोविंदरावांनीं आपल्या स्नेह्याचा घोडा आणविला आहे. आपण परवां पाहिलेल्या मनुष्याचें नांव तुम्हीं जाणतां काय?

टीप—उद्देश्याप्रमाणें प्रत्यक्ष कर्मासही वरच्यापैकीं अनेक विस्तारकें एकदम लागलेलीं आढळतात.

६६९. अप्रत्यक्ष कर्माचाही विस्तार उद्देश्य-विस्तारक शब्दांनींच होतो. उदाहरणें:—

अधिविशेषण—त्यानें आपल्या धाकट्या भावास अर्धें राज्य दिलें.

कृदन्त विशेषण किंवा वाक्यांग—मी मुंबईस जाणाऱ्या आपल्या स्नेह्यास म्हणालों कीं, इ०.

समानाधिकरण पद—धर्मराजा आपले चुलत भाऊ कौरव यांस म्हणाला कीं, इ०.

षष्ठ्यन्त शब्द—त्यानें आपल्या भावास गादी दिली.

टीप—अप्रत्यक्ष कर्मासही अनेक विस्तारकें एकदम लागू शकतात.

६७०. मूल विधेय हें व्याकरणदृष्ट्या वाक्यांतील क्रियापद होय. उद्देश्याप्रमाणें ह्याचाही विस्तार होतो; म्हणजे उद्देश्याच्या विस्तारकापासून जशी उद्देश्याबद्दलची अधिक माहिती मिळते, तशीच विधेयाच्या विस्तारका-

पासून विधेयाबद्दलची अधिक माहिती मिळते. उद्देश्य हें नाम असल्यामुळें, त्याचा विस्तार जसा प्रायः नामविशेषणांनीं होतो, त्याचप्रमाणें मूळ विधेय क्रियापद असल्यामुळें त्याचा विस्तार प्रायः क्रियाविशेषणांनीं होतो. चार प्रकारच्या अव्ययांपैकीं उभयान्वयी अव्ययांचा शब्द व वाक्यें जोडण्याचेच कामीं उपयोग होतो; आणि केवलप्रयोगी अव्ययांचा वाक्याशीं फारसा संबंध नसून, तीं स्वतंत्रपणें मनोविकार दाखवितात; तेव्हां उभयान्वयीं अव्ययें व केवलप्रयोगी अव्ययें यांचा वाक्यार्थाशीं विशेष संबंध नाहीं हें उघड आहे. बाकी राहिलीं क्रियाविशेषणें आणि शब्दयोगी अव्ययें; हीं दोन्ही विधेयविस्तारक आहेत. पैकीं शब्दयोगी अव्ययें हीं स्वतंत्र नसून नामांसारख्या शब्दांपुढें बहुधा येतात; आणि हे शब्दयोगी—अव्ययान्त शब्द विधेयविस्तारक असल्यामुळें, त्यांस वाक्यमीमांसेच्या दृष्टीनें क्रियाविशेषणें म्हणण्यास हरकत नाहीं हें पूर्वीं सांगितलेंच आहे. याशिवाय ज्या विभक्त्यन्त शब्दांचा कर्ता आणि कर्म, ह्यांशिवाय अन्य तऱ्हेचा क्रियापदांशीं संबंध असतो ते शब्द, म्हणजे कर्ता व कर्म ह्यांशिवाय इतर अर्थीं येणारे विभक्त्यन्त शब्द, यांचा वाक्यांतील मुख्य क्रियेसंबंधानें अधिक माहिती देण्याचे कामीं उपयोग झाला असतां, ते शब्दही विधेयविस्तारक होतात; आणि तेव्हां त्यांसही वाक्यमीमांसेचे दृष्टीनें क्रियाविशेषण म्हणण्यास हरकत नाहीं. जलदीनें, दुसऱ्या दिवशीं, सकाळीं, चार वर्षांनीं, इत्यादि शब्दांसच काय पण ‘ मी ज्या वर्षीं तापानें आजारी पडलों होतों त्या वर्षीं ’ अशा प्रकारच्या लांब लांब, वाक्यात्मक शब्दसमुदायांसही क्रियाविशेषणें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु वाक्यमीमांसेला वाक्यांतील मुख्य मुख्य अवयवांचाच विचार करावयाचा असल्यामुळें, आणि व्याकरणास वाक्यांतील प्रत्येक शब्दाचा विचार करावयाचा असल्यामुळें, वाक्यमीमांसेची दृष्टि व व्याकरणाची दृष्टि यांमध्यें घोंटाळा उत्पन्न करून, जलदीनें, सकाळीं, आरंभीं, सुरवातीस, या विभक्त्यन्त नामांस व्याकरणांतही क्रियाविशेषणें म्हणणें योग्य नाहीं हें उघड आहे. या मुद्याचा सविस्तर ऊहापोह क्रियाविशेषणांचे अध्यायांत आम्हीं केला आहेच. तो वाचकांनीं वाटल्यास पुन्हा एकवार पहावा.

६७१. विधेयाचा विस्तार खालीं दिलेल्या शब्दांनीं होतो.

( अ ) नाम—इंग्रजी अभ्यास **बारा वर्षें** करावा लागतो, तो **मर्यादेनें** वागतो, **त्याला** चार भाऊ आहेत, तो **दिवसाचा** चालतो, तो **घरीं** गेला, इ०.

**टीप**—यावरून संबोधनेतर सर्व विभक्तींचा विधेयविस्ताराचे कार्मीं उपयोग होतो हें उघड आहे. कोणत्या विभक्तीचा कोणत्या अर्थी विधेयविस्ताराचे कार्मीं उपयोग होतो, हें पुढील अंकांत सांगण्यांत येईल.

( आ ) क्रियाविशेषणाप्रमाणें योजिलेलें विशेषण—तो **चांगलें** वाचतो, ती **सुरेख** गातें, आम्ही **स्वस्थ** बसलों, इ०.

( इ ) क्रियाविशेषण—तो **हळू** चालतो, हा प्रकार **सर्वत्र** आढळतो, तो **उद्यां** येईल, तो **मोठ्यानें** म्हणाला, इ०.

( ई ) शब्दयोगी—अव्ययान्त शब्द—**गेल्या वर्षापासून** तो आजारी आहे, **एका धोतरानिशीं** तो निघून गेला, तुम्हीं **माझ्याबरोबर** चलावें, **तुझ्या जाण्यापासून** त्यांना आनंद होईल, **आपल्या येण्यापासून** विशेष शोभा येईल, इ०.

( उ ) कृदन्त व वाक्यांश—तो **पळत** गेला, तो **चालतां चालतां** थकला, **आम्ही वाचीत बसलों असतां** मुली भातुकली खेळत होत्या, **उद्यां मुलांस बक्षिसें वांटण्यासाठीं** प्रांताच्या साहेबांस निमंत्रण करण्यांत आलें आहे.

६७२. नामांचा विधेय-विस्तारकांप्रमाणें कोणत्या विभक्तींत कोणत्या अर्थीं उपयोग होतो, हें आतां खुलासेवार सांगतों. म्हणजे वाक्यपृथक्करण बरेंच सुलभ होईल. येथें प्रत्येक विभक्तीच्या विधेयविस्तारक अर्थाचा फक्त नामनिर्देशच करितों. त्यांचीं उदाहरणें विभक्त्यर्थविचारांत दिलीं आहेत तीं पहावीं. त्यांची द्विरुक्ति किंवा तशाच प्रकारचीं दुसरीं उदाहरणें देऊन व्यर्थ जागा अडवीत नाहीं.

( अ ) प्रथमा—अधिकरण, अवधि किंवा अन्तर, इयत्ता किंवा परिमाण, मूल्य, प्रमाण.

( आ ) तृतीया—करण, अधिकरण, हेतु किंवा निमित्त, साहित्य, मूल्य, अवधि, इयत्ता किंवा परिणाम, सान्निधि किंवा सामीप्य, रीति, मनःस्थिति किंवा मनोविकार, अनुरोध.

( इ ) चतुर्थी---करण, अपादान, अधिकरण, उद्देश, हेतु किंवा प्रयोजन, मूल्य किंवा विनिमय, शरीरसंबंध किंवा नातें, स्वामित्व, अंगांगिभाव, प्रमाण, अपेक्षा किंवा विषय ( बाब ), मर्यादा.

( ई ) पंचमी--अपादान, अंतर.

( उ ) षष्ठी---कारण, अपादान, अधिकरण.

( ऊ ) सप्तमी---करण, अधिकरण, हेतु किंवा प्रयोजन, विषय किंवा संबंध, साहित्य किंवा परिस्थिति.

टीप---संबोधनवाचक शब्द हे वाक्याचे बाहेरचेच बहुधा गणले जात असल्यामुळें, त्यांस वाक्यपृथक्करणांत स्थळच नाहीं.

६७३. क्रियाविशेषणांचे अर्थ क्रियाविशेषणांचे अध्यायांत दिलेच आहेत. मागल्या अंकांतील माहितीवरून वाक्यांतील कोणत्या विभक्त्यन्त शब्दांस विधेय-विस्तारकें म्हणावें हें समजण्यास सुलभ जाईल. नामविशेषणाचा विधिविशेषणांप्रमाणें उपयोग झाला असतां, तीं विधेय--पूरकें किंवा विधेय--विस्तारकें असतात. तेव्हां विधिविशेषण विधेयपूरक नसल्यास, त्यास विधेय--विस्तारक म्हणावें. शब्दयोगी अव्ययान्त शब्द हे तर वाक्य-मीमांसेचे दृष्टीनें क्रियाविशेषणें म्हणजे विधेय--विस्तारकेंच होत. यावरून विधेय--विस्तारक नामें व विशेषणें ओळखण्याच्या व्याकरणाविषयक खुणा मिळतात. क्रियाविशेषणें व शब्दयोगी अव्ययान्त शब्द, हे तर नेहमींच विधेयाचा विस्तार करितात. तेव्हां विधेय--विस्तारक शब्दांपैकीं फक्त कृदन्त अव्ययें व वाक्यांश ह्यांचा विधेयविस्तारकांप्रमाणें कधीं उपयोग होतो, हें आतां सांगावयाचें राहिलें. तितकें सांगितलें म्हणजे विधेय--विस्तारकांची ओळख पटण्यास उशीर लागणार नाहीं.

६७४. कोणतेंही वाक्यांग किंवा शब्दसमुच्चय वाक्यामध्यें पुढील अर्थ दाखवित असतां, त्यास विधेय--विस्तारक म्हणावें. एखादें गौण वाक्यही या अर्थी विधेय--विस्तारक होऊं शकतें. पण त्यायोगें सबंध वाक्य मिश्र होत असल्यामुळें, या अध्यायांतील पुढील उदाहरणांत विधेयाविस्तारक गौण वाक्यांचा अन्तर्भाव करितां येत नाहीं. बाकी तींही या अर्थी विधेय--विस्तारकेंच होत हें उघड आहे.

( १ ) **स्थलवाचक.**

( अ ) स्थितिदर्शक—त्या उंच झाडाचे खालीं, तळ्यावरील पुतळीघराचे पाठीमागें, इ०.

( आ ) गत्यारंभदर्शक—हिंदुस्थानदेशाचे राजधानीपासून.

( इ ) गत्यन्तदर्शक—समुद्राचे किनाऱ्यापर्यंत, शुक्रवारांतील तुमच्या घरावेरीं.

( २ ) **कालवाचक.**

( अ ) क्षणवाचक—पांच वाजतां, नऊ वाजून दहा मिनिटांनीं, सूर्य उगवतांच, मी त्याच्या घरीं जाऊन पोचतांक्षणींच, इ०

( आ ) अवधिवाचक—सर्व आयुष्यभर, सकाळपासून सायंकाळपर्यंत, या उभ्या वर्षांत, त्याचे लग्नाचें घाटत असतां, तो अमेरिकेचा प्रवास करीत असतां, इ०.

( इ ) पौनःपुन्यवाचक—तो किती तरी वेळां [ आला, ] तोयाप्रमाणें उड्यांवर उड्या मारीत असतां, उडया मारून मारून, उडया मारमारून, तो आपल्या कथेंत मधून मधून [ मनोरंजक गोष्टी सांगतो ], इ०.

( ३ ) **अंश, कोटि,** किंवा **परिमाणदर्शक.**

( अ ) निश्चयदर्शक—छातीस हात लावून, बेंबीच्या देंठापासून, अगदीं मनापासून, तुझ्या गळ्या शपथ, वास्तविक म्हटलें असतां.

( आ ) अनिश्चयदर्शक—साधारणपणें पाहिलें असतां, हजार हिश्शांनीं, दैव अनुकूल असतां, इ०.

( ४ ) **रीति** किंवा **परिस्थितिदर्शक**—(त्यानें चेंडू) हात वर करून (फेंकला), इतकें मोठें सैन्य व युद्धसामग्रीबरोबर घेऊन ( त्यानें शत्रूवर हल्ला केला ), शांत अंतःकरणानें ( म्हणाला ) इ०.

( ५ ) **कार्यकारणदर्शक**—तो दगड मर्मी लागून ( त्या मांजराचा प्राण गेला ), मुलीचें लग्न करण्यासाठीं ( मुंबईस गेला ), उद्योग केला असतां ( पोट भरतें ), इ०.

६७५. याप्रमाणें केवल वाक्याचे पृथक्करण संपलें. यामध्यें वाक्यपृथक्करणाच्य बहुतेक सर्व मुख्य गोष्टींचा खुलासा झाला. मिश्रवाक्य व

कवाक्य ह्यांमध्यें वाक्यावाक्यांतील निरनिराळ्या संबंधाचा मात्र विशेष
ार व्हावयाचा असतो. तो पुढील अध्यायांत येईल. बाकी त्यांतील
यांचें पृथक्करण केवळ वाक्याच्या पृथक्करणाप्रमाणेंच करावयाचें असतें.
ां आतां केवळ वाक्याच्या वरील विवेचनावरून वाक्यांत कोणते अव-
असतात, तें सांगून कांहीं केवळ वाक्यांचें नमुन्यादाखल पृथकरण
न दाखवितों.

६७६. ( अ ) वाक्याचे मुख्य अवयव दोन. उद्देश्य व विधेय.

( आ ) उद्देश्याचे दोन पोटभाग करितात. मूल उद्देश्य आणि
य–विस्तारक.

( इ ) विधेयाचे तीन पोटभाग करितात: मूल विधेय, विधेयपूरक,
ि विधेय–विस्तारक. या तिन्हींपैकीं विधेयपूरकाचे पुन्हां दोन पोटभाग
तात. ते असे:––कर्म आणि पूरक. कर्में दोन प्रकारचीं आहेत,
क्ष कर्म आणि अप्रत्यक्ष कर्म. हीं दोन्ही कर्में याच सदरांत सांगून
े पुढें कंसांत प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष ह्याचा खुलासा करण्याची चाल
. त्याचप्रमाणें पूरकही दोन प्रकारचे आहे. एक उद्देश्यविषयक
ि दुसरें कर्मविषयक. दोहोंचाही पूरक या एकाच सदरांत अन्तर्भाव
न त्यांच्या पुढें कंसांत उद्देश्यविषयक किंवा कर्मविषयक हा खुलासा
ां हें चांगलें.

यावरून पुढील कोष्टक प्राप्त हात

| उद्देश. | | विधेय. | | | |
|---|---|---|---|---|---|
| उद्देश्य. | उद्देश्य-विस्तारक. | मूल विधेय. | विधेय पूरक. | | विधेय विस्तारक |
| | | | कर्म. | पूरक. | |
| | | | | | |

६७७. आतां कांहीं केवल वाक्यांचें पृथक्करण करून दाखवितों.

( अ ) इंग्लंडच्या राजाचें सिंहासन कधींही रिकामें नसतें.

| मूल उद्देश्य. | उद्देश्य-विस्तारक. | मूल विधेय | कर्म | विधेयपूरक | विधेय-विस्तारक |
|---|---|---|---|---|---|
| सिंहासन | इंग्लंडच्या राजाचें | नसतें | ... | रिकामें ( उद्देश्य-विषयक ) | कधींही |

स्पष्टीकरण--वरील वाक्यांत अकर्मक कर्तरि प्रयोग आहे. यांतील सिंहासन हा कर्ता मूल उद्देश्य होतो; आणि नसतें हें क्रियापद मूल विधेय होतें. ' इंग्लंडच्या राजाचें ' हे शब्द सिंहासन या उद्देश्या संबधाचे आहेत; तेव्हां ते उद्देश्य–विस्तारक होत. रिकामें हें विधि–विशेषण सिंहासन या कर्त्यास उद्देशून आलेलें आहे; तेव्हां तें पूरक होय ( अंक ६६४ ); आणि कधींही हें क्रियाविशेषण विधेय–विस्तारक आहे, हें उघड आहे ( अंक ६७१ ).

( आ ) या कृत्याबद्दल आम्ही येथें जमलेले सर्व लोक आपलें मनः—पूर्वक अभिनंदन करितों.

| मूळ उद्देश्य | उद्देश्य-विस्तारक | मूळ विधेय | कर्म | विधेय-पूरक | विधेय विस्तारक |
|---|---|---|---|---|---|
| आम्ही | येथें जमलेले सर्व लोक | करितों | आपलें अभिनंदन | ... | या कृत्याबद्दल, मनःपूर्वक |

स्पष्टीकरणः—वरील वाक्यांत, आम्ही हा कर्ता, अभिनंदन हें कर्म, आणि करितों हें क्रियापद, सकर्मक कर्तरि प्रयोग आहे. यावरून आम्ही हें मूळ उद्देश्य, आणि करितों हें मूळ विधेय, हें उघडच आहे. येथें जमलेले सर्व लोक, हे आणि आम्ही, हे समानाधिकरण शब्द आहेत; तेव्हां ' येथें जमलेले सर्व लोक ' हे उद्देश्य–विस्तारक शब्द होत, हें उघड आहे; ( अंक ६५८ ). आपलें हें षष्ठ्यन्त पद अभिनंदन या कर्माकडे

जातें. कर्माचाही उद्देश्याप्रमाणेंच विस्तर होतो, हें पूर्वीं सांगितलें आहे. तथापि कर्म हा अवयव उद्देश्याप्रमाणें मुख्य नसून, केवल विधेयाचे पोटांत येणारा असल्यामुळें, त्याचा विस्तार करणारे शब्द वेगळे सांगण्याची चाल नाहीं; तर कर्माचेच सदरांत कर्माबराबरच त्याचा विस्तार सांगण्याची चाल पडली आहे. म्हणून ' आपलें अभिनंदन ' हे शब्द कर्म या सदरांत जातात. ' या कृत्याबद्दल ' हे शब्दयोगी अव्ययान्त शब्द, आणि मनः—पूर्वक हें क्रियाविशेषण, हीं दोन विधेय—विस्तारकें होत.

( इ ) प्रथम व्याख्यात्यांच्या चिकित्सक पद्धतीच्या विवेचनाबद्दल त्यांचें अभिनंदन करून व आभार मानून, अध्यक्ष रा० फणसळकर ह्यांनीं आपल्या अस्खलित भाषणास सुरवात केली.

| मूळ उद्देश्य | उद्देश्य-विस्तारक | मूल-विधेय | कर्म | वि० पूरक | विधेय-विस्तारक |
|---|---|---|---|---|---|
| ह्यांनीं | अध्यक्ष रा. फणसळकर | केली | आपल्या अस्खलित भाषणास ( अप्रत्यक्ष ); सुरुवात ( प्रत्यक्ष ) | ... | प्रथम ...... करून व आभार मानून |

स्पष्टीकरण——वरील वाक्यांत ' यांनीं सुरवात केली ' हा प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोग आहे. तेव्हां यांनीं हें उद्देश्य, केली हें विधेय, व सुरवात हें कर्म होय. अध्यक्ष 'रा० फणसळकर' हे शब्द उद्देश्याशीं समानाधिकरण असून, त्याचा विस्तार करितात. ' आपल्या अस्खलित भाषणास ' हें चतुर्थ्यन्त अप्रत्यक्ष कर्म होय. आणि प्रथम....करून व आभार मानून, हीं दोन वाक्यांगें कालदर्शक विधेय—विस्तरकें होत.

( ई ) या वहिवाटीस अनुसरून कालरोजीं पार्लमेंटाच्या दोनही सभांचे सभासद आणि प्रीव्ही कौन्सिल यांच्या बैठकी होऊन, एडवर्ड बादशहांचे युवराज यांची पांचवे जॉर्ज राजे अशी द्वाही ६९ तोफांचे सलामींत फिरविण्यांत आली. ( नवीन कर्मणि ).

| मूल उद्देश्य | उद्देश्य-विस्तारक | मूल विधेय | कर्म | विधेय पूरक | विधेय-विस्तारक |
|---|---|---|---|---|---|
| द्वाही | एडवर्ड बादशहांचे युवराज यांची, 'पांचवे जार्ज राजे' अशी | फिरविण्यांत आली | ... | ... | या वहिवाटीस अनुसरून; कालरोजीं......बैठकी होऊन; ६९ तोफांचे सलामीत. |

स्पष्टीकरण---वरील वाक्यांत 'द्वाही फिरविण्यांत आली' हा एक प्रकारचा नवीन कर्मणि प्रयोग आहे, हें उघड आहे. तेव्हां यांत द्वाही हें उद्देश्य, फिरविण्यांत आली हें विधेय; उद्देश्य-विस्तारकें व विधेय-विस्तारकें स्पष्टच आहेत.

( उ ) या कामीं आमच्याकडून तुम्हांस कोणत्याही प्रकारचा अडथळा केला जाणार नाहीं ( नवीन कर्मणि ).

| मू० उ० | उद्देश्यविस्तार | मूल विधेय | कर्म | विधेय-पूरक | विधेय विस्तारकें |
|---|---|---|---|---|---|
| अडथळा | कोणत्याही प्रकारचा | केला जाणार नाहीं | तुम्हांस (अप्रत्यक्ष) | ... | या कामीं, आमच्याकडून; |

( ऊ ) या प्रसंगींच्या दुःखामुळें माझ्यानें अथवा मला आपल्यासमोर चार शब्दांपेक्षां अधिक लांब भाषण करवत नाहीं; ( शक्य कर्मणि ).

| मू० उ० | उद्देश्य-विस्तार | मूल विधय | कर्म | विधेय-पूरक | विधेय-विस्तारकें |
|---|---|---|---|---|---|
| भाषण | चार शब्दांपेक्षां अधिक लांब | करवत नाहीं | ... | ... | या प्रसंगींच्या दुःखामुळें; माझ्यानें अथवा मला |

स्पष्टीकरण---वरील वाक्यांत शक्य कर्मणि प्रयोग आहे. शक्य कर्मणि क्रियापदांचीं साधनिका व अर्थ यांसंबंधानें या ग्रंथांत जें स्पष्टीकरण केलें आहे, त्यावरून शक्य कर्मणि क्रियापद ज्या वाक्यांत असतें, त्या वाक्यांत गौणकर्तृक कर्मणि प्रयोग असतो हें उघड आहे. त्यास अनुसरून भाषण हें उद्देश्य, करवत नाहीं हें मूल विधेय, माझ्यानें अथवा मला हें विधेय–विस्तारक होय. बाकीचें स्पष्टच आहे.

( ऋ ) व्याकरणावरील माझा हा ग्रंथ अंदाजाच्या मानानें फारच थोड्या मुदतींत लिहून झाला. ( समापनकर्मणि प्रयोग ).

| मूल उद्देश्य | उद्देश्यविस्तार | मूल विधेय | कर्म | विधेय-पूरक | विधेय-विस्तारक |
|---|---|---|---|---|---|
| ग्रंथ | व्याकरणावरील माझा हा | लिहून झाला | ... | ... | अंदाजाचे मानानें फारच थोड्या मुदतींत |

[ ऌ ] त्या घोडयास वठणीवर आणण्याकरितां सइसानें त्याला खूब मारिलें. [ प्रधानकर्तृक भावे प्रयोग ].

| मूल उद्देश्य | उद्देश्य-विस्तार | मूल विधेय | कर्म | विधेय-पूरक | विधेय-विस्तारक |
|---|---|---|---|---|---|
| सइसानें | ... | मारिलें | त्याला (प्रत्यक्ष) | ... | त्या घोड्यास वठणीवर आणण्याकरितां; खूब |

[ ए ] या प्रसंगीं तूं त्याला भेटावयास जावें किंवा गेलें पाहिजे.

| मू० उ० | उद्देश्य-विस्तार | मूल विधेय | कर्म | विधेय-पूरक | विधेय-विस्तारक |
|---|---|---|---|---|---|
| तूं | ... | जावें किंवा गेलें पाहिजे | ... | ... | या प्रसंगीं; याला भेटावयास |

स्पष्टीकरण—वरील वाक्यांत प्रधानकर्तृक अकर्मक भावे प्रयोग आहे. त्याला भेटावयास ( त्याला भेटण्यासाठीं ) हें हेतुदर्शक चतुर्थ्यन्त वाक्यांग विधेयाचा विस्तार करणारें आहे.

( ऐ ) त्याचें आतांपर्यंत निजून झालें. [ समापनभावे प्रयोग ]

| मूल उद्देश्य | उद्देश्यविस्तार | मूळ विधेय | कर्म | पूरक | विधेय-विस्तारक |
|---|---|---|---|---|---|
| निजणें (क्रियापदा-न्तर्गत ) | ... | निजून झालें ( उद्देश्यासह ) | ... | ... | आतांपर्यंत; त्याचे |

स्पष्टीकरण—समापनभावे हा एक गौणकर्तृक भावे प्रयोग आहे. ह्या संबंधाचें विवेचन वाक्यपृथक्करणाचे विषयोपन्यासांत सविस्तर केलें आहे तें पहावें.

( ओ ) त्याला अद्याप दिवसास दहा मैल चालवतें. [ शक्य भावे ]

| मूल उद्देश्य | उ० वि० | मू० विधेय | कर्म | पूरक | विधेय-विस्तारक |
|---|---|---|---|---|---|
| चालणें (क्रिया-पदान्तर्गत ) | ... | चालवतें (उद्देश्यासह) | ... | ... | त्याला अद्याप, दिव-सास १० मैल. |

स्पष्टीकरण—गौणकर्तृक प्रयोगासंबंधाचें वाक्य-पृथक्करण कसें करावें, याबद्दलचें विषयोपन्यासांतील विवेचन पहावें.

( औ ) मला शहराबाहेरच सांजावलें. ( जकर्तृक भावे ).

| मूळ उद्देश्य | उ० वि० | मूळ विधेय | कर्म | पूरक | वि०विस्तारक |
|---|---|---|---|---|---|
| सांज ( क्रिया-पदान्तर्गत ) | ... | सांजावलें (उद्देश्यासह) | ... | ... | मला; शहरा-बाहेरच |

( अं ) तुम्ही कालेजामध्यें परीक्षेच्याशिवाय बरींच पुस्तकें वाचलींत. ( कर्तृ—कर्म—संकर ).

| मूळ उद्देश्य | उ० वि० | मू० वि० | कर्म | पूरक | वि० वि० |
|---|---|---|---|---|---|
| तुम्हीं | ... | वाचलींत | परीक्षेच्याशिवाय बरींच पुस्तकें | ... | कालेजामध्यें |

( अः ) माझ्या नणंदेच्या सासूनें तिला उभ्या वर्षांत एकदांही माहेरीं पाठविलीं नाहीं. ( कर्मभाव—संकर ).

| मूल उद्देश्य | उद्देश्यविस्तार | मूल विधेय | कर्म | पूरक | वि० विस्तार |
|---|---|---|---|---|---|
| सासूनें | माझ्या नणंदेच्या | पाठविली नाहीं | तिला (प्रत्यक्ष) | ... | उभ्या वर्षांत एकदांही माहेरीं. |

सर्व प्रयोगांतील निरनिराळ्या नमुन्याच्या केवल वाक्यांचें वाक्यपृथक्करण कसें करावें हें वरील उदाहरणांच्या खुलाशानें वाचकांस कळून येईल. कर्मणि व भावे या प्रयोगांचे जे प्रकार या ग्रंथांत दाखविले आहेत ते वाक्यपृथक्करणदृष्ट्या किती महत्त्वाचे आहेत हेंही यावरून समजेलच.

---

## अध्याय ४.

---

### मिश्र वाक्य.

६७८. मिश्र वाक्यामध्यें एक मुख्य किंवा प्रधान उद्देश्य आणि एक मुख्य किंवा प्रधान क्रियापद असतें; आणि एक किंवा अधिक इतर उद्देश्यें व क्रियापदें असतात. ज्या भागांत प्रधान उद्देश्य व प्रधान क्रियापद असतें त्यास **प्रधान वाक्य** असें ह्मणतात; आणि अन्य वाक्यांस **गौण वाक्यें** असें ह्मणतात.

६७९. मिश्र वाक्यांत प्रधान वाक्य एकच असतें; आणि एक किंवा अधिक गौण वाक्यें असूं शकतात. गौण वाक्यें **तीन** प्रकारचीं आहेत. **नामवाक्य, विशेषणवाक्य,** आणि **क्रियाविशेषणवाक्य.**

( अ ) केवल वाक्यांत ज्या स्थळीं नाम येतें त्या स्थळीं येणारे वाक्यास नामवाक्य म्हणतात. जसें:—तो पूर्वींच आला हें वाईट झालें, या वाक्यांत 'तो पूर्वींच आला' हें गौण वाक्य नामवाक्य आहे. तें प्रधान वाक्याचे उद्देश्याचे जागीं आलें आहे. त्याचें पूर्वींचें आगमन वाईट झालें, हें केवल वाक्य होय. यांत त्याचें पूर्वींचें आगमन हें उद्देश्य होय. याचे जागीं तो पूर्वींच आला हें वाक्य येऊन प्रकृत मिश्र वाक्य होतें.

( आ ) केवल वाक्यांत ज्या स्थळीं विशेषण येऊं शकतें, त्या स्थळीं येणाऱ्या वाक्यास विशेषणवाक्य असें म्हणतात. जसें— त्यापैकीं जो मनुष्य उंच होता तो पुढें आला; ह्या मिश्रवाक्यांतील जो मनुष्य उंच होता हें गौण वाक्य आहे. त्यांपैकीं उंच मनुष्य पुढें आला असें जर वाक्य असेल तर तें केवलवाक्य होय. ह्यांत उंच हें विशेषण मनुष्य ह्या मूळ उद्देश्याचें विस्तारक आहे. त्या विशेषणाचे जागीं 'जो मनुष्य उंच होता' असें वाक्य आल्यामुळें त्यास विशेषणवाक्य असें म्हणतात. या विशेषणवाक्यामुळेंच मूळचें केवळवाक्य मिश्रवाक्य होत आहे.

( इ ) केवल वाक्यांत ज्या स्थळीं क्रियाविशेषण येऊं शकतें त्या स्थळीं येणाऱ्या वाक्यास क्रियाविशेषणवाक्य असें म्हणतात. जसें:— आज सूर्य मावळला तेव्हां मी घरींच होतों. या वाक्यांतील 'आज सूर्य मावळला' हें गौण वाक्य क्रियाविशेषणवाक्य होय. आज सूर्यास्ताचे वेळीं मी घरींच होतों, असें जर वाक्य असेल तर तें केवल वाक्याचें उदाहरण होय. ह्यांपैकीं 'आज सूर्यास्ताचे वेळीं' हें कालदर्शक वाक्यांग क्रियाविशेषणासारखें विधेयविस्तारक आहे. याचे जागीं 'आज सूर्य मावळला तेव्हां' हें वाक्य येतें म्हणून तें क्रियाविशेषणवाक्याचे उदाहरण होय. यामुळेंच मुळचें केवल वाक्य मिश्र वाक्य होत आहे.

टीप—यावरून असें दिसून येईल कीं मिश्र वाक्यांतील गौणवाक्यांचे जागीं त्यांच्या त्यांच्या जातीस अनुसरून त्या अर्थाचीं नामें, विशेषणें, किंवा क्रिया-

विशेषणें घातलीं असतां मिश्र वाक्यांतील प्रधानवाक्य हें एक केवल वाक्य होतें. आणि ह्याचे उलट केवल वाक्यांतील नामें, विशेषणें, व क्रियाविशेषणें यांचे जागीं त्याच अर्थाचीं तदनुरूप नामवाक्यें, विशेषणवाक्यें, किंवा क्रियाविशेषणवाक्यें घातलीं असतां तें मूळचें केवल वाक्य प्रधानवाक्य होऊन संबंध वाक्यास मिश्रत्व प्राप्त होतें, म्हणजे त्या संबंध वाक्याचें केवल वाक्यत्व नष्ट होऊन तें मिश्र वाक्याचें उदाहरण होतें.

६८०. ज्याप्रमाणें एका केवल वाक्यांत समानाधिकरण नामें किंवा विशेषणें किंवा क्रियाविशेषणें असूं शकतात, त्याचप्रमाणें एका मिश्रवाक्यांत समानाधिकरण दोन गौण वाक्यें येऊं शकतात. जसें:—त्यानें जें वाचलें आणि तो जें बोलला तें ऐकून मला फार आश्चर्य वाटलें. या मिश्र वाक्यांत 'तें ऐकून मला फार आश्चर्य वाटलें' हें प्रधान वाक्य असून 'त्यानें जें वाचलें' आणि 'तो जें बोलला' हीं दोन गौणवाक्यें आहेत. हीं दोन्ही 'ऐकून' या कृदन्ताचीं कर्में आहेत; म्हणून हीं **नामवाक्यें समानाधिकरण गौण** वाक्यें होत ह्यांचे जागीं नामें घातलीं असतां तीं दोन्ही नामें समनाधिकरण आहेत असें दिसेलच. 'त्याचें वाचन व भाषण ऐकून मला आश्चर्य वाटलें.' या वाक्यामध्यें वाचन व भाषण यांचा प्रधान वाक्याशीं एकाच प्रकारचा—ऐकून या कृदन्ताचे कर्माचा संबंध आहे हें उघड आहे तें ऐकून मला आश्चर्य वाटलें, हें प्रधान वाक्य एकच असल्यामुळें त्यांतील दोन गौण वाक्यांचा समानाधिकरण संयोग करून एक मिश्रवाक्य तयार होतें. मिश्र वाक्यांतील गौणवाक्यें याप्रमाणें समानाधिकरण असतात किंवा व्यधिकरण म्हणजे असमानाधिकरण असतात; म्हणजे त्यांचा प्रधान वाक्याशीं एकाच प्रकारचा संबंध नसतां भिन्न भिन्न प्रकारचाही असतो. द्रोणाचार्य जरी युद्धकलेंत निपुण व शूर होते, तरी अश्वत्थामा रणांत पडला ही बातमी ऐकून यांना क्षणभर मूर्च्छा आली. या वाक्यांत 'ही बातमी ऐकून त्यांना क्षणभर मूर्च्छा आली' हें प्रधानवाक्य आहे. अश्वत्थामा रणांत पडला, हें गौणवाक्य नामवाक्य आहे आणि **ही बातमी** या शब्दांशीं समानाधिकरण आहे. द्रोणाचार्य जरी युद्धकलेंत निपुण व शूर होते हें गौण वाक्य संकेतदर्शक असून तें प्रधान वाक्याशीं क्रियाविशेषणाप्रमाणें संबद्ध आहे. म्हणजे या संबंध वाक्यांतील दोन गौण वाक्यांपैकीं एक नामवाक्य व दुसरें क्रियाविशेषणवाक्य असल्यामुळें तीं दोन्ही समानाधिकरण नसून

व्याधिकरण आहेत. गौण वाक्यें समानाधिकरण असोत किंवा व्यधिकरण असोत तीं एकाच प्रधान वाक्याशीं संबद्ध असलीं म्हणजे त्या सबंध वाक्यास मिश्र वाक्यच म्हणतात. म्हणजे मिश्र वाक्याची मूळ खूण अशी कीं त्यांत एकच प्रधान वाक्य असावें; मग त्यांत एक किंवा अनेक गौण वाक्यें असोत, आणि तीं अनेक असतील तेव्हां तीं समानाधिकरण असोत किंवा व्यधिकरण असोत; तीं कशींही असलीं तरी सबंध वाक्य मिश्रच होय.

६८१ नामवाक्य, विशेषणवाक्य, व क्रियाविशेषण वाक्य असे गौण वाक्याचे तीन प्रकार सांगितले. यांपेक्षां गौण वाक्याचे अधिक प्रकार होऊंच शकत नाहींत, कारण कीं वाक्यामध्यें उद्देश्य व विधेय हे दोन मुख्य अवयव होत. ह्यापैकीं उद्देश्य हें प्रायः नाम असतें; त्याचे जागीं वाक्य असल्यास तें नामवाक्य होय. विधेयाचे जागीं वाक्य येऊंच शकत नाहीं. कारण कीं, मूल विधेय म्हणजे क्रियापद, याचा अर्थ वाक्यानें प्रकट करणें शक्य नाहीं. उद्देश्याचा विस्तार बहुधा विशेषणांनीं आणि मूल विधेयाचा म्हणजे क्रियापदांचा क्रियाविशेषणांनीं होतो. या दोहोंचे जागीं गौण वाक्यें येऊं शकतात. त्यांस अनुक्रमें विशेषणवाक्यें व क्रियाविशेषणवाक्यें म्हणतात. यांशिवाय मूल विधेयास कर्म व पूरक असतात. तींही बहुधा नामें व विशेषणेंच असतात. यामुळें त्यांच्या जागींही येणारीं वाक्यें नामवाक्यें व विशेषण वाक्येंच असावयाचीं. याशिवाय वाक्यामध्यें असा दुसरा कोणता अवयवच नाहीं कीं ज्याचे जागीं वाक्य येऊं शकेल. यामुळें गौण वाक्यें फक्त तीनच प्रकारचीं आहेत.

## नामवाक्य.

६८२. नामवाक्यें खालील जागीं येतातः—

**उद्देश्य**—तुम्ही आलांत हें फार चांगलें झालें.

**कर्म**—मी उद्यां येईन असें तो म्हणाला.

**समानाधिकरणपद**—सातवे एडवर्ड बादशहा एकाएकी परलोकवासी झाले ही बातमी ऐकून हिंदुस्थानांतील लोकांस साश्चर्य दुःख झालें.

**पूरक** ( विधिनाम )—आज लोकांसमोरील प्रश्न हा आहे कीं, आपल्या मुलांस योग्य शिक्षण कसें द्यावें.

स्पष्टीकरण—पहिल्या वाक्यांत हें म्हणजे 'तुह्मी आलांत' हें; तेव्हां तें वाक्य उद्देश्याचे जागीं आलें आहे. दुसऱ्यांत **असें** हें कर्म आहे; आणि असें=मी उद्यां येईन; ह्मणून, मी उद्यां येईन, हें वाक्य कर्म-स्थानीं आलें आहे. तिसऱ्यांत **ही बातमी**=सातवे एडवर्ड बादशहा एकाएकीं परलोकवासी झाले; ह्मणून हें वाक्य व बातमी हीं समानाधिकारण पदें आहेत. आणि चवथ्यांत हा = आपल्या मुलांस योग्य शिक्षण कसें द्यावें; **हा हें आहे** या अकर्मक क्रियापदाचें पूरक आहे; तेव्हां 'आपल्या मुलांस योग्य शिक्षण कसें द्यावें' हें वाक्य त्या पूरकाचे जागीं आलें आहे हें उघड आहे.

टीप—वाक्यामध्यें नामवाक्य येण्याचीं हीं चार स्थानें होत. यांपैकीं कर्ता, कर्म आणि पूरक हीं मुख्य स्थानें होत. समानधिकरण हें स्थान निश्चित नाहीं. विशेषणात्मक वाक्यांश, क्रियाविशेषणात्मक वाक्यांश, किंवा दुसरा कोणताही वाक्यांश, यांमध्यें जर एखादें नाम येत असेल तर त्याचे जागींहीं किंवा त्याच्याशींही समानाधिकरण असणारें नामवाक्य आढळतें. जसें:—त्या उदाहरणाची रीति तो आपल्या मुलास समजावून देत असतां मी तेथें पोंचलों. हें एक केवल वाक्य आहे; आणि 'त्या उदाहरणाची रीति तो आपल्या मुलास समजावून देत असतां' हें विधेय—विस्तारक आहे. या विधेय—विस्तारकामध्यें 'त्या उदाहरणाची रीति' इतकें समजावून ह्याचें कर्म आहे. त्याचें जागीं 'तें उदाहरण कसें करावें हें' असें नामवाक्य येऊं शकतें. पण तें मूळ वाक्याचे उद्देश्यस्थानींही नाहीं, कर्मस्थानींही नाहीं आणि पूरकस्थानींही नाहीं. तर विधेय—विस्तारान्तर्गत कृदन्ताचे कर्मस्थानीं आहे. वर जीं नामवाक्यांचीं स्थानें दाखविलीं आहेत तीं मिश्र वाक्यांतील प्रधान वाक्यासच उद्देशून होत, असा कोणी गैरसमज करून घेऊं नये; तर तीं प्रधानवाक्यान्तर्गत वाक्यांगासंबंधानेंही समजलीं पाहिजेत हें उघड आहे.

६८२ नामवाक्याचा प्रधान वाक्याशीं असणारा संबंध पुढील प्रकारांनीं जोडण्यांत येतो:—

(अ) जेव्हां प्रधान वाक्यांतील मूळ विधेयाचे पूर्वीं नामवाक्य हें उद्देश्याचे जागीं येतें, तेंव्हां त्याचे पुढें 'हें' हें दर्शक सर्वनाम किंवा क्वचित् 'असें' हें नाम येऊन क्रियापद त्याच्याच लिंगवचनपुरुषाप्रमाणें असतें. जसें:—तो काल गेला, हें फार चांगलें झालें. प्रत्येक मनु-

ष्यानें खरें बोलावें हें त्यास इहपरलोकीं पुण्यकारक आहे, तूं काल आलास हें किंवा असें मला गोविंदरावांपासून समजलें, इ०.

परंतु प्रधान वाक्यांत जर वर सांगितलेलें एखादें विधिनाम विधेय-पूरकाचे जागीं येत असेल, तर वर सांगितलेलें दर्शक सर्वनाम त्या विधि-नामाचे लिंगवचनाप्रमाणें असतें. जसें:—प्रत्येकानें यथाशक्ति धर्म करावा ही नीति आहे किंवा हा प्रत्येकाचा धर्म आहे किंवा हें प्रत्येकाचें कर्तव्य-कर्म आहे, तूं त्या ठिकाणीं काल नव्हतास ही फार चांगली गोष्ट झाली, इ०.

[ आ ] नामवाक्य जेव्हां क्रियापदाचे किंवा कृदन्ताचे कर्मस्थानीं पण त्या क्रियापदाचे किंवा कृदन्ताचे पूर्वी येतें, तेव्हां त्याचे पुढें हें किंवा बहुधा असें हा शब्द येतो. जसें:—ते उद्यां येथें येणार हें किंवा असें मला गोविंदरावांनीं सांगितलें, त्यास उद्यां फांशीं देणार असें [लोक] म्हणतात इ०.

टीप:—उद्देश्य व कर्म या स्थानीं येणाऱ्या नामवाक्याचेपुढें हें किंवा असें हे जे शब्द येतात म्हणून ( अ ) व ( आ ) या कलमांत सांगितलें, ते कवितेंत बऱ्याच ठिकाणीं अध्याहृत असतात; आणि प्रचलित गद्यांत जरी ते शब्द स्पष्ट घालण्याची चाल आहे तरी प्रचलित गद्यांतही ते कधीं कधीं अध्याहृत असलेलीं उदाहरणें आढळतात. जसें:—

धर्मासि म्हणे ' राया, आले यज्ञोत्सवार्थ नगरा जे
त्यामध्यें पूजावा त्वां प्रथम श्रेष्ठ, सर्व मग राजे'—मोरोपंत.

तूं आलास, ( हें ) बरें झालें; तो कधीं येतो ( हें ) कोणास ठाऊक; हें कसें झालें ( हें ) कोण जाणे; त्याला काय झालें ईश्वर जाणे; इ०.

( इ ) जेव्हां प्रधान वाक्यांतील उद्देश्य किंवा कर्म किंवा पूरक किंवा इतर कोणत्याही ठिकाणचें नाम, याशीं समानाधिकरण म्हणून नाम-वाक्याचा उपयोग झालेला असतो, तेव्हां पुढें ' हा ' किंवा ' असा ' हे शब्द त्या नामाच्या लिंगवचनाप्रमाणें येतात. जसें:— तो घर सोडून निघून गेला ही गोष्ट कांहीं चांगली झाली नाहीं, महाराज साहेबांस पुत्र झाला ही बातमी किंवा हें वर्तमान मीं कोणत्याशा वर्तमानपत्रांत वाचलें, माझी कल्पना त्यानें आतां लग्न करावें अशी आहे, मी यंदां पास होईन या गोष्टीबद्दल मला मुळींच शंका नाहीं, तो कधीं जाणार या प्रश्नाशीं तुला काय करावयाचें आहे, इ०.

टीप:—नामवाक्याचे अंती येणाऱ्या या ' हा ' किंवा ' असा ' शब्दांचे जागीं कधीं कधीं ' म्हणून ' या स्वरूपदर्शक उभयान्वयी अव्ययाचाही उपयोग झालेला आढळतो. जसें:—मी उद्यां येईन म्हणून तो बोलला, मी तुला यथाशक्ति मदत करीन म्हणून त्यानें मला वचन दिलें आहे, इ०.

[ ई ] जेव्हां प्रधान वाक्याचे नंतर नामवाक्य येतें, तेव्हां प्रधान वाक्याचे अंतीं व नामवाक्याचे आरंभीं प्राय: 'कीं' हे स्वरूपदर्शक उभयान्वयी अव्यय येतें आणि पुढील नामवाक्यास उद्देशून प्रधान वाक्यांत हें किंवा असें हा शब्द येतो किंवा कधीं कधीं अध्याहृतही असतो. जसें:—तो [ असें ] म्हणाला कीं, यंदां कोंकणांत पीकपाणी चांगलें आहे, माझा हेतु [ असा ] आहे कीं, आपण आणखी चार दिवस तरी रहावें, त्याचा परिणाम हा किंवा असा झाला कीं, अखेरीस त्यास हिंवतापानें चार महिने पडून रहावें लागलें, आज परसूनें खबर आणिली आहे कीं, बादशहा मरण पावला, भवितव्यता बलीयसी या म्हणीविषयीं माझें मत असें कीं, मनुष्यानें प्रयत्न करून केवळ यशापयशासंबंधानें तिचा हवाला द्यावा, इ०.

[ उ ] कोणत्याही नामाशीं नामवाक्य समानाधिकरण असतां तें समानाधिकरणपदाचे पूर्वीं किंवा नंतर येतें, त्याचा प्रधान वाक्याशीं संबंध जोडण्याचा आणखी एक प्रकार आढळतो. तो असा:—[ १ ] नामवाक्य त्या समानाधिकरण पदाचे पूर्वीं आल्यास त्या पदाचे लिंगवचनाप्रमाणें त्या नामवाक्याचे अंतीं ' हें जें ' किंवा ' असें ' जें हे शब्द येतात व त्याचे नंतर तें समानाधिकरण पद येऊन त्याचे पुढें **तो** हें दर्शक सर्वनाम त्या पदाचे लिंगवचनाप्रमाणें येतें, जसें:—या रोप्याचीं फळें आपल्या हयातींत आपणास खावयास मिळावीं हा जो आपला हेतु तो सिद्धीस जाईल असें मला वाटत नाहीं, या जागेचे पांचशें रुपये येतील हा जो अंदाज तो जरासा फाजीलच आहे, त्याला ही बातमी समजली नाहीं अशी जी तुझी कल्पना ती बरोबर नाहीं, इ०, [ २ ] समानाधिकरणपदाचे पुढें नामवाक्य आल्यास त्या पदाचे पुढें व नामवाक्याचे आरंभीं **कीं** हें अव्यय येऊन त्याचे अंतीं ' तो ' हें दर्शक सर्वनाम समानाधिकरणपदाचे लिंगवचनाप्रमाणें येतें. जसें:—माझी कल्पना कीं, तो आज सकाळीं यावा, ती अगदींच चुकली; माझी सूचना कीं, या ठिकाणीं जकातीचें एक नाकें असावें, तिला कोणीच विचारीत नाहीं. इ०

टीप १—जो व तो यासंबंधीं व अनुसंबंधीं आणि तो या दर्शक सर्व-नामांचा हा उपयोग संस्मरणीय आहे.

टीप २—उभयान्वयी अव्ययांच्या गौणत्वसूचक या वर्गामध्यें स्वरूपदर्शक उभयान्वयीं अव्ययें म्हणून एक भेद आहे. कीं, म्हणून, हीं स्वरूपदर्शक उभयान्वयी अव्ययें नामवाक्याचें गौणत्व सुचवितात हें वरील नियमावरून व उदाहरणांवरून वाचकांस समजलेंच असेल. कधीं कधीं कीं, ह्याचे जागीं 'जे' ह्या स्वरूपदर्शकाचाही उपयोग होतो, हें उभयान्वयी अव्ययांचे विवेचनांत सांगितलेंच आहे. जसें:—करारनामा लिहून देतों ऐसा जे, विनंती ऐसी जे, इ०

( ऊ ) प्रश्नार्थक गौण वाक्य नामवाक्याचे जागीं आलें असतां त्याचे पुढें तें किंवा हें ह्या दर्शक सर्वनामाचा उपयोग करितात. जसें:—तो कधीं येणार आहे तें किंवा हें मला माहीत नाहीं. तो कोठें गेला तें मला सांग, इ०

[ अशा प्रकारच्या वाक्यरचनेच्या सविस्तर ऊहापोहासाठीं पुढील अंक ६८५ ( इ ) पहा. ]

## विशेषणवाक्य.

६८४. वाक्यांमधील विशेषणाचे जागीं विशेषणवाक्य येऊं शकतें, हें पूर्वींच सांगितलें आहे. विशेषणें नामाचे पूर्वींच किंवा नंतर येतात. नंतर येणार विशेषणांस विधिविशेषण असें म्हणतात. विधिविशेषणाचे जागीं विशेषणवाक्य बहुधा येत नाहीं, वाक्यामध्यें नाम हें उद्देश्य, कर्म, क्रियाविशेषणार्थक विभक्त्यन्त शब्द किंवा वाक्यांश, आणि पूरक, इतक्या ठिकाणीं येतें. तेव्हां इतक्या ठिकाणच्या नामांस विशेषणवाक्य मर्यादित करूं शकतें; म्हणजे विशेषणवाक्यही इतक्या चार ठिकाणीं येऊं शकतें. जसें:—

उद्देश्य-विस्तारक—जे विद्यार्थी चांगला अभ्यास करितात ते यशस्वी होतात.

कर्मविस्तारक—आज जी संपत्ति त्याजपाशीं आहे, ती त्यानें स्वतःच्या पराक्रमावर मिळविली आहे.

| | |
|---|---|
| क्रियाविशेषणार्थक विभक्त्यन्त शब्दाचें विशेषण ( विधेयविस्तारकान्तर्गत नामाचें विशेषण ) | ' ज्या दसऱ्याला आतां मराठे लोक फक्त शमीपूजनासाठीं सीमोल्लंघन करितात, त्या दसऱ्याला पेशवाईंत मराठे सरदार शत्रूवर मोहीम करण्यास नगराबाहेर पडत. ' |

पूरकाचें विशेषण—' ज्यानें बापाच्या उज्वल कीर्तीला सर्व प्रकारें काळोखी आणिली असा कुलकलंक संभाजी निघाला. '

स्पष्टीकरण—पहिल्यांत ' जे विद्यार्थी....करितात ' हें विशेषणवाक्य 'ते' ह्या उद्देश्याचें विस्तारक आहे दुसऱ्यांत ' आज जी....आहे ' हें विशेषणवाक्य ' ती ' ह्या कर्माचा विस्तार करीत आहे. तिसऱ्यांत ज्या दसऱ्याला....करितात ' हें विशेषणवाक्य आहे, आणि ' तें ' त्या दसऱ्याला ह्यांतील 'दसरा' शब्दाच्या अर्थाचें पोषक आहे. त्या दसऱ्याला हें ' मराठे सरदार बाहेर पडत ' या प्रधान वाक्यांतील कालदर्शक विधेयविस्तारक आहे. म्हणून ' ज्या दसऱ्याला....करितात ' हें विशेषणवाक्य विधेयविस्तारक विभक्त्यन्त नामाचें विशेषण आहे हें उघड आहे. चवथ्यांत ' संभाजी कुलकलंक निघाला ' हें प्रधान वाक्य असून, त्यांतील कुलकलंक हें विधेयपूरक आहे. आणि ' ज्यानें बापाच्या....आणिली ' असा ह्यानें त्या पूरकाचा विस्तार होत आहे म्हणजे तें कुलकलंक ह्या नामाचें विशेषण आहे असें म्हटलें तरी चालेल.

टीप—पूर्वी नामवाक्यासंबंधानें सांगितल्याप्रमाणें विशेषणवाक्यही प्रधान वाक्याचे कोणत्याही मुख्य अवयवांत येणाऱ्या नामास उद्देशून येऊं शकतें. वर जीं चार स्थानें सांगितलीं तीं वाक्यांतील प्रमुख स्थानें होत. तितक्याच जागीं विशेषणवाक्य येतें असें समजण्याची जरूर नाहीं. तर तें वाक्यांतील कोणत्याही कोनाकोपऱ्यांतील नामासंबंधानेंही येण्यास हरकत नाहीं. जसें:—' जेथें आमच्या मुलीचा नवरा राहतो त्या गांवांत राहणाऱ्या श्रीनिवासराव नांवाच्या गृहस्थानें दळण्याचें एक नवीन यंत्र केलें आहे. ' या वाक्यांत ' गृहस्थानें ' हें मूळ उद्देश्य होय. ' त्या गांवांत राहणाऱ्या श्रीनिवासराव नांवाच्या ' हें त्याचें विस्तारक आहे. या विस्तारकांत गांव हा शब्द आला आहे. तो प्रधान वाक्यांतील उद्देश्य-विस्तारकान्तर्गत आहे; म्हणजे त्यास वाक्यांत प्रमुख स्थान नसून, तो एका कोपऱ्यांत पडला आहे. तरी ' जेथें आमच्या मुलीचा नवरा राहतो ' हें विशेषणवाक्य त्या गांव शब्दासच उद्देशून आलें आहे हें उघड आहे.

६८५. विशेषणवाक्य हें एका प्रकारचें गौण वाक्य आहे. त्याचा व प्रधान वाक्याचा संबंध जो हें संबंधी सर्वनाम व तो हें अनुसंबंधी सर्वनाम ह्यांनीं जोडण्यांत येतो. जो हें गौण वाक्यांत येतें, आणि तो हें प्रधान वाक्यांत येतें. तसेंच जो व तो यांपासून निघालेल्या जसा, जितका, इ० संबंधी आणि तसा, तितका, इ० अनुसंबंधी विशेषणांनीं ही विशेषण वाक्याचा प्रधानवाक्याशीं संबंध जोडण्यांत येतो. ह्यांपैकीं जो या प्रमाणें जसा, जितका, इ० संबंधी विशेषणें हीं विशेषणवाक्यांत येतात; आणि तसा, तितका, इ० अनुसंबंधी विशेषणें तो या अनुसंबंधी सर्वनामाप्रमाणें प्रधान वाक्यांत येतात. जो, जसा, जितका इ० संबंधी व तो, तसा, तितका इ० अनुसंबंधी शब्द ह्यांच्या उपयोगाबद्दलचे बहुतेक सर्व नियम पूर्वी दिलेच आहेत; [ अंक १३४ व १५३ पहा ]. त्याशिवाय विशेषणवाक्य व प्रधान वाक्य ह्यामधील संबंधाचे आणखी पुढील नियम आढळतात.

( अ ) जो ह्या संबंधी सर्वनामाबद्दल विशेषण वाक्यांत कधीं कधीं संबंधी क्रियाविशेषणेंही येतात. जसें:—जेथें तो राहतो तें घर त्यास त्याच्या सासऱ्यानें दिलें, जेव्हां विद्यार्थ्यास अभ्यास करावयाचा नसतो तो वेळ त्यानें अन्य उपयुक्त कामाकडे लावावा, इ०. या ठिकाणीं, जेथें = ज्यांत, जेव्हां = ज्या वेळीं, हें उघड आहे. स्थलवाचक व कालवाचक संबंधी विशेषणांचा ( जेथें, जिकडे, जेथून, इ० व जेव्हां, जेव्हांपासून, इ०. ) विशेषणवाक्यांत अशा प्रकारें जो या संबंधी सर्वनामाबद्दल किंवा क्रियाविशेषणाबद्दल बराच उपयोग होतो; तरी तो या अनुसंबंधीबद्दल मात्र, वाक्यांत अनुसंबंधी क्रियाविशेषणें चालत नाहींत. कारण उघड आहे कीं, अनुसंबंधी जर क्रियाविशेषण असेल तर संबंधी क्रियाविशेषणानें युक्त जें गौण वाक्य असेल तेंही क्रियाविशेषणच होईल. म्हणून विशेषणवाक्यांत जरी संबंधी क्रियाविशेषणें आलीं, तरी त्या विशेषणवाक्याचे प्रधान वाक्यांत अनुसंबंधी क्रियाविशेषणें येत नाहींत; तर अनुसंबंधी सर्वनामें किंवा विशेषणेंच येतात.

( आ ) कधीं कधीं तो या अनुसंबंधी शब्दापूर्वीं आणि जो ह्या संबंधी शब्दानें युक्त विशेषणवाक्याचे अन्तीं ' असा जो ' हें लिंगवचनाप्रमाणें बदलणारे शब्द विशेष्यासह येतात. जसें:—ज्याचें नामस्मरण केलें

असतां पातकांचा नाश होतो, तो रामचंद्र राज्य सोडून वनवासास गेला. या वाक्यांत 'नाश होतो' या शब्दांचे नंतर 'तो' याचे आधीं 'असा जो' हें शब्दही विकल्पानें येऊन 'ज्याचें नामस्मरण केलें असतां पातकांचा नाश होतो असा जो रामचंद्र तो, इ' असेंही म्हणण्याचा भारदस्त प्रघात आहे.

( इ ) कधीं कधीं विशेषणवाक्यांतील संबंधी शब्दाचे जागीं प्रश्नार्थक शब्दही आलेले आढळतात, तरी प्रधान वाक्यांतील अनुसंबंधी शब्द नियमानुसार येतात. जसें:——येथें कसा काय प्रकार झाला तो मला सांगतां येत नाहीं, तो कोणत्या गांवास गेला आहे त्याचें नांव मला आठवत नाहीं, त्याची किती संहिता म्हणून झाली ती तुला माहीत आहे काय इ०. या उदाहरणांत कसा काय = जो, कोणत्या = ज्या, किती = जितकी, इ०. तथापि या उदाहरणांतील या प्रश्नार्थकांचे जागीं संबंधी शब्द घालणें भाषादृष्ट्या गौण आहे हें उघड आहे.

टीप——मिश्र वाक्याच्या गौण वाक्यांत या कलमांत सांगितल्याप्रमाणें संबंधी शब्दाचे जागीं प्रश्नार्थक शब्द आले असतां, जरी वर उदाहरणें दिल्याप्रमाणें कांहीं ठिकाणीं तीं गौण वाक्यें विशेषणवाक्यें असतात, तरी तीं बहुधा नामवाक्यें असतात; आणि कांहीं ठिकाणीं त्यांस नामवाक्य म्हणावें किंवा विशेषणवाक्य म्हणावें ह्याबद्दल शंका उत्पन्न होते. 'त्याची किती संहिता म्हणून झाली आहे, ती तुला माहीत आहे काय ?' या वाक्यांत ती म्हणजे ती किंवा तितकी संहिता हें उद्देश्य असून 'त्याची किती ( जी ) संहिता म्हणून झाली आहे' हें गौण वाक्य उद्देश्य-विस्तारक असल्यामुळें, विशेषणवाक्य होय हें उघड आहे. परंतु ह्याचे जागीं 'त्याची संहिता किती म्हणून झाली आहे तें किंवा हें तुला माहीत आहे काय ?' अशा प्रकारें ती या शब्दाचे जागीं तें किंवा हें हा शब्द घालण्याचा प्रचार फार आहे. या वाक्यास विशेषणवाक्य म्हणतांच येत नाहीं. कारण कीं, तें ह्याचा संबंधी शब्द जें हा गौण वाक्यांत कोठेंही स्पष्ट नाहीं किंवा अध्याहृत समजतां येत नाहीं; आणि हें हा शब्द कधींच अनुसंबंधी होत नाहीं; यामुळें या ठिकाणचा तें शब्द मुळीं अनुसंबंधी नव्हे, आणि हें हा शब्द तर कधींच अनुसंबंधी नसतो. यामुळें यांचे मागील गौण वाक्य हें विशेषणवाक्य होऊंच शकत नाहीं. या ठिकाणीं तें किंवा हें हा शब्द पूर्वीच्या गौण वाक्याशीं समानाधिकरण असल्यामुळें, तें गौण वाक्य नामवाक्य होय हें उघड आहे. तसेंच 'तेथें कसा काय प्रकार झाला तो मला सांगतां येत नाहीं' याचे जागीं 'तेथें कसा काय प्रकार झाला तें किंवा हें मला सांगतां येत नाहीं' असें म्हणण्याचाही प्रचार आहे. या प्रचारांतही गौण वाक्य हें नाम—

वाक्य होय. परंतु ज्या ठिकाणीं गौण वाक्यांतील प्रश्नार्थक शब्द ज्या नामासंबंधानें येतो, तें नपुंसकलिंगी असतें किंवा तें नाम अध्याहृत असते, त्या ठिकाणीं तें गौण वाक्य नामवाक्य होय किंवा विशेषणवाक्य होय, ह्याचा निर्णय करणें कठीण असतें. 'त्याचें किती गणित झालें आहे तें मला माहित नाहीं' या ठिकाणीं किती म्हणजे जें आणि तें म्हणजे तें गणित, असा जर अर्थ केला तर तो साजेसा आहे. त्याचप्रमाणें 'तो कोठें गेला आहे तें मला सांग' या वाक्यांतही कोठें = जेथें = ज्या ठिकाणीं, आणि तें = तें ठिकाण, असें म्हटल्यास तेंही गैर नाहीं. या दृष्टीनें प्रकृत वाक्यें विशेषणवाक्यें होत. परंतु 'त्यांचें किती गणित झालें आहे तें मला माहित नाहीं; आणि तो कोठें गेला आहे तें मला सांग' या वाक्यांचा याप्रमाणें अर्थ करून त्यांस विशेषणवाक्य म्हणणें जरी चुकीचें नसलें तरी प्रशस्त नाहीं असें आम्हांस वाटतें. एक तर प्रश्नार्थक शब्दांचा इंग्रजींतल्याप्रमाणें संबंधी शब्दांसारखा उपयोग झालेला मराठींत आढळत नाहीं; आणि दुसरें असें कीं, या वाक्यांतील तें ह्या शब्दाचे जागीं विकल्पानें हें हा शब्द घालण्याचा प्रघात आहे. आणि वर सांगितल्याप्रमाणें हें ह्या शब्दाचा अनुसंबंधी शब्दाप्रमाणें कधींच उपयोग होत नाहीं आणि त्याचे मागें गौणवाक्यांतील प्रश्नार्थक शब्दांचे जागीं कोणताही संबंधी शब्द घालून वाक्यरचना होत नाहीं. म्हणजे 'त्याचें जें गणित झालें आहे हें मला माहीत नाहीं.' 'तो ज्या ठिकाणीं गेला आहे हें मला सांग' अशी भाषा कोठेंच ऐकूं येत नाहीं. तथापि 'त्याचें किती गणित झालें आहे तें किंवा हें मला माहीत नाहीं' 'तो कोठें गेला आहे तें किंवा हें मला सांग' असें म्हणण्याचा सर्वत्र प्रचार आहे. यावरून या ठिकाणचा तें शब्द हें ह्याप्रमाणें अनुसंबंधी नसून दर्शक आहे हें उघड आहे. यामुळे, अशा वाक्यांत तें हा शब्द असेल तेव्हां जरी त्यांस विशेषणवाक्य म्हणजे अगदीं चुकीचें नसलें तरी प्रशस्त नाहीं असें आम्ही म्हटलें आहे; आणि त्याची यथार्थता वाचकांस पटेल अशी आमची खात्री आहे. आतां गौण वाक्यांत प्रश्नार्थक शब्द आला असतां रचनेच्या दृष्टीनें गौण वाक्य हें विशेषणवाक्य असल्याचीं कांहीं निःशंक उदाहरणें वर आलींच आहेत, तेव्हां गौण वाक्यांस प्रश्नार्थक शब्द आले असतां गौण वाक्य नामवाक्य असतें, असा जरी साधारण नियम करितां येत नाहीं, तरी असल्या विशेषणवाक्यांतही मूळची रचना नामवाक्यांसच साजेशी असावी असें वाटतें. कारण कीं, 'तेथें कसा काय प्रकार झाला तो मला सांगतां येत नाहीं' 'त्यानें कोणता शब्द योजिला तो मी सांगतों' अशी जरी गौण वाक्यांस विशेषणवाक्येंच ठरविणारी भाषा प्रचारांत आहे, तरी तिचे जागीं 'तेथें कसा काय प्रकार झाला तें किंवा हें मला सांगतां येत नाहीं' 'त्यानें कोणता शब्द योजिला तें किंवा हें मी सांगतों' अशीच भाषासरणी स्वाभाविक असून तिचाच विशेष प्रचार दिसतो.

आणि या ठिकाणचीं गौण वाक्यें वर स्पष्ट करून दाखविल्याप्रमाणें नामवाक्यें होत हें उघडच आहे. एवंच ज्या ठिकाणीं वाक्यरचनेच्या दृष्टीनें प्रश्नार्थक शब्दांनीं युक्त असणाऱ्या गौण वाक्यांस विशेषणवाक्य म्हटल्यावांचून गत्यन्तरच नाहीं, त्या ठिकाणीं त्यांस विशेषणवाक्य म्हटलेंच पाहिजे. परंतु तसें करण्याची जेथें जरूर नाहीं, तेथें त्यांस नामवाक्यच म्हणणें योग्य होय हें उघड आहे.

( ई ) संबंधी व अनुसंबंधी शब्दांच्या उपयोगाचा आणखी एक प्रकार मराठींत येऊं पहात आहे तो इंग्रजी आहे. परंतु इंग्रजीच्या दृढ परिचयानें आणि विशेषेंकरून इंग्रजीचें शब्दशः भाषान्तर करण्याचे संवईनें ही रचना मराठींत घुसूं पहात आहे. ज्यास उद्देशून संबंधी शब्द येतो त्या नामापुढेंच संबंधीशब्दयुक्त विशेषणवाक्य येऊन त्याचे अंतीं पुन्हा अनुसंबंधी शब्द येतो. जसें:——त्याचा मुलगा, जो विलायतेस गेला होता, तो हा होय. तें घर, ज्यांत आम्ही पूर्वीं रहात होतों, तें विकावयास काढलें आहे, इ०. ही रचना मराठीच्या स्वाभाविक रूपास साजेशी नसल्यामुळें मराठींत ती लौकर रूढ होईल असें वाटत नाहीं.

( उ ) आणखी एक मुद्दा इंग्रजी वाक्यरचनेंतच विशेषेंकरून आढळतो. तो मराठीमध्यें प्रचलित गद्यांत तरी फारसा आढळत नाहींच. पण पद्यांत मात्र कधीं कधीं आढळतो. तो आगरकरांनीं आपल्या वाक्यमीमांसेंत सविस्तर सांगितला आहे. तो त्यांच्याच शब्दांनीं वाचकांच्या पुढें ठेवितों. " ज्याप्रमाणें विशेषणवाचक शब्द नामांचे मर्यादक खरे, तरी वाक्यांत ज्या शब्दांच्या संबंधानें ते घातले असतील ते त्यांचे योगानें मर्यादित झाले पाहिजेतच असा नियम नाहीं; त्याप्रमाणें प्रत्येक विशेषणवाक्य नाममर्यादक असेलच असें मानितां येणार नाहीं. त्याच्या बाह्य स्वरूपावरून व भाषेच्या नित्य रूढीवरून तें मर्यादक आहे असें वाटेल; पण बारीक विचार करितां तें तसें नाहीं असें मानण्यासही कारण आहे, असें दिसून येईल, उदाहरणार्थ मोरोपंताची पुढील आर्या घ्या.

तिसरे दिवशीं चक्रव्यूह सुदुर्भेद्य युक्तिनें रचिला ।
जो धीर—वीर—हीर—प्रवर—प्रकरें करोनियां खचिला ॥

या आर्येचा उत्तान अर्थ असा आहे कीं ( कौरव योध्यांनीं युद्धाचे ) तिसरे दिवशीं ( एक मोठा ) सुदुर्भेद्य चक्रव्यूह ( मोठया ) युक्तीनें

रचिला, ' आणि तो ' धैर्यवान् वीररूपी उत्तम उत्तम अनेक ह्रियांनीं खचला. ........ तेव्हां वरील आर्येंत जो हें संबंधी सर्वनाम ' आणि तो ' या शब्दांबराबर असून ' जो धीर–वीर ........ ' इत्यादि वाक्य केवळ विशेषणार्थक मानण्यास थोडी अडचण वाटते. वास्तविक पहातां या आर्येंतील ' जो ' संबंधी सर्वनाम नाहीं, तर उभयान्वयी अव्यय आणि दर्शक सर्वनाम आहे. इंग्रजींत अशा अर्थाच्या संबंधी सर्वनामाला Coordinating relative म्हणजे समानाधिकरण वाक्यान्वयी संबंधी सर्वनाम म्हणतात ........ संबंधी सर्वनामांनीं कोणत्या ठिकाणीं विशेषणार्थक वाक्यान्वय होत आहे व कोणत्या ठिकाणीं समानाधिकरणवाक्यान्वय होत आहे, हें जेथल्या तेथें अर्थनिर्णय करून ठरविलें पाहिजे; अशा प्रकारचा अर्थनिर्णय करतांना मतभेद होण्याचा संभव आहे.

समानाधिकरण वाक्यान्वयी संबंधी सर्वनामांचीं उदाहरणें मराठी गद्यांत तर आढळतच नाहींत. पद्यांत मात्र कोठें कोठें आढळतात; व पद्यांत जीं आढळतात त्यांची थोडी ओढाताण केली तर तीं विशेषणार्थक वाक्यान्वयी आहेत असें भासवितां येतें. ' ज्यानें आमचें उत्तम आदरातिथ्य करून आमची योग्य संभावना केली त्या भोजराजाकडे आम्ही गेलों. ' या वाक्याचा उत्तानार्थ असा आहे कीं, आम्ही भोजराजाकडे गेलों, व त्यानें आमचें उत्तम आतिथ्य करून योग्य संभावना केली. ' ज्यानें ' याचा अर्थ ' व त्यानें ' आहे. पण आम्हां महाराष्ट्रीयांस भाषाविषयक अर्थजालाशीं झगडण्याची संवय अद्यापि फारशी नसल्यामुळें, अशा प्रकारच्या वाक्यांस शुद्ध विशेषणवाक्यें मानण्याची सहज प्रवृत्ति होते. शिवाय असल्या वाक्यांचा अर्थ करतांना ' त्या ' चा ' अशा ' शब्दानें अर्थ केला तर त्यास विशेषणवाक्य मानण्यास बलवत्तर कारण झाल्यासारखें वाटतें. " ( वाक्यमीमांसा पृष्ट १००–१०२ ).

हें अवतरण बरेंच लांबलें. तेव्हां ह्या संबंधाचें आमचें म्हणणें थोडक्यांत सांगतों. यांत महाराष्ट्रीयांवर केलेला आरोप अद्याप खरा आहे; आणि ' जो ' या संबंधी सर्वनामाचा ' आणि तो ' असा मोरोपंताच्या वरील आर्येंतल्याप्रमाणें अर्थ असतां तद्युक्त वाक्यास विशेषणवाक्य म्हणणें रास्त नाहीं, हें उघड आहे. परंतु ' जो ' म्हणजे ' आणि तो ' असा

अर्थ असलेलीं वाक्यें ‘ मराठी गद्यांत तर आढळतच नाहींत ’ असें निश्चय-पूर्वक जोरानें सांगून लगेच आगरकरांनीं त्यांचें एक गद्य उदाहरण द्यावें हें चमत्कारिक दिसतें. परंतु जरी त्यांनीं ‘ ज्यानें आमचें योग्य ........ त्या भोजराजाकडे आम्ही गेलों. ’ असें, ज्यानें = आणि त्यानें, अशा अर्थाचें म्हणून हें उदाहरण दिलें आहे, तरी तें योग्य नाहीं. कारण कीं, अशा अर्थाचें संबंधी सर्वनाम इंग्रजींतल्याप्रमाणें त्याच्या नामाचे नंतर येतें. म्हणजे या अर्थाची रचना इंग्रजीसारखीच आहे हें वरील मोरो-पंतांचे आर्येवरूनही स्पष्टच आहे. ‘ चक्रव्यूह रचिला जो खचला ’ अशी वाक्यरचना आहे. वरील गद्य वाक्याची we went to Bhojaraj received us &c. अशी इंग्रजी रचना आहे आणि तिलाच धरून जर मराठींत ‘ आम्ही भोजराजाकडे गेलों, ज्यानें आमचें इ०, ’ असें वाक्य झालें असतें, तर तें योग्य उदाहरण होतें; म्हणजे, ज्यानें = आणि त्यानें, असें त्या ठिकाणीं म्हणतां आलें असतें. परंतु संबंधी—सर्वनामयुक्त गौण वाक्य याप्रमाणें विशेष्याचे पुढें मराठी गद्यांत रूढीस अनुसरून कधींच येत नसल्यामुळें तशा प्रकारचें गद्य उदाहरण देण्याचा प्रयत्नच करणें व्यर्थ आहे. ‘ ज्यानें आमचें योग्य आतिथ्य केलें इ० ’ हें गौण वाक्य आरंभीं आलें असतां ज्यानें ह्याचा ‘ आणि त्यानें ’ असा अर्थ करणें शक्यच नाहीं. एवंच विवक्षित उदाहरण प्रचलित मराठी गद्यांत मिळणें संभवनीय नसल्यामुळें आगर-करांचें उदाहरण जरी चुकलें आहे तरी त्यांनीं अशा प्रकारच्या रचनेसंबं-धानें जें मत दिलें आहे तें योग्य आहे. पण तशी रचना केवळ गद्यांत क्वचित् कधीं येत असल्यामुळें ती प्रचलित मराठी भाषेच्या दृष्टीनें महत्त्वाची नाहीं हें उघड आहे.

## क्रियाविशेषणवाक्य.

६८६. वाक्यामध्यें क्रियाविशेषण हें क्रियापदाशीं, कृदन्ताशीं, विशेषणाशीं किंवा दुसऱ्या क्रियाविशेषणाशीं संबद्ध असतें, त्याच-प्रमाणें क्रियाविशेषणवाक्यही इतक्यांशीं संबद्ध असण्यास हरकत नाहीं. परंतु मूळ उद्देश्य, उद्देश्यविस्तार, मूळ विधेय, कर्म, पूरक आणि विधेयविस्तारक हीं जीं वाक्यमीमांसेचे दृष्टीनें वाक्यांतील

सहा प्रमुख स्थानें आहेत, त्यांपैकीं फक्त विधेयविस्तारक ह्याच स्थानीं क्रियाविशेषणें व क्रियाविशेषणवाक्यें येऊं शकतात; आणि तेव्हां तीं मूल विधेय म्हणजे क्रियापद किंवा दुसरें क्रियाविशेषण याशीं संबद्ध असतात. म्हणून क्रियाविशेषणें किंवा क्रियाविशेषणवाक्यें हीं जेव्हां कृदन्तांशीं किंवा विशेषणांशीं संबद्ध असतात, त्याच वेळीं तीं विधेयविस्तारका-शिवाय इतर सदरांत—प्रमुखत्वानें नव्हे तर त्या कृदन्तांच्या व विशेषणांच्या आश्रयानें त्यांच्या मागोमाग—प्रवेश करितात. क्रियाविशेषणवाक्यांचीं उदाहरणें:—

क्रियापदाशीं संबद्ध—आज दुपारपर्यंत मला तें पुस्तक मिळालें तर माझें कार्य होईल.

क्रियाविशेषणाशीं संबद्ध—तुम्ही जिकडे गेलां होतां तिकडेच तोही गेला आहे.

कृदन्ताशीं संबद्ध—जर तूं अद्यापही मेहनत घेऊन चांगला अभ्यास केलास तर तुला यश येणें कांहीं कठीण नाहीं.

विशेषणाशीं संबद्ध—चार पांच जणांची तो सहज दमचक्की करील इतकी ताकद त्याला आहे.

स्पष्टीकरण—पहिल्या वाक्यांत होईल हें क्रियापद मूल विधेय असून, ' आज दुपारपर्यंत मला जर तें पुस्तक मिळालें तर ' या क्रियाविशेषण-वाक्याचा त्या क्रियापदाशीं संबंध आहे, हें त्या वाक्याचे जागीं ' आज दुपारपर्यंत मला तें पुस्तक मिळालें असतां ' असें क्रियाविशेषणात्मक-वाक्यांग घालतां येतें, या गोष्टीनें विशेष स्पष्ट होईल. दुसऱ्यांत ' तुम्हीं जिकडे गेलां होतां ' या क्रियाविशेषणवाक्याचा ' तिकडे ' या क्रिया-विशेषणाशीं संबंध आहे हें सहजच समजेल. तिसऱ्यांत ' येणें ' हें कृदन्त असून त्याच्याशीं जर ' तूं............ अभ्यास केलास ' या क्रिया-विशेषणवाक्याचा संबंध आहे हें वरील पहिल्या वाक्याचे स्पष्टीकरणा-वरून कळेलच. शेवटच्या वाक्यांत ' इतकी ताकद ' यांतील इतकी ह्या विशेषणाचा खुलासा ' चार पांच जणांची........... करील ' ह्या क्रिया-विशेषणवाक्यानें होत आहे हें उघड आहे.

६८७. क्रियाविशेषणवाक्य हें एका प्रकारचें गौण वाक्य आहे. तेव्हां त्याचा संबंध प्रधानवाक्याशीं कसा जोडण्यांत येतो तें सांगतों.

(अ) संबंधी सर्वनामाप्रमाणें संबंधी क्रियाविशेषणेंही आहेत व अनुसंबंधी सर्वनामाप्रमाणें तदनुरूप अनुसंबंधी क्रियाविशेषणेंही आहेत ही गोष्ट पूर्वीं सांगितलीच आहे. या संबंधी व अनुसंबंधी क्रियाविशेषणांनीं क्रियाविशेषण वाक्यें प्रधानवाक्यास जोडण्यांत येतात. पैकीं संबंधी क्रियाविशेषण हें गौण वाक्यांत म्हणजे क्रियाविशेषणवाक्यांत येतें आणि अनुसंबंधी क्रियाविशेषण हें प्रधानवाक्यांत येतें. हीं संबंधी व अनुसंबंधी क्रियाविशेषणें व त्यांच्यासारखे उपयोगांत येणारे इतर शब्द येणेंप्रमाणें:—

स्थलवाचक—जेथें–तेथें, जिथें–तिथें, जिकडे–तिकडे, जेथून–तेथून, जिकडून–तिकडून, जिकडनें–तिकडनें, ज्या जागीं–त्या जागीं, ज्या बाजूस–त्या बाजूस, इ०.

कालवाचक—जेव्हां–तेव्हां, जों–तों, जइं–तइं, जेधवां–तेधवां, जोंपर्यंत–तोंपर्यंत, ज्या वेळेस–त्या वेळेस, ज्या वेळीं–त्या वेळीं, ज्या दिवशीं–त्या दिवशीं इ०.

रीतिवाचक—जसें–तसें, ज्याप्रमाणें–त्याप्रमाणें, जेवीं–तेवीं, ज्या प्रकारें–त्या प्रकारें, ज्या रीतीनें–त्या रीतीनें इ०.

संख्यावाचक किंवा अंशवाचक—जसजसें–तसतसें, जितक्या अंशानें–तितक्या अंशानें, ज्या मानानें–त्या मानानें, इ०.

कार्यकारणदर्शक—(मूळ क्रियाविशेषणें या अर्थीं नाहींत. तथापि शब्दयोगी अव्ययान्त शब्द आहेत. हे वाक्यमीमांसेचे दृष्टीनें क्रियाविशेषणेंच होत, हें पुष्कळदां सांगितलेलें वाचकांस स्मरत असेलच.) ज्यामुळें–त्यामुळें ज्या अर्थीं–त्या अर्थीं, ज्या पक्षीं–त्या पक्षीं, ज्या करितां–त्या करितां, इ०.

टीप—यांचीं उदाहरणें सहज समजण्यासारखीं असल्यामुळें उदाहरणें देण्याची गरज दिसत नाहीं. अमक्या संबंधीचें अनुसंबंधी अमुक म्हणून जें वर सांगितलें आहे तें वास्तविक खरें आहे. तथापि भाषणांत व लेखनांत वरील जोड्यांत वारंवार फरक झालेला आढळतो. यामुळें, जेव्हां–त्यावेळीं, ज्यावेळीं–तेव्हां, जेथें–त्या ठिकाणीं, ज्या ठिकाणीं–तेथें, इ०. स्वरूपतः विजोड जोड्या

फार उपयोगांत येतात. अर्थदृष्ट्या विजोड झालेला खपावयाचाच नाहीं हें उघड आहे. तसेंच या जोड्यांपैकीं जेव्हां, जेथें, जसें, इ० संबंधी क्रियाविशेषणें हीं नेहमीं वाक्यांत स्पष्टच असतात असें नाहीं, तर तीं पुष्कळदां अध्याहृतही असतात; मात्र अनुसंबंधी हीं नेहमीं स्पष्ट असतात; आणि त्यांच्याच साहाय्यानें तदनुरूप संबंधी शब्दांचा अध्याहार श्रोत्यांस व वाचकांस समजतो.

( आ ) उभयान्वयी अव्ययांचे दोन भेद आहेत. प्रधानत्वसूचक आणि गौणत्वसूचक. ह्यांपैकीं प्रधानत्वसूचक उभयान्वयी अव्ययांनीं जोडणारीं वाक्यें प्रधानवाक्यें असतात; ह्यामुळें त्यांचा संयुक्त वाक्याचे विचारांत उल्लेख होईल. गौणत्वसूचक उभयान्वयी अव्ययांनीं गौण वाक्यें प्रधान वाक्यास जोडण्यांत येतात. गौणत्वसूचक उभयान्वयी अव्ययांनीं प्रधान वाक्याशीं जीं गौण वाक्यें जोडण्यांत येतात, तीं बहुधा क्रियाविशेषण वाक्यें असतात. ज्याप्रमाणें संबंधी क्रियाविशेषणांनीं अंशतः उभयान्वयी अव्ययांचें काम होतें, त्याप्रमाणें या गौणत्वसूचक उभयान्वयी अव्ययांनीं जोडण्यांत येणारीं गौण वाक्यें बहुधा क्रियाविशेषण वाक्यें असल्यामुळें त्यांचे ठायींही एका दृष्टीनें अंशतः क्रियाविशेषणत्व येतें. गौणत्वसूचक उभयान्वयी अव्ययें चार प्रकारचीं आहेत: कारणदर्शक, उद्देशदर्शक, संकेतदर्शक, आणि स्वरूपदर्शक. ह्यांपैकीं उद्देशदर्शकें हीं परिणामबोधक म्हणून जो प्रधानत्वसूचक उभयान्वयी अव्ययांचा भेद आहे, त्यासारखींच आहेत. म्हणजे उद्देशदर्शकें व परिणामबोधकें हे दिसण्यांत एकच शब्द आहेत. परंतु त्यांचे उपयोगांत फरक आहे. तो यापूर्वीं ( अंक २३६ ) सविस्तर सांगितला आहे. तो वाचकांनीं पुन्हा एकदां पहावा. त्या ठिकाणींच या सर्व उभयान्वयी अव्ययांच्या साधारण उपयोगाचें निरूपण केलें आहे. तथापि त्यासंबंधानें आणखी कांहीं गोष्टी सांगण्यासारख्या आहेत त्या खालीं देतों.

कारणदर्शक उभयान्वयी अव्ययें:—कारण, कारण कीं, कां कीं, कीं. यांपैकीं कारण, कारण कीं, कां कीं, ह्यांचा प्रचार गद्यांत व पद्यांतही आहे. परंतु कीं ह्या कारणदर्शकाचा उपयोग गद्यांत आढळतच नाहीं; पद्यांतही क्वचित्च आढळतो. जसें:—
'कां न सदन बांधावें कीं, त्यांत पुढें बिळें करिल घूस.'
कार्य सांगणारें वाक्य प्रधान असून त्याचे पुढें कारण सांगणारें वाक्य आलें असतां या दुसऱ्या कारण सांग—

णाऱ्या वाक्याचे आरंभीं हीं कारणदर्शक उभयान्वयी अव्ययें येतात. कारणदर्शक उभयान्वयी अव्यय, आरंभीं आलेलें वाक्य गौण असून त्यास वाक्यमीमांसेचे दृष्टीनें क्रियाविशेषण वाक्य म्हणतात. उदा०--तो यंदा नापास झाला, कारण ( कारण कीं, कां कीं, ) तो परिक्षेच्या पूर्वीं चार महिने बहुतेक आजारी होता. येथें 'तो यंदा नापास झाला' हें प्रधान वाक्य असून 'कारण' चे पुढील वाक्य गौण आहे; आणि तें प्रधान वाक्यास क्रियाविशेषणाप्रमाणें जोडण्यांत आलें असून सबंध वाक्य मिश्र झालें आहे. वाक्यमीमांसेंत हें क्रियाविशेषणवाक्य विधेय-विस्तारकाचे सदरांत येईल हें उघड आहे.

उद्देशदर्शक उभयान्वयी अव्ययें:--सबब, म्हणून, यास्तव, याकरितां, इ०. हीं उभयान्वयी अव्ययें ज्या गौण वाक्यांत उद्देश सांगितलेला असतो त्याचे अंतीं येऊन त्याचे पुढें प्रधान-वाक्य येतें. जसें:--आपल्या मुलींसाठीं वर पहावा म्हणून ( सबब, यास्तव, इ०. ) तो पुण्यास गेला आहे. या वाक्यांत 'तो पुण्यास गेला आहे' हें प्रधान वाक्य असून 'आपल्या मुलीसाठीं वर पहावा' हें उद्देश सांगणारें वाक्य गौण आहे; आणि तें म्हणून (सबब, यास्तव, इ०.) या उद्देशदर्शकानें प्रधान वाक्याशीं जोडण्यांत आलें आहे.

संकेतदर्शक उभयान्वयी अव्ययें:--जर-तर, जरी-तरी, यद्यपि,-तथापि, म्हणजे, कीं, इ०. यांपैकीं जर, जरी, यद्यपि,-इ० हीं गौण वाक्यांत येतात. जर, जरी, यद्यपि, इ० ज्या वाक्यांत येतात त्यास पूर्व वाक्य आणि तर, तरी, तथापि, इ० हीं ज्या वाक्यांत येतात त्यास उत्तर वाक्य असें म्हणतात. या भाषेनें बोलावयाचें म्हटलें तर पूर्व वाक्य गौण असून उत्तर वाक्य प्रधान असतें आणि पूर्व वाक्याचा उत्तर वाक्याशीं क्रियाविशेषणाचा संबंध असून, तें पूर्व वाक्य सबंध मिश्र वाक्याचे पृथक्करणांत विधेय-विस्तारकाचे सदरांत

येतें. **म्हणजे** आणि **कीं** हीं दोन अव्ययें संकेतदर्शकां-प्रमाणें उपयोगांत येतात, तेव्हां तीं पूर्व वाक्याचे शेवटीं किंवा पूर्व व उत्तर ह्यांचे मध्यें येतात; तसेंच पूर्व वाक्यांतील जर, जरी, यद्यपि, इ० हीं कधीं कधीं अध्याहृत असतात; वगैरे गोष्टी उभयान्वयी अव्ययांचे अध्यायांत सांगितल्याच आहेत.

जर, जरी, यद्यपि, इ० संकेतदर्शक उभयान्वयी अव्ययें ज्या गौण वाक्यांत असतात, आणि ज्यास साधारणपणें भाषेंत व न्यायशास्त्रांत पूर्व म्हणतात, आणि वाक्यमीमांसेंत क्रियाविशेषणवाक्य म्हणतात, त्यामधील क्रियापद वाटेल त्या आख्यातीं असूं शकतें. **जर** हें बहुधा वास्तविक किंवा काल्पनिक संकेत किंवा अट किंवा कमी-अधिक संभवनीय गोष्ट दाखवितें, आणि **तर** हें त्या संकेतावर किंवा अटीवर किंवा कमीअधिक संभवनीय गोष्टीवर अवलंबून असलेली गोष्ट सुचवितें. जरी—तरी, आणि यद्यपि—तथापि, यांनीं पूर्व व उत्तर यांमध्यें थोडासा विरोध आहे असा ध्वनि उमटतो. याच अर्थानें किती कां—पण, या शब्दांचाही कधीं कधीं उपयोग होतो. जसें:—तो किती कां खपेना, ( पण ) त्याच्या हातून हें काम तडीस जाणार नाहीं. अशा वाक्यांतील उत्तर वाक्याचे आरंभी येणारें **पण** हें बहुधा अध्याहृत असतें.

**[स्]वरूपदर्शक** उभयान्वयी अव्ययें——म्हणजे, म्हणून, कीं. स्वरूपदर्शकांपैकीं म्हणून व कीं हीं नामवाक्यांचा प्रधान वाक्याशीं संबंध जोडतात, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. ‘म्हणजे’ व ‘म्हणून’ या स्वरूपदर्शकांचा वाक्यान्वयाचे कामीं फारसा उपयोग होत नाहीं. तेव्हां स्वरूपदर्शकांपैकीं फक्त कीं हेंच कायतें क्रियाविशेषणवाक्य प्रधान वाक्याशीं

संबंध जोडण्याचे कामीं फार उपयोगांत येतें. जेव्हां वाक्यांत इतका, एवढा, हीं विशेषणें येऊन त्यांचें स्वरूप स्पष्ट करावयाचें असतें, तेव्हां त्या वाक्याचे पुढें कीं हें अव्यय येऊन नंतर तें स्वरूप स्पष्ट करणारें क्रियाविशेषणवाक्य येतें. जसें:—तो इतका संतापला कीं त्याचा सगळा चेहेरा अगदीं लाल होऊन गेला, तिला इतकें दुःख झालें कीं तिनें चार दिवस जाग्यावरून न हालतां अन्न-ग्रहणही केलें नाहीं, इ. या वाक्यांत त्याचा सगळा चेहेरा इ.' आणि 'तिनें चार दिवस इ०.' या गौण वाक्यांनीं मागील प्रधान वाक्यांतील इतका, व इतकें, या शब्दांच्या अर्थाचें स्वरूप कळत आहे. म्हणून त्यांस क्रियाविशेषणवाक्यें असें म्हणतात. जेव्हां हें 'इतका' याच्या अर्थाचें स्वरूप दाखविणारें क्रियाविशेषणवाक्य प्रधान वाक्याचे आधीं येतें, तेव्हां **कीं** याचा उपयोग होत नाहीं. जसें:—यंदां पिकें कुजून गेलीं इतका पाऊस पडला, त्याचें पोट दुखायला लागलें इतकें खच्चून तो आज जेवला, इ०.

६८८. आतां कांहीं मिश्र वाक्यांचें प्रत्यक्ष पृथकरण करून दाखवितों:—

(अ) 'या मालेंतील व्याख्यानें मराठींत व्हावयाचीं असतां तिचा आरंभ मला इंग्रजींत करावा लागत आहे ही दिलगिरीची गोष्ट आहे.'

हें सबंध वाक्य मिश्र वाक्य आहे. त्यांत 'ही दिलगिरीची गोष्ट आहे' हें प्रधान वाक्य असून, त्याचे मागलें गौण वाक्य नामवाक्य आहे. तें नामवाक्य **ही** ह्या उद्देश्यस्थानच्या सर्वनामाशीं समानाधिकरण आहे. दोन्ही वाक्यांचें पृथकरण निरनिराळें केवल वाक्याप्रमाणेंच करावयाचें असतें. तें असें:—

| वाक्य | जाति | मूल उद्देश्य | उद्देश्य-विस्तार | मूल विधेय | कर्म | पूरक | वि |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ही दिलगिरीची गोष्ट आहे | प्रधान | ही ( या मालेंतील ... लागत आहे. ) | ... | आहे | ... | दिलगिरीची गोष्ट | |
| या मालेंतील ... लागत आहे | गौण-नाम-वाक्य | मला | ... | करावा लागत आहे. | तिचा आरंभ | ... | या ... इंग्र |

( आ ) इंग्लंडांतील ज्या स्थितीचें मीं वर्णन केलें आहे ती बहुतांशीं २५० वर्षांपर्यंत अस्तित्वांत होती. ( सबंध वाक्य--मिश्र

( १ ) ती स्थिति बहुतांशीं २५० वर्षांपर्यंत अस्तित्वांत ( प्रधान वाक्य ).

( २ ) इंग्लंडांतील ज्या स्थितीचें मीं वर्णन केलें आहे. [ ग विशेषणवाक्य--( १ ) ह्यांचें. ]

| वाक्य | जाति | मूल उद्देश्य | उद्देश्य विस्तार | मूल विधेय | कर्म | पूरक | विधेय-वि |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ( १ ) | प्रधान | स्थिति | ती | होती | | अस्तित्वांत | बहुत २५० व |
| ( २ ) | गौण विशेषण-वाक्य [१] चें | मीं | ... | केलें आहे | इंग्लंडांतील ज्या स्थितीचें वर्णन | ... | . |

( इ ) त्यांना एक तृतीयांश जमीन दर वर्षीं पडीत टाकावी ल मीं पूर्वीं सांगितलेंच आहे. ( मिश्र वाक्य ).

(१) हें मीं पूर्वीं सांगितलेंच आहे. ( प्रधान वाक्य ).

( २ ) त्यांना एक तृतीयांश जमीन दरवर्षीं पडीत टाकावी लागे, [ गौण–नामवाक्य–( १ ) या प्रधान वाक्यांतील हें याशीं समानाधिकरण ].

| वाक्य | जाति | मू० उ० | उ. विस्तारक | मू० वि० | कर्म | पूरक | वि० विस्तारक |
|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | प्रधान | मीं | ... | सांगितलेंच आहे. | हें [गौण वाक्याबद्दल | | पूर्वी |
| २ | गौण नामवाक्य [१] चें | त्यांना | | टाकावी लागे | $\frac{1}{3}$ जमीन | पडीत | दर वर्षीं |

( ई ) सुमारें तीस वर्षांपूर्वीं लहानपणीं मी वडिलांबरोबर जाईं तेव्हां लोकांमध्यें गाण्याच्या प्रती वांटण्याचें काम मी करीं. ( मिश्र वाक्य ).

( १ ) तेव्हां लोकांमध्यें गाण्याच्या प्रती वांटण्याचें काम मी करीं. ( प्रधान वाक्य )

( २ ) सुमारें ३० वर्षांपूर्वीं लहानपणीं मी वडिलांबरोबर जाईं [ गौण क्रियाविशेषणवाक्य–( १ ) या प्रधान वाक्यांतील ' तेव्हां याचें स्पष्टीकरण करणारें ].

| य | जाति | मू. उ. | उ. विस्तारक | मू. वि. | कर्म | पूरक | वि.–विस्तारक |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | प्रधान | मी | ... | करीं | लोकांमध्यें.. ..काम | ... | तेव्हां |
| २) | गौण क्रि. वि. (१) चें | मी | ... | जाईं | ... | ... | सुमारें ३० वर्षांपूर्वीं लहानपणीं; वडिलांबरावर |

( उ ) ज्या काळासंबंधानें मी बोलत आहें, त्या काळीं इंग्लंडांतील बहुतेक लोक शेतकीवरच निर्वाह करीत. [ मिश्र वाक्य ].

( १ ) त्या काळीं इंग्लंडांतील बहुतेक लोक शेतकीवरच निर्वाह करीत. [ प्रधान वाक्य ].

( २ ) ज्या काळासंबंधानें मी बोलत आहें [ गौण—विशेषणवाक्य—( १ ) या प्रधान वाक्यांतील ' काळ ' या नामाचें स्पष्टीकरण करणारें. ]

| वाक्य | जाति | मू.उ. | ऊ. विस्तारक | मू. वि. | कर्म | पूरक | वि. विस्तारक |
|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | प्रधान | लोक | इंग्लंदांतील बहुतेक | करीत | निर्वाह | ... | त्या काळीं; शेतकीवरच |
| (२) | गौण विशेषण[१चें] | मी | ... | बोलत आहें | ... | ... | ज्या काळासंबंधानें |

( ऊ ) बागांत होणारीं पिकें वगळलीं तर त्या काळचीं पिकें हाताच्या बोटांवर मोजतां येतील इतकीं थोडीं होतीं ( मिश्र वाक्य ).

( १ ) त्या काळचीं पिकें इतकीं थोडीं होतीं [ प्रधान वाक्य ].

( २ ) हाताच्या बोटांवर मोजतां येतील [ गौण—क्रियाविशेषण-वाक्य—( १ ) या प्रधान वाक्यांतील इतकीं ह्या क्रियाविशेषणाचें स्पष्टीकरण करणारें ].

( ३ ) बागांत होणारीं पिकें वगळलीं, [ गौण—क्रियाविशेषणवाक्य—( १ ) या प्रधान वाक्यासंबंधानें संकेत दाखविणारें ]

| वाक्य | जाति | मू. उ. | उ. विस्तारक | मू. वि. | कर्म | पूरक | वि. विस्तारक |
|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | प्रधान | पिकें | त्या काळचीं | होतीं | | इतकीं थोडीं | |
| (२) | गौण क्रि. वि. | आपणास [अध्याहृत] | | मोजतां येतील | तीं पिकें (अध्याहृत) | | हाताच्या बोटांवर |
| (३) | गौण क्रि. वि. | पिकें | बागांत होणारीं | वगळलीं—गेलीं ( अध्याहृत ) | | | |

टीपः—पिकें वगळलीं हा प्रयोग पानें वाढलीं यासारखा आहे. यांत गेला ह्या सहायक्रियापदाचा अध्याहार समजून नवीन कर्मणि प्रयोग आहे असें मानणें चांगलें. ( सविस्तर खुलाशासाठीं अंक ५८२ टीप पहा. )

( ऋ ) शेतकीच्या सुधारणेनें इंग्लंदांतील लोकांचे स्थितींत जो फरक पडला आहे, तो सर्वांशीं चांगला आहे काय, याविषयीं चर्चा करणें म्हणजे पाश्चात्य सुधारणेच्या मूलभूत तत्त्वांची चिकित्सा करणें होय. ( मिश्र वाक्य ).

( १ ) याविषयीं चर्चा करणें म्हणजे........करणें होय, ( प्रधान वाक्य ).

( २ ) तो सर्वांशीं चांगला आहे काय [ गौण—नामवाक्य—( १ ) या प्रधान वाक्यांतील ' याविषयीं ' यांतील ' हा ' या सर्वनामाशीं समानाधिकरण.]

( ३ ) शेतकीच्या सुधारणेनें...............पडला आहे. [ गौण—विशेषणवाक्य, ( २ ) या नामवाक्यांतील ' तो ' या सर्वनामाचें स्पष्टीकरण करणारें. ]

येथें दोन वाक्यें गौण आहेत, तरी दोन्हीं ( १ ) या प्रधान वाक्यावर अवलंबून नाहींत; तर ( २ ) हेंच कायतें ( १ ) या प्रधान वाक्यावर अवलंबून आहे; आणि ( ३ ) हें गौण वाक्य, ( २ ) या गौण वाक्यावर अवलंबून आहे; म्हणजे ( ३ ) याचे संबंधानें ( २ ) हें जणुं कांहीं प्रधान वाक्यच आहे, आणि ( १ ) याचे संबंधानें ( २ ) हें गौण वाक्य आहे.

| वाक्य | जाति | मू. उ. | उ. वि. | मू. वि. | कर्म | पूरक | वि. विस्तारक |
|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | प्रधान | चर्चा करणें | याविषयीं | होय | | पाश्चात्य... चिकित्सा करणें | |
| (२) | गौण नाम-वाक्य(१) चें | तो | | आहे काय | | सर्वांशीं चांगला | |
| (३) | विशेषण-वाक्य (२) चें | जो फरक | | पडला आहे. | | | शेतकीच्या सुधारणेनें इंग्लंडांतील लोकांचे स्थितींत |

( ल ) राजकीय प्रगतीच्या दृष्टीनें एडवर्ड बादशहांची कारकीर्द हिंदुस्थानास ज्याप्रमाणें महत्त्वाची झाली, त्याप्रमाणें ब्रिटिश साम्राज्याच्या इतर भागांतही एडवर्ड बादशहांच्या नऊ वर्षांच्या अमदानींत महत्त्वाच्या घडामोडी झाल्या. ( मिश्र वाक्य ).

( १ ) त्याप्रमाणें ब्रिटिश साम्राज्याच्या..........घडामोडी झाल्या, ( प्रधान वाक्य ).

( २ ) राजकीय प्रगतीच्या दृष्टीनें....ज्याप्रमाणें महत्त्वाची झाली [ गौण—क्रियाविशेषणवाक्य ( १ ) या प्रधान वाक्यांतील ‘ त्याप्रमाणें ’ या क्रियाविशेषणाचें स्पष्टीकरण करणारें. ]

| वाक्य | जाति | मू. उ. | उ. विस्तार | मू. वि. | कर्म | पूरक | वि. विस्तारक. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | प्रधान | घडा—मोडी | महत्त्वाच्या | झाल्या | ... | ... | त्याप्रमाणें ब्रिटिश साम्राज्याचे इतर भागांतही... अमदानींत. |
| (२) | क्रि. वि. वा. (१)चें | कार-कीर्द | एडवर्ड बादशहा-ची | झाली | ... | मह-त्वाची | हिंदुस्थानास ज्याप्रमाणें, राजकीय प्रगतीचे दृष्टीनें. |

( ए ) पेंडरगास्ट यानें थिबास कैद केलें ही बातमी लॉर्ड डफरिन यास समजली, तेंव्हां त्याला आपण आपल्या अंगावर घेतलेल्या जबाबदारींतून पार पडलों असें वाटलें असेल, यांत संशय नाहीं. [ मिश्र वाक्य ]

( १ ) यांत संशय नाहीं. [ प्रधान वाक्य ].

( २ ) तेंव्हां त्याला असें वाटलें असेल [ गौण—नामवाक्य—( १ ) या प्रधानवाक्यांतील ‘ यांत ’ या शब्दाशीं समानाधिकरण ].

( ३ ) आपण आपल्या अंगावर घेतलेल्या जबाबदारींतून पार पडलों [ गौण—नामवाक्य—( २ ) या गौण वाक्यांतील ‘ असें ’ या शब्दाशीं समानाधिकरण. याचे दृष्टीनें ( २ ) हें प्रधान वाक्य होय. ]

( ४ ) ही बातमी लॉर्ड डफरिन यास समजली, [ गौण—क्रियाविशेषणवाक्य—( २ ) या गौण वाक्यांतील तेंव्हां या क्रियाविशेषणाचें स्पष्टीकरण करणारें. या वाक्याचे दृष्टीनें ( २ ) हें प्रधान वाक्य होय. ]

टीप—परिणामबोधक उभयान्वयी अव्ययें आणि उद्देशदर्शक उभयान्वयी अव्ययें हीं एकच असून, त्यांचे उपयोगांतील फरक संस्मरणीय आहे. तो उभयान्वयी अव्ययांचे अध्यायांत सविस्तर सांगितला आहे तेथें पहावा. आणि, व; पण परंतु, इ० अव्ययांचे उपयांतील फरक सांगण्याचा कांहींनीं प्रयत्न केला आहे. परंतु तो फरक बहुधा काल्पनिकच असल्यामुळें, म्हणजे त्यास भाषाप्रचाराचा फारसा आधार नसल्यामुळें तसा प्रयत्न करणें व्यर्थ आहे.

( १ ) वारा आला आणि पाऊस गेला.

( २ ) बुडी मारण्याची घांट हें एक मोठें यंत्र आहे; त्यांत वायु भरून मनुष्यास आंत बसवून खोल पाण्यांत जातां येतें, आणि आंतील वायु नाहींसा होईपर्यंत त्यांत रहातां येतें.

( ३ ) प्रत्येक काव्यग्रंथाचा कांहीं विशिष्ट उद्देश असतो व तो उद्देश सिद्ध झाला म्हणजे त्या काव्याची परिसमाप्ति होते.

( ४ ) तुम्ही स्वतः या किंवा ( अथवा ) तुमचा भाऊ आला तरी चालेल.

( ५ ) यंदां पुष्कळ पाऊस पडला, परंतु ( पण ) तो एकाच महिन्यांत बहुतेक पडल्यामुळें पिकांस विशेष फायदा झाला नाहीं.

( ६ ) यत्नाशिवाय दैव पंगु आहे, म्हणून ( सबब ) प्रयत्नच प्रधान होय.

इ०. इ०. इ०.

या सर्व उदाहरणांत, आणि, व, किंवा, अथवा, परंतु, पण, म्हणून, सबब, इ० प्रधानत्वसूचक उभयान्वयी अव्ययांनीं जोडण्यांत आलेलीं **प्रधानवाक्यें स्पष्ट** आहेत.

६९२. शब्दांचा पुनरुच्चार टाळण्यासाठीं प्रधानत्वसूचक अव्ययांनीं वाक्यांतील मूल उद्देश्यें व मूल विधेयें जोडण्यांत येतात. त्या वेळीं संयुक्त वाक्यांतील प्रधानवाक्यें स्पष्ट नसतात. अशा **अस्पष्टसंयुक्त** वाक्यांचीं कांहीं उदाहरणें देतों.

( अ ) अनेक उद्देश्यें व एक विधेय—चांगल्या पाण्याचा पुरवठा, गांवांतलि सांडपाणी वाहून नेणारीं गटारें, चांगले रस्ते,

शालगृहें, दवाखान्याकरितां इमारती, मार्केट व कसाईखाने, या म्युनिसिपालिट्यांच्या मुख्य गरजा आहेत; रामा, गोविंदा आणि विष्णु हे काल गेले.

या ठिकाणीं विधेय हें प्रत्येक उद्देश्यास पृथक्पणें लागून एक एक प्रधान वाक्य तयार होतें, जसें:---रामा, गोविंदा व विष्णु हे काल गेले. या वाक्यांत---रामा काल गेला, गोविंदा काल गेला, विष्णु काल गेला---हीं तीन अलग अलग वाक्यें आहेत. ह्यामुळें अशा प्रकारच्या संयुक्त वाक्यांत जितकीं उद्देश्यें असतात, तितकीं वास्तविक प्रधान--वाक्यें असतात हें उघड आहे.

( आ ) अनेक विधेयें व एक उद्देश्य---तो मुंबईहून सकाळीं येथें आला व लगेच दुपारच्या डाकगाडीनें परत गेला; सूर्य पूर्वेस उगवतो व पश्चिमेस मावळतो. वर सांगिल्याप्रमाणें अशा संयुक्तवाक्यांतही जितकीं विधेयें असतात तितकीं प्रधानवाक्यें असतात. दुसऱ्या उदाहरणांत 'सूर्य पूर्वेस उगवतो' व 'पश्चिमेस मावळतो' हीं दोन प्रधानवाक्यें संयुक्त आहेत.

६९३. या वर सांगितलेल्या दोन प्रकारच्या अस्पष्ट संयुक्त--वाक्यांशिवाय आणखी कांहीं स्थळींही अस्पष्ट संयुक्त--वाक्यें दिसतात. तीं स्थळें अशीं:---

( अ ) अनेक पूरकें व एक उद्देश्य आणि एक विधेय:---घोडा हा एक फार चपळ, उपयोगी व उमदा प्राणी आहे. या वाक्यांत तीन पूरकें आहेत, म्हणून यांत---घोडा हा एक चपळ प्राणी आहे, घोडा हा एक फार उपयोगी प्राणी आहे, आणि घोडा हा एक फार उमदा प्राणी आहे--अशीं तीन प्रधानवाक्यें संयुक्त आहेत.

( आ ) अनेक कर्में व एक उद्देश्य आणि एक विधेय:---बादशहाचे राज्यारोहणाचे दिवशीं त्यानें गरीब लोकांस अन्न, कपडे व पैसे वांटले; तो रोज संध्या, पूजा, जप, वैश्वदेव आणि वेदाध्ययन करितो; इ०.

येथेंही जरी मूळ विधेय एकच असलें, तरी कर्म हें विधेयाचाच एक मुख्य भाग असल्यामुळें, अशा संयुक्तवाक्यांत जितकीं कर्में असतात,

तितकीं वास्तविक प्रधानवाक्यें असतात असेंच म्हटलें पाहिजे. दुसऱ्या उदाहरणांत—तो रोज संध्या करितो, तो रोज पूजा करितो, तो रोज जप करितो, तो रोज वैश्वदेव करितो, तो रोज वेदाध्ययन करितो,—अशीं पांच प्रधानवाक्यें संयुक्त आहेत.

( इ ) अनेक स्थलवाचक किंवा कालवाचक किंवा इतर एकाच अर्थाचीं विधेय—विस्तारकें व एक विधेय व एक उद्देश्यः— दुसऱ्यास त्रास दिल्यानें, त्याचें नुकसान केल्यानें किंवा त्याचा हेवा केल्यानेंही स्वतःचें नुकसान होतें; तो रोज सकाळीं, दुपारीं, सायंकाळीं, संध्या करितो; इ०.

येथेंही शेवटल्या उदाहरणांत—तो रोज सकाळीं संध्या करितो, तो रोज दुपारीं संध्या करितो, तो रोज सायंकाळीं संध्या करितो—अशीं तीन प्रधानवाक्यें संयुक्त आहेत. म्हणजे वाक्यांत जितकीं विधेय—विस्तारकें असतील तितकीं त्यांत प्रधान वाक्यें असतात. वरील उदाहरणांतील सर्व विधेय—विस्तारकें कालवाचक आहेत. परंतु कधीं कधीं निरनिराळ्या अर्थाचींही अनेक विस्तारकें एकाच वाक्यांत एकामागून एक अशीं आलेलीं आढळतात. जसें:—तो काल दोनप्रहरीं, डाकगाडीनें, भावाच्या तारेप्रमाणें, बहिणीच्या लग्नासाठीं, कोणास न भेटतां, एकाएकीं, मुंबईस गेला. या वाक्यांत 'तो गेला' इतकेंच मुख्य वाक्य होय, बाकीचीं सर्व विधेय—विस्तारकें आहेत; परंतु काल दोनप्रहारीं हें कालवाचक, डाकगाडीनें हें वाहनवाचक, भावाच्या तारेप्रमाणें हें निमित्तवाचक, बहिणीच्या लग्नासाठीं हें उद्देश्यवाचक, कोणास न भेटतां व एकाएकीं हीं भिन्न भिन्न रीतिवाचक, आणि मुंबईस हें स्थलवाचक अशीं सात विधेय—विस्तारकें आहेत; आणि तीं निरनिराळा अर्थ दाखविणारीं आहेत—ही गोष्ट त्यांस जोडण्यास समुच्चयबोधक किंवा दुसरें कोणतेंही प्रधानत्वसूचक उभयान्वयी अव्यय लागत नाहीं, यावरूनही उघडच आहे. यामुळें प्रकृत वाक्य केवल वाक्यच होय.

( ई ) अनेक उद्देश्य—विस्तारकें व एक उद्देश्य व एक विधेयः—त्याच्या घरची व आमच्या घरची मंडळी काल सर्कस पहावयास गेली

होती; गोविंदरावांची, तुमची, व आमची गाडी परवांच्या बेगारींत सांपडली होती; इ०.

येथें दुसऱ्या उदाहरणात—गोविंदरावांची गाडी परवांच्या बेगारींत सांपडली होती, तुमची गाडी.......होती, आमची गाडी.......होती, अशीं तीन प्रधानवाक्यें संयुक्त आहेत.

( उ ) कर्माचीं अनेक विशेषणें व इतर सर्व एक एकः—त्यानें मला एक संस्कृत, एक इंग्रजी, एक मराठी, व एक गुजराथी, पुस्तक दिलें.

या वाक्यांत—त्यानें मला एक संस्कृत पुस्तक दिलें, त्यानें मला एक इंग्रजी पुस्तक दिलें, अशा प्रकारचीं चार प्रधानवाक्यें आहेत हें उघड आहे.

( ऊ ) अशा प्रकारें अनेक उद्देश्यें व अनेक विधेयें किंवा कर्में किंवा विस्तारकें एकत्र मिळालीं, म्हणजे संयुक्तवाक्यांतील प्रधानवाक्यांची संख्या वाटेल तितकी वाढते. जसें:—'गोविंदा आणि कृष्णा सातान्यास व पुण्यास राहिले' 'त्यांनीं व आम्हीं पेरू व केळीं खाल्लीं' या वाक्यांत चार चार प्रधानवाक्यें संयुक्त आहेत. तसेंच "त्यांनीं व आम्हीं, पुण्यास व वाईस, पेरू व केळीं खाल्लीं; या वाक्यांत वास्तविक पहातां आठ वाक्यांचा संकोच आहे! त्यांनीं व आम्हीं, पुण्यास व वसईस, पेरू व केळीं, वाटलीं व खाल्लीं, यांत तर सोळा वाक्यांचा संकोच आहे!" ( वाक्यमीमांसा, पृष्ठ १२१ ).

अ, आ, इ, ई, उ, ऊ, या सर्व ठिकाणीं तेथें तेथें सांगितल्याप्रमाणें प्रधान वाक्यांचा अस्पष्ट संयोग आहे, असें तात्विक दृष्टीनें कबूल करण्यास हरकत नाहीं. परंतु व्याकरण वाक्यपृथक्करण यांमध्यें आपणास बहुधा भाषेंतील प्रचलित वाक्यांचा न्यायशास्त्राचे दृष्टीनें जराशा स्थूल मानानेंच विचार करावयाचा असल्यामुळें, या अंकांत सांगितलेल्या या सहा प्रकारच्या वाक्यांस संयुक्त वाक्यें असें वाक्यमीमांसेंत म्हणत नाहींत. तर ज्या वाक्यांत अनेक उद्देश्यें किंवा अनेक विधेयें एका किंवा अनेक विधेयोद्देश्यांशीं संयुक्त असतात, त्याच वाक्यांस वाक्यपृथक्करणांत अस्पष्ट संयुक्त वाक्यें असें म्हणतात. कारण कीं, मूल उद्देश्य व मूल विधेय ह्यांनीं

वाक्य होतें; बाकीचे अवयव वाक्यदृष्ट्या गौण असल्यामुळें, त्यांच्या बाहुल्यानें वाक्यबाहुल्य होत नाहीं.

६०४. आतां संयुक्त वाक्याचें पृथक्करण कसें करावें तें सांगतों जेथें संयुक्त वाक्यांतील प्रधान वाक्यें स्पष्ट आहेत, तेथें त्यांचें पृथक्करण करण्याची अडचण नाहीं. तीं केवल वाक्यें किंवा मिश्र वाक्यें असावयाचीं, तेव्हां त्यांचें पृथक्करण पूर्वीं सविस्तर सांगितलेल्या केवल वाक्यांच्या व मिश्र वाक्यांच्या पृथक्करणाप्रमाणेंच करावयाचें. गेल्या अंकांत सांगितलेल्या अस्पष्ट संयुक्त वाक्यांत जितकीं प्रधानवाक्यें असतील, तितकीं सर्व स्पष्ट सांगून त्यांचे स्वतंत्रपणें पृथक्करण करावें.

हा साधारण नियम झाला, परंतु ‘ गोविंदा, विठू व कृष्णा मुंबईस गेले ’ या वाक्याचीं तीन निरनिराळीं वाक्यें स्पष्ट करण्याची काय गरज आहे ? ‘ हे तीन इसम एकत्र समजून अनेकवचनीं क्रियापद घातलें आहे. ज्या ठिकाणीं कर्ते अनेक असून क्रियापद एकवचनीं असेल, त्या ठिकाणीं मात्र असा संकोच समजावा, म्हणजे त्यांतील वाक्यें स्पष्ट सांगून प्रत्येकाचें अलग अलग पृथक्करण करावें, असा एक नवीन मार्ग निघालेला दिसतो. आणि गेल्या अंकांतील ( ऊ ) या कलमांत सांगितल्याप्रमाणें जेव्हां एखाद्या लहानशा वाक्यांत आठ आठ, सोळा सोळा वाक्यें असतील, तेव्हां त्या वाक्यांचे पृथक्करणांत हीं सर्व वाक्यें स्पष्ट सांगून त्यांचें अलग अलग पृथक्करण करण्याचा नियम फारच त्रासदायक दिसतो. ह्यामुळेंच आगरकरांनीं असें म्हटलें आहे कीं, नवीन मार्ग कांहीं वावगा नाहीं. ‘व असें केलें तरच ( नवीन मार्ग स्वीकारिला तरच ) वाक्यपृथक्करण सुलभ होणार आहे. ’ ते पुढें म्हणतात—‘ विधानाचें सारें अवसान विधेयक्रियापदावर असतें. तीं जितकीं असतील तितकीं निराळीं वाक्यें आहेत असें समजणें साहजिक आहे. या नियमास अनुसरलें असतां, वरील सोळा वाक्यांचे संकोचानें झालेल्या एका वाक्याचें पृथक्करण करितांना त्याचीं फक्त दोन वाक्यें करावीं लागतील. वास्तविक पहातां हा नियम कांहीं अंशीं सोईसाठीं म्हणून करण्यांत आला आहे, हें सांगावयाला पाहिजे असें नाहीं. ’ ते सरतेशेवटीं म्हणतात कीं,—‘ संकुचित व संक्षिप्त वाक्यांत क्रियापदाशिवाय इतर शब्दांचा अध्याहार केला असल्यास, ते सांगणें किंवा न

सांगणें वाक्य पाहून ठरविलें पाहिजे. त्याविषयीं ठरींव नियम घालतां येत नाहीं;' ( वाक्यमीमांसा पृष्ठ १२९ ).

या उताऱ्यांवरून असें दिसून येईल कीं संयुक्त वाक्यांतील अस्पष्ट वाक्यें स्पष्ट करण्याचा त्रास फार वाटतो, तो चुकविण्यासाठीं वरील तोड: आहे, आणि ती 'सोईसाठीं म्हणून करण्यांत' आली आहे. एक एका संयुक्त वाक्यांत आठ आठ सोळा सोळा अस्पष्ट वाक्यें असण्याचा संभव आहे, आणि एकाच वाक्यांत सोळाच काय, पण शें सवाशें अस्पष्ट वाक्यें असणें केवळ अशक्य नाहीं, ह्या गोष्टी खऱ्या आहेत. तथापि व्यवहाराचे दृष्टीनें बोलावयाचें म्हटलें तर असें वाक्य जरी एखादा परीक्षक विद्यार्थ्यांचा सोशिकपणा पाहण्यासाठीं मुद्दाम तयार करून विचारण्याचा संभव आहे, तथापि साधारण लेखनांत व भाषणांत सरासरी चारसहापेक्षां अधिक अस्पष्ट वाक्यांनीं होणारीं संयुक्त वाक्यें सहसा स्वाभाविकपणें येत नाहींत; असें म्हणण्यास हरकत नाहीं. म्हणजे वरील विवेचनांत अस्पष्ट वाक्यें स्पष्ट करण्याचा त्रास मुद्दाम वाजवीपेक्षां फाजील फुगवून दाखविला आहे. हें आगरकरांच्या उदाहरणावरूनही स्पष्ट कळण्यासारखें आहे. तथापि वाक्यमीमांसेच्या सोईसाठीं वर अंक ६९३ चे अखेरीस सुचविलेली व्यवस्था स्वीकारणें योग्य आहे. म्हणजे जेव्हां वाक्यांत अनेक उद्देश्यें किंवा अनेक विधेयें किंवा दोन्ही अनेक असतील, तेव्हांच त्या वाक्यांस वाक्यमीमांसेचे दृष्टीनें अस्पष्ट संयुक्त असें समजून, त्यांतील संयुक्तवाक्यें स्पष्ट सांगून वाक्यपृथक्करण करावें. जेथें जेथें उद्देश्य व विधेय हीं एकेकच आहेत तेथें तेथें, इतर अवयव अनेक असून ते प्रधानसूचक अव्ययानें जोडलेले असले तरी, एकच वाक्य आहे; म्हणजे संयुक्त वाक्य नाहीं असेंच समजावें.

६९५. संयुक्त वाक्यांत ज्याप्रमाणें मिश्र वाक्यें असूं शकतात, त्याचप्रमाणें मिश्र वाक्यांतही संयुक्त वाक्यें असूं शकतात; पण तीं गौण असतात. एका मिश्र वाक्यांतील प्रधान वाक्यास जीं गौण वाक्यें जोडण्यांत येतात, तीं जर प्रधानत्वसूचक उभयान्वयी अव्ययांनीं जोडलेलीं असलीं, तर तीं समानाधिकरण गौण वाक्यें होत. अर्थात् मिश्र वाक्यांत एकच वाक्य प्रधान असल्यामुळें त्यांत दोन किंवा अधिक प्रधान वाक्यांचा

संयोग मुळीं शक्यच नाहीं, हें उघड आहे. तेव्हां मिश्र वाक्यांत जर संयुक्त वाक्य यावयाचें झालें, तर तें गौण वाक्यांचेच संयोगानें येणें शक्य आहे. उदा०:—त्यानें जी गोष्ट वाचून दाखविली आणि जिचें तोंडी स्पष्टीकरण केलें, ती मंडळीस पसंत पडल्यासारखी दिसली. या मिश्र वाक्यांतील 'ती मंडळीस पसंत पडल्यासारखी दिसली,' हें प्रधान वाक्य असून 'त्यानें जी गोष्ट वाचून दाखविली' आणि 'त्यानें जिचें तोंडीं स्पष्टीकरण केलें,' हीं गौण वाक्यें विशेषणवाक्यें आहेत हें उघड आहे. हीं दोन विशेषणवाक्यें 'आणि' या प्रधानत्वसूचक उभयान्वयी अव्ययानें जोडण्यांत आलीं असल्यामुळें, तीं एकमेकांवर अवलंबून नाहींत; तर दोन्ही तिसऱ्यावरच अवलंबून आहेत. म्हणून अशा प्रकारच्या एकमेकांवर अवलंबून नसणाऱ्या व प्रधान वाक्यांशीं एकाच तऱ्हेचा संबंध ठेवणाऱ्या गौण वाक्यांस समानाधिकरण गौण वाक्य असें म्हणतात; आणि यामुळेंच सबंध वाक्यास संयुक्त वाक्य असें म्हणत नाहींत. गौण वाक्यें व्यधिकरण असलीं, तर संयुक्त वाक्याचा आभासही होत नाहीं हें उघड आहे. मिश्र वाक्यांतील समानाधिकरण व व्यधिकरण गौण वाक्यां-संबंधानें मिश्र वाक्यांचे विवेचनांतही खुलासा केला आहे. तो या ठिकाणीं पहावा, (अंक ६८० ).

६९६. समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययांनीं जोडलेलीं अनेक उद्देश्यें किंवा अनेक विधेयें वाक्यांत आलीं असता, तें वाक्य अस्पष्ट संयुक्त होतें; हें वरील विवेचनांत आलेंच आहे. तथापि यासंबंधानें एक गोष्ट सांगितली पाहिजे ती अशी:—कधीं कधीं समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययानें जोडलेलीं दोन नामें उद्देश्यस्थानीं असून त्या दोहों मिळून वास्तविक एकच उद्देश्य होत असतें; म्हणजे त्या ठिकाणीं उद्देश्यबाहुल्य हें केवळ दिखाऊ असतें. अशा वेळीं त्या वाक्यास संयुक्त म्हणतां येत नाहीं; तर तें केवळ वाक्यच होय. जसें:—दोन आणि तीन पांच (होत किंवा होतात अध्याहृत), राम आणि रावण शत्रु होत, राम आणि लक्ष्मण सख्खे भाऊ नव्हत, वडिलांस मान देणें आणि त्यांची आज्ञा पाळणें हें प्रत्येक मुलाचें कर्तव्यकर्म आहे, इ०. पहिल्या वाक्यांत दोन आणि तीन अशीं जरी दिसण्यांत दोन उद्देश्यें दिसत आहेत, तरी पांच हें पूरक

त्यापैकीं प्रत्येकास निरनिराळें लागत नाहीं; म्हणजे दोन पांच होत किंवा तीन पांच होत असें म्हणतां येत नाहीं. अर्थात् ' दोन आणि तीन ' इतकें सबंध उद्देश्य असल्यामुळें, या वाक्यास संयुक्त वाक्य असें म्हणतां येत नाहीं. त्याचप्रमाणें पुढील वाक्यांत राम शत्रु होता आणि रावण शत्रु होता. अशीं दोन वाक्यें आहेत असें म्हणणें शक्य नाहीं. यावरून शत्रु, मित्र, इ० परस्परसंबंधवाचक शब्द आणि बहीण, भाऊ, इ० नात्याचे वाचक शब्द विधेयपूरकें असतां, दिलेल्या वाक्यामध्यें दिसण्यांत जरी अनेक उद्देश्यें असलीं, तरी तें वाक्य केवलवाक्यच होय. अखेरच्या उदाहरणांत वडिलांस मान देणें व त्यांची आज्ञा पाळणें हीं दोन वाक्यांनें उद्देश्य आहेत. तरी तीं दोन भिन्न भिन्न उद्देश्यें नाहींत, ही गोष्ट त्या वाक्यांतील ' हें ' ' कर्तव्य कर्म ' आणि ' आहे ' ह्या एकवचनी शब्द-प्रयोगांवरून स्पष्टच आहे. एवंच एखाद्या वाक्यांत अनेक उद्देश्यें आहेत, असें जरीं सकृद्दर्शनीं भासलें, तरी तेवढ्यावरून तें वाक्य संयुक्त आहे असें एकदम ठरत नाहीं. तीं उद्देश्यें स्वतंत्र म्हणजे भिन्न भिन्न असतील म्हणजे त्या वाक्यांतील विधान जर त्यापैकीं प्रत्येकासंबंधानें पृथक्त्वानें करतां येत असेल, तरच त्यास संयुक्त-वाक्य म्हणता येईल; नाहींतर तें केवलवाक्यच होय, हें उघड आहे.

६९७. संयुक्तवाक्यांतील अनेक उद्देश्यें व अनेक विधेयें समुच्चयबोधक उभयान्वयी अव्ययानींच जोडलेलीं असतात असें नाहीं, तर प्रधानत्वसूचक उभयान्वयी अव्ययांपैकीं कोणत्याही प्रकारच्या उभयान्वयींनीं तीं जोडण्यांत येतात. जसें:—परसू किंवा विष्णु ( विकल्पबोधकानें जोडलेलीं ) उद्यां तुमचेकडे येईल; तो काल आला होता पण लगेच गेला ( न्यूनत्वबोधकानें जोडलेलीं ); तूं काल भर उन्हाचा बाहेर गेलास म्हणून आजारी पडलास ( परिणामबोधकानें जोडलेलीं ).

**टीप:**—संयुक्तवाक्यांची बरीच उदाहरणें या अध्यायांत आलीं आहेत. तेव्हां आणखी उदाहरणें देण्याची गरज नाहीं. त्याचप्रमाणें संयुक्तवाक्यांचें स्वतंत्र पृथक्करण करून दाखविण्याचीही गरज दिसत नाहीं. त्यांतील प्रधानवाक्यांचें वेगळें वेगळें पृथक्करण होतें हें पूर्वीं सांगितलेंच आहे.

# अध्याय ६.

## वाक्यविशेष.

६९८. तिन्ही प्रकारच्या वाक्यांचें पृथक्करण असें करितात, हें येथपर्यंत सविस्तर व सोदाहरण सांगितलें. येथेंच वाक्यपृथक्करणाचा विषय बहुतेक पूर्ण झाला; तथापि ह्याच विषयासंबंधानें कांहीं विशेष प्रकारच्या वाक्यांचा थोडासा खुलासा करणें व कांहीं साधारण गोष्टी सांगणें इतकें काम उरलें आहे. तें या अध्यायांत करण्याचें योजिलें आहे. करणरूपी, अकरणरूपी ह्या सत्तादर्शक व सत्ताभावदर्शक वाक्यांचाच बहुधा मागील सर्व अध्यायांत मुख्यत्वेंकरून उल्लेख करण्यांत आला आहे. तेव्हां प्रथम आज्ञार्थक, विध्यर्थक, प्रश्नार्थक, उद्गारवाची, संकेतार्थक आणि आशीर्वादार्थक ह्या साधारण दृष्टीनें भिन्न दिसणाऱ्या वाक्यांचा थोडास खुलासा करणें इष्ट आहे.

६९९. विध्यर्थक, उद्गारवाची, संकेतार्थक, आणि आशीर्वादार्थक वाक्यांसंबंधानें कांहींच अडचण नाहीं. संकेतार्थक वाक्यें नेहमींच मिश्र वाक्यें असतात, विध्यर्थक, उद्गारवाची आणि आशीर्वादार्थक हीं वाक्यें तिन्ही प्रकरचीं असूं शकतील. जसें:—

| | |
|---|---|
| विध्यर्थक | त्वां हें काम करावें........केवलवाक्य. तुला जें समजत नाहीं तें तूं गुरुजींस विचारावें....मिश्र. त्यानें मुंबईस रहावें व छापखान्यांत काम शिकावें............संयुक्त. |
| उद्गारवाची | दोरास्वामीची शक्ति विलक्षण आहे !............केवल त्या पोरीनें काठीवर जी कसरत केली ती पाहून आपण तर अगदीं थक्क झालों !...मिश्र. त्याचा पोषाख विचित्र आणि त्याचें बोलणेंही विचित्र !.................................संयुक्त. |
| आशीर्वादार्थक | ईश्वर तुमचें कल्याण करो........केवल. तुमचें नांव मागें राखील असा पुत्र तुम्हांस होवो...................मिश्र. तुम्हांस पुत्र होवो आणि तो तुमचा लौकिक राखो......................................संयुक्त. |

तेव्हां यांचें पृथक्करण करण्याची अडचण नाहीं. ज्या जातीचें वाक्य असेल त्या जातीच्या पृथक्करणाचे नियम त्यास लावावे.

७००. आज्ञार्थक क्रियापदांसंबंधानें ही फारशी अडचण नाहीं. आज्ञा बहुधा दुसऱ्यास म्हणजे ज्याच्या जवळ बोलतात त्यास, अर्थात् व्याकरणाचे भाषेनें द्वितीय पुरुषास करितात. तेव्हां आज्ञार्थक वाक्यांतील क्रियापदाचा कर्ता तूं किंवा तुम्ही हा असतो व तो बहुधा अध्याहृत असतो. जसें:—(रामा), तूं घरीं जा, मुलांनों, (तुम्ही) हा धंडा तयार करा; इ०. तथापि सौम्य आज्ञा करावयाची असतां क्रियापद कधीं कधीं प्रथम पुरुषींही येतें. जसें:—तूं कसें गातोस तें पाहूं; आतां आपण हवा खावयास जाऊं; इ०. मात्र आज्ञार्थक वाक्यांत तृतीय पुरुषीं कर्ता कधींच नसतो. ऊ—आख्याताच्या [ आज्ञार्थाच्या ] तृतीय पुरुषाचा उपयोग आज्ञा दाखविण्यासाठीं कधींच होत नाहीं, हें ऊ—आख्याताच्या उपयोगांवरून वाचकांस कळलेंच असेल. आज्ञार्थक वाक्यांत नेहमीं कर्तरि प्रयोग असल्यामुळें ह्यांतील कर्ता सर्वत्र उद्देश्य होतो हें उघड आहे.

आज्ञार्थक वाक्येंही तिन्ही प्रकारचीं असूं शकतात. जसें:—हें पत्र टपालांत टाक, [ केवल ]; तूं जें पत्र लिहीत आहेस तें टपालांत टाकण्यापूर्वीं मला दाखव, ( मिश्र ); हें पत्र लौकर पुरें कर आणि टपालांत टाक, ( संयुक्त ). न्यायशास्त्रामध्यें सर्व वाक्यांस सत्तावाचक वाक्यांचें रूप देतात हें तज्ज्ञांस स्मरेलच. त्या नियमास अनुसरून 'दत्तू इकडे ये' या आज्ञार्थक वाक्यास 'तूं इकडे ये अशी तुला माझी आज्ञा आहे.' असें सत्तावाचक रूप देतात. म्हणजे पहिल्या आज्ञार्थक वाक्याचें मिश्र वाक्य करितात. परंतु न्यायशास्त्राचे दृष्टीनें तसें करणें जरी अवश्य असलें, तरी वाक्यपृथक्करणास त्याची जरूर नाहीं. तर आज्ञार्थक वाक्य जसें असेल तसेंच घेऊन चालण्यास वाक्यमीमांसेंत हरकत नाहीं. इतकेंच नव्हे, तर वाक्याचें स्वरूप बदलणें वाक्यमीमांसेंत इष्ट नसल्यामुळें वाक्याचें मूळ रूपच घेऊन चालणें अवश्य आहे हें उघड आहे.

**टीपः**—आज्ञार्थक वाक्यांतील क्रियापद तृतीय पुरुषीं कधींच येत नाहीं हें वर सांगितलेंच. पण आगरकर आपल्या वाक्यमीमांसेंत म्हणतात.—" तसेंच 'त्याला पाहिजे तें करूं दे, मी म्हणून येथून हालणार नाहीं.' या वाक्यांतील करूं दे क्रियापदाला तूं हा अध्याहृत कर्ता मानणें फार गौण पक्ष आहे. त्याचा

खरा कर्ता अध्याहृत तो आहे. तो कर्ता करून करूं दे ' हें तृतीय पुरुषीं आज्ञार्थक क्रियापद करावें......' त्याला जें पाहिजे ' तें तो करूं दे ' हें पूर्ण वाक्य होय. हें मिश्र आहे. ' त्याला जें पाहिजे हें विशेषणार्थक गौण वाक्य आहे. यांतील पाहिजे हें सकर्मक क्रियापद मानिलें तर त्याला हा त्याचा कर्ता ( इत्यादि या वाक्यांतील शब्दांचें व्याकरणावर त्यांनीं कांहीं लिहिलें आहे त्याचा वाक्य पृथक्करणाशीं संबंध नाहीं म्हणून तें गाळलें आहे. )......... अशा प्रकारच्या वाक्यांचें व्याकरण करितांना ज्याप्रमाणें विकल्प ठेवावा लागतो, त्याप्रमाणें त्यांचें पृथक्करण करितांनाही तो ठेवावा लागतो.........संस्कृतांत प्रथम पुरुषीं व तृतीय पुरुषीं क्रियापदांचीं आज्ञार्थक रूपें रूढ आहेत. इंग्रजींतही आहेत, पण त्यांस पूर्वींचे व्याकरणकार ओढून ताणून द्वितीय पुरुषीं म्हणत. अलीकडील कांहीं अनेक भाषाभिज्ञ व्याकरणकार त्यांस प्रथम पुरुषीं व तृतीय पुरुषीं मानूं लागले आहेत. " ( वाक्यमीमांसा पृष्ट १३१–१३२ ).

या वाक्यासंबंधानें आगरकरांचें म्हणणें एका दृष्टीनें खरें आहे. ' त्याला पाहिजे तें करूं दे, मी म्हणून येथून हालणार नाहीं ' या वाक्यांत करूं दे म्हणजे करो ( अर्थात् त्याला पाहिजे तें तो करो ) असा अर्थ आहे असें म्हणणें कांहीं गैर नाहीं. आणि या अर्थाचे दृष्टीनें तो हा अध्याहृत कर्ता समजणें क्षम्य आहे. परंतु ' तो मुंबईस गेला ' या वाक्यांत मुंबईस हें स्थळवाचक क्रियाविशेषण अव्यय होय हें जरी अर्थदृष्ट्या केवळ गैर नसलें तरी तसें करणें शब्ददृष्ट्या गैरच होय. अर्थदृष्टि व शब्ददृष्टि या दोन भिन्न आहेत. हें कोणीही कबूल करील. मुंबईस हें व्याकरणांतही क्रियाविशेषण अव्ययच होय " असा एखाद्या तर्कटी वाक्यमीमांसकानें आग्रह धरीला, व अस्माकूणां नैयायिकानां अर्थेरि तात्पर्य न तु शब्देरि ' असा आपल्या तर्कशास्त्राचा डौल मांडिला, तर त्याच्यापुढे काय करावयाचें ! " असें जें आगरकरांनीं अन्यत्र ( वाक्यमीमांसा पृष्ट ३७ ) म्हटलें आहे, त्याचाच अनुवाद येथेंही करावा लागणार हें उघड आहे. ' तूं काय म्हणालास तें मला समजलें हें वाक्य मिश्र आहे; आणि तुझें म्हणणें मला समजलें , हे केवळ वाक्य आहे. या दोन वाक्यांतील अर्थ अगदीं एक असून तूं काय म्हणालास तें म्हणजे तुझें म्हणणें होय; हें कोणीही नाकबूल करणार नाहीं. पण अर्थदृष्ट्या दोन्ही वाक्यें एकच आहेत म्हणून तीं दोन्ही मिश्र वाक्यें होत किंवा दोन्ही केवळ वाक्य होत, हें म्हणणें सारखेंच चुकीचें आहे हें उघड आहे. पत्नी, कुटुंब, दारा ह्या तीन शब्दांचा अर्थ एकच असल्यामुळे तिन्ही शब्द भाषादृष्ट्या एकाच लिंगाचे होत असें समजून ' माझी कुटुंब आली ' असें जर कोणी म्हणूं लागला तर तें मराठी बोलण्याचा नवीनच प्रयत्न करणाऱ्या अनभ्यस्त, अपरिचित तेलंग्यासच शोभेल. अशा प्रकारचीं अनेक उदाहरणें सहज देतां येतील तरी तसें करण्याची कांहीं आवश्यकता

दिसत नाहीं. तात्पर्य इतकेंच कीं, ‘ त्याला पाहिजे तें करूं दे ’ याचा ‘ त्याला पाहिजे तें तो करो ’ असा अर्थ आहे असें जरी गृहीत धरून चाललें तरी भाषादृष्ट्या दोन्ही वाक्यांतील क्रियापद एकच असून, त्याचा कर्ताही एकच आहे हें समजणें इटवादी, तर्कटी नैय्यायिकासच शोभेल. करो हें क्रियापद ऊ—आख्यातीं तृतीय पुरुषीं आहे. परंतु करूं दे ह्यांत संयुक्त क्रियापदांतील दे हें रूप कोणत्या आख्याताचें व कोणत्या पुरुषीं आहे असा जर प्रश्न केला तर त्याचें एकच उत्तर येणें शक्य आहे. तें हें कीं दे हें ऊ—आख्याताचें ( आज्ञार्थाचें ) द्वितीय पुरुषाचें एकवचन होय, पण दे याचा वर्तमान काळाचे अर्थानेंही कधीं कधीं तृतीय पुरुषीं एकवचनीं उपयोग झालेला आढळतो. जसें:—‘ जें दे पतीस सुख फार कलत्र तेंच. ’ या ठिकाणीं दे=देतें, हें उघड आहे. परंतु ह्या रूपाचा हा उपयोग केवळ पद्यांत आढळतो. प्रचलित गद्यांत त्याचें एकही उदाहरण आढळत नाहीं. तेव्हां वरील प्रचलित गद्य वाक्यांत करूं दे हें क्रियापद तृतीय पुरुषीं एकवचनीं समजण्यास प्रचलित गद्याचा मुळींच आधार नाहीं. हें उघड आहे. म्हणून ‘ त्याला पाहिजे तें करूं दे ’ म्हणजे ‘ त्याला पाहिजे तें तो करो ’ असा जरी अर्थ मानिला तरी त्याचें ‘ त्याला पाहिजे तें तो करूं दे ’ असें रूप होतें असें जर आगरकरांचें म्हणणें असेल तर तें प्रचलित शिष्ट मराठी गद्याचे दृष्टीनें कोणासही संमत होणार नाहीं हें उघड आहे. एवंच ‘ करूं दे ’ हें क्रियापद एक तर गद्यांत तृतीय पुरुषीं कधींच होत नाहीं; आणि पद्यांत तें जरी तृतीय पुरुषीं एकवचनीं कधीं कधीं आलें तरी त्याचा आज्ञार्थ कधींच नसतो, तर वर्तमान काळ किंवा भूतकाळ [ मागूनि ये दूरुनि चक्रपाणी—मोरोपंत ] मात्र असतो. तेव्हां भाषादृष्ट्या आगरकरांचें मत साफ चुकीचें आहे ह्यांत संशय नाहीं. वाक्यमीमांसेंत जरी वाक्याच्या अर्थाकडे आपलें लक्ष असलें तरी वाक्याचें स्वरूप आपणास बदलण्याचा अधिकार नाहीं, तर तें काईंमच ठेवून त्याची व अर्थाची संगति लाऊन त्याच्या मूळ स्वरूपाच पृथक्करण करावयाचें असतें. दिलेल्या वाक्याचा मूळ अर्थ कायम ठेवून त्यास आपणास अर्थदृष्ट्या योग्य वाटेल तें स्वरूप देण्यास न्यायशास्त्राची आडकाठी नाहीं. परंतु न्यायशास्त्र व व्याकरणशास्त्र ह्यांची तडजोड होऊन जेव्हां वाक्यमीमांसा अस्तित्वांत येते तेव्हां त्या तडजोडीप्रमाणें वाक्याचें साधारण भाषेंतील मूळ रूप न बदलतां अर्थदृष्ट्या त्याचें पृथक्करण करावयाचें आहे हें विसरतां कामा नये. [ या मुद्याचें सविस्तर विवेचन या प्रकरणाचे विषयोपन्यासांत आलें आहे तें पहावें. ] नाहींतर केवलवाक्य, मिश्रवाक्य, संयुक्तवाक्य ह्यांमधील फरक वर दाखविल्याप्रमाणें अनेक जागीं उडून जाऊं लागेल. तात्पर्य, वाक्य-मीमांसेंत जरी अर्थदृष्ट्या वाक्याचे अवयव सांगावयाचे असले तरी हें काम दिलेल्या वाक्याचे मूळ स्वरूपास धरूनच झालें पाहिजे. त्या स्वरूपांत

बदल करण्याचा अधिकार जरी न्यायशास्त्रास असला तरी वाक्यमीमांसकास नाहीं हें निर्विवाद आहे.

आगरकरांचे मताचें खंडण करण्यास येथपर्यंतचें विवेचन पुरे आहे. तथापि आतां वादविषयक वाक्यांत 'त्याला पाहिजे तें करूं दे' याचा 'त्याला पाहिजे तें तो करो' असा अर्थ करणें वाक्याच्या शब्दांकडे नीट लक्ष देऊन कितपत योग्य आहे हें पाहूं. असा अथ करण बरावर आहे असें जरी मानिलें तरी वरील वाक्यांतील क्रियापद तृतीय पुरुषीं आज्ञार्थी आहे असें मानितां येत नाहीं हें वर दाखविलेंच आहे. आतां असा अर्थ करणेंही सर्वस्वी योग्य नाहीं असें दाखविण्याचा आमचा मानस आहे. कारण कीं असें न करितां येथेंच जर आम्ही थांबलों तर 'आम्हां महाराष्ट्रीयांस भाषाविषयक अर्थजालाशीं झगडण्याची संवय अद्यापि फारशी लागली नाहीं' असा जो आगरकरांनीं महाराष्ट्रीयांवर पंचवीसतीस वर्षांपूर्वीं आरोप केला आहे तो इतक्या काळानंतरही तितकाच खरा आहे असें ठरावयाचें; म्हणून त्या आरोपाचा सर्वस्वी नाहीं तरी अंशतः प्रतीकार करण्यासाठीं प्रकृत वाक्यांतील 'अर्थजालाशीं झगडणें' आम्हांस अवश्य आहे. हें उघड आहे, हा वाद केवळ साधारण लोकांसाठीं नसून तज्ञ लोकांसाठींच आहे, तेव्हां या वादांत स्थूल दृष्टि बाजूला ठेऊन सूक्ष्म दृष्टीचेंच अवलंबन केलें पाहिजे. प्रस्तुत वाक्यांत करूं दे हें संयुक्त क्रियापद आहे. ह्यांत कर हा मुख्य धातु व दे हा सहायधातु आहे. तसेंच या ठिकाणीं दे धातु अनुज्ञार्थक आहे हें उघड आहे. अनुज्ञार्थक दे धातु सहायधातु असता तेव्हां त्याचा कर्ता व मुख्य धातूचा कर्ता एक नसतात तर ते भिन्न असतात; आणि मुख्य धातूचा कर्ता अशा वाक्यांत चतुर्थ्यन्त असून संयुक्तक्रियापदाचें अप्रत्यक्ष कर्म असतो आणि दे ह्या सहायधातूचा कर्ताच संयुक्तक्रियापदाचा कर्ता होतो. या गोष्टी संयुक्तक्रियापदांचे विवेचनांत सविस्तर आल्या आहेत ( अंक ५४० ) व त्या सर्व वैयाकरणांस पूर्णपणें मान्य आहेत. त्यांस अनुसरून 'त्याला पाहिजे तें करूं दे याचा काय अर्थ होतो तो पहा. कर ह्या मुख्य धातूचा कर्ता म्हणजे करणारा जो 'तो', तो दे ह्या सहायधातूच्या कर्त्याहून भिन्न असला पाहिजे; आणि दे' ह्या सहाय धातूचा व सबंध संयुक्तिक्रियापदाचा कर्ता एकच असतो; तेव्हां 'त्याला' शब्दानें सूचित होणारा 'तो' हा 'करूं दे' ह्या संयुक्तक्रियापदाचा कर्ता होत नाहीं हें उघड आहे. इंग्रजीमध्येंही Let me speak, Let him speak इ० प्रयोगांस आज्ञार्थी प्रथम व तृतीय पुरुष असें जरी अर्थदृष्ट्या म्हणतात, तरी त्या भाषेंतही Let ह्याचा कर्ता नेहमीं you हा द्वितीय पुरुषींच आहे असें म्हणतात. त्याचप्रमाणें 'त्याला पाहिजे तें करूं दे' हा जरी अर्थदृष्ट्या तृतीय पुरुषीं अज्ञार्थ मानिला तरी दे ह्या धातूचा तो हा कर्ता होऊं शकत नाहीं. अर्थात् करूं दे हें संयुक्तक्रियापद द्वितीय पुरुषींच आहे. ह्याचें

तृतीय पुरुषीं रूप करूं देतो असं होतें. आतां 'त्याला पाहिजे तें करूं दे. मी म्हणून येथून हालणार नाहीं' असें जेव्हां वक्ता दुसऱ्यास म्हणत आहे, तेव्हां त्याचा काय आशय आहे तो पहा. 'मी येथें आहे, तो मला येथून जा म्हणून सांगत आहे किंवा मी येथून जावें अशी त्याची इच्छा आहे, शिवाय मी जर येथून दूर झालों नाहीं, तर तो मला कांहींतरी शासन करण्याची भीति घालीत आहे. अशा स्थितींत तूं मला, तें शासन टाळण्यासाठीं कदाचित् दूर होण्याची सल्ला देत आहेस. त्यावर मी असें म्हणतों कीं, तो वाटेल तें शासन मला करण्यास किंवा माझें वाटेल तें नुकसान करण्यास तयार होवो आणि त्याला तूं कोणताहि अडथळा जरी केला नाहींस म्हणजे जरी त्यानें अप्रतिहतपणें माझ्याशीं कोणत्याहि प्रकारचें वर्तन केलें किंवा माझें कांहींहि केले तरी मी येथून त्याच्या इच्छेस अनुसरून हालणार नाहीं.' असा प्रस्तुत वाक्याचा अर्थ आहे हें कोणीहि कबूल करील. आतां 'त्याला पाहिजे तें करूं दे' याचा आगरकरांच मतें त्याला पाहिजे तें तो करूं दे' असा अर्थ आहे. परंतु 'तो करूं दे' हा प्रयोगच वर सांगितल्याप्रमाणें भाषादृष्ट्या अशुद्ध आहे तो जर शुद्ध केला तर 'त्याला पाहिजे तें तो करो असा होतो; आणि याचा अर्थ 'त्याला पाहिजे तें करूं दे.' याच्या वरील अर्थासारखा जरी आहे, तरी दोहोंत थोडासा फरक आहे. तो इतकाच कीं, 'त्याला पाहिजे तें करूं दे' यामधील 'दे' या अनुज्ञार्थक सहायधातूनें स्पष्टपणें दाखविल्या जाणाऱ्या अर्थाचा 'करो' या क्रियापदांत जरी ध्वनी असला तरी तो अर्थ 'त्याला पाहिजे तें तो करो' या वाक्यांत स्पष्ट नाहीं. म्हणजे वरील अर्थामध्यें 'आणि त्याला तूं कोणताहि अडथळा जरी केला नाहीं' किंवा अप्रहितपणें असें जें करूं दे' यांतील दे या अनुज्ञार्थक सहायधातुच्या स्पष्ट अर्थास उद्देशून शब्द घालण्यांत आले आहेत. ते 'करो' याच्या अर्थांत् केवळ गर्भित आहेत हें उघड आहे. यामुळें 'त्याला पाहिजेतें करूं दे' आणि 'त्याला पाहिजे तें तो करो' या दोन वाक्यांचें अर्थ अगदीं समान आहेत असें म्हणतां येत नाहीं; शिवाय या दोन वाक्यांचा अर्थ अगदीं तंतोतंत एक आहे असें जरी म्हटलें तरी त्यावरून दोहोंची रचना एकच होय किंवा दोहोंचें पृथक्करण एकच प्रकारें झालें पाहिजे, असें म्हणतां यावयाचें नाहीं; हें वर सविस्तर दाखविलेंच आहे. एवंच या ठिकाणचें आगरकरांचें मत ग्राह्य नाहीं असें आम्हांस वाटतें.

७०१. प्रश्नार्थक वाक्यांबद्दलचें अंशतः विवेचन मिश्र वाक्याचें विवेचनांत आलेंच आहे. प्रश्नार्थक वाक्यहि तिन्ही प्रकारचें असूं शकते. जसें:—तूं कधीं आलास ? (केवल); तो काल आला हें तुला कसें कळलें ? (मिश्र) आणि तो आला कधीं आणि गेला कधीं ? (संयुक्त).

या वाक्यांचें पृथक्करण त्या त्या जातीच्या वाक्यांप्रमाणेंच करावयाचें. न्यायशास्त्रांत या प्रश्नार्थक वाक्यांस आज्ञार्थक वाक्यांप्रमाणेंच सत्तावाचक वाक्यांचें रूप देतात; आणि 'तूं कधीं आलास' ह्याचे जागीं 'तूं कधीं आलास असें मी विचारतों' किंवा 'तूं कधीं आलास असा माझा तुला प्रश्न आहे' असें मिश्र वाक्य घेतात. परंतु आज्ञार्थक वाक्यांचें संबंधानें सांगितल्याप्रमाणेंच प्रश्नार्थक वाक्यांसही असें सत्तावाचक मिश्र वाक्यांचें रूपदेण्याची वाक्य पृथक्करणास जरूर नाहीं.

७०२. वाक्यांतील जे शब्द स्पष्ट सांगण्याची जरूर नसते, तर जे वाक्यौघावरून सहज समजण्यासारखे असतात ते स्पष्ट न सांगतां वाक्यरचना करण्याची चाल सर्व भाषांत आढळते. त्या योगें वाक्यांस आटपसरपणा येतो. अशा वाक्यांस **संक्षिप्त** वाक्यें म्हणण्यास हरकत नाहीं. उदाहरणार्थः—रामा, गोविंदाइतका हुषार नाहीं, तरी तो गोविंदापेक्षां अधिक मेहनती आहे; माझ्यापेक्षां तो अधिक कुशल आहे; अगदीं फेंकून देण्याइतका हा आंबा सडला नाहीं; तुमच्यासारखें आमचें अंगण आट्यापाट्यांस योग्य नाहीं; इत्यादि वाक्यांचा स्पष्ट खुलासा पुढें दिल्याप्रमाणें:—गोविंदा जितका हुषार आहे तितका रामा हुषार नाहीं, तरी गोविंदा जितका मेहनती आहे, त्यापेक्षां रामा अधिक मेहनती आहे. मी कुशल आहे, परंतु तो मजपेक्षांहि अधिक कुशल आहे; अगदीं फेंकून देण्यास आंबा जितका सडावा लागतो; तितका हा आंबा सडला नाहीं; तुमचें अंगण आट्यापाट्यांस जसें योग्य आहे तसें आमचें अंगण आट्यापाट्यांस योग्य नाहीं; इ०. वरील संक्षिप्त वाक्यांचा जरी असा अर्थ असला तरी तसा अर्थ करून म्हणजे त्यांस अशा प्रकारचीं नवीन स्वरूपें देऊन त्यांचें पृथक्करण करावयाचें नाहीं. तर तीं जशी असतात तशींच ठेवून पृथक्करण करावयाचें असतें. त्यांचा अर्थ विद्यार्थ्यांस नीट समजावून सांगण्यासाटीं वाटेल तर त्यांतील अध्याहार स्पष्ट करून दाखवावा. तथापि वाक्यपृथक्करणास तसें करण्याची जरूर नाहीं.

७०३. ईआख्याताचे रूपांपुढें म्हणजे त्या आख्यातांतील क्रियापदांपुढें तों, पर्यंत, तोंपर्यंत, पावेतों, हीं शब्दयोगीं अव्ययें येऊन मागलें वाक्य त्याचें पुढील वाक्यास जोडण्यांत येतें. (सबंध खुलासा अंक

५९७ मध्यें पहावा ). जसें:—मी मुंबईहून परत येईपर्यंत तूं जाऊं नको, दिवे लागत तोंपर्यंत मला तेथें थांबावें लागलें, इ०. अशा ठिकाणचीं शब्दयोगी-अव्ययान्त वाक्यें सर्व शब्दयोगी अव्ययान्त शब्दांप्रमाणें वाक्यमीमांसेचे दृष्टीनें क्रियाविशेषणें होत; म्हणजे त्यांस क्रियाविशेषणवाक्य समजून सबंध वाक्य मिश्र वाक्य समजावें; आणि त्याचें पृथक्करण पूर्वीं सांगितल्याप्रमाणें करावें. उदाहरणार्थ:—

त्यानें मनांत धरिलेलें कार्य जरी क्षुल्लक आहे, तरी तें सिद्धीस जाई-तोंपर्यंत त्याचें दुसऱ्या कोणत्याही कामांत लक्ष लागावयाचें नाहीं.

हें सबंध वाक्य मिश्र आहे.

( १ ) तोंपर्यंत त्याचें.......नाहीं.—प्रधान वाक्य.

( २ ) त्यानें मनांत धरिलेलें.......सिद्धीस जाई—[ क्रियाविशेषण वाक्य—( प्रधान वाक्यावर अवलंबून असलेलें. )]

हें क्रियाविशेषण वाक्य जरी गौण आहे, तरी तें स्वतंत्रपणें एक मिश्र वाक्य आहे. त्यांतील वाक्यांच्या जाती येणेंप्रमाणें:—

( ३ ) तें सिद्धीस जाई—प्रधानवाक्य.

( ४ ) त्यानें मनांत धरलेलें कार्य क्षुल्लक आहे-[ क्रियाविशेषण गौण वाक्य—( ३ ) ह्यावर अवलंबून असलेलें. ]

यावरून ( २ ) हें क्रियाविशेषणवाक्य, ( १ ) या वाक्यासंबंधानें जरी गौण आहे, तरी त्यांतील ( ३ ) हें वाक्य, ( ४ ) ह्या वाक्यासंबंधानें प्रधान आहे; म्हणजे सबंध मिश्र वाक्यांतील गौण वाक्यही मिश्रच आहे. इतकें समजल्यावर प्रत्येक वाक्यांतील उद्देश्यादि अवयव स्पष्ट सांगण्याचें काम सोपें आहे.

टीप:—व्याकरणामध्यें पर्यंत वगैरे शब्दयोगी अव्ययांचे पाठीमागील वाक्य नामाप्रमाणें उपयोगांत आहे असें समजतात. कारण कीं, शब्दयोगी अव्ययें हीं नामांचेपुढें, किंवा नामांप्रमाणें उपयोगांत येणाऱ्या शब्दांपुढें, येतात असा व्याकरणाचा नियम आहे. त्यास अनुसरून पर्यंत वगैरे शब्दयोगी अव्ययांचे मागील वाक्यें व्याकरणदृष्ट्या नामें होतात. परंतु वाक्यमीमांसेचे दृष्टीनें पर्यंत वगैरे शब्दयोगी अव्ययें ज्यांचे अंतीं येतात तीं स्थलवाचक किंवा कालवाचक असल्यामुळें, सर्व शब्दयोगी अव्ययान्त नामांप्रमाणें क्रियाविशेषणें म्हणजे क्रिया-

विशेषणवाक्यें होत हें उघड आहे. वाक्यमीमांसेचे दृष्टीनें यास नामवाक्य म्हणतां यावयाचें नाहीं—हें विद्यार्थ्यांनीं लक्षांत ठेवावें.

७०४. आतां ज्या वाक्यांत ला—प्रत्ययान्त धातुसाधितें म्हणजे ला-कृदन्तें विभक्तिप्रत्यय लागून किंवा शब्दयोगी अव्ययें लागून उपयोगांत येतात त्यांच्याकडे वळूं. तो वेळेवर येऊन पोंचल्यामुळें सर्व काळजी दूर झाली, त्यानें मला भर दिल्यानेंच मीं तें काम हातीं घेतलें, सूर्य उगवल्यापासून कपाळ दुखण्यास सुरवात होते, इ० या वाक्यांचा बराच खल वाक्यरचनेमध्यें ( अंक ६२१—६२३ ) केला आहे. यावरून त्यांचें पृथक्करण कसें करावें हें समजण्यास बरीच मदत होईल.

या वाक्यांतील पोंचल्यामुळें, दिल्यानें, उगवल्यापासून इत्यादि रचने संबंधानें दोन पक्ष आहेत. एकाचे मतें पोंचल्यामुळें = पोंचला यामुळें, दिल्यानें = दिली यानें म्हणजे या गोष्टीनें, उगवल्यापासून = उगवला तेव्हांपासून, असा पदच्छेद करून व्याकरण व वाक्यपृथक्करण करावें. दुसऱ्या पक्षाचे मतें असें करणें योग्य नसून पोंचल्यामुळें, दिल्यानें, उगवल्यापासून इत्यादि शब्दांस विभक्त्यन्त किंवा शब्दयोगी—अव्यान्त कृदन्तेंच समजणें बरें. या शब्दांचा पदच्छेद करून एका वाक्यांत दोन वाक्यें उत्पन्न करून केवळ वाक्यास मिश्र वाक्याचें रूप देणें योग्य नाहीं. ‘ मी शाळेंत पोंचतांच घंटा वाजली ’ हें केवल वाक्य असून ‘ मी शाळेंत पोंचतांच ’ हें वाक्यांग कालदर्शक क्रियाविशेषणाप्रमाणें आहे; त्यास विधेय—विस्तारकाचे सदरांत घालावें या गोष्टी सर्वांस संमत आहेत. आतां ‘ मी शाळेंत पोंचतांच ’ या शब्दांचे जागीं जर ‘ मी शाळेंत पोंचतोंतोंच ’ हे त्याच अर्थाचे शब्द घातले, तर ह्या शब्दसमुच्चयास वाक्यांग न म्हणतां त्यांत पोंचतों हें क्रियापद असल्यामुळें यास वाक्यत्व प्राप्त होत आहे; ह्यामुळें सबंध वाक्य केवल न राहतां मिश्र होतें, हें उघड आहे. त्याचप्रमाणें ‘ मी शाळेंत पोंचल्याबरोबर घंटा वाजली ’ हें वाक्यही केवल वाक्य असून ‘ मी शाळेंत पोंचल्याबरोबर ’ हें कालदर्शक विधेय—विस्तारक आहे असें म्हणणें बरें. त्याचा ‘ मी शाळेंत पोंचलों याबरोबर ’ असा पदच्छेद करून केवल वाक्यास मिश्रत्व देणें वाक्यमीमांसेचे दृष्टीनें योग्य नाहीं. तसें झाल्यास ज्या ज्या ठिकाणीं कृदन्तानें होणारा वाक्यांश केवल वाक्यांत येईल, त्या त्या ठिकाणीं त्या कृदन्तापासून एक क्रियापद

स्पष्ट सांगून वाक्यांत थोडासा योग्य फरक केल्यानें बरींच केवल वाक्यें मिश्र होऊं शकतील; परंतु हा फरक करण्याचा वाक्यमीमांसकास अधिकार नाहीं. त्यानें वाक्याचें स्वरूप बदलतां कामा नये; तर तें जसें असेल तसेंच घेऊन चालावयाचें असतें. हा मुद्दा यापूर्वीं अनेकवार येऊन गेलाच आहे. अशा दृष्टीनें हा दुसरा पक्षच आम्हांस विशेष योग्य दिसतो. आगरकरांचें मतही असेंच आहे. तें वाचकांस समजावें व त्यांच्या जोरदार भाषेचा व अधिकारयुक्त विवेचनाचा ठसा वाचकांचे मनावर उमटावा म्हणून त्यांच्या वाक्यमीमांसेतून एक विस्तृत उतारा घेतों.

" अशा ठिकाणीं कै० कृष्णशास्त्री गोडबोले ' उगवला, यावर, ' ' केलें, यास, ' ' करवलें, यास, ' अशी शब्दफोड करून, अशा प्रकारच्या शुद्ध वाक्यांचीं मिश्र वाक्यें करितात. अशा रीतिनें शब्दांची फोड करीत बसणें म्हणजे जेथें अडचण नाहीं तेथें ती उकरून काढण्यासारखें होय. उगवला, केलें, करवलें, हीं जर मूळचीं धातुसाधित विशेषणें आहेत व विशेषणांना नामाप्रमाणें लिंग-वचनविभक्त्यादि कार्यें होतात, तर त्यांना विशेषणें कल्पून इतर शब्दांप्रमाणें अशा ठिकाणीं त्यांचीं विभक्तिप्रत्ययांनीं व शब्दयोगी अव्ययांनीं सामान्यरूपें झालीं आहेत असें समजणें बरें, कीं कै० कृष्णाशास्त्र्यांप्रमाणें त्यांना द्विधा करून, व त्यांतील ' पूर्ण क्रियापदें ' आणि विभक्त्यन्त व अव्ययान्त सर्वनामें काढीत बसून वाक्याच्या अर्थांत निरर्थक घोंटाळा उत्पन्न करणें चांगलें—याचा सुज्ञ वाचकांनीं विचार करावा. इतर गोष्टींप्रमाणें भाषेचीही सुधारणा होत असते. तेराव्या शतकांतील मराठी भाषेचे सारे नियम आजच्या मराठीस लावूं म्हटलें तर कधींही चालावयाचें नाहीं. भाषेंत कोणत्याही नवीन प्रकारचे संप्रदाय पडून ते सुशिक्षित लोकांस संमत झाले, व ते वारंवार त्यांच्या बोलण्यांत व लिहिण्यांत येऊं लागले, म्हणजे व्याकरणकारांनीं आपले दुराग्रह एकीकडे ठेवून त्यांचा आदर केला पाहिजे. आपले जुने नियम त्यांवर चालविण्याचा प्रयत्न करण्यांत कांहीं नफा नाहीं. केल्यास, केल्यावर, इत्यादि शब्दांची फोड करण्याचा द्राविडी प्राणायाम करीत बसण्यापेक्षां, त्यांस विभक्तींनीं व अव्ययांनीं झालेलीं धातुसाधितांचीं सामान्यरूपें मानून निर्वाह करून घेणें विशेष सोईचें आहे. ' सूर्य उगवल्यावर आपण

पुढें चालूं लागलों ' या वाक्याचें पृथक्करण करतांना ' सूर्य उगवला ' ' यावर [ किंवा मग ] आपण पुढें चालूं लागलों ' असा दीर्घ अर्थ दोन वाक्यांनीं निर्दिष्ट करण्याचा बोलणाचा हेतु असता, तर त्यानें आपण होऊन दोन वाक्यें घातलीं असतीं; तें काम त्यानें व्याकरणकारावर किंवा वाक्यमीमांसकावर सोंपविलें नसतें. दुसरें हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, अशा रीतिनें वाक्याची फोड करूं गेल्यास वाक्याच्या ज्या भागाला महत्त्व देण्याचा उद्देश्य नसतो, त्यास महत्त्व देण्यांत येतें. अशा रीतिनें उद्दिष्ट अर्थाचा अनर्थ करण्याचा काधिकार व्याकरणकाराला नाहीं, व वाक्यामींमांसकालींहीं नाहीं. ' उगवला आणि मग ' असे शब्द न घालितां ' उगवल्यावर असा एक संयुक्त शब्द घालण्यांतच ' सूर्य उगवल्यावर ' या वाक्यांशानें स्वतंत्र वाक्यार्थाचा बोध न होतां, फक्त कालवाचक क्रियाविशेषणार्थक वाक्यांशाचा बोध व्हावा, असा बोलणाराचा किंवा लिहिणाराचा आशय असावा, असें स्पष्ट सिद्ध होतें. निदान या पुस्तकांत तरी वरील कारणांस्तव अशा प्रकारच्या वाक्यांस ' शुद्ध ' वाक्यांत गणिलें आहे. " [ वाक्यमीमांसा—पृष्ठ ७८—८० ].

अशा प्रकारें हा आगरकरांनीं प्रतिपादिलेलाच पक्ष आमच्या मतें विशेष ग्राह्य आहे. आणि हाच पक्ष ग्राह्यतर कां हें आम्हीं पूर्वीं [ अंक ६२३ ] सप्रमाण दाखविलें आहे.

याउपर गोडबोले यांचाच पक्ष जर कोणास पसंत पडत असला, तर त्यानें त्या मार्गाचें खुशाल अवलंबन करावें. येथें ग्राह्याग्राह्यतेचा प्रश्न आहे. तेव्हां जो मार्ग ज्यास पंसत पडेल, त्याचा त्यानें स्वीकार करावा. आम्हांस मात्र आगरकरांचाच मार्ग विशेष प्रशस्त दिसतो.

---

# पर्यवसानाध्याय.

—:०:—

## पदपरिस्फोट.

७०५. मराठी व्याकरण हा विषय गेल्या अध्यायाचे अंतीं संपला. व्याकरणाचें पर्यवसान पदपरिस्फोट होय. म्हणजे वाक्याचा अर्थ पूर्णपणें ध्यानांत येण्यासाठीं व्याकरण–शास्त्राचें साहाय्य घ्यावयाचें असतें; तें साहाय्य, वाक्यांतील पदांचें स्वरूप व त्यांचा परस्परसंबंध यांचें पूर्ण स्पष्टीकरण करण्याचे कामीं मिळतें. ह्यास **पदपरिस्फोट** असें म्हणतात आणि हेंच व्याकरणाचें पर्यवसान होय. वाक्यांतील पदांचें स्वरूप व त्यांचा इतर पदांशीं संबंध स्पष्ट करणें यास 'ग्रंथावरून व्याकरण करणें' किंवा 'व्याकरण सांगणें' असें आजकाल म्हणतात; त्याचे जागीं 'पदांचा परिस्फोट करणें' असें म्हटल्यानें तोच अर्थ थोडक्यांत स्पष्टपणें समजतो.

७०६ व्याकरणदृष्ट्या पदांचा परिस्फोट करण्याची पद्धति ठराविक आहे. त्या पद्धतीस अनुसरूनच परिस्फोट करणें चांगलें. एकंदर शब्दांच्या जाति आठ आहेत. तेव्हां या सर्व जातींच्या शब्दांनीं होणाऱ्या पदांचा परिस्फोट कसा करावा, हें प्रथम सांगून नंतर त्याचीं कांहीं उदाहरणें देऊं; आणि हा विषय पूर्णपणें मनांत भरून सर्व प्रकारच्या कमीज्यास्त अवघड ठिकाणच्या पदांचा परिस्फोट करण्याचें सामर्थ्य वाचकांस यावें म्हणून अखेरीस नमुनेदार परिस्फोटाची एक यादी देण्याचें योजिलें आहे.

### ( अ ) परिस्फोटाची साधारण पद्धति.

( १ ) **नाम**—मूळ शब्द, लिंग, जाति, विभक्ति, वचन, विभक्त्यर्थ.

( २ ) **सर्वनाम**—मूळ शब्द, लिंग, जाति, विभक्ति, वचन, विभक्त्यर्थ.

( ३ ) **विशेषण**—मूळ शब्द, जाति, असल्यास विकरण, विशेष्य.

( ४ ) **क्रियापद**—धातु, सकर्मक किंवा अकर्मक, रूप, आख्यात, लिंग, पुरुष, वचन, आख्यातार्थ, प्रयोग.

( ५ ) **क्रियाविशेषण**—जाति, विशेष्य.

( ६ ) **उभयान्वयी**—जाति, अन्वित वाक्यें किंवा पदें.

( ७ ) **शब्दयोगी**---त्याच्या मागील शब्द.

( ८ ) **केवलप्रयोगी**---अर्थविशेष.

उदाहरणे.

रामभाऊंचा धाकटा मुलगा फार हुषार आहे, म्हणून त्याला ते रसायनशास्त्र शिकण्यासाठीं जपानला पाठविणार आहेत.

( १ ) रामभाऊंचा---हें रामभाऊ या मूळ पुल्लिंगी विशेषनामाचें षष्ठीचें एकवचन, षष्ठीचा अर्थ जन्यजनकभावसंबंध, मुलगा या शब्दाकडे.

( २ ) त्याला---हें तो या पुल्लिंगी दर्शक सर्वनामाचें चतुर्थीचें एकवचन, चतुर्थीचा अर्थ कर्म, पाठविणार आहेत या संयुक्तक्रियापदाचें.

( ३ ) धाकटा---हें गुणविशेषण. ह्याचें विशेष्य मुलगा.

( ४ ) पाठविणार आहेत---हें पाठविणार आहे या सकर्मक संयुक्तक्रियेचें करणरूपीं, ई-आख्यातीं, पुल्लिंगी, तृतीय पुरुषाचें अनेकवचन, अर्थ उद्दिष्ट वर्तमान किंवा वर्तमान उद्देश; या क्रियापदाचा ते हा कर्ता व त्याला हें कर्म, सकर्मक कर्तरि प्रयोग.

( ५ ) फार---हें प्रकर्षवाचक क्रियाविशेषण अव्यय, हुषार या विशेषणाचें.

( ६ ) म्हणून---हें परिणामबोधक उभयान्वयी अव्यय; ह्यानें ह्याचे पुढील वाक्य मागील वाक्याचा परिणाम आहे असें समजतें व हें त्या दोन वाक्यांस जोडतें.

( ७ ) साठीं---हें शब्दयोगी अव्यय, शिकणें ह्या शब्दाचे पुढें आलेलें.

( ८ ) अरेरे ! त्याचा एकुलता एक मुलगा दगावला ! या ठिकाणीं अरेरे हें विषादद्योतक केवलप्रयोगी अव्यय आहे.

टीप:---पदपरिस्फोटाच्या आजपर्यंतच्या पद्धतींत येथें एक दोन फरक झालेले आहेत; ते असेः--हल्लीं नामाच्या परिस्फोटांत अन्त्य स्वर सांगण्याची चाल आहे. मूळ शब्द सांगितला म्हणजे अन्त्य स्वर सांगण्याची जरूर नाहीं. सर्वनाम, विशेषण वगैरे शब्दांचे परिस्फोटांत हल्लींही अन्त्य स्वर सांगत नाहींतच; नामाच्या

व सर्वनामाच्या परिस्फोटपद्धतींत कांहींही फरक असण्याचें कारण नाहीं. तेव्हां जर सर्वनाम सांगितल्यावर अन्त्य स्वर वेगळा सांगण्याची जरूर भासत नाहीं, तर ती मूळ नाम सांगितल्यावर तरी कां भासावी ? मूळ शब्द सांगितला म्हणजे अन्त्य स्वर साहजिकपणेंच स्पष्ट होत असल्यामुळें, कोणत्याच पदाचे परिस्फोटांत अन्त्य स्वर सांगण्याची आवश्यकता नाही हें उघड आहे. दुसरा फरक क्रियापदाचे परिस्फोटांत असून तो महत्त्वाचा आहे. प्रथम संयुक्त–क्रियापदांतील धातूसंबंधाचा; त्याबद्दलचें अंक ५४३ मधील विवेचन पहावें. दुसरें, दादोबांची भेदव्यवस्था गेल्यामुळें ' अमुक भेदी ' असें म्हणण्याची जरूर नाहीं हें पूर्वी विस्तृतपणें सांगितलेंच आहे. तसेंच अर्थ व काल हीं निरनिराळीं धातुरुपभेदक कारणें नसून, त्या दोहोंचा साधारण अर्थ या शब्दांतच अन्तर्भाव होतो. आणि नामांचे संबंधानें ज्याप्रमाणें विभक्तीचा निर्देश करून तिचा अर्थ सांगण्यांत येतो, त्याचप्रमाणें क्रियापदाचें आख्यात सांगून त्याचा अर्थ सांगण्यांत आला म्हणजे झालें. म्हणजे नामाचे विकरणाचा व अर्थाचा जसा परिस्फोट करावयाचा तसाच धातूच्या विकरणाचा व अर्थाचा करावयाचा, ह्यामुळें दोहोंचा परिस्फोट संगतवार होतो.

## ( आ ) नमुनेदार व बिकट परिस्फोट.

१. नंतर **अत्रिऋषि** स्नानास गेले.

अत्रिऋषि—अत्रिऋषि हा एक कर्मधारय समास होय; फक्त संधि झालेला नाहीं. परिस्फोट नामाप्रमाणें. येथें कोणी कोणी अत्रि हें ऋषि या शब्दाचें विशेषण होय असें म्हणतात, पण तें योग्य दिसत नाहीं. अत्रिऋषि हा समासच होय. अशा प्रकारचे धर्मराज, वसिष्ठमुनि, इ० समास संस्कृतांतही आहेत. वसंतऋतूंत झाडांस पालवी फुटते, लंडनशहराचें वर्णन काय करावें, या वाक्यांत वसंतऋतू व लंडनशहर हे अशाच प्रकारचे कर्मधारय समास होत.

( २ ) **सत्य** म्हणजे **खरें**, चार **पैसे** म्हणजे **आणा**, इ०.

[ या वाक्यांपैकीं पहिल्या वाक्यांत होय हें क्रियापद अध्याहृत समजून सत्य ही कर्त्रर्थी प्रथमा व खरें ही विधानार्थी प्रथमा, असा परिस्फोट करण्याची चाल आहे. परंतु ती दुसऱ्या वाक्यास नीट लागू पडत नाहीं. कारण कीं, ' चार पैसे म्हणजे एक आणा होय ' असें म्हणतात किंवा म्हणतां येतें हे खरें. तरी होय ह्या अध्याहृत क्रियापदाचा पैसे हा कर्ता होय, असें व्याकरणदृष्ट्या दिसत नाहीं. पैसे हा शब्द अनेकवचनीं असून त्याचा होय या एकवचनी क्रियापदाशीं अन्वय होऊं शकत नाहीं हें उघड आहे. तेव्हां आणखी उदाहरण घेऊन पाहूं.

एक रुपया म्हणजे सोळा आणे (होत किंवा होतात), सैन्य म्हणजे पुष्कळसे शिपाई (होत), पुष्कळसे शिपाई म्हणजे सैन्य (होय), दहा शेंकडे म्हणजे एक हजार (होय किंवा होतो), एक हजार म्हणजे दहा शेंकडे (होतात किंवा होत), घडा म्हणजे दहा शेर (होत किंवा होतात), दहा शेर म्हणजे एक घडा (होय किंवा होतो), इत्यादि अनेक उदाहरणांकडे पाहिलें म्हणजे या वाक्यांतील दुसऱ्या प्रथमान्त नामाप्रमाण क्रियापद फिरत व पहिल्या प्रथमान्त नामाप्रमाण फिरत नाहीं हें अगदीं स्पष्ट होतें. जेव्हां दोन्ही नामें एकवचनीं किंवा दोन्ही अनेकवचनीं असतील तेव्हां हा फरक समजत नाहीं. सत्य म्हणजे खरें (होय), दोन आणे म्हणजे आठ पैसे (होतात किंवा होत) अशासारख्या उदाहरणांत पहिलें प्रथमान्त नाम कर्तृस्थानीं आहे असें म्हणणें शक्य आहे. तथापि वरील उदाहरणांकडे पाहिलें म्हणजे हा पदपरिस्फोट मराठी भाषेच्या दृष्टया सर्वसाधारण नाहीं. नाहीं तर एका ठिकाणीं एक व्यवस्था व दुसऱ्या ठिकाणीं दुसरी व्यवस्था अशी विसंगति उत्पन्न होईल. तेव्हां सर्व उदाहरणांची संगतवार व्यवस्था लावणेंच इष्ट असल्यामुळें पुढें दिल्याप्रमाणें येथील परिस्फोट करणें अवश्य आहे हें उघड आहे. ]

सत्य, पैसे––हीं प्रथमान्त नामें, प्रथमेचा अर्थ उद्देश, अनुक्रमें खरें व आणा ह्या शब्दांकडे.

खरें, आणा––हीं प्रथमान्त नामें, प्रथमेचा अर्थ कर्ता, होय या अध्याहृत क्रियापदाचा.

**टीपः**––अशा वाक्यांत पहिलें प्रथमान्त नाम उद्देश्यार्थी व दुसरें प्रथमान्त नाम कर्त्रर्थी असतें.

(३) **तो** गृहस्थ काय करीत होता ?

तो––दर्शक विशेषण, गृहस्थाचें.

(४) **आम्हां** ब्राह्मणांनाच धर्म **नकोसा** झाला आहे.

आम्हां––आम्ही या सर्वनामविशेषणाचें सविभक्तिक विशेष्याचे योगानें सामान्यरूप. (अंक १४९).

**नकोसा**––विधिविशेषण. (नको + असा. नको ह्याचा क्रि० वि० प्रमाणें उपयोग होतो. पृष्ठ ४५६ पहावें).

(५) त्यानें **नन्नाचा** पाडा वाचिला.

नन्नाचा––(नकार) या धर्मवाचक पुल्लिंगी नामाचें षष्ठीचें ए० व०, षष्ठीचा अर्थ प्रकारविशेष, हिचा संबंध 'पाडा' या शब्दाकडे.

( ६ ) त्याला **ग**ची बाधा झाली आहे.

गची---**ग** ( गर्व ) या धर्म० नामाचें ष० ए० वें०. अर्थ प्रकारविशेष.

( ७ ) त्यानें **झाडझाड** झुडाकिलें.

झाडझाड---प्र० ए० व०, अर्थ कर्म; हा कर्मधाराय समास ( अंक ४२९ ).

( ८ ) तो **देशदेश** हिंडला.

देशदेश---प्र० ए० व०, अर्थ अधिकरण ( पृष्ठ ६६८ ); हिंड धातु अकर्मक आहे. हाही कर्मधारय समास होय, ( अंक ४२९ ).

( ९ ) शिवाजी इसवी **सन १६२७ त** जन्मला.

सन १६२७ त---सन १६२७ हें मूळचें धर्मवाचक नाम, पण येथें विशेषनामाप्रमाणें आहे. त्याचें सप्तमीचें एकवचन, अर्थ अधिकरण. सन १६२७ हा विशेषणोत्तरपद कर्मधारय समास होय.

( १० ) त्याचें **मी मी** म्हणणें व्यर्थ आहे.

मी मी--( मी मी म्हणणें म्हणजे मी असा आहें मी तसा आहें, माझ्यासारखा कोणी नाहीं वगैरे, अशा प्रकारचें म्हणणें; तेव्हां 'मी मी असें म्हणणें' असें समजून पदपरिस्फोट करावा. ) मी मी ह्या प्रथमेचा अर्थ उद्देश 'असें' ह्या अध्याहृत शब्दाकडे, व असें हें म्हणणें ह्याचें कर्म. किंवा 'मी मी' हेंच एकदम म्हणणें याचें कर्म केलें तरी चालेल.

( ११ ) **माझें माझें** म्हणण्यांत सर्व आयुष्य गेलें.

माझें माझें---माझें माझें विधिविशेषण, अध्याहृत हें, तें ह्या शब्दाचें, आणि असें हें अध्याहृत कर्म, म्हणण्यांत या कृदन्ताचें, खुलासा ( १० ) प्रमाणें.

( १२ ) तेथें बरीच **भवति--न--भवति** झाली.

भवति--न--भवति--भवति--न--भवति [ चर्चा ] या स्त्रीलिंगी धर्म-वाचक नामाचें प्र० ए०; अर्थ कर्ता झाली या क्रियापदाचा. हा द्वंद्व समास होय.

[ १३ ] **ज्यांत त्यांत** त्याचें पुढें पुढें आहेच.

ज्यांत त्यांत—याचा अर्थ सर्वांत. ही संक्षिप्त रचना आहे. जो विषय निघतो किंवा निघेल त्यांत इ०. ह्याचे जागीं 'ज्या त्या विषयांत' असेंही म्हणतात. 'त्याला नको काय, जें तें पाहिजेच' या ठिकाणीं 'जें तें' म्हणजे सर्व असा अर्थ आहे हें उघड आहे. जें तें म्हणजे जें पाहील तें. यावरून असें दिसून येईल कीं, 'ज्यांत त्यांत' हें 'जो तो' या संयुक्त अनिश्चित विशेषणनामाचें, किंवा सर्वनामाचें सप्तमीचें एकवचन होय.

( १४ ) **मला गरिबाला** तूं व्यर्थ कां त्रास देतोस ?

मला—हें मी या प्र० पु० वा० सर्वनामाचें, च० ए० व०, चतुर्थीचा अर्थ संप्रदान.

गरिबाला—ही गरीब या विशेषणनामाची चतुर्थी, चतुर्थीचा, अर्थ उद्देश मला या शब्दाकडे.

टीपः—आजकालचें या संबंधाचें मत असें:—"मला हें मूळचें सर्वनाम असतां, येथें त्याचा विशेषणाप्रमाणें उपयोग करून कवितेच्या नियमाप्रमाणें त्याची पुढील विशेष्याची जी विभक्ति तीच विभक्ति केली आहे." हें मत कां ग्राह्य नाहीं व कांहीं ठिकाणीं तरी तें साफ चूक कसें आहे, हें जाणण्यासाठीं १४९ अंकांतील ऊहापोह पहावा.

( १५ ) माझा मी, ज्याचा तो, तो ढचा ढच आहे, घरचें घर, घरच्या घरीं, सोमवारच्या सोमवारीं, कोराचा कोरा, गांवचे गांव, इत्यादि ठिकाणच्या षष्ठीच्या उपयोगासंबंधानें अंक ४९५ पहावा.

टीपः—निरनिराळ्या विभक्तींच्या निरनिराळ्या उपयोगांसाठीं व अर्थांसाठीं विभक्त्यर्थाध्याय पहावा. येथें द्विरुक्ति करण्यांत अर्थ नाहीं.

( १६ ) **कित्येकांचें** असें मत आहे.

कित्येकांचें—हें कित्येक या सर्वनामसाधित विशेषणनामाचें ( नामाप्रमाणें योजिलेल्या विशेषणाचें ) षष्ठीचें अनेकवचन, ह्याचा संबंध मत या शब्दाकडे.

टीप—अवघा, सर्व, कांहीं, कित्येक, अन्य, इतर, इ० बऱ्याच शब्दांस सामान्य सर्वनामें म्हणण्याची चाल पडून गेली आहे, ती योग्य नाहीं. सविस्तर विवेचनासाठीं पृष्ट १२३ मधील ऊहापोह पहावा.

( १७ ) त्याला **आपल्या इतका** बुद्धिमान् दुसरा कोणी नाहीं, असा गर्व झाला आहे.

आपल्या—हें आपण ह्या आत्मवाचक सर्वनामाचें सविकरण किंवा षष्ठ्यन्त सामान्यरूप, 'इतका' ह्या शब्दयोगी अव्ययाचे योगानें.

इतका—हें शब्दयोगीविशेषण होय; हें आपल्या या शब्दास जोडलेलें असून ह्याचें विशेष्य कोणी; किंवा हें ह्या बुद्धिमान् विशेषणाचें विशेषण होय असें म्हणणें बरें. ( शब्दयोगीविशेषणांसंबंधानें २१८ व ३६१ हे अंक पहावे ).

( १८ ) **गोविंदराव** मला म्हणाले कीं **तुम्ही** उद्यां या.

गोविंदराव—बहुमानार्थीं प्रथमेचें अनेकवचन, अर्थ कर्ता म्हणाले या क्रियापदाचा.

तुम्ही—बहुमानार्थीं अनेकवचन.

( १९ ) त्यानें माझ्यावर आज **चौसष्टी** केली.

चौसष्टी ( एका प्रकारचा सोंगट्यांचे खेळांतील डाव )—चौसष्टी हें स्त्रीलिंगी सामान्यनाम, प्र० ए० व०, अर्थ कर्म, केली या क्रियापदाचें.

( २० ) ह्या **सहामाहींत** त्याचा अभ्यास बरा आहे.

सहामाहींत—हें सहामाही ( हें मूळ धर्मवाचक नाम ) या स्त्रीलिंगी सामान्यनामाचें सप्तमीचें एकवचन, अर्थ अधिकरण. हा द्विगु समास होय. ( पृष्ट ६१० ).

( २१ ) **साठी** बुद्धि **नाटी** अ० नाठी.

साठी—धर्मवाचक नाम प्र० ए०, प्रथमेचा अर्थ कर्ता, झाली या अध्याहृत क्रियापदाचा. यांतील अध्याहृत शब्द स्पष्ट केले म्हणजे जें पूर्ण वाक्य होतें तें असः—साठी झाली म्हणजे बुद्धि नाटी होते, किंवा साठी जेव्हां होते तेव्हां बुद्धि नाटी होते.

नाटी—विधिविशेषण, बुद्धीच.

**टीप**—'मंजरीकार' नाठी ' क्रियापद करितात. परंतु नाटणें किंवा नाठणें असा धातु कोठें आढळत नाहीं. नाटी, नाठी अशीं विशेषणें आहेत.

( २२ ) या डावांत बापूला **पंधरा एकसारखे पांचवेळ** पडले.

पंधरा--हें सामान्यनाम, प्र० अ० व०, अर्थ कर्ता, पडले ह्या क्रियापदाचा. या ठिकाणीं पंधरा म्हणजे फांशावरील तितके पौ; ह्यामुळें ते येथें संख्याविशेषण नव्हे. पौ किंवा पव म्हणजे फांशावरील ठिपके.

एकसारखे---विधिविशेषण, पंधरा या नामाचें. एकसारखा हा कर्मधारय समास आहे. किंवा हा अव्ययीभाव समास समजून त्यास क्रियाविशेषण म्हणावें.

पांचवेळ---हें क्रियाविशेषण, पडले या क्रियापदाचें.

**टीप**---पांच आणि वेळ असे दोन स्वतंत्र शब्द येथें समजतां येत नाहींत. 'पांच वेळा पडले' अशा ठिकाणीं पांच वेळा ह्या नामाचें विशेषण व वेळा हें प्र० अ० व०, अर्थ अधिकरण असा परिस्फोट केला पाहिजे हें उघड आहे. पण वेळ हें एकवचन असल्यामुळें पांच हें त्याचें स्वतंत्रपणें विशेषण होऊं शकत नाहीं. म्हणून 'पांचवेळ' असा समास समजणें अवश्य आहे. एकवार, तीनवार, दोनडाव, हे ह्याच प्रकारचे समास होत. परंतु वार, डाव, ह्यांचें बहुवचन एकवचनाप्रमाणेंच असल्यामुळें वार, डाव, हे शब्द स्वतंत्र समजले तरी चालतें. परंतु वेळ ह्याचें अनेकवचन एकवचनाहून भिन्न पडल्यामुळें, 'पांचवेळ' हें सामासिक पद होय, असें म्हटल्यावांचून गत्यंतरच नाहीं.

( २३ ) **बेदुणें** चार, **बेत्रिक** सहा.

या ठिकाणीं दोन रीतींनें पदपरिस्फोट करितां येईल; बेदुणें, बेत्रिक यांच्या मूळ स्वरूपांचा विचार करून किंवा त्यांस आतां एक साधित शब्द समजून.

( अ ) मूळ स्वरूपाचे दृष्टीनें बे ही प्रथमा आणि दुणें, त्रिक इ० शब्द तृतीयान्त होत. बारा अठ्ठें, सोळा सत्तें, चौदा नव्वें, वीस पावणें, पंचवीस दीढें, तीस अडचें, इत्यादि शेंकडों पाठांकडे नीट लक्ष पुरविलें म्हणजे त्रिक हें मूळचें त्रिकें असून तृतीयान्त होय, ह्याबद्दल शंकाच उरत नाहीं. तेव्हां ही भाषा संक्षिप्त होय, व तिचें मूळ विस्तृत स्वरूप कांहींसें पुढें दिल्याप्रमाणें असावें. दुणें ( दोन या संख्येनें ) गुणलेले बे ( दोन ), त्रिकें ( तीन या संख्येनें ) गुणलेले बे ( दोन ), अठ्ठें ( आठानें ) गुणलेले बारा, पावणें ( पाऊण या संख्येनें ) गुणलेले वीस, दीढें ( दिढानें ) गुणलेले पंचवीस, इत्यादि.

या विस्तृत रूपांवरून पदांचा परिस्फोट सुगम होतो. दुणें, त्रिकें, अट्टें, इत्यादि तृतियेचा अर्थ इयत्ता किंवा परिणाम; बे, बारा, वीस, इत्यादि पहिल्या संख्यावाचकांच्या प्रथमेचा अर्थ उद्देश चार, सहा इ० दुसऱ्या प्रथमान्त संख्यावाचकांकडे आणि चार, सहा या दुसऱ्या संख्यावाचकांच्या प्रथमेचा अर्थ कर्ता 'होत' या अध्याहृत क्रियापदाचा. बे निम्मे एक या ठिकाणीं होय हें एकवचनीं क्रियापद अध्याहृत आहे असें समजावें लागेल. ( येथील प्रथमान्त शब्दांच्या प्रथमेच्या अर्थासंबंधानें चार पैसे म्हणजे आणा, सत्य म्हणजे खरें, या वाक्यांचें खालील ऊहापोह पहावा. )

( आ ) बेदुणें, बेत्रिक, बाराअठ्ठें, सोळासत्तें, वीसपावणें, इत्यादि साधित शब्द होत असें समजून त्यांचा एकत्र परिस्फोट करणें हा दुसरा मार्ग होय. या दृष्टीनें बेदुणें म्हणजे द्विगुणित बे, बेत्रिकें=त्रिगुणित बे, बाराअठ्ठें=अष्टगुणिक बारा, अशा प्रकारचा अर्थ असल्यामुळें बेदुणें, बेत्रिकें, बारा अठ्ठें हीं आवृत्तिवाचक संख्याविशेषणें होत असे म्हणावें. (अंक१७१)

प्रचलित भाषेच्या दृष्टीनें आणि संक्षिप्त रचनेचा विघाड न करितां व्याकरणव्यवस्था करावयाची म्हटल्यास दुसरा मार्ग बरा दिसतो. तथापि संक्षिप्त रचनेच्या मूळाचा विसर न पडावा असें जर कोणास वाटत असेल तर त्याचे दृष्टीनें पहिला मार्ग बरा हें उघड आहे. यद्रोचते तद्ग्राह्यम.

(२४) **लहानमोठ्या** माणसांचा **सरसकट** खर्च **प्रत्येकीं** दरमहा **सहा सात रुपये** लागतो.

लहानमोठ्या—लहानमोठा हा विशेषणोभयपद कर्मधारय समास ( अं० ४४३ ). हें माणसें या शब्दाचें विशेषण; सविभाक्तिक विशेष्याचें योगानें लहानमोठ्या असें विशेषणाचें सामान्यरूप झालें आहे.

सरसकट—हें साधित विशेषण, ह्याचें विशेष्य खर्च.

प्रत्येकीं–( अ ) हें क्रियाविशेषण [ अव्ययी भाव समास अंक ४३० ]; लागतो ह्या क्रियापदाचें.

( आ ) हें प्रत्येक ह्या पृथक्त्ववाचक ( अं० १७२ ) संख्या विशेषणाचें सप्तमीचे एकवचन, सप्तमीचा अर्थ प्रमाण. ( ज्याप्रमाणें प्रत्येकास सहा अशा सारख्या ठिकाणीं चतुर्थीचा अर्थ प्रमाण–पृष्ठ ६७४–होतो,

त्याचप्रमाणें माणशीं पांच रुपये, मणी दोन आणे नुकसान झालें, इत्यादि ठिकाणी माणशीं, मणी, अशा सप्तमीचा अर्थहि प्रमाण असतो. )

दरमहा–हें क्रियाविशेषण ( अव्ययीभाव समास–अं० ४२७ ) लागतो ह्या क्रियापदाचें.

सहासात–हें मासिक विशेषण, रुपये या शब्दाचें ( सहासात हें वैकल्पिक कर्मधारय समासाचें उदाहरण होय. पृ० ६१४ ).

रुपये–ह्या प्रथमेचा अर्थ मूल्य पृ० ६६९.

( २५ ) तुम्ही **कसचें** काय घेऊन बसलांत ?

कसचें–हें विशेषण, काय ह्या प्रश्नार्थक सर्वनामाचें.

टीपः––कसचें हें कसा ह्यास चें प्रत्यय लागून झालेलें विशेषण समजावें. कसा ह्याचें षष्ठीचें नियमित रूप कशाचें असें होतें, कसचें हें रूप मुद्दां षष्ठीच्याच प्रत्ययानें साधलेलें होय, पण ह्यांत विशेषणत्व अधिक आहे. ( सविस्तर खुलाशासाठीं पृ० ३७० टीप १ पहा. )

(२६) **चालता** काळ; त्याची वाचा जरी बंद झाली होती, तरी मात्रा पोचतांच तो **बोलता** झाला.

चालता––हें काळ ह्याचें विशेषण, हें संक्रांत विशेषण होय, ( पृष्ठ ६३७ टीप. )

बोलता–विधिविशेषण, ह्याचें विशेष्य तो.

टीपः––बोलता झाला, हें येथें संयुक्त क्रियापद नाहीं. झाला हेंच मुख्य क्रियापद आहे, तथापि बोलता झाला हें संयुक्त क्रियापद केलें तरी चालेल.

(२७) तूं जेवितेवेळीं बोलत नाहींस काय ?

जेविते–हें जेवती या कृदन्त विशेषणाचें वेळीं या साविभक्तिक विषेश्याचे योगानें सामान्यरूप.

टीपः––या ठिकाणीं प्रचलित मताप्रमाणें ‘ तूं जेवीस ते वेळीं ’ असा पदच्छेद करून परिस्फोट करतात. पण हें मत कां व कसें असमाधानकारक आहे हें समजण्यासाठीं अंक ६०७ मधील विस्तृत ऊहापोह पहावा.

(२८) **कांहीं केल्या** त्याची सुटका होणार नाहीं.

कांहीं––हें अनिश्चित विशेषणनाम, केल्या या कृदन्ताचें कर्म.

केल्या---हें कृदन्त कियाविशेषण ( पृ. ५३२ ).

( २९ ) तूं असा कसा **फसला गेलास** ?

फसला गेलास---( याचा अर्थ फसलास असा आहे. तथापि फसला गेलास, हा स्वरूपतः नवीन कर्मणि प्रयोगासारखा म्हणजे फसविला गेलास या स्वरूपाचा व अर्थाचा प्रयोग दिसतो. तथापि फस धातूचा सकर्मक उपयोग कधींच होत नसल्यामुळें फसला गेलास यास कर्मणि प्रयोग म्हणण्याची अडचण आहे. ही अडचणच पतकरत असल्यास या वाक्यांत कर्मणि प्रयोग आहे असें म्हणावें; पण तसें करणें आम्हांस प्रशस्त दिसत नाहीं. आमच्या मतें अकर्मक धातूच्या ला--कृदन्तापुढें जा धातूचा उपयोग होऊन कर्तरि प्रयोगच होतो. तो इतका कसा भिजला गेला, त्याचा हात इतका कसा भाजला गेला, इत्यादि अशाच मासल्याचीं उदाहरणें होत. ) या वाक्यांत तूं हा कर्ता, भिजला गेलास हें संयुक्त क्रियापद, कर्तरि प्रयोग. ( मात्र हा प्रयोग प्रशस्त नाहीं. जा धातूचा अकर्मक धातूच्या ला--कृदन्तापुढें उपयोग करण्याची जरूर नाहीं. फसला गेलास म्हणजे फसलास, भाजला गेला म्हणजे भाजला, भिजला गेला म्हणजे भिजला, इतकाच अर्थ आहे; तर जा धातूच्या आख्यातरूपाचा काय उपयोग ? )

( ३० ) आज **कमींत कमी** शंभर **पान** झालें.

कमींत कमी--हें परमावधिद्योतक विशेषण शंभर याचें, ( अंक ३७०--ई)

पान---हें समुदायवाचक किंवा आधिक्यार्थक एकवचन, अंक (२९३).

( ३१ ) त्यानें ही गोष्ट **करावयाची नव्हती**, या वाक्यांत त्यानें हा कर्ता, गोष्ट हे कर्म, करावयाची नव्हती हें संयुक्तक्रियापद, प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोग.

करावयाची नव्हती---हें ' करावयाची नहो ' या संयुक्त क्रियेचें अकरणरूपीं द्वितीय ताख्याताचें स्त्रीलिंगी तृ० पु० ए० व०, अर्थ विधिभूत. या वाक्यांत प्रधानकर्तृक कर्मणिप्रयोग आहे.

( ३२ ) त्यानें **जायचें होतें**.

जायचें होतें---हें ' जायचें हो ' या संयुक्तक्रियेचें करणरूपीं द्वितीय ताख्याताचें नपुंसक लिं० तृ० पु० ए० व०, अर्थ विधिभूत; याचा त्यानें हा कर्ता; हा प्रधानकर्तृक भावी प्रयोग.

[ ३३ ] तो **जायचा आहे.**

जायचा आहे—हें संयुक्तक्रियापद. ई–आख्यातीं तृ० पु० ए० व०, वर्तमान विधि किंवा उद्देश, कर्तरि प्रयोग.

**टीप**—जायचा आहे आणि जाणार आहे, यांतील फरकासाठी पृष्ठ ७०७ वें. याठिकाणीं जायाचा हें विधिविशेषण मानिलें तरी चालण्यासारखें आहे. संयुक्तक्रियापदांचे पद्धतीप्रमाण संयुक्तक्रियापद मानणें अधिक प्रशस्त होय.

( ३४ ) एखादा मुंबईस **जावयाचा** मनुष्य आहे काय ?

जावयाचा—हें षष्ठयन्त विशेषण मनुष्य ह्या नामाचें.

( ३५ ) तो हळूच उठून **जायचा.**

जायचा—हें विधिविशेषण तो या सर्वनामाचें.

**टीप**—या वाक्यांत ' आहे ' हें क्रियापद अध्याहृत मानावें. कोणी ' जायचा ' च क्रियापद म्हणतात; पण तें योग्य नाहीं. तें क्रियापदाची व्याख्याच लक्षांत नाहींत, दुसरें काय ? ( अंक ६३० पहा. )

( ३६ ) आतां घरीं **जायचें** आहे.

जायाचें आहे—हें संयुक्त क्रियापद, ह्याचा आपण किंवा आम्हांस हा अध्याहृत कर्ता, भावीप्रयोग.

[ ३७ ] इतकें पुरे, आणखी **नको**

पुरे—हें पुर या अकर्मक धातूचें ई–आख्याती तृ० पु० ए० व०, अर्थ वर्तमान किंवा भूत ह्याचा इतकें हा कर्ता, अकर्मक कर्तरि प्रयोग.

नको—हेंही ऊ–आख्याताचें तृ० पु० ए० व०, ( पृष्ठ ४५६ ), वर्तमान, ह्याचा आणखी हा कर्ता, अकर्मक कर्तरि प्रयोग.

( ३८ ) यंदां पावसानें अगदा **पुरं** केलं किंवा पुरेसें केलें.

पुरे—पुर या अकर्मक धातूचें ई–आख्याती तृ० पु० ए० व०, अर्थ ह्याचा कर्ता तो ( पाऊस ) अध्याहृत होय.

पुरेसें—पुरे + असें. ह्यांपैकीं पुरे ह्याचा परिस्फोट वर सांगितल्याप्रमाणें करावा. आणि असें हें केलें या क्रियापदाचें कर्म.

**टीप**—कोणी कोणी पुरें हें कदाचित् क्रियाविशेषण करतील तर तें बरें. मोल्स्वर्थच्या कोशांत हें क्रियाविशेषण म्हणून दिलें असून, त्याचें पुरेत अनेकवचन दिलें आहे. परंतु कोशकारांस पुरे हें पुरणें ह्या धातूचें ई–आख्या-

त्याचें तृ० पु० ए० व० होय आणि पुरत, पुरेत, हीं तृ० पु० अनेकवचनी रूपें होत, आणि हीं रूपें अगदीं नियमितपणें झालेलीं आहेत ( अं० ३८० ; हें समजल नसावें असे वाटतें. एरवीं त्यांनीं पुरेत ह्याची कंसांत पुरा आणि आहेत अशी फोड केली नसती. त्यांस हा शब्द इंग्रजी enough शब्दासारखा दिसला. असो. पुरणें म्हणजे पूर्ण होणें हा धातु इतर आख्यातींही चालतो. जसें:—पुरतो, पुरता, पुरला, पुरेल, पुरो, पुरेल. असें असून, पुरे हें क्रियाविशेषण कां समजावें ?

( ३९ ) खरें **म्हटलें म्हणजे** अशी गोष्ट होऊं नये.

म्हटलें ( **गेलें** )—हें म्हण धातूचें लाख्यातीं तृ० पु० ए० व०, याचा अध्याहृत कर्ता इतका क्षुल्लक आहे कीं, तो जाणण्याची कोणासच गरज नाहीं, खरें हें कर्म, हा नवीन कर्मणि प्रयोग. ‘ खरें म्हटलें गेलें म्हणजे ’ येथें गेलें हें सहाय क्रियापद अध्याहृत आहे. ( सविस्तर खुलाशासाठीं अंक ५८३ व त्याचे मागल्या अंकांतील टीप पहा. ) ‘ खरें पाहिलें म्हणजे ’ या ठिकाणींही ‘ खरें पाहिलें गेलें म्हणजे ’ अशी रचना समजून पदपारिस्फोट करावा.

म्हणजे—हें अर्थात् संकेतदर्शक उभयान्वयी अव्यय, ( पृष्ठ २५४ ).

**टीप**—कोणी कोणी ‘ म्हटलें म्हणजे ’ इतकें सर्व क्रियाविशेषण समजतात. पण हा अडचण टाळण्याचा एक मार्ग होय इतकेंच. यापेक्षां यांत कांहीं तथ्य दिसत नाहीं.

( ४० ) त्याचें **बरें** करायला मी गेलों पण तें त्यास रुचलें नाहीं.

बरें—ह्या विशेषणनामाचें ( बरें हें मूळचें विशेषण येथें हित या अर्थानें नामाप्रमाणें योजिलें आहे ) नपुंसकलिंगी प्र० ए०, प्रथमेचा अर्थ कर्म, करायला या कृदन्ताचें.

तें—हें दर्शक सर्वनाम, प्र० ए० व०, प्रथमेचा अर्थ कर्ता, ‘ रुचलें नाहीं ’ या क्रियापदाचा. ( स्पष्टीकरणार्थ पृष्ठ १६७ पहावें. )

( ४१ ) त्यानें तुला पत्र **पाठविल्यास** मला खपणार नाहीं.

पाठविल्यास—हें पाठविलें या कृदन्ताचें चतुर्थीचें एकवचन, चतुर्थीचा अर्थ हेतु किंवा कारण; किंवा ह्याचे पेक्षांही ‘ संकेत ’ असा चतुर्थीचा अर्थ करणें चांगलें, त्यायोगें ‘ जर पाठविलें तर ’ असा ह्या पदाचा अर्थ स्पष्ट समजेल.

मला---या चतुर्थीचा अर्थ अधिकरण. ( स्पष्टीकरणार्थ पृष्ठ १६७ पहावें ).

टीप---जोशी म्हणतातः---" यांत दोन वाक्यें आहेत. पहिलें नामवाक्य असून त्यास स हा प्रत्यय लागून तें अव्ययवाक्य झालें आहे,...........दोन वाक्य निरनिराळीं केल्यावर पहिल्या वाक्यास लागलेला सामान्यरूपाचा प्रत्यय ' या ' व विभक्तिप्रत्यय ' स ' हे व्याकरण करितांना विचारांत घेऊं नयेत. " पद-परिस्फोटाची काय ही परवड ! यासंबंधानें पूर्वीं पृ० ८४३ सविस्तर ऊहापोह केला आहेच. तेव्हां विस्तार नको. पहिलें नाम---वाक्य त्यास स हा प्रत्यय लागून अव्यय झालें ! वाक्यास प्रत्यय कसा लागतो, आणि त्यास सामान्यरूपाचा ' या ' हा प्रत्यय कसा लागतो, ही भाषाच कशी विचित्र वाटते पहा ! शिवाय ' हे व्याकरण करितांना विचारांत घेऊं नयेत. ' कां तर त्यांची वैयाकरणांस फार अडचण होते किंवा त्यांची त्यांस नीट व्यवस्था लावितां येत नाहीं म्हणून कीं नाहीं ? पण त्यांची योग्य व्यवस्था करण्याचें वैयाकरणांचें काम नाहीं काय ? शिवाय ' त्यानें तुला पत्र पाठविलें ' व ' तें मला खपणार नाहीं ' हीं जीं दोन वाक्यें मूळ वाक्यांत आहेत असें सांगण्यांत येतें तें तरी अर्थास जुळतें आहे काय ? या दोन वाक्यांनीं मूळ वाक्याचा अर्थ पूर्ण व स्पष्ट होत आहे काय ? या दोन वाक्यांमध्यें संकेतदर्शक उभयान्वयी अव्ययानें होणारा अन्वय जो गर्भित आहे, तो ' हे व्याकरण करितांना विचारांत घेऊं नयेत ' असें ज्या अवयवांसंबंधानें म्हणण्यांत येतें ते सोडल्यानें कसा प्रगट होईल ? एवंच तसें केल्यानें त्या गर्भितार्थाची हानि होत नाहीं काय ? तेव्हां अर्थघातक ही चाल यापुढें तरी कोणी न चालो म्हणजे झालें. दुसरें, मला हें ' खपणार यांतील खप धातूचें कर्तृपद ' असें जोशी म्हणतात. यांतील चुकीच्या स्पष्टीकरणार्थ पृष्ठ १६७ पहावें.

( ४२ ) त्याच्या तोंडांतून **नाहीं** कधीं निघालेंच नाहीं.

नाहीं---म्हणजे नाहीं हें भाषण, यावरून ' नाहीं ' या प्रथमेचा अर्थ उद्देश भाषणाकडे, व भाषण हा निघालें नाहीं याचा कर्ता होय, हें उघड आहे.

( ४३ ) खुशालरावानें त्याची **चांगली** उडविली.

चांगली---हें ' फजिती ' या अध्याहृत नामाचें विशेषण. त्याला भले शालजोडींतले बसले, या ठिकाणींही प्रकृत वाक्यांतल्याप्रमाणेंच शालजोडीं-तले ह्याचे पुढें ' जोडे ' हा शब्द अध्याहृत आहे.

( ४४ ) **साधु** तो **साधु** आणि भोंदू तो भोंदू.

अशा ठिकाणीं ' जो साधु होय तो साधु होय आणि जो भोंदू होय तो भोंदू होय ' असा अध्याहार पूर्ण करून पदपरिस्फोट करणें चांगलें; त्या योगें पदपरिस्फोटाचें कामही सुलभ व स्पष्ट होतें.

( ४५ ) अशा कामांत **कांकूं** करणें त्याला शोभत नाहीं.

कांकू—हें मूळचें क्रियाविशेषण, परंतु येथें प्रथमान्त नाम; अर्थ कर्म करणें याचें, कांकूं करणें म्हणजे आढेवेढे घेणें, नाखुषी दाखविणें.

( ४६ ) बडोद्याहून तो **अमदाबाद** येथें गेला.

अमदाबाज—ह्या प्रथमेचा अर्थ उद्देश, येथें या स्थलवाचक क्रियाविशेषणाकडे. येथें = या शहरीं किंवा स्थळीं. अथवा येथें हें शब्दयोगी अव्यय, अमदाबाद याचे पुढें आलेलें. ( पुढील वाक्यांतील टीप पहा. )

(४७ ) **आमच्याकडे** यंदा दुष्काळच आहे, तुमच्याकडे कसें आहे ?

आमच्या—हें सामान्यरूप पुढील कडे ( या सविभक्तिक शब्दाचे योगानें, असें मूळार्थानें; परंतु आतां कडे ) या शब्दयोगी अव्ययाचे योगानें.

कडे—( हें कड ह्या स्त्रिलिंगीं साभान्यनामाचें प्रत्ययाभाव चतुर्थीचें एकवचन, चतुर्थीचा अर्थ अधिकरण. कडे ह्याचें जागीं कडेस असेंही येतें. आमच्या कडेस, तुमच्या कडेस, इ० ). हें शब्दयोगी अव्यय होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**टीप**—याचप्रमाणें आमच्या हिकडे, या जागींही हिकडे, तिकडे यांस आतां शब्दयोगी अव्ययेंच म्हणणें बरें. तसेंच आमच्या येथें, त्यांच्या येथें, गोविंदरावांच्या येथें, तुमच्या येथें, या ठिकाणीं येथें, तेथें, ह्यांसही शब्दयोगी अव्ययेंच म्हणावें. म्हणूनच या सर्वांचा शब्दयोगी अव्ययांत अन्तर्भाव करण्यांत आला आहे, ( अंक २१७ ) मागल्या वाक्यांतील ' अमदाबाद येथें ' या ठिकाणच्या येथें या शब्दासही शब्दयोगी अव्यय म्हणण्यास हरकत नाहीं. त्याचे योगानें ' अमदाबाद ' या नामाचें फक्त सामान्यरूप झालेलें नाहीं. पण विशेषनामांचें सामान्यरूप न करितां त्यांस विभक्तिप्रत्ययही लावण्याची भाषेची नवीन प्रवृत्ति दिसते, ( पृष्ठ ३६९, ३७० ). अमदाबादला, नगराला, पंढरपूरचा, इ० स्थळीं जसें सामान्यरूप नाहीं, त्याचप्रमाणें ' येथें ' या शब्दयोगी अव्ययापूर्वींही नाहीं.

( ४८ ) पत्र **पोचतांच** लिहून यावें, पत्र **पोचतांक्षणींच** इ०.

पोंचतांच—कालवाचक क्रियाविशेषण अव्यय, ( अंक ६१४).

पोंचतांचक्षणींच-- ( अ ) कालवाचक संयुक्त क्रियाविशेषण अव्यय, ( अंक ६१६ ).

( आ ) पोंचत हें पोंचता या कृदन्त-विशेषणाचें सप्तमीचें एकवचन. ह्याचें विशेष्य क्षण, व त्या विशेष्याची विभक्ति विशेषणास लागली आहे. हा येथील पदपरिस्फोटाचा आणखी एक मार्ग दिसतो. विशेष्याची विभक्ति विशेषणास लागलेली मराठी गद्यांत सहसा आढळत नाहीं. त्या नियमास मात्र हें स्थळ अपवादक समजावें लागेल. एरवीं हा मार्गही कांहीं वाईट नाहीं.

टीपः---पोंचतांच यासारख्या शब्दांबद्दल दादोबांचें मत दोन प्रकारचें आहे. "पोंचतांच म्हणजे पोंचलें तोंच; यांतील 'लें' प्रत्ययाचा लोप होऊन व तों च्या स्थानीं तां आदेश होऊन पोंचतांच असें रूप झालें आहे असें दिसतें" दुसरें प्रकारें ते म्हणतात कीं, पोंचे ( हें ग्रंथभाषेंतलें भूतकाळाचें रूप ) तोंच यापासून पोंचतांच हें संक्षिप्त रूप झालें. "परंतु असें मानल्यावर 'धन्यानें हांक मारतांच चाकर उठला' इत्यादि स्थळीं धन्यानें इ० तृतियान्त कर्ता न करितां प्रथमान्त कर्ता केला पाहिजे, म्हणजे 'धनी हांक मारतांच चाकर उठला,' असा बोलण्याचा व लिहिण्याचा शुद्ध प्रघात घातला पाहिजे. तो घातल्यावर अशीच बोलण्याची रूढि जेव्हां पडून जाईल, तेव्हां वरल्या कलमांत दर्शविलेल्या ( येथील पहिल्या ) कल्पनेची विशेष अपेक्षा राहणार नाहीं, ( पृष्ठ ३६१ )" अर्थात् दादोबांच्या दोन्ही कल्पनाच आहेत. त्यांस पूर्वपरंपरेचा कांहींच आधार नाहीं. शिवाय दुसरी कल्पना भाषाप्रचाराविरुद्ध आहे, हें ते स्वताच सांगत आहेत. तरी ती कल्पना टाकावयाची नाहीं; तर त्या कल्पनेशीं जुळेल असा 'बोलण्याचा व लिहिण्याचा शुद्ध प्रघात घातला पाहिजे.' काय ही अरेरावी ! कोण ही भाषेस काल्पनिक वळण लावण्याची हांव ! बरें, 'धनी हांक मारतांच' हें वळण तरी शुद्धसें कशावरून, तर निवळ कल्पनेवरून ! असा जुलूम दादोबांचा चालण्यासारखा वाटला असला तरी तो चालला नाहींच, हें प्रचलित भाषेवरून सिद्धच आहे. आणि आतां असा जुलूम चालण्यासारखा आहे, असेंही कोणास वाटत नाहीं.

( ४९ ) तो न्यायी होत्साता प्रजेचें पालन करूं लागला.

होत्साता—हें संयुक्त कृदन्त असून, तो ह्या कर्त्याचें विधिविशेषण आहे, ( राजवाडे, ज्ञानेश्वरी—व्याकरण, पृष्ट ११७ ).

( ५० ) तसें झालें म्हणजे त्याचें मोठें नांव होईल.

म्हणजे—संकेतदर्शक उभयान्वयी अव्यय, ( पृष्ठ २५४ ).

टीपः—मंजरीकार ' झालें म्हणजे ' यास भूतकालवाचक धातुसाधित अव्यय असें म्हणतात; पण कारण सांगत नाहींत. तेव्हां तसें करण्याचें विशेष कारण नाहीं, हें उघड आहे.

( ५१ ) मी **येईपर्यंत** बैस.

येई—हें ये धातूचें ई-आख्यातीं प्रथम पुरुषाचें एकवचन, अर्थ भविष्य; ( अंक ५९७ ).

पर्यंत—हें शब्दयोगी-उभयान्वयी अव्यय म्हणजे हें शब्दयोगी अव्यय असून या ठिकाणीं दोन वाक्यें जोडीत आहे.

टीप १—पर्यंत, पावेतों, इत्यादि अव्ययांचे पूर्वीं येई हें एकच रूप सर्वत्र येतें, वगैरे खुलासा पूर्वीं ( अंक ५९७ ) केलाच आहे. ई–आख्याताचा वर्तमानकाळ, व भूतकाळ या दोन्ही अर्थानें उपयोग होतो हें प्रसिद्धच आहे. त्याचा भविष्यकाळाचे अर्थानेंही उपयोग होतो, हें वरील उदाहरणावरून कळलेच. शिवाय ह्याचा ' जाशी तरी जाई संतांचिया गांवा ' अशा ठिकाणीं संकेतवाक्यांत उद्देश, हेतु या अर्थी एक उपयोग आढळतो. तोही भविष्यकाळाचे अर्थास धरूनच आहे. कारण कीं, क्रियेचा वर्तमान उद्देश म्हणजे भविष्यकाळचीच क्रिया होय, हें उघड आहे.

टीप २—मंजरीकार ' येईपर्यंत ' हें कालवाचक क्रियाविशेषण अव्यय असें म्हणतात, ( व्याकरणमंजरी पृष्ठ ५८ ). वाक्यपृथक्करणाचे दृष्टीनें हें म्हणणेंही कांहीं अयोग्य नाहीं.

( ५२ ) **गेल्यासारखें** काम झालें तर बरें.

गेल्यासारखें—( अ ) गेला ह्या कृदन्ताचें सारखें या शब्दयोगी अव्ययानें झालेलें गेल्या हें सामान्यरूप, आणि सारखें हें शब्दयोगी विशेषण; ( अंक २१८ व ३६१ ).

( आ ) गेल्यासारखें हें क्रियाविशेषण अव्यय, शब्दयोगी अव्ययान्त शब्द वाक्यमीमांसेचे दृष्टीनें क्रियाविशेषणें असतात, ( अंक २१९ टीप ). तेव्हां हा दुसरा परिस्फोटही चालेल.

( ५३ ) हें नाहीं **आपल्याला** खपावयाचें.

आपल्याला—आपण ह्या प्र० पु० वा० सर्वनामाची सविकरण चतुर्थी, अर्थ अधिकरण.

खपावयाचें--विधिविशेषण. ह्याचें विशेषण ' हें; ' अथवा खपावयाचें नाहीं हें संयुक्त क्रियापद, ह्याचा कर्ता ' हें; ' हा अकर्मक कर्तरि प्रयोग. ( खप धातु रुच धातूप्रमाणें आहे, पृष्ठ १६७ पहा ).

( ५४ ) पुष्कळांस **आपलें** हिताहित **कळत नाहीं.**

आपलें—आपण ह्या आत्मवाचक सर्वनामाचें षष्ठीचें अ० व०.

कळत नाहीं—कळत आहे या अकर्मक धातूचें अकरणरूपीं ई. आख्यातीं तृ० पु० ए० व०, अर्थ अपूर्ण वर्तमान, याचा हिताहित हा कर्ता, अकर्मक कर्तरि प्रयोग. ( कळ धातु रुच धातूप्रमाणें आहे, पृष्ठ १६७पहा).

( ५५ ) मला **मळमळतें.**

मळमळतें—मळमळ या अकर्तृक अकर्मक धातूचें प्रथम ताख्याताचें न० लिं० तृ० पुरुषाचें ए० व०; हा अकर्तृक भावी प्रयोग, ( अंक १८१ व अंक ५६९ पहा ). यांत मळमळणें असा कर्ता समजणें नीट नाहीं.

( ५६ ) मला एक शब्दही **बोलवत नाहीं.**

बोलवत नाहीं—हें ई-आख्यात, अर्थ वर्तमान. याचा मला हा कर्ता, शब्द हें कर्म, शक्य कर्मणि प्रयोग, ( अंक ५६३ ).

टीप—येथें दादोबा म्हणतात—शब्द हा कर्ता ( म्हणजे वास्तविक धातुरूपेश ) व बोलवत नाहीं हें क्रियापद, अकर्मक कर्तरि प्रयोग. ह्यासंबंधाचा सविस्तर ऊहापोह पूर्वी ( पृष्ठ १८३–१९६ ) केला आहे तो पहावा.

( ५७ ) त्याच्यानें अथवा त्याला **जाववतें.**

जाववतें—हें जा या अकर्मक धातूचें प्रथम ताख्यातीं न० लिं० तृ० पुरुषाचें ए० व०, प्रथम ताख्याताचा अर्थ शक्य वर्तमान. ह्या क्रियापदाचा त्याच्यानें अथवा त्याला हा कर्ता, शक्य भावी प्रयोग, ( अंक ५६८ पहा. )

टीप:—येथें दादोबा भावकर्तृक प्रयोग मानितात. यासंबंधानें वरील टीपेंत निर्दिष्ट केलेलाच ऊहापोह पहावा.

( ५८ ) तुला पोळी **हवी** [ व्हावी ] किंवा **नको** ?

हवी ( व्हावी )—हें हो धातूचें वाख्यातीं न० लिं० तृ० पु० ए० व० वाख्याताचा अर्थ विधि किंवा आवश्यकता; याचा पोळी हा कर्ता; अकर्मक कर्तरि प्रयोग.

नको---हें गौण क्रियापद, याचा, पोळी हाच कर्ता; व प्रयोगही तोच.

( ५९ ) मला दूध **पाहिजे.**

पाहिजे---हें पाव ( सं०--प्राप्य, पृष्ठ ४५२ ). या सकर्मक धातूचें ई-आख्यातीं तृ० पु० कर्मणि ए० व०. याचा मला हा कर्ता, व दूध हें कर्म, पुराण-कर्मणि प्रयोग.

( ६० ) मला हें काम करितां **कामा नये.**

कामा नये---अंक ५३० मधील टीपा पहा.

**टीप**---कोणी ' कामा नये ' इतकें गौण क्रियापद करितात, तें अगदींच गैर होय. खेर='कामा=कामास--चतुर्थी, नये हें क्रियापद.' इतकें खेरांचें मत बरें आहे. पण ते म्हणतात कामा नये ह्याचे पाठीमागील वाक्य नये या क्रियापदाचा कर्ता आहे. ' हें काम करितां ' यांत करितां=केलें असतां असें ते सांगतात. पण हें वाक्य नसून वाक्यांग आहे आणि शिवाय तें नये ह्याचा कर्ता कां व कसा हें स्पष्ट नाहीं. जोशी--' करितां हें नाम ये याचा कर्ता.' करितां यास नाम कां म्हणावें ? त्याचा अर्थ करणें असा जोशी समजतात काय ? तसें वाक्यौघाचे दृष्टीनें नीट नाहीं. नसल्यास ' करितां ' या नामाचा अर्थ काय ? प्रस्तुत वाक्यांत एक ' तें ' हा शब्द ' करितां ' या शब्दाचे पुढें अध्याहृत समजला व तो ' नये ' ह्याचा कर्ता होय असें म्हटलें म्हणजे योग्य व्यवस्था लागून सर्व अडचणी दूर होतात, ( पृष्ठ ८६६ ).

( ६१ ) तूं **वर** जाऊन बैठकी **वर वाचीत बस.**

वर ( पहिलें )---स्थलवाचक क्रियाविशेषण, जाऊन यांतील जा या क्रियेचें.

वर ( दुसरें )---शब्दयोगी अव्यय. बैठक या शब्दापुढें आलेलें.

वाचीत -- कृदन्त क्रियाविशेषण, बस ह्या क्रियेचें.

( ६२ ) तो स्टेशनावर **जात असतां,** किंवा **जातांना** मला **दिसला.**

जात असतां---हें कृदन्तात्मक संयुक्त क्रियाविशेषण ( कालवाचक ), दिस धातूचें.

जातांना---हें कृदन्त क्रियाविशेषण ( कालवा० ) दिस धातूचें.

दिसला---दिस या अकर्मक धातूचें लाख्यातीं पु० लिं० तृ० पु० ए० व० लाख्याताचा अर्थ भूतकाळ. ह्या क्रियापदाचा तो हा कर्ता, अकर्मक कर्तरि प्रयोग.

टीप—या प्रयोगासंबंधानें पृष्ठ १६७, १६८ पहा. ' जात असतां ' याचे संबंधानें पृष्ठ ५२८ टीप २ पहा.

( ६३ ) स्थापत्य **शिकावयास** तो विलायतेस **जाणार.**

शिकावयास—शिकावें या कृदन्तनामाची ही चतुर्थी होय, अर्थ हेतु.

जाणार—येथें आहे हा शब्द अध्याहृत असून, जाणार आहे हें संयुक्त क्रियापद आहे. जाणार हें क्रियापद नसून कृदन्त आहे, ( पृष्ठ ५२१ ),

( ६४ ) तो काल हजर **होता.**

होता—हो या अकर्मक धातूचें द्वितीय ताख्याताचें ( अंक ५०७, ५०९ ) पुल्लिंगी तृ० पु० ए० व०; अर्थ भूत, ह्याचा कर्ता तो अकर्मक कर्तरि प्रयोग.

( ६५ ) त्याला मुंबईस **जावयाचें आहे.** [ पृष्ठ ७४४ ].

जावयाचें आहे—संयुक्तक्रियापद. ह्याचा त्याला हा कर्ता. प्रधान-कर्तृक भावी प्रयोग.

टीप—जावयाचें यास आहे ह्याचा कर्ता समजतात. पण जावयाचें हें प्रथमान्त नाम कसें ? यांतील चें हा प्रत्यय नपुंसक कां ? आणि आहे हें असल्या वाक्यांत मुख्य क्रियापद आहे काय ?

( ६६ ) म्हातारी **उडतां नयेचि** तिजला माता मदीशा अशी.

उडतां ( न ) ये—हें संयुक्तक्रियापद. तिजला हा कर्ता, उडतां ( न ) ये हें क्रियापद, भावी प्रयोग. तिला उडतां येतें, हा भावी प्रयोग आहे; कारण ' उडतां येतें ' हें क्रियापद तिला या कर्त्याचे लिंगवचनाप्रमाणें असून, तृ० पु० न० लिं० ए० व० आहे, हें उघड आहे.

टीप—उडतां म्हणजे उडणें असा अर्थ करून, त्यास प्रथमान्त नाम समजून तें येतें ह्याचा कर्ता होय असें जोशी वगैरे म्हणतात. पण जातां, जावें, जावयास, जावयाचें, हीं सर्व प्रथमान्त नामें समजणें व्याकरणास कसें शोभतें कोणास ठाऊक ? जावें ही प्रथमाच आणि जावयाचें ही प्रथमाच! असो. प्रस्तुत स्थळीं तरी तां—कृदन्तास नाम समजून, तें ये धातूचा कर्ता होय असें मानणें प्रशस्त नाहीं. इतकेंच नव्हे, तर साफ चुकीचें आहे; " पुढील उदाहरणांवरून समजेल. त्याला लिहितां येतें, त्याला पोथी लिहितां येते, त्याला हें पुस्तक वाचतां येतें, हा ग्रंथ वाचतां येतो, त्याला हा श्लोक लावितां यतो, " श्लोक लावितां येतात, ही आर्या लावितां येते, ह्या आर्या लावितां येतात, इ०. म्हणजे तां—कृदन्त सकर्मक असतां ये धातूचें रूप त्याचे कर्माप्रमाणें बदलतें हें उघड आहे. यावरून लावितां येणे

वगैरे यांस संयुक्तक्रियापदें समजून, या वाक्यांत कर्मणि प्रयोग आहे असें मानिलेंच पाहिजे हें निर्विवाद नाहीं काय ? असें जर आहे तर 'उडतां येतें' हें सुद्धां संयुक्तक्रियापदच समजावें हें बरें, हें सहज कळेल. विस्ताराची जरूर नाहीं.

( ६७ ) बाजिरावास इंग्रजांना पुणें द्यावें लागलें.

द्यावें लागलें––संयुक्तक्रियापद, याचा बाजिरावास हा कर्ता, पुणें हें कर्म, प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोग.

टीपः––दादोबा, जोशी, वगैरे ह्यांचे मतें द्यावें हा लागलें याचा कर्ता व अकर्मक कर्तरि प्रयोग. पण द्यावें हें नाम कां ? शिवाय पुणें द्यावें लागलें. सातारा द्यावा लागला, वाई द्यावी लागली. या उदाहरणांवरून द्यावें हें विशेषण होय असें ठरत नाहीं काय ? सविस्तर ऊहापोहासाठीं अंक ६२५ चे आधींचा ऊहापोह पहावा. त्यावरून येथील व्यवस्थेचें रहस्य समजेल. तसेंच 'त्याला जावें लागत' येथेंही जावें हें नाम नसून 'जावें लागतें' हें संयुक्तक्रियापद आहे, आणि भावीप्रयोगरचनेस अनुसरून क्रियापदाच नपुंसकलिंगी एकवचन झालें आहे, हें उघडच आहे.

( ६८ ) बापू काल मुंबईस जायचा होता.

जायचा होता––हें संयुक्तक्रियापद, याचा बापू कर्ता, अकर्मक कर्तरिप्रयोग.

टीपः––येथें 'जायचा' हें नाम होता याचा कर्ता असें कोणी म्हणत नाहीं. पण 'बापूला काल मुंबईस जायचें होतें' या ठिकाणीं मात्र जायचें हें नाम. होतें याचा कर्ता असें मानण्यांत येतें. जर वाक्यांत कर्ता व क्रिया एकच आहेत, तर ही विसंगति म्हणजे अव्यवस्थाच नव्हे काय ? तेव्हां असें म्हणणें गैरशिस्त किंवा अप्रशस्त आहे, हें उघड आहे. दोन्ही वाक्यांत बापू हा कर्ता व जाणें ही क्रिया असल्यामुळें केवळ वाक्यरचनेच्या भिन्नत्वानें प्रयोगाभिन्नत्व उत्पन्न झालें आहे. बापू जायचा होता, हा कर्तरी व बापूला जायचें होतें हा भावी प्रयोग होय. दुसऱ्यांतील भावीप्रयोगानें जायचें होतें, ह्याचें नपुंसकलिंगहि स्पष्ट होतें. पहिल्यांत जायचा हें बापूचें विशेषण करून होता, हें एकेरी क्रियापद मानतां येईल. परंतु जायचा होता हें संयुक्त क्रियापद मानणें संगतीस व अर्थास धरून आहे, म्हणून तसें केलें आहे.

( ६९ ) चिंतूला बक्षिस मिळवावयाचें आहे.

मिळवावयाचें आहे––संयुक्त-क्रियापद, याचा चिंतूला हा कर्ता, बक्षिस हें कर्म, आणि प्रधानकर्तृक कर्मणि-प्रयोग.

टीपः—आतां आजपर्यंतची व्याकरणव्यवस्था—किंवा अव्यवस्था—पहा. " बक्षिस मिळवावयाचें आहे, पदवी मिळवावयाची आहे, तोडा मिळवावयाचा आहे, इत्यादि उदाहरणांतील ' मिळीव ' धातूचीं रूपें बक्षिस, पदवी, तोडा, या नामांच्या लिंगवचनाप्रमाणें फिरत असल्यामुळें कोणी कोणी तीं विध्यर्थक विशेषणें मानितात. परंतु आम्हांस असें वाटतें कीं, बक्षिस, पदवी, व तोडा हीं मिळीव धातूचीं कर्में असून, ' अस ' धातूचें कर्तृत्व त्यांच्या ठायीं संभवत नाहीं. म्हणून मिळवावयाचें—ची—चा हेच अस धातूचे कर्ते होत. मिळवावयाचें याच्या ठिकाणीं मिळविणें हा शब्द घालून पाहिला असतां, ज्यास्त स्पष्टीकरण होईल. आतां कोणी कोणी बक्षिस हा कर्ता व ' मिळवावयाचें आहे ' हें सबंध संयुक्तक्रियापद असें मानितात. "—( व्याकरणमंजरी पृष्ठ ७६ ) येथील प्रकार असे. पहिला—बक्षिस हा कर्ता, आहे हें क्रि०, मिळवावयाचें हें बक्षिस ह्याचें विधिविशेषण; यावर टीका वरच्याच उताऱ्यांत आहे. दुसरा-मिळवावयाचें हें प्रथमान्त नाम, आहे ह्या क्रियापदाचा कर्ता. हा मार्ग मंजरीकारांस पसंत आहे. ते म्हणतात—' मिळवावयाचें या ठिकाणीं मिळविणें हा शब्द घालून पाहिला असतां अधिक स्पष्टीकरण होईल ! मिळविणें शब्द घातल्यानें अर्थांत फरक होत नाहीं असें धरून चाललें, तरी मिळविणें हें नाम असणें शक्य आहे म्हणून मिळवावयाचें हें नाम कसें होतें हें गूढच आहे. प्रत्येक नामास स्वतःचें लिंग—वचन असतें; तें या बाबतींत परतंत्र कधींच नसतें. मिळविणें हें कृदन्त तसें आहे. म्हणून तें नाम होण्यास पात्र आहे. परंतु मिळवावयाचें हा शब्द दुसऱ्याच्या लिंग—वचनाप्रमाणें बदलणारा असल्यामुळें म्हणजे तो लिंग—वचनाचे बाबतींत परतंत्र असल्यामुळें नाम होण्यास नालायक आहे, हें सिद्ध होत नाहीं काय ? यापेक्षां विस्तृत ऊहापोह करण्याचें हें ठिकाण नव्हे, व तसें करणें आतां आवश्यहि नाहीं. हा ग्रंथ ज्यानें काळजीपूर्वक समग्र वाचिला आहे, तो तें काम स्वतःच करूं शकेल तिसरा—बक्षिसहा कर्ता व मिळवावयाचे हें संयुक्त क्रियापद. ' मिळवावयाचें आहे' हें संयुक्त क्रियापद मानल्यावर बक्षिस हा त्याचा कर्ता कां व कसा हें स्पष्ट नाहीं. आमच्या मतें तर हें साफ चुकीचें आहे. कर्ता या शब्दाची व्याख्या व संयुक्त क्रियापदांचे विवेचन ही पाहिलीं असतां यांतील चूक कोणासहि समजेल. हे सर्व पाहून व्याकरण म्हणजे एक हातचलाखीच आहे, असें जर कोणास वाटलें तर त्याचा दोष कोणाकडे ? यापुढेंतरी हा घोंटाळा चालणार नाहीं, अशी आशा आहे.

( ७० ) त्यानें मला **पुस्तक** वाचूं दिलें.

पुस्तक—हें ' वाचूं दिलें ' या संयुक्तक्रियापदाचें कर्म; या वाक्यांत त्यानें हा कर्ता असून कर्मणि प्रयोग आहे, ( अंक ५४० खालील ऊहा-

पोह पहा. त्यावरून वाचूं यास नाम मानणें व वाचू हें कृदन्त अव्यय दिलें ह्याचा कर्ता होय असें समजणें, वगैरे प्रचलित हातचलाखीचे प्रकार किंवा कसा तरी निर्वाह करून घेण्याचे मार्ग कां स्वीकारार्ह नाहींत तें समजेल ).

( ७१ ) त्यानें मला **जाऊं दिलें.**

जाऊं दिलें––हें संयुक्तक्रियापद, ह्याचा त्यानें हा कर्ता, मला हें कर्म, भावी प्रयोग. ( सविस्तर खुलासा अंक ५४० खालील ऊहापोहावरून होईल ).

( ७२ ) आईनें मुलास **जेवूं घातलें.**

जेवू घातलें––संयुक्तक्रियापद, ह्याचा आईनें हा कर्ता, अन्न हें अध्याहृत कर्म, प्रधानकर्तृक कर्मणि प्रयोग, ( पृष्ठ ७४४ )

टीप––या ठिकाणीं जेवूं हें नाम समजून त्यास घातलें याचें कर्म म्हणणें चुकीचें आहे, हें भात जेवूं घातला, पोळी जेवूं घातली, लाडू जेवूं घातले, इत्यादि रचनेवरून स्पष्ट होईलच, तसेंच संयुक्तक्रियापदाची आवश्यकता ही कळलेच.

( ७३ ) त्यानें **गेलें पाहिजे.**

गेलें पाहिजे––हें संयुक्तक्रियापद, त्यानें हा कर्ता, भावी प्रयोग, ( पृष्ठ ७२० ).

टीप––जोशी म्हणतात कीं, गेलें क्रियावाचक नाम असून पाहिजे याचा कर्ता आहे. पण ‘ तो गेला पाहिजे, ते गेले पाहिजेत, ‘ ती गेली पाहिजे, इ० ’ ठिकाणीं ते कसें व्याकरण करितात तें कोणास ठाऊक ! या ठिकाणीं कर्तरी प्रयोग असून, ‘ गेलें पाहिजे ’ यांतील नपुंसकलिंग भावी प्रयोगास अनुरूप आहे, हें उघड आहे.

( ७४ ) तुला पुस्तक दिलें पाहिजे.

या वाक्यांत तुला हा कर्ता, पुस्तक हें कर्म, व दिलें पाहिजे हें संयुक्त क्रियापद, कर्मणि प्रयोग; ( पृष्ठ ७२० ).

टीप––या ठिकाणी जोशी म्हणतात कीं, दिलें हें विशेषण पुस्तकाचें, आणि पुस्तक हा पाहिजे याचा कर्ता; त्यानें गेलं पाहिजे, या वाक्यांत गेलें हें नाम, परंतु प्रकृत वाक्यांत दिलें हें विशेषण; म्हणजे अकर्मक धातूचें ला–कृदन्त हें, अशा वाक्यांत नाम असतें; परंतु सकर्मक धातूचे ला–कृदन्त मात्र विशेषण होतें ! बरें, त्यानें बोललें पाहिजे, या ठिकाणीं बहुधा बोललें हें त्यांचे मतें नाम असावें.

आणि त्यानें चार शब्द तरी बोलले पाहिजेत, या ठिकाणीं बोलले हें विशेषण, आणि शब्द हा पाहिजेत ह्याचा कर्ता. तर मग बोलले, आणि दिलें ह्या कृदन्तांचीं कर्में कोणतीं ? शिवाय, ते बोलले पाहिजेत, या वाक्यांत पाहिजेत ह्याचा कर्ता बोल धातूचें कर्म नसून, बोल धातूचा कर्ता व पाहिजेत ह्याचा कर्ता एकच आहे. येथें जोशी यांची कोणती व्यवस्था किंवा अव्यवस्था लागू पडते, तें नीट समजत नाहीं.

( ७५ ) त्याला फार बोलावयास पाहिजे.

या वाक्यांत त्याला हा कर्ता, फार हें कर्म, बोलावयास पाहिजे हें संयुक्त क्रियापद; कर्मणि किंवा भावीप्रयोग. क्रियापद तिन्ही लिंगीं समान असल्यामुळें प्रयोग संदिग्ध आहे.

टीप—बोलावयास हें कृदन्त नाम प्रथमेचें ए० व० हा पाहिजे या क्रियापदाचा कर्ता, असें वैयाकरण म्हणतात. परंतु बोलावयास ही कोण विलक्षण प्रथमा ! ( ७३, ७४, ७५ या तिन्ही वाक्यांसंबंधानें पृष्ठ ७२० मधील पाहिजे यानें बनणाऱ्या संयुक्तक्रियापदांच विवेचन पहावें.

**सूचना**—प्रयोग व कृदन्तें ह्यासंबंधाचें विवेचन व वादग्रस्त मुद्यांसंबंधाचा ऊहापोह या ग्रंथांत सविस्तर केला असल्यामुळें त्यांचीं वेगळीं वेगळीं उदाहरणें येथें देण्याची आवश्यकता नाहीं. तसेंच शब्दांच्या आठ जातींचें निरूपण व विभक्त्यर्थ, आख्यातार्थ व संयुक्तक्रियापदें ह्यांचें स्पष्टीकरण सविस्तर व सोदाहरण झालेलें असल्यामुळें, त्यांच्या परिस्फोटाबद्दल अडचण प्राप्त झाली असतां, ती हजार वांट्यांनीं त्या त्या विषयावरील अध्यायाचे मननपूर्वक वाचनानें दूर झाल्यावांचून राहणार नाहीं. ह्यामुळें ते सर्व अध्याय लक्षपूर्वक वाचण्याची वाचकांस नम्र विनंति आहे.

# परिशिष्ट.

## कर्तृभावसंकर प्रयोग.

कर्तरि, कर्मणि, आणि भावी, या तीन प्रयोगांपासून कर्तृकर्मसंकर, कर्तृभावसंकर, आणि कर्मभावसंकर असे तीन संकीर्ण प्रयोग संभवतात. या तिहींपैकीं ' कर्तृभावसंकराचें उदाहरण कोठेंच आढळत नाहीं. ' असें या ग्रंथांत अंक ५७० मध्यें म्हटलें आहे. परंतु आमच्या टांचणांत अशीं उदाहरणें नमूद केलेलीं मागाहून आढळलीं. ह्यामुळें हें परिशिष्ट निर्माण करावें लागलें. तथापि कधींच नाहीं त्यापेक्षां उशिरां कां होईना; हा कर्तृभावसंकर याच ग्रंथांत पुढें आला हें बरेंच झालें म्हणावयाचें.

**कर्तृभावसंकर**—ज्या प्रयोगामध्यें क्रियापद नेहमीं भावी म्हणजे नपुंसकलिंगीं एक वचनीं असून, शिवाय त्याला कर्तृद्योतक प्रत्यय लागलेला असतो, अर्थात् तें अंशतः कर्तरि व अंशतः भावी असतें, त्या प्रयोगास **कर्तृभावसंकर** असें म्हणतात. जसें:—तूं घरीं जायचें होतेंस, तुम्हीं त्याला मारावयाचें नव्हतेंत, इ० या वाक्यांत **जायचें होतेंस** आणि **मारायचें नव्हतेंत**, हीं जीं संयुक्त क्रियापदें आहेत त्यांजकडे पहा. जायचें होतें, मारायचें नव्हतें, हीं क्रियापदें भावी आहेत, हें उघड आहे. कारण कीं, त्यानें जायचें होतें, तिनें जायचें होतें, त्यांनीं जायचें होतें, इत्यादि उदाहरणांत तें कर्त्याचे लिंग—वचन—पुरुषाप्रमाणें न बदलतां, अगदीं स्वतंत्रपणें तृतीय पुरुषीं नपुंसकलिंगीं एकवचनीं असतें. त्याचप्रमाणें मारायचें नव्हतें हेंही भावी आहे. परंतु वरील वाक्यांत जरी ' तूं घरीं जायचें होतें, तुम्हीं त्याला मारायचे नव्हतें, ' अशा प्रकारें तीं क्रियापदें भावी राहून भावी प्रयोग होतोच, तरी ' तूं घरीं जायचें होतेंस, तुम्हीं त्याला मारायचें नव्हतेंत, असें म्हणण्याचा प्रचारही बराच आहे. या प्रचारांत प्रकृत क्रियापदांचें भावी रूप राहून शिवाय त्यांस द्वितीयपुरुषवाचक कर्त्याचें वचन दाखविणारे **स** आणि **त** हे प्रत्यय लागले आहेत. तेव्हां या वाक्यांतील भावी क्रियापदें अंशतः कर्तरि आहेत; आणि यामुळें या वाक्यांत कर्तृभावसंकर हा प्रयोग आहे, हें उघड आहे.

या प्रयोगांतील क्रियापद नपुंसकलिंगीं एकवचनीं असतें; आणि त्यास द्वितीयपुरुषवाचक कर्ता दाखविणारे **स** आणि **त** हे प्रत्ययही लागत असल्यामुळें त्यांस केवल तृतीयपुरुषीं म्हणतां येत नाहीं; तरी तें मूळचें तृतीयपुरुषींच होय, हें त्याच वाक्यांतील निवळ भावीप्रयोगावरून उघडच आहे. ज्याप्रमाणें कर्तृभावसंकर हा प्रयोग बहुधा द्वितीयपुरुषीं कर्ता असतांना होतो, त्याचप्रमाणें हा कर्तृभावसंकरही कर्ता द्वितीयपुरुषवाचक असतांनाच होतो. आणि द्वितीयपुरुषवाचक तूं हें प्रथमा व तृतीया या दोन्ही विभक्तींत येत असल्यामुळें, आणि तुम्ही ह्या प्रथमेच्या रूपांत व तुम्हीं या तृतीयेच्या रूपांत तरी अन्त्य बिंदूचा फरक असला, तरी उच्चारांत तो फरक फारसा दिसत नसल्यामुळें, या कर्तृभावसंकरांतील कर्त्याची विभक्ति अमुकच होय, असें एकदम म्हणतां येत नाहीं. तथापि 'त्वां घरीं जायचें होतेंस, त्वां त्याला मारायचें नव्हतेंस,' अशीं त्वां ही स्पष्ट तृतीया असलेली उदाहरणें 'तूं घरीं जायचें होतेंस' ह्या तूं या संदिग्धविभक्तियुक्त उदाहरणांचे मानानें कमीच प्रचारांत असल्यामुळें, कर्तृभावसंकरांतील कर्त्याची विभक्ति प्रथमा होय; असें म्हणणें बरें दिसतें. शिवाय या कर्त्याचा क्रियापदाचे रूपावर अंशतः अधिकार चालावयाचा असल्यामुळें; त्याची या ठिकाणीं प्रथमा विभक्ति असणें साहजिक दिसतें. म्हणून कर्तृभावसंकरांत, कर्तृकर्मसंकरांतल्याप्रमाणें, कर्ता हा द्वितीयपुरुषवाचक असून, प्रथमान्त असतो असेंच म्हणणें व्याकरणदृष्ट्या योग्य दिसतें. 'त्वां घरीं जायचें होतेंस' हा प्रयोग 'त्वां मला पुस्तक दिलेंस' (पृष्ठ ७८०) या प्रयोगाप्रमाणेंच अगदीं हिणकस होय.

कर्ता प्रथम पुरुषीं असतां हा संकर कधींच आढळत नाहीं. कर्ता तृतीय पुरुषीं असतां, त्यानें काम केलेंन, या कर्तृकर्मसंकराप्रमाणें 'त्यानें जायचें होतेंन' असा जर प्रयोग ऐकूं आला असता, तर तो झाला असता. परंतु असा प्रयोग होतो असें मुळींच वाटत नाहीं. ह्यामुळें कर्तृभावसंकर हा प्रयोग केवळ द्वितीय पुरुषींच होतो हें उघड आहे. हा सकर्मक व अकर्मक ह्या दोन्ही प्रकारचा आढळतो. उदाहरणें:—तूं त्याला न्यायचें होतेंस, तुम्ही त्यालाही न्यायचें होतेंत, तूं त्या ठिकाणीं बसायचें होतेंस, तुम्ही व्यर्थ कां जागलांत खुशाल निजायचें होतेंत, इ०.

---

# सार्थ-श्रीदासबोध.

---

संपादक व भाषांतरकार.

ह. भ. प. **लक्ष्मण रामचंद्र पांगरकर** बी. ए. मुमुक्षुकर्ते पुणें.

श्रीसमर्थ **रामदास** स्वामींच्या दासबोध ग्रंथाची योग्यता लोकविश्रुतच आहे. **परमार्थ, प्रपंच,** व **राजकारण** यांची सांगड घालून ज्या महापुरुषानें महाराष्ट्राचा सर्व प्रकारें उद्धार केला त्याची ही **दिव्यवाणी** आहे. दासबोध ग्रंथ समजण्यास अति बिकट आहे म्हणून तो सर्वांस कळण्यास साह्य व्हावें या हेतूनें रा. रा. **लक्ष्मणराव पांगरकर,** मुमुक्षुकर्ते पुणें, यांनीं दासबोधाची प्रत शुद्ध करून त्याचें मराठी सुबोध भाषांतरही केलें आहे. प्रत्येय पृष्ठावर वर मूळ व खालीं सरळ भाषांतर असा हा ग्रंथ तयार आहे. डोमगांवची **कल्याणस्वामींची** प्रत धुळेकरांनीं प्रसिद्ध केलीच आहे. कल्याणस्वामींचे बंधु **शिरगांवमठाचे** अधिपति **दत्तात्रय स्वामी** यांच्या हातची शके १६०६ च्या भाद्रमद मासांत लिहून तयार झालेली प्रत ग्वाल्हेरीस जाऊन अक्षरशः तपासून घेऊन व दोन्ही प्रतींचा मेळ पाहून रा. **पांगरकर** यांनीं ही प्रत तयार केली आहे. ग्रंथाच्या प्रस्तावनेंत त्यांनीं दोन्ही प्रतींचा मेळ घातला आहे. व १५० ठळक पाठभेद, ५० लेखन भेद दिले आहेत. ' सांप्रदायिक **मंगलाचरण** ' ही दिलें आहे. असा हा बहुमोल व परिश्रमपूर्वक तयार केलेला ग्रंथ मराठी वाचक प्रेमानें स्वीकारतील अशी आशा आहे. पृ. सं. ७५० सुंदर सोनेरी बाईंडिंग, किंमत ४ रु. व्ही. पी. खर्च ८१० आणे.